# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

( शरीरखंड. )

हा ग्रंथ

श्रीधर व्यंकटेश केतकर; एम्. ए. पीएच्. डी.

यांनीं

मंडळांतील अनेक साहाय्यकांच्या मदतीनें तयार केला.

## विभाग सोळावा

—:*:—

## धम्मपद—नेपाळ

—*—

ज्ञानं राष्ट्रधनं महत्तममिदं ब्राह्मण्यसंरक्षकम् ।
लोके क्षत्रियवैश्यकार्यघटनासौकर्यसंस्थापकम् ॥
कर्तृत्वागमबोधको ननु भवेज्ज्ञानार्थयत्नोऽधुना ।
ज्ञात्वा नागपुरे सुपण्डितजनैःसंघःशुभो निर्मितः ॥

१९२५

मुद्रक—डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनीं ज्ञानकोश छापखाना ८४१ सदाशिव पेठ पुणें येथें छापला.

प्रकाशकः—महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लिमिटेड नागपूर, तर्फे श्रीधर व्यंकटेश केतकर, ८४१ सदाशिव पेठ, पुणें.

नांदेड, नारायणपेठ, निझामाबाद. व डो दें.—नवसरी. रेवा कांठे र.—नखर. व ऱ्हा ड.—नरनाळा, नरगंगा, नांदुरा. म ध्य प्रां त.—नगरधन, ननसरी जमीनदारी, नरखेड, नरसिंगपूर, नागपुर, नांदगांव, नारायणपूर, नावडा. म ध्य हिंदु स्था न.—नदीगांव, नरसिंगगढ संस्थान, नरोद, नागोद, नायगांव रेबई, निझामत-इ-जनुब, निझामत-इ-मग्रीब, निझामत-इ-मश्रिक, निझामत-इ-शिमाल, नीमच. रा ज पु ता ना.—नगरी, नवलगड, नागौर, नांत, नाथद्वार, नादोद, नारायण, नावा, निंबहेर, निमराण. पं जा ब.—नकोदर, नगरकोट, नगरखेडें, नंदन, नदौन इस्टेट, नरनौला, नरवाण, नाभा, नारायणगढ, नारोवाल, नालागड, नाहन, नूरपूर, नूरमहाल. सं यु क्त प्रां त.—नकुर, नगीना, नजीबाबाद, नंदादेवी, नंदिग्राम, नबाबगंज, नरवल, नानपारा, निघासन. बं गा ल.—नडिया, नतोर, नयागढ संस्थान, नरैळ, नलहाती, नवद्वीप, नारायणगंज, नेत्रकोणा. आ सा म.—नागटेंकड्या, नाझीरा. बि हा र ओ रि सा.—नरसिंगपूर संस्थान, नवाडा, नीलगिरी संस्थान. ब्र ह्म दे श.—नंके, नझून, नटमौक, नटोग्यी, नथैंग्यौंग, नपुटा, नह्यकोक, नांग्वान, नामकई. म द्रा स.—नगरमूबेट, नंगराजपट्टण, नंदिगाम, नंदीकोनकूर, नदुवत्तम्, नंद्यल, नन्निलम्, नरसपट्टण, नरसपुर, नरसरावपेठ, नल्लमलियास, नांगुनेरी, नागेरकोइल, नाझारेथ, नामक्कल, निझामपट्टम्, निलगिरी, नुझवीद, नेगापट्टम्. म्हैसू र.—नगर, नंजनगुड, नंदीखेडें, नंदीदुर्ग, नायकनहट्टी, निआमति, निरगुंडा. सी लो न.—नुवरएलिया. वा यव्य स र ह द्द प्रां त.—नथियागली. हिं दु स्था नी बे टें.—निकोबार. स्वं त त्र सं स्था नें.—नेपाळ.

**आशिया हिंदुस्थानेतर**, ऐ ति हा सि क—नादीरशहा ( इराण ), निनोमिय ( जपान ), नुरुद्दिन महमूद ( सीरिया) नूशेखान अदल ( इराण ). प्रा दे शि क.—नष्कि, नसीराबाद ( बलुचिस्तान ), नगरहार सांप्रतचें जलालाबाद (अफगाणिस्तान ), नागासाकी ( जपान ), नाझरेथ ( तुर्कस्तान ) नानकिंग, ( चीन ), नायडस, नायसिआ ( तुर्कस्तान ), निआस ( सुमात्रा ), निकोमेडिया ( तुर्कस्तान ), निकोसिया ( सायप्रस बेट ), निंगपो ( चीन ), निनेव्हे ( सीरिया ), निप्पुर ( बाबिलोनिया ), निशापूर ( इराण ), निसिबस ( मेसापोटेमिया ), वा ङ्म म य च रि त्रें.—नासिरउद्दीन तूसी ख्वाजा, नासिरखुश्रु, निझामी. **यूरोप**, ऐ ति हा सि क.—नार्थक्लिफ लार्ड (इंग्लंड), नार्थब्रुक लार्ड (इंग्लंड), निकोलस झार, नीरो. प्रा दे शि क.—नॅक्सास (ईजियन समुद्र), नॅन्टिस, नॅन्सी ( फ्रान्स ), नामूर ( बेल्जम ), नॉर्थाम्टन ( इंग्लंड ), नार्वे, निझ्निनोव्ह गोरॉड ( रशिया ), निश ( सर्व्हिया ), नीपर नदी ( रशिया ), नीस्टर नदी ( रशिया ), नेदर्लंड, नेपल्स ( इटली ). वा ङ्म य, इंग्रजी, चरित्रें:—नार्थक्लिफ, ज र्म न.—निश्शे फ्रेडरिक.

**आफ्रिका**, प्रा दे शि क.—नाईल नदी ( ईजिप्त ), नाताळ ( दक्षिण आफ्रिका ), नायगेरीया ( पश्चिम आफ्रिका). जा ती.—नँडि, निआमनिआम, नीग्रो.

**अमेरिका**, प्रा दे शि क.—नायगराफाल्स शहर, निकाराग्वा ( मध्य अमेरिका ). जा ती.—नीग्रो.

**शास्त्रें**—यु द्ध शा स्त्र.—नगारा ( नौबत ). वै द्य क.—नाकाचे रोग, नाडीव्रणरोग, नारू. नासापुट पार्श्वग्रंथी, निद्रापस्मार, नीलरक्तपित्त, नेत्ररोग. चरित्रें:—नागार्जुन. व न स्प ति.—नागली, नागवेल, नारळ, निवडुंग. निशोत्तर, नीलकलमी, नीळ. चरित्रें:—नागेली, प्रा णि शा स्त्र.—नागमणि. र सा य न.—नत्र ( नायट्रोजन), नत्राम्ल (नायट्रिक ॲसिड ), नवसागर, निओविअम, निकल, निलीन, निलींय, नीळ, नीळल. चरित्रें:—निप्से, यं त्र शा स्त्र—चरित्रें:—नास्मिथ जेम्स. वा स्तु शि ल्प.—नगररचनाशास्त्र. ग णि त.—निर्णायक. ज्यो ति ष.—नवग्रह, नक्षत्रपद्धति व तारकापुंज. चरित्रें:—नासिरुद्दीन, नीलांबरशर्मा, नीळकंठ धर्मपूरकर, नृसिंह. अ र्थ शा स्त्र.—नाणकशास्त्र. भू शा स्त्र.—नद्या व नाले. सा हि त्य शा स्त्र.—नवरस, नाटकगृहें, नाट्यशास्त्र, नायिका व नायक. चरित्रें:—नाटेकर. शा री र व इं द्रि य वि ज्ञा न.—नाक. का य दे शा स्त्र.—नागरिकत्व. त त्व ज्ञा न.—निराशावाद आणि आशावाद, निसर्गवाद, नीतिशास्त्र. ख नि ज.—नीलमणि. औ द्यो गि क.—निर्वे ( टोकाचीं टोकें ). चि त्र क ला, चरित्रें:—नॉस्ट थॉमस. भा षा शा स्त्र.—नंदभाषा. धा र्मि क व सां प्र दा यि क.—नगारा, नटराज, नंदी, नरक, नरमेध, नवरात्र, नवरोज ( पारशी ), नवविधाभक्ति, नागपंथ, नाथपंथ, नामकरण, नास्तिक्यवाद. चरित्रें:—नंद ( तिरुनलैपोवर ), नरसिंहसरस्वती, नरहरितीर्थ, नरहरि सोनार, नवनाथ, नाट, नाथमुनि, नानक ( शीख गुरु ), नारायण, निकोलस पोप, निंबार्क, निरंजनस्वामी, निवृत्तिनाथ. सं गी त.—नृत्य.

**अक्षरविकास**—न.

---

**धम्मपद**—पाली धर्मशास्त्राचा सुत्तपिटक म्हणून त्रिपिटकापैकीं जो एक भाग, त्यांतील खुद्दकनिकायांतील धम्मपद हा एक पोटवर्ग आहे. याची माहिती ज्ञानकोशाच्या चवथ्या विभागांत ( पृ. २११ ) दिली आहे. यावरील टीकाहि महत्त्वाची असल्यानें तिची माहिती पुढें दिली आहे.

जातक व धम्मपद टीका.—या ग्रंथांच्या बाबतींत वास्तविक टीका व टीकाकार हे दोन्हीहि शब्द अप्रयोजक दिसतात,कारण या दोनहि ग्रंथांमध्यें वास्तविक टीक' म्हणजे पद्यांतील शब्दांचें व्याकरण व व्युत्पत्ति या दृष्टीनें विवेचन, यानें फारच थोडी जागा व्यापिली आहे. आणि बहुतेक ग्रंथ खरें म्हणावयाचें तर गोष्टिरूप प्रवचनें यांनींच भरलेला आहे. आणि बुद्धघोष अथवा ज्या दुसऱ्या कोणी जातकट्ठवण्णना व धम्मपदावरील टीका हे ग्रंथ लिहिले असतील, त्याला केवळ संग्राहक अथवा संपादक एवढेंच नांव देतां येईल. कारण त्याचें काम केवळ हीं प्रवचनें अथवा गोष्टी एकत्र करून संपादन करावयाचें एवढेंच होतें.

धम्मपद टीका.—धम्मपदावरील टीका ही जातक टीकेला पूरक असून बरीच महत्त्वाची आहे, आणि तिच्या-मध्यें जातक टीकेप्रमाणेंच प्राचीन काळीं लोकांच्या आव-डीच्या असलेल्या अनेक विषयांवर गोष्टी असून त्यांपैकीं बऱ्याच गोष्टी भरतखंडाबाहेर जगांतील इतर वाङ्मयामध्यें आढळतात. उदाहरणार्थ, या गोष्टींमध्यें आपणांला हरून-अल्रशीदप्रमाणें रात्रीं शहरांतून फिरणाऱ्या बनारसच्या राजाची गोष्ट, सर्वज्ञ वैद्य यांची काल्पनिक गोष्ट इत्यादि गोष्टी आढळतात. किसागोतमी हिची प्रख्यात गोष्ट आपणांला या ठिकाणीं दृष्टीस पडते. ती आपलें मेलेलें मूल हातांत घेऊन निराशेनें इकडून तिकडे भटकत असतां बुद्धाजवळ येते. तो तिचें मूल जिवंत करण्याचें कबूल करतो,मात्र तिला ज्या घरांत अद्यापपर्यंत कोणीहि मेलं नाहीं अशा घरांतून एक मोहरी घेऊन येण्यास सांगतो. ती विचारी घरोघर जाऊन व्यर्थ शोध करीत फिरते. सरतेशेवटीं तिच्या लक्षांत येतें कीं, बुद्धाच्या मनांतून मरण हें सार्वत्रिक आहे, एवढीच गोष्ट केवळ माझ्या लक्षांत आणून द्यावयाची होती. तेव्हां तिचें समाधान होऊन तिनें बुद्धाच्या संघामध्यें प्रवेश केला, ही गोष्ट पूर्ण परिचित अशा शांतवन कथांतील धर्तीवर रचिलेली आहे. ही गोष्ट जरी लक्षांत घेतली तरी ती खरोखर भरतखंडामध्येंच उत्पन्न झालेली आहे, अशी खात्री होईल. यामुळें जेव्हां आपणांला अलेक्झांडरसंबंधीं दंतकथांमध्यें, सुडोकॅलिस्थेनिस याच्या कांहीं पाठांमध्यें व अरबी, यहुदी, इराणी व कॉप्टिक ( ईजिप्तमधील) अलेक्झांडरसंबंधीं गोष्टीं-मध्यें या गोष्टीसारखीच एक आख्यायिका आढळून येते, तेव्हां प्रस्तुत बौद्ध दंतकथेचाच त्या ग्रीक गोष्टीवर परिणाम झाल्याचा जास्त संभव वाटतो; आणि रोहडे याच्या मताप्रमाणें ही गोष्ट मूळांत ग्रीसमध्यें उत्पन्न झाली असावी, असें वाटत नाहीं. परंतु उदयन आणि वासवदत्ता यांच्या अद्भुत कथेमध्यें प्रद्योत राजा उदयन याला फसवून आपल्या ताब्यांत आणण्याकरितां लांकडाचा हत्ती करून त्यामध्यें ६०योद्ध्यांनां लपवून ठेवितो, ही गोष्ट वाचतांना आपणांला ट्रोजन घोड्याची गोष्ट हिंदुस्थानामध्यें आलेली असून, तिचाच प्रतिध्वनि प्रस्तुत गोष्टीमध्यें उठलेला दृष्टीस पडतो.

या ग्रंथाची रचना (धम्मपदावरील टीकेची) पुढील प्रमाणें आहे. धम्मपदांतील प्रत्येक पद्याबद्दल किंवा पद्यसमूहाबद्दल असें सांगितलें आहे कीं, तें प्रवचन ( धम्मदेसना—याचा अर्थ तें पद्य अथवा तो पद्यसमूह आणि त्याच्याबरोबर सांगितलेली गोष्ट ) बुद्धानें अमुक अमुक ठिकाणीं अमुक एक अथवा अनेक मनुष्यांकरितां अमुक प्रसंगावरून केलें. नंतर एक कथा सांगितलेली असते, आणि तिच्या शेवटीं कांहीं पद्यें दिलेलीं असून नंतर त्यांतील प्रत्येक शब्दावर विवेचन केलेलें असतें. हीं सर्व कथा, पद्यें व शब्दार्थविवेचन प्रत्यक्ष बुद्धाच्या तोंडीं घातलेलीं असतात; सरतेशेवटीं बहुतकरून या प्रवचनानंतर अथवा हीं पद्यें ऐकून, त्या कथेमध्यें संबंध आलेला एक, अनेक अथवा हजारों लोक अथवा भिक्षु पुण्यमार्गास लागले अथवा अधिक पुण्यवान झाले, असें सांगितलेलें असतें. अनेक ठिकाणीं मधून मधून जातक कथाहि सामील केल्या असून त्यांमध्यें त्या कथेंतील नायकाची पूर्वजन्मींचीं कृत्यें अथवा त्याचें भवितव्य यांचें वर्णन असतें. या कथांमध्येंहि अनेक प्रकार आढळतात. कांहीं लांब, पाल्हाळिक कादंबरीवजा असून, कांहीं लहानशा मजेदार गोष्टी एखाद्या पद्याच्या स्पष्टी-करणार्थ मध्येंच अरसिकाप्रमाणें घातलेल्या दिसतात. परंतु कांहीं मनोरंजक–काल्पनिक कथा व गोष्टी तत्कालीन लोकांत प्रचलित असलेल्या वाङ्मयामधून घेतलेल्या आढळतात. या सर्व गोष्टींमधून कर्म या तत्त्वाचें प्रतिपादन केलेलें आढ-ळतें. मोग्गलान याच्या मृत्यूबद्दलची कथा अन्वर्थक असून मनोरंजकहि आहे. कारण तीमध्यें धम्मपदावरील टीकेंतील बऱ्याच गोष्टींप्रमाणें नग्न साधूंबद्दल ( जैन भिक्षु ) विरोध दाखविलेला आढळतो.

हा नग्न साधूंबद्दल विरोध विसाखा हिच्या गोष्टीमध्येंहि दिसून येतो. ही गोष्ट अनेक दृष्टींनीं महत्त्वाची आहे. परंतु तींतील तत्त्वाची परमावधि दाखविण्याचा प्रसंग म्हणजे त्या श्रीमान व सात्त्विक श्राविकेला तिनें पूर्वजन्मांत त्या वेळच्या बुद्धाची पूजा केली होती, म्हणूनच या जन्मांत अतोनात संपत्ति तिला मिळाली होती; आणि या जन्मांत तिनें आपली संपत्ति बौद्ध भिक्षुसंघाला मोठमोठ्या देणग्या देण्यामध्यें खर्च करून टाकली होती व म्हणूनच तिला चांगल्या कर्मांची प्राप्ति झाली होती, असें दाखविलें आहे. कांहीं गोष्टी तर तिपिटकामध्यें आढळून येणाऱ्या गोष्टींचीच पाठांतरें आहेत. उदाहरणार्थ, गोधिक या साधूची गोष्ट घ्या, हा निर्वाणाप्रत जाण्याकरितां आपली मान कापून घेतो. आणि नंतर मार हा त्याच्यासाठीं

विनाकारण शोध करीत असतो. या गोष्टीमध्यें आणि संयुक्तनिकायामध्यें सांगितलेल्या गोष्टीमध्यें फारच थोडा फरक आहे. तथापि जातक ग्रंथाप्रमाणें या संग्रहांतहि मधून मधून विनोदाला अवसर दिला आहे, ही गोष्ट पुढें दिलेल्या हट्टी गाढवाच्या गोष्टीवरून दिसून येईल. ही गोष्ट जातकांच्याच स्वरूपामध्यें असून तिचा थोडक्यांत सारांश असा आहे:—एक व्यापारी कांहीं मडकीं विकण्याकरितां एक गाढव घेऊन वनारसहून तक्षिला शहरीं जातो, तेथें आपला माल विकीत असतां तो गाढवास गांवाबाहेर चरावयास सोडतो. तेथें त्याचें एका गाढवीबरोबर भाषण होतें. तिला या गाढवाला इतके मैल जड ओझें वाहून आणावें लागतें, आणि घरीं गेल्यावर त्याची पाठ आणि पाय चेपण्यास कोणिहि नसतें, म्हणून त्याची फार कीव येते. या भाषणामुळें तो गाढव रागावून बनारसला परत जाण्याचें नाकारतो. चाबकाच्या फटक्यांचाहि कांहीं उपयोग होत नाहीं. अखेरीस त्याच्या धन्याच्या दृष्टीस ती गाढवी पडते; आणि त्यावरून त्याला त्या गाढवाच्या हट्टाच्या कारणाची कल्पना येते, आणि तो त्याला स्त्रीप्रभावानें वठणीस आणण्याचा निश्चय करतो. तो त्याला एक सुंदर गाढवी बायको करून देण्याचें कबूल करतो, तेव्हां तें गाढव आनंदित होऊन मोठ्या खुषीनें धांवत घरीं येतें. परंतु थोड्याच दिवसांनीं जेव्हां तें आपल्या धन्याला त्याच्या वचनाची आठवण देतें, तेव्हां तो म्हणतो कीं, मी माझा शब्द मोडणार नाहीं, मी तुला एक बायको आणून देईन. परंतु मी तुला एकट्यालाच काय तें खावयाला देणार आणि तुम्ही दोन झाल्यावर तें तुम्हाला पुरेसें होईल कीं नाहीं, तें तूं आपलें पहा. तुम्ही दोघे एके ठिकाणीं राहिल्यावर तुम्हांला मुलें होतील, आणि मुलें झाल्यावर तें अन्न तुम्हाला पुरेसें होईल कीं नाहीं तें तूंच आपलें पहा. इतके धन्याचे शब्द ऐकल्याबरोबर त्या गाढवाची बायको करण्याची इच्छा पार मावळून गेली.

**धम्मपाल**—एक बौद्ध ग्रंथकार. यानें थेरी गाथांवर टीका लिहिली आहे. धम्मपाल हा बुद्धघोषानंतर लवकरच होऊन गेला असून तो सिंहलद्वीप.लगतच्याच दक्षिण हिंदुस्थानच्या किनाऱ्यावरील एखाद्या विहारामध्यें रहात असावा. धम्मपाल आणि बुद्धघोष यांच्या दरम्यान फारसा काल गेलेला नसावा. कारण त्यांच्या ग्रंथांमध्यें सर्वत्र एकच मतें प्रतिपादन केलेलीं दिसतात. दोघांनींहि त्याच आधारांचा उल्लेख केलेला आहे; व दोघांची प्रतिपादनाची पद्धतहि एकच आहे. ते दोघेहि बहुतकरून एकाच पंथांतील असून, दोघेहि अनुराधपूर येथील परंपरेपैकींच असावेत. थेरी गाथेवरील या टीकेच्या शेवटीं धम्मपाल यानें तीन जुन्या टीकांचा ( अट्ठकथा ) उपयोग केला असल्याबद्दल लिहिलें आहे. आणि या सर्व टीकांचें महत्त्व याच एका गोष्टीमध्यें दिसून येतें कीं, त्या टीका बुद्धघोष, धम्मपाल अगर दुसऱ्या कोणी अज्ञात ग्रंथकारानें लिहून ठेविल्या, किंवा संगृहित केल्या असल्या, त्या खिस्ती शकाच्या पांचव्या अगर सहाव्या शतकामध्यें तयार झाल्या असल्या ( त्यांचा सर्वांचा काल बहुधा परस्परांपासून फारसा दूरचा नाहीं ) तरी त्या सर्वांमध्यें अतिशय प्राचीन कालची परंपरा कायम राहिलेली दिसते. थेरी गाथांवरील टीकेमध्येंहि बहुधा बराच प्राचीन भाग असावा. उदाहरणार्थ, भद्दा कुंडलकेसा हिच्या गोष्टीवरून आपणांला बुद्ध आणि त्याचे पहिले शिष्य यांच्या वेळीं, निरनिराळ्या मतांचे लोक अनेक विद्वान साधूंबरोबर तत्त्वज्ञानासंबंधीं वादविवाद करून त्यांनां हरविण्यासाठीं ठिकठिकाणीं कसे फिरत असत, याची कल्पना होते.

भद्दा कुंडलकेसा ही राजाच्या जामदाराची मुलगी होती. एके दिवशीं तिनें एका चोराला सुळीं देण्याकरितां नेतांना पाहिलें, व तिचें त्याच्यावर मन बसलें. तिच्या बापानें लांच देऊन त्या चोराची मुक्तता केली आणि तिचें त्याच्यावरोबर लग्न लावून दिलें. परंतु त्या चोराला फक्त तिच्या अंगावरील जवाहिरांची गरज होती, तेव्हां तें लुबाडण्यासाठीं त्यानें तिला एकीकडे नेलें. परंतु त्याचा बेत तिच्या लक्षांत येऊन त्याला आलिंगन देण्याच्या निमित्तानें तिनें त्याला कड्यावरून ढकलून दिलें. परंतु या गोष्टीनंतर तिला बापाच्या घरीं न जावें असें वाटून, ती जैन भिक्षुणी झाली. परंतु तिला जैनाचीं मतें पसंत न पडून ती जेथें प्रसिद्ध विद्वान लोक रहात असत अशा एका ठिकाणीं त्यांच्याशीं वादविवाद करण्यासाठीं गेली. परंतु तिला तिच्या बरोबरीचा कोणी वादविवाद करणारा न आढळल्यामुळें ती फिरत फिरत अनेक ठिकाणीं गेली. प्रत्येक लहानमोठ्या गांवीं गेल्यावर तिनें वेशीशीं एक रामफळीची खांदी पुरावी, आणि त्या गांवांतील मुलांनां सांगावें कीं, जर कोणाची माझ्याबरोबर वाद करण्याची इच्छा असेल, तर त्यानें या खांदीवर पाय द्यावा, आणि असें झाल्यावर त्या मुलांनीं ती बातमी तिला सांगावी. जर ती खांदी एक आठवडाभर तशीच उभी राहिली तर ती घेऊन तिनें पुढें जावें. याप्रमाणें ती सावत्थी शहरीं आली. तेथें सारीपुत्त यानें तिच्याशीं वाद करून तिला बौद्ध बनविलें. बुद्धानें स्वतः तिला दीक्षा देऊन संघांत घेतलें. या टीकेंत जरी कांहीं गोष्टी सुंदर आहेत, आणि अपदानांतील अनेक अवतरणें घेतल्यामुळें ही टीका बरीच महत्वाची आहे, तरी या गोष्टी कांहीं ठिकाणीं अगदीं बालिश व अनेक ठिकाणीं केवळ पद्यांवरून बनविलेल्या दिसतात. मधून मधून त्या इतक्या नीरस आणि चातुर्यरहित दिसतात कीं, थेरी गाथांशीं यांची तुलना केली असतां एकदम रसभंग झाल्याचा भास होतो.

**धरणगांव**—मुंबई, पूर्वखानदेश, एरंडोल तालुका. हा एरंडोलपासून ७ मैलांवर आहे. लोकसंख्या (१९११) १४१७२. मोंगलांनीं हा तालुका जिंकिला त्यावेळेस ( १६०० ) "जिरिफाफ" व "भिरान" या नांवाच्या कापडाकरितां हा प्रसिद्ध होता. येथें १६७४ सालीं इंग्रजांनीं वखार घातली. पुढच्याच

वर्षी हा शिवाजीनें लुटला, व पांच वर्षांनीं (१६७९) पुन्हां एकदां लुटला. स. १६८५ मध्यें संभाजीनें हा तालुका उध्वस्त केला. मराठयांच्या अमदानींत येथें वारंवार भिल्ल लोक लुटालूट करीत असत. हा १८१८ सालीं ब्रिटिशांच्या ताब्यांत आला व १८२५ ते १८३० यांच्या दरम्यान सर जेम्स औटरॅम यानें येथें भिल्ल पलटण उभारली. इ. स. १८४४ मध्यें येथें प्रथम सरकी काढण्याचा कारखाना निघाला. येथें कापूस, जवस, वगैरेंचा बराच व्यापार चालतो. पूर्वी येथील कागद व कापड नामांकित असे. आतां कागद होत नाहीं पण हातमाग चालू असून जाडेंभरडें कापड व लुगडीं काढतात. हल्लीं येथें कापसाचे जीन व प्रेस १०।१२ आहेत. येथें औटरॅमचा बंगला असून पोष्टऑफिस व ४ शाळा आहेत. येथें म्युनिसिपालिटी असून तिचें १८७९ सालीं उत्पन्न ४३८० रु. होतें. [ ग्लाडविन–ऐने–ई–अकबरी; ब्रूस–ॲनल्स पु. २; ऑर्म–हि. फ्रगॅमेंटस. ]

**धरमजयगड**—छोटा उदेपूर संस्थानची राजधानी. हें गांव संस्थानच्या जवळ जवळ मध्यावर असून मांड नदीच्या कांठावर आहे. येथें संस्थानिकाचा राजवाडा, पोलिस ठाणें, शाळा, दवाखाना, तुरुंग ह्या मुख्य इमारती आहेत. [ छत्तीसगड फ्यु. स्टेट्स ग्याझे. ]

**धरमपुर, संस्थान**—मुंबई इलाखा, सुरत पोलिटिकल एजन्सींतील एक संस्थान. क्षेत्रफळ७०४चौरस मैल. उत्तरेस सुरत जिल्ह्याचा चिरवली तालुका व वासदा संस्थान; पूर्वेस सुरगाण व डांग संस्थानें; दक्षिणेस नाशिक जिल्हा; पश्चिमेस सुरत जिल्ह्याचे वलसाड व पारडी तालुके. बहुतेक सर्व संस्थान डोंगराळ व अरण्यमय आहे.

या संस्थानांतून दमणगंगा, कोलक, पार, औरंग व अम्बिका या नद्या वाहतात. पाऊस ७५ इंच पडतो. हवा रोगकारक आहे. ह्या संस्थानास पूर्वी रामनगर म्हणत असत. १५७६ सालीं येथील राजा भडोच येथें अकबराचा प्रधान तोडरमल्ल ह्यास भेटावयास गेला होता. स. १६७२ मध्यें शिवाजीनें रामनगर काबीज केलें तेव्हां तेथील राजा पळून दमण येथें फिरंग्यांच्या आश्रयास गेला होता. १८ व्या शतकांत मराठयांनीं धरमपूरचीं ७२ खेडीं आपल्या ताब्यांत घेतलीं होतीं. वसईच्या तहानंतर धरमपूरचा राजा पेशव्याऐवजीं इंग्रजांस खंडणी देऊं लागला. येथील राजे सिसोदिया वंशांतील आहेत. सांप्रतच्या संस्थानिकाचें नांव महाराणा श्रीविजय देवजी गोहन देवजी असें आहे.

संस्थानांत २७२ खेडीं आहेत. लोकसंख्या (१९२१) ९५१७१. पैकीं शेंकडा ९५ पेक्षां अधिक लोक हिंदू आहेत. या संस्थानांत जंगल २२९ चौरस मैल आहे. मोहाचीं फुलें, सागवान, शिशवीचें लांकूड वगैरे जंगलांतील उत्पन्न आहे. मुख्य पिकें तांदूळ, कडधान्य, चणे व ऊंस आहे. शेतसारा कांहीं नाणें व कांहीं धान्य या रूपांत भरतात. कर्जफेडीकरितां शेतजमीन विकण्याची परवानगी नाहीं.

गां व.—हेंच राजधानीचें मुख्य ठिकाण असून, त्याची लोकसंख्या. ६३४४ असून पैकीं ५३१६ हिंदू आहेत. येथें शाळा, दवाखाने वगैरे आहेत. [ इंपे. ग्याझे. ]

**धनौंदा**—मध्य हिंदुस्थानांतील ग्वाल्हेर रेसिडन्सींतील एक ठाकुरात. क्षेत्रफळ ४१ चौरस मैल. हींत ३६ गांवें असून लोकसंख्या. (१९११) ५५०९. उत्पन्न १०हजार रुपये आहे. [ सेन्सस ऑफ इंडिया. १९११ पु. १७. ]

**धर्मकीर्ति**—एक बौद्ध ग्रंथकार. यानें बौद्धसंगति नांवाचा अलंकारावर एक ग्रंथ लिहिला असून त्यावद्दल अनेक कवींनीं उल्लेख केलेले आहेत. चिनी प्रवाशी ह्युएनत्संग याच्या लेखाच्या भाषांतरांत धर्मकीर्ति हा त्याचा समकालीन होता असें दिसतें; व ह्युएनत्संग इ. स. ७०३ मध्यें मेला. यावरून धर्मकीर्ति इ. स.च्या सातव्या शतकांत झाला असावा.

**धर्मपुरी**—मद्रास इलाखा. सालेमजिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ ९४३ चौरस मैल. या तालुक्याच्या पश्चिम सीमेवरून कावेरी नदी वहाते व वायव्यभागांतून सनत्कुमार नदी वहाते. ह्या दोन नद्यांच्या संगमाजवळ 'होगेनकल' नांवाचा धबधबा आहे. लोकसंख्या (१९२१) २१६१३३. तालुक्यांत खेडीं ५८० आहेत. या तालुक्याचें मुख्य गांव धर्मपुरी हेंच आहे. येथील लोकसंख्या आठ हजारांवर आहे. येथें एक जुनाट किल्ला आहे. [ इंपे. ग्याझे. पु. ११ ]

**धर्म व धर्मशास्त्र**—धर्म शब्दाला हल्लीं इंग्रजींतील रिलिजन या शब्दाचा अर्थ जोडला गेला आहे त्यासंबंधीं विवेचन परमार्थसाधन या लेखांत केलें आहे.

धर्मशास्त्राच्या ग्रंथांत आढळून येणारे जे विधिनिषेधांचे नियम आहेत त्यांस शास्त्ररूप जरी सूत्रकालांत प्राप्त झालें तरी त्या नियमांपैकीं बऱ्याच नियमांचें अस्तित्व बऱ्याच पूर्व कालापासून असलें पाहिजे श्रौतगृह्य आणि धर्म हीं तिन्हीं मिळून कल्पवेदांग होतें.

**धर्म म्हणजे काय.**—श्रौत नियम हाच धर्म होय अशी मीमांसाकारांची वृत्ति होती. धर्म हा शब्द ऋग्वेदांतच सोंवळा झाला होता. त्यांत धर्म म्हणजे यजनविषयक क्रिया व त्यांचीं अंगें असाच अर्थ होता. याला उतारे अनेक देतां येतील. [ स्वाध्याय, वर्ष १ अंक ८ ऋग्वेदांत धर्म. य. रा. दाते ]. धर्म हा शब्द महत्त्व पावला असल्यामुळें हा शब्द आपल्या इष्ट विचारमालेस आणि क्रियामालेस लावून घ्यावा अशी वृत्ति प्राचीन काळीं पौराणिकांनीं तशीच धर्मशास्त्रकारांनीं ठेवली होती. धर्मशास्त्र म्हणून जे उपदेश केले जात त्यांची वेदमूलकता बेताचीच आहे ही जाणीव मनुस्मृतिकारांस होती आणि यामुळेंच "श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः" हें वाक्य मनुस्मृतींत आलें होतें. मीमांसकांची वृत्ति श्रौतधर्म नियमबद्ध करावा आणि तो वेदवाक्यावर अवलंबून ठेवावा आणि इतर सर्व व्यवहार समजून सर्वसामान्य आयुष्यक्रमास वैदिक शब्दाचा बंध नसावा या प्रकारची होती.

पण या प्रकारचें व्यवहारस्वातंत्र्य समाजांत त्यावेळीं रुजलें नाहीं यांचें कारण नेहेमींच्या व्यवहारास कांहीं तरी नियमबद्धता पाहिजे ही भावना होतीच व शिवाय जो वेदांतर्गत स्मार्त धर्म होता त्यासहि जैमिनीच्या विचार-पद्धतीप्रमाणें धर्मांत स्थान नव्हतें. स्मार्त धर्मांचा पगडा लोकांवर होतांच व श्रौतधर्म बुडत चालला असतां व स्मार्त-धर्म हा बऱ्याच अंशीं श्रौतसंक्षेपरूपी असल्यामुळें त्या धर्मास तरी लोकांस बुडूं द्यावयाचें नव्हतें; शिवाय परंपरागत आचारविचार व लोकरीति यांनां जर शास्त्रीय दृष्टीनें स्थान नाहीं तर त्यांचें महत्त्व तरी लोकांस कसें भासणार व तें भासलें नाहीं तर समाजास पूर्वरूढींचें व नियमांचें नियंत्रणहि राह-णार नाहीं, यामुळें धर्म शब्दाचा मक्ता मीमांसाकारांनीं जो तीन अग्नींवरील कर्मांस दिला होता त्याविरुद्ध बंड करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. कदाचित् असेंहि असूं शकेल कीं, धर्म शब्द हा मांत्रसंस्कृतींत व त्याचप्रमाणें सूतसंस्कृतींतहि असावा पण तो निरनिराळ्या अर्थानें असावा. उपनिषत्कालाची धर्म या शब्दासंबंधानें वृत्ति काय असावी हें निश्चित होत नाहीं. धर्म या शब्दा-पेक्षां ब्रह्म या शब्दालाच त्यांनीं अधिक प्राधान्य दिलें आहे व धर्म हा शब्द उपनिषदांत फारच थोड्या वेळां येतो तथापि त्यावेळेस कर्मकांडास अत्यंत कमी महत्त्व देणारे आरण्यकीय ब्रह्मवेत्ते धर्म या शब्दाचें ब्रह्माशीं ऐक्य करण्यास बरेच नाखूष असावेत. "धर्म ही कांहीं चांगली गोष्ट आहे आणि अधर्म ही कांहीं वाईट गोष्ट आहे" इतपत जाणीव छांदोग्योपनिषद् आपल्या सातव्या खंडांत दाखवितें व तैत्तिरीय उपनिषत् "धर्मेचर" (जे धर्मकाम असतील त्यांच्याशीं तसें वर्तावें ) इत्यादि मनो भावना व सत्कर्म यांस प्राधान्य देणाऱ्या भावना व्यक्त करतें (अनुवाक ११ ).

धर्म या शब्दाचा सूतसंस्कृतींत निराळाच अर्थ होत गेला आणि धर्म म्हणजे विशिष्ट कर्म असा अर्थ न घेतां लो. टिळक म्हणतात त्याप्रमाणें मुख्यत्वेंकरून व्यावहारिक नीतिबंधनांस किंवा समाज धारणार्थ निघालेल्या व्यवस्थांस लाविला आहे.

धारणाद्धर्ममित्याहुः धर्मो धारयते प्रजाः ।
यत्स्याद्धारणसंयुक्तम् सधर्म इति निश्चयः ॥

या तऱ्हेचें वाक्य समर्थनार्थहि त्यांनी दिलें आहे व सामा-न्यतः धर्म याचा अर्थ चांगल्या तऱ्हेनें वागणें असा व्यावहा-रिक अर्थ त्यांनीं प्राचीन कालींहि प्रचारांत आणला होता असें भारतांतील उतारे घेऊन दाखविलें आहे. त्यास खुद्द

धर्मेणाधिगतो यैश्च वेदःसपरिबृंहणः ।
ते शिष्टा ब्राह्मणा ज्ञेयाः श्रुतिप्रत्यक्ष हेतवः ॥
( मनु, १२.१०९ )

यासारखे धर्मशास्त्रांतील उतारे जोडतां येतील.

आतां धर्मशास्त्राच्याच घटनेकडे वळूं. धर्मशास्त्र प्रथमतः केवल कल्पशास्त्राचा भाग म्हणून अवतीर्ण झालें. त्यावेळेस प्रचलित सामाजिक रीतींचा आणि वैदिक संस्कृतीचा संबंध जोडून देण्याचा प्रयत्न त्यांत आपणांस स्पष्ट दिसून येतो. एकीकडे प्रचलित व्यवहारास वैदिक संस्कृतीची जोड द्याव-याची व दुसरेकडे त्यांत प्रचलित समाजनीतिस अधिकाधिक स्थान द्यावयाचें व एकंदर व्यवहारास धर्मशास्त्राच्या ताब्यांत द्यावयाचें; या तऱ्हेनें धर्मशास्त्राचा विकास झालेला दिसतो. यासाठीं धर्मशास्त्र आणि कायदेशास्त्र यांची संगति कशी काय वाढत गेली व तिचा ब्राह्मण जातीवर कसकसा परिणाम होत गेला याच्या विवेचनाकडे आपण लक्ष देऊं.

धर्मशास्त्रीय वाङ्मयाच्या वाढीसंबंधानें असें सांगतां येईल कीं पहिलें वाङ्मय सूत्रग्रंथ असून ते सर्वांत प्राचीन होत. त्यांपैकीं फार थोडे उपलब्ध आहेत. त्यांच्या नंतरचे ग्रंथ म्हणजे स्मृतिग्रंथ होत व त्यानंतरचे ग्रंथ म्हणजे त्यांवरील टीका, वृत्ती वगैरे होत. कांहीं निबंधग्रंथहि झाले आहेत. बौधायनाचा ग्रंथ, अस्तित्वांत असलेल्या ग्रंथांत फार जुना आहे असा समज आहे. आपस्तंब आंध्रकालीन ग्रंथ होय, मनु-स्मृतीचा काल अनिश्चित आहे. तो बुल्हरनें ख्रिस्तपूर्व दोनशें-पासून ख्रिस्तोत्तर दोनशें एवढ्या काळांत केव्हांतरी असा ठरविला आहे तर डॉ. केतकर यानीं ख्रिस्तोत्तर २२७ ते ३२० या काळांत घातला आहे. हा काल डॉ. हॉप्किन्स वगैरेंनां मान्य आहे. तथापि दुसऱ्या अनेक संशोधकांस मान्य नाहीं. याज्ञवल्क्य हा मनुस्मृतीनंतरचा ग्रंथकार व पराशर हा अत्यंत अलीकडचा ग्रंथकार असावा. बहुतकरून हा मुसुल-मानी अंमलांतच झालेला असावा. दक्षिणेकडे पराशरावर टीकाग्रंथ लिहून पराशरानें केलेली घाण पुसटून टाकणारा ग्रंथ म्हटला म्हणजे पाराशरमाधवीय होय. याचीच व्यवहार माधवीय ही पुरवणी होय. उत्तरकालीं व्यवहार व आचार-प्रायश्चित्त या दोहोंचें पृथक्करण होऊन निरनिराळ्या प्रका-रचे ग्रंथ झाले आहेत. विज्ञानेश्वराची मिताक्षरा, व्यवहार मयूख, दायभाग इत्यादि पुस्तकें कायद्याकडे अधिक लक्ष देतात, तर निर्णयसिंधु, धर्मसिंधु, शूद्रकमलाकर वगैरे ग्रंथ आचार–प्रायश्चित्ताकडे अधिक लक्ष देतात. कांहीं अर्वाचीन स्मृतीहि केवळ प्रायश्चित्तांचाच विचार करतात. धर्मशास्त्रा-मध्यें कायदा कसा शिरत गेला आणि त्यानें भारतीय कायदेशास्त्रावर कसा परिणाम घडविला इकडे आतां लक्ष देऊं.

**ध र्म शा स्त्र आ णि का य दा.**—कोणत्याहि देशांत काय-देविषयक घडामोडी ज्या होतात त्यांत तेथील संस्था, देशांत जो शासक वर्ग असेल त्याचे या संस्थांसंबंधानें अस-लेले विचार, आणि या विचारांनां अमलांत आणण्यास उप-योगी अशी साधनसामुग्री व उपकरणें या गोष्टी महत्त्वाच्या असतात. ( अमेरिकेंत समाजघटक कायद्याचा जो अर्थ आहे त्या अर्थानें म्हणजे ) शासन संस्थांनां बंधनकारक असणारा कल्पनासमुच्चय या अर्थानें समाजघटक कायद्याचें अस्तित्व भारतांत होतें. तसेंच कायदेकार मंडळें पुष्कळ प्रकारचीं भारतांत होतीं. समाजाचें शासन करण्याच्या संबंधांतील निवक्षित कल्पनांचा संगतवार समुच्चय कसा कसा तयार

झाला याचें आतां विवरण करूं. समाजाचा मार्ग नीट दिसावा व आक्रमिला जावा यासाठीं आपण, पूज्य मानल्या जाणाऱ्या वाङ्मयांत किंवा पूर्वी घडलेल्या घटनेंत एखादी आज्ञेच्या स्वरूपाची अथवा उपदेशाच्या स्वरूपाची कांहीं उक्ति शोधून काढण्याचा प्रयत्न सामान्यतः करीत असतों; अशी उक्ति न सांपडल्यास हितसंबंध हा मुख्य मुद्दा धरून त्याजवर आपण आपली विचारसरणी उभारतों, व या हीनविचारापासून कांहीं आचारनियम ठरविण्याचा प्रयत्न करतों. प्राचीन भारतांत या सर्व पद्धतींचा समाजमार्गदर्शनाच्या कार्यांत उपयोग करून घेतला गेला. सामान्यतः श्रुति, स्मृति, पुराणें यांतील आधार काढून समाजनियंत्रणा करीत असत. श्रुतींमध्यें आज्ञार्थी व विध्यर्थी वाक्यें सांपडतात, तीं व्यवहारनियम म्हणून स्वीकारलीं जात. पण त्यांचा व्यवहाराशीं संबंध कितपत येत असे याबद्दल शंकाच आहे, कांकी मीमांसकांचा प्रयत्न श्रौत-धर्म स्पष्टीकरणार्थ होता. स्मृतींमधील नियमहि याचप्रमाणें उपयोगांत आणीत. पूर्वी घडलेल्या गोष्टी दाखले म्हणून गोळा करण्यासाठीं इतिहासपुराणांचें आलोचन करीत. पुष्कळ बाबतींत या सर्व आधारांकडे अद्यापिहि बघतात, व त्यांची विवक्षित गोष्टीला अनुकूलता आहे कीं नाहीं हें पाहतात. पुराण व इतिहास यांचा अभिप्राय वेदकालीं देखील पहात असत. आज पुराण व इतिहास या नांवानें जे ग्रंथ प्रसिद्ध आहेत ते वेदकाळीं होते, असें केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. परंतु या प्रकारचें कांहीं तरी लिखाण त्या काळीं होतें असें विधान करण्यास जागा आहे. अथर्ववेदांत ( १५. ६, ४ इ. ) व शतपथ ब्राह्मणांत ( १३. ४, ३, १२ ) आणि तीन उपनिषदांत इतिहासपुराण नांवाखालीं येण्यासारखीं लिखाणें पूर्वी असल्याबद्दलचे उल्लेख आहेत. एवढेंच नव्हे तर इतिहासपुराणाला पांचवा वेद म्हटलें आहे. कोणत्याहि लोकांचा विचारविषयक इतिहास तपासून व अभ्यासून त्यांची समाजशासनाची पद्धति आपल्याला नीट समजावी व तिची परंपरा व विकाससरणी लक्षांत यावी असें वाटत असेल तर सदरील इतिहासाचा अभ्यास खालील वर्गीकरणानुसार करण्यांत यावा; ( १ ) सामाजिक संस्थांच्या संबंधाचा, उदा० विवाह वगैरे संस्थासंबंधाचा विचार. ( २ ) राजकीय संस्थाविषयक, उदा० राजधर्म, प्राग्विवाकधर्म ( न्यायाधिशाचा धर्म ), सभाधर्म इत्यादि विचार. (३) आपल्याला मार्गदर्शक होतील असे नियम शोधून काढण्याच्या पद्धतींसंबंधींचा विचार (आधुनिक परिभाषेंत या पद्धतीला कायद्याची पद्धति असें नांव देतां येईल ). ( ४ ) धर्मविषयक गोष्टींशीं संबंध असलेल्या विषयासंबंधींचा विचार, उदा० धर्मसंबद्ध न्यायशास्त्र किंवा वेदाचा अर्थ लावण्याचें शास्त्र.

ज्ञानशाखांपैकीं या वरील सर्व शाखांचा प्राचीन भारतांत बराच विकास झाला होता. परंतु या सर्व शाखांचा अभ्यास केवळ धर्मजिज्ञासेनें होत होता. असो. आतां लॉ किंवा कायदा या शब्दाच्या व्याप्तीसंबंधानें विचार करून 'कायद्याचा इतिहास ' याची व्याख्या ठरवूं.

ऑस्टिनची जी ' कायदा ' शब्दाची व्याख्या आहे ती खरी धरली तर कायद्याचा इतिहास लिहावयाचें हातीं घेतांच ही व्याख्या उपयोगांत आणण्यांत अडचणी उत्पन्न होतात; पूर्वीच्या घडामोडीकडे लक्ष फिरवितांच ऑस्टिनची व्याख्या अडचणी उत्पन्न करते. एखाद्या न्यायाधिशानें एखाद्या चालीला मान्यता देणारा असा निवाडा आज दिला तर तो न्यायाधीश असें कांहीं म्हणत नाहीं कीं, ही विवक्षित चाल मला स्वतःला मान्यता देण्यासारखी वाटते व म्हणून तिला कायद्याचें स्थान मी आपल्या अधिकारानें देतों, अथवा देऊं इच्छितों. न्यायाधीश असें म्हणतो कीं ती चाल अगोदरच कायद्याचें काम करीत होती, त्यानें निवाडा करण्यापूर्वी तिला कायद्याचेंच स्वरूप होतें. या प्रकारची विचारसरणी जर तो न पत्करील तर अस्तित्वांत नसलेल्या कायद्याचा आधार घेऊन त्यानें आरोपी मनुष्याला दोषी ठरविलें किंवा त्याजवरील खटल्याचा निकाल दिला असा अपवाद त्याला लागेल. न्यायाधिशानें निवाडा दिला म्हणजे ज्या चालीचा या निवाड्यांत त्यानें मान्यता दिली असेल ती चाल कायद्याच्या सदरांत येऊन पडते हें खरें; परंतु प्रश्न असा आहे कीं हा निवाडा होण्यापूर्वी ती चाल कायदा होती अगर नव्हती? ऑस्टिनची विचारपद्धति घ्यावयाची तर सदरील चाल निवाड्यापूर्वी कायदा बनली नव्हती असें म्हटलें पाहिजे, मग ती चाल अस्तित्वांत आणणारे लोक तिला कायदा या नांवानें खुशाल संबोधीत पाहिजे तर. ही ऑस्टिनची विचारपद्धति आपण उचलली तर इतिहासलेखनांतच केवळ नव्हे तर आपल्या व्यवहारांतहि जज्जांनीं दिलेले निवाडे सत्ताधारी कायदेमंडळानें स्पष्ट केलेले कायदे व कायदेग्रंथ यांखेरीज मार्गे दाखविण्यास दुसरें कांहींच रहाणार नाहीं. हिंदूंचा कायदा अद्यापि बहुतांशानें 'निवाड्याचा कायदा ' या स्वरूपांत आहे. त्यामुळें हिंदूंच्या व्यवहाराच्या बाबतींत ऑस्टिनपद्धति विशेषच अडचणी उत्पन्न करील. हिंदूंच्या व्यवहाराच्या अशा पुष्कळ बाबी आहेत कीं त्यांसंबंधानें जज्जांचे निवाडे अद्यापि झालेले नाहींत त्यामुळें वरील प्रकारानें हिंदु धर्मशास्त्रांतलि अति पूज्य वचनेंहि कायद्यासदरांत येणार नाहींत व त्यायोगें हिंदु समाजाला तीं बंधनकारक म्हणून समजलीं जाणार नाहींत.

कार्नेगी नांवाच्या एका अमेरिकन कोट्याधिशानें, अमेरिकन कॉंग्रेसनें केलेला विवक्षित नमुन्याच्या व्यापार-संघमंडळांनां बंदी करणारा कायदा उघडपणें धाब्यावर बसविला होता; त्यासारखींच हिंदु धर्मशास्त्रांतील वचनें वरील प्रकारानें धाब्यावर बसविणाऱ्या हिंदूंची स्थिति होणार आहे. सदरील अमेरिकन कोट्याधिशाला कमिशननें त्याच्या बेकायदा वागण्यासंबंधानें प्रश्न विचारतां तो असें म्हणाला कीं, कॉंग्रेसनें केलेला हा कायदा होतो कीं नाहीं हाच मला संशय आहे,

म्हणून मी तो मानीत नाहीं. तो आपल्या बाजूचें समर्थन येणेंप्रमाणें करूं लागलाः आमच्या देशाचें जे वरिष्ठ न्यायकोर्ट, त्यानें अद्यापि या कायद्यासंबंधानें तो राष्ट्रघटनेच्या मूळ सनदेला धरून आहे असें मत दिलेलें नाहीं तेव्हां मी त्याची प्रतिष्ठा काय म्हणून ठेवावी. या कोट्याधिशाला नंतर असें विचारण्यांत आलें कीं, अमेरिकेच्या न्यायखात्यानें ख्रिस्ती धर्मशास्त्रांतील दहा आज्ञा राष्ट्रघटनेप्रमाणें सनदशीर असल्याबद्दलचें मत दिलेलें नाहीं. तेव्हां तुम्ही या आज्ञा स्वतःला बंधनकारक मानतां किंवा नाहीं ? तर तात्पर्य असें कीं, ऑस्टिनच्या विचारसरणीप्रमाणें हिंदु कायद्याचा इतिहास लिहावयाचा म्हटलें तर त्यांत राजांच्या आज्ञा व न्यायकचेऱ्यांचे निवाडे यांखेरीज कांहींच घालतां येणार नाहीं. अर्थात् अशा तऱ्हेचा इतिहास तयार करणें जवळ जवळ अशक्य होईल. कारण यासंबंधाचें आपलें साहित्य फारच अल्प आहे व असा इतिहास लिहिला तरी तो फारसा उपयोगी होईल असें वाटत नाहीं. याप्रकारें ऑस्टिनच्या कायदाविषयक कल्पना शिरसावंद्य मानून कायद्याचा इतिहास लिहावयाचा नाहीं असें कोणीं ठरविलें तर त्यानें कायद्याच्या बाबतींत कोणत्या कल्पनेचा आश्रय करणें योग्य होईल, हा एक प्रश्न आहे. या प्रश्नाचा आतां विचार करूं. कायदे म्हणजे समाज ज्या नियमांनां बंधनकारक मानून पाळतो ते नियम अशी कायद्याची व्याख्या केली तर कायद्याचा इतिहास लिहिणाराला ती बरीच उपयोगाची होईल. या व्याख्येनुसार कायद्याचा इतिहास लिहितांना ऑस्टिनच्या व्याख्येप्रमाणें ज्या नियमांनां कायदे हें नांव लावतां येईल, ते नियम व इतर सर्वसाधारणपणें पाळले जाणारे नियम यांचा उल्लेख वेगळा वेगळा करण्याचा प्रयत्न व्हावा. धर्मशास्त्रांतील नियम इतिहासकारानें द्यावयाचे ते त्याला खरोखरी अंमलांत आणले जाणारे नियम सांपडणें अशक्य होईल तेव्हांच द्यावे. जेव्हां देशाचा कायदा या प्रकारचा शब्दप्रयोग केला जातो. तेव्हां सर्व देश समुच्चयरूपानें आपल्या मनांत असतो. देशाचा कायदा म्हणजे समाजाच्या सर्व बाजूंच्या जीवनाचें नियंत्रण करणारे एकीकृत नियमसमूह. देशांत ज्या संस्था असतील त्या सर्वांनां कायद्याची बाजू असते म्हणून कोणत्याहि देशाचा कायदा पूर्णत्वानें सांगावयाचें पत्करलें म्हणजे या कायद्याच्या बरोबर तेथील सर्व संस्थांचा परामर्शहि लेखकानें घेतला पाहिजे. या रीतीनें कायद्याचा इतिहास याचा अर्थ विशिष्ट देशांतील संस्थांचा व त्या संस्थांचें नियंत्रण करण्यासाठीं नियमावली तयार करतांना झालेल्या बौद्धिक प्रयत्नाचा इतिहास असा होतो. यूरोपांत आणि हिंदुस्थानांत आजवर झालेल्या घडामोडींची परंपरा जर आपण अवलोकिली तर आपणांस असें दिसून येईल कीं, व्यवहारांत राजकीय सत्तेचा अधिकार सारखा वाढत चाललेला आहे. एकंदर समाजशासनाचे आजचे कित्येक नियम जुन्या काळापासून चालत आलेले तेच आहेत. तथापि फरक असा आहे कीं, या नियमांपाठीमागें जी सत्ता पूर्वी होती ती राजकीय सत्तेव्यतिरिक्त अशी होती व आज मात्र त्यांच्या पाठीमागें राजकीय सत्ता आहे. पूर्वी ज्या गोष्टींनां राजकीयेतर सत्तेचें पाठबळ लागत असे त्यांनां आज राजकीय सत्तेचें पाठबळ लागतें. राजा ज्या नीतिनियमांनां मान्यता देण्याची लोकांवर सक्ति करील ते नीतिनियम म्हणजे कायदे अशी कायद्याची व्याख्या केल्यास इतिहास हा निरनिराळ्या धर्ममतांसंबंधानें व धर्मरूढींसंबंधानें निरनिराळ्या राजांनीं लोकांवर त्यांनां मान्यता देण्याची सक्ति करण्याचा कितपत आग्रह धरला अथवा धरला नाहीं यासंबंधाचा इतिहास होणार आहे.

सामान्यतः हिंदु कायद्याचा इतिहास या विषयाचे तीन विभाग होतीलः— (१) संस्थांचा इतिहास, (२) कायद्याशीं संबद्ध असा बौद्धिक व्यापाराचा अथवा तर्कशास्त्राचा इतिहास व (३) मनुष्याच्या जीवनक्रमावर राजकीय सत्तेचा अधिकार कसा वाढत गेला आहे त्याचा इतिहास.

आतां आपण धर्म व कायदा या गोष्टींमधील साम्यें व भेद काय आहेत ते पाहूं. या दोन गोष्टींमधील भेद आपल्या लक्षांत आले म्हणजे कायद्याचा इतिहास तयार करतांना धर्मग्रंथांचा आपल्याला कितपत उपयोग होईल हें आपणांस ठरवितां येईल.प्रथम आपण साम्यें पाहूं.(१) धर्म व कायदा हे दोन्ही प्रकारचे नियम प्रपंचांतील अथवा व्यवहारांतील नियम आहेत. (२) दोन्ही नियम निश्चित ठिकाणांहून घ्यावयाचे असतात. (३) दोन्ही नियम वाढावयास विशेष सिद्धीच्या व सामान्य सिद्धीच्या विशिष्ट तर्कपद्धती उपयोगांत आणाव्या लागतात. (४) दोन्ही नियमांत समाजव्यवस्थेच्या व लोकभावनांच्या फेरफारामुळें आणि त्या त्या काळच्या विचारसरणीमुळें बदल होत असतो. (५) धर्म व कायदा या दोहोंनांहि जी सत्य गोष्ट असेल किंवा ठरेल ती मान्य करावयाची असते. सत्यासत्य ठरविणें हा प्रश्न इतर शास्त्रांचा आहे. सत्यनिर्णयार्थ धर्म व कायदा या दोघांनांहि या इतर शास्त्रांवर अवलंबून रहावें लागतें. तार्किक अथवा सामाजिक सत्य हें ठरवावयाचा धर्म अथवा कायदा या दोघांनांहि अधिकार नाहीं. (६) धर्म व कायदा दोन्ही नियमसमूह संघरूप आहेत. या नियमसंघांतील नियमांत बरीच परस्पर संगति ठेवलेली असते. कायद्यांत अथवा धर्मांत कोठेंहि नवीन कल्पनेचा अंतर्भाव करावयाचा तर ती कल्पना अगोदर असलेल्या नियमसंघांत सुसंगतपणें बसवितां आली पाहिजे. तशी ती बसली तरच ती समाजशासनाचा एक भाग होऊं शकेल.

याप्रमाणें धर्म व कायदा या नियमसंघांचीं साम्यें दाखविलीं. हे नियम निश्चित ठिकाणांहून उद्धृत करावयाचे असतात असें वर सांगितलें. आतां यासंबंधांत येथें हें स्पष्ट केलें पाहिजे कीं, दोघांचीं उगमस्थानें निश्चित असलीं तरी तीं एकच असलीं पाहिजेत असें नव्हे. व्यवहारांतील

कायदा याचा 'रूढ असलेल्या चाली' असा अर्थ आहे. हा कायदा समाजाच्या घडामोडींतून व या घडामोडींच्या वर्णनपर कागदपत्रांतून शोधून काढावा लागतो. याच्या उलट धर्म याचा अर्थ चालीरीती कशा असाव्या तें ठरविणारीं मूलतत्त्वें असा असून हा तत्त्वरूप धर्म फार पूज्य गणल्या जाणाऱ्या विचारसंग्रहांतून शोधून काढावा लागतो. धर्म या सदरांत घातलेल्या विचाराचा थोडासाच अंश कायद्यांत अंतर्भूत झालेला आढळतो. उलटपक्षीं, कायदा म्हणून मानल्या जाणाऱ्या कित्येक रूढींचें धर्मप्रतिपादक ग्रंथांत नांवनिशाणहि आढळत नाहीं. असो. आतां धर्म व कायदा यांजमधील भेदांकडे वळूं. धर्म व कायदा यांजमध्यें भेद पुष्कळ आहेत व त्यांची कारणेंहि अनेक आहेत.

(१) कांहीं भेदांचें कारण असें आहे कीं या प्रत्येक शब्दांत ज्या निरनिराळ्या अर्थांच्या छाया आहेत त्या अर्थ छायांचा विचारावर पडलेला परिणाम. धर्म याचा स्वभाव असा एक अर्थ आहे. स्वभाव म्हणजे जन्मगुण, जन्माबरोबर घातलेला गुण. यावरून धर्म हा उत्पत्तीवरून ठरविण्याचा परिपाठ पडला.अर्थात् धर्म ठरविण्याच्या कामीं इतिहासांतील, पुराणांतील व प्राचीन कायदेग्रंथांतील विश्वोत्पत्तिविषयक अथवा विशिष्ट वस्तुनिर्माणविषयक कथा आणि श्लोक यांचा उपयोग होऊं लागला.

(२) धर्म व कायदा यांच्यामागें असणारीं शासनें किंवा मान्यताप्रवर्तक कारणें निरनिराळीं आहेत.कायदा पाळावयाचा तो राजनिर्मित न्यायकचेऱ्यांकडून होणाऱ्या शिक्षा टाळण्याकरितां पाळावयाचा असतो. धर्म पाळावयाचा तो परलोकींचीं दुःखें टाळण्यासाठीं, आत्मतुष्टीसाठीं किंवा कोणत्याहि फलाची अपेक्षा न करतां ती एक स्वभावतः कल्याणमय गोष्ट आहे म्हणून पाळावयाचा असतो

(३) धर्मांचा अंमल समाजांत करावयाचा तो राजसत्तेची प्रत्यक्ष मदत न घेतां करावयाचा असें धोरण असे. धर्म काय आहे हें सांगणारे व धर्मांचा अंमल करणारे वेग वेगळे असल्यानें धर्मग्रंथ लिहिण्याची तऱ्हा कायदेग्रंथाच्या तऱ्हेहून निराळी असे. धर्मानें समाजाचें नियमन करून त्याला वळण लावावयाचें तें सत्तेच्या जोरावर लावावयाचें नसून अप्रत्यक्ष रीतीनें लावावयाचें असल्यानें राजे लोक व प्रजाजन यांच्यांमध्यें धर्मासंबंधानें तीव्र कर्तव्यभावना जागृत करणें जरूर होतें. व ही जागृति ग्रंथांच्या द्वारांच करणें अवश्य होतें.या कारणानें धर्मांचें प्रणयन करणाऱ्या लोकांनीं खालील गोष्टी केल्या.(अ) धर्माची हेटाळणी केली असतां अमुक दुष्परिणाम होतील असें बयाहवार सांगून धर्माबद्दल लोकांच्या मनांत आदरभाव वाढविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. (आ) ब्राह्मण हा न्यायाधीश नेमला जावा या मताचा त्यांनीं आग्रहानें पुरस्कार केला. (इ) ब्राह्मणाच्या पूज्यतेसंबंधानें त्यांनीं लांबलचक निरूपण केलें. ब्राह्मणाला त्यांनीं धर्माचा अवतारच करून ठेवलें होतें. (ई) वेद हे पूज्य आहेत, ते नित्य आहेत व तेच धर्माचे मूळ आहेत असा सिद्धांत दृढतेनें प्रस्थापित करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. (उ) ब्राह्मण वर्ग हा विशेष हक्क उपभोगणारा वर्ग करून ब्राह्मणांच्या या विशेष हक्कांचें अत्युक्तिपर विवेचन व समर्थन त्यांनीं केलें. हेतु हा कीं, आहेत त्यांहून अधिक हक्कांचा पाढा वाचला म्हणजे कांहीं हक्क तरी लोक कबूल करतील; तपशिलाचें बाड पुढें केलें म्हणजे तत्त्व तरी गळीं उतरेल. (ऊ) कांहीं तत्त्वांची पूज्यता प्रस्थापित करण्यासाठीं त्यांनीं रूपकात्मक उत्पत्तिकथांचा उपयोग केला. उदाहरणार्थ त्यांनां इष्ट अशी समाजव्यवस्था कायम राखण्यासाठीं त्या व्यवस्थेची उत्पत्तिकथा देतांना तिच्यांत अवश्य त्या रूपकाची योजना त्यांनीं केली. कांहीं शब्दांची उत्पत्ति देखील त्यांनीं आपल्या कल्पनेनें विलक्षण प्रकारची ठरविली. उदाहरणार्थ मांस या शब्दाची व्युत्पत्ति मा + अश् (खाऊं नका) अशी सांगितली आहे. (ऋ) आपण लिहिलेलीं पुस्तकें प्राचीन काळीं होऊन गेलेल्या पूज्य माणसांनीं रचलीं आहेत असेंहि त्यांनीं सांगितलें.

(४) धर्म हा केवळ लोकांनां अमुक कर्म योग्य, अमुक कर्म अयोग्य अशी सल्ला देणारा होता. धर्मांचे पुष्कळ नियम केवळ वैयक्तिक उपयोगाचे होते. हे नियम कायद्याचे म्हणूनच पुष्कळ लोक पाळीत. हे नियम पाळलेच पाहिजेत अशी कांहीं राजाची अथवा कायद्याची सक्ति नसे. उलटपक्षीं अनेक व्यवहारांगांसंबंधानें कायदा अथवा राजाज्ञा यांचा लोकांपाठीमागें लकडा असे, पण या व्यवहारांच्या बाबतींत धर्मग्रंथांत कोठें उल्लेखहि नाहीं. ब्राह्मणांच्या हातांत समाजाचा सामान्य व्यवहार नियंत्रित करण्याची सत्ता जशी अधिकाधिक येत गेली तसतशी ब्राह्मणी धर्मनियमांची संख्या वाढत गेली हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. न्यायनिवाड्यावर ब्राह्मणांची सत्ता वाढली तशा धर्म हा आजच्या दृष्टीनें कायद्याचें रूप धारण करूं लागला. जसजसें कालदृष्ट्या अलीकडे येत जावें तसतसें धर्म व कायदा यांमध्यें अधिक सादृश्य उत्पन्न झालेलें दिसतें. धर्म हा शासनांपेक्षां म्हणजे कायद्याच्या भाषेंत, प्रासंगिक कायद्यापेक्षां श्रेष्ठ मानलेला आहे. शासनें, म्हणजे प्रासंगिक विशेष बाबींसंबंधाचे कायदे एकत्र केले म्हणजे कायदेशास्त्र तयार होतें असें मात्र नाहीं. कायदेशास्त्र व शासनसंग्रह यांत पुष्कळच अंतर आहे. धर्मनियमांचें शास्त्र आहे व शासनें हीं स्वतंत्र प्रासंगिक आज्ञांच्या स्वरूपाचीं आहेत. पोटनियम किंवा पोलिसांचे नियम यांच्यासारखेंच शासनांचें कार्य व स्थान आहे. इंग्रजी कायद्यांत पार्लमेंटचे ॲक्ट वगैरे इंग्रजी दरबारानें केलेले स्वतंत्र हुकूम (शासनें) एकत्र केलेले आहेत. सामान्य रूढींचा कायदा, तात्त्विक न्याय, आणि न्यायाधीशांनीं ठरविलेले कार्यवाहीचे नियम यांच्या दृढ सूत्रानें सदरील स्वतंत्र शासनांचा एकजीव करून इंग्रजी कायदेशास्त्ररूपी व्यवस्थित नियमसंघ तयार केलेला आहे. तरी पण इंग्रजी कायद्यांत अशी कल्पना नाहीं कीं,

पार्लमेंटनें केलेले कायदे हे न्यायाधीशांनीं दिलेल्या निवाड्यांहून वगैरे कसी दर्जाचे व अधिकाराचे समजले जावे. एका बाजूला धर्मशास्त्र व शासनें आणि दुसऱ्या बाजूला पार्लमेंटचा कायदा व पोटकायदे यांची तुलना करतांना खालील भेद नजरेस येतात. राजे लोक शासनें काढतांना धर्मशास्त्राला आपल्या इच्छेप्रमाणें कमी अधिक मान्यता देत. उलटपक्षीं म्युनिसिपालिट्यांनीं पोटकायदे करावयाचे ते करतांना पार्लमेंटच्या कायद्याला पूर्ण मान्यता दिलीच पाहिजे असा नियम आहे. राजे लोक धर्मशास्त्राचा मुख्य भाग आपल्या शासनांत अंतर्भूत करीत परंतु त्यांतील तपशिलवार नियमांना ते सर्वथा मान्यता देत नसत.

कायदा व धर्म यांच्यामध्यें वर सांगितल्याप्रमाणें कांहीं सारखेपणा व कांहीं वेगळेपणा आहे. या साम्यांतून व भेदांतून कायदेपद्धतींच्या इतिहासग्रंथांची रचना कशी करावी या संबंधींची मूलतत्त्वें आपणांस काढतां येतात. ज्या बाबतींत धर्माचें आणि कायद्याचें साम्य आहे त्या बाबतींत धर्माचा इतिहास हाच कांहीं अंशानें कायद्याचा इतिहास होईल. परंतु धर्मग्रंथांतील नियम आणि व्यवहारांतील वागणूक यांत निरनिराळ्या काळीं कमी अधिक अंतर असल्यानें, त्या त्या काळीं त्या त्या संस्थानांत धर्मांत अदृष्ट असे आचार कोणते होते तें ठरवून कायद्याच्या इतिहासांत त्यांचा समावेश आपणांस करावा लागेल. ‘ जातींचा इतिहास ’ या पुस्तकांत डॉ. केतकर यांनीं धर्माचा विवक्षित आदेश हा कायदा या सदरांत कितपत येत होता, त्याला लोकांत मान्यता कितपत मिळत होती हें पाहण्यासाठीं काय करावें तें सांगितलें आहे. वरील गोष्टीचा उलगडा करण्यासाठीं धर्मग्रंथांतील वचनें नीतिग्रंथांतील वचनांशीं ताडून पहावीं, तसेंच नाटकें, शिलालेख, ताम्रपट वगैरे खोदलेख आणि परकीय प्रवाशांचे वगैरे प्रवासग्रंथ यांत स्पष्ट होणाऱ्या त्या त्या काळच्या सामाजिक गोष्टींशींहि धर्मवचनांची तुलना करावी. धर्मग्रंथांतील आज्ञा लोक कांहीं सरसकट मानीत नसत, या आज्ञांच्या मान्यतेला लोकांत पुष्कळ मर्यादा असे. उदाहरणार्थ, ब्राह्मणांनींच फक्त न्यायाधिशाचें काम करावें, न्यायकचेऱ्यांतून न्यायाधिशाच्या मदतनीस सल्लागाराचें काम ब्राह्मणांनींच करावें, हे धर्मांत सांगितलेले आदेश पाळले जात नसत. न्यायाधिशाचें काम ब्राह्मणेतराहि करीत व सल्लागार क्वचितच ब्राह्मण असे. याचप्रमाणें ब्राह्मणास देहान्तशासन देऊं नये या आदेशाची गोष्ट आहे. क्षत्रियेतर देखील पोलिसांत व लष्करांत मोठ्या जाग्यांवर भरती होत हेंहि धर्माज्ञांच्या मान्यतेला मर्यादा असत या गोष्टीचें एक आणखी प्रमाण आहे. कायद्यानें जीवनक्रमाच्या ज्या इतर बाबींचें नियंत्रण होतें त्या बाबींच्या संबंधानेंहि संशोधन केलें असतां जुन्या काळच्या वस्तुस्थितीवर पुष्कळ प्रकाश पडणार आहे.

संशोधन करतांना खालील गोष्टींकडे विशेष लक्ष द्यावें. ( १ ) राजे लोक धर्मांतील कोणता भाग लोकांकडून सक्तीनें करवून घेत असत. धर्मप्रणेते आपल्या आदेशांपैकीं कोणते आदेश राजांनीं अंमलांत आणावे असें इच्छीत. ( २ ) धर्मशास्त्रकार कांहींच उल्लेख करीत नाहींत परंतु राजे लोक मात्र नियंत्रणा करतात अशा बाबी जुन्या काळीं कोणत्या सांपडतात. ( ३ ) धर्मवचनांप्रमाणें राजे लोक वागत तेव्हां या वागण्याला मर्यादा कोणत्या असत. हे संशोधनमार्ग ध्यानांत ठेवून जर आपण धर्मग्रंथ तपासले व त्यांतील विधींची आणि निषेधांची राजांच्या शासनांशीं ( फर्मानांशीं ) तुलना केली तर त्या त्या राजांच्या राज्यांत अथवा संस्थानांत धर्मग्रंथांतील कोणत्या भागाला कायद्याचें स्थान दिलेलें होतें हें कळून येईल. वर जीं शासनें सांगितलीं त्यांपैकीं कांहीं शासनें अद्यापि उपलब्ध होतात. खोदलेख जे गोळा झाले आहेत व प्रसिद्ध केले आहेत त्यांत निरनिराळ्या जुन्या राज्यांतील खरा कायदा थोडाबहुत आलेला आहे.

वरील प्रकारची तुलना धर्मशास्त्रांतील कोणत्या तात्त्विक वचनांना ‘ करावें ’ च्या अथवा शिफारशीच्या वर्गांत घालावयाचें व कोणत्या वचनांना ‘ केलें पाहिजे ’ च्या अथवा सक्तीच्या हुकमाच्या सदरांत घालावयाचें हें स्पष्ट करण्याच्या कामीं फार उपयोगाची आहे. धर्मशास्त्रांत ज्यांचा उल्लेखहि नाहीं असे कित्येक कायदे खोदलेखांत आपणांस पहावयास मिळतात. एकंदर राजकीय इतिहासाच्या अभ्यासकांनीं खोदलेखांचा उपयोग थोडाफार केलेला आहे; कायद्याच्या अभ्यासकांनीं तितकाहि केलेला नाहीं. खोदलेखांच्या अभ्यासानें राज्याराज्यांत व निरनिराळ्या काळीं कायदे कसे भिन्न भिन्न असत हें आपणांस समजेल. तसेंच ‘ हिंदुस्थानचा समाज हा चैतन्यशून्य स्थावरासारखा स्थिर आहे, त्याचे कायदे व त्याची संस्कृति ही गतिशून्य आहे ’ अशा प्रकारचीं मौल्यवान मतें बरळणारांच्या व खरडणारांच्या जिव्हेला व लेखणीला खोदलेखांसारख्या दस्तऐवजांच्या बारीक तपासणीनें चांगलाच आळा बसेल. खोदलेख हे परकीयांनीं आमच्या संस्कृतीवर घेतलेले आक्षेप खोडून काढण्यास मदत करतात एवढ्या एकाच दृष्टीनें त्यांचें महत्त्व आहे असें नाहीं. अन्य व्यावहारिक कारणांसाठींहि त्यांचें मोठें महत्त्व आहे. ते कायद्यासंबंधींच्या आजच्या ज्या आपल्या कल्पना आहेत त्यांतील दोष काढून टाकतील व या रीतीनें आमच्या प्रगतीस साहाय्य करतील. धर्मशास्त्रांतील कांहीं नियमांचा आज कायद्यासारखा अंमल केला जात आहे याचें कारण जुन्या काळींहि त्यांना आजच्या अर्थानें कायद्याचें स्थान होतें ही समजूत आहे. आपणांस जर असा शोध लागला कीं हे नियम जुन्या काळीं कायदे समजले जात नव्हते, तर आजच्या कायद्यांच्या बाबतींतील आपल्या कल्पना खास बदलतील. धर्मशास्त्रांतील नियमांना विरोधी अशा ज्या आपल्या आजच्या न्यायाच्या कल्पना व चालीरीती असतील त्यांना आज कायद्याचें स्थान मिळण्यास, जुन्या काळीं हे धर्मनियम शास्त्रांच्या दृष्टीनें निरपवादपणें

बंधनकारक होते हीं समजूत आड येते. ही समजूत चुकीची आहे असें दाखवितां आल्यास सदरील कल्पना व चाली आज कायद्यांत प्रविष्ट होणें अधिक सुलभ होईल.

आमचा वकीलवर्ग धर्मशास्त्रांतील शब्दांवर वाजवीपेक्षां अधिक भिस्त ठेवून वागतो ही दुर्दैवाची गोष्ट आहे. धर्मशास्त्रकार विवक्षित विधिनियमाच्या अथवा निषेधनियमाच्या बाबतींत फार कडक शब्द वापरीत आहेत, व पुष्कळ धर्मशास्त्रकारांचें त्यांतील पुष्कळशा तपशिलांसंबंधानें ऐक्यमत आहे असें आमच्या वकीलवर्गाला आढळून आलें कीं, त्या नियमाचा वेगळया तऱ्हेनें अर्थ लावणें किंवा त्याला थोडेंसें बाजूला ठेवणें ही गोष्ट त्याला अशक्य होऊन जाते. परंतु या वकीलवर्गाला जर असें कळतें कीं, हिंदु राजे व त्यांचे सल्लागार जुन्या काळीं धर्मातील विधिनिषेधांप्रमाणें तंतोतंत वागत नसून किंवा लोकांस वागावयास भाग पाडीत नसून त्यांच्या पुष्कळ आंतबाहेर स्वतः वागण्याची व लोकांस वागूं देण्याची त्यांची वहिवाट होती, तर हा वकीलवर्ग धर्मशास्त्रकारांच्या वचनांचा अर्थ लावतांना व त्यांचा अंमल करतांना आजच्याहून बऱ्याच वेगळया तऱ्हेनें वागेल असें मानण्यास हरकत नाहीं. आज वकील लोक विवक्षित धर्मवचनाचा कायद्याच्या दृष्टीनें अधिकार ठरवितांना धर्मशास्त्रकारांचें त्याविषयीं एकमत कितपत आहे एवढेंच पाहतात. याचें कारण, जुन्या काळीं त्याचें कायदा या नात्यानें कोणतें स्थान होतें हें ठरविण्याचें साधन त्यांना उपलब्ध नाहीं.

ऑस्टिनच्या अर्थानें ज्याला कायदा म्हणतां येईल असा नियमसंग्रह हिंदुस्थानांत अगदीं अलीकडे झालेला आहे. जुन्या काळीं सर्व हिंदुस्थानांत आणि इंग्लंडांत कॉमन लॉ अथवा जनरूढीरूप कायदा आहे त्या प्रकारचा कायदा होता.तसेंच देशाच्या निरनिराळ्या भागांत समाजशासनाच्या कल्पनांचे वेगवेगळे संघटित संग्रह होते.

आज जी समाजनियंत्रणपद्धति आपल्यामध्यें आहे ती अशी आहेः लोकांवर थोड्याफार नैतिक कल्पनांचें दडपण आहे; पण लोकांचे परस्पर व्यवहार व परस्पर संबंध यांजवर निर्णायक सत्ता ब्रिटिश सरकारच्या कायद्यांची आहे. या सरकाराचा कार्यक्रम कांहीं नैतिक व राजकीय ध्येयांनुसार ठरत असेल किंवा नसेल. जुन्या काळीं हिंदुस्थानांत समाजनियंत्रणा वेगळ्या तऱ्हेनें होत होती. लोकांचा जीवनक्रम कांहीं नैतिक कल्पनांनुसार चालत असे. राजांचा व सत्ताधाऱ्यांचा व्यवहारहि याचप्रमाणें चालत असे मात्र हीं नैतिक तत्त्वें व कल्पना आचरणांत आणल्याच पाहिजेत अशी सक्ति फार थोड्या बाबतींत होती. लोक ज्या नियमांनुसार मनापासून वागत असत, त्यांपैकीं राजाज्ञेनें घालून दिलेले असे नियम फारच थोडे होते.

या जुन्या काळच्या पद्धतीचें एक उदाहरण ब्राह्मणांच्या संस्कारांत व होमहवनांत सांपडेल. ब्राह्मणवर्गाच्या लोकांनीं अमुक होमहवनें, अमुक संस्कार, अमुक प्रकारें केले पाहिजेत असा कडक निर्बंध असे परंतु राजकीय सत्ता या निर्बंधांचा अंमल करण्याच्या भानगडींत मुळींच पडत नसे म्हटलें असतां चालेल. कित्येक ठिकाणीं वरील निर्बंध न पाळणाऱ्या ब्राह्मणांचे उल्लेख येतात. महंमदीय सत्तेच्या पूर्वी हिंदुस्थानांत आजच्या इतकेच ब्राह्मण वर्णनिर्बंध बाजूला ठेवणारे असे होते असें म्हणतां येईल. राजानें कोणत्या कल्पना लोकांवर सक्तीनें लादाव्या ही गोष्ट बऱ्याच विचारांवर अवलंबून राही. कांहीं कल्पना लोकांनां व राजांनां इतर कल्पनांपेक्षां अधिक पटणाऱ्या होत्या. राजाला एखादा हेतु पटला तरी तो बिघडविणाऱ्या माणसाला शिक्षा केलीच पाहिजे असें कांहीं त्याला वाटत नसे. उदाहरणार्थ, वाईट कुलांत जन्मलेल्या मुलीशीं कोणी लग्न करूं नये हें एक धर्मतत्त्व आहे. या तत्त्वाला राजे वगैरे पूज्य मानीत होते यांत संशय नाहीं. परंतु अशा मुलीशीं कोणी विवाह केला तर धर्मवचन मोडल्याबद्दल त्याला शिक्षा मात्र होत नसे. काल, स्थल, राजघराणें यांच्या भेदाप्रमाणें लोकांवर सक्तीनें लादली जाणारी धर्मतत्त्वें व न लादली जाणारीं धर्मतत्त्वें यांत अंतर पडे. संशोधन करून धर्मतत्त्वांचें वरील दृष्टींनीं व्यापक व सूक्ष्म वर्गीकरण करावयाचें म्हटलें तर या संशोधनाला लागणारी साधनसामग्री आज आपल्याला कितपत मिळण्यासारखी आहे याजबद्दल संशय आहे. तरीपण या प्रकारचा अभ्यास करतां येईल तेवढा करणें युक्त आहे येवढें येथें सांगणें अवश्य आहे.

धर्मशास्त्रकार कांहींच बोलत नाहींत अशा कांहीं गोष्टींसंबंधानें नीतिशास्त्रकार राजांनां सल्ला देतांना दिसतात. वेश्यावर्गावर वैद्यांची देखरेख असावी अशाबद्दल धर्मग्रंथांत कोठें उल्लेख सांपडत नाहीं. परंतु चाणक्य आपल्या अर्थशास्त्रांत ( अ. २ ) राजाचें तें एक कर्तव्य आहे असें सांगतो. याप्रमाणें आणखीहि उदाहरणें धर्म व नीतिशास्त्रांची तुलनात्मक तपासणी केल्यास आपल्याला सांपडतील. [ धर्म व नीतिशास्त्रें किंवा धर्म व अर्थशास्त्रें यांजमधील साम्यें व भेद डॉ. केतकर यांनीं आपल्या हिस्टरी ऑफ कॉस्ट ( भाग १ ) या पुस्तकांत दाखविले आहेत ते पहावे. ]

धर्म किंवा कायदा यांसंबंधाची अभ्याससामग्री बारकाईनें पाहिल्यास वर सांगितल्याखेरीज आणखीहि सांपडते. हिंदु कायदा आज प्रत्यक्ष अंमलांत आहे असा किती आहे त्याविषयींची लोकांची कल्पना बरीच चुकीची आहे. सरकार म्हणतें कीं अमुक समाजव्यवहारांचें नियंत्रण आम्हीं करूं, तमक्या व्यवहारांचें करणार नाहीं. पण सरकारचें हें म्हणणें व कोर्टांचें प्रत्यक्ष कर्तृत्व यांत पुष्कळ तफावत आहे. समाजांतील व्यवहार एकमेकांत असे गुंतलेले असतात कीं एखादें व्यवहारक्षेत्र आजिबात दृष्टीआड करणें अशक्य होतें. उदाहरणार्थ, हिंदु लोकांच्या जातिव्यवस्थेच्या शासनाचें काम करण्याची कोर्टांची इच्छा नाहीं; तरी या बाबतींत कोर्टांनीं नियम करून ठेवले नाहींत असें नाहीं.

कोर्टांत हिंदु कायद्याचें ज्ञान होण्यासाठीं जें वाङ्मय उपयोगिलें जातें तें फार थोडें उपयोगिलें जातें याचें कारण एतद्विषयक वाङ्मय थोडें आहे अथवा तें पुष्कळ असल्याची माहिती लोकांस नाहीं हें नव्हे, तर या अमूप वाङ्मयाचा उपयोग कसा करावा हें लोकांनां कळत नाहीं हें कारण आहे. वैदिक वाङ्मयाची स्थिति थोडी बहुत अज्ञाच प्रकारची आहे, म्हणजे या वाङ्मयाचें कायद्याच्या दृष्टीनें जें महत्त्व खरोखर आहे त्याची कल्पना लोकांस बरोबर झाली नाहीं. धर्मशास्त्रें लिहिणारांच्या परिपाठाला अनुसरून आज हिंदु कायद्यावर लिहिणारे लेखक वेदांनां कायद्याचें मूलस्थान म्हणतात, परंतु या म्हणण्याचा अर्थ पूर्णपणें त्यांचा त्यांनां कळतो असें नेहमीच म्हणतां येत नाहीं. वैदिक वाङ्मयानें हिंदूंच्या व्यवहाराचें अद्यापिहि कोठपर्यंत नियंत्रण होत आहे याची बरोबर कल्पना या लेखकांनां दिसत नाहीं.

यज्ञयागासंबंधांतले वैदिक नियम आज कांहीं कायदा म्हणून उपयोगी नाहींत हें खरें आहे. तसेंच वारसा वगैरे बाबतींत आधुनिक प्रमाणभूत ग्रंथांनां वैदिक ग्रंथांतील वचनांचा विरोध दाखवून कमी दर्जाचें व अप्रमाण ठरविण्याच्या भानगडींत कोणी पडणार नाहीं हेंहि खरें. तथापि वेदग्रंथ आणि श्रौत व गृह्यसूत्रें यांनां कायदे म्हणून कांहींच किंमत नाहीं असें मात्र म्हणतां येणार नाहीं.

आज दुर्दैवाची गोष्ट ही कीं आधुनिक वकीलवर्गांत पुष्कळ हिंदु व ब्राह्मण जरी आहेत तरी या वकीलवर्गाचें हिंदु कायद्याचें ज्ञान 'ब्रिटिश'आहे, प्रामुख्यानें ब्रिटिशांपासून मिळविलेलें असें आहे. आमचा वकीलवर्ग हिंदु कायद्यासंबंधाचें जें ज्ञान प्राप्त करून घेतो तें त्या कायद्याचें खरें ज्ञान नसून, मेन वगैरे ब्रिटिश पुस्तककारांनां हिंदु कायद्याविषयीं जी कल्पना झाली ती कल्पना या वकीलवर्गाला कायद्याचें ज्ञान म्हणून मिळत असते. या वकिलांनां धर्मशास्त्रांच्या जुन्या अभ्यासकांच्या परंपरेंतलि लोक असें म्हणतां येणार नाहीं. असे परंपरेचे लोक आज पंडितांमध्यें मात्र पुष्कळ सांपडतात.

वैदिक वाङ्मयांतील कांहीं भाग कायदा म्हणून महत्त्वाचे आहेत. तिकडे आतां थोडें लक्ष देऊं. मौंजीबंधन व विवाह या विधींसंबंधाचे संस्कार घ्या. कायद्याच्या ग्रंथांत या संस्कारसमूहांचा विचार कायदेदृष्टीनें क्वचितच केलेला आढळतो. तथापि हे संस्कार हिंदु कायद्याचा एक भाग आहेत याबद्दल संशय नाहीं. थोडेसे मंत्र म्हटले न गेले तर विवाह कायदेशीर झाला नाहीं अशी अडचण कोणी आणीत नाहीं हें खरें आहे. पुष्कळशा पुरोहितांनां पुरेसें शिक्षण नाहीं, सामान्य लोकांनां मंत्र चार कमी म्हटले किंवा अधिक म्हटले त्याची फिकीर नाहीं. अशा परिस्थितींत चारदोन मंत्र वगळले गेले म्हणून विवाहांत कायद्याच्या दृष्टीनें दोष राहिला असा कोणी आग्रह धरून बसत नाहीं हें ठीक आहे. पण हे मंत्र वगळले जातात ते दुर्लक्षामुळें वगळले जातात, वगळावयाचेच अशा हेतूनें कांहीं वगळले जात नाहींत. तेव्हां या वगळण्यामुळे वैदिक वचनांनां कायदेदृष्टीनें कांहीं किंमत नाहीं असा समज करून घेणें चुकीचें होईल. कोर्ट विवाह रीतसरपणें झाला असेंच गृहीत धरून चालतें. मंत्र वगळल्याचा वगैरे मुद्दा कोर्टांत आणून लग्न सदोष ठरविण्याच्या भानगडींत सहसा कोणी पडत नाहीं. पण यावरून वरील मुद्दा संभवत नाहीं असें समजूं नये.

इंग्लंडांत देखील विवाहविषयक विधी बरोबर ठरल्याप्रमाणें झाले पाहिजेत असा कटाक्ष आहे. कायद्यानें स्थापित केलेल्या चर्चच्या विधीनुसार लग्न करण्याची इच्छा असेल तर या विधीबरहुकूम बरोबर सर्व समारंभ झाला पाहिजे असा आग्रह असतो. एक मताचा हक्क मागणारी ( सफ्रेजेट ) स्त्री विधींतलि नवऱ्याची आज्ञा पाळीन हा भाग गाळावा असें म्हणत होती तेव्हां तिला तुझें लग्न विधींत असा फरक केल्यानें कायदेशीर मानलें जाणार नाहीं असें बजाविण्यांत आलें होतें.

कोर्टांत विवाहाचा प्रकार व संस्कार यासंबंधानें वाद उपस्थित झाला व हिंदु विवाह काय संस्कार केले म्हणजे सिद्ध झाला असें होतें हा प्रश्न उभा राहिला तर कोर्टाला निर्णय देणें अवश्य होणार. हिंदू विवाहाचे अनेक प्रकार कोर्टांनीं कायदेशीर म्हणून मान्य केलेले आहेत. तेव्हां विवक्षित विवाहप्रकारांत हिंदु कल्पनांप्रमाणें कोणते संस्कार करण्याची वहिवाट आहे आणि विवक्षित संबंधाला ' विवाह ' म्हणतां येण्यास कोणते संस्कार होणें अवश्य आहे तें पाहून कोर्टाला आपला निर्णय द्यावा लागेल अर्थात इतर व्यवहारांत कायदेशीर अथवा कायद्याचे भाग म्हणून जसे कांहीं प्रकार आहेत त्यांप्रमाणें विवाह व्यवहारांत वैदिक विवाहप्रकार, संस्कार व मंत्र हे कायद्याचे भागच आहेत हें कोर्टाच्या वरील व्यवहारक्रमावरून स्पष्ट होतें. ब्रिटिश न्यायाधीशानें आमच्या संस्कारांतील आवश्यक व ऐच्छिक भाग कोणता हें ठरावावें ही मात्र हंसूं येण्यासारखी स्थिति आहे. या स्थितीच्या मुळाशीं आमच्या कायदेविषयक संस्था आहेत हें येथें नमूद करणें अवश्य आहे.

विवाहविषयक संस्कारांप्रमाणें मौंजीबंधनाचे संस्कारहि कायद्याचे भाग आहेत. मौंजीबंधन अथवा उपनयन हा विधि कायद्याच्या दृष्टीनें महत्त्वाचा असल्यानें उपनयनाच्या प्रकारांनां व संस्कारांनांहि कायद्यांत किंमत आहे. उपनयनाला कायद्यांत स्थान असण्याचें कारण त्या विधीनें उपनीताला द्विजाचा दर्जा प्राप्त होतो हें आहे. द्विज या दर्जाला कायद्यांत स्थान दिलें आहे. कारण या दर्जामुळें कायदेशीर असे कांहीं सामान्य व विशेष हक्क मनुष्याला प्राप्त होत असतात. हिंदु कायद्यांत उपनयन न झालेल्या ब्राह्मणाचा

दर्जा शूद्र हाच असतो व शूद्राचेच हक्क त्याला उपभोगण्याचा अधिकार पोंचतो.

याप्रमाणें वेदवाङ्मयाचा कांहीं भाग हा आधुनिक हिंदु कायद्याचा घटक भाग आहे. श्रौतसूत्रांच्या कांहीं भागालाहि हिंदु कायद्यांत स्थान आहे. कारण हिंदु विवाहविधींत महत्त्वाच्या व अवश्य असणाऱ्या पुष्कळशा तपशिलाच्या गोष्टी –उदाहरणार्थ–गोत्रें, प्रवर हीं श्रौतसूत्रांत दिलीं आहेत.

आजच्या हिंदु कायद्याच्या दृष्टीनें वेदवाङ्मयाचें स्थान कोणतें त्याचा विचार येथपावेतों झाला. पूर्वी प्रचलित असलेल्या हिंदु कायद्याची दृष्टि घेतली तर वर उल्लेखिलेल्या वेदभागांखेरीज इतर कित्येक भागांचाहि कायद्याच्या सदरांत समावेश करतां येईल व करावा लागेल. उदाहरणार्थ राजाचा अभिषेक व विलेपन हे पूर्वीचे विधी पूर्वीच्या कायद्याचे अंशभूत आहेत. आज या विधींचें इतकें महत्त्व नाहीं. वारसाचा कायदा प्रतिकूल नसला व ब्रिटिश सरकाची संमति असली म्हणजे हिंदु राजाला आपल्या गादीवर कायदेशीर हक्क सांगण्याला आणखीं कोणत्याहि गोष्टीची जरूर लागत नाहीं. मुकुटधारणासंबंधीचे संस्कार वगळले तर हिंदुराजाच्या हक्कांत आज गौणत्व उत्पन्न होत नाहीं. पूर्वीच्या काळीं ब्राह्मणांनीं राजाला अभिषेक केला म्हणजे धर्मावतारभूत असणाऱ्या या वर्गाची राजास राजपद धारण करण्याला अनुमति मिळाली असा त्याचा अर्थ होई. ब्राह्मणांत राजकीय सत्ता आज कांहींच नसल्यानें आज राजपदधारणाला त्यांची संमति असलीनसली सारखीच झाली आहे. तथापि पूर्वी असें नव्हतें. ब्राह्मणांच्या द्वारां राजाला अभिषेक झाला असतां तो राजा त्याच्या प्रजेला विशेष पूज्य होत असे व हा पूज्यपणा शासनकार्याच्या दृष्टीनें राजाला फार उपयोगी पडे. पूर्वी ही ब्राह्मणदत्त संमति किती किंमतीची वाटत होती याचें प्रत्यंतर अल्पांशानें आज सयामच्या राज्यांत पहावयास मिळतें. सयामचे राजे व त्यांतलि लोकहि ब्राह्मणविरोधी पाखंडी पंथाचे अनुयायी असून तेथील राजांनां राज्याभिषेकविधींमध्यें ब्राह्मणांशिवाय चालत नाहीं. असो; कायद्यांत 'कायदेशीर राजपदाधिकार' अंतर्भूत होत आहे त्या अर्थी वेददृष्ट राज्याभिषेकविधि कायद्याचा अंशभूत मानला पाहिजे. कायद्यांतलि राजत्वाची कल्पना अशी आहे कीं राजत्व हें विशिष्ट अभिषेकानें अथवा विलेपनानें प्राप्त होतें.

वेदवाङ्मयाचें आणखी एका दृष्टीनें कायद्यांच्या क्षेत्रांत महत्त्व आहे. कायद्याची प्रगति होण्यास तें वाङ्मय उपयोगी पडेल. प्रगति झपाट्यानें व्हावी यासाठीं नेहमींचा सर्वसंमत उपाय हा आहे कीं, वेदवाङ्मयांतून प्रगतीला अनुकूल अशा कल्पना उध्दृत कराव्या.

या प्रगतिसंपादक साधनाचें महत्त्व आजच्या कायदेशास्त्रांत फारसें राहिलेलें नाहीं.याचें कारण वेदवाङ्मय प्रगतिसाधन म्हणून निरुपयोगी आहे हें नव्हे तर आज ज्या न्यायसंस्था आमच्यामध्यें आहेत त्या भलत्या प्रकारच्या व दोषपूर्ण आहेत हें आहे. आजचे धंदेवाईक कायदेपंडित फारसे विद्यासंपन्न नाहींत; हेंहि एक प्रगतीच्या कामीं वेदवाङ्मयाचा उपयोग न होण्याचें कारण आहे. आमचे वकील हे ब्रिटिश पुस्तककारांचे शिष्य आहेत. या शिष्यत्वापेक्षां त्यांच्या ठिकाणीं अधिक गुण कांहींच नाहीं म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. ब्रिटिश पुस्तककारांनां हिंदु कायद्यांतील कांहीं तपशिलाच्या गोष्टी उपलब्ध झाल्या आहेत व त्यांचें त्यांनीं उद्घाटन केलें आहे. परंतु हिंदु कायदेशास्त्राचीं तत्त्वें त्यांनां मुळींच समजलेलीं नाहींत. अर्थात् त्यांचे शिष्यहि या बाबतींत त्यांच्याइतकेच अज्ञ आहेत. आजचें हिंदु कायद्याचें वकिली ज्ञान म्हणजे कांहीं हिंदु रूढींचें तपशिली ज्ञान व ब्रिटिश कायदेशास्त्रांतील कांहीं तत्त्वांची त्यांत भरती, अशा प्रकारचें असतें.

कायद्याच्या क्रमविकासावर लिहिणारे जे ग्रंथकार आहेत त्यांचा क्रम एकदम धर्मसूत्राच्या युगाला हात घालावयाचा हा असतो. वैदिक वाङ्मयाचा उल्लेख हे ग्रंथकार केवळ जातां जातां म्हणून करीत असतात. हा विवेचनप्रकार अगदीं चुकीचा आहे. पूज्य अशा वेदवाङ्मयाचा या प्रकारच्या विवेचनानें अनादर होतो ही एक गोष्ट आहेच; पण मुख्य मुद्दा वेगळा आहे, धर्मशास्त्रांतील वचनांचा खरा गर्भितार्थ, या ग्रंथांचा ढीग बाजूला ठेवून स्वतंत्रपणें आणि स्वतंत्र मनानें कायद्याचा अभ्यास केला तरच समजणार आहे. 'जातीचा इतिहास' या पुस्तकाच्या पहिल्या विभागांत धर्मग्रंथांतलि वचनांचा कायदेदृष्टीनें खरा अर्थ लावणें दुसऱ्या स्वतंत्र वाङ्मयाच्या साहाय्यावांचून फार जड जातें हें दाखविलें आहे. ( मनुस्मृतीवर 'जातीचा इतिहास' हा टीकारूप असून त्यांत या स्मृतींत ऐतिहासिक गोष्टी कोणत्या व तदीतर काल्पनिक व भ्रमोत्पादक गोष्टी कोणत्या हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे ). खरा कायदा, सामाजिक व राजकीय व्यवस्था, व घडामोडी यांच्या अभ्यासानेंच कळणार आहे. निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या ठिकाणीं प्रचलित असलेल्या व्यवहारांतील कायद्यांचा काळजीनें अभ्यास होईल तेव्हांच धर्मग्रंथांनीं केलेलें कार्य स्पष्टपणें अभ्यासकाला कळून येईल.

हिंदु संस्थानांनीं धर्मग्रंथांनां पूर्वी मान दिला, व आजहि हीं संस्थानें त्यांनां मान देतात. परंतु यावरून असें निघत नाहीं कीं, निरनिराळ्या संस्थानांत एकाच तऱ्हेचा कायदा चालत होता. धर्मशास्त्रकार जें सांगत तें सर्व हे संस्थानिक कायद्यांप्रमाणें मानीत असेंहि नव्हे. कोणत्याहि प्राचीन काळीं जें सामान्य वाङ्मय तयार झालें असेल व त्या काळचीं जीं खोदलेलीं लिखाणें वगैरे उपलब्ध असतलि त्यांच्या साहाय्यानें त्या काळांतील खरा चालू कायदा समजावून घेतला पाहिजे. कांहीं अगदीं प्राचीन संस्थांचेहि अवशेष आज बऱ्याच प्रमाणांत आपणांला उपलब्ध आहेत.

या अवशेषांपैकीं पुष्कळांची नोंद सरकारी मानववंशशास्त्रज्ञांनीं केलेली आहे. हें मानववंशविषयक वाङ्मय आपल्याला फार महत्त्वाचें आहे. प्राचीन काळीं रूढ असलेला व्यक्तिनिष्ठ कायदा बऱ्याच अंशानें आजलाहि कायम आहे. बऱ्याच वादांचा निर्णय करण्याच्या कामांत ब्रिटिश अमदानीच्या पूर्वीचे कागदपत्र तसेंच वंशवृक्ष आणि वारसांच्या यादी कोर्टांतून हजर करण्यांत येत असतात. या प्रकारचें साहित्य उपयोगांत आणून, आपल्याला पूर्वी व्यवहारांतील-धर्मग्रंथांच्या वचनांतील नव्हे-आचार म्हणजे खरा हिंदु कायदा काय होता तें ठरवितां येईल.

हिंदु कायद्याच्या क्षेत्रमर्यादांचा विचारहि उपयुक्त होईल. हिंदुस्थानांत समाजशासनाच्या संबंधांत ज्या कल्पना उदयास आल्या त्या हिंदु संस्कृतीच्या कक्षेंत आलेल्या प्रदेशांत कितीशा व कोठवर जाऊं शकल्या त्याचा विचार म्हणजेच हिंदु कायद्याच्या क्षेत्रमर्यादांचा विचार होय. हा विचार देशवार होणें जरूर आहे.

का य दा व ध र्म यां च्या प द्ध ती चें सा म्य.—धर्मशास्त्र व कायदेशास्त्र यांच्या पद्धतींत बराच सारखेपणा असतो. येथें धर्मशास्त्रांच्या पद्धतींचाच आम्हीं विचार करणार आहों. या पद्धती वाचकांच्या नजरेसमोर आल्या म्हणजे कायदेशास्त्राच्या पद्धतींशीं त्यांचें असलेलें साम्य वाचकांच्या लक्षांत येईल. येथें धर्मशास्त्राच्या पद्धतींची सुव्यवस्थित मांडणी करीत बसण्याचा आमचा उद्देश नाहीं.. फक्त किती निरनिराळ्या पद्धतींचा उपयोग धर्मशास्त्र तयार करण्याच्या कामीं होतो त्याचें दृष्टान्तयुक्त दिग्दर्शन करण्याचा आमचा उद्देश आहे.

'कायदेशास्त्राच्या पद्धती' याचा अर्थ (१) व्यवहारांत लावण्याचा कायदा ज्या पद्धतींनीं आम्हांला मिळतो त्या पद्धती; अथवा (२) कायदा हें एक ज्ञानसाधन आहे या नात्यानें कायद्याचा उपयोग करून इतर ज्ञानसंग्रह करण्याच्या पद्धती असा दोन प्रकारचा होतो.

हे दोन अर्थ नजरेसमोर ठेवणें उपयुक्त आहे. पहिल्या पद्धतींत कायद्याचें ज्ञान हें फळ आपणांस प्राप्त होतें व दुसऱ्या पद्धतीमध्यें कायद्याचें ज्ञान हें एक उपकरण असतें व संस्थांचा व तत्त्वांचा इतिहास, कायदेपद्धतीचा विकास स्पष्ट करणारा वरील प्रकारचा इतिहास हें फळ असतें. कायद्याच्या शास्त्रांत ऐतिहासिक पद्धति शक्य असते ती पहिल्या अर्थानें, म्हणजे या पद्धतीनें व्यवहारांतील कायदे आपणांस उपलब्ध होतात. 'पद्धतीचा' दुसरा अर्थ म्हणजे संस्थांच्या इतिहासासाठीं कायद्यांचा उपयोग करण्याची पद्धति; हा अर्थ लोकांत अधिक परिचयाचा आहे. परंतु ही पद्धति म्हणजे '.कायद्याची पद्धति' असें वास्तविक म्हणतांच येत नाहीं. तेव्हां पहिल्या अर्थाकडेच लक्ष देऊन कायदेशास्त्राच्या पद्धतींचा येथें विचार होईल. व्यवहारांत लावावयाचा कायदा तयार करण्याच्या पद्धती येणेंप्रमाणें:—

(१) विशेषसिद्धि-म्हणजे मूळ उपलब्ध असलेल्या सामान्य तत्त्वाचा विस्तार करून नवें तत्त्व प्रस्थापित करणें.

(२) सामान्यसिद्धि-म्हणजे पूर्वीचे दाखले शोधून काढून त्यांच्या आधारावर अथवा पूर्वीच्या घडामोडी व वाद गोळा करून त्यांच्या आधारावर सामान्य नियम अथवा कायदा तयार करणें.

व्यवहारांत कायदा तयार करण्याच्या या दोन पद्धतींनां नांवें दिलीं आहेत तीं अगदीं यथार्थ आहेत असें समजूं नये. दुसऱ्या परिचित शब्दांपेक्षां दिलेले नांवाचे शब्द अधिक अन्वर्थक आहेत एवढेंच कायतें.

दाखला किंवा जुनें उदाहरण जेव्हां आपण शोधीत असतों, तेव्हां आपल्याला उपयोगांत आणतां येईल असा एक नियम प्राप्त होतो आणि या प्राप्त झालेल्या नियमाचा व्याप आपण व्यवहारांत वाढवीत असतों, म्हणजे सामान्यसिद्धीबरोबर विशेषसिद्धीचाहि आश्रय आपण करीत असतों. याप्रमाणें दिलेल्या पद्धती जरी अगदीं स्वतंत्र नाहींत तरी सामान्यतः हें वर्गीकरण उपयुक्त आहे. कायदेपद्धती अनेक आहेत. या भिन्न कायदेपद्धतींचा विचार करावयाचा असतां सामान्यसिद्धि व विशेषसिद्धि या वर्गीकरणाचा फायदा आपणांस मिळतो.पृथ्वीवर जे महत्त्वाचे देश आहेत त्या बहुतेकांत गेल्या १०० वर्षांत कोर्टासमोर आलेल्या प्रकरणांची हकीकत प्रसिद्ध झालेली आहे. या प्रकरणांतून सामान्यसिद्धीच्या मार्गानें कायदा निश्चित करतात.

प्राचीन भारतांत वर सांगितलेल्या दोन्ही पद्धतींचा आश्रय करून धर्मनियम ठरविण्याचा क्रम असे. वेदवाङ्मयांत अनुज्ञापर व निषेधपर वाक्यें सांपडतात त्यांचा उपयोग धर्म ठरविण्याकडे करीत, त्याचप्रमाणें प्राचीन काळीं घडलेल्या ऐतिहासिक घडामोडींचा उपयोग करूनहि धर्म ठरवीत. जैमिनीची मीमांसा हा वेदवाक्यांचा आधार घेऊन त्यांजपासून विशेषसिद्धीच्या पद्धतीनें धर्मनियम ठरविणारा ग्रंथ आहे. पुराणकाळीं घडून आलेल्या प्रकरणांतून कायदा काढण्याच्या पद्धतीचाहि अंगीकार जुने लोक पुष्कळ वेळां करीत. 'श्रुतिस्मृतिपुराणोक्त' असा शब्दसमुच्चय धर्मसंस्कारप्रसंगीं नेहमीं उपयोगांत येत असतो. धर्मशास्त्राच्या अभ्यासकांप्रमाणें राजानेंहि पुराण व इतिहास यांचा अभ्यास करावा असा नियम होता. पुराणं व इतिहास यांनां पांचवा वेद म्हणत (जैमिनीय उपनिषद् १. ५३; बृहदारण्यकोपनिषद् २. ४, १०; छांदोग्योपनिषद् ३. ४, १, २. इत्यादि). धर्म या शब्दाच्या द्वारां ज्या कल्पना व्यक्त केल्या जात होत्या त्यांत कमीअधिकपणा कसा झाला यासंबंधाचा अभ्यास करण्याला पुरेसें साहित्य आपणांस मिळत नाहीं. पूर्वी अध्यापक या प्रकारचा वाद तोंडानें चालवीत. स्मृतींमधून जीं सूत्रें अथवा बोधपर श्लोक आहेत त्यांत वरील प्रकारच्या वादांवरून निघालेला निष्कर्ष मात्र घालीत. तथापि सूत्रांतहि अल्प प्रमाणांत वादांचा सारांश

दिलेला आढळतो. जैमिनी व बादरायण यांच्या सूत्रांत वाद पुष्कळ वेळां सांपडतो. धर्म या शब्दाच्या मूळ अर्थांत अनेक प्रकारें बदल झाला याचें कारण मुळांत धर्म या शब्दाचा अर्थ स्पष्ट नव्हता, हें एक आहे. अनेक शास्त्रांनीं अथवा विद्वन्मंडळांनीं धर्म या शब्दाची व्याख्या करण्याचा सारखा प्रयत्न चालविलेला होता यामुळेंहि त्याला अनेक अर्थ आले. धर्मशास्त्राला न्यायशास्त्रपद्धति लावली गेली. त्याप्रमाणें ती दुसऱ्याहि अनेक शास्त्रांनां लावली गेली. या कारणानें भिन्न न्यायपद्धतींत नाना प्रकारचे भेद आपल्या नजरेस येतात. व्यवहारांत असलेल्या कल्पनांचें अथवा शब्दांचें पृथक्करण करून सार्वत्रिक परिभाषा तयार करावयाची हें ज्या चिकित्सापद्धतीचें कार्य ती पद्धतीहि जुन्या काळीं भारतीयांस परिचित होती. मग तिला आजच्याप्रमाणें स्वतंत्र पद्धति म्हणून त्यांनीं नांव दिलेलें असो वा नसो. पूर्वीं जे वाद होत त्यांची हकीकत लिहून ठेवलेली सांपडत नाहीं, अथवा लिहिली जात नसे. त्याअर्थीं कार्यपद्धतींनां स्वतंत्र नांवें सांपडत नाहींत ही आश्चर्य करण्यासारखी गोष्ट नाहीं. पद्धती वापरण्यांत असूनहि त्यांनां नांवें दिलेलीं नाहींत असें दिसतें. मनुष्याच्या शरीरांत नाना प्रकारच्या क्रिया चालू असतात व पुष्कळांनां या क्रियांची माहिती नसते, त्याप्रमाणेंच समाजाच्या बौद्धिक जीवनाची गोष्ट आहे. सत्यशोधनाचे अनेक मार्ग समाजांतील विचारपंडित उपयोगात आणीत असतात. मग या मार्गांचा नामनिर्देश त्यांच्याकडून होवो वा न होवो. पुरातनकाळीं ब्राह्मणांनां हें विदित होतें कीं, सत्य प्राप्त व्हावयाचें तर अनेक पद्धतींचा उपयोग आपण केला पाहिजे. प्रमाण म्हणजे काय या संबंधानें नेहमीं वाद चालत असे. अनुमान, प्रत्यक्ष, उपमान, आप्तवाक्य यांत प्रमाण कोणाला म्हणावें, यांत प्रत्येकाला कोठवर प्रमाणत्व आहे अशा प्रकारचे वाद नेहमीं चालत असत.

वेदविद्येच्या बाबतींतहि अर्थनिर्णयाच्या पद्धती निरनिराळ्या असून त्यांचा यास्कानें उल्लेख केलेला आहे. ऐतिहासिक, नैरुक्त इत्यादि पक्षांचा उल्लेख निरुक्तांत आलेला आहे ( निरुक्त २.१६; ६.९; ७.६; १२.१ इ० ) वेदाचा अर्थ लावणारांत ऐतिहासिक पक्ष हा नैरुक्त पक्षाचा विरोधी दिसतो.

धर्माच्या इतिहासांत न्याय म्हणजे काय वगैरे तत्त्वविषयक प्रश्नांवरील वादविवादहि अंतर्भूत होतात. अशा प्रकारचे वाद पूर्वीं पुष्कळ होत असत. या वादांमध्यें ज्या कल्पना उद्भूत होत त्यासंबंधानें वाद करणारांचें एकमत होत नसलें तरी त्या कल्पना लक्षांत येण्यासारख्या निघत. प्लेटोचा रिपब्लिक हा निबंध न्यायसंबंधीं वाद करण्यांतच खर्ची पडला आहे तरी त्यांतून विशेष फलनिष्पत्ति झालेली नाहीं.न्यायाची व्याख्या आपणांस आजहि करतां येणें अवघड आहे. सर्व काळांत उपयोगी पडेल अशी न्यायाची व्याख्या करणें मुष्किलच आहे. तेव्हां प्राचीन काळीं आपल्या देशांत न्यायाच्या व्याख्येच्या बाबतींत एकवाक्यता झाली नाहीं म्हणून न्यायाची यथार्थ कल्पना आमच्या लोकांनां नव्हती असा निष्कर्ष त्यावरून काढण्याची आवश्यकता नाहीं. ' चांगलें ', ' वाईट ' या साध्या शब्दांच्या व्याख्या देणेंहि आपणांपैकीं पुष्कळांनां जड जाईल. तरी अमुक एक गोष्ट चांगली कीं वाईट असा प्रश्न आपल्याला केला तर त्याचें बरोबर उत्तर आपण सर्व खात्रीनें देऊं शकूं.हें उत्तर कदाचित् सर्वांचें एक असणार नाहीं, पण बहुतेकांचे एक असूं शकेल. ही जशी व्यक्तींची गोष्ट तशीच समाजांचीहि गोष्ट आहे. विशिष्ट गोष्टींच्या बाबतींत अमुक निर्णय न्यायाचा कीं अन्यायाचा हें सांगणें एखाद्या समाजाला अवघड जाणार नाहीं,पण न्यायाची तात्त्विक कल्पना ठरविणें त्याला कदाचित् अवघड जाईल. पूर्वीं कल्पना कशा अस्पष्ट असत व त्यांचे प्रकार कसे नानाविध असत याची माहिती व्हावी यासाठीं मानवधर्मशास्त्रांतील एक सुप्रसिद्ध वचनावरील टीका येथें उद्धृत करीत आहों.

> अर्थानर्थावुभौ बुद्ध्वा धर्माधर्मौच केवलौ ।
> वर्णक्रमेण सर्वाणि पश्येत्कार्याणि कार्यिणाम् ॥
>
> मनु.७ . २४.

राजानें अर्थ व अनर्थ जाणून धर्म व अधर्म पहावा व फिर्यादींचीं कामें वर्णक्रमानें चौकशीला घ्यावीं ( कुल्लुक ). न्यायासंबंधींच्या कल्पना या श्लोकांत आहेत या कारणानें या श्लोकाचें महत्त्व आहेच परंतु या श्लोकाचा अर्थ टीकाकारांनीं निरनिराळा लावला आहे म्हणून याचें विशेष महत्त्व आहे. ' अर्थ ' याचे ' लाभ ' व ' सोय ' असे अनेक अर्थ आहेत. ' अनर्थ ' या शब्दाला यांच्या उलट तितकेच अर्थ आहेत. अनर्थ या शब्दाला केवळ नकारार्थी अर्थच नसून जोरदार असा स्वतंत्र अर्थहि आहे. आपत्ति, संकट असाहि अनर्थ याचा अर्थ आहे. धर्म व अधर्म यांच्या अर्थांची फोड येथें करीत नाहीं. अर्थ याचा लाभ अथवा सोय असा अर्थ आहे. पण अर्थशास्त्रावर लिहिणारे ग्रंथकार आपल्या विषयाचें प्रतिपादन करतांना ' अर्थ ' हें कारण देऊन अशा कित्येक गोष्टी लोकांस करावयास सांगत कीं ज्या दुसरे ग्रंथकार ' धर्म ' हें कारण देऊन करावयास सांगत. यामुळें धर्म आणि अर्थ यांची तुलना करावयाचा प्रसंग आला म्हणजे त्यांच्या क्षेत्रासंबंधानें नाना कल्पना कराव्या, व त्यांच्या परस्परसंबंधाच्या बाबतींत नाना भिन्न मतें उपस्थित व्हावीं असा सहजच योग येई. न्याय व उपयुक्तता यांत जो संबंध आहे तसाच संबंध धर्म व अर्थ यांच्यामध्यें आहे असें पुष्कळ बाबतींत म्हणतां येईल.

मेधातिथि यानें वरील श्लोकावर टीका करतांना धर्म ( न्याय ), अर्थ ( लाभ ) मिळवून देतो आणि अधर्म ( अन्याय ), अनर्थ ( हानि ) ओढवून आणतो असा अर्थ दिला आहे. कुल्लुकाची टीका निराळीच आहे. 'सोईचें काय गैरसोईचें काय याची ओळख ठेवून न्याय व अन्याय यांज-

कडेच केवळ लक्ष द्यावें आणि प्रकरणाचा निकाल करावा' असें कुल्लूक म्हणतो. न्याय व सोय हीं एकच असें ज्या अर्थीं घेतलें आहे तो खरा अर्थ असें गोविंदराजाचें मत आहे. 'सोईचें' म्हणजे लोकांनां संतुष्ट करणारें, 'गैरसोईचें' म्हणजे लोकांनां क्षुब्ध करणारें असा अर्थ गोविंदराज करतो. दुसऱ्या पक्षीं, कुल्लुक व राघवानन्द यांनीं सोईचें व गैरसोईचें यांचा अर्थ लोकांचें रक्षण करणारें व लोकांचा नाश करणारें असा अनुक्रमें घेतला आहे. सारांश असा कीं, कांहीं लेखक न्याय व सोय हीं एक धरतात. याप्रमाणें अर्थ करणारे लोक राजकीय दृष्टीचे आहेत; शुद्धन्याय दृष्टीचे असें त्यांस म्हणतां येत नाहीं. न्यायाचें असेल तेवढेंच सोईचें असतें हें राजकीय मत महत्त्वाचें आहे व या मताचा पुरस्कार वरील लेखक म्हणजे न्याय व सोय यांचें ऐक्य मानणारे लेखक करतात असें म्हटलें पाहिजे. एका लेखकानें लोकसत्तादृष्टीनें 'सोईचें' याचा अर्थ लावला आहे. लोकांनां संतोष देणारें तें सोईचें असें या लेखकाचें म्हणणें आहे. दोन दुसरे लेखक लोकांचें हित ज्यापासून होतें तें सोईचें असा अर्थ करतात. न्याय वेगळा सोय वेगळी असा ज्यांचा पक्ष आहे ते असें म्हणतात कीं राजानें न्यायाचा अंमल करावा मात्र त्यानें सोय कशांत आहे हेंहि पहावें.

बेंथॅम यानें उपयुक्ततावाद अथवा सोय पहावी हें मत प्रतिपादलें व या मताचा इंग्रजी कायदेशास्त्रांत शिरकाव केला. इंग्रजी कायद्यांत हें उपयुक्तता-मत पायाभूत असल्याबद्दल इंग्रज कायदेपंडितांनां मोठा अभिमान वाटतो. हें उपयुक्तता-मत आमच्या जुन्या काळांतील धर्मशास्त्रकारांनां कितपत अवगत व संमत होतें तें आतां पाहूं.

मनुस्मृति अध्याय बारावा यांतील तिसऱ्या श्लोकांत "शुभाशुभफलं कर्म' हे शब्द आढळतात. करावीं अशीं कर्में कोणतीं न करावीं अशीं कोणतीं म्हणजे विहित व निषिद्ध कर्में कोणतीं तें सांगतांना वरील शब्द मनु उपयोगांत आणीत आहे. विहित या अर्थी शुभफलं कर्म निषिद्ध या अर्थी अशुभफलं कर्म असा मनूचा शब्दप्रयोग आहे. कुल्लुक यानें आपल्या टीकेंत विहित कर्म म्हणजे सुखफलक कर्म, निषिद्ध कर्म म्हणजे दुःखफलक कर्म असें स्पष्ट म्हटलें आहे. कोणत्याहि लोकांत पूर्वी न्यायाच्या कल्पना काय होत्या तें समजून घेणें असल्यास त्या कामीं त्यांच्या कल्पना-प्रधान तात्त्विक लिखाणांचा अथवा त्यांच्या लिखाणांतून सांपडणाऱ्या तात्त्विक वचनांचा उपयोग कांहीं फारसा होत नाहीं. या लिखाणावरून त्या लोकांचे निरनिराळे तात्त्विक विचार मात्र कळतील. असल्या तात्त्विक लिखाणावरून, कायदा म्हणजे काय, न्याय म्हणजे काय असल्या प्रश्नावर लिहिलेल्या तात्त्विक वादांवरून कोणत्याहि देशांत काय कायदा होता हें ठरवितां येत नाहीं. पुष्कळ वेळां असें होतें कीं, असले तात्त्विक विचार ग्रंथांतच पडून राहतात. या विचारांचा देशांतील कायदेपंडितांवर किंवा त्यांच्या निकालावर कांहींच परिणाम होत नाहीं; न्याय अथवा अन्याय निश्चित करावयाच्या कामीं वरील तात्त्विक विचार फारशी मदत करीत नाहींत. लोकांचा कायदेविषयक विचार हा व्यवहारांत खरोखर घडणाऱ्या गोष्टींनीं निश्चित होत असतो. लोकांनां कोणत्या गोष्टी स्वाभाविक वाटतात त्यांवरून 'स्वाभाविक' म्हणजे अमुक प्रकारची गोष्ट असा सामान्य विचार लोकांच्या मनांत तयार होतो. लोकांची वृत्ति पालटली, कीं पूर्वी स्वाभाविक वाटणाऱ्या गोष्टी त्यांनां स्वाभाविक वाटत नाहींतशा होतात. गुलामगिरी ही संस्था उदाहरणसाठीं घेऊं. ॲरिस्टॉटलला ही संस्था स्वाभाविक वाटत होती. रोमन लोकांनीं ग्रीकांपासूनच आपली निसर्गदृष्ट कायद्यांची कल्पना घेतली होती तरी गुलामगिरी कांहीं निसर्ग व्यवस्थेचा भाग म्हणून त्यांनीं मानली नाहीं.जस जेंटियम म्हणजे 'राष्ट्रांचा कायदा' याचा एक भाग गुलामगिरीची संस्था असें मात्र ते मानीत असत.

आज लोक असें कांहीं मानीत नाहींत कीं, निसर्गस्थिति म्हणून मानवी समाजाची नमुनेदार अवस्था होती, किंवा असूं शकते. तरी पण या निसर्गस्थितीची कल्पना लोकांनां अद्यापिहि मनोवेधक वाटते, व या कल्पनेचा त्यांच्या विचारावर परिणाम होत असतो. स्वाभाविक अथवा नैसर्गिक व्यवस्थेचा अथवा कायद्याचा उल्लेख येथें आणला आहे तो येवढ्याच कारणानें आणला आहे. स. १८८२ चा इंडियन सिव्हिल प्रोसीजर कोड, स. १८९८ च्या आक्टोबर २०चीं ब्रिटिश आर्डर इन कौन्सिल (सदर्नऱ्होडेशियास लागू असणारी), या दोन ठिकाणीं 'नैसर्गिक न्याय' या शब्दाचा प्रयोग केलेला आढळतो. नैसर्गिकत्वाची कल्पना म्हणजे निसर्गनियमाची अथवा विश्वव्यवस्थेची कल्पना. या कल्पनेचा भारतीयांच्या मनावर इतर लोकांप्रमाणें परिणाम झाला होता. भारतीयांनीं धर्मनियम तयार केले त्यांत निसर्गव्यवस्थेच्या कल्पनेचा परिणाम दिसून येतो.पुराणांत व धर्मग्रंथांत विश्वाच्या उत्पत्तीचा क्रम सांगितलेला असतो. या विश्वोत्पत्ति कल्पनेची मांडणी भिन्न तऱ्हेची आढळते. मनुस्मृतींत सांगितलेली विश्वोत्पत्ति-कल्पना येथें उद्धृत करीत आहों. या कल्पनेमुळें हिंदु कायद्याला एक विशिष्ट स्वरूप प्राप्त झालें हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

"प्रथमभूत अंडांतून भगवान् मनाचें आणि पंचेंद्रियांचे गुण (गुण म्हणजे सत्त्व, रजस् व तमस्. सांख्य मताप्रमाणें हे गुण सृष्ट पदार्थांपैकीं प्रत्येकांत अंतर्बाह्य व्यापून असतात.) उत्पन्न करता झाला. वेदाच्या शब्दापासून भगवानानें सृष्टींतील सर्व वस्तुजातांचीं नांवें आणि त्यांचीं कर्में (उदा० ब्राह्मणांचें कर्म, स्वाध्याय), तशाच सर्व संस्था उत्पन्न केल्या (१.२१).

भगवानानें प्रथम मनुष्याला अथवा दुसऱ्या सृष्ट वस्तूंनां जें कर्म लावून दिलें तेंच कर्म प्रत्येक कल्पांत मनुष्य व त्या वस्तू आचरूं लागल्या. उग्रांत उग्रपणा, मृदूंत मार्दव, सत्यनिष्ठांत

धर्म, तदितरांत अधर्म जसा आरंभीं भगवानानें ठेविला त्याप्रमाणें तो तो मनुष्य किंवा पदार्थ आपोआप वागूं लागला ( १.२८-९ ). लोकांच्या उन्नतीसाठीं भगवानानें मुख, बाहु, मांड्या व पाद या आपल्या इंद्रियांपासून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे अनुक्रमें उत्पन्न केले (१.३१)".

या वचनांत अनेक कल्पना आहेत. एक कल्पना ही आहे कीं धर्म व अधर्म हा निसर्गानें ठरविला आहे. अमुक वर्णानें समाजांत अमुक कर्म करणें हें निसर्गानें ठरविलें आहे. समाजांत भिन्न वर्ण असतात ते समाजाच्या उन्नतीसाठीं निसर्गानें उत्पन्न केले आहेत. वर्णांत असणारा परस्पर भेद हा निसर्गजन्य आहे. परमेश्वरानेंच कांहीं विशेष हेतु मनांत धरून हा भेद केला. परमेश्वरानेंच समाजांत घडून येणारीं सर्व कर्में निर्माण केलीं, त्यानेंच या कर्मांसाठीं अवश्य ते गुण निर्माण केले.

का य दा व ध र्म यां च्या वि का स क्र मां ती ल सा म्य.—मागें धर्म व कायदा यांतील साम्यें व भेद दाखविले ते स्वरूपगत होत. धर्मशास्त्राचें प्रगल्भ स्वरूप व कायदेशास्त्राचें तसलेंच स्वरूप घेऊन त्यांच्या तुलनेनें वरील साम्यें व भेद आपणांस सांपडतील. या शास्त्रांचा विकासक्रम आपण अद्यापि तुलना करून पाहिला नाहीं. या विकासक्रमांत कांहीं साम्यें अथवा भेद आहेत कीं काय हें पाहणें जरूर आहे. या प्रकारच्या साम्यभेदांना स्वरूपविकासगत असें म्हणतां येईल. धर्म व कायदा यांचा अभ्यास करतांना तुलनेच्या कामांत कोणतीहि अपूर्णता न राहील इकडे लक्ष ठेवणें चांगलें. कारण तुलनेंत व्यंग राहील तर अभ्यासांत व्यंग उत्पन्न होईल.

सामाजिक व राजकीय परिस्थितीच्या गोष्टी, व एतद्विषयक कल्पना व भावना यांना निसर्गाच्या इतर प्रान्तांत लागू असणारे रूपस्थैर्य व रूपान्तरविषयक नियम लागू आहेत. या सर्वांची एकमेकांवर क्रियाप्रतिक्रिया होत असते; सत्ताधारी वर्गाच्या विचारसरणीवर यांचा परिणाम होत असतो व त्या विचारसरणीचा यांजवर परिणाम होत असतो. सत्ताधारीवर्गाचा विचार ज्या राजकीय संस्थांच्या द्वारां लोकसमाजांत अंमल चालवीत असतो त्या संस्था व सदरील राजकीय, सामाजिक स्थित्यन्तरकल्पनादि प्रकार यांजमध्येंहि क्रियाप्रतिक्रिया होत असते. धर्म व कायदा या दोहोंमध्येंहि राजकीय व सामाजिक स्थित्यंतरांनीं व एतत्संबंधीं कल्पनांत व भावनांत फरक पडल्यानें तदनुसार फरक होत असतो. धर्म व कायदा यांजमध्यें हें जें साम्य आहे तें स्पष्ट करण्यासाठीं सामाजिक रूढी व शासनसंस्था यांच्या विकासाचीं कांहीं प्रमुख अंगें वाचकांपुढें मांडलीं पाहिजेत. हें करण्यापूर्वी धर्माचा विकास आणि आर्थिक व बौद्धिक इतिहास यांचें परस्पर नातें कशा प्रकारचें आहे तें थोडक्यांत पाहूं. कायद्याचा विकास व आर्थिक–बौद्धिक इतिहास यांचें नातें सर्वांना ठाऊक असल्यानें त्याचा विचार येथें करण्याची आवश्यकता नाहीं.

समाजाच्या आर्थिक स्थितींत फरक झाले कीं त्याच्या धर्माच्या इतिहासांतहि फरक होतात. हिंदुस्थानच्या आर्थिक इतिहासाची उपलब्ध माहिती फार त्रोटक असल्यानें वरील मुद्द्याचा विचार त्रोटकपणें करणेंच जरूर आहे. एवढें खरें कीं, जसजसें अलीकडच्या काळांत आपण प्रवेश करतों तसतशी धर्मशास्त्रांतून आर्थिक विषयांवर अधिक माहिती दिलेली आपणांस आढळते. उदाहरणार्थ याज्ञवल्क्यांत जाइंटस्टॉक अथवा समाईक भांडवलाच्या मंडळ्यांचें शासन कसें करावें यासंबंधींचे नियम आहेत. परंतु अलीकडे आलें म्हणजे आर्थिक विषयांचा परामर्श धर्मशास्त्रांत अधिक प्रमाणांत पहावयास मिळतो याचें कारण निश्चितपणें सांगतां येत नाहीं. न्यायदानाचा कारभार ब्राह्मणांच्या हातीं अलीकडे अधिक प्रमाणांत आला व धर्मशास्त्राचा अलीकडे अधिक विकास होऊन शुद्ध कायद्याच्या गोष्टीकडे त्याचा भाग अधिक खर्ची पडूं लागला, हें एक वरील गोष्टीचें कारण असलें पाहिजे व समाजाची आर्थिक दृष्टीनें प्रगति अलीकडे अधिक होत गेली हेंहि कदाचित आर्थिक विषयांचा विचार धर्मशास्त्रांत अधिक प्रमाणांत येऊं लागण्याचें कारण असलें पाहिजे पण कोणत्या कारणाचा प्रस्तुत बाबतींत कितपत योग झाला हें समजणें दुरापास्त आहे. कारण व्यापारी मंडळ्यांचा उल्लेख जातकांतहि सांपडतो. यावरून आर्थिक उन्नति फार प्राचीन काळींहि भारतीयांत बरीच झाली होती हें उघड होतें.

समाजाचा बौद्धिक इतिहास त्याच्या धर्मशास्त्राच्या व कायदेशास्त्राच्या विकासाशीं निगडित झालेला असतो हें सहज समजण्यासारखें आहे. कोणी कांहीं निर्णय देतो तो त्याच्या काळीं चांगली तर्कपद्धति म्हणून जी लोकदृष्टीनें ठरली असेल त्या पद्धतीला धरूनच देत असतो. कायद्यांतील व्यंगपूरक कल्पना तयार होतात त्या सत् व असत्, न्याय व अन्याय यासंबंधींच्या लोकांच्या कल्पना थोड्या फार बदलतात तेव्हां तयार होतात. असलेला नियम वापरतांना त्याचा अर्थ कायद्यांतील अक्षरांना धरून लावणें अगर कायद्याच्या हेतूला धरून लावणें या क्रिया करण्यांत येतात तेव्हां व्युत्पत्तिशास्त्राचा कायदेशास्त्राच्या प्रांतांत प्रवेश होतो.

कोणत्याहि समाजाचा कायदा आणि त्याच्या संस्था यांच्यासंबंधानें बरोबर कल्पना यावी असें वाटत असेल तर त्या समाजांतील लोकांची विचारसरणी काय होती व या विचारसरणीचा ते आपल्या संस्थांत कसा काय उपयोग करीत होते हें आम्हीं समजून घेतलें पाहिजे. भारतीयांत धर्मशास्त्रांवर लिहिण्याची विचारसरणी कशी होती ती समजावी म्हणून त्या विचारसरणीचे कांहीं विशेष खालीं देतों.

धर्म काय आहे हें ठरवितांना मीमांसाशास्त्र हें एकच मार्गदर्शक साधन आहे अशी सामान्य समजूत आहे. जुन्या शिक्षणाचे ब्राह्मण लोक याच शास्त्रावर अवलंबून

रहातात ही गोष्ट कदाचित खरी असेल. परंतु भारतीयांच्या बौद्धिक विकासांत विशेष अथवा विशिष्टत्वसूचक भाग कोणते त्यांचें ज्ञान करून घेऊं इच्छिणारांनां मीमांसाशास्त्र कांहीं पुरें पडत नाहीं. अशा प्रकारचें ज्ञान आजच्या वकिलाला अवश्यक आहे. विवक्षित लोकसमाजांत जो कायदा असेल त्याचा अर्थ लावतांना त्या समाजाचें अंतरंग ओळखून तदनुसार अर्थ लावला पाहिजे, अथवा दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें तर त्या समाजाची बौद्धिक पूर्वकथा काय आहे ती सामग्र्यानें पाहून तिच्या अनुरोधानें त्या समाजाच्या कायद्याचा अर्थ लावला पाहिजे.

धर्मकल्पनांची व्यवस्था लावण्याची पुराणाभिमान्यांची रीत कशी होतीः—जुन्या कल्पना खोट्या असें विधान हे लोक कधींहि करीत नसत. परिस्थितींत कांहीं सवलती देण्यासारखी स्थिति उत्पन्न झाली आहे व म्हणून जुना नियम मोडला तरी चालेल असें प्रतिपादन ते करीत. अति पुरातन काळीं असणाऱ्या सवलती बंद करतांना कृतयुगांत या सर्व ठीक होत्या, परंतु कलियुगांत त्या ठीक नव्हत या विचारप्रकाराचा ते उपयोग करीत.

अलीकडे आलों असतां आपणांस असें दिसतें कीं, पूर्वी अनिषिद्ध असलेल्या गोष्टी पुढें निषिद्ध ठरण्यास कांहीं शास्त्रांची अवनति हें कारण झालें. हीं शास्त्रें लोकांच्या भ्रामक धर्मसमजुतींनां आळा घालीत. तीं अवनत झाल्यानें धर्मभ्रष्ट वाढले व या भ्रमांमुळें अनिषिद्ध गोष्टी निषिद्ध झाल्या. पारमार्थिक कल्पनांत फरक झाला कीं धर्मात फरक होई असेंहि आपणांस आढळून येतें. पराशर (१.३८) यानें जे सद्य धर्म म्हणून सांगितले आहेत ते व मनूनें (१०.७५) सांगितलेले सद्य धर्म यांत स्पष्ट अंतर आहे. या भेदाचें स्पष्टीकरण पराशर येणेंप्रमाणें करतो—मनूची शिकवणी ही सत्य अथवा कृतयुगाकरितां असून माझी कलियुगासाठीं आहे ( पराशर १. २३ ).

वेदान्ताचा प्रसार झाला तेव्हां यज्ञयागांचीं व संस्कारांचीं कर्में कमी झालीं. फलज्योतिषाचा प्रसार झाला तसा धर्मशास्त्रकारांनीं त्या शास्त्रानुसार कर्में करावीं असा विधि अथवा उपदेश केला. याप्रमाणें बौद्धिक दृष्टीनें लोकांचें पाऊल जसें पुढें किंवा मागें, या किंवा त्या बाजूला पडलें त्याबरोबर त्यांच्या धर्मांच्या अथवा कर्तव्यकर्मांच्या कल्पनांतहि बदल झाला, ही गोष्ट सिद्ध करणारे अनेक दाखले देतां येतील.

' हिंदु अँड इंडस फॉर्मेशन अँण्ड फ्यूचर ' ( हिंदुधर्म, त्याची रचना व त्याचें भवितव्य ) या पुस्तकांत डॉ. केतकर यांनीं या विषयाचा थोडासा विस्तार केलेला आहे. त्या ठिकाणीं त्यांनीं हेंहि दाखविलें आहे कीं, भारतीयांनां जें नवें शिक्षण मिळालें आहे त्यामुळें कांहीं सोंवळ्या ओंवळ्यासंबंधींच्या व शुद्धाशुद्धतेसंबंधाच्या जुन्या कल्पना त्यांनां पूर्वीइतक्या किंमतीच्या वाटत नाहींतशा झाल्या आहेत.

इंग्रजी कायद्याचा व रोमन कायद्याचा इतिहास यांच्या अभ्यासानें असें ठरतें कीं, कोणत्याहि देशाच्या कायद्यांत पायाभूत तत्त्वांच्या दृष्टीनें किंवा विविधता व संकीर्णता या दृष्टींनीं जे फेरफार होतात त्यांच्या मुळाशीं ज्या शक्ती, प्रेरणा अथवा घडामोडी असतात त्या पांच प्रकारच्या असतात, हे प्रकार येणेंप्रमाणेंः—( १ ) राजकीय फेरफार, ( २ ) क्षेत्रविस्तार, ( ३ ) परमार्थ संप्रदायांतील फेरफार, ( ४ ) आर्थिक फेरफार व ( ५ ) शास्त्रीय व तात्त्विक विचारसरणींतील फेरफार अथवा प्रगति.

विचारांची पालट व प्रगति त्याचप्रमाणें आर्थिक स्थितीची पालट ही धर्मांत फरक उत्पन्न होण्यास कारणीभूत होते हें आपण वर पाहिलेंच आहे. परमार्थसंप्रदायांतील फेरफारांनीं पाश्चात्य देशांत अनेक फेरफार घडवून आणले, परंतु पाश्चात्य देशांच्या मानानें भारतवर्षांत सांप्रदायिक फेरफार तितके परिणामकारी झाले नाहींत. धर्म व पारमार्थिक संप्रदाय एकच असें मानणारांनां हें विधान चमत्कारिक वाटेल. हिंदुधर्मावरील पुस्तकांत डॉ. केतकर यांनीं दाखवून दिलें आहे कीं, धर्म व संप्रदाय एक नव्हत. ख्रिस्ती मत व हिंदु मत यांच्यांत फार अंतर आहे. आज हिंदुस्थानचे लोक धर्म व संप्रदाय एकच मानतात ही गोष्ट खरी. परंतु या दोन मतबंधांत फरक आहेत. ख्रिस्ती व मुसुलमान संप्रदायांच्या मुळाशीं विशिष्ट पारमार्थिक कल्पना व विशिष्ट ग्रंथ आहेत. या संप्रदायांचे अनुयायी होणारांस त्यांच्या सांप्रदायिक पवित्रग्रंथांतील नियमांनां धरून वागावें लागे. संप्रदायाचें अनुयायित्व याच गोष्टीवर अवलंबून असे. ख्रिस्ती पवित्र ग्रंथाचा अर्थ लावण्याचा अधिकार एका मध्यवर्ती केंद्राकडे म्हणजे पोपकडे होता. यामुळें चर्चनें म्हणजे सांप्रदायिक केंद्रसंस्थेनें ठरविलेले नियम राज्याचा वरिष्ठ कायदा म्हणून मानला जाऊं लागला. कॅथोलिक राजसत्तेच्या ठिकाणीं प्रॉटेस्टंट राजसत्ता झाली कीं, कायदे करणाऱ्या सत्तेंत फरक होई. अर्थात सांप्रदायिक फरकानें कायद्यांत फरक होत. पूर्वी यूरोप हा सांप्रदायिक सत्तेनें शासित झालेला होता; तसा प्रकार हिंदुस्थानांत केव्हांहि घडलेला नाहीं. हिंदुस्थानांत राजानें धर्माप्रमाणें चालावें असा नियम होता. परंतु त्यानें व्यवहाराची स्थिति पाहून सोईचें व शक्याशक्य काय तें ठरवून धर्माप्रमाणें वागावें अशी सवलत असे. तसेंच धर्म म्हणजे काय हें भिन्न ठिकाणीं भिन्न ब्राह्मण ठरवीत व या ब्राह्मणांचा कांहीं मेळ नव्हता. या दोन्ही कारणांमुळें पाश्चात्य देशांत संप्रदायसत्तेचा जसा धुमाकूळ माजला तसा प्रकार हिंदुस्थानांत झाला नाहीं.

सांप्रदायिक फेरफारांमुळें धर्मांच्या व कायद्यांच्या नियमांत फेरफार झालेले असे फारच थोडे. नवा संप्रदाय कोणी काढला म्हणजे ख्रिस्तीसाठीं म्हणून संप्रदाय-संस्थापक आपल्या अनुयायांनां खासगी व्यवहार अमुक प्रकारें करावा असें ठरवून त्याप्रमाणें कांहीं विशेष नियम घालून देत असे.

या संप्रदायाचे लोक अधिकाराच्या जाग्यावर चढले म्हणजे सार्वजनिक जीवनावर त्यांच्या विचारांचा परिणाम होई. उदाहरणार्थ कांहीं राजांनीं जैनांच्या पवित्र स्थानांतून प्राणिवध करू नये असे हुकूम काढले होते. दोन खोदलेख नमुन्याकरितां येथें देतों.

(१) " महाराणा श्री राजसिंह (इ. स. १६९३)—उमराव, प्रधान, पटेल, पटवारी, मेवाडच्या दशसहस्र गांवांत अंमल चालविणारे यांस त्यांच्या त्यांच्या स्थानांप्रमाणें फर्मावीत आहेत कीं, (अ) पुरातन काळापासून जैनांचीं मंदिरें व राहण्याचीं ठिकाणें यांस विशेष हक्क दिलेले आहेत,तरी या ठिकाणांच्या हद्दींतून मारावयाकरितां न्यावयाचा प्राणी नेऊं नये. हा त्यांचा पुरातन हक्क आहे. (आ) कोणताहि जीव-मनुष्य वा जनावर त्यांच्या ठिकाणावरून वधाकरितां नेला जाईल तर तो अवध्य होईल. (इ) राजद्रोही, दरवडेखोर, खुनी वगैरे लोक कैदेतून सुटून यतींच्या शालागृहांत शरणागत म्हणून गेले तर त्यांनां न्यायकचेऱ्यांच्या सेवकांनीं धरून आणूं नये. "

(२) " महाराजा छत्रसिंह (१६४९) फर्मावीत आहे कीं, रस्मी गांवांत मेंढ्या, म्हशीरेडे, बकरे किंवा दुसरा कोणताहि जीव मारणारा हा सरकारचा गुन्हेगार होईल.त्याचें घर, त्याचीं गुरेंढोरें व दुसरी मालमत्ता जप्त केली जाईल व त्याला गांवांतून बाहेर काढलें जाईल. "

आतां राजकीय फेरफार हे धर्मांत कोठवर फेरफार करूं शकतात तें पाहूं. राजकीय फेरफार याचा एक अर्थ राजकीय सत्ता चालविणाऱ्या वर्गांत फेर होणें म्हणजे नवीन वर्गाच्या हातीं राजकीय सत्ता जाणें असा आहे. या अर्थानें राजकीय फरक झाला कीं धर्मांत फरक होतो; याचें ठळक उदाहरण ब्राह्मणवर्गाच्या हातीं राजकीय सत्ता जाऊन ते अधिकाधिक राजकीय शक्तिमान् झाले तेव्हां धर्माचा व कायद्याचा दूरभाव कमी कमी होत गेला हें आहे. धर्मनियम अमलांत आणणारे ब्राह्मण, देशांत न्याय देणारे म्हणजे कायदा ठरविणारे ब्राह्मणच ही स्थिति बराच काळ टिकली असती तर कायदा व धर्म यांतील तफावत कदाचित अजीबात नाहींशी झाली असती.

राज्याच्या क्षेत्रविस्ताराचा परिणाम राजसत्ता चालविण्याचें कार्य अधिक गुंतागुंतीचें करण्याकडे होतो हें उघड आहे. नैतिक कल्पनांतहि या विस्तारानें फरक घडून येऊं शकतो. राज्यांत लहानसहान नव्या गोष्टी घडल्या, एखाद्या ठिकाणीं एखादी कल्पना विशेष पुढें आली तर राज्याच्या कायद्यांत फरक होईल. परंतु तेथील धर्माच्या प्रमुख तत्त्वांत अशा गोष्टींनीं फरक होत नाहीं. फारच महत्त्वाचे सामाजिक व राजकीय फेरफार घडून आले तरच धर्माच्या प्रमुख तत्त्वांत फरक घडून येऊं शकतो. हिंदुधर्माचा इतिहास पाहतां असें दिसतें कीं, हिंदु समाजाच्या जीवनक्रमाला येथून तेथवर वेगळी गति देणारे असे जे प्रकार समाजांत घडून आले त्यांनींच धर्मांत मोठाले फरक घडवून आणले. हिंदु समाजाची बनावट ज्या गोष्टींनीं झाली अशा गोष्टी, या समाजांत सर्वांत अधिक महत्त्वाचा जो ब्राह्मणांचा वर्ग त्याचें वजन वाढविणाऱ्या गोष्टी, तसेंच हिंदु समाजाचें राजकीय जीवन नष्ट करणाऱ्या किंवा पुन्हां प्रस्थापित करणाऱ्या गोष्टी यांचाच हिंदु धर्माची समाजांत पाळली जाणारी शिस्त व तिची वाढ यांजवर विशेष परिणाम झालेला आहे. आर्यन् कालापासून कायद्याच्या विकासाचे कालविभाग पडतात ते—

(१) वेदवाङ्मयाचा काळः—हा काळ फार मोठा होता. याच्या मर्यादा मात्र सांगतां येत नाहींत. या काळांत बाहेरून आलेल्या आर्यन् जातींच्या भिन्न संप्रदायांत एकपणा उत्पन्न झाला. त्या संप्रदायांचें ऐक्य झालें. सर्व आर्यन् लोकांचें वेद हें सामान्य पूर्वार्जित धन झालें. हें सर्व कसकसें घडून आलें तें कळण्यास मार्ग नाहीं.

(२) ब्राह्मणांचें वजन कायद्याच्या क्षेत्रांत वाढलें तो काळः—हा काळ कोठून कोठवर तें नक्की सांगतां येत नाहीं. धर्मसूत्रांचा उत्तर भाग तयार झाला त्या वेळेपासून मुसुलमानीं सत्ता येथें होईपर्यंतचा काळ वरील सदरांत घेतल्यास फारसें चुकणार नाहीं. ब्राह्मणांचें वजन वाढतें असतां घडलेल्या महत्त्वाच्या गोष्टीः—

(अ) धर्मशास्त्र तयार झालें. (आ) ब्राह्मणांनीं जी वरिष्ठ सत्ता मिळविली ती मिळविण्याचे त्यांचे उपाय. (इ) ब्राह्मण व क्षत्रिय या वर्गांचा आपसांत कलह. (ई) ब्राह्मणांच्या धर्मशास्त्राचा भारतांत सर्वत्र व भारताच्या बाहेर सयाम, कांबोज, जावा, बलि इत्यादि ठिकाणीं प्रचार आर्यन् धर्मशास्त्रांत आर्यन् बाह्य कायद्याचा अंगभूतत्वानें समावेश. ब्राह्मणांच्या वजनामुळें निरनिराळ्या ठिकाणांच्या कायद्यांत फरक. आर्यन् बाह्य रूढींचा ब्राह्मणी कायद्यांत अंगभूतत्वानें समावेश.

(३) मुसुलमानांच्या सत्तेचा काळः—हिंदु कायद्यावर मुसुमानांच्या हातीं सत्ता गेल्यानें परिणाम झाला. हिंदूंची समाजव्यवस्था व कायदेपद्धति पूर्वीप्रमाणें कितपत टिकून राहिली, व तिच्या परंपरेंत किती भंग झाला हा प्रश्न येथें महत्त्वाचा आहे.

(४) मराठ्यांच्या सत्तेचा व हिंदु पुनर्जीवनाचा काळः—या काळांत हिंदु संस्थांचें पुनरुज्जीवन होत होतें. हिंदु कायद्याचेंहि पुनरुज्जीवन होत होतें.

(५) ब्रिटिश सत्तेचा काळ.

ब्राह्मणवर्ग व कायदेशास्त्र.—कल्पशास्त्र व्यवहाराला (कायद्याला) लावल्यानें त्याचा असा परिणाम झाला कीं धर्माच्या पोटांत ज्या चालीरीती घेतल्या गेल्या त्यांनां अधिक पावित्र्य प्राप्त झालें. न्याय देण्याचें काम हें फार पवित्र होऊन बसलें. न्याय देणारा न्यायाधीश पुष्कळ अंशीं अशा वैभवाचा होऊन बसला कीं त्याला धक्का पोंचविणें म्हणजे अधर्माचें मानलें जाऊं लागलें. न्यायाधिशाच्या स्थानाची कल्पनाहि मोठी व उदार झाली. तो धर्माचा संरक्षक मानला जाऊं लागला. विश्वव्यवस्था व समाजव्यवस्था यांसंबंधींचे नियम पाळले जात आहेत

की नाहींत व त्यांत ठरविलेलीं मानवी कर्तव्यें नीट होत आहेत कीं नाहींत हें पाहणारा तो न्यायाधीश अशी उदार व्याख्या रूढ झाली. कल्प व धर्म दोन्ही शास्त्रें वेदांतून निघालेलीं, यामुळें त्यांनां सहजच पावित्र्य होतें. यायोगें खुद्द वेदग्रंथांचेंहि हित झालें. ते यापूर्वी विधि व संस्कार यांचे आधारभूत ग्रंथ म्हणून प्रमाण धरले जात, परंतु यापुढें रोजच्या व्यवहारांतील कायद्याला तात्त्विक दृष्टीनें तरी वेद हे पायाभूत मानले जाऊं लागले. अर्थात त्यांतील वाक्यांतून कांहीं रोजचे व्यवहारनियम काढले नाहींत, परंतु या नियमांनां सर्वसामान्य रीतीनें वेदाचा तत्त्वतः आधार आहे असा समज रूढ झाला.

ब्राह्मणांनीं न्यायाचीं कामें हातीं घेतल्यानें समाजाच्या एकीकरणाची क्रिया मार्गास लागली. धर्म व कायदा (व्यवहार) यांचा योग घडला. एका अखंड शास्त्राचे हे दोन घटक झाले आणि त्यामुळें सर्व समाजाला यांचा अधिक उपयोग होऊं लागला. आर्येन् जाती व इतर जाती यांनां कायद्यांत भिन्नत्व राहिलें नाहीं. कायद्यानें ते एका समाजाचे अंगभूत घटक झाले. तत्कालीन समाज कांहीं वेदवाङ्मय पूर्वार्जित असलेल्या लोकांचाच केवळ बनलेला नव्हता. तथापि धर्म हा वेदमूलक आहे, तसेंच तो विश्वव्यवस्थेचा अंगभूत असल्यानें सर्व समाजावर त्याची सत्ता आहे असा समज समाजांत असल्यानें धर्माशीं निगडित झालेला परंपरागत व्यवहारनियमसमुच्चय अथवा कायदा हाहि वेदमूलकच आहे असें सर्व लोक मानूं लागले. सर्व आर्य—अनार्य समाज स्वतःला एकरूप अखंड मानूं लागला. लोकांच्या मनांत सर्व समाज एका शरीरासारखा आहे अशी कल्पना रूढ झाली. यामुळें उच्च जातींची राहणी हीच खालच्या जातींनीं स्वतःस आदर्शभूत ठरवून आपल्या कमी प्रतीच्या चालीरीती बदलावयाचा उपक्रम त्यांनीं सुरू केला.

धर्माला अनुसरून सर्व व्यवहार चालावा ही कल्पना जरी सर्वसंमत झाली होती तरी ही कल्पना अमलांत आणतांना मर्यादा कोणती मानावयाची, धर्म या वस्तूंत कोणत्या गोष्टींचा अंतर्भाव करावयाचा वगैरे गोष्टी स्पष्टपणें केव्हांहि ठरल्या नाहींत. यासंबंधींच्या कल्पनांत नेहमींच पुष्कळशी संदिग्धता असे. भिन्न राजांच्या राजनीतींत भेद बऱ्याच प्रमाणांत आढळून येई. या भेदाला कारणें होतीं तीं येणेंप्रमाणेः—वेद हे धर्माचें आद्यमूलस्थान व वेदानंतर स्मृती, त्यानंतर वेदज्ञ व पुण्यशील लोकांचा आचार आणि शेवटीं आत्मतुष्टि हीं धर्माचीं उगमस्थानें होत अशी धर्मानें वागावें या सिद्धान्तांतील धर्मवस्तूसंबंधाची कल्पना होती. अर्थात धर्माचें उगमस्थान वरीलप्रमाणें अतिविस्तृत असल्यानें धर्म ठरवितांना व अमलांत आणतांना सदरील ग्रंथादिकांचा अर्थ लावण्याचा प्रश्न उभा राही, आणि अर्थ लावणारा जो वर्ग तो सुसंघटित नसल्यानें अर्थात भेद उत्पन्न होत ही एक गोष्ट. दुसरी गोष्ट म्हणजे धर्मविषयक सिद्धान्त जरी अस्पष्ट नसले तरी ते फारच व्यापक होते यामुळें प्रत्येकानें आपल्या शक्त्यनुसार धर्माचरण करावें एवढाच आग्रह असे. धर्म हा मूळांत ध्येयरूप असल्यानें व्यवहारांत त्याचा अंमल करतांना कडकपणाला फांटा देणें जरूर होत असे व यामुळेंहि भेद उत्पन्न होत.

धर्मवस्तूची अस्पष्टता, धर्म ही सर्वश्रेष्ठ वस्तु आहे ही कल्पना, राजे लोकांनींहि धर्म पाळलाच पाहिजे हा आग्रह व धर्म समजावून सांगणें हें काम ब्राह्मणांचें आहे, इतरांचें नव्हे हा आग्रह या सर्वांचा दुहेरी परिणाम झाला. एक, ब्राह्मणवर्ग अधिक पूज्य व म्हणून अधिक सत्तेचा मालक होऊन बसला व दुसरें, ब्राह्मणवर्ग व सत्ताधारीवर्ग यांच्यांत लढा उत्पन्न झाला.

धर्मांतील कर्तव्याकर्तव्याच्या उच्च कल्पना इतर सर्व गोष्टींपेक्षां श्रेष्ठ मानल्या जाव्या यासाठीं धर्मग्रंथांचा अर्थ लावणारा जो वर्ग त्या वर्गाला निर्भय करून ठेवणें व त्याचें चांगलें संरक्षण करणें अवश्य होतें. या अवश्यकतेनुसार ब्राह्मणवर्गाला पूज्य मानणें हें सामाजिक व राजकीय जीवनक्रमाचें मूलभूत तत्त्व होऊन बसलें. ब्राह्मण हा धर्माचा मूर्तिमंत अवतार आहे असें मनूमध्यें म्हटलें आहे (१.९८,९ ). ब्राह्मण स्वतःस लोकांनीं पूज्य मानावें असा जो हक्क सांगत तो अगदींच स्वार्थानें सांगत असें म्हणतां येत नाहीं. कोणत्याहि वर्गानें असा पूज्यपणाचा हक्क सांगावा व सामान्य जनतेनें तो इच्छा नसतांहि मान्य करावा अशी कांहीं स्थिति नसते. सर्वसाधारण लोक असा पूज्यपणाचा हक्क त्यापासून त्यांचा स्वतःचा कांहीं फायदा असल्याशिवाय कबूल करणारच नाहींत. श्रेष्ठत्वावर ब्राह्मण आपला हक्क सांगत होते व ब्राह्मण सत्ताधारी वर्गाशीं झगडा करीत होते या गोष्टींनां ब्राह्मणांची धर्मसंरक्षणाची काळजीच कारण होती असें कांहीं म्हणतां येत नाहीं. दुसरींहि अनेक कारणें होतीं परंतु सदरील कारण प्रमुख होतें एवढें मात्र खरें.

राजे लोक व धर्मग्रंथांचा अर्थ लावणारा वर्ग यांच्यामध्यें लढा उत्पन्न होणें अपरिहार्य होतें. पाश्चात्य जगतांत उपासनापंथ हाच समाजाच्या मूलधर्माचें काम करीत होता. ख्रिश्चन पंथाचा मनुष्य त्या पंथाप्रमाणें चालावयाचा असा क्रम असे. राजा जे कायदे करी त्यांजपेक्षांहि ख्रिस्तीपंथ हा वरिष्ठ मानला जात असे. ख्रिस्ती पंथ ज्यावेळीं जसा असेल तसा राजांनीं मानावयाचा हेंच राजाचें कर्तव्य मानलें जात होतें. ख्रिस्ती पंथांत काय येतें हें सांगणें चर्चकडे असे आणि यामुळें चर्च व स्टेट म्हणजे पंथसंस्था व राज्यसंस्था यांच्यामध्यें लढा उत्पन्न झाला. भारतांत चर्चप्रमाणें पंथसंस्था नव्हती; परंतु येथें ब्राह्मणवर्ग होता. हा ब्राह्मणवर्ग सामर्थ्यवान आणि स्वयंपूर्ण असा होता. त्याचा पूज्यपणा हा त्याच्या स्वयंपूर्णतेचें कारण होतें. अशी स्थिति असल्यानें धर्म आणि राजाज्ञा यांच्यामध्यें जो लढा प्रथम उत्पन्न झाला त्याचा परिणाम ब्राह्मणांचा राजांनीं द्वेष करण्यांत झाला.

ब्राह्मणवर्ग धर्म काय तें समजावून सांगण्याचा हक्क आपला आहे असें जें म्हणत त्याला अनेक कारणें होतीं. एक, वेदवाङ्मय व धर्मशास्त्रें यांचें ज्ञान असणारा वर्ग एवढाच होता. दुसऱ्या अशा संस्थाच अस्तित्वांत नव्हत्या कीं ज्यांच्या आधारानें ब्राह्मणांशीं स्पर्धा करण्यास समर्थ असा एखादा वर्ग उभा होऊं शकेल. दुसरें, सर्वसाधारण लोकांमध्यें अशी एक भावना होती कीं, संपत्तीच्या पाठीमागें लागलेला जो मनुष्य त्याला धर्म सांगण्याचा हक्क असूं नये. मनु म्हणतो जे धनार्जनाकडे लागलेले नाहींत त्यांच्यासाठीं धर्माचें ज्ञान विहित आहे; धर्मतुष्टीला श्रुतींचा आधार सर्वश्रेष्ठ आहे.

धनार्जनांत गुंतलेल्या लोकांनां धर्मनिरूपणाचा अधिकार न देण्याचीं कारणें अनेक होतीं. एक धर्मनिरूपण करणारास दीर्घ कालपर्यंत एक ठरीव अभ्यासक्रम पार पाडावा लागे. दुसरें, उपजीविकेसाठीं दुसऱ्यावर अवलंबून असणारे लोक त्यामानानें न्याय देण्यास कमी पात्र आहेत असें मानलें जाई..धर्मकल्पना ही विस्तृत व व्यापक होती आणि धनार्जनमग्न माणसाला धर्मनिर्वचनास अनधिकारी मानण्याला हेंहि एक कारण होतें. विस्तृत व व्यापक धर्मकल्पनेप्रमाणें ब्राह्मणांखेरीज इतरांनां धर्माचें निर्वचन करतां येणें शक्यच नव्हतें. सामान्य व्यवहारनियम एवढाच केवळ धर्म नसून पुष्कळसा संस्काराचा भागहि धर्मांत येई. अशा व्यापक धर्माच्या बाबतींत धर्मनिर्णय द्यावयास नेमलेल्या माणसांनां अनेक प्रश्नांचा निर्णय करावयाचा असे. उदाहरणार्थ, करार म्हणजे काय, अमुक यज्ञ अमुक घटकेला करावा किंवा कसें हे दोन्हीहि प्रश्न एकाच व्यक्तीकडे अगर सभेकडे निर्णयास येत. यांतील विधिविषयक व देवशास्त्रविषयक गोष्टींमध्यें ब्राह्मणांखेरीज इतर वर्ग अधिकारीपणानें कांहींच सांगूं शकले नसते.

पृथ्वीवरील इतर देशांत कायदेविषयक उपपत्तींचा लढा लागलेला होता त्याप्रमाणें हिंदुस्थानांतहि तो लागलेला होता. या लढ्यांत भाग घेणारे लोक म्हणजे बहुतकरून ब्राह्मणवर्ग व राजन्यवर्ग यांतीलच असत.

राजन्यवर्ग हा आपल्यांतून फारसे लायक लोक स्वपक्षसमर्थनार्थ निर्माण करूं शकला नाहीं असें दिसतें. ब्राह्मणांचा सर्वकाळ विजयच झाला असा इतिहास दिसतो. बौद्धसंप्रदाय पाखंड ज्यानें काढलें तो गौतम, धम्म म्हणून नवीन नीतिशास्त्र सर्वांसाठीं तयार करण्याच्या प्रयत्नांत होता. तथापि हा धम्म केवळ त्याच्या संप्रदायी लोकांतच काय तो उपयोगांत आला. गौतमाच्या ठिकाणीं, व्यवहाराच्या निरनिराळ्या अंगांत मार्गदर्शक होतील असे नियम तयार करण्यापुरती बौद्धिक ऐपत नव्हती असें दिसतें. गौतमाचा अंतिम हेतु राजकारणानें अगदींच अस्पृष्ट होता असें ह्मणतां येत नाहीं. तो ब्राह्मणांचें शास्त्र, त्यांचें तत्त्वज्ञान व त्यांची जात यांविरुद्ध अतिशय कडक शब्दांनीं ओरड करीत होता. प्रापंचिक व्यवहाराचे नियम करण्याचा त्यानें यत्न केला परंतु त्याला या कामांत यश आलें नाहीं. यश न येण्याचीं कारणें येणेंप्रमाणें:—

( १ ) देशांतील कायदा व परंपरागत लोकाचार यांचें ज्ञान गौतमाला नव्हतें; त्यानें लिहिलेल्या ग्रंथांतलि कित्येक उतारे दाखवून वर उल्लेखिलेलें त्याचें अज्ञान सिद्ध करून दाखवितां येईल. ( २ ) प्रापंचिक व्यवहाराचे नियम करण्याला जी दुसरी पात्रता लागते तीहि त्याच्या ठिकाणीं नव्हती. कायद्याची एकंदर इमारत रद्द करावयाची म्हणजे मनुष्याला एकमुखी सत्ता पाहिजे; व कायदेशास्त्राचें पद्धतशीर ज्ञान पाहिजे. धर्मबंधनाची अस्तित्वांत असलेली व्यवस्था दूर करावयाची होती तर खालील गोष्टी करण्याचा व्यवस्थित प्रयत्न गौतमानें करावयास पाहिजे होता. ( अ ) वेद हें सामाजिक बाबतींत मार्गदर्शक असणाऱ्या नियमांचें मुख्य उगमस्थान होतें. त्यांवरील लोकांचा विश्वास गौतमानें हाणून पाडावयास पाहिजे होता. ( आ ) जुनें धर्मवाङ्मय जें होतें त्याच्या जागीं अवैदिक व्यवहारशास्त्र रचावयास पाहिजे होतें. समाजव्यवस्थेची सुव्यवस्थित कल्पना त्यानें तयार करावयास पाहिजे होती आणि या नवीन समाजव्यवहारशास्त्रांत स्थानिक रूढी बेमालूमपणें अंगभूत म्हणून त्यानें बसवावयास पाहिजे होत्या. तसेंच कांहीं राजे बौद्धधर्मी झाले तेव्हां ही अवैदिक व्यवस्था त्यांनीं पत्करावी असा प्रयत्न त्यानें करावयास पाहिजे होता. ( इ ) ब्राह्मणजात अथवा वर्ग व्यवहारशास्त्राचा अधिकारी कर्ता आहे ही जी जुनी समजूत होती ती काढून टाकण्याचा त्यानें प्रयत्न करावयास पाहिजे होता व त्यावरोबर ब्राह्मणांखेरीज कोणत्या तरी दुसऱ्या वर्गाकडे व्यवहारशास्त्ररचनेचें कार्य सोंपवून या वर्गाला ब्राह्मणांचें जुनें स्थान प्राप्त होईल असाहि प्रयत्न करावयास पाहिजे होता. ब्राह्मणांचें वर्चस्व नाहींसें करण्यासाठीं वेदांचेंच महत्त्व गौतमानें नाहींसें करावयास पाहिजे होतें. परंतु वेदांच्या संबंधांत गौतमाची वृत्ति पाहिली तर विरोधाची होती पण ती अगदीं दुबळ्या व भित्र्या विरोधाची होती. याप्रमाणें प्रापंचिक व्यवहारशास्त्र रचण्याला गौतम अगदीं अपात्र होता व यामुळें या शास्त्राच्या रचनेंत त्याला यश आलें नाहीं.

चातुर्वर्ण्याच्या तत्त्वाचें बौद्ध जगाकडून अवलंबनः—बौद्धांनीं चातुर्वण्याचें तत्त्व अजीबात मानलें नाहीं असें नाहीं. जेव्हां भारतीय संस्कृति हिंदुस्थानाबाहेर गेली तेव्हां ब्राह्मणी वाङ्मय व त्याबरोबर चातुर्वर्ण्याचें तत्त्व अन्य देशांत गेलेंच, पण जेथें बौद्ध संप्रदाय होता तेथें देखील ब्राह्मणांचें महत्त्व होतेंच. ब्रह्मदेशच्या राजे लोकांनीं आपले संस्कार करण्याकरितां काशीहून ब्राह्मण आणले, त्यांचे वंशज आज ब्रह्मदेशांत आहेतच. सिंहलद्वीपांत सिंहली समाजांत ब्राह्मण नाहींत तरी ब्राह्मणांचें तात्त्विक व सामाजिक महत्त्व त्यांच्या नीतिनिगंडुवखारव्या ग्रंथांत दिसून येत

आहे. तेथील गोवीय आपणांस अंशेकरून ब्राह्मण पुरुषांचे वंशज समजतात. जपानमध्यें सामुराईचें महत्त्व आणि व्यापारीवर्गाची तुच्छता तेथील चातुर्वर्ण्यविषयक उपदेशाचें स्मारक आहे. तिबेटमध्यें असलेले 'बोनबो' यांचें सांस्कारिक-महत्त्व तेथील प्राचीन चातुर्वर्ण्यविषयक उपदेशाचेंच स्मारक आहे. बौद्धांची खटपट ब्राह्मणांचें महत्त्व नाहींसें करण्याकडे नव्हती तर ब्राह्मणांपेक्षां क्षत्रियवर्गाचें महत्त्व वाढवण्याकडे होती.

ब्राह्मणवर्ग आणि कायदेशास्त्रः-वेदकालांतील बौद्धिक वर्ग म्हणजे ब्राह्मणांचा वर्ग होय. ब्राह्मणांच्या अध्ययनांत नानातऱ्हेचे विषय येत. ब्राह्मणांनीं बौद्धिक श्रेष्ठतेचें स्थान कसें प्राप्त करून घेतलें त्याचें वर्णन करण्याचें येथें कारण नाहीं. येथें एवढेंच सांगावयाचें कीं, वेदोत्तरकालीन ब्राह्मणांचा जो दर्जा होता तो त्यांनां परंपरेनें प्राप्त झालेला होता व असा दर्जा परंपराप्राप्त असल्यानें त्यांनां न्यायाधिकाऱ्याचें कार्य व स्थान आपल्या हातांत घेणें सुकर झालें. ब्राह्मण न्यायाधिकारी कसे झाले, ब्राह्मणवर्गाचें महत्त्व ब्राह्मण-क्षत्रियांच्या स्पर्धेस कसें व कितपत कारण झालें व या स्पर्धेशीं ज्याचा निकट संबंध तें धर्मशास्त्र कसें निर्माण झालें त्याचा आतां आपण विचार करूं.

समाजांत विशिष्ट प्रकारचे राजकीय फेरबदल घडून आले म्हणजे त्याच्या कायद्यांतहि फेरफार होतो. परंतु भारतांत राजकीय फेरफार हा कायद्यांच्या विकासाचा घटक फारसा दिसून येत नाहीं. समाजांत ज्या वर्गाच्या हातांत राजकीय सत्ता खेळत असते त्या वर्गांत कांहीं फेरपालट करणारे जे राजकीय फेरफार असतील त्यांचाच कायद्यांत फेरबदल करण्याच्या कामीं उपयोग होतो. ख्रिस्तपूर्व ५ व्या शतकापासून तों मुसुलमानी सत्तेच्या स्थापनेपर्यंत सदरील प्रकारचे राजकीय फेरफार सामान्यतः घडलेच नाहींत असें म्हणतां येतें. या १५०० वर्षांच्या किंवा त्याहिपेक्षां अधिक काळांत कायद्याची स्थिति साधारणतः खालीं दर्शविल्याप्रमाणें होती. ठिकठिकाणीं ज्या स्थानिक रूढी म्हणून असत व ज्यांचा निरनिराळ्या वर्गांत प्रसार असे त्यांनां राजाकडून मान्यता मिळे. राजा हुकूम करी ते सर्वांनां मान्य करावे लागत व खुद्द राजांनां कधीं कधीं ब्राह्मण जे नियम घालून देत किंवा जो सल्ला त्यांजकडून मिळे त्याप्रमाणें वागावें लागे. पण राजे लोक ब्राह्मणांकडून आपणांस फारसे जखडून घेत असत असें दिसत नाहीं.

कायदा व न्याय या कार्याकडे ब्राह्मणांचें लक्ष वेधलें त्यावेळीं ब्राह्मणवर्ग हा फार मोठ्या संख्येचा व जन्मसिद्ध वर्ग बनलेला होता. त्यांची कडक बंधनांची जातच बनलेली होती व पुरोहितपण आणि गुरुजीपण या नेहमींच्या धंद्यावेगळे धंदे करून उपजीविका करण्याची आवश्यकता त्यांनां उत्पन्न झालेली होती. संख्यावृद्धि या गोष्टीखेरीज दुसरीहि एक गोष्ट न्याय व कायदा या कार्यां ब्राह्मणांनां सहज लोटावयास कारण झाली. ही गोष्ट म्हणजे तत्कालिन विद्येची स्थिति. या काळीं वेदवाङ्मय व्यवस्थेनें लावलें गेलें होतें. वेदाभ्यासानें प्राप्त होणारें जें ज्ञान त्याची सहा शास्त्रांत विभागणी केली गेली होती. छंद, व्याकरण वगैरे नांवें या शास्त्रांस दिलीं होतीं व या सर्वांनां वेदांगें म्हणत. कल्प हें एक या शास्त्रांपैकीं शास्त्र होतें. यज्ञविषयक कर्म व पौरोहित्याचें नित्यकर्म यांचाच कल्पशास्त्रांत ऊहापोह केलेला आहे. कल्पशास्त्राचाच एक विभाग धर्म हा होता. समाजांत असणारे चार वर्ग व जीविताच्या चार अवस्था अथवा आश्रम यासंबंधांतील कर्तव्यें व विधिसंस्कार या धर्मनामक कल्पविभागांत विशद करून सांगितले आहेत. धर्माचें क्षेत्र आरंभीं फार मर्यादित होतें पण पुढें त्याच्या सीमा पुष्कळच वाढल्या. समाजाच्या नियंत्रणाची जी धर्म नांवाची व्यवस्था तिचा वेदग्रंथांतील मूलघटकांतून कसा उद्भव व विकास झाला तें पाहण्यासारखें आहे. धर्म याचा मूळ अर्थ कोणताहि विधि अथवा नियम. धर्म या शब्दाला मूळांत निश्चित व स्पष्ट-अमुक नियम-असा अर्थ नव्हता. विधि अथवा नियम हा जो धर्म याचा संदिग्ध अर्थ त्याच्याभोंवतीं हळू हळू पुष्कळशा विचारसंपत्तीचीं पुटें बसलीं, व स्मृतिग्रंथ अस्तित्वांत आले. स्मृतिग्रंथांतील बऱ्याच नियमांनां वेदग्रंथांत फारच थोडा आधार मिळतो. वेदग्रंथांत चार वर्णांचा थोडाफार उल्लेख आढळतो, आणि त्यांच्या उत्पत्तीच्या कांहीं अलंकारिक कथा सांपडतात इतकेंच काय तें. स्मृतींनें व वेदांचें भिन्नत्व मनुस्मृतींत 'श्रुतिस्तु वेदो विज्ञेया धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः' असें व्यक्त केलें आहे व धर्मशास्त्र व वेद यांचें दूरत्व वर्णिलें आहे. पुढें स्मृतींत या लहानशा आधारावर मोठाल्या इमारती रचल्या गेल्या. स्मृतींत सुस्पष्ट समाजव्यवस्था व तिची मीमांसा सांपडते, वर्णानें आपापलें कर्म करणें हें समाजशासनाचें आद्यतत्त्व म्हणून स्मृतींतून घालून दिलेलें आढळतें. त्यांत विवाहासंबंधानें कांहीं विवक्षित तात्त्विक नियम सांपडतो. फौजदारी व दिवाणी कायद्याचीं तत्त्वें त्यांत पहावयास मिळतात. यांपैकीं कांहींहि वेदग्रंथांत आपणांस उपलब्ध होत नाहीं. फौजदारी अथवा दिवाणी कायदा प्रस्थापित करणारा पुरुष अमुक होता असाहि कांहीं उल्लेख वेदांत मिळत नाहीं. यज्ञविषयक विधि निर्माण करणारांचे मात्र वेदांत उल्लेख येतात. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे स्मृतींतून आढळणारा पुष्कळसा भाग वेदमूलक नाहीं.

स्मृतींमधून आढळून येणारे कांहीं नियम वेदांत उल्लेखिलेले असले तरी हे वेदांतील उल्लेख व धर्माची कल्पना यांचा परस्पर संबंध वेदकालीं नव्हता. धर्माचें व सदरील नियमांचें नातें पुढें पुढें जमविलें गेलें. वस्तूंचा स्वभाव नित्य आहे, वस्तूंच्या उगमस्थानावरून त्यांचा स्वभाव ठरतो, विश्व हें स्वभावतः व्यवस्थित घटलेलें आहे, चातुर्वर्ण्ययुक्त समाजव्यवस्था ही

विश्वव्यवस्थेचाच एक भाग आहे, अशा कल्पना विकास पावल्यानें वेदांतील विधिनियम जे पूर्वी धर्माशीं निगडित नव्हते ते धर्माच्या पोटांत घेतले गेले. स्मृतींमध्यें विवाहविषयक जे नियम आहेत ते, वर्ण ही कल्पना मनुष्यजीविताला लावून तयार केलेले आहेत. येथें हें सांगितलें पाहिजे कीं, हे विवाह-नियम शिफारशींच्या स्वरूपाचे होते. स्मृतिकालीन वाङ्मयांत असा एकहि दाखला मिळत नाहीं कीं, या नियमांच्या अतिक्रमणाला शासन मिळालें आहे. स्मृतींमध्यें अमुक युगांत अथवा मन्वंतरांत अमुक धर्मनियम विहित आहेत अशा प्रकारची कल्पना वेदांत नाहीं, कारण चार युगें ही कल्पना अथवा ·न्वंतरांची कल्पना वेदांत नाहीं. युग हा शब्द वेदांत आहे पण त्या शब्दानें उत्तरकालीं व्यक्त होणाऱ्या कल्पना वेदांत नाहींत. वेदांमध्यें कृत,त्रेत,द्वापर, कलि हीं युगांचीं नांवें म्हणून आलीं नसून फांश्यांच्या दानांचीं नांवें म्हणून आलीं आहेत. कृत, त्रेत, हीं युगें अशी कल्पना पुढें हळू हळू अस्तित्वांत आली व त्यायोगें धर्माची कल्पना विस्तृत झाली. ब्राह्मण लोक न्यायाधिकारी व कायदेशिक्षक झाले तेव्हां ही न्यायाची व कायद्याची विद्या त्यांनीं धर्माच्या पोटांत घातली. ही विद्या येथेंच घालणें त्यांनां शक्य होतें. जातां जातां हें सांगणें वावगें होणार नाहीं कीं, प्राचीन ब्राह्मणांनां जसें एखादें नवें ज्ञानक्षेत्र सांपडे तसें तें कोणच्या तरी जुन्या अथवा नव्या वर्गीकरणानुसार काळजीनें वर्गीकृत करून टाकण्याची त्यांनां संवय असे. या त्यांच्या संवयीमुळें प्राचीन संस्कृत वाङ्मयांत वर्गीकरणाची रेलचेल आपणांस पहावयास मिळते. मनुस्मृतीसंबंधानें बोलावयाचें तर या स्मृतींतील पुष्कळसा भाग वेदांत मुळींच सांपडणार नाहीं हें सांगितलें पाहिजे. वेदमूलक असा जो या स्मृतींतील भाग आहे तो म्हणजे 'कल्प' भाग होय. या कल्पांत चार वर्णांचे संस्कार व तत्संबंधीं विधी वर्णिलेले आहेत.

पूर्वी धर्म या कल्पनेच्या क्षेत्रांत कायद्याचा मुळींच अंतर्भाव होत नसे ही गोष्ट जैमिनीच्या ग्रंथावरून सिद्ध होते. वेदवाक्यांचा अर्थ कसा लावावा यासंबंधानें जैमिनीनें पूर्वमीमांसा या नांवाचें एक शास्त्र लिहिलें आहे व या शास्त्राचा उद्देश अभ्यासकाला वेदवाक्यांतून "धर्मतत्त्वें" शोधून काढण्याला मदत व्हावी हा आहे. या धर्म शब्दाचा अर्थ जैमिनीनें विधि व यज्ञयाग असा घेतला आहे. ऋग्वेदांत धर्म याचा अर्थ श्रौतसंस्थाविषयक नियम असा आहे, सामाजिक नियम असा नाहीं· हें सदरील मीमांसेंत जी चर्चा आहे तिजवरून उघड होतें. ब्राह्मण हा प्रत्यक्ष धर्माची मूर्ति आहे, धर्माचें संरक्षण हें ब्राह्मणांकडे सोंपविलें आहे अशीं विधानें मनूमध्यें व तत्पूर्व ग्रंथकारांच्या ग्रंथांतून सांपडतात; परंतु या विधानांवरून ब्राह्मण हे न्यायाधीश होते हें सिद्ध होत नाहीं.

ब्राह्मणांनीं न्यायाचें व कायद्याचें काम उत्तरकालीं हातीं घेतलें यास एक पुरावा असा आहे कीं, जसें जसें आपण अलीकडच्या काळांत येतो तस तसा धर्मग्रंथांतून व्यवहारावर अधिकाधिक भाग खर्ची पडलेला सांपडतो. या अधिक व्यवहार-चर्चेचें कारण समाज अधिक संकीर्ण होत गेला हेंच केवळ आहे असें म्हणतां येणार नाहीं; कारण बौधायनाच्या वेळीं देखील ग्रंथांत समाविष्ट झालेल्या नियमांनींच केवळ चालणारा समाज नसून पुष्कळच संकीर्ण होता.

ब्राह्मणांकडे कायद्याचें व न्यायाचें काम आल्यानें कायदेशास्त्र व समाजशास्त्र यांजवर दूरगामी परिणाम झाले. पहिली गोष्ट, समाजांत ज्या वहिवाटी व जो कायदा चालू होता त्याला एक प्रकारची व्यवस्थित रचना प्राप्त झाली. कल्पग्रंथ झाले त्यामुळें समाजांत असलेल्या कायद्यापाठीमागें एक सामाजिक उपपत्ति उभी केली गेली. या कल्पग्रंथांत चार वर्णांची व्यवस्था उपपत्तिरूपानें सांगितलेली आहे. या उपपत्तीमुळें कायद्याच्या विकासाला एक विशिष्ट वळण मिळालें. आधुनिक कायदेपंडितांनां ही उपपत्ति कांहीं उपयोगाची नसली तरी तिचा त्याग त्यांनां करवत नाहीं असें दिसतें. समाजाला कांहीं तरी समाजरचनाविषयक उपपत्ति व अंतिम असलेलें, असें कांहींच नसण्यापेक्षां फायद्याचें असतें. वरील उपपत्तीला श्रुतीचा व विश्वरचनाशास्त्राचा आधार होता यामुळें प्राचीन समाजाच्या शासनाच्या कामीं तिचा फार उपयोग होत असे.

कायदा याद्दृष्टीनें धर्माचें महत्त्व मर्यादित होतें. मुसुलमानी अमदानींत जुन्या हिंदु संस्थांत व कायदेपद्धतींत दोषांचा शिरकाव झाला. हिंदु-समाजव्यवस्थेची हयगय झाली. हिंदु कायद्याकडे दुर्लक्ष झालें. हिंदूंच्या चाली व संस्था यांच्या संबंधानें अधिकारयुक्त मत देणारे हिंदु असतांना त्यांचें मत निरुपयोगी झालें. त्यांचा सरकारी निकालावर कांहींच परिणाम होईनासा झाला. जातपंचायती मात्र काम करीत राहिल्या. गांवपंचायती हीनावस्थेंत चालल्या. बहुतेक हिंदु लोक जातप्रकरणें, विवाह, दत्तक वगैरे बाबतींत आपल्या समाजाच्या खासगी कायद्याप्रमाणें वागत. बहुतेक लोक वरील बाबतींत आपखुषीनें जुन्या कायद्याप्रमाणें चालत. राज्यकर्त्यांनीं या कायद्याला पाठबळ दिलें असतें किंवा नाहीं याबद्दल शंका आहे. एवढें खरें कीं, मुसुलमानी अमदानींत वारसा वगैरे बाबतींत मुसुलमानी राजांचे अंकित झालेले हिंदु अधिकारी पंडितांचा सल्ला घेऊन निकाल देत. तसेंच जातपंचायती आपल्या जातीच्या रूढी, जातवाल्यांनां बऱ्याच प्रमाणांत पाळावयास लावीत.

मराठ्यांच्या अमदानींत हिंदु कायदा आणि हिंदु धर्माच्या अंतिम कल्पना यांनां व्यवहारांत पुन्हां पाहिलें स्थान मिळूं लागलें. परंतु मराठ्यांचा अंमल फार थोडे दिवस टिकला यामुळें कायद्यावर त्याचा विशेष परिणाम घडून आला नाहीं.

[ मराठ्यांची इच्छा हिंदुस्थान मुसुलमानांप्रमाणें इंग्रजांच्या हातूनहि हिंदूंच्या हातीं आणण्याची होती ही गोष्ट बाळाजी बाजीराव याच्या एका अप्रसिद्ध पत्रांत व्यक्त झालेली

आहे. इंडिया ऑफिस-मॅकेंझीचा संग्रह ( १३, २९ ) हें पत्र बाळाजी बाजीराव यानें जयपूरच्या महाराजाला लिहिलें आहे. हें पत्र पानिपतच्या लढाईनंतरचें असून यांत इंग्रजांनां हांकलून देण्याच्या कामीं पेशवा जयपूर महाराजाची मदत मागत आहे. पत्र मूळ मराठीचें इंग्रजी भाषांतर आहे. त्यांतलि कांहीं भाग येणेंप्रमाणेः—" चिरंजीव राजश्री भाऊ आणि विश्वासराव यांस आम्ही अटककडे पाठविलें. ते गिलच्यांशीं कुरुक्षेत्रीं युद्ध करून धारातीर्थी आपल्या सेनेसह कामास आले. त्यावेळेपासून मी दुःखांत आहे. राज्यकारभार व मुलगा मुत्सद्यांच्या व सरदारांच्या हवालीं केला आहे व स्वस्थपणें त्या गोष्टीचें चिंतन करीत मी बसलों आहे. सरदारांनीं करूं नये तें काम केलें व आतां पस्तावून मजला ते सल्ला विचारीत आहेत. टोपीवाल्यांची व्यवस्था लावण्याच्या विचारांत मी आहे व अशा वेळीं आपलें पत्र आलें म्हणून मला आनंद होत आहे. पूर्वी आपल्याला कांहीं गोष्ट करण्याची शंका वाटत होती; ती आतां केली पाहिजे व वेळ न गमावतां केली पाहिजे. माझा बंधु मी महाराजांकडे पाठवीत आहे. बंधूबरोबर राजश्री अप्पाजी शिंदे, राजश्री महादाजी होळकर हे आहेत. तीन लाख फौज, तोफखाना व सामानसुमानहि त्यांच्याबरोबर रवाना केलें आहे. आतां महाराजांनीं जोधपूरवाले, उदेपूरवाले यांस सेनांसह पाचारण करावें. जाट महाराजांचेच, ते स्वयंस्फूर्तीनें येतील. १०००० तोफा, १०-१२ लाख घोडदळ, शिवाय गोलंदाज वगैरे. इतकी सेना घेऊन महाराजांनीं पूर्व देशाकडे जावें. अयोध्येला जाऊन तेथील म्लेच्छ हातांशीं घ्यावे. त्यांनां पुढें कलकत्त्याकडे रवानः करावें. महाराजांनीं कलकत्त्यास जाऊन त्या शहराला वेढा द्यावा. कलकत्त्यास वेढा पडला कीं तेथील हिंदु-मुसुलमान महाराजांनां आपोआप येऊन मिळतील. बंगाल्यांत चोहोंकडे राहणारे त्यांचे नात्याचे व स्नेहाचे लोक कांहीं भीतीनें, कांहीं आशेनें महाराजांकडे येतील. दुबाशे लोक (?) यानंतर टिकाव धरणार नाहींत. निशाण पुढें करून शरण येतील. या लोकांच्या किल्ल्यावर पेंढारी लोकांनां आपण चांगली संधि पाहून पाठवूं. या पेंढाऱ्यांनां लढाईंत मिळेल ती लूट तुमची असें सांगू, म्हणजे ते जिवाकडे न पाहतां किल्ल्यावर तुटून पडतील व तो कबजांत घेतील. याप्रमाणें मूळ उपटून टाकलें म्हणजे वाराणशी, गया वगैरे ठिकाणच्या संरक्षक पलटणी आपोआप पळून जातील. मी स्वतः येथील फौज घेऊन व पाळेगार आणि जहागिरदार यांस घेऊन श्रीरंगपट्टणवर जाण्याच्या विचारांत आहे. तेथून कर्नाटकांत जाऊन जमीनदार वगैरेंच्या जामिनी गेलेल्या आहेत त्या त्यांनां परत करण्याचा हुकूम देणार आहे.

समुद्राच्या किनाऱ्यावर अंत्यजांचीं स्थलें आहेत. तेथें फौजेसह जाऊन त्यांचा किल्ला पाडाव करूं व त्याची मोडतोड करून समुद्राला तो अर्पण करूं. याप्रमाणें द्वीपालूच्या काली दैत्याचें नांव पुसून टाकूं. यानंतर टिप्पूचा नाश करूं व मग कूच दर कूच करीत महाराजांकडे येऊं. महाराजांनां जय मिळाला तर चांगलें; जय मिळणार नसेल तर आपले लोक व्यर्थ खर्ची घालण्यांत तात्पर्य नाहीं. आंग्र्यांचीं २०० जहाजें कलकत्त्याला वेढा देण्यासाठीं ८ दिवसांत हजर होतील. मी त्यांस तसा हुकूम दिला आहे. मीहि येत आहे. हरामखोरांनां त्वरित शिक्षा करूं. मग महाराजांस मोठ्या सत्तेचा लाभ होईल. महाराजांनीं आज्ञा करावी. महाराजांची कोणतीहि आज्ञा आम्ही खालीं पडूं देणार नाहीं. "]

मराठी व मुसुलमानी कायदा कशा प्रकारचा होता हें समजून घेण्यास हवे तितके कागदपत्र उपलब्ध आहेत. अमुक अमुक जमीन अगर वतन आपल्याला दिलें आहे व त्याच्या त्या वतनाच्या हक्कांनां कोणी बाधा आणूं नये असा हुकूम असलेले दस्तऐवज पुष्कळ मिळतात. वतनाची व हक्काची गोष्ट या दस्तऐवजांतून केव्हां केव्हां सविस्तर सांगितलेली असते. असले दस्तऐवज पुष्कळांच्या घरीं आहेत. या कागदांत कायदा आला आहे. त्याचा अभ्यास केला तर मुसुलमानी काळांत व मराठ्यांच्या वर्चस्वाच्या काळांत हिंदुस्थानांत चालत असलेल्या कायद्यावर चांगला प्रकाश पडेल. वरील प्रकारचें साहित्य इतकें आहे कीं अनेक पंडितांनां अनेक वर्षें काम करावयाला तें पुरेल.

'रिलिजन' या इंग्रजी शब्दाला जो अर्थ आहे तो किंवा तसा अर्थ धर्म याला पूर्वी नव्हता. आज मात्र तसा अर्थ धर्म या शब्दाला आलेला आहे. हे कसें झालें तें पाहूं. धर्म किंवा धर्मन् याचा मूळ अर्थ चालरीत, विधि, संस्कार ( तानि धर्माणि प्रथमान्यासन्-ऋग्वेद १०. ९०, १६ ), व्यक्तीच्या व्यवहाराला व समाजाच्या व्यवहाराला लागू असणारा नियम असा याचा अर्थ होता. मुसुलमानी सत्ता प्रस्थापित झाल्यावर हिंदूंनां राजकीय जीवन पारखें झालें. हिंदूंनां आपल्या वैयक्तिक बाबतींतहि मुसुलमानी कायद्याप्रमाणें चालणें भाग पडलें. हिंदु धर्मशास्त्राला पूर्वी समाजांत शासनाधिकार असे तो, मुसुलमानी सत्तेमुळें नाहींसा झाला. तरी पण धर्म नित्य आहे हा विश्वास कांहीं गेला नाहीं. तो राहिला व ब्राह्मणांनां वेदविहित कर्में करावीं लागत त्या कर्मांच्या बाबतींत म्हणजे खासगी ब्राह्मण व्यक्तीच्या आचाराच्या बाबतींत धर्मशास्त्राचें शासन कायम ठेविलें गेलें. हीं कर्में स्वतःच्या मोक्षासाठीं करावयाचीं असत. या कारणानें 'धर्म' या शब्दाला 'रिलिजन' सारखा अर्थ आला.

ब्रिटिश राज्य झाल्यानंतर धर्म याचें रिलिजन असें भाषांतर करण्याचा प्रघात पडला. हें भाषांतर करणाऱ्यांनां धर्म व रिलिजन या दोनहि शब्दांचा खरा अर्थ ठाऊक नव्हता. दोन्ही शब्दांत जीवनाचा क्रम ठरविणारीं सर्व गोष्टी असा अर्थ आहे. हेंच काय तें एक साम्य या

शब्दांच्या अर्थांत आहे. रिलिजन व धर्म हे दोन शब्द सर्वस्वी समानार्थी मानले गेल्यानें धर्म याच्या मूळ अर्थांतहि सहजच फरक होत गेला. पारमार्थिक कल्पना म्हणजेच धर्म असा समज झाला. इंग्रजी शिकलेले परंतु अज्ञ अशा लोकांनां धर्म म्हणजे पारमार्थिक कल्पना असेंच वाटतें. धर्म व रिलिजन या शब्दांच्या अर्थांत काय अंतर आहे तें 'हिंदुइझम, इट्स फारमेशन अँड फ्यूचर' या पुस्तकांत डॉ. केतकरांनीं दाखविलेलें आहे. संस्कृतमध्यें पारमार्थिक कल्पना व मोक्षाचीं साधनें यांनां वेगळे शब्द आहेत. धर्म हा वरील अर्थी उपयोगांत आणीत नाहींत.

आतां ब्रिटिश सत्तेचा काल घेऊं. आज हिंदु कायद्याची स्थिति पुढीलप्रमाणें आहेः--हिंदुस्थानांत आज सार्वजनिक कायदा जेवढा आहे तेवढा ब्रिटिश मूळ आधाराचा आहे. हिंदु कायदा फक्त खासगी बाबतींतच चालतो. कुटुंबव्यवस्थेच्या वारसा, विवाह, वगैरे ज्या गोष्टी त्या तत्त्वतः तरी सर्वस्वी हिंदु कायद्यानें चालतात;व हा कायदा पूर्वीच्या हिंदु कल्पनांतूनच विकास पावलेला आहे. अपकृत्य, गुन्हा इत्यादि बाबतींतील कायदा ब्रिटिशांनीं केलेला आहे. या कायद्याचा बराच भाग मुसुलमानी अमदानींतलाच असावा. ब्रिटिशांच्या हातीं राज्य गेलें त्यावेळीं करारासंबंधींचा विशेषतः हिंदू-हिंदूमधील करारासंबंधींचा कायदा बहुतांशानें हिंदूंनीं पूर्वी केलेल्यापैकींच होता.

आज कायदा अमलांत आणण्याचें काम राजसत्तेच्या अधिकारानेंच फक्त होतें. पूर्वी राजसत्तेखेरीज इतर मार्गांनीं हा अधिकार प्राप्त होत असे. हे दुसरे अधिकार आज कमी मान्यतेचे झाले आहेत, त्यांचें वजन अजिबात मावळलेलें नाहीं पण तें ओहोटीला लागलेलें आहे खास. जातीच्या न्याली कोर्टांत मानल्या जातात. जातमंडळाच्या कारभारांत कोर्टें हात घालीत नाहींत. जाती स्वयंसत्ताक असाव्या हें तत्त्व कोर्टांनीं मान्य केलें आहे.

जुन्या सत्ताधाऱ्यांच्या हातून ब्रिटिशांच्या हातीं सत्ता गेल्यानें वर सांगितलेल्या परिणामांखेरीज आणखी जे हिंदु कायद्यावर परिणाम झाले आहेत ते येणेंप्रमाणें:—

पहिला सर्वांत ढोबळ असा परिणाम म्हणजे धर्मग्रंथकार पूर्वी कायद्याचे संस्थापक मानले जात होते आणि त्यांचे कायदे मान्य केले जात होते, तो प्रकार आज राहिलेला नाहीं. कायदेग्रंथ लिहिणाऱ्या कायदेपंडित लोकांनां कायदेकर्तृत्व आलें असें आज होत नाहीं. आज कायदेपंडितांनां कायदेकर्तृत्व मिळविण्यासारखी परिस्थितीची सवड नाहीं अशी कांहीं गोष्ट नाहीं. आजहि शोधील त्याला संधि आहे. पण कोणीहि पंडित संधि शोधीत नाहीं व असलेल्या संधीचा फायदा घेत नाहीं हीच खरी स्थिति आहे. ब्रिटिश संस्कृतींत जुन्या रोमन कायदेपंडितांचें स्थान न्यायाधिशांनीं घेतलें आहे न्यायाधिशांनीं चालविलेलीं प्रकरणें व दिलेले निकाल अलीकडे सविस्तर नोंदले जातात व हे नोंदलेले निकाल ग्रंथांचें काम करतात. प्रकरणांची नोंद होऊं लागली म्हणजे ग्रंथलेखक कायदेपंडितांचें महत्त्व अर्थातच कमी होऊं लागतें. फ्रान्समध्यें कायदेपंडित ग्रंथांत कायद्यांची चिकित्सा करीत व या चिकित्सेचें महत्त्व कायद्याच्या कोटींत मानलें जात असे. परंतु या प्रकारचें महत्त्व कायदेपंडितांच्या ग्रांथिक चिकित्सेला देणें कमी कमी होत जाऊन आजला त्या चिकित्सेला अजिबातच महत्त्व देत नाहींत. हा सर्व फरक थोड्या दिवसांत घडून आला आहे. हिंदुस्थानांत निकालांची संख्या बरीच झालेली आहे परंतु व्यवहाराच्या बऱ्याच अंगांसंबंधानें अद्यापि निकाल नाहींत. या कारणानें ग्रांथिक चिकित्सेची आवश्यकता आहे. ज्या मुद्द्यांवर कायदा आज निश्चित अथवा तयार नाहीं त्या मुद्द्यांवर आज उपलब्ध असलेलें नाना प्रकारचें साहित्य वापरून कायदा निश्चित अथवा तयार करून देणें हें काम आज आहे. ही कामाची संधि मोठी महत्त्वाची आहे. परंतु पुष्कळांच्या ही लक्षांत येत नाहीं, व ज्यांनां या संधीचा फायदा घेण्यासारखें ज्ञान आहे तेहि पुढें होत नाहींत अशी स्थिति आहे.

ब्रिटिश कायद्याचें हिंदुस्थानांत राज्य सुरू झाल्यानें दुसरा परिणाम झाला तो जुन्या देशाचाराचा ब्राह्मणवर्गप्रतिपादित कायदा नष्ट झाला हा होय. कोणत्याहि देशांत कायदा जो असतो, त्यांत कांहीं सुविख्यात व सुनिश्चित अशीं तत्त्वें आणि नियम असतात, व कांहीं अनिश्चित व अप्रसिद्ध अशा कल्पना असतात. मात्र या दुसऱ्या कल्पना ज्ञात आहेत असेंच मानलें जात असतें. प्रकरण उपस्थित झालें म्हणजे न्यायाधीश आपल्या न्यायाच्या कल्पनेचा उपयोग करून निकाल देतात, व याप्रमाणें सामान्य समंजसपणाला योग्य दिसेल असा एखादा नियम करून टाकतात. हिंदु समाजांत हिंदु व्यवहाराच्या बाबतींत नियम करावयाचा तर तो सर्वसाधारण हिंदु समाजाच्या समंजसपणाला पटेल असाच असला पाहिजे. परंतु आज हिंदु न्यायाधीश जी सामान्य समजुत अगर अक्कल लक्षांत घेऊन नियम करतो ती समजूत हिंदु समजूत नसून ब्रिटिश समजूत असते.

न्यायाधिशाचें समाजांत हें काम आहे कीं, समाजांत अमुक चांगलें म्हणून ज्या कल्पना प्राधान्येंकरून प्रचारांत असतील त्यांचा अंमल त्यानें करावा. समाजांतील श्रेष्ठांचें जें मत असेल त्या मताप्रमाणें व्यक्तींनां वागावयास भाग पाडणें हें त्याचें काम आहे. न्याय ही कल्पनाच सापेक्ष आहे. न्यायाच्या शास्त्रमार्गाची व्याख्या करावयाची म्हटलें तर अस्पष्ट अर्थाचे शब्द वापरूनच करावी लागेल.

इंग्रजांची कल्पना घ्या किंवा हिंदी लोकांची कल्पना घ्या, न्यायाधीश हा न्यायाचा अवतार आहे असाच दोन्हीकडे समज आहे. याठिकाणीं न्याय म्हणजे त्या त्या ठिकाणीं रूढ असणाऱ्या न्यायाच्या कल्पना हाच आहे. न्यायाधीश हा विशिष्ट गुणांचा समजला जातो. समाजाचें सत् व असत्,

न्याय व अन्याय यासंबंधाचें जें ज्ञान तें त्याच्या ठिकाणीं एकवटलें आहे असें मानलें जातें. मूर्तिमंत न्यायदेवतेचा मनुष्यरूपांत अवतार, हीच न्यायाधिशासंबंधीची कल्पना असते. लोकांच्या न्यायासंबंधीच्या कल्पना कोर्टांतून दिल्या जाणाऱ्या न्यायांत प्रतिबिंबित झाल्या पाहिजेत. याप्रमाणें लोकांच्या कल्पनानुसार न्याय दिला जावा म्हणून अँग्लो-सॅक्सन देशांत व इतर कित्येक देशांतहि जूरीची (पंचांची) पद्धति राखलेली आहे.

कोर्टांत हिंदु कायदा म्हणून जो अंमलांत आणला जातो त्यासमध्यें वरीलप्रमाणें लोकमान्यता नसते. याचीं कारणें अशीं आहेतः एक, दिवाणी प्रकरणांत पंच घेण्याची पद्धति नाहीं. दुसरें, हिंदु कायद्याची बजावणी करणारे म्हणून जे न्यायाधीश असतात ते हिंदु नसतात. हिंदु न्यायाधीश असते तरी ब्राह्मण पंडित ज्या माहितगारीच्या अधिकारानें प्रकरणांचा विचार व व्यवस्था करील त्या अधिकारानें त्यांनां आजच्या परिस्थितींत विचार व निकाल करतां आला नसता. ब्राह्मण पंडित समाजाच्या कल्याणाचें काय व अकल्याणाचें काय हें जाणतो. लोकांचा त्याच्यासंबंधानें वरील प्रकारचा समज असतो व अद्यापि आहे. न्यायाधिशांनीं नीतीचे व आचाराचे नियम समजावून सांगावे व लोकांनीं त्यांचें ऐकावें अशी समाजाची वहिवाट असती तर आजच्या न्यायाधिशांनां स्वतःच्या बुद्धीनें स्वतःच्या जबाबदारीवर पुरावा न बोलावतां कांहीं गोष्टींचा निकाल देतां आला असता व तो लोकसमजुतीला बरोबर वाटला असता, परंतु न्यायाधिशासंबंधानें समाजाची बुद्धि वर वर्णिल्याप्रमाणें नाहीं. म्हणून कोर्टांत हिंदु न्यायाधीश सर्वत्र असते तरी त्यांच्या तेथें असण्यानें त्यांनीं दिलेला न्याय लोकसमजुतीप्रमाणें योग्य व बरोबर ठरला नसता.

हिंदु समाज आजहि व्यवहाराचे व आचाराचे नियम पाहिजे असल्यास काशीच्या पंडितांकडे व इतर ठिकाणच्या पंडितांकडे धांव घेतो. शृंगेरी, द्वारका, संकेश्वर येथील शंकराचार्य, तसेंच जातपंचायती यांजकडेहि आचारनियमांसाठीं हिंदु समाज पहात असतो. ब्रिटिशांनीं या लोकांनां कायदा बदलण्याचा अथवा नवा सांगण्याचा अधिकार ठेवलेला नाहीं. यामुळें यांजकडून हिंदु समाजाला कायदा नवा करून अथवा बदलून मिळत नाहीं. उलटपक्षीं, न्यायाधीश हे हिंदु समाजाचे प्रतिनिधिभूत नसल्यानें त्यांनांहि कायदा बदलतां येत नाहीं अशी आजची स्थिति आहे.

हिंदु कायद्याची बजावणी योग्य रीतीनें व्हावयाची तर समाजाच्या परंपरेनें ज्या लोकांनां कायद्याची बजावणी करण्याचा अधिकार सोंपविलेला आहे त्यांजकडून त्याची बजावणी झाली पाहिजे. तसेंच हिंदु कायद्याचा अर्थ लावतांना इंग्रजी ज्ञानाचा उपयोग नको आहे तर हिंदु लोकसमजुतीचा अथवा हिंदु अकलेचा उपयोग हवा आहे. याप्रमाणें योग्य अधिकाऱ्यांची व योग्य लोकविचारांची अधिकार-स्थानीं योजना झाली तरच हिंदु कायद्याची बजावणी योग्य प्रकारें होणार आहे. हें व्हावयाचें कसें हा प्रश्न राजकारणाचा आहे. तो येथें विचारांत घ्यावयाचा नाहीं. जुन्या काळीं हिंदु कायद्याचा नियम ठरविण्याची व निर्णय देण्याची तऱ्हा काय होती व आज ब्रिटिश तऱ्हा काय आहे व या दोन तऱ्हांत काय फरक आहेत ते आतां थोडे बारकाईनें पाहूं.

पूर्वी अमुक कृत्य न्यायाच्या व कायद्याच्या दृष्टीनें योग्य कीं अयोग्य हा प्रश्न जेव्हां ब्राह्मणांपुढें येई, तेव्हां पुरातन काळीं तसल्या प्रकारच्या कृत्याला कशा प्रकारचें मानीत हें संशोधनानें पाहून ब्राह्मण निकाल देत. वेदविद्या, इतिहास म्हणजे रामायण व महाभारत व पुराणें यांचें आलोचन, सदृशप्रसंग शोधून काढण्यासाठीं व निकाल ठरविण्यासाठीं होत असे. आजचा ब्रिटिश न्यायाधीश वरील वाङ्मय इतिहासांत धरणार नाहीं व या वाङ्मयांतून दाखले शोधून समोर आलेल्या प्रकरणाचा निकाल देण्याचा विचार तर तो बहुधा केव्हांच करणार नाहीं. आजचा न्यायाधीश या वाङ्मयांनां दंतकथा लेखतो व या कथांनां कायद्यांत अधिकाराचें स्थान देण्याचें तो क्वचितच कबूल करील. कायद्यांत सदरील ग्रंथांनां अधिकाराचें स्थान न देण्यांत आजच्या न्यायाधिशाची चूक होते. वेदांतील गोष्टी खऱ्या असोत, खोट्या असोत कायद्यांत त्या खऱ्या कीं खोट्या हा प्रश्न उद्भवत नाहीं. समाज त्यांनां खऱ्या मानतो कीं नाहीं, समाज त्यांजवर आपला कायदा उभारण्यास तयार आहे कीं नाहीं--उभारतो कीं नाहीं हे प्रश्न मुद्द्याचे आहेत. जुने पंडित उपमा व रूपक वगैरे अलंकारांचा व वादविषयाचा विचार करतांना उपयोग करीत असत. आजचा न्यायाधीश या पद्धतीला नांवें ठेवील. जुना एक नियम असा आहे कीं, दुसऱ्याच्या बायकोपासून कोणाला मुलगा झाला तर तो मुलगा त्या दुसऱ्याचा म्हणजे त्या मुलाच्या मातेच्या पतीचा समजावा. मनु या नियमाचें मंडन करतांना स्त्री म्हणजे क्षेत्र आहे, क्षेत्राचा धनी असेल त्याचीच मालकी त्या क्षेत्रांत उत्पन्न झालेल्या मालावर असते, असें म्हणतो. आजचे न्यायाधीश या विचारसरणीला हंसतील. ते आपल्या निर्णयांत या विचारसरणीचा उपयोग करणार नाहींत.

जुन्या विचारसरणीचा उपयोग करून आजचा ब्रिटिश न्यायाधीश निर्णय देत नाहीं किंवा नियम ठरवीत नाहीं याचें एक कारण आजच्या न्यायाधिशाचें ज्ञान व कल्पनाभांडार निराळ्या प्रकारचें असतें हें आहे. परंतु आजच्या ब्रिटिश न्यायाधीशानें वरील प्रकारें निर्णय देणें धोक्याचें होईल हेंहि त्याला तसा निर्णय न देण्याला कारण आहे. लीगल फिक्शन अथवा कायद्यांतील व्यंगपूरक सांकेतिक कल्पना ज्या तयार होतात त्यांची उत्पत्ति पुढीलप्रमाणें असते. आपल्या

पंडिताला किंवा जातपंचायतीला एखाद्या कृत्याच्या योग्यायोग्यतेसंबंधानें प्रश्न केला तर जातपंचायत व पंडित हे समाजाचे अंगभूत घटक असल्यानें त्यांनां समाजांतील योग्यायोग्य सहजबुद्धीनें उमजतें. पण हें समजावून सांगतांना ज्या कल्पना किंवा विचार ते योग्यायोग्यतेचें कारण म्हणून सांगतात ते आपल्या बुद्धीला १ युक्तिक वाटण्यासारखे केव्हां केव्हां नसतात. हे विचार नियमपोषक संकेत म्हणून कायद्यांत अथवा व्यवहारशास्त्रांत ओळखले जातात. असे विचार स्वतःच्या जातपंचांनीं अगर पंडितांनीं सांगितलेलेच बरे. कोणा तरी आधुनिक परकीय शिक्षणाच्या व संस्काराच्या न्यायाधिशानें असे स्वतःच्या बुद्धीनें निर्णय दिले व तत्पोषक म्हणून वरीलप्रमाणें विचार सांगितले तर त्याचा निर्णय आपल्याला पटणार नाहीं, तो खोटा, जाचक वाटेल व जाचक होईलहि. हिंदु कायद्यांतील अथवा व्यवहारशास्त्रांतील अथवा जुन्या विद्येच्या स्वकीय पंडितांनीं जातिपंचांनीं व धर्मगुरूंनीं दिलेल्या आणखी कांहीं नियमांचीं व निर्णयांचीं उदाहरणें घेऊं.

धर्मशास्त्रांत असा एक नियम आहे कीं, सगोत्रांचा विवाह होऊं नये. गोत्र ही फार जुनाट संस्था आहे व आज विवाहाच्या प्रशस्ततेचा व सयुक्तिकतेचा विचार करतांना गोत्राकडे लक्ष देणें जरूरीचें नसतें. निरनिराळ्या जातींत तेंच गोत्र आज सांपडतें. असें असून एका गोत्रांतलीं माणसें म्हणजे बहिणभाऊ ही कल्पना अद्यापि रूढ आहे व यामुळें विवाहाच्या बाबतींत वरीच अडचण उत्पन्न होते. महाराष्ट्रांत प्रमाण मानल्या जाणाऱ्या शंकराचार्यांनीं ही अडचण खालील नियम घालून दूर केली. ज्या सगोत्र वधूवरांचें लग्न ठरलें असेल त्यांतील वधूला परगोत्रांत दत्तक द्यावें म्हणजे सगोत्र विवाह होणार नाहीं [ अलीकडे प्रसिद्ध झालेल्या हिंदु कायद्याच्या कांहीं ग्रंथांत मुलगी दत्तक घेतां येत नाहीं असें विधान सांपडतें तें रूढीला अगदीं सोडून आहे ].

एका जातपंचायतीपुढें नळांतून घरोघर जाणारें पाणी प्यावें कीं नाहीं, पाण्याच्या कारखान्यांत अगदीं खालच्या जातीचे लोक कामाला असतात व त्यांचा पाण्याला स्पर्श होऊन तें विटाळत असतें तेव्हां तें पिणें अप्रशस्त आहे, असा प्रश्न आला त्यावेळीं पंचायतीनें तें पाणी पिण्याचें पाप पाण्याचा कर लोक देतात त्यानें दूर होतें; तो कर त्या पापाला पुरेसें प्रायश्चित आहे असें समजावें असा निकाल दिला. पंडितांचें शिक्षण जुन्या तऱ्हेचें असलें तरी त्यांजकडून पुष्कळदां कायद्यांत फार उपयोगी व अतिशय सयुक्तिक अशा कल्पना निघतात. एकदां अशा एका पंडिताला असें विचारण्यांत आलें कीं, इंग्रजांशीं कायदेशीर पद्धतीनें लग्न करणाऱ्या चांगल्या हिंदु बाईचा मुलगा हिंदु म्हणून समजला जात नाहीं, व दुराचारी बाईचा यूरोपियनपासून झालेला मुलगा हिंदु समजला जातो हें कसें ? या प्रश्नास त्यानें उत्तर दिलें तें येणेंप्रमाणें:—" अदृष्ट पाप विचारांत घेतलें जात नाहीं. अलत्याच रीतीनें तयार केलेले जिन्नस आम्ही खातों, परंतु यांतील पाप समजत नसल्यानें स्वतःला आम्ही पापी समजत नाहीं; त्याचप्रमाणें एखाद्या बाईला भलत्या पुरुषापासून मुलगा झाला असला तरी हिंदु बापाचा तो आहे असें मानतात. या बाईची गर्भधारणा कोणी पाहूं शकत नाहीं. गर्भधारणेपासून बाळंतपणापर्यंतच्या क्रिया सर्वांस अदृश्य अशाच असतात. उलट पक्षीं, इंग्रजाशीं जिचें लग्न झालें असेल तिचा मुलगा इंग्रज बापाचाच मुलगा असेल असा अंदाज असतो. धर्म अधर्म ठरवितांना पुरावा घ्यावयाचा तो सर्वथा दृश्य असावा लागतो. " त्या पंडितानें असेंहि सांगितलें कीं, पुरुषांनां नीतीचें माप वेगळें व बायकांनां वेगळें अशी व्यवस्था आहे. तिच्या बुडाशींहि एका पक्षानें केलेलें पाप अदृष्ट असतें हीच गोष्ट आहे. व्यभिचारी पुरुषानें केलेल्या कर्माचा पूर्णतः दृश्य असा पुरावा मिळत नाहीं. पण अविवाहित मुलगी अथवा विधवा व्यभिचार करील तर असा पुरावा मिळतो. या कारणानें सनातन धर्मनियम असा आहे कीं, बायकांच्या बाबतींत समाजानें अधिक कडकपणानें वागावें. आज समाजांत कित्येक गोष्टी मूर्खपणाच्या वाटतात. या गोष्टी जुन्या पद्धतीची विचारसरणी आपण लक्षांत घेऊं तर मूर्खपणाच्या न वाटतां त्या गोष्टींनां कांहीं सयुक्तिक प्रयोजन आहे हें आपल्याला कळून येईल. अशा प्रकारचा जुना युक्तिवाद कायद्यांत प्रमाण मानला जावा असें आमचें मत आहे. आतांपर्यंत ब्रिटिश सत्तेखालीं हिंदु कायद्याची स्थिति काय आहे तिचें वर्णन केलें. या वर्णनाचा उद्देश हा आहे कीं, हिंदु समाजाचें शासन हिंदु कायद्यानें केलें जातें असा जरी समज आहे तरी पुष्कळसा जुना हिंदु कायदा अद्यापि स्थानापन्न व्हावयाचा आहे हें सर्वांस कळावें. आमच्या न्यायाच्या संस्थांत हिंदु भावना, कल्पना व विद्या यांचा संचार होऊन त्या लोकांच्या खऱ्या प्रतिनिधिभूत होतील तर आज बाजूला पडलेला पुष्कळसा हिंदु कायदा पुन्हां स्थानापन्न होईल आणि हिंदु कायदेपद्धतींत सर्वांगपूर्णता येईल असें आम्हांस वाटतें. लोकांनीं वरील दिशेनें प्रयत्न करणें अगत्याचें आहे. नवीन पिढीनें सामाजिक सुधारणेस जुन्या न्यायसंस्थांचा फार उपयोग आहे हें ओळखलें तर अद्यापिहि त्या संस्थांचें पुनरुज्जीवन जोरानें होणें शक्य आहे.

आजची हिंदु कायद्याची अवस्था ही संक्रमणावस्था आहे. आज या कायद्यासंबंधानें अनिश्चितता पुष्कळच आहे म्हणून कायद्याचीं शालोपयोगी पुस्तकें वाचून आणि निकाल केलेल्या प्रकरणांचीं दप्तरें पाहून, हिंदु कायदा आज इतका अमलांत आहे असा अंदाज करणें अगदीं चुकीचें होईल. कारण, बहुतेक मोठमोठे वकील–हिंदु वकीलहि–हिंदु कायद्याच्या क्षेत्रविस्तारासंबंधानें बरोबर कल्पना करूं शकत नाहींत अशीच आजची स्थिति आहे; व हीच न्यायाधिशांची गोष्ट आहे; त्यांनांहि हिंदु कायद्याचें क्षेत्र किती विस्तृत आहे तें ठाऊक असण्याचा संभव फार थोडा आहे.

उ प सं हा र.–हिंदूंच्या धर्मशास्त्रांची तत्त्वें अतिशय व्यापक होतीं. हीं तत्त्वें उदयास आल्यानंतर त्यांतील अत्यंत व्यापक मतांस समाजाच्या मूळ अथवा पायाभूत कायद्याचें स्वरूप व स्थान मिळालें. हिंदु संस्कृति गेली तेथें कांहीं, राजानें धर्मावलंबन करण्याची आवश्यकता इत्यादि, चातुर्वर्ण्य धर्माचीं तत्त्वें पण गेलीं. समाजशासनाचीं हीं सर्वसामान्य तत्त्वें खेरीजकरून प्रत्येक संस्थानांत त्या त्या संस्थानचा निराळा दिवाणी व फौजदारी कायदा, निराळ्या न्यायसंस्था, निराळ्या व्यापार-रीती, निराळा स्थानिक न्यायकचेऱ्यांचा कायदा व निराळे शासननियम उत्पन्न करणाऱ्या संस्था होत्या. संस्थानांतून भांडणें मिटविण्याच्या स्थानिक सोयी निराळ्या होत्या; तसेंच खासगी करारानें किंवा उट्टे काढण्यानें नुकसान भरून घेण्याच्याहि सोयी भिन्न होत्या. संस्थानांतून स्थानिक मूलभूत धर्माचीहि कल्पना निरनिराळी होती. हिंदुस्थानांतील कायद्याचा सर्वांगपूर्ण इतिहास तयार करणें असेल तर संस्थानाप्रमाणें व कालमार्गांप्रमाणें वरील गोष्टींचा पृथक्पणें अभ्यास झाला पाहिजे. हा संस्थानप्रधान अभ्यास झाल्यावर कायद्यांत फरक घडवून आणणाऱ्या विचारपद्धतींचा इतिहासहि पूरक म्हणून अभ्यासिला पाहिजे. धर्मविषयक नियम अथवा निर्णय ठरविण्यांत उपयोगी येणारी विचारसरणी व कायदेविषयक विचारसरणी यांतील साम्यें वर दाखविलीं आहेत. हीं धर्मविषयक तर्कपद्धति व तिचा इतिहास कायद्याच्या इतिहासांत आला पाहिजे. तसेंच धर्मनियमांनां शास्त्राचें स्वरूप व स्थान प्राप्त करून देणाऱ्या मार्गाचाहि या इतिहासांत उहापोह आला पाहिजे. प्राचीन भारतांत सामाजिक व राजकीय जीवनाचा विचार करणारीं शास्त्रें प्रधानतः धर्म व अर्थ हीं दोन होतीं. यांत धर्म हें अधिक पवित्र शास्त्र समजलें जाई. समाजांत सर्व वर्ग या शास्त्राला गुरुस्थानीं मानीत होते.अर्थात् संस्थानांतून न्यायगैरन्याय ठरविण्याच्या कामीं या शास्त्राचें म्हणणें प्रमाण म्हणून विचारांत घेतलें जात होतें. अर्थशास्त्र हें न्याय वगळून इतर राजकीय जीवनक्रमाच्या भागांत विचाराला व आचाराला मार्गदर्शक म्हणून मानलें जात होतें. धर्म हें कायद्याचें शास्त्र नव्हतें. परंतु कायदे ठरविण्याच्या व बजावण्याच्या कामीं या शास्त्राचा उपयोग केला गेला व यामुळें या शास्त्राचा उत्तरकालीन विकास झाला तो कायद्याच्या क्षेत्रांत अथवा विभागांत झाला. धर्मशास्त्रांतील कांहीं आदेश व उपदेशपर भाग स्थानिक गरजा भागविण्याच्या हेतूनें संस्थानें आपला कायदा म्हणून उचलून घेऊं लागलीं.

हिंदु राज्यें नाहींशीं झाल्यावर धर्मशास्त्राचें राजकीय व कायदेशास्त्रविषयक महत्त्व लयास गेलें. राजधर्माचें निरूपण सहजच हिंदु राज्याच्या लयाबरोबर लयास गेलें. धर्मग्रंथकार त्यानंतर वैयक्तिक धर्माच्या निरूपणाकडेच सर्व लक्ष देऊं लागले. व्यक्तीचें आचरण कसें असावें, तसेंच, वारसाची व्यवस्था, दानाची व्यवस्था, इत्यादि वैयक्तिक हिंदु जीवनक्रमाच्या अंगभूत गोष्टी कशा कराव्या यांचें निरूपण धर्मग्रंथांतून चालू राहिलें. याप्रमाणें धर्माचा क्षेत्रसंकोच झाला. हिंदु सत्ता वरिष्ठ स्थानापन्न १८ व्या शतकांत झाली होती ती फार थोडा काळ टिकली. यामुळें संकुचित क्षेत्राचा पुन्हां विस्तार करण्याचें काम तिजकडून फारच थोडें झालें. मुसुलमानांनीं हिंदु धर्माच्या क्षेत्राची जी आकुंचना केली होती ती ब्रिटिश अमदानींत तशीच कायम केली गेली. ब्रिटिश अमदानींत नवी गोष्ट झाली ती ही कीं, कोर्टांनीं अमलांत आणावयाचा धर्मग्रंथांतर्गत कायदा, व धर्मवाङ्मयांत या प्रकारच्या नियमाखेरीज असणारा इतर भाग, यांची फारकत करणारे ग्रंथ निर्माण झाले. तथापि हें फारकतीचें कार्यहि अद्यापि प्रयोगावस्थेंत आहे. त्याला निश्चित व निर्व्यंग असें रूप अद्यापि प्राप्त झालेलें नाहीं.

हिंदुस्थानच्या कायद्याचा व ब्रिटिश कायद्याचा विकास तुलनात्मक दृष्टीनें तपासला तर त्यांत कांहीं साम्याचीं व कांहीं भेदाचीं स्थानें दिसून येतात. हिंदुस्थानांत कायद्याशीं कांहीं संबंध नसलेलें असें समाजपर तत्त्वज्ञान होतें तें पुढें कायद्याच्या क्षेत्रांत मान्यतेला पात्र झालें व याप्रमाणें या क्षेत्रांत कायद्याचें स्वरूप ठरविण्याच्या कामीं उपयोगांत येतां येतां कांहीं काळानें तें कायद्याशीं एकरूप होऊन गेलें. पुढें हिंदु राज्य नष्ट झाल्यावर राजकीय जीवनाचें शासक या नात्यानें तें पंगु होऊन बाजूला पडलें. या हिंदुस्थानच्या कायद्याच्या इतिहासाला समानरूप असा भाग ब्रिटिश इतिहासांत मिळत नाहीं. आर्थिक वगैरे बाह्य कारणांनीं कायद्यांत फरक होतात त्या प्रकारचे फरक हिंदुस्थानांतील धर्मनियमांत व व्यवहारांतील कायद्यांत घडून आलेले दिसतात. केवळ धर्मवाङ्मयाच्या अभ्यासानें व आर्थिक वगैरे बाह्य गोष्टींचा कायद्यावर रूपविकृतिकारक वगैरे परिणाम कोठवर झाला आहे त्याचा विवेचक विचार यथोचितपणें करतां येणार नाहीं. पूर्वी व्यवहारांत कोणते कायदे होते तें दर्शविणारें साहित्य गोळा करून त्याचाहि अभ्यास करणें वरील प्रकारचें विवेचन करूं इच्छिणाराला जरूर आहे.

आजच्या कायद्यांत संशोधनाचा उपयोग:—वकील लोक असा प्रश्न करतात कीं, वकिली करणाराला ऐतिहासिक कायदेसंशोधन करावयाचें काय? "जुन्या काळीं कसलाहि कायदा असो त्याच्याशीं आम्हाला कांहीं कर्तव्य नाहीं. आज जो हिंदु कायदा म्हणून आहे तो आम्हाला माहीत पाहिजे एवढेंच; व हा कायदा लॉ रिपोर्टांवरून म्हणजे प्रकरणांच्या अहवालांवरून आम्हाला पाहिजे तसा समजतो. श्रुति, स्मृति, पुराणें यांच्याशीं आम्हाला काय करावयाचें आहे? आज जो कायदा आहे तो कांहीं या ग्रंथांनीं ठरत नाहीं. मेनचा 'हिंदू कायदा' यासारखे कांहीं अभ्यासग्रंथ वाचले व निकाल झालेलीं प्रकरणें वाचलीं म्हणजे आमचें काम होतें. असा आजच्या गांवठी वकीलांचा विचारौघ जागजागीं दिसून येतो. आतां हें खरें कीं, बहुतेक वकिलांनां कायद्याचें

पंडिती ज्ञान नको आहे, हिंदु कायदा जसा माहीत असावयास पाहिजे तसा त्यांनां माहीत नसला तरी चालेल. कारण असें ज्ञान नसलें तरी चांगला पैसा मिळण्यास त्यांनां हरकत पडत नाहीं. ज्यांनां पैशाची वकीलीच करून रहावयाचें नाहीं, तर खरे कायदेकोविद व्हावयाचें आहे त्यांनां मात्र संस्कृतविषयंत व इतिहासविषयंत पांडित्य मिळविण्याची आवश्यकता आहे. या खऱ्या कायदेपंडितांस श्रुति, स्मृति, पुराणें हे पूर्वकालीन आचारविचारपरंपरा सांगणारे ग्रंथ अभ्यासणें जरूर आहे. हिंदु कायद्यावर इंग्रजी ग्रंथ जे आहेत त्यांत न आढळणाऱ्या परिस्थितीचा अथवा प्रकरणाचा प्रसंगीं निर्णय अथवा कायदा ठरविण्याला वरील ग्रंथांचें ज्ञान फार उपयोगाचें असतें. अशा प्रसंगींच त्याचें विशेष महत्त्व आहे. एखादा प्रश्न कोर्टापुढें आला व कोर्टानां या प्रश्नाच्या बाबतींत कसें वागावें तें ठरविण्यास उपयोगीं पडणारा असा नियम सध्यांच्या अभ्यासग्रंथांत आणि कोर्टांच्या निकालांत सांपडला नाहीं आणि कोणी वकिलांनीं अशा प्रसंगीं लागू पडेल असा नियम अथवा निर्णय जुन्या ग्रंथांत शोधून कोर्टापुढें ठेवला तर हा नियम कोर्टानां कायद्यांत समाविष्ट करून घ्यावा लागेल किंवा अमान्य करावा लागेल. कोणताहि मार्ग कोर्टानीं पत्करला तरी त्यांनां समर्पक कारणें द्यावीं लागतील. अशा प्रकारचा नियम मान्य करावयाचा व दुसरा एखादा अमान्य करावयाचा हें केवळ लहरीवर करतां यावयाचें नाहीं. जुन्या ग्रंथांतून घेतलेल्या नियमाला अथवा निर्णयाला मान्यता किंवा अमान्यता द्यावयाची ती खालील तत्त्वांवर द्यावी लागेलः—

( १ ) आज उपयुक्तता,—तो नियम अथवा निर्णय उपयुक्त असेल तर तो मान्य करण्यास तें एक जोरदार कारण होईल. उपयोगी नियम याचा अर्थ ज्या नियमाचा फायदा न घेतल्यास कांहींतरी सामाजिक अडचण किंवा अनिष्ट उत्पन्न होण्याचा फार संभव आहे किंवा ज्याचा फायदा घेतल्यास कांहींतरी कल्याण होण्याचा संभव आहे असा नियम.

( २ ) जुन्या काळीं बजावणी,—जुन्या हिंदु राजांनीं तो नियम अथवा निर्णय अंमलांत आणला होता कीं नाहीं याचा विचार करावा लागेल. धर्मशास्त्रांतलें वचन विधिरूप असेल, किंवा विचारविषयावाततची ती कांहीं एक कल्पना असेल, अथवा जुन्या विश्वविषयक सिद्धान्तांचा अथवा उपपत्तींचा एक भाग त्या वचनांत आलेला असेल. समोर असलेलें धर्मशास्त्रांतलि वचन यापैकीं कोणत्या सदरांतलें आहे त्याचा तपास कायदेपंडितानें केला पाहिजे. तें वचन विधिरूप आहे असें ठरलें तर पुढें त्यानें त्या विधीचें स्वरूप शिफारशीचें आहे कीं आज्ञेचें आहे हें पहावें मीमांसक व धर्मशास्त्रलेखक विधींचें अशा प्रकारचें वर्गीकरण करतात. पण त्यांच्या वर्गीकरणांत आज्ञारूप म्हणून असे कांहीं विधी धरले आहेत कीं तें शिक्षेची भीति घालून लोकांकडून करवून घेण्यास कोणताहि समंजस राजा तयार झाला नसता. कायदेपंडितानें हें मीमांसकी वर्गीकरण बाजूला ठेवलें पाहिजे. त्यानें विधींचें आज्ञात्मकत्व अथवा अन्यरूपत्व ठरवितांना राजे लोक या विधींचें पालन न करणाराला शिक्षा करीत होते काय, किंवा धर्मशास्त्रकार तरी अशा माणसाला शिक्षा सांगतात काय हें पहावें. राजे लोक अमुक विधि अमलांत आणीत होते किंवा कसें हें ठरविण्यासाठीं त्या विधीशीं संबंध असणाऱ्या जुन्या घडामोडी आपण शोधून काढाव्या, तसेंच खोदीव लिखाणांतून सांपडणाऱ्या राजप्रणीत शासनांशीं अथवा अशाच दुसऱ्या गोष्टींशीं त्या विधींची तुलना आपण बारकाईनें करून पहावी. धर्मशास्त्रकार अमुक विधींचें पालन न करणाराला शासन सांगतात असें दिसलें तर तें शासन त्या माणसानें अमुक प्रायश्चित्त घ्यावें अशा रूपाचें आहे कीं राजानें त्याला अमुक दंड करावा या रूपाचें आहे हें पहावें. राजे लोक अमुक विधीला शासनाचें पाठबळ देऊन अमलांत आणीत असत असें दिसलें तर त्या गोष्टीला विशेष महत्त्व आहे ब्राह्मणांनीं त्या विधीसंबंधानें राजानें तो न पाळणारास दंड करावा अशी इच्छा प्रदर्शित केली असली तर ही नुसती इच्छा तितकी म्हणजे राजाच्या कृतीइतकी महत्त्वाची नाहीं. कारण कायदा ठरवितांना राजांच्या कृतीलाच अधिक मान दिला जाईल. एखादा राजा एखाद्यावेळीं एखादी गोष्ट करून गेला असेल तर त्या कृतीला कायद्याचें स्थान देऊं नये. परंतु धर्मशास्त्रांतील एखाद्या नियमाप्रमाणें अनेक राजे लोक अनेक वेळां वागले असतील तर त्या कृतिमालिकेला मात्र कायदा ठरविण्याच्या दृष्टीनें फार महत्त्व आहे. धर्मग्रंथांतील कोणतीं वचनें राजे लोकांनीं कायदे म्हणून अंमलांत आणलेल्या नियमांत होतीं हें ठरवावयास चाणक्य व शुक्र यांनीं राजनीतीवर केलेल्या ग्रंथांचा अभ्यास आणि नेपाळसारख्या प्रदेशांत शुद्ध हिंदु कायद्यांचा अंमल करणारीं कोर्टें आहेत त्या कोर्टांच्या व्यवहाराचा अभ्यास फार उपयोगी पडेल. एखादा नियम पूर्वी अंमलांत होता असें आपणांस आढळून आलें तर तो नियम अमलांत आणण्याचा प्रकार काय होता तेंहि आपण पहावें. हा प्रकार समजावा यासाठीं जुन्या काळची विचारपद्धति काय होती ती आपण समजून घेतली पाहिजे. जुन्या विचारपद्धतीनें जुन्या काळीं एखादा नियम लावलेला असेल, तो आज जर आपण ती जुनी विचारसरणी तेवढी वगळून लावूं लागलों, तर त्या विचारसरणीवरच तो नियम आधारलेला असल्यानें आज त्याचा अंमल कायद्याच्या दृष्टीनें सदोष व समाजाच्या दृष्टीनें अहितकर होईल. आजच्या कायदेपंडिताला जुना नियम आज लावण्याचा प्रसंग आल्यास खालील दोन गोष्टींपैकीं एक केली पाहिजे. जुना नियम जसा असेल तसा घ्यावयाचा, त्याच्या पाठीमागें जी विचाराची जुनी सांखळी असेल ती तिच्यांतील गृहीतसत्यांसह व संकेतात्मक कल्पनांसुद्धां तशीच घ्यावयाची आणि त्या सांखळीनें तो नियम आजच्या बाबीला लावावयाचा हा एक मार्ग. किंवा

त्या जुन्या नियमाला आधार म्हणून ज्या गृहीतसत्याच्या कल्पना होत्या त्या आज खोट्या दिसत आहेत तेव्हां तो जुना नियम जुन्या समाजांतच लागू समजतां येईल.आज तो गैरलागू आहे असें प्रतिपादन करून त्या नियमाला बाजूला टाकावयाचें, हा दुसरा मार्ग. धर्मग्रंथांमधील नियमांच्या पाठीमागें जो विचारपद्धति असते, तिच्याशीं फार थोड्यांचा परिचय असेल. धर्मवचनांनां कायद्याचें रूप व स्थान देण्याच्या क्रियेंत समाजशासनाच्या माहितीची फार जरूरी असते. पूर्वेकडील समाजशासनविद्या व पश्चिमेकडील समाजशासनविद्या या दोन्ही ज्याला चांगल्या अवगत आहेत, या दोहोंत जो चांगलाच तज्ज्ञ आहे अशा माणसालाच धर्मवचनांनां कायद्याचें रूप व स्थान देतां येण्यासारखें आहे. जातींचा कायदा व विवाहाचा कायदा हे दोन विषय घेऊन या बाबतींत जुन्या ग्रंथांतून व विचारपरंपरेतून असणाऱ्या वचनांवरून आज लागू करण्यासारखा कायदा कसा काढावयाचा तें आपण पाहूं. ब्रिटिश न्यायाधिशापुढें कांहीं धर्मतत्त्वाचा वाद आला, व या वादाच्या बाबतींत त्यानें कसा विचार करावयाचा तें सांगण्यास तज्ज्ञ लोक कोणी पुढें आले नाहींत तर त्या न्यायाधिशानें काय करावयाचें ? धर्मशास्त्रकारांचें प्रस्तुत तत्त्वासंबंधानें ऐकमत्य आहे, ते या तत्त्वाच्या बाबतींत फार आवेशानें लिहीत आहेत एवढें पाहूनच त्यानें त्या तत्त्वाचा अंमल करावयाचा काय ? जुन्या काळीं हिंदुस्थानांत त्या तत्त्वाप्रमाणें न वागणाराला शिक्षा करीत असत असा स्पष्ट पुरावा मिळत नाहीं. अशा स्थितींत न्यायाधिशानें काय करावयाचें ? त्या तत्त्वाच्या विरुद्ध आज वर्तन करणें हें आजच्या कमीअधिक सार्वत्रिक असलेल्या नीतिकल्पनांनां अनुचित वाटत नाहीं असें न्यायाधिशाला दिसून आल्यानंतरहि त्यानें त्याचा अंमल करावयाचा कीं कसें ?

वर दिलेल्या परिस्थितींत न्यायाधिशानें कसें वागावें हें सांगणें सोपें नाहीं. सामान्यतः असें सांगतां येईल कीं, 'आत्मनस्तुष्टि' म्हणजे आत्मसंतोष किंवा स्वातंत्र्य हें शास्त्रकारसंमत तत्त्व आहे व या तत्त्वाशीं विरोधी, त्याला बाध आणणारें असें कोणतेंहि तत्त्व अंमलांत आणण्याचा प्रश्न न्यायाधिशापुढें आणल्यास त्यानें तें अंमलांत आणण्यापूर्वी फार विचार करावा; हें दुसरें तत्त्व अंमलांत आणीत असत, तें अंमलांत आणण्यासारखें आहे असा अत्यंत सबळ पुरावा न्यायाधिशासमोर आला तरच त्यानें तें अंमलांत आणावें, एरवीं आणूं नये. स्वातंत्र्य अथवा आत्मसंतोष हा कायद्याचा महत्त्वाचा उगम व आधार आहेच पण तो धर्माचाहि महत्त्वाचा उगम व आधार आहे असें मनूनें म्हटलें आहे ( २. ६ ).

ब्रिटिश न्यायाधिशांसंबंधानें वर जें सांगितलें तेंच ब्रिटिश कोर्टांत काम करणाऱ्या हिंदु न्यायाधिशांनीं लक्षांत वागवावें. सर्व न्यायाधिशांनीं हें ध्यानांत ठेवावें कीं, धर्मातील कांहीं तत्त्वें लोकांनां जबरीनें लादण्याकरितां नसतात. अशीं तत्त्वें वाटांत पुढें आलीं तर त्यांकडे दुर्लक्ष करणें बरें. असें दुर्लक्ष केल्यानें समाजाला कांहीं नुकसान पोंचेल कदाचित्. पण समाजावर अशीं तत्त्वें जबरीनें लादल्यानें समाजाला फार अधिक नुकसान पोंचेल हें न्यायाधिशांनीं विसरूं नये. कायद्याच्या ऐतिहासिक संशोधनानें वरील प्रकारची विचारसरणी सुचते व ग्राह्य वाटते. नवीन कायदा करतांना त्याची योग्यायोग्यता ठरविण्यास संशोधनाचा उपयोग होतो. पण केवळ नवीन कायद्याच्या बाबतींतच संशोधन उपयोगी पडेल असें नव्हे. जुना कायदा दुरुस्त करण्यासहि त्याचा उपयोग होईल.कोर्टांत हिंदु कायद्याची जी बजावणी होते ती या तत्त्वावर होते कीं, हिंदु कायदा जसा खरोखरी असेल तसाच अंमलांत यावा आज कोर्टांचे निकाल जे कायद्याप्रमाणें मानले जातात ते देखील कोर्टांत त्या त्या प्रसंगीं हिंदु कायदा खरोखरी बरोबर कळला या समजुतीवरच मानले जातात. निकालांच्या बाबतींत जेथपर्यंत हिंदु कायदा कोर्टांनां बरोबर कळला असेल तेथपर्यंतच त्यांचे निकाल कायद्याच्या स्वरूपाचे मानावयाचे असें तत्त्व आहे. कोर्टाला वादांतील गोष्टी बरोबर समजल्या नाहींत व त्यानें दिलेला निकाल गैरसमजामुळें अथवा सदोष समजामुळें दिलेला आहे असें ज्या निकालासंबंधानें म्हणतां येईल त्याला त्यापुढें किंमत दिली जाणार नाहीं. याप्रमाणें आज जे निकाल आपल्यापुढें आहेत त्यांची किंमत ठरविण्यास ऐतिहासिक संशोधन आपल्या उपयोगीं पडेल. बरेचसे निकाल चुकीचे आहेत असें मानण्यास भरपूर कारणें आहेत. हिंदु समाजाची व्यवस्था नीट माहीत झाली नव्हती व उमजली नव्हती अशा वेळचेच पुष्कळसे निकाल आहेत. त्यावेळीं धर्मवचनांचें खरें स्वरूप व महत्त्व कळलेलें नव्हतें, व म्हणून सहजच चुकीचे निकाल दिले गेले. खरे कायदेपंडित ज्या वकिलांनां व्हावेंसें वाटत असेल त्यांनीं प्रत्येक नियम लावण्यापूर्वी त्याचा पूर्वेतिहास व उगम शोधवयाची संवय करावी. या प्रकारच्या ऐतिहासिक संशोधनानें वर सांगितल्याप्रमाणें इंग्रजी ग्रंथांत घातलेला सदोष कायदा दुरुस्तहि करतां येईल व त्यांत नवी चांगली निर्दोष भरहि टाकतां येईल.

**धर्मशास्त्र व समाजनियमन.**—भारतीयांचें समाजनियामक शास्त्र बरेंच विकसलें होतें हें कोणीहि कबूल करील. कोणताहि इतिहास लिहावयाचा म्हणजे साहित्याचा शोध, त्या साहित्याचा अर्थ लावणें, या साहित्यांतून घडलेल्या गोष्टी निवडून काढणें आणि शेवटीं आपले निर्णय लेखनिविष्ट करणें या गोष्टी करावयाच्या असतात. हिंदु कायदेशास्त्राचा इतिहास लिहिण्यासाठीं संशोधन करणारास अतिशय आवश्यक गोष्ट म्हणजे या इतिहासाचा विषय होण्यास योग्य अशा समाजसंबद्ध गोष्टी कोणत्या तें ठरविणें. याप्रमाणें हिंदु कायदेशास्त्राचा विषय म्हणजे अमक्या प्रकारच्या समाजांतर्गत गोष्टी हें ठरलें म्हणजे मग गेल्या ३।४ हजार वर्षांत ज्या गोष्टी भारतभूमींत घडून आल्या त्यांतून

या वरील स्वरूपाच्या गोष्टी वेगळ्या करण्याचें काम कायद्याच्या इतिहासकाराला करावयाचें रहातें. धर्म व कायदा यांजमध्यें परस्परसंबंध कशा प्रकारचा आहे हें स्पष्ट झालें म्हणजे हिंदु कायदेशास्त्राचा इतिहास लिहिणें सोपें होईल. हिंदु धर्मशास्त्राचाच केवळ इतिहास लिहावयाचा असेल तर तें काम सोपें आहे.

हिंदूंचें धर्मशास्त्र हें स्वतंत्र शास्त्र आहे. इंग्लंडमध्यें जी कायदेपद्धति आहे तिच्याहून हें धर्मशास्त्र निराळें असून त्याचा इतिहास मनोरंजक आहे. परंतु हा इतिहास दिल्यावरहि असा प्रश्न येऊं शकेल कीं, समाजनियमनाचा हिंदूंच्या धर्मशास्त्रांशीं संबंध काय ? आधुनिक समाजांत जे निरनिराळे कायदे आढळतात त्या कायद्यांशीं सदृश असें प्राचीन हिंदु समाजांत काय होतें. आजज्याला कायदा म्हणतात त्या प्रकारचें कांहीं शासन हिंदु समाजांत होतें कीं नव्हतें ? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं आज ज्याला कायदा म्हणतात अथवा कायद्याचें शासन म्हणतात तसें शासन व तसे व्यवहारनियम हिंदु समाजांत पूर्वी होते. इतकेंच कीं, हे व्यवहारनियम एकसूत्रित केलेले नव्हते. धर्म, नीति या नांवाखालीं कांहीं समाजशासक नियमावल्या होत्या परंतु आज कायद्यांचा जो अर्थ आहे त्या अर्थानें धर्मशास्त्रांतर्गत नियमांचा समाजशासनाच्या कामीं उपयोग फार थोडया प्रमाणांत होत असे. कायद्याखेरीज अनेक गोष्टींतून भारतीयांचें समाजशासन होत असे.

समाज हा इतर बऱ्याच विकासात्मक गोष्टींहून निराळा आहे. समाजाचा हा एक विशेष आहे कीं, याच्या विकासेतिहासांत निरनिराळ्या काळांत व देशांत ज्या बौद्धिक अथवा संस्थाविषयक घडामोडी होतात त्या सर्वत्र सारख्या स्वरूपाच्या असत नाहींत. उदाहरणार्थ, भारतांत प्राचीन काळीं ज्या राजकीय संस्था होत्या त्या आजच्या ब्रिटिशांच्या राजकीय संस्थांहून निराळ्या होत्या. समाजाच्या अभ्यासकानें दुसरी एक लक्षांत ठेवण्याची गोष्ट म्हणजे शब्दांच्या कल्पनांचे व संस्थांचे अर्थ व उद्देश हळू हळू बदलत असतात ही होय. या फेरफारामुळें व या त्रयींच्या एकमेकांवर होणाऱ्या परिणामामुळें कायद्याचें विवेचन करूं इच्छिणाराला चांगले पारिभाषिक शब्द सांपडणें किंवा बनविणें दुर्घट होऊन बसतें. कोणत्याहि विषयांत चांगली परिभाषा तयार होण्यापूर्वी त्या विषयांत ज्या घडामोडींचा अंतर्भाव होतो त्या घडामोडींचें बारकाईनें पृथक्करण होऊन तज्जन्य ज्ञानाचें संकलन झालेलें असलें पाहिजे. सध्यां ओबडधोबड परिभाषेनेंच काम निभावून घेणें भाग आहे. कारण आजची कायद्याची परिभाषा अधिक सूक्ष्मार्थबोधक करावयाची तर समाजशासनविषयक आणि संप्रदायविषयक व इतर नानाविध घडामोडींचें साकल्यानें ज्ञान करून घेणें अवश्य आहे. या विषयांतील अभ्यासकांचा अभ्यास कांहीं इतका खोल आणि व्यापक झालेला नाहीं आणि समाजनियमांचें--मग ते आजच्या कायद्याच्या स्वरूपाचे असोत अगर नसोत, ( कारण कांहीं समाजांत आजची कायद्याची कल्पना मुळींच अस्तित्वांत आलेली नसेल.) सांगोपांग अभ्यसन केल्याशिवाय कायद्याची समाधानकारक परिभाषा बनवितां येत नाहीं. नाना प्रकारें उत्पन्न झालेले अथवा लादले गेलेले नियम व त्यांच्या आधारानें अस्तित्वांत आलेले शासनाचे नाना प्रकार यांची निव्वळ याद द्यावयाची म्हटलें तरी तें फार परिश्रमाचें काम होईल. वाचकांनां या प्रकारबाहुल्याची कांहीं कल्पना, कायदा या शब्दाचे कांहीं भिन्न भिन्न उपयोग खालीं दाखविले आहेत त्यांवरून होईल.

कायदा या विषयाचें शास्त्रीय विवेचन करूं इच्छिणारा लेखक लॉ या शब्दानें दोन प्रकारचा अर्थ व्यक्त करूं शकेल. एक, शासनसत्ता ज्यांचा अंमल करते असे नियम व दुसरा, समाजाचा राजकीय व सामान्य जीवनक्रम ज्या नियमांनुसार चालत असतो ते सर्व नियम. प्राचीन ग्रीस देशांत कॉन्स्टिट्यूशन या शब्दाला असाच व्यापक अर्थ होता. जुन्या समाजांचें वर्णन करतांना कायदा या शब्दाचा उपयोग करावयाचा तर त्याला बराच व्यापक अर्थ दिला पाहिजे. कारण ज्या नियमसमूहाला आज आपण कायदा म्हणतों असा नियमसमूह एखाद्या जुन्या समाजांत कदाचित् मुळींच सांपडणार नाहीं; त्या समाजांत त्याचें सरकार कलहांचा निवाडा करण्याचें काम मुळींच अंगावर घेत नसेल. एखाद्या समाजांत व्यवहारनियम करून देणारी सत्ता ही सरकारची सत्ता नसून दुसरी एखादी सत्ता असेल. एखाद्या समाजांत सरकारच्या हुकुमामुळें ज्यांनां मान्यता दिली जाते असे नियम फार थोडे असतील. कायदेशास्त्राच्या अभ्यासकांत कायदा हा शब्द प्रसंगाप्रमाणें वर दिलेल्या दोनहि अर्थी वापरण्याचा प्रघात आहे. या प्रघाताला कारण हें आहे कीं समाजव्यवस्थेच्या संबंधांतील सर्व प्रकारच्या गोष्टींचा चिकित्सक दृष्टीनें अभ्यास अद्यापि झालेला नाहीं व त्यामुळें तर्कशुद्ध शब्द व व्याख्या पुष्कळ बाबतींत अद्यापि तयार झालेल्या नाहींत. राजकीय जीवनक्रम व कायदेविषयक लोकस्थिति यांच्या विविधतेची कल्पना येण्यासाठीं आतां कांहीं समाजविषयक गोष्टींकडे वळूं.

इंग्रजांमध्यें ज्या नियमांनां कायदे असें नांव आहे, ते नियम समाजनियंत्रणासंबंधीं गोष्टींत मोडतात. समाजनियंत्रण व वादनिर्णय या संबंधांत जे साधनप्रकार संभवतात त्यांपैकीं कांहीं खालीं देत आहों. वाद उत्पन्न झाला असतां त्याचा निर्णय ज्या पक्षाला आपलें नुकसान झालेलें आहे असें वाटत असेल तो पक्ष आपल्या स्वतःच्या जबाबदारीवर स्वेच्छेप्रमाणें करून टाकील. "वैरदेय" म्हणून जो ऋग्वेदांत उल्लेखिलेला प्रकार आहे तो राजाचें नियमन होण्यापूर्वीच्या स्वरूपांत असतां या स्वरूपाचा होता. तो पुढें राजनियंत्रण पावला. यूरोपीय सामाजिक इतिहासकारांस परिचित असा वेंडेंल्ड हा जो निर्णयाचा मार्ग तो, वरीलप्रमाणेंच असतो. निर्णयाचा दुसरा मार्ग म्हणजे खासगी पंचायत व तिसरा मार्ग म्हणजे शासनसत्तेनें स्थापिलेल्या न्यायकचेऱ्या हा.

होय. या न्यायकचेऱ्यांनीं आणि जे वाद निकालांत निघतात, ते वाद ज्या नियमानुसार चालतात व निकालांत निघतात त्या नियमांनां आधुनिक कायदेशास्त्राच्या दृष्टीनें कायदे असें म्हणतां येईल. गुन्हा होऊं नये यासाठीं जे प्रतिबंधक उपाय अस्तित्वांत आहेत त्यांचे प्रकार येणेंप्रमाणें:—(१) ज्याचा आपण गुन्हा करूं तो आपलें त्याच्या लहरीप्रमाणें उट्टें काढील ही भीति; (२) सरकाराचें रूप न पावलेल्या समाजाकडून शिक्षा होण्याची भीति, उदाहरणार्थ आजच्या हिंदु समाजांत वाळींत पडण्याची, गांवकीची वगैरे म्हणजे बहिष्काराची भीति, (३) अतिनैसर्गिक आणि अतिभौतिक अथवा दैवी शासनाची भीति, (४) सरकारच्या शासनाची भीति, शिक्षा फक्त सरकारच करीत असेल किंवा सरकारी शासनाबरोबर इतर प्रकारच्या शासनांची देखील गुन्हेगाराला भीति असेल. सरकार जें शासन करतें त्या शासनाच्या मुळाशीं सुडाची कल्पना असेल, ज्याचा अन्याय कोणाकडून घडला त्याला अन्यायी इसमापासून कांहीं तरी बदला घेण्याचा अधिकार प्राप्त होतो अशी समाजाची कल्पना असेल, अथवा सरकारी शासनाच्या मुळाशीं कोणा देवतेला घडलेल्या गुन्ह्यामुळें ताप झाल्यानें तिच्या संतोषार्थ गुन्हेगाराला कांहीं शिक्षा झाली अशी कल्पना असेल; किंवा गुन्हा जो होतो त्याच्या योगानें सरकारचें अथवा समाजाचेंच नुकसान होतें, व या नुकसानीची भरपाई म्हणून गुन्हेगाराला शिक्षा झाली पाहिजे अशीहि कल्पना सरकारी शासनाच्या मुळाशीं असूं शकेल. आजच्या यूरोपीयांच्या कायद्यांच्या मुळाशीं रोमन कायदे आहेत. रोमन कायद्यांची पूर्वपीठिका आपणांस समजल्यास एक भिन्न परिस्थिति लक्षांत येईल.

समाजानें पाळण्याचे नियम सरकारनें अथवा सरकार नियोजित इसमांनीं केलेले असतात किंवा राज्यांत ज्ञानाचा संग्राहक म्हणून जो वर्ग समाजनियमन करण्यासारखा म्हणून समजला जातो, व लोक वरील कारणासाठीं ज्याला मान देतात व ज्याचा वचक बाळगतात त्या वर्गानें हे समाजाचे नियम केलेले असतात, अथवा या नियमांचें जनकत्व विवक्षित देवतेचे पूजक म्हणून तिच्याशीं निकटसंबद्ध असलेल्या व लोकांनीं पूज्य मानलेल्या एखाद्या वर्गाकडे असतें. या नियमांचें-म्हणजे समाजांतील ज्ञानविशिष्ट अथवा पावित्र्यविशिष्ट वर्गानें केलेल्या नियमांचें-स्वरूप अनेक प्रकारचें असूं शकेल. सरकार ज्यांची अंमलबजावणी करते अशा शुद्ध कायद्याच्या रूपाचे हे नियम असतील; या नियमांत कांहीं वरीलप्रमाणें शुद्ध कायद्याच्या स्वरूपाचे व कांहीं लोकांनीं आपल्या लौकिक फायद्यासाठीं पाळण्यास सोईचे असे असतील; तसेंच मोक्षप्राप्त्यर्थ साधकानें पाळण्याचे नियमहि त्यांमध्यें मिश्रित केलेले असतील. समाजांत त्याच्या ध्येयांवर व कल्पनांवर परिणाम करून आपली सत्ता चालविणारे वर्ग अनेक असतील अथवा एकच असेल. अशा प्रकारचे अनेक वर्ग जेथें आहेत तेथें प्रत्येक वर्ग आपलें व आपल्या मताचें अथवा संप्रदायाचें श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करतो. अशा रीतीनें, लोकांनीं आपल्याला इतरांपेक्षां अधिक मान द्यावा, अधिक पवित्र समजावें व आपल्या विचारसंप्रदायालाहि अधिक मान्यता द्यावी यासाठीं अहमहमिकेनें झगडणारा वर्ग आपल्या वर्गाचा हक्क अधिकाधिक शाबीत करण्याचा आणि आपला अधिकार इतरांपेक्षां मोठा सांगण्याचा प्रयत्न करीत असतो. उदाहरणार्थ, राजे लोकांच्या अधिकाराचा अभिमानी वर्ग आपण करूं तोच कायदा, कायदा ठरविण्याचे सर्वाधिकार राजाचे, असें दाखविण्याचा प्रयत्न करील, तर ब्राह्मणांचा किंवा दैवतोपासकांचा वर्ग शासननिर्णय हें काम आपलें व राजाचा अधिकार केवळ परंपरागत शासनाप्रमाणें राज्य चालविण्याचा आहे असें तत्त्व पुढें आणील. ज्या वेळेस न्यायाधिशासमोर खटला येईल त्या वेळेस त्याला निरनिराळ्या मतांतून आपला मार्ग काढावा लागतो व सामान्य लोकांस तोच कायदा होतो.

मनुष्यांच्या राजकीय जीवनक्रमांतील नियंत्रणविषयक गोष्टी वर वर्णिल्याप्रमाणें नाना प्रकारच्या असल्यानें परिभाषा ठरविणारांनां समाजांतील कोणत्या नियमांनां कायदा या नांवानें संबोधावें हा प्रश्न सोडविणें बरेंच अवघड जातें. सरकार कांहीं समाजनियम आपल्या सत्तेनें अंमलांत आणीत असतें, व कांहीं नियमांपाठीमागें सरकारची सत्ता नसून ते केवळ धार्मिक कल्पनांमुळें, परमेश्वराच्या अथवा निसर्गातीत शक्तीच्या भीतीमुळें लोक पाळीत असतात. या दुसऱ्या प्रकारच्या नियमांनां कायदे म्हणावें किंवा कसें ? या प्रश्नाचें उत्तर देण्याच्या भानगडींत आम्हीं पडत नाहीं. समाजव्यवस्थेचा अभ्यासक आपल्या लहरीप्रमाणें किंवा बुद्धीप्रमाणें कायदा कशाला म्हणवयाचें तें ठरवील व त्याच्या या कायद्याच्या व्याख्येप्रमाणें समाजनियमांची तो कायद्याच्या वर्गांत व इतरत्र व्यवस्था लावील. येथें सांगावयाचें तें एवढेंच कीं, हिंदुस्थानांत धर्मशास्त्राचे व रूढीचे कित्येक नियम, सरकार ते अंमलांत आणण्याचें स्वप्नांतहि आणीत नाहीं तरी, लोक शिरसा मान्य करून आचरणांत आणीत आहेत; व या प्रकारच्या नियमांनां आज कायदा हें नांव देत नाहींत. हिंदुस्थानांत आज दिसून येणाऱ्या नियमव्यवस्थेवरून कायद्याबिनकायद्यांतील भेद कायदेशास्त्रांनीं ठरवावा असा आमचा आग्रह नाहीं. आमचा आग्रह इतकाच आहे कीं, कोणत्याहि काळीं जे समाजनियम दृष्टोत्पत्तीस येतील त्यांत सरकारी सत्तेचें पाठबळ कोणाला आहे व कोणाला नाहीं हें बारकाईनें पहावें व या मुद्द्यावर त्यांचे शक्य तेथें स्पष्ट दोन वेगळाले वर्ग करावे. याप्रमाणें वर्गीकरण करून सरकारी सत्ता पाठीमागें असलेल्या समाजनियमाला मराठींत कायदा असें नांव दिलेलें आहे.

धर्मशास्त्रांतील व्यवहारधर्माचें तात्त्विक विवेचन येथपर्यंत झालें. विशिष्ट विषयावरील व्यवहारधर्म त्या त्या विषयांत अंतर्भूत केला आहे. आचारधर्माविषयीं व प्रायश्चित्त धर्माविषयीं आतां विवेचन करूं. सध्यां जुना आचारधर्म

हळू हळू नष्ट होत चालला आहे व त्याबरोबर प्रायश्चित्ताचा धर्महि नष्ट होत चालला आहे. या दोन्ही धर्मांचें एकत्वानें विवेचन केलें असतां वावगें होणार नाहीं. गेल्या पिढीमध्यें ज्याला धर्म म्हणून समजण्यांत येई असा धर्म म्हणजे आचार-प्रायश्चित्त धर्मच होय. व याचा जसजसा लोप होऊं लागला तसतसा धर्म बुडाला अशी भावना होऊं लागली. तथापि वस्तुस्थिति तशी नसून धार्मिक बाबतींत अधिक उज्वल स्थिति येऊं लागली आहे. विचारक्रांतीमुळें आचार-प्रायश्चित्तधर्मांत फरक हा व्हावयाचाच व तसा तो पूर्व काळापासून होत आहे. श्रौतधर्म अप्रिय होऊं लागला तसतसा स्मार्त व पौराणधर्म जोर करूं लागला. त्यावेळेस देखील धर्म गेला असेंच वाटत असलें पाहिजे. श्रौतसंस्था जेव्हां मरूं लागल्या तेव्हां प्रथम आध्यात्मिक विचारास जोर मिळूं लागला. व त्या क्रियेचे कर्ते आरण्यकीय ब्रह्मवेत्ते होते. तसेंच श्रीकृष्णासारखे नारायणीय धर्माचे प्रवर्तक, बुद्ध व महावीर हेहि होते. तिघांनींहि चित्तशुद्धि व संयमन यांवर जोर दिला.कर्मांचें महत्त्व करण्याची पण भावनेऐवजीं ज्ञानास प्राधान्य देण्याची परंपरा पुढें बादरायण व्यास व त्यांचे भाष्यकार यांनीं चालविली. नारायणीय धर्माच्या प्रचारामुळें पौराणधर्माला अधिक जोर मिळाला आणि अनेक दैवतें, अनेक उपास्यें, तत्संबद्ध व्रतें, कर्में, दैकल्यें सुरू झाली. श्रौत परंपराहि स्वस्थ बसली नाहीं. शाखा प्रवर्तकांनीं पाकयज्ञ उत्पन्न केले आणि अनेक शाखागणिक निरनिराळीं कर्में सुरू केलीं. या क्रांतीचें स्वरूप वेदविद्या विभागांत स्पष्ट केलें आहे ( वेदविद्या प्र. १० पहा ). वेदांच्यामुळें जीं वेदांगें उत्पन्न झालीं आणि त्याबरोबर जीं ज्योतिष-व्याकरणादि शास्त्रें उत्पन्न झालीं तींच पुढें पौराणधर्माला लागूं झालीं. ज्योतिषी श्रुतिकालीं दर्श किंवा पौर्णिमा केव्हां हें ठरवीत असतील तर पौराणधर्माच्या वाढीबरोबर एकादशी व शिवरात्र केव्हां हें ठरवूं लागले. या पद्धतीप्रमाणें श्रौतकालीं अकर्माबद्दल किंवा कर्मांतील चुकीबद्दल जशीं प्रायश्चित्तें ठरविलीं जात तीच पद्धति पौराणधर्मास लागू लागली आणि अनेक नवीन प्रायश्चित्तेंहि निर्माण झालीं. स्मार्त व पौराण धर्मांचें एकीकरण होऊन संयुक्त कर्मसमुच्चय प्रचलित धर्म बनला व हा सर्व धर्म ब्राह्मणांचा व त्यांतला पौराणिक धर्म तेवढा शूद्रांचा अशी लोकप्रवृत्ति ग्रंथनिर्दिष्ट झाली. उत्तरकालीन धर्मशास्त्रावरील ग्रंथकर्ते, उदाह० धर्मसिंधुकार हे श्रौत खेरीज स्मार्तांतील कर्में व पौराण कर्में हीं सर्व एकत्र करून सर्वच धर्म प्रचलित आहे असें गृहीत धरून ग्रंथ लिहिते झाले. आज धर्मशास्त्रांतील कोणता भाग कायम ठेवावा व कोणता ठेवूं नये यासंबंधानें प्रश्न उपस्थित होतात. व नवीन स्मृति झाली पाहिजे असेंहि लोक म्हणूं लागतात. तथापि कांहीं सुसंबद्ध नियममाला तयार होईल असा संभव नाहीं. पूर्वीची नियममाला व विधिनिषेध यांपैकीं ज्या सार्वलौकिक नाहींत त्यांचें महत्त्व कमी होणार आणि बाकीचे सर्व आचार-प्रायश्चित्तें हळू हळू मरत जाणार हें भवितव्य दिसतें. यांत फरक एवढाच पडेल कीं, जे संप्रदाय, उदाहरणार्थ आर्यसमाज, वारकरी-संप्रदाय आपापली चळवळ जास्त ठेवतील ते आपला सांप्रदायिक विशिष्ट आचार अधिक दिवस कायम राखतील. कोणती स्मृति अधिक प्रमाण मानावी; कोणती मानूं नये इत्यादि शास्त्रीबोवांचे प्रश्न कितीहि जोरानें चालू झाले तरी त्यांचें महत्त्व निमुळत्या होत चाललेल्या समाजापलीकडे कांहींच नाहीं. विशिष्ट ग्रंथाचें महत्त्व आहे म्हणून एखाद्यानें ओरडावें याच्या पलिकडे कोणत्याहि ग्रंथकाराचें महत्त्व सर्वमान्य होणार नाहीं.

धर्मशास्त्रासंबंधानें सामान्य जनांची अशी समजूत असणार कीं त्यास विधिपर अगर निषेधपर स्पष्ट वाक्यें पाहिजेत. धर्मशास्त्रग्रंथांतील वचनांचें पृथक्करण करून अनेक परस्परविरोधी वचनें वाचकांसमोर मांडलीं असतां त्यास कौतुक किंवा मौज वाटेल,परंतु कार्याकार्य ज्ञान होणार नाहीं. परस्पर विरुद्ध वचनांपैकीं ग्राह्य कोणतें व अग्राह्य कोणतें याविषयीं ज्ञानकोशकारांनीं, कांहीं विशिष्ट मत प्रगट केलें तर त्याची किंमत काय ? आणि त्यास लोकमान्यता कशी प्राप्त होणार ? परस्पर विरुद्ध विधानें असलीं तर त्यांची संगति कशी लावावी, त्यांतील योग्य नियम कसा ठरवावा इत्यादि गोष्टींविषयीं धर्मशास्त्रांतच नियम आहेत. पण ते नियम पूर्णपणें पाळले गेले आहेत कीं नाहीं हें कसें ठरणार ? व जरी ते पूर्णपणें पाळले तरी विकल्पास म्हणजे स्वेच्छानिर्णयास क्षेत्र आहेच. आणि त्यामुळें परस्परविरुद्ध विधानांतील ग्राह्य नियम काढण्याच्या क्रियेविषयीं प्रश्न उपस्थित होतोच.

धर्म याची जर मीमांसकांची व्याख्या घेतली तर आज धर्मशास्त्रावर जे अनेक ग्रंथ झाले आहेत त्यांतील बराचसा भाग धर्मशास्त्रांत येतो किंवा नाहीं हा प्रश्न उपस्थित होणार.

धर्मशास्त्रांत पुन्हां पुन्हां उच्चारण केलें आहे कीं, शब्दप्रामाण्य वेदासच आहे, इतर ग्रंथांस नाहीं. " केवळ श्रुतिनियमांचें अवलंब करा " किंवा " सर्व श्रुतिनियमांचें अवलंब करा " असें आज कोण म्हणणार आहे ? श्रुतींच्या खालोखाल अधिकारी ग्रंथ म्हणजे कल्पसूत्रें. आपस्तंबाश्वलायनादि सूत्रांचा अनुयायी जो ब्राह्मण असेल त्यास आपलें सूत्र श्रुतीच्या खालोखाल महत्त्वाचें वाटतें. परंतु त्याचें सुद्धां अवलंबन केलें असतां समाजांत दोष उत्पन्न होणार नाहीं काय ? उदाहरणार्थ, आश्वलायन सूत्री ब्राह्मणांस म्हणजे सर्व कऱ्हाडे ब्राह्मणांस आणि निम्याहून अधिक कोंकणस्थ, देशस्थांस " शूलगव " कर्म कर्तव्य आहे ! तथापि शूलगवाचा म्हणजे बैल मारण्याचा विधि दर महिन्या-पंधरा दिवसांनीं एखादा ब्राह्मण करूं लागला तर तो ब्राह्मण धर्माचार करणारा मनुष्य या मान्यतेनें समाजांत राहील किंवा नाहीं याची शंकाच आहे.

कलियुगांत अमुक विधी करावयाचे नाहींत असें जरी स्मृतिवचन असलें तरी प्रत्येक स्मृतिवचनाची मान्यता वेदमूलकत्वावरच असावयाची ना ? वेदांत कलियुगाचा उल्लेख आहे काय ? आणि कलीमध्यें निराळा धर्म असावा असा आदेश वेदांत कोठून असणार ?

जेथें शास्त्रवचन निश्चयात्मक नाहीं तेथें रूढी घ्यावयाची असें कोणी म्हणेल. पण आज रूढी घ्यावयाची ती कोणामधील? बहुजनसमाजाची म्हणजे शुद्रातिशूद्रांतील रूढी घ्यावयाची की ब्राह्मणांतील, किंवा ब्राह्मणांतील इंग्रजी शिकलेल्यांची मान्य करावयाची, अथवा बहुतांशीं रूढीवर अवलंबून राहणाऱ्या व शास्त्राभ्यासापेक्षां क्रिया शिकलेल्या अशा भिक्षुकवर्गाची रूढी घ्यावयाची, कीं जे थोडेसे धर्मशास्त्रज्ञ समाजांत असतील त्यांची घ्यावयाची? ज्यांच्यांतील रूढी घ्यावयाची असा शिष्ट वर्ग कोणता व कसा शोधावयाचा ?

आज भिक्षुक मंडळी कांहीं विशिष्ट ग्रंथास प्रमाण मानून थोडासा गडबडगुंडा करतील, किंवा परस्पर मत्सरामुळें अमक्याचें कर्म चुकलें, माझ्या म्हणण्याप्रमाणें अमुक पाहिजे होतें, असल्या गोष्टी सुरू करतील पण त्याचें महत्त्व इतर जनतेस नाहीं. एवंच पूर्वकालीन धर्माचार मृत झाले आहेत आणि मुंज विवाह यांपलीकडे स्मार्त धर्म शिल्लक नाहीं, व त्यापलीकडे कोणताहि धर्म बहुमान्य नाहीं एवढेंच विधान प्रचलित आचारप्रायश्चित्तधर्माविषयीं आज करतां येईल. समाजसदस्यत्वदर्शक जे धर्मनियम असतील त्यासहि थोडासा जोर येईल आणि व्रात्यस्तोम किंवा शुद्धि यांचें महत्व वाढेल. आजची हिंदूंची धार्मिक भावना आहे ती ही कीं आपलें हिंदू नावानें स्वतंत्र वैशिष्ट्य असावें आणि तें सांस्कारिक विधीनें व्यक्त व्हावें. या हेतूच्या सिद्धीसाठीं लागणाऱ्या नियमांपलीकडे संस्कारधर्माचें महत्त्व नाहीं.

आज ज्या ग्रंथांनां धर्मग्रंथ म्हटलें जातें त्यांपैकीं वेद, ब्राह्मणें व निरनिराळ्या शाखांपरत्वें असलेलीं गृह्यसूत्रें यांचा उल्लेख 'बुद्धपूर्व जग' या विभागांत शेवटीं आला आहे. याशिवाय गौतम, आपस्तंब, वसिष्ठ, सत्याषाढव गैरे धर्मसूत्रें, मनु, याज्ञवल्क्य, पराशर, देवल इत्यादि स्मृती; व त्यांवरील कुल्लूक भट्ट, मेधातिथि, विज्ञानेश्वर वगैरे टीकाग्रंथ; महार्णव, हेमाद्रि, प्रयोगपारिजात, निबंधचंद्रिका, दत्तकचंद्रिका, आचारभूषण, आचारेंदु, पुरुषार्थचिंतामणि, संस्कारकौस्तुभ, संस्काररत्नमाला इत्यादि निबंधग्रंथ; आचार, व्यवहार, प्रायश्चित्त, दान, श्राद्ध वगैरे बारा मयूख; आणि निर्णयसिंधु, धर्मसिंधु यांसारखे अलीकडील निबंधग्रंथ यांचा धर्मशास्त्रग्रंथांत समावेश होतो. ( 'परमार्थसाधन' व 'संस्कारधर्म' पहा).

**धर्मशिला**—आपल्या पतीबरोबर सती जाणारी स्त्री ज्या दगडावर उभी राहून सौभाग्यवायनें वांटून चितेंत प्रवेश करते तो दगड. धर्मशिलेवर उभी असतांना थोरल्या माधवराव पेशव्यांची स्त्री रमाबाई हिनें नारायणराव पेशव्यांचा हात राघोबाच्या हातीं दिल्याचें प्रसिद्ध आहे.

**धर्मसूत्रें**—सूत्रवाङ्मयाची ही एक शाखा असून तिची उभारणी पूर्वपरंपरागत ज्ञानाच्या आधारावर केलेली आहे. 'सामयाचारिका' ( सामान्य रीतीभाती ) हा धर्मसूत्रांचा विषय आहे. मूळ स्वरूपांत टिकून राहिलेलें धर्मसूत्र आपस्तंबाचें होय ( "आपस्तंब" पहा ). हिरण्यकेशी धर्मसूत्राचा याच्याशीं निकट संबंध दिसतो तिसरें प्रसिद्ध धर्मसूत्र बौधायनाचें होय. हें आपस्तंब सूत्राहून प्राचीन दिसतें. हीं तिन्ही सूत्रें कृष्णयजुर्वेदीय तैत्तिरीय शाखेचीं आहेत. गौतमधर्मसूत्राची माहिती त्या नांवाखालीं स्वतंत्र दिली आहे. कुमारिलभट्टाच्या काळीं वसिष्ठाचें धर्मशास्त्र सर्वसामान्यपणें प्रमाणभूत मानिलें जात असे, तरी फक्त ऋग्वेदीय शाखांचे लोक त्याचा अभ्यास करीत. वसिष्ठाचें धर्मसूत्र गौतमाच्या नंतरचें आहे पण तें मनुस्मृतिपूर्वकालीन दिसतें. सर्व धर्मसूत्रांसंबंधीं कांहीं विवेचन त्यांच्या कर्त्यांच्या चारित्रांतून आढळेल. शिवाय वेदविद्या विभाग पृ. १८०–१८३ पहा.

**धर्मावरम्**, ता लु का.—मद्रास इलाखा. अनन्तपुर जिल्ह्याच्या मध्यभागीं असलेला तालुका. क्षेत्रफळ ७३२ चौरस मैल. यांत खेडीं ४८ आहेत. याचा दक्षिण, पश्चिम व पूर्व सरहद्दीचा प्रदेश डोंगराळ आहे जमीन तांबडी आहे. पाऊस सरासरी २१ इंच पडतो. हरभरा व बाजरी हीं येथील मुख्य पिकें होत. चित्रावती नदीस बांध घालून धर्मावरम् येथें मोठा तलाव बांधला आहे. लोकसंख्या (१९२१) ८८६६८०.

गां व.—धर्मावरम् तालुक्याचें मुख्य ठाणें हें मद्रासहून १०० कोस आहे. लोकसंख्या ( १९११ ) ७३८६०. हा गांव क्रियाशक्ती थोडेयार यानें वसविला. गांवाजवळ एक मोठा तलाव असून एक मोठें विष्णूचें देऊळ आहे. येथें सुती व रेशमी कापड तयार होतें. [ इंपे ग्याझे. पु. ११. ]

**धर्मोत्तर**—सन ११७३ च्या सुमारचा हिंदुस्थानांतील एक बौद्ध तर्कशास्त्रवेत्ता. हा जरी सांप्रत हिंदुस्थानांत स्मृतिशेष झाला आहे तरी तिबेटांतील 'तंडजूर' या ग्रंथाच्या आधारानें धर्मोत्तर हा तर्कशास्त्रावरील कोणी तरी एक प्रसिद्ध ग्रंथकर्ता होता इतकी माहिती आढळते. हा सौत्रान्तिक संप्रदायाचा उत्पादक अथवा अध्यापक होता. यानें सुमारें सात ग्रंथ लिहिले; आणि त्यांपैकीं न्यायबिन्दुटीका हा एकच उपलब्ध आहे. [ जर्नल ऑ. रॉ. ए. सो. पु. १७, पृ. ४७. ]

**धवलधार**—पंजाब. ही कांग्रा जिल्ह्यांतील एक पर्वताची ओळ असून ह्या ओळीच्या पलीकडच्या अंगास चंबा संस्थान आहे. या रांगेंतील सर्वांत उंच शिखराची उंची १५९५६ फूट आहे. धरमशाळा हें कांग्रा जिल्ह्याचें मुख्य गांव धवलधारच्या उतारांतच आहे.

**धाकड**—एक मजूर जात. यांची लोकसंख्या (१९११) १६०१०५ असून ती मुख्यतः मध्य हिंदुस्थान व राजपुताना

यांत आहे; पैकीं राजपुतान्यांत जास्त आहे. पुरुषांपेक्षां बायका यांच्यांत जास्त आहेत. धाकड शब्द मध्यप्रांतांत वरई, बनिया व किराड लोकांस लावितात व त्यांत गोळक अर्थाचा बोध होतो. पण बस्तर संस्थानांत याचा विशेष अर्थ, ब्राह्मण आणि रजपूत यांच्यापासून स्थानिक स्त्रियांच्या पोटीं जी संतति झाली ती असा आहे. यांच्यांत दोन वर्ग आहेत. एक पुराइत (शुद्ध) व दुसरा सुराइत (मिश्र). ब्राह्मण किंवा रजपूत व हळवा स्त्री यांची संतति पुराइत आणि मुरिया, मरार, नाई, व कलार स्त्रियांपासून झालेले ते सुराइत; पण हे सुराइत दोन तीन पिढ्यांनंतर पुराइत होतात. हाच नियम धाकड पुरुष व रावत किंवा हळवा स्त्रीच्या संततीस लागू आहे. पण धाकड बाप व मुरिया स्त्रीपासून झालेल्यांस नेहमीं सुराइतच रहावें लागतें. पुराइत व सुराइत हे एकमेकांत अन्नव्यवहार करतात, मात्र लग्नव्यवहार करीत नाहींत. यांच्यांत चिकसार नांवाचे लोक आहेत; त्यांनीं एकदां शिकार करतांना अरण्यास आग लावली व चुकून जळालेल्या कुत्र्याचें मांस खाल्लें; म्हणून त्यांस राजानें दसऱ्याच्या दिवशीं झोपडी शाकारण्याचें काम सांगितलें अशी दंतकथा असून हें काम हे लोक अद्याप करीत असतात. इतर धाकड यांच्या हातचें खात नाहींत किंवा यांच्या मुली करीत नाहींत. जर जातीच्या माणसापासून कुमारिका गरोदर राहिली, तर लग्न न करतां ती त्यास देऊन टाकतात, अथवा वाग्दत्त वराची कबुली असल्यास त्याला देतात. उच्च जातीच्या माणसापासून कुमारिका गरोदर झाली तर तिला बहिष्कार घालीत नाहींत. पण नीच जातीपासून झाल्यास बहिष्कार घालतात. प्रौढ मुलगी मनास वाटेल तर स्वतःच वर निवडते आणि संक्षिप्त विधीनें लग्न उरकून घेते. पूर्वी धाकड हे आपल्या नातीवरोवर लग्न करीत, पण आतां करीत नाहींत. मर्तिकानंतर जोंपर्यंत जातीभोजन दिलें नाहीं तोंपर्यंत अशौच असतें. गरीब माणसाकरितां त्याचे जातभाई वर्गणी करून जातिभोजन करून त्याला शुद्ध करतात. पाणी भरलेल्या द्रोणांत एक मासा घालून तो द्रोण हातांत घेतला म्हणजे शुद्धि होते. एकानें दुसऱ्यास जोडा मारल्यास जोडा खाणाराची जात जाते, पण प्रायश्चित घेऊन पुन्हां त्यास जातींत येतां येतें. धाकड शेतकीचें व मजुरीचें काम करतात. ते लोहाराचें काम कधीं करीत नाहींत. [ रसेल-हिरालाल; सेन्सस रिपोर्ट १९११. पु. ११, भा. २.]

**धागा**--मध्यप्रांत, वर्धा जिल्हा, आर्वी तहशील. वर्ध्याच्या उत्तरेस २५ मैलांवर, हें सुमारें २०० लोकवस्तीचें लहानसें खेडें आहे. गांवाजवळील टेंकडीवर एक लेणें असून देवळांत महादेवाची स्वयंभु पिंडी आहे. येथें दर महाशिवरात्रीस मोठी यात्रा भरते. [ वर्धा डिस्ट्रिक्ट ग्याझे. ]

**धाडि**—पंजाबांतील जुब्बल संस्थानाची एक जहागीर. क्षेत्रफळ २५ चौरस मैल. पूर्वी ही थरोच व बशहर संस्थानाकडे होती पण स. १८९६ पासून ही जुब्बल संस्थानाची मांडलिक झाली. लोकसंख्या (१९२१) १८५. उत्पन्न सुमारें दोन हजार. येथील जहागिरदार एक हिंदु रजपूत ठाकुर असून याच्या हातीं सर्व अधिकार आहे. फक्त फांशीची शिक्षा सांगतेवेळीं सिमल्याच्या हिल स्टेट्स सुपरिन्टेन्डेंटची मंजुरी मिळवावी लागते. [ इंपे. ग्याझे. पु. ११. ]

**धाडी**—मुसुलमानी गायक. हे भाटासारखे मोठमोठ्या सरदारांच्या व राजांच्या पदरीं असत. समारंभाच्या मिरवणुकींत किंवा लढाईच्या स्वारींत हे लोक आपापल्या मालकापुढें त्यांचीं स्तुतिस्तोत्रें गात गात चालत. मराठी राज्यांत छत्रपति, पेशवे व इतर मोठमोठे सरदार यांच्या पदरीं हा मुसुलमान भाटवर्ग होता.

**धातकी**—हें झुडुप सर्व हिंदुस्थानभर व उत्तर ब्रह्मदेशांत आढळतें. या झाडापासून डिंक निघतो; व याच्या फुलापासून रंग तयार करतात किंवा इतर रंगांबरोबर रंगबंधकर म्हणून यांचा उपयोग करतात. फुलांत सुमारें शें. २०.६ पर्यंत ट्यानिकाम्ल ( रांपणारे द्रव्य ) असतें परंतु चामडें रांपविण्याकरितां फुलांच्या ऐवजीं पानें अधिक पंसत केलीं जातात. फुलें औषधी दृष्ट्या स्तंभक आहेत. मध्यप्रांतांत या झाडाचीं फुलें खातात व बंगालमध्यें थंडाई करण्याकरितां त्यांचा उपयोग करतात असें म्हणतात. हें झाड बागेंतहि शोभेकरितां लावतात. [ वॅट ].

**धातु**—मूलतः धातु हा शब्द सोनें, रुपें, तांबें, लोखंड, कथील, शिसें म्हणजे ज्या पदार्थांचें विशिष्टगुरुत्व जास्त आहे, जे घनवर्धिष्णु, अ-पारदर्शक व एक प्रकारची चकाकी असणारे असे असतात अशा पदार्थांनां लावण्यांत आला. अर्वाचीन रसायनशास्त्रांत मूलद्रव्यांचा धातुवर्ग हा एक स्वतंत्र वर्गच कल्पिलेला आहे व त्यांत जीं मूलद्रव्यें येतात त्यांचे गुणधर्म वर दिलेल्या गुणधर्मांशीं सर्वांशीं जुळतातच असें नाहीं. रसायशास्त्रज्ञांनीं आतांपर्यंत एकंदर सुमारें ७० मूलद्रव्यें शोधिलीं आहेत आणि वरील गुणधर्मांप्रमाणें आपण जर त्यांचा अनुक्रम लावला तर आरंभीं किंवा शेवटीं येणाऱ्या द्रव्यांमध्यें धातूंचे किंवा अ-धातूंचे गुणधर्म विशेष असतात व अर्सेनिकाप्रमाणें मध्यें येणाऱ्यामध्यें दोहोंचेहि कांहीं गुणधर्म असतात. धातूंचा प्रमुख गुणधर्म म्हणजे त्यांपासून निदान एक तरी अनाम्ल प्राणिद तयार होणें हा होय. प्राणिदांचे अम्लांबरोबर क्षार होतात व अधातुमूलद्रव्यांचीं आम्लिक प्राणिदें तयार होतात व त्यांचा पाण्याशीं संयोग झाला असतां त्यांपासून अम्लें तयार होतात. पण या गुणधर्मांवरच केवळ आपणास धातूंची व्याख्या बनवितां येणें शक्य नाहीं. कारण धातु या शब्दानें आपणांस त्यांच्या सर्व रासायनिक गुणधर्मांबरोबरच पदार्थवैज्ञानिक, यांत्रिक वगैरे सर्व गुणधर्मांचा बोध व्हावयास पाहिजे.

धातूंनां जड किंवा अचेतन ( इनर्ट ) वातावरणांत बरीच उष्णता दिल्यास ते द्रवीभूत होतात. हा द्रव भांड्यांत ठेवल्यास त्याचा पृष्ठभाग बहिर्गोलवक्राच्या आकाराचा ( कॉन्व्हेक्स ) असतो. या द्रवाच्या योगानें प्रकाशाचें विविष्ट तऱ्हेनें परावर्तन होतें. त्यामुळें धातूच्या

चकाकीचा बोध होतो. आणखी जास्त उष्णता दिल्यास धातू बाष्परूपांतहि जाऊं शकतात. कांहीं धातूंच्या बाष्पांचा रंग ओळखतां येतो. रजताच्या वाफेचा रंग निळा असतो, पालाशच्या वाफेचा रंग हिरवा असतो आणि इतर बऱ्याचं धातूंची वाफ रंगहीन असते. द्रवरूप धातू थंड केले असतां ते घन होत जातात व त्यांचे स्फटिक निरनिराळ्या प्रकारचे चौकोनी असतात. अधातूंपेक्षां ते बरेच विद्युद्वाहक आणि उष्णतावाहक असतात. धातूंच्या अंगचे आणखी गुणधर्म म्हणजे लवचिकपणा, चिकणपणा व ताठरपणा हे होत.

अ पा र द र्श क ता.—धातूंमध्यें अत्यल्प प्रमाणांत पारदर्शकता असते. रासायनिकरीत्या कांचेवर सोन्याचा अतिशय पातळ थर बसविल्यास त्यांतून हिरवा प्रकाश पार जातो. पण रजताच्या पातळ थरांतून कोणत्याहि प्रकारचा प्रकाश आंत जाऊं शकत नाहीं. पाऱ्याच्या पातळ पटलांतून मेलसेन्स ह्याच्या म्हणण्याप्रमाणें निळसर रंगाचा प्रकाश जाऊं शकतो आणि तांब्याचे अतिशय पातळ पडदे अर्धपारदर्शक असतात.

रं ग.—रंगाच्या बाबतींत बऱ्याच धातूंचा रंग करडा असून कथील किंवा रजतासारख्या कांहीं धातूंचा रंग पांढरा असतो. निरनिराळ्या रंगांचेहि कांहीं धातू आहेत. सोन्याचा पिंवळा व तांब्याचा तांबडा रंग असतो.

प्र का श प रा व र्त न.—कोणत्याहि जिल्हई चढविलेल्या धातूच्या पत्र्यावर किरण पडला तर त्याचें परावर्तन व वक्रीभवन होतें पण इतर घनपदार्थांवर पडणाऱ्या किरणांत व या किरणांत फरक इतकाच कीं वक्रीभवन झालेला किरण अपशोषला जातो व परावर्तन झालेल्या किरणावर ध्रुवीभवनाच्या योगानें निराळेच परिणाम दिसून येतात.

स्फ टि क म य आ का र व घ ट ना.—बहुतेक धातूंचे स्फटिक बनतात. सुवर्ण, पल्लाद, रजत, पारा, तांबें, लोखंड आणि शिसे यांचे स्फटिक नियमित आकाराचे असतात. अंज, बिस्मत, भोम, जशद, मग्न ह्यांचे स्फटिक समभुज चौकोनी व पालाश, कथील यांचे चौकोनी आकाराचे असतात. धातूंच्या घटनेशीं त्यांच्या चिकणपणाचा बराच संबंध आहे. या चिकणपणामुळेंच आपणांस त्यांचे ठोकून पातळ पत्रे करतां येतात व ओढून तार काढतां येते. ह्या चिकणपणाचा गुणधर्म निरनिराळ्या धातूंत निरनिराळ्या अंशानें दृष्टोत्पत्तीस येतो व एकाच धातूंतील चिकणपणा तिच्या उष्णमानावर अवलंबून असतो व तो यांत्रिक किंवा पदार्थवैज्ञानिक शक्तीच्या योगानें बदलतां येतो. चिकणपणामध्यें धातूंच्या मऊपणाचा समावेश होत नाहीं कारण चिकणपणा जसजसा कमी होत जातो तसतसा मऊपणाचा प्रादुर्भाव होतो. प्रेक्टल ह्याच्या म्हणण्याप्रमाणें पुढील धातूंचे ठोकून पातळ पत्रे बनण्याचें व रुळांत दाबून पत्रे बनण्याचें किंवा ओढून तार बनण्याचें प्रमाण असतें.

| ठोकून पत्रे बनणारे. | रुळांत दाबून पत्रे बनणारे. | ओढून तार काढावयाचे. |
|---|---|---|
| शिसें | सुवर्ण | प्लातिन |
| कथील | रजत | रजत |
| सुवर्ण | तांबें | लोखंड |
| जस्त | कथील | तांबें |
| रजत | शिसें | सुवर्ण |
| तांबें | जस्त | जस्त |
| प्लातिन | प्लातिन | कथील |
| लोखंड | लोखंड | शिसें |

सोन्याचा १/[illegible] मि. मि. जाडीचा पातळ पत्रा ठोकून काढतां येतो. प्लातिनाची १/[illegible] मि. मि. इतक्या बारीक व्यासाची तार ओढून काढतां येते. धातू कानसले असतां होणाऱ्या प्रतिरोधावर त्यांचें काठिन्य अवलंबून असतें पण ह्या प्रतिरोधानें त्यांचें काठिन्य मोजतां येत नाहीं.

ल व चि क प णा अ थ वा स्थि ति स्था प क ता.—सर्व धातूंत हा गुणधर्म दिसून येतो. धातूवर कांहीं विवक्षित प्रमाणाहून कमी अशा शक्तीचा दाब घातला असतां तिच्या आकारमानांत थोडा फरक होतो व तो दाब काढून घेतला असतां धातू मूळ आकार धारण करतो. पण जर दाबाच्या योगानें आकारमानांत होणारा फरक त्याच्या विशिष्ट लवचिकपणाच्या ठरीव मर्यादेच्या बाहेर जाईल तर तो बदल चिरस्थायी होतो. निरनिराळ्या धातूंची ही विशिष्ट स्थितिस्थापकता आतां निश्चित झाली आहे.

स्थितिस्थापकतादर्शक कोष्टक

| धातूचें नांव | स्थितिस्थापकता |
|---|---|
| शिसें, तार | १८०३ |
| शिसें, तापवून निववलेलें | १७२७ |
| कथील, तार | ४१४८ |
| कथील, तापवून निववलेलें | १७०० |
| कॅडमियम, तार | ७०७० |
| सोनें, तार | ८१३१ |
| सोनें, तापवून निववलेलें | ५५८५ |
| रुपें, तार | ७३५७ |
| रुपें, तापवून निववलेलें | ७१४० |
| जस्त, शुद्ध | ९०२१ |
| जस्त साधें, तार | ८७३५ |
| पालाडियम, तार | ११७५९ |
| पालाडियम, तापवून निववलेलें | ९७०९ |
| तांबें, तार | १२४४९ |
| तांबें, तापवून निववलेलें | १०५१९ |
| प्लॅटिनम, तार | १७००४ |
| प्लॅटिनम, तापवून निववलेलें | १५५१८ |
| लोखंड, तार | २०८६९ |

| धातूचें नांव | स्थितिस्थापकता |
|---|---|
| लोखंड तापवून निववलेलें | २०७९४ |
| निकल तार | २३९५० |
| ॲल्युमिनम | ७२०० |
| ॲल्युमिनम ब्राँझ | १०७०० |
| पितळ | ८५४३ |
| जर्मन सिल्व्हर | १०७८८ |

वि शि ष्ट गु रु त्व.—हें .५९४ ( प्राव ) पासून २२·४८ ( ओस्म ) पर्यंत दिसून येतें, व बऱ्याच अंशीं उष्णमानावर आणि तीवर झालेल्या यांत्रिक व पदार्थवैज्ञानिक क्रियांवर अवलंबून असतें. धातूंच्या प्राणिदांतील प्राणवायु काढून टाकला असतां राहणाऱ्या चूर्ण स्थितींतील धातूचें विशिष्ट-गुरुत्व निराळें असतें व तोच धातु गोठवून नंतर काढलेलें विशिष्टगुरुत्व निराळेंच असतें.

उ ष्ण ते चे प रि णा म.—बहुतेक धातूंची विशिष्ट उष्णता काढलेली आहे. ह्या विशिष्ट उष्णतेबद्दल ड्युलाँग व पेरिट यांनीं एक ठोकळ नियम प्रसिद्ध केला आहे कीं, धातूंच्या परमाणूंची उष्णता ( आटोमिक हीट )६·४ असते. उष्णतेच्या योगानें धातूंची सरळ रेषेंत होणारी वाढ निरनिराळ्या धातूंत कमजास्त प्रमाणांत दिसते. ह्या वाढीचा गुणक नियमित रीतीनें स्फटिकीभवन होणाऱ्या धातूंच्या बाबतींत स्थिर असतो पण इतर धातू त्यांच्या स्फटिकांत असणाऱ्या निरनिराळ्या अक्षांच्या दिशांकडे निरनिराळ्या प्रमाणांत वाढतात.

द्र व क्ष म ता व बा ष्प भा वी प णा.—निरनिराळ्या धातूंच्या द्रवक्षमतेंत बराच फरक दिसून येतो. धातूंचा बाष्पभावीपणा खालीलप्रमाणें दिसून येतो. पाऱ्याचें ऊर्ध्वपातन रक्तोष्ण-तेच्या आधींच होतें. काद्म, अल्क-धातू, जशद, मग्न हे रक्तोष्णतेच्या सुमारास बाष्परूप पावतात. अंज, शिसें, बिस्मत, कथील, रजत हे धातू उघडया भांड्यांत तापवून द्रवरूप केले असतां लवकरच बाष्परूप पावतात. सोन्याचाहि धर्म जवळ जवळ वरीलप्रमाणेंच आहे व तांबें, लोखंड, निकेल, कोबाल्ट, स्फट, प्राव, भार, खांत व खट, हे बाष्प-रूप पावणें जवळ जवळ अशक्य आहे. प्राणोज्ज ज्योतीं-मध्यें रजत उकळून त्याची निळी वाफ होते. प्लातिन हळूहळू बाष्परूप पावतो व ओस्म जरी द्रवक्षम नसला तरी लवकरच बाष्परूप होतो.

वा ह क ता.—उष्णतावाहकता आणि विद्युद्वाहकता या निरनिराळ्या धातूंत निरनिराळ्या प्रमाणांत. दिसून येतात.

चुं ब की य गु ण ध र्म.—लोखंड, निकेल, कोबाल्ट ह्या धातूं-तून ह्या गुणधर्म दृष्टोत्पत्तीस येतो, पण पोलादाच्या तोडीस कोणीच येत नाहींत

रा सा य नि क फ र क.—धातू हे रासायनिक रीत्या धातूंशीं किंवा अधातूंशीं संयोग पावतात. आतां शुद्ध धातु अधातूंशीं संयोग पावला असतां काय फरक होतात तें पाहूं.

उज्जः—ह्या वायूः पलादासारख्या धातूशीं संयोग पावतो अथवा शोषला जातो व त्यापासून सारखेच रासायनिक संयुक्त पदार्थ तयार होतात.

प्राणः—धातूंशीं प्राण संयुक्त होऊन धातूंचीं प्राणिदें तयार होतात. कांहीं प्राणिदें मूळ धातूंशींच संयुक्त होऊन कांहीं बाबतींत चांगला व कांहीं बाबतींत वाईट परिणाम घडवून आणतात. पाऱ्याशीं त्याचें प्राणिद संयोग पावलें असतां तो सर्वसाधारण कार्यास निरुपयोगी होतो. पण तांब्याशीं त्याचें प्राणिद संयोग पावलें असतां त्यास जास्त चिकणपणा येऊन इतर धातूंच्या मिश्रणाच्या योगानें येणारा कमीपणा तें काढून टाकतें.

स्फुरः—स्फुर ह्या तांब्याशीं संयोग पावला असतां स्फुर-कांस्य तयार होतें आणि साध्या कांशापेक्षां याचें काठिंण्य व लवचिकपणा वगैरे जास्त असतात.

कर्बः—बहुतेक धातूंत कर्ब ते धातु द्रवरूप असतां संयोग पावतो आणि त्यांच्या गुणधर्मांवर वाईट परिणाम घडवून आणतो. पण लोखंडाच्या बाबतींत मात्र कर्बाच्या योगानें लवचिकपणा व चिकटपणा वाढतो व त्याचें पोलाद बनतें. आतां आपण सर्वसाधारण रासायनिक द्रव्यांच्या योगानें होणारा धातूवरील परिणाम पाहूं.

पाणीः—उष्ण पाण्याच्या योगानें किंवा हवा व पाणी यांच्या मिश्र परिणामानें बऱ्याच धातूंचीं उत्प्राणिदें तयार होतात. शुद्ध पारा किंवा राजधातू (नोबल मेटल्स) यांच्यावर पाण्याचे परिणाम क्वचितच दिसून येतात. जशद, लोखंड, काद्म वगैरे धातू अति तप्त करून त्यांवर पाण्याची वाफ सोडली असतां उज्ज वायु वेगळा होऊन धातूचें प्राणिद तयार होतें.

गंधकाम्ल किंवा हराम्लः—( १ ) सिंधु, पलाद, प्राव, खट, खात, भार, ( २ ) मग्न, जशद, मंगल वगैरे धातूंवर या अम्लांच्या क्रियेच्या योगानें उज्ज वायू बाहेर पडतो व धातूंचें गंधकिन किंवा हरिदें होतात. या प्रकारें होणारा परिणाम इतर बऱ्याच बाबतींत दिसून येतो. कांहीं ठिकाणीं ह्याच परिणाम उष्ण अम्लाच्या योगानें दिसून येतो. कांहीं बाबतींत उष्ण गंधकाम्लाच्या योगानें उज्जाच्या ऐवजीं गंधकद्विप्राणिद वायु वेगळा होतो.

नत्राम्लः—सुवर्ण, प्लातिन, ऐंद्र, ऱ्हद या धातूंशिवाय इतर सर्व धातूंवर याची क्रिया होऊन कथिल व अंज यांचीं शेवटीं उज्जितें मिळतात व इतर सर्व धातूंचीं नत्रितें मिळ-तात. लोखंड, जशद, काद्म, आणि कथिल हे धातू निर-निराळ्या परिस्थितीप्रमाणें या अम्लांचें नत्रसप्राणिद किंवा अम्रनत्रित यांमध्यें रूपांतर करतात. हराम्ल व नत्राम्ल हीं विवक्षित प्रमाणांत मिसळून त्यांची ( अक्वारेजिया ) क्रिया ऱ्हद, ऐंद्र, व ह्यथेनखेरोज कोणत्याहि धातूवर केली असतां हरिदें तयार होतात.

दाहक अल्कें:—द्रवदाहक अल्कामध्यें स्फट किंवा जसदा-सारखे कांहीं धातू विद्रुत होतात आणि सिंधु याचें स्फटित किंवा सिंधुजशदित बनतें व उज्ज वायु बाहेर पडतो. इतर बऱ्याच धातूंवर अल्कांची क्रिया थोडीफार होतेच. सुवर्ण, प्लातिन व रजत यांवर मात्र त्यांची क्रिया होत नाहीं म्हणून अल्कांशीं संबंध असणारे अतिशय अचूक रासायनिक प्रयोग करावयाचे झाल्यास ह्या धातूंचीं उपकरणें वापरतात.

प्राण किंवा हवा:—राजधातूंवर प्राणवायूचा परिणाम होत नाहीं. पण कदाचित तो वायू ते धातू द्रवस्थितींत असतांना अपशोषला जात असेल. पारा उकळण्याच्या बिंदूपर्यंत तापवून जर प्राणवायूजवळ नेला तर त्याचें तांबडें प्राणिद तयार होतें. बहुतेक सर्व धातू प्राणाच्या वातावरणांत किंवा हवेंत तापविले असतां प्राणवायूशीं संयोग पावतात.

गंधक:—सुवर्ण आणि स्फट हे गंधकासह तप्त केले असतां कांहींहि फरक होत नाहीं, पण इतर बहुतेक धातूंचीं गंधकिदें होतात. ताम्रामध्यें गंधकाबद्दल बरीच स्नेहाकर्षकता आहे.

हर:—हराच्या वातावरणामध्यें जर धातू तप्त केले तर त्यांचीं हरिदें बनतात. बहुमूल्यक धातूंच्या बाबतींत अल्प-मूल्यक हरिदें अगोदर बनून मग अधिकमूल्यक हरिदें बनतात. अधिकमूल्यक हरिदें तप्त केलीं असतां अल्प-मूल्यक हरिद आणि हर मिळतें. हरिदें हीं द्रव किंवा घन रूपांतहि आढळतात. कांहीं विशिष्ट हरिदांशिवाय बहुतेक हरिदें पाण्यामध्यें विद्राव्य आहेत.

**धातुकाम**—अर्वाचीन स्वतंत्र धातुकाम थोडें सांपडेल. जें आहे तें मागील कामाप्रमाणेंच किंवा त्याच्या आधारानें बनविलेलें असल्यानें प्रत्येक देशांतील धातुकामाचा इतिहास दिल्यानें या विषयाचा बोध होणार आहे. तेव्हां प्रथम पाश्चात्त्य देश घेऊन मग भारतीयाकडे वळूं.

ई जि प्त.—प्राचीन ईजिप्शियन लोक इतर कलेप्रमाणें धातुकामांत-विशेषतः ब्रॉन्झ धातुकामांत-तरबेज होते. या कलेंत ओतणें किंवा हातोड्यानें ठोकून जडावणें या क्रिया उपयोगांत आणीत. त्यानंतर आंतील भागास रुप्यासारख्या चकचकीत धातूचें पाणी देत व त्यावर पुन्हां मिनाकाम करीत. ईजिप्तपासूनच हिब्रू लोक ही कला शिकले असावेत. ज्यू लोकांनींहि त्यांच्याचपासून व शेजारच्या टीरा देशा-पासून ही उचलली असावी. सालोमनच्या सिंहासनाच्या सोन्याचे सिंह व बैलाच्या पाठीवरील ओतीव ब्रान्झचीं गंगा-ळासारखीं फुलपात्रें यांचीं वर्णनें वाचलीं म्हणजे या ओत-कामांत हे लोक किती पुढें गेले होते तें सहज समजतें.

अ सी रि या.—असीरियांत तर हें काम फार उत्तम होत असे. प्राचीन राष्ट्रांत असुर लोक या बाबतींत सर्वांच्या पुढें होते असें दिसतें. त्यांचीं हीं कामें प्रचंड व सुरेख असत. एकबतनसारख्या शहराच्या सवंध तटाला धातूच्या पत्र्यांचें आच्छादन असे; हे पत्रेहि जस्ताचें अथवा रुप्याचें पाणी पाजलेले असत. पुष्कळ शहरांचे असे पत्र्यानें मढविलेले तट होते. बाबिलोन व निनेव्हा येथें प्रचंड व पुष्कळ पुतळे होते असें हिरोडोटस, अथेनियस व इतर ग्रीक-रोमन इतिहास-कारांनीं वर्णन केलें आहे. सांप्रत युफ्रेटीस व तैग्रीस या नद्यांच्या आसपासच्या प्रदेशांत खणून असे बरेच लहानमोठे पुतळे उजेडांत आणले आहेत. ते पाहिले म्हणजे या असुरी कलेचें खरें स्वरूप ध्यानांत येतें. त्यांपैकीं कांहीं पुतळे तर त्यांच्यावरील लेखांवरून पहातां खि. पू. २२०० वर्षांपलीकडील आहेत; सारांश इतक्या प्राचीन काळीं असुर लोकांत ही कला इतक्या पूर्णावस्थेप्रत पोंचली होती.

ग्री स.—या देशांतील या कलेच्या प्राचीन इतिहासाबद्दल विद्वानांत व पुराणवस्तुसंशोधकांत बराच मतभेद आहे, व इतिहाससुद्धां त्रोटक आहे. एवढेंच नव्हे तर होमरकालीं लोखंड व ब्रॉन्झ यांचा परस्पर कसा उपयोग करीत हेंहि अद्यापि नक्की समजलेलें नाहीं. होमरच्या काव्यांत ब्रॉन्झ, सोनें व चांदी या धातुकामांच्या पदार्थांचीं भपकेदार वर्णनें येतात. काव्यांतील अतिशयोक्ति वगळली तरी हीं कामें साधारणपणें त्यावेळीं होत असत एवढें खास. स्पार्टा येथील अथेना देवतेचें ब्रॉन्झ देऊळ, अटेरीस व मिसेनी येथील धुकतीच खोदून काढलेली व ब्रान्झ पत्र्यानें मढविलेली खजि-न्याची कोठी हीं पाहिल्यास ग्रीक लोकांनां होमरकालीं व नंतरहि या धातुकामाची चांगली माहिती होती असें दिसतें. पुतळ्याच्या कामीं ग्रीक लोक प्रथम हातोड्यांचाच उपयोग करीत असत. पुढें ख्रिस्तपूर्व ६ व्या शतकांतील सामियन कारागीर थिओडोरस व ऱ्हीकस यांनींच पोकळ पुतळे ओत-ण्याची कला प्रथम प्रचारांत आणली असें ग्रीक लोक कबूल करतात. स्पार्टा येथें झियूस (द्युः)चा एक पुतळा हातो-ड्यानें ठोकलेल्या व एकमेकांशीं रिव्हेटनें जोडलेल्या पत्र्यांचा होता असें पौसानियसनें स्वतः पाहून लिहून ठेवलें आहे. ओतकामाची युक्ति निघाल्यानंतर फक्त वजनानें हलक्या व लहान आकाराच्या वस्तूंत हातोड्याच्या ठोककामाचा उपयोग करीत. तसेंच चांदीसोन्यासारख्या मौल्यवान धातूचा उपयोग करतांनाहि (ओतकामांत फार खर्च होई म्हणून) ठोककामाची रीत प्रचारांत होती. कांहीं पुतळ्यांत हस्तिदंताचाहि उपयोग करीत. अशावेळीं हस्तिदंत, सोनें, चांदी व ब्रॉन्झ यांची कोठें व किती योजना करावयाची हें मोठें चातुर्याचें काम असे. असल्या प्रकारचा एक पुतळा पार्थिनन येथें व दुसरा ऑलिम्पिया येथें आहे. प्राचीन ग्रीक ब्रॉन्झओतकामांत प्रख्यात म्हणजे हल्लीं कॉन्स्टान्टिनोपल येथील हिप्पोड्रोममधील एक ब्रॉन्झस्तंभ होय. खि. पू. ४७९ मध्यें ग्रीक लोकांनीं इराणी लोकांवर मिळविलेल्या विजयाचें स्मारक म्हणून हा स्तंभ ओतला आहे. त्याची आकृति म्हणजे तीन सर्पांनीं एकमेकांनां विळखा घातला आहे

असा असून तो २० फूट उंच, आंतून पोकळ, एकसंधी, सुंदर व प्रमाणबद्ध असा आहे. प्राचीन ग्रीक लोक संगमरवरी दगडांचा उपयोग फार थोडा करीत. धातूच्या पुतळ्यांचे ओंठ, डोळे व पोषाकाचे पदर यांनां सोनें रुपें व क्वचित रत्नें बापरीत. ग्रीक लोक आरसेहि ब्रान्झ धातूचे करीत. यांशिवाय तवकें, सुरया, पिण्याचीं साधीं व चांदी सोन्याचें पाणी दिलेलीं भांडीं हे लोक करीत; हीं ओतींव व घडींव दोन्हीं प्रकारचीं असत. ग्रीक लोकांपासून रोमन व त्यांच्यापासून बहुतेक यूरोपियन लोकांनीं ही कला उचलली.

इटली.—बायझांटियम ही राजधानी असतांना रोमन लोक या कलेंत शिरूं लागले. सहाव्यापासून आठव्या शतकापर्यंत रोमच्या सेंटपीटरच्या देवळांत सोन्यारुप्याच्या वस्तू येत. त्या फार अप्रतिम असत व त्यांतहि बायझांटियन कारागिरी दृग्गोचर होई; हीं कामें ११ व्या शतकापर्यंत चालू होतीं. यावेळचें (स. १०६६) एक दार अमल्फी येथील चर्चमध्यें अद्यापि शाबूत आहे. पुढें पुढें या वस्तूंत प्राण्यांचीं चित्रें व मिनाकाम यांचा प्रवेश होऊं लागला. मिलन येथील सेंट अंब्रोजियोमधील चांदीसोन्याची वेदि ही या धातूकामाचा इटालींतील फार जुना नमुना आहे (स. ८३५); तिच्यावर ख्रिस्ताची व सेंट अंब्रोजचीं चित्रें आहेत. तसेंच मिलन येथीलच एका मठांतील एक झुंबर पहाण्यासारखें आहे. तें सोन्याचें पाणी दिलेल्या ब्रॉन्झचें असून, त्याची उंची १४फूट आहे व त्याला ७फांद्या आहेत व चार गरुडांनीं तें आपल्या खांद्यावर उचललेलें आहे. त्याचें काम नाजुक असूनहि सफाईदार व भव्य दिसतें. त्यांत लहान लहान अनेक चित्रें कोरलेलीं आहेत. पुढें (१३ व १४ वें शतक) संगमरवरी पुतळे होऊं लागल्यावर धातूचा उपयोग पुतळ्यांकडे न होतां, खिडक्यांच्या जाळ्या, दारांचीं फाटकें व पूजेचीं लहान लहान उपकरणीं यांकडे होऊं लागला. खिडक्यांच्या जाळ्यांत पशुपक्ष्यांचीं चित्रें काढीत व निरनिराळ्या वेलपत्ती दाखवीत. असली प्रख्यात जाळी फ्लारेन्स येथील सांताक्रूसच्या मठांत असून ती सन १३७१ मधील आहे. फ्लारेन्स येथें ब्रॉन्झचें काम उत्कृष्ट होई; तसेंच लोखंडी कंदील, शामदानें वगैरें किरकोळ कामेंहि होत (१५ वें शतक). व्हेनिस येथील तबकें वगैरें धातुकामावर पौर्वात्य—विशेषतः अरबी—कारागिरीची झांक दिसते. गिओव्हन्नी, बेन्वेन्युटो, रिशी इत्यादि कारागीर या काळांत प्रसिद्धीस आले.

स्पेन.—या देशांत ब्रॉन्झ, लोखंड वगैरे धातूंचीं कामें तर होतच पण विशेष प्रख्यातीचे म्हणजे सोन्याचांदीचे जिन्नस, मिनाकाम व जडावाचें कामहि पूर्वीपासून (७ वें शतक) होई. डोक्यावरील मुगुट, चर्चमधील क्रॉस व इतर उपकरणीं व लहानशीं शामदानें वगैरे जिन्नस सोन्याचांदीचे करीत असत. पुढील म्हणजे १५ व १६ व्या शतकांतील कारागिरी मात्र इटली व जर्मनी येथील कामाची नक्कल होती. मॅड्रिड व पॅरिस येथें जुन्या, ७ व्या शतकांतील कांहीं जिन्नस ठेवले आहेत.

इंग्लंड.—सॅक्सनकालीं या देशांत देवळाच्या उपयोगी पडणाऱ्या बहुमोलाच्या जिनसा चांगल्या तयार करीत.कँटरबरीचा आर्चबिशप डन्स्टन (९२५-९८८) व बर्नवर्ड आणि सेंट एलोई इत्यादि मठपतीसुद्धां चांगले कारागीर होते. एडवर्ड दि कनफेसरच्या अस्थी ज्या सोन्याच्या करंडकांत ठेवल्या (स. १२४१) तो फार उत्कृष्ट कारागिरीचा होता; व ज्या सोनारानें तो तयार केला त्याचें (ओथो) घराणें पिढिजाद या कारागिरीसाठीं प्रसिद्ध होतें. पुढें तेराव्या शतकांत लोखंडीकाम उत्तम होत असे; दारांनां लावावयाच्या बिजागिऱ्या या वस्तूंत मुख्य असत. ऑक्सफर्डच्या मर्टन कॉलेजच्या इमारतींत १४ व्या शतकांतील बिजागऱ्या अद्यापि पहावयास सांपडतात. यावेळीं लोखंडी खोदींव व कोरींव जाळ्याहि उत्तम होत असत. वेस्टमिन्स्टरमध्यें पांचव्या हेनरीच्या थडग्याजवळची जाळी या सुमारचीच आहे. लोखंडी पत्र्याचीं व घडींव कामें १८ व्या शतकांत ख्रिस्तोफर रेनच्या देखरेखीखालीं बरींच होऊं लागलीं. फाटकांत निरनिराळ्या वेली व त्यांचीं पानें फुलेंसुद्धां तयार करून बसविण्यांत येऊं लागलीं; हॅम्प्टन कोर्टचें फाटक याचा एक सुंदर नमुना आहे. पितळी व ब्रॉन्झ धातूंचीं उपकरणें व वस्तू या १६ व्या शतकाच्या पूर्वीपासून तयार होत; मात्र इटलींतील वस्तूंसारख्या त्या नाजुक नसत. शिसेंहि बारीकसारीक कामांत उपयोगांत आणीत.

जर्मनी.—या देशांत १०व ११ व्या शतकांत ब्रॉन्झचीं मोठमोठीं कामें तयार होत; त्यांत मुख्यत्वें देवळाचे दरवाजे असत. ते बायझन्टाईनकालीन इटलींतील मोठमोठ्या व नक्षीदार दरवाजांच्या तोडीचे असत. हिल्डेशीमचा बिशप बर्नवर्ड (९९२-१०२२) हा या कामांत तरबेज होता, त्यानें रोमला जाऊन तेथील या वस्तू पाहिल्या होत्या. इटालियन दारें,खांब, जाळ्या इत्यादि वस्तूंची नक्कल या व पुढील शतकांत जर्मनींत व्हावयास लागली. मर्सबर्ग येथील रुडॉल्फचें (स. १०८०) खास थडगेंच ब्रॉन्झचें असून त्यावेळच्या कारागिराचा उत्कृष्ट नमुना आहे.पुढें ऑग्सबर्ग व नुरेम्बर्ग येथें हीं निरनिराळ्या धातूंचीं कलाकुसरचीं कामें मोठ्या प्रमाणावर व्हावयास लागलीं.इन्सब्रुक येथील मॅक्झांमिलियन (पहिला) याचें थडगें व जवळचे पुतळे हे १६ व्या शतकांतील जर्मन कारागिरीचे उत्कृष्ट नमुने म्हणून प्रख्यात आहेत. लोखंडी जाळीदार वस्तू तर जर्मनींत १५ व्या शतकांत उत्तमच होत असत; तीं बहुधा देवळांतील उपकरणेंच असत.

फ्रान्स.—रोमन लोकांच्या कालापासून लिमोगेस हें गांव सर्व प्रकारच्या धातुकामाबद्दल व पितळेवरील मिनाकामाबद्दल प्रख्यात होतें.थडग्यावर बसविण्यांत येणारे तांब्याचे व ब्रॉन्झचे

मोठमोठे पुतळे-त्यांपैकीं कांहींवर मिनाकाम केलेलें असे-१३ व १४ व्या शतकांत या देशांत फार होत असत. यांपैकीं बरेचसे पुतळे इंग्लंडमध्यें नेले होते, त्यांतलि एक सांप्रत वेस्ट मिन्स्टरमध्यें पहावयास सांपडतो. लोखंडी दरवाज्यावरील नक्षी व निरनिराळ्या प्रकारचे नमुने यांत यूरोपांतील इतर कारागिरांपेक्षां फ्रेंच कारागीर फार पुढें गेलेले होते. त्याप्रमाणेंच शिशाच्या ओतकामांतहि त्यांचा हात धरणारा कोणी नसे.

इ रा ण.—पूर्वेकडे पितळ व पोलाद यांच्या वस्तू १३ व्या शतकाच्याहि आधींपासून उत्तम प्रकारच्या करीत असत असें थिओफिलस म्हणतो. इराणांत पहिल्या शहाअब्बासच्या वेळीं ( सन १६२८ ) हें काम उत्कृष्ट होई. पितळेच्या जाळीदार व नक्षीदार नाजुक वस्तूंवर मिनाकाम करीत, त्यांत वेली, फुलें वगैरे कोरून त्यांमध्यें सोनें, चांदी भरीत. हें काम दमास्कस येथें फार होई आणि त्यावरूनच यूरोपांत अशा कारागिराला दमास्कीनिंग असें नांव पडलें होतें. कोरलेल्या भागांत सोन्याचांदीच्या तारा काढून त्या बसवीत असत व मग वरील भाग साफसूफ करून त्याला झिलई देत. इटालींत पुढें पुढें या कामाची नक्कल होऊं लागली; चिलखतें व शस्त्रें या वस्तूंत ही कला विशेषतः उपयोगांत आणीत. दमास्कस येथेंहि हत्यारें तयार होत. टिंबीअसला इराणच्या बादशहानें पोलादी तरवारी नजर केल्याचें आढळतें.

भा र ती य.—धातूंवर कुसरीचें काम करण्यासंबंधीं भारतीयांचें ज्ञान फार व्यापक व जुनें आहे. अशोकाच्या वेळीं दगडाची उत्कृष्ट कामगिरी होई; तीसाठीं पोलादी हत्यारें अवश्य लागतात, यावरून त्या काळीं ( ख्रिस्त पूर्व २५०) तीं अतिस्त्वांत असलीं पाहिजेत. पेरिप्लसमध्यें ( ८०–९० ) असें म्हटलें आहे कीं, हिंदुस्थानांतून तरवारी अरबस्तान व आफ्रिकेंत जात; अरबी कवी या तरवारींची फार वाखाणणी करीत.

दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या वेळचा दिल्ली येथील प्रसिद्ध लोहस्तंभ हा इसवी सनाच्या पांचव्या शतकांत हिंदूंनां लोखंडाचे मोठमोठे पदार्थ घडवितां येत होते हें दर्शवितो. इ. स. च्या एकोणिसाव्या शतकापर्यंत पाश्चात्यांनां देखील अशीं कामें कारितां येत नव्हतीं. हा स्तंभ जरी हवेंत उघड्यावर आहे तरी तो कधींहि गंजलेला पाहण्यांत आला नाहीं.धार येथील 'गंग तेल्याची लाट' नांवाचा स्तंभ ( ११ वें शतक ) याहिपेक्षां मोठा आहे. त्याच्या एका तुकड्याचीच लांबी ४२ फुटांहून जास्त आहे. कर्णक येथील तेराव्या शतकांतील मोठाल्या लोखंडी तुळया या लहान लहान गज एकत्र सांधून केलेल्या असल्यामुळें वरील स्तंभापेक्षां कमी दर्जाच्या आहेत. आणखी एक महत्त्वाचें उदाहरण म्हणजे नरवर येथील २४ फुटांची घडीव लोखंडाची तोफ हें होय. अति प्राचीन काळीं लोखंडी काम होत होतें एवढेंच नव्हे तर पोलाद करण्याचीहि कला हिंदुस्थानांत त्या काळीं अस्तित्वांत होती. पोलाद हैद्राबाद संस्थानांत तयार करीत असत. ग्रीक लोकांनां आणि इराण्यांनां हिंदु पोलाद माहीत होतें. कदाचित ईजिप्शियनांनांहि तें माहीत असावें. दमास्कसचीं प्रसिद्ध हत्यारें याच पोलादाचीं करीत होते असें वाटतें. अजून देखील हिंदुस्थानांत आणि सिंहलद्वीपांत या धंद्याचा थोडासा अवशेष उरला आहे. मातीच्या मुशींत सुमारें बारा औंस लोखंड आणि लांकडांच्या ढलप्या घालून त्या भट्टींत तापवून त्यांतील पदार्थ वितळवीत व त्यांच्या लहान लहान पोलादी कांबी बनवून त्यांपासून हत्यारें बनविण्यासाठीं त्या लोहारांकडे देत असत. पोलादावर नक्षी करण्याची कला तंजावरमध्यें व दक्षिण हिंदुस्थानच्या इतर कांहीं भागांत अगदीं कळसास पोंचली होती. पण त्या ठिकाणीं हल्लीं कांहीं दिसत नाहीं. राजपुतान्यांत मात्र ती अद्याप जीव धरून आहे. तंजावर-कलेचे उत्कृष्ट नमुने मद्रास येथील पदार्थसंग्रहालयांत पहावयास मिळतात. उदाहरणार्थ, एट्टयपुरम् येथील राजाच्या हत्तीचा अंकुश. याशिवाय बहुतेक रजपूत राजवाड्यांतून कोरीव नक्षीकाम केलेल्या हत्यारांचा सुंदर समूह सांपडतो.

हिंदु लोक घरांत व धर्मसंस्काराकरितां जीं केवळ पितळेचीं किंवा तांब्याचीं भांडीं वापरतात तीं व्यावहारिक व सौंदर्यशास्त्रदृष्ट्या फार महत्त्वाचीं आहेत. अकराव्या शतकापूर्वी पितळ उपयोगांत असल्याचें दिसून येत नाहीं. त्या काळापूर्वी सर्व भांडीं पंचलोह ( ब्राँझ ) किंवा तांबें यांचीं करीत. महानिर्वाणतंत्रांतलि एका उताऱ्यावरून असें दिसून येतें कीं प्राचीनकाळीं धर्मसंस्कारांत उपयोजिलीं जाणारीं भांडीं धार्मिकभावनेनें तयार करीत असत. उदा. "घटाला कलश म्हणतात. कारण प्रत्येक देवतेच्या भिन्न भिन्न भागापासून तो विश्वकर्म्यानें घडविला. त्याची सर्वांत जास्ती रुंदी छत्तीस अंगुलें आणि उंची सोळा अंगुलें असावी. गळा चार अंगुलें रुंद, तोंड सहा आणि बूड पांच अंगुलें असावें. कलश घडवितांना हा नियम लावावा, त्याला छिद्र असतां कामा नये. त्याच्या घडणींत सर्व कंजूषपणा टाळावा. कारण देवांनां प्रसन्न करण्यासाठीं तो तयार केला असतो." अशी कलशासंबंधीं माहिती दिली आहे.

देवालयांतील दीप अनेक प्रकारचे असतात. विशिष्ट दीप म्हणजे फांद्या फुटलेल्या झाडाच्या आकाराचे उभे दिवे; त्यांच्या प्रत्येक फांदीच्या शेवटीं तेलवातीकरितां एक लहान वाटी असते. इतर दीप ( समया ) साधे, उभ्या बैठकीचे असून त्यांच्या वरच्या बाजूस अनेक वाती घालण्याकरितां एक उथळ वाडें असतें. पुष्कळ वेळां मधील दांड्याच्या शेवटीं ( वाड्याच्या वर ) हंस किंवा मोर यांसारखा एखादा पक्षी करून बसविलेला असतो. अशा तऱ्हेच्या समया सांखळीनें देखील टांगलेल्या असतात. त्यांवर सुद्धां सुंदर नक्षीकाम असतें. सिंहलद्वीपांतील बौद्ध देवळांतील दीप पोकळ असून त्यांत तेल असतें. तें, वाडें रिकामें झालें म्हणजे

आंत येऊन पडतें. कांहीं कांहीं दीप पक्ष्यांच्या आकाराचे असतात. सर्वांत जास्त वैचित्र्य नेपाळमधील दिव्यांत आढळेल. दुसरा एक नेहमीं पाहण्यांतला दिव्याचा नमुना म्हणजे तेलवातीकरितां एक उथळ वाडगें हातांत घेऊन उभी असलेली स्त्रीमूर्ति होय. इष्णकारतीचा एक सुंदर नमुना म्हणजे अनेक पाकळयांचें उघडतें-मिटतें कमळ करून त्याच्या मध्यभागीं कापूर जाळण्याकरितां एक वाटी ठेवितात. वज्रतारेची मूर्ति अशाच कमळांत बसविलेली असते. विधींतील चमच्यांचेहि अनेक आकार असतात. हिंदू स्वयंपाकगृहांतील भांडीं पितळेचीं असतात. ती दररोज घांसून पुसून आरशासारखीं स्वच्छ ठेवतात. सर्वांत महत्त्वाचीं पितळेचीं भांडीं म्हणजे पाणी पिण्याचे लहान मोठे लोटे किंवा तांबे होत. त्याचप्रमाणें दुधाचे अपकारे, पातेल्या, ताटें, परातीं, वगैरे होत. गंगेचें पाणी भरून ठेवण्याकरितां मुद्दाम केलेल्या सुरया फार सुंदर असतात.

सोन्याचीं ताटें अतिशय श्रीमंत लोकच वापरतात. पण साधारण सुखी लोकांच्या घरींहि चांदीचीं ताटें आढळतात. मुलांनां दूध पाजण्याकरितां केलेली झारी चांदी, तांबें, किंवा पितळ ह्या धातूची असून, प्राचीन कालापासून धार्मिक विधींतहि उदक सोडण्याकरितां व तोंडाला भांडें न लावतां पाणी पिण्याकरितां झारीचाच उपयोग करण्यांत येतो. रोज राखेनें अथवा मातीनें भांडीं घांसण्याची पद्धत आपल्याकडे असल्यानें भांड्यावरील नक्षी उठावदार उपयोगाची नाहीं. म्हणून अशा भांड्यांनां खोल किंवा सपाट नक्षी करण्यांत येते. लांब लांब दांतांच्या धातूच्या फण्या केस विंचरण्यासाठीं किंवा केसांत फुलें खोंचण्यासाठीं कांहीं ठिकाणीं उपयोगांत असलेल्या दृष्टीस पडतात. चांदीचीं किंवा पितळेचीं तबकेंहि चांगलीं नक्षीदार असतात. प्राचीन सीगिरि चित्रांत अप्सरामागून हातांत फुलांचीं तबकें घेऊन जात असलेल्या दासी दाखविल्या आहेत.

काशें आणि पितळ ह्या धातूंवरील कलाकुसरीचीं कामें अद्यापपावेतों नेपाळांत चांगलीं होतात. येथील परंपरा अजून कायम आहे. वज्र हें उपासनेंतील एक आयुध असून त्यावरील नक्षीकाम पाहण्यासारखें असतें. तांब्यापितळेच्या पेट्या उठावदार व खोदीव नक्षीच्या तेथें पाहण्यास सांपडतात. याखेरीज इतर पुष्कळ असाधारण प्रतीचीं सुबक उठावदार कामें नेपाळांत होतात.

सिंहलद्वीपांतील धातुकाम विशिष्ट प्रकारचें व अत्युत्कृष्ट असतें. मोठमोठ्या देवळांतून सोन्याचांदीचीं कांहीं सुंदर भांडीं तेथें आढळतात. सुऱ्यांचीं म्यानें आणि बंदुकीची दारू ठेवण्याचे शिंगाडे यांवर चांदीचें नक्षीकाम असतें. वाजविण्याच्या शंखाला सुद्धां पितळी टोपण असून त्यावर तांब्याचांदीची नक्षी केलेली आढळते. "नारळाच्या फुलांची" व "मिरीच्या मंजरीची" माळ व देवळाच्या दरवाजावरील नक्षीदार लोखंडीकाम हीं पहाण्यासारखीं असतात. प्रत्येक ठिकाणीं दिसणारे कण्डयन विहार अठराव्या शतकांतील कीर्तिश्री राजसिंह ह्याच्या अत्यंत उदार आश्रयाचीं साक्ष देतात.

फक्त जुन्या गुप्तराजांच्या वेळच्या नाण्यांतच खऱ्या हिंदु कामगिरीचा गुण दिसून येतो; अलीकडील मुसुलमानी नाण्यांवरील नक्षीदार ठसे तारीफ करण्यासारखे आहेत तरी त्यांची तऱ्हा याहून अगदीं निराळी आहे. अत्युत्तम तऱ्हेचीं पितळेचीं खेळणीं राजपुतान्यांत होतात. चाकें लावलेले घोडे, वर मेघडंबरी बसविलेल्या देशी पद्धतीच्या गाड्या, आणि हत्ती, हे आवडीचे नमुने होत. विजगापट्टममध्यें बनविलेले घोडे आणि त्यांवरील स्वार विचित्र दिसतात. हल्लीं सिंहलद्वीपांत बनणारीं हुबेहूब दिसणारीं पितळी जनावरें वगैरेंचा मोठा व्यापार आहे. जुन्या पितळी खेळण्यांपैकीं बरींचशीं खेळणीं, त्याचप्रमाणें दीप वगैरे दुसऱ्या वस्तु, हिणकस धातूचें ओबडधोबड व जड असें जवाहीर, हीं फिरकीच्या मळसूत्री घाटानें सुशोभित केलेलीं असतात. हें मळसूत्री घाट मूळच्या मेणाच्या साच्यावर तयार करतात.

याच पद्धतीचें ओतकामाचें दुसरें उदाहरण, अखंड व लवणाऱ्या अशा जुन्या रजपूत ( बुंदी )ओतीव सांखळयांत दिसून येतें. थामस वार्डल् ह्या सांखळयाविषयीं पुढील उद्‌गार काढतो. "ही पंचरशी धातूची असून ती एकाच साच्यांतून ओततात. ती इतक्या आश्चर्यकारक रीतीनें बनवितात कीं, अशी सांखळी यूरोपांत कोणी करूं शकेलसें मला वाटत नाहीं." मेण, राळ आणि तेल यांच्या मिश्रणाची एक दोरी तयार करतात. तयार करावयाच्या सांखळीच्या जाडीची काटकी घेऊन तिच्याभोंवतीं ही दोरी अंतर सोडून मळसूत्राप्रमाणें गुंडाळावयाची. नंतर त्या काटकीवरच असतांना तें मळसूत्र एका सरळ रेषेंत तोडावयाचें; ह्मणजे सांखळीच्या निरनिराळ्या कड्या सुटतात. अशा कड्या एकमेकींत अडकवून त्यांचीं तोंडें तापविलेल्या सुरीच्या धारेनें जोडलीं जातात. जेव्हां अशा साठपासून सत्तरपर्यंत कड्या जोडल्या जातात तेव्हां सांखळीचीं दोन टोंकें एकमेकांत अडवून जोडलीं जातात. मग ही सांखळी हळू हळू चपटी करणयांत येते; आणि ती हातानें अशी बनवितात कीं, भावी सांखळीचा पूर्णपणें लवणारा असा नमुना तयार होतो. हा नमुना नंतर शेणमातीच्या तयार केलेल्या खळींत कित्येक वेळां बुडवून त्यावर पुरा लेप बसला ह्मणजे त्यावर मातीचा आणखी जाड लेप देण्यांत येतो. हे सर्व लेप वाळल्यावर सांचाची वरील कड अशा रीतीनें घांसावयाची कीं प्रत्येक कडीचा पृष्ठभाग उघडा व्हावा. यावर एक मेणाची कडी बसवावयाची व तीवरहि मातीचा लेप द्यावयाचा. असाच दुसरा एक नमुना तयार करावयाचा व हे दोन एकमेकांजवळ एका काळ्या व चिकणमातीच्या बळकट वेष्टणांत झांकावयाचे. मग वर बसविलेल्या मेणाच्या

कांड्यांची टोकें सांचाच्या पृष्ठभागीं असलेल्या एका पेलेवजा पोकळींत आणावयाचीं. ही पोकळी धातु आणि थोडा टांकणखार यांनीं भरावयाची आणि वर लुकण बसवून त्यावर चिकणमाती थापावयाची. मध्यें फुंकण्यासाठीं एक छिद्र ठेवावयाचें. जेव्हां या सांचास भट्टींत घालून आंच देतात तेव्हां मेण वितळतें आणि त्याच्या जागीं धातूचा रस येऊन बसतो. नंतर निवल्यावर तो सांचा फोडतात तेव्हां इच्छित सांखळी बाहेर पडते. मग तिच्यावर असलेला खडबडीतपणा कानसून काढतात तेव्हां सांखळी उपयोगांत आणण्यास योग्य होते.

सर्व हिंदुस्थानभर ही जुनी ओतकामाची पद्धत अगदीं अशिक्षित अशा कारागिरांकडून अत्यंत कौशल्यानें आणि दक्षतेनें अनुसरली जाते. पंचरशी धातूच्या, तांब्याच्या आणि पितळेच्या मूर्ती ओतण्याची पद्धति अगदीं अशीच असून हें फारच नाजुक आणि क्लिष्ट काम असून देखील येथें केलें जातें. धातूच्या उत्तम उत्तम मूर्तींपैकीं बऱ्याचशा तांब्याच्या असतात आणि फारच थोड्या पंचरशी धातूच्या असतात.हिंदी धातुकामाच्या प्रत्येक शाखेंत अजूनहि कुसरी कामाचा संग्रह व निरनिराळ्या कृतींची उपयुक्त माहिती इतकी आहे कीं, तिच्यापासून अगदीं अनुभविक अशा आधुनिक कारागिरांनां व ओतकाम करणाऱ्यांनां देखील पुष्कळ शिकण्यासारखें आहे. हल्लीं बाजारांत दिसणाऱ्या व सर्वत्र उपयोगांत आणल्या जाणाऱ्या पितळेच्या पत्र्यापेक्षां हिंदी पितळ केव्हांहि सरसच आहे. भपकेदार पिवळ्या रंगांची हल्लींचीं काशीचीं पितळी भांडीं स्वस्त व बेगडी कुशलतेचीं असतात. परंतु जुन्या पितळेविषयीं बोलावयाचें तर तें क्वचितच सोन्यापेक्षां कमी सुंदर असतें. ' जडावाचें काम ' पहा. [ कुमारस्वामी—आर्टस् अॅन्ड क्रॅफ्टस् ].

**धातुविद्या**—या शब्दाचा उपयोग अशोधित धातूपासून शुद्ध धातु काढण्याची क्रिया दाखविण्याकडे केला जातो. विद्युत्च्या योगानेंहि कांहीं धातू वेगळे करतात पण त्या बाबतींत विद्युद्धातुविद्या हा शब्द योजतात. खालील कोष्टकांत कांहीं महत्त्वाचे धातू अशोधित स्थितींत ज्या स्वरूपांत सांपडतात तीं दिलीं आहेत.

धातूंचीं अशोधित स्वरूपें

| धातूचें नांव | कच्च्या धातूचें स्वरूप. |
|---|---|
| लोखंड | प्राणिद, गंधकिद. |
| ताम्र | मिश्र गंधकिदें, प्राणिदें, धातु. |
| रजत | गंधकिद, धातु, हरिद. |
| सुवर्ण | शुद्ध धातु. |
| शिसें | गंधकिद आणि अनाम्लिककर्बित गंधकिद वगैरे. |
| जशद | गंधकिद, प्राणिद, कर्बित, उज्जिव. |
| कथील | प्राणिद. |
| पारा | गंधकिद धातु. |
| अंज | गंधकिद. |
| बिस्मत | धातु. |
| निकल, कोबाल्ट | तालिदें. |
| प्लातिन वगैरे | धातु. |

यांपैकीं लोहगंधकिद, रजतहरिद व शीसगंधकिद हीं फारशीं महत्त्वाचीं नाहींत.

धा तु घ ट ना सं शो ध न.—सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें धातूंच्या घटनेसंबंधीं अर्वाचीन कालांत बरीच माहिती उपलब्ध झाली आहे. ज्या धातूची किंवा मिश्रधातूची घटना शोधावयाची असेल त्याच्या शुद्ध नमुन्याची १/४ इंच जाड व १ चौरस इंच क्षेत्र व्यापणारी पातळ चकती घेऊन ती बारीक कुरुंदाचा चूर लावलेल्या कागदानें बरीच घांसतात. पण ह्या घांसण्याच्या योगानें पत्र्यावर आरशासारखा पातळ पापुद्रा येतो व त्याच्या योगानें पत्र्यावरील अपूर्ण घर्षणाच्या योगानें राहिलेल्या खांचा दिसत नाहींत आणि नमुना बिघडतो. तेव्हां हा पापुद्रा शक्य तितका पातळ करण्याची खबरदारी घेतात. हा पापुद्रा कांहीं योग्य द्रव रासायनिक द्रव्यांच्या योगानें ताबडतोब घालवून पत्र्याचा मूळ पृष्ठभाग दृष्टोत्पत्तीस आणतां येतो. या पृष्ठभागावर छेदक रासायनिक द्रव्यें विद्युत् किंवा सेंद्रिय द्रव्य यांच्या क्रियेनें आपणास पाहिजे त्या तऱ्हेचा नमुना तयार करवून घेतां येतो. अशा रीतीनें तयार केलेल्या नमुन्याचें सूक्ष्मदर्शक यंत्र व प्रकाशलेखन यंत्र यांच्या साहाय्यानें छायाचित्र घेतात. या छायाचित्रावरून धातूच्या किंवा मिश्रधातूच्या घटनेसंबंधीं बराच बोध होतो.

धा तु शु द्ध क र ण्या च्या स र्व सा धा र ण री ती.—कधीं कधीं धातु त्याच्या मूळ स्वरूपांत सांपडून त्याच्याबरोबर असलेलीं खनिजगर्भित द्रव्यें हातांनीं किंवा हातोडीनें काढतां येतात; पुष्कळसे धातु खाणीबाहेर काढल्याबरोबर खनिजगर्भित द्रव्यें यांनीं मिश्रित असतात म्हणून कच्च्या धातूपासून शुद्ध धातु काढण्यापूर्वी कच्चा धातु शुद्ध करून घ्यावा लागतो. तो शुद्ध करण्याकरितां प्रथमतः त्याचें दळून अति सूक्ष्म चूर्ण करतात म्हणजे तो माती वगैरेंच्यापासून वेगळा होतो व नंतर तें चूर्ण धुतात. पुष्कळ कच्चे धातू रासायनिक संयुक्त पदार्थ असल्यामुळें त्यांपासून रासायनिक क्रियेशिवाय शुद्ध धातू काढतां येत नाहींत. त्यांपैकीं कांहीं क्रिया खालीं दिल्या आहेत.

**अग्निक्रियाः**—प्रथमतः कच्ची धातु घेऊन तींत संमिश्रक द्रव्य मिसळतात व नंतर त्या मिश्रणास विस्तवाची आंच देतात. ह्या आंचीच्या योगानें रासायनिक व पदार्थवैज्ञानिक असे दोन्हीहि फरक घडतात. या भट्याहि अशाच तऱ्हेनें बनविलेल्या असतात कीं, त्यांतील उष्णतेचा व त्यांत उत्पन्न

१५ वें शतकांतील तांब्याचे ख्रिस्ती देवळांतील एक नैवेद्यपात्र.



हँप्टनकोर्टच्या फाटकाचें एक दार.



गुलाबदाणी.



१५ वे शतकांतील लोखंडी पत्र्याचें भिंतीला लावण्याचें शामदान.



अत्तरदाणी.



# नाट्य

कर्कमुखहस्त (नीलकमलयुक्त)



अग्निज्वालायुक्त अर्धचंद्र हस्त.



पताकहस्त.



कर्तरीमुख.



पद्मकोषहस्त.



मुष्टिहस्त.



उद्वेष्टिततालपद्म.





भ्रमरहस्त.



शुकतुंडहस्त.



शिखरहस्त.



अर्धचंद्रहस्त.



होणाऱ्या वायूंचा आपणांस पाहिजे तसा उपयोग करून घेतां येतो. कांहीं बाबतींत कच्च्या धातूंतील कांहीं कांहीं पदार्थांचे पूर्णपणें जाळून भस्म करावयाचें असतें त्यावेळीं न जळालेल्या प्राणवायूची गरज असते. अशा वेळीं भट्टींत वायूचा प्रवाह चालू ठेवतात. अगर जेव्हां कच्चा धातु प्राणवायुरहित करावयाचा असतो तेव्हां भट्टींतून वाहणाऱ्या वाऱ्याचा प्रवाह बंद करतात. धातु भट्टींतल्याच जळणाऱ्या वायूमध्यें तप्त केला गेल्यानें आपणास पाहिजे तसा परिणाम घडवून आणतां येतो. धातुविद्येंतील बहुतेक रासायनिक क्रियांचा या दुसऱ्या प्रकारांत समावेश होतो, व ज्वालेमध्यें न मिळणारीं द्रव्यें वापरून शुद्ध करण्याची क्रिया क्वचितच करावी लागते.

पारदमिश्रणः—कच्च्या धातूचें पाऱ्याशीं मिश्रण करतात. हें मिश्रण शुद्ध करून त्याचें ऊर्ध्वपातन केलें असतां पारा उडून जातो व शुद्ध धातु खालीं रहातो.

आर्द्रप्रक्रियाः—ह्या क्रियेमध्यें प्रथमतः कच्चा धातु भाजून त्याचा एखाद्या क्षाराशीं किंवा अम्लाशीं संयोग करून त्या संयोगावर किंवा कांहीं बाबतींत खुद्द कच्च्या धातूवर सुद्धां एखाद्या योग्य रासायनिक द्रव्याची क्रिया करून शुद्ध धातु कच्च्या धातूपासून वेगळा करतात.

रासायनिक क्रियाः—पारदमिश्रणक्रिया अथवा आर्द्रक्रिया ह्या दोन्ही सोनें, तांबें, रजत वगैरेसारख्या धातूंनांच उपयुक्त आहेत. पण तिम्म रासायनिक क्रियांचा बऱ्याच ठिकाणीं उपयोग होत असल्यानें आपण त्यांचा विचार करूं. कोणती रासायनिक क्रिया करावयाची हें मूळ धातु ज्या अधातूशीं संयुक्त झाला असेल त्यावरून ठरवावयाचें असतें.

प्राणिद, उज्जित, कर्बित व सिक्तिः—ह्या स्वरूपांत खाणींतून बाहेर निघालेला कच्चा धातु प्रथमः भाजतात. म्हणजे त्यापासून कर्बद्विप्राणिद व पाणी वेगळें होऊन कांहीं गंधक, ताल आणि सेंद्रिय द्रव्यें हीं भस्म होतात, व धातूचें अशुद्ध प्राणिद मिळतें. हें प्राणिद जळाऊ पदार्थांच्या योगानें बरेंच तापविलें असतां प्राणवायुरहित होऊन मूळ धातु मिळतो. जर कच्चा धातु सिक्ति असेल तर तो तापवीत असतांच सिक्त वेगळें करून प्राणिद मिळविण्याकरितां त्यांत चुना मिसळतात. लोह, कथिल, ताम्र, शिसें आणि जशद हे धातू अशा रीतीनें काढतात. जशदाच्या बाबतींत प्राणरहित करण्याकरतां त्याच्या उकळण्याच्या बिंदूच्या उष्णमानाहून जास्त उष्णमान लागतें म्हणून त्याचा कच्चा धातु प्राणवायुरहित करणाऱ्या द्रव्याशीं मिश्रित करून तें मिश्रण शीतक असलेल्या बकपात्रांत किंवा मेघडंबरीपात्रांत तापवितात. बाकीचे बहुतेक धातु वाऱ्याच्या झोतावर चालणाऱ्या भट्टींतील विस्तवांतच प्राणवायुरहित करतात. या भट्टींत कोळशाचे व कच्च्या धातूचे एकावर एक असे थर रचून त्यांस खालून अग्नि देतात. नंतर कोळशामधील कर्ब आणि वाऱ्याच्या झोताबरोबर येणाऱ्या वायूमधील प्राण यांच्या संयोगानें झालेल्या कर्बैकप्राणिदाच्या योगानें धातूचें प्राणिद प्राणवायुरहित होऊन धातुरूप होतें व हें द्रवरूप स्थितींत असल्याकारणानें मळीसह भट्टीच्या खालील भागांत सांचतें. या ठिकाणीं असलेल्या छिद्रांच्या गुड्या ( बुचें ) काढल्या असतां मळीसह धातु आपणांस काढून घेतां येतो.

गंधकिदेंः—लोह, ताम्र, शिसें, जशद, पारा, रजत, अंज ह्या धातू या स्वरूपांत सांपडतात. गंधकिदांचे दोन विभाग करतातः—( १ ) साधीं गंधकिदें व ( २ ) संकीर्ण गंधकिदें. पहिल्या वर्गांत जशदगंधकिद, लोहगंधकिद, पारदगंधकिद वगैरे गंधकिदें येतात आणि दुसऱ्या वर्गांत निरनिराळ्या धातूंचीं संयुक्त गंधकिदें येतात;जसें बोर्नोनाइट, शिसें, अंज आणि ताम्र यांचें संकीर्ण गंधकिद.

गंधकिद प्रथमतः ज्वालापरावर्तक भट्टींत ( रेव्हर्बेटरी फरनेस ) प्राणवायुमिश्रित करण्याकरितां भाजून काढतात. या भाजण्याच्या योगानें तालाचा कांहीं भाग आणि गंधकाचा कांहीं भाग जळला जातो. आतां निरनिराळ्या गंधकिदांवर भाजण्याचे काय काय परिणाम होतात हें पाहूं.

( १ ) रजतगंधकिद व पारदगंधकिदें भाजलीं असतां गंधक–द्विप्राणिद वेगळा होऊन रजत किंवा पारा मिळतो. रजताच्या बाबतींत रजतगंधकितहि मिळतें. पारा या परिस्थितींत वायुरूप होतो तेव्हां मंद उष्णमान असल्यास त्यास शीतकाच्या योगानें द्रवरूप करतात.

( २ ) जशद व लोह यांचीं गंधकिदें तापविलीं असतां जशदप्राणिद व लोहप्राणिद मिळतात. जशदाच्या बाबतींत प्रथमतः अनाम्ल गंधकित बनतें. हीं प्राणिदें कर्बाच्या योगानें प्राणवायुरहित करून मूळ धातू बनवितां येतो.

( ३ ) शिसें व ताम्र यांचीं गंधकिदें तापविलीं असतां शिशाच्या गंधकिदापासून प्राणिद व गंधकित यांचें मिश्रण तयार होतें व ताम्राच्या गंधकिदापासून प्राणिद व अनाम्लिक गंधकित मिळतें. शिशाचें गंधकित रक्तोष्णतेच्या वेळीं स्थिर (स्टेबल) असतें व त्याच वेळीं ताम्राच्या गंधकितापासून प्राणिद, गंधक–द्वि–प्राणिद व प्राणवायु मिळतात. दोहोंच्याहि बाबतींत प्राणिदीकरणाची अथवा ज्वलनाची क्रिया शेवटापर्यंत नेत नाहींत. साधारण भाजल्या जाणाऱ्या पदार्थांमध्यें व तसेंच मूळ रूपांत असलेल्या गंधकिदामध्यें प्राणाशीं असणारें गंधकाचें प्रमाण प्र : गं झालें म्हणजे प्राणिदीकरणाची क्रिया बंद करून सर्व मिश्रण उच्च उष्णमानापर्यंत तापवितात म्हणजे गंधक व प्राण हे दोन्हीं निघून जाऊन मूळ धातू शुद्ध स्वरूपांत मिळतात.

( ४ ) अंजाचें गंधकिद भाजलें असतां प्राणिद व गंधकिद यांचा एक मिश्र धातु बनतो. लोहाचाहि प्रकार याप्रमाणेंच आहे. पण त्या बाबतींत जें प्राण–गंधकिद मिळतें त्याचें अधिक उष्णता देऊन लवकरच शुद्ध प्राणिद बनवितां येतें. अंजाच्या गंधकिदाशीं लोह मिश्रण करून तें द्रवरूपांत नेलें असतां लोहाचें गंधकिद बनून अंज वेगळा होतो. कारण

लोहगंधकिदापेक्षां अंज बरेंच जड आहे. याच क्रियेनें शिशाच्या गंधकिदापासून शिसें वेगळें करतां येतें. पुढें कंसांत दिलेले धातू क्रमानें घेतल्यास पुढील धातूंच्या गंधकिदावर मागील धातूची क्रिया केली असतां मागील धातूचें गंधकिद बनून पुढील धातु वेगळा होतो (ताम्र, लोह, कथील, जशद, शिसें, रजत, अंज, ताल).

तालिदें:—तालसंयुक्त कच्चे धातू हे फारच थोडे असून त्यांत कोबाल्ट, व निकेल हे बरेच महत्त्वाचे आहेत. ह्यांच्यापासून शुद्ध धातू काढण्याकरितां प्रथमतः कच्ची धातु भाजतात म्हणजे तालिदांचा कांहीं भाग प्राणिदांत रूपांतर होऊन जातो व कांहीं ताल तसाच उडून जातो. राहिलेला भाग संकीर्ण—अल्पमूल्यक तालिद म्हणून राहतो. ह्या राहिलेल्या भागावर कांहीं द्रव्याची क्रिया करून तो द्रवरूपांत नेतात. मँगेनीज, लोह, कोबल्ट, निकेल हे धातू सिकित रूपांत मळीमध्यें जातात व निकिल व कोबाल्ट यांचे प्राणिदें न झालेले तालिदांचे भाग ही क्रिया योग्य वेळीं थांबविली असतां तळाशीं सांपडतात, व निराळें संमिश्रक द्रव्य पुन्हां टाकलें असतां निकेल व कोबाल्ट निरनिराळे होऊन आपणांस कोबाल्टचें तालिद मिळतें.

किरकोळ प्रतिक्रिया द्रव्यें:—ज्वालेमध्यें असणाऱ्या प्राणिदीकारक अगर सोज्जीकारक (प्राणमिश्रक व प्राणहारक) द्रव्यांशिवाय इतर पुष्कळ संमिश्रक द्रव्यांचा उपयोग करतात. लोहाचा उपयोग गंधक काढण्याकरितां करतात. शिशाच्या प्राणिदाचाहि प्राणिदीकारक म्हणून बराच उपयोग केला जातो. रक्तोष्णतेच्या वेळीं जेव्हां हें प्राणिद वितळत असतें तेव्हां त्याची क्रिया सोनें व रजत खेरीज करून सर्व धातूंवर होऊन गंधक द्विप्राणिदांखेरीज त्याच्याशींच एकादें संकीर्ण प्राणिद, शिसें व शिशाचें प्राणिद कमी असल्यास तयार झालेल्या रांध्यांत गंधकाशीं लवकर संकोग पावणारे धातू असतात.

संमिश्रक द्रव्यें:—ह्यांचा उपयोग धातु द्रवरूपांत नेण्याकरितां करतात. त्यांची निवड अशाच रीतीनें करतात कीं त्यामुळें कच्च्या धातूंचा वितळून लवकरच रांधा बनेल. यांचे तीन प्रकार आहेत:—(१) चित्र-खनिज, (२) आम्लिक संमिश्रक द्रव्यें व (३) अनाम्लिक संमिश्रक द्रव्यें. यांपैकीं चित्र-खनिज हें सिकित किंवा खटगंधकितासारख्या पदार्थांस द्रवरूपांत नेण्यास उपयोगीं पडतें. सिधुकर्बित किंवा गालाशकर्बित हें आनाम्लिक संमिश्रक द्रव्य असून त्याचा सिकितें द्रवरूप कांचेंत नेण्याकरितां उपयोग करतात. टाकणखार हें अम्लिक द्रव्य असून अनाम्लिक प्राणिदें द्रवरूपांत नेण्यास उपयोगी पडतें.

**धांधलपुर-सुदाम्रा**—काठेवाड. पालयाद ठाण्यांतलि निराळी खंडणी देणारी जहागीर. ही चोटिलाच्या पूर्वेस १२ मैलांवर आहे. जहागिरींत धांधलपुर अणि सुदाम्रा हीं दोन वेगळीं गांवें आहेत. या जहागिरींत २८ खेडीं असून तीं खवड काठी लोकांच्या ताब्यांत आहेत. गुजराथचा राजा सिद्धराज याचा जन्म येथेंच झाला. [ बाँबे ग्याझे. पु. ८. ]

**धानुक जात**—यांनां धानाक, धानक किंवा धानकिया असेंहि म्हणतात. यांच्यांत हिंदु, शीख, मुसुलमान व वन्य-जाती असून, हे बंगाल, बहार, ओरिसा, मध्यप्रांत, वऱ्हाड, पंजाब, संयुक्तप्रांत, बडोदें संस्थान, मध्यहिंदुस्थानांतील कांहीं संस्थानें व राजपुताना इतक्या प्रांतांत आढळतात. ह्या जातीची एकंदर लोकसंख्या (१९११) ८५९७६७ आहे. हे लोक शेती व मजुरी करतात. कुरमी व कोयरी लोकांबरोबरीचे ते असल्यामुळें समाजांत त्यांनां बराच मान मिळतो. आसामांत ब्राह्मण त्यांच्या हातचें पाणी पितात. आसामांतील चहाच्या मळ्यांत हे लोक काम करतात.

संयुक्तप्रांतांत या जातींत लउंगबारसा, बधिक, हाझारि, कथारिया आणि तैहाल पोटजाती आहेत. कानपूरच्या दक्षिण प्रांतांत लउंगबारसा लोक बाधिक लोकांनां आपल्या मुली देतात परंतु बाधिक लोक लउंगवारसांनां आपल्या मुली देत नाहींत. कानपूरच्या पूर्वप्रांतांत लांगवारसा हे परजातीशीं विवाहसंबंध मुळींच करीत नाहींत. कानपूरच्या ईशान्य प्रांतांत लउंगबारसा लोक बाधिक, कथारिया व हाझारी या लोकांच्या मुली स्वीकारतात पण आपल्या मुली फक्त हाझारी लोकांनांच देतात. यावरून धानुक जातींत स्वज्ञातीमध्येंच विवाह करण्याचा नियम किती शिथिल आहे हें समजतें. विवाह नियम जसजसे भिन्न आहेत तसतसे निरनिराळ्या जातींत व्यवहार व पंचायती वगैरेंचे नियमहि निरानिराळे आहेत.

मध्यप्रांतांतील यांच्या एकंदर संख्येपैकीं तीन चतुर्थांश लोकवस्ती नरसिंगपूर जिल्ह्यांत आहे. पद्मपुराणाच्या आधारावरून ही जात चांभार बाप व चांडाल आई आणि चांभार आई व अहीर बाप यांची संतति आहे असें इलियट म्हणतो. धानक लोक तीरंदाज असत असें बुक्यानन म्हणतो. पारथीयन लोकांच्या सैन्यांत जशी गुलामांची भरती करीत तशीच एके काळीं यांची भरती गुलामांपासून झाली असावी. पण यांची रजपूत होण्याची महत्त्वाकांक्षा आहे व नरसिंगपूरचे धानक लोक स्वतः धानकराय म्हणवून घेतात. पण क्रूक्सच्या मतें जे बस्तार लोक टोपल्या विणण्याचें काम सोडून धनुष्यें तयार करूं लागले व पुढें धनुर्धारी झाले त्यांस धानुक म्हणूं लागले व अजूनहि नरसिंगपुरांतील व बस्तरांतील धानकांचा परस्पर संबंध आहे असें दिसतें. हे लोधी लोकांच्या हातची पक्की रसोई खातात, यावरून पूर्वीं लोधी सेनापतींच्या हाताखालीं हे असावेत असें रसेल म्हणतो. यांचीं कुलनामें बहुतेक स्थानिक दिसतात. हे आतेमामेबहिणींबरोबर लग्नें निषिद्ध समजतात. मागणी वराकडून व्हावी लागते. वधूच्या गांवीं वर जाण्यापूर्वी त्याच्या लग्नमंडपाजवळ तो उभा राहतो व त्याची आई आपला स्तन त्याच्या तोंडात घालते आणि त्याच्यावर अक्षता व आंगारा टाकते. जातांना वरानें तांदूळ भरलेल्या ताटलीवरून चालत गेलें पाहिजे. यांचा धंदा

शेतांतील मजुरी करणें हा आहे. यांपैकीं फार थोडे कास्तकार आहेत. हे कधीं कधीं कोटवाराचें कामहि करतात. हे रजपुतांच्या हातचें खात नाहींत. नेमाडांत या जातीची गणना नीच जातींत आहे. तेथें हे, ब्राह्मण व रजपुतांचें उष्टें खातात. धानक बाप व लोधी किंवा कुणबी आई असलेल्या मुलांस हे जातींत घेतात. धनवार लोकांचें व यांचें बऱ्याच बाबतींत साम्य आहे. [ रसेल व हिरालाल; सेन्सस रिपोर्ट. १९११, पु. ३.]

**धानोरें**—मुंबई. पश्चिम खानदेश, नंदुरबार तालुका. नंदुरबारच्या आग्नेयीस १६ मैलांवर हें गांव आहे. येथें एक जुना पडका किल्ला असून त्याच्या आंत एक देऊळ बांधलेलें आहे. त्यांतील शिल्पकाम अप्रतिम आहे. [ खानदेश ग्याझे. ]

**धान्य**—हा शब्द धाना या शब्दापासून झालेला आहे. धान्याचे तृणधान्य व द्विदल धान्य असे सामान्य दोन प्रकार आहेत. भात, गहूं, ज्वारी, बाजरी हीं तृणधान्यें होत. हरभरा, तूर, मूग, उडीद इत्यादिकांस द्विदलधान्यें व करडई, तीळ, जवस वगैरेस तैलधान्यें म्हणतां येईल. तृणधान्याची पेरणी वगैरे करण्यास फारसा त्रास पडत नसल्यानें व तें साधारण खडकाळ जमीनविराहि उगवत असल्यानें या प्राचीन लोकांनां आपल्या निवासस्थानीं त्याची सहज लागवड करतां येई. शेतीचीं अवजारेंहि त्याकाळीं क्वचित् प्रचारांत होतीं हेंहि एक कारण यांच्या उपयोगाचें असावें.

वेदकालीं कर्ण, कृष्ण, स्थविष्ट वगैरे हलके तांदूळ, सांवे, यव इत्यादि या तृणधान्यांचा उल्लेख आढळतो. नाचणी, वरी, सांवा, राजगिरा, राळा, देवभात, वरटी ( वरग ) हीं तृणधान्यें आजहि प्रचारांत आहेत. तृणधान्यांप्रमाणें द्विदल धान्येंहि वेदकालीं होतीं. ऋग्वेदकालीं पेरणी करीत; ऐतरेयांत धान्याचे अंडज, जीवज, उद्भिज व स्वेदज असे चार प्रकार दिलेले आहेत. गहूं, खल्व, तीळ, उडीद, मका, मसूर इत्यादि धान्यांचीं नांवें वेदकालांत आढळतात ( ज्ञानकोश वि. ३. पृ. २९४–९५ पहा. ).

देशांतील हवामान व जमीनीचा गुण यामुळें निरनिराळीं धान्यें निरनिराळ्या ठिकाणीं उत्पन्न होतात. एवढेंच नव्हे तर एकच धान्य निरनिराळ्या प्रांतांत उच्चनीच प्रतीचें उत्पन्न होतें, व त्याची चवहि चांगली किंवा वाईट असते. देशांत वाहतुकीचीं साधनें जसजशीं जास्त प्रचारांत येतात, तशी धान्याची उचल जास्त होते. या प्रकारामुळें ज्या देशांत धान्याची निपज फाजील असते, तेथील धान्य पडून राहून लोकांचें आर्थिक नुकसान न होतां, तें जेथें त्याची जरूरी असेल तिकडे निर्गत करून, त्यापासून फायदा काढतां येतो. तसेंच दुष्काळ पडल्यास तो विशेषसा जाणवत नाहीं. कारण जेथें दुष्काळ नसेल तेथील धान्य दुष्काळग्रस्त भागांत ताबडतोब पुरवितां येतें. पूर्वी वणजारी लोक धान्याची नेआण करीत असत. सांप्रत आगगाड्या व आगबोटी यांमुळें ही वहातुक सुलभ झाली आहे. त्यामुळें पूर्वी जीं प्रत्येक गांवीं धान्याचीं पेवें आढळत तीं आज ओस पडत चाललीं आहेत. प्रत्येक धान्याची माहिती स्वतंत्र लेखांत दिली आहे.

**धापेवाडा**—मध्यप्रांत, नागपूर जिल्हा. कलमेश्वराच्या उत्तरेस पांच मैलांवर चंद्रभागा नदीतीरीं ३००० लोकवस्तीचा गांव. येथें मराठी कोष्टी लोकांची वस्ती बरीच असून, त्यांचें हें एक पवित्रस्थान आहे. येथील आपल्या सरपंचाच्या समाधीची पूजा करण्याकरितां सर्व मध्यप्रांतांतून व पुण्याकडून सुद्धां कोष्टी येतात. येथें पहिल्या रघूजीच्या वेळीं बांधलेल्या एका जुन्या किल्ल्याचे अवशेष आहेत. पेंढाऱ्यांनीं हा गांव लुटला होता. [ नागपूर ग्याझे. पु. ३. १९०८. ]

**धावळाघोसी**—मध्य हिंदुस्थान. भोपाळ एजन्सींतील एक ठाकुरात. क्षेत्रफळ ६ चौरस मैल. या ठाकुरातींत १ गांव आहे. लोकसंख्या (१९११) ५९०. उत्पन्न ९५०० रुपये.

**धावळाधीर**—मध्य हिंदुस्थान. भोपाळ एजन्सींतील एक ठाकुरात. लोकसंख्या (१९११) १७७७. साक्षर लोक शेंकडा ४ आहेत. क्षेत्रफळ १२ चौरस मैल. या ठाकुरातींत ३ गांवें असून उत्पन्न १० हजार रुपये आहे.

**धामण**—एक झाड. धामण झाडांच्या एका वर्गांत ६० जाती आहेत त्यांपैकीं १२ जातींचीं झाडें असतात व बाकीच्या जातींच्या वेली व झुडुपें असतात. या जातींपैकीं ३६ जाती हिंदुस्थानांत आहेत. हीं झाडें डेहराडून ते आसामपर्यंतच्या हिमालयाच्या पायथ्याशीं आढळतात. सालवृक्षांच्या जंगलांत हीं असतात. धामणची दुसरी जात हजारा व पंजाबचे मिठाचे डोंगर यांपासून सिकीमपर्यंतच्या ३ ते ६ हजार फूट उंचीवर आढळते. या वर्गाच्या बहुतेक जातींच्या झाडांच्या आंतरसालींपासून तंतु निघतात. त्यांचा दोर करण्याकडे व केव्हां केव्हां कागद करण्याकडे उपयोग करतात. जेव्हां लांकडांतील लवचिकपणा व बळकटी यांची जरूर असते तेव्हां या लांकडाचा उपयोग करावा. याच कारणामुळें बाण, भालकाठी वगैरे तयार करण्याकरितां या लांकडाचा उपयोग होतो. या वर्गाच्या बऱ्याच जातींच्या झाडांचीं फळें खाण्यासारखीं असतात ( वॅट ).

**धामपूर**, तहशील.—संयुक्तप्रांत. बिजनोर जिल्ह्यांतील तालुका. ह्यांत धामपूर, सिओहारा, निहतौर आणि बऱ्हापूर ह्या परगण्यांचा समावेश होतो. क्षेत्रफळ ४५९ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) २६९५१५. या तहशिलींत ६ गांव असून खेडीं ६७९ आहेत. ह्या तहशिलींतून पुष्कळ लहान नदीनाले वहातात; पैकीं मोठ्यांचीं नांवें गान्गन, खोह व रामगंगा हीं होत. धामपूर गांव जिल्ह्याच्या मध्यभागीं असून तेथील जमीन सुपीक आहे. परंतु तें गांव पुरांत वाहून जाण्याची भीति असते.

गांव.—या तहशिलीचें मुख्य ठिकाण. धामपूर हें औंध व रोहिलखंड रेल्वेवर आहे. लोकसंख्या (१९०१) ७०२७.

सन १७५० मध्यें येथें दाऊदखान रोहिल्यानें मोंगल सैन्याचा पराभव केला. १८०५ सालीं अमीरखानाच्या हाताखालीं पेंढाऱ्यांनीं हा गांव लुटला. १८५७सालीं येथील खजिना लुटण्याचा बंडखोरांचा बेत होता. पण तो फसला येथें लोखंडाचा व पितळेचा व्यापार चालतो.

**धामलेज**—काठेवाड. सुत्रापादपासून ११ मैलांवर असलेलें खेडें. येथें उत्तम मीठ तयार होतें. जंबूचा झालाराणा धामलजी यानें हें वसविलें असें म्हणतात. येथील विष्णुगया ऊर्फ चक्रतीर्थ नांवाचा तलाव प्रसिद्ध आहे. येथें सोमनाथ महादेवाचें देऊळ आहे.

**धाम्रा**—ब्राह्मणी, वैतरणी व त्यांच्या उपनद्या ह्यांची मिळून तयार झालेली एक नदी. कटक व बलासोर जिल्ह्यांच्या सीमेवरून ही नदी वहाते.

**धायटें**—मुंबई, पश्चिम खानदेश. धुळ्याच्या आग्नेयीस ४० मैलांवर हें लहानसें गांव आहे. येथील वस्ती फार जुनी आहे. सतराव्या शतकाच्या आरंभीं ( १६०९ ) येथें औषधें व चिटें यांचा बराच खप होत असे. यापुढें ५० वर्षांनीं टॅव्हर्निअर म्हणतो कीं हें महत्त्वाचें गांव सुपीक प्रदेशांत वसलेलें आहे पण घाणेरडें, रोगट व मोहाची दारू उत्पन्न करणारें आहे. [ खानदेश ग्याझे. ]

**धार, संस्थान.**—मध्यहिंदुस्थानांत भोपावर एजन्सीपैकीं एक संस्थान. उ.अ.२१° ५७' ते २३° १५' आणि पू.रे. ७४° ३७' ते ७५° ३७'. क्षेत्रफळ १७८३ चौरस मैल, पैकीं १४४६ चौरस मैल खालसा म्हणजे खास दरबारच्या अंमलाखालीं असून बाकीचा जहागीरदारांकडे आहे. दुसऱ्या संस्थानांचे भाग आंत आल्यामुळें हा प्रदेश बराच तुटलेला आहे. यांत २ शहरें व ६७० गांवें आहेत. परमार रजपुतांची प्रसिद्ध राजधानी जें धार शहर त्यावरून या संस्थानचें नांव पडलें आहे. याचे विंध्यामुळें दोन स्वाभाविक भाग बनले आहेत. माळवा पठारावरचा १५ ते २५ शें फूट उंचीचा प्रदेश ( क्षेत्रफळ ८६९ चौरस मैल ), व विंध्यपर्वताच्या दक्षिणेकडे डोंगराळ मुलुखांतील जिल्हे. संस्थानच्या उत्तरेस रतलाम, दक्षिणेस वढवाणी व इंदूर, पूर्वेस इंदूर व ग्वालेर आणि पश्चिमेस झाबवा, इंदूर व ग्वालेर हीं संस्थानें आहेत. या संस्थानांतून नर्मदा, मही, चंबळ, काली सिंध व यांनां मिळणारे पुष्कळ प्रवाह वाहतात. निमनपूर परगण्यांत धार्डी गांवाजवळ नर्मदा नदीचा मोठा धबधबा आहे त्यामुळें तेथें भोंवरे पडले आहेत. या भोवऱ्यांत एकमेकांवर घासून गुळगुळीत झालेले बिजावर जास्पर, अगेट, बायराईट वगैरे प्रकारचे पाषाणाचे फार सुंदर बाण सांपडतात. यात्रेकरू लोक हे बाण नेऊन देवांत ठेवतात. या संस्थानांत एकंदर २२ जहागिऱ्या असून त्यांपैकीं १३ जहागिरदारांची जिम्मेदारी इंग्रजांनीं पत्करलेली आहे. या संस्थानांत साग, शिसू, तेंडू, सादडा, अंजन वगैरे झाडें होतात. जंगलांत वाघ, चित्ता, सांबर वगैरे प्राणी आढळतात. खनिज संपत्ति फारशी नाहीं. यांत विंध्य व सातपुडा हे दोन पर्वत आहेत. माळवा पठाराची हवा समशीतोष्ण आहे. विंध्यपर्वताच्या खालीं नेमाड भागांत उन्हाळ्यामध्यें उष्णमान थोडें जास्त असतें व हिंवाळा फार थोडा असतो. माळव्यापेक्षां नेमाडांतील गुरेंढोरें जास्त दुध देणारीं व अंगानें जास्त मोठीं आणि सुरेख असतात. नेमाडांतील धान्यें व माणसेंहि माळव्यापेक्षां जास्त सकस असतात. माळव्यांत वार्षिक पाऊस सरासरी २६ इंच व नेमाडमध्यें २५ इंच होतो. निमनपूर परगण्यांत मोठें जंगल आहे. येथील लोकसंख्या ( १९२१ ) २३०३३३. असून त्यांपैकीं ६११४ लोक साक्षर आहेत; व शेंकडा ६६ हिंदु आहेत.

येथें भिल्ली, हिंदी व नेमाडी, या माळवी भाषा चालत असून मुख्य भाषा हिंदी आहे. शेंकडा ५६ शेतकीवर, १३ मोलमजुरीवर व शें.२० उद्योगधंद्यावर पोट भरतात. माळव्यांतील जमीन उत्तम व नेमाडांतील मध्यम जातीची आहे. येथें ज्वारी, गहूं, मका, हरभरा, तीळ, बाजरी, तांदूळ, वगैरे धान्यें पिकतात. धान्य, कापूस, व अफू हे व्यापाराचे मुख्य जिन्नस आहेत. धार येथें अफू वजन करण्याचा सरकारी डेपो आहे. १९०४-०५ सालीं या डेपोंत ५७८ पेट्यांचें वजन झालें. धारच्या आसपास व मांडव आणि नालाछा येथें पुष्कळ तलाव आहेत. स. १९०१ पर्यंत संस्थानचें निराळें पोस्टखातें होतें; पण नंतर तें ब्रिटिश पोस्टखात्यांत सामील झालें.

राज्यव्यवस्थेकरितां या संस्थानचे ७ परगणे केलेले आहेत; त्यांचीं मुख्य ठिकाणें धार, बदनावर, सुंदरसी, कुक्षी, मांडव, निमनपूर व धरमपुरी, हीं आहेत. संस्थानचे जमीनबाब, जंगल टाका, अबकारी व इतर बाबी मिळून एकंदर उत्पन्न हल्लीं १८-१९ लाखांचें आहे. इंग्रज सरकारास ६६०० रुपये वार्षिक खंडणी मिळते. संस्थानच्या जहागिरदारांकडून ७६५०० रुपये टाका ( खंडणी ) दरसाल संस्थानिकास मिळते. बदनावर परगण्यांतहि हे टाकेदार आहेत. धारमध्यें चांदीचें नाणें कधींच पाडलें जात नव्हतें. येथें इंदुरी किंवा उज्जनी रुपये चालत असत. स. १८८७ पर्यंत संस्थानचें तांब्याचें नाणें चालू होतें पण तेव्हांपासून "धार संस्थान" हीं अक्षरें असलेलीं ब्रिटिश नाणीं चालतात.

कायमच्या सैन्यांत ५३ घोडेस्वार, २०० पायदळ, १९ तोफखानेवाले व ५ तोफा आहेत. स. १८७२ त शिक्षणखातें स्थापन झालें. स १९०४ मध्यें दरबारच्या ४० व खासगी ३० शाळा असून त्यांत एकंदर २२७० विद्यार्थी शिक्षण संपादन करीत होते. धारला १ हायस्कूल आणि मराठी, हिन्दी, उर्दू, व संस्कृत पाठशाळा आहेत. परगण्यांतील मुख्य मुख्य गांवीं पाठशाळा असून हिन्दी व इंग्रजी तेथें शिकवितात. प्राथमिक शिक्षण मोफत आहे. मोठ्या गांवीं पुस्तकालयें स्थापिलीं आहेत. धारेस मुलींची पाठशाळा आहे. संस्थानांत रुग्णालयें व दवाखाने मिळून १३ वैद्यकीय संस्था आहेत.

छापखाने, जिनिंग कारखाने, ओव्याच्या फुलांचे कारखाने वगैरे उद्योगधंदे चालतात; मुख्य धंदा शेतीचा आहे. मुलकी कामाकरितां पहिली मोजणी स. १९०२–०४ मध्ये करण्यांत आली. संस्थानांत ५–६ वर्षांपासून पंचायतपद्धति सुरू झाली आहे. घोड्यांची उत्तम अवलाद काढण्याचा प्रयत्न संस्थानकडून सुरू आहे. संस्थानांत अद्यापि आगगाडी नाहीं.

इतिहासः—येथील संस्थानिक पवार आडनांवाचे मराठे असून, ९ ते १३शतकापर्यंत माळव्यावर राज्य चालविणाऱ्या परमार रजपुतांचे ते वंशज आहेत. स. १६५० त धार अकबराच्या हातांत गेलें व त्याचा समावेश माळव्याच्या सुभ्यांत करण्यांत आला. १६९४ सालीं मराठयांनीं नर्मदा नदी ओलांडून ह्या प्रदेशांतील धरमपुरी जिल्हा व गांव लुटलें. यानंतर येथें एकसारख्या परकीय स्वाऱ्या येत गेल्या. १७२३ सालीं निजामानें माळव्याच्या सुभेदारीचा राजीनामा दिल्यावर त्याच्या जागीं गिरिधर बहादूर हा आला. त्यानें मराठयांनां जोराचा विरोध करून, मध्य हिंदुस्थानांत त्यांची सत्ता कांहीं वेळपर्यंत बसूं दिली नाहीं.

सांप्रतच्या धारच्या पवार घराण्यानें शिवाजीपासून पुढें दीडशें वर्षे मराठी राज्यांत अनेक लहान मोठ्या कामगिऱ्या केल्या आहेत. शिवाजीच्या वेळीं यांचा मूळ पुरुष साबूसिंग ( साबाजी अथवा शिवाजी ) यानें कल्याण काबीज करतांना आंबेगांवच्या घाटांत मुसुलमानांशीं लढाई दिली, तींत तो जखमी झाला. साबूसिंगानें नगर जिल्ह्यांतील सुपें गांव हें आपलें मुख्य ठाणें केलें; तेव्हां शेजारच्या हंगे गांवच्या दळव्याची झटापट होई. अशा एका झटापटींत (जांसुल ओव्यांत) साबाजी मारला गेला; हल्लीं तेथें एक चबुतरा बांधलेला आहे. साबाजीच्या मरणानंतर त्याचा मुलगा कृष्णाजी हा लहान असल्यानें आजोळीं संगमनेरास राहीं. कृष्णाजी हा मोठा झाल्यावर त्यानेंहि शिवाजीच्या पदरीं नौकरी धरली यानें आदिलशाहींतील आपल्या शेजारच्या प्रांतांत स्वाऱ्याशिकाऱ्या केल्या व एका ब्राह्मणाच्या मुलीस मुसुलमानांच्या हातून सोडविलें. कृष्णाजीस बुवाजी, रायाजी व केरोजी अशीं तीन मुलें होतीं; कृष्णाजीचें व बुवाजीचें नांव शिवाजीच्या सरदारांच्या यादींत आहे. बुवाजी, रायाजी व केरोजी यांनीं राजारामाच्या वेळीं मोंगलांनां तोंड देऊन तापी तीरापर्यंत आपला अंमल बसविला, आणि मोठमोठीं मसलतींचीं कामें पार पाडलीं म्हणून राजारामानें यांनां विश्वासराव हा किताब व सरंजाम दिला. केरोजी याला सेनाबारासहस्री मनसब दिली. चाकणप्रांत त्याजकडे वहिवाटीस होता. केरोजी हा शाहूच्या कारकीर्दीतहि होता. त्याला चंद्रसेन जाधवावर शाहूनें एकदां धाडलें होतें ( १७२४ ). बुवाजी, केरोजी व रायाजी यांचीं तीन निरनिराळीं घराणीं विद्यमान आहेत. बुवाजीपासूनच धार व देवास हीं संस्थानें उगम पावलीं.

बुवाजीचे पुत्र दोन, काळोजी व संभाजी. संभाजीस रामचंद्रपंत अमात्यानें योग्यतेस चढविलें ( ज्ञा. को. वि. ९ यांत संभाजीस शिवकालीन म्हटलें आहे, तें गोडबोले यांच्या हिंदुस्थानांतील ऐ. वि. राज्यें या पुस्तकाच्या आधारें म्हटलें आहे.). पुढें १६९४–१७०० पर्यंत मराठ्यांच्या माळव्यांतील स्वाऱ्यांत ही पवारमंडळी असावींत. कारण स. १६९६ मधील मांडवगडच्या स्वारींत त्यांचा स्पष्ट उल्लेख आहे. संभाजी हा शाहूच्या वेळीं बराच पुढें आला; तो दीर्घायु होता. त्याचें ठाणें मलठण येथें असून त्यानें नगर जिल्ह्यांत बऱ्याच पाटिलक्या खरेदी केल्या. संभाजीस उदाजी, आनंदराव व जगदेव अशीं तीन मुलें होतीं (उदाजीबद्दलची माहिती ज्ञानकोश विभाग ९ मध्यें पहा; आनंदरावाबद्दलची माहिती विभाग ८ मध्यें पहा. त्याविरहित माहिती येथें दिली आहे ).

उदाजीनें स. १७०९ त मांडवगड सर केला. त्यानें गुजराथेंतहि वरोंच ठाणीं घातलीं, तीं आपल्याकडे घेण्याची खटपट पिलाजी गायकवाडानें केली, परंतु ती साधली नाहीं. नारो शंकर यास ( १७२०–२१ ) यावेळीं उदाजीच्या दिमतीस दिलें होतें. बाजीरावानें उदाजीस १७२२ सालीं माळवा व गुजराथ प्रांताचा निमा मोकासा सरंजामी करून दिला. यापुढें बहुधां दरसाल उदाजीनें माळव्यांत स्वाऱ्या केल्या. गुजराथबद्दल मात्र उदाजी व गायकवाड यांच्यांत नेहमीं तंटे होत. ते शाहूनें तोडून, उदाजीस गुजराथमाळव्याची चौथाईसरदेशमुखी दिली ( १७२६ ). यानंतर पालखेडच्या लढाईंत उदाजी लढला होता, व माळव्यांतील मोंगली सुभ्यावरहि त्यानें चढाई केली होती ( १७२८ ). खानदेश, सोंधवाडा, काठेवाड, मेवाड, मारवाड, कच्छ वगैरे भागांतील मोकासावसुली उदाजीकडेच होती ( १७३० पर्यंत ). मात्र यावेळीं तो चिमाजीआप्पाच्या दिमतीखालीं होता. शाहूराजा हा उदाजीची सल्लामसलत घेत असे. सवाई जयसिंगाशीं या सालीं ( १७३० मार्च ) जी मसलत चालली होती तींत उदाजी हा होता. त्याचा व गुजराथचा निकट संबंध इ. स. १७३४ पासून सुटला असावा. पेशव्यांचें व याचें वांकडें आलें असतां होळकरानें त्यांची समजूत केली होती. मध्यंतरीं ( १७३५ ) शाहूची त्याच्यावर गैरमर्जी झाली होती, ती ब्रह्मेन्द्रस्वामीच्या खटपटीनें नाहींशी झाली ( १७३६ ). उदाजी शूर व मुत्सद्दी असल्यानें माळव्यांत " जिधर उदा उधर खुदा " अशी म्हण लोकांच्या तोंडून अद्यापि ऐकूं येते. उदाजी ब्रह्मेन्द्राच्या प्रेमांतील होता. तो तापट व आग्रही असल्यानें आणि पेशव्यांच्या विरुद्ध तेढीनें वागत असल्यानें सन १७३६ नंतर त्याच्या उत्कर्षास आळा बसत गेला. उदाजी हा उदगीरच्या लढाईंत निजामाकडून लढत असतां वारल्याचा उल्लेख ( इचलकरंजीकराचा इतिहास पृ. ५३ ) येथें आढळतो ( १७६० ). पुढें १७६३ मध्यें एका उदाजीरावाचा उल्लेख येतो. तो दुसरा एखादा उदाजी असावा. याच्या वंशाकडे अद्यापि मलठणची जहागीर चालते.

आनंदरावः—( ज्ञानकोश विभाग सात मध्यें याची माहिती आली आहे, तिच्याशिवाय जास्त येथें दिली आहे. ) उदाजीच्या तापट स्वभावानें काम बिघडल्यास आनंदराव तें सावरून घेई. हा उदाजीबरोबर नेहमीं स्वाऱ्या-शिकारींत असे. तो माळव्यांतुन मोकासा (१७२९ पूर्वीपासून) वसूल करीत असे. उदाजीप्रमाणें हाहि दाभाड्यास मिळाला होता पण त्यानें पेशव्यांशीं कायमची तेढ ठेविली नाहीं. त्यानें चिमाजीआप्पाकडून पेशव्यांशीं स्नेह जुळविला. पुढें ( १७३२ ) माळवा, गुजराथ, नेमाड, खानदेश वगैरे प्रांतां-तून मोकासा वसूल करण्याचा याला पेशव्यांनीं स्वतंत्र अधि-कार दिला. याच्याकडे १५ हजार स्वारांचें पथक होतें. माळव्याच्या वांटणींत धारप्रांत व आसपासचे कांहीं परगणे आणि रजपूत राजांकडील खंडणीचा कांहीं हिस्सा या पथका-साठीं सरंजाम आनंदरावास मिळाला. या वेळेपासून तो धार येथें राहूं लागला. माळव्याचें रक्षण करून दिल्लीपर्यंत आपला अंमल बसवावयाचा हें काम हा शिंदे–होळकरांच्या मदतीनें करी. पुढें थोड्याच वर्षांनीं तो उज्जनीस सर्पदंशानें वारला ( १७३६ जून ). उज्जनीस मंदाकिनी घाटावर मंगले-श्वरानजिक त्याची छत्री आहे.

जगदेवः—हाहि उदाजीचाच भाऊ, मराठी लष्करांत एक सरदार होता. हा सुद्धां मोहिमांत भावांबरोबर हजर असे. तिरला येथील लढाईंत यानें पराक्रम केल्याचा ( व एका कैफियतींत यानेंच दयाबहादूरचा वध केल्याचा ) उल्लेख आहे ( १७३१ ). यापुढील याची माहिती सांपडत नाहीं.

यशवंतरावः—धारच्या राज्याचा संस्थापक आनंदराव याचा हा पुत्र होय. माळव्याबाहेरील मराठी राज्याचा विस्तार करणाऱ्या मल्हारजी होळकर, राणोजी शिंदे, पिलाजी जाधव यांमध्येंच यशवंतराव हाहि होता. सन १७३४-३५ च्या माळव्याच्या मोहिमेंत हा होता. यावेळीं पठारी, लालगड इकडील गिराशांचा बंदोबस्त यानें केला. (हल्लींचा धार संस्थानांतील निमनपूर परगणा म्हणजे लाल-गड होय ). पुढल्या सालीं ( १७३६ ) चिमाजीआप्पाबरोबर हा कोंकणांत गेला. बाप वारल्यावर याला पुण्यास सरदारीचीं वस्त्रें मिळालीं ( आगस्ट १७३६ ) व नियमाप्रमाणें परमु-लुखांतील वसुलावर शेंकडा १६ रक्कम यास मिळूं लागली. झील तलावावरील लढाई ( नोव्हेंबर ), भोपाळची लढाई ( १७३७ डिसेंबर ), वसईची मोहीम ( १७३९ ), या प्रसं-गांत यशवंतरावानें चांगला पराक्रम गाजविला. पेशवे धार-जवळ आले असतां ( आक्टोबर १७३९ ), यानें धार व सोनगड त्यांच्या हवालीं केला. ढवळपूरच्या मुक्कामीं नाना-साहेब पेशवे व सवाई जयसिंग यांच्या दरम्यान भेटीच्या वेळीं राजकारण होऊन माळव्याबद्दल जो ठराव झाला, त्यांत पूर्वीपासून यशवंतराव होता ( १७४१ मे ). जयसिंह व जोध-पूरचा अभयसिंग यांचा समेटहि यशवंतरावानें करून दिला. यापुढील दोन तीन वर्षांत पेशव्यांनीं बुंदेलखंडापासून बंगा-लपर्यंत जो धुमाकूळ घालून चौथाई वसूल केली त्यांत शिंदे होळकरांप्रमाणें यशवंतरावहि होता. पातशहानें माळव्याचा सुभा पेशव्यानां दिला असतां त्याला (शिंदे, होळकर, जाधव) यशवंतराव यानें जामीनकतवा लिहून दिला (१७४३). पेशव्यानीं १७४४–४६ सालीं बुंदेलखंडांत स्वाऱ्या केल्या. त्यांत हा हजर असे. पुढील सालीं याची व सदाशिवराव भाऊसाहेब यांची कांहीं बोलाचाली होऊन यानें सरकारच्या डेऱ्यावर तोफा डागल्या. त्यामुळें याच्या सर्व सरंजामाची जप्ती झाली (१७४७), तीं स. १७५१ ( आगस्ट ) त मोकळी झाली. मध्यंतरीं याला अतोनात कर्ज झालें व त्यामुळें त्यानें निजामाकडेहि संधान बांधलें; निजामानें याला जहागीर व पंचहजारी मनसब कबूल केली. परंतु पुढें रामचंद्रबाबा शेणवी यानें व यशवंतरावाचा दिवाण काशीपंत यानें यश-वंतराव व पेशवे यांचा समेट घडवून आणला. पेशव्यांनीं त्याची सर्व बाकी माफ केली व सरंजामजप्ती मोकळी झाली. यानंतर पेशव्यांच्या बहुतेक ( घोडनदी, कुकडी, भालकी, होळीहुन्नुर, धारवाड ) मोहिमांत यशवंतराव हा हजर असे ( १७५१-.५३ ). कुंभेरीच्या ( १७५४ ) वेळ्यांत दादासा-हेबाबरोबर हा व याचा धाकटा भाऊ रायाजीहि होता. रायाजीला स. १७५० च्या सुमारास सरदारी मिळाली होती. श्रीरंगपट्टण ( १७५७ ), शिंदखेड, उदगीर ( १७६० ) वगैरे लढायांतहि यशवंतरावानें चांगला पराक्रम दाखविला. यावेळच्या लुटींतून पेशव्यानीं याला एक राजराजेश्वराची मूर्ति व चौघडा, जरीपटका आणि २५ शें स्वारांचें पथक दिलें. ही मूर्ति सांप्रत धारच्या राजवाड्यांत पवारांची कुल-देवता म्हणून पूजिली जाते. चौघडाहि तेव्हांपासूनच वाजविला जात असतो. यशवंतरावानेंहि घोडनदीच्या कांठीं या गोष्टींच्या स्मरणार्थ फत्तेश्वर महादेवाचें देऊळ बांधलें आहे. या वंशांत राजा हें पद प्रथम यालाच मिळालें. शेवटीं हा पानिपतांत गारद झाला ( १७६१ ). त्यानें २७ वर्षें कारभार केला. यशवंतराव शूर, दयाळू, साहसी व बेफिकिरी होता. पुढें ( १७७४ ) याचा एक तोतया निघाला होता.

खंडेरावः—हा यशवंतरावाचा पुत्रः बापाच्या मृत्यूच्या वेळीं हा लहान होता. त्यामुळें सरकारच्या स्वाऱ्यांबरोबर पवारांचें पथक घेऊन यशवंतरावाचा लेकवळा महिपतराव हा जाई. त्यामुळें तो थोरल्या माधवरावांचा आवडता होऊं लागला. तेव्हां खंडेरावानें राघोबादादाचा आश्रय घेतला. त्याचा व महिपतरावाचा नेहमीं तंटा पडे. खंडेरावाची आई गहिनाबाई व तिची सवत सकवारबाई यांचीहि चुरस असे. खंडेरावानें आनंदीबाई पेशवे हिला धारच्या किल्ल्यांत आश्रय दिला. त्यामुळें कारभारीमंडळाचा ( पुणें येथील ) त्याच्यावर रोष होऊन त्यांनीं याचा सरंजाम जप्त केला. पुढें मध्यस्थी वगैरे होऊन जप्ती मोकळी झाली ( १७७८ ).

आनंदीबाई धारच्या किल्ल्यांत सुमारें पांच वर्षें होती. यानंतर खंडेराव महादजी शिंदे याच्यावरोबर मोहिमांवर जाई. पुढें चार वर्षांनीं खंडेराव वारला ( १७८३ ).

आनंदराव दुसराः—( याची हकीकत ज्ञानकोशाच्या ७ व्या विभागांत आहे; तिच्यापेक्षां जास्त येथें दिली अहे. ) हा आजोळीं बडोद्यास दरमहः १ हजाराच्या नेमणुकीवर असतां राज्यकारभार रंगराव ओढेकर दिवाण पाहत असे. खडर्यांच्या लढाईंत आनंदरावाचें पथक होतें; त्याचप्रमाणें सरकारच्या मोहिमांतहि यांचें पथक हजर असे. उत्तरेकडे अलीबहादूरच्या हाताखालीं आनंदरावाचें सैन्य जाई. असईच्या लढाईंत आनंदराव लढत होता ( १८०३ ). रंगराव ओढेकरानें आपला अधिकार गेलासें पाहून होळकराच्या दरबारचा आश्रय घेतला. होळकरानें त्याला थापा देऊन धारकराचा मुलुख लुटला. तेव्हां रंगराव दौलतराव शिंद्याकडे गेला; शिंद्यानें त्याच्या मदतीनें नऊ वर्षें धारच्या राज्यावर स्वाऱ्या करून पुष्कळ प्रांत व पैसाहि उकळला. इतक्यांत आनंदराव वारला. त्यामुळें संस्थानांत जास्त घोंटाळा झाला. आनंदरावाची वहीण वाईट चालीची असून तिनें त्याला विषप्रयोग केल्याचें सांगतात. यावद्दल तिला व तिच्या साथीदारांनां पुढें योग्य शासन मिळालें.

रामचंद्ररावः—हा आनंदरावाचा पुत्र. आनंदरावांच्या पश्चात त्याची स्त्री मैनाबाई हिनें कारभार हातीं घेतला. ती यावेळीं गरोदर होती. मुरारराव नांवाच्या एका लेकवळ्यानें राज्यांत यावेळीं धुमाकूळ उडविला होता. मैनाबाई प्रसूत होऊन तिला मुलगा झाला, त्याचें नांव रामचंद्र ठेविलें. नंतर बाईनें हळू हळू मुराररावाची धुमाळी बंद केली; तरीहि त्याची कटकट चालूच असे. बडोद्याची फौज बाईनें आपल्या मदतीस ठेविली होती. इतक्यांत रामचंद्रराव वारला. तेव्हां बाईनें शिंदेहोळकरांच्या संमतीनें आपला भाचा दत्तक घेऊन त्याचेंहि नांव रामचंद्रराव ठेवून कारभार चालविला. परंतु राज्यावर चोंहोकडून संकटें आलीं. यावेळीं शिंदेहोळकरांनीं धारच्या राज्यांतील बराच मुलुख आपले ताब्यांत घेतला. मैनाबाई फार दक्ष व शूर असल्यानें तिनें राज्य अजीबात बुडूं दिलें नाहीं. स. १८१७ त इंग्रज जेव्हां पेंढाऱ्याच्या उच्छेदाकरितां माळव्यांत शिरले तेव्हां मैनाबाईच्या ताब्यांत केवळ धार शहरच होतें व तिला सारा २०-२५ हजार वसूल येई. पुढें इंग्रजांचा व धारकर यांचा तह होऊन इंग्रजांनीं राज्याचें रक्षण करण्याचें काम पत्करून ३५ हजार वसुलाचा मुलूखहि मिळवून दिला. धार, बदनावर, नालछा हे प्रांत रजपूत संस्थानिकांकडून जी खंडणी मिळे त्याऐवजीं १ लक्ष १० हजारांची रक्कम परभारें इंग्रजांकडून दरसाल मिळूं लागली. संस्थानांत व्यवस्था लागून १८२० सालीं २ लक्ष ६७ हजार रुपये वसूल आला. रामचंद्ररावाची पहिली बायको अन्नपूर्णाबाई ही दौलतराव शिंद्याची ( कोण ? ) होती. इंग्रजांबरोबर १८२८, १८३१ व १८३५ सालीं आणखी तहनामे झाले; त्यांत विशेष फरक नव्हता. मध्यंतरीं ( १८३२ ) अवचितराव नांवाच्या एका माणसानें आपण मुराररावाचा पुत्र म्हणून बंड केलें व त्याला पुष्कळ भिल्लांनीं साहाय्य केलें. संस्थानाकडून तें मोडलें जाईना म्हणून इंग्रज मध्यें पडले आणि दरमहा २०० रु. ची नेमणूक अवचितरावास करून देऊन त्याची समजूत घातली. पुढल्या वर्षीं रामचंद्रराव वारला ( १८३३ ). रामचंद्ररावास पुत्र नसल्यानें मलठणचा उदाजीच्या वंशांतील मुलगा दत्तक घेऊन त्यास गादीवर बसविलें ( १८३४ ).

यशवंतराव, दुसराः—याच्या कारकीर्दींत धारचा जुना व नांवाजलेला दिवाण बापू रघुनाथ हा वारला. याची बायको नानाबाई नांवाची होती. याला मूल झालेंच नाहीं व मुलगा नसल्यानें त्याचा अल्पवयस्क सावत्रभाऊ दत्तक होऊन गादीवर आला. यशवंतरावानें २३ वर्षें शांतपणें राज्य केलें होतें. हा १८५७ सालीं वारला. या सालीं धार येथेंहि बंड झालें. वास्तविक राजा लहान होता, त्याचा बंडांत कांहीं हातहि नव्हता; पण इंग्रजांनीं संशयामुळें धार संस्थान खालसा केलें. पुढें चौकशी करून राज्य सोडलें,मात्र बेरसिया नांवाचा एक प्रांत जप्त करून भोपाळच्या बेगमेस दिला.

आनंदराव, तिसराः—हा मोठा झाला तरी पोलिटिकल एजंट याच्या मतें तो राज्य चालविण्यास लायक नसल्यानें स. १८६४ पर्यंत त्याला मुखत्यारी मिळेना. यावेळीं गव्हर्नर जनरल लॉरेन्स यानें त्याला मुखत्यार केलें मात्र त्याच्याकडून कांहीं अटी कबूल करवून घेतल्या. यानें इ. स. १८९८ पर्यंत शांतपणें राज्य कारभार केला.

उदाजीराव, दुसरे:—आनंदराव निपुत्रिक असल्यानें त्यांच्या पश्चात् दत्तक मुलगा घेऊन गादी चालविली. मुलाचें नांव उदाजीराव ठेविलें. हेच सांप्रतचे धारचे महाराज आहेत. यांचें सबंध नांव मेजर हिज हायनेस महाराज सर उदाजीराव पोवार साहेब बहादूर, के. सी. एस्. आय; के. सी. व्ही. ओ; के. बी. ई. असून, यांचा जन्म इ. स. १८८६ त झाला. यानां १५ तोफांची सलामी आहे.

या घराण्यांतील ( बुबाजी, दारकोजी, मनाजी, गोविंदराव, चंदरराव, दुसरा गोविंदराव, दुसरा दारकोजी व यशवंतराव हे ) आठ पुरुष सरकारकामीं ठार झाले. सन १७६८-६९ चा एक हिंदुस्थानचा झाडा महाल उपलब्ध आहे, त्यांत उत्तर हिंदुस्थानांतील महाल पुढीलप्रमाणें त्या त्या सरदाराकडे होते.होळकर १४।,शिंदे १८।।, आणि पवार मंडळीकडे ( धारकर १८।, देवासकर ७।, अहमदाबादकर २ मिळून ) २७।। होते. [ फडके-परमार घराण्याचा इतिहास; का. कृ. लेले व शि. का. ओक यांनीं पुरविलेली माहिती; सप्तप्रकर्णात्मक बखर; मावजी-कैफियती; राजवाडे खंड, ३, ६, ८, १५; शाहू महाराजाची रोजनिशी; देवास थ्याक्षे; मालकम; डफ; होळकराची कैफियत; पेशवे शकावली. ]

गांव.—धार संस्थानाच्या राजधानीचें ठिकाण. राजपुताना माळवा रेल्वेच्या महू स्टेशनपासून ३३ मैल, व समुद्रसपाटीच्या वर १९०८ फूट आहे. धार हें नांव "धारानगरी" या नांवापासून आलें आहे. उत्तरेस तांबड्या दगडांचा किल्ला आहे. जुन्या गावाभोंवतीं हिंदूच्या वेळीं बांधलेला धुलकोट, आहे. हें गांव जुनें असून ५ शतकेंपर्यंत माळव्याच्या परमार रजपुतांच्या राजधानीचें ठिकाण होतें. ह्या घराण्याची पहिली राजधानी उज्जनी येथें होती; पण त्या घराण्यांतील पांचवा पुरुष, दुसरा वैरिसिंह यानें ती या ठिकाणीं आणली. भोजराजा गादीवर बसल्यानंतर धारेचें महत्त्व वाढून त्याला पहिलें स्थान प्राप्त झालें. मुंज वाक्पति (९७४ ते ९९५), सिंधु राजा (९९५–१०१०) व भोज यांच्या कारकीर्दीत धार हें सर्व हिंदुस्थानांत विद्येचें मुख्य ठिकाण समजलें जात असे आणि येथील राजे, स्वतः लेखक व चांगले विद्वान होते. १३०० सालीं अल्लाउद्दीननें धारपर्यंत सर्व माळवा जिंकला, त्यावेळीं धारमध्यें मुसुलमानांचा प्रथम प्रवेश झाला. यानंतर १० वर्षांनीं, मलिक काफूर यानें येथें मुक्काम केला होता. स.१३४४ च्या दुष्काळांत महमद तुघलख येथें आला असतां त्याला सर्व प्रदेश ओसाड आढळून आला; स.१३९९ त धारचा सुभेदार दिलावरखान हा बहुतेक स्वतंत्र झाला; त्याचा मुलगा होशंगशहा हा माळव्याचा पहिला मुसुलमान राजा होय. त्यानें मांडू ही आपली राजधानी केल्यामुळें धारचें महत्त्व अर्थातच कमी झालें. अकबराच्या कारकीर्दीत, धार हें माळवासुभ्यांत, मांडू सरकारांतील एका महालाचें मुख्य ठिकाण होतें. स. १५९८ त दक्षिणेस स्वारीवर जातेवेळीं अकबरानें येथें मुक्काम केला होता, ही हकीकत तेथें असलेल्या लोखंडी लाटेवर लिहिलेली आहे. स. १६५८ त येथील किल्ला दारा शिकोहच्या ताब्यांत होता, परंतु औरंगझेब जवळ आल्याबरोबर किल्ला मोकळा करून तो यशवंतसिंगास जाऊन मिळाला. हा किल्ला १७३० सालीं मोंगलाकडून मराठ्यांकडे आला.

लोकसंख्या,(१९११) ७४७२ पैकीं शें. ७५ हिंदु, व १९ मुसुलमान आहेत. धार हें या संस्थानांत व्यापाराचें मुख्य ठिकाण असून येथून धान्य व अफू हे जिन्नस मुंबई व इतर ठिकाणीं पाठविण्याकरितां महूस रवाना होतात. येथें अफूचा सरकारी डेपो आहे. येथें दोनतीन मुसुलमानी काळांतील इमारती असून त्या ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाच्या आहेत. गांवाच्या उत्तरेस उंचवट्यावर असलेला लाल दगडांचा किल्ला महंमद तुघलखाच्या वेळीं (१३४४) बांधलेला असावा. देवगिरीची खंडणी सुखरूप दिल्लीस जाण्यासाठीं हा बांधला. थोरल्या बाजीरावचा जन्म या किल्ल्यांत झाला; स. १८५७ च्या बंडांत रोहिले व संस्थानच्या नोकरींत दुसरे भाडोत्री शिपाई यांनीं हा किल्ला काबीज केला होता. तो महू येथील सैन्यानें ६ दिवसपर्यंत तोफांचा भडीमार करून परत घेतला. किल्ल्याच्या तिसऱ्या दरवाज्यावरील एका लोखंडी पत्र्यावर औरंगझेबाचा एक फारशी शिलालेख आहे (१६८३ चा). लाल मशीद ही माळव्याचा पहिला सुलतान दिलावरखान यानें हिंदु देवालयांच्या अवशेषांपासून १४०५ सालीं बांधिली. तिच्या बाहेर असलेल्या लोहस्तंभा (लाट) वरून हिला लाल मशीद हें नांव पडलें. पूर्वीचें नांव जामी मशीद. ह्या स्तंभावरील लेखांत अकबरानें आपल्या कारकीर्दीच्या ४४ व्या वर्षी (१६००) येथें मुक्काम केल्याचें लिहिलें आहे. हा स्तंभ भोज परमार (१०१०–१०५५) च्या कारकीर्दीत त्रिपूरीचा भेदिराज गांगेयदेव व तेलंगणचा राजा यांच्यावरील विजयाचें स्मारक म्हणून उभारण्यांत आला. गुजराथच्या सुलतान बहादूराच्या मनांत हा स्तंभ घेऊन जाण्याचें होतें. तो मोडून त्याचे तीन तुकडे झाले व तेव्हांपासून हा जमीनीवर पडलेला आहे अशी हकीगत जहांगिरानें आपल्या रोजनिशींत नमूद केलेली आहे. ह्याची मूळची लांबी ४४।४५ फूट होती, पण आतां त्याचे चार तुकडे झालेले आहेत. एक तुकडा जो मशीदीजवळ पडला आहे त्याची लांबी २४ फूट लांब व ४ फूट घेर असून तो चौकोनी आहे. याला तेलणीची लाट ह्मणतात. मशीदीच्या पूर्वेच्या व उत्तरेच्या दरवाजांवर दोन फारशी शिलालेख (१४०५ चे) आहेत. मशीदीच्या नैर्ऋत्येस दीड कोसावर सिंहासन बत्तिशीच्या कथा जेथें घडल्या ती सिंहासनटेंकडी आहे. कमाल मौला हें लहानसें आवार असून त्यांत चार थडगीं आहेत. त्यापैकीं एक पहिल्या महमद खिलजीचें (१४३५–६९) आहे. दरवाज्यावर निळ्या रंगांत कुफिक लिपींत एक लेख आहे. या आवाराजवळच भोजशाळा नांवाची इमारत हल्लीं मशीदीच्या रूपांत आहे. ही मशीद १४ व्या किंवा १५ व्या शतकांत हिंदु देवळांच्या विशेषतः तेथील सरस्वति मंदिराच्या अवशेषापासून तयार केलेली आहे. प्रख्यात राजा भोजानें (१०१०–१०५५) शहराच्या एका मध्यचौकांत हिंदुस्थानांतील निरनिराळ्या शास्त्रीपंडितांशीं वादविवाद करण्यास हें सरस्वति मंदीर बांधलें. यांत विद्यार्थ्यांस राहण्याची व शिकण्याची सोय होती. हेंच मंदीर हल्लीची मशीद होय. धारेमध्यें ८४ चौक होते त्यांत मधोमध हें मंदीर होतें. येथील भिंतीच्या दगडांवर फुटकळ संस्कृत लेख होते ते मुसुलमानांनीं फरसबंदीस लावून टाकीनें खोडून टाकले आहेत.

येथील दोन खांबांवर संस्कृतांतील विभक्तिप्रत्यय सर्पाच्या आकृतिप्रमाणें कोरलेले आहेत. खांब व इतर ठिकाणीं हिंदु पद्धतीचीं चित्रें वगैरे आहेत. गांवाच्या नैर्ऋत्येस, जुन्या हिंदु तटबंदीवर अब्दल्ला शहा चंगाल (दुसऱ्या भोजच्या वेळचा १३१०. मधील एक मुसुलमान साधू) याचें थडगें आहे. त्यावर एक स.१४५५ चा शिलालेख आहे. गांवाच्या दक्षिणेस तळ्याच्या कांठच्या टेंकडीवर कालिका देवीचें सुंदर देवालय आहे. देवीच्या खर्चासाठीं स्वतंत्र जहागीर तोडून दिली आहे. येथून जवळच मुंज राजानें बांधलेला मुंजसागर नांवाचा तलाव व राजघराण्याच्या छत्र्या व

धारेश्वराचें देऊळ आहे. [ आर्कि-सर्व्हे रिपोर्ट १९०२-०६; धारचा इतिहास-लेले व ओक .]

**धारण**—याचा अर्थ जिन्नसांच्या किंमती किंवा बाजारभाव. किंमती वाढण्याचीं कारणें दोन प्रकारचीं असतात तीं ( १ ) बाह्य व ( २ ) अन्तर्गत. बाह्य कारणें म्हणजे एकंदर जगांतील व्यापारविषयक व इतर उलाढालींचे आपल्या देशावर होणारे परिणाम. हीं बाह्य कारणें जगांतील सर्व देशांनां सरसकट सारखीं लागू होत असतात. हीं बाह्य कारणें मुख्यतः पुढीलप्रमाणें आहेतः—

( १ ) जगांतील बाजारांत जिन्नसांनां उत्तरोत्तर चालू असलेली वाढती मागणी. अशी मागणी वाढण्याचें मुख्य कारण म्हणजे जगांतील सर्व लोकसमाजांची शैक्षणिक व आर्थिक स्थिति सुधारत असल्यामुळें लोकांची राहणी उच्च बनत चालली व त्यामुळें खाण्यापिण्याच्या व वस्त्रप्रावरणाच्या सर्व प्रकारच्या जिन्नसांनां मागणी वाढत आहे. दुसरी गोष्ट खाद्येतर अनेक जिन्नसा तयार करण्याकरितां धान्यांचा उपयोग करावा लागतो. उदा. कापडाच्या गिरण्यांत खळीकरितां तांदुळाच्या, मक्याच्या वगैरे पिठांचा उपयोग; कृत्रिम रबराकरितां कणिकेचा उपयोग, किंवा यंत्रांकरितां तेलांचा उपयोग, वगैरे बाबतींत धान्यांचा खप वाढत असल्यामुळें धान्यांचे भाव वाढण्यास मदत होते. तिसरें कारण असें कीं, जगांतील दळणवळणाच्या साधनांची वाढ होत असल्यामुळें विपुल धान्य किंवा जिन्नस उत्पन्न होणाऱ्या ठिकाणाहून दूरदूरच्या देशींहि माल जाण्याची सोय झाल्यामुळें कोणत्याहि जिनसांची स्थानिक विपुलता मुळींच टिकत नाहीं; कारण अधिक किंमतीच्या व नफ्याच्या आशेनें माल दुसरीकडे रवाना होतो. जगांतील मागणी वाढण्याचें आणखी कारण असेंः पृथ्वीच्या पाठीवरील अनेक अज्ञात भूप्रदेश ज्ञात होत असून तेथें वसाहती होत आहेत व त्यामुळें जगाच्या एकंदर लोकसंख्येची वाढ होऊन त्यामानानें जिन्नसांनां मागणी उत्तरोत्तर वाढत आहे. मालाची मागणी वाढण्याचें आणखी एक महत्त्वाचें कारण अलीकडे उद्भवलें आहे तें हें कीं, कायमचें युद्धसाहित्य तयार करून ठेवण्याची प्रवृत्ति प्रत्येक राष्ट्रांत दिसूं लागली असून ती इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, जपान वगैरे प्रमुख राष्ट्रांत वाढत आहे. दारूगोळा, लढाऊ जहाजें व विमानें वगैरे युद्धसाहित्याकरितां लोखंडादि धातू व लांकूड यांचा खप होत असल्यामुळें या जिन्नसांच्या किंमती वाढल्या आहेत. सदरहू कारणामुळें गेल्या एकोणिसाव्या शतकांत जगांत मालाची मागणी पूर्वीच्या शतकांच्या मानानें फार वाढली आहे व ती विसाव्या शतकांत उत्तरोत्तर वाढतच आहे.

( २ ) किंमती वाढण्याच्या बाह्य कारणांपैकीं दुसरें, जगांतील खाणींतून सोन्याचा वाढत असलेला पुरवठा हें होय. सोन्याचा किंवा रुप्याचा पुरवठा वाढल्यामुळें रुपयाची किंवा पौंडाची किंमत कमी झाली आहे म्हणजेच इतर जिन्नसांच्या किंमती त्यामानानें वाढल्या आहेत.

( ३ ) सोन्यारुप्याच्या नाण्यांप्रमाणें जगांतील पतहि वाढली असल्यामुळें किंमती वाढल्या आहेत.

( ४ ) बाह्य कारणांपैकीं शेवटचें कारण जगांत होणारीं युद्धें. १८९७ सालापासून पाठोपाठ बोअर युद्ध, रूसो-जपानी युद्ध व महायुद्ध हीं तीन युद्धें थोडक्या काळावधींत झालीं. युद्धकाळीं बराचसा मजूरवर्ग व भांडवल युद्धसाहित्याकडे गुंतल्यामुळें इतर जिन्नसांची निपज शांततेच्या काळांतल्याइतकी होत नाहीं व त्यामुळें सरसकट सर्व जिन्नसांच्या किंमती युद्धकाळांत एकदम वाढतात. याशिवाय व्यापारी संघ, जाहीरातींवर होणारा अतोनात खर्च, चैनीच्या पदार्थांची वाढ, वगैरे गोष्टींमुळेंहि अन्नवस्त्राविषयक आवश्यक जिन्नसांच्या किंमती वाढल्या आहेत. किंमती कमजास्त होण्याला अन्तर्गत म्हणजे विशिष्ट देशांतल्या देशांत कारणें उत्पन्न होतात तींः—

( १ ) धान्यांच्या किंमती वाढण्याचें मुख्य कारण देशांतील वाढत्या लोकसंख्येच्या मानानें धान्यांच्या निपजीचें प्रमाण वाढत नाहीं हें होय. मालथसनें हाच महत्त्वाचा सिद्धांत पुढें मांडला आहे. हिंदुस्थानासंबंधानें पांचपांच वर्षांच्या लोकसंख्या व धान्योत्पत्ति यांच्या वाढीचें प्रमाण पाहिल्यास लोकसंख्या अधिक वाढली आहे असें दिसून येईल.

पंचवार्षिक वाढीचें सरासरी मान.

| साल | लागवडीची जमीन, एकर | धान्याचें क्षेत्र, एकर | लोकसंख्येची वाढ |
|---|---|---|---|
| १८९०-१८९५ | १०० | १०० | १०० |
| १८९५-१९०० | ९८ | ९६ | १०१.६ |
| १९००-१९०५ | १०३ | १०१ | १०३.७ |
| १९०५-१९१० | १०५ | १०२ | १०५.७ |
| १९१२ | १०६ | १०३ | १०८.४ |

( २ ) पर्जन्याची अनिश्चितता हें हिंदुस्थानसारख्या प्रत्येक शेतकीप्रधान देशांत धान्याचे भाव एकदम कमजास्त होण्याचें मोठें कारण असतें. विशेषतः हिंदुस्थानासंबंधीं ऑब्झर्व्हेटरीचा डायरेक्टर-जनरल वॉकर यानें असें म्हटलें आहे कीं, हिंदुस्थानांतल्याइतका पर्जन्यबाबत अनिश्चितपणा जगांतील दुसऱ्या कोणत्याहि देशांत नाहीं. हिंदुस्थानांतील दुष्काळाच्या बाबतींतहि हेंच प्रमुख कारण आहे.

( ३ ) तिसरें कारण धान्या ऐवजी धान्येतर कापूस, ज्यूट, तैलधान्यें वगैरे पदार्थांची लागवड हें होय. यांच्या लागवडीचें प्रमाण अलीकडे हिंदुस्थानांत सारखें वाढत असल्याकारणानें खाण्याच्या जिन्नसांचे भाव वाढले आहेत.

( ४ ) नवीन लागवडींत येणाऱ्या जमीनीचा निकसपणा हें महागाईचें एक कारण आहे. बहुतेक देशांतील चांगली जमीन पूर्वींच लागवडीखालीं आलेली आहे. वाढत्या लोकसंख्येबरोबर कांहीं नवीन जमीन लागवडींत येते; पण

ती उरलीसुरलेली टाकाऊच जमीन असते, त्यामुळें धान्योत्पत्ति कमी प्रमाणांत होते.

**हिंदुस्थानांतील धारण.**—हल्लींसारख्या पूर्वी धारण लिहून ठेवलेल्या वह्या सांपडत नाहींत. पूर्वीच्या मुख्य धान्याच्या किंमती व मिठाची किंमत कोठें कोठें दृष्टोत्पत्तीस येते. हल्लींच्या किंमतींत आणि पूर्वींच्या किंमतींत मुख्य फरक हाच आहे कीं, पूर्वींसारखा हल्लींच्या किंमतींत एकदम फरक पडत नाहीं. याचें कारण हेंच आहे कीं त्यावेळीं दळणवळणाचे मार्ग फार थोडे होते. पूर्वी एखाद्या देशांत उत्तम पीक झालें तर किंमत एकदम उतरत असे व दुष्काळ पडला तर किंमत अतिशय चढत असे. मुसुलमानी, मराठी व ब्रिटिश अमलांतील बाजारभावांचें मान पुढील कोष्टकावरून कळेल.

धान्यजिन्नसांचे दर.

| जिन्नसाचें नांव | अल्लाउद्दीन याचा काळ स.१३०० १२पायलींस रु. आ. पै. | अकबरचा काळ स.१५६० १२पायलींस रु.आ. पै. | पेशवाई अम्मल १७०० एका रुपयास | ब्रिटिश अंमल १९२५ एका रुपयास |
|---|---|---|---|---|
| गहूं | ०- ३-९ | ०-४-९ | ५ पायली | ४॥ शेर |
| बारली | ०- २-० | ०- ३-२ | ... | ... |
| चणे | ०- २-६ | ... | ४॥ पायली | ५॥ शेर |
| डाळ | ०- २-६ | ... | ... | ४॥ शेर |
| मठ | ०- १-६ | ०.- ३-० | ... | ५ शेर |
| तांदूळ | ०- २-६ | ०- ८-० | ३ पायली | ३॥ शेर |
| साखर | १- ४-० | १- ६-३ | २॥। शेर | ३ शेर |
| मीठ | ०- ४-० | ०- ६-३ | ... | १२ शेर |
| तूप | ३-१२-० | २- १०-० | २। शेर | -॥- शेर |
| बाजरी | ... | ०- ३-५ | ६ पायली | ६ शेर |
| तेल | ... | ० १०-० | ५॥ शेर | १॥ शेर |
| हळद | ... | ०- ४-० | ... | ... |
| कांदा | ... | २- ५-० | ... | ... |
| कोंडा | ... | ०- ०-८ | ... | ... |

**पेशवाईतील भावासंबंधीं ऐतिहासिक टिपणें**,५ आक्टोबर १७६६:—मुंबईस तोफा चांगल्या मिळत. पांच शेरी, चार शेरी, तीन शेरी १५ तोफांना दहा हजार रुपये पडत.

११ जून १७७०.—साडेसहा पावणेसात पायली जोंधळे; हरभरे पावणेचार; गहूं साडेतीन; तांदूळ अडीच; तूप सात रुपये कच्चा मण; गूळ पावणेदोन; तंबाखू दीड रुपया.

१८ नोव्हेंबर १७७०:—या वेळीं महागाई होती, ज्वारी दोन पायली, तांदूळ सव्वादोन पायली, हरभरे २ पायली, तूप दीडशेर. " आम्ही ब्राह्मण चौघे व माणसे तिघे इतक्यांस दीडरुपयापर्यंत रोज लागतो."

१२ नव्हेंबर १७८१:—इंग्रजी बानशी उपयोगांत असत. त्या नमुन्याच्या देशी तयार होत नव्हत्या. पुण्यांतील धारण ज्वारी साडेसात पायली, गहूं पांच पायली व बाजरी सहा पायली.

२३ डिसेंबर १७८१:—दुर्बिणींची आवश्यकता भासत होती. २१३ कोस दूरचें दिसणाऱ्या दुर्बिणींची किंमत १७ रुपये असे. या परदेशांतून इंग्रजांबरोबर येत. केशर दर शेरीं ३२ रुपये. गुलाबपाणी दर शेरीं ३ रुपये. पुण्यांतील धारण—ज्वारी साडेपांच निटवें; बाजरी सव्वापांच; हरभरे सव्वाचार साडेचार; तांदूळ सव्वातीन पायली–मध्यम; चांगले तीन पायली;हत्तीभोग तांदूळ पावणेचार पायली; तूप सव्वादोन शेर; तेल साडेपांचशेर.

३० डिसेंबर स. १७८१.—यावेळीं जिनसा समुद्रांतून येऊं जाऊं देत नसत. हिंग दर कच्च्या मणास ४६ रुपये. इंग्रजी लोखंड तेव्हां मिळत नव्हतें. शिसें कच्च्या मणास ११ रुपये. इंग्रजी शिसें दर मणीं रु. १३ प्रमाणें होतें.

११ मार्च १७८३:—सागवान, दर गाडींत पांच तुळया, लांबी अकरा–बारा हात व जाडी पांच तसू. दर प्रत्येक गाडीस ३५ रुपये. त्यावेळीं सागवान फार महाग होतें.

२६ जाने. इ. स. १७९०:—इंग्रजी लोखंड दर रुपयास सव्वातीनशेर पक्के. सुरुंगाची दारु रुपयास पक्के सहा शेर.

२ सप्टेंबर इ. स. १७९०:—पुण्यास अडीच–तीन पायली धारण होती. सरकारची आज्ञा तीन पायली विकावी म्हणून. तेव्हां बाजार बंद. चोरून लपून मारवाडी २॥ पायली विकीत. वरकड जिन्नस—तूप दोनशेर, तेल साडेतीनशेर, गूळ सव्वातीनशेर, साखर अडीच— पावणेतीन शेर.

जानेवारी इ. स. १७९१:—डबीचीं घड्याळें बाळगण्यास सुरुवात झाली होती; तीं नीट करतां येत नसत.

२७ डिसेंबर इ. स. १७९२ :—पुण्यांत महागाईचा कडका. चार साडेचार शेर धारण; पुण्यांत गल्ला आणावयाचा उद्योग झाला. गुजराथेंतील पीक जलमार्गानें इकडे आणलें. " इंग्रजानें करार केला आहे कीं दोन पायलींची धारण करून देतो. पनवेलीस दाणा आला आहे. "

जुलई इ. स. १७९३ :—परदेशांतून मुंबईस येणारीं घड्याळें खरेदी करण्यास सरकारांतून कारकून व कारागीर रवाना झाले होते.

१ मे, १७९५:—कडबा पांच सहा रुपयांनीं शेंकडा. नासिकहून डाळी व खानदेशांतून तूप, तेल, व सूत आणवीत.

वरील माहितीवरून दिसून येईल कीं, मागील दोन्ही अमदानींत धारण बरीच कमी होती. परंतु ब्रिटिश अमलापासून धारण वाढण्याला जी सुरुवात झाली आहे ती अद्याप थांबत नाहीं. पूर्वी इतर देशांना लागू असणारीं, वर दिलेल्या बाह्य व अन्तर्गत दोन्ही प्रकारांपैकीं बरीचशीं कारणें या

ब्रिटिश अमदानींतच एकदम उद्भवली. शिवाय हिंदुस्थानच्या विशिष्ट परिस्थितींत विशेष कारणें झालीं. पूर्वी मालाच्या रूपानें धारा देत असल्यामुळें धान्य येथेंच राहत असे. नगदीच्या रूपानें कर देणें सुरू झाल्यापासून धातु किंवा कागद मात्र जमीनदारांच्या हातांत राहतात. पूर्वी सर्व व्यवहार अदलाबदलीचा असे. दळणवळणाचे मार्ग वाढल्यामुळें वाटेल तितका माल–पैशाच्या लोभानें–बाहेर पाठविला जातो व येथील धारण वाढत जाते. हल्लीं अदलाबदलीचा धंदा न राहिल्यामुळें, चैनी वाढल्यामुळें, व सर्व व्यापार परक्यांच्या ताब्यांत असल्यामुळें शेतकरी लोक आपलें बहुतेक उत्पन्न विकून पैसे करण्याच्या मार्गास लागले आहेत. धान्यांची जरूरी पडली म्हणजे, कर्ज काढून मिळेलत्या भावानें, वाटेल त्या जातीचें धान्य घेऊन उपजीविका करतात. इकडील धान्य बाहेर जाऊं लागल्याकारणानें इकडे फक्त चांदी व कागद हातीं खेळूं लागले आहेत. १८६० पूर्वीची स्थिति पाहिल्यास दोन भावांमध्यें फरक एवढाच आहे कीं, पूर्वी जो भाव आहे तो त्यांच्या पिकावद्दल मिळालेला शेतकऱ्यांचा आहे आणि हल्लीं गिऱ्हाइकांचा भाव आहे. शेतकऱ्यांनां मिळालेला पैसा बराच कमी असला पाहिजे, कारण ते बहुतेक सावकाराच्या आधीन असतात. गिऱ्हाईकांनां पडणारा भाव जास्त असला पाहिजे, कारण गिऱ्हाइकें नेहमीं दलालाच्या आधीन. हल्लींचा भाव म्हणजे सुधारणेच्या नंतरचा आहे. म्हणून पूर्वींच्या किंमतींत आणि हल्लींच्या किंमतींत तुलना करतां येणार नाहीं. १८६१ पासून मुख्य जीं स्वस्त धान्यें–तांदूळ, गहूं, जव, ज्वारी, बाजरी, नाचणी, चणे–यांच्याच किंमती फक्त पूर्णपणें सांपडतात, येथें एका रुपयाला, किंवा अमुक रुपयांनां अमुक शेर धान्य मिळतें असाच भाव कळविला जातो.

१८६१ नंतर भाववाढीचीं कारणें.—बंडानंतर बरीचशी सुधारणा होऊन शान्तता प्राप्त झाली होती तरी अमेरिकेबरोबर लढाईमुळें तिकडील कापूस येणें बंद झालें व येथून विलायतेस कापूस जाऊं लागला. म्हणून येथील शेतकरी पैशाच्या मोहाला बळी पडून कापूस पिकवून बाहेर पाठवूं लागले. त्यामुळें इतर धान्यांकडे दुर्लक्ष होऊन महागाई होऊं लागली.

ही लढाई संपल्यानंतर कांहीं वर्षांच्या अंतरानें दोन तीन ठिकाणीं दुष्काळ पडले; ह्यास्तव भाव जो वाढला होता त्याला मूळस्थितीवर येण्याला अवकाशच सांपडला नाहीं. वर लिहिल्याप्रमाणें दिवसेंदिवस धारण वाढतच जात होती. याचीं मुख्य कारणें तीन आहेतः—निर्गत, चांदीची अतिशय आयात आणि दुष्काळ. परकी राज्य असल्यामुळें परमार्थापेक्षां साहजिकच स्वार्थाचा पगडा वर राहणार. मुख्यतः याच निर्गतीमुळें दुष्काळ पडत असत व हे दुष्काळ कोणत्या तरी प्रांतांत अद्यापपर्यंत चालूच आहेत. म्हणून जोंपर्यंत हें मुख्य कारण नाहींसें होत नाहीं तोंपर्यंत धारण कमी होण्याची आशा करण्याचें प्रयोजन नाहीं. वर दिलेल्या कारणांत लोकसंख्येची वाढ हेंहि कारण धारण जास्त होण्यांत नमूद केलें पाहिजे.

घाऊक किंवा ठोक किंमत.—स.१८६० पूर्वीचे घाऊक धारणेचे आंकडे मिळत नाहींत. किरकोळ धारणेची व घाऊक धारणेची स.१८६० पर्यंत साधारण तीच स्थिति आहे. मुख्य आयातीचे जिन्नस म्हणजे सूत, कापड, तांबें आणि लोखंड ह्यांत प्रत्येकाच्या निरनिराळ्या तऱ्हा आहेत असें समजावें. हे जिन्नस परदेशांतून मागणीपेक्षां जास्त आले तर साहजिकच त्यांची किंमत कमी होणार; आणि मागणीइतके जिन्नस आले नाहींत तर किंमत वाढणार हा नियम आहे. साखर, कोळसा व रॉकेल यांच्या किंमतींत जो फरक झाला आहे त्याचें कारण हें आहे कीं, त्यांतील बराचसा माल येथेंच उत्पन्न होऊं लागला आहे.

निर्गत वाढत्या प्रमाणावर होऊं लागल्याकारणानें किंमत वाढूं लागली. परंतु मध्यंतरीं जकातीचे दर कमी केल्यामुळें ही किंमत कमी झाली. कांहीं काळानें दुष्काळ पडला व धारण पूर्वस्थितीला येऊन पोंचली. एकदां यूरोपमध्येंच इकडील मालाला मागणी कमी आल्यामुळें भावांत बराच फरक पडला. साधारणपणें असें दिसून येईल कीं ज्या परिस्थितींत किरकोळ धारण कमीजास्त होते तीच परिस्थिति घाऊक धारणेला लागू पडते. किंमत कमी किंवा जास्त–आयातीच्या मालाची असो वा निर्गतीच्या मालाची असो, किंवा आंतर्देशीय मालाची असो–होणें हें साधारण चलनी नाण्याच्या व्यवहारावर अवलंबून आहे. देशांत चलनी नाणें जास्त असल्यास धारण वाढते, म्हणजे नाण्याची किंमत कमी होते; उलटपक्षीं नाणें कमी असल्यास त्याची किंमत वाढून धारण किंवा भाव उतरतो. दुसरीं कारणें व्यापाराची वाढ, जकातीच्या दरांत बदल व मागसलेल्या देशांचें सुधारणें हीं आहेत. परंतु मुख्य कारण पहिलेंच आहे.

हिंदुस्थानांतील स.१९१० नंतरची महर्घता.—ब्रिटिश अमदानींत मागील दोन्ही अमदानींपेक्षां भाव स. १९१० पर्यंत सारखे वाढतच गेले. तथापि स. १९१४ सालीं महायुद्ध सुरू झाल्यानंतर हे भाव इतके विलक्षण वाढले कीं, मागील कोणत्याहि दुष्काळाच्या सालासारखी स्थिति दरसालच चालू राहिली. महायुद्ध नुकतेंच संपतें न संपतें तोंच १९१८–१९ सालीं इन्फ्लुएंझाची सांथ व दुष्काळ या दोन्ही आपत्ती एकाच सालीं आल्या आणि १९१९–२० सालीं महागाईची अगदीं कमाल झाली. याची कल्पना पुढें दिलेल्या कोष्टकावरून येईल.

तथापि या महागाईपासूनहि कित्येक वर्गांचा फायदा झाला. शेतकरी व कित्येक कारखानदार यांनां धान्याची व मालाची निपज करण्यांत लागणारा खर्च फारसा वाढण्यापूर्वींच बाजारभाव वाढल्यामुळें फायदा झाला. तसेंच जमीनदारवर्गालाहि जमीनीचा खंड पूर्वींप्रमाणेंच कायम

वाढून धान्याचे दर वाढल्यामुळें फायदा झाला, व अधिक फायदा पडूं लागल्यामुळें शेतजमीनीच्या किंमती वाढून जमीनी विकणारांनां फायदा मिळाला. मजुरीचे दर वाढल्यामुळें मजूरवर्गाची स्थिति सुधारली. उलटपक्षीं बंगाल, अयोध्या, कोकणांतील खोत वगैरे ज्या प्रांतांत जमीनदारांचा खंड पैशांमध्यें कायम ठरलेला आहे त्यांचें नुकसान झालें. तसेंच कायम व्याजाच्या दराच्या गव्हर्नमेंट सिक्युरिटीज, डीबेंचर्स ( कर्जरोखे ) वगैरेमध्यें ज्यांच्या रकमा गुंतलेल्या होत्या त्यांचें व वकील, डॉक्टर व इतर धंदेवाले–ज्यांनां आपली मिळकत भराभर वाढवितां येईना–त्यांचें नुकसान झालें.

महागाईदर्शक कोष्टक.
( १९००–०९ सालच्या सरासरी किंमती १०० धरून )

| जिन्नसाचें नांव | १९०० | १९०५ | १९१० | १९१३ | १९१६ | १९१८ | १९१९ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| गहूं | १०६ | ८४ | १०९ | १०७ | १२८ | १४९ | २११ |
| रंगून तांदूळ | ९४ | ७५ | ९७ | १२४ | १०१ | ८८ | १३१ |
| देशी तांदूळ | ८३ | ८६ | ९९ | ११७ | १२७ | १०१ | १७८ |
| कापूस | ९५ | ९३ | ९४ | १३४ | १२७ | २८३ | २७६ |
| कापसाचें— | | | | | | | |
| कापड देशी | ९४ | १०० | ११८ | ११५ | ८८ | १४१ | १७६ |
| परदेशी | ९१ | ९६ | ११४ | ११९ | १२६ | २९५ | ३२२ |
| चहा | ९४ | ९१ | १२७ | १२८ | १५८ | १३१ | १२४ |
| तूप | ८८ | ९६ | १२४ | १४२ | १३४ | १६२ | २०४ |
| मीठ | ९५ | ९६ | १०८ | १०६ | १८८ | ४९६ | ३३० |
| जाड्या साखर | ... | ११८ | १०७ | १०० | १७५ | १५८ | २३२ |

**धारणी**—महायानपंथीय वाङ्मयाचा मोठा व महत्त्वाचा भाग म्हणजे धारणी अथवा 'अभ्यास'. आशीर्वादमंत्र व जादूचे मंत्र यांची जरूरी असते ती अत्यंत प्राचीन काळींच झालेल्या वैदिक मंत्रांनीं, विशेषतः अथर्ववेदांतील मंत्रांनीं भागविली होती; आणि असल्या मंत्रांची जरूरी हिंदु लोकांच्या मनाला नेहमीं अत्यंत वाटत असल्यामुळें बौद्ध धर्मांतहि त्यांनां फांटा देणें शक्य झालें नाहीं. सिलोनमधील बौद्ध लोक पाली तिपिटक या धर्मग्रंथांतील अत्यंत सुंदर सूत्रांपैकीं कांहींचा परित्तांप्रमाणें अथवा पिरितांप्रमाणें उपयोग करीत असत. तशाच रीतीनें हिंदुस्थानांतील महायानपंथीय बौद्धांनींहि कांहीं सूत्रांनां जादूचे मंत्र बनविले होते. शिवाय यांच्या भरीला, महायानपंथांतील बौद्ध व हिंदु धर्मांतून मूळ घेतलेल्या अशा असंख्य देवतांचीं अगणित प्रार्थनासूक्तें होतीं, आणि शेवटचें पण कमी महत्त्वाचें नव्हे, असें म्हणजे यजुर्वेदांतील यज्ञविषयक गूढ भागांत नेहमीं येणारे असे गूढार्थमय शब्द व वर्ण घेऊन जादूच्या कामाकरितां केलेलें सूत्र होय. याचें मेघसूत्र हें चांगलें उदाहरण आहे. इतर महासूत्रांप्रमाणें याचा आरंभ असा आहे. "याप्रमाणें आम्हीं असें ऐकलें आहे, एकदां भगवान् नंद आणि उपनंद या नागराजांच्या राजवाड्यांत गेले," इत्यादि. पुढें नागदेवतांनीं बुद्ध व बोधिसत्त्व यांची कशी पूजा केली तें सांगितलें आहे. पूजा झाल्यावर एका नागराजानें भगवान बुद्धाला असा प्रश्न केलाः "हे भगवन्, सर्व नागांचीं दुःखें कशीं दूर होतील, व त्यांनां संतोष व आनंद कोणत्या उपायानें होईल तें सांगा. कारण दुःखरहित होऊन आनंदित झाले म्हणजे हे नाग योग्य काळीं हिंदुस्थानावर भरपूर पर्जन्यवृष्टि करतील; व त्यायोगानें सर्व जातींचीं गवतें, झुडपें, वनस्पती व वृक्ष वाढतील, सर्व प्रकारचीं बियें रुजतील व सर्व रस वाहूं लागतील व हीं सर्व हिंदुस्थानांतील लोकांचीं सुखसाधनें होत."

या प्रश्नानें संतुष्ट होऊन बुद्धानें उत्तर केलें, "नागराजा, एका धार्मिक आचाराच्या योगानें ( धर्म ) तुमच्या सर्व नागांचीं दुःखें पूर्णपणें नाहींशीं होतील, व त्यांनां सुखप्राप्ति होईल." "तो धर्माचार कोणता"? "तो म्हणजे उपकार (मैत्री).हे नागराज, देव व मानव जे कोणी श्रेणीप्रमाणें मैत्रीनें राहतात, त्यांनां अग्नि दहन करूं शकत नाहीं.खड्ग इजा करूं शकत नाहीं, पाणी वाहून नेऊं शकत नाहीं, विष ठार करीत नाहीं, शत्रुसैन्य जिंकूं शकत नाहीं. ते शांतपणें निद्रा घेतात, शान्तपणें जागे होतात आणि स्वतःच्या सद्गुणांनीं त्यांचें संरक्षण होत असतें. म्हणून, हे नागराजा, शरीर, वाणी व मन या तिन्हीं साधनांनीं त्वां परोपकाररत असलें पाहिजे. शिवाय, हे राजा, सर्व–सुखंददा ( सर्व–सुखें देणाऱ्या ) धारणीचा उपयोग त्वां केला पाहिजे. ह्यानें सर्व नागांचीं संपूर्ण दुःखें दूर होतील, सर्वांनां निर्वाण–प्राप्ति होईल नंतर हिंदुस्थानभर यथाकालीं पर्ज्यन्यवृष्टि होईल, व त्यायोगें सर्व गवतें, झुडपें, वनस्पती व वृक्ष वाढतील, सर्व बियें रुजतील व रस वाहतील आणि ही धारणी कशी असते?"

नंतर खुद्द धारणीबद्दल वर्णन दिलें आहे. धारणीमध्यें अगणित देवतांच्या ( जसे, "धारणकर्त्री, आधारदात्री" ) बुद्धांच्या आणि बोद्धिसत्त्वांच्या प्रार्थना असून त्यांमध्यें कांहीं वाक्यें जोडून दिलेलीं आहेत ( जसें, "दुःखनिवारण कर," "मार्ग शुद्ध कर" ) आणि सर्पावरचे मंत्र आहेत ( जसें, "या, तुम्ही मोठे नाग......हिंदुस्थानावर पाऊस पाडा" ) आणि शेवटीं मधून मधून अक्षरें आलेलीं आहेत ( जसें, "सर सिरे सिरे सुरु सुरु नागानाम् जव जव जिवि जिवि जुवु जुवु इ. ); शेवटीं धरणीबरोबर करावयाच्या मंत्रतंत्रांचें वर्णन दिलें आहे, आणि असें सांगितलें आहे कीं, पर्जन्यवृष्टि होण्याला या सूत्रांचा उपयोग करणें, याखेरीज दुसरें चांगलें साधन नाहीं.

अशाच रीतीनें सूत्रांचा एक भाग म्हणूनहि धारणी बरेच वेळां येतात, आणि त्या धारणी ज्या परिस्थितींत

सांगावयाच्या तिचें वर्णन केलेलें असतें. शिवाय एकेक धारणीचे निरनिराळे पाठ अशा अनेक धारणी आहेत, आणि तसेच धारणींचे मोठाले संग्रहहि आहेत. आपणांस त्यांत प्रतिकूलग्रहपीडानिवारक मंत्र, विषबाधानिवारक यंत्र, सर्प व पिशाचें यांच्यावरील मंत्र, रोगनाशक मंत्र, आयुष्यवृद्धिकारक मंत्र, युद्धांत विजयप्राप्ति होण्याचे मंत्र, सुखावती स्वर्गांत पुन्हां जन्म प्राप्त होण्याचे मंत्र, वाईट जन्म न येण्याबद्दल मंत्र, पातकनिवृत्ति होण्याचे मंत्र आढळतात. दुसरे असलेहि मंत्र आढळतात कीं, त्यांच्यायोगानें बोधिसत्त्व उत्पन्न करतां येतो, किंवा स्वतःचा नास्तिकपणापासून बचाव करतां येतो. पंचमहाभूतांवर धारणींचा प्रयोग चालतो इतकेंच नव्हे तर त्यांच्या योगानें गरोदर स्त्रीला पुत्र अथवा कन्या तिच्या इच्छेनुरूप प्राप्त होऊं शकते. नेपाळमध्यें "पंचरक्षा" ( "पांच रक्षण" ) फार लोकप्रिय झालेली आहे; पंचरक्षा हा पांच धारणींचा संग्रह आहे, त्यांचीं नांवें:—( १ ) रोग, पाप व इतर अनिष्ट गोष्टींपासून संरक्षण करण्याकरितां महाप्रतिसरा, ( २ ) भूतपिशाच्चांविरुद्ध महासहस्रप्रमार्दिनी, ( ३ ) सर्पविषावर महामयूरी, ( ४ ) शत्रुग्रह, रानटी पशू व विषारी जंतू यांच्यावर महाशीतवती आणि ( ५ ) रोगनिवारक महा ( रक्षा )-मंत्रानुसारिणी. सर्व प्रकारच्या असुरी शक्तींपासून बचाव करणाऱ्या या धारणींचा बरेच वेळां मंत्रसिद्ध ताईतांप्रमाणें उपयोग करतात.

कांहीं धारणी म्हणजे केवळ तत्त्वज्ञानविषयक सूत्रांचा एक प्रकारचा संग्रह असून त्यांत तीं तत्त्वें दिलेलीं असतात; आणि त्यांमध्यें तत्त्वांच्या सारांशापेक्षां गूढार्थक व दुर्बोधार्थक शब्दांनां अधिक महत्त्व दिलेलें असतें. या प्रकारांत दोन प्रज्ञापारमिताहृदयसूत्रें येतात, यांचे संस्कृतांतील मूलग्रंथ जुन्या ताडपत्रांवर लिहिलेले इ. स. ६०९ पासून जपानांतील होरियुजीच्या मठांत जपून ठेविलेले आहेत. हीं सूत्रें प्रज्ञापारमितांचें 'हृदय' सांगतात, म्हणजे त्यांत सर्व दुःखहारक मंत्र आहेत, त्यांत बोधिसत्त्वाची पूर्णता दिली आहे, आणि म्हटलें आहेः—" हे दिव्यदृष्टि, तूं दुसऱ्या तीराला गेली गेली, गेली आहेस, दुसऱ्या तीराला पार गेली आहेस, कल्याण असो" ! जरी या वचनामध्यें प्रज्ञापारमितासूत्रांतील शून्यतातत्त्वाचें मर्म दिलें आहे असें कांहींसें मानतात तरी त्याचा आध्यात्मिक दर्जा उष्णीषविजयधारणीपेक्षां अधिक नाहीं; कारण ही धारणीहि येथील ताडपत्रांत सुरक्षित आहे व त्यांत अर्थशून्य प्रार्थनांची मालिकाच फक्त आहे.

महायानसूत्रांमध्येंहि धारणींनीं प्रवेश केला आहे. मागाहून जोडलेल्या ( २१-२६ ) सद्धर्मपुंडरीकाच्या प्रकरणांमध्यें धारणी आढळतात आणि लंकावताराच्या शेवटच्या दोन भागांत आढळतात. हे दोन भाग जुन्या चिनी भाषांतरांतले ( इ. स. ४४३ ) अद्यापि गद्याळ आहेत. तथापि धारणी हे अगदीं अलीकडचे ग्रंथ होत असें मानण्याचें कारण नाहीं. कारण ४ थ्या शतकापासून पुढें झालेल्या चिनी भाषांतरांत त्या आढळतात. तथापि बहुतकरून, पाली वाङ्मयांत जशा परित्ता आहेत त्यांसारखीं बौद्ध मतें ज्यांत आलेलीं आहेत अशीं स्पष्टार्थ सूत्रें हीं मूळचीं असावींत. परंतु त्यांतील दुर्बोध, व गूढार्थक पूर्णाक्षरें यांनांच हळूहळू महत्त्व देण्यांत येऊं लागलें. त्यांनां "बीज" म्हणजे त्यांत मंत्रांतील अद्भुत शक्ति गुप्त आहे असें मानूं लागले आणि शेवटीं शैव तंत्रांच्या महत्त्वामुळें हीं पूर्णाक्षरें म्हणजे पूर्णपणें अर्थरहित असें शब्दावडंबर बनलें, आणि यांनांच बौद्ध तंत्रांतील मुख्य भाग आहे असें मानूं लागले, पण प्रथम तसें महत्त्व त्यांनां नव्हतें.

**धारवाड**, जि ल्हा.—मुंबई इलाख्याच्या दक्षिण भागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ४६०२ चौरस मैल. मर्यादाः— उत्तरेस बेळगांव व विजापूर जिल्हे; पूर्वेस निजामचें राज्य, तुंगभद्रा नदी व तिच्या पलीकडे मद्रास इलाख्यांतील बल्लारी जिल्हा; दक्षिणेस म्हैसूर संस्थान व पश्चिमेस उत्तर कानडा जिल्हा. लांबी ११६ मैल व रुंदी ७७ मैल. धारवाड जिल्ह्याचे ठोकळ मानानें दोन भाग असून त्यांचें बाह्य स्वरूप, जमीन व उत्पन्न निरनिराळें आहे. साधारणपणें या दोन भागांच्या मधून बेळगांव-हरिहर हा रस्ता जातो. या रस्त्याच्या उत्तरेस व ईशान्येस नवलगुंद, रोन व गदग तालुक्यांच्या कांहीं भागांत, एकसारखी काळी जमीन असून तींत कापसाचें चांगलें पीक होतें. या मैदानाच्या आग्नेय भागांत कप्पतचे डोंगर आहेत. जिल्ह्याच्या पश्चिम भागांत, मलप्रभेच्या दक्षिण तीरापासून म्हैसूर सरहद्दीपर्यंत डोंगराच्या लहान लहान पुष्कळ रांगा असून त्यांच्यामध्यें लागवड केलेलीं सपाट खोरीं आहेत. जलविभाजक क्षेत्राच्या माथ्यावर हा जिल्हा असल्यामुळें ह्यांत मोठ्या नद्या मुळींच नाहींत. मुख्य सात प्रवाहांपैकीं ६ बंगालच्या उपसागरास मिळतात, व एक अरबी समुद्रास मिळतो. पूर्वेकडे वहाणाऱ्या मलप्रभा व तिला मिळणारी बेण्णीहल्ल, तुंगभद्रा व तिला मिळणाऱ्या वरदा, कुमुद्वती, वरदेला मिळणारी धर्मनदी, पश्चिमेकडे वहाणारी बेत्तिनुल्ला किंवा गंगावली या नद्या आहेत यांपैकीं फक्त धर्मनदीच्या पाण्याचा शेतकीकडे उपयोग करतात

धारवाड, कलघटगी, व बंकापूरच्या जंगलांत सागाचीं झाडें आहेत. यांत पुष्कळ प्रकारचे बांबूहि असून नांदुरकी, खैर, बाभळ, हिरडा, उंबर, चिंच, चंदन, शिसू वगैरे झाडें होतात. ह्या जिल्ह्यांत दक्षिण हिंदुस्थानांत सांपडणारे सर्व प्राणी आढळतात. मुंबई इलाख्यांत येथील हवा सर्वांत उत्तम आहे. डिसेंबर ते जानेवारीपर्यंत दंव बरेंच पडतें. फेब्रुवारीपासून एप्रिलच्या मध्यापर्यंत उन्हाळा असतो. जानेवारींत उष्णमान ८०°, मे महिन्यांत ९८° व पावसाळ्यांत ९१° असतें. नैर्ऋत्येकडील व ईशान्येकडील पावसाळी वारे ह्या जिल्ह्यावरून वहात असल्यामुळें जून ते डिसेंबरपर्यंत पावसाळा असतो; व सबंध वर्षांत पाऊस सरासरी ३३ इंच पडतो.

इतिहासः—या जिल्ह्यांत हनगल येथें पांडव रहात होते असा समज आहे. खि. पू. पहिल्या शतकांत, उत्तर कानड्यांत बनवासीच्या राजांच्या ताब्यांत धारवाडचा कांहीं भाग असावा असें ताम्रपटांवरून समजतें. या आंध्रभृत्य घराण्यानंतर गंग किंवा पल्लव राजे व नंतर कंदब नांवानें जैन घराणें होऊन गेलें. यापुढील इतिहासाचे तीन भाग पडतात. पूर्व चालुक्य व पश्चिम चालुक्य ( ६०० ते ७६० ); राष्ट्रकूट ( ९७३ पर्यंत ); पुन्हां पश्चिम चालुक्य ( ९७३ ते ११६५ ); कलचुरी ( ११६५–८४ ); होयसळ ( ११९२--१२०३ ), व देवगिरीचे यादव ( १२१०–९५ ); यादवांच्या वेळीं येथें कदंब नांवाचे मांडलिक राजे असून, त्यांची राजधानी बनवासी व हनगल येथें असे. स. १३१० त मलिक काफरनें कर्नाटक उजाड केलें व दक्षिणेकडील जिल्ह्यांवर महंमद तघ्लखानें पुन्हां स्वारी केली. पुढें हा जिल्हा विजयानगरच्या राज्यांत सामील झाला. तालिकोटच्या लढाईपूर्वी थोडे दिवस, हा जिल्हा विजापुरच्या सुलतानानें जिंकून घेतला. १६७३ सालीं अण्णाजी दत्तो यानें हुबळी शहर लुटलें व स. १७२६ त बाजीरावानें हा देश उध्वस्त करून टाकला. याप्रमाणें मोंगलांच्या मागून मराठ्यांनीं धारवाडवर आपला हक्क स्थापित केला. पुढें स. १७६४ त हैदरअल्लीनें मराठ्यांनां हुसकून लावून हा जिल्हा आपल्या ताब्यांत घेतला; पण पुढल्याच वर्षी माधवराव पेशव्यानें हैदरचा पराभव करून तो परत मिळविला. मध्यंतरीं हैदर व टिप्पू यांनीं कांहीं वेळपर्यंत ह्याचा पुन्हां ताबा घेतला, तरी स. १७९० त मराठ्यांनीं धारवाड काबीज केलें. १८३६ सालीं बेळगांव जिल्हा निराळा करून याचा आकार कमी करण्यांत आला.

धारवाड जिल्ह्यांत चालुक्य पद्धतीचे पुष्कळ सुंदर नमुने दिसतात. गदग, लकुंडी, डंबल, हावेरी आणि हनगल येथें चालुक्यांच्या वेळचे शिलालेख व स्मारकचिन्हें आहेत. सर्व जिल्हाभर जुने किल्ले, सुंदर आणि नक्षीदार इमारती आहेत; आण्णिगेरी, बंकापूर, चौदद्दामपूर, लक्ष्मेश्वर, आणि नरेगल वगैरे गांवींहि महत्त्वाचे शिलालेख असलेल्या इमारती आहेत. ९ पासून १३ व्या शतकांत चुन्याशिवाय बांधलेल्या सुंदर जखणाचार्यी देवालयांचे अवशेष आहेत. जखणाचार्य हा राजा होता; त्याच्या हातून चुकून घडलेल्या ब्रह्महत्येचें क्षालन करण्याकरितां, काशीपासून रामेश्वरापर्यंत देवालयें बांधण्यांत त्यानें २० वर्षे घालविलीं. जखणाचार्यी देवालयें, हेमाडपंती देवालयांसारखीं असतात. जिल्ह्याची लोकसंख्या (१९२१) १०३६९२४. पैकीं शेंकडा ८६ हिंदू, शें. १२ मुसुलमान व शेंकडा १ जैन आहेत. मुख्य भाषा अशुद्ध कानडी आहे; वरच्या वर्गांनां मराठी समजतें. जिल्ह्यांत लिंगायतांची संख्या बरीच मोठी आहे. शेंकडा ६२ लोक शेतकीवर व शेंकडा ४ लोक मजुरीवर पोट भरतात.

शेतकीः—तांबडी, काळी, व चिकण मातीची भुरकट जमीन, अशी तीन प्रकारची जमीन या जिल्ह्यांत आढळते. काळ्या जमिनींत कापूस चांगला पिकतो; ती वर्षांतून एक वेळच नांगरावी लागते व तिला खताची जरूर सहसा नसते. पण तांबड्या जमिनीला साधारणपणें खत देतात व वर्षांतून तीन किंवा चार वेळ नांगरतात. मुख्यतः रयतवारी पद्धत चालू असून सुमारें ४०० चौरस मैल जागा इनामी आहे. कलघगटी, हनगल व कोद हे तालुके सोडून इतर ठिकाणीं मुख्यतः ज्वारीचें पीक होतें; ह्या व पश्चिमेच्या तालुक्यांत भात हें मुख्य पीक आहे. याशिवाय गहूं, तूर, हरभरा, कुळीथ, ऊंस मिरची वगैरे पिकेंहि होतात.

मुंबई इलाख्यांत कापसाच्या उत्पन्नांत या जिल्ह्याचा पहिला नंबर असून येथील कापूसहि चांगल्या प्रतीचा असतो. स. १८२९ त बाहेरचें बीं आणून येथें कापसाची लागवड करण्याचे प्रयोग सरकारनें सुरू केले पण त्यांत यश न आल्यामुळें स. १८३६ त त्यांनीं आपले प्रयत्न बंद केले. पुढें १८४० सालीं कांहीं अमेरिकन शेतकऱ्यांनीं हुबळीच्या ईशान्येस ५ मैलांवर अमेरिकन कापसाच्या लागवडीचे प्रयोग सुरू केले. त्यांनां जरी प्रथम चांगलें यश आलें नाहीं तरी त्यांची भरभराट होत गेली व अमेरिकन कापसाला देशी कापसापेक्षां भाव चांगला असल्यामुळें, शेतकरी लोकहि या कापसाची पुष्कळ लागवड करूं लागले.

धारवाडी घोडे पूर्वी चांगले म्हणून समजले जात असत, पण इराणी व अबिसीनियन यांच्या स्वाऱ्यांत त्या जातीचे बहुतेक घोडे कामास आल्यामुळें हल्लींची जात खुजट, बेढब व हलक्या दर्जाची अशी दृष्टीस पडते. लागवडीच्या जमिनीपैकीं शेंकडा ४ एकरांनां कृत्रिम रीतीनें पाणी देण्याची सोय आहे. बहुतेक टांकीं व तलाव जुने असून विजयानगरच्या वेळेपासून ( १३३६--१५६५ ) अस्तित्वांत असावेत असा समज आहे. यांपैकीं करजगी तालुक्यांत हावेरी येथील, बंकापूर तालुक्यांत नागनूरचें व गदग तालुक्यांत डंबल येथील तळीं मुख्य आहेत कालव्यांपैकीं धर्मानदीच्या दक्षिण तीराचा कालवा मुख्य आहे. धारवाडचा बराच भाग वृक्षरहित आहे. अरण्याचे दोन भाग आहेत, ते पश्चिमेकडील तालुक्यांतील घनदाट अरण्यें, आणि पूर्व व दक्षिणच्या तालुक्यांतील रुक्ष अरण्यें हे होत. या घनदाट अरण्यांत चंदनाचीं व सागाचीं झाडें होतात. पूर्वी ह्या जिल्ह्यांत सोनें पुष्कळ सांपडत असे असें म्हणतात; न अद्यापहि कप्पत डोंगर व त्यांतून निघणाऱ्या नद्यांच्या पात्रांत थोडेंबहुत सोनें सांपडतें. पश्चिम भागांत पूर्वी मोठ्या प्रमाणावर लोखंड गाळण्यांत येत असे; पण हल्लीं सर्पणाभावीं हा धंदा फारच अल्प प्रमाणावर चालतो.

व्यापार व दळणवळणः—सुती व रेशमी कापड, घरगुती कामास लागणारीं नेहमीचीं भांडीं व दागिने हे जिन्नस तयार होतात. मोठ्या गांवीं कापड विणण्याचा धंदा बऱ्याच मोठ्या प्रमाणावर चालतो. नवलगुंद येथें सुंदर गालिचे करतात. धारवाड येथें कांचेच्या बांगड्या तयार होतात.

हुबळी व गदग येथें सरकी काढण्याच्या, कापूस दावण्याच्या आणि सूत काढण्याच्या गिरण्या आहेत.

व्यापाराचीं मुख्य ठिकाणें:—हुबळी, धारवाड, नवलगुंद, गदग, व राणीबेन्नूर. कापूस हा मुख्य निर्गत पदार्थ असून विलायती कापड, मिरच्या, नारळ, गूळ व सुपाऱ्या हे जिन्नस म्हैसूर आणि कानडा येथून येतात. ज्वारीचा स्थानिक व्यापारहि बराच मोठा आहे. बहुतेक व्यापारी ब्राह्मण व लिंगायत आहेत. सदर्न मराठा रेल्वेचा मुख्य फांटा अलनावरजवळ ह्या जिल्ह्यांत शिरून पूर्वेस हुबळी व गदग या गांवांवरून गेलेला आहे. हुबळीपासून एक शाखा आग्नेयीकडे निघून हरिहरजवळ म्हैसूर प्रांतांत शिरते; व गदगपासून दुसरी शाखा उत्तरेस विजापूरकडे जाते. धारवाडहून कुमठा, कारवार व वेंगुर्लें या बंदरांना जाण्याकरितां उत्तम रस्ते झालेले आहेत.

राज्यव्यवस्था:—धारवाड जिल्ह्यांत ११ तालुके व दोन पेटे आहेत. ते येणेंप्रमाणें:—धारवाड, हुबळी, गदग (मुंदरगी पेट्यासह), नवलगुंद (व नरगुंद पेटा), बंकापूर, रोण, राणिबेन्नूर, कोद, हनगल, करजगी व कलघटगी. येथील कलेक्टर हा सवानूर संस्थानचा पोलिटिकल एजंट असतो. जमिनविर पट्टी बसविण्याकरितां विजयानगरच्या कृष्णरायानें (१५०९-२९) रायरेख नांवाचें माप सुरू केलें. त्याकाळांत जमाबंदीच्या वेळीं फक्त जिराइत जमिनीची मोजणी होत असे व बागाईतांत जितकें बीं पेरलें जात असेल त्यात्याप्रमाणें अमुक खंडीची जमीन आहे असें म्हणत असत. विजापूर, सावनूर व मराठी राज्यांत हीच पद्धत सुरू होती. ब्रिटिश अमदानींत पहिली जमाबंदी १८४३ सालीं झाली. त्यानंतर उत्तरोत्तर करांचें उत्पन्न वाढत आहे. या जिल्ह्यांत धारवाड शहर, हुबळी, गदग, नवलगुंद, यमनूर, नरगुंद, राणीबेन्नूर, गुड्डगुड्डापूर, ब्यादगी, व हावेरी येथें म्युनिसिपालिट्या आहेत. यांशिवाय इतर ठिकाणचा स्थानिक कारभार जिल्हाबोर्ड व तालुकाबोर्डें यांच्याकडे आहे. साक्षरतेच्या बाबतींत मुंबई इलाख्यांतील जिल्ह्यांमध्यें धारवाडचा सहावा नंबर लागतो.

ता लु का.—धारवाड तालुक्याचें क्षेत्रफळ ४३२ चौरस मैल आहे. या तालुक्यांत धारवाड व हुबळी हीं दोन मोठीं गांवें असून खेडीं १२९ आहेत. लोकसंख्या (१९११) १०६४५६. हा तालुका डोंगराळ असून उत्तर व पूर्व भागांत काळी जमीन आहे. येथें पाऊस ३४ इंच पडतो.

गां व.—हें गांव मद्रास सदर्न मराठा रेलवेच्या फांट्यावर आहे. लोकसंख्या (१९११) ३०२८९ येथें एक पडीक किल्ला आहे. पश्चिमेस पश्चिम घाटापासून निघालेल्या लहान डोंगरांच्या रांगा मैदानापर्यंत जातात. झाडीमुळें पूर्वेच्या बाजूनें गांव व किल्ला हीं दृष्टीआड झालेलीं आहेत. गांव समुद्रसपाटीपासून २५८० फूट उंचीवर आहे. उंच जागीं असलेल्या कलेक्टर कचेरीजवळच उल्वी बसाप्पाचें देवालय व त्याच्या पलीकडे धारवाड किल्ल्याचें जणूं नाकच अशी मैलारलिंग टेंकडी आहे. येथील देवळांत दोन फारशी शिलालेख आहेत. त्यावरून स. १६७० त आदिलशहानें प्राचीन देवळाची मशीद केल्याचें समजतें. पुढें पेशव्यांनीं पुन्हां देऊळ बांधून मल्लारलिंगाची स्थापना केली. गांवाबाहेर पूर्वेस नवलगुंद व नरगुंद टेंकड्यापर्यंत, व ईशान्येस येलम्माची टेंकडी व परसगडपर्यंत काळ्या जमिनीचीं विस्तीर्ण मैदानें पसरलेलीं आहेत. आग्नेयीस ३६ मैलांवर मुलगुंदची टेंकडी दिसते.

किल्ला केव्हां बांधला गेला यासंबंधीं विश्वसनीय माहिती मिळत नाहीं. विजयानगरच्या हिंदू राजाच्या कारकीर्दीत धारराव नांवाच्या जंगलअधिकाऱ्यानें हा किल्ला स. १४०३ त बांधला अशी स्थानिक दंतकथा आहे. त्याचें क्षेत्रफळ ७६ एकर असून मुख्य वेस उत्तरेस असून तिच्या आंत पूर्वाभिमुख तीन दरवाजे आहेत. बालेकिल्ला व मुख्य किल्ला या दोहोंभोंवतीं खंदक होता. दुसऱ्या दरवाजावर शिलालेख (फारशी) आहे. तटाचें काम हिंदु पद्धतीचें आहे. शिलालेखावरून स. १६६० त दुरुस्ती झाली असें दिसतें. स. १५७३ त विजापूरचा सुलतान अदिलशहा ह्या किल्ल्यावर चाल करून आला व त्यानें सहा महिनेपर्यंत वेढा देऊन सर केला शिवाजीनें स. १६७४ त धारवाड जिंकलें होतें तें स. १६८५ त मोंगलानें घेतलें. नंतर तें पुन्हां १७५३ त मराठ्यांच्या हातांत गेलें. मध्यंतरीं मराठे व हैदर यांच्याकडे किल्ला जाई परंतु पुन्हां १७८८ सालीं परशराम भाऊनीं तो परत घेतला. यावेळीं धारवाडचा वसूल १२०१३० रु. होता. भाऊनें टिप्पूपासून हा स. १७९१ त कायमचा घेतला. ह्या किल्ल्याची रचना चांगली असून नैसर्गिक रीत्याच तो मजबूत होता. १८५७ पर्यंत त्याची डागडुजी नीट होत असे पण अलीकडे तो मोकळीस आला आहे. स. १८७५ पर्यंत येथें लष्कर असे.

या गांवास ७ महाल आहेत. गांवाभोंवतीं तट व पांच (मुदीहनुमान, नवलूर, तुचंबली, तेगूर व किल्ले असे) दरवाजे होते. स. १७५३ त भाऊसाहेब पेशवे यांच्या नांवाची सदाशिव पेठ वसविली (सांप्रतची हावेरी पेठ). लोकवस्तीपैकीं ब्राह्मण व लिंगायत ह्या जाती भरभराटींत आहेत. कापूस, लांकूड व धान्य यांचा बहुतेक व्यापार लिंगायतांच्या हातीं आहे. पारशी व मारवाडी बहुधा कापडाचा व्यापार करतात. कापूस व धान्य हे मुख्य निर्गत जिन्नस व विलायती कापड, मिरची, नारळ, काकवी, गूळ, खजूर, सुपारी, किराणा माल, नीळ, शिसें, जस्त, तांबें व पितळ हे आयात जिन्नस होत. तुरुंगांत गालिचे, कापड व वेतकाम होतें. येथील म्युनिसिपालिटी स. १८५६ त स्थापन झाली. विहिरीचें पाणी खारें असल्यामुळें तलावाचें पाणी पितात. सर्वांत मोठा हिरेकेरी तलाव असून कोपडकोरी, हलकेरी, लाल, परमनकट्टी हे लहान तलाव आहेत. धारवाडमध्यें एक कॉलेज, २ हायस्कुलें आहेत. मुल्की व न्यायखात्यांच्या कचेऱ्यांशिवाय येथें मद्रास स. म.

रेल्वेच्या एका विभागाची मुख्य कचेरी, रेल्वे दवाखाना, सरकारी दवाखाना, व वेड्यांचें हॉस्पिटल हीं आहेत. येथें पुष्कळ देवळें असून सर्वांत जुनें व्यासरायाचें रायर हनुमानाचें देऊळ आहे. इ. स. १५१० च्या सुमारास विजयनगरकरांनीं जीं सर्वत्र ३६० मारुतींचीं देवळें बांधलीं त्यांपैकीं हें एक आहे. [ फ्लीट-डिनॅस्टीज ऑफ धि कानडी डिस्ट्रिक्ट्स; बॉंबे रिव्हि. सेटलमेंट; धारवाड ग्याझे.; पेशव्यांची बखर; डफः मूर-नॅरेटिव्ह; वेरिंग-मराठाज; स्टोक-बेळगांव. ]

**धारापुरम्**—मद्रास इलाखा, कोइम्बतुर जिल्ह्यामधील एक तालुका. क्षेत्रफळ ८५३ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) १८१७३१. पैकीं हिंदू १७४८६१ आहेत. धारापुरम् हा एकच मोठा गांव असून ८३ खेडीं आहेत. जमीन सपाट असून, उत्तरेस नोइल नंदी आहे. पाऊस वीस इंच पडतो. येथें तंबाखूचें पीक चांगलें होतें. तालुक्याचें ठाणें धारापुरम आहे. लोकसंख्या १७१७८. स. १६६७ त हें म्हैसूरकरानें मदुरेच्या नायकापासून घेतलें. मंगलोरच्या तहाप्रमाणें हें स. १७६९ त हैदरास परत मिळालें. येथें गाड्या तयार होतात व व्यापारहि बरा चालतो.

**धारी**—(१) बडोदा संस्थान. अमरेली प्रान्तांतील धारी तालुक्याचें मुख्य ठिकाण धारी हेंच आहे. याची लोकसंख्या ( १९११ ) ४३९७. येथें एक जुनाट किल्ला आहे. नताली व शत्रूंजी या नद्यांच्या संगमावर एक जुनी मशीद व तलाव आहे.

( २ ) मुंबई इलाखा. रेवाकांठा एजन्सींतील एक लहान संस्थान.

**धारीवाल**—पंजाबांतील गुरुदासपूर जिल्ह्यांतील व तालुक्यांतील एक गांव. येथें कापड, फ्लानेल व साटीन वगैरेंच्या गिरण्या आहेत. येथें ब्लॅंकिटें व धाबळ्याहि तयार होतात..

**धारूर**—हा गांव व किल्ला मोंगलाईंतील निजामच्या राज्यांत आहे. उद्धवचिद्घन म्हणून जो साधु कवि होऊन गेला, तो येथें राहात असे. त्याची समाधि व मठ येथें आहे. येथील पाटील ब्राम्हण आहेत. गंगाधर कोकिल हा कवीहि येथें जन्मला. सांप्रत येथें कोकिळ घराणें आहे.

**धार्मिक उत्सव**—मनुष्य उत्सवप्रिय आहे. तेव्हां प्रत्येक राष्ट्रांत वर्षाच्या बहुतेक महिन्यांतून उत्सव आढळल्यास नवल नाहीं. शिवाय या उत्सवांना धार्मिक स्वरूप दिल्याकारणानें ते बहुधां सर्वांकडून पाळले जातातच. या लेखांत निरनिराळ्या राष्ट्रांतून उत्सव कसे चालतात याची थोडक्यांत माहिती दिली आहे.

**भा र ती य.**—प्राचीन काळचे सर्वच हिंदूंचे उत्सव धार्मिक स्वरूपाचे होते. याचें कारण त्यांचें वाङ्मय विशेषेंकरून धर्मविषयक होतें एवढेंच नसून, प्रत्येक बाबतींत धर्माचा धागा गुंतवावयाचा ही जी प्राचीन आर्यांची मनोवृत्ति हेंहि एक महत्त्वाचें कारण आहे.

प्राचीन उत्सवः—हिंदूच्या प्राचीन उत्सवांत पौर्णिमा व दर्श हे दिवस उत्सवाचे समजले जात. पण याहिपेक्षां 'चतुर्मासान्त' उत्सव हा विशेष महत्त्वाचा गणला जाई. दर चार महिन्यांच्या अखेरीस हा उत्सव केला जात असे. हिंवाळा, पावसाळा व उन्हाळा संपावयाच्या दिवशीं त्या त्या ऋतूच्या देवतेनिमित्त यज्ञ करण्याची चाल असे. सोमयज्ञाचेंहि प्राचीन काळीं फार प्रस्थ होतें. या यज्ञामध्यें जे भाग घेत त्यांना फुलांच्या माळांनीं भूषविलें जाई. नंतर रथांच्या शर्यती होत असत. मद्यपानहि यथेच्छ होत असे. अशा रीतीनें हा उत्सव मोठ्या थाटांत साजरा केला जाई. अश्वमेधयज्ञ हाहि त्या काळीं फार प्रचारांत होता. या यज्ञांत राजापासून रंकापर्यंत सर्व भाग घेत असत. श्रीमंत लोक आपल्या घोड्यांनां उत्तमरीतीनें सजवीत असत. यज्ञदिनीं गाणें, संवाद, वीररसपर काव्यें गायिलीं जात असत. अयनोत्सव, व द्वादशरात्र्युत्सव हेहि महत्त्वाचे उत्सव होते. याशिवाय, हल्लीं ज्या निरनिराळ्या तीर्थांच्या ठिकाणीं प्रचंड यात्रा भरतात त्यांचें मूळ, प्राचीन काळीं दृशद्वती, सरस्वति इत्यादि पवित्र ठिकाणीं यात्रा जमल्याचे व यज्ञ केल्याचे जे उल्लेख आहेत त्यामध्यें दिसून येतें.

अर्वाचीन उत्सवः—प्राचीन उत्सवांत व अर्वाचीन उत्सवांत एक महत्त्वाचा भेद म्हटला म्हणजे हा कीं, प्राचीन उत्सवांत विधींचें स्तोम फार असे व तें अर्वाचीन उत्सवांत दिसून येत नाहीं. पूर्वीचे, 'चतुर्मासांत' उत्सव, 'वर्षारंभोत्सव' इत्यादि उत्सव हल्लीं देखील साजरे केले जातात पण त्यांत पूर्वीसारखें आचारांचें बंड नसतें. शिवाय अर्वाचीन उत्सवांनां सार्वजनिक स्वरूप प्राप्त झालेलें दिसतें, हाहि अर्वाचीन उत्सवांचा एक विशेष आहे. उत्तर हिंदुस्थानांतलि महत्त्वाचे उत्सव म्हणजे, वसंतोत्सव. जगन्नाथ येथील जत्रा व प्रयाग येथील जत्रा हे होत. हे तीन्ही उत्सव फारच थाटांत होतात. दक्षिण हिंदुस्थानांत देखील पुष्कळ तीर्थांच्या ठिकाणीं यात्रा होतात. हजारों नव्हे लाखों लोक तीर्थामध्यें स्नान करून पावन होतात. दक्षिणेकडे वसंतोत्सव साजरा करण्यांत येतो त्यामध्यें कामचेष्टांनां पूर येतो. बंगालमधील दुर्गोत्सवांतहि असाच प्रकार आढळतो. होलिकोत्सव तर अभद्र गोष्टींचें माहेरघरच आहे असें म्हटल्यास हरकत नाहीं.

चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून फाल्गुनी अमावास्येपर्यंतच्या उभ्या वर्षांतील उत्सवांची मोजदाद केल्यास ते पुष्कळच भरतील. पण त्यांतल्या त्यांत महत्त्वाचे उत्सव जे असतील तेवढेच पहाणें भाग आहे. चैत्रप्रतिपदा हा वर्षारंभाचा दिवस म्हणून फार पवित्र मानला जातो. संक्रांतीचा सण सर्व हिंदुस्थानांत पाळला जातो. या दिवशीं प्रयाग येथें स्नानाला असंख्य लोक जातात. याच दिवशीं दक्षिणेकडे 'पोंगल' नांवाचा उत्सव साजरा केला जातो. या दिवशीं उन्हांत अग्नीवर दुधानें भरलेलें मडकें ठेऊन तें दूध कोणत्या दिशेनें उतू जातें हें पाहून त्यावरून पुढील वर्षाचें भविष्य

वर्तविण्याची वहिवाट आहे. हा मोठ्या आनंदाचा सण आहे. याशिवाय रामनवमी, गोकुळअष्टमी, नागपंचमी, गणेशचतुर्थी, विजयादशमी इत्यादि उत्सव अत्यंत थाटानें होतात. दीपोत्सव तर मौजेचें आगरच होय. या उत्सवांत प्रत्येक जण आपापल्या योग्यतेप्रमाणें नटत थटत असतो. जिकडे तिकडे दीपमाला लावण्यांत येतात. कांहीं ठिकाणीं देवतांच्या मिरवणुकी निघतात. संगीत, नाच, वाद्यवादन इत्यादि करमणुकीनें हा दीपोत्सव साजरा केला जातो.

वर जे उत्सव सांगितले ते विशेष महत्त्वाचे व अखिल हिंदुस्थानांत पाळले जाणारे तेवढेच सांगितले पण निरनिराळ्या प्रांतांत, निरनिराळे उत्सव साजरे केले जातात त्यांकडेहि दुर्लक्ष करून चालावयाचें नाहीं. विशेषतः मुंबई इलाख्यांत 'पंढरपूरची यात्रा' अत्यंत महत्त्वाची आहे. या यात्रेला लाखो लोक जमतात. विठोबाचें भजन करण्यांत, चंद्रभागेचें स्नान करण्यांत अत्यंत पुण्य आहे अशी या लाखो लोकांची समजूत असते. पुष्कळ ठिकाणीं स्थानिक उत्सव मोठ्या थाटानें पाळले जातात.अशा तऱ्हेच्या चैत्रांतील व नवरात्रांतील देवींच्या यात्रा, बालाजीच्या यात्रा, निर्मळ वगैरे ठिकाणच्या पुण्यपुरुषांच्या समाधीच्या ठिकाणच्या यात्रा हेहि उत्सव होत.कांहीं उत्सवांत धार्मिक स्वरूप प्रामुख्यानें दिसत नाहीं. महाभारतांत अशा उत्सवांचे उल्लेख आढळतात. त्यांतल्या त्यांत, अशा प्रकारच्या उत्सवांचें ढळढळीत उदाहरण म्हणजे पूर्वींचा 'स्वयंवर' उत्सव होय. या स्वयंवराच्या वेळीं निरनिराळ्या देशांचे राजे मोठ्या थाटानें नटून सजून स्वयंवराच्या जागीं येतात. त्यांपैकीं जो आवडेल त्याला राजकन्या माळ घालते व त्याच्याशीं तिचा विवाह होतो. याशिवाय हत्तींच्या लढाया ( साठमारी ) वगैरे उत्सव हेहि धार्मिक स्वरूपाच्या उत्सवांत पडत नाहींत.

[ संदर्भग्रंथ—नटेशशास्त्री–हिंदु फीस्ट्स, फास्ट्स अँड सेरीमनीज,मद्रास १९०३;वुइल्सन-सीलेक्ट वर्क्स,भाग २,लंडन १८६२; मॉनीअर वुइल्यम्स-मॉडर्न हिंदुइझम. लंडन१८७७.]

बौद्ध.—बौद्धांच्या धर्मग्रंथांतून खालील उत्सवांचा नामनिर्देश करण्यांत येतोः—

( १ ) उपोसथः—उपोसथ उत्सवांचें मूळ वैदिक चालीरीतींत आढळतें. दर महिन्याच्या पौर्णिमेला व अमावास्येला प्राचीन वैदिक लोक विशेष पवित्र मानीत. हांच चाल बौद्धांनींहि चालू केली. प्रथम प्रथम हे दोनच दिवस उपोसथांचे दिवस मानले जात पण पुढें दोन्हीं पक्षांतील अष्टम्या यादेखील या उपोसथोत्सवांत मोडल्या गेल्या व अशा रीतीनें उपोसथांचे दिवस चार झाले. या चार दिवशीं बौद्ध भिक्षु एके ठिकाणीं जमून, लोकांनां आपल्या धर्माचा उपदेश करीत असत. या दिवशीं बौद्धधर्मीय लोक उपवास करीत, शुभ्रवस्त्रें परिधान करीत व या चार दिवशीं पाठशाळांनां सुट्टी असे. या दिवसांमध्यें अहिंसा पाळणें, अदत्त ग्रहण न करणें, असत्य न बोलणें, मद्यपान न करणें, धर्मविरुद्ध कामाचें सेवन न करणें, वाईट फळें न खाणें; सुगंधी तेलें वगैरे न लावणें, चटयावर न निजणें, इत्यादि धार्मिक सूत्रांत सांगितलेल्या आज्ञा पाळाव्या लागत.

( २ ) वस्सः— वर्षांतून आठ महिने बुद्ध हा नेहमीं धर्मोपदेशासाठीं प्रचार करीत असे; व पावसाळ्याचे चार महिने तो एकाच ठिकाणीं रहात असे. पावसाळ्यांत बाहेर पडल्यास, भिक्षूंच्या हातून न कळत कां होईना पण अनेक लहान लहान जीव मरत असत. देशांतून जात असतांना लहान लहान वनस्पती चुरडल्या जात व त्यामुळें अहिंसातत्त्वाला बाध येत असे. ही आपत्ति टाळण्याकरितां बुद्धानें असा नियम घालून दिला कीं पावसाळ्यामध्यें बुद्धभिक्षूंनीं पर्यटण करूं नये. आपल्या विहारांतच राहून आपले धार्मिक विधि, धर्मपठण इत्यादि गोष्टी कराव्यात.

( ३ ) पवारणाः—वस्सकालाच्या अखेरच्या दिवशीं 'पवारणा' दिन साजरा केला जात असे. या दिवशीं सर्व भिक्षूंनीं एकत्र जमून वस्स कालांत प्रत्येकानें आपण काय पाहिलें, काय वाचलें व आपल्या काय शंका आहेत, याचा पाढा इतर भिक्षूंपुढें वाचावयाचा असे; व नंतर प्रत्येकाच्या वर्तनासंबंधीं ज्याला कांहीं बोलावयाचें असेल अगर सुचवावयाचें असेल त्याला तसें करण्याची मुभा असे. सर्व भिक्षू आपापल्यामध्यें गुण्यागोविंदानें रहातात अगर नाहीं हें यावेळीं सहज दिसून येत असे व त्याचसाठीं बुद्धानें हा दिवस पाळण्याची आज्ञा घातलेली होती.

(४)कठिणः—पवारणेनंतर लगेच 'कठिण' नांवाच्या उत्सवाला आरंभ होई. या दिवशीं संघाच्या भिक्षूंनां गृहस्थाश्रमी लोक भिक्षूंनां लागणारीं वस्त्रें दान करीत असत. यासंबंधींचे सर्व आचार महावग्गाच्या सातव्या खंडकांत सविस्तरपणें पहावयास मिळतात.

( ५ ) ऋतुः—वर्षांतून तीन ऋतूंच्या प्रारंभीं तीन यज्ञोत्सव करण्याची बुद्धपूर्व भारतवर्षाची चाल असे. तीच पुढें बुद्धानें चालू ठेवली. फक्त यज्ञांत हिंसा मात्र करावयाची नाहीं एवढा त्यानें फरक केला. पहिल्या ऋतूमध्यें वृक्षांच्या खालीं राहून भक्तिपूर्ण मनन करावयाचें. दुसऱ्या ऋतूकालामध्यें वस्स पाळावयाचा व तिसऱ्या कालांत पण्णशाला बांधून, अध्ययन व अध्यापन करावयाचें अशी बुद्धानें वहिवाट पाडली.

( ६ ) संगीतेः—या उत्सवांत सर्व धर्मगुरूंनीं व भिक्षूंनीं एकत्र जमून धर्मग्रंथाचें तालस्वरयुक्त पठण करावयाचें असे.

[ संदर्भग्रंथः—कर्न-मॅन्यूअल ऑफ इंडियन बुद्धिझम, १८९६; क्लौ-कर्मवाक्य दि रिच्युअल ऑफ दि बुद्धिस्ट प्रीस्टहुड; धम्मिक सुत्त; महावग्ग. ]

जैन.—जैनांमधील अतिशय महत्त्वाचा उत्सव म्हणजे 'पज्जूसन'चा उत्सव होय. हा उत्सव श्रावणाच्या शेवटच्या दिवसांत व भाद्रपदाच्या प्रारंभीच्या दिवसांत पाळला जातो. या उत्सवांत दिगंबर, श्वेतांबर इत्यादि जातींचे लोक उपासरा अगर मठ यांमध्यें प्रार्थना करतात. कल्पसूत्रांची मिरवणूक

काढतात. पर्यूषणाच्या उत्सवांतील शेवटचा दिवस संवत्सरी हा असून या दिवशीं सर्व जैन कडकडीत उपोषण करतात. संध्याकाळीं नटूनथटून देवदर्शनाला जाण्याचीहि वहिवाट आहे. पज्जूसनाच्या चवथ्या दिवशीं जैनगुरू महावीराची जयंतीहि थाटानें पाळण्यांत येते. इतर तीर्थंकराच्याहि जयंत्या पाळल्या जातात. पज्जुसनोत्सवाच्या खालोखाल, जैनांचा दुसरा महत्त्वाचा उत्सव म्हणजे दीपोत्सव होय. जैन लोक साधारणतः व्यापारी असल्यानें दीपोत्सवाचा सण ते फारच थाटानें पार पाडतात यांत नवल नाहीं. याशिवाय सिद्धिचक्रोत्सव, ऋतूत्सव, ज्ञानपंचमीचा उत्सव, मौंग्यारसोत्सव, आम्बेलोत्सव, गोमातेश्वरस्नानयात्रा इत्यादि उत्सव जैन लोकांत साजरे करण्यांत येतात. [ संदर्भग्रंथः—मार्गारेट स्टीव्हन्सन—नोट्स ऑन मॉडर्न जैनिझम, लंडन १९१०. ]

ति बे ट.—हिंदू व बौद्ध लोकांतील उत्सवांप्रमाणेंच तिबेटमधील लोकांचे उत्सव मुख्यः धार्मिक स्वरूपाचे असतात. तिबेटमधील उत्सवांचे सामान्यतः दोन भाग पडतात. ( १ ) बॉन लोकांचे उत्सव, व ( २ ) बुद्धधर्मीयांचे उत्सव. बॉन लोक हे तिबेटांतील मूळचे रहिवाशी होत. यांच्यामधील उत्सव मुख्यतः सृष्टिविषयक असतात. उदाहरणार्थ, अयनांच्या आरंभींचे उत्सव, अगर निरनिराळ्या ऋतूंच्या आरंभीचे उत्सव, याशिवाय पैतृक उत्सवांचेंहि माहात्म्य या लोकांत आढळतें. बौद्धधर्मीयांच्या उत्सवांत बुद्धाच्या चरित्रांतील अत्यंत महत्वाच्या गोष्टींच्या स्मृत्यर्थ होणारे उत्सव त्याचप्रमाणें, लामाधर्माचा संस्थापक पद्मसंभव व सॉंगखप नांवाच्या लामाधर्मामध्यें नवीन सुधारणा घडवून आणणारा धर्मगुरू यांच्याहि आयुष्यांतील स्मरणीय गोष्टींचा स्मृत्यर्थ होणारे उत्सव यांचा समावेश होतो. या उत्सावांमध्यें लोक आपलीं पोटाचीं कामें बंद ठेवून, हे उत्सवांचे दिवस, मौजेंत, धर्मपठणांत, देवालयांत जाण्यांत घालवितात. धर्मगुरू कडकडीत उपास करून, हा काल धर्मपठणांत खर्च करतात. प्रत्येक महिन्यांत साधारणतः एखादा तरी उत्सव तिबेटी लोकांत आढळून येतोच. लोगसर, मॉनलम, वज्र, कालचक्र, परिनिर्वाण, पद्मसंभवजन्मोत्सव, हे महत्त्वाचे उत्सव होत.[संदर्भग्रंथ—वॅडेल-बुद्धिझम ऑफ तिबेट, लंडन १८९५; कवागुची—थ्री ईयर्स इन तिबेट, लंडन १९०९. ]

ने पा ळ.—नेपाळांमधील उत्सवांत, हिंदु आणि बौद्ध धर्मांचें मिश्रण झालेलें आढळून येतें. निवार अगर राष्ट्रीय उत्सवांचें प्रस्थ, गुरखे लोकांच्या सत्तेखालीं पुष्कळ कमी झालें असलें तरी अद्यापीहि पुष्कळच उत्सव दरवर्षी साजरे केले जातात. या नेपाळी लोकांच्या उत्सवांत धर्मविधीपेक्षां, मौज व करमणुकीचेंच प्राबल्य दिसून येतें. भैरव जत्रा, गाइजत्रा, बन्‌ऱ्हाजत्रा, इंद्रजत्रा, स्वयंभूमला, शिवरात्रि, छोटी व मोठी मर्च्छेंद्रजत्रा, नेतदेविरजत्रा व नारायणोत्सव इत्यादि नेपाळांतील प्रमुख उत्सव होत. [ संदर्भग्रंथ—ओल्डफील्ड—स्केचेस फ्रॉम नेपाल, लंडन १८८०; मॉनीयर वुइल्यम्स—बुद्धिझम १८८९. ]

स या म.—सयाममध्यें फार प्राचीन काळापासून, ब्राह्मणधर्म व बौद्धधर्म हे एकत्र व एकोप्यानें नांदत होते. सयामचे राजे मुख्यतः जरी शिवभक्त होते तरी त्यांनीं, बौद्धधर्माची हेटाळणी कधींच केली नाहीं. अर्थातच सयाममध्यें ब्राह्मणी उत्सव व बौद्धधर्मीयांचे उत्सव असे दोन प्रकार आढळतात. व दोन्ही प्रकारचे उत्सव पुष्कळ काळ सयामांत होत असल्यानें या दोन्ही प्रकारच्या उत्सवांची छाप परस्परांवर पडली असल्यास नवल नाहीं. विशेषतः सतराव्या शतकांत, सँगथाम आणि मॉंगकटसारखे बौद्धधर्मीय राजे सयामच्या गादीवर बसले त्यावेळीं, तर या दोन्ही प्रकारच्या उत्सवांमध्यें बरीच भेसळ झाली. सयाममध्यें उत्सवांचें प्राबल्य फार दिसून येतें. प्रत्येक महिन्यांत कोणतानाकोणता तरी उत्सव असतोच.संवत्सरछिंद,गजेन्द्राश्वस्नान, थूनम, सोंक्रण ( संक्रांति ), विशाखपूजा, तुलाभार, वरुणसत्र, सात ( शारदीयोत्सव ) दीपोत्सव, कार्तिकेयोत्सव, पतंगोत्सव; दोलोत्सव, धान्यदाहोत्सव, शिवरात्रि, माघपूजा इत्यादि प्रमुख उत्सव होत.

ची न.—‘ सिंगकी ’ अगर धर्मगुरूंनीं पाळावयाचे नियम या ग्रंथामध्यें, चीनमधील लोकांत पाळल्या जाणाऱ्या उत्सवांची माहिती आहे. चीनमधील उत्सवांचे चार प्रकार पडतात. ( १ ) राष्ट्रीय, ( २ ) देवतोत्सव, ( ३ ) बुद्ध अगर बोधिसत्व यासंबंधींचे व ( ४ ) चीनमधील धर्मविषयक.

( १ ) राष्ट्रीय उत्सवः—शेंगसी अगर बादशहाचा जन्मदिनोत्सव; राणीचा जन्मदिनोत्सव; पौर्णिमा, अमावास्या, अष्टमी ( दोन्ही पक्षांतील ) असे महिन्यांतील चार दिवसांनिमित्त उत्सव. या चतुर्दिनोत्सावाला किनमिंग शिचई असें नांव आहे.

( २ ) देवतोत्सवः—या उत्सवांची माहिती, किन क्कांग सिंगकिंग या धर्मसूत्रांत मिळते. देवपूजोत्सव, चंद्रग्रहण, सूर्यग्रहण-या वेळीं प्रार्थना करण्याचा उत्सव, बुद्धधर्मपालक वीटूचा उत्सव, वीटूचा जन्मदिनोत्सव, बाक्कांग, लंग क्कांग, क्कांग ति इत्यादि देवतोत्सव हे प्रमुख होत.

(३)बुद्ध व बोधिसत्त्व यासंबंधींचे उत्सवः—मिलिफो (मैत्रेय बुद्धाचा जन्मदिनोत्सव,) शाक्य मुनींचे परिनिर्वाण, क्कानशि यिन पुसा अगर अवलोकितेश्वराचा जन्मदिनोत्सव, शाक्यमुनीचा जन्मादिनोत्सव, भैषज्यगुरुबुद्धोत्सव, ओमीटूफोचा जन्मोत्सव, इत्यादि.

( ४ ) चीनमधील बौद्धधर्मांतील इतिहासप्रसिद्ध व्यक्तींचे उत्सवः—पोचंग,बीयून,ताऊसीयून,बोधिधर्म, हैन शेन,चिकइ या व्यक्तींच्या पुण्यतिथीनिमित्त होणारे उत्सव; याशिवाय निरनिराळे ऋतु सुरू होण्याच्या प्रारंभींच्या दिवसांचा उत्सव, वर्षारंभोत्सव इत्यादीहि उत्सव करण्यांत येतात.

[संदर्भग्रंथः-आयटेल-हँडबुक फॉर दि स्टुडंट ऑफ चायनीज बुद्धिझम, लंडन १८७०; बील-बुद्धिझम इन चायना.]

ज पा न.—जपानी लोकांच्या उत्सवांत चीनांतील उत्सवापेक्षां अधिक राष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें आहे. जपान मधील राष्ट्रीय उत्सव मुख्यतः दहा आहेत. त्यांचीं नावें.— शिहोआइ (जानेवारी ता. १); गेंजीसाई (जानेवारी ता.३); कोमीटेन्नोसाई (जानेवारी ता. ३०); किजेनसेत्सु (फेब्रुवारी ता. ११); शंकीकोरीसाई (मार्च ता.२१); जिम्मूटेनोसाई (एप्रील ता. ३); शकी कोरीसाइ (सप्टेंबर ता.२४); कन्नामेसाइ (आक्टोबर ता.१७); टेंचोसेत्सु (नोव्हेंबर ता.३); नीनामेसाइ (नोव्हें. ता.२३). याशिवाय गोसेकु अगर पांच उत्सव म्हणून प्रसिद्ध उत्सव आहेत तेहि जपानी लोक थाटानें साजरे करतात. हे उत्सव म्हणजे शोगत्सुनो सेकू, जोमीनोसेकू नोबोरीनोसेकू, चोयोनोसेकू, तनबरनोसेकू, हे होत.

[संदर्भग्रंथः—चेंबर्लेन—थिंग्स जॉपनीज (लंडन १९०५); ह्यर्न ग्लिंप्सेस ऑफ दि अनूफॅमीलियर जपान (बोस्टन १८९४); ह्यचिहामा—सुपरस्टिशस जपान.]

इ रा णी लो क.—इराणी लोकांच्या उत्सवाची माहिती त्यांच्या धर्मग्रंथांतून फारशी आढळत नाहीं. पर्शु-अरेबिक वाङ्मयापासूनच ती आपल्याला उपलब्ध होते. अलबेरूणी यानें इराणी उत्सवासंबंधीं बरीच माहिति आपल्या ग्रंथांत ग्रथित केली आहे व ती फारच उपयुक्त आहे.

इराणी लोकांचे दोन महत्त्वाचे उत्सव म्हटले म्हणजे, नौरूझ व मिहिजान हे होत. या उत्सवांत राजापासून रंकापर्यंत सर्व लोक उत्साहानें भाग घेतात. हे दोन्ही उत्सव सहा दिवसांचे असतात. याशिवाय दुसरे उत्सव म्हटले म्हणजे झमझमह (फ्रवर्टिनचा १७ वा. दिवस), कस्न इनिलूफर, सतवैरो (हेमंतोत्सव); कुसहवर्निशिन; झरथुष्ट्राच्या पुण्यतिथीनिमित्त उत्सव; बर्सादहक; मॅगोफोनिया; इत्यादि होत.

[संदर्भग्रंथ-कराका-हिस्ट्री ऑफ दि पारशीज (लंडन १८८४); पेरॉन-झेंड अवेस्ता, पॅरिस १७७१; अलबेरूणी-क्रॉनॉलजी ऑफ एन्शंट नेशन्स, लंडन १८७९.]

ई जि प्शि य न.—ईजिप्तमधील लोकांमध्यें उत्सवांची चंगळ आहे. स्थानिक, प्रांतिक, राष्ट्रीय इत्यादि उत्सवांची जर आपण मोजदाद केली तर जवळ जवळ ईजिप्तमधील उत्सवांची संख्या १५०० वर जाईल. स्थानिक देवतांचे, ऋतूंचे, नद्यांचे, इत्यादि सर्व प्रकारचे उत्सव ईजिप्तमध्यें साजरे केले जातात. उत्सवांच्या लढायांचे दिवस उत्सवांप्रमाणें पाळले जातात. प्टाहसोकरसंबंधीं व ऑसीरीस देवतेसंबंधीं उत्सव राष्ट्रीय स्वरूपाचे आहेत. राजघराण्यांतील पुरुषांच्या अगर स्त्रियांच्या चरित्रांतील महत्त्वाच्या गोष्टींच्या स्मरणार्थ उत्सव केले जातात. यासंबंधींची विशेष माहिती 'ईजिप्त' या लेखांत पहावी.

[संदर्भग्रंथः-ब्रेस्टेड-एन्शंट रेकार्डस ऑफ ईजिप्त, शिकॅगो, १९०६-०७; विल्किन्सन-मॅनर्स, अँड कस्टम्स, १८७८.]

मु स ल मा नी.—मुसुलमानांचा सर्वांत महत्त्वाचा सण म्हणजे अल्ईद अल् कबीर हा होय. धुल हिज्जच्या दहाव्या दिवसापासून तो तेराव्या दिवसापर्यंत हा पाळला जातो. या दिवशीं प्राण्यांची बरीच हिंसा केली जाते. रमजानचा महिना उपवासाचा पाळल्यानंतर त्या महिन्यानंतरचे तीन दिवस फार थाटानें पाळले जातात. याशिवाय लैलत अल् कद्र हा उत्सवहि प्रसिद्ध आहे. मोहरमचे सहा दिवसहि पवित्र मानले गेल्यामुळें ते मोठ्या उत्साहानें पाळले जातात. याशिवाय महमंदाचा जन्म व मृत्यूचा, हसनहुसेनचे जन्म व मृत्यू यांसंबधींचे उत्सवहि साजरे केले जातात.

[संदर्भग्रंथः—सेलस-फेथ ऑफ इस्लाम, लंडन १८९६; एनसायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स.]

ग्री क.—ग्रीकांच्या उत्सवांचे तीन भाग स्थूलमानानें पडतात. (१) कृषिकर्मविषयक उत्सव; उदाहरणार्थ थेस्मोफोरिया, स्किरोफोरिया कार्मिया, थर्गेलिया इत्यादि. लेनैया व डायोनिशिया हे उत्सव फारच महत्त्वाचे असून, या उत्सवांच्या वेळीं मिरवणुकी, खेळ, नाटकें वगैरे केलीं जात असत. (२) राष्ट्रीय अगर ऐतिहासिक प्रकारचे उत्सव ग्रीक लोकांत फार आहेत. पनथेनैयाचा उत्सव फार महत्त्वाचा आहे. आलिंपिक उत्सव तर अतिशय थाटांत होत असे. डेल्फाय येथील अपोलो देवतेचा उत्सव दर नऊ वर्षांनीं एकदां होत असून त्यावेळीं ग्रीसमधील सर्व लोक एकत्र जमत असत. (३) इतिहासप्रसिद्ध व्यक्तींचे उत्सव व गूढशक्तींचे उत्सव; उदाहरणार्थ, अॅगॅमेम्नानचा उत्सव, इत्यादि.

[संदर्भग्रंथः—गार्डनर—ग्रीक अथ्लेटिक्र फेस्टिव्हल्स (लंडन १८१०); फार्नेल-कल्ट्स ऑफ ग्रीक स्टेट्स १८९६.]

ख्रि स्ती.—ख्रिस्ती लोकांमध्यें उत्सव पुष्कळ असून ते महत्त्वाचेहि आहेत. ईस्टरसारखे जे उत्सव अतिशय महत्त्वाचे आहेत ते त्या त्या नांवाखालीं स्वतंत्र रीतीनें दिले आहेत. यांखेरीज जे इतर उत्सव आहेत, ते म्हणजे लेंट, होली वीक, असेन्शन डे, ट्रॅन्सफिग्युरेशन ऑफ अवर लॉर्ड, पेंटेकॉस्ट, ट्रिनिटी संडे, कॉर्पस ख्रिस्टी, अडव्हेंट, सेंटजॉन दि बॅप्टिस्टचा उत्सव, सेंट मायकेलचा उत्सव, इत्यादि होत.

[संदर्भग्रंथ.—डॉउडन-चर्च ईयर अँड कॅलेंडर, केंब्रिज १९१०; नीले-हिस्ट्री ऑफ दि होली ईस्टर्न चर्च, लंडन १८५०.]

**धावडशी**—मुंबई, सातारा जिल्हा. हें गांव साताऱ्याच्या वायव्येस ६ मैलांवर आहे. ब्रम्हेंद्रस्वामी उर्फ भार्गवराम यांची समाधि व मठ येथें आहे. स्वामींचा व तत्कालीन सर्व प्रमुख मराठे (छत्रपति, पेशवे व इतर सरदार) मुत्सद्यांचा परस्पर संबंध असे व ते आपापली हकीकत स्वामीस कळवीत असत. येथील भार्गवरामाचें देऊळ, दोन तलाव, स्वामींची गुहा व कांहीं वस्तू पाहण्यासारख्या आहेत. देवळांत एक शिलालेख आहे. [सातारा ग्याझे.]

**धावडा**—याचीं धौरा, धैरी, धावडी, हेसेल बाकली आरम, व्हेलेनागा, चिरिमन इत्यादि दुसरीं नांवें आहेत. राबी नदीपासून पूर्वेस मध्य व दक्षिण हिंदुस्थानभर हीं झाडें आहेत. धावड्याचा डिंक हा चिटें छापण्याच्या कामीं उपयोगांत आणतात. इंग्लंडमधील रंगाऱ्यांनांहि याचा उपयोग होण्याजोगा आहे. हा डिंक परदेशीं पुष्कळ पाठविला जातो. या झाडाच्या पानापासून काळा रंग काढितां येतो.पानापासून रांपट द्रव्यहि ( कातडीं कमाविण्याचें द्रव्यहि ) काढितात.या झाडाचें लांकूड मजबूत व चिवट असतें परंतु हें कमावतांना अथवा मुरवतांना त्याला भेगा पडतात.ओलाव्याच्या ठिकाणीं हें लांकूड टिकत नाहीं. कुऱ्हाडीचे दांडे,आंस इत्यादि वस्तू, लांकडी सामान व जहाजें तयार करण्याच्या कामींहि या लांकडाचा उपयोग होतो ( आगगाडीच्या रुळाखालीं हें लांकूड घालण्यास हरकत नाहीं ). हें लांकूड चांगलें जळतें व याचा कोळसा चांगला पडतो. या झाडाच्या चकवा, किंवा पंचीं व धाड अथवा धौकरा अशा दोन जाती आहेत.चकव्याचीं झाडें बंगाल, दक्षिण हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांमध्यें होतात. याचें लांकूड खराब असतें. धौकराचीं झाडें राजपुताना व बुंदेलखंड या भागांत आढळतात.

**धावरें**—या सांसर्गिक रोगामध्यें त्वचेचा दाह होऊन ती सुजते व दाह उत्पन्न होण्याचें कारण स्ट्रेप्टोकाकस नांवाचे दाहजनक जंतु चामडींत प्रवेश करतात हें होय. कांहीं देशांत वर्षातून वसंतऋतु अगर इतर काळीं सांथीप्रमाणें हा रोग येतो. या रोगाचें स्वरूप सदा अतिभयंकर असतेंच असें जरी नाहीं तरी कधीं कधीं रोग्याचे कपडे अगर त्याची शुश्रुषा करणारीं माणसें हीं दुसऱ्या ठिकाणीं रोगाचा प्रसार करण्यास कारणीभूत होतात; इतका त्याचा संसर्ग विकारी असतो. याचे मुख्य दोन भेद आढळतात, ते असेः—( १ ) यादृच्छिक म्हणजे आपोआप होणारा व ( २ ) क्षतबाधाजन्य म्हणजे कांहीं जखम अगर व्रण होऊन त्यांत विषसंसर्ग होऊन ती जखम बिघडणें. पहिल्या प्रकाराचें प्रचारांतील उदाहरण म्हणजे चेहऱ्यावर हा रोग एकाएकीं होतो, हें आहे. तरी या प्रकारांतहि डोळ्यांच्या अश्रुमार्गांत जखम ( अतिसूक्ष्म ) असून तिच्या मार्गें चेहऱ्याच्या त्वचेंत विषसंसर्ग होत असावा. म्हणजे एकंदरींत पहिल्या प्रकारांत आपोआप रोग होतो असें जरी म्हटलें आहे तरी जंतुप्रवेश होण्यासारखें नकळत खरचटणें अशासारखें क्षुल्लक कारण त्या भेदाचें असावें अशीच समजूत दृढ होत आहे. मग तें कारण आपणांस समजण्यांत न येण्यास त्याचा सूक्ष्मपणा हें कारण पुरें आहे.

लक्षणें.–रोग सौम्य असल्यास दूषित भागामध्यें त्वचा जाड व कठिण होऊन ती लाल होते, व तीवर बारीक पुरळ येतो. ही लाली प्रथम थोडक्या जागीं असते खरी पण एकंदरींत तिचा कल आजूबाजूस पसरण्याचा असतो, व यामुळें संबंध हातास अगर पायास किंवा शरीराच्या सर्व भागास हा रोग होतो. रोगट भाग हातास कोमट लागून त्यांत आग, ठणका सुरू होतो. प्रथम जेथें लाली दिसते ती पुढें कमी होऊन ती जागा पिंवळसर होते, व तीवरील त्वचा कोंड्याप्रमाणें निघून जाते. व नंतर इतर सूजहि कमी होते. पण कांहीं थोड्या रोग्यामध्यें ही सूज पुन्हां उलटते व पुन्हां पसरते. कधीं नुसती त्वचा लाल होऊन सुजते व त्याबरोबर त्वचेखालील मांसल भागांतहि दाह, सूज उत्पन्न होते व पुढें त्यांत पू होतो. असा प्रकार जखम बिघडून होण्याचा अधिक संभव असतो व त्यास पूयप्रधान धावरें म्हणतात. कधीं कधीं वरील त्वचा व मांस सडून त्याचा कोथरोग बनतो. या रोगापासून कधीं जे दुष्परिणाम होतात त्यांत शरीरांतील हृदयावरण अगर फुप्फुसावरण अशा महत्त्वाच्या वेष्टणांचा दाह होणें हेंहि संभवनीय असतें. चेहऱ्यावर धावरें होतें त्याचा लक्षणक्रम येणेंप्रमाणेंः—रोग्यास प्रथम अशक्त, सुस्त व आजाऱ्यासारखें वाटून नंतर थंडी वाजून ताप येतो. कधीं गळ्यांत दुखतें व घसा सुजतो. पण नाकाच्या, कानाच्या अगर गालाच्या एकाच बाजूवर ठिपक्याप्रमाणें केव्हां केव्हां प्रथम लाली दिसते. कधीं रोगास सुरवात घशांतून होऊन नाकावाटे सूज येऊन चेहऱ्यावर दिसते. गाल व चेहरा यांची त्वचा पातळ असल्यामुळें सूज फारच वाढून चेहरा फार उग्र व विद्रूप दिसतो.नंतर सूज, डोक्यावर पसरून तेथून मान, गळा व तेथून छाती,उदर इकडे पसरते परंतु फक्त चेहऱ्यावरच सूज टिकून रहाते, अशींच उदाहरणें अधिक आढळतात. पुढें रोग वाढत गेल्यावर दाहादि लक्षणांशिवाय सर्व शरीरप्रकृति फार बिघडून १०५° किंवा कमीजास्त ताप चार पांच दिवस येतो; आणि क्षण ताप जरासा एकदम कमी होतो. तापांत वातानें रोगी बडबडतो. रोग सुमारें आठ दहा दिवस टिकतो व त्या अवधींत पहिल्या ठिकाणचा रोग शमन होतो. पण लाली व सूज खालीं अगर वर पसरते व तीहि कमी झाल्यावर त्या भागावरील त्वचा कोंड्याप्रमाणें निघून जाते व खालीं नवी त्वचा असतेच. पण याप्रमाणें नेहमींच सूज कमी होते असें नाहीं. तर रोग विकोपास जाऊन भयंकर स्थिति होते व मस्तिष्कावरणदाहादि परिणाम होऊन मृत्यूहि कधीं कधीं येतो. घशांत रोग असल्यास श्वासावरोध होऊन एकाएकीं मृत्यू येतो. एकदां हा रोग झाला असताना अंगांत प्रतिबंधक शक्ति तर येत नाहींच.पण उलट त्याच रोग्यास पुन्हां हा रोग होण्याचा संभव अधिक असतो. क्षयरोग, विषमज्वर अशांसारखें शक्ति क्षीण करणारे रोग झाल्यानंतर त्यापासून होणारा दुष्परिणाम म्हणून हा रोग त्या रोग्यास होण्याचा संभव असतो. असें झालें असतां हा रोग भयंकर स्वरूपांत प्रगट होतो. एक महिन्याच्या आंतील मुलांनां हा रोग होतो तोहि सौम्य प्रकारचा नसून प्राणघातकच असतो व त्याच्या संसर्गानें बाळंतिणीमध्यें प्रसूतिज्वर नांवाचा भयंकर सांसर्गिक ज्वर उद्भवतो.

उ प चा र.—जेणेंकरून रोग्याच्या हृदयफुप्फुसादि क्रियांस नीट उत्तेजन मिळेल व रोग्याची शक्ति रोगांतून मुक्त होईतों टिकेल असे उपाय योजावयाचे असतात. मुबलक व वरचेवर दूध, मांसकषाय अशांसारखीं पौष्टिक पेयें वरचेवर दिलीं पाहिजेत व बहुतेक रोग्यांनां पोर्ट हें मद्य अगर ब्रांडी हें आल्कोहलयुक्त पेय दिलें पाहिजे. लोहाचें क्लोराइड हें औषध ४० थेंब तीन वेळां दिवसांतून देतात. या रोगाला क्विनाईन उपयोगी पडतें.या रोगावर अँन्टी स्ट्रप्टोकॉकस जंतुघ्न लस १५ ते २० क्यूबिक सेंटिमिटर रोज एक दोनदां टोंचतात व ती बरीच उपयुक्त आहे. सुजेसाठीं वर व्हासेलीन लावतात अगर स्टार्चची भुकटी टाकून शोषक कापसाच्या घड्या बांधून तो भाग झांकून टाकतात. सूज दणक असल्यास दोन तीन जागीं थोडी चिरावी.

**धाला**—काठेवाड,लाखापादर ठाण्यांतील निराळी खंडणी देणारी एक जहागीर. येथील जहागिरदार देसाई नांवाचा आहे. जहागिरींत एकच खेडें आहे.

**धिनोधार**—मुंबई.कच्छच्या वायव्येकडील टेंकडी.हिच्या सर्वांत उंच असलेल्या शिखरावर धोरामनाथानें १८२१ मध्यें बांधलेलें एक देऊळ आहे. या टेंकडीवर धोरमनाथानें तप केलें असें सांगतात. त्यानंतर त्यानें टेंकडीखालीं येऊन एक मठ स्थापिला. त्याच्या अनुयायांनां कानफाटे म्हणतात. येथें भाद्रपद महिन्यांत तीन दिवस यात्रा भरते. मठांत त्याचें आणखी एक देऊळ असून तेथें गोकुळ-अष्टमीला व नवरात्रांत अन्नदान असतें. [ बॉम्बे ग्याझे. पु. ५. ]

**धिलवान**—पंजाबांतील कपुरथळा संस्थानाची एक तहशील. क्षेत्रफळ ११० चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ४२८८९. हींत १०३ खेडीं असून जमीन सुपीक आहे.

**धीमान**—आठव्या शतकांतील बंगालच्या पाल राजघराण्याच्या कारकीर्दींत हा एक मोठा कारागीर होऊन गेला. त्यावेळीं हा व याचा मुलगा विटपाल हे उत्तम चित्रकार, मूर्तिखोदक व ब्रांझधातूचे पुतळे ओतणारे म्हणून प्रसिद्धीस आले होते; यांच्या परंपरेंतील कांहीं वस्तू अद्यापि आढळतात असें म्हणतात. राजशाही येथील वरेंद्र रीचर्स सोसायटीहि या पितापुत्रांच्या परंपरागत कलेच्या शाखांचा हल्लीं विशेष प्रकारें शोध करीत आहे. [ हिस्टरी ऑफ फाइन आर्ट इन इंडिया. ]

**धुंद**—पंजाब, काश्मीर व वायव्येकडील प्रांत यांतील एक जात. ह्या जातीची एकूण लोकसंख्या (१९११) ७१२३५ असून तींत ७१२२१ मुसुलमान आहेत. रजपूत लोकांशीं या लोकांचें बरेंच साम्य असून हे पंच व मुजफराबाद येथें रहातात. हे मूळचे हिंदु असावेत.सध्यां ते आपणाला आरवी लोकांचे वंशज म्हणवितात व कुरेशी वंशांतील आपण आहों असें म्हणतात. रावळपिंडी जिल्ह्यांतील मरी डोंगरांत हे लोक फार आहेत. यांचा मुख्य धंदा शेतीचा आहे. [ सेन्सस रिपोर्ट १९११, पु. १४, २०. ]

**धुनिया**—एक जात. यांनां बहन नदफ असेंहि म्हणतात. यांची एकूण लोकसंख्या ( १९११ ) ७१९२६५ असून तींत मुसुलमान ६८९६८७ व बाकीचे हिंदू आहेत. यांची मुख्य वस्ती संयुक्तप्रांत ( ४०४७३८ ), बहार-ओरिसा ( २०२२०८ ),बंगाल,सेन्ट्रल इंडिया एजन्सी, निजामचें राज्य, मध्यप्रांत व वऱ्हाड इकडे आहे. यांचा मुख्य धंदा कापूस पिंजण्याचा आहे. [ सेन्सस रिपोर्ट, १९११, पु. ३. ]

**धुब्री**—आसाम, गोलपाडा जिल्ह्याचा पोटविभाग. क्षेत्रफळ २८६५ चौरस मैल. ह्या विभागांत गारोटेंकड्यांच्या व ब्रह्मपुत्रानदीच्या मधील कांहीं विभागांचा समावेश होतो. पाऊस ९४ ते १४० इंच पडतो. लोकसंख्या ( १९११ ) ४४३२३८. धुब्री हें विभागाचें मुख्य गांव आहे. तें ब्रह्मपुत्रेच्या उजव्या तीरावर आहे. येथें तागाचा व्यापार फार चालतो. पुरामुळें गांवाला नेहमीं धक्का बसतो. तांदूळ व ताग यांचें उत्पन्न जबर आहे. गौरिपूर इस्टेटींत गहूं पेरतात. ७८० चौरस मैल जंगल राखून ठेवलेलें आहे. धुब्री विभागाचीं ठाणीं आहेत तीं:—धुब्री, पूर्वद्वार, गोळकगंज, बिलासीपाडा, दक्षिण सालमार मणिकारचर. मोठें गांव १ व खेडीं १३१० आहेत.

**धुमनर**—मध्य हिंदुस्थान. इन्दूर संस्थानांतील एक संस्थान. फार पुरातनकालचे अवशेष येथें आहेत.

**धुमाळ ( दुमाल )**—ओरिसा व बहार या प्रांतांत यांची मुख्य वस्ती आहे. सोनपूर राज्यांतच हे पुष्कळ सांपडतात. याची लोकसंख्या (१९११) ६७०५२. हे मूळचे यदुपूर भागांतील रहिवाशी पण आपला गवळ्यांशीं संबंध जोडण्याच्या इच्छेनें यांनीं ही यदुपूरची गोष्ट बनविली असें रिस्ले म्हणतो.यांच्यांत उपवर्ग मुळींच नाहींत.विवाहाची चाल मात्र गुंतागुंतीची आहे. यांच्यांत तीन भाग आहेत. एक गोत्र, वर्ग व मिट्टी. जर कोणाचें गोत्र, वर्ग व मिट्टी तीन्ही सारखे असले तर तो विवाह निषिद्ध असतो. निदान एकांत तरी फरक पाहिजे. वर्गांची संख्या पुष्कळ आहे पण मिट्टी व गोत्रांची संख्या कमी आहे.कच्छप, उलूक, लिंब अशीं यांचीं गोत्रें आहेत. वर्गांचीं नांवें पुष्कळ प्रकारचीं आहेत. तीं:—नाईक, प्रधान, कर्मी, अम्मयत, महाकुल इत्यादि. वर्ग-नांवांवरून हे पूर्वीं गांवांत निरनिराळे उद्योग व मजुरीचीं कामें करीत असत असें दिसतें.

ऋतुस्नात होण्यापूर्वीं लग्न न झाल्यास मुलीस पुढील शिक्षा करतात. तिला रानांत नेऊन झाडास बांधतात, मग अशा स्थितींत कोणीहि जातवाल्यानें तिला सोडवून वरावें. अशा वेळीं मुलीचें लग्न म्हाताऱ्याबरोबर करून ही शिक्षा टाळतात. म्हाताऱ्याकडून दोन किंवा चार आणे हुंडा घेतात. लग्नानंतर म्हाताऱ्यानें पाहिजे तर ती आपली बायको म्हणून ठेवावी नाहीं तर ८ आणे देऊन काडी मोडून द्यावी. काडी मोडल्यानंतर ती विधवा होते व तिचा पाट तरुणाशीं लागतो. वराचा बाप मुलीची मागणी करतांना पोहे हातांत घेऊन

बधूच्या बापाकडे जातो आणि शेजाऱ्यासमोर त्यास म्हणतो, "मी ऐकलें आहे कीं,झाडास कळ्या फुटल्या आहेत व कांहीं उमलल्या आहेत. मी त्यापैकीं एक उमलेली कळी तोडूं इच्छितों."त्यावर मुलीचा बाप म्हणतो"फूल फार कोमल आहे. चोहोंबाजूंनीं समुद्रानें घेरलें आहे, तुम्ही तें कसें तोडाल ?" " मी डोंगे आणून तें तोडीन ". " पुष्कळ अडचणी येतील, फूल कोमेजेल किंवा हारवेल आणि फूल असेपर्यंत त्याची होडी समुद्रांत सुरक्षित राहील अशी भावना येणें तुमच्या-च्यानें होईल काय ? " " हो तसें करण्याची माझी इच्छा आहे म्हणूनच मी येथें आलों आहे."" बरें आहे मीं तें फूल तुम्हांला दिलें."हुंड्याचें ठरीव प्रमाण आहे. विधवेनें प्रथम दिराबरोबर पाट लाविला पाहिजे.तो नसल्यास दुसऱ्याबरोबर लवावा.या दुसऱ्या माणसानें तिला १०–२०रुपये व जातीच्या मुख्यास ५ रुपये दिले पाहिजेत. तिच्या पहिल्या नवऱ्याचीं मुलें तिच्या आईबापांकडे राहतात, नवीन बापाकडे जात नाहींत. घटस्फोट पंचाइतीसमोर होतो.यांचे उपाध्याय ब्राह्मण आहेत. यांचा डाकिणीवर फार विश्वास आहे.

हे प्रेतें जाळतात किंवा पुरतात. ताग व हळद यांखेरीज सर्व धान्यें पेरतात. यांच्यांत व्यभिचार फार आहे. संस्था-निक लोक यांच्या मुली नाटकशाळा म्हणून ठेवितात. हे मंदबुद्धी आहेत.

**धुरवई**—मध्य हिंदुस्थान. बुंदेलखंड एजन्सींतील एक लहानसें संस्थान. हें हस्तमैया जहागिरीकडे आहे. क्षेत्रफळ १५ चौरस मैल. संस्थानांत एकंदर ९ गांवें आहेत. हें रुनदी संस्थान आहे. उत्तरेस व दक्षिणेस झांशी जिल्हा; पूर्वेस तोरी--फत्तेपुर संस्थान व पश्चिमेस विजना. संस्थानची लोक-संख्या ( १९११ ) १५३०. येथील जहागिरदार ओरच्छा घराण्यांतील बुंदेला रजपूत आहे. दिवाण बुधसिंग ह्यास १८२३ सालीं संस्थानची सनद देण्यांत आली. एकाच घरां-तील नातेवाईकांनीं जहागिरीची वेगळी वेगळी विभागणी केली आहे. संस्थानचें उत्पन्न ८००० रु. आहे.

**धुराडें**—बॉयलरमध्यें जळलेल्या कोळशाचा धूर उंच हवेंत सोडून द्यावा लागतो कारण तो मनुष्याच्या जीवि-ताला अपायकारक असतो. यामुळें धुराड्याची उंची ठिकठिकाणच्या म्युनिसिपालिटीच्या कायद्यावर अवलंबून असते. जवळपास टेंकडी असल्यास व वाऱ्याचे प्रवाह ज्या-प्रमाणें वाहत असतील त्याप्रमाणें धुराडें उंच बांधावें लागतें. याशिवाय धुराड्याचा उपयोग आहे तो हा कीं याच्यामुळें कोळसे पेटण्यास मदत होते. धुराड्यांत उष्ण धूर गेला कीं, तो हलका असल्यामुळें वरवर जाऊं लागतो व त्यामुळें त्याच्या जागीं दुसरी ताजी हवा बॉयलरमधील भट्टींत घुसते व कोळसा चांगला जळतो. धुराड्यांत हवा जाण्यास बॉयलरच्या भट्टीच्या दरवाज्यापासून किंवा जाळींतूनच रस्ता असतो. धुराडें बांधतांना तें जेमतेम बेताबातानें बांध-ण्यापेक्षां चांगलें अघळपघळ मोठें बांधावें म्हणजे सर्व बॉय-लर एकदम चालू ठेऊन जास्तींत जास्त कोळसा जाळण्याची वेळ आली तर अडचण पडत नाहीं. इतर वेळीं कमी कोळसा जाळावयाचा असेल तेव्हां ड्राफ्ट बंद करून वायूचा झोत नियमित करतां येतो. धुराडें आंतून सारख्या व्यासाचें बांधावें किंवा खालीं कमी व्यास ठेऊन वर जरा जास्त ठेवावें. आंतल्या बाजूनें अदाह्य विटांचें अस्तर सरासरी निम्म्या उंचीपर्यंत किंवा ⅔ उंचीपर्यंत द्यावें. यामध्यें व बाहेरच्या धुराड्यामध्यें हवा राहण्यासाठीं थोडी मोकळी जागा ठेवावी म्हणजे धुराचा व वाफेचा परिणाम चुन्याच्या बांधकामावर होत नाहीं.

**धुलखेड**—इंदीच्या उत्तरेस १५ मैलांवर भीमेच्या कांठीं हें एक खेडें आहे. हें हिंदूंचें पवित्र स्थान आहे. या ठिकाणीं दक्षाचा यज्ञ झाला होता अशी कथा सांगतात.गांवांत अजूनहि त्याची बरीच राख दाखविण्यांत येते व तेथें मोठमोठीं हाडें सांपडलीं आहेत. या ठिकाणीं शंकराचें एक देऊळ असून त्यांत एक शिलालेख आहे. [ विजापुर ग्याझे. ]

**धुंसर**—संयुक्तप्रांत व पंजाबांतील एक जात. लोकसंख्या (१९११) ३८८१. यांनां भार्गव असेंहि म्हणतात. ते मुख्यतः कारकून व व्यापारी आहेत. त्यांचा सामाजिक दर्जा ब्राह्मण व वाणी यांच्या मधला आहे. परंतु ब्राह्मणांच्या बरोबरीला येण्याकरितां ते प्रयत्न करीत आहेत. ते आपले पूर्वज मोठमोठ्या हिंदु राजांचे पुरोहित होते असें सांगतात व कांहीं ठिकाणीं धुसर हा एक वाण्याचा वर्ग आहे असें मानितात.तेव्हांच त्यांच्या विवाहपद्धतीवरून ते ब्राह्मण नाहींत असें त्यांच्या दुष्टोत्पत्तीस येतें. ते मौंजीबंधन लग्नाच्या वेळेस करतात. ही चाल तिकडे कायस्थ, कांहीं वैश्य व खत्री या लोकांमध्येंच प्रचलित आहे. [ सेन्सस रिपोर्ट, १९११; रोझ-ग्लोसरी; क्रूक्स-ट्राइब्ज. ]

**धुळप**—धुळप यांचें मूळचें उपनांव मोरे, हे मूळ उत्तर हिंदुस्थानांतील रहिवासी. ह्या घराण्यांतील परसोजी बाजी व जयाजी बाजी या उभयतां बंधूंनीं सह्याद्रीच्या पूर्वेस कृष्णा व वारणा या दोन नद्यांच्या मध्यें जावळी व त्याच्या सभोंव-तालचा मुलूख काबीज करून, जावळी हें आपल्या राहण्याचें ठिकाण केलें. परसोजीस पांच पुत्र झाले. ( १ ) हणमंतराव, ( २ ) बागराव, ( ३ ) कमलराव, ( ४ )सुर्याजीराव व ( ५ ) चंद्रराव.जयाजी हा निपुत्रिक होता. शिवाजीच्या कारकीर्दींत चंद्रराव, सूर्याजीराव व हणमंतराव ह्या त्रिवर्गाचा शेवट झाला, नंतर हणमंतराव याचे मुलगे खेमाजी व चायाजी; बागराव याचा प्रतापजी; सुर्याजीराव याचा दादाजी; व चंद्रराव याचा बाळाजी येणेंप्रमाणें मोरे घराण्यांतील मंडळी स्वसंरक्षणार्थ विजापूरच्या बादशहाच्या आश्रयास जाऊन राहिली. वरील सहा जणांनीं विजापूरकरांच्या वतीनें समशेर गाजविल्यामुळें, बादशहानें खुष होऊन ' धुळप ' असा बहुमानाचा किताब दिला, अशी माहिती मिळते. विजापूरकर व शिवाजी यांच्या झटापटींत या मोऱ्यांपैकीं-धुळपांपैकीं बरीच मंडळी कामास

येऊन, शेवटीं छत्रपतींच्या धाकानें अवशिष्ट मंडळी वाट फुटेल तेथें जाऊन राहिली ( हणमंतराव व चंद्रराव यांचे वंशज धवडे बंदरीं, बागराव यांचे दुदुशी दुदगांवीं, सूर्याजीराव यांचे वसईस व कमलराव यांचे बीरवाडीस गेले ). ह्या घराण्याचा यापुढील पाऊणशें वर्षांचा इतिहास उपलब्ध नाहीं. इ. स. १७५६ मध्यें तुळाजी आंग्रे यास कैद केल्यानंतर पेशव्यांनीं विजयदुर्ग येथें आपल्या प्रत्यक्ष अधिकाराखालीं आरमाराचें मुख्य ठिकाण करून त्यास सुभा आरमार अशी संज्ञा दिली. या आरमारावर मुख्य अधिकारी एक असून त्यास सुभेदार निसबत सुभा आरमार असें म्हणत. इ. स. १७६४ मध्यें हणमंतरावें मोरे यांचे वंशज आनंदराव धुळप या दर्यायुद्धांत नाणवलेल्या गृहस्थाकडे मराठ्यांच्या आरमाराचें आधिपत्य आलें. इ. स. १७९४ पर्यंत म्हणजे जवळ जवळ ३० वर्षें आनंदराव ह्याच सुभ्याचा प्रामुख्येंकरून कारभार आटपीत असे ( आनंदरावाची हकीकत ज्ञानकोश विभाग ७ यांत त्याच्या नांवाखालीं पृ.१५३ वर पहा. ). आनंदरावाप्रमाणेंच हरवाजीराव, जानोजीराव इत्यादि धुळप मंडळींनीं आरमाराची उत्कृष्ट कामगीरी करून पेशव्यांकडून वेळोवेळीं बक्षिसेंहि मिळविलीं. इ. स. १८१८ मध्यें पेशवाई नष्ट झाल्यानंतर त्याच्या वंशजांस इंग्रजांनीं ‘ पोलिटिकल पेन्शन ’ करून दिलें. श्री० कृष्णराव रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब या घराण्याचे विद्यमान वंशज हल्लीं विजयदुर्ग येथें राहतात. विजयदुर्ग येथील किल्ला, गोदी, वगैरे स्थलें प्रेक्षणीय आहेत. थोरले माधवराव पेशवे यांनीं स.१७७४ त जानोजी धुळप यास दक्षिणेंत स्वारीस पाठविलें होतें. इ. स १७७५ मध्यें महीच्या पैलतीरीं हरिपंत फडके व दादासाहेब यांचें युद्ध झाल्यावर पेशव्यानें जानराव धुळप यांस सांगितलें कीं दादासाहेब सुरतेकडून जाह्मजांतून जलमार्गें एखादेकडे जातील, याची बातमी व बंदोबस्त ठेवून, प्रसंगीं त्यांशीं गांठ घालून हस्तगत करून घेणें. ले. मूएन वगैरे इंग्रजांशीं झालेल्या दर्यायुद्धांत ( १७८३ एप्रिल ) धुळपांनीं फार पराक्रम केला. त्यावद्दल पेशव्यांनीं त्यांस बक्षीसें दिलीं [ भा.इ. मं. अहवा. १८३३; लो.—हिस्टरी ऑफ धि नेव्ही; स्टेट पेपर्स बॉंबे. ]

**धुळें,** ता लु का.—मुंबई इलाखा. पश्चिम खानदेश जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ ७६० चौरस मैल. तालुक्यांत दोन शहरें व १५१ खेडीं आहेत. लोकसंख्या ( १९११ ) १२९१४७. या तालुक्यांतून पांजरा व बोरी या नद्या वाहतात. टेंकड्याहि पुष्कळ आहेत. हवा पावसाळ्याखेरीज आरोग्यकारक आहे. दक्षिण भागांत पाण्याची टंचाई भासते. जमीन तांबडी व कांहीं ठिकाणीं काळी आहे. पाऊस २२ इंच पडतो.

गां व.—हा गांव चाळिसगांवच्या उत्तरेस ३५ मैल असून पश्चिम खानदेश जिल्ह्याचें मुख्य ठाणें आहे. लोकसंख्या २८ हजारांवर आहे. जुनें व नवें धुळें असे गांवाचे दोन भाग आहेत.स. १८७२ च्या महापुरामुळें पुष्कळ घरें वाहून गेलीं व मालमत्तेची व जिवाची नुकसानी झाली. प्रथम हें एक खेडें असून निजामशाहींतील लळिंग तालुक्यांत मोडत असे, त्यावेळीं लळिंग हें दौलताबाद जिल्ह्यांत होतें. लळिंगचा किल्ला येथून ६ मैलांवर आहे. हा किल्ला गवळी राजानें ( कोणाच्या मतें फारुकी राजानें ) बांधला असावा. धुळ्याची गढी देखील त्यावेळची असावी. मोंगल, निजाम व (१७९५ सालीं) मराठ्यांनीं हें गांव घेतलें. स. १८०३ मध्यें हें गांव अगदी ओस पडलें. पेशव्यांनीं लळिंग व सोनगीर हे परगणे ज्यास इनाम दिले होते त्या बाळाजी बळवंतानें हा गांव पुन्हां वसविला. व ह्यावद्दल त्यास विंचूरकराकडूनहि इनाम मिळालें. स. १८१९ मध्यें गांवाची भरभराट व्हावी म्हणून कॅप्टन ब्रिगनें घरें बांधण्याकरितां जमिनी भाडें न घेतां दिल्या. येथें कापसाचा व्यापार सुरू झाल्यापासून गांवाची झपाट्यानें भरभराट झाली. १८७२पासून अलाहाबाद, बनारस व लखनौकडून मुसुलमान लोक येथें येऊन वस्ती करून राहिले आहेत. मोमीन अथवा जुलाही हे लोक अस्सल मुसुलमान आहेत. हे लोक उत्तम साड्या व लुगडीं विणतात. १८७३ सालीं हिंदी पायदळाची तुकडी येथून काढून घेण्यांत आली. येथें दर मंगळवारीं मोठा बाजार भरतो. १८६२ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. हल्लीं येथें सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे कारखाने १५–२० असून कापडाच्या गिरणीचें बांधकाम चालू ( १९२५ ) आहे. गांवाची वस्ती सोंगट्याच्या पटाप्रमाणें सुबक आहे. गांवांतून मुंबई–आग्रा ही सडक गेली आहे. मोंगलाई व देवपुर हीं दोन खेडीं धुळ्यांत सामील झालीं आहेत. गांवास पांझरा नदी आहे. येथें सरकारी दारू गाळण्याची एक गिरणी आहे. गांवास पांझरा नदीचे पाट असल्यानें बागाईती बरीच आहे. जवळच नकाणें व डेडरगांव असे दोन तलाव आहेत. जिल्ह्याच्या सर्व कचेऱ्या, दवाखाने, हायस्कूल, मराठी ट्रेनिंग स्कूल, इंडस्ट्रिअल स्कूल वगैरे संस्था धुळें येथें आहेत. देवपुरांत लष्करी तळ पडण्याचें ठिकाण असून तेथें अबुलहसन ( १६२९ ) याचा तळ पडला होता. तसेंच वसईकडील मोहिमेंत खंडोजी माणकरानें वांद्रें वगैरे भाग काबीज केला तेव्हां बाजीराव पेशवे याचा मुक्काम येथेंच होता. जवळच असलेलें देवीचें देऊळ फार जुनें आहे. धुळ्याच्या पूर्वेस अंबोडे येथें खंडोबाचें, दक्षिणेस शिरूड येथें देवीचें, धाडरें येथें महादेवाचें, उत्तरेस नंदाळें येथें महादेवाचें अशीं हेमाडपंती जुनीं देवळें आहेत. विंचूरबुद्रुक येथें एक हेमाडपंती विहीर आहे. [ बादशाहनामा; खानदेश ग्याझे. ].

**धूप**—पुष्कळ वर्षांपासून आफ्रिकेंतून किंवा अरबस्तानांतून हिंदुस्थानांत ऊद ( धूप ) येत आहे. ऊद, धूप वगैरे सुगंधी पदार्थांची मुसुलमानांना माहिती होती उदाचा हिंदुस्थानांत बराच व्यापार चालतो. धूप वास्तविक हिंदुस्थानांतील नसून परदेशांतील आहे.

गुगुळाच्या झाडापासून धूप निघतो. नेपाळ व सिकीममधील हें झाड उंच असून पूर्व हिमालयांतील खोऱ्यांत ३०००

फूट उंचीच्या प्रदेशांत होतें. या झाडापासून काळसर व तांबूस रंगाची ठिसूळ अशी राळ निघते. ही राळ लेपचास लोक धूप म्हणून जाळतात. चहाच्या पेट्यांनां याच्या लांकडाची मागणी असल्यामुळें हें झाड अलीकडे दुर्मिळ झालें आहे. हें लांकूड वाकत नाहीं परंतु फार लवकर कुजतें. सालवृक्षापासूनहि धूप निघतो ( साल पहा ). १९०६-०७ सालीं धूपाची आयात ३२५८२ हंड्रेवेट ( किं. ४१२०८२ रु. ) असून, निर्यात ६४०५४० हंड्रेडवेट होती.

धूमकेतु—एक आकाशस्थ ज्योति. याची माहिती फार प्राचीन काळापासून लोकांनां दिसते. वराह मिहिरानें ६२ श्लोकांचा एक सबंध अध्याय ( बृ. सं. ११ ) धूमकेतूकडे खर्च केला आहे. इ. स. च्या आरंभापासून आजपर्यंत ५०० वर धूमकेतु उघड्या डोळ्यांनीं दिसल्याचे उल्लेख सांपडतात. मोठमोठीं अरिष्टें आलीं त्यावेळीं धूमकेतू आकाशांत दिसले असें आढळून येतें. तेव्हां धूमकेतूंच्या आगमनानें लोकांस भीति वाटणें साहजिक आहे. पण हॅले व न्यूटन यांच्या वेळेपासून यांची नियमबद्धता सिद्ध झाली. उघड्या डोळ्यांनीं दिसणाऱ्या धूमकेतूचे तीन भाग असतात. त्यांत सामान्य तारांप्रमाणें लहान मोठी तारा दिसते. तिच्याभोंवतीं धुरासारखी लहानशी शेंडी असते; तिला शिखा म्हणतात. आणि पताकेसारखें एक मोठें शेंपूट असतें; त्यास केतु अथवा पुच्छ म्हणतात. केतु शब्दाचा मूळचा अर्थ पताका असा आहे. तारा आणि शिखा या दोहींमिळून धूमकेतूचा अग्रभाग होतो ( याला इंग्लिश भाषेंत केतूचें डोकें म्हणतात ). तीन भाग स्पष्टपणें परस्परांपासून निरनिराळे दिसत नाहींत. त्यांत शिखा कोठें संपली आणि केतु कोठें लागला हें तर बऱ्याच प्रसंगीं समजत नाहीं. कोणी पुच्छालाच शिखा ( शेंडी ) म्हणतात व त्यामुळेंच धूमकेतूला शेंडेनक्षत्र असें नांव पडलें आहे. तथापि सर्वच धूमकेतूंनां पुच्छ असतें असें नाहीं. म्हणून तारा, शिखा आणि केतु असे तीन भाग मानावे हें बरें. धूमकेतु याबद्दल केतु, शिखी ( शिखा ज्याला आहे तो ) अशाहि संज्ञा योजितात. धूमकेतूचा वाचक इंग्रजी शब्द कॉमेट ( याचा अर्थ शिखी ) असा आहे. धूमकेतूचें पुच्छ नेहमीं तारेच्या ज्या बाजूस सूर्य असतो तिच्या उलट बाजूस असतें. तें शेवटाकडे रुंद व अस्पष्ट होत गेलेलें असतें. कांहीं धूमकेतूंनां दोन तीन पुच्छें असतात. वस्तुतः त्या एकाच पुच्छाच्या निरनिराळ्या शाखा असतात. त्या सन १७४४ च्या केतूला ६ पुच्छें होतीं. एकाहून जास्त पुच्छें असतात तेव्हां कधीं कधीं तीं मुख्य पुच्छास फांद्या फुटल्याप्रमाणें दिसतात. सन १८२३ च्या केतूला दोन पुच्छें होतीं, त्यांत एक नियमाप्रमाणें सूर्याच्या उलट बाजूस होतें परंतु दुसरें बहुतेक सूर्याकडे होतें.

उघड्या डोळ्यांनीं थोडेच धूमकेतू दिसतात. दुर्बिणींतून फार दिसतात; ते लहान असतात. त्यांचें स्वरूप निरनिराळें असतें कधीं त्यांत तारा नसते; कधीं पुच्छ नसतें. कधीं पुच्छ आणि शिखा हीं वेगळीं ओळखूं येत नाहींत. तथापि सर्व प्रकारच्या धूमकेतूंची जात एकच आहे. उघड्या डोळ्यांनीं दिसणाऱ्या केतूंचा दृश्य व वास्तविक आकार विलक्षण असतो. तो सर्वांचा सारखा नसतो. त्यांच्या अग्रभागाचा व्यास एक दोन लक्ष मैल असतो. कांहीं तर सूर्यापेक्षांहि मोठे असतात. त्यांचें पुच्छ लक्षावधि मैल असतें. इ. स. १८११ च्या केतूचें पुच्छ ११ कोटी मैल होतें! धूमकेतूंची घनता फारच थोडी असते. यामुळें हे ग्रहाजवळून गेले असतां ह्यांचे आकार व मार्ग बदलतात. ह्यांचें पुच्छ पारदर्शक असतें. त्याची जाडी कधीं कधीं ५० हजार मैल असते, तरी त्यांतून पलीकडचीं नक्षत्रें दिसतात. धूमकेतूंच्या कक्षा तीन प्रकारच्या असतात. कांहींच्या दीर्घवर्तुलाकार असतात. परंतु ग्रहांच्या कक्षा वर्तुलप्राय असतात, म्हणजे त्यांची केंद्रच्युति थोडी असते, तशा केतुकक्षा नसतात. त्या अतिदीर्घवर्तुल असतात. त्यांची च्युति फार असते. अशा प्रकारची कक्षा ही आवृत होय. म्हणजे ती अतिदीर्घवर्तुल असली तरी तिच्या दोन्ही शाखा दोन्ही टोंकांकडे मिळालेल्या असतात. कक्षेच्या क्षेत्राभोंवतीं त्या शाखांचें आवरण झालेलें असतें. कांहीं धूमकेतूंच्या कक्षा अन्वस्त किंवा अपास्त अशा जातीच्या अनावृत असतात. त्याच्या दोन शाखा सूर्याच्या एका बाजूस मात्र मिळालेल्या असतात; दुसऱ्या अंगास फांकत जातात. यामुळें त्यांचें मधल्या क्षेत्राभोंवतीं आवरण होत नाहीं. अन्वस्ताच्या शाखा ज्या अंगीं मिळतात त्या अंगीं ते आणि अतिदीर्घवर्तुल यांत फारसा भेद दिसत नाहीं. अपास्ताच्या शाखा फार फांकत जातात.

ज्या धूमकेतूंच्या कक्षा अतिदीर्घवर्तुल असतात, ते नेहमीं सूर्याभोंवतीं फिरतात. एकदां सूर्याच्या फार जवळ येतात व तेथून परतल्यावर फार लांब जातात. परंतु कालांतरानें पुन्हां सूर्याजवळ येतात. जे धूमकेतु सूर्याच्या आकर्षणांत सांपडल्यावर त्यांच्या कक्षा अन्वस्त होतात ते एकदां सूर्याजवळून गेल्यावर पुन्हां परत येत नाहींत. तथापि अशा धूमकेतूंच्या गतीस थोडासा उपाधि झाला, तर त्यांच्या कक्षा अतिदीर्घवर्तुल होण्याचा संभव असतो आणि एखाद्या वेळीं सूर्याच्या तडाक्यांत सांपडून त्याकडे आलेले अपास्त कक्षांचे धूमकेतू एकदां सूर्यदर्शन घेऊन गेल्यावर पुन्हां त्याच्या आटोक्यांत येण्याचा संभव मुळींच नसतो.

धूमकेतू हे मुळचे आपल्या सूर्यमालेंतले आहेत कीं सूर्यमालेच्या भोंवतीं जो अनंत तारकाप्रदेश पसरलेला आहे त्यांतून आलेले आहेत व त्यांची उत्पत्ति कशी झालेली आहे ह्याविषयीं सिद्धांत अद्यापि ठरले नाहींत. सांप्रत याविषयीं असें मत आहेः—विश्वाच्या अपार प्रदेशांत तेजोमेघ पसरलेले आहेत; त्यांस गति आहे व आपला सूर्यहि ग्रहमालेसहवर्तमान आकाशांत कोणीकडे तरी वेगानें चालला आहे. यामुळें त्या तेजोमेघद्रव्याचे अंश अनादि कालापासून

एकेक आपल्या सूर्याच्या आकर्षणानें त्याजकडे येत आहेत. हे धूमकेतूच होत. दुसरें एक मत असें आहे कीं, अशनींच्या द्रव्याचे धूमकेतू बनले आहेत, किंवा ते अशनिसंघात्मकच आहेत; आणि ते आकाशांत सर्वत्र पसरलेले आहेत व कधीं कधीं सूर्याच्या आकर्षणांत सांपडतात. सूर्याभोंवतीं ग्रह नसते तर त्याच्या आकर्षणांत सांपडलेले धूमकेतू अन्वस्तकक्षेनें त्याभोंवतीं फिरून परत गेले असते व पुन्हां आले नसते. किंवा एकदां आले तसे कदाचित् कोटग्वधि वर्षांनीं पुन्हां आले असते. परंतु ग्रहांच्या उपाधीमुळें त्यांच्या गती कमजास्त होतात. पुनर्गमनाला सर्वांत जास्त काल लागणारा धूमकेतु हॅलेचा होय. याला ७६ वर्षें लागतात; तर सर्वांत कमी वेळ घेणारा धूमकेतु एन्केचा असून तो तीन साडेतीन वर्षांनीं पुन्हां येत असतो. हॅलेच्या खालोखाल ओलबर्स व पॉन्स धूमकेतू होत. यांनां अनुक्रमें ७३ व ७२ वर्षें लागतात. यानंतर दीर्घकालिन धूमकेतु टटलचा आहे. याला सुमारें १३॥ वर्षें लागतात. [ दीक्षित–ज्योतिर्विलास. ]

**धृष्टद्युम्न**–पुरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय पांचाल राजा द्रुपद याचा पुत्र. याचा जन्म अग्निकुंडांतून ( द्रोणाचार्यास मारण्याकरितां ) झाला. हा धनुर्विद्येंत द्रोणाचार्यांचाच शिष्य होता. भारतीययुद्धारंभीं ( भीष्मपर्वी ) कृष्णाच्या सल्ल्यानें हा पांडवांचा सेनापति झाला होता. हा द्रौपदीचा भाऊ म्हणजे पांडवांचा मेव्हणा होता. अश्वत्थामा मरण पावला असें ऐकून द्रोणाचार्यांनें आपलीं शस्त्रास्त्रें भूमीवर ठेविलीं व योगसाधनानें प्राणोत्क्रमण करीत असतां धृष्टद्युम्नानें जाऊन त्याचा शिरच्छेद केला. पुढें युद्धाच्या अठराव्या दिवशीं हा शिबिरांत निद्रित असतां अश्वत्थाम्यानें याचा शिरच्छेद केला ( ' द्रुपद ' व ' द्रोणाचार्य ' पहा ).

**धेड**—गुजराथ, राजपुताना, काठेवाड व कच्छ या प्रांतांत मुख्यतः हे लोक आहेत. लोकसंख्या ( १९११ ) ११८५१८. यांत महार जातीचा समावेश होत नाहीं; ते स्वतंत्र धरले आहेत. धेड हे आपण क्षत्रिय कुलांतील आहोंत असें म्हणतात. परंतु कराचीकडील धेड आम्ही रजपूत आहोंत असें सांगतात. महारमांगांप्रमाणेंच या लोकांचा समाज मूळच्या अनार्य जातीचा असावा. हे इतर जातींतील लोक आपल्या जातींत घेतात. जाडें भरडें कापड विणणें व ओझीं वहाणें हे त्यांचे मूळचे धंदे होते. कधीं कधीं हे वाटाड्यांचा धंदा करीत. यांचे चवदा पोटवर्ग असून एका पोटभागांतील लोक दुसऱ्या पोटभागांतील लोकांशीं विवाहसंबंध करीत नाहींत. यांचीं पुष्कळ कुळें असून मातंग कुळांतील लोक सर्वांत श्रेष्ठ समजले जातात. विवाह बहुधां प्रौढपणीं होतात. लग्नापूर्वी २।३ वर्षें मागणी घालून वर निश्चित ठरवितात. वर हा वधूच्या घरीं लग्नास जातो तेव्हां त्याचे आईबाप त्याच्या बरोबर नसतात. मित्रमंडळीनें लग्न लावावयाचें असतें. लग्नविधि गारुड्यांच्या विधीप्रमाणें व गारुड्यांकडून होतात. वधूवरांनीं दिव्याभोंवतीं प्रदक्षिणा करणें हा मुख्य विधि होय. पुनर्विवाहाची चाल यांच्यांत रूढ आहे. विधवेस धाकट्या दिराशींहि लग्न लावितां येतें. हे लोक मांसाहारी असून मेलेल्या गाईम्हशींचेंहि मांस हे खातात. कोळी, पारधी, भंगी या लोकांच्या हातचें अन्न खात नाहींत. तरी हे मुसुलमान हजामांखेरीज सर्व मुसुलमानांच्या हातचें अन्न स्वीकारतात. यांच्या देवता मुख्यत्वेंकरून गणपति, माता, मारुति व नरसिंह ह्या असून यांचे उपाध्ये गारुड (गारुडी?) असतात. कच्छांतील मघवाल नांवाचे ब्राह्मण या लोकांच्या हातचें जेवण जेवतात व कधीं कधीं त्यांच्यांशीं विवाहसंबंधहि जोडतात. सुरत जिल्ह्यांत या लोकांची मोठी ज्ञातिपंचायत आहे. घटस्फोटाबद्दल व एखाद्या स्त्रीला पळवून नेण्याबद्दल ५१ रुपये दंड केला जातो. इतर अपराधाबद्दल २५ रुपयेपर्यंत दंड केला जातो. इतरत्र असलेल्या सर्व पंचायतींचा एकमेकांशीं संबंध असून एका पंचायतीचा निकाल सर्व पंचायतींनां मान्य करावा लागतो. अहमदाबादमधील धेडांची अशीच एक मध्यवर्ती पंचायत आहे. कच्छप्रांतांतील धेडांमध्यें खास पंचायती नाहींत, म्हणून तंट्याचा निकाल दोन्ही पक्षांचे सारखे प्रतिनिधी नेमून दिला जातो. माहेश्री, मारवाडी व कच्छांतील गोरजा मघवाल लोकांनां सरकारला कांहीं दंड व दंडाच्या उत्पन्नाचा कांहीं भाग द्यावा लागतो. काठेवाड व सिंधु प्रांतांतहि पंचायती आहेत. [ मुंबई से. रि. १९११ ].

गुजराथेंतील डोंगराळ प्रदेशांतील धरद लोक व दक्षिण कानडा प्रांतांतील दाएर्द लोक यांचें व धेडांचें पुष्कळ बाबतींत साम्य दिसून येतें. राजपुतान्यांतील धेड आपल्याविषयीं असें सांगतात कीं, आपण मूळचे क्षत्रिय असून परशुरामानें क्षत्रियांचा जो निःपात केला तो चुकविण्यासाठीं, आम्ही कनिष्ठ वर्गांतलि आहोंत असें त्याला सांगितलें व त्यामुळें कनिष्ठ वर्गांत मिसळलों गेलों. त्यांच्यांत असलेल्या चावड, चासिया, चोहान वगैरे उपनांवांवरून ते अंशतः रजपूत बीजाचे असावेत असें दिसतें.

गु ज रा थी धे ड.—गुजराथेंत मारवाडांतून आलेले कांहीं मारवाडी अगर मारुधेड व कोंकण आणि दक्षिणेंतून आलेले कांहीं महार धेड आहेत. धेडांत उपनांवांवरून पडणाऱ्या पोटवर्गांशिवाय इतरहि पुष्कळ पोटवर्ग आहेत. अगदीं प्राचीन पोटवर्ग म्हटले म्हणजे चासिया आणि कुसिया हे होत. यांच्यांत मारुशिवायकरून आणखी दहा पोटवर्ग असून त्यांनां धंद्यावरून अगर स्थलांवरून निरनिराळीं नांवें पडलीं आहेत. मारवाडी धेड इतर सर्व वर्गांशीं रोटीव्यवहार करीत नाहींत व गुजर धेड फक्त महार धेडांशीं रोटीव्यवहार करीत नाहींत. मारवाडी आणि सुरती धेडांनां एक प्रकारचा विशेष मान असतो. मारवाडी धेड इतरांशीं न मिसळतां उंट हांकण्याचें काम करून पोट भरतात. सुरती धेड हे पार्शी व यूरोपियन लोकांशीं शरीरसंबंध केल्यामुळें दिवसेंदिवस गोरे होत चालले आहेत ( बॉम्बे ग्याझे. पु. ९. भा. १. पृ. ३३९ ). ते यूरोपियन आणि पार्शी लोकांच्या घरीं

आचाऱ्यांचें, चपऱ्याश्यांचें व मोत्तद्दारांचें काम करतात. कांहीं घेड स्त्रिया सुस्वरूप व देखण्या असतात. घेडांची भाषा अशुद्ध गुजराथी आहे. घेड हलकीं धान्यें, मांस ( आपोआप मेलेल्या जनावरांचें मांसहि) खातात. ते अफू खातात व दारू पितात. यांचा पोषाख अगदीं भिकार असतो. सुखवस्तु घेड लोकांचा पोषाख चांगला असतो. स्त्रिया गळ्यांत " किडिया " म्हणजे कांचेच्या मण्यांच्या माळा घालतात, नाकांत कांचेच्या म्होरण्या घालतात, व हातांत हस्तिदंती बांगड्या व पायांत चांदीचे वाळे घालतात. अहमदाबाद व खेडा या जिल्ह्यांतील घेड लोक खासगी नोकर आहेत. त्यांना चांभारांपेक्षां अधिक मान असून मेलेलीं जनावरें ओढून नेण्याशिवाय कोणतींहि इतर हलकीं कामें ते करीत नाहींत. पूर्वी ते कापूस पिंजून खादी विणीत असत व सरकारी खजिन्याची ने आण करीत. परंतु सांप्रत गिरण्यांमुळें त्यांचा खादीचा धंदा बसला व ते मजुरी करू लागले.

गुजराथेंत जमीनदारी किंवा शेतकरी आणि घेड कुटुंब यांतील संबंध धनी आणि गुलाम यांसारखा असतो. जमीनदार मेल्यावर त्याच्या जमिनीबरोबर त्याच्या घेडांचीहि वांटणी होते. कुणबी व घेड लोक लेव आणि देव या दोघां भावांचे वंशज आहेत अशी दंतकथा आहे. घेड लोक फार उद्धट असतात. उत्तर गुजराथेंत भंगी लोकांपेक्षां घेडांविषयीं फार तिटकारा आहे. तिकडे पूर्वी थुंकण्यासाठी घेडांनां गळ्यांत मडकीं बांधावीं लागत व आपलीं रस्त्यांत उमटलेलीं पावलें पुसून टाकण्यासाठीं हातांत झाडाच्या डहाळ्या न्याव्या लागत.

रस्ते झाडणें वगैरे कामें घेडच करतात. याबद्दल त्यांनां इनामी जमीन असून मोठमोठ्या शहरांतून घेड लोक शौचकूप झाडण्याचेंहि काम करतात. बहुतेक घेड लोक बीजमार्गी कबीरपंथी व रामानंदी असून, कांहीं हरिबावाचे अनुयायी व स्वामीनारायणपंथी आहेत. त्यांचीं कुलदैवतें नाहींत. त्यांचीं देवळें गांवाबाहेर असतात. शकून, जारणमारण व चेटूक यांवर त्यांचा विश्वास आहे. घेड लोक आपले उपाध्याय जे गारुड त्यांनां अत्यंत मान देतात. त्यांच्यांत खिमो व शिवो हे साधू होऊन गेले. मुलाचें नांव पांचव्या दिवशीं ठेवतात. घेड लोक अलीकडे शिक्षण संपादन करू लागले आहेत. या गुजराथी घेडांप्रमाणेंच इतर भागांतील घेडांची बहुतेक स्थिति आहे व हल्लीं हे झपाट्यानें सुधारत आहेत. [बॉंबे ग्याझेटियर पु. ९ भा. १; सेन्सस ऑफ इंडिया, १९११, पु. ७; अलोनी--लग्नविधि व सोहळे. ]

**घेंडा**—नवरीमुलगी वराच्या घरीं ( वरात ) निघाली म्हणजे त्यावेळीं घेंडा नाचवितात. एक माणूस नवरानवरीस आपल्या दोन्ही खांद्यांवर घेऊन नाचतो व देवाचें गाणें म्हणतो. त्यावेळीं मंगलवाद्यंहि वाजतात. 'टाळ गेला मांदळ गेला माझा घेंडा नाचूं द्या ' अशा पालुपदाचीं गाणीं म्हणतात. हा एक कुलाचार असून कांहीं खेडेगांवांत ब्राह्मणांपासून खालच्या जातींपर्यंत तो पाळण्यांत येतो. मात्र वधूवर लहान वयाचीं असावयास पाहिजेत. पूर्वीप्रमाणें वधुवरें अल्पवयी नसल्यामुळें सांप्रत हा विधि सर्रास आढळत नसून कमी होत आहे. घेंडा हा शब्द मूळचा अरबी आहे.

**धेनकानाल संस्थान**—ओरिसामधील एक मान्डलिक संस्थान. क्षेत्रफळ १४६३ चौरस मैल. यांत २ शहरें व ८६० खेडीं आहेत. उत्तरेस पाल लहरा व केओन झहार संस्थानें. पूर्वेस कटक जिल्हा व अथगड संस्थान. दक्षिणेस अथगड, तिगिरीया व हिन्दोल आणि पश्चिमेस आन्गूर जिल्हा, तालचर व पाललहरा हीं संस्थानें. धेनका ह्या मूळ नांवावरून हें नांव आलें असावेंसें वाटतें. या धेनकास खुर्दा घराण्यांतील पुरुषानें एका नाल्यांत मारून राज्य स्थापलें. हें १७ व्या शतकांत अस्तित्वांत आलें. या घराण्यांतील त्रिलोचन महेन्द्र बहादूरच्या कारकीर्दीत ( १७५६-९८ ) ह्यांत आणखी बराच भाग मिळविण्यांत आला. भगीरथ महेन्द्र हा फार चांगला राजा होऊन गेला. त्याला १८६९ सालीं ' महाराजा ' ही पदवी देण्यांत आली. ओरिसाच्या मांडलिक संस्थानांत धेनकानालचा तिसरा नंबर लागतो. या संस्थानचें उत्पन्न २.१९ लाख रुपये असून ब्रिटिश सरकारास ५०९९ रुपये खंडणी द्यावी लागते. लोकसंख्या ( १९११ ) २७०१७५, पैकीं २६५७५० हिंदू आहेत. हिंदूंत चासपान, सहर, गौर, खंडैत, वगैरे जाती आहेत.

या संस्थानांत धेनकानाल व भूवन हीं मोठीं गांवें आहेत. या संस्थानांत लोखंड पुष्कळ सांपडतें. संस्थानांत सडका चांगल्या आहेत. कांहीं दवाखाने, एक हायस्कूल, १०-१५ उच्च व माध्यमिक शिक्षणाच्या शाळा व २०० च्या वर प्राथमिक शाळा आहेत. राजधानीचें नांव धेनकानाल. यास निजगड असेंहि नांव असून त्याची लोकसंख्या ६ हजारांपर्यंत आहे. येथील राजवाडा पहाण्यासारखा आहे. [ इंपे. ग्याझे. ]

**धेबर तलाव**—राजपुताना. उदेपूर संस्थानांतील एक मोठा तलाव. उदेपूर शहराच्या आग्नेयीस ३० मैल. याच्या पश्चिमेस ८०० ते १००० फूट उंचीचे डोंगर आहेत. याच्या उत्तरेकडील भागांत लहान लहान बेटेंहि आहेत. नैर्ऋत्येस गोमती नदीस बांध घालून पाणी अडविलेलें आहे. सन १६८५ व १६९१ च्या दरम्यान हा तलाव राजा जयसिंगानें बांधिला व त्यावरून ह्यास जयसमुद्र हें नांव पडलें. मध्यभागीं एक सुंदर नकशीकाम असलेलें हिंदु देवालय आहे व कांठावर कांहीं वाडे आहेत. यापासून निघालेल्या कालव्यांनीं सुमारें १९ चौरस एकर जागा भिजते. [ इंडियन ॲंटिक्वरी, पु. १ ]

**घोडप किल्ला**—मुंबई, नाशिक जिल्हा. चांदोरच्या वायव्येस १५ मैलांवर अजिंठा अथवा चांदोर टेंकड्यांमध्यें सर्वांत उंच (४७७१फूट) टेंकडीवर हा किल्ला आहे. याला दोन रस्ते आहेत. एक दक्षिणेकडून चांदोर तालुक्यांतून माचीच्या बाजुला व दुसरा उत्तरेच्या कळवण तालुक्याच्या बाजूनें

पायथ्याशीं असलेल्या ओतुर गांवांतून ओतुरकडील रस्ता सोपा पण लांब आहे. मुख्य किल्ला येथूनहि पुष्कळ उंचावर आहे. येथें दोन फारसी शिलालेख आहेत. किल्ल्यांत किल्लेदाराचा पडका वाडा, एक देवीचें देऊळ, एक टांकें, कांहीं खडकांत खोदलेलीं तळघरें व गुहा आहेत. पूर्वेच्या बाजूच्या एका मशीदींत एक देवनागरी शिलालेख आहे. येथें एक त्रिकोणमिति मोजणीचें स्थान आहे. हा किल्ला अलिवर्दीखान यानें स. १६३५ त मोंगलांच्या वतीनें जिंकला होता. नंतर तो पेशव्यांकडे आला. मध्यंतरीं कांहीं काळ तो होळकरांच्या ताब्यांत होता ( १८१७ ). राघोबादादाचा थोरल्या माधवरावानें येथेंच पराभव केला ( १७६८ ). [ नाशिकग्याझे. ]

**धोडान**—पंजाब. पतियाळा संस्थानामध्यें असलेल्या कर्मगड निझामतींतील एक तहशील. हिला भवानीगड असेंहि म्हणतात. क्षेत्रफळ ४९७ चौरस मैल. तहाशिलींत मोठें गांव १ असून खेडीं २०४ आहेत. लोकसंख्या (१९११) १०२४३५.

**धोडिया**—हे मूळचे अनार्य होत. यांची मुख्य वस्ती गुजराथेंत असून लोकसंख्या ( १९११ ) ९३०१०५. हे लोक चपळ, मजबूत व ठेंगू आहेत; ते झोंपड्यांतून राहतात. लग्नांत मंगळसूत्रासारखा दोरो नांवाचा चांदीचा गोफ बायकांच्या गळ्यांत बांधतात. यांचा मुख्य धंदा शेती व मजुरी हा आहे. यांचा दर्जा दुबळे जातीच्या वरचा मानतात. यांचे देव शामळदेव व हरिआदेव असून त्यांच्यापासून भविष्यज्ञान व दिव्यरूप त्यांनां मिळतें. यांचे उपाध्याय नाईक असतात. यांच्यांत हुंडा मुलाकडून घेतात व लग्नासाठीं वधू ही वराच्या घरीं जाते. वधूवरांच्या पदरांनां गाठ मारणें हाच मुख्य लग्नविधि आहे. यानंतर वधू माहेरीं जाते व ४–५ दिवसांनीं वरानें सासुरवाडीस जाऊन तिला आणावयाचें असतें. वरास हुंडा देण्याचें सामर्थ्य नसल्यास त्यानें वधूच्या घरीं ५ वर्षें नोकरी करावयाची असते. या मुदतींत त्याला मजुरी न मिळतां उलट हलगर्जीपणा केल्यास त्याला हाकलून देतात. या प्रकारास खंधादियो किंवा खंडालिया म्हणतात.

मृताची स्त्री प्रेतावरोबर स्मशानांत जाते.स्मशानांतून परत आल्यावर सर्व मंडळी दारू पितात. तिसऱ्या दिवशीं राख गोळा करतांना राखेवर ताडी शिंपडतात व ती पितात. पंधराव्या दिवशीं गांवांतील भगताकडून मृताच्या नांवाचा एक दगड गांवाबाहेर पुरतात व त्याची पूजा करतात. दिवाळींत या दगडास बकरें, कोंबडें बळी देतात. गांवचा नाईक हाच त्यांचा जातीचा सरपंच; तो वंशपरंपरागत असतो. ज्ञातिसभा यांच्यांत आहेत. हल्लीं यांचीं मुलें शिकूं लागलीं आहेत. सावकारीचा धंदाहि हल्लीं अल्प प्रमाणांत हे करूं लागले आहेत.

ठाणें जिल्ह्यांत डहाणू तालुक्यांत यांची थोडीशी वस्ती आहे. रहाणी गलिच्छ आहे.बायकांच्या पायांत गुडघ्यापर्यंत तांब्यापितळेचे वाळे घालतात.जखाईजोखाई हीं यांचीं कुलदैवतें होत. कुलनामें इतर उच्च जातींत आढळतात. यांचीं लग्नें फक्त गुरुवारींच होतात. दुबळा, नाईकडा व चोधा यांच्या हातचें हे लोक खातात. जातिसभेंत वयांत आलेल्या सर्व माणसांनां मताधिकार असतो. दंडाची रक्कम मद्यपानांत खर्च होते व थोडासा भाग पंचायतीपाशीं शिल्लक ठेवून त्यांतून गरिबांचें क्रियाकर्मांतर करतात. [ सेन्सस रिपोर्ट १९११, पु.७; ठाणें ग्याझे. ]

**धोंड्या वाघ**—अठराव्या शतकाच्या अखेरीस दक्षिण हिंदुस्थानांत होऊन गेलेला एक प्रसिद्ध लुटारू. हैदरच्या कारकीर्दींत विष्णुपंडित नांवाच्या सरदाराच्या हाताखालीं हा शिलेदार होता, परंतु बुद्धिमान् व धाडशी असल्यामुळें लवकरच म्हैसूरच्या सैन्यांत बारगीर झाला. पुढें हैदराप्रमाणें स्वतंत्र सत्ता स्थापण्याची इच्छा धरून व स्वतःस राजा म्हणवून घेऊन त्यानें टिप्पूची नोकरी सोडून कांहीं लोक गोळा केले; व धारवाडजवळ लक्ष्मेश्वरच्या देसायाचा आश्रय धरून टिप्पू व मराठे यांचीं गांवें लुटण्यास व लोकांकडून कर वसूल करण्यास सुरवात केली. त्यानें हावेरी, सावनूर व दुसरीं कांहीं ठिकाणें काबीज करून इतर कांहीं ठिकाणें उध्वस्त केलीं. यामुळें मराठ्यांनां त्याचा समाचार घेणें भाग पडलें. स. १७९३ त परशुरामभाऊंनीं त्याच्यावर मोठें सैन्य पाठविलें; तेव्हां त्यानें पळून जाऊन पुन्हां टिप्पूच्या पदरीं नोकरी धरली व कांहीं अटीवर मराठ्यांकडून सावनूर परत घेण्याचें त्यास अभिवचन दिलें; टिप्पूनेंहि त्याचा उपयोग करून घेतां येईल असें जाणून त्यास मागच्या अपराधांची क्षमा केली व मुसुलमानी धर्माची दीक्षा देऊन सैन्यांत जागा दिली. पुढें कांहीं कारणानें टिप्पूची त्याच्यावर गैरमर्जी होऊन त्यास पुन्हां बंदिवास भोगावा लागला. स. १७९९ त श्रीरंगपट्टण पडल्यानंतर इतर कैद्यांबरोबर त्याची सुटका झाली. बंदिवासांतून मुक्तता झाल्याबरोबर धोंड्यानें टिप्पूच्या सैन्यांतून सुटलेले कांहीं शिपाई गोळा करून आसपासच्या मुलखांत हल्ले करून लुटालुटीस आरंभ केला. त्यानें बेदनूर जवळचा मुलुख बळकावून, उत्तरेस मराठ्यांच्या हद्दींत चाल केली. त्यामुळें कर्नाटकचा सरसुभेदार धोंडोपंत गोखले यानें एक वेळ त्याच्यावर अचानक छापा घालून त्याची छावणी लुटली. परंतु धोंड्या वाघ त्याच्या हातांतून निसटला व कोल्हापूरच्या राजाचा आश्रय करून धोंडोपंताचा सूड घेण्याची संधि पहात राहिला.

धोंड्या वाघाचा बंडखोरपणा दिवसेंदिवस वाढत चालला म्हणून त्याचें पारिपत्य करण्यास पेशव्यांनीं धोंडोपंत गोखल्यास पाठविलें. त्याप्रमाणें धोंडोपंत व सांगलीचे चिंतामणराव पटवर्धन हे कित्तूरकडे धोंड्यावर चाल करून गेले. कित्तूरजवळ दावणगी येथें त्यांच्या दरम्यान लढाई झाली. परंतु तींत धोंडोपंत व त्याचा एक पुतण्या हे दोघे मारले जाऊन धोंड्या वाघ विजयी झाला ( १३ जुलई १८०० ). धोंडोपंत

गोखल्यानां मारून त्याच्या रक्तानें मिशा तांबड्या करण्याची त्यानें प्रतिज्ञा केली होती असें म्हणतात. अखेरीस मराठे व इंग्रज या दोघांनीं मिळून धोंड्यावर चाल करून जाण्याचें ठरविलें; इंग्रज व मराठ्यांची फौज कित्येक दिवस धोंड्याचा पाठलाग करीत होती, परंतु त्यानें त्यांनां दाद दिली नाहीं. शेवटीं ( १० सप्टेंबर १८०० ) जनरल वेल्स्ली यानें धोंड्या वाघाला त्याच्या ५००० लोकांनिशीं कोंगल येथें गांठून त्याचा मोड केला; व त्या चकमकींतच धोंड्या मारला गेला. रक्तानें माखलेल्या धोंड्याच्या मिशा वेल्स्लीनें विजयचिन्ह म्हणून इंग्लंडास नेल्या असें म्हणतात. धोंड्याच्या मृत्यूनंतर त्याचा ४ वर्षांचा मुलगा सलाबतखान याला वेल्स्लीनें विलायतेस जातांना त्याच्या उदरनिर्वाहाकरितां व शिक्षणाकरितां स्वतः जवळचे ४०० पौंड दिले असें समजतें. सलाबतखान चांगला हुषार निघाला होता. त्याला म्हैसूरच्या राजाच्या पदरीं नोकरी मिळाली होती व तेथेंच तो १८२२ सालीं महामारीनें मरण पावला. [ पारसनीस-सांगली संस्थान; बील; डफ; खरे, भा. १२ ]

**धोतरा**—या वनस्पतीला संस्कृतांत धत्तूर अथवा उन्मत्त हीं सार्थ नांवें आहेत. ही वनस्पति हिंदुस्थानांत सर्वत्र वाढते. बहुधां घराशेजारच्या उकिरड्यावर किंवा शेतांच्या बाजूनें कुंपणांत ही वाढत असते. ही वनस्पति बहुतेक परदेशीय असावी. ही पूर्वींची खास हिंदुस्थानांत होणारी वनस्पति आहे असें मत प्रतिपादन करण्यास कांहींच प्रमाण दिसत नाहीं. या वनस्पतीचे दातुरा स्ट्रमोनियम व दातुरा फॅस्टुओसा असे दोन प्रकार आहेत. पैकीं एकाला पेल्याच्या आकारासारखें पांढरें फूल येतें व दुसऱ्याला जांभळें फूल येतें. हिच्या फळांतील बीं विषारी असतें. भांग विशेष मादक व्हावी म्हणून तींत हिचें बीं घालतात. या विषानें माणूस मरतें. दारूसारख्या पेयांत हिचें मिश्रण केलें तर तें मिश्रण पिणारा इसम वेडा होतो. हिंदुस्थानांतील गुन्ह्यांच्या वार्षिक अहवालावरून या विषाचा किती तऱ्हेनें उपयोग होतो हें स्पष्ट कळतें.

**कांटेधोतरा**.—हें लहान झुडूप आहे. यास लॅटिनमध्यें अग्रिमोन मेक्सिकाना, संस्कृतमध्यें स्वर्णक्षीरी, हेमदुग्धा, हिमावती, मराठींत पिंवळा धोतरा, विलायती धोतरा, विलायत, हिंदींत फिरंगी धतूरा, भेरवंड, मीलाधतूरा, गुजराथींत दारुडी, तेलगूंत ब्रम्हदंडी, इत्यादि नांवें आहेत. हें झाड सुमारें दोन हात वाढतें. याच्या सर्वांगावर बारीक कांटे असतात. यास जें बीं येतें तें बंदुकीच्या दारूप्रमाणें काळें असतें व त्याचें तेलहि काढतात. या झाडाचे अनेक औषधी गुण आहेत. [ वाट; पदे. ]

**धोत्रिय**—मध्य हिंदुस्थान. भोपावर एजन्सीमधील एक ठाकुरात. क्षेत्रफळ १८ चौरस मैल. हींत ९ खेडीं आहेत. लोकसंख्या ( १९११ ) ३२०५. एकंदर उत्पन्न बारा हजार रुपये आहे.

**धोबी**—कपडे धुणारांची ही एक जात आहे. यांनां धोबी, वरठी, बरेठा, चकला, रजक, परीट, धोबा इत्यादि दुसरीं नांवें आहेत. एकंदर लोकसंख्या ( १९११ ) २०७४४०५. ही जात केवळ धंद्यावरून नांव मिळालेली आहे. सर्वच प्रांतांतल्या कपडे धुणाऱ्यांनां धोबी असें नांव नाहीं. बावनिया, वरारिया, माळवी, बुंदेलखडी, निमरिया, कनौजिया, उदेपुरिया, मद्रासी, धरमपूरिया, इत्यादि यांचे पोटभेद आहेत. मुसुलमान धोब्यांची स्वतंत्र निराळी जात आहे. तिची संख्या ३२२२३९ आहे. हिंदुस्थानांत हे लोक सर्वत्र आहेत, त्यांत संयुक्तप्रांत, बंगाल, बहार, ओरिसा, मध्यप्रांत इकडे यांची वस्ती जास्त आहे.

धोबी बाळंतिणींचे व विटाळशांचे कपडे धुतात त्यामुळें अपवित्र गणले जातात. राजपुतान्यांत धोब्यांनीं खणलेले नदीच्या कांठच्या पाण्याचे खड्डे फार अपवित्र समजतात आणि " जर मी ही शपथ मोडली तर माझे पितर धोब्याच्या खड्डयांत पडोत " असें या खड्डयाबद्दल म्हणतात. धोबी हे महार, चांभार व मांग यांचे कपडे धूत नाहींत. कांहीं जातींत विवाहानंतर वधूस घेऊन धोब्याकडे जातात व धोबिणीकडून वधूस विडा देववितात. या विड्याला सोहाग म्हणतात व हा फार शुभ समजतात. लग्नांत पायघड्या घालण्यास धोब्यास बोलावितात. यवतमाळ जिल्ह्यांत नाचांत धोबी हा वराच्या मामाचें सोंग घेतो आणि वरानें वधूच्या गळ्यांत मंगळसूत्राच्या पांच गांठी घातल्यावर, न्हावी व धोबी वधूवरांस कडेवर घेऊन धेंडा नाचवितात. कोठेकोठें धोबी वधूच्या हातांत कंकण बांधतो.

धोबी आपल्या गिऱ्हाइकांचे कपडे उपयोगांत आणतात असें पद्याण्यांत येतें. "राजाचे शिरीं तें परटाचे टिरीं" अशी एक म्हण आहे. मद्रासकडे हे आपल्या गिऱ्हाइकांचे कपडे प्रेतविधींत भाड्यानें देऊन बरेच पैसे मिळवितात.

काश्मीर-पंजाबांतलि धोबी मुख्यत्वें मुसुलमान आहेत; ते सर्व पंजाबभर आढळतात. पंजाबच्या कांहीं भागांत हे पिंवा म्हणून ओळखले जातात.

आसामांतील या जातीची लोकसंख्या(१९११) ३३९४३, बंगाल्यांतील ( २३१८९० ) व ओरिसांतील ( ४२७०७९ ) आहे. कपडे धुणाऱ्या या जातीला ओरिसांत धोबा व विहारमध्यें धोबी म्हणतात. आसामांत असा फरक दिसून येत नाहीं. इकडे ह्या जातीच्या लोकांचा समाजांतील दर्जा हलका असून त्यांनां चांडाळ वर्गांतलि लोकांबरोबरीचे समजतात.

गुजराथ, काठेवाड व कच्छ इकडील धोबी अस्पृश्यांखेरीज इतर सर्वांचे कपडे धुतात. लग्नांच्या वेळीं मुलाकडून मुलीला ८०–१०० रुपये किंमतीचे दागिने मिळतात; त्याला "पाला" म्हणतात. लग्नांतलि मुख्य भाग म्हटला म्हणजे जोडप्यानें होमाला चार प्रदक्षिणा घालणें हा होय. या विधीला मंगलफेरो म्हणतात. हे लोक मांसाहारी आहेत.

सुरत शहरांत यांची मध्यवर्ती पंचायत आहे. या जातसभेचे चार अधिकारी ( पटेल ) असून यांच्या जागा परंपरागत चाललेल्या असतात. या मध्यवर्ती पंचायतीखेरीज यांच्या वेगळ्या पोटपंचायतीहि आहेत. मुंबईचे धोबी लोक सुरत पंचायतीचे निकाल प्रमाण मानितात. मध्यवर्ती पंचायत बोलावणें असल्यास फिर्यादीला ९ रु. भरावे लागतात. दंडाचें उत्पन्न पटेलाजवळ असतें. गुजराथेंत हे लोक मोठमोठ्या घराण्यांत नौकरी करतात. येथील धोबी रामानुज, कबीर व वल्लभपंथाचे आहेत. हे घरीं मूर्ती ठेवीत नाहींत; देवळांत दर्शनास जातात. खेडा जिल्ह्यांतील श्रावक लोक मुसुलमान धोब्यांनां श्रावणांत घरवसल्या बक्षिसें देतात.

मध्यप्रांतांतील मंडला भागाकडे यांनां धोबा म्हणतात. ते आपल्याला इतर धोब्यांहून निराळे मानतात. यांच्या पूर्वजासंबंधानें प्राइसनें अशी दंतकथा सांगितली आहे कीं, यांचा पूर्वज एका धोब्यानें पाळून वाढविला व आपल्या मुलीबरोबर त्याचें लग्न करून जी संतति झाली तिची त्यानें धोबा म्हणून नवी जात स्थापन केली. हे बुन्हानेर नदीच्या वरच्या खोऱ्यांत रहातात. यांच्या चेहऱ्यावरून यांच्यांत गोंडांचें मिश्रण असावें असें वाटतें. यांच्यांत १२ कुळें आहेत; कुलांचीं नांवें गांवांवरून पडलीं आहेत, तीं:—वाघमार, बाघचारिया, मराठा, खटनागर मरालवती, सोनवाणी व सोनसोनवाणी. सोनवाणी हें कुल सर्वांत उच्च आहे. बहीणभावांचीं मुलें आपसांत विवाह करतात. निरनिराळ्या नवऱ्यांपासून आईस झालेल्या मुलांचीं परस्पर लग्नें होतात. यांचा मुख्य देव घटाइया असतो. ज्या नदींत हे कपडे धुतात तिच्या घाटावर देवाचें स्थान असतें. आषाढांत हे त्याला दारूचा नैवेद्य दाखवितात. पाण्यांत कपडे धुण्यास शिरण्यापूर्वी कपडे धुण्याच्या दगडास नमस्कार करतात. व सर्प, मगर यापासून बचावण्यासाठीं प्रार्थना करतात. दसऱ्याला या दगडाची पूजा करतात. या दगडांत स्त्रियांचें वशीकरण करण्याची शक्ति असते; ग्रहणाच्या रात्रीं बाजारांतून सुपारी चोरून आणून ती या दगडावर ठेऊन, तिच्यापुढें एक अंडें व एक नारळ फोडून धूप जाळावा, मग ती सुपारी घरीं आणावी व जी स्त्री वश व्हावी असें वाटत असेल तिला विड्यांतून ती सुपारी खाण्यास द्यावी म्हणजे ती वश होते अशी यांची समजूत आहे. धोबी प्रेतें पुरतात किंवा जाळतात. मृताचें अशौच ३ दिवस पाळतात. त्यांच्या सरपंचांस मेहतर म्हणतात. उपाध्यक्षाचे चौधरी व वडकूर हे अधिकार वंशपरंपरेनें चालतात व त्यांस प्रत्येक प्रायश्चित्तविधींत एक एक रुपया हक्कानें मिळतो.

यांचा सरपंच सोनवाणी कुलाचा असतो. त्याला हे राजा म्हणतात. तोच लोकांस शुद्ध करण्याकरितां सोन्याचें पाणी पाजतो. राजाला कोणीहि दुय्यम नसतो.त्यास कधींहि दक्षणा मिळत नाहीं पण जेवण व मिठाई मिळते.इतर पंच तो नेमतो. ही निवड कोणत्याहि कुळांतून होते. जातिबहिष्कृतास परत जातींत येण्याकरितां त्यानें जातीस ३ भोजनें द्यावीं लागतात. दुसऱ्या जातीची स्त्री राख म्हणून ठेविली तर तिला सोडल्याखेरीज जातींत घेत नाहींत. हे लोक गोंडांचें पौरोहित्य करतात. हल्लीं हे आपल्या धर्मविधींनां ब्राह्मण बोलावूं लागले आहेत. हे गोमांस व उंदरांच्या मांसाखेरीज सर्व प्रकारचें मांस खातात. छत्तीसगडांतील धोबी लोकांत यांचें मिश्रण झालें असावें असें रसेल म्हणतो. [ बॉंबे ग्याझे. पु. ९. भा.१; सेन्सस रिपोर्ट १९११, पु. ३, ७, २०; रोझ— ग्लॉसरी; क्रुक—ट्राइब्ज. ]

धोबी काम.—देशी धोबी कपडे धुतांना ७ ग्यालन पाण्यांत ५ पौंड सोडाखार घालून त्यांत कपडे उकळतात. ओपवावयाच्या वेळीं भाताची पेज किंवा कणीक कपड्यांस लावतात. यूरोपांत धुण्याची पद्धत (लॉन्डरी सिस्टीम) इतकी पूर्णत्वाला गेली आहे कीं, शहर व खेड्यांतून तर ती आहेच; पण आगवोटीवरसुद्धां तिचें वास्तव्य आहे. ज्याप्रमाणें पोस्टाचीं कामें बिनचूक होतात, त्याचप्रमाणें तिकडे लॉन्डरीच्या कारखान्यांत सर्व तऱ्हेच्या कपड्यांची व्यवस्था वक्तशीर बिनचूक होते. तेथें सर्व कपडे मोटारच्या साहाय्यानें गोळा करतात व नंतर स्वच्छ आणि घाणेरडे कपडे निरनिराळे काढितात. त्यानंतर रेशमी, जरीचे किंवा लोंकरीचे कपडे निरनिराळे करतात. कोठें कांहीं फाटलें किंवा उसवलें असल्यास ते लगेच दुरुस्त करून त्यांचें वर्गीकरण करतात. ते सांसर्गिक रोगांचे वगैरे असल्यास एका मशीनमध्यें घालून, त्यांवर वाफ सोडून जंतू नष्ट करतात व नंतर दुसऱ्या यंत्रांत घालून, साबणाची फकी, गरम पाणी आणि वाफ सोडून तें यंत्र चालू झालें कीं, त्यायोगें कपड्यांपासून मळ निराळा होतो. मळ निराळा झाल्यास त्या यंत्रांत पुन्हां थंड पाणी घालून तें चालू करतात. त्यायोगानें कपड्याचा सर्व मळ थंड पाण्यांत मिसळून कपडा मळरहित होतो. नंतर तो कपडा थंड पाण्याच्या दुसऱ्या यंत्रांत घातला असतां खळबळून मळ गेल्यामुळें स्वच्छ होतो. त्यांतील सर्व पाणी निघून जावें म्हणून ते निराळ्या यंत्रांत घालतात. कपडा साधारण ओला असला तर शेजारीं "हीटचेंबर" म्हणून एक गरम खोली केलेली असते तींत कपडे सुकवितात. लवकर सुकावे म्हणून आंत गरम वाफ सोडावी लागते. त्यामुळें बाहेर कितीहि पाऊस असला तरी ते सुकतात. साधारण वाळत आले कीं, कपडे रोमिंग मशीनमध्यें घातले असतां त्यानें कपड्यांनां पॉलिश चढून चांगली स्वच्छ इस्त्री आपोआप होते. ( या धुण्याच्या सर्व यंत्रांची माहिती चित्रमयजगतच्या जून १९२५ च्या अंकांत पहावयास मिळेल.). इस्त्री झाल्यावर पुन्हां कपडे सॉर्टिंग रूममध्यें आणून तेथें निरनिराळ्या तऱ्हेनें त्यांचें वर्गीकरण करून ते मालकाच्या यादीप्रमाणें तपासून त्यांची पार्सलें बांधतात, तीं नंबरवारीनें ठेवतात व मोटारींतून ज्यांचीं त्यांस रवाना करतात. इतकीं कामें बिनचूक, पद्धतशीर, थोड्या वेळांत, थोड्या माणसांच्या सहाय्यानें व कोणाची तक्रार न येतां सुरळीत होतात.

**धोरहरा**—संयुक्तप्रान्त. खेरी जिल्ह्याच्या निघासन तहशिलींतील एक गांव. लोकसंख्या सुमारें पांच हजार. हें गांव पूर्वी पासी राज्याची राजधानी होती अशी आख्यायिका आहे. १८५७ च्या बंडाच्या सालीं शहाजहानपूर व महंमदी येथून पळालेल्या लोकांनां धोरहराच्या राजानें आश्रय दिला होता व त्याबद्दल चौकशी होऊन धोरहराच्या राजास फांशी देण्यांत आलें व त्याची इस्टेट सरकारजमा झाली. या इस्टेटीचा कारभार स.१८५६ च्या २० व्या कायद्याप्रमाणें होतो. गांवांचें उत्पन्न सुमारें ७०० रुपये आहे. [ इंपे. ग्याझे. ]

**धोराजी**—मुंबई इलाखा,काठेवाड. गोण्डल संस्थानांतील एक तटबंदी गांव. हा गांव राजकोटच्या नैर्ऋत्येस ४३ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९११ ) २१११६ असून पैकीं १०५९९ लोक हिंदु आहेत. भादर नदीच्या पूर्वेस तीन मैलांवर हा गांव आहे. हा गांव गोण्डलच्या दुसऱ्या कुंभोजी राजानें १८ व्या शतकांत जुनागडच्या राजाजवळून मिळविला. हा व्यापाराचा गांव आहे. कापूस व धान्य यांचा व्यापार चांगला चालतो. स्टेशनपासून गांवापर्यंत घोड्याची ट्रामगाडी आहे. शहराजवळून साफ्रा नदी वहाते. भावनगर-धोराजी आगगाडीच्या फांट्याचें हें शेवटचें स्टेशन आहे. येथें सरकारी कचेऱ्या, दवाखाने, शाळा व डांकबंगले आहेत. [ बॉंबे ग्याझे. पु. ८. ]

**धोलपूर,सं स्था न.**—राजपुतान्यांतील अगदीं पूर्वेकडचें संस्थान. संस्थानच्या मुलकी कागदपत्रांत दिल्याप्रमाणें याचें क्षेत्रफळ ११९७ चौरस मैल आहे. मर्यादाः—उत्तरेस आग्रा जिल्हा; वायव्येस भरतपूर; पश्चिमेस करौली व दक्षिणेस आणि पूर्वेस ग्वाल्हेरचें संस्थान. उत्तर भाग उघडा व सपाट आहे; पण इतरत्र पुष्कळ लहान टेंकड्या व खिंडी आहेत. राजधानीजवळून नैर्ऋत्येकडे जाणाऱ्या रांगेची सर्वांत जास्त उंची ११७१ फूट आहे. चंबळा नदीच्या कांठच्या प्रदेशाला डांग म्हणतात; त्यांत खिंडी पुष्कळ असून त्यांपैकीं कांहीं १०० फूट खोल व २ ते ४ मैल लांबीच्या आहेत.

चंबळा नदी संस्थानच्या दक्षिण व पश्चिम सरहद्दीवरून वहाते व बाणगंगा नदी संस्थानच्या वायव्य व उत्तर सरहद्दीवरून पूर्वेकडे वहाते.हिचें पात्र सपाटीपासून४०फूट खोल आहे तरी पावसाळ्यांत पुरापासून भय असतें. पार्वती नदी करौलीच्या डोंगरांत उगम पावून बाणगंगेला मिळते. पार्वती नदीस मेंडका व मेंडकी या नद्या मिळतात.वाघ,चित्ता,अस्वल, सांबर, नीलगाय, डुक्कर, खोंकड वगैरे श्वापदें या संस्थानांत आढळतात. येथील हवा साधारणपणें निरोगी आहे. एप्रिल, मे व जून या महिन्यांत उष्ण वारे वाहतात व सरासरी मध्यम उष्णमान जानेवारींत ६०° व मे महिन्यांत ९६° असतें. पावसाचें सरासरी मान २५ किंवा २६ इंच आहे.

**इतिहासः**—हल्लीं जेथें धोलपूर संस्थान आहे त्या प्रदेशाचा प्राचीन इतिहास फारसा उपलब्ध नाहीं. इ. स. ७९२ ते ११६४ पर्यंत दिल्लीस राज्य करणाऱ्या तोमर रजपुतांच्या ताब्यांत हा प्रदेश होता अशी दंतकथा आहे. पश्चिम भाग मात्र एके काळीं करौलीच्या यादव रजपुतांकडे होता. कनोज राज्याचा मोड केल्यावर महंमद घोरीनें बयाना व ग्वाल्हेरचे किल्ले घेतले (११९४). पुढें धोलपूरच्या एका राजानें बहलोल लोदी याला पुष्कळ मण सोनें देऊन त्याची मर्जी संपादन केली. स. १५०० त शिकंदर लोदीनें येथील माणिकदेवावर चाल केली व पुढच्या वर्षी धोलपूरचा किल्ला घेऊन सर्व देश लुटला. स. १५०४ त किल्ल्याचा अधिकार मुसुलमान कामगारांकडे गेला. खानुआ येथील (१५२७)विजयानें हा सर्व प्रदेश बाबरकडे आला.अकबरच्या कारकीर्दीत हें संस्थान आग्र्याच्या सुभ्यांत मोडत असे. या संस्थानांतील सामूगड येथें औरंगझेब व दारा यांच्या दरम्यान लढाई झाली. शहा अलम ( बहादुरशहा ) व अझमशहा यांच्यामध्यें याच प्रदेशाजवळ लढाई होऊन तींत ( १७०७ ) अझमशहा मरण पावला. या बखेड्याचा फायदा घेऊन राजा कल्याणसिंग भदौरिया ( संयुक्त प्रांतांतील इटावा येथील) यानें धोलपूर आपल्या ताब्यांत घेतलें. त्यानंतर भरतपूरचा जाट राजा सुरजमल यानें पानिपतच्या लढाईनंतर आग्रा प्रांत बळकावून चंबळपर्यंतचा प्रदेश काबीज करीपर्यंत,येथें भदौरिया घराणें नांदत होतें. पुढल्या ५० वर्षांत धोलपूरचें राजघराणें पांच वेळ बदललें. १७७५ सालीं भरतपूरबरोबर धोलपूरहि मिरझा नजफखानानें बळकाविलें. त्याच्या मरणानंतर ( १७८२ ) तें शिंद्याकडे गेलें; मराठा युद्ध सुरू झाल्यावर तें इंग्रजांनीं काबीज केलें होतें, परंतु सुरजीअंजनगांवच्या तहानें ग्वाल्हेर सरकारास तें परत मिळालें. १८०५सालीं दौलतराव शिंद्याशीं नवा करार करून ब्रिटिशांनीं तें परत घेतलें व धोलपूर, बारी, राजाखेड हे जिल्हे आणि शिरमथुरा यांचें एक संस्थान बनवून महाराणा राजा किरतसिंग यांस दिलें व त्याच्या मोबदला गोहद घेऊन तें शिंद्यास दिलें.

धोलपूरचे संस्थानिक बमरौलिया टोळीचे जाट आहेत. ( ११९५ च्या सुमारास आग्र्याजवळ बमरौलिया येथें या घराण्याचा मूळ पुरुष रहात होता त्यावरून हें नांव पडलें आहे ). मुसुलमानांविरुद्ध रजपुतांच्या बाजूनें लढल्याबद्दल त्यांनां स. १५०५ च्या सुमारास गोहद प्रदेश मिळाला व त्यांनीं राणा ही पदवी धारण केली याप्रमाणें हे मूळचे गोहदचे जमीनदार होत. पहिल्या बाजीरावाची येथील राण्यावर फार मर्जी होती; हा राणा१७५०त मेला. पानिपतानंतर राणा भीमसिंगानें ग्वाल्हेरचा किल्ला घेतला होता, तेव्हां राघोबादादानें त्याचा पराभव केला व त्याला मांडलिक बनविलें. पुढें ( १७७७ ) शिंद्यानें ग्वाल्हेर परत घेतलें. वारन हेस्टिंग्स यानें मराठ्यांविरुद्ध राण्याशीं तह करून दोघांच्या संयुक्त सैन्यानें ग्वाल्हेरचा किल्ला पुन्हां काबीज केला. सालबाईच्या तहानंतर ( १७८३ ), शिंद्यानें गोहद आणि ग्वाल्हेर आपल्या ताब्यांत आणिलें व संस्थान खालसा केलें. पुढें

इंग्रजानें (१८०४) गोहद व दुसरे कांहीं जिल्हे अंबाजी इंगळ्यापासून फितुरीनें घेऊन, १९ वर्षें इकडे तिकडे भटकणाऱ्या राण्याला परत दिले; परंतु स.१८०६ त तो प्रदेश पुन्हां शिंद्याकडे जाऊन त्यावद्दल राण्याला हल्लीं त्याच्या ताब्यांत असलेला मुलूख मिळाला व गोहद जाऊन धोलपूर राजधानी झाली. कीरतसिंग हा धोलपूरचा पहिला महाराज राणा होय. सं.१८३६ त त्याचा मुलगा भगवंतसिंग हा गादीवर आला. त्यानें १८५७ च्या बंडांत इंग्रजांस मदत केली. तो (१८७०त) मरण पावल्यावर त्याच्यामागून त्याचा नातू निहालसिंग (मृ. १९०१)गादीवर बसला.त्याच्यानंतर त्याचा वडील पुत्र रामसिंग गादीवर आला; तो स.१९११ त वारला. सांप्रतचा राणा हा त्याच्या मागून गादीवर आला. याचें नांव मेजर हिज-हायनेस रईस-उद्-दौला, सिपाहदर-उल मुल्क, सरदमराजा-ई-हिंद, महाराजाधिराज श्री सवाई महाराज राणा सर उदयभानसिंग लोकेंद्र बहादूर दिलेरजंग जयदेव, के. सी.एस्. आय्; के. सी. व्ही. ओ. असें असून तो निहालसिंगाचा दुसरा मुलगा आहे. याचा जन्म फेब्रुवारी स.१८९३ त झाला. याची आई रणजितसिंहाच्या वंशांतली आहे. याचें शिक्षण अजमीरच्या मेयो कॉलेजांत झालें असून इंपीरियल कॅडेटकोरमध्येंहि तो सामील झाला आहे. हा स. १९१२ त युरोपमध्यें गेला होता. याला १९१३ सालीं राज्याचे सर्व अधिकार प्राप्त झाले. धोलपूरच्या राण्याला १५ तोफांची सलामी मिळते.

राजधानीच्या दक्षिणेस चंवळा नदीच्या डाव्या तीरावर एक फार प्राचीन किल्ला आहे, तो शीरशहानें (१५४०) वाढवून मोठा केल्यापासून त्याला शीरगड असें म्हणतात. हल्लीं तो मोडकळीस आला आहे. इ. स. १६१७ च्या सुमारास शहाजहानाकरितां बांधलेल्या राजवाड्याचे अवशेष बारी गांवच्या आग्नेयीस ३ मैलांवर आहेत.

संस्थानची लोकसंख्या (१९२१) २२९७३४ असून शेंकडा ९२ पेक्षां जास्त हिंदु व शेंकडा ६ मुसुलमान आहेत. मुख्य भाषा हिंदी. शेंकडा ८४ पेक्षां जास्त लोक शेतकीवर पोट भरतात. जमीन एकंदरींत चांगली आहे. मुख्य पिकें बाजरी, मठ, ज्वारी, कापूस, गहूं व हरभरा हीं आहेत. संस्थानांत म्हणण्यासारखीं जंगलें नाहींत. धोलपुरांत सांपडणारा तांबडा वालुकामय दगड बांधकामाला फार उपयोगी पडतो. महत्त्वाचे असे उद्योगधंदे येथें नाहींत. मुख्य निर्गत माल, वालुकामय दगड, कापूस, तूप व (पीक उत्तम आल्यास) गहूं, हरभरा, बाजरी, तीळ आणि मोहरी हा असून मुख्य आयात माल, मीठ, कापड, साखर, तांदूळ व तंबाखू हा आहे. संस्थानचा बहुतेक व्यापार आग्रा जिल्हा व ग्वाल्हेर संस्थान यांशीं चालतो. ग्रेट इंडियन रेल्वेची इंडियन मिडलंड शाखा या संस्थानच्या पूर्व भागांतून दक्षिणोत्तर जाते. मुंबई-आग्रा रोड या संस्थानांतून जातो.

चंवळा नदींत धोलपूरपासून ग्वाल्हेरपर्यंत १६ घाटांवर होड्या चालतात. राजधानीपासून ३ मैलांवर राजघाट येथें पावसाळ्यांत मोठी होडी व इतरवेळीं होड्यांचा पूल असतो.

पोष्टाशिवाय सरकारी कामाकरितां राजधानी व निरनिराळ्या जिल्ह्यांचीं मुख्य ठिकाणें यांच्या दरम्यान हरकारे नेमलेले आहेत.

राज्यकारभारः—या संस्थानांत ५ तालुके आहेत ते गीर्दें, बारी, बसेरी, कोलारी व राजाखेर; आणि शीर मथुरा ही जहागीर. गीर्दें तालुक्याचें मुख्य ठिकाण धोलपूर ही राजधानीची जागा आहे. प्रत्येक तालुक्यावर तहशिलदार आहे. पूर्व रजपुताना संस्थानच्या पोलिटिकल एजंटची साधारण हुकुमत या संस्थानच्या राज्यकारभारावर चालते. इजलास खास हें दिवाणी व फौजदारी वरिष्ठ कोर्ट असून महाराज राणा हा त्याचा अध्यक्ष असतो. संस्थानचें उत्पन्न ९·६ लक्ष रु. आहे. ह्यांपैकीं जमिनीवरील कराचें उत्पन्न ८ लक्ष रु. व जकात वगैरेंचें उत्पन्न ९२००० रु. होतें. स. १८५७ पर्यंत संस्थानांत रुपया व अधेली हीं नाणीं पाडलीं जात असत. पण हल्लीं केवळ इंग्रजी नाणेंच चालू आहे. संस्थानांतील जमीनवहिवाटीचे दोन प्रकार आहेत; खालसा किंवा संस्थानिकाच्या प्रत्यक्ष अंमलाखालची; संस्थानाला कर देणारी जमीन व कांहीं अटीवर देवालयांस किंवा दुसऱ्या इसमास दिलेल्या जहागिरी. खालसा जमीनींत थोड्या फरकानें जमीनदारी पद्धत चालू आहे. जमीनदारांनां जमीनविर खरे मालकी हक्क नसून ते केवळ सरकारसारा देणारे मक्तेदार आहेत. शेतकऱ्यांकडे जमिनी खंडानें असतात व खंडांची मुदत बहुधा तीन वर्षांपेक्षां जास्त असत नाहीं. त्यांनां कुळांचे हक्क कायद्यानें किंवा रूढीनें कधींच प्राप्त होत नाहींत. अकबराच्या वेळेपासून स. १८७९ पर्यंत मोजणी किंवा जमाबंदी करण्याचा प्रयत्न झाला नव्हता. स.१८७९नंतर १८९२ सालीं पुन्हां जमाबंदी होऊन जमीनमहसूल ८·२ लक्ष रु. मुक्रर करण्यांत आला. स.१८७९ च्या मिठासंबंधींच्या करारानें संस्थानांत मीठ तयार करण्याची व ब्रिटिश हद्दींत परवान्याशिवाय अफू पाठविण्याची मनाई आहे. याच्या मोबदला संस्थानला वर्षास ६०००० रु. व ३०० मण मीठ फुकट मिळतें. रजपुतान्यांतील इतर संस्थानांपेक्षां धोलपुरांत साक्षर स्त्रीपुरुषांचें प्रमाण कमी आहे. येथें शिक्षण मोफत दिलें जातें.

गांव.—हें संस्थानची राजधानी असून इन्डियन मिडलंड सेक्शन रेल्वेवर ग्वाल्हेरच्या वायव्येस ४० मैलांवर (गीर्दें तहशिलचें मुख्य ठिकाण) आहे. लोकसंख्या (१९११) १९९२२. हा गांव ११ व्या शतकांत वसला अशी समजूत आहे. त्यावेळीं रजपूत राजा धोलनदेव (धवलदेव) होता. शिकंदर लोदीनें हें गांव स. १५०१ मध्यें व बाबरनें १५२६ सालीं घेतलें. अकबराच्या वेळीं येथें एक सराई बांधली. अकबराचा सेनापति सादिक महमदखान हा येथें वारला

(१५९७) तेव्हां त्याच्या स्मरणार्थ येथें मोठी छत्री बांधलेली आहे. मुचकुंद नांवाचा तलाव जवळच आहे व तेथें वर्षांतून दोन वेळां यात्रा भरते. येथें एक बिबी झरीनाची कबर आहे तेथें १४ दिवस जत्रा भरते. येथें एक टौन कमेटी असून राजा कमेटीचा अध्यक्ष असतो. स्टेशनाजवळ बऱ्याचशा चांगल्या दगडाच्या खाणी आहेत. व्यापार चांगला चालतो. येथें इंग्रजी, उर्दु, हिंदी शाळा असून महाराणा हायस्कूल नांवाचें एक हायस्कूल आहे. रस्ते वगैरे रुंद केल्यामुळें शहर सुधारत आहे. [इंपे. ग्याझे. पु.११; राजपुताना ग्याझे. सेटलमेंट रिपोर्ट १८९४; ॲडमि. रिपोर्ट ऑफ धोलपूर. ]

**धोला**—मुंबई, काठेवाड. चमारडी ठाण्यांतील एकच खेड्याची खंडणी देणारी जहागीर. हिला बहुतकरून धोला देवानि म्हणतात. ही धोला स्टेशनपासून ५ मैलांवर आहे. [ बॉंबे ग्याझे. पु. ८. ]

**धोलाद्रि**—मुंबई, काठेवाड. जुनागड संस्थानांतील एक तालुका. [ बॉंबे ग्याझे. पु. ८ ]

**धोली ऊर्फ ढोली जात**—हिची एकूण लोकसंख्या (१९११) ६७८३२ असून, तींत ६५२७१ हिंदू व बाकीचे मुसुलमान आणि वन्य जातीचे आहेत. यांची मुख्य वस्ती राजपुताना ( ३०९०८ ), मध्यहिंदुस्थान ( १५३४९ ) व आसाम ( ११२९२ ) इकडे आहे. याशिवाय मध्यप्रांत व वऱ्हाडाकडेहि हे लोक आहेत. कांहीं ठिकाणीं यांना नगारजी म्हणतात. ह्या जातीच्या लोकांची उत्पत्ति पाटणी अथवा खेवरता लोकांपासून झाली असावी असें आसामाकडे मानतात. तसेंच तिकडे त्यांचा समाजांतील दर्जा फार खालचा असून त्यांचा पिढजिाद धंदा पडघम वाजविण्याचा आहे. कोठें कोठें यांनां दमामी असेंहि नांव आहे. [ सेन्सस रिपोर्ट. पु. ३, १९११. ]

**धोलरवा**—मुंबई, काठेवाड. लाखापादर ठाण्यांतील निराळी खंडणी देणारी जहागीर. ही वालाकाठी लोकांच्या ताब्यांत आहे. ती फक्त एकच खेड्याची बनलेली आहे. [ बॉंबे ग्याझे. पु. ३. ]

**धोलेरा**—मुंबई इलाखा, अमदावाद जिल्हा. धंधुका तालुक्यांतलि एक बंदर. हें अमदावादच्या नैर्ऋत्येस ६२ मैलांवर आहे. हें कापसाच्या बाजाराचें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या (१९११) ६०५०. इंग्रजांच्या हातीं ह्या जिल्ह्यांतील हेंच बंदर पहिल्यानें आलें ( १८०२ ). हें समुद्रकिनाऱ्यापासून १२ मैल आहे. त्यामुळें व्यापार भादर अथवा धोलेरा नदीवरच खालीं ५ मैलांवर असलेल्या खुन बंदरांतून व दक्षिणेस असलेल्या बवलिआरी बंदरांतून चालतो. अमेरिका व यूरोपच्या बाजारांत नांवाजलेल्या धोलेरा कापसाचें नांव ह्याच गांवांवरून पडलें. ' अमेरिकन सिव्हिलवार ' च्या वेळीं गुजराथमधील कापसाचें मुख्य बंदर हेंच होतें. येथील निर्गत कापसाचा माल मुंबई, भडोच व सुरत येथें जातो. येथें धान्य व तेलाचाहि व्यापार चालतो. १९०३--०४ सालीं समुद्रावरील व्यापार १९ लाखांचा होता. गांवांत उंच देवळें व इमारती आहेत. मात्र गांव खाडीच्या खोलगट जमिनींत वसलें असल्यानें पावसाळ्यांत चिखल व उन्हाळ्यांत धूळ सर्वत्र आढळते. [ इंपे. ग्याझे. पु. ११. ]

**धोलका, तालुका**.—मुंबई इलाखा अमदाबाद जिल्ह्याचा मध्य तालुका. क्षेत्रफळ ६९० चौरस मैल. तालुक्यांत धोल्का हा एक मोठा गांव असून शिवाय ११७ खेडीं आहेत. लोकसंख्या ( १९११ ) ८७१९५ तालुक्यांतून साबरमती नदी वाहते. पाऊस ३४ इंच पडतो.

गांव.—या तालुक्याचें मुख्य ठिकाण धोल्का हेंच आहे. अमदाबाद–धोल्का रेल्वेचें शेवटचें स्टेशन. हें अमदाबादेहून नैर्ऋत्येस २२ मैलांवर आहे. लोकसंख्या (१९११) १३६९३. गांवाभोंवती कच्या मातीची भिंत आहे. गुजराथमध्यें सर्वांत जुनें गांव हें आहे. पूर्वी पांडवांनीं ज्या विराटपुरांत वास्तव्य केलें होतें तें शहर येथेंच होतें, व येथेंच सूर्यवंशी राजा कनकसेन व मैनलदेवी यांस आश्रय मिळाला होता, असें लोक समजतात. वाघेल वंशाच्या वीरधवलाच्या ताब्यांत हें गांव होतें असें म्हणतात ( १३ वें शतक ). मुसुलमानी अमदानींत येथें ठाण्याचा अधिकारी रहात असे. अजूनहि येथें मुसुलमानांचे मोठमोठे वाडे आहेत. मराठ्यांनीं हा गांव १७३६ सालीं घेतला नंतर हा गायकवाडाकडे १७५७ सालीं आला व १८०४ सालीं इंग्रजांकडे आला. येथील बहुतेक रहिवाशी कसबाती आहेत. हे लोक मूळचे अनहिलवाडचे होत पण अल्लाउद्दिन खिलजीनें त्यांस स. १२९८ त तेथून हांकलल्यापासून वाघेल्यावरोबर ते येथें येऊन राहिले होते. येथील म्युनिसिपालिटीची स्थापना स. १८५६ मध्यें झाली. उत्पन्न (१९०३--०४), १७००० रुपयांचें आहे. येथें सरकारी कचेऱ्या, शाळा, दवाखाने आहेत. येथील लोकांचा मुख्य धंदा लुगडीं तयार करण्याचा आहे. शिवाय लोखंड व पितळ वगैरे धातूंचें, मातीचें व लांकडाचें सामान तयार करतात. [ इंपे. ग्याझे. पु. ११. ]

**धौम**—(धोम)मुंबई. सातारा जिल्हा. वांई तालुका. हें खेडें कृष्णातीरीं वांईच्या वायव्येस ५ मैलांवर आहे. येथून वांईस जाणारी सडक आहे. येथें एक महादेवाचें मोठें देऊळ असून त्याच्या भोंवतीं नरसिंह, गणपति, लक्ष्मी आणि विष्णू यांचीं दुसरीं देवळें आहेत. तीं सर्व पुण्याच्या महादेव शिवराम नांवाच्या सावकारानें बांधिलीं आहेत. शेजारचें रामाचें देऊळ दुसरा बाजीराव पेशवे यानें बांधिलें. नदीवरील महादेवाचें देऊळ शाहूनें बांधिलें असें म्हणतात. हें गांव धौम्य ऋषीचें निवासस्थान होतें व वांई म्हणजे विराटनगर होतें अशी दंतकथा आहे. येथील महादेवाची यात्रा वैशाखी पौर्णिमेस आणि नरसिंहाची वैशाखी चतुर्दशीस भरते. [ सातारा ग्याझे. ]

**धौली**—ओरिसा. पुरी जिल्ह्याच्या खुर्दा पोटविभागांतील एक टेंकडी. ही भुवनेश्वराहून ७ मैल लांब आहे. टेंकडीच्या उत्तरेस अशोकाचें प्रख्यात शिलालेखशासन आहे.

टेंकडीवर बन्याच गुहा असून वर एक महादेवाचें देवालय आहे. [ इंपे. ग्याझे. पु. ११ ]

**ध्यान**—हा धर्माचरणाचा एक भाग असून संसारत्याग करून एकांतांत एका विशिष्ट गोष्टीवर मन एकाग्र करणें याला ध्यान म्हणतात. भारतीयांच्या उपनिषद व तदुत्तर ग्रंथांत ध्यानमार्गासंबंधानें विवेचन आहे. 'ॐ' या पवित्र अक्षराचें ध्यान करावें असें सांगितलेलें आहे. अशा ध्यानाचा उद्देश, पद्धति वगैरेसंबंधानें निरनिराळ्या धार्मिक पंथांत निरनिराळीं मतें आहेत. मानवी मनाला ताब्यांत ठेवण्याकरितां जे अनेक प्रकारचे प्रयोग किंवा मार्ग आहेत त्यांनां योग असा सामान्य शब्द असून ध्यान योगमार्गाचें एक अंग आहे. ( 'योग' पहा ).

**ध्यान व समाधि.**—बौद्धधर्मांत ध्यानाला फार महत्त्व दिलेलें आहे. ध्यान व समाधि या दोहोंमध्यें अंतर आहे. ध्यान म्हणजे एकाद्या विषयावर मनाची एकाग्रता करणें आणि ध्यान करीत असतांना ध्यान करणारा व ध्यानाचा विषय यांची पूर्ण एकतानता झाली व इतर सर्व बाह्य गोष्टींची जाणीव नष्ट झाली म्हणजे त्या स्थितीला समाधि म्हणतात. बौद्धधर्मांत अर्हत पदापर्यंत पोंचण्यास समाधि लावतां येणें साध्य व्हावें लागतें. अर्हत याला समाहित ( शांत ) असें यासुळेंच म्हणतात. समाधि पांच बलांपैकीं चवथें बल, सात बोध्यंगांपैकीं साहावें अंग आणि अष्टविध मार्गांपैकीं आठवा मार्ग आहे. त्यामुळें समाधि लावतां येणें हा बौद्ध लोकांचा मुख्य उद्देश असतो, आणि समाधि साध्य होण्याला ध्यान हें महत्त्वाचें साधन आहे. ध्यान लावतां येण्यालाहि पूर्व तयारी बरीच लागते. बुद्धानें शीलासंबंधानें सांगितलेले नियम पाळणें, शरीर व मन स्वच्छ व शुद्ध राखणें, लोकांपासून दूर एकांतांत राहणें, जंगलांत किंवा गुहेंत आसन घालून बसणें, वगैरे. नव्या इसमाला ध्यान लावतां येण्याकरितां अनेक युक्त्या सांगितल्या आहेत. ज्याला एकाग्रता साध्य करणें असेल त्यानें स्वतःचेच श्वासोच्छ्वास मोजण्याचा क्रम सुरू करावा; ज्याला स्वतःच्या वाईट इच्छा दाबून टाकणें कठिण जात असेल त्यानें स्वतःच्या देहाची मलिनता व अशाश्वतता यांचाच विचार करावा, वगैरे. याप्रमाणें प्रत्येक बौद्धधर्मी माणसानें आरंभीं कसलें तरी ध्यान सुरू करावें. सहा पारमितां ( पूर्णत्व ) पैकीं ध्यान–पारमिता ही पांचवी आहे. नागार्जुनाच्या एका ग्रंथांत ध्यानाचे सोळा प्रकार, लंकावतारसूत्र नामक ग्रंथांत चार प्रकार, व असंगाच्या योगाचारभूमि या ग्रंथांत नऊ प्रकार सांगितले आहेत.

**ध्रांगध्रा, संस्थान.**—मुंबई. काठेवाड पोलिटिकल एजन्सीमधील एक संस्थान. क्षेत्रफळ ११६७ चौरस मैल. उ. अ. २३° १३' व २३°३३' ते पू. रे. ७१° ४८' व ७१°. हा प्रदेश पहाडी व खडकाळ आहे. ह्या संस्थानांत हलवद व मानसर येथें विस्तीर्ण तलाव आहेत; शिवाय लहान तलाव पुष्कळ आहेत. हवा उष्ण पण प्रकृतीला सुखकारक आहे. पाऊस २४ इंच पडतो. कच्छच्या रणाचा कांहीं भाग या संस्थानांत येतो. त्या किनाऱ्यावर २० फुटांवर पाणी लागतें.

ध्रांगध्राचा राजा झाला रजपूत जातीचा असून, त्यां जातीचा मुख्य आहे. झालांचें प्राचीन नांव मकवान होतें. हे लोक उत्तरेकडून काठेवाडांत आले, व पहिल्यानें अमदाबाद जिल्ह्याच्या विरमगांव तालुक्यांत पाटडी येथें वस्तीस राहिले व नंतर हलवद व ध्रांगध्रा येथें गेले. ईशान्येकडे व उत्तरेकडे जाण्याचा मार्ग या भागांतून असल्यानें मुसलमानांच्या स्वाऱ्यांचा येथील राजांनां फार त्रास पोंहोंचे. गुजराथमधील मुसुलमान राजांनीं येथील बराच भाग जिंकिला होता. पुढें औरंगझेबानें हलवदचा विभाग ( ह्यास महंमद नगर म्हणत असत ) तेथील आसपासच्या मिठागरांसह झाला वंशांतील राजास परत जहागीर म्हणून देण्यांत आला. लिमडी, वढवान, चुडा, सायला व ठान लखतर हीं छोटीं संस्थानें ह्याच ध्रांगध्रा संस्थानाच्या शाखा होत. ध्रांगध्राच्या राजाची व इंग्रजांची दोस्ती इ. स. १८०७ मध्यें झाली. संस्थानिकास राजा हा किताब व दत्तक घेण्याचा हक्क आहे. लोकसंख्या (१९२१) ८८४०६. यांत २ गांवें असून १३२ खेडीं आहेत. ध्रांगध्रा हा राजधानीचा गांव आहे. यांत जंगल नाहीं. बामभान, चंद्रभागा, विलगंगा व फाल्गुक या नद्या आहेत. हत्ती, उंट वगैरे पाळीव व डुकरें, चित्ते, काळवीट, नीलगाय हे रानटी पशू आहेत. स. १८४० च्या पूर्वी सिंह आढळत असे. येथील ब्राह्मण शेतीहि करतात. मुसुलमान कापड विणतात व तेल काढतात. ध्रांगध्रा, हलवद व सीथा या मुख्य व्यापाराच्या उतारपेठा आहेत. पिकाऊ जमीन हलक्या प्रतीची रेताड आहे. लागवडींत आणलेली जमीन २०६ चौरस मैल असून मुख्य पिकें कापूस व सामान्य प्रकारचें धान्य. येथील कापूस लांब धाग्याचा असतो. उत्तम प्रकारचा रंगीत नक्षीचा व इमारतीचा दगड बराच सांपडतो. वडगर येथें उत्तम मीठ पिकतें. संस्थानाच्या मालकीच्या कारखान्यांत मॅग्नेशिअम क्लोराइड व मिठापासून होणारे रासायनिक पदार्थ तयार होतात. पितळेचीं व तांब्याचीं भांडीं, दगडी चक्क्या, कापड व मातीचीं भांडीं तयार करतात. संस्थानांत सरकी काढण्याचे कारखाने आहेत. आयात मालाची किंमत ( १९०३--०४ ) ५॥ लाख होती व निर्गत मालाची किंमत १¾ लाख होती. संस्थाच्या मालकीची एक रेल्वेलाईन आहे. ही वढवाण ते हलवदपर्यंत ४० मैल लांबीची आहे. अमदाबाद जिल्ह्यांतील धोलरा हें सर्वांत जवळचें बंदर आहे. ध्रांगध्रा हें काठेवाडांतील पहिल्या प्रतीचें संस्थान आहे. जमीनीचा सारा पिकावर ठरविला गेला आहे. एकंदर संस्थानाचें उत्पन्न २५ लाख रुपये आहे. येथील संस्थानिक जुनागडच्या राजास व ब्रिटिश सरकारास ४४६७७ रु. खंडणी देतो. पांच फौजदारी कचेऱ्या, दवाखाने, शाळा वगैरे आहेत. सांप्रतच्या राजाचें नांव हिज हायनेस महाराणा श्री सर घनश्यामसिंघजी, जी. सी. आय.

ई; के. सी. एस. आय. महाराज राजासाहेब असें असून तो सर्व झाला रजपुतांचा मुख्य आहे.

अलीकडील माहिती ( १९२१–२५ ):—असहकारितेची चळवळ जेव्हां १९२१ सालीं अगदीं शिखरास पोहोंचली होती त्यावेळीं सार्वजनिक सभा भरविण्याच्या हक्कावर नियंत्रण घालण्यांत आल्यामुळें या संस्थानच्या प्रजेंत कांहींसा असंतोष उत्पन्न झाला होता. पण मुंबईकडील कांहीं असहकारितावादी चळवळ्यांपुरतेच सदरहू निर्बंध तात्पुरते आहेत असें स्पष्टीकरण आल्यानंतर लोकांनीं सभा भरवून संस्थानिकावरील विश्वास जाहीर केला. १९२३ सालच्या आक्टोबरांत कुडा रेल्वे वाढविण्यांत आली आणि कुडा सॉल्ट वर्क्स ( मिठाचा कारखाना ) सुरू करण्यांत आला. मीठाच्या धंद्यामुळें संस्थानला कायमचें मोठें उत्पन्न लाभणार असून हजारों मजूरांची सोय लागणार आहे. शिवाय कुडा रणांत मीठ तयार करण्याचा पूर्वापार चालत आलेला हक्कहि संस्थाननें पुन्हां प्राप्त करून घेतला आहे. हिंदुस्थान सरकारनें हा हक्क बराच काळ अमान्य केला होता; पण सदरहू संस्थानिकानीं त्या हक्काकरितां नेटाचा प्रयत्न करून तो प्राप्त करून घेतला. स्टेटच्या मालकीची रेल्वे १९२३ सालीं ४६·६९ मैल होती, आणि हालवाड ते माळीयापर्यंतच्या नव्या फांट्याला मंजूरी मिळाली होती. सार्वजनिक रस्त्यांवरील दिव्याकरितां, सरकारी इमारतींकरितां, सरकारी छापखान्यांकरितां, दळणाच्या गिरण्या व इतर लहान लहान कारखान्यांकरितां वीज घेण्याच्या कामीं सर्व काठेवाडी संस्थानांत ध्रांगध्रानें पुढाकार घेतला. तसेंच दगडांचा व्यापार वाढावा म्हणून सरकारी कर कमी करून उत्तेजन देण्यांत आलें व वाहतुकीच्या सोयीकरितां एक रेल्वेचा फांटा दगडांच्या खाणीकडे नेण्यांत आला. लांब धाग्याचा कापूस व अनेक द्विदल धान्यें हीं तेथील मुख्य पिकें होत. दोन कॉटन प्रेस व सात जिनिंग फॅक्टऱ्या सरकारी मालकीच्या आहेत. १९२२--२३ सालीं हलवद येथें जिनिंग फॅक्टऱ्यांची संख्या ४० नीं वाढविण्यांत आली व इमारतीमध्यें पुष्कळ फरक करण्यांत आले. शेतकीला भरपूर पाण्याचा पुरवठा नाहीं, हा मोठा कमीपणा आहे. सितापूर येथें ७२२ फूट खोल छिद्र पाडण्यांत आलें व तेथें चांगलें पाणी लागलें. १९२३--२४ सालीं कुडा येथें ४०० फूट खोलीचें बोअर खोदलें, पण तेथें लागलेलें पाणी पिण्याच्या उपयोगाचें नाहीं. आणखी बोअर घेण्याचें काम चालू आहे.

श ह र.—या संस्थानची राजधानी ध्रांगध्रा याच नांवाची आहे. ध्रांगध्रा रेल्वेचें हें शेवटचें स्टेशन अमदाबादेच्या पश्चिमेस ७५ मैल आहे. ध्रांगध्रा हें नांव धरांग म्हणजे दगड व धर म्हणजे धरणारा यांपासून झालें असावें असें कित्येकांचें मत आहे; कारण येथें दगड पुष्कळ आहेत. लोकसंख्या (१९०१) १४७७०. येथील दगडाच्या खाणीबद्दल हें प्रसिद्ध आहे. राजवाडा, रामाचें, रणछोडचें, कृष्णाचें व स्वामी नारायणचें हीं मंदिरें पाहण्यासारखीं आहेत. प्रत्येक देवळाला एक धर्मशाळा जोडली आहे. गांवाभोंवतीं तट आहे. येथें एक हायस्कूल चालतें व गांवाला म्युनिसिपालिटीहि आहे. [ बॉंबे ग्याझे. पु. ८; सेन्सस रिपोर्ट. १९११. ]

ध्राफा—मुंबई, काठेवाड. हालर जिल्ह्याची निराळी खंडणी देणारी तालुकदारी. ही फुलझर नदीच्या उत्तर तीरावर असून तेथें जाडेजा रजपूतांचा अंमल आहे. या तालुकदारींत ३६ खेडीं आहेत. [ बॉंबे ग्याझे. पु. ८ ]

ध्रुव—( १ ) स्वायंभू मनूचा पुत्र जो उत्तानपाद त्याला सुनीतीपासून झालेला पुत्र. ध्रुवाच्या मातेवर राजाची प्रीति नसे म्हणून ध्रुव हाहि अप्रिय होता. एकदां ध्रुव राजाच्या मांडीवर चढूं लागला, तेव्हां सावत्रमाता सुरुची हिनें त्याचा धिक्कार केला. तेव्हां तो रडत स्वतःच्या मातेकडे गेला. तिनें त्यास परमेश्वराचें आराधन करण्यास सांगितलें. तेव्हां तो अरण्यांत गेला. नारदानें त्याचा दृढनिश्चय पाहून त्यास उपदेश केला. नंतर लवकरच त्यास विष्णूचें दर्शन झालें व त्यानें ध्रुवास अढळपद दिलें.

( २ ) पृथ्वी ज्या कल्पित रेषेवर स्वतःभोंवतीं फिरते त्या रेषेस आंस किंवा अक्ष असें नांव असून त्याच्या टोंकास ध्रुव म्हणतात. या पृथ्वीवरील ध्रुवांभोंवतालच्या प्रदेशांचें वर्णन ‘दक्षिणध्रुव’ व ‘उत्तरध्रुवप्रदेश’ या लेखांत केलें आहे. पृथ्वीचा आंस वाढविला असतां तोच आकाशाचा आंस होतो. या आकाशाच्या आंसाचीं जीं टोंकें ते आकाशाचे ध्रुव होत. ते अर्थात् पृथ्वीच्या ध्रुवांसमोर असतात. हल्लीं आपण ज्या तारेला ध्रुव म्हणतो व स्थिर समजतो ती उत्तरध्रुवबिंदुस्थानीं नाहीं तर त्याच्या दक्षिणेस सुमारें १ अंश आहे. तीन हजार वर्षांपूर्वी दुसरीच एक तारा ध्रुवबिंदूजवळ होती व पुढें बारा हजार वर्षांनीं अभिजित् ही तारा ध्रुवबिंदूजवळ येईल. यावरून ध्रुवतारा एक नाहीं व स्थीरहि नाहीं हें समजेल. ध्रुव तारा सुमारें दुसऱ्या प्रतीची आहे. सप्तर्षितारकापुंजांतील पुलह व क्रतु यांस सांधणारी रेषा खालीं वाढविली असतां तींत ध्रुव येतो; म्हणून त्या दोन तारकांस ध्रुवदर्शक म्हणतात. अगस्ति तारेस दक्षिणध्रुव असें चुकीनें म्हणतात.

ध्रुवीभवन—प्रकाशाच्या किरणांचा ते ज्या दिशेकडे जातात त्या दिशेकडील आवकाशाशिवाय इतर आवकाशाशीं कांहींहि संबंध नसतो हा त्याचा प्रकृतिधर्म नव्हे असें ख्रिश्चन हायगेन्सनें सिद्ध केलें आहे. सूर्याचा एक किरण स्पार नांवाच्या चौकोनी घनाकृति खनिज पदार्थावर एक विवक्षित दिशा सोडून कोणत्याहि दिशेनें पडला तर त्यांतून दोन तुल्य तेजाचे किरण बाहेर पडतात. हे दोनहि किरण दुसऱ्या चौकोनी स्पारमधून जाऊं दिले असतां प्रत्येक किरण पुन्हां दोन किरण देऊं शकतो. ह्यांची प्रखरता किरणांचा ज्या दिशेकडून प्रवेश होतो त्या दिशेकडील मुख्य पातळींच्या परस्पराशीं असणाऱ्या स्थितीवर अवलंबून असते या मुख्य पातळी म्हणजे वक्रीभवन होणाऱ्या पृष्ठभागावर

लंब असणाऱ्या स्फटिकाच्या अक्षांमधून जाणारी पातळी होय. कांहीं वेळेला तर या दोहोंपैकीं एक किरण अजिबात नाहींसा होतो त्यावेळीं पहिल्या स्फटिकामध्यें वक्रीभवन होऊन बाहेर पडणारा सामान्य किरण मुख्य पातळी एकमेकांस समांतर किंवा लंब असतील त्यामानानें फक्त सामान्य किंवा असामान्य किरण बाहेर टाकतो व असामान्य किरण याच्याविरुद्ध क्रिया करतो. पण या दोन्ही स्थितींखेरीज इतर स्थितींत किरणांची प्रखरता दुसऱ्या स्फटिकांतून बाहेर पडणारे किरण जेव्हां सर्वांत अधिक प्रखरता देतात त्यावेळीं जी मुख्य पातळी असते तिच्याशीं इतर स्थितींतील मुख्य पातळीच्या होणाऱ्या कोनाच्या कोज्याच्या वर्गाशीं प्रमाणांत असते आणि ज्या भागांत बाहेर निघणारे किरण एकमेकांवर पडले असतील त्या भागाचें निरीक्षण केल्यास त्या भागांतील प्रकाशाचे व साध्या प्रकाशाचे गुणधर्म सारखेच असतात. या प्रकाशाच्या गुणधर्मास मेलस यानें प्रकाशाचें ध्रुवीभवन ही संज्ञा दिली आहे.

आइस्लंड स्पारमधून ध्रुवीभवन झालेला किरण निराळा काढण्यास दुसरा स्फटिक इतक्या जाडीचा वापरला पाहिजे कीं त्यांतून निघणारे दोन्ही किरण अलग बाहेर पडून त्यापैकीं एक एका पडद्याच्या साहाय्यानें आडविता आला पाहिजे. ह्या वर सांगितलेल्या स्फटिकांत ध्रुवीभवन झालेला किरण कमजास्त प्रमाणांत अपशोषला गेल्याकारणानें ह्याहि स्फटिकांत याचें ध्रुवीभवन होतें. म्हणजे ह्या स्फटिकाच्या साहाय्यानें आपणांस ध्रुवीभवन झालेला किरण शोधून काढून तपासतांहि येतो. ह्या क्रियेस पृथक्करण असें म्हणतात व त्या स्फटिकास ध्रुवीभवन-कारक असें म्हणतात. स.१८१६मध्यें फ्रेनेल व ॲरॅगो यांनीं ध्रुवीभवनावर बरेच प्रयोग करून खालील सिद्धांत बसविले. (१) साध्या प्रकाशाच्या दोन किरणांस ज्या स्थितीमध्यें एकमेकांकडून प्रतिबंध होतो त्याच स्थितींत काटकोनांत ध्रुवीभूत झालेल्या दोन किरणांचा एकमेकांवर कांहीं एक परिणाम होत नाहीं. (२) परंतु समांतर पातळींत ध्रुवीभूत झालेल्या दोन किरणांचे वर्तन साध्या प्रकाशकिरणांप्रमाणेंच असतें.(३)एकाच प्रकारच्या प्रकाशाचे दोन किरण काटकोनांत ध्रुवीभूत झाले असल्यास त्यांस परस्पर प्रतिबंधाशिवाय एकाच ध्रुवीभवन पातळींत आणतां येतें.(४) ध्रुवीभूत प्रकाशाच्या दोन किरणांचें काटकोनांत ध्रुवीभवन झालें असल्यास त्यांस एकाच ध्रुवीभवन पातळींत आणतांना साध्या प्रकाशाप्रमाणें त्यांचा एकमेकांस प्रतिबंध होतो.

वरील पार्श्विक गुणधर्मावरून असें दिसून येईल कीं, ध्रुवीभूत प्रकाश ही एक विशिष्ट लांबीची व विशिष्ट दिशेकडे जाणारी अशी प्रकाशशलाका(व्हेक्टर) असल्यामुळें ती प्रकाशाची दिशा व ध्रुवीभवनाची पातळी दर्शविते. यावरून असें दिसून येतें कीं, ध्रुवीभूत किरणांची दिशा प्रकाशाच्या दिशेशीं कोन करते, आणि ही गोष्ट प्रकाशप्रतिबंधावरील प्रयोगांतीं सिद्धहि झाली आहे. या प्रयोगावरून असें दिसतें कीं समपातळींत ध्रुवीभूत झालेल्या प्रकाश लहरींच्या मालिकेची विशिष्ट शलाका लहरींच्या पातळींतच सरळ रेषेंत कंप पावते. स्पारमधून जातांना प्रकाशाचें जे वर्तन होतें त्याशीं या क्रियेच्या सारखेपणामुळें ही विशिष्ट शलाका ध्रुवीभवनपातळीस समांतर किंवा काटकोनांत असावयास पाहिजे. यांपैकीं कोणती दिशा समजावयाची हें त्या शलाकेच्या पदार्थवैज्ञानिक स्थितीवर अवलंबून असतें. प्रकाशोद्भवाच्या कोणत्याहि मताप्रमाणें विचार केला तरी ह्या प्रकाशशलाका दोन प्रकारच्या असून त्या एकमेकांस काटकोनांत असून त्यांचे संबंध भूमितीच्या नियमानुसारच असतात. ध्रुवीभूत प्रकाशाचा मार्ग दीर्घवर्तुळाकार असल्यास त्यास दीर्घवर्तुळ ध्रुवीभवन व वर्तुळाकार असल्यास वर्तुळध्रुवीभवन असें म्हणतात. हे निरनिराळे प्रकार, ध्रुवीभूतप्रकाश प्रकाशाची एकचतुर्थांश लहर परत पाठविणाऱ्या अभ्रकासारख्या वस्तूंतून जाऊं दिल्यास ओळखतां येतात. ध्रुवीभूत किरणांपैकीं दुसरा किरण ९०° चा कोन करीपर्यंत दहमंडलांतून फिरविला असतां पहिल्याप्रमाणेंच होऊन त्याचे गुणधर्म विरुद्ध असल्यास किरणांचें विरुद्ध ध्रुवीभवन झालें असें म्हणतात. विरुद्ध ध्रुवीभूत झालेल्या किरणांच्या योगानें प्रतिबंध होऊं शकत नाहीं पण एकाच प्रकारानें ध्रुवीभूत झालेल्या दोन किरणांचा परस्परांस प्रतिबंध होतो.

वरील विवेचनावरून असें दिसून येईल कीं ध्रुवीभूत प्रकाशाच्या निरनिराळ्या प्रकारांपैकीं हा एक प्रकार आहे. प्रकाशाचे निरनिराळे असे सात प्रकार आहेत. साधा प्रकाश, ध्रुवीभूत प्रकाश व आंशिक ध्रुवीभूत प्रकाश इ०शेवटच्या दोन प्रकारांतील ध्रुवीभवन दीर्घवर्तुलाकार, वर्तुलाकार किंवा समपातळींत असतें. साधा प्रकाश किंवा ध्रुवीभूत प्रकाश आइस्लंड स्पारमधून जाऊं दिल्यास तुल्य तेजाचे दोन किरण देतो. पण जर ध्रुवीभवन झालेला प्रकाश अभ्रकामधून पाठविला तर वरील गुणधर्म दिसून येत नाहींत व त्यांची प्रखरता स्फटिकामधील अक्षाच्या दिशेवर अवलंबून असते. वर्तुलाकार ध्रुवीभवनामध्यें तर एक किरण अजीबात नाहींसा करतां येतो. समपातळींत ध्रुवीभवन झालेला किरण चौकोनी स्फटिकामधून गेल्यास कमजास्त दोन तेजाचे दोन किरण देतो व कांहीं विवक्षित स्थितींत तर बाहेर येणारा किरण एकच असतो. दीर्घवर्तुलाकार, आंशिक दीर्घवर्तुलाकार व समपातळींत ध्रुवीभवन झालेला किरण, आइस्लंड स्पारमधून जातांना कमजास्त तेजाचे दोन किरण देतो आणि त्यांपैकीं कोणताहि नाहींसा करतां येत नाहीं. हे निरनिराळे प्रकार अभ्रकाच्या योगानें ओळखितां येतात. कारण याच्या योगानें दीर्घवर्तुलाकार ध्रुवीभूत किरण समपातळींत ध्रुवीभवन झाल्याप्रमाणें होतो व त्याचा दुसरा किरण चौकोनी स्फटिक फिरवून नाहींसा करतां येतो. पण इतर दोन प्रकारांमध्यें ही स्थिति दिसून येत नाहीं आणि प्रकाशाचें ध्रुवीभवन जास्तींत जास्त ध्रुवीभवन होणारी पातळी

कायम किंवा बदललेलीं असेल त्याप्रमाणें अर्धसमपातळींत किंवा अर्धवर्तुळाकार असतें.

**ध्रोल**—मुंबई, काठेवाड. राजकोटच्या वायव्येस ३४ मैलांवर असलेलें एक लहान संस्थान. उ. अ. २२° –३४′व पू. रे. ७०° --२७′. क्षेत्रफळ २८३ चौरस मैल. संस्थानांत १ शहर व ६७ गावें आहेत. लोकसंख्या (१९११) २४३५८ हिंदूंची संख्या १८ हजारांवर आहे. येथील जहागिरदार जाडेजा रजपुतांपैकीं आहे. नवानगरच्या राजाचा भाऊ हा या संस्थानचा मूळपुरुष होय.

ऊंसाचें पीक मुख्य आहे. जमीन खडकाळ व प्रदेश डोंगराळ आहे. हवा उष्ण व आरोग्यदायक आहे. पाऊस २५-३० इंच पडतो. येथील जहागिरदारास ठाकूर म्हणतात. राजधानीचा गांव ध्रोल हा नवानगरच्या ईशान्येस१२कोसांवर आहे. लोकसंख्या ५॥ हजार असून येथें खादी तयार होते. येथून जोडीया बंदरांत मालाची निर्गत होते. हें संस्थान काठेवाडांतील दुसऱ्या प्रतीचें आहे. संस्थानचें उत्पन्न १। लाख रुपये आहे. जुनागडच्या नवाबास व बडोदेसरकारास ठाकूर सालिना १०२३१ रुपये खंडणी देतो.ध्रोल येथें म्युनिसिपालिटी आहे. [ इंपे. ग्याझे पु. ११. ]

**ध्वनिलेखक यंत्र** ( फोनोग्राफ )—फोनोग्राफ उर्फ "ध्वनिलेखक यंत्र" म्हणजे मेणाच्या किंवा कथिलाच्या फिरत्या पृष्ठभागावर ध्वनीचें लेखन करून त्या मूळच्या ध्वनीस लागेल तेव्हां उत्पन्न करून देणारें विशिष्ट यंत्र होय. असल्या प्रकारचीं यंत्रें तयार करण्याचे प्रयत्न अनेकांनीं केले आहेत. असल्या प्रयत्नांपैकीं पहिला प्रयत्न थॉमस यंग नांवाच्या गृहस्थानें १८०७ सालीं केला व तेव्हांपासून बऱ्याच लोकांचें ध्वनिशास्त्राकडे व तद्वारां ध्वनिलेखक यंत्राकडे लक्ष वेधलें व गेल्या शतकांत विल्हेल्मवर्थेम ( १८४२), कार्ल रोडाल्फ कोनिग, विल्यम् हेनरी बार्लो (१८७४),फ्लरेन्स ब्लांक (१८७६ ), थिओडोर स्टेन इं. अनेक संशोधकांनीं या विषयांत प्रगति केल्यामुळेंच प्रसिद्ध टी. ए. एडिसन यास १८७७ सालीं सध्यां प्रचारांत आहे अशा प्रकारचें ध्वनिलेखकयंत्र जगापुढें आणतां आलें. एडिसन यानें प्रथमतः जें यंत्र तयार केलें त्याचें संक्षेपतः पुढें वर्णन केलें आहे. परंतु तें वर्णन नीटपणें समजण्यासाठीं ध्वनि म्हणजे काय हें सामान्यतः समजून घ्यावें(ध्वनिशास्त्र पहा ).

एडिसन यानें पहिल्याप्रथम प्रसिद्ध करून पेटंट घेतलेल्या फोनोग्राफची खालीं लिहिल्याप्रमाणें रचना होती. पितळेचें एक पंचपात्र (सिलेन्डर) एका मळसूत्राच्या योगानें उजवीकडून डावीकडे वर्तुलाकृति फिरत फिरत जावें अशी यांत्रिक योजना केली होती. एका पडद्यावर एक तरफ विशिष्ट प्रकारें जोडली होती; व त्या तरफेचें एक टोंक वरील पंचपात्रावर टेंकलेलें होतें; पंचपात्रावर कथिलाचा अत्यंत पातळ असा वर्ख लावला होता. हें यंत्र सुरू असतांना ध्वनीचा आघात पडद्यावर होऊन त्यायोगें तरफेच्या द्वारें कथिलाच्या वर्खावर निरनिराळ्या प्रकारच्या खुणा उठत. जेव्हां ध्वनि उत्पन्न करावयाचा असतो तेव्हां पंचपात्र व तरफ मूळच्या स्थितींत आणून यंत्रास गति द्यावी म्हणजे त्या खुणांतून तरफेचें टोंक फिरूं लागून त्यायोगें पडद्याचे पूर्वीच्याप्रमाणें प्रकंप होऊं लागून मूळच्या ध्वनीची जशीच्या तशी प्रतिकृति उमटूं लागते. आतां कथिलाच्या वर्खाच्या योगानें चालूं शकणारें असल्या प्रकारचें यंत्र अनेक प्रकारें दोषयुक्त असल्याकारणानें त्यांत पुढें अनेक सुधारणा झाल्या. प्रथमतः ध्वनिलेखक यंत्रास विजेच्या योगानें गति देऊं लागले; व त्यांतहि सुधारणा होऊन पुढें स्प्रिंगच्या योगानें गति देऊं लागले. तसेंच कथिलाच्या वर्खाऐवजीं एक प्रकारचें मेण वापरूं लागले; व पडद्याच्या ऐवजीं पातळ कांचेचा पापुद्रा वापरूं लागले आणि तरफेच्या टोंकांत सुधारणा झाली.

पुढें दिल्याप्रमाणें या यंत्रावर ध्वनी उतरून घेतात. ज्या वक्त्याचें भाषण किंवा ज्या गवयाचें गाणें उतरून घ्यावयाचें असेल तो एका विशिष्ट प्रकारच्या शृंगापुढें ठराविक अंतरावर बसतो. या शृंगाची रचना अशी असते कीं, त्यायोगें त्या शृंगाच्या तोंडावर पडणारे ध्वनि एका ठिकाणीं केंद्रीभूत होतात आणि ज्या ठिकाणीं ध्वनि केंद्रीभूत होतात त्या ठिकाणीं कांचेचा पापुद्रा बसविलेला असतो. गवई आणि शृंग हे पडद्याच्या एका अंगास असून दुसऱ्या अंगास ध्वनिलेखक यंत्राचा नियामक बसतो. गवयाच्या मागें सारंगी, सतार, तंबोरा इ. मंजुळ ध्वनिवाद्यें असतात. त्यांच्या पाठीमागें तुतारीवाले, तबलेवाले इ. जास्त मोठा आवाज काढणारे लोक कांहीं अंतरावर बसतात. याप्रकारें जर यंत्रापासून योग्य अंतरावर निरनिराळीं वाद्यें आणि गायक ही बसविलीं नाहींत तर ध्वनिलेखन चांगलेसें होत नाहीं.

अशा प्रकारें घेतलेल्या ध्वनिलेखांच्या प्रतिमा प्लास्टर ऑफ प्यारिसच्या योगानें घेतात; व त्यावर विजेच्या सहाय्यानें मुलामा चढवून त्यांचा ठशासारखा उपयोग करून त्यांपासून अनेक प्रती काढतां येतात. ही पद्धत पुढें दिली आहे. प्लेटवर ध्वनि घेऊन नंतर प्रथमतः त्या प्लेटीवर ग्राफाइटची पूड टाकतात आणि नंतर त्यावर विजेच्या योगें ०॰ मिलिमिटर इतक्या जाडीचा थर चढवितात व ह्या प्रतिमेच्या योगानें फिरून एकदां तांब्याची 'ऋण'प्रतिमा घेतात व ह्या ताम्रप्रतिमेपासून पाण्याच्या दाबानें चिवट आणि टणक अशा पदार्थावर "धन" प्रतिमा घेतात. अशा प्रकारच्या ध्वनिप्रतिमेंत एक प्रकारचा दोष रहातो; तो हा कीं, जेव्हां फोनोग्राफचीं सुई प्लेटीच्या खांचाखोचांतून फिरूं लागते तेव्हां त्या सुईचें प्लेटीच्या पृष्ठभागाशीं जास्त घर्षण होऊन एक प्रकारचा कर्णकटु आवाज निघूं लागतो. असला कर्णकटु आवाज निघूं नये म्हणून कित्येक ध्वनिलेखक-यंत्रांत विशेष योजना केली असते. ध्वनि उतरून घेतांना फौन्टन पेनप्रमाणें तेल सोडणारी सुई वापरतात. या तेलाच्या अंगीं हा गुण असतो कीं,

तें तावडतोब वाळून प्लेटांस चिकटतें. त्यामुळें प्लेटीवर जास्त चरे न उठतां एक प्रकारचा गुळगुळीतपणा येतो. या मूळच्या प्लेटीपासून तयार केलेल्या प्रतिमेंत ह्याच गुण उतरतो व आवाज गोड निघतो.

फोनोग्राफचा उपयोग.—यूरोपांतलि देशांत फोनोग्राफपासून काय काय फायदे करून घेतां येतील इकडे तज्ज्ञ जनांचीं मनें वेधलीं आहेत. ब्रिटिश लोकांच्या सर्व विख्यात पदार्थसंग्रहालयांत नामांकित गवयांच्या गाण्यांच्या ध्वनिलेखनाच्या मूल प्रतिकृती ठेविल्या आहेत. फ्रेंचांनीं सुद्धां आपल्या ग्रँड ऑपेरा इन पॅरिस नांवाच्या प्रसिद्ध स्थळीं वरीलप्रमाणेंच गाण्याचे फोनोग्राफच्यायोगें घेतलेले लेख ठेविले आहेत. फोनोग्राफच्या योगानें नुसती संगीत विद्याच नव्हे तर भाषाशास्त्र देखील उत्तम प्रकारें शिकतां येईल असें आतां सिद्ध होत आहे.

ध्वनिशास्त्र, प्रास्ताविक.—ध्वनि ह्या कंपयुक्त गतीपासून उत्पन्न होत असून ती एक श्रोत्रेंद्रियांवर होणारी संवेदना आहे. जे ध्वनी आपल्या कानास मधुर लागतात त्यांविषयींचा विचार संगीतशास्त्रांत करतात व संगीतशास्त्राचें विवेचन पृथक केलें आहे. येथें फक्त ध्वनीच्या भौतिक स्वरूपाचें विवेचन करावयाचें आहे.

कंपनाच्या योगानें ध्वनीची उत्पत्ति.—ज्या ज्या ठिकाणीं ध्वनीची भावना होते त्या त्या प्रत्येक ठिकाणीं ज्या पिंडापासून तो ध्वनि निघतो, त्या पिंडांत कशानें कां होईना कंप उत्पन्न झालेला असतो. ह्या कंप म्हणजे त्या पिंडांतील अणुपरमाणूंची मार्गेपुढें हालचाल होय, याची आपल्याला सहज खात्री पटवून घेतां येईल. उदाहरणार्थ, आपण एखाद्या भांड्याला टिचकी मारली तर त्यापासून आपल्याला नाद ऐकूं येऊं लागतो, ह्या नाद ऐकूं येत असतांना आपण जर सहज हलक्या तऱ्हेनें त्या भांड्याला बोट लावलें तर आपल्या बोटाला त्याचा कंप भासूं लागतो; पण तेंच बोटानें जास्त दाबलें तर कंप थांबून नादहि ऐकूं येईनासा होतो. असल्याच एखाद्या भांड्यांत तेल किंवा पाणी असलें तर त्याच्या पृष्ठभागावर वर्तुलाकार क्षोभ दिसूं लागतो, हेंहि त्या कंपाचेंच निदर्शक होय.

ध्वनिगमनावधि.—ध्वनीस एका ठिकाणाहून दुसऱ्या एका कांहीं अंतरावरच्या ठिकाणीं जाण्यास कांहीं दृश्य काल लागतो हें कांहीं परिचयाच्या उदाहरणावरून सहज लक्षांत येईल. उदाहरणार्थ, दूर अंतरावर घोड्यानें दगडावर आपटलेलें धुणें आपल्याला दिसल्यानंतर त्यापासून उत्पन्न होणारा आवाज कांहीं वेळानें आपल्याला ऐकूं येतो. रानांत लांकूडतोड्याच्या कुऱ्हाडीचा घाव पाहिल्यानंतर कांहीं वेळानें, तसेंच बंदुक सुटल्याची खूण म्हणून तिच्यांतून निघणारा धूर दिसल्यावर कांहीं वेळानें ध्वनि ऐकूं येतो. तसेंच आकाशांत वीज चमकल्यावर कांहीं वेळानें मेघगर्जना ऐकूं येते.

ध्वनिप्रसारास भौतिक साधनाची जरूर.—कोणत्याहि पदार्थापासून निघणाऱ्या नादाचा कानाला भास होण्याकरितां त्या पदार्थापासून तों तहत आपल्या कानापर्यंत एखादें अखंड द्रव्य पसरलेलें असण्याची जरूर आहे; त्याशिवाय एखाद्या पदार्थानें कितीहि नाद केला तरी तो आपल्या कानास भासणार नाहीं; हें खालील प्रयोगावरून सिद्ध होतें. वायुनिष्कासक यंत्राच्या ग्राहकांत एखादी विद्युत्घंटा जर लोंबत ठेविली व तिच्या तारा त्या ग्राहकांत घट्ट बुचें बसवून त्यांच्यांतून नेल्या व अशा स्थितींत जर ती घंटा वाजविली तर तिचा स्पष्ट आवाज ऐकूं येतो, पण यानंतर जर त्या ग्राहकांतील हवा पंपानें काढून घेण्यास सुरवात केली तर हवा जसजशी कमी होईल तसतसा आवाज अस्पष्ट होत जातो, अशा तऱ्हेनें त्यांतील हवा पूर्णपणें काढून झाली म्हणजे घंटानाद बाहेर ऐकूं येत नाहीं.

आवाजाच्या प्रसाराला वातावरण हेंच नेहमींचें साधन आहे पण कधीं कधीं द्रव किंवा घन पदार्थांतूनहि आवाज जाऊं शकतो. वरील प्रयोगांत ग्राहक निर्वात होण्यापूर्वी आवाज ग्राहकाच्या बाजूंतून बाहेर येत होता, त्याचप्रमाणें टेबलावर कान ठेवून त्या टेबलावर दुसऱ्या कोणत्याहि बाजूला खरवडलें तर तो आवाज ऐकूं येतो. पूर्वी जमिनीला कान लावून मैलपेक्षां लांबून येत असलेल्या घोड्यांच्या टापांच्या आवाजावरून घोडेस्वारांचें आगमन ओळखीत असत. तसेंच पाण्याच्या पिपांत डोकें बुडवून पिपाच्या बाहेर जर खरवडलें तरी देखील आवाज ऐकूं येतो; तो पाण्यांतून ऐकूं येण्याचें कार्य होत असल्याशिवाय खास नव्हे.

(५) ध्वनि हा लहरीरूप क्षोभ होय.—ज्याअर्थी साधारणतः आवाज कंपायमान पिंडापासून उत्पन्न होतो, तसेंच त्याला प्रसरणाला कांहीं अवधि लागतो आणि ज्या साधनांतून तो जातो तें साधन स्वतः पुढें जात नसून ध्वनि निघून गेल्यावर तें पुन्हां पूर्वस्थितींत येतें, त्याअर्थी ह्या क्षोभ लहरीस्वरूपाचाच असला पाहिजे. घंटेनें उत्पन्न होणाऱ्या नाद-लहरींचा जर विचार केला तर आपणास असें आढळून येईल कीं, घंटेच्या बाजू कंप पावत असतां तिचा कांठ बाहेरील बाजूस हलतो तेव्हां तो हवेवर आघात करतो व त्यामुळें तेथें हवेचें आकुंचन होतें. नंतर जेव्हां तो कांठ परत येतो तेव्हां हवेचें विरलीकरण होतें. याप्रमाणें हवेचें आकुंचन आणि विरलीकरण सभोंवर लहरीरूपानें गमन करतें.

अनेक ध्वनी एकमेकांचा नाश न करतां हवेंतून गमन करूं शकतात हें पुढील उदाहरणावरून सिद्ध करतां येतें. जसें नगारा, नौबत, वाजंत्रें व अलगुज—वाजत असतां ज्याला हे ध्वनी ओळखण्याची संवय आहे असा मनुष्य प्रत्येक वाद्याचा आवाज ओळखूं शकतो. नादलहरींमुळें हवेंत उत्पन्न होणारा क्षोभ नादलहरींच्या दिशेशीं समांतर असतो पण घनपदार्थामध्यें उत्पन्न होणाऱ्या लहरी नादलहरींच्या दिशेशीं

काटकोनांत असतात. प्रवाही पदार्थांतील लहरी हवेप्रमाणेंच असतात. नादलहरी एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणाकडे स्थानांतर पावत असतां मध्यंतरीं असलेले हवेचे कण आपलें स्थान प्रत्यक्षपणें सोडीत नाहींत तर त्याच ठिकाणीं मार्गेपुढें आंदोलन पावत असतात व याप्रमाणें लहरी उत्पन्न करीत असतात; ही गोष्ट पाण्याच्या लहरी पाहिल्या असतां सहज दिसून येईल. मात्र तेथें पाण्याचे कण खालींवर होत असतात.

**लहरी–दीर्घता व आवृत्ति.**—एकापाठीमागून एक अशा सारख्याच आकाराच्या अखंड लहरी निघूं लागल्या म्हणजे त्यांची एक रांग दिसते व त्या रांगेंत लहरीच्या त्याच त्याच स्थितीची पुनरावृत्ति झालेलीहि दृष्टोत्पत्तीस येते. ही पुनरावृत्ति ज्या अंतरानें होते त्या अंतरास लहरीदीर्घता म्हणतात. ज्यामुळें या लहरी उत्पन्न होतात, त्या पदार्थाची जर एका सेकंदांत 'न' आंदोलनें होऊं लागलीं तर त्याच्यामुळें एका सेकंदांत 'न' लहरी उत्पन्न होतात.

**नादाची तारता माधुर्य व उच्चता उर्फ मोठेपणा.**—तारता, माधुर्य व उच्चता या लक्षणांच्या योगानें ध्वनि निरनिराळे भासतात. विवक्षित लहरीदीर्घता असणाऱ्या लहरींच्या मालेच्या योगें ध्वनींत जी उच्चता येते ती हवेच्या परमाणूंच्या मार्गेपुढें होणाऱ्या फेऱ्याच्या पल्यावर अवलंबून असते. ज्यापासून लहरी उत्पन्न होतात त्याचा कंप जस जसा वाढेल तसतशी हवेच्या कणांच्या फेऱ्यांची गति वाढेल व त्याबरोबरच आवाजाची उच्चताहि वाढेल. मागून पुढें जेवढा फेरा होत असेल त्याच्या निम्यास कंपविस्तार म्हणतात. विवक्षित लहरीदीर्घता असणाऱ्या लहरींच्या आवाजाची तीव्रता किंवा शक्ति कंपविस्ताराच्या वर्गाच्या प्रमाणांत असते.

आवाजाची तारता विशिष्ट कालांत उत्पन्न होणाऱ्या लहरींच्या संख्येवर अवलंबून असते. पण लहरींची संख्या त्यांना उत्पन्न करणाऱ्या कंपायमान पदार्थावर अवलंबून असल्यामुळें अखेर आवाजाची तारता कंपाच्या पुनरावृत्तीवर आहे. लहरी उत्पन्न करणाऱ्या कंपायमान पदार्थाच्या कंपावृत्ती ठरविणाऱ्या प्रयोगाच्या वेळीं जर लक्ष दिलें तर असें दिसून येतें कीं, अमुक एका विवक्षित स्वराकरितां कंप उत्पन्न करणारा पदार्थ कसलाहि असला, तरी पुनरावृत्ति तीच ( सारखीच ) लागते हें दिसून येईल. सुराची आवृत्ति, जर ४ असेल तर तो सुर, मुख्य सा धरून गांधार; पंचम व तीव्र सा यांचें प्रमाण ४ : ५ : ६ : ८ असें असतें ( हें आवृत्ति–प्रमाण इंग्रजी आहे. हेंच सर्वत्र ठराविक नसून, निरनिराळेंहि असूं शकतें ).

**ध्वनिमाधुर्य.**—माधुर्याच्या योगानें दोन यंत्रांवरील एकाच सुरांत फरक दिसून येतो. एका यंत्रांतील सूर जास्त मधुर असला तर दुसऱ्यांतलि तो जास्त कठोर येईल पण सूर मात्र तोच. हा जो फरक दिसून येतो तो लहरी–दीर्घता, कंपविस्तार किंवा आवृत्ति यांवर अवलंबून नसून हा लहरींच्या आकारावर किंवा स्वरूपावर अवलंबून असतो.

**ध्वनीची प्रयोगज्ञात गति.**–ध्वनीची गति प्रयोगानें मोजण्याची जी एक स्पष्ट रीत आहे ती अशी कीं एखाद्या माणसापासून बऱ्याचशा अंतरावर एक बंदूक सोडावी. त्या मनुष्यास त्या बंदुकींतून निघणारी ज्वाला लागलीच दिसेल, पण आवाज मात्र तितका लवकर ऐकूं येणार नाहीं. ज्वाला दिसल्यापासून तों ध्वनि ऐकूं येईपर्यंत जो काल जाईल तो त्या ध्वनीला तितकें अंतर जाण्यास लागलेला वेळ होय. त्यावेळानें अंतरास भागिलें असतां ध्वनीची गति निघते. पण यांत असा एक दोष रहातो कीं, सरासरी ध्वनीच्या १२½ मैल प्रवासांत वारा जर ध्वनीच्याच दिशेनें वहात असेल तर एवढ्या प्रवासास ५५½ सेकंदें लागतात व तो जर उलटा वहात असेल तर ६३ सेकंद लागतात.. वारा ज्यावेळीं स्थिर असेल त्यावेळीं ध्वनीची गति दर सेकंदास ११४२ फूट आहे. हवेंतील उष्णमान व आर्द्रता यानींहि थोड्याबहुत प्रमाणांत चुका होण्याचा संभव आहे; पण ज्या वेळीं वातावरण स्थिर असतें त्यावेळीं दोन ठिकाणांहून परस्परांकडे ध्वनि जाण्यास लागणारा वेळ मोजून या चुका टाळतां येतात. उदाहरणार्थः—'अ' हें अंतर असेल व 'ग' ही शांत हवेंत ध्वनीची गति असेल व 'ध' ही वायूची गति असेल व एका दिशेनें 'अ' या अंतरावर जाण्यास ध्वनीस '$व_1$' व दुसऱ्या दिशेनें जाण्यास '$व_2$' वेळ लागतो. तर

$$ग+ध = \frac{अ}{व_1} \text{ आणि } ग-ध = \frac{अ}{व_2} \therefore ग = \frac{अ}{२}\left(\frac{१}{व_1}+\frac{१}{व_2}\right).$$

म्हणून $व_1$ आणि $व_2$ यांच्या किंमती जर जवळ जवळ सारख्या असतील तर

$$व = \frac{१}{२}(व_1+व_2) \text{ होतील, व यावरून } ग = \frac{अ}{व}.$$

फ्रेंच विद्यालयांतील पंचांनीं १७३८ सालीं ही अन्योन्य-निरीक्षणपद्धति अमलांत आणली. एकमेकापासून १७।१८ मैल अंतरावर असणाऱ्या दोन ठिकाणांहून अर्ध्या तासाच्या अंतरानें तोफा सोडल्या; व या दोन ठिकाणीं, शिवाय मध्यें दोन ठिकाणीं निरीक्षणें केलीं. आंदोलकघड्याळानें वेळ मोजला. शतभाग ६° उष्णमानाच्या वेळेस दर सेकंदास ३३७ मीटर गति या प्रयोगानें सिद्ध झाली.

पण 'ग' ही गति 'ट°' अंश उष्णमानाच्या वेळीं जर असेल तर शून्यांश उष्णमानाच्या वेळच्या गतीचें

$$ग_० = \frac{ग}{(१+०\cdot००१८४ट)}$$

हें सूत्र आहे. यांत '$ग_०$' म्हणजे शून्यांश उष्णमानाच्या वेळची गति. वरील सूत्रानें '$ग_०$' ची किंमत दर सेकंदास ३३२ मीटर येते.

यांत आणखी एका चुकीचा संभव म्हणजे, ज्यावेळीं वेळ मोजण्याकरितां बंदुकीच्या ज्वालेकडे पहाणें किंवा आवाज ऐकणें या दोन्हीहि क्रिया मनुष्याच्या ज्ञानेंद्रियांनीं व्हावयाच्या असतात, त्यावेळीं त्याच्या इंद्रिय–दोषाचीहि

दुरुस्ती लागते. कारण क्रिया घडणें, ती पहाणें किंवा ऐकणें व ती नमूद करून ठेवणें याला लागणारा वेळ खऱ्या वेळांत विनाकारण भर पडून ध्वनिवेगाची किंमत कमी येऊं लागेल. अर्थात ही चूक प्रत्येक माणसाच्या बाबतींत निरंनिराळी येऊं शकेल. इ. स. १८६२ ते १८६६ पर्यंत व्ही. रेग्नाल्ट नांवाच्या शास्त्रज्ञानें जे ध्वनि-गतीवर प्रयोग केले त्यांत त्यानें हें निरीक्षणाचें मानवी साधन काढून टाकून त्याऐवजीं विद्युत्‌ग्राहकांची योजना केली.

हवेंतून ध्वनीचा वेग.—एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं ध्वनि जाण्यास कांहीं काळ लागतो हें पूर्वींच दाखवून दिलें आहे. १८२२ सालच्या जून महिन्यांत रात्रीं पॅरिस येथें तेथील विद्वान मंडळींनीं पुढील प्रयोग केला. पॅरिस शहराजवळच्या मॉन्टल्हेरी नांवाच्या टेंकडीवर एक तोफ ठेविली आणि व्हिले ज्युजीफ नांवाच्या दुसऱ्या उंच सपाटीवर एक तोफ ठेवून दिली. या दोन ठिकाणांमधील अंतर सुमारें ६१०४५ फूट होतें. प्रत्येक ठिकाणीं दर दहा मिनिटाच्या अवकाशानें एका मागून एक अशी बारा वेळ तोफ उडविली. या दोन्हींहि ठिकाणीं बरोबर चालणारीं व सूक्ष्ममानानें काल दर्शविणारीं अशीं घड्याळें घेऊन लोक उभे केले होते. तोफेचा काना पेटलेला दिसल्यापासून किती वेळानें तोफेचा आवाज ऐकूं आला हें प्रत्येकजण टिपून ठेवीत होता. या सर्वांची सरासरी काढतां ५४.६ सेकंदें निघालीं. प्रकाशास वरील अंतर क्रमण्यास व्यवहारदृष्ट्या कांहींच काल लागत नाहीं; कारण प्रकाश एका सेकंदांत १८६००० मैल जातो असें सिद्ध झालें आहे. यास्तव ५४.६ सेकंदांच्या संख्येनें ६१०४५ फुटांच्या संख्येस भागलें असतां ध्वनीचा दर सेकंदास वेग १११८ फुटांप्रमाणें येतो. या प्रयोगाच्या वेळेस उष्णमान १६° श होतें. याहून कमी उष्णमान असतां ध्वनीचा वेग कमी येईल. कोठें दूर अंतरावर कांहीं आवाज झाला तर तो आवाज तेथें उत्पन्न होऊन आपल्यापर्यंत पोहोंचण्यास किती काल गेला हें समजल्यास आपणांपासून तें स्थळ किती लांब आहे हें स्थूलमानानें काढतां येतें.

निरनिराळ्या वायूंमध्यें ध्वनीचा वेग सारखा असत नाहीं. जे वायू जास्त विरल आहेत त्यांत ध्वनीचा वेग जास्त आहे. ड्युलांग यानें प्रयोगानें असें दाखवून दिलें कीं, ०° श उष्णमानावर कर्बाम्ल(कार्बानिक ॲसिड)वायूमध्यें ध्वनीचा वेग दर सेकंदास ८४६ फुटांप्रमाणें आहे आणि णाप्रवायूंत १०४० फूट, हवेंत १०९६फूट व उज्जांत ४१६३ फूट आहे. उच्च, नीच किंवा बारीक अशा सर्व ध्वनींचा वेग हवेंत सारखा असतो. यामुळें दूर अंतरावर गायन चाललें असतां सर्व सूर सारखेच ऐकूं येतात.

पाण्यांतून ध्वनीचा वेग.—पातळ पदार्थांपेक्षां घनपदार्थांतून ध्वनीचें वहन जास्त त्वरेनें होतें. कोलॅडन व स्टर्म यांनीं १८२७ सालीं पाण्यांत ध्वनीचा वेग काय असतो याचा निर्णय प्रयोगद्वारा केला. स्वित्झरलंड देशांतील जिनीवा सरोवरांत दोन बोटी कांहीं अंतरावर नांगरून ठेविल्या; त्यांपैकीं एका बोटीवरून एक घंटा पाण्यांत टाकली होती. या घंटेस एक यांत्रिक-कळ जोडून ठेविली होती. तिच्या योगानें घंटेवर ठोका पडल्याबरोबर दारू पेटून ज्वाला उत्पन्न होई. ही उत्पन्न झालेली ज्वाला दुसऱ्या बोटीवरून दिसत होती. दुसऱ्या बोटीवर एक पाण्यांत बुडविलेला कर्णा होता; या कर्ण्यामुळें पाण्यांत उत्पन्न होणारा ध्वनि ऐकूं येई. ज्वाला दिसल्यापासून किती वेळानें ध्वनि ऐकूं आला हें काढून त्यावरून ध्वनीचा पाण्यांतील वेग ठरवितां येतो. वरील प्रयोगांत पाण्यांत ध्वनीचा वेग ८° श उष्णमान असतां दर सेकंदास ४७०८ फूटप्रमाणें निघाला; म्हणजे हवेंतील वेगाच्या चौपट निघाला.

घनपदार्थांतून ध्वनीचें गमन.—घनपदार्थांतून ध्वनीचें वहन किती जलद होतें हें पुढील उदाहरणावरून स्पष्ट होईल. एखाद्या बऱ्याच लांबीच्या लोखंडी कांबीच्या एका टोंकास कान लावावा आणि दुसऱ्या टोंकास एखाद्याला हातोडीच्या जोरानें प्रहार करण्यास सांगावें, म्हणजे हवेंतून येणाऱ्या ध्वनीच्या अगोदर लोखंडी कांबींतून ध्वनि ऐकूं येतो. लोखंडांतून ध्वनि दर सेकंदास १६८०० फुटांप्रमाणें जातो. तांब्यांतून ११६०० फूट, ओक लांकडांतून १०९०० आणि पाइनच्या लांकडांतून १५२२० फूट याप्रमाणें ध्वनीचें वहन होतें.

बद्ध वायूंतून ध्वनीचा वेग.—जर एखाद्या नळींत हवा किंवा दुसरा एखादा वायु भरला तर त्या ठिकाणीं ध्वनीची गति काय असावी याबद्दल शंका उत्पन्न होते. कारण उघड्या स्थितींत ज्या वेगानें ध्वनींचें गमन होईल त्याच वेगानें बंद अशा परिस्थितींत गमन होणार नाहीं. प्रसिद्ध संशोधक रेग्नाल्ट यानें निरनिराळ्या व्यासाच्या नळींत निरनिराळे वायू भरून त्यांतून ध्वनीचें वहन होण्यास किती काल लागतो हें काढलें; त्यावरून असें दिसून आलें कीं, नळीचा व्यास जों जों लहान होत जाईल तों तों ध्वनीचें वहन होण्यास जास्त काल लागतो. हेल्महोल्ट्झ आणि किरचाफ यांनीं असें दाखवून दिलें कीं, नळीमधील वायूची ध्वनिवाहकता पुढील कारणांवर अवलंबून असते.—( १ ) नळीचा व्यास, ( २ ) आवाजाचीं प्रत्येक सेकंदास होणारीं प्रकंपनें ( ३ ) आणि नळींतील वायूच्या स्निग्धतेचा गुणक.

ध्वनीचें परावर्तन.—ध्वनीचें परावर्तन प्रकाशाच्या परावर्तनाच्या नियमांस धरून होतें. म्हणजे ध्वनीचें परावर्तन पुढील दोन नियमांस धरून होतें. ( १ ) पतन कोन आणि परावर्तनकोन एकाच पातळींत असतात, ( २ ) व पतनकोन आणि परावर्तनकोन बरोबर असतात.

या वरील नियमांप्रमाणें अंतर्गोल आरशापासून परावर्तन होऊन एका ठिकाणीं ध्वनि केंद्रीभूत होतो. असल्याप्रकारचे दोन आरसे बऱ्याच अंतरावर समोरासमोर व समान्तर

ठेवून द्यावेत ( ध्वनीकरितां केलेले आरसे पारदर्शक असावेच लागतात असें नाहीं ). नंतर त्यांपैकीं एका आरशाच्या केंद्रांत एखादें लहानसें घड्याळ ठेऊन द्यावें. म्हणजे दुसऱ्या आरशाच्या केंद्रांत त्या घड्याळाची टिकटिक एकत्रित झालेली दिसून येईल. हें जाणण्याकरितां दुसऱ्या आरशाच्या केंद्रांत एक लहानसें ध्वनिशृंग धरावें. म्हणजे मनुष्याच्या डोक्याच्या योगानें येणारा अडथळा दूर होऊन केंद्रित झालेला ध्वनि स्पष्टपणें ऐकतां येतो.

लंबवर्तुलाच्या अंगीं हा मोठा गुणधर्म आहे कीं, एका केंद्रापासून निघालेले ध्वनी दुसऱ्या केंद्रांत एकत्रित होतात. लंबवर्तुलाच्या या गुणामुळें असल्या प्रकारच्या घुमटांत मजेदार प्रकार पाहाण्यास सांपडतात. विजापूर येथील गोल घुमटांत अशा प्रकारचा चमत्कार पहाण्यास सांपडतो. परावर्तनाच्या या चमत्काराची पुष्कळ ठिकाणीं मजा अनुभवण्यास सांपडते. लंडन येथील एका गोलाकार घुमटांत नुसता उद्गार काढला तर मनुष्य मोठ्यानें हंसण्यासारखा ध्वनि होतो; किंवा नुसता कागद फाडला तर गारांच्या वर्षावाप्रमाणें आवाज सुरू होतो.

ध्व नी चें व क्री भ व न.—ज्याप्रमाणें प्रकाशाचें वक्रीभवन होतें त्याचप्रमाणें ध्वनीचें देखील एका पदार्थांतून दुसऱ्या पदार्थांत वहन होतांना वक्रीभवन होतें; वक्रीभवन होतांना प्रकाशाच्या वक्रीभवनाचे साधे नियम लागू होतात. ध्वनींच्या या गुणधर्मामुळें कर्बाम्ल ( कार्बानिक अॅसिड ) नांवाच्या वायूचीं लेन्सें तयार करून ध्वनी एकत्रित करतां येतात. रबराच्या पिशवीमध्यें कर्ब वायु भरला व त्या पिशवीस बाह्यगोल लेन्साप्रमाणें आकार येण्याची योजना केली तर एका अंगास ठेविलेल्या घड्याळाची टिकटिक दुसऱ्या अंगास स्पष्टपणें ऐकूं येते.

प्र ति ध्व नि.—कमीजास्त अंतरावरून ध्वनीचें परावर्तन होऊन जो ध्वनि जशाचा तसाच आपणास ऐकावयास मिळतो त्यास प्रतिध्वनि असा पारिभाषिक शब्द आहे. एखाद्या दाट अरण्यापासून किंवा खडकापासून अगर इमारतीपासून कांहीं अंतरावर मोठ्यानें उच्चारलेले शब्द जसेच्या तसेच कांहीं वेळानें ऐकूं येऊं शकतात व त्यामुळें दर अंतरावर कोणी तरी ते शब्द बोलत आहे असें भासतें. आतां ज्या पृष्ठभागापासून प्रतिध्वनि ऐकूं येतो तो पृष्ठभाग आणि बोलणारा इसम यांत कांहीं तरी ठराविक अंतर असावें लागतें. तोंडानें उच्चारलेल्या शब्दाचा प्रतिध्वनि ऐकूं येण्यास कमींत कमी सुमारें ११२ फुटांचें अंतर असावें लागतें. कारण कोणीहि मनुष्य एका सेकंदांत पांचहून जास्त स्वर स्पष्ट उच्चारूं किंवा ऐकूं शकत नाहीं. साधारण उष्णमानावर ध्वनीचा वेग दर सेकंदास ११२० फुटांपासून ११४० फुटांपर्यंत असतो. म्हणून ⅕ सेकंदांत ध्वनि २२४ ते २२८ फूट अंतर आक्रमील तेव्हां परावर्तक पृष्ठभागापासून ११२ फूट अंतरावर त्याकडे तोंड करून मोठ्यानें बोलणाऱ्या मनुष्यास त्यानें एक स्वर उच्चारल्यास त्याचा प्रतिध्वनि स्पष्टपणें ऐकावयास मिळेल.

ना द ल ह रीं ची वि कृ ति.—प्रकाशकिरणांची विकृति होऊन ज्याप्रमाणें एका पदार्थाचे बरेचसे पदार्थ दिसूं शकतात, त्याचप्रमाणें नाद-लहरींचीहि विकृति होऊन एका पाठीमागून एक लहरी ऐकूं येतात.

अं त र आ णि ध्व नी ची उ च्च नी च ता.—कानापासून नादजनक पदार्थाचें जें अंतर असेल त्याच्या वर्गाच्या व्युत्क्रमप्रमाणांत ध्वनीची उच्चनीचता असते. हा नियम गणितानें सिद्ध करतां येतो. प्रयोगानेंहि ही गोष्ट सिद्ध करितां येते. सारख्याच प्रकारच्या चार घंटा घेऊन त्या सारख्याच वजनाच्या मोगऱ्यांनीं एकदम वाजविल्या असतां जो ध्वनि उत्पन्न होतो तितकाच मोठा ध्वनि त्यांपैकीं एक घंटा निम्या अंतरावर ठेवून वाजविली असतां होतो.

सु रा वि ष यीं.—ज्याचीं ठराविक आंदोलनें सतत कांहीं काल होतात तो ध्वनि सूर या सदरांत येतो.

(२०) आ वृ त्ति व ता र ता.—सर्वच सूर चांगले असणें साहजिक नाहीं, कांहीं सुखकर असतील व दुसरा निव्वळ गोंगाट असूं शकेल. गोंगाट हाच शब्द असें दर्शवितो कीं, तो उत्पन्न करणाऱ्या लहरी व्यवस्थित नसून कांहीं तरी अनियमित क्रमानें उत्पन्न होत असल्या पाहिजेत. कोणत्याहि विवक्षित स्वरांत नाद-लहरींची संख्या नियमित असते; म्हणजे अमुक एक स्वर उत्पन्न करावयाचा असेल तर एका सेकंदांत अमुकच नाद-लहरी उत्पन्न केल्या पाहिजेत. त्याचप्रमाणें त्या सुराची तारता ही सर्वस्वी नाद-लहरींच्या संख्येवरच ( संख्यापटीवर ) अवलंबून आहे. या नाद-लहरी मोजून स्वर किंवा त्याची तारता, किंवा तारता किंवा स्वर यांवरून नाद-लहरींची संख्या मोजण्याच्या पुष्कळच रीती आहेत. पण त्यांपैकीं कांहीं सुलभ रीती येथें पाहूं.

सायरेनः—सायरेन नांवाचें एक स्वर-मापक यंत्र आहे. हीं स्वरमापकें निरनिराळ्या शास्त्रज्ञांनीं निरनिराळ्या तऱ्हेचीं केलीं आहेत. त्यांपैकीं 'सीबेक' व 'कॅगनीयार्ड डी ला टूर' यांचीं कांहीं उपयोगीं आहेत. पण त्यानंतर 'डव्ह' यानें जी त्यांत सुधारणा केली त्या योगानें निरनिराळ्या स्वरांचा एकमेकांशीं संबंध लावणें फार सुकर झालें आहे.

एका प्रकारच्या स्वरमापकाचा मुख्य भाग म्हणजे भोंकें पाडलेली एक तबकडी होय. ह्या तबकडीवर भोंकें पाडलेलीं अशीं चार समकेंद्र वर्तुळें असतात. त्यांच्यावर अनुक्रमें ८, १०, १२, १६ भोंकें असतात. अशा दोन तबकड्या असून त्यांपैकीं एक घट्ट बसविलेली असते व दुसरी फिरती असते. या प्रत्येक भोंकें पाडलेल्या वर्तुळाखालीं जरूर पडेल तर कांहीं भोंकें बंद करण्याकरतां म्हणून धातूचीं कडीं बसविलेलीं असतात; व अशा तऱ्हेनें एकाच किंवा ज्या तऱ्हेनें मिश्र ध्वनि काढावयाचा असेल अशीं मिश्र भोंकें उघडीं ठेवतात; व नंतर भात्यानें खालील नळीतून

वारा सुरू केला असतां, ती तवकडी फिरूं लागून तिच्यांतून सूर निघूं लागतो.

याखेरीज स्वरशूलाच्या कंपाप्रमाणें एका फिरत्या नळकांड्यावर निघणाऱ्या आकृतीवरून; तुलना करावयाच्या स्वरशूलांच्या एका बाजूवर एक आरसा बसवून त्यावरील किरणांच्या परावर्तनानें एका पडद्यावर निघणाऱ्या ( लिसजोसच्या )आकृतींवरून; व कूनिंगच्या विरलतामापक ज्योतींवरूनहि कंप अथवा आंदोलन संख्या मोजतां येते.

सूरः—सूर आणि आवाज असे ध्वनीचे दोन प्रकार करतात. त्यांपैकीं जो ध्वनि सूर या सदराखालीं मोडूं शकत नाहीं तो आवाज या सदरांत घालतात. कोणत्याहि सुराच्या अंगीं पुढील तीन गुण असतात. ( १ ) उच्च–नीचता, ( २ ) तीक्ष्णता व ( ३ ) स्वरविशेषता, किंवा स्वरविशिष्टत्व. वरील तीन भेद म्हणजे काय आहेत व हे कां झाले आहेत हें पुढें स्पष्ट केलें आहे.

सुरांचें मापनः—प्रथमतः सुराचें मापन कसें करतात हे पुढील प्रयोगानें दिसेल. एखाद्या चक्रास कांहीं भोकें सारख्या अंतरावर पाडलेलीं असतात व त्या चक्रापासून कांहीं अंतरावर एक कांचेची नळी वितळवून तिचें तोंड चक्रावरील छिद्राच्या व्यासाहून कमी व्यासाचें करून बसवितात; या नळींतून किंवा बारीक तोंडाच्या धातूच्या नळींतून चक्र गरगर फिरत असतां भात्याच्या साहाय्यानें वारा सोडल्यास स्वर निघूं लागतात. हे स्वर पत्र्याच्या (चक्राच्या) गतीवर अवलंबून आहेत. मुख्य स्वर सात आहेत. या सात स्वरांस सा, री, ग, म, प, ध, नी, अशीं सात नांवें आहेत. यांस संस्कृतांत षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत आणि निषाद अशीं जीं नांवें आहेत, त्यांच्या आद्याक्षरांवरून हीं सा, री, ग, इ. नांवें पडलीं आहेत. आतां हे स्वर उत्पन्न होण्यास दर सेकंदास कोणत्या प्रमाणांत आंदोलनें व्हावीं लागतात हें पुढें दिलें आहे.

| सा, | री, | ग, | म, | प, | ध | नी, | सां, |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | $\frac{९}{८}$ | $\frac{५}{४}$ | $\frac{४}{३}$ | $\frac{३}{२}$ | $\frac{५}{३}$ | $\frac{१५}{८}$ | २ |

उदा. २४, २७, ३०, ३२, ३६, ४०, ४५, ४८.

स्पष्टार्थः—वरील दिलेल्या आंकड्यांनीं प्रत्येक सुराचा षड्जाशीं काय संबंध असतो हें दाखविलें आहे.उदाहरणार्थ; षड्ज जर ४८ प्रकंपनें प्रत्येक सेकंदास होऊन होत असेल; तर गांधार सूर $\frac{४८}{१} \times \frac{५}{४} = ६०$ आंदोलनें होऊन निघेल.

वाद्यविद्येंत मध्यम सा या सुरास २५६ पूर्ण आंदोलनें लागतात असें समजण्याची साधारण चाल आहे.आतां २५६ आंदोलनें दर सेकंदास उत्पन्न करण्याकरितां निरनिराळ्या प्रकारची यंत्र–रचना करतां येणें शक्य आहे. परंतु खालील प्रकारचें यंत्र वापरणें सोईचें आहे. स्थितिस्थापक अशी पोलादी कांब वळवून चिमट्याप्रमाणें किंवा वैष्णवी नामाप्रमाणें बनवितात; यास स्वरशूल म्हणतात. ह्या पोलादी चिमट्यास सारंगीच्या गजानें ओढून वाजविलें किंवा दुसऱ्या कोणत्या तरी युक्तीनें प्रकंपित केलें म्हणजे ठराविक प्रकंपनें प्रत्येक सेकंदास होऊं लागतात. जर आपण वरील चिमट्यापैकीं, दर सेकंदास २५६ पूर्ण आंदोलनें देणारा चिमटा निवडून घेतला तर 'सा' हा स्वर आपणास प्रत्येक खेपेस तुलनेकरितां सहजच मिळेल. जरी दोन किंवा अधिक स्वर वेगवेगळाले कानास गोड लागले, तरी त्या दोहोंचा एकदम उच्चार झाला असतां ते नेहमींच गोड लागतील असें मानतां येत नाहीं. जर कोणत्याहि दोन स्वरांमधील मेळ किंवा संबंध साध्या आंकड्यांनीं दर्शवितां येण्यासारखा असला तर तो मेळ कानास गोड लागतो. उदाहरणार्थ, ' सा ' आणि ' प ' यांमधील संबंध २:३ या प्रमाणानें दर्शवितां येतो व ' सा ' आणि ' प ' हे दोन स्वर एकाच वेळीं उच्चारले असतां कानांस गोड लागतात. याप्रमाणेंच ' सा ' आणि ' प ' यांचें स्वरैक्य होऊं शकतें तसेंच ' सा ' आणि ' म ' यांचेंहि स्वरैक्य होऊं शकतें.

हवेचा अनुनादः—स्वरशूलयंत्राची अनुनादक पेटी, तंतुवाद्याचे अनुनादक भोपळे व पेट्या यांचा उपयोग कसा होतो या गोष्टीचा उलगडा पुढील प्रयोगावरून करतां येणें शक्य आहे. पूर्वी वर्णन केलेल्या चिमट्याप्रमाणें एखादा चिमटा घ्यावा व तो प्रकंपित करून कांचेच्या पंचपात्राच्या तोंडाशीं धरावा व त्यांत पाणी ओतावें; म्हणजे पाणी योग्य तितक्या खोलीपर्यंत भरलें तर चिमट्याचा आवाज स्पष्ट ऐकूं येऊं लागेल. या प्रयोगांत काय होतें याचा उलगडा केला पाहिजे.ज्यावेळेस पंचपात्र रिकामें होतें त्यावेळेस त्यांतील पोकळी चिमट्याच्या स्वरास प्रतिध्वनि देण्यालायक नव्हती;परंतु पाणी भरून त्या पंचपात्राची पोकळी प्रतिध्वनि देण्यालायक स्थितींत आणली तेव्हां चिमट्याच्या सुरास प्रतिध्वनीची जोड मिळून मूळचा स्वर वृद्धिंगत झाला. याच तत्त्वास अनुसरून सतार, बिन, इत्यादि वाद्यांस जे भोपळे लावलेले असतात,त्या भोपळ्यांच्या योगानें मूळचा ध्वनि वाढतो व त्यामुळें आवाज खुलतो.

स्वरविशेषत्वः—निरनिराळ्या वाद्यांतून "सा,रे,ग ,म, प. इ. सप्त सूर निघतात, परंतु प्रत्येक वाद्यांतील सा' ह्या सुराचें प्रकंपन दर सेकंदास ठराविक आणि सारखेंच होईल अशी व्यवस्था केली असली तरी प्रत्येक वाद्याच्या सुरांत कांहीं तरी विशेषत्व आहे असें दिसून येतें. या स्वरविशेषत्वास इंग्लिशमध्यें टिंबर ही संज्ञा आहे. टिंबर यालाच मराठींत स्वरविशिष्टत्व ही संज्ञा आहे. सुरांचा हा जो चमत्कार आहे, त्याचें कारण असें आहे कीं, फार थोड्या वाद्यांतून कोणताहि सूर अगदीं शुद्ध असा निघतो; परंतु पुष्कळांतून एक सूर काढिला म्हणजे त्याबरोबर त्याच्या वरचे अनेक सूर निघतात.

हेल्महोट्झ यानें परिश्रम करून निरनिराळ्या वाद्यांच्या सुरांचें पृथक्करण करून पाहिलें. त्या प्रयोगावरून असें दिसून आलें कीं, पाव्याचे म्हणजे फ्लूटचे सूर बहुतेक शुद्ध असतात.

कारण त्यांच्यावरचे सूर फार निःशक्त किंवा निर्बल असतात. रुंद तोंडाच्या पण बंद अशा आर्गनच्या नळ्यांतून बहुतकरून अगदीं शुद्ध असा मूळसूर निघतो. परंतु अरुंद नळ्यांतून त्याबरोबर पांचव्या सप्तकांतील तोच सूर उत्पन्न होतो. ताणलेल्या तारा किंवा दोऱ्या यांच्या सुरांमध्ये जे वरचे सूर असतात ते बऱ्याच अंशीं जोरदार असूं शकतात.

साधारण नियम असा आहे कीं, कोणत्याहि वाद्यांतून मूळ सुराबरोबर खालील सप्तकांतील सूर निघाल्यास आवाज अधिक मधुर आणि उच्च असा होतो; आणि वरचे उच्च सूर निघाल्यानें मूळ सुराच्या अंगीं अधिक कर्कशता येते.

आं दो ल नां चे प्र का रः—आंदोलनें ( किंवा लाटा ) दोन प्रकारचीं असतात. एक तिर्यक् आंदोलनें आणि दुसरीं लंबोत्तर आंदोलनें पहिल्या प्रकारच्या आंदोलनांचें उदाहरण पाण्यावरील लाटा होत; म्हणजे पाण्याच्या लाटा ज्या दिशेनें प्रसृत होतात त्या दिशेच्या काटकोनाकार दिशेंत त्यांचीं आंदोलनें होतात. विणाआदीकरून तंतुवाद्यांत तारेच्या समान्तर दिशेनें लाटांचें गमन होतें. परंतु तारेचें आंदोलन या दिशेच्या काटकोनांत होत असतें म्हणून असल्या प्रकारच्या आंदोलनास तिर्यक आंदोलन हें नांव आहे. लंबोत्तर आंदोलनांत तरंगाचा प्रसार आणि आंदोलन हीं एकाच दिशेनें होत असतात. हवेंतून ध्वनीचें गमन होत असतांना लंबोत्तर आंदोलनें होतात. तंतूच्या लांबीवर, ताणावर, आणि दार्ढ्यावर आंदोलनांची संख्या अवलंबून असते.

ध्व नि ऐ कूं ये ण्या ची म र्या दाः—साव्हर्ट यानें असें दाखवून दिलें कीं, दर सेकंदास १६ किंवा त्यापेक्षां जास्त आंदोलनें झालीं असतां ध्वनि कानास ऐकूं येतो. त्यापेक्षां कमी आंदोलनें झालीं असतां ध्वनि कानास ऐकूं येत नाहीं व त्याचप्रमाणें दर सेकंदास ४८००० पेक्षां जास्त आंदोलनें झालीं असतां ध्वनि कानास ऐकूं येत नाहीं. या दोन मर्यादांच्या आंत जर दर सेकंदास आंदोलनें झालीं तर तीं मनुष्याच्या कानास ऐकूं येतात. वयपरत्वें ध्वनि ऐकूं येण्याची मर्यादा बदलते. लहान मुलास बहुधा पाकोळ्यांचें ओरडणें ऐकूं येतें; परंतु तींच मुलें मोठीं झालीं म्हणजे त्यांनां पाकोळ्यांचें ओरडणें ऐकूं येत नाहीं.

तारायंत्राच्या साहाय्यानें दुसऱ्या ठिकाणच्या धातुमय पडद्यावर प्रकंप उत्पन्न करून एका ठिकाणचें भाषण दुसरीकडे ऐकवितां येतें. या तारायंत्राची उर्फ टेलिफोनची साद्यंत माहिती दुसरीकडे ( संदेशवाहक पहा. ) दिली आहे.

बोलण्याचे कर्णेः या कर्ण्याचा उपयोग दूर अंतरावर बोलणें ऐकूं जाण्याकरितां करतात. हा कर्णा किंचित शंक्वाकार असून कथिलाचा किंवा पितळेचा केलेला असतो. हें यंत्र ( कर्णा ) ज्यामानानें मोठें असेल त्याप्रमाणें जास्त अंतरावर बोलणें ऐकूं जातें. २० फूट लांबीच्या कर्ण्यांतून जोरदार मनुष्याचें बोलणें ३ मैल अंतरावर ऐकूं गेलें आहे. बोलण्याप्रमाणें ऐकण्याचेहि कर्णे असतात. हेहि शंक्वाकृति असून अनेक लहरींस केंद्रीभूत करतात.

ध्वनीची उच्चता मोजण्याची पद्धतिः—ध्वनीची उच्चता मोजण्याकरितां नादलहरींबरोबर जो कांहीं शक्तिप्रवाह सुरू होतो त्याचा एखाद्या पृष्ठभागावर पडणाऱ्या दाबाचा उपयोग करतात. हा मोजण्याच्या दोन रीती आहेत. एखादा शुद्ध स्वर निघत असतांना एका चौरस सेंटिमीटर मधून दर सेकंदास किती शक्तिप्रवाह सुरू होतो त्याचें कांहीं तरी विवक्षित प्रमाण असणें साहजिक आहे. एका पद्धतींत कंप पावणाऱ्या पदार्थांची कंपशक्ति मोजून ती शक्ति कशी कमी कमी होते हें पहातात. नादलहरींच्या रूपानें शक्तीचें किती विक्षेपण होतें तें काढल्यावर, कांहीं अंतरावरील पृष्ठभागावर दाबरूपानें झालेल्या शक्तिसंचयाचें परिमाण काढतां येतें. दुसरी पद्धत म्हणजे या लहरींच्या योगानें हीच लहरी-आवृत्ति असलेल्या दुसऱ्या एका कंपपद्धतीवर परिणाम होतो आणि त्यावरून लहरींचा कंपविस्तार मोजतां येतो, व नंतर या कंपविस्तारावरून ध्वनीचा जोरदारपणा मोजणें सोपें होतें. लॉर्ड रॅले नें, एका स्वरशूलाचा त्यांतून निघणारा आवाज ऐकूं येतो न येतो अशा वेळीं कंपविस्तार मोजून व त्याच वेळीं दर सेकंदास अनुनादकांतून विक्षेपण होणारी शक्ति मोजून त्यांच्यायोगानें कर्णगोचर आवाजाकरितां लागणारा सर्वांत कमी कंपविस्तार काढून त्यावरून आवाजाचा जोरदारपणा मोजला.

स्थिर-लहरीः—निरनिराळ्या कंपपद्धतींच्या विचारापूर्वी स्थिर-तरंग कसे बनतात याचा विचार करणें इष्ट आहे. नेहमीच्या सर्वसाधारण अर्थानें घेतलें, तर यांनां तरंग हें नांवच उचित नाहीं, कारण हे तरंग नसून हा माध्यमांत एकमेकांच्या अगदीं उलट एकाच वेळीं उत्पन्न होणाऱ्या सारख्या क्षोभाच्या मार्गक्रमणाचा देखावा आहे. माध्यमाचे कांहीं नियमित भाग होऊन ह्या भागबिंदूंचें कंपन होत असतें. या स्थिर-तरंगाचें साधें उदाहरण म्हणजे एक २०-२५ फूट लांबीचा दोरा एका टोंकाला बांधून, दुसरें टोंक हलवून पाहिल्यानें त्याच्यात तिर्यक् लहरी उत्पन्न केल्यावर कांहीं काळानें दुसऱ्या बांधलेल्या टोंकाकडून त्यांचें परावर्तन होऊं लागतें. प्रत्यक्ष आणि परावृत्त लहरी जवळ जवळ सारख्याच असतात; व नंतर हात ज्या तऱ्हेनें हलवावा, त्या तऱ्हेनें त्या दोराचे दोन किंवा तीन किंवा जास्ती असे सारखे भाग पडलेले दिसतात. अशा तऱ्हेनें निरनिराळे भाग जेव्हां कंप पावूं लागतात त्यावेळीं प्रत्येक दोन संलग्न भाग एकमेकांच्या विरुद्ध दिशेंत कंप पावत असतात.

ध्व नि-का र ण ( ध्वनींचीं उत्पत्तिस्थानें ), नलिकांविषयीं मूळ-सिद्धांतः—सनईच्या आकाराच्या निरनिराळ्या वायुवाद्यांत हवेंतील दीर्घांदोलनाचाच उद्भव असतो. पहिल्यानें वायुवाद्यांत स्थिर लहरी उत्पन्न होतात.

ही कल्पना करून नंतर त्यांच्या कंपनपद्धतीसंबंधीं विचार करूं. अर्थातच स्थिर-तरंगाला लागणारे दोन अन्योन्य क्षोभ ह्मणजे मूळ उत्पन्न होणारा क्षोभ व नलिकेच्या टोंकाशीं त्याचें होणारें परावर्तन हें होय.

स्थिर तरंगोद्भव सिद्ध करण्याकरितां, स्थानभ्रष्टता फार थोड्या प्रमाणांत आहे तोंपर्यंत परस्परविरुद्ध उत्पन्न होणाऱ्या क्षोभांचा एकमेकांवर परिणाम होत नाहीं हें दाखविणें जरूर आहे व हें दाखविण्याकरितां, माध्यमांतील परमाणूंच्या स्थानभ्रष्टतेमुळें उत्पन्न होणारी एकंदर शक्ति, त्या दोन्ही तऱ्हेच्या स्थानभ्रष्टतेमुळें उत्पन्न होणाऱ्या शक्तीच्या (त्यांचा निरनिराळ्या तऱ्हेनें विचार केला तरी) एकंदर बेरजेबरोबर असावयास पाहिजे. अशा स्थितींत माध्यम पहिल्या तरंगमालेशीं त्याचप्रमाणें दुसऱ्याहि तरंगमालेशीं एकाच तऱ्हेनें वागतो. अशी स्थिति असतां कोणत्याहि विवक्षित ठिकाणीं उत्पन्न होणारा दाब प्रत्येक तऱ्हेच्या तरंगमालेमुळें होणाऱ्या निरनिराळ्या ठिकाणच्या दाबाच्या बेरजेइतका असावयास पाहिजे.

वातनलिकानुरूप या स्थिर तरंगांचे वातनलिकांप्रमाणें तीन निरनिराळे प्रकार होतात. वातनलिका तीन तऱ्हेच्या असतातः--(१) एका टोंकाला उघडी व एकाला बंद, (२) दोन्ही टोंकांस बंद व (३) दोन्ही टोंकांस उघडी.

(१) एका टोंकास उघडी असलेली व दुसऱ्या टोंकास बंद असलेली नलिकाः—ह्या नलिकेंत बंद असलेल्या टोंकाशीं हवेंत चलन नसतें व दाबाच्या योगानें ह्या ठिकाणीं हवा स्थिर असते, पण उघड्या तोंडाशीं हवेंत चलन असलें तरी दाबाचे परिणाम दिसून येत नाहींत, कारण दाब जास्त झाला तर बाहेरील हवा प्रसरण पावते व कमी झाला तर बाहेरील हवा आंत येते. तेव्हां बंद केलेल्या टोंकाशीं ग्रंथि (नोड) असते व उघड्या तोंडाशीं पाश (लूप) असतो. ध्वनिक्षोभक ह्या उघड्या तोंडाशीं असल्याकारणानें क्षोभकापासून उत्पन्न होणाऱ्या लहरी व परावर्तन पावलेल्या लहरी यांच्या योगानें स्थिर-लहरी उत्पन्न होतात.

(२) दोन्ही तोंडांशीं उघडी असलेली नलिकाः—ह्या नलिकेच्या प्रत्येक टोंकाशीं एक पाश असतो म्हणजे पावा ही एक या तऱ्हेची नलिका आहे. ह्या नलिकेवर कूनिगच्या ज्योती $\frac{1}{4}$ $\frac{1}{2}$ $\frac{3}{4}$ अशा अंतरावर ठेवून हलकेच हवेचा शिरकाव केल्यास सर्वांत खालच्या सुरास (फंडामेंटल) प्राधान्य मिळून मध्यबिंदूशीं असलेल्या ज्योतीवर परिणाम होऊन ती बरीच कंप पावते आणि इतर दोन किंचित कंप पावतात. ह्या वेळीं मध्यबिंदूशीं ग्रंथि असतो. जर हवेचा शिरकाव जोरांत केला तर प्रथम उच्च सुरास प्राधान्य मिळतें. ह्यावेळीं दोन्ही टोंकांस ग्रंथी असतात व त्यामुळें शेवटच्या दोन्ही ज्योती जोरानें कंप पावतात व मध्यभागीं असलेली ज्योत जवळ जवळ स्थिर असते.

(३) दोन्ही टोंकांशीं बंद असलेली नलिकाः—ह्या नलिकेच्या टोंकाशी ग्रंथी असतात. उच्च सुराच्या बाबतींत टोंकाशीं उघड्या असलेल्या नलिकेच्या बाबतींत दिसून येणारे परिणाम याहि स्थितींत दिसून यावयास पाहिजेत व ते तसे जवळ जवळ दिसून येतात. ही नलिका ३ फूट लांब असून हिचा व्यास १ इंच असतो. हीमध्यें लायकोपोडियम चूर्ण सबंध लांबीवर पसरतात व तिच्या एका तोंडाशीं घट्ट असणारा पण पुढेंमागें सरणारा असा दट्टया बसवून ती आडवी ठेवतात. नंतर एक कांचेची किंवा धातूची मध्यभागीं चिमट्यांत बसविलेला शलाका घेऊन ती नलिकेच्या अक्षाच्या दिशेनें नलिकेच्या आंत घालतात. तिच्या आंतील टोंकास सैल बूच बसविलेलें असतें. त्या शलाकेच्या दुसऱ्या टोंकास ओलसर फडक्यानें ठोसे मारले म्हणजे अगदीं खालचा सूर (षड्ज) निघतो. जर वरील दट्टयाच्या योगानें लांबी कमजास्त असल्यास बरोबर करून घेतली तर स्थिर-लहरी उत्पन्न होतात व आंतील चूर्णाच्या ग्रंथिबिंदूशीं लहान लहान राशी जमतात. प्रथम ग्रंथि स्थिर असलेल्या टोंकाशीं असून शेवटचा शलाकेवर असलेल्या बुचाजवळ असतो. तसेंच स्थिर लहरी-मालिका शलाकेंत उत्पन्न होणाऱ्या कंपाशीं जुळती होत असल्यामुळें क्षोभक अगदीं ग्रंथीशींच असूं शकत नाहीं. या नळीनें आंत निरनिराळे वायू भरून ध्वनीची त्या वायूंतील गति मोजतां येते.

वाद्यांतील तंतूंच्या उभ्या कंपाविषयीं मूळ सिद्धांतः— दर एकमान लांबीस 'म' द्रव्यराशि असणाऱ्या व प्रत्येक ठिकाणीं 'त' दाब असणाऱ्या ताणलेल्या तंतूंतून जाणाऱ्या लहरीची गति त्या तंतूस लहरीच्या गतीच्या उलट तितकीच गति देऊन तंतची स्थिति कायम ठेवल्यास

$$ग = \sqrt{\frac{त}{म}}$$

असें सिद्ध झालें आहे. सोनोमीटर किंवा एकतारीनें वरील संबंध दाखवितां येईल. पोकळ अशा पेटीवरून एक तार घेऊन तिचें टोंक खुंटीला भक्कम बसवून दुसरें एका पडद्यावरून आणून एका चक्रावरून खालीं सोडलेलें असतें. या तारेच्या टोंकास वजनें लावण्याची व्यवस्था केलेली असते. खुंटी व पडदा यांच्यामध्यें दुसरा एक पडदा बसविलेला असून तो पुढेंमागें सरकवितां येत असल्याकारणानें आपणास पाहिजे तशी लांबी करतां येते. ही लांबी पट्टीनें मोजतां येते. आतां एका प्रयोगांत 'ल' ही लांबी असून 'न' ही लहरी आवृत्ति असल्यास जर ताण (खालील) कायम ठेवला व न अथवा ल यांची किंमत बदलली तरी न × ल हा गुणाकार स्थिर आहे असें दिसून येतें. आतां लांबी कायम ठेवून ताण-म्हणजे वजनें बदललीं तर 'न' ची किंमत वजनाच्या वर्गमूळाशीं प्रमाणांत असते. $न \propto \sqrt{व}$ आणि शेवटीं निरनिराळे तंतू वापरून ताण व लांबी जर कायम ठेवली तर 'न' ची किंमत निरनिराळ्या (म = मूलमान लांबीच्या तंतूची द्रव्यराशि) तंतूंच्या वर्गमूळाशीं प्रमाणांत असते. ह्याच मूलमान राशीवर निरनिराळे प्रयोग करून निरनिराळे कंपहि उत्पन्न करतां येतात. उदाहरणार्थ मधला पडदा काढून जर

ही तार मध्यभागीं छेडली तर सर्वांत खालचा सूर उत्पन्न होतो, मध्यभागीं जर नख लावलें किंवा पिसानें स्पर्श केला व नंतर सप्तकाच्या $\frac{१}{४}$ अंतरावर तार छेडली तर त्यावरचा चढता सूर ऐकूं येतो. आपणास जो सूर पाहिजे असेल त्या सुराच्या सप्तकांतील ग्रंथीस स्पर्श करून पाश छेडले असतां आपणांस पाहिजे तो स्वर या एकतारीवर काढतां येतो. ग्रंथि व पाशावर जर कागदाचे निरनिराळे उत्पातक ( पेपर रायडर ) ठेवले तर ग्रंथीच्या ठिकाणीं ते स्थिर असतात व पाशाच्या ठिकाणीं ते उडून जातात.

तंतू व शलाका यांचे आडवे कंपः—कांहीं विवक्षित मर्यादेपर्यंत तंतू किंवा शलाका यांमधील लहरी ह्या त्यांच्या द्रव्यावर अवलंबून असतात; तिर्यक् छेदावर नसतात. आतां आकुंचन किंवा प्रसरणाच्या योगानें उत्पन्न होणारे दाबांतील फरक तिर्यक छेदावर अवलंबून असतात व म्हणून एका स्थितींत असणाऱ्या लहरीवाहकाचा तिर्यक् छेद दुसऱ्या स्थितींत असणाऱ्या वाहकाच्या दुप्पट असेल तर त्यावरील दाब व चलन दिला जाणारा द्रव्यराशीहि दुप्पट होतो आणि त्यामुळें वेग-वर्धन कायम राहून वेगहि बदलत नाहीं. या आडव्या कंपाची गति भ्रामकत्त्वांत होणारे बदल विचारांत घेतले असतां पुढीलप्रमाणें असते. $ग=\sqrt{\frac{य}{र}}$ ( ग = गति य = यंग्ज मोडयूलस ऑफ इलॉस्टिसिटी आणि र = शलाकेंचें साधारण दार्ढ्य, नार्मल डेन्सिटी ) हें प्रमाण विवक्षित मर्यादेपर्यंत टिकतें. ही मर्यादा म्हणजे तिर्यक्छेदाचा व्यास; हा लहरीच्या लांबीपेक्षां कमी असावयास पाहिजे.

शलाका व तंतू यांचे निष्पीडन(इंन्टरनल)कंपः—ह्यांचीहि गति भ्रामकत्वाच्या बदलावरून काढतां येते. या ठिकाणीं कोण-भ्रामकत्व (ॲंग्युलर मोमेन्टम) असतें. ही गति पुढील प्रमाणांत असते $ग^{२}=\frac{प}{र}$(प = निष्पडिन ताठरपणाचा गुणकः र = दार्ढ्य आणि ग = गति ).

कागदाचीं लहान लहान वर्तुळें एकतारीवर ठेवून नंतर ती छेडली असतां तीं वर्तुळें ह्या निष्पिडन कंपाच्या योगानें फिरतात.

शलाकांचे उभे कंपः—शलाकांचे तिर्यक् छेद बरेच मोठे असल्यास दाबाच्या योगानें उभे कंप सुरू होतात. ह्या कंपांची गति व त्यांचे प्रकार हे शलाकेच्या लवचिकपणावर व आकारावर अवलंबून असतात. दोन्ही टोंकांस मोकळया असलेल्या शलाकेच्या बाबतींत अगदीं लहान सुराच्या वेळीं दोन्ही टोंकांस शेवटापासून लांबीच्या .२२४ इतक्या लांबीवर ग्रंथी असतात. जेव्हां एकच टोंक मोकळें असतें व एक बांधलेलें असतें तेव्हां बांधलेल्या तोंडाशीच ग्रंथि असतो. खालच्या लहान सुराच्या वेळीं तेवढी एकच ग्रंथ असतो. असल्या शलाकांचा उपयोग वाजवण्याच्या बाजाच्या पेट्यांतून करतात. स्वरशूल (सिंगिंग फोर्क )हे याच प्रकारचे असून ते दोन समांतर शलाका एकच टोंकाशीं एकत्र आणून बनविलेले असतात.

कोणतीहि वस्तु कंपित गतींत ठेवली असतां हळू हळू त्या वस्तूंतील कंप, ते उत्पन्न करण्याकरितां झालेल्या शक्तीच्या नाशाच्या योगानें किंवा घर्षणाच्या योगानें शक्तींत होणाऱ्या ऱ्हासाच्या योगानें कमी कमी होत जातात. हे कंप कायम ठेवण्याकरितां शक्तीचा पुरवठा करावयास पाहिजे. ही शक्ति निरनिराळ्या बाबतींत तोंडानें, भात्यानें, विद्युत्साहाय्यानें वगैरे निरनिराळ्या तऱ्हेनें पुरविली जाते.

ध्वनिप्रतिबंधः—जेव्हां एकाच मार्गावरून ध्वनीच्या दोन लहरीमालिका जातात, त्यावेळीं हवेच्या प्रत्येक कणावर त्यांचा एकमेकांस प्रतिबंध होत असल्याकारणानें एकत्रित परिणाम, त्यांस एका लहरीच्या योगानें मिळालेल्या गतीहून निराळीच गति देण्यांत होतो. ह्या हवेंतील कणास सारख्या वेळीं सारखी गति देणाऱ्या दोन ‘ ल ’ लांबीच्या लहरींचा परिणाम एक ‘ ल ’ लांबीची लहर उत्पन्न करण्यांत होतो पण कणाच्या फेऱ्यांत मात्र फरक होतो व तो फरक त्या दोन लहरींच्या फेऱ्यांच्या बेरजेबरोबर असतो. आतां एकाच वेळीं हवेंतील कणांस निरनिराळीं स्थिति देणाऱ्या म्हणजे, उदाहरणार्थ ल लांबीची लहरी दुसऱ्या तितक्याच लांबीच्या लहरीच्या $\frac{ल}{२}$ अंतरानें पुढें असेल तर या ल लांबीच्या दोन लहरींच्या योगानें होणारा परिणाम नवीन ल लांबीच्याच परंतु कमी आवृत्तीच्या लहरी उत्पन्न करण्यांत होतो. तेव्हां एकाच प्रकारच्या दोन लहरी कानावर एकदम आल्यास त्यांतील तारता (पिच) कायम राहते पण उच्चता वाढते, व जर विरुद्ध प्रकारच्या दोन लहरी कानावर आल्या तर त्यांचा कानावर परिणाम फारसा होत नाहीं, व जर त्यांच्यामधील फरक $\frac{ल}{२}$ अंतरानें असेल तर यांचा आवाज मूळ सुरापासून कमी स्वरांत उतरत जातो.

ता ल.—दोन सूर जर एकमेकांशीं मिळते नसतील तर त्यांच्यापासून उत्पन्न होणारा सूर ठरीव वेळीं आलटून पालटून कमीअधिक होत असतो. ह्या ठरीव वेळेस आलटून पालटून कमीअधिक होणाऱ्या आवाजांतील फरकास ताल म्हणतात.

संयुक्त-सूर.—तालयुक्त सुराशीं इतर सूर मिळाल्यास होणाऱ्या एकत्रित सुरास संयुक्त स्वर म्हणतात. हे संयुक्त स्वर तीन प्रकारानें उत्पन्न करतां येतात. पहिला प्रकार म्हणजे एकाच भात्यांतून पुरविल्या जाणाऱ्या वायूच्या योगानें दोन नलिकांतील सूर होय. दुसऱ्या प्रकारचे सूर ग्राहकांतील यंत्ररचनेसारख्या रचनेच्या योगानें काढतां येतात व तिसऱ्या प्रकारचे सूर हे लहरीच्या निरनिराळ्या वेगाच्या योगानें उत्पन्न होतात.

न, अ र्थ.—( १ ) नकारार्थी; ( २ ) त्याच त्याच दोन शब्दांमध्यें त्यांनां एकत्र जोडणारें अव्यय म्हणून

न = ⊥ ८ ८ न

न योजतात;याचेळीं त्याचा अर्थ बरोबर, मागून असा असतो; उदा० पैसा न पैसा, दमडी न दमडी मिळीव; पायरी न पायरी चढत जा; ( ३ ) आणि याअर्थी; उदा० ढाल न तरवार, तो न मी.

अ क्ष र वि का स.—या वर्णाला अंतिम अवस्था प्राप्त होण्यास तीन अवस्था पहाव्या लागल्या. पहिली अशोकाच्या गिरनार लेखांत, दुसरी कुशानवंशी राजाच्या वेळच्या मथुरा येथील लेखांत ( इ. स. १ लें शतक ), व तिसरी अवस्था मेवाडचा गुहिलवंशी राजा जो अपराजित त्याच्या काळच्या कुंडेश्वरलेखांत ( इ. स. ६६१ ) दृष्टीस पडते. शेवटल्या दोन अवस्थांत सुमारें ६ शतकांचा फरक आहे तरी वळणांत फारसा फरक नाहीं म्हटलें तरी चालेल. आजचा न, हैहयवंशी जाजल्लदेवाच्या वेळच्या लेखांत ( इ. स. १११४ ) स्पष्ट ओळखूं येतो. [ प्राचीन लिपिमाला. ]

**नकुर तहशील**.—संयुक्तप्रांत, मिरत विभाग. सहारणपूर जिल्ह्यांतील वायव्येकडील तहशील. उ. अ. २९° ३९' ते ३०°१०' व पू. रे. ७७° ७' ते ७७° ३४'. हींत सुलतानपूर, सरसावा, नकूर व गंगोह हे चार परगणे आहेत. हिच्या पूर्वेस यमुना नदी वहाते. क्षेत्रफळ ४१९ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १७९,७३४. यांत ३९४ खेडीं व ८ शहरें आहेत. पैकीं महत्त्वाचीं अशीं गंगोह, अंबथा व नकूर. हिचा ⅓ भाग यमुनेच्या खोऱ्यांत असून पूर्व भागांत यमुनेच्या कालव्यानें शेतांनां पाणी पुरवितात. तालुक्याचें ठाणें नकूर आहे. लोकसंख्या ५ हजार. निम्मेनिम हिंदु व मुसुलमान आहेत. हें गांव पांडवांतील नकुल यानें वसविलें अशी कथा आहे. १८५७ सालच्या बंडांत या गांवास पुष्कळ त्रास झाला. येथें मंदिरें, शाळा, दवाखाना वगैरे आहेत. व्यापार थोडासा आहे.

**नकुल**.—एक पांडव. हा पंडूच्या माद्री म्हणून धाकट्या स्त्रीच्या पोटीं अश्विनीकुमारापासून झाला. हा रूपानें अतिशय सुंदर होता.नकुलास द्रौपदीपासून शतानीक नांवाचा पुत्र झाला. याची दुसरी बायको शिशुपालाची कन्या. राजसूय यज्ञाच्या वेळीं हा पश्चिम दिशा जिंकण्यास गेला होता. तिकडे दिग्विजय करून यानें दहा हजार उंटभर द्रव्य आणलें. अज्ञातवासांत हा विराटगृहीं ग्रंथिक नांव धारण करून अश्वशाळेचा मुख्य बनला. भारतीय युद्ध समाप्त झाल्यावर पांडवांकडील जे अवशिष्ट सात वीर राहिले त्यांतील हा एक असून पुढें युधिष्ठिराबरोबरच हा ( हिमालयाकडे ) निजधामास गेला. याला अश्वशास्त्राचें ज्ञान व अश्वपरीक्षा चांगली असून शालिहोत्रावर याचा एक ग्रंथ आहे अशी दंतकथा आहे.

**नंके**—ब्रह्मदेश, शानसंस्थानसंघापैकीं पश्चिमेकडील एक संस्थान. यास नमकाई असेंहि दुसरें नांव आहे. क्षेत्रफळ ८६ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११)७८४१. ७१ गावें आहेत.

**नकोदर**.—पंजाब. जालंधर जिल्ह्यांतील पश्चिमेकडील एक तहशील. उ. अ. ३०° ५६' ते ३१° १५' व पू. रे. ७५° ५' ते ७५° ३७'. हिच्या दक्षिणेस सतलज नदी वाहते. क्षेत्रफळ ३६८ चौरस मैल. लोकसंख्या (१९११)१८९८३३. मुख्य शहर नकोदर; याखेरीज ३०९ खेडीं आहेत. पूर्वबेन या तहशिलींतून वहाते. नकोदर हें नांव मोंगलांच्या निकूदरी नांवाच्या सैन्यविभागावरून पडलें. हें तारासिंग व धैवा यांचें मुख्य ठाणें होतें. हें रणजितसिंहानें १८१५ सालीं घेतलें. येथें छावणी होती. येथें नामांकित हुक्के तयार होतात. येथें शाळा व दवाखाना आहे.

**नॅक्सास**—हें ईजिअन समुद्रांत एक बेट आहे. येथें उत्तम द्राक्षाचे मळे होते. बॅक्कसचा येथें फार मोठा उत्सव होत असे. प्राचीन ग्रीक लोकांच्या इतिहासांत येथील शिल्पकलेला फार महत्त्व प्राप्त झालें होतें. हें डेलियन संघाचें घटक होतें. ख्रि. पू. ५०१ च्या सुमारास येथें लिग्डामिस नांवाचा एक राजा राज्य करीत असे. ख्रि. पू. ४९० या वर्षी हें बेट इराणी लोकांनीं जिंकलें. पुढें तें अथेन्सनें जिंकलें. तें अथेन्सचें साम्राज्य लयास जाईपर्यंत अथेन्सच्या ताब्यांत होतें. इ. स. १२०७ मध्यें व्हेनेशिअन मार्कोसॅनुडो यानें तें घेतलें. पुढें तें १५६६ सालीं तुर्कांच्या ताब्यांत गेलें. परंतु स्वातंत्र्याच्या युद्धापासून तें ग्रीक राज्यांत आलें आहे. अजूनहि याची फळफळावळीविषयीं फार ख्याति आहे. येथील लोकसंख्या ( १९०७ ) २५१८५.

**नगर, ता लु का**.—म्हैसूर. शिमोगा जिल्ह्यांतील पश्चिमेकडील तालुका. क्षेत्रफळ ५२८ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ३७६५६. यांत कलूरकत्ते व नगर हीं दोन शहरें व १९६ खेडीं आहेत. हा देश डोंगराळ असून यांतील लहान लहान प्रवाह शरावतीला मिळतात. यांत कोद्रचाद्री नांवाचें ४४११ फूट उंचीचें शिखर आहे. नगर ( पूर्वीचें बेदनूर ) हें अशाच एका टेंकड्यांच्या घेरांत बसलें आहे. मुख्य पिकें—सुपारी, नारळ, मिरीं, वेलदोडे व तांदूळ. येथें उत्तम प्रतीच्या सुपाऱ्या पिकतात.

**गां व**.—म्हैसूर. शिमोगा जिल्ह्यांतील नगर तालुक्याचें ठाणें. लोकसंख्या८००. याचें पूर्वीचें नांव बिदरहल्ळी ( बांबूचें खेडें ). इ. स. १६४० च्या सुमारास केळदी राजांनीं येथें

राजधानी करून बिदरूर उर्फ बिदनूर (वेदनूर) असें याचें नांव ठेवलें. हें पुढें फार भरभराटीस आल्यामुळें याचें नांव नगर (शहर) असें पडलें. १७६३ सालीं हैदरअलीनें हें घेऊन याला हैदरनगर असें नांव दिलें. टिप्पू सुलतानच्या वेळेस या गांवास फार त्रास झाला. १७८३सालीं ब्रिटिशांनीं हें घेतलें. परंतु फिरून त्यांच्या हातून गेलें. नगर हें १८३० सालच्या बंडाचें केंद्रस्थान होतें.

**नगरकर्नूळ**—हैद्राबाद संस्थान महबूबनगर जिल्ह्यांतील आग्नेयीकडील तालुका. क्षेत्रफळ ४२० चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ८८५८६. यांत १३५ खेडीं असून पैकीं १९ जाहगिरी आहेत. १९०५ सालीं कांहीं खेडीं यांतून काढून अमराबाद तालुक्यास जोडिलीं. मुख्य ठिकाण नगर हें आहे. [ इं. गॅ.; हैद्राबाद सेन्सस रिपोर्ट, १९११. ]

**नगरकोट**—पंजाब. कांग्रा जिल्ह्यांतील जुनें शहर. येथें ज्वालामुखी असल्यानें पूर्वीपासून यास पवित्रपणा आला आहे. येथें फार श्रीमंत देवालय होतें तें महंमूद गझनीकर यानें लुटलें (१००५-६). पुढें हिंदु राजांनीं नगरकोटचा किल्ला मुसुलमानांपासून जिंकून घेतला (१०४३). जास्त माहितीकरितां "कांग्रा" (ज्ञानकोश, विभाग १०) पहा.

**नगरखेडें**—पंजाब, कांग्रा जिल्हा. कुलू तालुक्यांतील एक खेडें. हें बियास नदीच्या पश्चिम किनाऱ्यावर वसलें आहे. लोकसंख्या ६००. हें (जुन्या) कुलू राजांची राजधानी होतें. नदीकांठीं त्यांचा एक हजार फूट उंचीचा असा भव्य राजवाडा आहे. १९०५ सालच्या भूकंपामुळें येथें बराच धक्का पोंचला.

**नगरदेवळें**—मुंबई, पूर्वखानदेश. पाचोरें तालुक्यांत कजगांव रेल्वे स्टेशनच्या पूर्वेस ५ मैलांवर एक एक लहानसा गांव असून येथें एक महादेवाचें हेमाडपंती देवालय आहे. येथें पवार आडनांवाचा एक मराठा जहागिरदार आहे. [ खानदेश ग्याझे. ]

**नगरधन**—मध्यप्रांत. रामटेकच्या दक्षिणेस चार मैलांवर हें गांव आहे. लोकसंख्या तीन हजार. नंदिवर्धन या जुन्या नांवाचा नगरवर्धन (नगरधन) हा अपभ्रंश असून वर्धा जिल्ह्यांत देवळी येथें सांपडलेल्या ताम्रपटांत नागपुराबरोबर याचा उल्लेख केला आहे. ताम्रपट इ. स. ९४० सालचा आहे. नंद नांवाच्या सूर्यवंशीय राजानें हा गांव वसविला अशी स्थानिक आख्यायिका आहे. परंतु शैल राज्याच्या नंदिवर्धन नांवाच्या राजानें हा गांव वसविला असावा असें हिरालाल म्हणतो. या राजाचा उल्लेख राघोली ताम्रपटांत आलेला आहे. येथें एक हेमाडपंती कोटेश्वर महादेवाचें देवालय आहे.

शंखतीर्थ अथवा शुक्र नांवाचा एक तलाव या देवळाजवळ आहे. रामटेक येथील रामाच्या देवळांतील शिलालेखांतील हंसतीर्थ हेंच असावें. येथें एक किल्ला असून तो भोंसल्यांच्या वेळचा आहे असें म्हणतात. नवळच 'जुना किल्ला' म्हणून दुसरी एक जागा आहे. माळव्यांतील आपलें मूळचें स्थान जें धारा तें सोडून पोंवार रजपूत जे इकडे आले, ते नगरधन येथें आले असें म्हणतात. येथें जांग्रा लोधींची वस्ती असून ते पूर्वी शिपाई असावेत. येथील मालगुजार रजपूत आहे. [ नागपूर ग्याझे., ए. ]

**नगरपारकर**—मुंबई इलाखा. सिंध, थर व पारकर जिल्ह्यांतील तालुका. कच्छच्या रणाच्या सीमेवर हा आहे. क्षे. फ १६१८ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ४७५४८. यांत ३१ खेडीं असून नगरपारकर हें मुख्य ठाणें. त्याची लोकसंख्या २॥ हजार. येथें कापड विणतात व रंगवितात. लोंकर, धान्य, नारळ, कांतडी वस्तू, धातूंची उपकरणें यांचा व्यापार चालतो. येथून गहूं निर्गत होतो उंट वगैरे जनावरेंहि विकत मिळतात. गांव बरेंच जुनें आहे. एका मैलावर शरधारा तीर्थ आहे. दोन कोसांवर कांहीं पडकीं जैनमंदिरें आहेत. येथें दवाखाना व शाळा आहेत. दुष्काळाचें बरेंच भय असतें.

**नगरम्बेट**—मद्रास, गोदावरी जिल्ह्यांतील एक बेट. उ. अ. १६° २०' ते १६° ३५' व पू. रे. ८१°४४' ते ८१°५७' या दरम्यान आहे. हें वसिष्ठ नांवाच्या गोदावरीच्या मुखाजवळ असून, बंगालचा उपसागरहि नजिकच आहे. येथें पाण्याचा प्रवाह खोदून काढला आहे. त्यापासून ३३००० एकर जमिनीला पाणी पुरतें. येथें मुख्यत्वें नारळ व केळीं होतात.

**नगररचनाशास्त्र**—ह्या शास्त्रास प्राचीन भारतीय संज्ञा "नगरनिर्माण कला" किंवा "नगरादिक वास्तुशास्त्र" ही आहे. ह्यासंबंधीं विवेचन पुराणग्रंथांतून अनेक ठिकाणीं आलें आहे. ह्याच शास्त्राचें विवेचन भोजराजकृत युक्तिकल्पतरु ग्रंथांत सविस्तर आलें आहे. त्याचा गोषवारा असाः—

प्रथम नगराचा आकार कोणता असावा ह्याविषयीं विवेचन आहे. नगर दीर्घ, त्र्यस्त, चतुरस्त, बहुलंब किंवा वर्तुल आकृतीचें असतें. ह्यापैकीं दीर्घ आकृतीचें नगर दीर्घकाल सुख व संपत्ति देतें, व चतुरस्त नगर पृथ्वीपतीस चतुरवर्गफलाची प्राप्ति करून देतें. त्र्यस्त नगर राज्याच्या तिन्हीं शक्तींचा नाश करणारें व वर्तुळ आकाराचें नगर अनेक प्रकारचे रोग उत्पन्न करणारें असतें.

राजधानीचें प्रमाण राजक्षेत्राइतकें म्हणजे सरासरीनें १ कोटी चौरसचौरस (राज) हाताइतकें असावें. अर्थात त्यामानानें इतर गांवें लहान लहान असावींत. नगराची रचना करतांना मध्यभागीं विस्तीर्ण जागा राखावी व मधोमध चतुष्पथ (चौपाटी) असावेत. त्याचप्रमाणें पाणपोई, लतामंडप, उद्यानें, बागा इत्यादींनीं नगरास शोभा आणावी. ईशान्य व पूर्व दिशेस नगरप्रांत उतरता असून मध्यभागीं उंच असावा. सरोवरें, बाजार वगैरे असावेत. नगराभोंवतीं जंगी तट असून त्याला अनेक तऱ्हेचे बुरुज व गोपुरें असावींत व त्यावर नेहमीं शूर सैनिकांचा पाहरा असावा. राजमंत्र्यांचे वाडे नेहमीं राजवाड्याजवळ असावेत, व इतर अम्मलदार

अपापल्या कामावर दूर असावेत, कारण सर्व राजाचे मंत्री व इतर मोठमोठे अम्मलदार जवळ असले म्हणजे कार्यांचा नाश होतो, त्याचप्रमाणें मंत्री दूर असले तरी देखील कामें जलद होत नाहींत. हत्तींची वस्ती नगराच्या मध्यभागीं नसावी व अश्वांची प्रांतभागीं नसावी. आपली स्वतःची राज्यलक्ष्मी वाढविण्याची इच्छा असलेल्या राजानें, हीन, जास्त वाढलेल्या अवयवांचे किंवा कमी अवयवांचे, महाव्याधिग्रस्त व देशांतराहून आलेले लोक नगरांत न ठेवितां दूर वनांत जागा द्यावी, तसेंच अध्ययनशाळा दूर वनांत असाव्या कारण अशा ठिकाणीं शत्रूचे गुप्त हेर राहतात.

अग्निपुराणांत नगरादिक वास्तूबद्दल पुढीलप्रमाणें विवेचन आलें आहेः—नगरस्थापनेकरितां एक योजन, योजनार्ध इतक्या लांबीचा प्रदेश घेऊन त्या ठिकाणीं नगररचना करावी. भोंवताली जंगी तट बांधून निरनिराळ्या दिशेस तटास मोठाले दरवाजे ठेवावेत; त्यांपैकीं महाद्वरवाजा पूर्वेस अगर उत्तरेस बांधावा. नगरांतील मार्गांतून हत्तींनां सहज रीतीनें जातां येईल इतके ते मार्ग रुंद असावेत. बाजाराची जागाहि विस्तृत असावी. छिन्नवर्ण, विभिन्न व अर्धचंद्राकृति नगर अशुभ होय. नगरामध्यें आग्नेयी बाजूस सोनार वगैरे धंदेवाईक लोकांस रहावून घ्यावें. दक्षिण दिशेस नाचकाम, वेश्यांचा धंदा करणाऱ्या स्त्रियांची वस्ती असावी. त्याचप्रमाणें चक्रिकादिक, नट कोळी, वगैरे लोक नैर्ऋत्य दिशेस असावे. रथ, आयुधें इत्यादिकांचीं ठिकाणें पश्चिम दिशेस असावीत. उत्तरेस ब्राह्मण, यति संन्यासी व ईशान्येस फळवाले, भाजीवाले, बागवान, वाणी उदमी रहावेत. पूर्वेकडे सेनापति, आग्नेयी दिशेस चतुरंगबल,पश्चिमेस महामात्य, कोषाध्यक्ष, शिल्पकार, दक्षिणेस न्यायाधीश वगैरेंच्या कचेऱ्या असाव्यात. वस्तुतः वैद्य, अश्व व सैन्य ह्यांची सर्व बाजूंनीं वस्ती असावी. निरनिराळ्या देवतांचीं देवालयें पूर्वाभिमुख असून नगराच्या पश्चिम बाजूस असावींत. राजनगरांतील गृहें चतुःशाल (चौसोपीं), त्रिशाल, द्विशाल किंवा एकशालहि असावींत व त्यांच्यापुढें शोभेकरितां गच्ची वगैरे बांधलेली असावी. राजवाड्यांत पूर्व बाजूस सिंहासनगृह, आग्नेयीस पाकगृह, दक्षिणेस शयनमंदिर, नैर्ऋत्येस शस्त्रागार, पश्चिमेस भोजनगृह व वायव्येस धान्याचीं कोठारें असावींत.

ज्या समाजाकरितां नगररचना करावयाची त्याच्या विविधतेप्रमाणेंच नगररचनेंतील प्रश्न विविध आहेत. व्यापार, उद्योगधंदे, राज्यकारभार आणि लोकांचीं घरेंदारें या सर्वांशीं यांचा संबंध येत असल्याकारणानें त्यांचें मोठ्या प्रमाणावर वर्गीकरण करावें लागतें. रस्ते, लोकांची व मालांची वाहतूक, कारखान्यांकरितां जागा व त्यांची उभारणी, अन्नाचा पुरवठा आणि बाजार, पाणीपुरवठा आणि आरोग्य, घरें, करमणुकीच्या जागा, नगरोपांत रस्ते (बूलेवर) आणि रस्त्यावरचीं झाडें, वास्तुशिल्प, कायदे आणि पैशाचा व्यवहार या सर्वांचा अभ्यास वरील प्रश्न सोडविण्यासाठीं करावा लागतो. नगररचनेंतील अति महत्त्वाचे भाग म्हणजे औद्योगिक स्थानांची पद्धाणी, रस्ते मोठाले व रुंद करणें, गटारें, पाणी आणि दिवाबत्तीची व्यवस्था, घरें, आरोग्यसुधारणा, शिक्षण, करमणूक व सामाजिक उन्नति हे होत. बर्लिन, पॅरिस, लंडन, न्यूयार्क, शिकागो यांसारख्या शहरांतील भव्य सार्वजनिक इमारती, सुंदर बागा आणि मोठाले रस्ते या नगररचनाशास्त्रांतील महत्त्वाच्या समजल्या जाणाऱ्या गोष्टी कालच्या शिळ्या म्हणतां येतील. इंग्लंडमधील घरांची व उपवननगरांची योजना, म्युनिसिपालिटीच्या संसारांतील प्रत्येक भागाची जर्मनींत होत असलेली शास्त्रीय प्रगति, बंदरें आणि गोद्या यांची अवाढव्य सुधारणा, रस्ताबांधणी आणि वाहतुकीचीं साधनें यांमध्यें झालेली आश्चर्यकारक वाढ आणि लहान मोठ्या शहरांतून रहाणाऱ्या लोकांच्या सामाजिक हिताची वाढ करण्याकडे जगभर चाललेली चळवळ हीं नगररचनेचीं आजचीं कामें होत. यावरून नगररचनाशास्त्रांत कसा रोज बदल होत आहे हें कळून येईल.

यूरोप आणि अमेरिका खंडांत आज अनेक मोठाल्या शहरांतून म्युनिसिपालिटीची आणि सर्वसामान्य अशी प्रगति होण्याकरितां मोठमोठाल्या योजना केलेल्या असतात. बर्लिन आणि लिव्हरपूल या ठिकाणीं नगररचनेचें शिक्षण देणाऱ्या शाळा आहेत. स्ट्यूबबेन, फिश्वर, गुर्लेट, हेनरीकी आणि बॉमिस्टर हे जर्मन नगररचनाशास्त्रपंडित शहरोंशहरीं फिरून लोकांनां नगररचना कशी असावी हें शिकवीत आहेत. इंग्लंडमध्यें हेन्रीविव्हीयन, रेमंडअनविन, जे. एस. नेटलफोल्ड, टी. एच. मॉसन, आर. आय. ट्रिक्स, पी. गेडीज आणि थॉमस ॲडॅम्स हीं माणसें घरांची स्थिति सुधारण्यासाठीं उपवननगरांची स्थापना व्हावी आणि नगररचनेची चळवळ फैलावावी यासाठीं प्रयत्न करीत आहेत. अमेरिकेंत यांसारखे प्रयत्न करणारे लोक म्हणजे जॉन नोलेन, चार्लस एम्. रॉबिन्सन, जॉन. एम्. कॅरीरे, जॉर्ज. बी. फोर्ड इत्यादि होत. यावरून शहराची किंवा समाजाची रचना करण्याची चळवळ हा कांहीं तरी अप्रस्तुत विषय नसून म्युनिसिपालिटींच्या कारभारांतील एक अत्यंत महत्त्वाचा भाग आहे. मात्र याची आंखणी मोठ्या शहाणपणानें झाली पाहिजे.

सामाजिक व्यवहाराला साधारण शहाणपण व व्यापारी पद्धत लावणें याचेंच नांव नगररचना होय. शहराच्या कारभारांतील वाईट गोष्टींपासून होणारें अनहित टाळणें आपलें कर्तव्य आहे. रोग झाल्यावर बरा करण्यापेक्षां आधींच त्याचें निवारण करणें कमी खर्चाचें व फायद्याचें असल्यानें अगोदरच आपण नगररचनेसारख्या गोष्टी हातीं घ्याव्या हें हितावह आहे. या कामीं पैसा खर्च होईल त्याचा मोबदला लोकांच्या वाढत्या सुखानें आणि उत्कर्षानें भरून येईल. प्रत्येक व्यक्तीला कमी खर्च, सोई, आरोग्य आणि पैसा मिळावण्याचीं चांगलीं साधनें हे फायदे मिळतील आणि सबंध शहराचा

फायदा म्हणजे त्याच्या उद्योगधंद्याची वाढ, सर्व खात्यांत सुधारणा आणि एकंदर समाजाच्या भावी उन्नतीची ग्वाही. धनिकांनां शहरसुधराईबरोबर त्यांच्या इस्टेटीची आपोआप किंमत वाढल्यानें चांगलाच फायदा मिळतो. नगररचनेनें नवीन साधनें उत्पन्न केल्याकारणानें शहरांतील उद्योगधंद्यांनां एकसारखी तेजी येत जाणार म्हणून व्यापाऱ्यांनां आपलें भांडवल या ठिकाणीं गुंतविण्यास हरकत वाटणार नाहीं; कारण त्यांचा यांत फायदाच असतो.

एखाद्या समाजाची आपल्याला फायदेशीर अशी शहर-सुधारणा व्हावी अशी जेव्हां इच्छा असेल तेव्हांच हा प्रश्न हातीं घ्यावा असें नाहीं,तर याप्रकारचें लोकांवर बंधन असलें पाहिजे. दुःस्थितीकडे कानाडोळा करणाऱ्या आळशी शहराला कायद्यानें जागें करून हा प्रश्न हातीं घ्यावयास लावला पाहिजे. जर एखादें शहर कमी सुधारलेलें असून त्यानें आपल्या पुढील वाढीचो आंखणी केलेली नसेल तर सरकारी कायद्यानें त्याला शहरपहाणी करून नगरसंवर्धनाचे नियम करण्यास भाग पाडलें पाहिजे. यामुळें भावी आपत्ति टळून एखाद्या सुशिक्षित व कर्त्या अशा भावी पिढीला नगररचना करावी असें वाटल्यास तिच्या मार्गांत अडथळे तरी मागल्या पिढ्यांनीं उत्पन्न केलेले नसावेत.

**नगररचना पार कशी पाडावी.**—नगररचनेची व्यवस्था ज्यांच्या हातांत आहे त्यांनीं शहराची वाढ होईल अशा तऱ्हेची मोठी योजना करण्यास आणि न सुधारलेल्या मालमत्तेवर आपला चांगला ताबा रहाण्यास प्रथम पैसा मिळविण्याचें धोरण ठेविलें पाहिजे. अशा योजनेंत शहराची आहे ती स्थिति सुधारण्याचे अनेक उपाय करावे लागतील यांत शंका नाहीं. रस्ते व सार्वजनिक चौक नीट राखणें, बागा आणि खेळण्याच्या जागा तयार करणें. लोकांचीं घरें सुव्यवस्थित असलेलीं पाहणें व सार्वजनिक केंद्रस्थानें उत्पन्न करणें या गोष्टी नजरेपुढें ठेवून प्रत्येक कृत्य झालें पाहिजे. पण शहराला खर्चाची ऐपत येईल तेव्हांच या कामीं प्रत्यक्ष हात घालावा. जर एखाद्या शहराचा नगररचना करण्याचा हेतु असून योजना तयार नसेल तर ती योजना एकदम अंमलांत आणण्याची घाई न करणें बरें. पण ती सबंध योजना अंमलांत आणण्याच्या कामीं आलेली एकहि संधि दवडूं नये. नवीन सुधारणेचा तक्ता हातीं असतांना हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, मागील चुका दुरुस्त करण्यांत, रस्ते सुधारण्यांत आणि भावी गरजांसाठीं जमीन खरेदी करण्यांत खर्चलेला पैसा गैरवाजवी नव्हे; तर तो कोणत्या ना कोणत्या तरी रूपांत सवंधच्या सवंध परत मिळेल. नगर रचनेपासून होणारा फायदा तात्कालिक नाहीं, तथापि राष्ट्राच्या भावी उन्नतीचें बीज त्यांत सांठविलेलें असतें.

एखादा बेत पार पाडण्यासाठीं किंवा मालमत्ता हस्तगत करण्यासाठीं जो जादा खर्च लागतो तो भागविण्यास अगदीं सामान्य उपाय म्हणजे उसनवारी. आपला व्याप वाढविण्यासाठीं कर्ज काढण्यास कोणतीहि मोठी म्युनिसिपालिटी मागेंपुढें पहाणार नाहीं. म्युनिसिपालिटीच्या व्यवस्थेसाठीं आपल्याला आदर्शभूत असणारीं यूरोपांतील मोठमोठीं शहरेंहि सार्वजनिक फायद्याकरितां कर्जांत बुडालेलीं असतात. बंदरें, गोद्या, बागा, नाटकगृहें, मजुरांचीं घरें वगैरेंच्या वाढीसाठीं लाखो रुपये त्यांनां उसनवार वाढावे लागतात. न्यूयार्क शहराचें कर्ज अमेरिकेच्या राष्ट्रीय कर्जापेक्षां अधिक आहे. यावरून वरील विधानाची सत्यता पटेल. पण प्रत्येक व्यक्तीनें काय किंवा शहरानें काय हा विचार केला पाहिजे कीं, कर्जाची मुदत संपल्यावर तें फेडण्याची आपल्या अंगीं पुढें पात्रता येईल किंवा नाहीं. औद्योगिक किंवा सामान्य वाढ हींहि पात्रतेचा विचार करतांना लक्षांत घेतली पाहिजे. शहरानें कोणकोणत्या कामाकरितां किती मुदतीचें कर्ज काढावें याबद्दल जे घटनेंत नियम असतात त्यांकडे पाहून चाललें पाहिजे. हा कर्ज काढण्याचा एक मार्ग झाला. यानंतर पैसा मिळविण्याचा दुसरा मार्ग म्हणजे ज्यांच्या जमीनजुमल्यांनां नगररचनेच्या योजनेपासून विशिष्ट रीतीनें फायदा झाला असेल त्यांच्यावर कर बसविणें. त्यांच्यावर जास्त कर लादण्यानें अन्याय होत नाहीं. कारण स्थानिक सरकारनें केलेल्या सुधारणेमुळें त्यांच्या जमीनजुमल्याची किंमत आपोआप वाढलेली असते

**प्राथमिक कार्य.**—एकदां नगररचनेची योजना तयार झाल्यावर पहिलें काम म्हणजे मोठाले रस्ते, बागा, क्रीडांगणें, सार्वजनिक इमारती, शाळा आणि इतर लोकांच्या जरूरीच्या गोष्टी या सर्वांची भावी वाढ होण्याकरितां पुरेशी जमीन घेण्याची कांहीं तजवीज करून ठेवली पाहिजे. याच्याशिवाय वाढत्या शहराला पुढें जरूर लागल्यास खासगी जमीनजुमलेंहि हस्तगत करण्याचा अधिकार मिळाला पाहिजे. याकरितां आधीं एक बोर्ड स्थापून त्याला जरूर ते अधिकार दिले पाहिजेत. बोर्डानें शहरच्या गरजा नीट ध्यानांत घेऊन व तत्कालीन परिस्थितीची जाणीव ठेवून त्या दृष्टीनें व्यवस्था करण्यास सुरुवात करावी. शहरच्या लोकांनां नगररचनेपासून होणाऱ्या फायद्याची जाणीव करून द्यावी. जमीनजुमलेवाल्यांमध्यें आपल्या जमिनी कोणकोणत्या अटीवर द्याव्या याचा खल करून एखादी निश्चित योजना तयार करण्यासाठीं चळवळ सुरू केली पाहिजे. शहराची प्रगति, त्यांतून जाणाऱ्या आगगाड्यांनांहि फायदेशीर असल्यामुळें त्यांच्याकडूनहि नगररचनेच्या योजनेला पाठिंबा मिळवावा. आगगाडीच्या स्टेशनाभोंवतालची स्थिति सुधारण्याची हमीहि शहराधिकाऱ्यांनीं त्यांनां द्यावी. अशा रीतीनें सर्व तऱ्हेच्या लोकांत नगररचनेविषयीं सहानुभूति उत्पन्न करणें अधिकाऱ्यांचें काम आहे.

**लहान मोठे रस्ते आणि इतर व्यावहारिक प्रश्न.**—समाजाची प्रगति करतांना पुढें येणारे व्यावहारिक

प्रश्न मोठ्या महत्त्वाचे व गुंतागुंतीचे असतात. सामान्यतः नगररचनेंत पुढील गोष्टींकडे लक्ष द्यावें लागतें.

द ळ ण व ळ ण, ( अ ) रस्तेः—( १ ) मोठाले रस्ते लहान रस्ते आणि बागेचे रस्ते यांसंबंधीं स्थलनिश्चय. ( २ ) रस्तारुंदी, यांच्यांत फरसबंदीच्या पायवाटा, बाजूच्या वाटा आणि बागा येतात. ( ३ ) गाडीवाटा. ( ४ ) उपयुक्त गोष्टी ( नळ, तारा, नहर इत्यादि ). ( ५ ) अंगभूत गोष्टी (झाडें, दिवे, खुणेच्या पाट्या, दगड, पूल, पुतळे इत्यादि).

( आ. ) आगगाडीचे रस्तेः—( १ ) वाटा व रस्त्यांचे हक्क. ( २ ) वळणें.

( इ ) पाणरस्तेः—( १ ) ड्रेनेज ( २ ) व्यापारी सोई.

सा र्व ज नि क मा ल म त्ता, ( अ )कारभारः—( १ ) सामान्य ( पोस्ट ऑफिस, कोर्ट, नगरभवन, मोकळ्या जागा, दुकानें इ. ). ( २ ) पोलीसचौक्या व आग विझविण्याचीं स्टेशनें. ( ३ ) पाण्याकरितां केलेल्या योजना. ( ४ ) गटारांच्या योजना. ( ५ ) बाजार.

( आ ) शिक्षणः—( १ ) शाळा ( २ ) वाचनालयें, पदार्थसंग्रहालयें व अजबखाने.

( इ ) करमणूकः—( १ ) क्रीडांगणें. ( २ ) करमणुकीच्या जागा, स्नानगृहें इत्यादि. ( ३ ) चौक व स्थानिक बागा. ( ४ ) मोठाल्या बागा. ( ५ ) बागांचे रस्ते व नगरोपांत रस्ते (६) राखीव जंगलें. (७) इतर उघड्या जागा.

खा स गी मा ल म त्ता, ( अ ) उपयोगाचीं क्षेत्रेंः—( १ ) अर्धवट सार्वजनिक ( उपहारगृहें, देवळें, स्मशानें, संस्था, क्लबच्या जागा इत्यादि ).( २ ) औद्योगिक ( ३ ) व्यापारी.( ४ ) रहाण्यालायक स्वतंत्र व सामायिक घरें,चाळी वगैरे. ( ५ ) सुखवस्तूंचीं रहाण्यालायक–एकदोन कुटुंबांचीं घरें.

( आ )आगी विझविण्याच्या सोईकरितां पाडलेले विभाग.

( इ ) इमारतींच्या उंचीवरून पाडलेले विभाग.

( ई ) इमारत रेषा आणि इतर जागेवरील (मार्ग वगैरे) संबंधीं हक्क आणि बंधनें.

र स्ते.—लहानमोठ्या रस्त्यांचा प्रश्न प्रथम महत्त्वाचा आहे. कारण नगरजीवनाच्या त्या नाड्या म्हणतां येतील. रस्ते नीट नसले म्हणजे घरांची स्थितीहि नीट असणारच. '.निकृष्ट रस्ते, निकृष्ट लोक उत्पन्न करतात ' असें एका ब्रिटिश मजूर पुढाऱ्यानें जें विधान केलें होतें तें सर्वस्वी खरें आहे. रस्त्यांमध्यें जे तारेचे खांब, दिवे वगैरे उभारावे लागतात त्यामुळें रस्त्याचें सौंदर्य नष्ट होणार नाहीं या गोष्टीकडे लक्ष दिलें पाहिजे. कारण याकडे दुर्लक्ष झाल्यानें अनेक मोठाल्या इतर दृष्टींनीं सुंदर अशा रस्त्यांची खराबी झालेली आहे. तसेंच रस्त्यांतून लावावयाच्या झाडांचीहि योग्य निवड झाली पाहिजे. शहरांतील पुष्कळसे रस्ते त्यांत रहाणाऱ्या लोकांच्याच केवळ उपयोगाकरितां असल्यानें व्यापारी दळणवळणाकरितां योग्य अशी रस्त्यांची सरळ आंखणी करणें चुकीचें होईल. कारण रस्ते थेट व अगदीं सरळ करण्याला बराच खर्च येऊन अशा रस्त्यानें जाणें लोकांना कंटाळवाणें होतें. बहुतेक यूरोपियन शहरांनीं ही चुकी मागेंच दुरुस्त करून रस्त्यांनां सुंदर वळणें दिलीं आहेत.

रस्ते तयार करण्याचा पुढील प्रश्न म्हणजे ते स्वच्छ ठेवण्याचा होय. या कामीं वैयक्तिक सहकारितेची आणि संघांची आवश्यकता असते. बायकांची मदत याला मिळाल्यास अति उत्तम होईल. बायकांनीं हा स्वच्छतेचा प्रश्न हातीं घेतल्यास पुरुषांनां त्यांतून बाहेर पडून मोठमोठ्या गुंतागुंतीच्या प्रश्नांत हात घालतां येईल. स्थानिक स्मशानभूमींची चांगली व्यवस्था ठेवल्यास शहराला एक प्रकारची शोभा येते.

करमणुकीचीं साधनेंः—सार्वजनिक बागा या केवळ सौंदर्याकरितांच असतात असें नसून आरोग्याकरितां त्यांचा फार उपयोग असतो ही गोष्ट सुशिक्षित वर्गास पटवून देण्याची आज गरज राहिलेली नाहीं.क्रीडांगणें व बागा लांब मुदतीच्या भाडेपट्यानें खरेदी करण्याचा विचार करावा अशी पद्धत आपल्याकडील कांहीं शहरांतून आहे. शहरांतील लोकांकरितां करमणुकीचीं साधनें तयार करणें व लोकांनीं त्यांचा फावल्यावेळीं उपयोग करणें या गोष्टी पुष्कळ अमेरिकन शहरांतून दृष्टीस पडतात. उघड्या हवेंत राहून करमणूक करून घेणें हें लहान मुलांचेंच काम नसून मोठ्या माणसांनाहि त्याची आवश्यकता आहे. ज्यांत लहानमोठे सर्व भाग घेतील असे कांहीं खेळ वर्षांतून कांहीं वेळां म्युनिसिपालिटीनें करविले पाहिजेत. घराभोंवताली बागा करण्याला उत्तेजन देऊन लोकांनां करमणुकीचें साधन उत्पन्न करतां येतें. बालवीरचळवळ ही सध्याची चांगली करमणुकीची योजना असून शहरअधिकाऱ्यांनीं तिच्यांत प्रगति करावी. तसेंच मोठ्या लोकांकरितां क्लब, पोहोण्याचे तलाव, आखाडे, क्रीडांगणें तयार करवावींत. नगररचनेंत सार्वजनिक करमणुकीचा प्रश्न कमी महत्त्वाचा नाहीं. हा नीटपणें सोडविल्यास शिक्षण व आरोग्य यांची लोकांनां जोड करून दिल्यासारखी होईल.

शहरांतच राहणाऱ्या लोकांनीं तयार केलेले जिन्नस एकत्र करून त्यांचें प्रदर्शन केल्यानें स्वाभिमान वाढून निद्रितावस्थेंत असलेल्या लोकांच्या बुद्धीला चालन दिल्यासारखें होतें. शहरांत म्युनिसिपालिटीच्या खर्चानें गायनाचे जलसे झाले पाहिजेत व म्युनिसिपालिटीचें स्वतःचें नाटकगृह आणि सिनेमागृह असून लोकांनां त्यांचा मुबलक फायदा मिळाला पाहिजे. अशा तऱ्हेची बौद्धिक करमणूक किती उपयुक्त आहे याविषयीं फार लिहिणें नकोच.

शहरवासीयांकरितां एखादें अरण्य राखून ठेवावें. उद्योगधंद्याच्या दृष्टीनेंहि हें महत्त्वाचें आहे.यासाठीं म्युनिसिपालट्यांनीं बरीच मोठी कक्षा आपल्या ताब्यांत घेणें अवश्य आहे. लोकांनां शिकार करण्याची व पशुपक्ष्यांचा अभ्यास करण्याची

चांगली सोय होईल व पाणीपुरवठ्यालाहि मदत होईल.

घरें:—शहरांतील कोंदट व जवळ जवळ असलेलीं घरें कशीं नाहींशीं करावींत हा एक मोठा कठिण प्रश्न असला तरी तो सोडविलाच पाहिजे. नाहींतर देशाच्या भावी कल्याणाला धोका पोहोंचणार आहे. विशेषतः औद्योगिक नगरांतून यासाठीं जोराची चळवळ झाली पाहिजे. घरें बांधण्याकरितां कर्ज देणाऱ्या संस्था व सहकारी पतपेढ्या यांनीं गरीब लोकांनां सुस्थिति आणून दिली आहे असें निःसंशय आढळून येतें. उपवननगरांची योजना हितावह ठरलेली आहेच. अनेक यूरोपियन देशांतून घरें बांधण्याच्या योजनेला सरकार व स्थानिक संस्था चांगली मदत करते. ही मदत कोणत्या अटीवर द्यावयाची त्याबद्दल निरनिराळ्या देशांत निरनिराळे नियम असतात. पण सर्वसाधारण योजना खालील तीन वर्गांत मांडलेली आढळेल.

(१) प्रत्यक्ष भाड्याकरितां किंवा विकण्याकरितां इमारती बांधणें. (अ) सरकारी नोकरांकरितां. (आ) सामान्य नोकरांकरितां.

(२) सार्वजनिक (सरकारी) फंडांतून खालील संस्थांनां कर्ज देणें. (अ) स्थानिक अधिकारी किंवा संस्था, (आ) व्यापारी नसलेल्या इमारती संस्था, (इ) नोकर ठेवणारे लोक, (ई) व्यक्ती.

(३) इमारतीसंस्थांनां किंवा इतरांनां कर किंवा इतर तऱ्हेनें सूट किंवा सवलती देणें.

इंग्लंडमध्यें व्यापारी कामगारांनां चांगलीं घरें करून देण्याच्या चळवळीचें रूपांतर उपवननगरांच्या कल्पनेंत झालें. शेतकी, व्यापार व वसाहत या कामीं स्वयंपूर्ण असून घराभोंवती बाग करून देण्यापुरती जमीन असलेलें नगर तें उपवननगर म्हणतां येईल. नगर आणि खेडें या दोहोंतील फायदे उपवननगरांत असतात. दाट वस्तीच्या शहरांत येऊन मोठ्या हालांत राहणाऱ्या ग्रामवासीयांचा खेड्यांतून शहरांत चाललेला ओघ थांबवून त्यांच्यांत स्थानिक भावना उत्पन्न करणें हें आणखी एक उपवननगराचें ध्येय असतें. उपवननगरांच्या योजनेंत सहकारी तत्त्व गोंविलें असल्यानें त्यांत उपयुक्ततेची भर पडली आहे. घरें बांधून देणाऱ्या सहकारी संस्था उपवननगरांना जोडलेल्या असतात.

सार्वजनिक आरोग्यः—सार्वजनिक आरोग्य हें समाजरचना, त्याची प्रगति व कारभार यांवर बरेंचसें अवलंबून असतें. आधुनिक काळीं या प्रश्नाकडे लोक निराळ्या दृष्टीनें पाहूं लागले आहेत. स्वच्छ पाण्याचा पुरवठा, गटारांचा समाधानकारक निकाल, रस्ते व कारखाने यांतील घाण नाहींशी करण्याची व्यवस्था, चांगलीं घरें, कारखाने, शाळा व घरें यांची स्वच्छता, सांसर्गिक रोगांचा प्रतिकार, रोग्यांची सुश्रूषा, बालसंगोपन, जीवजंतूपासून होणारा त्रास वांचविणें, निर्भेळ दूध, शुद्ध अन्न व शाळांतील आरोग्य यांचें महत्त्व पटविणें, करमणुकीपासून होणारे हितावह परिणाम दृष्टोत्पत्तीस आणणें, इत्यादि प्रश्न सार्वजनिक आरोग्यांत येतात. यांतील प्रत्येक प्रश्नांवर स्वतंत्र अभ्यास झालेला आहे.

व्यापार व उद्योगधंदे:—शहरांतील उद्योगधंदे व व्यापार यांकडे प्रथम लक्ष देणें अति महत्त्वाचें आहे. कारण शहराचा एकंदर खर्च त्याच्या व्यापारवृद्धीवर अवलंबून असतो. वास्तविक शहराचे (१) व्यापारी, (२) उद्योगधंद्यांचा व (३) राहण्याचा असे तीन भाग पाडिले पाहिजेत. नाहींतर यांच्या सरमिसळीनें एकमेकांवर अनिष्ट परिणाम होऊन शहराची आर्थिक स्थिति खालावेल. नगररचना पुढील अनुक्रमानें झाली पाहिजे. (१) उद्योगधंदे व बाह्य दळणवळण, (२) आरोग्यकारक राहणी आणि घरांची स्थिति, (३) नगरांतील दळणवळण, (४) बाजार आणि अन्नाचा पुरवठा, (५) शिक्षण, (६) करमणूक, (७) क्रीडांगणें व क्रीडासंस्था (नागरिकांचे अड्डे) व स्मारक इमारती. येणेंप्रमाणें नगररचनेचें स्थूल स्वरूप वर्णन केलें आहे. या प्रश्नाकडे जनतेचें लक्ष जितकें लवकर ओढलें जाईल तितकें चांगलें. या विषयाचे अभ्यासकहि तयार झाले पाहिजेत. त्यांनीं स्थानिक परिस्थिति लक्षांत घेऊन नगररचना आंखली पाहिजे.

अलीकडे शहरांतील लोकवस्तीची झपाट्यानें वाढ होऊं लागल्यामुळें व शहरांत फार दाटी होऊं लागल्यामुळें शहरांची वाढ होऊं लागली आहे व हिंदुस्थानांतील सरकारास व लोकांस शहरांची वाढ व्हावयाची ती शास्त्रीय पद्धतीवर व्हावी असें वाटूं लागलें आहे व त्याकरितां नगररचनाशास्त्राकडे लोकांचें लक्ष दिवसेंदिवस अधिक वेधूं लागलें आहे. मुंबईसारख्या मोठमोठ्या शहरांत शहरसुधराईमंडळें (इंप्रूव्हमेंट ट्रस्ट) स्थापन होत आहेत. या शहरसुधराईमंडळांचें मुख्य काम शहरांतील दाटी मोडून शहरांतील दळणवळण व हवा, उजेड वगैरेंचा शहरास योग्य पुरवठा व्हावा या दृष्टीनें सोईस्कर असे शहराच्या मध्यभागीं मोठमोठे रस्ते तयार करणें, शहराबाहेरील भाग, रस्ते वगैरे दळणवळणाचीं साधनें तयार करून देऊन वस्तीला योग्य असे करणें, शहरांतील लोकांस शहराबाहेर घरें बांधून राहण्यास उत्तेजन देणें व अशा अनेक रीतींनीं शहरांचें आरोग्य सुधारून व त्यांचा व्यापार वगैरे वाढून त्यांची भरभराट व्हावी याकरितां लोकोपयुक्त कामें करणें हें असतें. शहरसुधराईमंडळापुढें मुख्यतः दोन प्रश्न असतात; एक शहरांतील दाटी मोडून शहर स्वच्छ ठेवण्यास सोईस्कर असे रस्ते व मोकळ्या जागा ठेवणें व वाढत्या वस्तीस योग्य वळण लावून नवी वस्ती आरोग्यकारक व पद्धतशीर होईल अशी योजना करणें. जुन्या वस्तींतील दाटी मोडतांना ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं जुन्या घरांतून जी दाट वस्ती असते तीं घरें पाडल्यावर त्यांत राहणाऱ्या लोकांस पुरेशी जागा शहरामध्यें अस्तित्वांत असलेल्या घरांत आहे काय? तसें नसेल तर राहिलेल्या

घरांत अधिक दाटी होईल याकरितां प्रथम शहराच्या वाढीस वाव दिला पाहिजे म्हणजे शहरालगतच्या मोकळ्या व घरें बांधण्यास सोईस्कर अशा जागा पाडून त्यांत रस्ते वगैरे करून त्या घरें बांधून राहण्यास योग्य कराव्या व तिकडे घरें होऊं लागलीं म्हणजे शहरांतील दाटी कमी करण्याकडे लक्ष द्यावें. असें केल्यानें दोन फायदे होतात; शहराबाहेरील मोकळी जमीन वस्तीयोग्य होऊन नवीन नमुनेदार वस्ती तयार होऊन शहराची शोभा वाढून लोकांची सोय होते आणि ज्या जागेला ती मोकळी व राहण्यास अयोग्य असते ती शहरसुधाराईमंडळास फार थोड्या किंमतीत मिळते व तीच घरें बांधण्यास योग्य झाली म्हणजे तिची किंमत अनेक पटींनीं येऊन त्यांतून रस्ते करण्याचा खर्च निघून फायदा होतो व त्याचा विनियोग शहरांतील दाटी मोडण्याकडे करतां येतो. म्हणजे हें काम आंतबट्ट्याचें होत नाहीं. तसेंच शहरांतील दाटी मोडण्यासाठीं दाट वस्तींतील घरें मालकांकडून विकत घेऊन पाडून टाकवीं लागतात व अशा रीतीनें जमीन मोकळी करावी लागते व अशा वेळींहि मध्यें रस्ता ठेवून बाजूस चांगलीं घरें बांधतां येतील येवढी जमीन विकत घ्यावी. अशा वेळीं घरें जुनीं व दाट असल्यामुळें त्यांची भरपूर किंमत दिली तरी पैसा फारसा लागत नाहीं व मोकळी जमीन विकून सर्व पैसा भरून काढतां येतो व जुन्या मालकांस भरपूर किंमत मिळाल्यामुळें त्यांचेंहि नुकसान होत नाहीं. शहरांत हवा चांगली खेळावी व व्यापारव्यवहारास अडचण पडूं नये म्हणून जेव्हां रुंद व मोठे रस्ते शहरामध्येंच तयार करावयाचे असतात तेव्हांहि वरीलप्रमाणेंच धोरण ठेवावें. शहरसुधराईमंडळाचें काम वरीलप्रमाणें असतें. अशीं मंडळें सध्यां मुंबई, कानपूर, कलकत्ता वगैरे ठिकाणीं अस्तित्वांत आहेत.

कलकत्ता इम्प्रुव्हमेंट ट्रस्ट स. १९१२ त निघालें. या बारा वर्षांत वस्ती विरळ करणें, रस्ते रुंद करणें व मोकळ्या जागा करून देणें या गोष्टी करण्यांत ७ कोटी रुपयांवर खर्च झाला पैकीं १। कोटी इंजिनियरिंग कामांत व बाकीचे जमिनी विकत घेण्यांत खर्च झाले. २। कोटींची जमीन लोकांनां विकत दिली. मुंबईचें इम्प्रुव्हमेंट ट्रस्ट यापेक्षां मोठ्या प्रमाणावर असून त्याचा खर्चहि दांडगा आहे. ३१ मार्च १९२४ पर्यंत १५ कोटी २६ लक्ष रुपये खर्च झाला. आणखी १ कोटी ६१ लक्षांपर्यंत खर्च करण्यास अधिकार आहे. नवे व मोठे रस्ते करणें, गरीबांकरितां चांगलीं घरें बांधणें, दाट वस्ती कमी करणें हीं नेहमींचीं कामें असून शिवाय समुद्र हटवून नव्या जागा निर्माण करणें हेंहि ट्रस्टचें महत्त्वाचें काम आहे. मुंबई बेटाचा उत्तरेकडील भाग घरें बांधण्यायोग्य करण्याचें सर्व श्रेय ट्रस्टला आहे. वरळी, धारावी, सेवरी आणि वडाला या ठिकाणीं १५५८ एकर जमीन मिळवून तिची सुधारणा केली. यामुळें दोन चार लाख लोकांनां या भागांत चांगलें राहावयास मिळेल. ट्रस्टचा ताबा म्युनिसिपालिटीकडे देण्याचा सरकारचा विचार चालू आहे.

केवळ नगररचना अगर नगरसंवर्धकमंडळाचें काम शहराच्या अंतर्भागापेक्षां शहराच्या बाहेरच विशेष असतें व तें म्हटलें म्हणजे शहराच्या वाढीवर योग्य नियंत्रण ठेऊन ती पद्धतशीर, आरोग्यकारक, सोयीस्कर व शोभादायक करणें हें असतें. याकरितां शहराबाहेरची विशिष्ट जागा शहरसंवर्धनाकरितां मुकर करून प्रथम त्या भागांत योग्य ठिकाणीं रस्ते, मोकळ्या जागा, अर्ध-सार्वजनिक इमारती, उद्यानें, बगीचे वगैरेकरितां जागाहि राखून ठेवून, राहिलेल्या जागेंत दळणवळणाच्या मानानें सोईचे रस्ते राखून राहिलेली जागा घरें बांधण्याकरितां देण्यांत येते. या जागेंत बांधलीं जाणारीं घरेंहि कांहीं विशिष्ट नियमानुसार बांधलीं गेलीं पाहिजेत असे निर्बंध घालण्यांत येतात. उदाहरणार्थ विशिष्ट क्षेत्राच्या एका तुकड्यांत एकच घर बांधलें पाहिजे. प्रत्येक जमिनीच्या तुकड्यांत बांधल्या जाणाऱ्या घराचें व मोकळ्या जागेचें विशिष्ट प्रमाण ( उदा० १:२ ) असलें पाहिजे. घरांची उंची पुढील रस्त्यांच्या रुंदीच्या मानानें अमुक फुटांवर असतां कामा नये. घराचा नकाशा प्रथम योग्य अधिकाऱ्याकडून मंजूर करून घेतला पाहिजे इत्यादि.

या योजनेंतहि कांहीं लोकांची जमीन रस्त्यांमध्यें अगर इतर सार्वजनिक जागांमध्यें अडली जाऊन त्यांचें नुकसान होतें व कांहीं लोकांची जमीन रस्त्यावर येऊन त्यांच्या जमिनीची किंमत वाढून त्यांचा फायदा होतो. तेव्हां ज्यांचा फायदा होतो त्यांच्याकडून त्या फायद्याचा अर्धा अगर कमी अधिक अंश घेऊन त्यांतून इतरांची नुकसानभरपाई व सार्वजनिक कामें करण्यांत येतात व अशा रीतीनें ही योजना बाहेरचा पैसा घेतल्याशिवाय यशस्वी करतां येते. अशा तऱ्हेच्या योजना हल्लीं पुणें, सोलापूर, कराची, अहमदाबाद, वगैरे ठिकाणीं चालू आहेत. बॉंबे डेव्हलप्मेंट स्कीमचें कार्य अति व्यापक असून, त्यायोगानें मुंबईचें भूमिक्षेत्र वाढेल, मजुरांनां रहावयास स्वतंत्र व चांगलीं घरें मिळतील, सरकारी जमिनीचा सदुपयोग होईल व साष्टी बेटाची सुधारणा होईल. या योजनेकरितां ९ कोटी ३९ लक्ष रुपये कर्ज काढिलें. नायगांव, डेलाइल रोड, वरळी व सेवरी या ठिकाणीं संस्थेनें बऱ्याच चाळी बांधल्या असून त्यांत सुमारें चार हजार बिऱ्हाडें रहातातहि. बाकीच्या चाळी या वर्षाअखेर पुऱ्या होतील. अंबरनाथ हें व्यापारी शहर करण्याचा बेत असून त्याप्रमाणें उद्योगहि सुरू आहे. [ बर्ड-टौन प्लॅनिंग फॉर स्मॉल कॉम्युनिटीज; हेनरी व्रुरे-दि न्यू सिटी गव्हर्नमेंट; इडा क्लाइड क्लार्क-दि लिटिल डेमाक्रसी; काडबरी-टौन प्लॅनिंग; लोकशिक्षणांतील ( वर्ष २ रें ). डॉक्टर केतकर यांचा 'नगरसंवर्धन व नगरसौंदर्य' हा लेख; इंडियन ईअर बुक, १९२५; इतर रिपोर्ट. ]

**नगरहार**—अफगाणिस्तानांतील सांप्रतचें जलालाबाद. येथें ह्युएनत्संग आला होता. हें राज्य १०० मैल घेराचें होतें. टालेमीनें याचा उल्लेख नगर म्हणून केला आहे. एका नाण्यावरहि नगरहार असें नांव आढळतें. प्रांताची चतुःसीमाः— पश्चिमेस जगदलकघाट, पूर्वेस खैबरघाट, उत्तरेस काबूल नदी व दक्षिणेस सफेतकोल पर्वत. बेग्राम ( जलालाबादेच्या पश्चिमेस एक कोस ) ही राजधानी होती. जवळच्या तीन कोसांवरील हिडा येथें बुद्धाच्या कवटीवर बांधलेला स्तूप ह्युएनत्संगच्या वेळीं होता. त्याचे व बेग्राम येथील इमारतींचे अवशेष शोधून काढले आहेत. स. ६३० मध्यें हा प्रांत कापिसेनींच्या, त्यानंतर काबूलच्या ब्राह्मणी राजांच्या व नंतर मुसुलमानांच्या ताब्यांत आला. [ दीक्षित—भारतवर्षीय भूवर्णन. ]

**नगरी**—मिनांडर यानें साकेतप्रमाणेंच मध्यमिका यां शहरावर स्वारी केल्याचें स्ट्राबो म्हणतो. पतंजलींहि याबद्दल ओझरता उल्लेख करतो. कांहींच्या मतें पतंजली यावेळीं हयात होता. मध्यमिका म्हणजे प्राचीन नगरी हें गांव होय. याचेंच दुसरें नांव तंववती नगरी होतें. हें गांव हिंदुस्थानांतील अत्यंत प्राचीन गांवांपैकीं एक होय. हें सांप्रत राजपुतान्यांत चितोरपासून उत्तरेस ५॥ कोसांवर आहे. येथें जीं नाणीं सांपडलीं त्यावर " मझिमिका (मध्यमिका) शिबी देशांतील " असा लेख आहे. [ कनिंगहॅम–आर्कि. रिपोर्टस पु. ६, १४: इंडि. अँटि. पु. ७. ]

**नगारची**—या जातीची एकूण लोकसंख्या ( १९११ ) ३४७२९. त्यांत हिंदु (५४९४), मुसुलमान ( २८३९७ ) आणि बाकीचे इतर जातीचे लोक आहेत. त्यांची मुख्य वस्ती बंगाल्यांत ( २४९०२ ) असून बाकी आसाम, मध्यप्रांत व वऱ्हाड इकडे आहे. मध्यप्रांतांतील हे लोक गोंडांची शाखा असून किल्ल्याच्या दरवाजावर व देवळांत नगारा वाजविणें हाच यांचा धंदा असे. कांहीं ठिकाणीं यांची स्वतंत्र जात बनत चालली आहे व ते आपसांतच लग्नें करतात.

**नगारा**—मूळ शब्द नकारा ( अरबी ) आहे. राज्यांतील अठरा कारखान्यांत याचा समावेश होतो. देवळांत पूजेच्या वेळीं अगर युद्धांत आणि दिवसाच्या ठराविक वेळेस काल दर्शविण्यासाठीं याचा उपयोग करतात. जाबत्यांत 'शनिवार' हा पेशजीचा फत्तेवार दिला आहे. त्याची फोड अशीः—थोरल्या शिवाजीनें शके १५८० श्रावण शुद्ध पंचमी शनिवारीं ( १६५८ जुलै २४ ) सातारा किल्ला हस्तगत केला. त्यामुळें विजयस्मारक म्हणून शनिवारीं आणि शिवाजी देवीभक्त असल्यानें शुक्रवारीं अशा दोन दिवशीं हा चौघडा वाजविण्याचा प्रघात पडला. [ शेडगांवकर बखर पहा. ]

लढाईंत वाजविल्या जाणाऱ्या नगाऱ्यास नौबत म्हणत. ती हत्तीवर असे. मुख्य सेनापतीला खास छत्रपतीकडून जरीपटका व ही ( साहेबी ) नौबत देऊन मोहिमेवर पाठवीत. हा एक प्रकारचा मान असे. या कारखान्यास निराळा खर्च तोडून दिलेला असे. लढाईंत नगारा वाजविण्याची पद्धत बहुतेक सर्व देशांत प्राचीन काळापासून आहे. सैनिकास हुरूप येण्यास किंवा जय झाल्यानंतर अथवा सेनापतीचे निरनिराळे हुकूम सैन्यास समजण्यास ( निरनिराळे आवाज काढून ) नगाऱ्याचा उपयोग होई. कूच करावयाचें असल्यास कूचाचा नगारा होई.

न गा र खा ना.—साताऱ्चे छत्रपति प्रतापसिंह यांच्या वेळीं नगारखाना या कारखान्याचें कामकाज कसें चाले ( पूर्वीपासून ) त्याची सविस्तर माहिती जाबत्यावरून समजेल. हा देवळाच्या किंवा राजवाड्याच्या प्रवेशद्वारावर असून यांत चौघडा असतो. सरकारनगारखान्यांतील कामगार चौघडा वाजवणार व सर्नई व तुरई व झांजवाला व घड्याळ्जी व नौबत वाजविणारे वगैरे कामगार त्यांनीं चौघडा वाजवावयाचा तो, अस्तमानीं, मध्यरात्रीं व प्रातःकाळीं दोन घटका रात्र राहिल्याचे पूर्वी इशारतीचा डंका करून, दोन घटका रात्र राहिल्यावर चौघडा सुरू करावा. तो दोन घटका दिवस आल्यानंतर अखेरीचा गजर व्हावा. तसाच सायंकाळीं दोन घटका दिवस आहे तों दुघडीचा डंका इशारतीचा करून, नंतर चौघडा सुरू करावा. तो दोन घटका रात्रीस अखेरीचा गजर व्हावा व मध्यरात्रीपूर्वी दोन घटकेस, इशारतीचा डंका करून नंतर चौघडा सुरू करावा. तो दोन प्रहर दोन घटका रात्रीस अखेरची नौबद व्हावी. व हल्लीं सरकारचा फत्तेवार शुक्रवार व पेशजीचा फत्तेवार शनिवार या दोहोंवारीं चार प्रहरास चौघडा; वर लिहिलेप्रमाणें दरप्रहरीं सदरहूप्रमाणें वाजवीत जावा व सरकारांतून कारखान्याचे दागिने, नौबत व झिला शेकावयास लांकडाची मोईन आहे त्याप्रमाणें घेऊन, झिला व नौबत चांगली खणखणीत वाजे असें करवीत जावें व नवेंजुनें सामान याची देखरेख करून सरकारांत कळवीत जावें. सरकारस्वारी जातां येतां, डंका हमेशा वाजवीत जाणें, गाफील राहूं नये. सदरहू लिहिल्याप्रमाणें बंदोबस्त हुशारीनें सरकारचाकरी करून दाखवील त्याजवर सरकार मेहेरबान होईल. ज्याकडून हें न घडे, त्यास इजा पोहोंचून पुन्हां त्या कामावर राहणें होणार नाहीं.

सरकारांतून कायदे चालावयाचे ते पुढीलप्रमाणेंः—
( १ ) दसऱ्याबद्दल कारखान्याचे बकऱ्यांची मुंडी जमादार याची, बाकी कारखानदार याचे व कारखान्याची पूजा, दक्षणा, नारळ, विडा जमादार याजकडे चालविले जाईल. (१) नौबतीस नऊ दिवस नैवेद्य व पूजेचें सामान व विडे पावतील. (१) सरकारची नजर एक रुपया व दिपवाळीस तेल, अंगेजा व फराळास व तुळशीचे लग्नाबद्दल ऊंस व संक्रांतीबद्दल तिळगूळ व शिवरात्रीचे फराळास व शिमग्याबद्दल होळीचा नारळ व मेसकुमाय राणीच्या सुगऱ्या व वर्षप्रतिपदेस निंब व विडे व गोकुळअष्टमीबद्दल निशाण, लोणी व खिरापत व गणेशचतुर्थीबद्दल विडे, खिरापत व आंबे पिकले हिरवे व गवत

गंजीपैकीं पावेल. [ संदर्भग्रंथ—इतिहाससंग्रह पु. ६. अं. १०।११।१२.]

**नगीना**, तहशील.—संयुक्तप्रांत. बिजनोर जिल्ह्यांतील आग्नेयीकडील तहशील .उ. अ. १२° १३' ते २९°–४५' व पू. रे. ७८°१७' ते ७८° ५७'. यांत नगीना, बन्हापुर व अफझलगढ या परगण्यांचा समावेश होतो. क्षे. फ.४८३ चौ मै. लो. सं. ( १९११ ) १६१९९७. यांत खेडीं ४६३ शहरें २आहेत. अलीगढ व नगीना यांत दाट जंगल आहे;रामगंगा व खोह या नद्या आहेत.जमीन सुपीक आहे, पण हवा चांगली नाहीं. येथें अतिवृष्टि व डुकरें वगैरे जंगली जनावरें यांपासून पिकांचें फार नुकसान होतें. कालव्यांनीं बऱ्याच जमीनीला पाणी पुरविलें जातें.

गां व.—या तालुक्याचें मुख्य ठिकाण नगीना हें अवध रोहिलखंड रेल्वेवर आहे. लोकसंख्या २१ हजार;पैकीं पंधरा हजार मुसुलमान आहेत. ऐने-इ-अकबरींत हें एका परगण्याचें मुख्य ठाणें होतें असा उल्लेख आहे. रोहिल्यांच्या उदयकाळीं येथें एक किल्ला बांधला गेला. स. १८०५ त हें अमीरखान पेंढाऱ्यानें उध्वस्त केलें. इ. स. १८१७–२४ पर्यंत हें उत्तर मुरादाबाद या नवीन जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें. येथें१८५७च्या बंडांत बरीच धामधूम झाली. हें शहर चांगलें असून यांतील रस्ते वगैरे उत्तम आहेत. येथें दवाखाना व शाळा आहे. येथें आठवड्यांतून २ बाजार भरतात. साखर, तांदूळ व कापूस यांचा बराच व्यापार आहे. हें ठिकाण शिसवीच्या लांकडी कामाकरितां प्रसिद्ध आहे; तसेंच कांचेच्या गंगाजळ्याहि होतात. पूर्वी येथें तोडचाच्या बंदुकी व इतर लोखंडी कामहि होत असे. [ इंपे. ग्याझे. पु. १७. ]

**नगेसिया** ( नगासिया )—या जातीची एकूण लोकसंख्या ( १९११ ) ५२७१२. बहार, ओरिसा व मध्यप्रांत–बऱ्हाड इकडे यांची मुख्य वस्ती आहे. छोटानागपुराजवळच्या संस्थानांतूनहि या जातीच्या वन्य लोकांची वस्ती आहे. यांच्या पूर्वजाला तो लहान असतां कोणा मुंडानें सर्पाच्या फणीखालीं निजलेला पाहिला म्हणून त्याला आणून तो मोठा झाल्यावर आपला राजा केलें अशी कथा आहे. हे लोक मुंडांची एक शाखा असावेत. मुंड लोकांसच नाग अशी संज्ञा त्यावेळच्या लोकांनीं दिली असावी. मध्यप्रांतांत यांच्यांत तीन वर्ग आहेत,तेः–तेल्हा, धुरिया व शेंदुरिया. तेल्हा लोक वधूच्या कपाळावर तेलाचा टिळा लावतात. धुरिया लोक वधूच्या कपाळावर वराच्या पायाच्या धुळीचा टिळा लावतात व शेंदुरिया तिला शेंदूर लावतात. शेंदुरिया स्वतःला उच्च समजतात. ते इतर दोन वर्गांबरोबर विवाहसंबंध करीत नाहींत. धुरिया व तेल्हा हे परस्पर लग्नें करतात. तेल्हा व धुरिया बायका कांचेच्या बांगड्या व नथ घालीत नाहींत. तेल्हा लोक म्हणतात कीं पूर्वी वाघदेवानें त्यांची गोंदण्याची सुई व शेंदूर चोरला म्हणून दोहोंच्या ऐवजीं ते तेलाचा उपयोग करतात आणि कार्यप्रसंगीं हें तेल अविवाहित मुलाकडून नांगराच्या जुंवाला धरून वांबूच्या पाटींत काढतात. धार्मिक कृत्यांत तेल जुन्या पद्धतीनें (घाण्यांतून) काढतात. [ हिरालाल आणि रसेल–छोटानागपूर. ]

**नचिकेतस्**—गौतमगोत्रोत्पन्न आरुणि ऋषि याचा पुत्र. हा सुमारें पांच वर्षांचा असतांना, याच्या पित्यानें एकदां उत्तम उत्तम गायी याच्यासाठीं निवडून ठेवून, ब्राह्मणांस देण्यासाठीं इतर ठेवलेल्या यानें पाहिल्या.हें न आवडून नचिकेतीं पित्यास पुन्हां पुन्हां विचारूं लागला कीं, आपण मला कोणत्या ब्राह्मणास दान देणार तें सांगा. तें ऐकून पित्यास क्रोध आला व त्यानें मी तुला मृत्यूप्रत समर्पण करणार म्हणून उत्तर केलें. याप्रमाणें हा यमलोकीं गेला. तेथें यमानें त्याला ब्रह्मविद्या देऊन आपल्या पित्याकडे परत पाठविलें. ही कथा तैत्तिरियब्राह्मणांत व कठोपनिषदांत आहे.

**नंजनगुड**, तालुका.—म्हैसूर संस्थान, म्हैसूर जिल्हा. मध्यभागांतील तालुका. उ. अ. ११°--५१' ते १२°–२४'व पू. रे. ७६°--२७' ते ७६°--५६'. क्षेत्रफळ ३७८.९४चौरस मैल व लोकसंख्या ( १९११ ) ११३१६९. यांत नंजनगुड व कललें अशीं दोन शहरें व १७० खेडीं आहेत. बोलगेर येथें सोन्याच्या खाणींचें काम सुरू केलें होतें पण जास्त फायदा न दिसल्यामुळें बंद केलें. वायव्येकडील भागांत अभ्रकाच्या खाणी आहेत.

गां व.—तालुक्याचें मुख्य ठिकाण. नंजनगुड हें म्हैसूरस्टेट रेल्वेवरील म्हैसूरच्या पुढचें स्टेशन आहे. लोकसंख्या ६हजार. ११ व्या शतकाच्या पूर्व भागांत गोपालस्वामी बेटावरील बेत्तडकोटे येथील दनायक लोकांकडे हें गांव असावें.येथें एक नंजुंडेश्वराचें देऊळ आहे. याला १५ व्या शतकांत उमुत्तुर सरदारानें व १६व्या शतकांत विजयानगरच्या राजानें व १९ व्या शतकांत म्हैसूरच्या राजानें देणग्या दिल्या आहेत. [ इंपे. ग्याझे. पु. १८. ]

**नजफखान**—हा इराणांत जन्मला; लहानपणीं नादीरशहानें याला कैदेंत ठेविलें होतें. पुढें मोठेपणीं हा हिंदुस्थानांत मुहम्मदशहाच्या वेळीं आला. सुजाउद्दौला, मीर कासीम वगैरे नबाबांच्या पदरीं हा होता. बुंदेलखंडच्या गुमानसिंगाकडे नोकर राहिला. मध्यंतरीं याला अलाहाबाद प्रांतांतली जहागीर इंग्रजांनीं दिली होती परंतु पुढें अयोध्येच्या वजिराशीं तह झाल्यानें इंग्रजांनींच ती जहागीर काढून त्याला कांहीं पेन्शन दिलें. शहाअलम दिल्लीस गेला तेव्हां यानें जाटांपासून आग्रा घेतलें ( १७७१ ). त्यामुळें याला अमीर-उल्उमरा पदवी व जागा मिळाली. पुढें अकरा वर्षांनीं हा मेला ( १७८२ ). [ फॉल ऑफ धि मोंगल एंपायर. ]

**नंजराज** ( तिसरा )—हा म्हैसूरचा सर्वाधिकारी होता. याच्या बापाचें नांव कळ्ळे वीरराज होतें. म्हैसूरचा दोड्ड कृष्णराज मेल्यावर ( १७३१ ) सर्व सत्ता या नंजराजाच्या हातीं आली. याच्याकडे सैन्याचें आधिपत्यहि होतें. हा स्वार्थी व महत्वाकांक्षी होता. याला

दळवाई व सर्वाधिकारी असे किताब होते. यानें राजास नांवाचें बाहुलें केलें होतें. यानें दोन राजांस गादीवर बसविलें. दुसरा राजा याला कंटाळला व त्यानें हैदराच्या साहाय्यानें नंजराजाला अधिकारावरून सैन्याच्या बळावर दूर करविलें. हैदर हा मूळचा नंजराजाचा विश्वासू नोकर होता. नंजराजा व त्याचा भाऊ देवराज यांच्यांत तंटा लागला असतां व मराठ्यांनीं म्हैसूरवर स्वारी केली, तेव्हां (१७५९) हैदरच नंजराजाच्या उपयोगी पडला व त्याबद्दल त्यानें हैदरास दळवाई केलें. पण राजाच्या सांगण्यावरून हैदरानें विश्वासघात करून नंजराजाला हद्दपार केलें; मात्र त्याला एक लाख होनांचा मुलूख खर्चाकरितां लावून दिला. याच्या वंशास दळवाई हें आडनांव पडलें आहे. कंठीय-नंजराज-बसवराज-नंजराज- कळ्ळे वीरराज-नंजराज व देवराज याप्रमाणें याची वंशावळी आहे. या दळव्यांनां म्हैसूरचे राजकर्ते म्हणत. [ खरे-हैदरअल्लीवरील पहिली स्वारी; अय्यंगार-एन्शन्ट इंडिया. ]

**नंजराजपट्टण**—दक्षिण हिंदुस्थान, कुर्गप्रांतांतील उत्तरेकडील तालुका . उ. अक्षांश १२° २१' ते १२° ५१ व पू. रेखां ७५ ° ४१ ते ७६ ° ५' क्षेत्रफळ ३१७ चौरस मैल. लोकसंख्या( १९११ ) ४०५१३; यांत सोमवारपेठ ( लो. सं. दोनहजार ) हें मुख्य शहर, फ्रेझरपेठ, व कोदलिपेट अशीं ३ शहरें व २५४ खेडीं आहेत. पश्चिमेकडे पुष्पगिरीचा डोंगराळ भाग असून दक्षिणोत्तर येळुसा विरशीम नांवाचा एक कडा आहे. कावेरी नदी याच्या पूर्वेस वहात असून या तालुक्यांतील सर्व नाले हत्ती किंवा हारंगी नदीला मिळतात व हारंगी ही कावेरीस मिळते. हेमावती, व कुमारधारी या दुसऱ्या नद्या आहेत.येथील लोक कुर्ग, येपवनाड कुर्ग, वोक्कलिग वगैरे. येदवनाड येथें दोनदां तांदुळाचें पिकें होतात. येथें ताडी काढतात; तिचा उपयोग गरीब लोक पिण्यासाठीं करतात. येथें चंदन फार होतें. [ इंपे. ग्याझे. पु. १८ ].

**नजीब उद्दौला**—हा रोहिल्यांचा एक सरदार याचे खरें नांव नजीबखान. बशारत खानाचा पुतण्या अली मुहंमदखानाच्या वेळीं हा प्रथम रोहिलखंडांत आला, तेव्हां याला बारा घोडेस्वारांचा नाईक नेमलें. परंतु हा अत्यंत कारस्थानी, कपटी व विश्वासघातकी असल्यानें हळू हळू यानें आपलें वर्चस्व वाढविलें. रोहिला सरदार दुंडेखान यानें आपली मुलगी नजीब यास त्याची कर्तबगारी पाहून दिली. यानें मराठ्यांविरुद्ध दिल्लीच्या राजदरबारीं जो अफगाण पक्ष होता त्यांत शिरकाव करून घेतला. मनांतून हा मराठ्यांचा अत्यंत द्वेष्टा होता. परंतु वेळीं तो त्यांच्यांशीं लुच्चेगिरीनें पड घेतल्यासारखें वागे. यानें स्वतःस मल्हारराव होळकराचा धर्मपुत्र म्हणविलें होतें. पेशवे वारंवार नजीबाची खोड मोडण्यास मल्हाररावास सांगत असतां, मल्हाररावानें, पेशवे आपल्याकडून घोत्रें बडवून घेतील या खोट्याच भीतीनें नजीबास मुद्दाम खळी म्हणून राखलें. त्यामुळें मराठी राज्याची फार नुकसानी झाली. नजीबानेंच विश्वासघात करून दत्ताजी शिंदे यास ठार मारलें व त्यानेंच दोन तीन वेळां अबदालीला बोलावून आणून शेवटीं पानपत केलें. त्याच्याच कारवाईनें सुजाउदौला हा अबदालीस मिळाला व रजपूत राजे मराठ्यांस मिळाले नाहींत. नजीबाचा हा स्वभाव पेशव्यांनीं व शिंद्यानें ओळखला होता. ते त्याला भाग्यागमनी या शब्दानें संबोधीत. त्याचा नाश करण्याबद्दलच्या अनेक सक्तीच्या सरकारी हुकुमांचा मल्हारराव होळकरानें जाणून बुजून अनादर केला. एकदां ( १७५७--५८ ) तर राघोबादादाच्या हातीं नजीब लागला होता व तो त्याचें कडक पारिपत्य करणार होता, परंतु त्यावेळींहि मल्हाररावानेंच त्याला वांचविलें. दिल्लीस हिंदुपतपातशाही स्थापण्याचें धोरण पेशव्यांचें होतें व त्याला दिल्लीदरबारांतील अफगाणपक्ष विरुद्ध होता. नजीब त्या पक्षाचाच प्रमुख बनला. गाजी व सफदरजंग हे मराठ्यांकडे होते. सारांश, नजीब जर नाहींसा झाला असता तर दिल्लीस हिंदुपातशाहीची स्थापना सुलभ झाली असती. नजीबानें गाजीउद्दीनचा पक्ष घेऊन एकदां सफदरजंगाचा पराभव केला. त्याबद्दल अहंमदशहानें त्याला नजीबउद्दौला ही पदवी दिली; तसेंच अबदालीनें याला अमीर उल उमराहि बनविलें(१७५७). परंतु गाजीउद्दीननें याला काढून अहंमदशहा बंगष याला अमीर उल उमरा केलें होतें.त्यामुळें तो पुढें गाजीच्याहि विरुद्ध गेला. पानपतानंतर अबदालीनें याला दिल्लीस ठेवून व वजिरी देवून पातशाहाचें रक्षण करण्याचें काम त्याच्याकडे ठेविलें; हें काम त्यानें मरेपर्यंत केलें. तो मेल्यावर ( १७७० ) त्याचा मुलगा झाबिताखान यानेंहि शहाअलमच्या राजकुटुंबाचें रक्षण केलें. नजीबाबाद येथें नजीबचें थडगें आहे. याची जहागीर गंगायमुनादुआबांत सहाराणपूरच्या सभोंवार होती. गाजी व सफदर यांच्या भांडणांत त्यानें हा प्रांत बळकावला होता. तसेंच पुढें त्यानें सुरजमल जाटाचाहि प्रांत लुबाडला होता. [ राजवाडे--खं-१; भाऊसाहेब बखर; बील; एलफिन्स्टन; डफ ].

**नजीबाबाद**, त ह सी ल.—संयुक्तप्रांत, बिजनोर जिल्ह्यांतील उत्तरेकडील तहशील. उत्तर अक्षांश. २९°--२५' ते २९°-५८' व पू. रे. ७८° ७' ते ७८°-३१'. यांत नजीबाबाद कीरातपूर, अकबराबाद हे परगणे मोडतात. क्षेत्रफळ ४५७ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) १५९००३. यांत नजीबाबाद ( हें मुख्य शहर )व कीरातपूर हीं दोन शहरें व ४२२ खेडीं आहेत. यांत कांहीं वस्ती नसलेला डोंगराळ प्रदेश असून थोडेंसें जंगलहि आहे. फक्त पावसाळ्यांत धोधो वाहाणारे बरेच नाले आहेत. मालिन हा प्रवाह काय तो थोडा महत्त्वाचा आहे. गंगानदी पश्चिम सीमेवर वाहाते. मालिन नदीपासून लहानसा कालवा काढला आहे.

गां व.---तहशिलीचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या (१९११) १८४६०. हें औधरोहिलखंड रेल्वेवरील स्टेशन आहे. हें शहर मोंगल घराण्याचा कांहीं दिवस वजीर असलेल्या

निझाम उद्दवल्यानें इ. स. १७५५ मध्यें वसविलें असून पूर्वेस १ मैलावर पत्थरगढ नांवाचा किल्ला आहे. नजीब उद्दवल्याचा नातू महमूद यानें बंद केलें परंतु तें बंड मोडलें गेलें व स. १८५८ मध्यें येथील राजवाडा पाडला गेला. गांव जंगलानजीक असून येथील हवा खराब आहे. येथें नजीब उद्दवल्याचें थडगें व कोरीव अशी दरवाजाची कमान आहे. पत्थरगढ पडला असून हा मोर्धेज याजवळच असणाऱ्या एका किल्ल्याचे दगडानें बांधिला. हें डोंगरी व्यापाराचें ठाणें आहे. भांडीं, कपडा, कांबळीं, जोडे वगैरे येथें तयार होऊन गन्हवालला जातात. मीठ, साखर, धान्य व इमारती लांकडाचाहि जंगी व्यापार आहे. हें मिठाईकरितां प्रसिद्ध असून पूर्वी येथल्या तोफ्यांच्या बंदुकी प्रसिद्ध होत्या.

**नझून**—वरचा ब्रह्मदेश. सगैंग जिल्ह्यांतील एक टौनशिप. ही इरावती नदीच्या दक्षिण किनाऱ्यानें पसरलेली असून क्षेत्रफळ ३३१ चौरस मैल आहे. लोकसंख्या (१९११) ५४६१९. नझून हें मुख्य ठिकाण आहे. ही मिंओथापासून उत्तरेस १७ मैल आहे. नदीनजिकचा भाग सोडून ही टौनशिप बहुतेक पडीत व ओसाड आहे. येथें पाऊस फार कमी पडतो. १९०३–०४ सालीं फक्त १६४ चौरस मैल जागा लागवडींत होती.

**नटमौक**–वरचा ब्रह्मदेश. मगवे जिल्ह्यांतील इशान्येकडील टाउनशिप. क्षेत्रफळ ८८० चौरस मैल. यिन नदीच्या शेजारीं तांदूळ, बाजरी, तीळ वगैरे उत्पन्न होतात. लोकसंख्या ( १९११ ) ७३२१७. मुख्य ठिकाण नटमौक. आहे.

**नटराज**—नटेश, नटेश्वर. ही नांवें एकाच तांडवनृत्यकारी शिवमूर्तीला लावतात. अशा मूर्ती दक्षिण हिंदुस्थानांत फार आढळतात. बंगालच्या डाक्का, टिप्पेरा यांसारख्या दक्षिण जिल्ह्यांतूनहि अशा मूर्ती सांपडल्या आहेत. सेनराजांच्या रामपाल या राजधानीच्या प्राचीन शहराच्या आसमंतांत असलेल्या एका खेड्यास अद्यापहि नटेश्वर म्हणतात. यांत एका मोठ्या देवळाचे अवशेष दिसतात. टिप्पेरा जिल्ह्याच्या ब्राह्मणवारिया पोटविभागांतील एका गांवाचें नटघार असें नांव आहे. यांत ८५ वर्षांपूर्वी एक नटराजाची मूर्ति सांपडली असून तिची लोक आजहि पूजा करतात. यावरून प्राचीन समतट व वंग राज्यांत नटराज ही सर्वसामान्य लोकप्रिय देवता असावी असें वाटतें. नृत्यकारी शिवाची मूर्ति कशी असावी याचें वर्णन मत्स्यपुराणांत ( अ. २५९ ) आलेलें आहे. उत्तर हिंदुस्थानांत आढळणाऱ्या मूर्तींतून शिवाच्या पायाखालीं एक बैल असतो व दक्षिणेंत अपस्मार पुरुष नांवाचा एक दैत्य असतो. तथापि कांहींतून मागें बैल असलेला दाखवितात(उदा. वदामीच्या पहिल्या लेण्यांत तोंडाशीं ). चार, दहा, बारा, सोळा असे निरनिराळ्या मूर्तींना हात असतात. नटराजाच्या मूर्तींत जो अभिनय दृष्टीस पडतो तो भारतीय मूर्तिशिल्पाचा एक विशेष म्हणून गणला आहे.

**नटोग्यी**—वरचा ब्रह्मदेश. म्यिंग्यन जिल्ह्यांतील ईशान्येकडील एक टौनशिप. क्षेत्रफळ ४७१ चौरस मैल. लोकसंख्या (१९११)७२४३९. मुख्य पिकें मोगांग तांदूळ व कापूस. कालव्यामुळें हा भाग सर्व जिल्ह्यांत सुपीक आहे. यांत खेडीं १२० असून एकच नटोग्यी हें मुख्य शहर मध्य भागीं वसलें असून येथें कापसाचा मोठा व्यापार आहे.

**नँडि**—नँडि ही जात पूर्व आफ्रिकेंत आहे. या लोकांवरुच नांव एका प्रदेशाला देण्यांत आलें आहे. त्यांची मूळ वस्ती उत्तरेंत होती व बहुधां १९ व्या शतकाच्या आरंभापर्यंत ते हल्लींच्या ठिकाणीं आले नसावे. नँडि लोक कृषिकर्मी असून ते मोठमोठे गुरांचे कळप पाळतात. ते शहरांत रहात नाहींत. कारण प्रत्येक कुटुंबांतील लोक ते जें शेत लागवडींत आणतात त्यावरच आपली उपजीविका करतात. गोऱ्या लोकांनां त्यांनीं फार त्रास दिला; व आगगाडीचे रस्ते व तारा यांची फार नासाडी केली म्हणून ब्रिटिशांनीं त्यांनां आगगाडीच्या मुलखाच्या उत्तरेकडे घालविलें.

**नडिया जिल्हा**—बंगाल इलाख्यांतील जिल्हा. उ. अ. २२°५३' ते २४°११' व पू. रे. ८८° ९' ते ८९°२२'. क्षेत्रफळ २७७९ चौरस मैल. मर्यादा—उत्तरेस जलंगी व पद्मा या नद्या व पश्चिमेस भागीरथी; दक्षिणेस २४ परगणे व पूर्वेस फरीदपूर व जेसोर जिल्हे. गंगानदीमधील त्रिकोणाकृति जमिनीच्या डोक्यावर हा असल्यामुळें याची उंची पुराच्या वेळीं पाण्याची जी सपाटी असते त्याहून बरीच उंच आहे. हा प्रदेश सुपीक असून येथें हिंवाळ्याचीं पिकें व तांदूळहि होतो. पश्चिमेस कालांतर नांवाचा फार सुपीक व काळा प्रदेश आहे. याच्या उत्तरेस पद्मानदी वहाते. हा प्रवाह अलीकडचा आहे. गंगा नदी पाहिल्यानें भागीरथीच्या प्रवाहानें वाहात असे व नंतर जलंगी व माताभंगा या नद्यांच्या प्रवाहानें वाहून शेवटीं पद्मानदीच्या प्रवाहाचें अवलंबन केलें. सर्व प्रदेशांत नद्यांचें जणूंकाय जाळेंच पसरलें आहे परंतु भागीरथी, जलंगी व मातागंगा या तिन्ही नद्यांनां मिळून "निदीया नद्या" असें नांव आहे. जलंगी कृष्णनगरजवळून वाहून शेवटीं नडिया शहराजवळ भागीरथीला मिळते. भैरव ही उपनदी आहे.

मातागंगेचे कृष्णगंजजवळ दोन भाग होऊन हिचें नांव लयास पावलें. येथें दलदल फार आहे. दलदलींत वाढणारीं झाडें बरींच आहेत. डुकर, चित्ता, तसेंच पद्मेजवळ जंगली बदकें व सर्प फार आहेत. सरासरी उष्णतेचें मान जानेवारींत ५२ तें जूनमध्यें ७९ असें असतें. पाऊस सरासरी ५७ इंच पडतो. येथें पुरापासून फार त्रास होतो.

इतिहास.—नडिया किंवा नवद्वीप हें फार जुनें आहे. सुमारें १२ व्या शतकांत सेन राजांनीं गौरहून आपली राजधानी येथें बदलली. इ. स १२०३ त लक्ष्मणसेनाचा महमद बखत्यार खिलजीनें पराभव करून ही राजधानी घेतली व बराच भाग काबिज केला. यापुढचीं इ. स. १५८२ पर्यंत कांहीं हकीकत माहीत नाहीं. यावेळेस तोडरमल्लाच्या व्यवस्थेत

याचा सातगांव सरकारांत समावेश होत असे. येथील पंडित त्यावेळीं फार प्रसिद्ध होते. सध्यांचे महाराज ब्राह्मण असून यांचा सेन घराण्याशीं कांहीं संबंध नाहीं. तरीपण ते अमीसूरनें कनोजहून जे ५ ब्राह्मण बोलाविले होते.—भट्टनारायण—त्यांचे वंशज आहेत असें म्हणतात. १६ व्या शतकाच्या शेवटीं येथील राजानें मानसिंगाला जेसोरच्या प्रतापादित्याविरुद्ध मदत केली त्याबद्दल याला १४ परगणे मिळाले. १८ व्या शतकाच्या मध्यांत येथला राजा महाराज कृष्णचंद्र यानें क्लाइव्हला प्लासी येथें मदत केली त्याबद्दल त्याला राजेंद्र बहादुर पदवी मिळून १२ तोफा इनाम दिल्या गेल्या पैकीं कांहीं सध्यां राजवाड्यांत आहेत. येथेंच इ. स. १८६० नें नीळेचें बंड झालें व यानंतर कमिशन बसून जो निकाल झाला तेव्हांपासून येथील नीळेचा व्यापार अगदीं बसला. याशिवाय कृत्रिम नीळेनें यांनां अगदींच निरुपाय करून सोडलें.

लोकसंख्या १९२१ सालीं १४८७५७२ होती. येथें मुसुलमान जास्त प्रमाणांत आहेत पण शहरांत कमी प्रमाणांत आहेत. हे बहुधां राक्षी किंवा वाहाबी पंथी आहेत. या जिल्ह्यांतच चैतन्यस्वामी होऊन गेले. येथील वैष्णव कीर्तनें फार आवडीनें करतात.

सुमारें २०० वर्षांपूर्वी चाकधाजवळ रामशरणपाल नांवाचा सद्गोप जातींत एक मनुष्य होऊन गेला. यानें कर्ताभज नांवाचा नवीनच पंथ काढला. कृष्णनगर व रतनपूर येथें झनानामिशन आहे व राणाघाट येथें एक वैद्यक मिशन आहे.

**शेतकी.**—कालांतर व कुष्ठिया पोटविभागांतील थोडा भाग खेरीजकरून इतर भाग सुपीक नाहीं. तांदूळ, हरभरा, डाळी, सरसू, मोहरी, ताग, गहूं, तीळ व ऊंस हीं मुख्य पिकें आहेत. येथें कुरणें चांगलीं नसल्यामुळें येथील गुरेंहि चांगलीं नाहींत.

**व्यापारवरस्ते.**—शांतीपूर येथें पूर्वी मलमल फारच सुरेख होत असे. शांतीपूर, मुनशीगंज येथें खजुरापासून साखर काढण्याचे एतद्देशीय लोकांचे कारखाने आहेत. नवद्वीप व मेहेरपूर येथें पितळेचीं भांडीं होतात. कृष्णनगर येथें मातीचीं चित्रें होतात. कुष्ठिया येथें सुतांच्या चरकांची गिरणी आहे. या जिल्ह्यांतून इस्टर्न बंगालस्टेट रेल्वेचा मार्ग असून बोटीनेंहि व्यापार करतां येतो.

निर्यात माल हरभरा, डाळी, ताग, सरस व मिरच्या व आयात माल कोळसा, मीठ, तेल, तांदूळ वगैरे आहे. इ. स. १७७०, १८६६ व १८९६ या सालीं भयंकर दुष्काळ पडले.

या जिल्ह्याचे पांच भाग केले आहेत. त्यांचीं मुख्य ठिकाणें कृष्णनगर, कुष्ठिया, राणाघाट, मेहरपूर व चौदांग. येथें प्रतबंदी धारापद्धति जास्त प्रमाणांत आहे. या पद्धतीप्रमाणें शेतकरी फक्त जमिनीचें भाडें काय तें देतो. १२ वर्षें सतत तीच जमीन नांगरीपर्यंत त्याला या जमिनीवर कोणत्याहि प्रकारचा हक्क मिळत नाहीं.

१८८०–८१ सालीं या जिल्ह्यांत बनगांव पोटविभागाचा समावेश होत असे. नंतर हा पोटविभाग जेसोर जिल्ह्याला जोडला गेला. येथील शिक्षण जरा मागासलें आहे. नडिया हें संस्कृत भाषेकरितां पूर्वीपासूनच प्रसिद्ध आहे व येथें टोल नांवाच्या संस्कृत शाळा आहेत.

**नडियाद, तालुका.**—मुंबई. खेडा जिल्ह्याच्या मध्यभागांतील तालुका. क्षेत्रफळ २२४ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १३३४६७. लोकवस्तीचें प्रमाण दर चौरस मैलीं ६६३ लोक. यांत खेडीं ९१ असून नडियाद व महुवा हीं दोन शहरें आहेत. येथें फळफळावळ चांगली होत असून शेताला कुंपणें वगैरे आहेत आणि एकंदरींत हा तालुका गुजराथेंत सर्वांत श्रीमंत आहे.

**गां व.**—खेडा जिल्ह्यांतील सर्वांत मोठें शहर. हें बी. बी. सी. आय. रेल्वेवर आहे. उ अ. २२°–४४′ व पू. रे. ७३°. लोकसंख्या ( १९११ ) २७१४५. सतराव्या शतकाच्या आरंभीं येथें निळीचा व्यापार चालत असे. येथें कापसाचेंहि बरेंच पीक होत असे. शहराला लहानसा तट असून त्याला नऊ दरवाजे होते व पलीकडे एक कोरडा खंदक होता. रघुनाथरावानें १७७५ सालीं या शहरच्या लोकांपासून हें शहर फत्तेसिंग गायकवाडाला मिळाल्याबद्दल६०००० रुपये दंड घेतला. १९ व्या शतकांत या शहरची सारखी भरभराट होत होती. येथून कापूस, सुती कापड, चीट, तंबाखू व हलकी साखर यांची निर्गत होते व बाहेरून कापड, धान्य, औषधें, डिंक व रंगाचें सामान येथें येतें. येथील तंबाखू फक्त मध्यहिंदुस्थानांतच नव्हे तर एडन, झांजीबार वगैरे भागांत खपतो. येथें सन्तरामाच्या देवळांत दर पौर्णिमेला जत्रा भरते.

**नडियाल**—ही एक आसामांतील जात. लोकसंख्या ( १९११ ) ६८३५०. ब्रह्मपुत्रा खिंडींतील कोळ्यांची ही जात आहे. धंद्यांत व समाजांतील दर्जांत ह्या जातीचे लोक सुरमा खिंडींतील जालिया कैवर्त लोकांबरोबरीचे असानेत. त्यांची राहणी स्वच्छ असून हिंदु धर्माचे नियम ते चांगल्या तऱ्हेनें पाळितात. त्यांनां डोम जातीचे म्हटलेलें मुळीच खपत नाहीं कारण तसें म्हटल्यास बंगालमधील भंग्यांपैकींच आपण समजले जाऊं अशी त्यांनां भीति वाटते. [ से. रि. पु. ३, १९११. ]

**नतोर, पोटविभाग.**—बंगाल, राजशाही जिल्ह्याचा पूर्वेकडील पोटविभाग. उत्तर अक्षांश २४°-७′ ते २४° ४८′ व पू. रे. ८८° ५१′ ते ८९° २१′. क्षेत्रफळ ८६४ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ३९८९५८. लोकवस्तीचें प्रमाण दर चौरस मैलीं ५१८ आहे. यांत नतोर हें मुख्य शहर असून १८४९ खेडीं आहेत. यांत दलदलीचा प्रदेश फार असून या सर्वांत चलन थल नांवाचा दलदलीचा जमिनीचा तुकडा

सर्वांत मोठा आहे. नतोर तालुक्याचें क्षेत्रफळ २१० चौरस मैल असून लोकसंख्या ११८१६० आहे.

श ह र.–नतोर पोटविभागाचें मुख्य ठिकाण. उ. अ. २४° २६'व पू. रे. ८९° १' हें नारद नदीच्या उत्तर किनाऱ्यावर वसलें आहे. लोकसंख्या ८२५१. हें पूर्वी जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें पण येथल्या रोगट वातावरणामुळें रामपूर बोलिया हें मुख्य शहर केलें. नतोर घराणें इ. स. १८ व्या शतकाच्या सुमारास पुढें येऊं लागलें पण सध्यां हें मोडकळीस आलें आहे. येथील म्युनिसिपालिटी इ. स. १८६९ त स्थापन झाली.

नत्र(नायट्रोजन–परमाणुभारांक १४.०१)—हें अधातुरूप मूलद्रव्य आहे. इ. स. १७७२ मध्यें डॉ. रूदरफोर्ड यानें हें प्रथम पृथक करून असें दर्शविलें कीं, हवेंतील प्राण काढून टाकिला असतां एक वायु रहातो व त्याच्या अंगीं ज्वलन-क्रिया किंवा श्वासोच्छ्वास क्रिया यांनां मदत करण्याचें सामर्थ्य नसतें. वातावरणापैकीं सुमारें शें. ७९ भाग ( आकारमानानें ) नत्र आहे. संयोगीस्थितींत, सिंधुनत्रित, सोरा, अमोनियाचे क्षार व प्राणी आणि वनस्पति यांच्या पेशिजालांत व द्रवांत नत्र आढळतो. वातावरणांतील प्राण काढून टाकिला असतां नत्र मिळतो. ही गोष्ट कोंडलेल्या हवेंत स्फुर जाळल्यानें किंवा तापलेल्या तांब्याच्या किसावरून हवा घालविल्यानें करतां येते.

अम्लनत्रायित ( किंवा सिंधुनत्रायित व अम्नहरिद यांचें मिश्रण ); अम्मनत्रित व हरिद यांचें मिश्रण; व अम्न-द्विक्रुमित हीं तापविलीं असतां नत्र तयार होतो. नत्रहरिदाच्या निविष्ट द्रावणांत हरवायु सोडल्यास, नत्रहरिदावर उपहरायितें किंवा उपब्रुमायितें यांची क्रिया झाल्यास व अम्ननत्रितावर मंगलद्विप्राणिदक्रिया झाल्यासहि नत्र मिळतो.

जिवंत झाडें जमिनींतून नत्रससंयुक्त पदार्थ शोषून घेतात व त्यांवर त्यांचें पोषण होतें; यास्तव ते संयुक्त पदार्थ फार महत्त्वाचे आहेत. जमिनींतील नत्रस कमी झाल्यास दुसरे घालावे लागतात यामुळें नत्रस खतांची मागणी सुरू झाली. हल्लीं खत तयार करण्याकरितां हवेंतील नत्राचा उपयोग करून घेतात.

नत्र हा रंगहीन, रुचिरहित व वासरहित वायु असून तो पाण्यांत फारच थोडा द्रवतो. तो हवेपेक्षां किंचित् हलका आहे. तो स्वतः जळत नाहीं किंवा त्यांत दुसरे जळण्यासारखे पदार्थहि जळूं शकत नाहींत. नत्राचें द्रवीकरण झालेलें आहे. द्रवीभूत वायु १९५.५° श.उष्णमानावर उकळूं लागतो व त्यावेळीं त्याचें विशिष्टगुरुत्व ०·८१०३ असतें.

न त्र सं यु क्त प दा र्थ.—नत्राचा उज्जाशीं संयोग होऊन अम्न (अमोनिया) तयार होतो. उज्जझिन ( हायड्राझाईन ), अजिविमिद ( अझोइमाइड ) हीं दुसरीं उज्जिदें होत.

न त्र त्रि ह रि द.—नवसागरावर हर किंवा सिंधु उपहरायित यांची क्रिया झाली असतां नत्रत्रिहरिद तयार होतें. हें तेलासारखें असून त्याचा रंग पिवळा असतो. त्याच्या वाफेनें डोळ्यांनां फार त्रास होतो. नत्रत्रिहरिद हें मोठें स्फोटक आहे. नत्राचीं ५ प्राणिदें होतात तीं येणेंप्रमाणें:नत्रसप्राणिद; नत्रिक प्राणिद; नत्रत्रिप्राणिद; नत्रपरिप्राणिद व नत्रपंचप्राणिद. पहिलीं चार वायुरूप असून पांचवें घनरूप आहे.

न त्र स प्रा णि द.—अम्ननत्रित तापविलें असतां उष्णमान (१७०° ते २६०°सें. ) किंवा नत्राम्ल व गंधकाम्लाच्या मिश्रणाचें जस्ताच्या योगानें संस्करण केलें असतां हा वायू तयार होतो. तो रंगहीन व बहुतेक वासरहित आहे. परंतु त्याला गुळचट चव असते. तो स्वतः जळत नाहीं. परंतु त्यांत तप्त पदार्थ प्राणाप्रमाणेंच जळतात. हा पोटांत गेला असतां मनुष्याची स्थिति वायूचा झटका आल्याप्रमाणें होते व तो हसूं लागतो; यामुळें या वायूला "हास्यवायू" असें म्हणतात.

न त्रि क प्रा णि द.—तांब्यावर पातळ नत्रिक-प्राणिदाची क्रिया करून हा वायु तयार करतात; परंतु ह्या रीतीनें वायू शुद्ध न मिळतां त्यांत नत्रस-प्राणिद व नत्र यांचें मिश्रण असतें. यापेक्षां पालाश-नत्रित व लोहसगंधकित यांच्या मिश्रणावर गंधकाम्लाची क्रिया करून किंवा पालाशनत्रित व लोहहरिद यांच्या मिश्रणावर उज्ज हराम्लाची क्रिया केली असतां हा वायू जास्त शुद्ध स्थितींत मिळतो. तो रंगहीन असून पाण्यांत अत्यंत थोडा द्रवतो. पदार्थ बरेच तापलेले असल्याखेरीज त्यांत जळत नाहींत. लोहसक्षारांच्या द्रावणांत नत्रिकप्राणिद द्रवल्यानंतर काळसर पिंगट रंगाचें द्रावण तयार होतें.

न त्र त्रि प्रा णि द.—तालप्राणिद व नत्रिकप्राणिद यांच्या ऊर्ध्वपातनक्रियेपासून मिळालेल्या अर्कांत नत्रत्रिप्राणिद असतें. द्रवरूप नत्रिकप्राणिद व प्राण, किंवा वायरूप नत्रिक-प्राणिद व द्रवरूप प्राण यांच्या मिश्रणापासून नयत्रिप्राणिद मिळतें.

न त्र प रि प्रा णि द.—प्राण व नत्रिकप्राणिद यांच्या मिश्रणापासून होणारा रक्त वायु शीतकारक– मिश्रणांत सोडला असतां नत्रपरिप्राणिद मिळतें. नत्राच्या अम्लांपैकीं प्राणिद हें सर्वांत जास्त स्थिर आहे. यांत मेणबत्ती जळत नाहीं; परंतु ज्वलत स्फुर व तांबडा लाल निखारा जळूं शकतो. हा बलवान प्राणिदिकारक ( आक्सिडाइझिंग एजंट ) आहे.

न त्र पं च प्रा णि द.—रजतनत्रितावर अनार्द्रहराची क्रिया झाली असतां हें प्राणिद मिळतें. तें अतिशय अस्थिर असून नेहमींच्या उष्णमानालाहि त्याचें हळू हळू विघटन होतें. तें पाण्यांत द्रवलें म्हणजे नत्राम्ल तयार होतें.

उ प न त्र सा म्ल.—हें अम्ल स्वतंत्र स्वरूपांत करण्याची उत्तमरीति म्हणजे ईथरमधील उज्जहराम्लाच्या द्रावणानें रजतक्षाराचें विघटन करणें ही होय. हें स्फोटक-असून पाण्यांत ताबडतोब द्रवतें. अम्ल द्रावणांत पालाशपरिमांगलिताच्या योगानें त्याचें प्राणिदीकरण होऊन नत्रिकप्राणिद

बनतें; परंतु अल्कली द्रावणांत फक्त नत्रसाम्ल होतें. कांहीं वेळ ठेवल्यानंतर याचें विघटन होऊन नत्रसप्राणिद तयार होतें.

नत्रसाम्ल.—अद्यापपर्यंत हें अम्ल शुद्ध स्वरूपांत मिळालेलें नाहीं; कारण पाण्याशीं संयोग झाला असतां त्याचें विघटन होऊन नत्राम्ल बनतें व नत्रिकप्राणिद निघून जातें.

नत्राम्ल—हें एक महत्त्वाचें खनिज अम्ल आहे. कॅव्हेंडिश यानें त्याची रचना ठरवून आर्द्र हवेंत विजेच्या ठिणग्या पाडल्या असतां हें अम्ल होतें असें सिद्ध केलें. कांहीं ठिकाणच्या पाण्यांत हें अम्ल थोडया प्रमाणांत आढळतें; परंतु मुख्यतः तें निरनिराळ्या धातूंशीं संयोगी-स्थितींत नत्रितांच्या ( विशेषतः सोरा व सिंधुनत्रिताच्या ) रूपानें आढळतें.

प्रयोगाच्या कामाकरितां तें बहुधां पालाश किंवा सिंधु नत्रिताचें निर्विष्ठ गंधकाम्लाबरोबर ऊर्ध्वपातन करून मिळवितात. परंतु तें अम्ल मोठ्या प्रमाणावर लागत असल्यास, सिंधुनत्रित ( चिली देशांतील सोरा ) व निर्विष्ठ गंधकाम्ल यांचें ओतीव लोखंडाच्या ऊर्ध्वपातन यंत्रांत ऊर्ध्वपातन करून निघणाऱ्या वाफा चिनीमातीच्या भांड्यांत द्रवीभूत केल्या असतां मिळतें.

नात्राम्ल हें रंगहीन व द्रवरूप असून त्याच्या एक-सारख्या वाफा निघत असतात. त्याचें विशिष्टगुरुत्व १·५०३९४ आहे. हें तापविलें असतां शुद्ध अम्ल ७८.२° सें. ला उकळूं लागतें व त्याचें अंशतः विघटन होऊन पाणी, प्राण आणि नत्रद्विप्राणिद हीं द्रव्यें तयार होतात. फार थंड केलें असतां हें अम्ल ४७° सें. ला घनरूप होतें. नत्राम्लाबरोबर पाणी मिळविलें असतां मिश्रणाचें उष्णमान वाढतें व आकारमान कमी होतें. ह्या अम्लाच्या अंगीं प्राणिदीकरण करण्याची मोठी शक्ति आहे. बहुतेक धातूंवर याचा तावडतोब परिणाम होतो; परंतु सोनें व प्लाटिनम् यांवर मात्र त्याची क्रिया होत नाहीं.

नत्राम्लाच्या क्षारांनां नात्रितें असें म्हणतात. तीं सर्व पाण्यांत द्रवणीय असून त्यांचे चांगले स्फटिक पडतात. जास्त तापविल्यास त्या सर्वांचें विघटन होऊन बहुधां प्राण व नत्रद्विप्राणिद हे वायू निघून जातात आणि धातूचें प्राणिद मागें रहातें. नत्रिताच्या द्रावणांत लोहसगंधकिताचें द्रावण मिळवून मिश्रण थंड होत ठेवावें. नंतर त्यांत निर्विष्ठ गंधकाम्ल घातल्यास, लोहसगंधकिताच्या द्रावणाचा रंग पिंगट होतो. यावरून नात्रितांचें अस्तित्व ओळखितां येतें.

गंधकाम्ल, डांबराचे रंग, स्फोटक द्रव्यें व निरनिराळीं नत्रितें करण्याच्या कारखान्यांत नत्राम्लाचा पुष्कळ उपयोग होतो. चामखीळ व व्रण यांचा नाश करण्याकरितां शुद्ध नात्राम्लाचा बाह्यतः उपयोग केला जातो. अग्निमांद्य वगैरे रोगांवर पातळ नत्राम्लमिश्रित औषधें पोटांतहि देतात. नत्राम्लाच्या योगानें विष-प्रयोग झाला असतां सौम्य अल्क व दुग्ध हलकें करण्याकरितां अफू देतात.

**नथियागली**—वायव्य सरहद्दीवरील प्रांत. अबटाबाद तहशिलींतील टेंकडीवरील ठिकाण. उ. अ. ३४° ५' व पू. रे. ७३° ५८'. उन्हाळ्यांत या प्रांताचा चीफ कमिशनर येथें रहातो. हें मरीपासून अबटाबादला जाणाऱ्या रस्त्यावर जवळ जवळ मध्यावर आहे.

**नथुभाई, सर मंगळदास** ( १८३२-१८९० )—एक दानशूर हिंदी व्यापारी. यांचा जन्म कपोल बनिया जातींतील घराण्यांत झाला. हें घराणें दीवहून मुंबईस रहावयास आलें होतें. यांचा आजा रामदास मनोहरदास यांनीं व्यापारांत बराच पैसा मिळविला होता. मंगळदास यांचा अकराव्या वर्षींच बाप वारल्यामुळें लहान वयांतच ते धंद्यांत शिरले व पुष्कळ पैसा मिळविला. मंगळदास यांनीं बायको वारल्यावर तिच्या स्मारकार्थ कल्याणला एक मोफत दवाखाना स्थापला व पुण्याच्या डेव्हिड ससून हॉस्पिटलला एक स्वतंत्र फीमेलवार्ड जोडला. मंगळदास सामाजिक सुधारणावादी होते. स्वजातीच्या मुख्याच्या जागीं वंशपरंपरागत इसमाऐवजीं निवडणुकीनें लायक इसम नेमला जावा अशी सुधारणा त्यांनीं घडवून आणली. १८६२ सालीं मुंबई युनिव्हर्सिटींत एक फेलोशिप ठेवून यूरोपांत कांहीं वर्षें राहण्याची सोय ग्रॅज्युएट इसमांस करून दिली आणि मृत्युपत्रानें देणगी देऊन अशाच कांहीं स्कॉलरशिप्स मुंबई युनिव्हर्सिटींत ठेवल्या. १८६६ सालीं मुंबई कायदे कौन्सिलांत सरकारतर्फे नेमणूक होऊन ती १८७४ पर्यंत कायम राहिली. १८७२ सालीं सी. एस्. आय. आणि १८७५ सालीं नाईट बॅचलर या पदव्या मंगळदास यांस मिळाल्या. त्यांनीं इंडियन फॅमिन फंडाला मोठी देणगी दिली व त्याखेरीज ५० लक्ष पौंड इतर दानधर्मांत खर्च केले.

**नथैंग्यौंग, तालुका**.—खालचा ब्रह्मदेश. बेसिन जिल्ह्याच्या नथैंग्यौंग विभागांतील एक टाउनशिप. क्षेत्रफळ ३३६ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ७७३२४. यांत खेडीं ३३६ व गांव १ (नथैंग्यौंग) आहे. बेसिन नदीच्या कांठानें हा प्रदेश वसलेला असून सुपीक व दाट लोकवस्ती असलेला आहे.

**गांव**.—नथैंग्यौंग टाउनशिपमधील एक गांव व टाउनशिपचें मुख्य ठिकाण. हें बेसिन नदीच्या डाव्या किनाऱ्यावर असून बेसिनहून ९० मैल दूर आहे. लोकसंख्या ( १९११ ) ७१८२. कांहीं दिवस ह्या गांवास फार महत्व होतें. पण दुसऱ्या ब्रह्मी युद्धांत ह्या गांवास सैन्यानें गराडा घातला होता व बंडखोर लोकांनीं हें गांव १८५४ सालीं घेतलेंहि होतें. पण मेजर फिच यानें तें परत घेतलें.

**नंद**—गोकुळांतील गोपालांचा स्वामी. हा वसुदेवाचा परम मित्र असल्यानें त्यानें आपली स्त्री रोहिणी व पुत्र बळराम व कृष्ण यांस गोकुळांत ठेविलें होतें. नंदास यशोदा नामक स्त्री होती. 'नंदवंश' पहा.

**नंद उर्फ तिरुनलैपोवर.**—एक पराया (अंत्यज) साधु पुरुष सुमारें ६ शें वर्षांपूर्वी जन्मला. पराया ही मद्रासकडील अंत्यज जात बहुधां अस्पृश्य व गरीब स्थितींत आहे. नंदाला लहानपणींच देवतांच्या मृण्मय मूर्ती करून त्यांची पूजाअर्चा करण्याचा नाद लागला. मोठा झाल्यावरहि परमेश्वराची कृपा कोणत्या उपायानें संपादावी या विचारांत तो असतां त्याला एकाएकीं असें सुचलें कीं, देवळांतील नगाऱ्यांनां वगैरे लागणारीं कातडीं स्वतः तयार करून पुरवावीं. म्हणून तोच कातडीं कमावण्याचा व्यवसाय त्यानें सुरू केला. एक दंथकता अशी आहे कीं, तिरुपुनकूर येथील देवाच्या दर्शनास नंद गेला होता. तेथील शिवाच्या पुढील नंदीच्या मागच्या बाजूस उभा राहून देवाचें दर्शन घेण्याचा तो प्रयत्न करीत असतां त्याला नीट दर्शन व्हावें म्हणून तो नंदीहि थोडा बाजूला सरला! हल्लीं तिरुपुनकूर येथील देवळांतील नंदी शिवाच्या अगदीं समोर नसून जरा बाजूला कललेला पहावयास सांपडतो व त्यासंबंधीच ही दंतकथा आहे. या गोष्टीच्या वेळींच त्यानें एका ब्राह्मण पंडिताच्या तोंडून चिदंबर येथील शिवालयाची महती ऐकली व त्यांचें दर्शन घेण्याचा निश्चय केला. अंगाला भस्म फासून शिवनामस्मरण करणें हा त्याचा नित्याचा व्यवसाय बनला. अधनूर गांवच्या लोकांनां, नंदाच्या या वागणुकीनें त्याला भुताची बाधा झाल्याचा संशय आला आणि एके दिवशीं दुसऱ्या एका इसमाच्या अंगांत येऊन करुप्पन व इतर परायांच्या देवतांनां शंभर बकरीं, दोनशें कोंबडीं यांचा बळी व ताडी अर्पण केली पाहिजे असें तो बोलला. पण स्वतः नंद हत्येच्या विरुद्ध असल्यामुळें त्यानें बळी न देण्याबद्दल विनंति केली पण ती कोणी ऐकली नाहीं. तेव्हां दुःखी अंतःकरणानें चिदंबरला जाण्याची त्याच्या मनानें पुन्हां उचल घेतली. पण ते पावसाचे व शेतकामाचे दिवस असल्यामुळें त्याचा ब्राह्मण जमीनदार त्याला जाण्यास परवानगी देईना. त्यावेळची दंतकथा अशी आहे कीं, नंद ती अडचण ऐकून शेतांत जाऊन तेथें शिवाचें भजन, नाचत करूं लागला त्याबरोबर दोन चार तासांत सर्व शेत पिकानें पूर्ण भरलें, तें ब्राह्मण मालकास आणून नंदानें दाखविलें. तेव्हां तें आश्चर्य पाहण्यास सर्व समाज जमला व नंदाला नमस्कार करूं लागला. नंतर मालकाच्या परवानगीनें नंद चिदंबरला गेला. तत्संबंधीं दंतकथा अशी आहे कीं, तेथील दीक्षितांनां ( ब्राह्मणांनां ) स्वप्नांत नंदाला अग्नींत शुद्ध करून ब्राह्मण जातींत घेण्याबद्दल दृष्टांत झाला. त्याप्रमाणें कळविल्यावर नंदानें स्वतःस अग्नींत पावन केल्यावर तो चिदंबरच्या देवालयांत गेला व तेथें नटराजाच्या मूर्तींत अंतर्धान पावला. यामुळें त्याला संतमालिकेंत स्थान मिळालें आहे.

**नंदकुमार**—हा बंगाली ब्राह्मण वीरभूम जिल्ह्यांत स. १७२० च्या सुमारास जन्मला. याला बंगालच्या सुभेदार सिराजुद्दौला याच्या हाताखालीं नौकरी मिळाली व वाढतां वाढतां हा हुगलीचा फौजदार बनला; याला दिवाणाचाहि अधिकार असून महाराजा ही पदवी होती. नंदकुमार हा नवाबाचा नोकर असून तो इंग्रजांस आंतून फितूर असे. इंग्रजांनीं फ्रेंचांचें चंद्रनगर ज्यावेळीं काबीज केलें ( १७५७ मार्च ) त्यावेळीं नबाबानें त्याबद्दल तक्रार केली. कारण अलीनगरच्या तहान्वयें हें युद्ध इंग्रजांनां नवाबाच्या राज्यांत करतां येत नव्हतें. परंतु इंग्रजांनीं दांडगाई करून व तह मोडून चंद्रनगर घेतलें; तेव्हां नंदकुमारास नबाबानें फौजेसह फ्रेंचांच्या मदतीस पाठविलें होतें. परंतु नंदकुमार आयत्या वेळीं एकीकडे सरला. क्लाइव्ह म्हणतो कीं, " नंदकुमार जर आपली फौज घेऊन बाजूस सरला नसता तर चंद्रनगर आपल्या हातीं आलें नसतें. "

नंदकुमाराच्या मनांत नवाबाची वझिरी आपल्याला मिळावी असें होतें. ती मुहम्मद रेझाखान व राजा सीतापातिराय यांनां क्लाइव्हनें दिली होती. वर सांगितलेली फितुरी केल्याबद्दल क्लाइव्ह आपल्यास वझिरी देईल अशी नंदकुमाराची अपेक्षा होती. ती फुकट गेल्याचें पाहून नंदकुमार व त्याचे नीच ( स्मिथ-ऑ. हि. इं. पृ. ५१३ ) इंग्लिश साथीदार यांनीं त्या दोघांवर व नवाबाची पालक मन्नी बेगम हिच्यावर अव्यस्थेचे व लांच खाल्ल्याचे आरोप केले. या गोष्टींत हेस्टिंग्जचें अंग असावें असें कांहींचें म्हणणें आहे. कंपनीच्या डायरेक्टरांनीं या वझिरांनां पकडून खटले केले, त्यांत ते निर्दोषी सुटले. हेस्टिंग्जनें यावरहि नंदकुमारास वझीर नेमलें नाहीं,मात्र त्याच्या गुरुदास नांवाच्या मुलास तिजोरीचा कारभार दिला. त्यामुळें नंदकुमार हेस्टिंग्जवर चिडला. तो आपल्याला कामापुरता हातीं घेतो असें त्याला आढळून आल्यावर त्यानें हेस्टिंग्जवर मन्नी बेगमकडून लांच खाल्ल्याची फिर्याद कौन्सिलांत आणली. तीन सभासदांनीं आरोप गृहीत धरून लांचाची रकम हेस्टिंग्जनें परत करण्याचा हुकूम दिला. त्यामुळें तो नंदकुमारावर फार चिडला. त्यानें नंदकुमारावर आपल्या विरुद्ध कट केल्याची फिर्याद केली, तींत नंदकुमार निर्दोषी सुटला. अखेर नंदकुमारावर ६ वर्षांपूर्वी एक खोटा दस्तऐवज केल्याची फिर्याद हेस्टिंग्जनें आणविली; न्यायाधीश इंपे हा हेस्टिंग्जचा बालमित्र होता. त्यानें झटपट चौकशी करून नंदकुमारास दोषी ठरवून फांशीची शिक्षा दिली ( ५ आगष्ट १७७५ ) ज्यूरींतील बाराहि माणसें युरोपियन होते. यामुळें हेस्टिंग्ज निर्धास्त झाला. यावेळीं कंपनीला पैशाची फार अडचण होती व हेस्टिंग्जनें पैसा उकळण्याचीं निरनिराळीं कृत्यें याच सुमारास केलीं. नंदकुमाराच्या जवळ ५२ लाख रुपये रोकड असून तितक्याच किंमतीचें जवाहिर व माल होता. नंदकुमाराच्या फांशीबद्दल " गव्हर्नर जनरल व चीफ जस्टिस यांनीं संगनमतानें केलेला न्यायाचा खून " असें हेस्टिंग्जवरील खटल्यांत बर्कसारख्यानें उद्गार काढले आहेत.

[ स्मिथ-ऑक्स. हिस्टरी. ऑफ इंडिया; बील; स्टोरी ऑफ नंदकुमार. ]

**नंदगड**—मुंबई इलाखा, बेळगांव जिल्हा, खानापुर तालुक्यांतील एक गांव. याचें पेठ नंदगड हें गांव जास्त प्रचारांत आहे. खानापूरच्या आग्नेयीस सात मैलांवर हा गांव आहे. लोकसंख्या ( १९०१ ) ६२५७. येथें व्यापारी पेठ असून दर बुधवारीं बाजार भरतो. इ. स. १८०९ मध्यें येथून जवळच कित्तुरच्या देसायांनीं प्रतापगड नांवाचा किल्ला बांधला. या गांवास महत्त्व आणण्याकरितां कित्तुरच्या देसायांनीं खानापुराहून व्यापारी लोकांस वसाहत करण्यास उत्तेजन दिलें. जो येथें येऊन राहील त्यास नऊ वर्षें कांहीं एक कर द्यावा लागणार नाहीं असें त्यांनीं प्रसिद्ध केलें होतें. स. १८२९ मध्यें उद्भवलेल्या कित्तुरच्या दुसऱ्या बंडाचा पुढारी रायप्पा यास याच ठिकाणीं फांशीं दिलें.

**नंदन**—पंजाब, झेलम जिल्हा, पिंडदादलखान तहशिलींतील एक ऐतिहासिक ठिकाण.येथून जवळच पडीत असें देऊळ, किल्ला व खेडें आहे. देऊळ काश्मीर पद्धतीचें आहे, मात्र काश्मीरपद्धतप्रमाणें तें पूर्वाभिमुखी नसून पश्चिमाभिमुखी आहे. किल्ल्याचे फक्त दोन बुरूज कायम आहेत. येथें १०१४त महंमूद गझनी आला होता. १३ व्या शतकांत कांहीं दिवस येथें कमरुद्दीन करमानी होता पण जलालुद्दीन (खोरासानचा) यानें त्याला पदच्युत केलें. चंगीझखानानें स. १२२१ त जलालुद्दीनाचा पराभव केला व त्याच्या सरदारानें नंदन खेड्यांतील लोकांची कत्तल केली. स. १२४७ त येथें अल्तमशाचा अंमल असावा. १२४७ साली महंमूदशहा याचा मुलगा यानेंहि एक स्वारी केली.

**नंदप्रभंजन**—ओरिसाच्या दक्षिणेकडील व गोदावरीच्या उत्तरेकडील मुलुखावर राज्य करणाऱ्या गंगघराण्यांतील एक राजा. या गंग लोकांबद्दल व राजघराण्याबद्दल हिंदुस्थान व सिलोनमधील सर्वांत जुन्या बखरींतून उल्लेख आढळतो. या लोकांबद्दलची माहिती प्राचीन ग्रीक व रोमन ग्रंथकारांस असून, हे लोक पूर्वेकडील दूरवरच्या रहिवाश्यांसहि माहित होते. ते काटक असून धाडशी होते व समुद्रावरून दूरदूरच्या देशांशीं व्यापार करीत असत. बौद्ध लोकांच्या प्राचीन दंतकथांमध्यें कलिंग राजे त्यावेळीं एका सुधारलेल्या राज्यावर राज्य करीत होते असें आढळतें व गंजम जिल्ह्यांतील चिकाकोल येथें सांपडलेल्या एका प्राचीन शिलालेखामध्यें कलिंग देशाचा राजा नंदप्रभंजनवर्मा याचा उल्लेख आहे. याचा काल बहुतकरून इ. स. च्या सातव्या शतकाच्या आरंभीं चाळुक्य राजांनीं वेंगीवर केलेल्या स्वारीच्या पूर्वीचा असावा. वेंगी येथील राजांप्रमाणें हे राजेहि कदाचित पल्लव वंशांतील असावे. या राजाचा हा लेख सारपल्ली शहरीं लिहिलेला आहे. यानंतरच्या दोन शिलालेखांमध्यें राजा इंद्रवर्मा याचें नांव आढळतें. याचे लेख यांच्या ‘पराक्रमी शकाच्या’ १२८ व १४६ या वर्षी कलिंगनगरांत लिहिलेले आहेत. चाळुक्यांच्या सातव्या शतकांतील स्वारीनंतर कलिंग राजांबद्दल आपणास इ. स. ९७७ पर्यंत कांहीं माहिती नाहीं. यावेळीं चाळुक्य राज्यांत अराजकता पसरल्यामुळें कलिंग राजांस कलिंगनगर येथें आपलें सामर्थ्य वाढविण्यास संधि सांपडली.

या काळच्या शिलालेखांवरून पुढील वंशावळी सांपडतेः—

जयवर्मदेव
|
अनंतवर्मदेव
( इ. स. ९८५ त राज्य करीत होता )
|
राजेंद्रवर्मदेव — देवेंद्रवर्मदेव
देवेंद्रवर्मदेव
|
सत्यवर्मदेव

चिकाकोल येथें सांपडलेल्या दोन शिलालेखांमध्यें देवेंद्रवर्मा, व सत्यवर्मा यांच्या देणग्यांचा उल्लेख असून दोहोंमध्येंहि कलिंगनगर येथील गांगेय वंशाचें५१वें वर्ष असा काल सांपडतो. या शतकाचा आरंभ, यांपैकीं ज्या राजानें या राज्याचें वैभव पुन्हां प्रस्थापित केलें अशा राजाच्या ( जयवर्मदेव ? ) कारकीर्दीपासून झालेला असावा. देवेंद्रवर्मा याच्या दुसऱ्या एका शिलालेखांत २५४ वें वर्ष आहे परंतु शक कोणता तो दिला नाहीं. कदाचित २५४ वें वर्ष त्यांच्या मूळच्या राज्यस्थापनेपासून असून ५१ वें वर्ष त्यांच्या सत्तेची पुन्हां प्रस्थापना झाली त्या काळापासून असावें. [ इंडि. ॲंटि पु. ८ व १०; बर्जेस— सा. इं. पॅलिओग्राफी ].

**नंद भाषा**—ही एक व्यापारी लोकांची भाषा आहे. विसोबा खेचराचे कांहीं अभंग, महिपतीच्या विसोबा खेचरासंबंधाच्या कांहीं ओंव्या (भक्तिविजय अ. १८)व तुकारामाचे कांहीं क्षेपक अभंग यांत ही भाषा सांपडते. ज्ञानेश्वराच्या कालापासून आजपर्यंत म्हणजे सुमारें सहाशें वर्षें ही भाषा महाराष्ट्रांत अस्तित्वांत आहे. ही कोठून व कशी आली, हिला नंदभाषा कां म्हणतात इत्यादि माहिती अजून स्पष्ट झाली नाहीं. या भाषेंतील शब्द येणेंप्रमाणें:—केवली = एक, अवारू = दोन, उधानु = तीन, पोकू = चार, मुलु = पांच, शेली = सहा, पवित्र् = सात, मंगी = आठ, तेवसू = नऊ, लेवनू = नऊ, अंगुलु = दहा, एकडू = अकरा, रेघा = बारा, ठेपरू = तेरा, चोपडू = चवदा, तळी = पंधरा, तान आणि भुरकातानतळी = सोळा, उधानुतानतळी = अठरा, काटी = वीस, भुरकातानकाटी = एकवीस, बिटी = शंभर, ढका = हजार, फाटा = एक आणा, अवारू फाटे = दोन आणे, मंगी फाटे = आठ आणे; तळी फाटे = पंधरा आणे, इत्यादि. [ मोलस्वर्थ; पुणें ग्याझेटियर भाग १, पृष्ठ ३७०; भा. इ. सं. मं. १८३४. ]

**नंदलाल मंडलोई, चौधरीराव**—हा जातीचा ब्राह्मण. बादशाही अमलांतच इंदुरास चौधरीच्या कामावर असून,

नर्मदेवरील उतारांच्या बंदोबस्ताचें काम त्याच्याकडे होतें. मोंगल अधिकाऱ्यांनीं त्यास सर्वस्वी हैराण केल्यामुळें सवाई जयसिंगाच्या सल्ल्यानें तो मराठयांस अनुकूल झाला. त्यास आपल्या बाजूस वळविण्याचें काम मल्हारराव होळकर व उदाजी पवार यांनीं केलें. मंडलोई घराणें अद्यापि इंदुरास नांदत आहे.

एकदां ( १७२९ ) नंदलालास पेशव्यानें जरब दाखविली होती. नंदलाल स. १७३१त मरण पावला. त्याप्रसंगीं त्याच्या पुत्रांचें समाधान करून बाजीराव व चिमणाजीआपा यांनीं त्यांचें पुढें यथायोग्य चालविण्याविषयीं अभिवचन दिलें. मल्हारराबानें तेजकर्णास ( नंदलालचा पुत्र )पालखी देऊन त्याच्या नेमणुकीबद्दल सालाचे ७०० रु. ठरविले. मंडलोईचा वाडा मराठयांच्या कमाविसदारांनीं आपल्याला राहण्यास घेतला होता तो परत दिला. [ राजवाडे खंड–६; मराठी रियासत, म. वि. ]

**नंदवंश**—मगधराज्याच्या शिशुनागवंशांतील शेवटचा राजा नंदिवर्धन अथवा महानंदिन् नांवाचा होता; त्याची एक राणी शूद्रा होती. तिच्यापासून त्याला महापद्मनंद नांवाचा मुलगा झाला. त्यानें बापाच्या पश्चात गादी बळकावली व याप्रमाणें या नंदवंशास प्रारंभ झाला ( ख्रि. पू. ३७२ ).या नंदवंशाची खरी व सुसंगत माहिती उपलब्ध होत नाहीं. हिंदू पुराणें, बौद्ध ( महावंश, दीपवंश, अशोकावदान वगैरे ) पुराणें व जैन पुराणें यांच्या परस्पर माहितींत एकवाक्यता नसून जास्त घोंटाळे आहेत. हिंदू पुराणकार नऊ नंदांचीं नांवें व पिढ्या ( बाप व त्याचीं आठ मुलें ) देतात, मात्र त्यांचा काल भरमसाट सांगतात; महापद्म याचा काल ८८ आणि आठ मुलांचा १२ वर्षें देतात. मुलांच्या नांवांतहि संगति नाहीं. वडील मुलाचें नांव सुकल्प असें आढळतें. एकंदर या दोन पिढ्यांचा काल १०० वर्षें या पुराणकारांनीं बसविला आहे; जैनग्रंथ तर १५५ वर्षें सांगतात. [ ज्ञा. को. वि. ४ पहा. ]

अलेक्झांडरच्या वेळचे लेखक व मेग्यास्थेनीस यांची माहिती दुय्यम दर्जाची आहे. अलेक्झांडरची अडवणूक ज्यावेळीं हीफासीस ( ख्रि. पू. ३२६ ) येथें झाली त्यावेळीं गंगारीदे व प्रासी ( प्राची? ) देशावर अग्रम्मेस या नांवाचा राजा होता व त्याच्याजवळ २० हजार घोडदळ, २ लाख पायदळ, २ हजार रथ व ३ हजार गजदळ असून तो अत्यंत श्रीमंत होता, अशी बातमी अलेक्झांडरास पौरस राजाकडून मिळाली होती. हा राजा बहुतकरून या नंदवंशांतील महापद्म असावा असें विद्वानांचें म्हणणें आहे. महावंशांत धनानंदाचें नांव येतें व ह्युएनत्संग हाहि पर्यायानें या धनानंदाचा उल्लेख करतो. पाटलिपुत्रास असलेल्या अशोकाच्या पांच स्तूपांची मालकी एका दंतकथेनें या धनानंदाकडे जाते. तेथें त्यानें अगणित धन सांठवून ठेविलें होतें असें म्हणतात. मुद्राराक्षसांत चाणक्य हाहि नंद राजाच्या लोभीपणाबद्दल उद्गार काढतो ( अंक. १ ).

एकंदर हकीकतीवरून एवढें सार निघतें कीं, नंदवंश हा मूळचा हलक्या दर्जाचा असून त्यानें दोन पिढ्या राज्य केलें. त्याच्याजवळ असलेलें अफाट सैन्य शिशुनागवंशांतील राजांच्याच वेळचें असावें व त्याच्याच जोरावर त्यांनीं त्या वंशांतील शेवटच्या राजाच्या हातून ( त्याचा खून करून ? ) सत्ता हिसकावून घेतली असावी. नंदाच्या राज्यमर्यादेचा व कालाचा नक्की तपास लागत नाहीं. साधारणतः त्यांनीं ५० वर्षेंपर्यंत राज्य केलें असावें पुढें या शेवटच्या नंदराजास प्रख्यात चंद्रगुप्तानें हांकलून व सर्व नंदवंशाचा उत्खात करून राज्य घेतलें ( ख्रि. पू. ३२२ ). जैनांच्या उदयगिरी येथील खारवेलराजाच्या शिलालेखांत दोनदां नंदराजांचा उल्लेख आला आहे. हे राजे ब्रह्मद्वेष्टे होते म्हणून त्यांच्या कारकीर्दीचा स्पष्ट उल्लेख पुराणकारांनीं केला नाहीं असें ग्रियर्सन म्हणतो. साधारणतः नंदवंश हा ख्रि. पू. ३७२ ते ३२२ पर्यंत राज्य करीत असावा. नऊ या अंकास नंद अशी संज्ञा कालगणनेंत देतात. [ भागवत व विष्णुपुराण; मुद्राराक्षस; जर्नल रा. ए. सो. १९०८, १९००; एपि. इंडि. पु. १०. ]

**नंदादेवी**—ब्रिटिश हिंदुस्थानांतील एक सर्वोच्च शिखर. उ. अ. ३०°२३' व पू. रे. ७९° ७८'. हें संयुक्तप्रांतांतील अलमोरा जिल्हा अलमोरा तहशिलीमध्यें आहे. याचा आकार पिरॅमिडसारखा आहे. येथून निघणाऱ्या ढगांनां हिंदु लोक नंदादेवीच्या पाकघरांतील धूर असें म्हणतात.

**नंदिकेश्वर**—मुंबई, विजापूर जिल्हा.बदामी तालुक्यांतील एक खेडें. हें येथें असणाऱ्या महाकूटच्या देवालयसमुच्चयाकरितां व लिंगमांकरितां प्रसिद्ध आहे. महाकूट देवळाच्या सभोंवार भिंत असून या देवळाला कांहीं पायऱ्या आहेत. तेथील द्वारपाळ (या कोरीव मूर्ती असाव्यात) वातापि व इल्वल हे दोन राक्षस आहेत असा समज आहे. येथील देवालयें चालुक्य किंवा द्राविड पद्धतीचीं असून येथें विष्णु पुष्करणी नांवाचें कुंड आहे. या कुंडांत ब्रह्मयाची मूर्ति आहे.

दरवाज्याच्या ईशान्येस लज्जागौरीचें देवालय आहे. अशी कथा आहे कीं, देवी ( पार्वती ) व शिव हे जलक्रीडा करीत असतां एक भक्त दर्शनाकरितां आला. शिव देवळांत पळाले व पार्वती पाण्यांत गुप्त झाली. वांझ बायका या गौरीची पूजा करतात. जवळच एक पापविनाशी कुंड आहे. हें कृतयुगांत एका साधूनें बांधलें व हें महादेवाच्या घर्मापासून झालें आहे. महापुरेश्वर देवळावर ६ लेख आहेत. स. ६९६–७३३ चा एक लेख एका वेश्येच्या देणगीचा उल्लेख करतो व ९३४ तील लेख बाप्पुवरसच्या देणगीचा उल्लेख करितो. तिसऱ्यांत एका खांबाच्या देणगीचा उल्लेख केला आहे.

**नंदिगाम**—मद्रास, कृष्णा जिल्ह्यांतील पश्चिमेकडील तालुका. उ. अ. १६° ३६' ते १७° ३' व पू. रे. ८०°१ ते

८०° ३२'. क्षेत्रफळ ५३२ चौरस मैल. यांत मुंगल व लिंगगिरी या निझामाच्या मुलुखांतील जमीनादाऱ्यांचा समावेश होतो. लोकसंख्या(१९२१) १५५९८१.यांत जगग्यपेठ हें शहर व १६९ खेडीं आहेत. मुख्य शहर नंदिगाम. यांत कृष्णानदीला मिळणाऱ्या मुनेरु ( वरेसूसहित ) व पलेरु या नद्या आहेत.

**नंदिग्राम**—अयोध्येपासून एका कोसावर पूर्वी असलेला एक गांव. राम अरण्यांत गेला असतां येथें भरत १४ वर्षे राहिला होता.

**नंदी**—कामधेनूचा पुत्र व शिवगणांतील एक. याची सर्व आकृति मनुष्यासारखी असून मुख वानरासारखें आहे. भुज ऱ्हस्व आहेत. दक्षयज्ञविध्वंसकालीं यानें भग ऋत्विजास बद्ध केलें होतें. यानें रावणास शाप दिला होता. [भाग. चतुर्थ स्कं.अ, ५;वा. रामा. उत्तर. स. १५] नंदिक, नंदिकेश्वर शब्द याच अर्थाचे आहेत. प्रत्येक शिवालयांत नंदीची मूर्ति असते. लिंगायतांचा बसव हा नंदीचा अवतार समजत असल्यानें ज्या प्रांतांत ( उदा॰ म्हैसूर ) लिंगायत वर्चस्व आहे त्यांतून नंदीच्या मोठमोठ्या मूर्ती आहेत. एक नंदीपुराणहि आहे.

**नंदीकोतकूर**—मद्रास. कर्नूळ जिल्ह्यांतील उत्तरेकडील पोटविभाग व तालुका. उ. अ. १५° ३९' ते १६° १५ व पू. रे. ७८° ४' ते ७९° १४'. क्षेत्रफळ १३०८ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) १०४८८२. यांत १०२ खेडीं असून पैकीं ६ इनाम आहेत. हा सर्वांत मोठा तालुका आहे. परंतु हे पेक्षां जास्त ( म्हणजे सर्वांत ज्यास्त ) " रक्षित जंगल " आहे. याच्या सीमेवर कृष्णा व तुंगभद्रा वाहतात. वनवासी नदी तालुक्यांतून वाहत जाऊन संगमेश्वर या हिंदूंच्या पवित्रस्थानीं कृष्णेला मिळते. यांतून कर्नूळकडाप्पा कालवा जातो.सरासरी पाऊस २९ इंच पडतो. हवा रोगट असून ताप व पानथरीचे विकार यांचा बराच उपद्रव आहे.

**नंदीखेडें**—म्हैसूर, कोलार जिल्हा, चिक्कबल्लापूर तालुक्यांतील खेडें. लोकसंख्या (१९०१) १३१५. येथें चोलांच्या वेळेचें ११ व्या शतकांतील भोगनंदीश्वराचें देऊळ आहे परंतु आंगणांत याच्याहि २०० वर्षांपूर्वीचा ( ९ व्या शतकाचा ) लेख सांपडतो. १७९९ ते १८०८ पर्यंत येथें ब्रिटिशांचें लष्करी ठाणें होतें. येथें साखर व बटाटे उत्तम होतात. येथें शिवरात्रीला मोठा मेळा भरतो व बैल विकावयास येतात. येथें ' हैदर्स ड्रॉप ' नांवाची टेंकडी आहे. येथून हैदरच्या हुकुमानें अपराध्यांना कडेलोटाची शिक्षा होई. पूर्वेस एक मशीदहि आहे.

**नदीगांव**—मध्य हिंदुस्थान, दतिया संस्थान, नदीगांव परगण्याचें मुख्य शहर. हें पहूजनदीच्या पूर्व किनाऱ्यावर आहे. लोकसंख्या सुमारें चार हजार. या परगण्याचा मालक शिंद्याचा मांडलिक असून शिंद्यांनां ब्रिटिश सरकारमार्फत येथला मुख्य ९५०० रु. देतो. येथें पोस्टऑफिस व एक शाळा आहे. या गांवाला जी. आय. पी. च्या कानपूर शाखेवरील कुंच हें स्टेशन आहे.

**नंदीदुर्ग**—म्हैसूर. कोलार जिल्ह्याच्या पश्चिमभागांत असणारी ४८५१ फूट उंच व तटबंदी केलेली टेंकडी. पूर्वभागांतील हें सर्वोच्च शिखर असून हें पेन्नूकोंडा व बेल्लारी जिल्ह्यांच्या उत्तरेस असणाऱ्या पर्वतरांगेच्या टोंकाशीं आहे. याच्या शिखरावर मैदान व अमृतसरोवर नांवाचें तळें आहे. पश्चिम भागाखेरीजकरून या टेंकडीचा कडा भिंतीसारखा सरळ आहे. येथें पालार व अर्कावती या नद्यांचा उगम होतो. यावर जंगलहि बरेंच आहे. येथें पूर्वी गंग राजांचें ठाणें असून ते आपल्याला नंदगिरीचे अधिपती म्हणवीत. पुढें चोलांनीं येथें येऊन नंदगिरीचें नंदीगिरी असें नांव ठेविलें. १७७० सालीं ही मराठ्यांनीं घेतली व नंतर हैदर व टिप्पूसुलतान यांनीं येथें सुधारणा घडवून आणल्या. येथें एक ' टिप्पूज ड्रॉप ' नांवाचा कडा आहे. येथें अपराध्यांनां टिप्पू कडेलोटाची शिक्षा देत असे. १७९१ सालीं हें ब्रिटिशांनीं घेतलें व बरेच दिवस थंड हवेचें ठिकाण म्हणून येथें यूरोपियन लोक उन्हाळ्यांत रहात असत.

**नदुवत्तम**—मद्रास. नीलगिरी जिल्हा. उटकमंड तालुक्यांतील खेडें. येथून गुदलूर तालुका व दूरचा-मलबार वयनाद येथील फारच सुंदर देखावा दिसतो. हें उटकमंडहून गुदलूरला जाणाऱ्या मुख्य रस्त्यावर आहे. हें चहा व सिंकोना ( किनाईन ज्या झाडापासून काढतात तें ) यांच्या लागवडीचे मुख्य ठिकाण आहे. हें फार निरोगी ठिकाण असल्यामुळें जेव्हां गुदलूर येथें ताप वगैरेंचा उपद्रव होतो तेव्हां कचेऱ्या येथें नेतात.

**नंदुरबार, तालुका.**—मुंबई. पश्चिम खानदेशांतील एक तालुका. उत्तर अक्षांश २१° ते २१° ३२' व पूर्व रेखांश ७३° ३५' ते ७४° ३१'. क्षेत्रफळ ९९२ चौरस मैल. यांत नंदुरबार हें एकच व मुख्य शहर व २७५ खेडीं आहेत. लोकसंख्या ( १९११ ) ८३२७२. पश्चिमभागांत सह्याद्रीच्या कांहीं टेंकड्या आहेत पूर्वेकडील भाग उजाड आहे. हवा थंड असून सरासरी पाऊस २५ इंच पडतो. पाणी कमी असून फक्त तापी व शिवा याच नद्यांनां १२ महिने पाणी असतें. पाटाचेंहि पाणी असून, थोड्या फार बागाइती जमिनी आहेत. जंगल बरेंच असून त्यामुळें वाघाचा उपद्रव फार होतो.

**गांव.**—हा गांव खानदेशांतील फार जुन्या गांवांपैकीं एक असून धुळ्याच्या वायव्येस ३२ मैलांवर आहे. नंदुरबार तालुक्याचें हें ठाणें आहे. याचा नंदिगड या नांवानें कान्हेरि येथील लेण्यांतील शिलालेखांत उल्लेख आहे. हें गांव नंद गवळी यानें वसविलें असून मुसुलमानांच्या स्वारीपर्यंत तें त्याच्या वंशजांच्या ताब्यांत होतें असें म्हणतात. इब्न बतूता यानें आपल्या प्रवासवृत्तांत नंदुरबारचा उल्लेख केला आहे. खानदेशचा पहिला फरुकि राजा मलिकराज यानें सुलतानपूर व नंदुरबार हीं१७३०सालीं घेतलीं; परंतु सुलतान मुजफर

गुजराथी ह्याच्या स्वारीमुळें मलिकराजास थाळनेराकडे परत जावें लागलें. इ. स. १५३६ मध्यें महमुदशहा (तिसरा) हा गुजराथचा राजा झाल्यावर त्यानें असीरगडावर कैदेंत असतांना कबूल केल्याप्रमाणें सुलतानपूर व नंदुरबार हीं ठाणीं मुबारकखान फरुकि यांस दिलीं. मध्यंतरीं गुजराथच्या चेंगीझखानानें हीं पुन्हां घेतलीं होतीं परंतु त्यास लवकरच तीं सोडावीं लागलीं. अकबराच्या कारकीर्दीत हें सरकार (जिल्ह्या)चें ठाणें असून त्याचा वसूल पांच कोटी दाम असे. येथें टरबुजें व द्राक्षें होत असत. टॅव्हर्निअर यानेंहि असेंच म्हटलें असून हें फार भरभराटींत होतें असें म्हटलें आहे. सन १६६६ मध्यें येथें इंग्रजांनीं एक वखार घातली व ती चांगली चालल्यामुळें त्यांनीं अहमदाबादचा कारखाना (१६७० सालीं) येथें आणला व त्यांत तयार झालेला माल इंग्लंडांत पाठविण्यांत आला एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीच्या कालांत याचा नाश झाला.इ. स.१८१८ मध्यें हें गांव इंग्रजांच्या ताब्यांत आलें तेव्हां अर्धवट ओसाड होतें. येथून कापूस, जंवस, गहूं, रोशेल तेल वगैरे जिन्नस बाहेर जातात.

येथें कचेरी, कोर्टें, शाळा, पोष्ट व म्युनिसिपालिटी आहे. येथील जुना किल्ला मोडकळीस आलेला आहे. त्यांत दोन विहिरी आहेत. एका जुन्या मशिदीचे अवशेष असून तिच्या एका मनोऱ्यावर एक फारशी शिलालेख आहे. उत्तरेच्या बाजूस जुम्मामशीद असून ती एक देऊळ पाडून बांधली असें म्हणतात. याखेरीज दोन मशीदी आहेत. गांवाबाहेर ईशान्येच्या बाजूस एक देऊळ व एक मशीद असून तीवर,ती १५८३ (९९१ हिजरी) सालीं बांधल्याबद्दल शिलालेख आहे. रनाळा सडकेवर अवलगझनी नांवाची मशीद आहे. याखेरिज नदीवर एक जुनी मशीद असून तीमधील दोन थडग्यांवर फारशी लेख आहेत.

येथें एक रामाचें व एक विठ्ठलाचें देऊळ असून ४।५ तलाव आहेत. येथील सरदेसाई यांचें बरेंच जुनें घर आहे. लो.सं. दहा हजार आहे. येथें ताप्ती-व्हॅली रेल्वे झाल्यापासून व्यापार वाढत असून येथील स्टेशन महत्त्वाचें आहे. सुरत-मुंबईशीं व्यापार चालतो. कापूस पिंजण्याचे व गठ्ठे बांधण्याचे ४-५ कारखाने आहेत. [ लासेन, यूल. २; फेरिस्ता ४; ऐनें-इ-अकबरी. २; अँडर्सन—इंग्लिश इन वेस्टर्न इंडिया. ]

**नदौन इस्टेट**—पंजाब, कांग्रा जिल्हा. हमीरपूर तहशिलींतील एक इस्टेट. राजा संसारचंदाचा नातू येथील अधिपति असून तो कांग्रा येथील कटोच राजघराण्याचा पुरुष आहे. संसारचंदाचा अनौरस पुत्र जोधबीरचंद यानें आपल्या दोन बहिणी रणजितसिंगाला दिल्यामुळें तो नदौनचा राजा झाला. इ. स. १८४८ त जोधबीर इमानाला जागल्यामुळें ब्रिटिश सरकारनें त्याची जहागीर (त्यावेळेस तिचें उत्पन्न वर्षास २६२७० रु. होतें) कायम करून दिली. याच्या मुलानें १८५७ सालच्या बंडांत मदत करून "स्टार ऑफ मेरिट" ही पदवी मिळविली. १८६८ सालीं येथील राजाला के. सी. एस्. आय ही पदवी देवून ७ तोफांची सलामी दिली. यानंतर नरेंद्रचंद्र (हल्लींचा) हा गादीवर आला. त्याच्या जहागिरींत १४ खेडीं आहेत. याला मुनसिफ व ऑनररी मॅजिस्ट्रेटचे हक्क आहेत.

**नंद्याल, तालुका.**—मद्रास,कर्नूल जिल्ह्यांतील एक तालुका. उ. अक्षांश १५° २१' ते १५° ४२' व पू. रेखांश, ७८° ते ७८° ४७'. क्षेत्रफळ ६७९ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) ७४२०४. येथें मुसुलमानी वस्ती फार आहे. यांत नंद्याल हेंच मुख्य व एकच शहर असून खेडीं ९१ आहेत. याच्या पूर्वेस नल्लामलई व पश्चिमेस इर्रामल पहाड आहेत. यांतून कुंदेरू नदी वाहाते. याच्या मध्यांतून दक्षिणोत्तर कर्नूल-कडाप्पा कालवा आहे. बहुतेक जमीन काळी आहे. पाऊस सरासरी २८ इंच. हवा रोगी असून हिंवताप बहुधां सर्व वर्षभर असतो. यांत रक्षित जंगल ३५० चौरस मैल आहे.

**गांव.**—नंद्याल तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें कुंदेरूच्या उजव्या किनाऱ्यावर आहे. लोकसंख्या (१९११) १६२३०. या शहराच्या वरच्या भागास तलाव असून बहुतेक भाग ओलसर आहे व म्हणून हा भाग फार रोगट आहे. सदर्न मराठा रेल्वे सुरू झाल्यापासून नंद्याल भरभराटूं लागलें व हल्लीं तें धान्याच्या व्यापाराचें ठाणें आहे. यांत २ कापूस दाबण्याच्या गिरण्या व एक हायस्कूल आहे. हें कलावतूच्या कामाकरितां प्रसिद्ध आहे.

**नद्या व नालें**—नद्या व नाले यांच्या पाण्याच्या भूगर्भशास्त्रदृष्ट्या इतर पाण्याप्रमाणें दोन प्रकारच्या क्रिया आहेत; एक रासायनिक व दुसरी पाण्याच्या जोरामुळें होणारी.

**रासायनिक क्रिया.**—इतर पाण्याप्रमाणें नदी-नाले यांच्या पाण्यांत रासायनिक क्रिया घडवून आणण्याची शक्ति असते. या शक्तीमुळेंच नदीच्या पाण्यांत खनिज पदार्थ विरघळलेले असतात. विरघळलेल्या पदार्थांचें प्रमाण ऋतुमानावर व ज्या खडकावरून पाणी वाहतें त्या खडकावर अवलंबून असतें. परंतु सर्वसाधारणतः विचार केल्यास आतांपर्यंतच्या शोधांवरून असें दिसतें कीं पाण्याच्या प्रत्येक दहा हजार वजनाच्या भागांत दोन भाग विरघळलेले खनिज पदार्थ असतात व हेंच प्रमाण नेहमीं राहिल्यास प्रत्येक ५००० वर्षांनीं नदी आपल्या पाण्याच्या सांठ्याइतके खनिज पदार्थ विरघळलेल्या स्थितींत वाहून नेईल.

**नदीच्या पाण्याच्या जोरानें होणारीं कार्यें.**—हीं कार्यें तीन प्रकारचीं आहेत:-(१) गाळ, माती, रेती, वाळू व दगड उंच जागेकडून सखल जागेकडे नेणें, (२) दगड, वाळू, वगैरेंच्या मदतीनें नद्यांच्या कडा व पात्रें खरडून काढणें व (३) सर्व वाहून नेलेले दगड, वाळू वगैरे निरनिराळ्या ठिकाणीं सांठवून ठेवणें.

(१) दगड, वाळू वाहून नेण्याची क्रियाः—नदीचें पाणी साधारणतः स्वच्छ दिसलें तरी त्यांत तरंगत असलेले बारीक

कण नेहमीं असतातच. पाऊस पडला कीं नदीच्या पाण्याचा रंग तेव्हांच बदलतो. याचें कारण असें आहे कीं पावसाच्या पाण्यानें वाहून आलेली माती नदीच्या पाण्यांत मिसळून पाणी गढूळ होतें. पाऊस जोराचा असल्यास मोठाले दगड व खडकांचे कडपे सुद्धां नदीच्या पाण्यांत येतात. पुष्कळसे दगड पाण्याबरोबर वहात जात असतांना एकमेकांवर नदीच्या कांठावर व नदीच्या तळावर घांसून त्यांचा भुगा होतो व त्यामुळें नदीचें पाणी अधिकच गढूळ होतें. ज्या दगडांचा भुगा होत नाहीं त्यांची वाळू किंवा वाटोळे गोटे होऊन नदीच्या तळावरून सरकत जातात. नदीच्या पाण्यांत तरंगत असलेले किंवा तिच्या ओघाबरोबर घसरत जाणारे पदार्थ नदी किती सपाट्यानें नेऊं शकेल हें खालील गोष्टींवर अवलंबून आहे. (अ) पाण्याचा लोट व त्याचा वेग, (आ) वहात जाणाऱ्या पदार्थांचा आकार, आकृति व विशिष्टगुरुत्व आणि (इ) नदीच्या पाण्यांतील रासायनिक द्रव्यें.

(अ) पाण्याचा लोट जितका अधिक तितकी पाण्याची ढकलण्याची किंवा वाहून नेण्याची शक्ति अधिक, त्यामुळें कांहीं निमित्तानें पाणी वाढल्यास नदी अधिक दगड व गाळ नेऊं शकते. वेग वाढल्यास नदीची शक्ति फारच वाढते. पाण्याचा वेग ज्या प्रमाणांत वाढेल त्याच्या सहाव्या घाताइतकी वाहून नेण्याची पाण्याची शक्ति वाढते. वेग जर दुप्पट झाला तर वाहून नेण्याची शक्ति चौसष्टपट होते. यावरून वेग थोडा वाढला तरी शक्ति अतिशय वाढते हें सहज कळून येईल. पाण्याचा वेग मोजावयाचा तो तळाशीं असलेला वेग मोजला पाहिजे. पाण्याच्या पृष्ठभागाचा वेग मोजून पाण्याची खरी शक्ति कळणार नाहीं. पृष्ठभागीं वेग पुष्कळ असतो व तळाशीं कमी असतो आणि तळांतील वेगच ढकलण्याला उपयोगी पडतो.

(आ) दगडाच्या लहानमोठेपणावर पाण्याचें वाहून नेणें अवलंबून असतेंच परंतु तें दगडाच्या आकृतीवरहि अवलंबून असतें. कारण खांचा खोचा असलेल्या दगडापेक्षां वाटोळा दगड सहज वाहून नेला जातो. दगडाचें विशिष्टगुरुत्व पाण्याच्या दुप्पट, तिप्पट असतें परंतु कोणताहि पदार्थ पाण्यांत असला म्हणजे त्याचें वजन कमी भरतें. त्यामुळें पाण्याबाहेर अति वजनाचे व मोठे वाटणारे दगड पाण्यांत असले म्हणजे सहज वाहून नेले जातात.

(इ) पाण्यामध्यें कोणतींच रासायनिक द्रव्यें विरघळलेलीं नसल्यास त्यांत तरंगणारा बारीक गाळ तसाच तरंगत राहतो व तो लांबवर नेला जातो. परंतु पाण्यांत रासायनिक द्रव्यें असल्यास गाळ बसूं लागतो. आपण गढूळ पाणी घेऊन त्यांत तुरटीचे कांहीं वेढे उगाळल्यास थोड्याच वेळांत गाळ खालीं बसतो याचा पुष्कळांना अनुभव आहेच. त्याप्रमाणें पाण्यांत जिप्सम् (कर्पूर शिलाजित, शिरगोळा, खरगंधकित) वगैरे सारखे जे पदार्थ विरघळलेले असतात यांचा असाच परिणाम होतो व जो गाळ फार लांबवर गेला असता असा लवकरच खालीं बसतो. ज्याप्रमाणें खनिज व निर्जीव पदार्थ पाण्याबरोबर वहात जातात त्याप्रमाणें सजीव पदार्थहि वाहून जातात. मृत वनस्पती व प्राणी पाण्याच्या ओघानें वहात जाऊन एखाद्या ठिकाणीं आधार मिळाल्यास त्या ठिकाणीं सांठतात. नंतर तेथें त्यांस धरून गाळ व इतर पदार्थांचा थर होतो. अशा तऱ्हेचे थर मोठाल्या नद्यांच्या कांठाला किंवा मध्यभागीं तयार होऊन त्यांचीं बेटें बनतात व कित्येक वेळां त्यांची वाढ इतकी होते कीं नदींतील दळणवळण बंद होतें. एखादेवेळीं हे थर निसटून फार लांबवर वहात जातात. गंगानदींतील असे निसटलेले थर शंभर मैलपर्यंत समुद्रांत वाहून गेलेले आढळतात. नद्यांतील सर्व गाळ नेहमीं खनिज आणि निर्जीव पदार्थांचाच असतो असें नाहीं. पुष्कळ वेळां या गाळांत सूक्ष्म प्राणी व वनस्पती किंवा त्यांचें बीं असतें. गंगेच्या पाण्यांतील गाळांत शेंकडा बारा ते पंचवीसपर्यंत इंफ्यू झोरिआ असतात. नाईल नदीच्या पाण्यांतहि त्यांचें प्रमाण शेंकडा ५ तें १० असतें. नदीच्या पाण्याबरोबर वाहून जाणाऱ्या पदार्थांचें प्रमाण जसें पाण्यावर आणि पाण्याच्या वेगावर अवलंबून असतें तसेंच तें ज्या खडकावरून नदी वाहते त्यावरहि अवलंबून असतें. खडक मऊ असल्यास साहजिकच अधिक गाळ वाहून जातो. नदीच्या पाण्यानें नेहमीं थोडातरी गाळ वाहून जातच असतो परंतु ज्यावेळीं एकदम पुष्कळ पाऊस पडतो किंवा नदीच्या उगमापाशीं बर्फ वितळतो त्यावेळीं नदीला मोठा पूर येऊन पुष्कळच गाळ व दगड वाहून नेले जातात. गंगानदीच्या पाण्यांत पुराच्या दिवसांत वजनानें $\frac{१}{४२८}$ भाग व मापानें $\frac{१}{८५६}$ भाग गाळ असतो आणि वर्षभर सरासरी वजनानें $\frac{१}{५१०}$ भाग व मापानें $\frac{१}{१०११}$ भाग इतका गाळ असतो. नदीच्या तळावरून दगड वगैरे जड पदार्थ ढकलत नेले जातात त्यांचेंहि प्रमाण वरीलप्रमाणेंच कमीजास्त होतें. कित्येक वेळां नदीला डोंगराचा भाग कोसळून किंवा बर्फाचे कडपे पडून बांध बसतो व त्या ठिकाणीं तळ्यासारखें पाणी सांठतें. वरील बांध कांहीं दिवसांनीं एकाएकीं फुटून मोठाले खडक फार लांबवर नेले जातात व त्यामुळें आसपासच्या प्रांताचें फार नुकसान होतें; कारण नदीच्या दोन्ही कांठांवरील शेतें, घरें, जनावरें व माणसें या सर्वांचीच नासाडी होते.

(२) नदीच्या पाण्याची पोखरण्याची शक्तिः— पाण्याचा वेग, पाण्याबरोबर वाहणारा गाळ व दगड, नदीचा उतार व ज्या खडकावरून पाणी वाहतें तो खडक या सर्वांवर नदीच्या पाण्याची पोखरण्याची शक्ति अवलंबून असते. पाण्याच्या वेगानें दगड वाहूं लागले कीं एकमेकांवर घांसले जातात व त्याचप्रमाणें नदीच्या तळावर व कांठावर त्यांचें घर्षण होतें. दगड घांसले गेल्यानें त्यांचे कोपरे व कडा झिजतात आणि वाटोळे गोटे तयार होतात. हेच गोटे पुढें झिजत झिजत लहान होऊन त्यांची वाळू होते व शेवटीं

अगदीं बारीक कण होतात. घर्षणानें नदीचे कांठ व तळ हीं झिजतात आणि त्यायोगानें नदीचें पात्र रुंद व खोल होतें. कित्येक ठिकाणीं पाण्याचे भोंवरे तयार होतात. अशा जागीं पाण्याबरोबर दगड व वाळू एकसारखीं चक्रांत फिरविल्यासारखी फिरते त्यामुळें त्या दगडांचे व वाळूचे बारीक कण होतातच परंतु ज्या खडकावर भोंवरे फिरतात त्या खडकावर वाट्यांच्या आकाराचे लहान लहान खड्डे व मोठ्या आकाराचीं कुंडें तयार होतात.

धबधबेः—नदीच्या पात्राचें सहजगत्या निरीक्षण केलें तर असें दिसून येतें कीं नदीचा प्रवाह अगदीं सरळ एका दिशेनें न जातां सारखीं वळणें घेत जातो व बहुतेक सर्व नद्या व नाले नागमोडीसारखे असतात. ज्या प्रांतांतून नदी वाहते त्या ठिकाणीं मऊ खडक किंवा वाळुकामैदान असल्यास नदीचें पात्र रुंद व उथळ असतें परंतु जर खडक कठिण असला तर नदीचें पात्र अरुंद व खोल असतें. खडक एकदम बदलल्यास धबधबे होण्याचा संभव असतो. त्याचप्रमाणें कठिण खडकाला पुष्कळ भेगा असल्या व कठिण खडकाखालीं मऊ खडक असला तरी सुद्धां धबधबे होतात कारण भेगांतून पाणी खालीं जाऊन मऊ दगडांत शिरतें व मऊ दगड वाहून जाऊन वरच्या कठिण दगडाचे कडपे पडतात. या वरील वर्णनावरून असें स्पष्ट दिसून येतें कीं नदीनाल्यांतील पाण्याचें पोखरण्याचें काम सदोदित चालू असतें. परंतु यामध्यें असें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं नदीच्या पाण्यांत गाळ किंवा वाळू वगैरे जिन्नस बसल्यास पाण्याची खणण्याची क्रिया फारच थोडी असते. मोठाल्या तलावांतून निघणाऱ्या स्वच्छ पाण्याच्या नद्यांच्याकडून पोखरण्यानें काम जवळ जवळ मुळींच होत नाहीं असें म्हटलें तरी चालेल परंतु जेव्हां कांहीं अंतरावर गेल्यावर त्यांच्यांत वाळू वाहून येते त्याच्या पुढल्या पात्रांत त्याच नदीच्या पोखरण्याच्या शक्तीचीं स्पष्ट उदाहरणें दिसतात. यावरून असें समजलें पाहिजे कीं ज्या ठिकाणीं पाण्यांत वाळूसारखे पदार्थ वाहून नेले जात नाहींत त्या ठिकाणीं नदीची पोखरण्याची क्रिया फारच थोडी असते.पाणी वाळूला बळकटी आणून देतें परंतु प्रत्यक्ष खणण्याचें काम वाळूच करते.

(३) नदीची सांठविण्याची क्रियाः—नदीचें खणण्याचें व वाहून नेण्याचें काम सदोदित चालू असतें. परंतु वाहून नेलेले पदार्थ कोठेंतरी सांठवले पाहिजेतच. कोणतेहि पदार्थ नदीच्या पाण्याबरोबर वहात जाऊन शेवटीं समुद्रांतच पडले पाहिजेत, परंतु समुद्रांत जाऊन पडण्यापूर्वी त्यांचा मुक्काम निरनिराळ्या ठिकाणीं होतो व कांहीं पदार्थ हजारों वर्षें झालीं तरी समुद्रापर्यंत जाऊन पोहोंचत नाहींत. कोणत्याहि कारणानें पाण्याला अडथळा झाला, पाण्याचा वेग थांबला किंवा पाण्याचा साठा कमी झाला कीं ज्या प्रमाणांत जोर कमी झाला असेल त्या प्रमाणांत वाहून नेत असलेले जिन्नस नदी टाकून देते. डोंगरांत नदीचें पाणी फार जोरानें व खळखळून वहात असतं त्यावेळीं मोठाले खडक ढकलले जातात व तेंच पाणी खालीं दरींत पडल्यावर त्याचा जोर कमी होऊन डोंगरांतून आणलेले खडक व दगड वाळू यांचे ढीग डोंगराच्या पायथ्याशीं सोडून नदी पुढें वाहू लागते. त्याचप्रमाणें नदी दरी सोडून सपाट जमीनीवर येते तेव्हांहि असाच प्रकार घडतो.दरींतील पाण्याचा जोर सपाटीवर नसल्यानें पुष्कळ वाळू दरीच्या तोंडाशीं पडते.सपाटीवरून नदी वहात असतांना ज्या ज्या ठिकाणीं पाण्याचा वेग कमी होतो त्या त्या ठिकाणीं वाळू सांठते. नदी वळण घेतांना ज्या खडकाभोंवती वळते त्या खडकाच्या बाजूस पाण्याचा वेग दुसऱ्या तीरापेक्षां जास्त असतो म्हणून खडकाच्या बाजूस वाळू सांठत नाहीं, परंतु दुसऱ्या तीरावर सांठते. नदीला पूर आला म्हणजे दोन्ही तीरावर पाणी चढतें व पाणी कमी होतांना बरोबर आणलेला गाळ तीरावरच राहतो. कित्येक वेळां तीरावर गाळ इतका सांठतो कीं पुन्हां पूर आल्यास तितकें पाणी चढतच नाहीं व पूर्वीपेक्षा खालच्या जागीं गाळ सांठतो व अशा तऱ्हेनें नदीच्या दोन्ही तीरावर वाळूच्या पायऱ्या तयार होतात.

नदी तळ्यांत शिरतांना तिच्या पाण्याचा वेग तळ्यांतील स्थिर पाण्याच्या अडथळ्यानें कमी होतो व ती जसजशी पुढें जाते तसतशी पाण्याबरोबर आणलेला दगड व वाळूचा भाग टाकीत जाते.नदी जेथें तळ्यांत शिरते तेथें मोठाल्या आकाराचे व जड पदार्थ खालीं पडतात व त्या ठिकाणीं नदीचें पाणी तळ्यांतील पाण्याइतकें स्थिर होतें त्या ठिकाणीं अगदीं बारीक कण सुद्धां खालीं पडतात. नदीचें पाणी तळ्यांत शिरल्याबरोबर पंख्यासारखें पसरतें त्यामुळें जो गाळ खालीं बसतो त्यालाहि पंख्याचा आकार असतो.

समुद्राचें पाणी शांत असल्यास तळ्याप्रमाणेंच समुद्रांतहि पंख्याच्या आकाराचा गाळाचा व वाळूचा ढीग पडेल, परंतु समुद्राच्या लाटांमुळें समुद्रांत जात असलेला गाळ नदीच्या पात्रांत फेंकला जातो. नदीचा पूर आणि समुद्राच्या लाटा यांच्या तडाक्यांत गाळ पुष्कळ वेळां हेलकावे खात राहतो व शेवटीं समुद्रांत कायमचा फेंकला जातो. नदी फार जोरानें वहात असल्यास तींत दगड, गाळ व वाळू पुष्कळ असतें. असें पाणी समुद्रांत शिरलें कीं त्याची पुष्कळ शक्ति कमी होते. समुद्रानें पाणी नदीच्या पाण्यापेक्षां जड असतें म्हणून नदीचें पाणी समुद्राच्या पाण्यावर तरंगतें व गाळ वगैरे जिन्नस खालीं बसतात. त्याचप्रमाणें समुद्राचें पाणी नदीच्या पाण्यांत मिसळलें कीं नदीच्या पाण्याची पदार्थ तरंगत ठेवण्याची शक्ति कमी होते. जेथें नदीच्या तोंडाशीं दांडी तयार होत नाहीं अशा ठिकाणीं वाळू समुद्रांत किनाऱ्याच्या बाजूनें सांठत जाते व समुद्रकिनाऱ्याची रुंदी वाढते. कांहीं ठिकाणीं समुद्राच्या बाजूकडे वाळवंटें वगैरे जास्त उंचवटा होऊन किनाऱ्याकडील सखल जागेंत पाणी सांठतें व पुढें त्याचें तळें होऊं शकतें. त्याचप्रमाणें हें तळें भरूं लागल्यास

त्या ठिकाणीं दलदलीचीं ठिकाणें तयार होतात. कित्येक प्रसंगीं नदीचा गाळ समुद्रकिनाऱ्यावर सांठतो व पाण्याला एक प्रकारचा अडथळा तयार होतो. असें झालें म्हणजे नदी दुभंग होऊन तिचे दोन्ही फांटे दोन बाजूंनीं गाळाला वळसा घालून समुद्रास मिळतात. पुन्हां गाळ साठून प्रत्येक फाटा दुभंगतो व असें होऊन शेवटीं पुष्कळशा फाटयांनीं नदी समुद्रास मिळतात. ज्याठिकाणीं वरीलप्रमाणें नदी दुभंगू लागते त्या ठिकाणीं मुखप्रदेश तयार होतो. नाईल नदी किंवा गंगा नदी यांचे मुखप्रदेश फार मोठे असल्याचें प्रसिद्ध आहेच.

**ननसरी जमीनदारी**—मध्यप्रांत, जिल्हा भंडारा. बाग नदीच्या तीरावर आमगांवच्या उत्तरेस ही जमीनदारी आहे. इ. स. १८१४ मध्यें ही जमीनदारी एका महाराष्ट्र ब्राह्मणास मिळाली. पुढें या घराण्याकडे लांजीच्या कमाविसदाराचें काम होतें. लोकसंख्या सुमारें पांच हजार. जमीनदारीचें एकंदर उत्पन्न ( १९०८ ) ५००० रुपये [ भंडारा डिस्ट्रिक्ट ग्याझे. ]

**नॅन्ट्स**—पश्चिम फ्रान्स. लॉयर इन्फेरीअर विभागाचें मुख्य शहर. लॉयरच्या मुखापासून ३५ मैलांवर उजव्या तीरावर हें वसलें आहे. ब्रिटनीमध्यें लोकसंख्येच्या बाबतींत नॅन्ट्स पहिलें शहर आहे. लोकसंख्या (१९११) १७०५३५. येथील बंदरांत २० फूट १० इंची जहाजें येऊं शकतात. येथील डॉब्रे नांवाच्या पदार्थसंग्रहालयांत जुने ऐतिहासिक लेख व इतर वस्तू यांचा संग्रह असून तसबिरी वगैरेहि आहेत. येथें अदालत कचेरी व ११ व्या सेनाभागाचें (आर्मीकोअर) मुख्य ठाणें आहे. शिवाय पहिल्या प्रतीची न्यायकचेरी, व्यापारी न्यायकचेरी, दलालमंडळ, वणिक्सभा, व फ्रान्समधील पेढीची शाखा या संस्था आहेत. विद्याखात्यांत प्रवचनमठ, मुलींची शाळा, वैद्यकशाळा, दवाखाना व इतर विविध संस्था आहेत. मूकविद्यालयेंहि आहेत. साखर शुद्ध करण्याचे कारखाने, तांदूळ कांडण्याचे, साबू तयार करण्याचे व तेल काढण्याचे कारखाने मुख्य आहेत. कोळसा व इतर सर्पण हा मुख्य आयात माल असून निर्गत मालांत वंकरकोळसा, पायराइट स्लेट्स्, हीं येतात.

रोमन लोकांच्या अमलाखालीं हें शहर व्यापाराचें व राज्यकारभाराचें केंद्र होतें. सेंट क्लेयर यानें तिसऱ्या शतकाच्या मध्यकालांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला. स. ५६० मध्यें १ ल्या क्लाटेअरला हें शहर मिळाल्यावर त्यानें सेंट फेलिक्स नांवाच्या धर्माधिकाऱ्यास येथील कारभार सांगितला. शार्लमेन यानें पुष्कळ वेळां हें पादाक्रांत केल्यानंतर ब्रिटनीनें त्याच्या पश्चात बंड उभारलें व ८४२ मध्यें नामिनो राजा झाला. ८४३ पासून ९३६ पावेतों हें शहर नार्मन लोकांकडे होतें. स. १५६० मध्यें दुसऱ्या फ्रान्सिस यानें नॅन्ट्सला कॉम्यूनची संस्था दिली. १५ व १६ व्या शतकांत कित्येक साथींमुळें शहराचें फार नुकसान झालें.

' एडिक्ट ऑफ नॅन्टीज ' ही ह्यूजेनॉट लोकांची स्वातंत्र्याची सनद असून तिच्यावर १५९८ सालीं येथील ड्यूकनें सही केली; पण १६८५ सालीं १४ व्या लुईनें ही सनद रद्द केली. स. १७८९ च्या राज्यक्रांतीस अनुकूल झाल्यामुळें स. १७९३ मध्यें या शहराला बराच त्रास पोंचला.

**नन्नयभट्ट**—एक तेलगू कवि. हा इ. स. ११ व्या शतकांत होऊन गेला. यानें प्रथमतः लहानपणीं वेदाध्ययन करून नंतर शास्त्राभ्यास केला. हा याज्ञिक क्रियेंत चांगला निष्णात असे. यानें स्वतः सोमादि यज्ञहि केले होते. यानें एक तेलगी भाषेचें जें व्याकरण केलें आहे त्यास आंध्र कौमुदी असें नांव आहे. यानें नारायणभट्ट नामक एका तैलंग ब्राह्मणाच्या साहाय्यानें महाभारताच्या पहिल्या दोन पर्वांचें तेलगींत जें भाषांतर केलें तें फारच उत्कृष्ट झालेलें आहे. [ ' तेलगू वाङ्मय ' पहा. ]

**नन्निलम**, तालुका.—मद्रास, तंजावर जिल्ह्यांतील पूर्वेकडील एक तालुका. उत्तरअक्षांश १०° ४४' ते ११° १' व पूर्व रेखांश ७९° २७' ते ७९° ५१'. क्षेत्रफळ २९१ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) २०६७२६. मुख्य शहर नन्निलम, याखेरीज कुदवासल हें दुसरें मोठें शहर असून खेडीं २४४ आहेत. येथें पाऊस सरासरी वर्षास ४४–४६ इंच पडतो. येथें कालव्यांनीं बऱ्याच जमिनीला पाणी पुरवितात.

गां व.—नन्निलम तहशिलीचें मुख्य ठिकाण. लो. सं. (१९११) ५३८२. येथें विणकाम लहान प्रमाणांत होतें. या शहरापासून तीन मैलांवर रेल्वेस्टेशन आहे. येथें एक मधुवनेश्वर स्वामीचें देऊळ असून देवळाजवळ रानटी मधमाशा मधाचीं पोळीं तयार करतात म्हणून याकडे लोक जरा आश्चर्यानें पहातात.

**नॅन्सी**—फ्रान्स देशाच्या ईशान्य भागांतील एक शहर. पूर्वी लॉरेन प्रांताचें हें मुख्य शहर होतें. सांप्रत मॅर्थे-एट-मॉसेल विभागाचें हें मुख्य शहर आहे. पॅरिसपासून पूर्वेकडे २१९ मैलांवर, स्ट्रासबुर्गला जाणाऱ्या रेल्वेवर हें मॅर्थेच्या तीरावर मार्नेऱ्हाइनच्या कालव्यापासून ६ मैल वरच्या बाजूस शहर वसलें आहे. येथील लोकसंख्या १९११ सालीं ११९९४९ होती.

नॅन्सी हें धर्माधिकारी व प्रिफेक्ट यांचें रहाण्याचें ठिकाण असून अपीलकचेरी, अदालत कचेरी व विसाव्या आर्मीकोरचें मुख्य ठाणें आहे. हें शहर शैक्षणिक विभागाचें मुख्य ठिकाण असून येथें कायदे, वैद्यक, शास्त्र व वाङ्मयशाखेचीं महाविद्यालयें आहेत. कनिष्ठ दर्जाची न्यायकचेरी व व्यापारी न्यायकचेरी, दलालमंडळ, प्रवचनमठ व शिक्षक तयार करण्याची शाळा, धर्मशिक्षणाची शाळा, शेतकीची शाळा, जंगलशिक्षणाची शाळा वगैरे संस्था आहेत. लोंकरी व सुती कापडाचे कारखाने, बूट, गवती टोप्या, मातीचीं भांडीं वगैरे तयार करण्याचे कारखानेहि आहेत.

१२ व्या शतकांत लोरेन ड्यूक यांची राजधानी येथें स्थापन करण्यांत आली. १४७७साली २ऱ्या रेने यानें चार्लस दि बोल्डचा येथें पराभव करून प्रवेशद्वारावर त्याला ठार केलें. तिसऱ्या चार्लसनें या शहरास वाढवून पुनः शहराची तटबंदी केली. १६३३ साली फ्रेंचांनीं हें शहर घेतलें. १६९७ सालीं रिसविकच्या तहान्वयें हें शहर परत दिलें गेलें व ड्यूक लिओपोल्ड यानें या शहरास पूर्वस्थितीस आणण्याच्या विचारानें त्याची डागडुजी करून विद्यापीठ व कारखान्यांची स्थापना केली व नवें शहर बनविण्याच्या विचारास लागला. पुढें स्टानिस्लास लेझिन्स्की यानें तें काम तडीस नेलें. १७६६ सालीं हें शहर फ्रेंच लोकांकडे आलें व १८१४-१८१५ सालीं दोस्तराष्ट्रांनीं घेतलें. १८७० सालीं प्रशियन लोकांनीं जिंकल्यावर खंडणी घेऊन तें पुन्हां फ्रेंचांच्या स्वाधीन केलें.

**नपुटा**—दक्षिण ब्रह्मदेश, बेसिन जिल्ह्यांतील दक्षिणेकडील इरावती नदीच्या मुखप्रदेशाच्या अगदीं नैर्ऋत्य कोपऱ्यांतील एक पोटविभाग. क्षेत्रफळ १४५७ चौरस मैल. पश्चिम व दक्षिण सरहद्दीवर समुद्र असल्यामुळें व पश्चिम भागांत आराकानयोमा ह्या डोंगराच्या ओळीमुळें येथील जमीन पिकाऊ नाहीं. लोकसंख्या(१९११)४६३८०. यांत खेडीं११० नपुटा हें मुख्य ठाणें असून तें बेसिन नदीच्या पूर्व किनाऱ्यावर वसलेलें आहे व खुद्द बेसिन शहराच्या दक्षिणेस १६ मैल लांब आहे. येथें मीठ तयार करतात.

**नंबियसन**—अंबलवासी जातिसमूहांपैकीं एक वर्ग. पुष्पकन हें या जातीचें सर्वसाधारण नांव आहे. हे माळ्याचा धंदा करतात. त्यांच्या बायकांनां पुष्पनी किंवा ब्राह्मणी असें म्हणतात आणि त्या भद्रकालीच्या देवळांत व नायरादि लोकांच्या तालीबंधनाच्या वेळेस कांहीं गाणीं म्हणतात. चक्कियर, थियत्तनी व चेंगझी नंबियर यांच्याशिवाय अंबलवासियांमध्यें हा एवढाच वर्ग यज्ञोपवीत धारण करतो. [ से. रि. पु. १८ ( १९११)].

**नंबुद्रि**—मद्रास इलाख्यांतील एक ब्राह्मण जात. यांनां मलय ब्राह्मण म्हणतात. ते लग्न व वडिलोपार्जित मिळकतीच्या वांटणीमध्यें मक्कतयम शास्त्र प्रमाण मानतात ( त्या कायद्यानें चालतात ) परंतु वडील मुलगाच फक्त नियमानें आपल्या जातींत विवाह करतो. त्याला एका स्त्रीपासून संतति न झाली तर,तिसाठीं अनेक स्त्रिया करण्यास मोकळीक आहे. तो संततीवांचून मरण पावल्यास त्याच्या धाकट्या भावास लग्न करण्याची परवानगी असते. एखाद्या ज्येष्ठ बंधूस पुष्कळ बहिणी असून त्यांचीं लग्नें करण्याचें त्यास सामर्थ्य नसेल तर तो त्यांनां दुसऱ्या कुटुंबांत देऊन त्यांच्याबद्दल स्वतःला बायका करून घेतो. या अनेक बायकांपैकीं जिचा मुलगा सर्वांत वडील असेल त्यालाच लग्न करण्याचा अधिकार प्राप्त होतो. बाकीचे मुलगे नायर, अंबलवासी व क्षत्रिय यांच्या बायकांशीं 'संबंधम् विवाह' करतात. त्यांच्या बायका पडदा पाळतात व त्यांस अंतर्जना किंवा अकत्तमा ( पडदानशीन स्त्रिया ). असें म्हणतात. त्यांचा बहुतकरून ऋतु प्राप्त झाल्यानंतर विवाह होतो. सध्यां या ब्राह्मणांत मुली १२ते२० वर्षें वयापर्यंत अविवाहित असतात यांचें कारण ऋतुस्नात होण्यापूर्वी लग्न न करणें व कुटुंबांतील फक्त वडील मुलास लग्न करतां येतें त्यामुळें नवरा मिळण्याची पडणारी पंचाईत पडते. संस्कारविषयक कांहीं हक्कावरून या ब्राह्मणांचे दहा पोटभाग आहेत. त्यांपैकीं सर्वांत वरिष्ठ वर्गाला १० हक्क आहेत. त्यांच्याहून हलक्या वर्गास ९, ८ याप्रमाणें हक्क आहेत. फक्त पहिले ६ वर्ग वेदांचें अध्ययन करूं शकतात. वैदिक नंबुद्रीमध्यें पुन्हां तीन वर्ग आहेत. अध्यन हे सर्वांत श्रेष्ठ, त्यांच्याहून कमी प्रतीचें अस्यन आणि सर्वांत कनिष्ठ दर्जाचें सामन्यन. अस्यन हे यज्ञादि कामें करूं शकतात. सामन्यन यांस तसें करण्याचा अधिकार नाहीं. आणि अध्यन, हे यज्ञ वगैरे करणें कमीपणा समजतात. वैदिक नंबुद्रीमध्यें कांहीं परंपरागत तंत्री आहेत. ते सर्वांत श्रेष्ठ पुजारी असून देवळामधील संस्कारांमध्यें ते सांगतील त्या गोष्टी प्रमाण आहेत. दुसरे वाधयन, हे यज्ञामधील मुख्य ऋत्विज असून त्रिचुर, तिरुनवय आणि वैधिकान येथील वेदशाळेचे मुख्य अध्यापक आहेत.

ते जातीसंबंधानें सर्व गोष्टींत शास्त्राधार देतात व स्मार्तन हे पंचायतीचे अध्यक्ष असतात. वैदिकेतर नंबुद्रींच्या पुष्कळ पोटजाती आहेत. त्यांच्यांतील मुसद किंवा अष्टवैद्यांचा परंपरागत धंदा वैद्यकीचा आहे. दुसरे शस्त्रांगकार ( किंवा जास्त बरोबर क्षत्रांगकार )हे यांचे पूर्वज लढाईचा धंदा करीत होते असें म्हणतात. तिसरे ग्रामी हे नंबुरी वसाहतीमध्यें कारभार पाहात असत. इतर ब्राह्मणांप्रमाणें नंबुद्रि ब्राह्मणांमध्येंहि गोत्रें असून गोत्रांतरविवाह प्रचलित आहे. ते वृद्धि व सुतक १० दिवस पाळतात.

**नमूचि**—इंद्रानें मारिलेला एक दैत्य. जेव्हां इंद्रानें सर्व असुरांनां जिंकलें तेव्हां एकटा हाच जिंकण्याचा राहिला. दिवसां किंवा रात्रीं ओल्यानें किंवा वाळलेल्यानें मी मारला जाऊं नये हा वर इंद्रापासून त्यानें मिळविला. पुढें इंद्रानें संधिप्रकाशांत पाण्याच्या फेसानें याचें मस्तक उडविलें. या कथेचें बीज प्रथम ऋग्वेदांत आढळतें. शतपथ ब्राह्मणांत व महाभारतांत या कथेचा विस्तार केला आहे.

**नम्माळवार**—एक वैष्णवपंथी तामिळ कवि. याच्यापूर्वी चार आळवार होऊन गेले पण ते फार प्रसिद्ध नव्हते.('आळवार' पहा ). ताम्रपर्णीच्या तीरावर असलेल्या शिरुकुरुहुर नांवाच्या गांवीं करियर वेल्लाळ राहात असे. तो व त्याचे पूर्वज विष्णुभक्त असत. त्याला बरेच दिवस संतान नव्हतें. पुढें देवाला नवस केल्यावर एक मुलगा झाला. हा मुलगा डोळे उघडीत नसे, हूं कां चूं करीत नसे किंवा, अंगावर दूधहि पीत नसे. तेव्हां त्याच्या आईबापांनीं बाराव्या दिवशीं नदीच्या कांठीं असलेल्या विष्णूच्या देवळांत त्याला नेऊन तेथें जवळच चिंचेच्या झाडाखालीं पाळण्यांत ठेऊन दिला. असा विचित्र

मुलगा आपल्याजवळ बाळगण्यापेक्षां देवाच्या हवालीं केलेला बरा असा विचार करून ते घरीं गेले. या मुलाचें नांव मरन ठेविलें होतें. तो अशा स्थितींत वाढून सोळा वर्षांचा झाला. पुढें अशी कथा सांगतात कीं, मधुरकवि नांवाच्या एका विद्वान सामवेदी ब्राह्मणाला दृष्टांत होऊन तो या ठिकाणीं आला व त्यानें चिंचेच्या झाडाखालीं डोळे झांकून पडलेल्या या प्राण्याला पाहिलें. तेव्हां आश्चर्य वाटून त्यानें एक मोठा धोंडा मरनच्या समोर आदळला. त्याबरोबर सोळा वर्षें झांकलेले आपले डोळे मरननें उघडून मधुरकवीकडे पाहिलें. तेव्हां या मुलाचे विचार तरी काय आहेत हें अजमावण्याकरितां मधुरकवीनें एक वेदांतातील प्रश्न टाकला.तेव्हां मरनकडून त्याला ताबडतोब सूत्रबद्ध सुंदर उत्तर मिळालें.

या मुलाचा विचित्र जन्म, असाधारण विद्वत्ता व दैवी दृष्टि पाहून मधुरकवि चकित झाला. व मरनचें शिष्यत्व पत्करून त्याच्याजवळ राहिला. या मधुरकवीच्या सुखकर संगतीमुळें मरनला काव्यस्फूर्ति झाली. याच्या सर्व कविता मधुरकवीनें ताडपत्रांवर काळजीपूर्वक लिहून घेऊन नम्माळवारच्या मृत्यूनंतर त्या प्रसिद्ध केल्या. त्या पाण्ड्य राजाच्या दरबारांत ३०० पंडितांच्या सभेंत मधुरकवीनें म्हणून दाखवून त्यांचें महत्त्व प्रस्थापित केलें.

दृष्टि प्राप्त झाल्यावर नम्माळवारानें पुढें काय केलें, त्याचें आयुष्य कोणत्या प्रकारचें होतें वगैरेंबद्दल कांहीं माहिती मिळत नाहीं. वरील माहितीसुद्धां दंतकथेसारखी आहे.

तामिळ भाषेंत गूढ व भावनामय काव्य करणारा हा पहिला कवि होय. त्याच्या उक्तींत औत्सुक्य व प्रेम दिसून येतें. त्याप्रमाणें सृष्टिसौंदर्य जागजागीं वर्णन केलेलें आढळतें. कदाचित् उपजल्यापासून सृष्टीकडे सारखें लक्ष असल्यामुळें सृष्टिप्रेम त्याच्यांत उपजलें असावें. नम्माळवार पसतीस वर्षांचा होऊन वारला. मधुरकवीनें याची स्मृति जागविण्यासाठीं बरीच खटपट केली. थिरुकुरुहुर येथें त्याची मूर्ति असून त्याठिकाणीं यात्रा भरते. नम्माळवाराच्या हजार कवितांच्या संग्रहाला "तिरुवोयमोळि" असें नांव आहे. सामवेदाचा निष्कर्ष त्यांत आहे. श्रीरंगमच्या देवळांत या ग्रंथाचें पठण होत असतें. वेदाचा अर्थ खालच्या लोकांत व लौकिक (तामिळ) भाषेंत आणण्याचा प्रयत्न नम्माळवारानें केला हेंच त्याचें मुख्य कार्य होय.

शैवपंथ तामिळ प्रदेशांत स्थापण्याचें जें कार्य अप्परनें केलें तेंच वैष्णवपंथ स्थापून नम्माळवारानें केलें. दोघांनींहि आस्तिक्यवादाला दुजोरा देऊन बौद्ध व जैन धर्मांचें उच्चाटण केलें. या दोघां शैव व वैष्णव वेल्लाळ कवींच्या कविता तामिळी काव्याच्या मध्ययुगांत अति उच्च दर्जाच्या गणल्या जातात. नम्माळवाराच्या ग्रंथांनां "द्राविड वेद" म्हणतात. यावरून त्याच्या काव्याची योग्यता किती मानतात हें समजून येईल. या द्रविडवेदांत वेदांचा सारांश तामिळ भाषेंत आणलेला आहे. शतगोपदासर, तिरुवळुदिनाडूदासर व कुरुगैकावलन हीं दुसरीं नांवें नम्माळवाराला होतीं.

नम्माळवाराच्या कालाविषयीं मतभेद आहे. कोणी त्याला नवव्या शतकांत घालतात तर कोणी पांचव्यापासून सातव्या शतकाच्या अवधींत तो होऊन गेला असावा असें निश्चित करितात. वैष्णवपंथाच्या उदयास केव्हांपासून सुरवात झाली हें ठरविलें असतां त्याचा काळ अजमावतां येईल असें वाटतें. [डॉ. हुलटझ; नटेसन चरित्रमाला; अय्यंगार—एन्शन्ट इंडिया.]

**नम्हकोक** (ब्रह्मी नांकोक)—ब्रह्मदेश, दक्षिण शान संस्थानांतील मध्यवर्ती संस्थान. उ. अ. २०° ३३′ ते २०° ४७′ व पू. रे. ९७° ११′ ते ९७° २१′. क्षेत्रफळ १०८ चौरस मैल. मुख्य पिकें तांदूळ, भाजीपाला, नीळ व थांतपेत. लोकसंख्या (१९११) ६९२०. यांत ७२ खेडीं आहेत. यांत शान व तांगयस या जातींचे लोक निम्मे निम्मे आहेत. म्याओझा हा नम्हकोट येथें राहतो. १९०३–४ सालीं करापासून—मुख्यत्वेंकरून थाथमिडा करापासून—८८०० रु. उत्पन्न आलें. पैकीं ४५०० ब्रिटिश सरकारला खंडणी म्हणून गेलें.

**नयागढ संस्थान**—बंगाल्यांतील एक मांडलिक संस्थान उ. अ. १९° ५३′ ते २०° २०′ व पू. रे. ८४° ४८′ ते ८५° १५′. क्षेत्रफळ ५८८ चौरस मैल. लोकसंख्या (१९०१) १४०७७९. येथील नैसर्गिक देखावा चांगला आहे. निर्गत माल तांदूळ, कापूस, ऊंस व तेलाचें बीं. दक्षिणेकडील खोंड लोकांनीं स. १८९४ मध्यें याला फार त्रास दिला. हें संस्थान ५०० वर्षांपूर्वीं रेवा येथील राजघराण्यांतील एका पुरुषानें स्थापिलें. खंडपारा-पूर्वीचा नयागड संस्थानांतील भाग-२०० वर्षांपूर्वीं स्वतंत्र झाला. नयागढचें एकंदर उत्पन्न १२०००० रुपये असून त्यापैकीं ५५२५ रुपये ब्रि. सरकारला खंडणीच्या रूपानें द्यावे लागतात. खेडीं एकंदर ७७५. मुख्य खेडें नयागढ असून तेथें राजा राहतो. येथें एक मिडलस्कूल, ३ अप्पर प्रायमरी व ४८ लोअर-प्रायमरी शाळा आहेत. तसेंच एक दवाखाना आहे.

**नरक**—'स्वर्ग व नरक' पहा.

**नरकासुर**—हा भूमीचा पुत्र म्हणून यास भौमासुर असेंहि नांव होतें. हा प्राग्ज्योतिषपुरचा राजा होता. हा मोठा बलाढ्य होता. यानें देवास मोठी पीडा देऊन अनेक कन्यका हरण केल्या. तेव्हां कृष्णानें आश्विन वद्य १४ स त्याचा वध केला. हा दिवस दिवाळीचा आरंभ मानितात.

**नरखेड**—मध्यप्रांत, नागपुर जिल्हा, काटोल तहशील. काटोलपासून १५ मैल आणि नागपूरपासून ४४ मैल. उ. अ. २१° २९′ व पू. रे. ७८° ३२′. हा एक महत्त्वाचा शेतीचा गांव आहे. लोकसंख्या (१९११) ६२०३. हें गांव मानस नांवाच्या लढवय्या जातीनें वसविलें असावें असें म्हणतात. हे वऱ्हाडांत लुटालूट करण्यास जात असून पेंढारी लोकांचे हल्ले परतवीत असत.

**नरगुंद**—मुंबई, धारवाड जिल्हा. नवलगुंदच्या उत्तरेस १२ मैल व हुबळी–विजापूर रस्त्यावर १० हजार लोकवस्तीचा डोंगरपायथ्याशीं वसलेला एक गांव. इ. स. १८७१ मध्यें येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें व्यापार बराच चालतो. येथील पडक्या किल्ल्याचें क्षेत्रफळ ३८८ एकर आहे. किल्ल्यांत चार पांच कोरडे तलाव, अंबरखाना व दारूखाना वगैरे ठिकाणें आहेत. हा किल्ला मोडकळीस येण्यापूर्वी बराच भक्कम होता.

येथें शंकरलिंग व महाबळेश्वर यांचीं देवळें असून जोड हनुमंताच्या लहानशा देवळांत स. ११४७ सालचा एक शिलालेख आहे. येथील व्यंकटेशाचें देवालय रामदुर्ग संस्थानचा संस्थापक रामराव यानें एक लाख रुपये खर्च करून बांधलें ( १७२० ). देवळास २२१० रुपयांची जमीन इनाम असून दरसालीं १३२० रुपये नक्त इनाम आहे. स. १७९२ सालीं रामदुर्ग संस्थानाच्या वांटण्या झाल्या; त्यावेळीं नरगुंद शाखेकडे हें देऊळ आलें. स.१८५८सालीं देवळांतील देवाची मूर्ति भंगली व देवळाची पडझड झाली. नंतर रामदुर्गकरांनीं पुन्हां देवाची प्रतिष्ठा केली. येथें आश्विन शु॥ पौर्णिमेस जत्रा भरते. बारा दिवस जत्रा असून शेवटल्या दिवशीं रथ निघतो. येथील पूर्वीचे संस्थानिक भास्करराव भावे यांनीं हस्तलिखिताचा पुष्कळ संग्रह केला होता. इ. स. १८५८ च्या लुटींत या संग्रहाचा नाश झाला असें समजतें.

इतिहास.—शिवाजीनें स. १६७४ सालीं या किल्ल्याची तटबंदी केली असें दिसतें. दंतकथा अशी आहे कीं, १६७७ सालीं शिवाजीनें हा किल्ला बांधला व त्याचें नांव महिलगड असें ठेविलें. १७७८ सालीं हैदरानें ज्यावेळीं कृष्णेच्या दक्षिणेकडील सर्व प्रदेश जिंकला त्यावेळीं नरगुंदच्या संस्थानिकानें कांहीं ठराविक खंडणी देण्याचें कबूल केलें पुढें ( १७८५ ) टिप्पूनें नरगुंदकर व्यंकटराव यापासून जादा खंडणी घेण्याचें ठरविलें. टिप्पूच्याविरुद्ध लढण्याची ताकद संस्थानिकास नसल्यामुळें त्यानें पेशव्यांची मदत मागितली. टिप्पूनें नरगुंदच्या किल्ल्यास वेढा दिला.परंतु मराठ्यांचें लष्कर पोहोंचण्यापूर्वींच पाण्याच्या अभावीं टिप्पूच्या सैन्यास नरगुंदचा वेढा उठवावा लागला. तथापि मराठ्यांच्या आणि टिप्पूच्या सैन्यांच्या लढाया झाल्या; तेव्हां जास्त खंडणी वसूल करणार नाहीं असें टिप्पूनें कबूल केल्यावरून मराठे कृष्णापार झाले; व टिप्पूच्या शब्दावर विश्वास ठेवून व्यंकटरावानें किल्ला स्वाधीन केला. किल्ला हातांत आल्याबरोबर टिप्पूनें आपलें वचन मोडलें. व्यंकटरावास त्याच्या मुलामाणसांसह कैदेंत टाकलें. पुढें ( १७८७ ) झालेल्या तहांत नरगुंद टिप्पूनें मराठ्यांच्या हवालीं केलें. १७९० च्या सुमारास नरगुंद हें तोरगल जिल्ह्यांतील एका पेट्याचें मुख्य ठिकाण असून त्याचें उत्पन्न ७५००० रुपये होतें. इ. स. १८१८ मध्यें दादाजीराव आप्पासाहेब गादीवर होता. इ. स. १८२१ मध्यें या संस्थानिकास खंडणी माफ केली. १८५७ सालीं नरगुंदचा संस्थानिक भास्करराव आप्पासाहेब उर्फ बाबासाहेब हा होता. कर्नाटकांतील संस्थानिकांमध्यें हा सर्वांत जास्त हुशार होता. याला औरस संतति नव्हती म्हणून त्यानें दत्तकाची परवानगी मागतली असतां डलहौसीनें दिली नाहीं. त्यामुळें यास फार वैषम्य वाटत होतें. आपल्यामागें सरकार आपलें संस्थान खालसा करील ही गोष्ट त्याच्या मनांत एकसारखी घोळत असल्यामुळें त्यानें त्यावेळच्या धामधुमींत अग्रेसरत्व पत्करिलें. नरगुंदचा किल्ला लढविण्यास फार सोयीस्कर होता, म्हणून इंग्रजांनीं तेथील तोफा व दारूगोळा ( बंडवाल्यांच्या ताब्यांत जाऊं नये म्हणून ) धारवाडास पोंचतां करावा असें भास्कररावांस कळविलें. त्याप्रमाणें ( ७ मे १८५८ ) तीन तोफांशिवाय सर्व तोफा व बराच दारूगोळा धारवाडास पोंचता केला. इतक्यांत मुंदर्गीच्या संस्थानिकानें बंड उभारलें अशी बातमी आली, तेव्हां भास्कररावानेंहि तयारी केली. दक्षनचा पोलिटिकल एजंट मॅन्सन हा सुरिवान गांवीं आहे अशी बातमी लागल्यावरून भास्करराव आठशें लोकांसमवेत तेथें आला व रात्रीं छापा घालून त्यास ठार मारिलें व त्याचें शीर नरगुंदच्या शिवेवर लटकत ठेविलें. ही बातमी धारवाडास समजल्यावर ( १ जून ) नरगुंदवर इंग्रजांनीं चाल केली. आंत लढाऊ सामान कांहींच नसल्यानें किल्ला लवकरच सर झाला व भास्करराव निसटला परंतु त्यास तोरगळ जंगलांत पंढरपूरच्या यात्रेकरूंच्या वेशांत पकडण्यांत आलें त्याची चौकशी बेळगांव येथें होऊन १८ जून रोजीं त्यास फांशीं देण्यांत आलें व नरगुंद संस्थान खालसा केलें. नरगुंद किल्ल्यांत कांहीं वेळ सैन्य ठेवलें होतें पण तें लवकरच काढून नेण्यांत आलें. किल्ला पुन्हां लढवितां येऊं नये म्हणून कांहीं तलाव निकामी करण्यांत आले व तटबंदी पाडून टाकली. हल्लीं तें धारवाड जिल्ह्यांतील थंड हवेचें ठिकाण आहे.

**नरनाळा**—वऱ्हाड. अकोट तालुक्याच्या उत्तरेकडील ६ कोसांवरील अतिशय जुना किल्ला. हा सातपुड्याच्या एकीकडच्या टोंकावर आहे. हे एकंदर तीन निरनिराळे किल्ले आहेत. त्यांचीं नांवें: जाफराबाद पूर्वेकडील; तेलियागड पश्चिमेस आणि या दोघांच्यामध्यें नरनाळा. शाहनुर दरवाजा पाहाण्यालायक आहे. याचें बांधकाम मुसुलमान लोकांच्या पूर्वीचें असावें. बहामनी नववा अहमदशहा वली यानें गाविलगड बांधला (१४२५ ) व नरनाळ्याचा किल्ला दुरुस्त केला अशी माहिती आढळते. हा किल्ला मूळ गोंड राजांनीं बांधला असावा असें कोणी म्हणतात.

महाकाली दरवाजा मुसुलमानी पद्धतीवर इ. स. १४८७ मध्यें फत्तेउल्ला इमाद–उल–मुल्क यानें बांधला. येथें दोन शिलालेख आहेत. एकावर हिजरी ८९२ ( स. १४८७ ) हा सन असून दुसऱ्यावर शहाबुद्दीन महंमदशहाची वंशावळी आहे. परंतु ही सर्व चुकलेली दिसते. किल्ल्यांतील एका टेंकडीवर एक नऊ यार्ड लांबीची ' नऊ गज ' नांवाची

तोफ आहे. तिच्यावरहि एक लेख असून हिजरी सन १०९१ आहे. या किल्ल्यांतील पाणी मधुर आहे. एकंदर२२ तलाव येथें आहेत व पाण्याच्या सोयीसाठीं ठिकठिकाणीं हौद बांधिले आहेत. जवळच्या दलबादल ठिकाणीं पूर्वी भोसल्यांचे २०००।२५०० सैन्य असे. हल्लीं यात्रेकरूंखेरीज या किल्ल्यावर कोणी सहसा येत नाहीं. रानटी श्वापदांची येथें वस्ती आहे. बुऱ्हाण इमादशहा हा येथें कैदेंत होता; याच वेळीं (१५७२) मूर्तिजा निजामशहानें हा किल्ला घेतला. अकबराच्या वऱ्हाड सुभ्यांत नरनाळा हें एक सरकार ( जिल्हा ) होतें. शाहूनें परसोजी भोंसल्यास वऱ्हाडची जहागीर दिली त्यावेळीं या सरकारांत ३७ महाल होते. शेवटीं भोंसल्याकडे हा किल्ला होता. [ फेरिस्ता; अकोला डिस्ट्रिक्ट ग्याझेट. भाग १. ]

**नरनौला** ( नवल ), त ह शी ल.—पंजाब, पतियाळा संस्थानांतील एक तहशील. क्षेत्रफळ ५७६ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) १५४०४७. यांत दोन शहरें व २८७ खेडीं आहेत.

गां व.—नरनौल तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें छालक नदीवर वसलें आहे. हें पतियाळाखेरीज करून सर्वांत महत्त्वाचें शहर आहे. लोकसंख्या ( १९११ ) २१३५०. हें शहर निःसंशय जुनाट आहे. दंतकथांवरून हें राजा लवणकर्ण यानें वसवून आपली बायको नारलवण हिच्या नांवावरून याचें नांव ठेविलें. पण महाभारतांत दिल्लीच्या दक्षिण भागाचें नरराष्ट्र असें नांव होतें व याच्यावरून नरनौल हें नांव पडण्याचा जास्त संभव आहे. मुसुलमान प्रथम याचा उल्लेख अल्तमशनें सैफुद्दीन यास—म्हणजे आपल्या मालकाला—नजर केलें होतें म्हणून करतात व स. १४११ त हें दुल्लीमखान व बहादुर नादिर यांच्याकडे होतें. नंतर खिजिरखानानें यावर स्वतः स्वारी केली. येथें शेरशहा जन्मला व त्याचा आजा मरण पावला. इ. स. १६७२ त औरंगझेबाच्या कारकीर्दीत येथें महत्त्वाचें धार्मिक बंड झालें. सतनामी नांवाच्या, आपणांस अमर समजणाऱ्या लोकांनीं हें काबीज करून येथें आपला अंमल बसविला, पण सरतेशेवटीं यांचा मोठ्या शोचनीय रीतीनें पाडाव झाला. मोंगल सत्तेनंतर येथें जयपूरच्या महाराजाची सत्ता आली. इ. स. १७९५ त हें आप्पा खंडेराव व जार्ज थामस यांनीं घेतलें व नंतर मूर्तिजाखान बहरेख याला दिलें. इ. स. १८५७ च्या बंडाच्या वेळीं मदत केल्याबद्दल पतियाळाचे महाराज नरिंदरसिंग यानां २ लक्ष रु. वार्षिक उत्पन्न असलेली नरनौलची इलाक मिळाली. येथें मुख्यत्वेंकरून कापूस, तूप, लोंकर यांचा व्यापार आहे. येथें एक धान्यबाजार, एक शाळा व एक दवाखाना आहे. येथें इ. स. १९०६ त म्युनिसिपालिटी स्थापन झाली.

**नरमेध**, प्रा स्ता वि क व प्रा ची न.—बहुतेक सर्व धर्मांत व जातींत नरमेध करण्याची चाल आहे. सुधारणेच्या कालांतहि निरनिराळ्या लोकांवर या चालीचा पगडा बसलेला होता. नरमेधाची चाल अगदीं रानटी लोकांत उगम पावली असें म्हणतां येत नाहीं; उलट पक्षीं, अर्धवट रानटी व थोडेबहुत सुधारलेल्या अशा लोकांमध्येंहि ही चाल बरीच प्रचलित होती. प्राचीन हिंदुस्थान, ग्रीस, इटली वगैरे देशांत व प्राचीन जपानी व कांहीं आफ्रिकन जातींत ही चाल होती. ब्राह्मणकालीन भारतवर्षापेक्षां वैदिककालीन भारतवर्षामध्यें नरमेध अगदीं कमी प्रमाणांत अस्तित्वांत होता. कायद्याच्या दृष्टीनें प्रत्येक नरमेधास विधियुक्त खून असें म्हणतां येईल. नरमेध करणें हें सामुदायिक कृत्य समजलें जातें; कारण मनुष्य एखाद्या संघाचा किंवा वर्गाचा प्रतिनिधि असतो.

ज्यावेळीं समाजरचना धार्मिक तत्त्वांवर झालेली असते. त्यावेळीं न्याय व निष्ठा यांचा घोटाळा होऊन जातो. सँडविच बेटांतलि लोक गुन्हेगार लोकांनां ईश्वराला बळी देतात असें म्हणतात. प्राचीन रोमन लोक धान्य चोरणाऱ्या लोकांचा सिरेस देवतेला बळी देण्याच्या निमित्तानें प्राण घेत असत. लढाईंत पकडून आणलेल्या लोकांचा किंवा त्रासदायक लोकांचा बळी घेण्याचा ताहिति देशांत प्रघात होता; परंतु मेक्सिकन लोक सर्व प्रकारच्या देहान्ताशिक्षेस बलिदानाचें स्वरूप देत. एकंदर समाजाचें कल्याण करणें हाच सर्व प्रकारच्या यज्ञांचा उद्देश असतो. एखाद्या रोगाची सांथ घालविण्यासाठीं सर्वांत सुंदर मुलीला नदींत बुडविण्याची चाल चिपेवा लोकांत होती; तसेंच ॲशिअन लोक एखाद्या मुलाला बळी देत. पापक्षालनार्थ एका बाईचा बळी घेण्याची चाल नायगर देशांत होती. धान्याला अपायकारक अशी हवा पडली असतां, पेरू देशांतील लोक मुलांनां बळी देत. अतिवृष्टि झाली असतां किंवा सूर्याच्या उष्णतेपासून फार त्रास झाला तर सूर्याला खुष करण्यासाठीं नरमेध करण्याची चाल ग्रेटबेनिन देशांत होती. हे बळी दिलेले लोक आपल्या देशाचें ईश्वरापाशीं दौत्यकर्म करतील असें त्या लोकांनां वाटत असे. झालेल्या पापाचें क्षालन करण्यासाठीं किंवा पुढें पाप होऊं नये या उद्देशानें बळी देण्याची चाल होती.

युद्धांत पराभव होऊं नये ह्मणून प्राचीन ग्रीक, गॉल, सेमाईट व हिंदु लोक नरमेध करीत असत. नरमेध करण्याचा उद्देश इतर लोकांचे प्राण वांचविणें हा होय. आयुष्याचा विमा उतरण्याचीच ती एक चमत्कारिक पद्धत होती. अनेक लोकांचें संरक्षण करण्यासाठीं एका मनुष्याला बळी देणें किंवा एखाद्या मोठ्या व लोकोपयोगी मनुष्यासाठीं सामान्य एखाद्या मनुष्याचा बळी घेणें हाहि नरमेधाचा उद्देश होता. जेव्हां राज्यकर्त्याच्या दुर्वर्तनामुळें एखादी आपत्ति येई त्यावेळीं प्रत्यक्ष राजालाहि बळी जावें लागत असे. हिंदु लोकांमधील सती जाण्याची चाल, युगांडा, ईस्ट इंडीज्, फिजी व न्यू हेब्रिडीज या ठिकाणींहि आहे. हा आत्मयज्ञ विरक्तावस्थेसारखा असून परलोकसाधन हा त्याचा उद्देश असतो. एखाद्या विशिष्ट व्यक्तीचा प्राण वांचविण्यासाठींहि नरमेध करण्याचा कोठें कोठें प्रघात आहे. प्राचीन

सेमाईट लोकांत पहिल्या मुलाला बळी देण्याची चाल होती. स्त्रियांचें पंध्यत्व घालविण्यासाठीं एखाद्या मुलाला बळी देण्याचाहि कोठें कोठें प्रघात आहे. नवीन इमारत बांधावयाच्या ठिकाणीं एखाद्या मनुष्यास बळी दिल्यास तो त्या इमारतीचा रक्षक बनतो अशीहि कल्पना होती. मेक्सिकन लोक नरमेधाचे पक्के अनुयायी असून, ते बळी दिलेल्या मनुष्यांचा कांहीं भाग भक्षण करीत असत. देवांचें सांत्वन करण्यासाठीं किंवा एखादें संकट टाळण्यासाठीं केलेले नरमेध, भिक्षु किंवा इतर लोक यांनीं बळी दिलेल्या माणसाच्या शरीराचा कांहीं भाग भक्षण केल्याशिवाय, पुरे होत नाहींत अशी नायगेरिया देशांतील लोकांची समजूत आहे. मृतांनां अन्न मिळावें या हेतूनेंहि नरमेध करण्याची कोठें कोठें पद्धत आहे. मेक्सिकन लोक सूर्यग्रहणामध्यें नरमेध करीत.

देव यज्ञामध्यें मनुष्याचा वध करीत, असें ऐतरेय ब्राह्मणामध्यें सांगितलें आहे. यज्ञासाठीं मनुष्याला मारल्यास तो खून होत नाहीं असें कालिकापुराणांत म्हटलें आहे. ब्राह्मणजातीच्या देवतेला ब्राह्मण बळी व क्षत्रिय देवतेला क्षत्रिय बळी दिला पाहिजे असें तैत्तिरीय ब्राह्मणांत सांगितलें आहे. बळी द्यावयाचा मनुष्य उत्तम प्रकारचा असला पाहिजे. त्याला कोणतेंहि शारीरिक व्यंग नसून तो निष्कलंक असावा असें कालिकापुराणांत म्हटलें आहे. देवाच्या आवडत्या जागेशेजारीं एखाद्यानें आग लाविल्यास त्या मनुष्याचा त्या देवतेसाठीं बळी घेण्याची चाल पूर्व आफ्रिकेंत आहे. परंतु त्यानें आपल्याबद्दल आपला गुलाम बळी दिल्यास त्याची मुक्तता होते. [डॉरमन-प्रिमिटिव्ह सुपरस्टिशन्स, फिलाडेल्फिया, १८८१; बॅन्क्रॉफ्ट-नेटिव्ह रेसेस; वेस्टरमार्क-ऑरिजिन अँड डेव्हेलेप्मेंट ऑफ दि मॉरल आयडीयाज् १९०६-०८.]

भा र ती य.—हरिश्चंद्र राजानें आपला पुत्र वरुणास बळी देण्याची शपथ घेऊन ती मोडल्यामुळें त्या राजाला जलोदर झाला वगैरे हकीकत ऐतरेय ब्राह्मणांत आहे ( ७.१३,१८ ). बंगालमधील स्त्रिया आपलें पहिलें मूल गंगेस अर्पण करीत असत, परंतु ब्रिटिश सरकारनें ही चाल बंद केली. याशिवाय सर्व प्राणिमात्रावर वर्चस्व मिळविण्यासाठीं 'पुरुषमेध' करण्याची चाल हिंदुस्थानांत होती. या यज्ञांत अकरा माणसें व अकरा गाई बळी देत असत. हा विधि शुक्लयजुर्वेदांत दिला आहे ( १. १२ ). तैत्तिरीय ( ३. ४ ), शतपथ ( १३. ६ ), शांखायन ( १६. १०,१६ ), ब्राह्मणांतून व वैतानश्रौतसूत्रांतहि ( ३७ पासून पुढें ) यासारखे उल्लेख आहेत. धनप्राप्तीसाठीं करण्यांत येणाऱ्या अश्वमेधांतहि एका मनुष्याला बळी देत असत. चण्डिकादेवीला नरबलि देत असत असें पुराणांमध्यें व तन्त्रांमध्यें सांगितलेलें आहे. एकदां विधिपूर्वक नरमेध केला असतां चण्डिका देवी एक हजार वर्षेंपर्यंत प्रसन्न रहाते असें कालिकापुराणांत सांगितलें आहे.

मराठ्यांच्या राज्यामध्यें अशा प्रकारचे तांत्रिक यज्ञ प्रचलित होते. तंजावर येथील शिवमंदिरांत कालीची एक मूर्ति आहे; त्यां मूर्तीपुढें प्रत्येक शुक्रवारीं एका मुलाला बळी देत असत; परंतु ब्रिटिश अंमल सुरू झाल्यावर मुलाऐवजीं एका मेंढाला बळी देण्याचा प्रघात पडला. मध्यप्रांतांतील एका देवीला ब्राह्मण बळी लागत असे. साताराचा राजा दरवर्षीं प्रतापगडावर जाई त्यावेळीं तेथील लोक एका वृद्धस्त्रीला बळी देत असत. कऱ्हाडे ब्राह्मण प्रत्येक वर्षीं एका ब्राह्मणकुमाराचा पुर्णे येथें बळी घेत असत; जेव्हां उघडपणें एखाद्याचा बळी घेणें धोक्याचें होऊं लागलें तेव्हां ते विषप्रयोग करूं लागले असें सर जॉन मालकम याचें म्हणणें आहे. हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व जिल्ह्यांतून धार्मिक विधि म्हणून कधीं कधीं नरमेध अद्यापिहि करण्यांत येतो असें इ. स. १८५४ च्या चेन्हरच्या अहवालावरून समजतें. हिंदुस्थानच्या ईशान्येस कालीसाठीं बळी देण्याचा वराच प्रघात आहे. सोळाव्या शतकांतील कोचचा राजा नरनारायण यानें एकदम दीडशें लोकांनां बळी दिले व त्यांच्या वंशजांपैकीं कांहींनीं ती चाल पुढें चालविली असें म्हणतात. कुचविहारमध्यें भोगी नांवाचे लोक स्वखुषीनें बळी जाण्यास तयार होतात; बळी जाण्याची वेळ येईपर्यंत त्यांनां वाटेल तसें वागण्याची मोकळीक असते. हल्लीं मनुष्यांनां बळी देण्याऐवजीं टोणगे, बोकड वगैरे जनावरांनां बळी देण्याची चाल पडली आहे.

छोटानागपूरच्या आसपास रहाणाऱ्या द्रविड लोकांत एकेकाळीं नरमेध फार प्रचलित होता. खोंड लोकांमध्यें नरमेध फारच भयंकर प्रमाणांत चालू असल्यामुळें, तो बंद करण्यासाठीं जादा कामगार ब्रिटिश सरकारास नेमावे लागले. संकटें टाळण्यासाठीं, रोगांची सांथ घालविण्यासाठीं, युद्धांत यश संपादण्यासाठीं व धान्याचें उत्तम पीक येण्यासाठीं हे लोक 'तरि पेनु' म्हणजे पृथ्वीदेवीसाठीं नरमेध करीत. कापणीच्या हंगामाच्या वेळीं नरमेध करण्याची बहुधां चाल असे; परंतु त्यापूर्वीं कित्येक दिवस बळी देण्यासाठीं मनुष्यांची निवड केली जाई. या निवडलेल्या लोकांनां फार सन्मानानें वागविण्यांत येत असे. भूमिज जातीचे द्रविड, मुलांनां पळवून आणून रंकिनी नांवाच्या आपल्या देवीपुढें त्यांनां बळी देत असत. नाग जातीचे लोक शिरकमळें मिळविण्यासाठीं एकमेकांवर हल्ले करतात. अंगामि जातीच्या लोकांत निदान एका मनुष्याचा प्राण घेईपर्यंत कोणीहि योद्ध्याचा पोषाख घालूं नये असा नियम आहे. ही चाल ब्रिटिश सरकारानें बंद केली; परंतु कांहीं स्वतंत्र जातींत ही चाल अद्यापि चालू आहे.

जमिनींत पुरून ठेविलेल्या संपत्तीवर भूतपिशाच्चादिकांचा ताबा असतो अशी हिंदु लोकांची सामान्यतः समजूत आहे. या पिशाच्चांनां कांहीं बळी दिल्याशिवाय ही संपत्ति काढून घेणें धोक्याचें आहे असें त्यांनां वाटतें. यासाठीं दक्षिण हिंदुस्थानांत नरमेध करण्यांत येतात व गरोदर स्त्रियांचें रक्त

भुतांनां फार आवडतें अशी त्या लोकांची समजूत आहे; परंतु अलीकडे बोकड वगैरे प्राण्यांनांच बळी देण्यांत येतें. नद्यांवर पूल बांधावयाचे असल्यास अगोदर नरमेध करून जलदेवतेस संतुष्ट करावी लागते. मोठमोठ्या इमारती बांधण्यापूर्वी त्या जागीं बळी देण्याचा प्रघात आहे. कोणताहि इष्ट हेतु साध्य करण्यासाठीं नरमेध करणें जरूर आहे अशी हिंदु लोकांची समजूत आहे.

धर्मासाठीं आत्मयज्ञ करण्याची चाल हिंदुस्थानांत बरीच प्रचलित होती. नर्मदा नदींतील एका बेटांत नरमांसप्रिय अशा काळभैरवासाठीं त्याचे भक्त स्वखुषीनें बळी जात असत; ही चाल १८२४ सालापर्यंत चालू होती. गंगा नदीसारख्या पवित्र नदींत एखाद्यानें जीव दिल्यास त्यास पुण्यप्राप्ति होऊन, दुसऱ्या जन्मीं त्याचा त्याला फायदा होतो अशी कित्येक लोकांची कल्पना होती. पुरी येथील जगन्नाथाच्या रथाची मिरवणूक दरवर्षी एकदां निघत असते; त्या रथाच्या चाकाखालीं स्वतःला चिरडून घेणें हेंहि पुण्यप्रद मानलें जातें.

पतिनिधनानंतर सती जाणें हें तर अत्यंत पुण्यप्रद आहे असें जुने हिंदु लोक समजतात. सती जाण्याची चाल बहुतेक सर्व जातींत होती; रजपूत लोकांमध्यें तर विशेष प्रचलित होती. बहुतेक स्त्रिया स्वखुषीनें सती जात असत; परंतु कित्येक प्रसंगीं त्यांचे आप्तेष्ट त्यांनां सती जाण्यास भाग पाडीत. ही सतीची चाल १८२९ सालीं ब्रिटिश सरकारनें बंद केली व संस्थानिकांनींहि त्याचें अनुकरण केलें; तथापि सतींचीं उदाहरणें क्वचित् प्रसंगीं आढळण्यांत येतात. ही चाल कशी व कधीं प्रचारांत आली तें निश्चितपणें सांगतां येत नाहीं; वेदांमध्यें याचा कोठेंहि उल्लेख नाहीं. परंतु पतिसहगमन केल्यानें परलोकींहि त्याचा सहवास घडेल या समजुतीमुळें ही सती जाण्याची चाल पडली असावी असें वाटतें. दक्षिण हिंदुस्थानांतील विजयानगरच्या राज्यांत मृत राजाबरोबर कित्येक स्त्रिया आपली प्राणाहुति देत असत. पति किंवा पुत्र अत्यंत आजारी असल्यास काली देवीस स्त्रिया असा नवस करीत कीं, 'हे देवि, माझा पति किंवा पुत्र बरा झाल्यावर मीं आपलें रक्त तुला अर्पण करीन.' [मुल्लर–एन्शंट संस्कृत लिटरेचर; हिलेब्रांट—रिच्युॲलिस्टिक लि० विल्सन--एसेज......ऑन दि रिलिजन ऑफ दि हिंदूज; चेव्हर्स--मेडिक्हल ज्यूरिस् प्रूडेन्स इन् बंगॉल. वार्ड–हिस्टरी, लिटरेचर ॲंड रिलिजन ऑफ दि हिंदूज; मित्र--ऑन ह्यूमन सॅक्रिफाइसेस इन् एन्शंट इंडिया; गेट–ह्यूमन सॅक्रिफाइस इन् एन्शंट आसाम; कूक, थर्स्टन, एन्थोवेन वगैरे. ]

इ रा ण.–इराणमधील अवेस्तालोकांमध्यें किंवा त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांमध्यें नरमेध प्रचलित होता असें दिसत नाहीं. परंतु आकेंमिनियन राजांच्या वेळीं नरमेधाचा प्रचार होता असें हिरोडोटस वगैरे ग्रंथकारांचें मत आहे. जिवंत माणसांनां पुरून टाकण्याची पद्धत इराणांत अर्वाचीन कालींहि दिसून येते. इराणांत इतर लोकांत जरी नरमेधाची चाल नव्हती तरी ती सिथियन लोकांत बरीच प्रचलित होती असें दिसतें. लढाईत पकडून आणिलेल्या लोकांपैकीं प्रत्येक शेकड्यापैकीं एका मनुष्यास ते बळी देत. ढोंगी दैवज्ञांनांहि बळी देण्याचा प्रघात इराणांत होता. राजाच्या निधनसमयीं, त्याच्या नोकरांपैकीं कांहीं नोकरांचा बळी घेण्यांत येत असे. धार्मिक कृत्य या नांवाखालीं हे बळी घेण्यांत येत. [जिव्हॉन्स–प्रीहिस्टॉरिक् ॲंटिक्विटीज् ऑफ दि आर्यन पीपल्स; संजाना–सिव्हिलिझेशन ऑफ दि ईस्टर्न इराणियन्स; फ्रेझर—ॲडोनिस, ॲटिस, ऑसिरिस. ]

ज पा नी व को रि य न.–जलदेवता क्षुब्ध होऊं नयेत म्हणून त्यांच्यासाठीं नरमेध करण्याची चाल प्राचीनकाळीं जपानमध्यें होती असें प्राचीन दंतकथांवरून समजतें. परंतु माणसांऐवजीं प्राण्यांनां बळी म्हणून मारण्यांत येऊं लागलें व पुढें बौद्धधर्माचा प्रसार झाल्यावर ही बलिदानाची चाल बंद पडली. इ. स. ६४२ त जपानांत अवर्षण झाल्यामुळें कित्येक ठिकाणीं कांहीं प्राण्यांनां बळी देण्यांत आलें; परंतु पर्जन्यवृष्टि न झाल्यामुळें, बलिदानाची पद्धत बंद करावी व पर्जन्यवृष्टीसाठीं बुद्ध–प्रार्थनेशिवाय दुसरा कोणताहि उपाय योजूं नये असें प्रधानमंडळानें ठरविलें. ज्यावेळीं नरमेध करण्याची चाल जपानांत होती, त्यावेळीं ते नरमेध नद्यांनां बंधारे बांधतेवेळीं करण्यांत येत. किल्ले, पूल वगैरे बांधतेवेळीं जिवंत माणसांनां पुरून टाकण्याची चाल जपानांत होती; अशा बळींनां मानवी स्तंभ असें ह्मणत. बादशहा व राजपुत्र यांच्या थडग्यांतहि जिवंत माणसांनां पुरण्यांत येत असे. पुढें माणसांऐवजीं मातीचे पुतळे थडग्यांत पुरण्याचा प्रघात पडला. तथापि जपानांत धनी किंवा पति मरण पावला असतां त्याचा नोकर किंवा त्याची स्त्री हीं स्वखुषीनें आत्मयज्ञ करतांना अद्यापि आढळतात. ही चाल बंद करण्याची पुष्कळ खटपट झाली, परंतु विसाव्या शतकांतहि हा प्रकार तेथें चालू आहे. इ. स. १९१२ मध्यें मुत्सु–हितु बादशहा मरण पावला यावेळीं काउंट नोगी नांवाच्या त्याच्या सरदारानें परलोकींहि आपल्या धन्याचा सहवास घडावा म्हणून आत्मयज्ञ केला; परंतु या गोष्टीचें अनुकरण होऊं नये म्हणून पोलिसखात्याला त्याचा बंदोबस्त करावा लागला.[ कोजिकी व निहोंगी ( भाषांतरें ); ॲस्टन–शिंटो; चुओकोरॉन (जपान मेल ); टॉंगकम. ]

चि न.—चिनी लोकांमध्यें नरमेधाची नियमित अशी कांहींच पद्धत नाहीं. त्यांच्या देवतांचें स्वरूप सौम्य असून त्या परोपकारी असतात. हिंदी कालीसारखी देवता चिनी लोकांत नाहीं. त्यांच्या देवतांनां मानवी रक्ताची तृष्णा नसून त्यांनां बळी लागत नाहीं. तथापि मनुष्यांचे बळी घेऊन ईश्वराला प्रसन्न करून घेण्याची त्यांची इच्छा चिनी इतिहासांत कोठें कोठें व्यक्त होते. कारण, नरमेधाची निदान कल्पना तरी प्रादुर्भूत झाल्याचीं कांहीं उदाहरणें उपलब्ध

आहेत. मृत सरदारांच्या स्त्रिया व नोकर यांनां मारून टाकण्याची चाल प्राचीन चीनमध्यें होती. सोनें, रत्नें वगैरे मौल्यवान चिजा मृत मनुष्याबरोबर पुरून टाकण्याची पद्धत चीन देशांत बरेच दिवस प्रचलित होती; कारण, परलोक हा इहलोकचा पूरक आहे अशी त्यांची कल्पना असल्यामुळें येथें लागणाऱ्या सर्व वस्तूंची मरणानंतरहि अपेक्षा आहे असें त्यांनां वाटत असे. अशा प्रकारें बरीच संपत्ति फुकट जात असे; यामुळें पुढें पुढें कमी किंमतीच्या वस्तू मृताबरोबर पुरण्यांत येऊं लागल्या व माणसांचे लांकडी पुतळे पुरण्याची चाल पडली. चौ घराण्याच्या वेळीं, ज्या पुतळ्यांचा उपयोग करीत, त्यांनां स्प्रिंग असल्यामुळें, ते प्रत्यक्ष माणसांप्रमाणें हालचाल करीत असत. परंतु कालांतरानें मृतांबरोबर जिवंत माणसांस पुरण्याचा प्रघात पडला. वरिष्ठ दर्जाचे लोक मृत झाले असतां त्यांच्यासाठीं नरमेध करण्यांत येत असे. याबद्दल चिनी वाङ्मयांतहि उल्लेख केलेला आढळतो. राजांच्या प्रेतयात्रेबरोबर शेंकडों लोकांनां जिवंत पुरून घ्यावें लागे. त्सिन शि ह्वांग हा महापुरुष मरण पावला त्यावेळीं त्याच्या अंतःपुरांतील सर्व निपुत्रिक स्त्रियांनां त्याच्याबरोबर पुरून टाकण्यांत आलें ( ख्रिस्तपूर्व २०९ ). परंतु चौ घराण्यानंतर आपली प्रेतयात्रा कोणालाहि त्रास न देतां व कोणाचाहि बळी न घेतां करण्यांत यावी असें एका बादशहानें इ. स. ९५४ त सांगितलें. परंतु निसर्गदेवतेला व जलदेवतेला बळी दिल्याचीं उदाहरणें इ. सनाच्या बाराव्या शतकांत चीन देशांत आढळतात. मिंग घराण्यांतील बादशहा राज्य करीत असतांना ( इ. स. १३६८--१६४४ ) नरमेधाची चाल बरीच प्रचलित होती; यिंग त्सुंग यानें आपल्या मरणसमयीं नरमेध करूं नये असें ठरविलें ( स. १४६४ ).

आपल्या मृत पतीबरोबर परलोकीं जाण्याकरितां, स्त्रियांनीं जाहीरपणें आत्महत्या केल्याचींहि कांहीं उदाहरणें चीनमध्यें आढळतात. पूल किंवा सार्वजनिक इमारती बांधतेवेळीं कैदी किंवा गुलाम यांनां बळी देण्याची चाल चीनमध्यें अद्यापिहि आहे. [ मॅक्गोवन—ए हिस्टरी ऑफ चायना; ग्रूट--रिलिजिअस सिस्टिम ऑफ इंडिया; लेग्गे—चायनीज क्लासिक्स; चायना रिव्ह्यू. ]

ग्री क.—होमरच्या काव्यांत नरमेधाचा फारसा उल्लेख नाहीं असें म्हणतात;तथापि या गोष्टीस अपवाद आढळतात. ग्रीक संस्कृतीला नरमेध संमत नव्हते; तथापि ऐतिहासिक कालापूर्वी नरमेधाची चाल होती असें आख्यायिकांवरून समजतें. अधर्मामुळें ईश्वरीकोप होऊन समाजावर संकट येतें; अधर्माचरणामुळें येणारें हें संकट घालविण्यासाठीं एका व्यक्तीचा बळी घेणें अवश्य आहे अशी ग्रीकांची समजूत होती. दुष्काळ, रोगाची सांथ वगैरे संकटें नाहींशीं करण्यासाठीं अथेनियन लोकांत नरमेध करण्याची चाल होती. परंतु परकीय शत्रूपासून येणारें संकट टाळण्यासाठीं नरमेध नेहमीं करावा लागे.

ऐतिहासिक कालांत नरमेध अस्तित्वांत नव्हता असें ग्रीक वाङ्मयावरून अनुमान काढतां येतें. सॅलेमिसच्या लढाईपूर्वी लोकांच्या आग्रहावरून डॉयओनिझस ओमेस्टसच्या सन्मानार्थ तीन पर्शियन कैद्यांचा बळी घेणें थेमिस्टोक्लस याला भाग पडलें ही प्लुटार्चमधील हकीकत वाचून आश्चर्य वाटतें. ही गोष्ट विश्वसनीय नाहीं असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे; ती तशी असो वा नसो, परंतु नरमेध उपयुक्त आहे असें मानणारे कांहीं लोक त्यावेळीं होते एवढें अनुमान काढण्यास हरकत नाहीं.

कांहीं उडाणटप्पू लोकांनां दुष्काळ वगैरे संकटांच्या वेळीं बळी देण्यासाठीं सार्वजनिक खर्चानें अथेनियन लोक पोशीत असत असें म्हणतात. कांहीं कांहीं ठिकाणीं तर प्रत्येक वर्षी नरमेध करण्याची चाल होती. आर्केडियामध्यें इसवी सनाच्या २ ऱ्या शतकांतहि ही चाल प्रचलित होती. ल्यूकासमधील अपोलोच्या देवळापाशीं प्रत्येक वर्षी एका गुन्हेगारास समुद्रास बळी देण्यांत येत असे. अथेन्समध्यें होणाऱ्या थर्जेलिया नांवाच्या उत्सवाच्या वेळीं एक पुरुष व एक स्त्री यांनां बळी देण्याचा प्रघात होता. त्यांनां दगड मारून ठार मारीत असत. एकंदरीत असें दिसतें कीं प्राचीन ग्रीस देशांतील सुसंस्कृत लोकांमध्यें फक्त विशिष्ट प्रसंगींच नरमेध होत असत; त्यांचें सातत्य असेल असें वाटत नाहीं. नरमेधाच्या चालीवरूनच आर्टिमिस आर्थिआच्या वेदीशीं स्पार्टन मुलांनां फटके मारण्याची पद्धत निघाली असावी असा समज आहे. [ हॅरिसन—प्रॉलिगोमेना; लांग—मिथि. रिचुअल ॲण्ड रिलिजन; टेलर—प्रिमिटिव्ह कल्चर; फ्रेझर—गोल्डन बाऊ. ]

रो म न.—नरमेध याचा अर्थ एखाद्या देवतेप्रीत्यर्थ मनुष्यवध करणें असा आहे; हें कृत्य धर्मिक असून तें विधिपूर्वक करावयाचें असतें. देवता क्रुद्ध झाल्या असतां युद्धें सुरू होतात किंवा रोगांच्या सांथी उद्भवतात; त्यांनां संतुष्ट करण्याकरितां मनुष्यांच्या प्राणांची आहुति द्यावी लागते अशी पूर्वी कल्पना होती; परंतु कालांतरानें ही चाल बंद पडून प्रत्यक्ष माणसाऐवजीं त्यांचे पुतळे देवतांनां अर्पण करण्याचा प्रघात पडला. पापाचें निरसन करण्यासाठीं रोमन लोकांमध्यें देहान्तशिक्षा देण्याचा परिपाठ होता. देवीला वाहिलेल्या कुमारिकांनीं नीतिभ्रष्ट आचरण केल्यास त्यांस जिवंत पुरून टाकण्यांत येत असे. वसंतऋतूमध्यें जन्मलेलीं असतील तीं सर्व पाळीव जनावरें देवतेला अर्पण करूं अशी रोमन लोकांनीं, त्यांचें हॅनिबॉलशीं युद्ध चालू असतां शपथ घेतली होती. हाहि एक प्रकारचा यज्ञच होय. रोमन लोकांचा विजय झाला असतां ते आपल्या शत्रूच्या सेनापतीस पकडून आणून ठार मारीत असत; हाहि एक नरमेधाचाच प्रकार होय. ख्रिस्तपूर्व ४६ तील बंडाच्या वेळीं ईश्वराला प्रसन्न करण्यासाठीं सीझरनें दोन मनुष्यांनां बळी दिले. ख्रिस्तपूर्व ४१ त जूलियसच्या वेदीपाशीं ऑक्टेव्हिअननें ३०० लोकांस बळी दिले असें म्हणतात; डिक्टेटरच्या

पूर्वजांनां संतुष्ट करण्याच्या हेतूनें त्यानें हा नरमेध केला असावा. मिथ्राच्या सन्मानार्थ कमोडस बादशहानेंहि एका मनुष्याला बळी दिलें होतें. पिशाच्चविद्या ज्यावेळीं प्रचारांत होती, त्यावेळीं कित्येक लोकांनां ठार मारण्यांत येत असे; डिडियस ज्यूलिनस, हा भविष्य जाणण्यासाठीं मुलांचा बळी घेई. तसेंच एलागेबालस हा जादू करण्यासाठीं लहान मुलांनां मारीत असे.

बिनसरकारी कामगारांच्या धर्मकृत्यांत नरमेधाचा इतका प्रसार झाल्यामुळें कांहीं दयाळु बादशहांनीं नरमेधाची चाल बंद करण्याचा प्रयत्न केला. तैबेरियस, क्लाडियस, हॅड्रियन वगैरे बादशहांनीं नरमेधाच्या विरुद्ध बरीच चळवळ केली. दरबारी धर्मकृत्यांतून नरमेधाची हकालपट्टी करण्यांत आली तथापि परकीयांच्या वर्चस्वामुळें, नरमेधाची चाल पुन्हां प्रचारांत आली व जरी नरमेध बंद करण्याकरितां बरेच कायदे करण्यांत आले, तरी ती चाल समूळ नष्ट करणें अशक्य झालें. [ वार्ड फौलर–दि रोमन फेस्टिव्हल्स; टौटेन–सॅक्रिफिसिअम्; रीड–ह्यूमन सॅक्रिफायसेस ॲट रोम. ]

से मि टि क.—ईजिप्तमध्यें नरमेध अस्तित्वांत नव्हता असें कित्येक प्रसंगीं प्रतिपादन केलेलें आहे; तथापि ग्रीक व लॅटिन ग्रंथकारांच्या लेखांवरून नरमेध थोड्या निराळ्या स्वरूपांत प्रचलित होता असें दिसतें. ईजिप्तच्या राजानें ताम्रवर्णाच्या लोकांनां बळी दिलें असें डायओडोरस सिक्युलसनें म्हटलें आहे; ताम्रवर्णाचे लोक त्या देशांत अगदीं कमी असल्यामुळें त्याच लोकांनां बळी देण्यांत येत असे. कालांतरानें जिवंत माणसांऐवजीं मेणाच्या पुतळ्यांचा उपयोग करण्यांत येऊं लागला असें मॅनिथोनें म्हटलें आहे. अवर्षण व रोग यांचा उद्‌भव होऊं नये म्हणून माणसांनां जिवंत जाळून टाकण्यांत येत असे, असें एका ठिकाणीं म्हटलें आहे. नाइल नदीवर ईजिप्तमधील लोकांचें जीवित अवलंबून असल्यामुळें, प्रत्येक वर्षी एका तरुण मुलीला ह्या नदींत लोटण्यांत येत असे. मुसुलमानांनीं स. ६४२ त तो देश काबीज केला, तोंपर्यंत हा प्रकार चालू होता असें अरबी इतिहासकार मुर्तधा यांचें मत आहे. हिब्रू लोकांमध्येंहि नरमेधाची चाल होती; ती चाल बंद करण्याकरितां कडक कायदे करावे लागले. विजयप्राप्तीसाठीं नरमेध करण्याची चाल त्या लोकांमध्यें होती. अहज व मनसेह यांच्या कारकीर्दींत मुलांनां अग्नीच्या भक्ष्यस्थानीं देण्याचा प्रघात होता. [ स्मिथ–रिलिजिअस सेमेटिकस्; मॅकॅलिस्टर-दि एक्सकॅव्हेशन ऑफ गेझर; स्ट्रक—दि ज्यू ॲंड ह्यूमन सॅक्रिफाइस. ]

टयू ट न.—एखादें संकट टाळण्यासाठीं नरमेध करण्याची चाल टयूटन लोकांत ऐतिहासिक कालपर्यंत होती. नरमेधाच्या योगानें देवता व पिशाचें संतुष्ट होतात अशी त्या लोकांची कल्पना होती. लढाईंत पकडून आणलेले लोक, गुलाम, बहिष्कृत लोक किंवा लहान लहान मुलें यांनां हे लोक नरमेधासाठीं पसंत करीत. कालांतरानें माणसांऐवजीं जनावरांनां बळी देण्याचा प्रघात सुरू झाला.

सर्व जातीचे जर्मन लोक वोडन–मर्क्युरीला नरमेध करीत असत असें टॅसिटसचें म्हणणें आहे. उपसलेचा औन राजा वृद्ध झाला त्यावेळीं आपलें आयुष्य वृद्धिंगत व्हावें म्हणून त्यानें आपले नऊ पुत्र ओडिनला बळी दिले. ओडिनला बलिदान केलें असतां तो बळी देणाऱ्यांचें आयुष्य वाढवितो असा त्या लोकांचा समज होता. लढाईस सुरवात होण्यापूर्वींहि विजय प्राप्त झाल्यास आपण नरमेध करूं अशी शपथ घेण्याची चाल या लोकांत होती.

रॅन नांवाचें नरस्तेयी पिशाच्च समुद्रामध्यें रहातें अशी टयूटन लोकांची समजूत होती; समुद्रामध्यें वादळ झालें म्हणजे हे पिशाच्च माणसांनां पकडतें, अशी त्या लोकांनां भीति वाटत असल्यामुळें जलपर्यटन करण्यापूर्वी हे लोक स्वसंरक्षणार्थ नरमेध करीत असत.

सॅक्सन व नार्मन लोकहि समुद्रापासून आपलें रक्षण करून घेण्यासाठीं नरमेध करीत. हे नरमेध समुद्र क्षुब्ध झालेला असे त्यावेळीं समुद्रकिनाऱ्यावर करण्याची वहिवाट होती. जमिनींत पीक चांगलें यावें यासाठींहि नरमेध करण्याची पद्धत होती. दुष्काळ पडल्यास टयूटन लोक राजाला दोषी ठरवीत. सामान्य माणसास बळी देऊनहि दुष्काळनिवारण न झाल्यामुळें स्वीडन लोकांनीं डोमॅल्डी राजाला बळी दिलें असें म्हणतात. कालांतरानें ही चाल बंद पडली; परंतु बर्गंडियन लोकांप्रमाणें हे लोक दुष्काळ पडल्यास राजाला पदच्युत करीत किंवा त्याला देशाबाहेर घालवून देत. इतर लोकांप्रमाणें टयूटन लोकहि इमारतींचे पाये बांधतेवेळीं नरमेध करीत असत. असें केल्यानें इमारत दीर्घकाल टिकते असा त्यांचा समज होता; कांहीं कालानें मनुष्याच्या ऐवजीं जनावरांनां बळी देण्यात येऊं लागलें; व नंतर पुतळे, नाणीं वगैरे जमिनींत पुरण्याचा प्रघात पडला. पाया बांधतेवेळीं नरमेध केल्याशिवाय मोठाल्या इमारती बांधतां येत नाहींत असा अद्यापि कांहीं लोकांचा समज आढळतो. [ टॅसिटस; सागा; स्ट्रॅबो. ए. रि. एरिस्कमधील "ह्यूमन सॅक्रिफाइस" हा लेख. ]

**नरवर, जिल्हा.**—मध्यहिंदुस्थान. ग्वाल्हेर संस्थानांतील एक जिल्हा. उत्तर अक्षांश २४° ३२' ते २५° ५४' व पूर्व रेखांश ७७° २२' ते ७८° ३२. क्षेत्रफळ ३७६३ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ४०८१२९. येथें जंगल असणाऱ्या बऱ्याच लहान लहान टेंकड्या आहेत. जमीन बरीच सुपीक आहे. करेरा खेड्याच्या आसपास खडकाळ जमीन आहे. सिंधु, पार्वती, बेटवा या मुख्य नद्या होत. यांत चंदेरी व नरवर हीं दोन शहरें व १३४२ खेडीं आहेत. मुख्य ठिकाण सीपरी; याचे सीपरी, पिचोर, कोलरास व करेरा हीं मुख्य ठिकाणें असलेले असे चार परगणे केले आहेत.

गां व.—याच नांवाच्या जिल्ह्यांतील एक गांव. लोकसंख्या (१९११) ३९१३. हें नलराजाचें ठिकाण होतें. कनिंगहॅमच्या मतें ही नागांची पद्मावती असावी. गणपति नांवाच्या प्रयाग येथील समुद्रगुप्तलेखांत वर्णन केलेल्या नाग राजाचीं नाणीं येथें सांपडतात. याचा ग्वाल्हेरशीं फार निकटसंबंध आहे. १० व्या शतकांत दोन्ही ठिकाणें कछवाह रजपुतांच्या हातीं गेलीं. इ. स. ११२९–१२३२ पर्यंत परिहार लोक येथें होते. यांनां नंतर अल्तमशानें घालविलें. नंतर स. १२५१ त हें यादवदेवानें घेतलें व नंतर नासिरुद्दिनानें येथें आपला अंमल बसविला. तैमूरच्या स्वारीनंतर नरवर तोनवार लोकांनीं घेऊन तेथें स. १५०७पर्यंत राज्य केलें. नंतर १२ महिन्यांच्या खडतर वेढ्यानंतर शिकंदर लोदीनें याचा पाडाव केला. यानें कछवाह घराण्याच्या–प्रथम घराण्याच्या-एकाला हें देऊन टाकलें.थोडा काल खेरीजकरून १९ व्या शतकापर्यंत येथें कछवाह घराण्याचा अंमल होता. नंतर हें शिंद्यांनीं घेतलें व पुढें प्रयागच्या सन १८०५ च्या तहानें यांच्याकडे हें कायमचें आलें.

येथील किल्ला फार सुंदर असून याच्या भोंवती ५ मैलांवर असणारी भिंत आहे. येथें मुसुलमानी अवशेष आहेत. परंतु हिंदूंच्या उदयकाळांत याचा नंबर ग्वाल्हेरनंतर दुसरा लागत असे. हिंदूंच्या पुराणवस्तूंत इ. स. १६९६ चा छाप असणारी एक जोधपूरच्या सवाई जयसिंगाची तोफ आहे. भिंतीच्या बाहेर जवळच एक तोनवाट मुख्यांचीं नांवें असलेला दगडी खांब, एक बावडी व मुसुलमानांनीं बांधलेला पूल आहे. येथें एक सतीचें स्थान आहे. राजा गजसिंहाच्या उपाध्यायाच्या २ बायका आपल्या नवऱ्याच्या मरणाचें वृत्त ऐकून सती गेल्या होत्या. येथून पूर्वी लोखंड काढीत पण आजकाल तें काम बंद आहे.

**नरवल**—संयुक्तप्रांत. कानपूर जिल्ह्यांतील पूर्वेकडील तहशील. ही पूर्वीच्या सान्ह सालेमपूर (हल्लीं नरवल) परगण्याला लागूनच आहे. क्षेत्रफळ २०६ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ८८९१६. खेडीं १७२. नरवल शहर हें तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. यांत पांडु व रिंद या नद्या वाहतात. तहशिलीचा मध्यभाग सुपीक आहे. येथें 'लोअर गँजीस कनाल' या कालव्याच्या कानपूर व फत्तेपूर शाखांनीं पाणी पुरविलें जातें.

**नरवाण**—पंजाब, पतियाळा संस्थान. करमगढ निझामतींतील एक तहशील. क्षेत्रफळ ५८२ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) १३५५१३. यांत खेडीं १३८ असून मुख्य खेडें नरवाण आहे.

**नरसपट्टण**—मद्रास, विझगापट्टण जिल्हा. नरसपट्टण पोटविभाग व गोवळकोंडा तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें सुपीक जमिनीनें वेष्टित असून टेंकडीच्या पायथ्याशीं आहे. लोकसंख्या (१९११) ११२६८. हें एक व्यापाराचें ठाणें आहे.

**नरसपुर**, ता लु का.—मद्रास. कृष्णा जिल्ह्यांतील समुद्रकांठचा तालुका. थोड्या दिवसांपूर्वी यांत नगरम् बेटाचा समावेश होत असे. हें सध्यां गोदावरी जिल्ह्याला जोडलें आहे. क्षेत्रफळ २६२ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) १९०८०७. यांत ३ शहरें व ७८ खेडीं आहेत. मुख्य पिकें तांदूळ व बागांतील भाजीपाला हीं होत.

गां व.—तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें समुद्र किनाऱ्याहून ६ मैलांवर गोदावरीच्या वसिष्ठ मुखाजवळ वसलें आहे. लोकसंख्या (१९११) ११९५०. येथें पोर्तुगीज लोकांनीं पालाकोल्लु कारखान्याची शाखा स्थापन केली होती. ते येथें लोखंड काढीत असत. सध्याहि त्यांच्या कांहीं इमारती आहेत. इंग्लिशांनीं येथें स. १६७७ त जम बसविला पण स. १७५६ त त्यांनां फ्रेंचांनीं हांकून लाविलें. स. १७५९ त फोर्ड साहेबानें फिरून हें घेतलें. येथला व्यापार बहुतेक बसला. येथून फक्त दरवर्षी झाडें परदेशीं जातात. इलाख्यांत प्राथमिक शिक्षणप्रसार करण्याच्या प्रयत्नांत येथेंच प्रथम टेलर शाळा उघडली.

**नरसरावपेठ**, ता लु का.—मद्रास इलाखा, गुंतूर जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ७१६ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) २११६३१. यांत नरसरावपेठ हेंच मुख्य व एकच शहर आहे. येथें कालव्यांचा फारच थोडा उपयोग केला जातो. येथील कुरणें फार चांगलीं असून येथील गुरें चांगलीं असतात.

गां व.–तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें सदैन मराठा रेल्वेवर आहे. लोकसंख्या (१९२१) ११३०८. याचें नांव, नरसरावाशहरांतील तलाव ज्यानें वाढवून बांधिला त्या मलराझू वेंकट गुंडरावाच्या बापाच्या नांवावरून पडलें असावें. पट्टाभि. रामस्वामी व भीमेश्वर यांच्या छत्रीवर लेख आहेत. येथून जवळच कोतप्पकोंडा हें पवित्र स्थान असून फेब्रुवारींत पौर्णिमेला जंगी मेळा भरतो. येथें देवळें बरींच आहेत.

**नरसापुर** (१)–मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा गदगच्या ईशान्येस दोन मैलांवरचें एक इनामी खेडें. या खेड्याचा वसूल गदग येथील त्रिकुटेश्वर व वीरनारायण या देवळांकडे जातो. येथील एका लहानशा देवळांत इ. स. ११७३ सालचा एक शिलालेख आहे. या देवळांतील खोदकाम म्हणजे तेराव्या शतकांतील एक उत्तम नमुना आहे.

(२) मुंबई इलाखा, सिंधहैदराबाद जिल्ह्यांतील अलाह्यार तालुक्यांतील "तंदो" मध्यें असणारें एक गांव. लोकसंख्या (१९११) ४३४२. हें पूर्वी विणकामाकरितां प्रसिद्ध असून सध्यांहि थोड्या प्रमाणावर हातमागाचें काम होतें हें गांव स. ९८९ त वसलें असावें. येथें एक दवाखाना, एक शाळा व एक न्यायकचेरी आहे.

**नरसिंगगढ संस्थान**–मध्य हिंदुस्थान, भोपाळ एजन्सींतील एक संस्थान. उ. अ. २३° ३५ ते २४° व पू. रे. ७६° २०' ते ७७° १०'. क्षेत्रफळ ७३४ चौरस मैल. लोकसंख्या

१०१४०६. हें माळव्याच्या उमतवाडा भागांत वसलें आहे. या संस्थानचा राजगढशीं निकट संबंध आहे. कारण कीं, दोहोंचे सरदार राजगढच्या उदाजीचा भाऊ दुदाजीचे वंशज होत. इ. स. १६६१ त रावत मोहनसिंग हा लहान असल्यामुळें दिवाण अजबसिंग हा कारभार पहात असे. यानंतर परशुराम हा कारभार पाहूं लागला. कांहीं दिवसांनीं रावत व दिवाण यांमध्यें बेबनाव होऊन शेवटीं इस्टेटीचे दोन वांटे झाले. स. १६८१ त परशुराम यानें नरसिंगगढ येथें राजधानी केली. १८ व्या शतकांत येथल्या मुख्याला मराठयांशीं (होळकर)८५००० रु. खंडणी देऊन सलगी करावी लागली. स. १८१८ च्या मालकम साहेबाच्या व्यवस्थेंत होळकर, देवास वगैरे राजांशीं व येथल्या संस्थानिकांशी परस्पर ठराव करून दिले. या ठरावानें होळकरला ठराविक रक्कम मिळत असे. स. १८१९ त दिवाण सुभागसिंग हा अधिकार न चालवूं शकल्यामुळें त्याचा मुलगा चेनसिंग याच्याकडे अधिकार आला. पण त्याचा पोलिटिकल एजंटाशीं बेबनाव होऊन त्यानें सीहोर येथील ब्रिटिश सैनिकांवर हल्ला केला; त्यांत तो मारला गेला. यानंतर हनवंतसिंग गादीवर आला. व याला इ. स. १८७२ त राज्याधिकार व ११ तोफांची सलामी मिळाली. इ. स. १८८० त प्रतापसिंहानें (हनवंतसिंग नंतरचा राजा)मिठावरील कर माफ करून ६१८ रु १२ आ. घेण्याचें कबूल केलें. स. १८९० त याचा चुलता महताबसिंग गादीवर आला. हा स. १८९६ त मेल्यानंतर अर्जुनसिंग गादीवर आला. हा १९२४ त वारला. हल्लीचे संस्थानिक राजा विक्रमसिंग १६ वर्षांचे असून राणी शिवकनवर साहिना या कारभार पहातात. संस्थानिकाला ११ तोफांच्या सलामीचा मान आहे.संस्थानांत नरसिंगगढ हेंच एक कायतें मोठें शहर आहे; त्याची लोकसंख्या सुमारें ९ हजार आहे. भाषा राजस्तानी भाषेची मालवा भागांतील आहे. रजपूत, चमार, ब्राह्मण व बेलेस या जाती आहेत. यांत डाकल्यांचें प्रमाण फार थोडें आहे. मुख्यपिकें.—ज्वारी, कापूस, गंहु, मका, हरभरे, व खसखस. येथें फक्त गाडीवाटा चांगल्या आहेत. राज्यव्यवस्थेच्या सोयीकरितां या जिल्ह्याच्या तहशिली केल्या आहेत. त्यांचीं मुख्य ठिकाणें नरसिंगगढ, पाचोर, खुजनेर व छपेरा येथें आहेत. यांवर एक तहशिलदार असून हाच न्यायाधीश व करवसूली करणारा असतो. फारच उच्च दर्जाचे मुकदमे पोलिटिकल एजंटाकडे जातात. येथें स. १८९७ पर्यंत भोपाळची नाणीं चालू होतीं. नंतर तेथें इंग्रजी रुपयाचा प्रवेश झाला. येथें उमत रिसाला नांवाचे एक पथक, एक घोडेस्वारांची टोळी, एक तोफ व २३ तीरंदाज इतकें सैन्य आहे. लिहितां वाचतां येणाऱ्यांचें प्रमाण सुमारें शेंकडा ३.५ आहे.

**नरसिंगदेव बुंदेला**—हा राजा मधुकरशहा बुंदेल्याचा मुलगा. हा अकबराच्या कारकीर्दींत शहाजादा सेलीम (जहांगीर) याचा नौकर होता. यानें सेलीमच्या आज्ञेनें अकबराचा मित्र व वझीर अबूल फजल याला ठार मारिलें (१६०२). जहांगीरनें आपल्या कारकीर्दींत याला चार हजारी मनसबदार केलें होतें. यानें मथुरा येथें श्रीकृष्णाचें मोठें मंदिर बांधलें, त्यास तीन लाख रु. खर्च आला. या मंदिराचीच पुढें औरंगझेबानें मशीद केली. नरसिंग हा सन १६२६ त मेला.

**नरसिंगपूर**, जिल्हा.—मध्यप्रांत. नर्मदाविभागांतील जिल्हा. उ. अ. २२° ३७′ ते २३° १५′; व पू. रे. ७८°२७′ ते ७९°३८′. क्षेत्रफळ १९७६चौरस मैल. बहुतेक जिल्हा नर्मदेच्या दक्षिणेस तिच्या व सातपुडा पर्वतांच्या मध्यें आहे.जमीन चांगलीच सुपीक आहे. जिल्ह्याची समुद्रसपाटीपासून सरासरी उंची ११०० फूट आहे. जंगल असें फक्त सातपुड्याच्या दक्षिणेकडील उतारावर आहे. यांत मुख्यत्वेंकरून मोह, अचार, दमन, सालई, पळस, वगैरे झाडें सांपडतात. वाघ (क्वचित्च), चित्ता, डुक्कर, सांबर, व नीलगाय हीं जनावरें आहेत.हवा चांगली असून थंडीचे दिवस फार बहारीचे असतात. पाऊस सरासरी ५१ इंच पडतो.बहुधां अतिवृष्टीपासूनच पिकाचें वगैरें नुकसान होतें.

इतिहास:—याच्या उपलब्ध इतिहासकालापासून नरसिंगपूर येथें मंडलागोंड घराण्याचा अंमल होता. नरसिंगपूरच्या नैर्ऋत्येस असणारा चौरागढ याचा मंडलाराजाशीं निकट संबंध होता. याच्यावरील काम व विहिरी पाहून याला राजे लोक किती महत्त्व देत होते याची कल्पना होते. इ. स. १५६४ त असफखान या मोंगल सरदारानें दलपतशहा(सिंग) ची राणी दुर्गावती हिला हरवून चौरागढ घेतलें; त्यावेळेस त्याला १०० रत्नांनीं भरलेले हंडे व १००० हत्ती मिळाले. तीन पिढ्यांनंतर ओरछाचा राजा प्रेमनारायण यानें हा किल्ला घेतला पण याचा विश्वासघातानें वध झाला. अजूनहि लोक प्रेमनारायण व दुर्गावतीला फार मान देतात. स. १७८१ त हा किल्ला मराठ्यांच्या सागरच्या सुभेदारींत मोडूं लागला. इ. स. १८१७ त नागपूरच्या गडबडीमुळें ब्रिटिशांनीं नरसिंगपूरवर हल्ला केला. इ. स. १८२६ त हा जिल्हा ब्रिटिश अंमलाखालीं आला व इ. स. १८६० त शिद्यांनीं दिलेल्या छानवरपाठ व तेंडूखेडा हे परगणे जोडून त्याचा विस्तार केला. ब्रिटिश अंमलाखालीं येथें इ. स. १८४२ त व १८५७ त थोडासा उपद्रव झाला.

जुन्या वस्तूंपैकीं बरिहटा ( नरसिंगपूरच्या नैर्ऋत्येस १४ मैल ) येथें जुने शिलालेख मिळाले; पैकीं कांहीं नरसिंगपूरच्या सार्वजनिक बागांत आहेत व कांहीं विलायतेला नेले आहेत. नर्मदा व वराही या नद्यांचा बरचाहाण हा संगम हिंदूंचें पवित्र स्थान आहे. नद्यांवर देवळें व ठिकठिकाणीं घाट आहेत. धिलवर व छानवारपाठ येथें गोंड किल्ले आहेत. लोकसंख्या ( १९२१ ) ३१५१६२.

शहरें नरसिंगपूर ( मुख्य ठिकाण ), गाडरवाडा व छिंदवाडा हीं आहेत. मुख्यत्वें बुंदेली व क्वचित् लोक मराठी, उर्दू

व गोंडी या भाषा बोलतात.येथें गोलापुरव म्हणून एक ब्राह्मणांची जात आहे. हे फक्त शेतीच करतात; भिक्षुकी वगैरे करीत नाहींत. शेतकी करणारे बहुधां लोधी, कुरमी किंवा कौनरास या जातींचे असतात. कौनरास हे आपल्याला कौरवांचे वंशज समजतात.

शेतकीः—येथें दोन धान्यें एकाच वेळीं एकाच शेतांत पेरतात. जसें कोदों व तीळ, तीळ व अऱ्हर किंवा तांदूळ, व अऱ्हर आणि उडीद किंवा मूग. मसूर, कापूस वगैरेहि उत्पन्न करतात.येथें मालगुजारी पद्धतीनें करवसूली होते.शेताला बांध घालून अडविलेल्या पाण्याचा गव्हास उपयोग करतात. येथून सागर, हुशंगाबाद वगैरे ठिकाणीं गुरें पाठवितात. तूपहि बऱ्याच प्रमाणांत होतें. येथें विहिरींचे पाणी पाटानें शेतास नेतात. अशा विहिरी एकंदर १२०० आहेत.

खनिजः—येथें२४९ चौरस मैलांचें "राखीव" जंगल असून यांत साग, खैर, वांबू वगैरे होतात. गाडरवाड्यापासून १२ मैलांवर मोहपानी येथें कोळशाची खाण आहे. शेर व शक्कर या नद्यांच्या पात्रांतहि थोडा कोळसा सांपडतो. तेंडूखेड्याला लोखंडाच्याहि खाणी आहेत. बरह्माणमध्यें तांबें सांपडतें.

व्यापारः—गाडरवाडा, सिंधपूर व आमगांव येथें थोडा कापडाचा व्यापार चालतो. पण गिरण्यामुळें हा अलीकडे मंदावला आहे. चिखली येथें पितळेचें काम चालतें. नयाखेडा व बाऱ्ह येथें बांगड्या होतात. गाडरवाडा व छिंदवाड्याला कापुस दावण्याचे कारखाने आहेत. नीळेंत कांहींतरी मिसळून अम्रोव्हा नांवाचें रंगीत कापड तयार करतात.

निर्यात माल तूप, गळीताचीं धान्यें, हरभरे,धान्य व इमारती लांकूड वगैरे असून आयात माल कापड, मीठ, साखर, मातीचें तेल, तंबाखू व किरकोळ सामान हा आहे.शिक्षणाच्या बाबतींत या जिल्ह्याचा ४ था नंबर लागतो.

तहशील.—नरसिंगपूर जिल्ह्यांतील पूर्वेकडील तहशील. क्षेत्रफळ १०६८ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १५३४८२. या तहशिलींत नरसिंगपूर व छिंदवाडा हीं दोन शहरें व ५५८ खेडीं आहेत. यांतून नर्मदा नदी वहाते.

शहर.—नरसिंगपूर जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें जी. आय्. पी च्या जबलपूर–इटारसी वाटेवर आहे. लोकसंख्या ( १९११ ) १०६३०. याचें पूर्वींचें छोटागाडरवाडा असें नांव होतें पण १०० वर्षांपूर्वी बांधलेल्या श्रीनृसिंह देवळावरून याचें नांव नरसिंगपूर पडलें. यांतून सिंगरी नदी वहाते. ही लहान असूनहि कधीं कधीं हिला भयंकर पूर येतात. इ. स. १८९१ च्या पुरानें बराच गांव वाहून गेला होता. या नदीला बांध घालून शहराला पाणी पुरविलें जातें. सागरशीं संबंध जोडल्यामुळें नरसिंगपूर भरभराटत चाललें आहे. इतर धंदे म्हणजे हातमागाचें काम, रंगाचें काम व छापखाने. येथें ३ मासिकें निघतात.

**नरसिंगपूर, नीरा**—पुणें जिल्ह्याच्या अगदीं आग्नेयीस, इंदापूरच्या आग्नेयीस १२ मैलांवर भीमा व निरेच्या संगमावर हें गांव आहे. येथें श्री लक्ष्मीनरसिंहाचें देवालय आहे. विंचूरकरानीं हें देवालय शके १६७८ त बांधिलें. वैशाख शुद्ध चतुर्दशीपासून येथें दोन दिवस जत्रा भरते. [ तीर्थयात्राप्रबंध. ]

**नरसिंगपूर संस्थान**—बिहार-ओरिसा. ओरिसाप्रांतातील मांडलिक संस्थान. उ. अ. २०° २३'ते २०°३७'व पू.रे. ८४° ५' ते ८५°१७'. क्षेत्रफळ १९९ चौरस मैल. उत्तरेस अंगुल जिल्हा व हिंदोल संस्थानामधील पहाड, पूर्वेस बटांबा; दक्षिणेस महानदी व पश्चिमेस दसपल्ला. नरासिंग व चोरो या खोंड पुढाऱ्यांचा ६०० वर्षांपूर्वी पराभव करून धरमसिंग नांवाच्या एका रजपुतानें हें वसविलें. याचें कराचें उत्पन्न ६६ हजार रु. असून यापैकीं १४५० रु. ब्रिटिश सरकारला खंडणी म्हणून दिली जाते. लोकसंख्या ( १९२१ )३३००२. यांत १९८ खेडीं असून मुख्य गांव कानपूर आहे. लोक सर्व हिंदु आहेत. मुख्य जाती चास व पान या आहेत.

**नरसिंह**—विष्णूचा चवथा अवतार (' अवतार ' पहा). हिरण्यकशिपु दैत्याच्या त्रासांतून जगाची मुक्तता करण्याकरितां हा अवतार आहे. हिरण्यकशिपूचा पुत्र प्रल्हाद हा विष्णुभक्त होता, म्हणून बाप त्याची निंदा व छळहि करी. एके दिवशीं त्याला तुझा विष्णु या दगडी खांबांत आहे कां असें विचारून त्या खांबाला लाथ मारतांच अर्धा मनुष्य व अर्धा सिंह यारूपानें विष्णु प्रकट होऊन हिरण्यकशिपूला फाडून टाकिलें. नृसिंहजयंति वैशाख शुद्ध १४ ला असते.

अठरा उपपुराणांत नरसिंहपुराण नांवाचें एक उपपुराणहि आहे. या पुराणाचा सूतसंहितेंत तिसरा नंबर आहे. मत्स्यपुराणांत ( अध्याय ५३ ) नरसिंहपुराणाची श्लोकसंख्या १८ हजार दिली आहे. अपरार्क १२ व्या शतकांत नरसिंहपुराणाचा उल्लेख करतो.

**नरसिंह ठक्कुर**—यानें मम्मटाच्या काव्यप्रकाशावर ' नरसिंहमनीषा ' नामक टीका लिहिली आहे. गोविंद ठक्कुराच्या ' प्रदीप ' नामक टीकेविषयीं हा बराच पक्षपाती दिसतो. याच्या टीकेंत चंडीदास, भाटभास्करमिश्र, सुबुद्धिमिश्र, मधुमतीकार (रविभट्टाचार्य), कौमुदीकार, आलोककार, यशोधरोपाध्याय, मणिसार, रुचिमिश्र ( रुचिकरमिश्र ), परमानंद चक्रवर्ती, प्रदीपकर ( गोविंद ठक्कुर ) इत्यादि पूर्वींच्या काव्यप्रकाशटीकाकारांचीं नांवें आढळतात. हा मोठा नैयायिक होता. [ वि. वि. पु. २२.]

**नरसिंहसरस्वती**—हा शके १३८० त होऊन गेला. हा दत्तभक्त असून, याचा शिष्य सरस्वतीगंगाधर यानें याचें चरित्र ' गुरुचरित्र ' या नांवाचें लिहिलें आहे, ( 'गंगाधरसरस्वती' पहा ). श्रीपादश्रीवल्लभ याचा नरसिंह हा शिष्य होता. यानें दत्तभक्ति सुरू केली.

**नरसी मेहता** ( १४१५—१४८१ )—एक गुजराथी संतकवि. याचें चरित्र व काव्याविषयीं माहिती "गुजराथी वाङ्मय" ( १२ वा विभाग, पृ. १४३-१४४ ) या लेखांत सांपडेल. महिपतीनें भक्तिविजयांत नरसीमेहत्याची सुरस कथा दिली आहे.

**नरसोबाची वाडी**—कोल्हापूर संस्थान. हें क्षेत्र पंचगंगा व कृष्णा नदी या दोन नद्यांच्या संगमावर वसलें आहे. मिरज-कोल्हापूर रेल्वे फांट्यावरच्या शिरोळ स्टेशनावर उतरून या ठिकाणीं जातां येतें. स्टेशनपासून वाडी ९मैल आहे. मोटार व टांगे मिळतात. श्रीपाद श्रीवल्लभ म्हणून लोक ज्यानां दत्तात्रेयाचा प्रथमावतार समजतात ते येथें झाले असें म्हणतात. या क्षेत्रास कुरुंदवाड संस्थान लागून आहे. येथील दत्ताच्या पादुकांची सेवा करण्याकरितां हजारो लोक येतात. भूतबाधा व कुष्ठरोग जातो अशा समजुतीनें बरेच सेवेकरी येथें नेहमीं राहातातहि. गुरुचरित्रांत या क्षेत्राचें बरेंच वर्णन केलें आहे. देवस्थानाला चांगलें उत्पन्न असून त्यांतून गुरुद्वादशीला(आश्विन व॥ १२) अन्नदान केलें जातें. दरवर्षी एकंदर एक लाख यात्रा तरी या ठिकाणीं येते.

**नरहरितीर्थ**—एक स्वामी. नरहरितीर्थांचें पूर्वाश्रमांतलि नांव शामाशास्त्री असें होतें यांचे वडील कलिंगदेशच्या राजाच्या मुख्य मंत्र्याचें काम करीत होते. पुढें कलिंगदेशचा राजा प्रतापवीर वारसिंहदेव याच्या अज्ञानावस्थेंत यांनीं राज्यकारभार हांकला ( शके ११८६ ). यावेळीं कलिंगदेशास शेजारच्या पहाडी मुलखांतील शबर लोकांपासून बराच उपद्रव होत असावा असें दिसतें. नरहरितीर्थांनीं या लोकांचा चांगला बंदोबस्त केला व तेथील राजा वयांत आल्यावर त्याच्या स्वाधीन सर्व राज्यकारभार केला ( शके ११९७ ). यांचे गुरु आनंदतीर्थ ( मध्वाचार्य ) बदरिकाश्रमीं कायमचें वास्तव्य करण्याकरितां निघून गेल्यावर ( शके ११९७ ) पद्मनाभतीर्थ त्यांच्या गादीवर होते व पद्मनाभतीर्थांच्या निधानानंतर ९ वर्षें, १ महिना व २३ दिवसपर्यंत त्या गादीचें काम नरहरितीर्थांनीं पाहून श्रीमुखसंवत्सरीं दशममासीं शुद्ध सप्तमीस ते समाधिस्थ झाले ( शके १२१४-१५ ). [ इं. अँ. पु. ४३, पृ. २६२-२६६. ]

**नरहरि मोरेश्वर देशपांडे** ( शके १६७० )—एक मराठी कवि. हा बीड परगण्याचा देशपांडे. आईचें नांव भवानी; याचें टोपणनांव बवाजी. हा बीडमठपति भीमस्वामी रामदासी याचा शिष्य. यानें महाभारताच्या कांहीं पर्वांवर मराठींत टीका केली आहे. सध्यां उद्योग, भीष्म, द्रोण व कर्ण अशीं चार पर्वें उपलब्ध आहेत. हा बहुश्रुत असून आपल्या पूर्वीच्या ग्रंथकारांच्या उपमा व कल्पना यानें उचललेल्या आढळतात. याची भाषा चांगली आहे. [ सं. क. काव्य सूचि. ]

**नरहरि सोनार**—हा जातीचा सोनार असून शिवभक्त होता; हा पंढरपुरास रहात असे.हा वीरशैव असल्यानें विठोबाचें दर्शन घेत नसे. पण कडदोऱ्याच्या निमित्तानें यानें विठोबाच्या मूर्तीचें दर्शन घेतलें व पुढें ज्ञानेश्वराच्या सांगण्यावरून शिव व विष्णु यांत अभेद मानून हा वारकरी भागवतपंथी बनला. हा शके १२३५ त पंढरपुरास वारला. [ म. सा. ]

**नरेगळ**—( १ )मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा. रोणच्या आग्नेयीस १० मैलांवर हें एक गांव आहे. येथें चंद्रमलेश्वरदेव, सोमेश्वरदेव, त्रिपुरांतकेश्वर, कमलेश्वरदेव व मोले ब्रह्मदेव अशीं पांच देवळें असून येथें एकंदर सात शिलालेख आहेत.

( २ ) मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा. हानगलच्या ईशान्येस १४ मैलांवर एक गांव असून येथील सर्वेश्वराचें देऊळ फार जुनें आहे असें म्हणतात. या देवळांत चार शिलालेख असून पैकीं तीन इ. स. १०७७, ११२५ आणि ११३० सालचे आहेत. येथील तलावाचें क्षेत्रफळ ३०२ एकर असून याच्या इतका मोठा आसपास तलाव नाहीं. याच्या कांठावर इ. स. १०९९ आणि ११५० या सालचे शिलालेख असलेले दोन वीरगळ असून तळ्याच्या बांधकामावर इ. स. ११८६सालचा एक शिलालेख आहे. त्याचप्रमाणें येथील बसप्पाच्या देवळांत इ. स. १२७३ सालचा एक शिलालेख आहे. म्हणजे या गांवांत एकंदर आठ शिलालेख आहेत.

**नरेंद्र**—मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा. धारवाडच्या ईशान्येस पांच मैलांवरील एक गांव. शंकरलिंग देवळाच्या समोरील दिगावर गोवा कदंबदास ( इ. स. १००७-१२५० ) चा एक शिलालेख आहे.

**नरैळ, पोटविभाग**.—बंगाल, जेसोर जिल्ह्यांतील आग्नेयीकडील पोटविभाग. क्षेत्रफळ ४८७ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ३६०५०९. खेडीं ५४१. मुख्य खेडें नरैळ. हा पोटविभाग जेसोर जिल्ह्यांतील इतरापेक्षां निरोगी असल्यामुळें येथें दाट वस्ती आहे. बाजाराचीं ठिकाणें नरैळ, नलदी व लोहागरा हीं आहेत. नरैळ तालुक्याचें क्षेत्रफळ २३८ चौरस मैल असून लोकसंख्या १४९२८९ आहे. यांत खेडीं २३८ आहेत.

**खेडें**.—बंगाल, जेसोर जिल्हा. याच नांवाच्या पोटविभागाचें मुख्य ठिकाण. उ. अ. २३° १०' व पू. रे. ८९° ३०'. लोकसंख्या १२२५. हें चित्रानदीवरील जेसोर शहरापासून २२ मैल आहे. येथें एक कॉलेजवजा शाळा आहे. यांत एफ. ए. पर्यंत शिक्षण दिलें जातें. नरैळ घराणें येथील मुख्य जमीनदार असून या घराण्यानें येथें बऱ्याच उपयुक्त इमारती बांधल्या आहेत.

**नरोद** ( किंवा रनोद )—मध्यहिंदुस्थान, ग्वाल्हेर संस्थान, नरवर जिल्ह्यांतील एक खेडें. हें सिंधूच्या अहिरावती उर्फ अहीरयाट नाल्यावर वसलें आहे. येथें हिंदी व मुसुलमानी प्रेक्षणीय पडकीं स्थळें असून येथें आंबराई वगैरेहि आहेत. सर्वांत पहाण्यालायक असा एक हिंदी धर्तीवर बांधलेला मठ आहे. सध्यां ज्या भिंतीला कोकई महाल

म्हणतात; त्यावर एक त्या इमारतीसंबंधाचा लेख आहे. त्यांत अवंतिवर्मन राजाचा उल्लेख आहे. जुन्या लेखांवरून हा राजा इ. स. ११ व्या शतकांत झाला असावा. झंझीरी मशीदहि पद्धाण्यासारखी आहे. जहांगीरच्या राज्यांत हें खेडें चौधरी चिंतामण वकील याला दिलें व याच्या वंशजांनां अजून याची सनद आहे. मराठयांच्या स्वारीपासून याला उतरती कळा लागली व १९ व्या शतकांत शिंद्यांच्या हातीं गेल्यावर याचा सपाटयानें ऱ्हास होऊं लागला. याच्या भोंवतीं उंच भिंत असून तिला ४ दरवाजे आहेत. येथें एक शाळा व संस्थानी पोस्ट ऑफिस आहे.

**नर्मदानदी**—ही हिंदुस्थानांतील एक प्रमुख नदी आहे. अमरकंटक पर्वतांत ( उ. अ. २२° ४१' व पू. रे. ८१° ४८') उगम पावते, व ८०१ मैल वहात जाऊन शेवटीं शेवटीं भडोचजवळ समुद्राला ( खंबायतच्या आखाताला ) जाऊन मिळते. समुद्रसपाटीवर ३००० फूट असणाऱ्या व ज्या भोंवतीं देवळें आहेत अशा एका कुंडापासून हिचा उगम आहे. जवळच कपिलधारा नांवाचा ८० फूट उंचीचा एक धबधबा आहे. ४० मैलांनंतर ही मध्यप्रदेशांत शिरते, व मंडल्यावरून रामनगरच्या जवळ पोंचते. हिचें मंडला ते रामनगर पर्यंत(१५ मैल) पाणी निळें असून दोन्ही बाजूला दाट जंगल आहे. यानंतर ही नदी जबलपूरच्या शेजारून वाहते. येथें दूधधारा नांवाचा ३०फूट उंचीचा धबधबा आहे.नंतर संगमरवरी खडकांतून ही आपला मार्ग काढते. येथें पात्र फक्त २० यार्ड रुंद आहे. यानंतर जबलपूर ते हंडिया, २०० मैल पर्यंत फार सुपीक अशा विंध्य व सातपुडा पर्वतांमध्यें असणाऱ्या प्रदेशांतून ही वहाते. यानंतर पुन्हां नदीच्या कांठांनीं पर्वत व जंगल सुरू होतें. याच ठिकाणीं पेंढारी लोकांचें माहेरघर होतें. मंचर व पुनासा येथें लहान लहान धबधबे आहेत. मांधातानंतर इंदूर संस्थानांतून सुमारें १०० मैल पुन्हां सुपीक प्रदेशांतून वहाते. नंतर ही महेश्वराजवळून वहात जाते. येथें अहल्याबाईनें बांधविलेले घाट व देवळें बरींच असून तिचेंहि स्मारक आहे. मुंबई इलाख्यांतील या नदीची लांबी १७० मैल आहे. भडोचपासून या नदीचें मुख १७ मैल आहे. मंडल्यांतून बंजर, नरसिंगपुरांतून शरे, शकुर व हीरन या नद्या हिला मिळतात.

या नदींत बोटी अशा फक्त मुखाजवळ चालतात. इतरत्र फक्त पावसाळ्यांत लहान लहान होड्या चालू शकतात. या नदीवर जबलपुर, हुशंगाबाद व मोरटक्का येथें रेल्वेपूल आहेत. बहुतेक ठिकाणीं हिचे कडे फार उंच असल्यामुळें या नदीचा कालव्यांकडे उपयोग होत नाहीं.

. या नदीचें नांव रेवा असेंहि आहे. हें नांव रेव ( उडणें ) या शब्दावरून पडलें. रामायणांत व महाभारतांत ही नदी शिवाच्या शरीरापासून निघाल्याचे उल्लेख आहेत. हिंदूंनां ही नदी फार पवित्र वाटते. कोणी हिचें महात्म्य गंगेहून जास्त आहे असें प्रतिपादन करतात. ज्या ज्या ठिकाणीं यां नदीचा दुसऱ्या नद्यांशीं संगम झाला आहे, तेथें देवळें फार असून त्या ठिकाणीं नर्मदे ब्राह्मण फार असतात.

पवित्र स्थानें.—भेडाघाट, ब्रह्मण, ओंकार मांधाता ( मध्यप्रांत), बरवानी (मध्य. हिं. ). नर्मदाखंड या पुस्तकांत १४०००श्लोकांत या नदीचें विस्तृत वर्णन आहे. प्रतिवर्षी सुमारें ३००यात्रेकरू नर्मदाप्रदक्षिणा करण्यास निघतात. शुक्लतीर्थ, येथें एक वडाचें झाड असून यावर संत कबीराचें नांव आहे. नर्मदा ही उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांची सीमा आहे. या नदीच्या दोन्ही बाजूंनां निरानिराळे शक आहेत. मराठे लोक या नदीच्या पलीकडे गेले म्हणजे दुसऱ्या देशांत गेलों असें समजत.

**नल**—निषधराज वीरसेनाचा पुत्र; हा सुंदर,सत्यवादी व अश्वविद्येंत फार प्रवीण होता. विदर्भदेशाचा राजा भीमक याची कन्या दमयंती हिची माहिती ऐकून यानें तिच्याकडे दूत(हंस) पाठविला. दोघेहि परस्परानुरक्त झालीं. स्वयंवराच्या वेळीं देवांनीं नलरूप घेऊन तिची परीक्षा केली असतां तिनें खरा नळ ओळखून त्याला माळ घातली. पुढें नळानें दायादांशीं द्यूत खेळून त्यांत आपलें राज्य गमाविलें. तेव्हां मुलें माहेरीं पोहोंचवून दमयंती नळाबरोबर अरण्यांत गेली. हिला सोडल्यास ही माहेरी जाऊन सुखांत राहील अशा विचारानें नळानें अरण्यांत तिचा त्याग केला; वाटेंत एका व्याधानें तिच्यावर वाईट नजर ठेवल्यानें तिनें त्याला दग्ध करून चेदीराजाच्या घरीं आश्रयास गेली. नळानें एका नागास वणव्यांतून वाचविल्यामुळें त्यानें नळाचें स्वरूप बदलविलें. पुढें नळ हा अयोध्येच्या ऋतुपर्ण राजाकडे बाहुक नांव धारण करून सारथी म्हणून राहिला. दमयंतीच्या बापास तिचें वर्तमान समजल्यावर त्यानें तिचा शोध करून तिला माहेरीं आणविलें. नळाला कुंडिणपुरास आणण्याच्या निमित्तानें दमयंतीनें आपण पुनः स्वयंवर करीत असल्याचें ऋतुपर्णास कळविलें. बाहुकानें अगदी थोडया दिवसांत ऋतुपर्णास अयोध्येहून कुंडिणपुरास आणलें. तेव्हां ऋतुपर्णानें नळास अक्षविद्या शिकविली व आपण त्याच्या जवळून अश्वविद्या शिकला. पुढें दमयंतीनें नळास खरा प्रकार सांगितला व पुन्हां दोघे एकत्र झाले. नंतर नळानें आपल्या राजधानीस येऊन आपल्या दायादांशीं पुन्हां द्यूत खेळून राज्य जिंकून घेतलें व सुखानें आयुष्य घालविलें. 'दमयंती' पहा. [ भारत वनपर्व. अ. ५३—७२ ]

**नळ ( ळ )**.—मुंबई इलाखा. अहमदाबादच्या वायव्येस सुमारें ३७ मैलांवर असणारें एक मोठें तळें. पूर्वी हा समुद्राचाच भाग असून काठेवाड हें बेट होतें. तरी सध्यांहि याचें क्षेत्रफळ ४९ चौरस मैल आहे. उन्हाळ्यांत याचें पाणी फारच खारट असतें. याच्या कांठांनीं निरनिराळीं झुडुपें आहेत व यांत चित्रविचित्र पक्षी राहतात. यांत बरींच बेटें असून त्यांचा कुरणांप्रमाणें उपयोग केला जातो.

**नलकूबर**—कुबेराचा पुत्र. मणिग्रीवाचा ज्येष्ठ भ्राता. नारदाच्या शापानें हे दोघे गोकुलांत अर्जुन-वृक्ष झाले असतां, कृष्णानें यांचा उद्धार केला.

**नलगोंडा**, जि ल्हा.—हैदराबाद संस्थान. मेयक-गुलशनाबाद विभागांतील जिल्हा. उत्तर अक्षांश १६° २०' ते १७° ४७'व पूर्व रेखांश ७७° ४५' ते ७९° ७५'. क्षेत्रफळ ६१०४ चौरस मैल ( यांत जहागिरींचाहि समावेश होतो ). यांत एकंदर ४ पर्वतांच्या रांगा असून लहान लहान स्वतंत्र टेंकडया बऱ्याच आहेत. नल्लपहाड ही त्या रांगांपैकीं एक आहे. जिल्ह्याचा सरसकट उतार वायव्येकडून आग्नेयीकडे आहे. या जिल्ह्यांत कृष्णा व तिला मिळणाऱ्या नद्या मुसी, अलेर हल्लिया, पेद्दावती, दंडी या नद्या मुख्य आहेत. गोंवळकोंडयाचे हिरे येथील कडाप्पाकर्नूलसारख्याच दगडापासून काढीत असत. येथील जंगलांत साग, शिसू, संद्र, बाभुळ, आंबा, चिंच व तरवड इत्यादि झाडें सांपडतात. आगस्ट-आक्टोबरमध्यें येथें हिंवतापाची सांथ असते. पाऊस सरासरी २६ इंच पडतो.

इतिहासः—हा पूर्वी वरंगळच्या राजांचा भाग असून त्यांच्यांतील एकानें नलगोंडाच्या ईशान्येस २ मैलांवर पांगाल किल्ला बांधून तें मुख्य ठाणें केलें; पुढें लगेच नलगोंडा येथें राजधानी झाली. अहंमदशाह वली या बहामनी राजाच्या वेळेस हा प्रांत जिंकला गेला. बहामनीनंतर येथें गोंवळकोंडयाची कुतुबशाही कुलीकुतुबशहाच्या वेळेस आली. पुढें औरंगझेबाच्या राज्यांत हा प्रांत मोडूं लागला. पण हैदराबाद जेव्हां वेगळें झालें तेव्हां हाहि वेगळा झाला. पुराणवस्तूंपैकीं नलगोंडा व देवरकोंडा, ओरलकोंडा व भोंगिर हे किल्ले प्रेक्षणीय आहेत. देवरकोंडयाच्या भोंवती ७ टेंकडया होत्या व हा अजिंक्य समजला जात असे, पण सध्यां हा किल्ला धुळीस मिळाला आहे. पांगाल, नागलपाद व पाललमरी येथील देवालयें हिंदूंच्या कारागिरीची साक्ष देतात. यांत जहागिरीसुद्धां ११९७ खेडीं आहेत. शहरेंः—नलगोंडा व भोंगीर. येथील लोक तेलगू भाषा बोलतात. सध्यां यांत नलगोंडा, चेरिअल, सुरियापेठ, हुजुरनगर, मिरियालगुडा, देवरकोंडा व भोंगीर या ७ तहशिली आहेत. कापूस, माडिगा, धनगर, ब्राह्मण, सालस् ( कोष्टी ), कोमटी, औसालस वगैरे जाती आहेत. लोकसंख्या( १९११ )१०४४३८१.

मिरियालगुडा तालुक्यानजीकची कृष्णानदीकांठची जमीन सुपीक आहे. येथें रब्बी पिकें होतात. चलका व मसब ( जमिनीचे प्रकार ) या जमिनींत खरीफ पिकें होतात; जसें ज्वारी, बाजरी, कापूस, कुळीथ व एरंडीचें बीं. थोडासा तांदूलहि होतो. येथें रयतवारीपद्धतीनें जमिनी दिल्या जातात. मूसी, अलेर, पेद्दावागु या नद्यांच्या पाण्यापासून कांहीं तलाव झालेले आहेत. त्यांचें पाणी बरेंच उपयोगांत येतें. येथें रक्षित असें जंगल नाहीं पण १७ प्रकारचीं झाडें कोठेंहि सांपडलीं तरी "रक्षित" समजावीं असा नियम आहे. येथें चुन्याचा व शाहाबादी दगड सांपडतो. पूर्वी चित्रेळ येथें सोन्याची खाण होती पण ती बंद झाली कृष्णानदीच्या डाव्या किनाऱ्यावर हिरे सांपडतात असें म्हणतात.

व्यापारः—चरलपल्ली, नलगोंडा व पांगल तालुक्यांत फारच टिकाऊ लुगडीं व उपरणीं होतात. भोंगीर येथें मातीचीं भांडीं तयार होऊन तीं हैद्राबाद वगैरे ठिकाणीं जातात. नलगोंडयाच्या पूर्वेस कातडें कमाविण्याचा कारखाना आहे.

आयात-निर्गत मालः—एरंडीचें बीं, कापूस, तरवडाची साल, कातडीं, हाडें, शिंगें, तांदूल, ज्वारी बाजरी, हा असून आयात माल, मीठ, अफू, चांदी, सोनें, तांबें, पितळ, लोखंड, साखर, मातीचें तेल, कच्चें रेशीम, सूत, लोंकरी, रेशमी व सुती कापड इत्यादि आहे. जिल्ह्यांतून नैझाम गॅरंटीड स्टेट रेल्वे जाते. राज्यव्यवस्था इतर जिल्ह्यांप्रमाणें चालते. शिक्षणाच्या बाबतींत याचा नंबर बराच खालीं लागतो. फक्त शेंकडा १.९ लोक साक्षर आहेत [ इंपीरियल गॅझे.; हैदराबाद सेन्सस रिपोर्ट ].

ता लुका.—नलगोंडा जिल्ह्यांतील तालुका. क्षेत्रफळ १००३ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १८६२०५. यांत नलगोंडा शहर हें मुख्य ठिकाण असून २४६ खेडीं आहेत; पैकीं १६ जहागिरी आहेत. येथें मुख्यत्वेंकरून तांदूळ पिकतो.

गां व.—याच नांवाच्या जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें दोन टेंकडयांमध्यें वसलें आहे. लोकसंख्या ( १९०१ )५८८९. उत्तर टेंकडीवर शाहा लतीफचें थडगें व दक्षिणेकडील टेंकडीवर एक किल्ला आहे. पूर्वी याचें नांव नीलगिरी होतें. पण अलाउद्दीन बहामनशहापासून हें नांव पडलें. येथें एक मरी अलमेंने बांधलेली सराई, हिंदू देवालय, एक उतारूंसाठीं गृह व उस्मानगंज नांवाचा बाजार आहे. येथें एक दवाखाना, शाळा, कातडीं कमावण्याचा कारखाना इत्यादि आहेत.

**नलदुर्ग**—हैद्राबाद संस्थान. उस्मानाबाद जिल्ह्याचें जुनें नांव. हा दुआब निजामाचा होता; येथें एक किल्लाहि होता; तो त्यानें साखरखेडयाच्या लढाईंत पराभव झाल्यानें ( २५ लक्षांच्या जहागिरीबरोबरच ) पेशव्यानां देण्यांत आला. पुढें इंग्रज व निजाम यांच्यांतील स. १८५३ च्या तहानें हा दुआब इंग्रजांस मिळाला. नंतर १८५७ च्या बंडांत निजामास परत मिळाला. हा आदिलशाहीचा एक सरकार ( जिल्हा ) होता; ज्यावेळीं औरंगझेबानें तें राज्य खालसा केलें तेव्हां हा प्रांत मोंगलाकडे गेला व पुढें निजामउल्मुल्क स्वतंत्र झाल्यावर त्याच्या राज्यांत समाविष्ट झाला.

येथील किल्ला बोरी नदीच्या उंच थडीवर वसला असून हा दक्षिणेंतील किल्ल्यांपैकीं मुख्य व महत्त्वाचा आहे. मुसुलमानी स्वारीपूर्वी येथें एखादा चालुक्यांचा मांडलिक असावा. नंतर हा बहामनी राज्याकडे गेला व त्यांनीं शहराची तटबंदी केली. नंतर विजापूरच्या आदिलशाहीचा येथें अंमल सुरू झाला. इ. स.१५५८ मध्यें अली आदिलशहानें हा किल्ला

बांधला इतकेंच नव्हे तर वोरी नदीला बांध घालून किल्ल्यासाठीं सतत पाण्याचा पुरवठा करून घेतला.

**नलहाती**—बंगाल, बीरभूम जिल्हा. रामपूर पोटविभागांतलि खेडें. हें ईस्ट इंडियन रेल्वेवर वसलें आहे. येथें पूर्वी नलराजाची राजधानी असावी. नलहाती झिला टेंकडीवर कांहीं पुराणवस्तूंचे पडके अवशेष दिसतात. दुसरें नलतेश्वरीच्या देवळापासून याचें नांव पडलें असावें असें म्हणतात. येथें सती देवीचें डोकें पडलें असे म्हणतात. हें तांदुळाच्या व्यापाराचें ठिकाण आहे.

**नलिया**—मुंबई, कच्छ संस्थानांतील शहर. लोकसंख्या ( १९११ ) ५४७७. कच्छमधील हें बऱ्याच भरभराटीचें शहर आहे. याला तटबंदी असून येथें मुंबई व झांजीबारचे श्रीमंत वयोवृद्ध व्यापारी आपले शेवटचे दिवस घालवण्याकरितां येतात.

**नल्लमलियास** ( काळ्या टेकड्या )—मद्रास, कर्नूळ जिल्ह्याच्या दक्षिणेकडील तीन तालुक्यांतील पूर्व घाटाच्या भागाचें नांव. उ. अ. १४° २६' ते १६° व पू. रे. ७८° ३९' ते ७९° २३. ह्या टेंकड्या दक्षिणोत्तर कृष्णा नदीपासून पेन्नार नदीपर्यंत ९० मैल पसरल्या आहेत. यांची सरासरी उंची १५००—२००० फूट आहे.

यांवर वरीच उंच सपाटीवरील मैदानें असून कित्येक वेळां येथें राहण्याचे प्रयत्न झाले. परंतु पाण्याची टंचाई व जूनमधील ताप यामुळें ते सफळ झाले नाहींत. श्रीशैलम् हा फार सखल असल्यामुळें येथें जुन्या काळीं वस्ती होती व पुराणवस्तूंचे मोडके अवशेष सांपडतात. हल्लीं येथें चेंचस नांवाचे रानटी लोक मात्र राहतात.

या सर्व टेंकड्यांवर बहुतेक सर्व ठिकाणीं जंगल आहे. पाऊस सरासरी ४० इंच पडतो. दऱ्या फार खोल व सुळकेदार असल्यामुळें पाणी चटकन वाहून जातें. येथील इमारती लांकूड कठिण असतें. येथून सध्या गुंतकल-बेझवाडा रेल्वेनें इमारती लांकूड बरेंच आणलें जातें. ही रेल्वे नंदी कनम "नंदीपथ" या अरुंद वाटेनें जाते. जवळच नंदिकेश्वराचें देऊळ आहे कर्नूल जिल्ह्यांतून समुद्रकांठाकडे व मंगलम्मा व डोर्मलवरून जाणारा असे दोन बैलगाडीचे रस्ते आहेत; पैकीं पहिला महत्त्वाचा आहे.

**नवखंडें**—इलावृत्त, भद्राश्व, हरिवर्ष, किंपुरुष, केतुमाल, रम्यक, भरत, हिरण्मय, व उत्तरकुरु हीं नऊ खंडें जंबुद्वीपाचीं आहेत. भरत, वर्त्त, राम, ब्रामाळ, केतुमाल, हिरे, विधिवस, महि व सुवर्ण हीं दुसरीं नांवें कांहीं ग्रंथांतून सांपडतात ( विवेकसिंधु ).

**नवग्रह**—सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहु, व केतु हे नवग्रह होत.

**नवद्वीप**( नडिया )—बंगाल. नडिया जिल्ह्याचें पूर्वीचें मुख्य ठिकाण. उ. अ. २३° २४' व पू. रे ८८° २३'. हें भागीरथीच्या पश्चिम किनाऱ्यावर वसलें आहे. लोकसंख्या ( १९११ ) १२४८०. येथें हिंदूंची वस्ती फार मोठी आहे. बंगालचा बल्लाळसेन याचा मुलगा लक्ष्मणसेन यानें हें शहर इ. स. च्या १२ व्या शतकांत वसविलें असावें. स. १२०३ मध्यें बखत्यार खिलजीनें हें घेतलें. हें विद्वान लोकांचें ठिकाण असून धर्माच्या बाबतींत येथल्या पंडितांचा सल्ला दूरदूरचे लोक घेतात. येथेंच चैतन्य या थोर पुरुषाचा जन्म झाला व त्याच्या जन्मदिवसाप्रीत्यर्थ येथें जंगी यात्रा भरते. येथें तोल किंवा संस्कृत पाठशाळा आहेत. येथें पितळेचीं भांडीं तयार होतात.

**नवनाग**—अनंत, वासुकी, शेष, पद्मनाथ, कंबल, शंखपाल, धृतराष्ट्र, तक्षक व कालिय. हीं नवनागाचीं नांवें होत.

**नवनाथ**—नाथसंप्रदायांत नवनाथ व ८४ सिद्ध सांगितले आहेत, त्यांतील ९ नाथ तेः—प्रकाशनाथ, विमर्शनाथ, आनंदनाथ, ज्ञाननाथ, सत्यानंदनाथ, पूर्णानंदनाथ, स्वभावानंदनाथ, प्रतिभावानंदनाथ आणि सुभगानंदनाथ. [ मत्स्येंद्रादिनाथ नाथपंथ-कानफाटे; नवनाथभक्तिसार पहा. ]

**नवनिधी**—महापद्म, पद्म, शंख, मकर, कच्छप, मुकुंद, कुंद, नील व खर्व असे कुबेराचे नवनिधी आहेत.

**नवरत्नें**—हिरा, माणिक, मोतीं, गोमेद, इंद्रनील, पाच, प्रवाळ, पुष्कराज व वैडूर्य किंवा तोरमल्ली.

**नवरस**—शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत व शांत हे नवरस होत.

**नवरात्र**—आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंतच्या नऊ दिवसांस नवरात्र असें म्हणतात. हें नवरात्र देवीविषयीं असून शरदृतूमध्यें येत असल्यामुळें यास शारदीय नवरात्र असें म्हणतात. हा कुलाचार बहुतेक सर्व ब्राह्मणवर्गांत आढळतो. आश्विन शुद्ध प्रतिपदेस मातीच्या लहानशा ढिगावर थोडे गहूं पेरून त्यावर मृत्कलश स्थापून त्यावर देवीची स्थापना करतात. यास घटस्थापना हें नांव रूढ आहे. नित्य देवीची पूजा, घटावर पुष्पमाला बांधणें व अखंडदीपस्थापना या गोष्टी नऊ दिवस चालतात. कोणी मार्कंडेय पुराणांतील देवीमहात्म्य-सप्तशती-नित्य पठण करतात. आठव्या दिवशीं चंडी ( देवी ) प्रीत्यर्थ सप्तशतींतील श्लोक म्हणून तिलहोम करतात. या होमानंतर बलीच्या ऐवजीं कोहाळा फोडून देवीस बलिदान करतात. नऊ दिवस पूर्ण झाल्यावर दहाव्या दिवशीं विसर्जन होतें. दाहव्या दिवशीं दसरा होतो; 'दसरा' पहा.

शारदीय नवरात्राशिवाय, खंडोबाचें नवरात्र(सहा दिवस), रामाचें नवरात्र ( रामनवमी पूर्वी ) वगैरे नवरात्रें आहेत. परंतु तीं फारशीं रूढ नाहींत. विशेषतः देशस्थ लोकांत खंडोबाचें नवरात्र ( मार्गशीर्ष शु. १ ते ६ पर्यंत ) पाळलें जातें. पेशवाईतील नवरात्राचा कार्यक्रम पुढीलप्रमाणें असेः—

आश्विन शुद्ध पक्षांत अंबा पद्मासनावर आरूढ होते; व प्रतिपदेस घटस्थापना होते. मूळमंत्र करून व रक्षपाल ठेऊन ब्रह्मा, विष्णु, महेश व यमाबाईचें पूजन करून उदो म्हणतात.

दुसऱ्या दिवशीं रेणुकादि चौसष्ट योगिनी कस्तुरी मळवट भरून उदोकार बोलतात. तिसरे दिवशीं अंबा सीनगा ( शृंगार ) मांडते व पीतांबर व अलंकार लेवून अष्टभुजा स्वरूपांत विराजमान होते. चतुर्थ दिवशीं निराहार करून विश्वव्यापक भवानीला पावण्याबद्दल प्रार्थना करण्यांत येते. पाचवे दिवशीं भक्तीनें देवीचें पूजन व रात्रीं जागरण करितात. सहावे दिवशीं दिवटया घेऊन गोंधळ घालतात व कवड्यांची माला धारण करून भक्तगण जोगवा मागतात. सातवे दिवशीं सप्तशृंगगडावर नानाप्रकारच्या पुष्पांनीं पूजा केली जाते. आठवे दिवशी अष्टभुजा नारायणी शेषाद्रिपर्वतावर उभी देखिली असा भक्तास अनुभव येतो व तो तिला शरण जातो. नवव्या दिवशीं नवा दिवसांचें पारणें करून सप्तशतीचा जपहोमहवन करतात. पक्वान्नाचा नैवेद्य करून आचार्य ब्राह्मण तृप्त केले जातात. दहाव्या दिवशीं अंबा शिलंगणास निघते. [ भा. इ. सं. मं. शके १८३२. ]

**नवरोज**—पारशी लोकांचा वर्षप्रतिपदेचा दिवस. इराणांत पारशी राज्य असतांना पारशी राजे आपल्या राज्यारोहणाचा वाढदिवस करीत त्यासहि नवरोज म्हणतात. मुसुलमानांनीं इराण घेतल्यावर त्यांनींहि हा क्रम सुरू ठेवला होता. अकबरानें ज्यावेळीं आपला दिन–ई–इलाहि नांवाचा नवीन धर्म प्रचारांत आणला त्यावेळीं नवरोजचा सण सुरू केला. १५९७ सालीं अकबर लाहोरास असतांना नवरोजचा सण मोठ्या समारंभानें करीत असतां एकाएकीं मोठी वीज पडून त्याची सर्व छावणी जळून गेली. हा उत्सव मोंगल बादशाहीअखेरपर्यंत चालू असे. त्या दिवशीं सरदार-दरकदारांस इनामें, बक्षिसें वगैरे देत व त्यांच्याकडून पातशहास नजर मिळे. ती त्याची खासगी मिळकत समजली जाई. हा समारंभ पांच दिवस चाले. नाण्यांवर, बादशहाच्या राज्यारोहणाचें हें नवें वर्ष लागल्यानें नवा सन घालून नवीं नाणीं पाडण्यांत येत. कांहीं विलासप्रिय बादशहा यावेळीं मीनाबाजार भरवून गोषांतील स्त्रियांची ओळख करून घेण्याची खटपट करीत. अशा ओळखीच्या स्त्रिया पुढें त्यांच्या बेगमाहि होत असें म्हणतात. मराठी राज्यांत हा सण उचलला गेल्याचें आढळत नाहीं.

**नवलगड**—राजपुताना, जयपूर संस्थान. शेखावती निझामतींतील याच नांवाच्या इस्टेटीचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या ( १९११ ) १४०५९. येथें दगडी तटबंदी आहे. येथें पोस्ट व टेलिग्राफ ऑफिस व शाळा आहेत. येथें तीन ठाकुर असून ते सर्व मिळून दरबारला ९२४० रुपये देतात.

**नवलगुंद, तालुका.**—मुंबई. धारवाड जिल्ह्यांतील वायव्येकडील तालुका. उत्तर अक्षांश १५° २१′ ते १५°५३′ व पूर्व रेखांश ७५° ५′ ते ७५° ३३′. क्षेत्रफळ ५६५ चौरस मैल. यांत नवलगुंदपेठ या लहान पोटविभागाचाहि समावेश होतो. यांत अण्णिगरी, नरगुंद व नवलगुंद अशीं ३ शहरें व ८५ खेडीं आहेत. लोकसंख्या (१९११) ८८८१६. हा सर्वांत विरळ लोकवस्ती असलेला तालुका आहे. पाऊस सरासरी २४ इंच पडतो.

श ह र.—नवलगुंद तालुक्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या ( १९११ ) ७०४५. हें सुती सतरंज्या व येथील उत्तम बैलांकरितां प्रसिद्ध आहे. स. १४५४ च्या सुमारास हें बहामनी सुलतान अल्लाउद्दीनच्या एका सरकाराचें मुख्य ठिकाण होतें इ. स. १६९० मध्यें औरंगझेबच्या वेळेस येथें एक लिंगायत देसाई राहत असे. १७४७ सालीं हें पेशव्यांकडे गेलें. नंतर हें टिप्पूनें घेतलें परंतु फिरून हें मराठ्यांनीं घेऊन येथील देसायाला २३००० रुपये वार्षिक उत्पन्न असणारी जमीन दिली. १७९५ पासून १८०० पर्यंत धोंडोपंत गोखल्यांनीं नवलगुंद व गदग हे देसायापासून घेतले. इ. स. १८३७ मध्यें जनरल मनरोनें रामराव नांवाच्या एका मनुष्याला येथला अधिकारी नेमिलें व त्यानें गोखल्याच्या मुलाचा ( बापू ) पराभव केला. येथल्या देसायाला अजून कांहीं इनाम जमिनी आहेत. इ. स. १८३८ मध्यें देसायाला व्यापारावरील जकात उठविण्याच्या अटीवर दत्तक घेण्याचा हक्क दिला.

**नवलाख उंबरें**—खेडकाळ्याच्या (पुणें) ईशान्येस १० मैलांवर हें एक जुनाट गांव आहे. जवळूनच सुद नदीचा उगम होतो. येथें कांहीं हिंदुमुसलमानांचे पुराणावशेष आहेत. येथें एक बहिरोबा नौखंडींचें देवालय आहे. ह्या गांवाची स्थापना ७०० वर्षांपूर्वीं झाली. येथील कोणा मोंगल सरदाराच्या कन्येस भाऊबिजेच्या दिवशीं नऊ लाख टांक ओंवाळणींत मिळाले. त्यावरून या गांवास हें नांव पडलें. रशियन प्रवासी निकितिन ह्यास चेऊलहून जुन्नरास जातांना वाटेंत उंबरें लागलें होतें.

**नवली**—मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा. नवलगुंदच्या पूर्वेस आठ मैलांवर हें खेडें असून येथील कलमेश्वराच्या देवालयांत एक शिलालेख आहे.

**नवविधाभक्ति**—ईश्वरभक्तीचे नऊ प्रकार आहेत तेः- श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन.

**नवशाहरो उबौरो** ( गढीयासीन )-मुंबई, सिंध, सक्कर जिल्ह्यांतील तालुका. क्षेत्रफळ ४०२ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ७५९८३. यांत गढीयासीन हें मुख्य खेडें असून इतर ९० खेडीं आहेत. हा तालुका फार सुपीक असून भरभराटींत आहे. मुख्य पिकें तांदूळ, ज्वारी, गहूं, हरभरा हीं होत. शेतांना सक्कर कालव्यानें पाणी पुरविलें जातें.

**नवशाहारो फिरोझ**—मुंबई, सिंध-हैदराबाद जिल्ह्यांतील तालुका. क्षेत्रफळ ५५३ चौरस मैल. लोकसंख्या(१९११) १०१३१४. खेडीं ११३; मुख्य खेडें नवशाहरोफिरोझ. तालुक्याच्या पश्चिम भागाला जंगल असून नदीच्या पुरामुळें कधीं कधीं नुकसान होतें. मुख्य पिकें गहूं, हरभरा, ज्वारी व नीळ हीं आहेत.

**नवसरी**, प्रां त –बडोदें संस्थानांतील एक प्रांत. बडोद्यांतील ४ प्रांतांपैकीं हा सर्वांच्या दक्षिणेस आहे. मर्यादाः– उत्तरेस भडोच व रेवाकांठा एजन्सी; दक्षिणेस सुरत जिल्हा, वांसदा व डांग; पूर्वेस खानदेश व पश्चिमेस सुरत व अरबी समुद्र. क्षेत्रफळ १८१० चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) ३४०३७२. यांत शहरें सह आहेत. येथील शेंकडा ७५ लोक गुजराथी बोलतात. मुख्य पिकेंः—ज्वारी, तांदूळ, गहूं, बाजरी, कोद्रा, नागली, तूर, वाल, वाटाणे, चणे, मूग, उडीद, कापूस, तंबाखू, ऊंस, केळीं वगैरे आहेत. या प्रांतांत जंगल ५४७ चौरस मैल आहे. यांत हलारवन, तेमरू व सादडा या जातींचें इमारतीचें लांकूड सांपडतें. येथें मुख्यत्वेंकरून कापडाचा व्यापार चालतो. इतर नक्षीकाम, दागिनें व धातूंचें कामहि होतें. निर्गतमाल ताडी, केळीं, ऊंस, तांदूळ, ज्वारी, गूळ, साखर, साग, सादडा वगैरे; व आयातमाल विलायती सामान, स्टेशनरी, लोखंडी व कांचेचें सामान, छत्र्या वगैरे. व्यापार बोटींनें व रेल्वेनें चालतो. यांत बी. बी. सी. आय् व तापती–व्हॅली रेल्वे या अनुक्रमें दक्षिणोत्तर व पूर्वपश्चिम आहेत. प्रांताचा कारभार नवसरी येथें असणारा सुभा चालवितो. येथें इतर खात्यांच्याहि मुख्य कचेऱ्या आहेत.

ता लु का.—नवसरी प्रांतांतील नैर्ऋत्येकडील एक महाल. क्षेत्रफळ १२५ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ५५२७०. नवसरी हें एकच व मुख्य शहर आहे. खेडीं ६० आहेत. यांतून उत्तरेकडे मिधोला व दक्षिणेस पूर्णा या नद्या वाहातात. मुख्य पिकें ज्वारी, तांदूळ, कापूस, एरंडीचें बीं व ऊंस हीं आहेत.

श ह र.—नवसरी प्रांताचें मुख्य शहर. हें बॉंबे–बडोदा सेंट्रल इंडिया रेल्वेवरील स्टेशन आहे. हें जुनें शहर असून टॉलेमी याचा नसरिया म्हणून उल्लेख करतो. लोकसंख्या १७९८२. या शहराशीं हिंदुस्थानांतील पारश्यांचा ऐतिहासिक संबंध आहे. इराणांतून ज्या पारश्यांनीं इस्लामधर्म नाकारला ते ११४२ सालीं हिंदुस्थानांत येऊन नवसरीला राहिले. येथें ते भरभराटीला आले व हें शहर त्यांनीं आपलें ठाणें केलें. येथें म्हातारपणीं धंदा सोडल्यावर चैनीनें राहणाऱ्या अशा बऱ्याचशा पारशांचीं घरें आहेत. येथें ताडाचीं पुष्कळ झाडें असून नवसरीची ताडी फारच स्वादिष्ट म्हणून प्रसिद्ध आहे. समुद्राच्या सान्निध्यामुळें उन्हाळ्यांतहि हवा समशीतोष्ण असते. मल्हारराव होळकरानां येथें राहणें फार आवडत असे. येथें एक हायस्कूल, आंग्लोव्हर्नाक्युलर शाळा, दवाखाना तसेंच बाजार, वाचनालय, तुरुंग, दारूचा कारखाना वगैरे आहेत. येथें गुलशन नांवाचें इंग्रजी–गुजराथी मासिक निघतें. पाहण्यासारख्या वस्तूंपैकीं येथें " टावर ऑफ सायलेन्स " ( पारशी मृतांनां पुरण्यासाठीं ) व अग्नीचें एक देवालय( अताश नांवाचें ) आहे. येथें पूर्वी सुती कापड होत असे. पारशी लोकांचीं कस्ती नांवाचीं जानवीं येथेंच होतात इतर कारखाने म्हणजे साखरेचा व कातडीं कमावण्याचा हे होत. येथें बोटीनें व रेल्वेनें बराच व्यापार चालतो व बंदरांतहि सुधारणा होत आहे.

**नवसागर**—" आमोनिया " ( ज्ञानकोश विभाग ८, पृ. २०१–२०२ ) पहा.

**नवादा**, पो ट वि भा ग.—बिहार–ओरिसा. गया जिल्ह्यांतील पूर्वेकडील पोटविभाग. क्षेत्रफळ ९५२ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ४६०९९६. उत्तरेकडील भाग सुपीक असून दक्षिणेकडील डोंगराळ आहे. यांत नवादा हें मुख्य शहर व हिसुआ हीं दोन शहरें आहेत. यांत खेडीं १७५२ आहेत. अफसर येथें जुन्या वस्तू सांपडतात. पैकीं वराहाची एक मूर्ति आहे.

श ह र.—याच नांवाच्या पोटविभागाचें मुख्य शहर. याच्या मधून खुरई नदी वहाते. लोकसंख्या (१९११)६८२८. साउथ–बिहार रेल्वे सुरू झाल्यापासून ह्या शहराला व्यापारी दृष्ट्या महत्त्व येऊं लागलें आहे.

**नवानगर**, सं स्था न.—मुंबई. काठेवाड पोलिटिकल एजन्सींतील एक संस्थान. उत्तर अक्षांश २१° ४४' ते २२° ५८' व पूर्व रेखांश ६९° २०' ते ७०° ३३.' क्षेत्रफळ ३७९१ चौरस मैल. लोकसंख्या ( १९०१ ) ३३६७७९. मर्यादाः—उत्तरेस कच्छचें आखात ( रण ); पूर्वेस मोर्वी, राजकोट, ध्रोल व गोंडल हीं संस्थानें; दक्षिणेस काठेवाडचा सोरठ पोटविभाग व पश्चिमेस अरबी समुद्र व ओखारण. यांत भादर, वर्तू, अजी व उन्द या मुख्य नद्या आणि जोडिय सलाय व नवानगर किंवा बंदी हीं बंदरें आहेत.

या संस्थानांत पूर्वी सिंह सांपडत असत. वाघेर बंडखोरांनां पकडण्यासाठीं तोफा चालविल्यापासून आतां सिंह फक्त जीर व ( क्वचित प्रसंगीं ) गिरनार जंगलांत आढळतात. इतर जनावरें म्हणजे नीलगाय, चित्ता वगैरे. हवा साधारण बरी आहे; पाऊस सरासरी २०–३० इंच पडतो.

इतिहासः—नवानगरचा जाम हा जातीनें जाडेजा रजपूत असून कच्छच्या रावंवंशाचा आहे. जाडेजा रजपूत कच्छमधून काठेवाडांत आले व त्यांनीं तेथल्या जेठवा रजपुतांनां हांकलून लाविलें. इ. स. १५३५–३७ च्या सुमारास जाम रावळानें सोरठवर स्वारी करून जोडिया, अमरान व खंबालिया हे परगणे जिंकून १५४० सालीं नवानगर वसविलें. याला याचे भाऊ हरदोलजी, रावजी, व भांडजी हे मदत करीत होते. हरदोलजीनें ध्रोल परगणा घेऊन तेथें राज्य वसविलें. १८०७ सालीं येथील जाम यांनीं व्यवस्थेकरितां करवसुलीची पद्धत सुरू केली. यांच्यांत मुलीच्या लग्नाचे पैसे वांचावे म्हणून लहान मुलींनां ठार करीत. ब्रिटिश अमलाखालीं हा प्रकार बहुधां बंद झाला आहे. सध्यांचे जामसाहेब रणजितसिंगजी हे १९०७ सालीं गादीवर बसले. हे क्रिकेटपटु म्हणून विख्यात आहेत. संस्थानांत शहरें ३ व खेडीं ६६६ आहेत. मुख्य शहर नवानगर. ज्वारी, बाजरी, गहूं, चणे, तांदूळ (रावल येथें), हीं मुख्य पिकें आहेत.

थोडेंफार जंगल फलबरदा टेकडीजवळ आहे. येथें थोडासा संगमरवरी दगड सांपडतो. खंबालिया परगण्यांत थोडेंसें तांबेंहि आहे. तसेंच रेशमी व सुती कापड, मासे, इसिंग्लास यांचाहि व्यापार चालतो. संस्थानाच्या सुमारें३०० बोटी व ४दीपगृहें आहेत. नवानगरहून राजकोटपर्यंत ५४.२२ मैल लांब आगगाडीचा रस्ता आहे. नवानगर हें काठेवाडांतलि पहिल्या प्रतीचें संस्थान असून येथील संस्थानिकाला बराच अधिकार आहे. संस्थानचा वसूल ६० लाख रुपये आहे. १२००९३ रुपये कररूपानें ब्रिटिश सरकार, गायकवाड व जुनागडचा नबाब यांनां मिळून द्यावे लागतात.

श ह र.—संस्थानचें मुख्य ठिकाण. याला जामनगर असेंहि नांव आहे. लो. सं. (१९११)४४८८७. हें शहर १५४०सालीं जानरावळ यानें वसविलें. येथें दगडी इमारती असून त्यांच्या भोंवती दगडी भिंत आहे. हें भरभराटीचें शहर असून येथील व्यापार वाढता आहे. येथें मोत्याचे मासे मिळतात. येथें जरीचें काम व सुगंधी तेलें आणि कुंकू तयार होतें. येथें रंगाचें काम उत्तम होतें व या धंद्याला रंगमती नदीचें पाणी फायदेशीर आहे असा समज आहे. या शहरांत जस लाधक याचें स्मारक आहे. येथील बागांत बरींच केळीं तयार होतात.

**नवापूर—**मुंबई. पश्चिम खानदेशांतील एक तालुका. तालुक्याचें मुख्य ठाणें नवापूर. गुजराथेंतून येणाऱ्या रस्त्यावर हें गांव असून येथें पूर्वी पुष्कळ विणकऱ्यांची वस्ती होती. येथील सुकवेल व जिरेसाळ नांवाचे तांदूळ फार प्रसिद्ध असून, त्यांस कस्तुरीसारखा वास येत असे. हा तांदूळ इराणांत रवाना होत असे व पेशव्यांच्याकडेहि जाई. तसेंच हें गांव द्राक्षाकरितां प्रसिद्ध असे व येथें उंसाचे मळे असून चरक व गुऱ्हाळें पुष्कळ असत.हल्लीं हें व्यापारांत मागें पडलें आहे. मुंबई सरकारचा सरकारी गवताचा फार मोठा सांठा (डेपो) येथें असतो. सभोंवार सह्याद्रीचे फांटे व जंगल आहे. पाणी व हवा खराब आहे. वाघांचा उपसर्ग फार होतो. जवळच गायकवाडी सरहद्द लागते. पूर्वी हा पेटा होता; त्यावेळीं यांत ८० गांवें व लोकसंख्या (१९११) ३२२११ होती. हें तापी व्हॅली रेल्वेवरील स्टेशन आहे.[ येव्हेनॉट. पु. ५; टॅव्हर्निअर पु. २; खानदेश ग्याझेटियर. ]

**नवाबगंज,** त ह शी ल.—(१) संयुक्तप्रांत. बाराबंकी जिल्ह्यांतील मुख्य तहशील. हींत नवाबगंज, प्रतापगंज,सत्रिख व देवा या परगण्यांचा समावेश होतो. क्षेत्रफळ ३६१ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) २४६१७९.यांत ४शहरें व ३८८ खेडीं आहेत. नवाबगंज हें तहशीलीचें मुख्य ठिकाण आहे. यांतून कल्याणी व रेथ या गौतमी नदीला मिळणाऱ्या नद्या वहातात. येथें झील म्हणजे लहान पाण्याचे झरे आहेत. यांपासून कालवे काढलेले आहेत.

श ह र.—संयुक्तप्रांत, बाराबंकी जिल्हा, याचें तहसीलीचें मुख्य ठिकाण. हें औंध-रोहिलखंड रेल्वेच्या बाराबंकी स्टेशनाजवळ आहे. लो. सं. (१९११)१४१२७. हें असफउद्दवल्याच्या वेळेस उदयास आलें. येथें बंडांत बराच उपद्रव झाला. येथें शाळा, सराई, पुरुषांसाठीं व स्त्रियांसाठीं दवाखाने आहेत. येथें धान्याचा व कापडाचा बराच व्यापार चालतो. हें पूर्वी साखरेसाठीं प्रसिद्ध होतें पण तो धंदा आतां मंदावला.

त ह शी ल.—(२)संयुक्त प्रांत, बरेली जिल्ह्यांतील पूर्वेकडील तहशील. क्षेत्रफळ २२१ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) १२८४८०. यांत खेडीं ३०६ व शहरें २ आहेत. ह्या भागांत मैदान असून बऱ्याच लहान लहान नद्या वहातात. मुख्य पिकें तांदूळ व ऊंस हीं होत.

**नवाबगंज शहर** ( किंवा बारघरिया नवाबगंज).—मालडा जिल्ह्यांतील शहर.हें महानंदा नदीवर तिच्या गंगेशीं झालेल्या संगमाच्या थड्यांवर वसलें आहे. लोकसंख्या (१९११)२३३१२. हें व्यापाराचें ठाणें असून येथून बोटीनें व्यापार चालतो. हें या जिल्ह्यांतील सर्वांत दाट वस्तीचें ठिकाण आहे.

**नशीरउद्दीन कबाचा—**शहाबुद्दीन मुहम्मद घोरीचा हा एक तुर्की गुलाम असून त्यानें याला मुलतान प्रांताचा सुभेदार नेमिलें (१५०३). याला दिल्लीचा सुलतान कुत्बुद्दीन ऐबक यानें आपली मुलगी दिली. कुत्ब याच्या मरणानंतर नशीरनें सिंधप्रांतांतील दिल्लीकराचा पुष्कळसा प्रांत काबीज केला व सुमनस या क्षत्रिय घराण्याचें राज्यहि हिसकावून घेतलें आणि आपण स्वतंत्र बनला. मुलतान, सिंध,कोहराम व सुरसती हे प्रांत त्याच्या राज्यांत मोडत. गझनीच्या ताजुद्दीन एलदझनें याच्यावर दोनदां स्वाऱ्या केल्या, पण त्यांत त्याचाच मोड झाला. दिल्लीचा सुलतान शम्सुद्दीन अल्तमश यानेंहि सिंध काबीज करण्याची पुष्कळ खटपट केली. अखेर तो स्वतः याच्यावर आला; तेव्हां त्याच्याशीं तोंड देण्याची ताकद आपल्यास नाहीं असें पाहून नशीरनें आपला सर्व पैसा व कुटुंब घेऊन उच्छ ही आपली राजधानी सोडून दुसरीकडे जात असतां वादळानें त्याच्या होडीचा नाश झाला व तो सर्व माणसांसह सिंधुनदांत बुडून मेला (१२२५). यानें २२ वर्षें सिंधवर राज्य केलें. [बील.]

**नश्कि,** त ह शी ल.—बलुचिस्तानांतील चागई जिल्ह्याची अगदीं पूर्वेकडील तहशील.समुद्रसपाटीपासून उंची ३०००फूट. क्षेत्रफळ २३६१ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ )८११८. हिचा पूर्वभाग डोंगराळ आहे. ह्या तहशिलीचा 'डाक' भाग फार सुपीक आहे.गांवें १० असून नश्कि हा तहशिलीचा मुख्य गांव होय.

गां व.—बलुचिस्तानांतील चागई जिल्ह्याचा मुख्य गांव. समुद्रसपाटीपासून उंची २९०० फूट. हें क्वेटाहून ९१ मैल आहे. लोकसंख्या (१९०१) ६४४. कलातच्या खानाजवळून जेव्हां नश्कि निजामत घेण्यांत आलें त्यावेळीं ( १८९९ ) हें गांव वसविलें.ह्या गांवाचा खोरासान व इराणांतील सिस्तान वगैरे प्रांतांशीं व्यापार चालतो.

**नसरत**—मुंबई, सिंध-हैदराबाद जिल्ह्यांतील एक तालुका. हा सन १९०३ मध्यें वसविला असून यांत मोरो, सकरंद व शाहदापूर या तालुक्यांचा समावेश होतो. क्षेत्रफळ ९६० चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ३५६८१. खेडीं १६८असून मुख्य ठिकाण नवाबदिह आहे.येथें रेतीच्या टेंकड्या आहेत. सध्यां येथें नसरत कालव्यानें पाणी पुरवितात व बाजरी, तीळ, व कापूस हीं पिकें मुख्यत्वेंकरून होतात.

**नसीराबाद**—( १ ) बलुचिस्तान, सिबी जिल्ह्यांतील पोटविभाग व तहशील.क्षेत्रफळ ८२७ चौरस मैल. लोकसंख्या (१९११)३३९७७.राज्यव्यवस्थेकरितां यांत ज्ञातपत ते मिथ्रीपर्यंतच्या रेल्वेरस्त्याचाहि समावेश होतो. मुख्य ठिकाण नसीराबाद; हें जाकोबाबादहून ८ मैलांवर आहे. ह्यांत खेडीं १७० आहेत.येथें बेगडी व " डेझर्ट कॅनाल "(वाळवंटी कालवे)चें पाणी पुरवितात. येथेंच कायते हरभरे व नीळ उत्पन्न होते.

(२) मुंबई.सिंध.लारकाना जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ४१८ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ५७१२९. खेडीं ६५ असून मुख्य ठिकाण वारह. घार कालव्याच्या चिलोवाह व नासिरवाह या दोन शाखांतून या तालुक्याला पाणी मिळतें व येथें मुख्यत्वेंकरून तांदूळ होतो. दक्षिणेकडील जमिनींत बराच खार असल्यामुळें जमीन शेतीला अयोग्य आहे.

(३)मुंबई,पूर्व खानदेश, जळगांव तालुक्यांतील एक शहर. हें जी आयू. पी. रेल्वेच्या भादली स्टेशनापासून दक्षिणेस २ मैलांवर आहे. लोकसंख्या (१९११) १३०३३. हें येथल्या बांगड्याकरितां प्रसिद्ध आहे. येथें बऱ्याचशा मशीदी आहेत. सातमाळ पहाडांत राहणाऱ्या भिल्लांनीं येथें ब्रिटिश अंमलापूर्वी बरेच डाके घातले. १८०१ सालीं जुवा नांवाच्या दरवडेखोरानें व १८०३ सालीं पेशव्यांच्या अंमलदारानें यावर स्वारी केली होती. यानंतर पुरंदऱ्यांनीं हें गांव वसविलें व हें त्यांनां इनाम म्हणून दिलें गेलें. येथें जीन व कापूस दाबण्याचे कारखाने तसेंच ६ शाळा आहेत; पैकीं २ मुलींच्या आहेत.

(४) राजपुताना, अजमेर-मेरवाडमधील छावणीचें शहर. हें अरवलीच्या पूर्वेकडील उतारावर वसलें आहे. लोकसंख्या (१९११) २०२४१. क्षेत्रफळ ८०५ चौरस मैल. लष्करी ठाणें १८१८ सालीं सर डेव्हिड आक्टरलोनीनें वसविलें असून याभोंवतीं शहर वसलें आहे. नसिराबाद हें महू येथील " वेस्टर्न कमांड " मधील एक भाग आहे. येथें पाणी कमी आहे. येथील बंगाली तुकड्यांनीं २८ मे १८५७ सालीं बंड करून त्या दिल्लीकडे-अजमीर घेण्याचा प्रयत्न न करतां निघाल्या. मुंबईचें घोडेस्वारसैन्य मात्र इमानानें राहिलें. हें माळवा-राजपुताना रेल्वेवरील एक स्टेशन आहे.

**नहपान क्षहरात व त्याचें घराणें**—आंध्र राजवंशांतील २३ वा राजा गौतमीपुत्र शातकर्णी व २४ वा राजा वासिष्ठीपुत्र पुलुमायी यांच्या वेळेस पश्चिम हिंदुस्थानांत बाह्य शकयवनादि टोळयांनीं धुमाकूळ घातला. त्यांनीं कांहीं प्रांत बळकावला व ते इंडोपार्थियन किंवा कुशान यांच्या आश्रयानें राहिले. मुंबई इलाख्यांत हे पसरले होते, त्यांचीं नक्की ठिकाणें व राज्यविस्तार आढळत नाहीं. अगदीं प्रथम ज्याचा उल्लेख आढळतो तो सत्रप भूमक क्षहरात याचीं नाणीं पार्थियन राजांच्या नाण्यांसारखीं आहेत. हा त्या राजांपैकीं गोंदोफरेसचा मांडलिक असावा. याचा नक्की काळ सापडत नाहीं; बहुधां ख्रिस्ताच्या पहिल्या शतकाच्या मध्यभागांत तो झाला असावा. कदाचित त्याच्याहि पूर्वी झाला असेल. या क्षहरातांचा व शकांचा संबंध होता व हे बहुधां मूळचे शकस्थानांतील ( सीस्थान ) रहिवासी होते.

दुसरा क्षहरात राजा नहपान होय. याचा भूमकाशीं संबंध होता कीं नाहीं व त्याच्याच मागें हा गादीवर बसला कीं काय हें मात्र समजत नाहीं. याचा काल इ. सन ६० ते ९० असावा. याचें नांव इराणी पद्धतीचें दिसतें. प्रथम हा सत्रप (गव्हर्नर ) होता. पुढें यानें आपल्याला महाक्षत्रप व राजा हीं उपपदें लाविलीं. यानें आपलें राज्य दक्षिण-राजपुताना ते नाशिक पुणेपर्यंत (सुराष्ट्र काठेवाड धरून) वाढविलें होतें. याची राजधानी जुन्नर (पुणें जिल्हा) येथें होती. महाक्षत्रप पदवीवरून हा स्वतंत्र नसून उत्तरेकडील कुशानांचा मांडलिक असावा असें कांहींचें म्हणणें आहे. याच्या नंतर ऋषभदत्त हा गादीवर आला. वर सांगितलेल्या गौतमीपुत्र शातकर्णीनें गादीवर आल्यावर (इ. सन १०९) या क्षहरात घराण्यावर स्वारी करून त्यांनां हिंदुस्थानांतून बाहेर हाकलून दिलें व त्यांचें सर्व राज्य आपल्या राज्यांत सामील केलें (१२४). त्यानें क्षहरातांचें सर्व चलन प्रजेकडून सरकारांत आणवून त्यां ( नाण्यां) वर आपल्या प्रतिमेची व आपल्या नाण्याची मुद्रा ठोकून तें परत प्रजेस दिलें व याप्रमाणें आपल्या क्षहरातावरील विजयाचें स्मारक कायमचें करून ठेविलें. [ भांडारकर--डेक्कन. स्मिथ अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया; भाऊदाजी--लिटररी रिमेन्स. ]

**नहाल**—ही जात साधारणतः भिल्ल या सामान्यनांवाखालीं मोडते. पण भिल्लांत व या जातींत पुष्कळशा बाबतींत फरक आहेत. सातपुड्याच्या सीमेवर, यालवाडी पळासनेर, सिंदवा, चिरमिरा, बीरवड वगैरे शहरीं या लोकांचें वास्तव्य आहे. भिल्लांत अत्यन्त रानटी लोक कोणी असतील तर ते हेच होत. यांचा वर्ण अत्यन्त काळा, बांधा ठेंगणा, व अवयव राकट असतात. पितळेचीं कर्णभूषणें हे घालतात, व जोडे म्हणून नीलगाईचें कातडें पायाला बांधतात. कंदमुळें, फळें व बोरें यांवर मुख्यतः ते आपला उदरनिर्वाह करतात. हे इतरांशीं कोणत्याहि प्रकारची देवघेव अथवा व्यवहारसंबंध ठेवीत नाहींत. झाडांच्या वाळलेल्या पाचोळयाच्या राखेंत कित्येक धान्य पेरतात व कित्येक अरण्यांतील उपयोगी वस्तु इतरांनां देऊन त्यांच्यापासून मोबदला कापड घेतात. परंतु आपल्या अरण्यांतील वस्तीच्या सीमेबाहेर ते क्वचितच जातात. नहाल लोकांपैकीं कित्येक

मुसुलमान आहेत, पण पुष्कळांनां ओळखण्यासारखा असा धर्मच नाहीं. ते हिंदु दैवतांचीहि पूजा करीत नाहींत. किंवा मुसुलमानी धर्माप्रमाणेंहि वागत नाहींत यांचा एक पिढीजात नाईक असतो. १८२३ त नहाल लोकांनीं खानदेशांत बरेच दंगेधोप केले होते.

**नहुष**--एक राजा. हा पुरूरव्याचा नातू, आयूचा पुत्र व ययातीचा पिता होय. यास एकदां इंद्रपद प्राप्त झालें असतां यानें इंद्राणीचाहि अभिलाष धरिला. तिनें 'आपण अपूर्व वाहनांत बसून आलांत तर मी तुमची होईन' असा त्याला निरोप पाठविल्यावरून नहुषानें सप्तर्षींचें वाहन केलें व त्यांनां पादस्पर्श करून 'सर्प' 'सर्प' (चला, चला) असें म्हणूं लागला. तेव्हां अगस्त्य ऋषीला राग येऊन त्यानें तूं सर्प होशील असा शाप दिला. सर्पयोनींत हा दहा हजार वर्षे होता. युधिष्ठिराच्या दर्शनानें त्याचा उद्धार झाला.

**नळगंगा नदी**--मलकापूर तालुक्यांतील अजंठा डोंगरांत नळकुंड गांवाजवळ या नदीचा उगम असून ही पूर्णा नदीस मिळते. मलकापूर येथें या नदीवर रेल्वेचा पूल बांधला आहे. उन्हाळ्यांत या नदीस वाहतें पाणी नसून ठिकठिकाणीं डोह असतात या नदीची लांबी सुमारें ४० मैल असून ही नदी बुलढाणा जिल्ह्यांतील मलकापूर तालुक्यांत आहे.

**नक्षत्रपद्धति व तारकापुंज**--नक्षत्रांसंबंधीं बरीच माहिती ज्ञानकोश विभाग तीन यांत शब्दसृष्टि या प्रकरणांत आली आहे ( पृष्ठ १८८ ).नक्षत्र हा शब्द प्रायः चंद्रमार्गांतील तारकागणांस लावण्यांत येतो. तथापि चंद्रमार्गाबाहेरील तारकाकरितांहि नक्षत्र शब्द वापरण्याचा बराच प्रचार आहे. हल्लींप्रमाणेंच वैदिक कालांतहि नक्षत्र संज्ञा चंद्रमार्गांतील नक्षत्रांस लागून सर्व तारकांस देखील लागत असे. उदाहरणार्थ, ऋ. सं. १०. ८५, २. अथर्व सं. १४. १, २ यांत नक्षत्र हा शब्द चंद्रमार्गांतील नक्षत्रांस लाविलेला आहे; परंतु ऋ. सं. १. ५०, २; अथ. सं. १३. २, १७; २०. ४७, १४ व ऋग्वेद सं. १०. ६८, ११, या ठिकाणीं तो एकंदर तारकांचा बोधक आहे. चंद्रमार्गांतील नक्षत्रांपैकीं सर्वांचीं नांवें ऋक्संहितेंत आलीं नाहींत. ऋ. सं. ५. ५४, १३; १०. ६४, ८ मध्यें तिष्य म्हणजे पुष्य, ४. ५१, २ मध्यें चित्रा, ४. ५१, ४७ मध्यें रेवती व १०. ८५, १३, मध्यें अघा आणि अर्जुनी म्हणजे मघा आणि फल्गुनी. ( अथ. सं. १४. १, १३ व शत. ब्रा. २. १, २, ११ पहा.) अशीं कांहीं नक्षत्रें मात्र आलीं आहेत. तैत्तिरीय श्रुतींत नक्षत्रांचा संबंध फार आला आहे. तै. सं. ४. ४, १०; तै. ब्रा. १. ५, १; ३. १, १, २; व ३. १, ४, ६ ह्या चार ठिकाणीं सर्व नक्षत्रें आलीं आहेत. त्यांचीं नांवें अशीं:-( १ ) कृत्तिका; ( २ ) रोहिणी; ( ३ ) मृगशीर्षम् किंवा इन्वका; ( ४ ) आर्द्रा किंवा बाहू; ( ५ ) पुनर्वसू; ( ६ ) तिष्य; ( ७ ) आश्रेषा; ( ८ ) मघा; ( ९ ) फल्गुनी किंवा पूर्वेफल्गुनी; ( १० ) फल्गुनी किंवा उत्तरेफल्गुनी; ( ११ ) हस्त; ( १२ ) चित्रा; ( १३ ) स्वाती किंवा निष्ट्या; (१४) विशाखे; ( १५ ) अनुराधा; ( १६ ) रोहिणी किंवा ज्येष्ठा; ( १७ ) विचृतौ, मूलबर्हणी किंवा मूलम् ( १८ ) अषाढा; किंवा पूर्वाषाढा; ( १९ ) अषाढा किंवा उत्तराषाढा; × अभिजित्; ( २० ) श्रोणा; ( २१ ) श्रविष्ठा;( २२ ) शतभिषक् ( २३ ) प्रोष्ठपदा; किंवा पूर्व प्रोष्ठपदाः ( २४ ) प्रोष्ठपदा; किंवा उत्तरप्रोष्ठपदाः ( २५ ) रेवती; ( २६ ) अश्वयुजौ; ( २७ ) आणि अपभरणी. तैत्तिरीय श्रुतींत चोहोंपैकीं दोन स्थळीं अभिजित् नक्षत्र आलें आहे; परंतु एकंदर नक्षत्रें २७ किंवा २८ हें कोठें सांगितलें नाहीं. अथ. सं. १९.७ मध्यें नक्षत्रें २८ मानिलीं आहेत असें दिसतें. तेथेंहि सर्व नक्षत्रें आलीं आहेत. पण कृत्तिका, मृगशिर; पुष्य; आश्लेषाः; फल्गुन्यौ, स्वातिः, अनूराधा, श्रवणः व भरण्यः याप्रमाणें कांहीं नक्षत्रांच्या नांवांत, लिंगांत किंवा वचनांत थोडासा फरक आढळतो. हीं नक्षत्रें म्हणजे चंद्राच्या मार्गांत लागणारे तारकागण असुन तीं वर दिलेल्या अनुक्रमानें पश्चिमेकडून पूर्वेकडे आहेत.

नक्षत्र शब्दाची व्युत्पत्ति तैत्तिरीय ब्राह्मणांत (१.५,२) व निरुक्तांत गत्यर्थक नक्ष् धातूपासून सांगितली आहे. ह्या लोकींचे पुण्यात्मे स्वर्गी नक्षत्रें होतात अशी यांत कल्पना आहे. तथापि त्याच ब्राह्मणवचनांत नक्षत्रें हीं देवांचीं गृहें आहेत असेंहि म्हटलें आहे. येथें देव शब्दानें नक्षत्रांतून संचार करणारे प्रत्यक्ष प्रकाशमान ग्रह विवक्षित दिसतात. नक्षत्रें हीं पृथ्वीचीं अर्थात् पृथ्वीवरील वस्तूंचीं चित्रें अशी आणखीहि एक कल्पना उपर्युक्त ब्राह्मणवचनांत आहे. ती पाहिली असतां आकृतीवरून नक्षत्रविशेषांस नांवें पडलीं असतील असा संभव दिसतो. परंतु नक्षत्रांचीं नांवें दुसऱ्याच कारणानें पडलेलीं दिसतात. पुनर्वसू, मघा, चित्रा व रेवती हे शब्द भाषेत अगोदरच प्रचारांत असलेले मागाहून नक्षत्रांस लागले असावे व ऋ. सं. १०. १९, १ मधील पुनर्वसु शब्दाचा अर्थ सायणानें 'पुनःपुनर्वस्तारौ स्तोतृणामाच्छादयितारौ ( देवौ)' असा केला आहे. ऋ. ७. ७५, ५; ७७. ३ यांतील चित्रामघा या पदाचा अर्थ विचित्रधना असा आहे ( निरुक्त १.७ ). ऋ सं. ५. ५१, १४; व ९. ७२, ९ यांत रेवती म्हणजे धनवती असा अर्थ आहे. यावरून उपर्युक्त शब्द त्या त्या नक्षत्रांचें दर्शनीयत्व, धनदातृत्व, इत्यादि, प्रत्यक्ष, कल्पित किंवा अनुभूत गुणावरून त्या त्या नक्षत्रास लाविले असावे असें अनुमान होतें. दुसऱ्या कांहीं नक्षत्रांसंबंधींहि असेंच म्हणतां येईल. रोहिणी, मृग व मृगशीर्ष हीं नांवें आकृतीवरून पडलेलीं दिसतात. हीं सर्व नक्षत्रें उगवून वर येऊन पश्चिमेकडे जात असतां ऐ. ब्रा. १३.९ मध्यें सांगितल्याप्रमाणें रोहिणीच्या पाठीस मृग लागला आहे आणि त्याच्या पाठीस व्याध लागला आहे असें दिसतें. हस्त

नक्षत्राच्या पांच तारा मिळून हाताच्या पंजासारखी आकृति होत असल्यामुळें त्यास हस्त ही संज्ञा पडली हें स्पष्ट आहे. तै. ब्रा. १. १, २ व ५;२ मध्यें कित्येक नक्षत्रांच्या व्युत्पत्ती दिल्या आहेत. त्यांपैकीं दुसऱ्या ठिकाणीं हस्त, चित्रा, निष्टया, विशाखा व अनुराधा हीं पांच नक्षत्रें मिळून नक्षत्रिय प्रजापतीची आकृति कल्पिली आहे. हस्त हा त्याचा हस्त, चित्रा हें शिर, निष्टया हें हृदय, विशाखा (दोन तारा) ह्या मांडया व अनुराधा ही त्याची उभे राहण्याची जागा असें ह्या प्रजापतीचें वर्णन आहे. सांप्रत आकाशाकडे पाहिलें असतां या पुरुषानें हात मस्तकाच्या एका बाजूस वर केला आहे अशी कल्पना करून ही आकृति चांगली जमते; मात्र स्वाति हृदय हें जमत नाहीं असें कै. शं. बा. दीक्षित म्हणतात. स्वातीची निजगति इतर तारांपेक्षां पुष्कळ जास्त असल्यामुळें वरील वाक्यांत वर्णिलेली स्थिति प्राचीन काळीं केव्हां तरी खरी असली पाहिजे असें ते म्हणतात.

तैत्तिरीय श्रुतींत नक्षत्रांसंबंधीं जीं वचनें आहेत तीं त्या त्या नक्षत्रांतील तारासंख्या समजण्यास बरींच उपयोगी आहेत. त्यांवरून वेदकालीं रोहिणी, पुष्य, चित्रा, स्वाती, ज्येष्ठा, अभिजित्, श्रवण, शतभिषक् व रेवती या नक्षत्रांत प्रत्येकीं एक एक; अश्विनी, पुनर्वसू, पूर्वा, फल्गुनी व विशाखा यांत प्रत्येकीं दोन दोन; आणि आर्द्रा व मूळ यांत प्रत्येकीं एक एक किंवा दोन दोन तारा मानीत असें सिद्ध होतें. याशिवाय कृत्तिकांत सात (तै. ब्रा. ३.१,४), धनिष्ठा व उत्तरा भाद्रपदा यांत प्रत्येकीं चार चार (तै. ब्रा. ३.१,२) व राहिलेल्या नक्षत्रांपैकीं प्रत्येकांत सातांहून कमी (शत. ब्रा. २.१,२-२) तारा होत्या असें दाखविणारीं वचनें सांपडतात. वेदोत्तरकालीं निरनिराळ्या ग्रंथांत निरनिराळ्या तारा दिल्या आहेत. सूर्यादि चार सिद्धांतांपैकीं फक्त शाकल्यब्रह्मसिद्धांतातच नक्षत्राच्या तारा किती हें सांगितलें आहे. नक्षत्रकल्प, वृद्धगार्गीयसंहिता, नारदसंहिता, वराहमिहिर, खंडखाद्यक, लल्लकृत रत्नकोश, शाकल्यब्रह्मसिद्धांत, श्रीपतिकृत रत्नमाला, मुहूर्ततत्त्व व मुहूर्तचिंतामणी अशा दहा ग्रंथांत दिलेल्या तारासंख्यांची तुलना करून पाहतां असें दिसून येतें कीं, सर्वांच्या मतें चित्रा, स्वाती व आर्द्रा यांची प्रत्येकी एक एक; उत्तरा फाल्गुनी व पूर्वाभाद्रपदा यांच्या दोन दोन; भरणी, मृग, ज्येष्ठा, अभिजित् व श्रवण यांच्या तीन तीन; रोहिणी व हस्त यांच्या पांच पांच व कृत्तिकांच्या सहा तारा आहेत. पूर्वाफल्गुनी नक्षत्रांत वराहमिहिराशिवाय इतर सर्व ग्रंथकारांच्या मतें दोन तारा आहेत. व अनुराधा नक्षत्रांत शाकल्यब्रह्मसिद्धांताखेरीज इतर सर्वांनीं चार तारा दिल्या आहेत. वराहमिहिर मात्र पूर्वाफल्गुनीच्या ८ तारा देतो व शाकल्यब्रह्मसिद्धांतकार अनुराधा नक्षत्रांच्या ३ तारा देतात. इतर नक्षत्रांच्या तारासंख्येविषयीं तर याहूनहि अधिक मतभेद आहे. अश्विनीच्या दोन किंवा तीन; पुनर्वसूच्या व पूर्वाषाढांच्या दोन किंवा चार; पुष्याची एक किंवा तीन आश्लेषाच्या व मघाच्या पांच किंवा सहा; धनिष्ठाच्या चार किंवा पांच; शतभिषक्ची एक किंवा १००, विशाखांच्या दोन, चार किंवा पांच, उत्तरा भाद्रपदांच्या दोन, चार किंवा आठ; रेवतीची एक, चार किंवा बत्तीस, मूळाच्या दोन, सहा, नऊ किंवा अकरा आणि उत्तराषाढाच्या दोन, तीन, चार किंवा आठ तारा सांगितल्या आहेत नक्षत्रतारासंख्येविषयीं मतभेद आहे तरी इष्ट नक्षत्रपुंज आकाशांत कोणते याविषयीं मतभेद नाहीं. शतभिषक् या शब्दांतील शत शब्दावरून त्याच्या तारा १०० असा भ्रम पडला व त्यामुळें शतभिषक् या मूळच्या नांवाबद्दल शततारा असें नांव पडलें. परंतु ही समजूत वराहमिहिरापासून आहे. तसेंच रेवती नक्षत्रांतील योगतारेच्या आसपास मृदंगाकारांत बऱ्याच तारा आहेत; परंतु त्या बत्तीसच असतील असें नाहीं. केव्हां ही संख्या कशावरून मानली तें समजत नाहीं; परंतु तीहि वराहमिहिरापासूनच आहे. बाकी सर्व नक्षत्रांचे प्रदेश आकाशांत पाहिले असतां प्रत्येकानें मानलेल्या संख्येस कांहींना कांहीं आधार आहे असें दिसून येतें.

कै. शं. बा. दीक्षित यांच्या मतें भारतीयांस नक्षत्रज्ञान शकपूर्व ५००० वर्षांच्या अगोदरच झालें होतें. शतपथ ब्राह्मण २.१,२ मध्यें 'कृत्तिकामात्र पूर्व दिशेपासून चळत नाहींत' असें वर्णन आलें आहे त्यावरून त्या वचनाचा काल शकपूर्व ३००० वर्षें ठरत असल्यामुळें, वेदमंत्रांचा व त्यांत आलेल्या नक्षत्रज्ञानाचा काल याहूनहि प्राचीन असला पाहिजे हें उघड आहे. कै. दीक्षितांचें असें म्हणणें आहे कीं, शनि आणि मंगळ हे रोहिणीशकटाचा भेद करतील तर तें फारच अनिष्टकारक असें जें बृ. सं. ३४ मध्यें सांगितलें आहे त्यावरून तो भेद कधीं तरी झालेला असला पाहिजे, परंतु तसा भेद होण्याचा काल शकापूर्वीं ५००० वर्षांच्या अलीकडे कधींच येत नसल्यामुळें नक्षत्रांचें ज्ञान आपणास ह्या कालापूर्वीं कधीं तरी झालें असावें.

वेदांत नक्षत्रारंभ कृत्तिकांपासून आहे. कृत्तिकांपूर्वी मृग हें पहिलें नक्षत्र होतें असें अनुमान निघतें. परंतु प्रत्यक्ष तशी गणना कोठें नाहीं. ज्योतिषसिद्धांतग्रंथांत अश्विनी हें पहिलें नक्षत्र आहे. तें वैदिककालीं किंवा वेदांगकालीं नव्हतें. धनिष्ठांपासून आरंभ वेदांगज्योतिषांत आहे. श्रवण हें एकदां पहिलें नक्षत्र होतें असें महाभारतांत आहे. म्हणजे हीं दोन नक्षत्रें वेदांगकालीं पहिलीं होतीं. त्या कालीं कृत्तिका हें पहिलें होतेंच. मृग, कृत्तिका, अश्विनी यांच्या प्राथम्याचा संबंध वसंताशीं अथवा वसंतांतल्या विषुवाशीं आहे. धनिष्ठा, श्रवण यांचा संबंध उदगयनारंभाशीं आहे.

क्रांतिवृत्ताचा २७वा भाग म्हणजे ८०० कला हें नक्षत्राचें मान सामान्यतः आहे. परंतु भारतीयांची नक्षत्रपद्धति मूळ दृष्टिवेधानें सिद्ध झाली असल्यामुळें नक्षत्रतारा सारख्या अंतरावर नाहींत. कांहीं नक्षत्रें अर्धभोग, कांहीं समभोग (एक भोग), व कांहीं अध्यर्ध भोग (दीड भोग) अशी

मानण्याची जी एक पद्धति पूर्वी प्रचारांत होती तिचें कारण हेंच असलें पाहिजे. गर्गादिकांनीं फलाकरितां ही पद्धति सांगितली आहे असें म्हणून ब्रह्मगुप्तानें व तदनुसार भास्कराचार्यानें ती दिली आहे. ह्या पद्धतींत भरणी, आर्द्रा, आश्लेषा, स्वाती, ज्येष्ठा, शतभिषक् हीं ६ नक्षत्रें अर्धभोग; रोहिणी, पुनर्वसू, उत्तरात्रय, विशाखा हीं सहा अध्यर्धभोग आणि बाकीचीं १५ समभोग आहेत. भोगप्रमाण गर्गानें ८०० कला आणि ब्रह्मगुप्तानें चंद्रमध्यमदिनगति म्हणजे ७९० कला व ३५ विकला मानिलें आहे. आणि यामुळें ब्रह्मसिद्धांतपद्धतींत अभिजित् नक्षत्र घेऊन त्याचा भोग ( चक्रकला–२७×७९० कला, ३५ विकला = ) ४अंश, १४कला व १५ विकला दिला आहे. त्या पद्धतीनें नक्षत्रांचें कालविषयक मान अर्धभोगाचे १५ मुहूर्त, समभोगाचे ३० मुहूर्त व अध्यर्धभोगांचे ४५ मुहूर्त नारदानें सांगितले आहेत. ही पद्धति कांहीं काळ प्रत्यक्ष व्यवहारांत होती असें दिसतें. कनोजचा राजा भोजदेव याच्या संवत् ९१९ च्या देवगड येथील शिलालेखांतील नक्षत्र गर्गपद्धतीनें किंवा ब्रह्मसिद्धांतपद्धतीनें मात्र मिळतें ( इं. अँ. जानेवारी, १८८८ ). सांप्रत सूर्यसंक्रमण ज्या दिननक्षत्रावर होईल त्या मानानें त्याचे १५, ३० किंवा ४५ मुहूर्त मानतात व त्यावरून सुभिक्षदुर्भिक्ष ठरवितात, याचें मूळ हीच पद्धति आहे.

चैत्रादि मासंसज्ञा नक्षत्रांवरूनच पडल्या. त्या वेदांच्या संहितांमध्यें नाहींत. ब्राह्मणांत त्या क्वचित् आहेत. कै. दीक्षितांच्या मतें त्या ब्राह्मणकालाच्या शेवटीं प्रचारांत आल्या असाव्या. पारस्कर सूत्रांत ( १.२१ ) नक्षत्राचे चार अंश मानलेले आढळतात. यावरून त्या सूत्राच्या कालीं क्रांतिवृत्ताचे द्वादशधा भाग पाडूं लागले होते असें अनुमान होतें.

नक्षत्रांच्या योगतारा कोणत्या याविषयीं ज्योतिष्यांत हल्लीं बराच मतभेद आहे. शके ९५३ च्या सुमारास हिंदुस्थानांत आलेला अल्बेरुणी म्हणतो कीं अत्यंत परिश्रम करूनहि नक्षत्रांच्या योगतारा डोळ्यांनीं पाहून आकाशांत बोटानें दाखविणारा एकहि ज्योतिषी मला आढळला नाहीं. कोलब्रुक म्हणतो कीं, कांहीं नक्षत्रें हिंदु जोतिष्यांनीं आम्हांस दाखविलीं परंतु कांहीं त्यांस दाखवितां आलीं नाहींत. कै. दीक्षित यानांहि चौकशीअंतीं ज्यांस सामान्यतः नुसती नक्षत्रेंहि दाखवितां येत नाहींत असे पुष्कळ ज्योतिषी असल्याचें आढळून आलें होतें. कोलब्रुक, वेटलि व केरोपंत, व्हिटने आणि बर्जेस, बापूदेव, वेंकटेश बापूजी केतकर व शंकर बाळकृष्ण दीक्षित या आठ विद्वानांच्या मतांची तुलना करतां कृत्तिकांची ईटा टारी, रोहिणीची आल्डिबरान, पुनर्वसूची पोलक्स, पुष्याची डेल्टा कांक्रीं, मघाची रेग्युलस, उत्तराफाल्गुनीची डेनिबोला, चित्राची स्पायका, स्वातीची आर्क्टयूरस, ज्येष्ठाची अंटारिस, अभिजित्ची व्हीगा, श्रवणाची आल्टेर, शतभिषक्ची लँबडा आक्वेरियस व पूर्वाभाद्रपदाची मार्काब योगतारा आहे; याविषयीं मतभेद आढळून येत नाहीं. इतर नक्षत्रांच्या योगतारांविषयीं मात्र मतभेद आहे. अश्विनीची अल्फा किंवा बीटा एरीटिस; भरणीची ३५,४१ किंवा म्यू एरीटिस मृगाची लँब्ड ओरायन* किंवा ११६ टारि, आर्द्राची आल्फा-ओरायन, १३३ टारि किंवा गॅमा जेमिनि,* आश्लेषाची आल्फा किंवा ४९ कांक्री किंवा एप्सिलान किंवा झीटा*हैड्री, पूर्वाफल्गुनीची थीटा,*किंवा डेल्टा लिओनिस,हस्ताची डेल्टा* किंवा गाया कोर्व्हि,विशाखाची २४ आल्फा*किंवा कपा लिब्रा, अनुराधाची डेल्टा*किंवा बीटा स्कार्पिआन, मूळाची न्यू ३४ किंवा लँड* स्कार्पि किंवा ४५ ओफि, पूर्वाषाढाची डेल्टा किंवा लँड* साजिटेरिअस, उत्तराषाढाची टो, सिग्मा, फाय, किंवा पाय साजिटेरिअस, धनिष्ठाची आल्फा* किंवा बीटा डेल्फि, उत्तराभाद्रपदाची आल्फेराट किंवा आल्जेनिब व रेवतीची झीटा* किंवा म्यू* पीशियम ही योगतारा मानण्यांत येते. यांपैकीं कै. शं. बा. दीक्षितांच्या मतें ज्या योगतारा आहेत त्यांच्यापुढें अशी फुलीची खूण केली आहे.

हिंदु लोकांप्रमाणें प्राचीन काळच्या चिनी व अरब लोकांतहि नक्षत्रपद्धति होती. या नक्षत्रपद्धतीचें हिंदु नक्षत्रपद्धतीशीं बरेंच साम्य आहे. रोहिणी, पुनर्वसु, मघा, चित्रा, ज्येष्ठा ह्या ठळक पहिल्या प्रतीच्या तारा, अश्विनी वगैरे कांहीं दुसऱ्या प्रतीच्या तारा व कृत्तिका इत्यादि बारीक तारांचीं नक्षत्रें कोणाहि दोघांचीं एक जमल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. परंतु मृगशीर्ष, मूळ, पूर्वोत्तरभाद्रपदा, भरणी हीं नक्षत्रें हिंदु, चिनी अरबी या तिघांचीं एक आहेत; पूर्वोत्तर फल्गुनी हिंदु व अरब यांच्या एक आहेत; आणि आश्लेषा नक्षत्र हिंदु व चिनी यांचें एक आहे. भारतीय व चिनी नक्षत्रांतील मुख्य फरक म्हटला म्हणजे भारतीयांचीं सर्व नक्षत्रें अगदीं स्वाभाविक सुचलेलीं दिसतात, परंतु चिनी नक्षत्रांचें तसें नाहीं. रोहिणी, पुनर्वसु, मघा, पूर्वोत्तरफल्गुनी, स्वाती, अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, अभिजित्, श्रवण यांच्या योगतारा चांगल्या ठळक म्हणजे पहिल्या किंवा दुसऱ्या ( क्वचित तिसऱ्या ) प्रतीच्या आहेत; पण चिनी लोकांनीं त्या न घेतां त्या नक्षत्रांच्या तारा दुसऱ्याच अगदीं कमी तेजस्वी वेधोपयोगी असलेल्या अशा स्वीकारल्या आहेत. [ सूर्य सिद्धांत भाष्य पृ. ३२४ पहा. ]

बायो म्हणतो कीं चिनी लोकांचीं वेधयंत्रें व वेधपद्धति चांगली होती, आणि त्यांचें सांप्रतच्या यूरोपीय पद्धतीशीं साम्य आहे. त्यांच्यापाशीं याम्योत्तरलंघनयंत्र आणि कालसाधनार्थ घटिका होती. त्यांनीं तारांच्या याम्योत्तरलंघन वेधावरून त्यांचे विषुवांश आणि क्रांति ठरविली होती, आणि त्याकरितां व वेधांत कालसंबंधीं चूक पडेल तर दुरुस्त करण्याच रितां विषुववृत्ताच्या आसपासच्या २४ तारा त्यांनीं कृत्तिकारंभकालीं म्हणजे ख्रि. पू. २३५७ च्या सुमारास ठरविल्या होत्या. त्या ठरविण्यांत त्यांचें विषुववृत्ताशीं सान्निध्य या गोष्टीकडे मुख्य लक्ष होतें; मग त्या फार तेजस्वी असोत

किंवा नसोत. त्या प्रत्येकास सियू म्हणतात. त्या चोविसांत मागाहून मघा, विशाखा, श्रवण आणि भरणी यांतील चार तारा च्यूकांग या राजाच्या वेळीं ख्रि. पू. ११०० च्या सुमारास जोडल्या. चिनी नक्षत्रें मूळचीं २४ असून ख्रि. पू. ११०० च्या सुमारास २८ झालीं ( या गोष्टीस ऐतिहासिक आधार मुळींच नाहीं असें थीवो म्हणतो ). बायबलांतील मझलॉथ व मझरॉथ हे शब्द ( जाब ३८. ३२, राजे २३.५ ) अरब लोकांच्या नक्षत्रवाचक मंझिल शब्दाशीं सदृश आहेत, त्यावरून पाश्चात्त्य सेमिटिक लोकांत नक्षत्रपद्धति असावी आणि ती खाल्डियन लोकांनीं काढली असावी असें वेबर म्हणतो. बाबिलोनियांत नक्षत्रपद्धति होती व तेथून ती सर्वत्र पसरली असें मॅक्सम्युलरनें एके ठिकाणीं ( ऋग्वे. प्रस्तावना पृ. ४ ) विधान केलें आहे. परंतु त्यांत तथ्य नाहीं ( ज्ञानकोश प्रस्तावनाखंड भा. १पृ.३०१ पहा). बुंदेहेश नामक पारशी ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत नक्षत्रांची संख्या ( २८ ) आणि त्यांची नांवें आहेत. व्हिटने म्हणतो कीं, ख्रिस्त पू. ११०० यावेळीं किंवा त्यानंतर लवकरच चिनी नक्षत्रपद्धति पश्चिम आशियांत गेली. तेथें सेमिटिक अथवा इराणी या दोन राष्ट्रांपैकीं कोणीं तरी ती स्वीकारली. त्यांनीं तींत कमी कुशलतेच्या आणि चांगल्या शास्त्रीय पद्धतीस विशेष अनुसरून नाहीं अशा वेधपद्धतीस उपयोगी असा फेर फार केला. तो असा कीं, क्रांतिवृत्ताच्या प्रदेशांतील ग्रहगतीस अनुसरून त्यांनीं चिनी सू ही एक तारा होती त्याबद्दल पुंज कल्पिले आणि कांहींचीं स्थानें बदललीं आणि अशा स्थितींत ती पद्धति आणि तिजबरोबरच ग्रहांचें ज्ञान हिंदुस्थानांत आलें आणि त्याच सेमिटिक आणि इराणी लोकांपासून ती नक्षत्रपद्धति शेवटीं अरबांनीं घेतली. परंतु ज्या सेमिटिक किंवा इराणी लोकांच्या द्वारें चिनी पद्धति हिंदुस्थानांत आली असें व्हिटने म्हणतो ते खाल्डियन किंवा पार्शी नव्हत. कां कीं, खाल्डियन लोकांत नक्षत्रपद्धति होती असें दाखविणारा उल्लेख इतका अप्रसिद्ध व संशयित आहे कीं तो त्या पद्धतीच्या अस्तित्वाबद्दल प्रमाण मानतां येत नाहीं असें स्वतः व्हिटनेच म्हणतो. व खाल्डियन ज्योतिःशास्त्रांत ती असती तर ग्रीक लोक तिजविषयीं कांहीं तरी सांगितल्याशिवाय राहतेना. पार्शी लोकांच्या झेंदावेस्ता ग्रंथांत नक्षत्रपद्धति अद्यापि कोणीं दाखविली नाहीं व त्यांच्या ज्या बुंदेहेशनामक ग्रंथांत नक्षत्रांचीं नांवें आहेत ती अलीकडचा म्हणजे ज्या सस्सानियन बादशहाच्या कारकीर्दींत इराण देश स्वतंत्र झाला त्या वेळचा आहे. अरबांपासून हिंदूंनीं नक्षत्रपद्धति घेतली म्हणावी तर तसें स्वतः अरबांचें मत नाहीं किंवा दुसऱ्या कोणाचेंहि नाहीं. हिंदूंनीं नक्षत्रें चीन, बाबिलोन किंवा दुसऱ्या कोणत्या अज्ञात राष्ट्रापासून घेतलीं असें ज्या यूरोपियांचें म्हणणें आहे त्यांपैकीं कांहींच्या मतें या गोष्टीचा काळ ख्रि. पू. ११०० हून प्राचीन नाहीं. वेबरनें जरी काल स्पष्ट सांगितला नाहीं तरी तो त्याच्या मतें ख्रिस्त पूर्व २७८० हून प्राचीन नसला पाहिजे. परंतु भारतीयांस नक्षत्रें ख्रि. पू. ३००० च्याहि अगोदरपासून माहीत होतीं असें वर दाखविलेंच आहे. अर्थात् चिनी इत्यादि लोकांनीं नक्षत्रपद्धति स्वतंत्रपणें स्थापिली असेल तर भारतीयांनींहि ती स्वतंत्रपणेंच स्थापिली असली पाहिजे.

नक्षत्रें ओळखण्याकरितां नाटिकल अल्मनॅकावरून ताऱ्यांचे विषुवांश आणि क्रांति घेऊन एक सूक्ष्म पट तयार केला असतां त्यावरून नक्षत्रांची ओळख पटण्यास सोईचें होतें. अलीकडे जे पट तयार झाले आहेत त्यांत फरक आहे.

## तारका.

**ताऱ्यांच्या प्रती.**—नुसत्या डोळ्यांनीं सहा प्रतींच्या तारा दिसतात. सहा इंच भिंगाच्या दुर्बिणींतून सुमारें १३ प्रतीच्या तारा दिसतात. आणि पृथ्वीवरील अति मोठ्या दुर्बिणींतून १६ प्रतींच्या तारा दिसतात. कोणी तारांच्या प्रती २० पर्यंतहि केल्या आहेत. एका प्रतीच्या तारेचें तेज खालच्या प्रतीच्या तारेच्या सुमारें२॥ किंवा २॥। पट असतें. आणि एका प्रतीच्या तारांची संख्या आकाशांत जितकी आहे, तिच्या सुमारें २॥ किंवा ३ पट खालच्या प्रतीच्यांची आहे. एका प्रतीच्या सर्व तारा एकत्र केल्या तर वरच्या प्रतीची सुमारें एक तारा होईल. हीं अनुमानें केवळ डोळ्यांनीं दिसणाऱ्या तेजावरून बसविलेलीं आहेत. यामुळें तीं स्थूल असणें साहजिक आहे.

प्रकाशमापक या नांवाचें यंत्र हल्लीं निघालेलें आहे. त्यानें तेजाचें सूक्ष्म मान समजतें. परंतु त्यावरून तारांच्या प्रती अजून ठरल्या नाहींत. हल्लीं फार सूक्ष्म अशीं तारास्थितिपत्रकें झालीं आहेत. त्यांत सुमारें २० हजार तारांची स्थिति दाखविली आहे. उत्तरध्रुवापासून दक्षिणक्रांति २ पर्यंत असणाऱ्या ९ प्रतीच्या तारांचें एक स्थूल स्थितिपत्रक झालें आहे. त्यांत सुमारें ३ लक्ष तारा आहेत. ही संख्या सुमारें अर्ध्या आकाशांतली आहे. नुसत्या डोळ्यांनीं जेथें एक तारा दिसते तेथें मध्यम दुर्बिणींतून सरासरी १०० तारा दिसतात.

दुर्बिणींतून दिसणाऱ्या असंख्य तारांनीं आकाशगंगा झाली आहे. अशा तारा आकाशगंगेपासून दूरच्या प्रदेशांत थोड्याच आहेत. जसजसें आकाशगंगेकडे पहात यावें तसतशा त्या दाट आहेत असा अनुभव आहे. नुसत्या डोळ्यांनीं दिसणाऱ्या ताराहि आकाशगंगेंत जास्त आहेत. आकाशगंगेखेरीज इतर प्रदेशांतहि कोठें कोठें फार दाट तारा आहेत.

**रूपविकारी तारा.**—कांहीं तारांचें तेज नेहमीं एकसारखें नसतें;कमजास्त होतें. अशा तारा सुमारें १४३ आहेत. त्यांत ज्यांचा रूपविकार सहज समजण्यांत येतो अशा २ आहेत.ययाति नामक पुंजामध्यें एक तारा आहे;स.१८९३च्या आरंभीं तिचे विषुवांश ३।१।१२ व क्रांति उ० ४०।३२।३६ होते. हिला अलगोल असें यूरोपियन ( मूळचें अरबी )

नांव आहे. ती साधारणतः दुसऱ्या प्रतीची दिसते. २ दिवस, २० तास व ४९ मिनिटें इतक्या कालांत तिच्या रूपांत एकदां फरक होतो. एकदां तेज कमी होऊं लागलें म्हणजे सुमारें ३॥ तासांत ती चवथ्या प्रतीची होते. सुमारें १५ मिनिटें ती तशीच राहते व पुन्हां ३॥ तासांत पूर्ववत होते. मिरा ( अद्भुत ) या नांवाची दुसरी एक रूपविकारी तारा तिमिंगल पुंजांत आहे. नौकापुंजांत तिसरी एक तारा आहे. हिच्या तेजांत फार विलक्षण फेरफार होतो. परंतु तिचा काल सुमारें ४६ वर्षें आहे. इतर तारांचे फेरफार पुष्कळ होतात. परंतु त्या बारीक असतात. अभिजित्च्या आग्नेयीस ५।६ अंशांवर दोन तारा आहेत. त्यांतील पश्चिमेकडची १३ दिवसांत ४ वेळां बदलते. त्यांत ती कधीं ३॥ प्रतीची व कधीं ४॥ प्रतीची असते. मृगांतली १३ वी तारा किंचित बदलणारी आहे.

न व्या ता रा.—कधीं कधीं पूर्वी दिसल्या नाहींत अशा फार तेजस्वी तारा आकाशांत दिसतात, आणि नाहींशा

## नक्षत्रांच्या योगतारा, शर, ध्रुवक व तारापुंज.

| नक्षत्रें | योगतारा | शर | उत्तर कीं दक्षिण | ध्रुवक राशी | ध्रुवक अंश | ध्रुवक कला | तारापुंजांतील तारा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अश्विनी | बीटा एरैटिस | १० अंश | उत्तर | ० | ८ | ० | ३ |
| भरणी | ३५ एरैटिस | १२ अंश | उत्तर | ० | २० | ० | ३ |
| कृत्तिका | ईटाटारी | ४ अंश, ३० कला | उत्तर | १ | ७ | २८ | ६ |
| रोहिणी | आलूडिबरान | ४ अंश, ३० कला | दक्षिण | १ | १९ | २८ | ५ |
| मृग | ११६ टारी | १० अंश | दक्षिण | २ | ३ | ० | ३ |
| आर्द्रा | १३३ टारी | ११ अंश | दक्षिण | २ | ७ | ० | १ |
| पुनर्वसु | पोलक्स | ६ अंश | उत्तर | ३ | ३ | ० | ४ |
| पुष्य | डेल्टाकांक्री | ० अंश | शर नाहीं | ३ | १६ | ० | ३ |
| आश्लेषा | ४९ कांक्री | ७ अंश | दक्षिण | ३ | १८ | ० | ५ |
| मघा | रेग्युलस | ० अंश | | ४ | १ | ० | ५ |
| पूर्वा | थीटालियानिस | १२ अंश | उत्तर | ४ | २७ | ० | २ |
| उत्तरा | डेनींबोला | ३ अंश | उत्तर | ५ | ५ | ० | २ |
| हस्त | डेल्टाकाव्हि | ११ अंश | दक्षिण | ५ | २० | ० | ५ |
| चित्रा | स्पायका | १ अंश, ४५ कला | दक्षिण | ६ | ३ | ० | १ |
| स्वाती | आर्कटयूरस | ३७ अंश | उत्तर | ६ | १९ | ० | १ |
| विशाखा | २४ लिब्रा | १ अंश, २० कला | उत्तर | ७ | २ | ५ | ४ |
| अनुराधा | बीटा स्कार्पी | १ अंश, ४५ कला | उत्तर | ७ | १४ | ५ | ४ |
| ज्येष्ठा | अंटारिस | ३ अंश, ३० कला | उत्तर | ७ | १९ | ५ | ३ |
| मूळ | ३४ स्कार्पी | ८ अंश, ३० कला | उत्तर | ८ | १३ | ० | ११ |
| पूर्वाषाढा | डेल्टासाजि | अंश, २० कला | उत्तर | ८ | १४ | ० | ४ |
| उत्तराषाढा | फैसाजि | ५ अंश | उत्तर | ८ | २० | ० | ३ |
| अभिजित् | व्हीगा | ६२ अंश | उत्तर | ८ | २५ | ० | ३ |
| श्रवण | आल्टेर | ३० अंश | उत्तर | ९ | ८ | ० | ३ |
| धनिष्ठा | आल्फाडेल्फी | ३६ अंश | उत्तर | ९ | २० | ० | ४ |
| शततारका | लँबडा आक्वेरियस | ० अंश, २० कला | दक्षिण | १० | २० | ० | १०० |
| पूर्वाभाद्रपदा | मार्काब | २४ अंश | उत्तर | १० | २६ | ० | २ |
| उत्तराभाद्रपदा | आल्जेनिका आल्फेराट | २६ अंश | उत्तर | ११ | ७ | ० | २ |
| रेवती | झीटापीशियम | ० अंश | | ० | ० | ० | ३२ |

होतात. ह्या तारा वस्तुतः नव्या नव्हत. फार तेजस्वी नसल्यामुळें किंवा फारच बारीक असल्यामुळें पूर्वी त्या माहीत नसतात, व तेज कमी झाल्यावर बारीक होऊन राहतात किंवा अगदीं बारीक होऊन दिसेनाशा होतात. त्या वस्तुतः रूपविकारी होत. इतरांचा रूपविकार बराच किंवा अगदीं नियमित असतो; ह्यांचा अनियमित असतो इतकेंच. सूर्य आणि तारा ह्यांची शरीररचना सामान्यतः सारखीच आहे. सूर्यावर सुमारें दर ११ वर्षांनीं फार डाग दिसतात. तेव्हां 'सूर्य' सुद्धां ही एक इतक्या काळांत नियमित रूपविकार पावणारी तारा होय.

ता र का यु ग्म.—नुसत्या डोळ्यांनीं जेथें एक तारा दिसते तेथें दुर्बिणींतून दोन तारा दिसतात अशीं पुष्कळ उदाहरणें आहेत. अशा दोन तारांस तारकायुग्म अथवा जोडतारा म्हणतात. रोहिणींतील चवथी तारा; मृगांतील पहिली, चवथी, पांचवी, सहावी; व्याध; पुनर्वसूपैकीं पहिली; मघापैकीं पांचवी; त्रिशंकु दुसरी; दक्षिणर्क्ष सातवी; आप; ज्येष्ठा दुसरी ( योगतारा ) ह्या जोडतारा आहेत. यांत कांहींची

जोडी लहान दुर्बिणीनें दिसते, कांहींची मोठ्या दुर्बिणीनें मात्र दिसते. ज्या तारांच्या जोडीमध्यें १५ विकलांपेक्षां जास्त अंतर आहे त्या नुसत्या डोळ्यांनीं जरी दिसल्या तरी दुर्बिणींतून फार दूर दूर दिसतात. म्हणून ज्योतिषी त्यांस जोडतारा म्हणत नाहींत. हल्लीं सुमारें सहा हजार जोडतारांचा शोध लागला आहे. फार थोड्या अंतरानें असणाऱ्या जोडीचा वास्तविक कांहीं संबंध आहे कीं काय हें सर्वांविषयीं निश्चयानें सांगतां येत नाहीं. कांहीं जोड्या पृथ्वीपासून एका सरळ रेषेंत असतात म्हणून मात्र तशा दिसतात. परंतु ज्या ज्या जोडीमध्यें फार थोड्या विकलांचें अंतर आहे तिचा कांहीं तरी भौतिक संबंध असावा असें दिसतें. हा संबंध कांहींच्या अनुभवास आलेला आहे. त्यांतल्या तारा आपल्या गुरुत्वमध्याभोंवतीं प्रदक्षिणा करतात. अशा जोडीस मिथुनमाला म्हणतात. सुमारें १२ मिथुनमालांचा प्रदक्षिणाकाल निश्चित झाला आहे. तो सुमारें २५ पासून १०० वर्षेपर्यंत आहे. कांहींचा शेंकडों वर्षें असेल. ज्या जोडीचा प्रदक्षिणाकाल थोडा आहे ती फारच निकट आहे. कांहीं तारा एकत्र तीन व कांहीं चार आहेत. युग्मांतलीं एक अथवा दोन्ही तारा स्वतः युग्म असल्यामुळेंच अशीं बहुतेक त्रिकें आणि चतुष्कें झालीं आहेत.

तारकापुंज.—दुर्बिणींतून फार बारीक तारा दिसतात, त्या सर्वत्र सारख्या पसरलेल्या नाहींत. त्यांचे बहुधां दाट पुंज झालेले आहेत. कृत्तिका नक्षत्र हा नुसत्या डोळ्यांनीं दिसणारा पुंज होय. त्यांत ६ किंवा ७ तारा दिसतात. दुर्बिणींतून पाहिलें तर ५० पासून १०० किंवा अधिकहि दिसतात. ज्या पुंजांत फार दाट व फार बारीक तारा असतात तो नुसत्या डोळ्यांनीं लहानसा धुराचा पट्टा किंवा ढग दिसतो. पुष्यनक्षत्राच्या पश्चिमेस ३-४ अंशांवर असा एक पुंज दिसतो. त्याचे विषुवांश ८।२० व क्रांति उत्तर २०।१० आहे. ययातिपुंजांत एक गुच्छ आहे. त्याचे विषुवांश २।१० व क्रांति उत्तर ५७ आहे. तो जानेवारीच्या सातव्या तारखेस ७ वाजतां मध्यान्हीं येतो. मूळांच्या तिसऱ्या तारेजवळ एक गुच्छ आहे.

तेजोमेघ.—अगदीं स्वच्छ आकाशांत नुसत्या डोळ्यांनीं पांढऱ्या मेघासारखे किंवा आकाशगंगेसारखे तेजाचे लहान लहान पुंज दिसतात. दुर्बिणींतून पाहिलें तर त्यांतले कांहीं तारकागुच्छ असतात. एका दुर्बिणींत जो नुसता ढग दिसतो तो तिच्याहून मोठ्या दुर्बिणींत तारकागुच्छ दिसतो. परंतु अशा प्रकारच्या कांहीं पुंजांचे वर्णलेख घेतल्यावरून दिसून आलें आहे कीं, ते अतिप्रदीप्त वायूचे किंवा वाफेचे स्वयंप्रकाशपुंज आहेत. त्यांस आपण अग्निमेघ किंवा तेजोमेघ म्हणतों. अशा सुमारें पांच हजार तेजोमेघांचा शोध लागला आहे. कांहीं तेजोमेघांचा आकार ग्रहांसारखा वाटोळा असतो त्यांस ग्रहाकार तेजोमेघ म्हणतात. कांहीं आवर्ताकार ( भोंवऱ्यासारखे ) व कांहीं वलयाकार ( आंगठीसारखे ) असतात. कांहींचे आकार अनियमित असतात. एखादा तेजोमेघ एखाद्या तारेच्या भोंवतीं पसरलेला असतो. देवयानी पुंजांत एक तेजोमेघ आहे. अर्धपारदर्शक भिंगांतून दिवा दिसावा तसा तो नुसत्या डोळ्यांनीं दिसतो. त्याचे विषुवांश ०-३५ व क्रांति उ. ४० आहे. अभिजित्च्या आग्नेयीच्या दोन तारांमध्यें वलयाकार तेजोमेघ आहे. नौकापुंजांतील रूपविकारी तारा मागें सांगितली ती, आणि मृगांतील ८ वी व ९ वी यांच्या भोंवतीं एकेक तेजोमेघ आहे. कृत्तिकांतील चवथ्या तारेच्या दक्षिणेस एक तेजोमेघ आहे.

फार प्रसिद्ध असा एक तेजोमेघ मृगाच्या पोटांतील बाणाच्या दक्षिणेस ३ लहान तारा आहेत ( त्यांस यूरोपियन ओरायनची तरवार म्हणतात ) त्यांतील मधल्या तारेच्या म्हणजे मृगापैकीं सहाव्या तारेच्या भोंवतीं हा तेजोमेघ आहे. असा तेजस्वी आणि चित्रविचित्र तेजोमेघ उत्तरगोलार्धांत नाहीं. नुसत्या डोळ्यांनीं देखील पूर्वोक्त तारेभोंवतीं तेजोमेघाचा भास होतो. हल्लींच्या अति मोठ्या दुर्बिणींतून त्यांत शेंकडों तारा दिसतात. तथापि वर्णलेखावरून असें दिसून आलें आहे कीं तो घनपदार्थ नसून, तप्तवायु आहे व त्यांत हायड्रोजन व नायट्रोजन ह्या दोन वायूंचें मिश्रण आहे.

तारांची गति.—वर्णलेखकयंत्रानें खस्थ ज्योतींची भौतिक घटना समजूं लागली आहे. तसेंच तें दुसऱ्या एका महत्त्वाच्या शोधाचें साधन झालें आहे. कमजास्त तिर्यक् रेषेनें कांहीं तारा आपल्याकडे येत आहेत, व कांहीं आपल्यापासून दूर जात आहेत. काटकोनत्रिकोणाच्या कर्णरेषेनें होणारी त्यांची गति आपल्यास त्यांच्या दोन बाजूंतून दिसते. म्हणजे एक आकाशांत आडवी दिसते आणि दुसरी तारांकडे पाहण्याची आपली जी दिशा म्हणजे दर्शनरेषा तींत अनुभवास येते. यांपैकीं आडवी म्हणजे आकाशांत पूर्व पश्चिम किंवा कोणत्या तरी दिशेस दिसणारी गति दुर्बिणीनें पुष्कळ वर्षें समजली, तिला वास्तवगति म्हणतात. ती गति कांहीं तारांची वर्षांत ४ पासून ७ विकला आहे आणि बहुतेक तारांची शंभर वर्षांत थोड्याशा विकला आहे. ही गति सर्व तारांची एका नियमानें होत आहे असें नाहीं. तिचीं मानें आणि दिशा निरनिराळ्या आहेत; आणि ती सरळरेषेंत आहे. कांहीं तारा दर सेकंदास ४०-५० मैल वेगानें आपल्याकडे येत आहेत व कांहीं तारा १५-२० मैल वेगानें आपल्यापासून दूर जात आहेत. यांत व्याधाच्या गतींत चमत्कार दिसून आला आहे. प्रथम दर सेकंदास सुमारें २० मैलप्रमाणें त्याचें निर्गमन होत होतें. परंतु तो वेग कमी होत जाऊन आतां त्याचें आगमन होऊं लागलें आहे. [ दीक्षित—भारतीय ज्योतिःशास्त्र; ज्योतिर्विलास. ]

**नाइक**—नायक, नाइकडा. यांची एकंदर वस्ती सुमारें १। लाख असून मुंबई इलाखा व रजपुताना यांत विशेष आहे. मुंबई इलाख्यांत सुमारें ५० हजार नाइक आहेत. हे पंचमहाल, रेवाकांठा व सुरत प्रांतांत मुख्यत्वेंकरून आढळतात.

भडोचचे 'तलब्दा', कोळी यांनांहि नाईक असें म्हणत असत. तेव्हां नांवाचा घोंटाळा होऊं नये. म्हणून यांनां लहान नाईक अथवा नाइकडे म्हणूं लागले. गेल्या शतकाच्या अखेरपर्यंत हे केवळ रानटी स्थितींत होते. व व्यावहारिक आचार विचाराची फारशी पर्वा करीत नसत. त्यानंतर त्यांनीं मजुरी, लांकूड तोडण्याचा उद्योग आरंभिला व ज्यांच्या जवळ बैल व नांगर होते त्यांनीं शेतकी सुरू केली. यांची सज्ञानपणीं लग्नें होतात.

नायकडा व कोळी जातींत परस्पर शरीरसंबंध होऊं शकतात. वधूवरांस भोजनोत्तर अंगणाच्या अथवा मंडपाच्या मध्यभागीं बसवून उभयपक्षांचीं वृद्ध मनुष्यें उपाध्याय या नात्यानें त्या वधूवरांचा 'हस्तमेलाप' करितात व त्यांच्या वस्त्रांच्या पदरांस गांठ मारून त्यांच्या डोक्यावरून दुसरें एक वस्त्र धरितात. नंतर वृद्ध मनुष्यें त्यांनां गूळपापडीचे लाडू देतात. वधूवरांनीं परस्परांस दोन दोन घांस दिल्यावर त्यांच्या डोक्यावरील वस्त्र काढून टाकतात, म्हणजे लग्नकार्य संपलें. कोणी मुलगी सोळा वर्षांच्या वयावर अविवाहित स्थितींत असेल, तर तिनें त्यानंतर आपल्या पसंतीस येईल त्या पुरुषाबरोबर स्त्रीच्या नात्यानें जाऊन राहण्यास हरकत नाहीं आणि जर तो पुरुष त्या स्त्रीच्या आईबापांस सोळापासून पन्नास रुपयांपर्यंत कांहीं देणगी देऊं शकेल तर त्या स्त्रीनें त्या पुरुषाजवळ राहण्यास तिचे आईबापहि हरकत करीत नाहींत. जर बायको नवऱ्यास टाकून देईल, आणि दुसऱ्याजवळ जाऊन राहील तर तो पहिल्या नवऱ्यास सोळापासून साठापर्यंत कांहीं रुपयांची रक्कम देतो म्हणजे तंटा तुटला. परंतु जर नवरा आपखुषीनें बायकोस टाकून देईल तर तिनें दुसऱ्याशीं लग्न केल्यावर पहिल्या नवऱ्यास कांहीं द्यावें लागत नाहीं. या जातींत पुनर्विवाह प्रचलित आहे. विधवेला दिराशीं अगर नवऱ्याच्या दुसऱ्या एखाद्या नातलगाशीं लग्न करतां येतें. ही जात सर्व प्रकारचें मांस (गाढव, कावळा व साप खेरीज) खाते. या जातींत मनस्वी दारू पितात व उत्सवप्रसंगीं तर दारूचा अतिरेक होतो. भिल्लजात त्यांच्या हातचें पाणी पिते. मुंबई ग्याझेटियरवरून असें समजतें कीं, ही जात मुसुलमानांबरोबर जेवते व धेड, चांभार, भंगी यांच्या हातचें जेवलेल्या नायकड्यांनां पंचांनीं जातीबाहेर टाकल्यावर जातभाईनां दंड व भोजन देऊन पुन्हां जातींत घेतलें आहेत. भिल्ल त्यांच्या जातींत येऊं शकतात. त्याचप्रमाणें कोळी व इतर जातीहि नायकड्यांच्या जातींत येतात. त्यांचा धर्म वन्य वाटतो. कालिका, अंबा, व महाकाली या देवतांचें हे पूजन करतात. हे वाघाला फार मानीत असून खरेपणाची शपथ घ्यावयाची असल्यास वाघाची घेतात.

आपले सामाजिक वाद पंचायत सभा भरवून निकालास लावतात. जातीचे नियम मोडल्यास दंडाची शिक्षा होते व दंडाच्या रकमेंतून त्याला शुद्ध करून घेण्यांत येतें.

पंजाबांत हे हिंदू व मुसुलमान असून मुख्यतः मुलतान व दिल्ली प्रांत फेरोजपूर, लाहोर व शहापूर जिल्हे व लोहारु, फरीदकोट, चंबा, नाभा आणि भावलपूर संस्थान यांत आढळतात. पूर्वी नाईक ही केवळ अहेरी, थोरी व बंजारा लोकांच्या पुढाऱ्यांनां पदवी म्हणून लावीत असत. परंतु हल्लीं ती एक जात ( नाईक ) म्हणून झाली आहे. हे शेतकी व मजुरी करतात. [ सेन्सस रिपोर्ट ( १९११ ) मुंबई व पंजाब ; रोज ग्लासरी. ]

**नाईलनदी**—ही आफ्रिकेंतील सर्वांत लांब नदी असून जगांतील नद्यांच्या लांबींत हिचा नंबर २ रा लागतो. व्हिक्टोरिया नायंझापासून थेट समुद्रापर्यंत हिची लांबी ३४७३ मैल आहे. हिचा मुख्य फांटा दक्षिणेकडून उत्तरेकडे वहात जातो. हिला मध्य आफ्रिकेंतील तलावांचें पाणी मिळतें. याशिवाय हिला काफू, बेहर एल गझल, सोबात वगैरे नद्या मिळतात. सोबातपासून ५२० मैलांवर हिला पूर्वेकडील बाल एल अझ्राक नांवाची एक मोठी नदी मिळते. या दोन नद्यांच्या मध्यें खारटूम आहे. खारटूमपासून २०० मैलांवर हिला अतबारा नांवाची शेवटची नदी मिळते. ईजिप्त व सुदानच्या उत्तरेकडील भागाचें जीवित व भरभराट या नदीच्या कालव्यांवर अवलंबून आहे. या नदीचें पाणी सतत सारखें रहात नाहीं. पावसाळ्यांत हिला पूर येतो व उन्हाळ्यांत हिचें पाणी कमी होतें; तरी तें १८ फुटांपेक्षां कमी खोल नसतें. एलेफंटाइन बेटावर या नदीचें पाणी मोजण्याकरितां एक जुनाट स्तंभ आहे. ही नदी कांहीं ठिकाणीं नौकानयन करण्याइतकी खोल नाहीं. कांहीं ठिकाणीं हिच्यांत मोठ्या बोटीहि चालू शकतात.

ह्या नदीच्या उगमाचा शोध लावण्याचा प्रयत्न पुरातन काळापासून सुरू होता. ग्रीक व इराणी लोक यांनीं बराच प्रयत्न केला होता. यानंतर निरनिराळ्या यूरोपियन प्रवाशांनीं हिच्या उगमाचा शोध लावण्याचा प्रयत्न केला. स्टानले यानें १८८५ सालीं व्हिक्टोरिया नायंझाला प्रदक्षिणा घालून नाईलच्या उगमाचा खरा शोध लाविल्यावरहि बरेच प्रयत्न स्थानिक अधिकाऱ्यांकडून व आंग्लो-जर्मन कमिशनकडून केले गेले. ही नदी ब्रिटिशांच्या ताब्यांत आहे.

**नाक**—गंधाचें ज्ञान होण्याकरितां नासिक हें विशेष इंद्रिय आहे. जरी गंधाच्या प्रकृतिधर्माविषयीं पुरतेपणीं समजत नाहीं तरी तो पदार्थांच्या पृष्ठभागावरून निघतो. अशी सामान्य कल्पना असते कीं, गंधवान पदार्थांपासून सूक्ष्म कण निघून चहूंकडे पसरतात, आणि ते आपल्या नाकास येऊन लागतात तेव्हां आपणांस गंधज्ञान होतें परंतु हा तर्क खरा आहे किंवा कसें याविषयीं संशय आहे. गंधज्ञानसंबंधीं इंद्रियें नाकाच्या खांचांत आहेत. ह्या खांचा कफादि मलोत्पादक अशा नाजुक त्वचेकडून मढविलेल्या आहेत. वरला भाग मात्र गंधाचें स्थान असा मानला पाहिजे, कारण तेथेंच मात्र घ्राणेंद्रियांसंबंधीं मज्जातंतू आढळतात. नाक हें

अस्थियुक्त सांगाडा व कूर्चा मिळून मुख्यत्वेंकरून झालें आहे, व त्याच्यामध्यें एक हाडाचा पातळ पडदा व कूर्चा उभा असून त्यांकडून नाकाच्या खांचेचे दोन भाग झाले आहेत, त्यांस नाकपुड्या म्हणतात. हाडांच्या योगानें नाकाच्या बुडास सुरेखपणा प्राप्त झाला आहे, आणि स्नायूंस जडून रहाण्यास मजबूत आधार आहे. कूर्चेच्या योगानें बाहेरल्या भागास सुरेखपणा आला आहे आणि तिची स्थितिस्थापकता दुखापतीचें भय कमी करते.

उ प यो ग.—फुलांचा व सुगंधी द्रव्यांचा सुवास या इंद्रियानें घेऊन मनुष्यास फार आनंद होतो हें सांगणें नको. तथापि क्षुधा व श्वासोच्छ्वासासंबंधीं इंद्रियें यांस सांभाळणें हा या इंद्रियाचा मुख्य उपयोग आहे. याच्या साहाय्यानें अन्नाची परीक्षा करतां येते, म्हणजे ज्या पदार्थाचा वास अमंगळ आहे व त्यामुळें अर्थात जो खाण्यास योग्य नाहीं तो सेवन करूं नये, असें ठरवितां येतें. परंतु सर्वांहून मोठा उपयोग हा आहे कीं, श्वासोच्छ्वासाच्या इंद्रियांचें त्याकडून संरक्षण होतें. जे सूक्ष्म अदृश्य कण गंधयुक्त पदार्थांपासून निघतात ते वारंवार प्रकृतीस फार बाधक असतात, आणि हवा कधीं कधीं अशा विषकारक पदार्थांनीं भरलेली असते. हवा येण्याजाण्याच्या रस्त्यावरच हें इंद्रिय असल्यानें हवेचा लोंढा आंत जाऊं लागतांच नाक त्याची परीक्षा करतें, व शरीरास बाधक असे जे वायू त्यांत असतात त्यांच्या विषयीं आपणांस सावध करतें.

घ्रा णें द्रि या ची ती व्र ता.—कित्येक पदार्थांविषयीं घ्राणेंद्रियाची तीव्रता फार विलक्षण आहे. असें म्हणतात कीं कस्तुरीचा अतिसूक्ष्म परमाणु जरी साधारण हवेंत मिसळला असतां त्याचा गंध समजतो. निरनिराळ्या पदार्थांच्या गंधाचा भेद समजण्याची शक्ति, शिक्षण व संवयी यांकडून पुष्कळ वाढवितां येते.

ज ना व रां मध्यें घ्रा णें द्रि यें.—बहुतकरून सर्व जनावरांस घ्राणेंद्रिय आहे आणि विशेषेंकरून सस्तन प्राण्यांमध्यें तें फार पूर्णतेस आलें आहे. त्यांचें नाक फार मोठें असून आंतील खांच विस्तीर्ण आहे. कित्येकांस अधिक हाडें अथवा हाडाच्या बढ्या यांचा पुरवठा आहे, तेणेंकरून अधिक मोठा पृष्ठभाग उघडा राहून हुंगण्याची शक्ति वाढते. मनुष्याच्या संबंधानें घ्राणेंद्रियाचे जे उपयोग आहेत म्हणून पूर्वी सांगितले त्यांखेरीज आणखी त्याचे उपयोग जनावरांमध्यें आहेत. सिंह, वाघ, लांडगा, अस्वल आदिकरून मांसाहारी जनावरांस या इंद्रियाच्या योगानें आपल्या भक्ष्याचा पाठलाग करतां येतो, आणि आसपास दुसरें जनावर दृष्टीस पडण्याजोगें नसलें तरी त्याचा शोध त्यांस लागतो.

**नाकाचे रोग**—घ्राणेंद्रिय जें नाक त्यायोगें बऱ्या व वाईट गंधांचें ज्ञान मेंदूस होतें; परंतु त्यास त्याच्या नाना ठिकाणीं नानाप्रकारचे रोग होतात; व म्हणून तें इंद्रिय आपल्या परिचयांतलें असलें तरी रोगपरीक्षणार्थ त्याचे भाग पद्धतशीर रीतीनें तपासण्याची माहिती पाहिजे. नुसत्या डोळ्यांनीं बहुधां हें कार्य करतां येतें. परंतु त्याजोगता एक बारीक आरसा-जो घशांत घालतां येऊन नाकपुड्यांचा घशांतील मागील भाग प्रकाशित करील अशा प्रकारचा-जवळ असल्यानें परीक्षणास मदत होते. आरशानें व तदर्थ दुर्बिणीनें नाकपुड्यांत पुढूनहि प्रकाश पाडतां येतो. प्रथम रोग्याच्या नाकाचा बाह्य भाग तपासावा. नंतर त्यास डोकें मागें वांकविण्यास सांगितल्यानें नाकपुड्यांच्या आंतील भाग प्रकाशित करतां येतो व तसा तो झाला म्हणजे आंतील पडदा, नाकाचा तळभाग अगर भूमि ( डोकें मागें वांकविलेल्या स्थितींत असलेली ), दोन्ही बाजू व त्यांवरील श्लेष्मल आवरण, यांतच नाकपुड्यांच्या बाहेरील व पडदीच्या आंतील बाजूच्या हाडांच्या सुमारास आडव्या दोन खोबणी, ज्यावर श्लेष्मलत्वचा आहे अशा व नाकपुड्या या भागांचें निरोगी स्थितींत परीक्षण करण्याची संवय असल्यास रोगविज्ञान व विकृतस्थिति लवकर लक्षांत येते. नाकपुड्यांचीं घशांतील छिद्रें घशांत बोट घालून तपासतां येतात व तेथें ग्रंथि वगैरे असल्यास त्या चांचपतां येतात. वरील जबड्याच्या व नाकामागील मस्तकाच्या पोकळ अस्थींचा संबंध नाकाशीं आहे.

लाल नाक अगर नाकावरील मुरुमाच्या फुटकुळ्याः—दारूबाजाचें नाक लाल असतें हा समज खरा आहे. कारण नाक लाल होण्याचें तें एक कारण आहे. पण त्याशिवाय तितकींच महत्त्वाचीं कारणें आहेत तीं अशीं. थंड सर्द हवा, सर्दी, यौवनावस्था प्राप्त होण्याचा काल, अजीर्ण व अग्निमांद्य. स्त्रियांना हा रोग विशेष होतो. याचें कारण शोधून त्यावर उपाय करावे. बाहेरून लावण्यासाठीं गंधकाचें मलम अगर रसकापुराचें धावन उपयुक्त असतें. बारीक व मध्यमशा ग्रंथी व दुष्ट ( असाध्य ) ग्रंथी या ठिकाणीं होतात व त्यासाठीं शस्त्रक्रियेची मदत पाहिजे. चरणारा असाध्य व्रण व ल्युपसनामक त्वग्रोग या ठिकाणीं होतात. त्यासाठीं त्यावर सांगितलेले उपचार करावेत. फिरंगोपदंशासंबंधीं होणारीं गळवें व गुमडीं; हीं हाडास होऊन तीं रात्रीं ठणकतात व त्यांवर त्या रोगाचे इलाज करावेत.

ना क पु ड्यां ती ल रो ग.—( १ ) घुणघुणा फुटणेंः—मेंदू, यकृत या ठिकाणीं रक्ताधिक्य झाल्यास घुणघुणा फुटल्यानें बरें वाटतें. मुलांची यौवनावस्था, म्हातारपण, यकृतरोग, हृद्रोग, व मूत्रपिंडाचे रोग या अवस्थेंत रक्त खराब व पातळ होणें, रक्तपित्त, कांहीं प्रकारचे ताप व रक्तस्राव होण्याची प्रकृति असणें, नाकास व डोक्याच्या कवटीच्या तळास मार, इजा, धक्के इत्यादि लागणें अगर अस्थि भंग होणें; आंतील पडद्यांस, रक्तग्रंथी, श्लेष्मल ग्रंथी असाध्यग्रंथी अगर हाडीव्रण असणें हीं मुख्य कारणें होत. रक्त एका अगर दोन्ही नाकपुड्यांतून येतें किंवा मागील

छिद्रांतून तें गिळलें जातें अगर तोंडांतून बाहेर व्हातें; अगर श्वासनलिकेंत शिरून खोकला व ठसका उत्पन्न करतें.

उपचारः—सशक्त माणसांत रक्तस्राव आपोआप थांबतो व फार तर साधे उपचार करावे व थोडेंफार रक्त गेल्यानें फायदाच असतो. म्हणून तें अगदीं तावडतोब बंद करूं नये. रोग्यास उताणा निजवून त्याचे हात डोक्याकडे पसरून ठेवावे व डोकें अमळ उंच राहील असें ठेवावें. त्यास बर्फ चोखण्यास द्यावा. अति थंड अगर कढत पाण्याची पिचकारी हळूहळू नाकांत सोडावी, मानेस अगर नाकास बर्फ लावावें. हात व पाय गरम ठेवावे, पोटामध्यें अर्गटचा अर्क, क्यालशियम् लॅक्टेट हीं औषधें द्यावीत. नाकांत पिचकारीनें घालण्यास तुरटीचें पाणी, आयर्न क्लोराईडचें पाणी हीं औषधें चांगलीं, अगर ड्रेनेलिन किंवा ॲड्रिनेलिनचे थेंब घालावे अगर त्यांत कापूस भिजवून त्याचा बोळा नाकांत ठेवावा. अगर रक्तस्रावाच्या ठिकाणीं विजेची पेटी लावावी. वरील उपचार करण्याच्या अगोदर कोणतें कारण संभवत आहे हें पाहून उपचार करावे.

(२) जुनाट पडसेंः—कारणें—मुलांची अशक्त व क्षयी प्रकृति, वरचेवर पडसें येणें,घशाच्या मागें मऊ व विलविलीत बारीक ग्रंथी असणें, मधील पडदी वांकडी असणें, चिंचोळ्या नाकपुड्या, तपकीर फार ओढणें इत्यादि. या रोगाचे तीन प्रकार अगर अवस्था आहेत. (अ) नाकांतून पांढरा-पिवळा शेंबूड येणें, व नाक आंतून लाल होणें. परंतु नाकांतील त्वचा जाड न होणें व त्यांतून दुर्गंधिमय खपल्या न निघणें व नाकाची घाण न येणें हीं लक्षणें असतात. (आ) मागील रोगाची हयगय झाल्यानें नाकाची अंतस्त्वचा सुजून लाल होते व त्यांतून पांढरा पिंवळा शेंबूड फार येतो, आवाज नाकांतून येतो, नाक चोंदल्यामुळें वरचेवर शिंकरावें लागतें व श्वासासाठीं तोंड उघडें ठेवणें जरूर असल्यामुळें चेहरा बावळट दिसतो, शेंबूड नाकाच्या मागून घशांत उतरतो व तो खांकरून थुंकावा लागतो. याचा कानाशीं संबंध असल्यामुळें बहिरेपणाहि येतो. ठसका, दमा, अगर घुरें सुद्धां यामुळें होतें. बाहेरून नाकपुड्या जाड दिसतात. मागील छिद्रें तपासलीं असतां तेथें त्वचा सुजलेली दिसून त्याच्या गांठीहि बनलेल्या असतात. याच रोगाचें तिसऱ्या प्रकारांत पर्यवसान होतें (इ) पीनस रोगः—नाकांतील अंतस्त्वचेची सूज ओसरून ती रुक्ष होऊन त्याखालील रचनेचा नाश होणें हें लक्षण यांत असतें व म्हणून यांत नाकपुड्या फार मोठ्या दिसतात. अंतस्त्वचा नेहमींपेक्षां कमी लाल दिसते व तीवर हिरव्या व पिंवळ्या खपल्या धरतात. बहुतेक रोग्यांच्या नाकाला या खपल्याखालीं जमणाऱ्या स्रावामुळें अत्यंत दुर्गंधी येते.जुनाट पडश्यामुळेंच असें झालें असल्यास खपलीखालीं व्रण बनतो. उपदंश वगैरे इतर कारणांमुळें नाक बिघडून त्यांत व्रण व दुर्गंधी येते तो प्रकार पुढें येईलच.

उपचार—आरंभीच न कंटाळतां खटपट केली तर हा रोग बरा होतो. परंतु शेवटच्या पीनसाच्या अवस्थेपर्यंत जाऊं दिल्यास पूर्ण बरा होत नाहीं. रोग्याची प्रकृति तो क्षयी व अशक्त असल्यास कॉडलीव्हरआईल, माल्टाईन, आयर्न आयोडाईड, या औषधांनीं सुधारावी. नाक स्वच्छ करण्यासाठीं औषधें घालावयाचीं तीं तुषार उडवण्याऱ्या पिचकारीनें घालावीं.व त्यासाठीं हायड्रोजन परॉक्साईड हें औषध चांगलें आहे. त्यानंतर त्या भागास स्तंभत्व येण्यासाठीं टॅनिक असिड, झिंक सल्फोकार्बोलेट, टर्पिन, कोकेन व थायमॉल हीं औषधें पातळ पेट्रोलिअममध्यें यथायोग्य प्रमाणांत विरघळून घालावींत. अंतस्त्वचा फार जाडी असल्यास तिला क्रोमिक ॲसिड लावावें. अगर कांहीं व्यंग असल्यास शस्त्रक्रिया करावी. पीनस रोगासाठीं दुर्गंधी कमी होण्यास कॅर्बोलिक ॲसिड, बोरॅक्स, अरिस्टॉल इत्यादींच्या धावनांचा उपयोग करावा अगर दुर्गंधीनाशक पूड नाकानें ओढावी व पोटामध्यें कंकोळयुक्त औषध द्यावें.

(३) नाकांत व्रण होणेंः—हा क्षयी व अशक्त प्रकृतीमुळें होतो व तो हाडापर्यंत गेल्यानें नाक बसकें व विद्रूप होतें. उपचारः—पोटांत कॉडलिव्हर ऑईल वगैरे देऊन प्रकृति सुधारावी व वर सांगितलेल्या धावनानें अगर आयडोफार्म किंवा ल्याक्टिक आसिड लावून व्रणाचें स्थान शुद्ध करावें. व्रण जुनाट असल्यास शस्त्रानें खरडावा किंवा आंतील नासक्या हाडाचा तुकडा काढावा.

(४) फिरंगोपदंशसंबंधीं नासारोगः—लहान मुलास हा रोग (आईच्या संसर्गानें वगैरे) झाल्यास प्रथमावस्थेंत पुटकुळ्या येऊन पडसें येतें व त्यामुळें श्वासोच्छ्वासाच्या वेळीं मोठा आवाज, हीं लक्षणें होतात. यापुढील स्थितींत नाकपुडींत व्रण होतो व "गमा" नामक ग्रंथि होतात व त्यामुळें आंत चरत जाणारे खोल हाडीव्रण होऊन हाडें कुजून जातात व पू वाहून नाक खचतें व नंतर बसकें होतें, नंतर मधील पडदी झडते, टाळूस भोंक पडतें व नंतर नाकावरील मांस व त्वचा झडून गेल्यावर माणूस फार विद्रूप दिसतें. फार दिवस टिकणारा स्राव व हाडाची एक विशिष्ट दुर्गंधी व जुनाट पडशाप्रमाणें नाकाची अंतस्त्वचा सुजलेली नसणें आणि पूर्वी उपदंश झाल्याचा पुरावा मिळाल्यानें रोगनिदान होऊन उपचार करणें सोपें होतें. उपचारः—पोटांत पोटॅशियम आयोडाईड हें औषध द्यावें; व त्याबरोबर किनाईन, सिंकोना, व नाना पारदभस्म प्रकारांपैकीं एखादा योग्य प्रकार योजून द्यावेत व पिनस रोगांत सांगितल्याप्रमाणें नाकावर धुण्याचे उपचार करावेत. कुजकें हाड शस्त्रक्रियेनें नाकपुड्याच्या पुढील अगर मागील छिद्रांतून काढून टाकावें.

(५) लेंकरांनां सांसर्गिक फिरंगोपदंश रोग झाल्यास पोटांत कांहीं महिने ग्रे पावडर हें औषध सूक्ष्म प्रमाणांत

देऊन नंतर पोटयाशियम आयोडाईड दिल्यानें आश्चर्यकारक गुण येतो. नंतर कॉडलिव्हर आईल द्यावें.

( ६ ) ल्यूपस नामक त्वग्रोग नाकाबाहेर होतो. तो कधीं नाकाच्या पडदीस होऊन तेथें छिद्र पडल्यानें स्राव सुरू होतो. तेथील जागा लाल होऊन तीवर फोडा व खपल्या जमतात, व त्या काढल्या तर त्यांखालीं मऊ व्रण दिसतो. उपचारः—पोटांत कॉडलिव्हर आईल व सोमल हीं पौष्टिक औषधें देऊन रोगनाश करणारीं ल्याक्टिक असिडें वगैरे औषधें लावावीं अगर शस्त्रानें खरडावें अगर " क्ष " किरणांचा उपयोग करावा.

( ७ ) नासाश्मरीः—सुतखड्याप्रमाणें चुन्याच्या फॉस्फेटचें कीट नाकांत जमून खडा बनतो व त्यामुळें शेंबूड, स्राव, नाक चोंदणें हीं लक्षणें होतात. निदान करतांना अस्थिग्रंथि अगर क्यान्सर आहे कीं काय असा घोंटाळा होतो. यास उपचारः—खडा चिमट्यानें ओढून काढावा. खडा मोठा असल्यास प्रथम तो फोडण्याचें शस्त्र असतें त्यानें प्रथम बारीक करून काढावा. आगंतुक पदार्थ आंत शिरल्यासहि वरीलच उपचार उपयोगी आहेत.

ग्रं थि रो ग.—यांचे तीन प्रकार आहेत. ( अ ) श्लेष्मल ग्रंथि—ही गांठ बहुधां नाकाच्या बाजूस आंतून होते व फार क्वचित मधील पडदीस होते. या गांठी अनेक व लहान असून त्यांचा बहुधा पुंजका असतो. लक्षणेंः—नाक चोंदणे,गेंगाणा आवाज व पांढरा स्राव,दमा, खोकला कसलाच वास न येणें हीं लक्षणें असतात. नाक तपासलें तर पांढऱ्या-करड्या रंगाच्या, ओलसर, हालणाऱ्या व त्यावर टोंचलें किंवा दाबलें तर तेथें खळगा पडणाऱ्या गांठी दिसतात. गांठी खोल जागीं असल्या तर नाक तपासण्याच्या दुर्बिणीची मदत घ्यावी लागते. उपचारः—यास प्रथम कोकेन लावून विजेच्या साहाय्यानें जाळून काढतां येते. अगर तारेच्या फासांत अगर चिमट्यांत पकडून पीळ घातल्यानें त्या तुटतात. ( आ ) तंतुमय ग्रंथी या नाकपुडींत पुढील भागास प्रायः होत नाहींत; आंत खोल घशांत होऊन मोठ्या झाल्यावर त्या नाकांत अडथळा करतात. यांचीं लक्षणें वरील प्रमाणेंच पण घाणेरडा स्राव व त्यांत रक्त, विशेष बहिरेपणा,श्वासास,कधीं कधीं अन्न गिळतांना अडचण हीं होत.मनुष्य मोठा होतो तसतशा या गाठी लहान होतात. परंतु त्या फुटल्या तर फार रक्तस्राव होऊन रोगी दगावतो सुद्धां. उपचारः—या गांठी शस्त्रक्रियेनें काढतांना रक्तस्राव फार होतो म्हणून ही शस्त्रक्रिया करण्यास उत्तम शस्त्रवैद्याची उत्तम मदत हवी. ( इ ) असाध्य (क्यान्सर सार्कोमा ग्रंथी) यांचीं लक्षणें वरीलप्रमाणें. उपचार शस्त्रक्रिया करणें.

ना क पु ड्यां म धी ल प ड दी चे रो गः—( १ ) रक्त सांखळून गांठ बनणें; हें मार अगर धक्का, इजा यामुळें घडतें. ही गांठ मऊ बिलबिलीत असते व ती इजा झाल्यानंतर लागलीच आल्यामुळें तें गळूं नव्हे असें ओळखतां येतें. पडदीच्या दोन्हीं बाजूंस बहुधां ती असते ही फोडूं नये, ती आपोआप ओसरून जाते.( २ ) गळूं झाल्यास मात्र तें फोडावें. लाली, सूज, दाह, ठणका यावरून गळूं ओळखावें. ( ३ ) फिरंगोपदंशजन्य " गमा " नामक ग्रंथि होऊन तीवर उपचार न केल्यास ती चरत जाते व व्रण होऊन पडदीस भोंक पडतें व नाकाचीं हाडें कुजून नाक बसतें अगर झडतें. त्या व्रणावर हिरवें-काळें सायटें धरून त्याभोंवतीं लाली असते. उपचारः—आरंभींच पोटॅशियम आयोडाइड औषध घेतल्यानेंहि गांठ जिरते. नाहीं तर पुढें व्रण बनल्यास शस्त्रवैद्याची मदत घ्यावी लागते. क्षयी व अशक्त प्रकृतीमुळें होणारा रोग हाडीव्रण व लाल पुटकुळी या दोहोंपैकीं एखाद्या स्वरूपांत हा रोग होतो. फुप्फुसांत कफक्षयाचीं लक्षणें बहुधां सांपडतात. उपचारः-शस्त्रवैद्याकडून व्रण अगर पुटकुळी खरडून घेऊन नंतर तीवर शामक उपचार करावे.

पडदीची उपजत अगर इजेमुळें असलेली वक्रताः—यामुळें एका नाकपुडींत फुगवटी व दुसरींत खळगा दिसतो. नाकपुडीची बाहेरील बाजूहि अंमळ वक्र दिसते. नाक चोंदून श्वासास अवरोध, शेंबूड येणें, बहिरेपण, माथेशूळ हीं लक्षणें असतात. उपचारः—ही वक्रता नाहींशीं करण्याजोगता एक चिमटा असतो; त्यांत पकडून पडदी सरळ करितात. परंतु ती कायम तशी राहण्यासाठीं दोन्ही नाकपुड्यांत नाकपुडीच्या आकाराच्या कांड्या बसवून कांहीं दिवस त्या ठेवतात. नंतर भोंवतालच्या रचनेस नवीन वळण येईतोंपर्यंत ठेवल्यावर त्या काढून त्याऐवजीं व्हल्कनाइट किंवा हस्तिदंताच्या कांड्या कांहीं काळ ठेवतात. याच पोकळ कांड्या बसविल्या म्हणजे श्वासास अवरोध होण्याची अडचण दूर होते. नंतर त्याहि काढून टाकतात.

पडदीस तंतुमय, कूर्चामय, अस्थिमय अगर रक्तवाहिन्यायुक्त ग्रंथी होतात त्यांवर इलाज शस्त्रप्रयोगहाच होय. मृत्तिकासम ( बिलबिलीत ) ग्रंथी लहान मुलाच्या घशांत नाकपुड्याच्या मागील छिद्रांजवळ पुष्कळांनां होतात; कारण त्या होण्याजोगी अनुकूल रचना तेथें असते. अशा मुलाच्या गळ्यांतील गांठीहि बहुधां मोठ्या असतात. या मुलांनां घशांतील सूज, दाह व पडसें वरचेवर येतें व त्याची हयगय झाल्यास कान ठणकतो, फुटतो व बहिरा होतो. लक्षणेंः—बहिरेपण, नाकांतून श्वासास अवरोध, घोरणें, नाकांतून आवाज येणें अगर निर्जीव पुळपुळीत आवाज येणें, व सदा श्वासासाठीं तोंड उघडें राहिल्यानें चेहऱ्यावरील बावळटपणा. तोंडांत बोट घालून नाकपुड्यामागें चांचपिलें तर या ग्रंथी मऊ मऊ व बोटांस गांडुळाप्रमाणें लागतात. आरशानें तपासलें तर त्या गुलाबी रंगाच्या व दाट उगवून नाकपुड्याच्या मागील छिद्राआड आलेल्या दिसतात. उपचारः-शस्त्रानें कापून काढणें. यासाठीं हाताचें नख, वर्तुळाकार ( आंगठीप्रमाणें ) चाकू, चिमटा अगर खरवडण्याचें हत्यार यांपैकी जें सोयीचें दिसेल त्या साधनानें त्या काढून टाकतात. व साधल्यास

घशांतील गांठीहि काढतात. गुंगी आणण्यास प्रथम ईथर हुंगवून मग क्लोरोफार्मनें गुंगी आणतात; तो जपून दिला पाहिजे. कारण रक्त नाकांतून व तोंडांतून वाहून तें गालांत जमतें व तेथून तें स्पंजानें अगर बोळयानें वरचेवर टिपून घेतां येईल असा मदतनिसास अवसर द्यावा लागतो. म्हणून डोकें एका बाजूवर ठेवतात. शस्त्रक्रियेनंतर रोग्याचें तोंड बंधनानें बांधून टाकतात म्हणजे तो नाकानें श्वास आपोआप घेऊं लागतो.

नाकाच्या पोकळीशीं संलग्न अशा इतर ( जबडा, मस्तक, कपाळ इ.) पोकळीचे रोगः—नाकांत पडसें, सूज प्रथम येऊन ती इकडे पसरल्यामुळें अगर श्लेष्मल ग्रंथी किंवा किडक्या दांताच्या मूळाची पीडा होऊन त्यामुळें हा रोग उत्पन्न होतो. याचीं लक्षणें:—एका नाकपुडींतून फिकट पिंवळा पू बाहेर येतो. पू येण्यासारखी नासाश्मरी, कुजकें हाड, फिरंगोपदंशजन्य व्रण हीं कारणें जर नसलीं तर या पोकळीपैकींच कारण बहुधां असतें. जबड्याच्या पोकळींतील पू वाहिल्यावर कांहीं दिवस बंद होतो व तो पू दुर्गंधियुक्त असा वाहतो. डोकें मागें केल्यानें अगर दूषित जबड्याच्या विरुद्ध बाजूवर निजल्यानें नाकपुडीच्या बाजूच्या आंतील अंगाकडून पू येतो. गालावर अगर दांत दाबला तर दुखतें. विजेच्या दिव्याच्या साहाय्यानें रोगनिदान होतें. परंतु तें नक्की अजमावण्यासाठीं दातांच्या वरील मार्गेत पोकळ सुईच्या अग्रानें टोंचून आंत पू आहे किंवा नाहीं हें पाहतात. जबड्याखेरीज इतर पोकळींतून येणारा पुवाचा स्राव सतत वाहतो व मस्तक ताठ ठेवल्यानें अधिक येतो. नाकामार्गे खोल ठिकाणीं दुखतें अगर डोळयांत व कपाळांत पोकळी दूषित असलेल्याप्रमाणें दुखतें, तसेंच डोळे पुढें आलेले बटबटीत दिसल्यास नाकामागील अगर अस्थींतील पोकळींत पू आहे असें दर्शवितें. पापणी पडली राहून निर्जीव होणें, तिरवेपणा, व एकदम अंधत्व हीं लक्षणेंहि तेंच दर्शवितात. उपचारः—अगोदर औषधी पाण्यानें जुनाट पडशाचे उपचार, फवारा उडविण्याच्या पिचकारीनें करून नाकांतील स्राव कमी करावा. त्यानें उपयोग बराच होईल. न झाल्यास शस्त्रक्रिया करावी. म्हणजे जबड्याच्या अगर कपाळाच्या हाडांतील पोकळींतील पू धुवून ती निर्मळ करतां येते. अगर ती चिरून तिच्यांतील पुवाचा निचरा होण्यासाठीं तिच्यामध्यें पू वाहून नेणारी नळी कांहीं दिवस ठेवावी म्हणजे कांहीं दिवसांनीं ती पोकळी पूयरहित व स्वच्छ होते. हें करण्याच्या वेळीं दांत शाबूत असल्यास दांतांच्यावर हाडांत छिद्र पाडून आंत नळी घालावी, पण एखादा दांत किडका असेल तर तो उपटून अगर अगोदरच पडून गेलेला असेल तर त्याच्या उगवण्याच्या पोकळींत छिद्र पाडून त्यावाटें जबड्यांत नळी शिरकवावी. नळी ठेवल्यानें तें छिद्र बुजत नाहीं व त्यांतून रोज बोरिक ॲसिड किंवा झिंक सल्फेटच्या धावनानें ती पोकळी धुवून निर्मळ करतां येते. एवढयावर बहुधा भागतें. पण न भागलें तर हेंच छिद्र मोठें करून त्यावाटे आंतील मळ श्लेष्मल त्वचा खरडण्याच्या हत्यारानें खरवडून ताजी व स्वच्छ करतात. म्हणजे त्यांतील पूयोत्पादक दुर्गुण नाहींसा होऊन स्राव बंद होतो. त्याच प्रमाणें कपालास्थींतील पोकळीपुढील बाजू भोंक पाडून धुतात अगर खरवडतात व त्याचा नाकाशीं असलेला स्वाभाविक संबंध बुजला असेल तर तो सळईनें फोडून सुरू करतात. नाकामागील हाडाच्या पोकळी खरवडण्यासाठीं नाकांतून जपून शस्त्र घालावें लागतें अगर डोळा व नाक यांच्या कोपऱ्यांत चिरून खालील खोलभाग उघडा करावा लागतो.

नासाकाठिण्यरोग.—हा एक दुर्मिळ व विशिष्टजंतुजन्य रोग आहे व यांत नाक, ओंठ हे दगडासारखे कठिण होऊन श्वासावरोध होतो; दुःख नसतें. यास उपचार, त्या जंतूची लस टोंचणें. नाकांत आगंतुक पदार्थ जाऊन बरेच दिवस झाल्यास दुर्गंधियुक्त स्राव सुरू होतो. एखादेवेळीं हा पदार्थ आंत गेलेला आईबापांसहि माहीत नसतो व बऱ्याच दिवसांनीं नाकांत व्रणहि होतो. उपचारः—संशय आल्यास रोग्यास भूल देऊन नाकांत आगंतुक पदार्थ शोधावा व तो चिमटा अगर सळई या साधनांनीं काढावा अगर तो मार्गे घशांत ढकलावा.

नासास्थिभंगः—मार लागून हाडें मोडल्यास नाकपुड्यांत बोट अगर सळई घालून तीं हाडें नेहमींप्रमाणें जुळवून ठेवावीं व तीं पुन्हां विस्कटूं नयेत म्हणून नाकपुड्यांत हस्तिदंती व पोकळ खुंटया कांहीं दिवस ठेवाव्या. नाकाचा अंतस्त्वचेचा संबंध मेंदूशीं असल्यामुळें या इजेची हयगय करूं नये.

नवें नाक बसवणें:—रोगानें नाक झडतें. अगर कोणी दुसऱ्यानें द्वेषानें नाक कापल्यास त्यामुळें अति विद्रूपता प्राप्त होते; स्त्री असो, पुरुष असो त्यास ही विद्रूपता असह्य होते. ती जाण्यासाठीं नाकाच्या क्षेत्रफळायेवढें त्रिकोणी कातडें, रोग्यास भूल देऊन त्याच्याच कपाळावरून सोलून काढून तें नाकाकडे न तोडतां तसेंच वळवून त्याचें नाक व नाकपुड्या बनवून त्या जागच्याजागीं टाके मारून कायम करतात. त्यास पोषण करणारी रक्तवाहिनी शाबूत असल्यामुळें नवीन ठिकाणीं मूळ धरीपर्यंत व नंतरहि तें कृत्रिम नाक तजेलदार रहातें व तेथें तें कांहीं दिवसांनीं चिकटल्यावर वळलेल्या त्वचेचा संबंध तोडतात. तोंपर्यंत कपाळाच्या ठिकाणीं नवीन त्वचा आल्यामुळें कपाळहि साफ होतें. हें नवीन नाक अर्थात कृत्रिम असल्यामुळें केवळ शोभेचें होय. त्याचा वास अगर घ्राण जाणण्याच्या कामीं उपयोग नाहीं. पण विद्रूपता बरीचशी घालविणें हा त्याचा मोठा उपयोग होतो.

आयुर्वेदीय निदान.—दंव, वारा, धुरळा, फार बोलणें, फार निजणें, फार जागणें, सखल डोकें ठेऊन किंवा फार उंच उशी घेऊन निजणें, पाणी बदलणें, फार पाणी पिणें, पाण्यांत फार डुंबणें, वांती व अश्रू यांस आवरून धरणें या व इतर अशाच प्रकारच्या कारणांनीं वातादिक दोष कुपित

होऊन नाकांत दाट होऊन पडसें उत्पन्न करतात. तें जसजसें वाढतें तसतसा मनुष्य क्षीण होत जातो आणि अतिशय वाढलें असतां त्यापासून शेवटीं क्षयरोगहि होतो. वाताच्या पडशांत तोंडास कोरड, अतिशय शिंका, नाक चोंदणें व त्यांत टोंचल्यासारखें होणें, दांत, कानशिलें व डोकें यांत व्यथा होणें, भिवयांच्या आसपास किडे फिरल्यासारखें वाटणें, आवाज बसणें, पडसें उशीरा पिकणें आणि थंड व पातळ शेंबूड येणें हीं लक्षणें असतात. पित्ताच्या पडशांत तहान, ताप, नाकांत पुळया येणें, भोंवळ, नाकाच्या शेंडीवर बारीक पुळ्या येणें आणि रुक्ष, उष्ण, तांबूस व पिंवळट शेंबूड येणें हीं लक्षणें होतात. कफाच्या पडशांत खोकला, अरुचि, दमा, वांती, अंग जड होणें, तोंड गुळचट होणें, नाकांत कंड सुटणें आणि, चिकट पांढरा दाट असा शेंबूड येणें हीं लक्षणें होतात. त्रिदोषजन्य पडशांत वरील तिहींचीं लक्षणें असून तें कारणावाचून एकाएकीं कमीजास्त होतें. रक्त दूषित होऊन नाकाच्या शिरांत जाऊन पडसें उत्पन्न करतें, त्यांत छाती बधिर होते, डोळे लाल होतात, श्वासास घाण येते, कान, नाक व डोळे यांत कंड सुटते, आणि पित्तजन्य पडशाचीं लक्षणेंहि होतात.

या सर्व प्रकारच्या पडशांची हयगय केली असतां तीं दुष्ट होतात. त्यांत वरील लक्षणें अधिक जोरदार असल्यामुळें सर्व इंद्रियांस त्रास होतो. अग्निमांद्य, ताप, दमा, खोकला, उरांत व बरगड्यांत वेदना, तोंडास दुर्गंधी व सूज, हे विकार होतात. पुष्कळदां हें पडसें कारणावांचून जास्त होतें. वरचेवर नाक कोरडें किंवा ओलें होतें, मोकळें असतें किंवा चोंदतें, पुवासारखा काळसर, रक्ताच्या गांठींनीं युक्त असा शेंबूड येतो आणि त्यांत लांब गुळगुळीत पांढरे व बारीक असे कृमी असतात. अंग हलकें होणें, शिंका थांबणें, चिकट व पिंवळा शेंबूड येणें, आणि रस व वास कळूं लागणें हीं सर्व प्रकारचीं पडशीं पिकल्यांचीं लक्षणें होत. तीक्ष्ण पदार्थ हुंगणें, सूर्याचे किरण, सूत, गवत व इतर वातप्रकोप करणाऱ्या कारणांनीं नाकांतील कोंवळीं हाडें घांसलीं गेल्यानें वायु कुपित होऊन त्याचा मार्ग बंद झाला म्हणजे तो शृंगारक मर्मांत जाऊन तेथून उलटतो काणि अतिशय शिंका आणतो. या विकारास भृशक्षव (शिंका अतिशय येणें ) म्हणतात.

वायु नाकांतील कफास शुष्क करून नासिकःशोष नांवाचा विकार उत्पन्न करतो. यांत नाकांत कुसें भरल्यासारखें वाटतें व श्वास टाकतांना कष्ट होतो. नासानासांत कफानें वायु कोंडला जाऊन नाक चोंदतें आणि श्वासोच्छ्वासास अटकाव झाल्यानें नाकाचीं छिद्रें बंद झाल्यासारखीं होतात. पित्त, नाकपुडींतील त्वचा व मांस यांचा पाक करून दाह व शूळ उत्पन्न करतें, यास घ्राणपाक म्हणतात. कफानें स्वच्छ व पाण्यासारखा पातळ असा निरंतर स्राव होत असतो. तो रात्रीं विशेष होतो. त्यास घ्राणस्राव असें म्हणतात. नाकांत कफ वाढून तो स्रोतांस बंद करून अपीनसं नामक रोग उत्पन्न करतो, यांत पडशापेक्षां जास्त वेदना असतात. श्वास घुरघुर वाजतो आणि मेंढीसारखें नाक चिघळून त्यांतून एकसारखा बुळबुळित पिंवळा, पिकलेला व दाट असा शेंबड वहातो. नाकांत रक्ताचा विदाह झाला असतां नाकास आंतून व बाहेरून स्पर्श सोसेनासा होतो, एकसारखा कढत उच्छ्वास निघतो व नाक पेटल्यासारखें वाटतें. या रोगास दीप्ति, असें म्हणतात. टाळूच्या मुळाशीं तिन्ही दोष दुष्ट झाले म्हणजे तोंडांतून व नाकांतून जो वायु व शेंबूड येतो त्यास दुर्गंधी येते. या विकारास पूतिनास म्हणतात. त्रिदोषापासून किंवा नाकावर अथवा डोक्यावर आघात झाल्यानें नाकांतून पू व रक्त वहातें त्यास पूयरक्त असें म्हणतात. यांत डोक्याची आग व वेदना होतात. पित्त व कफ यांनीं नाकांत वायु अडकला म्हणजे तो कफास सुकवितो. त्यायोगानें नाकपुड्या कोरड्या होतात या विकारास पुटक असें म्हणतात. नासार्श व नासार्बुद हे पूर्वी सांगितलेल्या अर्श व अर्बुद या विकारांसारखेच असतात. त्यांचे दोष व लक्षणेंहि त्यांच्याप्रमाणेंच समजावीं. सर्व प्रकारच्या नासार्श व नासार्बुदांत उच्छ्वास करण्यास कष्ट पडतात, पडसें येतें, एकसारख्या शिंका येतात, गेंगणा शब्द येतो, तोंडांतून व कानांतून दुर्गंधियुक्त वायु व शेंबूड येतो आणि डोकें दुखतें. या अठरा प्रकारच्या नासारोगांत दुष्ट प्रतिश्याय अथवा दुष्ट पीनस याप्य आहे; बाकीचे साध्य आहेत.

चि कि त्सा.—सर्व प्रकारच्या पडशांत अगोदर निवाऱ्याच्या जागेंत रहावें. स्नेहपान करणें, शेकून घाम काढणें, वमन, धूम्रपान, गुळणे, जड व उबदार कपडे व डोक्यास जाडसें वस्त्र बांधणें हे उपचार करावे. शिंका येण्याकरितां तीक्ष्ण नस्यें ओढावीं. हलकें व रुक्ष अन्न खावें. धूम्रपान करावें. स्नान, शोक, राग, फार निजणें व थंड पाणी हीं वर्ज्य करावीं. दुष्ट पीनसावर क्षयरोग व कृमी यांवरील चिकित्सा करून रोग्याची शक्ति कमी होऊं देऊं नये. पूयरक्त नवीन असतां त्याची मधुर औषधांनीं चिकित्सा करावी आणि जुनें होऊन अतिशय वाढल्यावर नाडीव्रणासारखी चिकित्सा करावी. नासार्श व नासार्बुद यांचा दाह करून सैंधव, मनशील, हरताळ, इत्यादि औषधांची वात करून ती नाकांत घालून ठेवावी.बाकीच्या सर्व नाकाच्या रोगांवर तीक्ष्ण नस्यांचा उपयोग करावा व दोषानुरोधानें इतर चिकित्साहि करावी.

ज्याचें नाक तुटलें असेल तो तरुण असल्यास प्रथम रेचकादिकांनीं शुद्ध करून तुटक्या नाकाएवढा एक पानाचा तुकडा कातरावा. तो तुकडा नाकाजवळ गालावर ठेवून तेवढ्याच आकाराचा त्वचेचा व मांसाचा एका अंगास घर राखून तुकडा काढावा; तो तुकडा एका बाजूस करून गालाचा छेद जुळवून मध्यें कापसाचा बोळा घालून सुईनें टांके मारावे, नंतर नाकाचा छेद खरवडून तो बाजूस केलेला गालाचा तुकडा नाकावर

वळवून घेऊन गालास बंध बांधावा व फार जपून नाक शिवावें. नंतर श्वासोछ्वास चांगला चालण्याकरितां नाकांत दोन नळ्या घालून नाकपुड्या उचलून धराव्या. शिवणीवर हिरवें तेल लावून रक्त बंद करणाऱ्या औषधाचें वस्त्रगाळ चूर्ण वर लावावें व व्रणाचे उपचार करावे. अवस्था पालटल्यास सद्योव्रणावरचे उपचार करावे. व्रण भरून आल्यावर नाकाजवळ वाढलेलें मांस चामड्यासकट कापावें आणि साफ करून शिवावें.नाक कमी म्हणजे बसकट झाल्यास पुन्हां पालिवर्धक तेलांनीं वाढवावें. नाक तुटल्याबरोबर वैद्यास समजल्यास त्यानें लागलाच तो तुकडा वर बसवून बाकी सर्व उपचार व्रणाप्रमाणें करावे.

नस्यः–गळयाच्या वर असलेले विकार नस्यानें ( नाकांत घातलेलें औषध) घालवितां येतात. कारण नाक हें डोक्याचें द्वार आहे म्हणून नाकांत घातलेलें औषध डोक्यांतील दोष काढून टाकितें. या नाकांतून ओढण्याच्या औषधाचे त्याच्या कार्यावरून तीन भेद आहेत. अपस्मार, पडसें, डोकें दुखणें व जड होणें, कृमि, डोळे येणें, इत्यादि विकारांत आंतील दोष बाहेर काढून टाकण्यासाठीं जें नस्य देतात त्यास विरेचन नस्य म्हणतात.

वातिक शूल,आवाज बसणें, सूर्यावर्त रोग इत्यादि विकारांत वायूच्या शांत्यर्थ देतात तें बृंहण नस्य व केशदोष, डोळ्यांचे रोग, नालिका, वांग इत्यादि रोग जाण्याकरितां तेथल्यातेथें दोष जिरून जाण्याकरितां देतात तें शमन नस्य होय. हीं विरेचन, बृंहण आणि शमन अशीं तीनहि प्रकारचीं नस्यें स्नेहाच्या रूपानें ज्यावेळीं घावयाचीं असतात त्यावेळीं त्यः स्नेहाच्या प्रमाणावरून त्यांस मर्श व प्रतिमर्श अशीं नावें देतात. मर्शाची मात्रा प्रतिमर्शापेक्षां तिप्पट अगर चौपट मोठी असते व त्यांत कांहीं चूक झाल्यास अपाय होतो.प्रतिमर्श निरोगी लोकांनीं इंद्रियें तरतरीत रहाण्याकारितां घावयाचा असतो व त्यास पथ्य नसतें. याचें प्रमाण दोन थेंब आहे. तीक्ष्ण औषधें वाटून चटणीच्या अगर चूर्णाच्या रूपानें देऊन विरेचनकार्य ज्यावेळीं करावयाचें असतें त्यावेळीं त्या विरेचननस्याला अवपीड असें म्हणतात. हें चूर्णस्वरूपाचें औषध नळीनें नाकांत फुंकावें म्हणजे पुष्कळ दोष बाहेर निघतात.

नस्य घ्यावयाचें असतां अगोदर डोक्याला स्नेह व स्वेदविधी करावे. नंतर निवांत जागीं उताणें सरळ निजावें, पाय थोडे उंच करून डोकें खालीं करावें; नंतर एक एक नाकपुडी बंद करून औषध ऊन पाण्यांत ऊन करून नळीनें अगर बोळ्यानें नाकांत औषध घालावें. औषध घातल्यावर पाय, हात, खांदे व कान हे चोळावे. जितका वेळ औषध ठेवावयाचें तितका वेळ झाल्यावर हळू हळू कुशीवर होऊन नाकांतील औषध काढून टाकावें. याप्रमाणें दोन तीन वेळ औषध संपेपर्यंत करावें.

नाकांत घातलेल्या तीक्ष्ण औषधांनीं मूर्च्छा आल्यास डोक्यावर थंड पाणी शिंपडावें. विरेचननस्य दिल्यावर स्निग्ध नस्य द्यावेंच. नाकांत औषध घातल्यानंतर दोन मिनिटें उताणें निजावें; नंतर औषध काढून टाकावें व नंतर धूम्रपान करून ऊन पाण्याच्या चुळा मुखशुद्धीकरितां कराव्या. नस्याकरितां नेहमीं उपयोगांत येणारें अणुतैल नांवाचें औषध प्रसिद्ध आहे. यानें डोक्याचे पुष्कळ विकार जातात. नेहमीं नस्य औषधें वापरणाऱ्यांचे खांदे, मान, वक्षस्थल व तोंड हीं घट्ट व उंच आणि त्वचा चांगली असलेलीं होतात. इंद्रियें दृढ होऊन केस लवकर पिकत नाहींत.

**नाग**—हा शब्द मूळचा विशिष्ट लोकांचा वाचक दिसतो. नागकन्या, पुराणांत जिकडे तिकडे चमकलेल्या दिसतात. यादवांचा मूळ पुरुष यदु, याचा नागकन्यांबरोबर विवाह झाला होता. कुशाचा विवाहहि एका नागकन्येबरोबर झाला. असल्या स्थळीं नाग म्हणजे सर्प किंवा तिर्यंच सृष्टींतील प्राणी अशी कल्पना करणें योग्य नाहीं. अर्जुनानें नागकन्या उलुपी हिच्याशीं विवाह केला, कित्येक ऋषींनां नागकन्यांपासून संतति झाली वगैरे उल्लेख महाभारतांत आहेत. खांडववनांत नाग लोक राहत असत. त्यांनां तेथून हांकलल्यामुळें त्यांचा राजा तक्षक हा पांडवांचा शत्रु बनून भारतीय युद्धांत पांडवांविरुद्ध त्यानें कर्णास मदत केली. शिवाय अर्जुनाचा नातु परीक्षित राजा यालाहि तक्षकानें मारलें. त्याचा सूड घेण्याकरितां परीक्षितपुत्र जनमेजय यानें सर्पसत्र केलें म्हणतात. त्यानें सर्व नाग(सर्प)जातीचा संहार सुरू केला त्यावेळीं इंद्राचा आश्रय घेऊन तक्षक वांचला. भगवद्गीतेतील " सर्पाणामस्मि वासुकिः " आणि " अनंतश्चास्मि नागानां " या वचनांवरून नाग व सर्प एकवंशी पण दोन भिन्न जातीचे असावेसें दिसतें. त्यांपैकीं सर्प हे सविष म्हणजे आर्यांनां त्रास देणारे व नाग हे निर्विष म्हणजे त्रास न देणारे असा भेद असावा. वासुकि, तक्षक वगैरे सर्पकुलांतील आणि अनंत, शेष वगैरे नागकुळांतील प्रसिद्ध पुरुष दिसतात. राजतरंगिणींतहि नागकन्या व नाग आहेत. आपल्या धर्मांत जसे नाग येतात, तसेच बौद्धांच्या धर्मांतहि येतात. ललितविस्तरांत व महावंशांतहि नाग नांवाजलेले आहेत. विष्णुपुराणांत व भागवतांत " नऊ नाग " राजे आलेले आहेत. या नाग राजांचीं नाणीं हल्लीं उपलब्ध असून, गणपति नाग हा राजा समुद्रगुप्ताचा समकालीन होता. माळव्याचे गुप्त वंशांतील जे मोठे पराक्रमी राजे शालिवाहन शकाच्या पांचव्या शतकांत होऊन गेले, त्यांच्यामध्यें समुद्रगुप्त हा मूर्धाभिषिक्त होय. या नागांची राजधानी पद्मावती असून, हीस हल्लीं नरवर किंवा नलवाडा म्हणतात. नरवर हें माळव्यांत आहे. काश्मीरचा पहिला राजा नील नांवाचा नाग होता, इतकेंच नाहीं तर शालिवाहनाच्या आठव्या शतकांत जो वंश काश्मीरची गादी उपभोगीत होता, तो वंश एका कर्कोट नांवाच्या नागाचाच समजला जातो. पूर्वेकडील किनाऱ्यावरील निगापट्टण हें मूळचें नागापट्टण म्हणतात.नागांव

किती आहेत, त्यांचा पत्ताच नाहीं. नागपूर हें नांव नागांव-वरून पडलेलें असून रेशीम रंगविण्याचें वगैरे काम करणारी जी जात त्या मुलखांत प्रसिद्ध आहे, तीस नाग शब्द लाविला जातो असें म्हणतात. पूर्वेकडील नाग लोक व त्यांची प्रस्तुत नांवाजलेली मणिपूर राजधानी हीं दोन्हीं, महाभारतांत व पुराणांत अनेक वेळां आलेलीं आहेत. नागोर हेंहि मूळचें नागपूर समजतात. इतक्या जर नागांच्या निशाण्या आज-मितीस कायम आहेत, तर ते तिर्यंच समजण्यापेक्षां आपल्या अफाट मानवी जातीचाच एक पुष्कळ जुनाट व अनेक ठिकाणीं पसरलेला एक पोटभेद मानणें अधिक सयुक्तिक आहे. नाग शब्दाचा विचार करतां हे लोक मूळचे डोंगरी असावे, कारण नग हा शब्द संस्कृतांत 'डोंगरा'चा वाचक आहे.हे लोक मूळचे डोंगरचे किंवा डोंगराळ मुलखांतील रहि-वाशी असून ते जिकडे तिकडे पसरले असावे. जर यांचीं समुद्रांतरीं द्वीपें होतीं, तर जलयानाच्या विषयीं यांचा बराच परिचय पूर्वीच्या काळीं असला पाहिजे. नागांचा लोक "खाली" (पाताल) समजण्याचा संस्कृतांत संप्रदाय आहे. या संप्रदायावरून नाग हे मूळचे दक्षिण दिशेचे रहिवाशी असून,ते पुढें वर हिमालयापर्यंत व काश्मिरापर्यंत पसरले असें म्हणणें भाग पडतें. आज आमच्या देशांतील महारांच्या नावास "नाक" किंवा "नाख" शब्द लाविला जातो. नाक किंवा नाख हें नाग शब्दाचेंच रूपांतर असून,महार हे मूळचे नागां-मधीलच असावेत. [ वि. वि. पुस्तक २३, पान ४९. ]

**नाग जात**—आसामच्या पूर्व टेंकड्यांतून या जातीची वस्ती आहे.यांचे भौगोलिक व भाषाशास्त्रीय वर्गीकरण केल्यास चार पोटजाती पडतील, त्याः—( १ ) नाग बोडो, ( २ ) पश्चिमेकडील नाग, ( ३ ) मध्यभागांतील नाग, आणि ( ४ ) नाग-कुकी. हे सर्व भाषेच्या तिबेटी-ब्रह्मी वंशांतले आहेत. यांची संख्या सुमारें दोन लाख आहे. या लोकांची ओळख त्यांच्या उंचीवरून, त्यांच्या पोशाखांवरून व त्यांच्या शस्त्रास्त्रांवरून होते. यांचा रंग तपकिरी असतो. नाक बहुतेक चपटेंच असतें. यांचे डोळे घारे असतात. यांची दाढी फारशी वाढत नाहीं.

बायका पुरुषांपेक्षां फार ठेंगण्या असतात. पण पुरुषांस सुद्धां लाजविण्याइतकी त्यांच्या स्नायूंची वाढ झालेली असते. मूल होईपर्यंत त्या मोहक दिसतात. पुढें म्हाताऱ्या दिसूं लागतात. हे लोक स्वभावतः आनंदी स्वभावाचे आहेत. यांच्या उत्पत्तीच्या अनेक दंतकथा आहेत. यांच्या दंत-कथांवरून हे लोक मणिपूरचेच मूळ राहणारे नसावेत असें दिसतें. हे लोक शेतीची जमीन पाळीपाळीनें बदलीत अस-तात व शकुन पाहून लागवड करण्याची दिशा ठरवितात. डोंग-राच्या उतारावर निरनिराळ्या रुंद पायऱ्या करून त्यावर पाटबंधारे घालून फार लांबून पाणी आणून शेती करतात. प्रत्येक टोळीचीं निरनिराळीं पण ठरीव शेतें असतात. घरां-तील राहणी, शेतकी व विणकाम आणि शिकार यांच्या अनुरोधानें वसविलेली आहे. यांच्या घरांतील पुढल्या भागांत आगटीभोंवतीं बसण्याकरितां लांब फळया घालून चौथरे केलेले असतात. लहान मुलें घराच्या मागच्या भागांत राहतात. बायका हुक्के ओढतात व पुरुष त्या हुक्क्यांतलें पाणी फार आवडीनें पितात.

यांचें मुख्य खाणें तांदूळ असून मांजर सोडून सर्व प्राणी हे खातात. कुत्र्यास प्रथम उपाशीं ठेवून त्यास भात खाऊं घालतात. त्यानें पोटभर भात खाल्ला म्हणजे तो झोंपतो. लागलीच त्याचें डोकें फोडून त्याचा पाय एका काठीस बांधून त्यास थोडा वेळ भाजतात. नंतर त्याचें पोट चिरून त्यांतील भात खातात.

यांच्या करमणुकीचे अनेक प्रकारचे खेळ निरनिराळ्या जातींतून असतात. नृत्य करणें यांस फार आवडतें. यांच्यांत नृत्यांचे अनेक प्रकार आहेत. हूंसेंगे, टुनांगालोम्ना, हेग्नांग-टूना, टिंकूमज्नीना टनग्गा लामे, ग्नानलाम, हीं नृत्य-प्रकारांचीं नांवें आहेत. एक कुटुंब हेंच यांच्या समाजाचें घटक आहे. घरांत फक्त नवराबायको राहतात. त्यांचीं अविवाहित मुलें निराळ्या घरांत राहतात, व हीं मुलें गांवांतील राखून ठेवलेल्या एका खोलींत एकत्र निजतात. यांच्या समाजांत सर्वांत वडील पुरुषांची संतति कुटुंब बनते. कुटुंबांतलि मुख्यासच घरांतलीं सर्व धर्मकृत्यें चालवावीं लागतात व कुलदेवतेची पूजाहि करावी लागते. मुलाचें लग्न झालें कीं पूर्वीचें कुटुंब मोडून नवी दोन कुटुंबें बनतात. यांच्यांतील टोळ्यांचें महत्त्व लग्नें जुळवितांना दृष्टीस पडतें. मुलगी नेहमीं बाहेरच्या टोळींतलीच असली पाहिजे. लग्नापूर्वी मुलीनें कोणाबरोबर जरी संयोग केला तरी त्याबद्दल कोणतीच हरकत नाहीं पण लग्न झाल्यावर तिला फार कडक पातिव्र-त्यानें राहणें भाग पडतें. याचें मुख्य कारण विवाह झाल्या-बरोबर स्त्रियांस समाजांत महत्त्वाचा दर्जा प्राप्त होतो.

तरुण मुली व मुलगे स्वतःच आपसांत लग्नें जुळवितात.पण बहुधा एखाद्या वृद्ध मध्यस्थाकडूनहि जुळविण्याची चाल आहे. मुलींचा हुंडा द्यावा लागतो. हा हुंडा पैशाच्या ऐवजीं धान्याच्या रूपांत किंवा कपड्याच्या रूपांत देतात. बायको मेली तर नवऱ्यापासूनच तिचा बाप मुंडू किंवा मांडू नांवाचा दंड घेतो. हा दंड तिच्या हाडांची किंमत समजतात. कधीं कधीं बायको विकली तर तिचा मुंडू तिच्या विकत घेणारा-कडून घेतात. बायको माहेरीं मेली तर मुंडू मिळत नाहीं. कारण तिचीं हाडें माहेरच्याच माणसांच्या ताब्यांत असतात.

वडील मुलाचें लग्न झालें कीं, आईबापांनीं घर सोडून आपलीं इतर मुलें व नातलग घेऊन दुसऱ्या घरांत रहाव-यास गेलें पाहिजे व लग्न करणाऱ्या मुलास आपल्या शेताचा दोनतृतीयांश हिस्सा दिला पाहिजे. अशा प्रकारें निराळें झाल्यानंतर पुन्हां एका मुलाचें लग्न केलें कीं पुन्हां घर सोडून गेलें पाहिजे. शेवटीं वडील मुलाच्या घरांत राहण्यास आई-बाप येतात. मुलाचें लग्न झालें कीं बापाचा दर्जा कमी झाला.

मुलांच्या लग्नापूर्वीच बाप मेला तर वडील मुलास इतर भावांपेक्षां दुप्पट हिस्सा मिळतो. जंगम संपत्तीचे मात्र सारखे वांटे होतात. कोठें कोठें वडील मुलाच्या वांटयावर धाकटया भावांनां पोसण्याचा बोजा लादण्यांत येतो. मुलींस व विधवांस फक्त अन्नवस्त्र मिळतें. त्यांचा स्थावर संपत्तीवर मुळींच हक्क नसतो. मुलें नसलींच तर मयताच्या भावांकडे स्थावर संपत्ति जाते व जंगम माल बायकांत वांटून टाकतात.

या लोकांत खून म्हणून होत नाहींत असें म्हटलें तरी चालेल. पुरुषाला व्यभिचाराबद्दल पूर्वी देहांतशिक्षा मिळे. आतां स्त्रियांच्या लग्नांत दिलेलें शुल्क दंड म्हणून त्यांच्याकडून घेतात. कोठें गाईचा दंड करतात, कोठें गांवांतून हद्दपार करतात. तर कोठें व्यभिचारिणीच्या आईबापांकडून तिच्या लग्नांतलें शुल्क परत देवावितात.

पूर्वी चोरीबद्दल देहांतशिक्षा करीत. पण आतां चोरी हा साधारण गुन्हा समजतात. विवाहित गुन्हेगारास मात्र जास्त शिक्षा देतात. कर्ज काढलें तर त्याचें व्याज एक वर्षानंतर सुरू होतें. यांच्यांत दिव्यें करण्याचीहि चाल आहे.

इंग्रजी अम्मल सुरू होण्यापूर्वी नेहमीं गांवागांवांत युद्धें होत. अजून सुद्धां युद्धाचा पुकारा एका गांवांतून दुसऱ्या गांवांत पाठवितात. शत्रुपक्षाचा सूड पूर्ण घेतला नसला तर त्यांच्याकडील माणसांचीं डोकीं तरी जमा करून ठेवावीं व तीं गांवाबाहेर झाडांवर ठेवावीं; शत्रूचीं सख्य झालें म्हणजे एकमेकांनीं जमविलेलीं डोकीं परत करावीं अशी चाल आहे.

धरणीकंप करणाऱ्या देवानेंच सृष्टि निर्माण केली असावी अशी यांची समजूत आहे. हे लोक आकाशास पुरुष व पृथ्वीस स्त्री व धरणीकंप हें यांचें मैथुन असें समजतात. मृत्यु म्हणजे देहाला 'कोणी तरी' सोडून जाणें. हें सोडून जाणारें 'कोणी तरी' कधीं कधीं फुलपाखरूं तर कधीं कधीं मधमाशी असें समजतात. मृत्यूनंतर मृताचा आत्मा किंवा लिंगशरीर सिरोही फुरारच्या शिखरावरून स्वर्गास जातें. तेथील दार नेहमीं लागलेलें आढळतें. एखादें लठ्ठ शरीर आल्याखेरीज तें दार उघडत नाहीं. म्हणून श्रीमंत माणूस मेला तर रेडा बळी देतात. कारण रेड्याचा लिंगदेह स्वर्गद्वाराला धक्का देऊन दार उघडतो. [ आसाम सेन्सस रिपोर्ट, १८९१, १९११; मॅक्कुल्लो–मणिपूर अँड दि हिल ट्राइब्स; हॉडसन–दि नाग ट्राइब्स ऑफ मणिपूर; ग्रीयर्सन–लिंग्विस्टिक सर्वे ऑफ इंडिया, पु. ४; रसेल व हिरालाल. ]

**नाग टेंकड्या** ( नागाहिल्स )—आसाममधील एक जिल्हा. क्षेत्रफळ ३०७० चौरस मैल. उत्तरेस नौगांग व शिवसागर; पश्चिमेस उत्तर कचहार पहाड; दक्षिणेस मणिपूर संस्थान; पूर्वेस दिखो व तिझु या नद्या. हा जिल्हा पर्वतांनीं व्यापिलेला असून पर्वतांवर दाट झाडी आहे व दऱ्या फार खोल आहेत. यांतील सर्वांत उंच शिखर कोहिमा हें १०००० फूट उंच आहे. यांतील सर्वांत मोठी नदी दोयांग ही होय, पण हिच्यांत बोटी फारशा चालत नाहींत. येथील हवा थंड असून पावसाळ्यांत दऱ्याखोऱ्यांतील प्रदेशांत हिंवतापाचा उपद्रव असतो. पाऊस ७६ ते १०० इंच पडतो.

इ ति हा स.—नागांची पूर्व माहिती फारच थोडी आहे. १७ व्या शतकाच्या उत्तरार्धांत टॅव्हरनियर हे लोक टोप्यांनां डुकरांचे सुळे लावतात व फार कमी वस्त्रें उपयोगांत आणतात, असें वर्णन करतो. अहोम राजांच्या वेळेस हे मैदानांत येऊन कधीं कधीं स्वाऱ्या करीत पण बलाढ्य राजे यांनां थोपवून धरीत. इ. स. १८३२ त जेंकिन्स व पेंबरटन हे इंग्रज प्रथमच येथें गेले व ब्रिटिशांच्या पूर्व अंमलांत येथील लोकांशीं त्यांनां सतत लढावें लागे. १८३२ ते १८५१ पर्यंत ब्रिटिशांनीं येथें १० स्वाऱ्या केल्या. यांतील शेवटच्या लढाईनंतर ब्रिटिश सरकारनें या पहाडी लोकांशीं कांहींहि संबंध ठेवूं नये असें ठरविलें. परंतु हाहि उपाय चालेना. पुन्हां १८५३–१८६५ पर्यंत १९ स्वाऱ्या झाल्या. नंतर सरकारनें इ. स. १८६६ त याचा जिल्हा बनवून सामगुतिंग हें मुख्य शहर बनविलें. इ. स. १८७८ त अंगामी प्रदेशांतील मध्यवर्ती स्थळ कोहिमा येथें राजधानी बदलण्याचें ठरलें. यानंतर नाग लोकांवर स्वाऱ्या होतच होत्या. इ. स. १८९८ त मीकीर व रंगमा हे पर्वत नौगांग व शिवसागरला जोडले गेले. इ. स. १९०४ त कांहीं भाग या जिल्ह्याला जोडला जाऊन तिझु नदीच्या पलीकडे मर्यादा नेली.

लोकसंख्या ( १९२१ ) १६०९६०. कोहिमा हेंच एक व मुख्य शहर असून खेडीं २९२ आहेत. नाग लोक यांचा कल कोणत्याहि धर्माकडे नाहीं; हे स्वच्छंदी लोक आहेत ( नाग लोकांची माहिती स्वतंत्र दिली आहे ). अंगामी, चुंगली व ल्होता या यांच्या भाषा आहेत. अंगामी, औस, ल्होता व सेमा ह्या नागापोट जातींचे लोकहि येथें आहेत.

शे त की.—येथें झूम नांवाची शेतकीपद्धति प्रचारांत आहे. जंगल कापून व नंतर त्याला आग लावून त्यानंतर पेरणी करतात. तांदूळ, मका, मिरच्या, कापूस, हीं येथील मुख्य पिकें आहेत. २ वर्षें पेरणी झाल्यानंतर ८ ते ९ वर्षें शेतें पडित ठेवितात. अंगामी नागांची शेतीपद्धति चांगली असून ते कालव्यांचाहि उपयोग करतात. येथील गुरें खाण्याला उपयोगी पडत असल्यामुळें जरा लठ्ठ असतात. पण गाईचें दूध काढीत नाहींत. येथें पूर्वी दाट जंगल होतें पण झूम शेतपद्धतीनें जंगलाचा बराच नाश झाला.

व्या पा र.—स्थानिक उपयोगास लागणाऱ्या जिनसा येथें तयार केल्या जातात. सर्वांत मुख्य धंदा म्हटला म्हणजे जाडेभरडे कापड तयार करणें. लोखंडी भाले व इतर युद्धशस्त्रेंहि तयार करतात. आयात माल मीठ, सूत, मातीचें तेल व लोखंड. व्यापारी ठाणीं खोनोमा, मोझेमा, लोझेमा, हीं आहेत. अंगामी व खेमी, हे लोक कधीं रंगून, कलकत्ता, व क्वचित् प्रसंगीं मुंबईलाहि व्यापारासाठीं जातात.

रा ज्य व्य व स्था.—जिल्ह्याचे कोहिमा व मोकोकचुंग असे दोन पोटविभाग केले आहेत. यावर डेप्युटी कमिशनर

असतो, तो कोहिमा येथें राहतो व याला एक युरोपियन असिस्टंट मदत करतो. येथें क्रिमिनल किंवा सिव्हिल प्रोसीजरपैकीं कोणताहि कायदा अंमलांत नाहीं. डेप्युटि कमिशनरला चीफ कमिशनरच्या संमतीनें देहांतशिक्षा देण्याचा अधिकार आहे. बरेच खटले खेड्यांतच आपसांत मिटतात. येथें जमिनीवर कर नाहींत. घरामागें मात्र अंगामींनां ३,नागांनां २ व परदेशीयांनां ५रुपये कायद्याबद्दल द्यावे लागतात. येथील शिक्षण फार मागासलेलें आहे.

**नागपंथ**—बहुनकरून संस्कृत नग्नक व हिंदी नग्न या शब्दांवरून या लोकांस हें नांव मिळालें असावें. शैव, वैष्णव व शीख या तिन्ही पंथांत नाग असा पोटपंथ आहे. पूर्वी हे लोक सशस्त्र टोळयाटोळयांनीं लुटालूट करीत हिंडत असत. शैवनाग व वैष्णवनाग यांच्या आपापसांत मारामाऱ्या होत. सं. १७६० मध्यें हरिद्वार येथें एक अशीच मोठी मारामारी झाली होती, तींत वैष्णवनागांपैकीं १८००० लोक मरण पावले असें म्हणतात. स. १७७८ मध्यें बंगालकडून मुंबईकडे कर्नल गॉडर्ट येत असतां त्यावर शैव नागांनीं हल्ला केला होता. ब्रिटिश अमदानींत यांचा बराच बंदोबस्त झाला. जयपूर संस्थानांत पायदळी लष्करांत सुमारें ५०० नाग लोक आहेत. हे फक्त लंगोट नेसतात. त्याशिवाय यांच्या अंगावर वस्त्र नसतें.

**नागपूर ( कोंकणांतील )**—शिलाहार राजा अंनतदेव याच्या ताम्रपत्रांत नागपूर नांवाच्या एका बंदराचा उल्लेख आहे. याचा भोंसल्याच्या नागपुराशीं कांहीं संबंध नसून अलिबागजवळ कोंकणांत नागांव नांवाचें एक खेडें आहे, तेंच हें नागपूर असलें पाहिजे. नागांव हें नाग-गांवाचा अपभ्रंश आहे. स्कन्दपुराणांतील सह्याद्री-माहात्म्यांत देखील सह्याद्रीच्या पश्चिमेस कोंकणांत अघाशी नदीच्या कांठीं समुद्रकिनाऱ्याजवळ एक नागपूर गांव असल्याचें वर्णन आहे. आधुनिक नागांव, समुद्र व ओढा यांच्यामध्यें आहे. या ओढ्यास त्याच्या किनाऱ्यावर असलेल्या अक्षी नांवाच्या एका गांवावरून कधीं कधीं अक्षि ( अघाशी ) असेंहि म्हणतात, असें शोधाअंतीं कळलें आहे. त्याच्या आसपास सांपडलेल्या शिलालेखांवरून तें प्राचीन काळीं बंदर असलें पाहिजे असें दिसून येतें. ( इं. अँ. पु २४,पृ. ८३. )

**नागपूर, जिल्हा.**—मध्यप्रांतांतील नागपूर पोटविभागांतलि एक जिल्हा. उत्तर अक्षांश २०°३५' ते २१°४४' व पूर्व रेखांश ७८° १५' ते ७९°४०'. क्षेत्रफळ ३८४० चौरस मैल. मर्यादाः—उत्तरेस छिंदवाडा व सिवनी, पूर्वेस भंडारा, दक्षिणेस चांदा व पश्चिमेस वर्धा. यांतील जमीन उंचसखल असून लहान लहान टेंकडया आहेत. यांत सातपुडयाच्या अंबागड टेंकडया असून त्यांवर प्रसिद्ध रामटेकचें देवालय आहे. पिलकापार नांवाचा पहाड काटोल तहशिलींत दक्षिणोत्तर पसरला आहे. नागपुरांतील सीताबर्डीसारख्या स्वतंत्र व लहान अशा बऱ्याच टेंकडया आहेत. यांत वैनगंगा, वर्धा, कन्हान व पेंच या नद्या आहेत. येथें शेतकी मोठया प्रमाणांत आहे. मुख्यत्वेंकरून आंबे फार होतात. यांत बहुतेक रेतीचा दगड असून क्वचित त्यांत थर असणाऱ्या दगडाचें व चुन्याच्या दगडाचें मिश्रण असतें.

दाट असें जंगल फक्त वायव्येकडे सातपुडयावर आहे. बाकी लहान लहान जंगलें नैर्ऋत्येकडे आढळतात. यांत साग, अचार, तेंडू, सालई व मोह हीं झाडें मुख्यत्वेंकरून आढळतात. यांत जंगली जनावरें फार कमी व शिकारीच्या दृष्टीनें हा सर्वांत निकृष्ट जिल्हा आहे. नागपूर हें उन्हाळ्यांत हिंदुस्थानांतील सर्वांत उष्ण ठिकाणांपैकीं एक आहे. मे महिन्यांत ११६° पर्यंत उष्णता वाढते व निरभ्र रात्रीं ७०°पर्यंत उतरते. हिंवाळ्यांत ५०° पर्यंत रात्रीं उष्णतेचें मान उतरतें. उन्हाळ्याचे ३ महिने सोडून मग नागपूरची हवा बरी असते. येथें सरासरी ४६ इंच पाऊस पडतो. पूर्व भागापेक्षां पश्चिम भागांत पाऊस कमी पडतो.

इतिहासः—इ. स. १८ व्या शतकाच्या सुरुवातींत छिंदवाडा येथील देवगढच्या गोंड राजाचें येथें राज्य होतें. बख्त बुलंद या राजानें दिल्लीची सुधारणा पाहून तशी येथें घडवून आणण्यासाठीं शेतकरी वगैरे लोकांनां सखल प्रांतांत राहण्याला बोलावून नागपूर हें शहर वसविलें. त्याच्या मुलानें ( चांद सुलतान ) नागपूर येथें राजधानी आणली. चांदच्या मरणानंतर भाऊबंदकीमुळें त्याच्या बायकोनें भोंसले यांची मदत मागितली व भोसल्यांनीं ती दिली. मात्र त्यामुळें राजा बुऱ्हाणशहा हा नांवाचाच राजा बनून खरी सत्ता मराठ्यांकडे गेली. भोंसल्यांच्या दरबारीं इ.स.१७९९ पासून इंग्रजी तैनाती फौज होती. देवगांवच्या तहानें भोसल्याचें ½ राज्य इंग्रजांनीं घेतलें व सीताबर्डीच्या लढाईनंतर बाकीचा वऱ्हाड व नर्मदा प्रदेश घेतला. १८५७ च्या बंडांत रघूजी ( ३ रा ) याची बायको बांकाबाई हिनें इंग्रजांतर्फे बरीच कामगिरी केली. ( जास्त इतिहासाकरितां ' नागपूरकर भोंसले ' पहा. ).

येथें कधीं कधीं जुन्या वस्तू सांपडतात; जसें जुनीं भांडीं, लोखंडी शस्त्रें, वगैरे. रामटेक, सावनेर व भिवगड येथील पेंच नदीवरील गोंडी किल्ला हीं प्राचीन ठिकाणें पहाण्यासारखीं आहेत. स. १९२१ त जिल्ह्याची लोकसंख्या ७९९५२१ होती. यांत १२ शहरें व १६८१ खेडीं आहेत. मुख्य भाषा मराठी, हिंदी, गोंडी, उर्दू व तेलगु या आहेत.

शेतकीः—येथील जमीन काळी आहे. ज्वारी, कापूस, गहूं, तीळ, जवस, हरभरा हीं मुख्य पिकें होत. पश्चिमेकडे कापूस व ज्वारी, पूर्वेकडे तांदूळ व दक्षिण भागांत गहूं, तीळ वगैरे उत्पन्न होतात. इतर फळ व भाजीपाल्याचें उत्पन्न म्हणजे संत्रीं मिरच्या, एरंडी, तंबाखू, चिंच वगैरे. रामटेकचीं पानें ( विडयाचीं ) प्रसिद्ध आहेत. येथें कपूरी व बंगाली पानेंहि होतात.

येथें सरकारी जंगल ५१५ चौरस मैल आहे. पैकीं ३५० चौरस मैल पेंच नदीच्या दोन्ही कांठावर आहे. बंगलच्या

करावें उत्पन्न चांगलें आहे. या जिल्ह्यांत मँगेनीझ सांपडतें. थारड्याहून वाडेगांव व मंद्री येथें मुद्दाम आगगाडी नेली आहे. मनसर, कांद्री, सतफ, लोहडोंगरी, वाडेगांव, कचूरवाही, मंद्री, पाली वगैरे ठिकाणीं खाणी आहेत.

व्यापारः—नागपूर व उमरे हीं रेशीमकांठी ( धोतरें, उपरणीं, पातळें वगैरे) कपडाकरितां प्रसिद्ध आहेत.वऱ्हाणपूरचा कलाबतूहि कांठांत उपयोगांत आणितात. इतर धोतरजोडे व साधीं लुगडींहि तयार होतात. कारठी येथें मोमिन ( मुसुलमान ) व खाचा येथें कोष्टी हलके कापड तयार करतात. नागपूर व केलवद येथें पितळकाम होत असून अडकित्ते व चाकू नागपूर येथें होतात. नागपुरांत कापडाच्या गिरण्या, जिन व प्रेस हे कारखाने तसेंच कामठी, सावनेर येथेंहि कांहीं जिन व प्रेस आहेत. येथून कापूस, जवस, तीळ, गहूं तसेंच संत्रीं, बोरें, विड्याचीं पानें इतर भागांत जातात. भंडारा व छत्तिसगढमधून तांदूळ व चांदा, भंडारा व सिवनी येथून बांबू प्रथम नागपूरला येऊन नंतर बाहेरगांवीं जातो. आयात—समुद्रमीठ व खनिजमीठ, ( पंजाब व मुंबई ), मोरस साखर, गूळ (संयुक्तप्रांत, वार्शी, सोलापूर), विलायती कापड, लोंकरी व लोखंडी सामान ( इंग्लंड ). कामठी येथें मोठा आठवड्याचा बाजार भरतो; नागपूरचे रविवार व बुधवारचे बाजारहि प्रसिद्ध आहेत. रामटेक येथें नोव्हेंबरांत यात्रा भरते. अंभोरा, बुढारी, अदासा व धापेवाडा येथें लहान लहान जत्रा भरतात. जिल्ह्याचा कारभार इतर जिल्ह्यांप्रमाणेंच चालतो. स. १८६२-६४ त जमिनीची पाहणी होऊन जमिनी ३० वर्षांच्या धाऱ्यानें दिल्या गेल्या. नागपूर, रामटेक, खापा, कलमेश्वर, उमरेट, मोंवार व सावनेर येथें म्युनिसिपालिटया आहेत. येथें शेंकडा ५ लोक साक्षर असून शिक्षणांत या जिल्ह्याचा नंबर प्रांतांत तिसरा लागतो.

त ह शी ल.—या जिल्ह्यांतील एक तहशील.हिच्या उत्तरेस कोइलर नदी व कन्हाल नदी; दक्षिणेस व पूर्वेस उमरेट तहशील व वुनानदी; पश्चिमेस काटोल तहशील. क्षेत्रफळ ८१० चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १६०६९५. तहशिलींतील मोठीं गांवें नागपूर, कामटी, सावनेर, कलमेश्वर हीं आहेत. येथें जमीन सर्व प्रकारची आहे. रब्बी पीक कमी कमी होत असून त्याजागीं लोक कापसाची पेरणी करूं लागले आहेत. तहशिलीचे धारावसुलीकरितां ९ भाग केले आहेत. नागपूर, मेथीबाग, कामठी, खापी, बोरी आणि बोरखेडी हीं या तहशिलींत रेल्वे स्टेशनें आहेत. नागपूर, सावनेर आणि कलमेश्वर येथें म्युनिसिपालिटी असून कामठी येथें लष्कर आहे. नागपूर, बोरी, कलमेश्वर, कामठी आणि सावनेर या ठिकाणीं पोलिस ठाणीं आहेत.

श ह र.—मध्यप्रांत, वऱ्हाड व नागपूर भाग व जिल्हा यांचें नागपूर हें राजधानीचें शहर आहे. उत्तर अंक्षांश २१° ९' आणि पूर्व रेखांश ७९°७'. हें शहर मुंबईहून ५२० मैल व कलकत्त्याहून ७०१ मैल आहे. हें जी. आय. पी. रेल्वे व बी एन्. रेल्वेचें स्टेशन आहे. सातपुडा डोंगर उत्तरेकडे २५ मैलांवर असून शहर नागनदीतीरीं साधारण सपाट प्रदेशावर वसलेलें आहे. या नदीच्या नांवावरून नागपूर असें नांव या शहरास मिळालें आहे. शहर व सरकारी ठाणें या दोन्ही मिळून क्षेत्रफळ सारखें वाढत असून १९०८ सालीं तें १० चौरस मैल झालें. प्रथमतः गोंड राजांच्या प्राचीन किल्ल्याभोंवतीं हा गांव वसलेला होता. सुमारें शंभर वर्षांपूर्वी येथील सुपीक प्रदेशावर इतस्ततः कांहीं झोंपड्या होत्या. परंतु हल्लीं तें मोठें शहर झालें असून आणखी वाढत आहे. लोकसंख्या (१९११) १४५१९३. येथें हिंदु, मुसुलमान, ख्रिस्ती, पारशी वगैरे सर्व जातींची वस्ती आहे. परंतु, कापसाच्या गिरण्या व मँगेनीज धातु यांच्या खाणी इकडे सुरू झाल्यामुळें पारशी लोकसंख्या मात्र वाढूं लागली आहे. तसेंच वऱ्हाड व मध्यप्रांत हे एक केल्यामुळें यूरोपियन व यूरेशियन यांचीहि लोकसंख्या वाढली आहे.

इतिहासः—हल्लींचें शहर अठराव्या शतकाच्या आरंभीं गोंडराजा बखत बुलंद यानें वसविलें. नंतर तें भोंसल्यांची राजधानी झालें. १७६५ सालीं हें शहर लुटून जाळलें होतें. तसेंच १८११ सालीं पेंढाऱ्यांनीं याचा कांहीं भाग जाळला होता. परंतु भोंसल्यांच्या अमदानींत या शहराची भरभराट झाली. १८१७ सालीं सीताबर्डी व नागपूर येथील लढाया या शहरानें पाहिल्या. याच लढायांनीं ब्रिटिशांचें वजन या प्रदेशावर बसलें. १८५३ सालीं सर्व देश ब्रिटिश अंमलाखालीं गेला व १८६१ सालीं हें शहर मध्यप्रांताची राजधानी झालें. बंडाच्या वेळीं इकडे थोडीशी धामधूम झाली होती. परंतु लवकरच ती दवली. तसेंच १८९६ सालीं जो दुष्काळ पडला त्याच्या आरंभीं एक दंगा झाला होता. तसाच १८९९ सालीं प्लेगच्या प्रतिकारार्थ जे उपाय योजले गेले त्यांविरुद्ध एक दंगा झाला होता. परंतु तो लवकरच मोडला. ब्रिटिश अंमलाखालीं हा गांव आल्यावर जी. आय. पी. रेल्वे १८६७ त आली त्यावेळेपासून याची जास्त भरभराट झाली. आणि जरी कांहीं मोठे दुष्काळ आले व प्लेगहि जरी पुष्कळ वेळां येऊन कित्येक लोकांचा संहार झाला, तरी कापसाचा व्यापार मोठ्या प्रमाणावर वाढत असल्यामुळें लोकसंख्येचें प्रमाण वाढतच आहे.

नागपूर शहराचे स्वाभाविक असे दोन भाग पडतात. (१) सीताबर्डी किल्ल्याच्या पूर्वेस आणि दक्षिणेस असलेलें नागपूर शहर आणि (२) पश्चिमेस व उत्तरेस असलेलें सरकारी ठाणें. येथील जुम्मा तलाव हा चौकोनी व मोठा असून तो भोंसल्यांनीं बांधलेला आहे. तलावाच्या उत्तर दक्षिण तीरांवर एंप्रेस मिल्स आहेत. अलीकडे बांधलेला एक लहानसा राजवाडा व टाउन हॉल शहराच्या मध्यभागीं आहेत. टाउन हॉलच्या पलीकडे गोंड राजांचा जुना किल्ला व राजवाडा आहे. हल्लीं तो जरा मोडकळीस आलेला आहे. दक्षिणेस सकरदरा बाग असून तेथें हल्लीं देवारचे भोंसले

राजे राहतात. येथील पशुपक्षिसंग्रहालय पहाण्यासारखें आहे. शहरांतील मुख्य रस्ता म्हणजे हंसापुरी रस्ता होय. यावरच तहशिली कचेऱ्या असून, आदितवारचा बाजार येथेंच भरतो. हा बाजार लहान असून अपुरा आहे. पन्नास वर्षांपूर्वी नागपूर शहराची वस्ती अगदीं गचाळ होती. चांगले व रुंद रस्ते मुळींच नसून अरुंद गल्ल्या आणि मातीचे कच्चे रस्ते होते. परंतु अलीकडे दरवर्षी नवीन नवीन रस्ते होत आहेत. हें शहर दिसण्यांत मुळींच सुंदर नाहीं; तथापि उंच भागावरून या शहराकडे पाहिलें असतां सीतावर्डी टेंकडी जुम्मा तलावाला शोभा देत असून, झाडींनें शहरांतील सर्व अरुंद रस्ते व घाण झांकून टाकलेली दिसते. फक्त गिरण्यांच्या व कारखान्यांच्या चिमण्या वर डोकीं काढून येथें गांव आहे इतकें दाखवितात. सीतावर्डीच्या उत्तरेकडील अगदीं एकीकडच्या टेंकडीवर हल्लींचें सरकारचें राहण्याचें ठिकाण १८९१ सालीं बांधलें. याच्या पलीकडे रोमन कॅथालिक सेमिनरी ( पुरण्याची जागा ) आणि त्यांचीच एक उंच व भक्कम इमारत आहे. या टेंकडीच्या पायथ्याजवळ सपाट मैदान असून त्यांत रुंद रस्ते व क्रिकेट, फुटबॉल, पोलो, शर्यतींचीं आणि गोल्फ खेळण्याचीं मोठमोठीं मैदानें आहेत. जुन्या सरकारी ठाण्यांत रोमन कॅथोलिक कॅथेड्रल ( प्रार्थनामंदिर ), दि इंग्लिश चर्च, सर्वसंग्रहालय, क्लब हाऊस आणि न्यू व्हिक्टोरिया इन्स्टिटयूट आहेत. नव्या भागांत सेक्रेटेरिएट, पोस्ट ऑफिस वगैरे नव्या नव्या सरकारी इमारती आहेत. तेलंगखेडी तलावाजवळ मध्यप्रांत क्लबची इमारत आहे. १८६४ सालीं नागपुरास प्रथम म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. व १८८४ सालीं सरकारी ठाण्याकरितां एक अगदीं निराळ्या कमिटीची स्थापना झाली. हल्लीं म्युनिसिपालिटीचें उत्पन्न ४.१५ लाख रुपये असून तें जेमतेम खर्चास पुरतें. येथें कर अतिशय कमी आहेत.

नागपूरचीं संत्रीं सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहेत. पूर्वी येथें हातविणकाम फार चालत असे. हल्लीं गिरण्यांचें कापड बाजारांत जरी आलें आहे तरी ५००० वर हातमाग नागपूरमध्यें काम करीत असून पुष्कळ सूत काढण्याचे व रंग देण्याचे कारखाने आहेत. येथें कापसाचा व्यापार फार मोठा असून त्यामुळेंच नागपुरास व्यापारी महत्त्व आलें आहे. दि एंप्रेस मिल, स्वदेशी मिल या गिरण्या व सरकी काढण्याचे आणि रुई दाबण्याचे कारखाने पुष्कळ आहेत. मँगेनीज धातु खाणींतून निघाल्यापासून नागपूरचा व्यापार आणखी वाढला आहे. येथें बरेच छापखाने आहेत. येथें दुसऱ्या व्यापाराचीहि पुष्कळ वाढ झाली आहे. इमारती लांकूड, सरपण, रॉकेल, बाहेरून येणारें कापड, चामड्याचें सामान, खाण्याचे जिन्नस, तंबाखू, सोडावॉटर, बर्फ इत्यादिकांचा व्यापार फार वाढला आहे. विटांचे कारखानेहि पुष्कळ आहेत.

नागपूर हें मध्यप्रांत आणि वऱ्हाड यांचें राजकीय दृष्टीनें मुख्य ठिकाण आहे. येथें तुरुंग, वेड्यांचें व महारोग्यांचें इस्पितळ आहे. तुरुंगांतच सरकारी छापखाना आहे. सर्व सरकारी छपाईकाम येथेंच होतें.तुरुंगांत सत्रंज्या व वेतांचीं कामें होतात. सरकारी ठाण्याजवळच सरकारी खात्याचें एक मोठें प्रयोगक्षेत्र आहे. तीन चार बागा आहेत. नागपूर येथें दोन कॉलेजें ( हिस्लॉप आणि मॉरिस ) आहेत. व्हिक्टोरिया टेक्निकल इन्स्टिटयूटमध्यें शास्त्रीय व औद्योगिक विषय शिकविण्याची सोय आहे.जवळच शेतकी कॉलेज आहे.खासगी व सरकारी शाळा येथें पुष्कळ आहेत. १९२३ सालीं पास झालेल्या कायद्यान्वयें नागपूर विश्वविद्यालयाची स्थापना झालेली आहे. येथें तीन इस्पितळें आहेत.

**नागपूरकर भोंसले**---हे आपल्यास उदेपूरकर राण्याचे वंशज म्हणवितात. मुसुलमानींत हे खालीं दख्खनमध्यें आले. हे प्रथम निजामशाहींत नौकर होते व त्यांनां उमरावती व भाम गांवें इनाम होतीं. यांचा मूळ पुरुष मुधोजी व त्याचा भाऊ रुपाजी यांनीं पुणें जिल्ह्यांतील मौजे हिंगणी तर्फ पाटस येथील पाटिलकी खरेदी केली. हे दोघे थोरल्या शिवछत्रपतीच्या हाताखालीं फौजेंत होते. मुधोजीस ७ पुत्र होते; रुपाजीस संतति नव्हती; सात भावांपैकीं परसोजी व साबाजी हे बापाच्या म्हातारपणीं सरकारचाकरी करीत.

**प र सो जी**.---संभाजीला गादीवर न बसविण्याच्या कटांत परसोजीहि असावा. कारण, संभाजी रायगडास आल्यावर परसोजी तेथून निसटून खानदेशांत निघून गेला. संभाजीच्या नंतर राजारामाच्यावेळीं मुसुलमानांनां त्रास देण्याच्या व मुलुख काबीज करण्याच्या कामीं इतर सरदारांप्रमाणें परसोजीनेंहि भाग घेऊन गोंडवण व वऱ्हाड प्रांतांत अंमल बसविला. त्याबद्दल राजारामानें सेनासाहेबसुभा हें एक नवीन पद ( सेनापतीप्रमाणें वस्त्रें, अलंकार, जरीपटका व चौघडा यांसह ) व वरील प्रांत परसोजीकडे सोंपविला; तसेंच वऱ्हाडांतील चौथ व सरदेशमुखीचें कामहि त्यालाच सांगितलें. राजारामाच्या गंगथडीवरील प्रसिद्ध मोहिमेंत (१६९९) परसोजी हजर होता. शाहू दक्षिणेंत येत असतां खानदेशांत परसोजी व त्याचा वडील भाऊ बापूजी हे १५ हजार फौजेसह त्याला येऊन मिळाले. शाहू तोतया नाहीं हें इतरांस कळण्यासाठीं बापूजी हा त्याच्या पंक्तीस जेवला होता. शाहू गादीवर बसल्यानंतर त्यानें सेनासाहेबसुभा पद परसोजीकडे कायम केलें व वऱ्हाड–गोंडवन या प्रांतांत सहा सरकार ( जिल्हे ) खर्चास लावून देऊन मोकासा बाबीपैकीं शेंकडा ९ टक्के देण्याचा करार केला. त्यावर परसोजी साताऱ्याहून वऱ्हाडाकडे जात असतां, गोदावरी उतरून पलीकडे गेल्यावर मरण पावला (१७०९). परसोजीचें राहण्याचें मुख्य ठिकाण भाम हें होतें.

**का न्हो जी**.---( याची माहिती ज्ञानकोश वि. १० ' कान्होजी भोंसले ' या नांवाखालीं आली आहे. तिच्यापेक्षा

अधिक माहिती येथें देतों)कान्होजीनें वऱ्हाडांत अंमल बसविला व प्रथम रितपूर येथें आपलें ठाणें केलें. सय्यदांस साहाय्य करण्याकरितां बाळाजी विश्वनाथ दिल्लीस गेला असतां, कान्होजीस त्याच्याबरोबर जाण्यास सवड झाली नाहीं, म्हणून त्यानें आपले चुलत भाऊ संताजी व राणोजी यांस पाठविलें. पैकीं संताजी हा दिल्लीच्या लढाईत ठार झाला. कान्होजीनें चांदा, देवगड वगैरे प्रांतांतून खंडण्या वसूल करून भाम हें रहाण्याचें ठिकाण केलें. हा फार तापट होता. हा ब्राह्मणांच्याशिवाय दुसऱ्या कोणाच्या हातचें खात नसे. एकदां शाहूनें याला जेवण्यास बोलावल्यावरून हा नाइलाजानें गेला; परंतु, घरीं परत आल्यावर त्यानें अन्न ओकून टाकलें. यामुळें व वर सांगितल्याप्रमाणें दिल्लीस पेशव्यांबरोबर जाण्याचा हुकूम तोडल्यामुळें शाहूनें याचें सेनासाहेबसुभा पद काढून पहिल्या रघूजीस दिलें व राणोजीस ४३ महालांची सनद दिली (१७२९–३०).

पहिला रघूजी.—परसोजीचा वडील भाऊ बापूजी याचा पुत्र बिंबाजी व त्याचा हा रघूजी. तेथील रामाजी कोल्हटकर या साधूच्या आशीर्वादानें याचा जन्म झाला म्हणून याला त्याचें नांव मिळालें. हा लहानपणीं पांडववाडीस ( वांई तालुका ) राहत असे. पहिल्या साबाजीची बायको रमाबाई हिला पुत्र नसल्यानें ती याच्यावर(हा नातूच होता)फार लोभ करी व याला जवळ ठेवी. पुढें कान्होजीनें स्वतःस पुत्र नसल्यानें याला आपल्याजवळ नेलें. कान्होजीस पुढें रामाजी नांवाचा पुत्र झाल्यावर, याच्यावरचें त्याचें लक्ष्य उडालें व नंतर तर दोघांत वैमनस्य आलें. तेव्हां रघूजी हा कान्होजीवर रुसून देवगडच्या चांदसुलतान नांवाच्या गोंड राजाकडे १०० स्वारांसह गेला; तेथें कांहीं दिवस राहून, एलिचपूरच्या नवाबकडेहि थोडे दिवस राहिला आणि मग साताऱ्यास शाहूच्या जवळ गेला व गोविंदराव चिटणीस, फत्तेसिंग भोंसले व श्रीपतराव प्रतिनिधि यांच्या तर्फे त्यानें शाहूशीं संधान बांधलें. फत्तेसिंगाबरोबर कर्नाटकाच्या स्वारींत रघुजीनें जाऊन उत्तम कामगिरी बजावली. एकदां शाहू हा शिकारीस गेला असतां, नेम चुकल्यानें वाघानें त्याच्यावर चाल केली, तेव्हां रघूजीनें मध्यें घुसून वाघास ठार केलें; रघुजीची स्त्री सुकाबाई व शाहूची धाकटी राणी सगुणाबाई या चुलतबहिणी होत्या; इत्यादि कारणानें शाहूची मर्जी रघूजीवर बसली व त्यास सेनासाहेबसुभा हें पद मिळालें. त्या सुमारास छत्रपतीच्या खर्चास सालिना १० लक्ष रुपये द्यावे व १० हजार फौजेसह छत्रपतीची नौकरी करावी असा करार रघूजीनें केला होता. रघूजी हा कदाचित स्वतंत्र बनेल म्हणून शाहूनें ( वांई तालुक्यांतील ) देऊर हें गांव त्याला इनाम देऊन, तेथें त्याचा कबिला ठेवला व राजनिष्ठेबद्दल कोन्हेरराव मुजुमदार हा जामीन घेतला ( १७२२ ). नंतर बरोबर विश्वासू मंडळी देऊन त्याला वऱ्हाडांत पाठविलें. रघूजी वऱ्हाडांत जातांना त्याचा व समशेरबहादर आटोळे याचा वाटेंत तंटा झाला. पण तो लगेच मिटला. वऱ्हाडांत एलिचपूरकर नबाबाचा पराभव करून प्रांत काबीज करीत रघूजी ( उर्फ बाबासाहेब ) हा भाम ( यवतमाळ जिल्हा ) येथें असलेल्या कान्होजीस भेटला व त्याची समजूत घालूं लागला पण कान्होजीनें त्रागा केल्यानें त्यास पकडून रघूजीनें आपल्याबरोबर घेतलें. इतक्यांत देवगडचा चांद सुलतान मेला व त्याच्या औरस मुलांत व लेकवळ्यांत गादीबद्दल तंटा लागला. औरस मुलांच्या आईनें रघूजीस तंटा तोडण्याबद्दल बोलाविलें असतां यानें जाऊन देवगड काबीज केलें व औरस मुलें आणि राणी यांना नागपुरास आणलें ( १७३६ ). याच वेळीं भंडाऱ्याच्या समर्थसंप्रदायी देवदासाचा रघूजीनें उपदेश घेतला.

रघूजी करांडे नांवाचा शूर पुरुष रघूजी भोसल्याचा सेनापति होता; त्यानें गोंडवन काबीज केलें. देवगडच्या राणीनें आपल्या दोन मुलांप्रमाणेंच रघूजीस तिसरा मानून राज्याचा तिसरा हिस्सा त्याला दिला(१७३७). हें वर्तमान ऐकून शाहूनें बंगाल, बहार व ओरिसा इकडील अंमल ( चौथाईसरदेशमुखीचा ) रघूजीस दिला ( १७३८ ). तेव्हांपासून रघूजीनें नागपूर येथें आपलें ठाणें दिलें. नंतर चंदासाहेबावरील व चंद्रसेन जाधवावरील स्वारींत रघूजी गेला होता. रघूजी शूर, शिपाईगडी व ऐषाराम न करणारा होता. नानासाहेबांना पेशवाई न देतां बाबूजी नायकास द्यावी असा आग्रह रघूजीनें केला होता पण शाहूनें तें ऐकलें नाहीं (१७४०). नाईक पेशवा झाला कीं, पुढें आपल्याला उत्तरेंत कारभार करण्यास कुलमुखत्यारी मिळेल व शाहूच्या मांडीवर आपला मुलगा देतां येईल असा बेत रघूजीचा होता, पण तो सर्व फसला. मध्यंतरीं बुऱ्हाण व अकबर या दोन ( गोंड ) भावांत तंटा लागला असतां रघूजीनें मुदबक्याकडून अकबरास वीष चारविलें; त्यामुळें बुऱ्हाणनें अकबराच्या राज्याचा हिस्सा रघूजीस दिला ( १७४१ ). रघूजीनें मिळविलेली सरकारी रसद तो साताऱ्यास पाठवीतच नसे; त्यामुळें शाहूनें त्याला ऐवज लवकर न पाठविल्यास शासन केलें जाईल असा हुकूम पाठविला होता ( १७३५ ) शाहूसहि तो जुमानीत नसे. मराठामंडळांत फूट पाडणाऱ्या मंडळीपैकीं रघूजी हा एक प्रमुख होता. त्याला शाहूच्या राणीचेंहि पाठबळ होतें. त्यामुळें शाहूच्या हयातींत पेशव्यांनां रघूजीचा बंदोबस्त करतां आला नाहीं. रघूजी दारू फार पीत असे, त्यानें स. १७४० त डुमासकडून विलायती दारू घेऊन लढाई बिघडविली होती. पेशव्यांनां स्वाऱ्यामुळें अतिशय कर्ज होई, तर रघूजी स्वाऱ्यांतील लुटीनें गबर झाला होता; पण पैसा मात्र सरकारांत तो भरीत नसे. रघूजीनें बंगाल, बहार व ओरिसा प्रांतांवर भास्करराम व तुळजोराम या ब्राह्मण वीरांच्या साहाय्यानें अनेक स्वाऱ्या केल्या व पुष्कळ किल्ले आणि प्रांत काबीज करून मोंगल व इंग्रज यांनां वचक बसविला. यामुळें कलकत्यास मराठा–डिच हा इंग्रजांनां खोंदावा लागला.

अलावर्दीखान ( बंगालचा नवाब ) यानेंहि खंडणी कबूल केली, परंतु त्यानें पेशव्यांशीं संधान बांधलें. पेशव्यांच्या अखत्यारीखालीं वागावयास रघूजी कबूल नसे. रघूजी हा पेशव्यांविरुद्ध प्रतिनिधि व फत्तेसिंग भोंसले यांच्या मसलतींत असे व त्यामुळें व वरील कारणानें पेशवे व रघूजी यांच्यांत लढाई होऊन तींत रघूजीचा पराभव झाला ( १७४२ ). पेशव्यानीं उत्तरेकडे स्वाऱ्या केल्या असतां रघूजी त्यानां अडथळा करीत असे. त्यामुळें पेशव्यांस कडकपणा करणें भाग पडलें. भोपाळच्या लढाईत त्याला पेशव्यांस मदत करण्यास सांगितलें असतांहि तो गेला नव्हता. शेवटीं शाहूनें दोघांचा समेट केला. यानंतर भास्करपंतानें बंगालवर स्वारी केली असतां अलावर्दीखानानें त्याला मेजवानीस बोलावून विश्वासघात करून त्याचा बरोबरच्या २२ सरदारांसह खून केला. तेव्हां रघूजीनें मुला ( जानोजी ) स मोठ्या फौजेसह अलावर्दीवर पाठविलें. नवाबानें घाबरून खंडणी देऊन व पुष्कळ मुलूख देऊन तह केला, मात्र पेशव्यानें या कामीं रघूजीस मदत केली नाहीं. शाहू मृत्युशय्येवर असतां सकवारबाईनें व मुतालिकानें जें कारस्थान पेशव्यांच्या विरुद्ध उभें केलें, त्यांत रघूजी होता, परंतु त्याला फौजेसह येण्यास उशीर झाल्यानें कारस्थान फिकें पडलें. पुढें रामराजानें सांगेल्यास पेशव्यांशीं रघूजीचा समेट करून दिला ( १७५० ).नंतर रघूजी नागपुरास परत आला; या सुमारास नासरजंग मेल्यानें त्याचा वऱ्हाडांतील मुलूख व गावीलगड किल्ला रघूजीनें पेशव्यांच्या सल्ल्यानें काबीज केला. निजाम पुण्यावर आला असतां रघूजीनें मोंगलाईत स्वारी केली होती ( १७५१ ). यापुढें थोड्याच दिवसांत पोटदुखीनें रघूजी मरण पावला ( १७५५ फेब्रुवारी ). त्यावेळीं त्याच्या तेरा बायकांनीं सहगमन केलें. मरतांना रघूजीनें जानोजीस सेनासाहेबसुभ्याचें पद देऊन सर्व मुलांस राज्यांत कांहीं वांटणी करून दिली. जानोजी,साबाजी, बिंबाजी व मुधोजी असे चार रघूजीचे पुत्र होते. रघूजी मुळापासून मराठामंडळाशीं फटकून वागे. भोंसले घराण्याचें नांव यानेंच काढिलें.

जा नो जी.—पहिल्या रघूजीचा थाकटा पुत्र, लहानपणापासून स्वाऱ्याशिकारींत भाग घेई. कर्नाटकांतील व बंगालमधील ( १७४९–५० ) स्वाऱ्यांत्तर हाच गेला होता. यानें आपल्या भावाशीं ( मुधोजी ) तंटा आरंभून गादी बळकाविली. जानोजी वयानें वडील ( परंतु धाकट्या बायकोचा ) व मुधोजी वयानें धाकटा ( परंतु वडील बायकोचा ) होता. जानोजीनें फितूर करून मुधोजीनें घेतलेला गावीलगड आपल्या ताब्यांत घेतला व भाऊसाहेब पेशव्यांमार्फत सरकारांत सेनासाहेबसुभ्याच्या वस्त्रांबद्दल खटपट केली ( १७५३ ). या कारभारांत देवाजीपंत चोरघोडे हा प्रमुख असल्यानें तोच पुढें जानोजीचा दिवाण झाला. सावनूरच्या लढाईत ( १७५६ ) मुधोजीनें चांगलें शौर्य गाजविल्यानें भाऊसाहेबानें त्याची नवाजीस नानासाहेब पेशव्यांकडे केली; नानासाहेबांचा ओढा जानोजीकडे होता. जानोजीनेंहि सावनूर येथें पराक्रम केला होता. पुण्यास आल्यावर पेशव्यानीं या भावांच्या ( ४५ लक्षांच्या दौलतीच्या ) वांटण्या करून दिल्या. देवाजीपंत चोरघोडे यास नानासाहेबानींच भोंसल्यांचा कारभारी नेमला. हा नानासाहेबाचा विश्वासु होता. जानोजी हा सेनासाहेबसुभा झाला, मुधोजी हा सेनाधुरंधर झाला व त्यानें जानोजीच्या दौलतीचा कारभार करावा असें ठरलें; तसेंच यांचे दुसरे भाऊ साबाजी यानें दारव्हा येथें व बिंबाजी यानें छत्तिसगड येथें राहून (१५ लक्षांचा) कारभार पहावा असें ठरलें ( १७५७ ).निजामानें जानोजी कर्नाटकांत गेल्याचें पाहून वऱ्हाडावर स्वारी केली त्यावेळीं जानोजीनें परत येऊन निजामाला पिटाळून लाविलें व सर्व वऱ्हाड खालसा केला; तेव्हां निजामानें साठचाळिशीचा तह केला. यांत असें ठरलें कीं वऱ्हाडांतील निजामाच्या सर्व मुलुखाची वहिवाट भोंसल्यानें करावी व चौथाई, घांसदाणा वगैरे मराठ्यांच्या हक्कांबद्दल व खर्चाबद्दल शेंकडा साठ रुपये ( २५ चौथाई, १० सरदेमुखी, २५ लष्करीखर्च ) द्यावे व शेंकडा चाळीस निजामास द्यावे. पानपत झाल्यावर नानासाहेब पेशवे उत्तरेकडे निघाले, तेव्हां जानोजी त्यानां जाऊन मिळाला होता. पुढें दादासाहेबानीं थोरल्या माधवरावाविरुद्ध कारस्थानें केलीं त्यावेळीं जानोजी हा निजामाकडे गेला(१७६३). मधोजी हा दादाकडे जात असतां सदाशिव हरि या दिवाणानें दोघां भावांत समेट घडवून आणला. राक्षसभुवनच्या लढाईत हे दोघे भाऊ निजामाकडून निघून पेशव्यांकडे आले व त्याबद्दल दादासाहेबानें ३२ लाखांचा प्रांत त्यांनां दिला. यानंतर साबाजी हा जानोजीवर रुसून माधवराव पेशव्यांकडे जात असतां जानोजीनें व त्याची बायको दर्याबाई हिनें त्याची समजूत काढली. माधवराव पेशवे गादीवर आल्यानंतर त्यांनीं भोसलेबंधु दादासाहेबाच्या पक्षाचे म्हणून त्यांच्यावर स्वारी केली; नागपूर जाळून त्यांचा पुष्कळ प्रांत काबीज केला. जानोजी वगैरे बंधू पळून गेले. त्यांच्या पाठीवर गोपाळराव पटवर्धनास पाठविलें. गोपाळरावानें भोसल्यांची समजुत केली व श्रीमंतांकडून त्यांनां क्षमा करविली ( १७६९ ). कनकापूर येथें उभयतांत तह झाला. जानोजीस मूल नसल्यानें त्यानें मुधोजीचा पुत्र रघूजी यास दत्तक घेतलें. दत्तकमंजूरीस पुण्यास जाऊन परत येतांना बालेघाटप्रांतीं पोटशुळाच्या व्यथेनें जानोजीबावा वारला ( १७७०-एप्रिल ); त्याच्याबरोबर त्याच्या नाटकशाळाहि सती गेल्या.

र घू जी दु स रा.—दर्याबाईनें प्रथम या दत्तक मुलास गादी न देतां त्याला मुधोजीच्या हवालीं करून व मुधोजीला चांद्याकडे काढून देऊन, आपण स्वतः राज्यकारभार हातीं घेतला; याकामीं साबाजीहि तिला मिळाला. पेशव्यांकडून साबाजीच्या नांवें सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें तिनें आणविलीं. तेव्हां मुधोजीनें रघूजीला घेऊन साबाजीवर कुंभारीगांवीं

चढाई केली ( १७७३ ). शेवटीं समेट होऊन रघूजीस गादी प्राप्त झाली व साबाजी आणि मुधोजी दोघे कारभारी झाले. परंतु त्यांचीं पुन्हां भांडणें झालीं. दादासाहेब पेशवे गादीवर आल्यानंतर त्यांनीं रघूजीस सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें दिलीं. निजामावरील बेदरच्या मोहिमेंत रघूजी हजर होता. बारभाईच्या कारस्थानांत साबाजी नानांच्या पक्षास मिळाला. दर्याबाईहि मुधोजीच्या विरुद्ध बारभाईस मिळाली; पुढें साबाजीनें रघूजीस मुधोजीपासून काढून नागपुरास आणून कारभार आपल्या हातीं घेतला ( १७७४ ). तेव्हां मुधोजीनें साबाजीवर मोहीम करून त्यास ठार मारलें; त्यावेळीं साबाजीच्या स्त्रिया सती गेल्या (१७७५).रघूजीचें लग्न स. १७७७ त होऊन तो पुण्यास पेशव्यांच्या भेटीस गेला,आणि त्यानें नाना फडणिसाची मर्जी प्रसन्न करून घेतली. रघूजीच्या लहानपणांत त्याचा बाप मुधोजी व चुलता साबाजी हेच राज्यकारभार पाहात त्यामुळें स.१७८८ पर्यंत याचें कांहींच तेज पडलें नाहीं. त्याला खंडोजी ( चिमणाबापू ) व व्यंकोजी नाना ( मन्याबापू )असे धाकटे भाऊ होते. रघूजीनें पेशव्यांची मर्जी संपादून व्यंकोजीस सेनाधुरंधरीचीं वस्त्रें मिळविलीं(१७८९). पुढल्या वर्षी खंडोजी एकाएकीं वारला. यावेळीं छत्तिसगडाकडे स्थानिक जमिनदारांनीं बंड उभारलें तें रघूजीनें मोडलें व टिपूवरील मोहिमेंत हरिपंत फडक्याबरोबर आपलें सैन्य पाठविलें. रघूजी हा मध्यंतरीं नानांच्या विरुद्ध मशीर-मुल्क याच्या नादीं लागला होता, परंतु पुढें खर्ड्यांच्या लढाईंत पेशव्यांच्या बाजूनें प्रत्यक्ष हजर राहून नानांची मर्जी संपादिली व हुशंगाबाद वगैरे पांच महालांच्या सनदा मिळविल्या ( १७९६ ). महाडाहून रावबाजीस गादीवर बसविण्याचें जें कारस्थान नानांनीं केलें, त्यांतहि रघूजी हा नानांच्या बाजूस होता. पुढें होळकरबंधूंच्या तंट्यांत रघूजीनें यशवंतरावास तो नागपुरास आश्रयास आला असतां पैशाच्या लोभानें कैद केलें ( १७९९ ); परंतु तो कैदेंतून पळून गेला. नंतर कटक, चौरागड, जबलपूर वगैरे ठिकाणीं बंडाळी झाली होती ती रघूजीनें मोडून अमीरखान पेंढाऱ्याचाहि मोड केला ( १८०० ). यशवंतराव होळकरानें पुणें जाळलें व विनायकरावास पेशव्यांच्या गादीवर बसविलें, त्यावेळीं रघूजीनें रावबाजीचा पक्ष घेतला होता. पुढें वसईच्या तहामुळें इंग्रजांच्या विरुद्ध जें मराठामंडळ उठलें त्यांत रघूजीहि होता. आसईच्या लढाईंत तो प्रत्यक्ष लढत होता ( १८०३ ) परंतु तेथें मराठ्यांचा मोड झाला कारण यावेळीं होळकर अलग राहिला व निजाम इंग्रजांस मिळाला. नंतर अडगांव व गाविलगड येथें लढाया होऊन तेथेंहि भोंसल्यांचा पराभव झाला व गड व त्यांतील भोंसल्यांची सारी दौलत इंग्रजांच्या हातीं लागली. गडकरी बेनीसिंग मात्र फार शौर्यानें लढला. यानंतर देवगांव येथें तह होऊन ओरिसा, बागलाण, वऱ्हाड वगैरे प्रांत इंग्रजांस मिळाले व भोंसल्यानें सर्व राजकारण इंग्रजांमार्फत करावें असें ठरलें; याप्रमाणें भोंसल्यांचें स्वातंत्र्य नष्ट झालें ( १८०३. डिसें. १७) पुढें राज्यांतील किरकोळ बंडाळी मोडण्याकडे रघूजीचे दिवस गेले; भोपाळवाले, शिंदे व पेंढारी यांचा उपसर्ग भोंसल्यांस नेहमीं होई. पेंढाऱ्यांच्या बंदोबस्तास आम्हीं येतों म्हणून इंग्रजांनीं आपण होऊन रघूजीस कळविलें, तेव्हां त्याला या अनाहूत मदतीची शंका आली व त्यानें "आजवर मी आपले हातें जेवीत आलों. पुढें या ( इंग्रज ) लोकांचे हातून मजला जेवणें प्राप्त झालें, हें माझ्या देहांत प्राण आहे तोंवर करण्याचें नाहीं" असें बोलून दाखविलें. परंतु त्याचे कारभारी व जवळचे लोक यांनीं त्याची समजूत घातली. पुढें कॅप्टन क्लोज हा २२ पलटणी घेऊन रघूजीनें पेंढाऱ्यांचा दंगा मोडल्यावर त्याच्या राज्यांत आला व पेंढाऱ्यांचें निमित्त करून त्याच्या राज्याच्या सीमेवर तितक्या पलटणी कायमच्या ठेवण्याचा आग्रह धरून बसला. यासुमारास काशीस व्यंकोजी भोंसले सेनाधुरंधर हा वारला ( १८१२ ); तेव्हां त्याचा पुत्र मुधोजी आण्णासाहेब यास छत्तिसगड संस्थानांत कायम केलें. भोपाळवाल्यानें इंग्रजांस लिहिल्यावरून त्यांनीं रघूजीस भोपाळवाल्यावर स्वारी करण्यास मनाई केली. वास्तविक या दोघांचीं पुष्कळ दिवसांपासून कुरबुर चालू होती व व तींत पडण्याचें कारण इंग्रजांनां नव्हतें; परंतु इंग्रजांनीं याप्रमाणें मध्यें हात घालून रघूजीवर आपला शह बसविला. यामुळें रघूजीस फार वाईट वाटलें; यानंतर थोड्याच दिवसांनीं रघूजी वारला ( १८१६ ).

मुधोजी पहिला.—पहिल्या रघूजीचा वडील मुलगा व शाहूराजाच्या धाकट्या राणीच्या ( सगुणाबाई ) चुलत बहिणीचा मुलगा. हा बापाचा नावडता होता पण त्याच्यावर शाहूची फार मर्जी असे; याला दत्तक घ्यावें असा शाहूचा एकेकाळीं मनोदय होता, परंतु ताराबाईनें रामराजाची आठवण देऊन हा बेत नापसंत केला. हा घोड्यावर बसण्यांत व शिकारींत पटाईत होता. बाराव्या वर्षी यानें बस्तर, राजमहेंद्री, सिकाकोलकडे स्वारी केली ( १७४९ ); आणि नरनाळा व गाविलगड हे प्रख्यात किल्ले काबीज केले (१७५२). जानोजीच्या व याच्या गादीबद्दलच्या तंट्यांत वऱ्हाडदेशाची नासधूस फार झाली. बाप मेला तेव्हां हा गाविलगडीं होता म्हणून जानोजीनें गादी बळकावली. मुत्सद्दी मंडळी फांकून दोहोंकडे गेली. पुढें हा तंटा पेशव्यानीं मिटविला. नंतर मुधोजी दादासाहेब पेशव्यांबरोबर उत्तर हिंदुस्थानांत स्वाऱ्या करण्यास गेला; परंतु थोड्याच दिवसांत दोघांचें वांकडें येऊन तो वऱ्हाडांत परतला. मध्यंतरीं जानोजीनें मुधोजीची जहागीर लुटली व तींत आपलीं ठाणीं घातलीं; त्यामुळें दोघा भावांची उमरावतीजवळ रहाटगांव येथें लढाई झाली; तींत मुधोजीचा पराभव झाला. मुधोजीचा पक्ष भाऊसाहेब पेशवे व जानोजीचा पक्ष नानासाहेब पेशवे घेत, त्यामुळें त्यांचा तंटा कायमचा निकालांत निघेना. बिंबाजी हा मुधोजीचा पक्षपाती होता.घरकलहानें भोंसल्यांपैकीं

कोणींहि पानपतच्या स्वारींत गेलें नाहीं. यांचें व जानोजीचें पुढें सख्य झालें होतें. मुधोजीला रघूजीबापू, खंडोजी ऊर्फ चिमणाबापू व व्यंकोजीनाना असे तीन पुत्र होते, पैकीं रघूजी यास जानोजीस दत्तक दिलें. दर्याबाईनें जानोजीच्या पश्चात् सर्व कारभार आपल्याच हातीं घेतला. तेव्हां मुधोजीनें दर्याबाईवर तिचे पुष्कळ सरदार फितूर करून स्वारी केली व रघूजीस गादीवर बसविलें. तेव्हां दर्याबाईच्या विनंतीवरून नारायणराव पेशव्यानीं मुधोजीवर खंडेराव दरेकरास पाठविलें. त्यामुळें मुधोजीनें दादासाहेबाचा पक्ष घेतला व नारायणरावांस धरण्याच्या कटांत तो सामील झाला. मुधोजीनें निजामाचा सरदार रुक्नुद्दौला यालाहि दादाच्या पक्षास मिळवून घेतलें होतें. मुधोजी स्वतः पुण्यास आला होता; बारभाईच्या कारस्थानांत तो दादाच्या बाजूस होता. तिकडून वऱ्हाडांत परत आल्यावर एलिचपूर येथें सैन्यांतील पठाणांनीं पगार तटला म्हणून दंगा करून मुधोजीस जखमी केलें. कोणी म्हणतात कीं हे मारेकरी असून ते साबाजीनें पाठविले होते. येथेंच नारायणराव पेशव्यांचा खून करणारा महंमद यूसफ गारदी दादासाहेबाकडून ५ हजार सैन्यासह त्याच्या मदतीस आला. मुधोजीनें त्याचें व आपलें सैन्य जमा करून पांचगांव ( नागपुराजवळ . कोस ) येथें साबाजीशीं लढाई करून साबाजीस पिस्तुलानें ठार मारलें (१७७५ जानेवारी ) आणि रघूजीचा कारभार हातीं घेतला. ही बातमी ऐकून निजाम लढाईस उठला, तेव्हां मुधोजीनें त्याची समजुत करून त्यास कांहीं प्रांत दिला. पुढें ज० गाडर्ड हा पुण्याकडे जात असतां मुधोजीनें त्यास आपल्या राज्यांतून वाट दिली व पेशव्यांविरुद्ध त्याच्याशीं तह केला. त्यावर नानाफडणिसानें बिंबाजी भोसल्यास हातीं धरून मुधोजीविरुद्ध मसलत उभारली; त्यामुळें मुधोजी घाबरला व नानांचें म्हणणें कबूल करून त्यानें इंग्रजांचा पक्ष सोडला. परंतु नानांनीं इंग्रजांवर मोहीम करण्यास सांगितलें असतां मुधोजीनें तें चुकवून इंग्रजांकडून ३० लाखांची खंडणी घेऊन पुढें त्यांनां टिप्पूवर जाण्यास ओरिसामधून मार्ग दिला. यामुळें नानांच्या मसलतीप्रमाणें इंग्रज कमजोर न होतां शिरजोर झाला ( पश्चिमेकडून पेशवे, उत्तरेकडून शिंदे, होळकर, पूर्वेकडून भोसले व दक्षिणेकडून निजाम याप्रमाणें "चहूंकडोन इंग्रजावर शह द्यावा" असा नानांचा बेत होता. ). याप्रमाणें मराठी राज्याचें नुकसान मुधोजीनें केलें ( १७८१ ); मात्र नानांचा राग घालविण्यास बदामीवरील स्वारींत मुधोजी हजर राहिला ( १७८६ ). बदामीचा किल्ला घेतांना मुधोजीच्या खंडोजी ( सेनाबहादूर ) नांवाच्या मुलानें पराक्रम गाजविला होता. मुधोजी परत नागपुरास आल्यावर थोड्याच दिवसांनीं त्याचा धाकटा भाऊ बिंबाजी हा वारला (१७८८). त्यानें छत्तिसगड प्रांतावर स. १७५७ पासून राज्य केलें; तो रामभक्त होता; त्याची स्त्री उमाबाई ही सती गेली. हें ऐकून मुधोजीस शोक होऊन तोहि चार पांच महिन्यांनीं वारला ( १७८८ मे ). मुधोजी व जानोजी दोघेहि कर्तृत्ववान व हुशार होते, परंतु गृहकलहानें त्यांचें नुकसान झालें. मुधोजीचें व कायगांवकर दीक्षितांचें बरें होतें, त्यामुळें मुधोजी कायगांवकरामार्फत पेशव्यांशीं संधान बांधीत असे. यानें भास्करराम मेल्यावर त्याच्या कोन्हेरपंत या भावास सालिना २५ हजारांची जहागीर रघूजीकडून दिली होती. यानें एलिचपूर येथें तट व वेशी बांधल्या; याचा व एलिचपूरच्या नवाबाचा स्नेह असे. वॉरन हेस्टिंग्जनें मुधोजीला मराठमंडळांतून फोडण्याचा व त्याबद्दल त्याला शाहूला दत्तक देण्याच्या कामीं मदत करण्याचा प्रयत्न चालविला होता. परंतु मुधोजी या डावास बळी पडला नाहीं.

प र सो जी.—हा थोडासा भ्रमिष्ट व दुर्गुणी होता; त्यामुळें रघूजीचा लेकवळा धर्माजी व व्यंकोजीचा मुलगा मुधोजी या दोघांमध्यें कारभारीपणाबद्दल तंटा लागला. रघूजीची राणी बांकाबाईचा ओढा धर्माजीकडे होता; मुधोजीकडे सर्व सरदारमंडळ होतें. त्यामुळें अखेर हा मुधोजीच कारभारी झाला. परसोजी नांवाचा राजा होता, मुधोजीनें त्याच्या बाजूचीं माणसें काढून टाकून खुद्द बांकाबाईस नजरकैदेंत ठेविलें आणि परसोजीच्या खास दिमतीस आपल्या तर्फेचे लोक ठेविले. कांहीं दिवसांनीं मुधोजी चंद्रपुराकडे गेला असतां इकडे एकाएकीं परसोजी मेला ( १८११ ). त्याची बायको काशीबाई सती गेली. कोणी म्हणतात परसोजीचा खून झाला.

मु धो जी दु स रा.—परसोजीच्या पश्चात् यानें सर्व कारभार हातांत घेतला. यावेळीं इंग्रजांनीं हुशंगाबादेस वखारीकरितां परवानगी मागितली, परंतु मुधोजीनें दिली नाहीं. मात्र त्यांची तैनाती फौज जवळ बाळगली. इतक्यांत रावबाजीनें शेवटचा इंग्रजांविरुद्ध प्रयत्न उभारला, त्यांत होळकराप्रमाणें मुधोजी आप्पासाहेबाची मदत मागितली व ती त्यानेंहि कबूल केली. त्यामुळें पेशव्यानें त्याला सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें पाठविलीं. आप्पासाहेबानें थोडीशी फौज जमविली; या कामीं मनभट, रामचंद्र वाघ, गणपत सुभेदार वगैरे लोक त्याच्या मदतीस होते. फौजेनें सीताबर्डी व नागपूर शहर या दरम्यान नाकेबंदी करून रेसिडेन्सीवर तोफा चालू केल्या परंतु फितुरीमुळें लढाई नासली. आप्पासाहेबास भरवंसा देऊन रेसिडेन्सींत नेलें व अटकावून ठेवलें. तीन चार दिवस आप्पासाहेबांच्या सैन्यानें नागपूर लढविलें, अखेर भोसल्यांचा जुना सेनापति महंमदअल्ली याच्याचमार्फत नागपूरच्या किल्ल्यावर इंग्रजी बावटा चढविला गेला. नंतर इंग्रजांनीं आप्पासाहेबास पदच्युत करून काशीकडे पाठविलें. तेव्हां वाटेंतच तो निसटून गेला ( १८१७ ). पुढें (१८४८ ) आप्पासाहेबाचा एक तोतया निघून त्यानें वऱ्हाडांत पुष्कळ दिवस धामधूम केली होती, त्याला नंतर पकडण्यांत आलें. आप्पासाहेबास जोधपूरच्या महाराज मानसिंगानें आपल्या राज्यांत आश्रय दिला. तिकडेच कांहीं दिवसांनीं त्याचा अंत झाला.

तेथें गुरुद्वारांत ते राहत असत, त्यांची छत्री तेथील महामंदिराबाहेर अद्यापि आहे.

तिसरा रघूजी.—आप्पासाहेब गेल्यानंतर परसोजीच्या दुर्गाबाई नांवाच्या राणीच्या मांडीवर बाजीराव नांवाचा दत्तक मुलगा देऊन त्याचें नांव रघूजी ठेविलें. हा निपुत्रिक वारला ( ११ डिसेंबर १८५३ ); त्यावेळीं डलहौसीनें नागपूरराज्य खालसा केलें. त्याची थोडक्यांत हकीकत पुढीलप्रमाणें आहे. तिसरा रघूजी वयांत आल्यावर इंग्रजसरकारनें त्याच्याशीं जो तह केला ( १८२६ ) त्यांत नागपूरचें राज्य वंशपरंपरागत चालविण्याचें कबूल केलें होतें. हा अज्ञान असतांना बांकाबाई राज्यकारभार करीत असे. ही बाई मोठी कारस्थानी व हुषार असून तिनें जवळ जवळ ५० वर्षें राज्यकारभार केला होता. बाईनें तिसरा रघूजी मेल्यावर यशवंतराव नांवाच्या ( दुसऱ्या रघूजीच्या मुलीच्या वंशापैकीं अहीरराव घराण्यांतील ) मुलास दत्तक घेण्याचें ठरवून तें अगाऊ रेसिडेंटास कळविलें आणि त्याच्या हातानें रघूजीचें क्रियाकर्मांतर केलें.

जानोजी.—रेसिडेंटानें ही हकीकत गव्हर्नर जनरल डलहौसीला कळविली, त्याबरोबरच सेनापति लो यानेंहि नागपूरराज्य कायम ठेवण्याबद्दल रिपोर्ट केला; परंतु सातारा व झांशी हीं राज्यें बुडविणाऱ्या डलहौसीस तें न पटून, त्यानें दत्तविधानानंतर १ महिन्यानें नागपूर राज्य "औरससंतति नाहीं म्हणून" खालसा केलें ( २६ जाने. १८५४ ). रघूजीनें लहानपणापासून यशवंतरावास आपल्या मुलाप्रमाणें वागविलें होतें व तो त्याचा निकटचा आप्त होता, परंतु डलहौसीनें त्याला "परकीय" म्हटलें उमरावतीकर भोंसले घराण्यांत सखोजी व कृष्णाजी हीं भोंसले मंडळी ह्यात होती; कान्होजी ( सेनासाहेबसुभा ) चा सखोजी हा खापरपणतु असून सीधा वंशज ( औरस ) होता; असें असतांहि बेवारशी संस्थान म्हणून डलहौसीनें नागपूरराज्य खालसा केलें एवढेंच नाहीं तर यानें हिंदुस्थान सोडतांना एका सरकारी रिपोर्टांत ( मिनिट नं. २४५. सन १८५६ ) लिहिलें कीं, "रघूजीस पुत्र नव्हता व त्याच्या राण्यांनींहि दत्तक पुत्र न घेतल्याचें कबूल केलें आहे." याप्रमाणें डलहौसीनें धडधडीत खोटें लिहिलें. अप्पासाहेब पदच्युत झाल्यावर तिसऱ्या रघूजीस वास्तविक इंग्रजसरकारानेंच दत्तक कबूल करून गादीवर बसविलें होतें. लार्ड हेस्टिंग्जनें याची स्पष्ट कबूली ( ६ मे १८२३ चें पत्र ) दिली आहे. रघूजी जर दत्तक कबूल तर त्याचा मुलगा जानोजी हा दत्तक म्हणून कबूल कां नसावा ? रघूजी वारल्यावर तिसऱ्या दिवशीं ( १४ डिसें. ) रेसिडेंटानें डलहौसीला जो रिपोर्ट पाठविला, त्यांत जानोजीच्या दत्तविधानाची सर्व हकीकत लिहिली होती. परंतु डलहौसीनें जानोजीला गादीचा अधिकारीच कबूल केलें नाहीं. बरें हें दत्तविधान खोटें मानावें, तर स. १८५७ मध्यें जानोजीनें इंग्रजांनां उत्कृष्ट साहाय्य केल्यामुळें लॉर्ड क्यॅनिंगनें त्याला "राजाबहादूर" ही पदवी देऊन संस्थानची खाजगी मिळकत परत केली याचा अर्थ काय ?

नागपूरराज्य खालसा कां केलें याचें खरें कारण डलहौसीनेंच एके ठिकाणीं उघड लिहून ठेविलें आहे. तो म्हणतो, "नागपूरराज्य खालसा केलें...भोंसल्यांच्या ज्या सेनेमुळें आम्हांला नेहमीं उपसर्ग होत असे, ती आतां आमच्या हातीं आली...त्याबरोबरच ८० हजार चौरस मैल क्षेत्रफळाचा व सालिना ४० लाख वसुलाचा प्रांत आमच्या हातांत पडला... नागपूरराज्य आम्हीं घेतल्यामुळें निजामाच्या चारी बाजूंस आमचा गराडा आयता पडला. खानदेश व ओरिसा हे प्रांत मोकळेपणानें हातीं आले. वऱ्हाड, सागर व रेवाकांठचा प्रदेशहि हळू हळू आमच्या ताब्यांत येईल. कलकत्त्याहून थेट मुंबईस विनहरकत आमचा रस्ता मोकळा होऊन सैन्यांत व व्यापारांत वाढ होईल." (ए व्हिंडिकेशन. पृ. ३६).

दत्तक नामंजूर करूनच डलहौसी थांबला नाहीं, तर त्यानें रघूजीच्या राण्यांनीं केलेली कायदेशीर खटपटहि चालू दिली नाहीं. त्यांनां त्रास दिला. ८० वर्षांच्या वृद्ध बांकाबाईला तिच्या महालांतच कैदेंत ठेविलें; तिच्या विनंतीकडे दुर्लक्ष केलें; तिला पैशाची मदत करणाऱ्या सावकारांनां कैद केलें; मेजर ओस्ले हा तिचा पक्ष घेऊन खटपट करीत असतां त्याला बंदी केली; जानोजीच्या दत्तक आईकडून जबरदस्तीनें राज्याच्या बेदावापत्रावर सही करवून घेतली; नागपूरचें सैन्य निःशस्त्र केलें व सर्वत्र गोरे कामगार व गोरी फौज ठेवली. भोंसले घराण्याचें जवाहीर व हत्तीघोडे आणि शेले शालुसुद्धां यांचा भरबाजारांत लिलांव केला; राणिवशांच्या झडत्या घेतल्या; राणीच्या पलंगाखालीं ४ लाख रुपये पुरलेले व खास तिच्याच मालकीचे होते ते खोदून घेतले. राणीनें दानधर्माकरितां त्यांतली थोडीशी रक्कम मागितली परंतु तीहि मिळाली नाहीं. या गोष्टीस रेसिडेंट विरुद्ध होता; त्यानें लिहिलें होतें कीं, "राजाची खाजगी संपत्ति पुष्कळ आहे त्यापैकीं राजकुटुंबाजवळ ५० ते ७५ लाखांचें जवाहीर ठेवलें पाहिजे; त्याचा व्यय त्यांच्या मर्जीप्रमाणें होऊं द्यावा." परंतु डलहौसी म्हणाला कीं, "राजकुटुंबाचा खाण्यापिण्याचा खर्च भागविण्यास जवाहीर विकलें पाहिजे." के. टॉरेन्स, बेल वगैरे इतिहासकारांनीं डलहौसीच्या या कृत्याचा धिःकार केला आहे.

नागपूरराज्य खालसा करण्याचा डलहौसीचा बेत इंग्लंडहून हिंदुस्थानांत येण्यास निघाल्यापासूनचा होता. तो म्हणतो " नागपूरराज्य खालसा केल्यास इंग्लंडचा पुष्कळ नफा होइल व व्यापाराचा जम बसेल. कारण नागपूरप्रांतांत कापूस फार पिकतो, त्याचा पुरवठा म्यांचेस्टरला जरूर व्हावयास पाहिजे (कारण खुद्द म्यांचेस्टरच्या व्यापाऱ्यांनीं मला हें सांगितलें होतें ) त्याबद्दल इंग्लंडच्या प्रधानमंत्र्यानेंहि मला वारंवार आग्रह केला." यावरून नागपूर खालसा करण्यांत कोणकोणाचें अंग होतें तें स्पष्ट दिसेल. नॉर्टन

म्हणतो कीं, या नागपूरप्रकर्णी "कापसानें इंग्रजी न्याय-देवतेचे कान बहिरे केले व डोळ्यांत धूळ फेकली" ( रिवेलियन इन इंडिया. पृ. ९८ ).

जानोजीरावास १८६७ सालच्या सुमारास "राजा ऑफ देऊर" अशी पदवी देऊन सालिना ९० हजारांचें पेन्शन दिलें.यानां ६ राण्या होत्या. त्यांपैकीं अंजीराबाईसाहेब यांच्या पोटीं दोन मुलें झालीं. श्रीमंत राजेबहाद्दर रघूजीराव बापूसाहेब व श्री. कुमार लक्ष्मणरावसाहेब ( राजे ) अशीं त्यांचीं नांवें असून हे विद्यमान आहेत. श्री. रघूजीराव हे नागपुराजवळ सक्करदरा येथील राजवाड्यांत राहतात; त्यानां श्री. फत्तेसिंहराव व जयसिंहराव असे दोन पुत्र आहेत. श्री. रघूजीराव हे सुशिक्षित व शिकारी असून धार्मिक प्रवृत्तीचे आहेत; सांप्रत त्यांचा काल भजनपूजनादि धार्मिक कृत्यांत जातो. श्री. लक्ष्मणराव हेहि सामाजिक व धार्मिक चळवळींत भाग घेत असतात.

[पुरंदरे-रोजनिशी; नानासाहेब पेशवे व शाहू महाराजांच्या रोजनिशा; अमात्याची बखर; ऐति. लेखसंग्रह. पु. १, ८; का. इ. सं. पत्रें यादी; राजवाडे-खं. २, ३, ६; नागपूरकर भोंसल्याची बखर व कागदपत्रें; डफ; नॉर्टन-धी रिवेलियन इन इंडिया; अनेक्झेशन ऑफ बेरार १८५९; टॉरेन्स-एंपायर इन एशिया; पेपर्स, राजा ऑफ बेरार; कलकत्ता रिव्ह्यू-सेप्टेंबर, एप्रिल, १८६०; जॅक्सन-ए व्हिन्डिकेशन; अर्गाईल-इंडिया अंडर डलहौसी ॲन्ड कॅनिंग; बेल-रिट्रॉस्पेक्टस ॲन्ड प्रॉस्पेक्टस; लो-एंपायर इन इंडिया; अर्नोल्ड-ॲडमिनिस्ट्रेशन ऑफ डलहौसी. ]

**नागभट**—कनोजच्या प्रतिहार घराण्याचा मूळपुरुष असा हा राजा इ. स. ७२५-४० मध्यें होऊन गेला. यानें सिंधमधून पूर्वेकडे घुसणाऱ्या अरबांचा पुष्कळदां पराभव केला. याची राजधानी मंडोर ( जोधपुराजवळील ) होय. स्मिथच्या मतें याची राजधानी भिन(ल)माल ही होय. अरबांनीं सिंध घेतल्यावर मारवाडवर त्यांनीं मोर्चा वळविला. त्यावेळीं नागभटानेंच त्यांची लाट थोपवून बाप्पा रावळाप्रमाणें कीर्ति मिळविली. या नागभटाच्या पुतण्याचा नातू दुसरा नागभट हा फार प्रख्यात झाला. यानें तर कनोजचें साम्राज्य हर्षवंशाकडून घेऊन आपण सम्राट बनला. प्रथम त्यानें कनोजच्या आंध्र, सैंधव, कलिंग, विदर्भ इत्यादि सामन्तांचा पराभव केला व त्यास आपले मांडलिक बनविलें. नंतर त्यानें वंग राजाचा पराभव केला. नागभटाबद्दल भोज लेखांत व 'बुचकला' शिलालेखांत उल्लेख आलेले आहेत ( ८१५ ). यानंतर नागभटानें आनर्त,माळवा किरात, तुरुष्क, वत्स, मत्स्य, वगैरे देश जिंकून साम्राज्याचा विस्तार केला. या नागभटाचा काल ८००-८२५ आहे. याचा पराभव राष्ट्रकूटांनीं केला; परंतु कनोज घेतलें नाहीं. बंगालचा राजा धर्मपाल होता, त्याचा पराभव नागभटानें केला म्हणून त्याची बाजू घेऊन तिसरा गोविंद राष्ट्रकूट यानें नागभटाचा पराभव केला. धर्मपाल हा गोविंदराजाचा जांवई होता. [ इंडि. अँटि. पु. २१; जर्नल रा. ए. सो. बंगाल. पु. ८; मध्य.भारत, भाग २; स्मिथ-ऑक्स. हिस्टरी ऑफ इंडिया. ]

**नागमणि**—हिंदुस्थानांत मोठमोठया नागाच्या डोक्यांत मणि असतो असा समज सर्वत्र आहे आणि त्याचा उल्लेख रत्नविषयक ग्रंथांतून देखील आला आहे. ग्रीक लोकांचा देखील असा समज होता कीं, हिंदुस्थानांतील मोठमोठ्या नागांच्या डोक्यांत मणि असून त्याची उपयुक्तता मोठी आहे; पण हा मणि अर्वाचीन संशोधकांस सांपडला नाहीं. आणि अशा तऱ्हेचा मणि असतो ही केवळ कल्पना आहे असें त्यांचें मत आहे.

दक्षिण अमेरिकेंत पेरू देशांत कार्बेकुलो नांवाचा एक प्राणी आहे. त्याचा कोणी पाठलाग केला असतां त्याच्या डोक्यांत एक दरवाजा उघडल्यासारखा होऊन उजेड पडतो असें म्हणतात. अशा तऱ्हेच्याच कांहीं प्रकारावरून ही मण्याची कल्पना उत्पन्न झाली असावी. इंग्लंडमध्यें बेडकाच्या डोक्यांत अशा प्रकारचा मणि सांपडतो अशी कल्पना आहे व आपल्याइकडेहि आहे. सर्पाच्या डोक्यांत मणि असतो अशी इराणी लोकांचीहि कल्पना आहे, आणि त्यास त्यांच्यांत मोहरा हा शब्द आहे.ग्रीक ग्रंथकार आपोलोनिअस टिआनिअस हा हिंदूंची नागमणि काढून घ्यावयाची पद्धत येणेंप्रमाणें सांगतोः—सर्पगुहेपुढें रेशमी जाळें पसरतात. त्यावर जादूचीं सोनेरी अक्षरें बसविलेलीं असतात. त्यांच्या योगानें व मंजुळ संगीताच्या योगानें सापास निद्रा येते. आणि मग सापास मारून त्याच्या डोक्यांतील मणि काढून घेतात.

**नागरिक**—हा शब्द पूर्वी सभ्याचारयुक्त मनुष्य या अर्थानें वापरला जात होता. उदारणार्थ उर्वशी; तिजविषयीं अधिक स्नेहयुक्त जिज्ञासा विदूषकानें दाखविल्यामुळे "तूं साधु नागरिक आहेस" असे उर्वशीकडून विक्रमोर्वशीय नाटकांत कालिदासानें उद्गार काढविले आहेत. आतां हा शब्द राष्ट्रसदस्य या अर्थानें वापरला जात आहे. "सिटिझन" या शब्दाचें हें भाषांतर होय. पंडिता रमाबाईनीं यास अधिक योग्य प्रतिशब्द "जानपद" म्हणून सुचविला होता ( युनायटेड स्टेट्सची लोकस्थिति ). "जनपदाचा सदस्य तो जानपद" , व नगर यापेक्षां जनपद ही राजकीय दृष्टया अधिक महत्त्वाची संज्ञा आहे. या दृष्टीनें वरील शब्दाची निवडहि चांगली होती पण नागरिक हाच शब्द रूढ झाला. नागरित्वाचें विवेचन करावयाचें म्हणजे "सिटिझन" या शब्दानें व्यक्त होणाऱ्या कल्पनेचें विवेचन करावयाचें.

नागरिकत्वकशांतआहे.-मत(व्होट)असणें हें नागरिकत्वाचें लक्षण आहेच असें म्हणतां येत नाहीं; कां कीं,परक्यास देखील मत असतें. तसेंच युनिव्हर्सिटीच्या निवडणुकींत वगैरे नागरिकत्वाचा प्रश्नच येत नाहीं. नागरिकत्व आणि विशिष्ट

राष्ट्राचें प्रजाजनत्व या दोहोंमध्यें फरक नाहीं; कां कीं, निरनिराळ्या राष्ट्रांच्या व्यवहारामध्यें अमुक व्यक्तीवर तावा कोणाचा, या प्रश्नाचा निवाडा करतांना त्याच्या राष्ट्रविषयकतेचा निवाडा करावा लागतो. आणि आज नागरिकत्व म्हणजे व्यक्तीस कोणत्या संघांत सदस्यत्व आहे एवढेंच ठरविण्यापुरतें आहे. जेव्हां एका राष्ट्रामध्यें भिन्न अधिकारांचीं माणसें असतात तेव्हां नागरिक कोण, गुलाम कोण आणि केवळ राहूं दिलेल्या व्यक्ती कोण असे प्रश्न उपस्थित होतात. दक्षिण आफ्रिकेंत वरिष्ठ कायदेमंडळाचे प्रतिनिधी निवडतांना यूरोपीयेतर लोकांस मताधिकार नाहीं. पण त्यांस नागरिकत्व नाहीं असें कोणी म्हणणार नाहीं. एका राष्ट्रानें आपल्या जनतेंतील निरनिराळ्या वर्गांस कसें वागवावें हा प्रश्न स्थानिक नीतीचा आहे. उदाहरणार्थ रोममधील प्लेबियन माणसें जर बाहेरदेशीं गेलीं असतीं आणि त्यांच्यावर समजा, पर्शियन लोकांनीं जुलूम केला असता तर रोमला त्यांचें संरक्षण करावें लागलें असतें. रोमन लोकांत ज्यांस सिटिझन म्हणत त्या व्यक्ती म्हणजे रोममध्यें सत्ताधिकार निवडण्याचा हक्क असलेल्या व्यक्ती एवढाच काय तो त्याचा अर्थ होता. आतां जनतेच्या अनेक वर्गांत फरक करण्याची पद्धति बरीच कमी झाली आहे. मत असलेला वर्ग बहुतेक सर्वराष्ट्रव्यापी झाला आहे. आणि नागरिकास असलेले विशिष्ट हक्क कमी झाले आहेत. सर्वसामान्य नीतीप्रमाणें इतर राष्ट्रांतलि नागरिकांस वागवावें हें सर्वत्र सत्तांचें धोरण आहे. हिंदुस्थानांत समान नागरिकत्वाची कल्पना जितकी पसरत जाईल तितकी जन्ममूलक उच्चनीचता किंवा हक्क व वैगुण्यें हीं कमी होत जातील.

नागरिकत्व संपादणें, बदलणें (-नागरिकत्व--नॅचरलायझेशन):—कायद्यामध्यें या शब्दाचा अर्थ, परकी इसमानें एखाद्या राष्ट्राचा किंवा राज्याचा नागरिक किंवा कायमचा रहिवाशी या नात्यानें हक्क व जबाबदारी पत्करणें, असा आहे. या कृत्याला त्या इसमाची व त्या राष्ट्राच्या किंवा राज्याच्या सरकारची अशी दोघांची मान्यता पाहिजे. पण तो इसम पूर्वी जेथील नागरिक होता तेथल्या सरकारची परवानगी लागत नाहीं. कारण कोणतेंहि सरकार स्वप्रजाजनांनीं परराज्यांत नागरिकत्व स्वीकारण्याच्या कृत्यास मान्यता देणार नाहीं. निदान कांहीं अटी घातल्याशिवाय तरी देणार नाहीं. या गोष्टीचा विचार करतां, एका इसमाला एका वेळीं एकाच राष्ट्राचें नागरिकत्व तात्त्विक दृष्ट्या असणार हें खरें असलें तरी पुष्कळ वेळां असें होतें कीं, एकाच वेळीं एका इसमावर दोन राष्ट्रें नागरिकत्वाचा हक्क सांगतात. असें भांडण उद्भवण्याचें कारण उघडच आहे कीं, एका सरकारनें नागरिकत्व सोडण्याची परवानगी देण्यापूर्वीच दुसऱ्या सरकारचें नागरिकत्व मिळवितां येतें. शिवाय मनुष्याचें मूळचें नागरिकत्व ठरण्याचे दोन प्रकार आहेतः—(१) जन्मस्थानावरून नागरिकत्व ठरणें, हा प्रकार इंग्लंड व ब्रिटिश साम्राज्याच्या कायद्यांत आहे. (२) बापाच्या नागरिकत्वावरून मुलाचें नागरिकत्व ठरणें. हा प्रकार जुन्या रोमन कायद्याचें तत्त्व मान्य करणाऱ्या देशांत आढळतो. वरील भांडण मिटविण्याकरितां सामान्य व्यवहारांत असा नियम पाळतात कीं, जन्मामुळें, पित्यामुळें, नूतन स्वीकारामुळें किंवा नागरिकत्वत्यागाला परवानगी न दिल्यामुळें जें सरकार ज्या कोणा इसमावर नागरिकत्वाचा हक्क सांगत असेल त्याच सरकारच्या देशांत असेपर्यंत त्या इसमाला संरक्षण त्या इसमावर नागरिकत्वाचा हक्क सांगणारें दुसरें सरकार देत नाहीं. या नियमानुसारच ब्रिटनचें परराष्ट्रखातें स्वतःच्या नागरिक इसमांना परदेशांत प्रवासार्थ परवाने (पासपोर्ट) देऊन सुद्धां त्या इसमांना, त्यांच्यावर नागरिकत्वाचा हक्क सांगणाऱ्या त्यांच्या पूर्वीच्या देशानें त्या इसमांकडून लष्करी नोकरी कायदेशीर हक्कानुसार करवून घेण्याचें ठरविल्यास त्याविरुद्ध संरक्षण देत नाहीं. उलटपक्षीं, युनायटेड स्टेट्स सरकार, नागरिकत्वत्यागाचा प्रत्येक मनुष्याला अनाहार्य असा हक्क असल्यामुळें स्वतःच्या नवीन नागरिकांच्या पूर्वीच्या देशांतहि संरक्षणाचा हक्क आहे असें मानतें मात्र पूर्वीचा देश सोडण्याच्या वेळीं शिक्षेस पात्र होण्याजोगा कांहीं गुन्हा त्या इसमानें केला असल्यास युनायटेड स्टेट्स सरकारकडून तेवढ्या बाबतींत त्याला संरक्षण मिळणार नाहीं. युनायटेड स्टेटस् देशांतल्याप्रमाणें फ्रान्स व जर्मनी यांचाहि कायदा आहे.

स. १८७० मध्यें पास झालेला 'दि नॅचरलायझेशन ॲक्ट' हल्लीं इंग्लंडांत चालू असून त्यांत असें एक कलम आहे कीं, नवीन बनलेल्या ब्रिटिश नागरिकास त्याच्या पूर्वीच्या देशांत ब्रिटिश सरकारकडून संरक्षण मिळणार नाहीं या कलमामुळें, ब्रिटनमध्यें नवीन नागरिकत्वाचा हक्क खरोखर मिळतच नाहीं, अशी टीका झालेली आहे. इंग्लंडच्या अशा कायद्यामुळें फ्रेंच सरकार असें मानतें कीं, इंग्लंडचें नागरिकत्व पत्करणाऱ्या फ्रेंच इसमाचें जुनें फ्रेंच नागरिकत्व नष्ट होत नाहीं. या मुद्द्याचें विवेचन बोर्गाइस केस (४१ चॅं. डि. ३१०), प्रो. डायसीचा लेख (५ लॉ क्वॉर्टर्ली रिव्ह्यू ४३८), सर थॉमस बार्क्लेचा लेख (४ लॉ. क्वा. रि. २२६), प्रो. वेस्टलेकचे ग्रंथ (इंटरनॅशनल लॉ–पीस दुसरी आवृत्ति पा. २३४) आणि प्रायव्हेट इंटरनॅशनल लॉ, (चवथी आ. पान ३५६) यांत सांपडेल. युनायटेड किंगडमच्या नागरिक असलेल्या बापाच्या परदेशांत जन्मलेल्या मुलाला ब्रिटिश नागरिकत्व मिळतें कीं नाहीं या प्रश्नामुळेंहि वरील मुद्द्याला महत्त्व आहे.

या बाबतींत आणखीहि एक महत्त्वाचा मुद्दा आहे. स. १८७० च्या नॅचरलायझेशन ॲक्टचें १६ वें कलम असें आहे कीं, ब्रिटिश साम्राज्यांतील कोणत्याहि भागानें त्या त्या भागापुरता नागरिकत्वाचा हक्क देण्यासंबंधानें कायदा करावा. या कलमाचा व्यापक अर्थ असा होतो कीं, ब्रिटिश साम्राज्याच्या कोणत्याहि भागाचें नागरिकत्व मिळालें म्हणजे तें

इसम सर्व ब्रिटिश साम्राज्याचा नागरिक बनतो. मात्र ब्रिटिश साम्राज्याच्या एखाद्या भागांत अशा नागरिकत्वाला विरोधी असे कायदे असतील ते मात्र लागू समजावे. एका ब्रिटिश विभागांतील इसमास दुसऱ्या ब्रिटिश विभागांत जमीन खरेदी करण्याचा हक्क नसणें, वगैरे निर्बंध मात्र जसे असतील तसे पाळावयास पाहिजेत. परंतु वरील कलमाचा संकुचित अर्थ करणारेहि कांहीं आहेत व ते म्हणतात कीं, ज्या ब्रिटिश विभागाचें नागरिकत्व असेल त्याखेरीज इतर ब्रिटिश मुलखांत त्या इसमाला ब्रिटिश नागरिकत्वाचे हक्क मुळींच नसतात.

हिंदुस्थानांत नागरिकत्वासंबंधानें स. १८३२ चा ब्रिटिश इंडियन नॅचरलायझेशन ॲक्ट नांवाचा कायदा आहे. तदनुसार हिंदी संस्थानांतील प्रजाजनांनां व ब्रिटिश साम्राज्याबाहेरच्या इतर कोणाहि परकी इसमाला ब्रिटिश इंडियांत नागरिकत्व मिळूं शकतें. मात्र हिंदी संस्थानांतील प्रजाजनांनां अनेक बाबतींत ब्रिटिश नागरिकांच्या बरोबरीनें नेहमींच वागविण्यांत येतें. ब्रिटिश इंडियांत नागरिकत्वाचा हक्क मुद्दाम निराळा संपादन करावा लागत नाहीं.

पुष्कळशा देशांत नागरिकत्वाचा हक्क नवीन संपादन करणाराची अगाऊ बराच काळ त्या देशांत वस्ती झालेली असावी लागते. अशा वस्तीची मुदत बेल्जम, युनायटेड किंगडम, नॉर्थ अमेरिका व रशिया या देशांत पांच वर्षांची आहे; फ्रान्स, ग्रीस व स्वीडन या देशांत तीन वर्षांची; अर्जेंटाइन रिपब्लिकमध्यें दोन वर्षांची आणि पोर्तुगालमध्यें फक्त एक वर्षाची आहे. जर्मनी, ऑस्ट्रिया व इटली या देशांत वस्तीसंबंधीं मुदतीची अट मुळींच नाहीं. उलटपक्षीं ऑस्ट्रिया देशांत दहा वर्षें वस्ती केल्यावर नागरित्व आपोआपच प्राप्त होतें,त्याकरितां निराळा अर्ज,मान्यता वगैरे कोणताहि विधि लागत नाहीं. युनायटेड स्टेट्समध्यें परकी इसमाला नागरिकत्व पाहिजे असल्यास तो उद्देश शपथपूर्वक जाहीर करावा लागतो; व त्यानंतर दोन वर्षांनीं यु. स्टेट्सच्या राज्यघटनेचा स्वीकार आणि इतर सर्व परकी राज्यसत्ताविषयींच्या राजनिष्ठेचा इनकार शपथपूर्वक जाहीर करावा लागतो; शिवाय यू. स्टेट्स देशांत चांगल्या वर्तणुकीनें पांच वर्षें वास्तव्य आणि ज्या संस्थानचें नागरित्व पाहिजे असेल त्यांत निदान एक वर्षाचें वास्तव्य झाल्याचें सिद्ध करावें लागतें आणि श्रेष्ठतादर्शक पदव्या ( टायटल ऑफ नोबिलिटी ) सोडून द्याव्या लागतात; इतकें केल्यानंतर यू. स्टेट्स देशाचें नागरित्व मिळूं शकतें. फ्रान्समध्यें नागरिकत्व संपादण्याकरितां, अगोदरच सतत दहा वर्षांचें वास्तव्य झालेलें नसल्यास, प्रथम सरकाची परवानगी घ्यावी लागते व त्यानंतर तीन वर्षांनीं नागरिकत्वाचा हक्क मिळण्याबद्दल अर्ज करतां येतो व त्यानंतर तें मिळालें कीं इतर कोणत्याहि देशांतलें पूर्वीचें नागरिकत्व रद्द झाल्याचें मानण्यांत येतें.

**नागर्त**—म्हैसूर संस्थानांतील एक जात. वस्ती (१९११) ७७८२. सुमारें चारपंचमांश लोक कोलार व बंगलोर जिल्ह्यांत रहातात. हे लोक व्यापारी असून बहुतेक सर्व शहरांत आढळतात. ते सोनें, कापड, कापूस, औषधें व धान्य यांचा व्यापार करतात. यांच्यापैकीं कित्येक विष्णुपूजक असून कित्येक शिवपूजकहि आहेत. शिवभक्त आपल्या गळ्यांत लिंग घालतात. पूर्वी ते कांजीवरम् येथें राहत असत. हे लोक यज्ञोपवीत धारण करतात. विवाहविधि व और्ध्वदेहिक कर्म ते ब्राह्मणांप्रमाणेंच करतात. मुलगी वयांत येण्यापूर्वीं तिचें लग्न झालें पाहिजे असा निर्बंध आहे.बहुपत्नीत्व रूढ असून व्यभिचाराच्या दोषावरूनच घटस्फोट करतां येतो.

**नागली** ( रागी )—एक जंगली वनस्पति. ही सखल प्रदेशांत सांपडते. हिमालय पर्वतावर ही ५०००पासून ८००० फूट उंचीवर आढळते. हिंदुस्थानांत ही विशेषेंकरून डोंगराळ प्रदेशांवर होते. या देशांत दक्षिण, पश्चिम व उत्तर येथील पहाडी जातींचें नागली हें मुख्य खाद्य आहे.संस्कृतमध्यें हिला राजिक व रागी हीं नावें असून, मारो, मांडो, माक्रा, मंडल, मंड्वा, मेख्य, नाचुइ, नचिरि, नागली, नाचणी, कोडौ, कोडा, कोड्रा, कयुर, केवर, केल्वरगु, कुत्र, कुरकन, रोट्‌क, रागी, रागुल्छ, तामिडेलु, तैंडुलु, बावटो वगैरे एतद्देशीय नांवें आहेत. वन्यस्थितींतून लागवडीचें पीक या दृष्टीनें जें संक्रमण झालें त्यास सुरवात हिंदुस्थानांतच झाली. रागीला अगदीं सरळ व बरीच कणसें येतात.

कोंकणांतील व घाटावरील प्रदेशांत रागीचें पीक पावसाळ्यांत येतें व तेथें बहुधां तें उथळ जमिनीवर पेरतात; व जेथें पावसाचें पाणी सारखें वाटलें जातें अशा चिकण मातीच्या जमिनीवर सुद्धां रागीचें पीक येतें.खडकाळ व रेताड जमिनीवर होणारें रागीचें पीक जवळ जवळ रानटी पिकाप्रमाणेंच असतें; हें पीक हलक्या प्रतीचें असतें. रागीच्या पिकाच्या बाबतींत बिहार--ओरिसाचा दुसरा नंबर लागतो. येथें ९ लाख एकर जमिनीवर हें पीक काढतात व त्याचें प्रमाण दर एकरीं १० मण याप्रमाणें आहे. बंगालमध्यें याचीं दोन पिकें काढतात; एक नोव्हेंबर–डिसेंबर महिन्यांत काढलें जातें व दुसरें त्याच्या आधीं तीन महिन्यापूर्वीं काढतात. पहिलें पीक तांबडें व दुसरें पांढरें असतें. रागीची लागण रोपें करतात.

संयुक्त प्रांत.–रागीच्या पिकाला महत्त्व नसून तेथें सुमारें १॥ लक्ष एकर जमीन या पिकाच्या उपयोगी आणतात. फक्त डोंगराळ प्रदेशांतच रागी धान्याला महत्त्व आहे. रागीच्या पिकाला अतिवृष्टीपासून धोका पोहोचतो. कोठें एप्रिल महिन्यांत तर कोठें कोठें मे अगर जून महिन्यांत रागीची पेरणी करतात. आक्टोबर अथवा नोव्हेंबर महिन्यांत रागीचें पीक तयार होतें.

पंजाब.—येथें रागी धान्याला फार थोडें महत्व असून तेथें २८ हजार एकर जमिनीपेक्षां जास्त जमीन या पिकाच्या

उपयोगी आणली जात नाहीं. रागीचें पीक बहुधां डोंगराळ प्रदेशांत होतें. रागी धान्य इतर धान्यांपेक्षां जास्त दिवस राहूं शकतें. सिमल्याच्या डोंगरी संस्थानांत रागीचें पीक बरेंच होतें. तेथें रागीचें पीक आक्टोबर महिन्यांत काढतात.

मुं ब ई व सिं ध.—पश्चिम हिंदुस्थानांतील मुलुख बराच डोंगराळ असल्यामुळें तेथें रागीचें पीक बरेंच येतें. या प्रांतांत सरासरी ६ लाख एकर जमीन या धान्याच्या लागवडीखालीं असते. खाद्य धान्यांत याचा पांचवा नंबर लागतो. खेडा, अहमदाबाद व गुजराथेंतील बडोदा जिल्हा या ठिकाणीं मळीच्या जमिनींत या धान्याचें पीक होतें. इतर ठिकाणीं उंच जमिनीवर हें पीक होतें. दुसऱ्या धान्याच्या पिकांत रागी पेरतात. कोंकणांतील व दक्षिणेंतील उंचवट्यावर असलेल्या जमिनींत रागी पेरतात. पहिल्यानें जमिनीवर झुडपें जाळून ती तयार करतात व नंतर तींत राख मिसळून रागी पेरतात. दर एकरास वजनी ७००—१६०० पौंड पीक येतें.

म द्रा स, म्है सू र व कू र्ग.—दक्षिण हिंदुस्थान हें रागीच्या पिकाचें मुख्य ठिकाण असून तेथें सुमारें २६ लक्ष एकर जमीन या पिकाच्या उपयोगांत आणली जाते, पैकीं निम्याहून जास्त म्हैसूरमध्यें आहे. दक्षिणेंतील मुसुलमान याला रागी म्हणतात व तामिळ लोक केविर म्हणतात. समाजांतील खालच्या दर्जाच्या लोकांचें रागी हें मुख्य धान्य आहे. म्हैसूरमध्यें ५५ लाख एकर जमीन लागवडींत आहे, तीपैकीं सुमारें अर्धी जमीन रागीच्या पिकाच्या उपयोगी आणली जाते. रागी पुष्टिदायक असून तिचे चार प्रकार आहेत. रागीचें पीक कालव्याच्या पाण्यानें अगर पावसाच्या पाण्यानें काढतात. ज्या ठिकाणीं कालव्याच्या पाण्यानें पीक काढलें जातें तेथें वर्षभर, पेरणें व पीक काढणें चाललेलें असतें. ज्या ठिकाणीं पावसाच्या पाण्यावर पीक काढतात तेथें (मेपासून जूनपर्यंत व आक्टोबरपासून डिसेंबरपर्यंतच्या) दोन मनसूनपैकीं एकाच्या पावसाच्या पाण्यानें पीक काढतात. रागीच्या कणसांचा ढीग करून दोन अगर तीन महिने ठेवितात व नंतर गुरांकडून तुडवितात.

उ प यो ग.—रागीचें पीक शेतांत बरेंच दिवस खडें राहूं दिलें तरी दाणा खराब होत नाहीं. सांठवून ठेविल्यानें रागी धान्यांत सुधारणा होते; व हें धान्य कीड लागल्याशिवाय अगर बुरसा आल्याशिवाय बरीच वर्षें राहूं शकतें. या कारणामुळें दुष्काळाकरितां याचा बराच उपयोग होऊं शकतो. ज्या जमिनीवर दुसऱ्या कोणत्याहि खाद्यधान्याचें पीक होणार नाहीं तेथें सुद्धां या धान्याचें बरेंच पीक होतें. अति गरीब लोक याचा दळून भाकरी करून खाण्याकडे उपयोग करतात. या धान्यापासून तयार केलेल्या दारूचा उल्लेख कित्येक ग्रंथकारांनीं केला आहे. महाराष्ट्रांत या दारूला बोजा अगर बोजली म्हणतात. हल्लींपेक्षां पूर्वीं या दारूचा बराच उपयोग होत असे. सर्व हिंदुस्थानांत ४०-४२ लक्ष एकर जमिनींत रागीचें पीक काढतात. पैकीं ३/४ दक्षिण हिंदुस्थानांतील आहे. पिकाचें प्रमाण दर एकरीं ५ पासून १० मण आहे. हिंदुस्थानांत पिकणारें सर्व रागी-धान्य हिंदुस्थानांतच उपयोगांत येतें. नागली थंड, रक्तपित्तनाशक व बलकारक आहे.

**नागवर्मा**—वेंगी देशांतील रहाणारा हा जैन होता. याचे ग्रंथः—( १ ) छंदस्; यांत संस्कृत व कानडी वृत्तांची माहिती दिली आहे. ( २ ) काव्यावलोकन साहित्यशास्त्रावरील ग्रंथ; ग्रंथाच्या पांच भागांचीं नांवें पुढीलप्रमाणें:—( अ ) रीतिकर्म, ( आ ) रसनिरूपण, ( इ ) शब्दस्मृति, ( ई ) काव्यमालावृत्ति व ( उ ) गुणविवेक ( ३ ) निघंटु; हा शब्दकोशग्रंथ वररुचि, हलायुध, भागुरी आणि अमरकोश यांच्या साहाय्यानें रचिला आहे. या ग्रंथांत मधून मधून शब्दार्थ कानडींत दिले आहेत.

**नागवेल**—ही स्त्री-पुं-केसर असलेली वेल असून मूळची जावा बेटांतील असावी. पानासाठीं म्हणून हिची हिंदुस्थानांतील व सिलोनमधील उष्ण भागांत लागवड करतात. यास पान, ताम्बुली, ताम्बूल, विड्याचें पान, नागवेल, नागवल्ली, वगैरे नांवें आहेत.

इ ति हा स.—मलायी भाषेंत हिला व्हेटिला अथवा व्हेरुला व पोर्तुगीज भाषेंत बेटर अथवा बेटल म्हणतात. हिंदुस्थानांत व इंडो-चायनांत वऱ्याच वर्षांपासून हीं पानें चुना, सुपारी व कात घालून खाण्यांत येतात. प्राचीन संस्कृत काव्यांतून तांबुलाचा उल्लेख येतो. १३ व्या शतकांतील मार्कोपोलो नांवाचा प्रवासी लिहितो कीं, हिंदी लोक 'तांबूल' खातात. अबदर-रझक (१४४२) व गार्सिआडीओर्टा (१५६३) यांनींहि पानासंबंधीं हकीकत लिहिली आहे.

ला ग व ड.—या वेलींना सारखें उष्णमान, हवेंतील आर्द्रता व नीट संगोपन यांची विशेष गरज लागते. कलमें लावून अथवा छायेंत वाढवून या वेलीचें संवर्धन करतात. कित्येक ठिकाणीं या वेलीसाठीं गवताचीं अथवा रुव्हाळ्याचीं छप्परें असलेलीं घरें बांधतात. कित्येक वेळां नागवेल झाडाच्या छायेंत लावतात. प्रत्येक भागांतील लागवडीची पद्धति वेगळी आहे.

प्रां त वा र मा हि ती, बंगालः—१९०४-०५ सालीं विड्याच्या पानाच्या लागवडीखालीं असलेल्या जमिनीचें क्षेत्रफळ ४३००० एकरांपेक्षां जास्त होतें. येथील विड्याच्या पानांच्या तीन जाती आहेत. दरवर्षी एक एकर जमिनींतून ८० लाख पानें निघतात व एका एकरास तीन वर्षांला १,४२२ रुपये खर्च लागतो.

संयुक्तप्रांतः—निवळ, ओलसर, उंच व उतार असलेली जमीन नागवेलीस चांगली असते. लावणी फेब्रुवारी ते एप्रिलपर्यंत होते. जूनच्या मध्यांत पानें तोडण्यास सुरवात करतात. वर्षभर पानें खुडतात. नंतर वेलीचीं पानें संपतात. त्या जमिनीस एक दोन वर्षेपर्यंत विश्रांति देतात. २०० पानांची 'ढोली' करून विकतात.

मध्यप्रांतः—येथील कपूरी नांवाच्या पानांची जात चांगली असून ती बहुतेक कलकत्त्यास पाठवितात. पानाचे मळे ह्या विशिष्ट जातीच्या ताब्यांत असतात व ते आपल्या मुख्याच्या मार्फत जमीनदारास सारा भरतात. लागवडीच्या पहिल्या वर्षास 'वोतुक' व दुसऱ्या परंतु महत्त्वाच्या वर्षास 'कोर्वा' म्हणतात. निमाड विभागांत एक वेळ लाविलेला मळा १० ते १२ वर्षेपर्यंत टिकतो. १०–१२ वर्षांनंतर मळा काढून तेथें ताग लावतात व कांहीं वर्षेपर्यंत मुबलक खत देऊन प्रत्येक दुसऱ्या वर्षी रब्बीचें पीक काढतात. जमीन पुन्हां पानमळयास योग्य होईपर्यंत हेंच चालू ठेवतात.

मुंबईः—१९०५–०६ सालीं ४,०४८ एकर जमीन पानाच्या लागवडींत होती. धारवाडमध्यें पानाचें पीक मुख्य समजतात. एक एकर जमिनींत सुमारें २००० वेल असून लागवड ४ पासून ७ वर्षेपर्यंत टिकते. पुणें भागांत पानाचें पीक महत्त्वाचें असून त्याला भरपूर खत व पाणी लागतें. चांगली काळजी घेतली असतां एक वेळ केलेली लागवड १५ ते २० वर्षेपर्यंत टिकते. कर्नाटकमध्यें पानाचे वेल आंब्याच्या झाडावर वाढवितात. चांगल्या वाढलेल्या वेलीपासून दर पंधरवड्यास १०० ते २०० पानें निघतात. ५०० वेल असलेल्या मळयांत दरवर्षी ४०००० पानें निघतात. त्यांची किंमत ४० रुपये येते व खर्च ८ रुपये होतो.

मद्रास व म्हैसूरः—येथें ही वेल मुख्यत्वेंकरून ओलसर भागांत होत असून सर्व इलाखाभर दृष्टीस पडते. तीन वर्षांचें हें पीक असून त्याला सतत पाटबंधाऱ्याचें पाणी लागतें. एक एकर जमिनींतून दोन वर्षांत ५ ते ७॥ हजार जुडगे ( ४०० पानें = १ जुडगा ) होतात. त्यांची ३०० ते ५०० रुपये किंमत येते.

ब्रह्मदेशः—येथें वेल चिंचेच्या झाडाखालीं लावितात व कित्येक वेळां छायेसाठीं केळी लावितात. पानें तोडण्यास दुसऱ्या वर्षापासून सुरवात करतात. ३ ते ५ वर्षेपर्यंत पानें अतिशय चांगलीं समजतात. ६ व्या वर्षी बहुतेक वेल कापून टाकतात. वेलाच्या रोपड्यांची दर हजारी किंमत १५ रुपये पडते. पानें २५ रुपयास अदमासें ३४१ पौंड (वजनी) मिळतात. जमिनीचा सारा वर्षास २२ रुपयेप्रमाणें पडतो. दर एकरास सुमारें ३५० रुपये नफा पडतो.

पा ना चा व्या पा र.—पानें खाण्याची संवय सर्वत्र आहे. ही संवय विशेषेंकरून शहरांत आढळते. त्यामुळें बरीच लांबून पानें येतात. मध्यप्रांतांतून कलकत्ता व मुंबई येथें बराच पानांचा पुरवठा होतो. अंतर्गत व्यापारासंबंधीं सरकारी आंकडे नाहींत. पानांचा व्यापार परदेशाशीं बिलकुल होत नाहीं. [ वाट–कमर्शिअल प्राडक्ट्स इन् इंडिया; मुकर्जी–हँडबुक, इंडियन अॅग्रिकल्चर, १९०१; रॉय—क्रॉप्स ऑफ बेंगॉल; राईस—म्हैसूर ग्याझे. ]

**नांगाम**—मुंबई, रेवाकांठामधील लहानसें संस्थान. क्षेत्रफळ ३ चौरस मैल. यांत चार गांवें आहेत व तीं चौघां भागीदारांकडे आहेत, त्यामुळें हे संस्थानिक म्हणजे केवळ शेतकरी दिसतात.

**नागामेव**—मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा. गदगच्या आग्नेयीस पांच मैलांवरीलं एक खेडें. येथील महाबळेश्वराच्या देवळांत इ. स. १२०७, १२११, १२१४ आणि १२५५ या सालचे चार शिलालेख आहेत.

**नागार्जुन**—याचा जन्म दक्षिणेंत कृष्णाकांठीं, शैल पर्वताजवळ झाला. हा जातीचा ब्राम्हण होता. हा विदर्भ देशचा होता असेंहि कांहींचें म्हणणें आहे. ह्याचा पहिला गुरु राहुलभद्र नांवाचा सनातनधर्मी ब्राह्मण होता. त्याची गीतेवर श्रद्धा होती व त्यामुळेंच महायानपंथांत भक्तियोग आढळतो. यास मूळ आधार गीतेचा आहे असें प्रो. कर्न याचें म्हणणें आहे. नागार्जुन फार विद्वान असून त्यानें पुष्कळ प्रवास केला. त्यानें बौद्ध धर्म स्वीकारला व पहिलीं तीन सूत्रें पठण केल्यावर हिमालयांत जाऊन चवथें सूत्र एका वृद्ध भिक्षूपासून मिळविलें. पुढें त्याला नागराजानें पाताळांत नेऊन आणखी बौद्ध ग्रंथांचें ज्ञान करून दिलें अशी दंतकथा आहे. नागार्जुनानें दक्षिणेमध्यें बौद्ध धर्माचा पुष्कळ प्रसार केला. हा महायानपंथाचा प्रवर्तक असून कनिष्काचा समकालीन होय. त्यानें "बुद्धाचा श्रेष्ठ मार्ग" व "भूतदयेची मीमांसा" असे दोन ग्रंथ लिहिले व आणखीहि कांहीं ग्रंथरचना त्यानें केली. चिनी तिपिटकांत याचे २४ ग्रंथ सांगितले आहेत. जरी नागार्जुनाच्या नांवावर पुष्कळ ग्रंथ दिसतात तरी ते चिनी किंवा तिबेटी या दोन्ही भाषांत नसून कोठेंहि सांपडत नाहींत. त्यानें पुष्कळ ब्राह्मणांनां बौद्ध धर्माची दीक्षा दिली. त्याचा जन्म अर्जुन वृक्षाखालीं झाला होता व त्याला नागानें धर्मतत्त्वें समजावून दिलीं म्हणून त्यास नागार्जुन असें नांव मिळालें. बुद्धापासून हा तेरावा पुरुष होता. नागार्जुन व नागसेन हे एक नसून भिन्न आहेत. नागसेनाचा काल ख्रि. पू. १४० आणि नागार्जुनाचा इ. स. चें दुसरें शतक ( शेवटचा पाद ) होय असें बील म्हणतो.

सर्व उत्तर हिंदुस्थानांत नागार्जुनाला "तद्विशिष्ट गुणविहीन बुद्ध" म्हणत; त्याच्या ग्रंथांनां खुद्द बुद्धाच्या सूत्रांइतका मान मिळे. कथासरित्सागर ग्रंथांत नागार्जुनाच्या पुष्कळ चमत्कारांच्या गोष्टी दिल्या आहेत.

नागार्जुन हा भारतीय रसायनशास्त्रांतील एक मोठा शोधक होऊन गेला. मंत्र–तंत्र–रसविद्या व 'पादुकासाधन' यांत तो प्रवीण होता अशी दंतकथा आहे. या रसविद्येसाठींच तो सनातनधर्म सोडून जैन झाला असें म्हणतात. गदग गांवाजवळील एक पर्वत त्यानें सोन्याचा केल्यामुळें व ही किमया तो सर्वांनां सांगूं लागल्यामुळें देवांनीं त्यास ठार केलें अशी कथा आहे. तो म्हणे "भ्रंग बेंयिलिल्ल। वंग बलियलिल्ल। रस निल्ललिल्ल। सुट्ट कंगेट्टु हाळनादे भिक्षांदेहि" ( म्हणजे, अभ्रक शिजला नाहीं, वंगाचा स्तंभ झाला नाहीं.

व रस अमींत टिकला नाहीं, म्हणून मी भीक मागत आहे, भिक्षा घाला ). यानें कानडींत व संस्कृतांत रसविद्येवर अनेक ग्रंथ लिहिले आहेत म्हणतात. हाचं नागार्जुन पुढें जैन धर्म सोडून बौद्ध बनला असावा. नंदिसूत्रें व आवश्यकसूत्रें यांत याचा उल्लेख आहे. तसेंच ह्युएनत्संगहि याचें नांव घेतो. यानें न्याय, तर्क, वैद्यक वगैरे अनेक शास्त्रावर ग्रंथ केले. सतीशचंद्र विद्याभूषण हे याला हिंदुस्थानचा अरिस्टॉटल म्हणतात.

ना गा र्जु न व प्र ज्ञा पा र मि ता.—हीनयानपंथीय लोक म्हणतात कीं, एक लाख श्लोकांचा प्रज्ञापारमिता ग्रंथ म्हणजे सर्वांत लहान महायानसूत्र असून तो नागार्जुनानें केलेला आहे. ह्या म्हणण्यांतील सत्यांश इतकाच दिसतो कीं, नागार्जुनाच्या पंथांतील हें एक प्रक्षिप्त सूत्र आहे. कारण, सकल प्रज्ञापारमितांप्रमाणेंच यांतहि नागार्जुनानें काढलेल्या माध्यमिक पंथाच्या तत्त्वांची असंख्य वेळां पुनरावृत्ति आलेली आहे. या सूत्रांच्या संवादांमध्यें जें कांहीं दुर्बोध आहे तेंच माध्यमिककारिकांमध्यें अथवा नागार्जुनाच्या माध्यमिक सूत्रांमध्यें अधिक पद्धतशीररीतीनें व जरा अधिक स्पष्ट करून सांगितलें आहे.

ब्राह्मणवर्गानें कारिकापद्धतीनें जें शास्त्रीय वाङ्मय लिहिलेलें आहे तशा प्रकारचेंच हें पद्धतशीररीतीनें लिहिलेलें तत्त्वज्ञानावरील पुस्तक आहे. त्यावर नागार्जुनानें स्वतः लिहिलेली 'अकुतोभया' नांवाची टीका ही हल्लीं संस्कृत भाषेंत उपलब्ध नाहीं, मात्र तिबेटी भाषेंत झालेल्या भाषांतरावरून तिची माहिती मिळते. अजमासें सातव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेलेल्या चंद्रकीर्ति नांवाच्या लेखकाची एक संस्कृत टीका मात्र सांपडते.

माध्यमिककारिकांशिवाय दुसरेहि पुष्कळ ग्रंथ नागार्जुनाचे म्हणून प्रसिद्ध आहेत, पण त्याचा खरा निर्णय लागत नाहीं. धर्मसंग्रह हा ग्रंथ त्याचा आहे असें म्हणतात; त्यांत बौद्ध संप्रदायाच्या पारिभाषिक शब्दांची यादी आहे. हा संस्कृत ग्रंथ उपलब्ध आहे. नागार्जुनानें एका राजाला लिहिलेलें ' मित्राचें पत्र ' किंवा सुहल्लेख मात्र मूळ तिबेटी प्रतीवरून केलेल्या इंग्रजी भाषांतरावरून माहीत झालेला आहे; चिनी साधनांवरून हा शालिवाहन असावा असें दिसतें. ऐतिहासिक तिबेटी लोक त्याला उदयन म्हणतात; त्यांत १२३ श्लोकांत बौद्धधर्माचीं मुख्य तत्त्वें दिलेलीं आहेत. परंतु यांत पालींतील धर्मतत्त्वांत आलेलें नाहीं असें कांहीं नाहीं; आणि कांहीं श्लोक तर धम्मपद व तत्सदृश इतर ग्रंथ यांतील श्लोकांप्रमाणें अक्षरशः आहेत; आणि इतर ब्राह्मणवर्गाच्या परिपाठांतल्या श्लोकांशीं सदृश आहेत. ईत्सिंग नांवाच्या चिनी यात्रेकरूनें नागार्जुनाच्या या ग्रंथाची फार स्तुति केली आहे; व असाहि तो उल्लेख करतो कीं, त्यावेळीं तो ग्रंथ हिंदुस्थानांत लोकांच्या वाचनांत व पठणांत पुष्कळ होता. कुमारजीवानें नागार्जुनाचें एक चरित्र लिहिलेलें आहे, त्याचें चिनीमध्यें भाषांतर ( इ. स. ४०५ च्या सुमारास ) झालेलें आहे. त्यांत असें लिहिलें आहे कीं, नागार्जुन दक्षिण हिंदुस्थानांत ब्राह्मणकुलांत जन्मला होता, त्यानें चारहि वेदांचें व सर्व शास्त्रांचें अध्ययन केलें होतें. शिवाय तो मोठा मांत्रिक होता. मंत्रविद्येच्या साहाय्यानें तो स्वतः अदृश्यहि होऊं शकत असे; एकदां त्यानें आपल्या तीन मित्रांसह राजाच्या राजवाड्यांत प्रवेश केला व तेथील स्त्रियांवर बलात्कार करण्यास सुरवात केली. इतक्यांत त्यांचें तें कृत्य उघडकीस आलें, आणि नागार्जुनाच्या त्या तीन मित्रांस ठार मारण्यांत आलें; नागार्जुनाला मात्र भिक्षु होण्याच्या शपथेवर सोडून देण्यांत आलें व त्यानें आपली शपथ पुरी केली. नव्वद दिवसांत तिन्ही पिटकांचा अभ्यास करून त्यानें त्यांच्या अर्थाचा पूर्ण बोध करून घेतला. तथापि एवढ्यानें त्याचें समाधान झालें नाहीं, म्हणून इतर सूत्रग्रंथांचा तपास सुरू केला असतां, त्याला हिमालयांत एका अतिवृद्ध भिक्षूपासून महायानसूत्र प्राप्त झालें.

एका नागराजाच्या मदतीनें त्याला त्या सूत्रावरील एक टीकाहि मिळाली. नंतर त्यानें दक्षिण हिंदुस्थानांत बौद्ध धर्माचा प्रसार जोरानें सुरू केला. चरित्रकार म्हणतो कीं, तीनशें वर्षे त्यानें धर्मप्रवर्तनाचें काम केलें. चिनी लोकहि तो सहाशें वर्षे जगला असें मानतात.

या दंतकथेंत सत्याचा भाग इतकाच दिसतो कीं, अश्वघोषाप्रमाणेंच नागार्जुन मूळ ब्राह्मण होता. कारण ब्राह्मणी शास्त्रांशीं त्याचा परिचय होता असें त्याच्या ग्रंथांवरून दिसतें. बौद्धधर्मान्तर्गत महायानपंथांतील एक महत्त्वाच्या शाखेचा संस्थापक या नात्यानें त्याला मोठा अधिकार प्राप्त झालेला असला पाहिजे, व त्यामुळें त्यानंतर कित्येक शतकें, लोकांनां विशेष मान्य असलेले ग्रंथ नागार्जुनाच्या नांवावर मोडत असावेत. महायानपंथाचा संस्थापक म्हणून जें त्याला पुष्कळ वेळां म्हणतात त्याबद्दलहि शंका आहे, कारण महायानपंथाचें तत्त्व व ग्रंथ इ. स. च्या पहिल्या शतकांतच अस्तित्वांत असले पाहिजेत. दुसऱ्या शतकांत तर महायान ग्रंथांचीं चिनीमध्यें भाषांतरेंहि होऊन गेलेलीं आहेत; आणि महायान–बौद्ध–धर्माची गांधार--कला ख्रिस्ताच्या जन्मकालापासून चवथ्या शतकापर्यंत परिणत झालेली आहे.

[ सद्धर्मपुंडरीक; तारानाथ; अय्यंगार–एन्शन्ट इंडिया; स्मिथ-ऑक्स॰हिस्टरी ऑफ इंडिया; वॉटर्स-युआनचंग. पु. २; हिरालाल–इन्स्क्रि. सी. पी. अँड बेरार; इंडि. अँटि. पु. १५; विंटरनिट्झ—इंडियन लिटरेचर; जर्नल बुद्धिस्ट टेक्स्ट सोसायटी १८९७. ]

**नागासाकी**—हें जपानमध्यें किउशिउ बेटावर एक शहर आहे. उ. अ. ३२° ४४' व पू. रे. १२९° ५२.' येथील लोकसंख्या ( १९१६ ) १३६८०० आहे. दक्षिणेकडून किंवा पश्चिमेकडून जपानास येणाऱ्या गलबतांचें हें पहिलें बंदर आहे. लोखंडासारख्या नौकाबंधनोपयोगी वस्तूंची येथें आयात होत असून समुद्रांतील वस्तू, कोळसा व कापूस यांची

येथून निर्गत होते. येथें मिटसू बिशी कंपनीच्या तीन गोद्या असून ६००० टनांपेक्षां मोठीं जहाजें येथें बांधण्यांत येतात. नागासाकीजवळ हवेचीं बरींच ठिकाणें असून उंझेन येथें गंधकमिश्रित उष्ण झरे आहेत.नागासाकी हें एक लहानसें खेडें होतें. पण १६ व्या शतकानंतर जपानांतील ख्रिस्ती धर्माचें केंद्रस्थान होऊन डच व चिनी व्यापाऱ्यांमुळें ह्याची बरीच भरभराट झाली. मॉजु बंदर उघडल्यापासून व रशियानें पोर्ट आर्थर व जर्मनीनें कियाचौ घेतल्यापासून या बंदराचें महत्त्व बरेंच कमी झालें आहे.

**नांगुनेरी**, ता लु का.—मद्रास, तिनेवेल्ली जिल्ह्यांतील दक्षिणेकडील तालुका. क्षेत्रफळ ६९४ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) २३५२१०. यांत २ शहरें ( नांगुनेरी व वडक्कू-वल्लीयूर ) व २३१ खेडीं आहेत. येथें वायव्येकडील भागांत पुष्कळ तळीं असून दक्षिणेकडे बऱ्याच विहिरी आहेत. पश्चिम घाटानजीक पश्चिम मन्सून वाऱ्यांपासून पर्जन्य येतो.

गां व.—तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें तिनेवेल्लीहून १८ मैलांवर आहे. लोकसंख्या (१९११) ८४९६. येथें वान मामलइ जीर (वैष्णवांतील तेंगलई पंथाचा मुख्य) यांचा मठ आहे. या मठाच्या सत्तेखालीं एक मोठी देणगी असलेलें एक देऊळ आहे. नांगुनेरीजवळील मरुगलकुरिची येथें मरव्हन लोक बरेच राहातात. स्थानिक न्यायाचें काम पंचायती करतात.

**नागेरकोइल** ( नगरकोविल—सर्पाचें देवालय )—मद्रास, त्रावणकोर संस्थान. अगस्तीश्वरम् तालुक्यांतील शहर. लोकसंख्या (१९११) २९८८३; पैकीं २००४५ हिंदु, २५७० मुसुलमान व ३१६७ ख्रिस्ती. पूर्वी हें संस्थानचें मुख्य ठिकाण होतें. येथें कालेज, शाळा व दवाखाना आहे. येथें 'अभिमानी' हें तामिल साप्ताहिक व "त्रावणकोर टाईम्स" हें इंग्रजी साप्ताहिक निघतें.

**नागेली, कार्ल विल्हेम व्हॉन** ( १८१७–१८९१ )—हा स्विस वनस्पतिशास्त्रज्ञ २७ मार्च १८१७ मध्यें जन्मला. त्यानें जिनोवा येथें वनस्पतिशास्त्राचा अभ्यास करून झुरिच येथें स. १८४० मध्यें पदवी मिळविली. सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें वनस्पतींचा अभ्यास येना येथें एम्. जे. श्लीडेन या विद्वानानें चालविला होता, त्या ज्ञानक्षेत्रांत नागेलीनें संशोधनास सुरवात केली. झुरिच येथें तो प्रोफेसर झाला; नंतर स. १८५२मध्यें फ्रीबुर्ग-इन-ब्रीसगौ येथें व स. १८५७त म्युनिच येथें वनस्पतिशास्त्राचा प्रोफेसर म्हणून त्यानें नोकरी धरली आणि मरेपर्यंत म्युनिच येथेंच राहिला.त्यानें वनस्पतिशास्त्रांत नवे शोध लावून अनेक निबंध लिहिले, ते स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले.

**नागेश भिंगारकर**—हा वामन पंडिताचा समकालीन ( १६६५ ) व त्याच्याप्रमाणेंच श्लोकबद्ध रचना करणारा अहमदनगर जिल्ह्यांतील भिंगारचा वृत्तवंशी जोशी. हा पढिक विद्वान नव्हता; सहजस्फूर्तीचा व समाधानी वृत्तीचा होता. बापाचें नांव मोरोपंत व आईचें जानकी; आडनांव मुळे. याची कविता साधी, यमकपरिपूर्ण व मधुर असते. मात्र पाल्हाळिक व काल्पनिक फार. यानें चंद्रावळी, सीतास्वयंवर, रसमंजरी, शारदाविनोद वगैरे काव्यें केलीं आहेत. नागेश नांवाचा एक शाहीर रामजोशाच्या वेळीं प्रख्यात होता. [ कविचरित्र; सं. क. का. सूचि ].

**नागोजीभट्ट**—हा महाराष्ट्रीय ब्राह्मण असून काशीक्षेत्रीं रहात असे. याच्या बापाचें नांव शिवभट्ट व आईचें सईबाई ( सती ) होतें. हा आश्वलायनशाखाध्यायी असून याचीं काळे व उपाध्याय अशीं दोन उपनामें होतीं.प्रसिद्ध वैय्याकरण व सिद्धांतकौमुदीकर्ता भट्टोजी दीक्षित यांचा नातु हरी दीक्षित हा याचा गुरु होता. पायगुंडे उपनांवाचा शब्देंदुशेखरटीकाकर्ता वैद्यनाथ हा याचा शिष्य होता व शृंगवेरपुरचा राजा रामवर्मा हा याचा आश्रयदाता होता.

नाव्यनामक विद्यालयांत असलेल्या ग्रंथांत याचें आवांतर वृत्त येणेंप्रमाणें लिहिलेलें आढळतें: यानें लहानपणीं वेदाध्ययन करून मग याज्ञीक शिकला आणि त्यावर निर्वाह करूं लागला. पुढें असें झालें कीं, त्यावर याचा निर्वाह नीट होईना. म्हणून हा कृष्णातीरीं वांईस आला व येथील विद्यालयांत पढूं लागला. तेथें यानें काव्याचें व इतर ग्रंथांचें अध्ययन केल्यावर हा काशीस गेला. त्यावेळेस याच्या वयास ४० वें वर्ष होतें. तरी यानें व्याकरणशास्त्राकडे अतिशय लक्ष देऊन भट्टोजी दीक्षितांचे सर्व ग्रंथ मन लावून अवलोकन केले. पुढें मंत्रशास्त्राचा अभ्यास केला व वयाच्या ५० व्या वर्षी मार्कंडेयपुराणांतील सप्तशतीवर टीका लिहिली. याप्रमाणें झाल्यावर पतंजलीच्या महाभाष्यावर यानें पतंजलीसूत्रवृत्ति या नांवाची व्याख्या लिहिली. यानें व्याकरण व इतर शास्त्रें यांवर मोठाले ग्रंथ लिहिले व ते सर्व हल्लीं उपलब्ध आहेत.

ग्रं थ र च ना.—( १ ) भाष्यप्रदीपोद्योत; हा कैयटाच्या टीकेसहित व्याकरण महाभाष्यावर टीकारूप ग्रंथ आहे. (२) लघुशब्देंदुशेखर हा कौमुदीवरील टीकारूपानें आहे. (३) बृहच्छब्देंदुशेखर; यामध्यें सिद्धांत व वादोपयोगी कोटिकक्षाक्रम विशेष आहे. ( ४ ) प्रायश्चित्तेंदुशेखर; हा धर्मशास्त्रावर आहे. ( ५ ) परिभाषेंदुशेखर; यांत व्याकरण व शास्त्रोपयोगी परिभाषा असून ( ६ ) लघुमंजूषा; हा व्याकरणशास्त्राच्या अर्थविचाराविषयीं आहे. (७) बृहन्मंजूषा यांतील विषय लघुमंजूषेप्रमाणेंच आहे. ( ८ ) लघुशब्दरत्न; हा मनोरमेवर व्याख्यारूप आहे. ( ९ ) बृहच्छब्दरत्न; हाहि मनोरमेवरच आहे. परंतु ( १० ) अशौचनिर्णयः हा धर्मशास्त्रप्रकरणावर आहे. यांत मृताशौच ( सुतक ) आणि जननाशौच ( सोएर ) हे कसे धरावेत याचा निर्णय आहे.

याप्रमाणें हा प्रख्यात कवि उत्तर हिंदुस्थानांत जें शृंगवेरपूर आहे तेथील रामराजाच्या आश्रयास होता: त्यावेळेस वरील सर्व ग्रंथ यानें लिहिले. हा आपल्या वयाच्या ६२ व्या वर्षी काशीक्षेत्रीं मरण पावला असें म्हणतात.

**नागोजी माने**—हा सातारा जिल्ह्यांतील म्हसवडकर मान्यांचा मूळपुरुष. याचा बाप रताजी; हा विजापुरकराचा नामांकित सरदार होता. जयसिंग व दिलेरखान यांनीं विजापुरावर केलेल्या स्वारींत रताजीनें चांगला प्रतिकार केला ( १६६५ ). रताजीच्या देखतच नागोजीस सरदारी मिळाली. पुढें नागोजी हा बेबनाव होऊन औरंगझेबास मिळाला व त्यानें मराठ्यांच्या विरुद्ध कामें केलीं. जिंजीस राजाराम असतां त्यानें याची समजूत केली व यास आपल्याकडे मिळवून घेतलें. याचा मोर्चा किल्ल्याच्या चंद्रपुरी दरवाजाजवळच होता त्यामुळें राजारामास किल्ल्यांतून निसटून जाण्यास मदत केली. त्याबद्दल त्यास म्हसवडची देशमुखी इनाम मिळाली. नागोजीचा सासरा, संताजी घोरपडे याच्या हाताखालीं होता. त्याच्या हातून गैरशिस्त वर्तन झाल्यानें संताजीनें त्याला ठार केलें. तो द्वेष मनांत आणून संताजी व धनाजी यांची लढाई जुंपली असतां व संताजी एकाकी सांपडला असतां ( बायकोच्या आग्रहानें ) नागोजीनें म्हसवडजवळच्या कारखाळ्याच्या रानांत संताजीचा दग्यानें खून केला व त्याचें डोकें औरंगझेबाकडे पाठविलें. त्याबद्दल औरंगझेबानें नागोजीस इनाम दिलें. या नागोजीच्या नीच कृत्याचा खाफीखानानेंहि निषेध केला आहे. यानंतर नागोजी राजारामास मिळाला. [ जेधे शकावली; राजारामाचें चरित्र; म. रि. भा. १. ]

**नागोद, संस्थान.**—मध्यहिंदुस्थान, बाघेलखंडच्या पोलिटिकल एजन्सींतील एक सनदी संस्थान. उ. अ. २४° १२' ते २४° ३९' व पू. रे. ८०° २८' ते ८०° ५३'. क्षेत्रफळ ५०१ चौरस मैल. १८ व्या शतकापर्यंत नागोदचें उंचहर असें नांव होतें. यांत सतना व हिल्ला मिळणाऱ्या लहान लहान नद्या वाहतात. हा प्रांत बहुतेक वालुकामय आहे. कोठें कोठें चुन्याच्या दगडाच्या टेंकड्या पाहाण्यांत येतात. येथून चुन्याचा दगड दूर दूर ठिकाणीं जातो. भ( र )हुंत स्तूप नांवाचा खांब बांदेर नांवाच्या वाळूच्या दगडांचा केलेला आहे.

नागोदचे संस्थानिक अग्निकुलांपैकीं परिहार ज्ञातीचे आहेत व यांचें परंपरागत स्थान अबू पर्वतावर आहे. यांचा बुंदेलखंडांतील इतिहास चांगला उपलब्ध नाहीं. ७ व्या शतकांत बुंदेलखंडावर गहरवार लोकांचें वर्चस्व होतें पण पश्चिमेकडून परिहार रजपुतांनीं स्वारी करून त्यांनां वश करून घेतलें. पुढें चंदेलघराण्यानें परिहारांनां अंकित केलें व कांहीं रजपूत आणखी पुढें बाघेलखंड येथें गेले व राजा धार यानें तेली राजाजवळून स. १३४४ त नारो किल्ला घेतला. इ. स. १४७८ त राजा भोजनें उंचहरा घेतलें व येथेंच, स. १७२० त राजा चैतसिंगनें नागोद येथें राजधानी नेईपर्यंत राजधानी होती. पुढें त्यांचा बहुतेक प्रांत बुंदेल्यांनीं डिंवा बाघेल्यांनीं घेतला व इल्लींचा थोडासा प्रदेश त्यांनां शरण गेल्यामुळें बचावला.

स. १८०२ च्या वसईच्या तहानंतर पन्ना संस्थानांतच याचा समावेश होत असे परंतु, ज्याअर्थी हें छत्रसालच्या उदयापूर्वी स्वतंत्र होतें त्याअर्थी स. १८०९ त या संस्थानाला शिवराजसिंगाच्या वेळेस वेगळी सनद दिली. यानंतर स. १८१८ त बलभद्रसिंग हा त्याचा गादीवर मुलगा आला पण भावाच्या खुनाच्या आरोपावरून तो पदच्युत केला गेला. याच्यानंतर राघवेंद्र (अज्ञान) गादीवर आला व याला स. १८३१ त सत्ता मिळाली. बंडांत हा फारच इमानदारीनें वागल्यामुळें व सरकारला मदत केल्यामुळें याला धानवाही हा परगणा मिळाला. इ. स. १८३१ त याला दत्तक घेण्याची सनद मिळाली व हा इ. स. १८७४ त मेला. यानंतर जाधवेंद्रसिंग गादीवर आला. याच्या गैरव्यवस्थेमुळें याचे अधिकार इ. स. १८९४ त काढून घेण्यांत आले; परंतु स. १९०४ त पुन्हां हा कांहीं वर्षासन घेण्याचें कबूल करून काशीहून येऊन सतन्याला राहूं लागला. याला 'राजा' ही पदवी असून ९ तोफांच्या सलामीचा मान आहे.

या संस्थानांत पुराणवस्तू बऱ्याच आहेत. फार जुने रस्ते म्हणजे दक्षिण हिंदुस्थानहून कौशांबी व श्रावस्ती यांनां जाणारे रस्ते कदाचित् येथें भ(र)हुंतजवळ मिळत असावेत. येथें एक बौद्ध स्तूप दृष्टोत्पत्तीस आला. त्याचे कांहीं भाग कलकत्त्याच्या पदार्थसंग्रहालयांत आहेत. एका दरवाज्यावर शुंग घराण्याचा थोडासा इतिहास सांपडतो. एके ठिकाणीं मध्ययुगांतील देऊळहि सांपडलें आहे. इतर ठिकाणें म्हणजे लाल पहाड नांवाची टेंकडी; येथें ११५८ त कलचुरी घराण्याचा इतिहास आहे; शंकरगढ; खोह नांवाची तेली राजाची जुनी राजधानी; येथें ४७५ ते ५५४ चे लेख सांपडतात. भूमर; मझगवान, करीतलई व पटेनी देवी; येथें गुप्त चालीचें एक देवालय आहे.

लोकसंख्या ( १९२१ ) ६४०९७. यांत उंचहर हें एकच व जुन्या राजधानीचें शहर व ३३६ खेडीं आहेत. मुख्य भाषा बुंदेलखंडी आहे. पिकें तांदूळ, कोंदो, हरभरे, ज्वारी, सामन व काकुन हीं होत. शेंकडा ३ लोकांनांच फक्त लिहितांवाचतां येतें.

**खेडें.**—संस्थानचें मुख्य ठिकाण. उ. अ. २४° ३४' व पू. रे. ८०°३६'. हें अमरान नदीवर बसलें आहे. लोकसंख्या ( १९०१ ) ३८८७. याचें नांव "नागवध" नांवाच्या नागोद संस्थानिकांच्या पूर्वजांनीं केलेल्या नाग लोकांच्या कत्तलीवरून पडलें असावें. येथें एक शाळा व दवाखाना आहे.

**नागौर**—राजपुताना, जोधपूर संस्थान. याच नांवाच्या जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या. ( १९११ ) १२९६०. येथें लोखंडी व पितळेचीं भांडीं, उंटांचीं खोगिरें, हस्तिदंती खेळणीं वगैरे होतात. हें शहर नाग रजपुतांनीं वसविलें असावें व म्हणून असें नांव पडलें आहे. हें अनुक्रमें पृथ्वीराज, घोरी व जोधपूरचे संस्थानिक यांच्याकडे होतें. कांहीं

दिवस मात्र विकानेरच्या राजाला हें अकबराकडून मिळालें होतें. या शहराभोंवतीं भिंत आहे. ही सुमारें १७ फूट उंच व २½ ते ५ फूट रुंद आहे. तटबंदीवर बरेच मुसुलमानी लेख आहेत. येथें देवळें पाहण्यालायक आहेत. किल्ल्याच्या भोंवतीं दुहेरी भिंत आहे. पायथ्याशीं या भिंतीची जाडी ३० फूट असून टोंकावर १२ फूट आहे. येथील बैल फार सुप्रसिद्ध आहेत. येथून पूर्वेस २० मैलांवर मंगलोद येथें संस्कृत लेख असलेलें ( इ. स. ६०४ ) एक देवालय आहे. जोधपुरांत मिळालेल्या लेखांत हा जुना आहे.

**नांग्वान**—ब्रह्मदेश, दक्षिण शान संस्थानांतील मध्यभागांत असणारें लहानसें संस्थान.उ.अ. २०°३३' ते २०°३६ व पू. रे. ९७°१०' ते ९७°२२'. क्षेत्रफळ ४२ चौरस मैल. लोकसंख्या ( १९०१ ) ४८०५. यांत लोईसैंग नांवाचें सर्वांत उंच शिखर ( ८००० फूट ) आहे. मुख्य (पिकें कालव्यांनीं उत्पन्न केलेलीं ) तांदूळ,केळीं, व भुइमूग हीं आहेत. नांग्वान हें मुख्य शहर आहे.

**नाची**—प्रख्यात तेलगू पंडित इलेश्वरोपाध्याय ( पहा ) याची मधली मुलगी. असून ही बालविधवा होती. नाची प्रथम मंदबुद्धि व संसारासक्त असे पण इलेश्वरोपाध्यायानें केलेलें ज्योतिष्मती (मालकांगोणी)चा कल्प घेतल्यापासून हिची बुद्धि अत्यंत तीव्र झाली व अल्पच काळांत शास्त्रांतील अनेक विषयांत ती इतकी पारंगत झाली कीं, त्यावर ती व्याख्यानेंहि देऊं लागली.पुढें थोड्याच दिवसांनीं तिनें संस्कृतांत एक नाटक रचिलें. त्यांत तिनें आपलें जन्म झाल्यादिवसापासून वैधव्य व विद्याभ्यास येथपर्यंत सविस्तर व वीररसप्रधान वर्णन फारच उत्कृष्ट लिहून वापास दाखविलें. तें त्यास पसंत होऊन त्यानें त्या नाटकास 'नाची' हें नांव दिलें.

हिनें काशी, मथुरा इत्यादि ठिकाणच्या सर्व पवित्र यात्रा केल्या. ही दिल्ली, जयपूर इत्यादि शहरांतहि गेली होती. तेथें हिच्या गुणावर हिला तेथील राजांनीं अनेक बक्षिसें दिलीं.

**नाझरेथ** ( आधुनिक-एन् नासिरा ).—हें गांव गॅलिलींत एसड्रीलॉन मैदानाच्या दक्षिण सरहद्दीवर असलेल्या टेंकड्यांच्या मध्यें होतें. येथेंच ख्रिस्ताचा बाळपणांतील काळ गेला. या गांवांतील पाण्याचा झरा ( सेंट मेरीचा कूप ) ख्रिस्ताच्या वेळचा असावा.इ. स. ६०० च्या सुमारास येथें एक मोठें मंदीर होतें. ११८७ सालीं हें सलाद्दीननें घेतलें. १५१७सालीं हें शहर तुर्कांच्या हातीं आलें.येथें सुमारें३५०० मुसुलमान व ६५०० ख्रिस्ती लोक आहेत. येथें शाळा व रुग्णालयें वगैरे लोकोपयोगी संस्था आहेत. येथील धर्मप्रसिद्धीचें मंदिर अजून दाखवितात.

**नाझारेथ**—मद्रास इलाख्यांत तिन्नेवेली जिल्ह्यांतील श्रीवैकुंठम् तालुक्यांतील एक खेडें. हें पालमकोटापासून २२ मैल आहे.लोकसंख्या सुमारें चार हजार. अर्ध्यापेक्षां अधिक लोक ख्रिश्चन धर्माचे आहेत. हें एक मिशनरी लोकांचें खेडें असून येथें मुलींकरितां एक हायस्कूल आहे. एक कलाविषयक, एक औद्योगिक शिक्षणाची शाळा येथें आहे. येथें उत्तम तऱ्हेची किनारी (लेस) तयार होते असें म्हणतात.

**नाझीरा**—अथवा गरगांव.आसामांत सिबसागर जिल्ह्यांतील एक खेडें. हें दिखो नदीच्या डाव्या तीरावर वसलेलें असून सिबसागर शहराच्या आग्नेयीस ९ मैल आहे. १६ व्या शतकाच्या मध्यापासून ते१७व्याच्या अखेरीपर्यंत येथें,'अहोम' राजांच्या वेळची राजधानी होती. एकदां कच्छचा राजा नरनारायण ह्यानें व एकदां डाक्याचा नवाब मीरजुमला ह्यानें, असे दोनदां ह्या गांवावर हल्ले चढवून हें काबीज केलें होतें. या गावांला त्यावेळीं ४ तीन तीन कोसांच्या अंतरावर एक एक असे ४ भव्य दरवाजे होते.नाझीरा हें आतां 'आसाम टी कंपनी ' चें मुख्य स्थान आहे व येथें मोठा बाजार भरतो. गौहत्ती व डिब्रूगडास जाण्यास येथून रेल्वे आहे. येथें एक हायस्कूल आहे.

**नाट**—ब्रह्मदेशांतील कांहीं दैवतें. हे पूर्वी बहुतेक प्रसिद्ध पुरुष व स्त्रिया असून त्यांनां आकस्मिक कारणामुळें मृत्यु आले. यांत पुष्कळ राजे व राण्या आढळून येतात. साधारण आकस्मिक कारणांमुळें मेलेल्या मनुष्याच्या आत्म्यास गति न मिळून त्याचें पिशाच्च होऊन तें त्यास पूर्वजन्मीं पीडा करणाऱ्यास त्रास देतें अशी पुष्कळ लोकांत समजूत आहे. तीस अनुसरूनच या नाटांबद्दल दंतकथा आहेत. यांची संख्या एकंदर ३७ असून त्यांत कांहीं स्त्रियाहि आहेत. यांतील पुरुषांचे पुजारी पुरुष व स्त्रियांच्या स्त्रिया असतात. ते प्रत्येक नाटाचा जो ठराविक पोषाख असतो तोच पोषाख करतात. [ इं. अँ. १९०५. ]

**नाट** ( नाटवा )—यांची वस्ती संयुक्तप्रांतांत फार (सुमारें ७० हजार) आहे. बंगाल, मध्यहिंदुस्थान व वऱ्हाडमध्यप्रांत यांतून दहा दहा हजार वस्ती आहे. इतर प्रांतांतूनहि थोडथोडी आहेच. एकंदर लोकसंख्या ( १९११ ) १२६४२८; पैकीं ९५१६३ हिंदु व ३०८५० मुसुलमान आहेत. नाट हें नांव कसरतीचे व दोऱ्यावर चालण्याचे खेळ करीत प्रवास करणाऱ्या अनेक जातींनां दिलेलें आहे. वादी, बाजीगर, दांगचरहा, झपेरा, गारुडी, कोल्हाटी, बेडिया, यांनांहि नाट म्हणतात. नाट हे लोक कंजर,बाडिया व डोम या जातींपासून झाले असावेत असें वाटतें. ही जिप्सी लोकांची एक जात आहे असें कोणी म्हणतात.बंगाल्यांत बाजीगर व कबूतरी असे दोन वर्ग आहेत. या दोघांसहि पूर्वी कंजर म्हणत. मध्यप्रांतांत गोपाल नांवाच्या लहान जातींतल्या बायकांस कबूतरी म्हणतात.यावरून नाट हें नांव धंद्याचें वाचक आहे जातीचें नव्हे. या लोकांच्या चालीरीतीवरून हा सर्व जातींचा गाळ असावा असें वाटू लागतें. हे वाटेल त्याच्या हातचें वाटेल तें खातात. हे आपल्या बायकांस व्यभिचारावर पैसे मिळविण्याची परवानगी देतात. पंजाबांतील नाट लोकांत मूल झालें कीं तें आजीला देतात

कारण तिच्या मुलीला मूल झाल्यामुळें व्यभिचारांत जास्त पैसे मिळण्याचा संभव कमी आला; म्हणून भरपाईबद्दल पहिलें मूल देतात. तिला ३० रुपये देऊन तें मूल पुन्हां परत घेतात. दोरीवर चालणें, पायास शिंगें बांधून त्यांच्या टोंकावर दोरीवरून चालणें, दोरीवर परात ठेऊन तीवर डोकें ठेऊन तोल संभाळून दोरीवरून सरकत जाणें इत्यादि कौशल्याचीं कामें हे लोक करतात. सोपरा, गारुडी हे साप धरितात व सापाच्या विषावर हे लोक औषधें बाळगतात. [ रसेल व हिरालाल; सेन्सस रिपोर्ट १९११; आशियाटिक रिसर्चेस, पु. १६; कलकत्ता रिव्ह्यू, पु. ५. ]

**नाटकगृहें,** प्रा ची न ग्री क रो म न का ळ.—नाटकें करून दाखविण्याकरितां मुद्दाम तयार केलेल्या इमारतीला नाटकगृह म्हणतात. यूरोपमध्यें प्राचीन काळीं नाटकें करण्याचा मूळ प्रघात प्राचीन ग्रीक लोकांमध्यें सुरू झाला. डायोनिसिस नामक देवतेच्या धार्मिक उत्सवांत गायन व नृत्य करण्याच्या पद्धतीपासून पुढें नाटकप्रयोगांचा उद्भव झाला. वरील उत्सव अथेन्स येथें होत असे. त्यावेळीं गीतनृत्यांच्या जळशांतील मुख्य इसम इतरांबरोबर कांहीं वेळ संभाषण करीत असे. पुढें या जळशांतील इसमांची संख्या वाढून त्यांतील संभाषणांनां अधिकाधिक महत्त्व प्राप्त होऊं लागलें व त्या प्रयोगाकरितां स्वतंत्र रंगण पात्रांनां पोषाख वगैरे करण्याकरितां निराळी जागा आणि प्रेक्षकांनां बसण्याकरितां वेगळी जागा याप्रमाणें व्यवस्था करण्यांत येऊं लागली. ख्रिस्तपूर्व ४९९ मध्यें अशा प्रयोगांकरितां एक कायमचें नाटकगृह ( थियेटर ) तयार करण्यांत आलें. हीं इमारत लांकडीच होती, पण नंतर बांधलेला भाग दगडी होता. प्राचीन ग्रीक लोकांतील नाटकगृहाचा आज अस्तित्वांत असलेला उत्तम नमुना एपिडोरसचें ख्रि. पू. ४ थ्या शतकांत बांधलेलें नाटकगृह हा आहे. याशिवाय प्राचीन ग्रीक नाटकगृहांचे नमुने डेलॉस, इरेट्रिया, ओरोपस वगैरे ठिकाणीं उपलब्ध झाले आहेत.

पुढें प्राचीन ग्रीक लोकांत नाट्यप्रयोग करण्याची सुरवात झाल्यावर नाटकगृहांनां विशेष महत्त्व आलें. आज उत्तम स्थितींत उपलब्ध असलेलें दगडी नाटकगृह लायकरगसच्या वेळचें आहे. त्यांत १५००० प्रेक्षक बसण्याची सोय असे. दगडी नाटकगृह करण्याला टेंकडीच्या उताराची जागा पसंत करण्यांत येत असे व प्रेक्षकांच्या जागेची रचना अर्धवर्तुळाकार करून त्याच्या पायथ्याशीं वर्तुलाकार रंगभूमि तयार करीत असत. ग्रीक रंगभूमीवर देखावे बदलण्याची व्यवस्था फार क्वचित् असे. नाटकांत एखाद्या देवतेचें पात्र असल्यास तें जमीनीपासून वर निराधार हवेंत उभें करण्याची व्यवस्था यारीच्या साहाय्यानें करीत. तसेंच भुतें पाताळांतून ( अंडर-वर्ल्ड ) वर येतात असें दाखविण्याची सोयहि रंगभूमीवर असे. मेघांचा गडगडाट उत्पन्न करण्याकरितां धातूच्या भांड्यांत मोठाले गोटे यंत्राच्या साहाय्यानें गरगर फिरत ठेवून आवाज उत्पन्न करीत.

रोमन लोकांनीं नाटकगृहाची इमारत बांधण्यांत फार सुधारणा केली. कमानींची रचना व कॉंक्रीटचा उपयोग करून सपाट जमिनीवर तीन तीन मजली नाटकगृहें ते बांधीत असत. ग्रीकांप्रमाणें नाटकगृहाकरितां टेंकडीचा उतार त्यांनां लागत नसे;व रोमन नाटकगृहांतील प्रेक्षकस्थान, रंगभमि व वाद्यस्थान ( ऑर्केस्ट्रा ) तिन्ही मिळून एकच इमारत दिसे. रोमन रिपब्लिकच्या काळांत रोमन लोकांतील साधेपणा नाहींसा होत गेला व त्यांच्या नाटकगृहांनांहि ग्रीक लोकांतील चैनीचें वळण लागलें. ख्रि. पू. ५५ मध्यें पॉंपेनें जें दगडी नाटकगृह बांधण्यास सुरवात केली त्यांत ४०,००० प्रेक्षक बसत असत असें प्लिनी म्हणतो. याच नाटकगृहाचे अवशेष रोममध्यें अद्याप पहावयास मिळतात.हें नाटकगृह ग्लॅडिएटर लोकांच्या सामन्याकरितांहि वापरीत असत. प्लिनीनें आणखी कांहीं नाटकगृहांचें वर्णन दिलें आहे; त्यांपैकीं एकांत ८०,००० लोक बसत असत असें तो म्हणतो, तें अविश्वसनीय वाटतें. रोमन साम्राज्याच्या प्रांतातील महत्त्वाच्या शहरांतहि निदान एकेक तरी नाटकगृह असे; त्यांपैकीं कांहींचे अवशेष आज उपलब्ध आहेत. ग्रीक व रोमन नाटकगृहें बहुधां वर उघडीं, बिन छपराचीं असत; पण रोमन लोकांनीं कांहीं नाटकगृहें आच्छादनायुक्त बांधिलेलीं असत. रोमन लोकांत सीनसिनरीचीं प्रगतीहि ग्रीकांपेक्षां अधिक झाली.

आ धु नि क का ळ.—मध्ययुगांत बायबलांतील साधुपुरुषांच्या अद्भुत चमत्कारांच्या गोष्टींसंबंधीं लिहिलेलीं नाटकें ( मिरॅकल-प्लेज ) विशेष लोकप्रिय व रूढ होतीं. अशीं नाटकें चर्चमध्यें किंवा तात्पुरत्या उभारलेल्या मांडवांत होत असत; त्यांच्याकरितां कायमचीं बांधलेलीं नाटकगृहें नव्हतीं. १६ व्या शतकांत पुन्हां सांसारिक किंवा प्रापंचिक ( सेक्युलर)नाटकांनां सुरवात झाली व इंग्लंडांत एलिझाबेथ राणीच्या वेळीं असल्या नाटकांनां वाङ्मयांत बरेंच महत्त्व प्राप्त झालें. या शतकांतील हीं नाटकेंहि तंबूंत किंवा मांडवांत किंवा सार्वजनिक खाद्यगृहांच्या ( इन ) आवारांत हलक्या वर्गांतील भटके लोक करून दाखवीत. पण १६ व्या शतकाच्या अखेरीस शेक्सपियर व बुर्बेज यांच्या व्यवस्थापकत्वाखालीं कायमच्या इमारतींमध्यें नाट्यप्रयोग होण्यास सुरवात झाली. लंडनमध्यें पहिलें नाटकगृह ' दि थिएटर ' या नांवाचें जेम्स बुर्बेज या नटानें १५७६-७७ सालीं बांधलें. तें लांकडी होतें व स.१५९८ मध्यें तें पाडून टाकण्यांत आलें. याच सुमाराचें दुसरें नाटकगृह ' कर्टन ' नांवाचें असून तें १६४२पर्यंत उपयोगांत येत होतें. शेक्सपियरच्या चरित्राशीं संबद्ध असलेले ' ग्लोब ' नाटकगृह १५९९ सालीं बुर्बेजनेंच बांधलें. १६१३ सालीं तें जळाल्यामुळें पुन्हां बांधलें गेलें. याशिवाय दि रोज, दि स्वॉन, फॉर्च्यून, रेडबुल, पॅरिस गार्डन वगैरे अनेक नाटकगृहें या सुमारास बांधलीं

गेलीं. हीं इंग्लंडमधील आद्य नाटकगृहें पूर्वीच्या तात्पुरत्या मंडपवजा नाटकगृहाच्या नमुन्याचींच होतीं, प्राचीन ग्रीक वळणाचीं नव्हतीं. या नाटकगृहांत मध्यभागीं स्टेज असून तीन बाजूंनीं प्रेक्षकांच्या जागा असत; व चवथ्या बाजूस नट सजण्याचें नेपथ्य ( ग्रीनरूम ) असे. अशा नाटकगृहांनां अष्टकोनी आकार असे व प्रेक्षक बसण्याची गॅलरी चोहों बाजूंस ग्रीनरूमच्या वरहि असे.

१६ व्या शतकांत इटलींत नाट्यप्रयोगांनां इंग्लंडांतल्याहून अधिक महत्त्व मिळालें होतें व तेथील नाटकगृहें प्राचीन नमुन्यावर तयार होत होतीं. त्यांपैकीं व्हिसेंझा येथील ट्रीटो ऑलिंपिको नांवाचें नाटकगृह अद्याप अस्तित्वांत आहे. फ्रान्समध्यें सांसारिक नाट्यप्रयोग इंग्लंडपेक्षां आधीं महत्त्व पावले. स. १४६७ मध्येंच एक चांगलें नाटकगृह होतें. १६ व्या शतकांत एका इटालियन नाट्य-प्रयोगानिमित्त पोषाख व सीनसिनरी यांवर अतोनात पैसा खर्च झाल्याची माहिती मिळते; व १७ व्या शतकांत पॅरिसमध्यें ऑपेराला नियमितपणें सुरवात झाली होती. १८ व्या शतकाच्या अखेरीस नेपल्स येथील सॅन कार्लो आणि मिलनचें लास्काला हीं दोन नाटकगृहें सर्व यूरोपांत सुरेख होतीं. पण अलीकडील लंडन, पॅरिस, सेंटपीटर्सबर्ग आणि यूरोप व अमेरिकेंतील इतर शहरांतील नाटकगृहें आकार व शोभा या दोन्ही बाबतींत फारच पुढें गेलीं आहेत.

आ धु नि क स्टे ज ची र च ना.—स्टेजच्या सुधारणेला प्रथम ऑस्ट्रियांत १८८० च्या सुमारास सुरुवात झाली. त्यांतील ध्येय नैसर्गिकपणा आणण्याचें होतें. आधुनिक यांत्रिक शोधांचा व प्रकाशसाधनांचा उपयोग स्टेजकडे करण्यांत येऊं लागला. नाटकगृहांत आगी वरचेवर लागत, त्यामुळें आगीपासून बचाव करण्याच्याहि अनेक युक्त्या निघाल्या. या सुधारणांच्या बाबतींत ग्रेटब्रिटन व फ्रान्स मात्र सर्वांत मागासलेले होतें. अलीकडील नाटकगृहांचे लांकडी, अर्धलांकडी, व लोखंडी असे तीन प्रकार आहेत. तसेंच स्टेजवरील पडदे व सीनसिनरीबाबत कामें शारीरिक शक्ति, जलशक्ति किंवा विद्युत् शक्तीनें करण्यांत येतात. लांकडी किंवा अर्ध लांकडी स्टेजवरील सर्व कामें शारीरिक शक्तीनेंच करवितात; पण लोखंडी स्टेजसंबंधीं कामें तीन्हीं किंवा तीन्हींपैकीं कोणत्या तरी शक्तीनें करतात. जलशक्ति वापरणें खर्चाच्या दृष्टीनें सर्वांत अधिक महाग जातें. पडद्यावरील रंगीत सीनसिनरी काढण्यांत हल्लीं इंग्लंडमधील चित्रकार यूरोप व अमेरिकेंतील तद्वर्गीयांमध्यें सर्वांत पुढें आहेत.

ना ट क गृ हा सं बं धीं का य दा.—प्राचीन रोमन काळांत बऱ्याच उशीरां नटाच्या धंद्यास सुरवात झाली, व तत्कालीन नटवर्ग गुलामांपैकीं असे व त्यांची प्राप्ति त्यांच्या मालकांनां मिळे. या धंद्यासंबंधीं कायदा थिओडोशियन कोडमध्यें आहे, त्यावरून पाहतां या धंद्याला फार हलका मानीत असें दिसतें. नटांचें ख्रिस्ती धर्मसंस्कार करूं नयेत; अगदीं असाध्य रोगांत व त्यांतून वांचल्यास पुन्हां नटाचा धंदा न करण्याच्या अटीवर संस्कार करावा: नटांच्या मुलींनां त्याच धंद्यांत पडण्याची सक्ति नसावी, स्त्रीनटांनां धंदा सोडून भिक्षुकिणी होण्याची परवानगी असावी, वगैरे कलमें त्या कोडांत होतीं. जस्टिनियनच्या कोडमध्यें नटांचे पुतळे सार्वजनिक रस्त्यांत ठेवूं नयेत, स्त्री नाटकगृहांत नवऱ्याच्या परवानगीशिवाय गेल्यास तें सोडचिठ्ठीस (डायव्होर्स) योग्य कारण मानलें जावें, वगैरे नियमहि आढळतात.

इंग्लंडांत इतर यूरोपीय देशांप्रमाणेंच नाटकगृहाविषयक कायदा अगदीं अलीकडे झालेला आहे. पूर्वी नाटकगृहांवर चर्चचें नियंत्रण असे, त्यामुळें एतत्संबंधीं पहिले नियम चर्चेनें केलेले आहेत. ख्रिस्ती इसमांनीं नाटकें पाहूं नयेत, नटाचे ख्रिस्तीधर्मविधी व अंत्यविधी करूं नयेत, पाद्री मंडळींनीं नाट्यप्रयोग करूं नयेत, नटांशीं संबंध ठेवूं नये व नाटकें पाहूं नयेत, वगैरे निर्बंध होते. रेफर्मेशनपासून हे निर्बंध नष्ट होण्यास सुरवात झाली पण राजे लोकांनीं राजकीय व इतर दृष्टया आक्षेपार्ह नाटकें करूं नयेत, नट व नाटकगृहें यांनीं सरकारी परवाना प्रथम काढावा वगैरे नियंत्रण ठेविलें. लायसेंसशिवाय काम करणाऱ्या नटांनां १५७२ च्या कायद्यानें फटके मारण्याची कडक शिक्षा ठेविली होती. नंतर या संबंधींच्या कायद्यांत अनेक वेळां सुधारणा झाली. नाटकगृहें बांधणें हा स.१८४३ पर्यंत मोनॉपोली (विशिष्ट व्यक्तीनें विकत घेतलेला हक्क) असे, त्यानंतर कांहीं कायद्याच्या अटींवर सर्वांनां मोकळीक देण्यांत आली. कामनवेल्थच्यावेळीं एतद्विषयक नियंत्रणाची कमाल झाली, कारण तत्कालीन प्युरिटनपंथी राज्यकर्त्यांनीं कोणतेहि नाटक पहावयास जाणें हा गुन्हा ठरविला होता. नाट्यग्रंथावरचें नियंत्रण एलिझाबेथ राणीच्या काळापासून आहे. स. १८४३ च्या कायद्यानें प्रत्येक नाट्यग्रंथाची प्रत नाटकप्रयोग होण्यापूर्वी सरकारकडे पाठवून मंजुरी घेणें जरूर झालें आहे. नामंजुरीचीं कारणें पुढीलप्रमाणें ठरविलीं आहेत—( १ ) असभ्यता; ( २ ) अनिष्ट पात्रें; ( ३ ) जिवंत किंवा नुकत्याच मेलेल्या इसमाचें विकृत निदर्शन; ( ४ ), धर्मनिष्ठेचें विघातक वर्णन; ( ५ ) गुन्हा किंवा दुर्गुणाला उत्तेजन; ( ६ ) शांतता विघातक किंवा दोस्त राष्ट्रांच्या मैत्रीला विघातक मजकूर. ब्रिटिश साम्राज्यांतील देश व इतर यूरोपीय देश यांत इंग्लंडच्या सारखाच कायदा आहे.

भा र ती य.—संस्कृत वाङ्मयांतील नाट्यविषयक ग्रंथांतच नाटकगृहाबद्दलची माहिती दिलेली असते. नाट्यशास्त्रावरील सुप्रसिद्ध भरतमुनिप्रणीत ग्रंथ 'नाट्यसूत्र' यांत भरत हाच देवांचा सूत्रधार ( स्टेज मॅनेजर ) होता असें सांगितलें आहे. नाटकांच्या प्रास्ताविक भागावरून असें दिसतें कीं, नाट्यप्रयोग राजाश्रयाखालीं राजवाड्यांत करण्यांत येत असत. तथापि सामान्य लोकांकरितांहि नाटकप्रयोग यात्रांच्या वेळीं देवालयांत किंवा मंडपांत होत असत. अजूनहि खेडेगांवांतून

नाटकें देवालयांत किंवा मुद्दाम तयार केलेल्या मंडपांत करतात. नाटकगृहें बांधण्याची कल्पना यूरोपियन नाटकमंडळ्यांनीं इकडे मूर्त स्वरूपांत आणली. त्यापूर्वी मोठमोठ्या शहरांतून देखील एखाद्या चाळींत किंवा वाड्यांत नाटकें होत. आतां बहुतेक जिल्ह्याच्या गांवीं नाटकगृहें बांधण्यांत आलीं आहेत.

मुंबई शहरांत आजमितीस सुमारें अकरा नाटकगृहें आहेत. त्यांपैकीं पारशी नाटक मंडळ्यांच्या मालकीचीं अशीं चार आहेत. मुंबई, सुरत, बडोदें, अमदावाद इत्यादि ठिकाणीं गुजराथी नाटकमंडळ्यांच्या मालकीचीं नाटकगृहें आहेत. मराठी नाटकाची जोपासना पुणें शहरांत झाल्यामुळें तेथील नाटकगृहांचा इतिहास पाहूं.

सन १८५२ पर्यंत पुण्यास नाटकें होण्यास सुरुवात झालेली नव्हती; अर्थात नाटकगृहेंहि नव्हतीं. या सालीं गोविंदभट सांगलीकर यांची पौराणिक नाटकमंडळी प्रथम पुण्यास आली व तिचे खेळ शनवार पेठेंतलि श्रीमंत सांगलीकर यांच्या वाड्यांत मंडप घालून होत असत. पुढें वाडा मिळेनासा झाल्यानें १८५५ सालीं कसबा पेठेंत आंबेकरांच्या बखळींत नाटकाकारितां मुद्दाम मंडप घालण्यांत आला. १८५८ सालीं शनवार पेठेंत आप्पा बळवंताच्या वाड्यानजीक, हल्लीं नूतन मराठी विद्यालयाची व्यायामशाळा आहे त्या ठिकाणीं, सुमारें चारशें लोक बसतील इतका एकमजली गवती छपराचा मांडव घालण्यांत आला होता; परंतु हें तात्पुरतें नाटकगृह अग्निनारायणास पसंत न पडल्यामुळें त्यानें त्याचा स्वाहाकार केला! या मंडपाचें नांव 'पूर्णानंद नाटकगृह' असें होतें. मंडप जळाल्यावर तेथेंच एकखांबी तंबूप्रमाणें अर्धवट मंडप व अर्धवट इमारत अशा तऱ्हेचें नाटकगृह बाधण्यांत आलें. हा मंडपाहि एके दिवशीं अकस्मात पडला व १८६० सालच्या सुमारास याच जागेवर पक्कें नाटकगृह बांधण्यांत आलें. याच नाटकगृहांत विष्णुपंत छत्रे यांची सर्कस व एक पाश्चात्य नट मि. डुआरिंग यांचे खेळ, तसेंच प्रसिद्ध आर्योद्धारक कंपनीचीं व डोंगरे यांच्या कंपनीचीं नाटकें होत. १८६४ सालीं भर बुधवार पेठेंत 'आनंदोद्भव' नाटकगृह बांधलें गेलें. या नाटकगृहांत जुन्या नाटकमंडळींतलि कित्येक नट प्रसिद्धीस आले होते. सांगलीकर, इचलकरंजीकर, कोल्हापूरकर यांचीं नाटकें याच नाटकगृहांत होत असत. किर्लोस्कर संगीत मंडळीचा जन्म याच नाटकगृहामध्यें १८८० सालीं झाला. यानंतर गणेश पेठेंत श्री. रा. परांजपे यांचें आर्यभूषण व नंतर दाणेआळींत शेलार यांचें जें हल्लीं त्रिंबकराव जबडे यांचें 'विजयानंद' या नांवानें प्रसिद्ध आहे, तें अशीं दोन नाटकगृहें बांधण्यांत आलीं. पैकीं आनंदोद्भव नाटकगृह अलीकडे रद्द झालें असून आर्यभूषण नाटकगृहहि जुनें होऊन नुकतें जळालें. अर्थात पुण्यास एक प्रशस्त, शोभिवंत व हवाशीर असें नाटकगृह मध्यवर्तीत जरूर हवें होतें. ही उणीव १९०९ सालीं बांधलेल्या किर्लोस्कर संगीत नाटकगृहानें भरून निघाली. नाना फडणिसांच्या वाड्याच्या दक्षिण भागांत हें नाटकगृह बांधिलें आहे.

आपल्या इकडील नाटकगृहांतहि अद्याप पुष्कळ सुधारणा झाली पाहिजे. पुष्कळ नाटकगृहें अरुंद असून, आंत खेळती हवा चांगली नसते; तसेंच थोड्या जागेंत पुष्कळ माणसें बसवीत असल्यामुळें कोंडवाड्याप्रमाणें खेंचाखेंची होऊन प्रेक्षकलोकांनां अनेक गैरसोयी सोसाव्या लागतात. त्याचप्रमाणें बोर्ड अरुंद असून पात्रांनां जाण्यायेण्याची चांगली सोय नसते व देखावेहि चांगल्या रीतीनें मांडतां येत नाहींत. तसेंच नाटकगृहांत केव्हां केव्हां गर्दीमुळें जाण्यायेण्याचा मार्ग बंद होऊन लोकांची गैरसोय होते. ही गैरसोय जाण्यायेण्याचे निरनिराळे रस्ते करून दूर करतां येईल. याखेरीज स्त्रीपुरुषांनां समोरासमोर न बसवितां पुरुषांच्या पाठीमागें स्त्रिया किंवा अशाच प्रकारची दुसरी व्यवस्था करून व जाळ्या घालून त्यांनां बसण्याची सोय करावी. फ्रान्समधील एका नाटकगृहाचें वर्णन एके ठिकाणीं दिलें आहे तें असें:—"तें नाटकगृह सगळ्या जगांत मोठें थोरलें आहे. त्यानें पावणेतीन एकर जमीन व्यापली असून तें बांधण्यास चवदा वर्षें लागलीं व २,१६,००,००० रुपये त्यासाठीं खर्च झाले. याचें अंतरंग व बहिरंग उत्तम सामानानें व रंगानें भूषविलें आहे. सगळ्यांत अतिशय विलक्षण भाग म्हणजे प्रचंड जिना होय. याची लांबी १९७ फूट, रुंदी ४३ फूट व उंची ६९ फूट आहे." नाटकगृहास आग वगैरे लागूं नये म्हणून जे उपाय सुचविण्यांत आले आहेत. ते:—(१) नाटकगृहास जें सामान घालावयाचें तें विवक्षित रसायन पदार्थांत बुडवून मग त्याची योजना करावी. (२) होतां होईल तितका लोखंडाचा उपयोग करावा. (३) नाटकगृहाला असणाऱ्या गॅलऱ्या, खिडक्या आणि त्यांच्या पुढील भाग यांची जमीन लोखंडी करावी. (४) बैठकीच्या जागा करावयाची तीहि ज्वालाप्रशामक पदार्थांची करावी. उदाहरणार्थ, कांहीं एक रसायन द्रव्य घालून तयार केलेल्या एका विशेष प्रकारच्या कागदाची करावी आणि पाठीमागें टेंकावयास असतें तें केशप्रपूरित असावें. (५) पडदे वगैरे होतां होईतों रेशमाचे अगर लोंकरीचे करावे. (६) पडद्यांस रंग देणें तो एक तऱ्हेची खळ आहे. ती खळ आणि डिंकाचें पाणी या मिश्रणानें द्यावा. टरपेंटाईन अगर साधें तेल यांचा उपयोग करूं नये. (७) जमिनी करण्याकडे चुना व खडी (कॉंक्रीट) अगर जमीन करण्याचीं कौलें यांचा उपयोग करावा. (८) नक्षीकाम करणें असल्यास लोखंडाची मदत घ्यावी. (९) रंगभूमीचा शेवट आणि प्रेक्षकाची बसण्याची जागा यांमध्यें एक भला जंगी लोखंडाचा पडदा असावा. त्यास खालीं वर करण्याचें साधन असावें. आग लागल्याची आरोळी झाल्याबरोबर त्या पडद्यास विरेंत घालतां यावें.

नाटकांसंबंधीं कायद्याचा आरंभ १८८५ त पुण्यांत झाला. पुण्याच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें नाटकगृहाच्या नियमांची रचना केली. त्यामध्यें मुख्यत्वें पुढील नियम महत्त्वाचे होते. (१) प्रत्येक नाटकगृहांत नियमित माणसें बसविणें.(२) राकेलचे दिवे बंद करणें. (३) एक वाजण्याच्या पुढें रात्रीं नाटक न करणें. आणि (४) आगींचा बंदोबस्त राखण्याकरितां पाण्याच्या व मातीच्या टोपल्यांची तरतूद करून ठेवणें. पहिल्या व चवथ्या कलमाची अंमलबजावणी नाटकगृहाच्या मजबुतीचा व सुरक्षितपणाचा विचार करून केली असली पाहिजे हें उघडच आहे. ही लोकांच्या दृष्टीनें अपवाद घेण्यासारखी नव्हती व त्याबद्दल कोणी कुरकूर केलीहि नाहीं. २ व ३ हीं कलमें मात्र त्यावेळीं वरींच अडचणींचीं व नुकसानीचीं होतीं. परंतु पुढें तींहि दुरस्त करण्यांत आलीं. [ रंगभूमी मासिक व कुलकर्णी--महाराष्ट्रीय रंगभूमी. ]

**नाटेकर, बाळकोबा** ( १८५५-१९१० )—एक महाराष्ट्रीय नट. हे किर्लोस्कर मंडळींतील आद्य व प्रमुख नट असून महाराष्ट्रीय नाट्यकलेच्या इतिहासांत जे किर्लोकर-वाघोलीकरादि प्रसिद्ध पुरुष होऊन गेले त्यांपैकींच नाटेकर हे एक होते. हे उत्तम गवयी म्हणून प्रथम पुण्यास प्रसिद्ध होते. नंतर १८८० सालीं आण्णासाहेब किर्लोस्करानीं मोरोबा बरोबर यानांहि आपल्यांत ओढिलें. हे दोघे नट जर त्या वेळीं किर्लोस्करानां अनुकूल झाले नसते तर ती कंपनी तेव्हां न निघतां, संगीत नाटकाची कल्पनाहि जेथल्या तेथेंच जिरली असती. शाकुंतल नाटकांत नाटेकर कण्वाची भूमिका घेत व सौभद्रांत नारद व कृष्ण होत. कृष्ण व कण्व या दोन परस्परविरोधी भूमिका असतांना सुद्धां नाटेकर या दोन्ही कामांत उत्तम प्रकारचें नैपुण्य दाखवीत. त्यावेळच्या संगीत नाटकांनीं महाराष्ट्रांत जी खळबळ उडवून दिली तिचें सूत्रधार कोल्हटकर, वाघोलीकर व नाटेकर हेच होत असें म्हणण्यास हरकत नाहीं. स.१८९० नंतर नाटेकरानीं कंपनी सोडली व ते घरीं स्वस्थ बसले. हे ता. १३ जानेवारी १९१० रोजीं पुण्यास वारले. [ कुलकर्णी-मराठी रंगभूमि; रंगभूमि मासिक, वर्ष ३, अं. ६-७. ]

**नाट्यशास्त्र**—सध्यां प्रचलित असलेल्या 'नाट्य' या शब्दाचा मूलार्थ व इंग्लिश भाषेतील 'ड्रामा' या शब्दाचा मूलार्थ,या दोहोसंबंधीं विचार करतां असें दिसून येतें कीं सांप्रत जरी हे दोन्ही शब्द समानार्थी योजले जातात तरी त्यांची मूळ पीठिका फारच निराळ्या तऱ्हेची आहे. ' नाट्य " हा संस्कृत शब्द 'नट' म्हणजे नाचणारा ह्या शब्दापासून झाला आहे हें उघड आहे. नट् या धातूचा अर्थ नाचणें असा आहे.

ड्रामा ह्या शब्दाचा मूलार्थ "क्रिया" असाच आहे. परंतु सध्यांचा प्रचलित अर्थ फारच प्राचीन काळीं म्हणजे ॲरिस्टॉटल या ग्रीक ग्रंथकाराच्या वेळींच सदरहू शब्दानें दर्शित केला जात होता. नाट्यशास्त्राचें मूळ विवेचन करतांना ॲरिस्टॉटलनें याची व्याख्या मनुष्यांच्या क्रियांचें, भावांचें व आयुष्याचें ध्येयात्मक प्रदर्शन अशी केली आहे. ह्यावरून ग्रीक नाट्यशास्त्राचा मूळ उगम अनुकरणबुद्धीपासूनच झाला असावा असें उघड दिसतें. प्राचीन कल्पनेप्रमाणेंच सध्यांहि नाटकांचा उपयोग घडलेल्या गोष्टी पुन्हां कृत्रिमपणें दाखविण्याकडेच केला जातो, व म्हणूनच नाटकास कोणत्या तरी भाषेची जरूरी भासते व म्हणूनच नाट्य हें महाकाव्यें ( एपिक ) व वीणाकाव्यें ( लिरिक ) ह्यांशीं अत्यंत निकट रीतीनें संबद्ध आहे असें ॲरिस्टॉटलनें म्हटलें आहे. फरक एवढाच कीं महाकाव्यें किंवा वीणाकाव्यें हीं केवळ शब्दसृष्टीवर उभारलेलीं असतात व नाटकास शब्दांची व क्रियेची जरूरी भासते. याला अपवाद असे हिंदुस्थानांतील यमपुरी वगैरेंसारखे बाहुल्यांचे ( पेपरश्लेज ) खेळ किंवा चलच्चित्रपट वगैरे दाखवितां येतील कीं ज्यामध्यें शब्दसृष्टीची कांहींच जरूर नसते परंतु सर्व उभारणी केवळ अभिनय व हावभाव यांजवर असते.

नाट्यकलेचा चित्रकलेशीं बराच संबंध आहे, परंतु चित्रकलेनें दाखविलेलें कथानक स्थिर (स्टॅटिक) असतें व शब्दसृष्टीचा तर त्यांत पूर्ण अभावच असतो. ह्या उलट नाट्यसृष्टींत एक प्रकारची कथानकाची अखंड परंपरा असते. त्याचप्रमाणें नृत्यकलेचा व संगीतकलेचा नाट्यकलेशीं बराच संबंध येतो हें वर दाखविलेंच आहे. आम्हां भारतीयांच्या दृष्टीनें तर नाट्याचा संगीत व नृत्यकला यांच्याशीं अतिशय निकट संबंध आहे. कारण भारतीयांच्या मतें मानवी मनोवृत्ति व संगीतशास्त्रांतील विशिष्ट नादलहरी यांचा अतिशय चमत्कारिक अन्योन्याश्रय आहे व ह्या विषयावरच संगीतांतील रागशास्त्राची उभारणी झाली आहे.

अर्वाचीन दृष्टीप्रमाणें नाट्याचें मुख्यतः आनंदपर्यवसायी ( कॉमेडी ) व शोकपर्यावसायी ( ट्रॅजेडी ) असे दोन विभाग पाडले जातात. परंतु अगदीं प्रथम अशा प्रकारचे विभाग कोणत्याहि नाट्याच्या प्राथमिक दशेंत दिसून येत नाहींत, व प्राचीन भारतीय नाट्यांत तर ह्या विभागांचा पूर्ण अभाव आहे. वस्तुतः विचार करतां दैविक प्राण्यांचीं कोणतींहि कार्यें केवळ शोकोत्पादक किंवा अल्हादकारक नसतातच. ज्याप्रमाणें मानवी जीवित हें सुखदुःखांचें मनोहर संमिश्रण आहे, त्याचप्रमाणें अशा प्रकारचीं दैविक कार्यें कांहीं अंशीं ग्राह्य व त्याज्य अशा विचित्र घटनांचीं मीलनें होत. परंतु ह्यापैकीं कांहीं प्रसंग इतरांपेक्षां महत्त्वाचे असल्यामुळें साहजिकच मानवी दृष्टीनें त्यास कांहीं वैशिष्ट्य प्राप्त होतें. म्हणूनच वसंतऋतूसारखे आल्हादजनक विशिष्ट समय किंवा विशिष्ट देवतेकरितां भरविण्यांत आलेले यात्राप्रसंग, ज्यावेळीं प्राथमिक अवस्थेंतील नाट्यरचना लोकसमाजापुढें आली त्यावेळीं ह्यांनीं त्या प्राथमिक नाट्यावर एकप्रकारची विशिष्ट छाया पाडली. प्राचीन भारतीय नाट्यरचना तर बहुतेक अशा प्रसंगाच्या वेळींच उद्भूत झाली. उदाहरणार्थ महाकवि

भवभूतीचीं नाटकें 'कालप्रियनाथ' ह्या देवाच्या उत्सवप्रसंगीं केलीं गेलीं. इटली देशांतील फेसेनिनीसारखीं प्राथमिक नाटकें देखील उत्तम पीक निघण्याचा काल जो वसंत-ऋतु अशा वेळींच केलीं गेलीं. आनंदपर्यवसायी नाटकाचा कोणत्याहि बाजूनें विचार केला असतां असेंच अनुमान निघतें कीं आनंदपर्यवसायी नाटक हें निसर्गाच्या पुनर्युवीकरणसमयींच्या आनंदाचें निदर्शन व निसर्गानें फलपुष्पास दिलेल्या नवचैतन्याचें व्यक्त स्वरूप होय. परंतु आनंदपर्यवसायी नाटकामध्यें या मूलभूत हेतूचा पुढें इतका अतिरेक झाला कीं त्यालाच पुढें किळसवाणें रूप प्राप्त झालें असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

शोकपर्यवसायी नाटकाच्या उद्भवाचा इतिहास फारच निराळ्या तऱ्हेचा आहे. प्राचीन भारतीय नाट्यांत तर शोकपर्यवसायी नाटक सर्वथा वर्ज्य आहे. परंतु ग्रीकदेशीय वाङ्मयांत शोकपर्यवसायी नाटकाचा कसा उद्भव झाला याजबद्दल क्रूसिअस नामक ग्रीक ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं, 'शोकपर्यवसायी नाटकाचा मूळ उगम, दिवंगत झालेल्या थोर व कर्तृत्ववान अशा व्यक्तींच्या अंत्यविधीच्या वेळीं त्यांच्या आत्म्यांनां पूर्ण शांतता मिळावी व त्यांच्याबद्दल आदर दर्शित केला जावा म्हणून म्हटल्या जाणाऱ्या शोकगीतांतच दिसून येतो'. हें क्रूसिअसचें मत बरेंच सयुक्तिक दिसतें.

अशा रीतीनें नाट्याचे मूळ हेतू कालांतरानें बदलत गेले व ग्रीक किंवा भारतीय देशांत नाट्य हें एक निराळ्या प्रकारचें करमणुकीचें वाङ्मयच होऊन बसलें. कॉमेडी हें एक उपरोधिक तऱ्हेचें टीका करण्याचें साधन होऊन बसलें व ट्रॅजेडी हें एक मानसिक विचारांस गंभीर वळण लावण्याचें साधन झालें. प्राचीन भारतीय नाट्याचा हा एक विशेष आहे कीं त्यामध्यें शोकपर्यवसायी नाटकांचा अभाव आहे. परंतु नागानंद आणि मालतीमाधव वगैरेंसारख्या नाटकांतून शोकरसाचा परिपोष बराच केला आहे.

ह्याखेरीज नाट्याचे इतर विभाग प्राचीन भारतीय नाट्याप्रमाणें पाहिले म्हणजे दहा रूपकें व अठरा उपरूपकें होत. त्याचप्रमाणें ग्रीक ग्रंथकार पोलोनिअस यानें (१) शोकपर्यवसायी, ( २ ) आनंदपर्यवसायी, ( ३ ) ऐतिहासिक, (४) मेषपालनविषयक, (५) मेषपालनविषयक आनंदपर्यवसायी, (६) मेषपालनविषयक ऐतिहासिक, (७) शोकपर्यवसायी ऐतिहासिक,(८) सुखदुःखात्मक ऐतिहासिक मेषपालनविषयक असे भेद पाडले आहेत. हे किंवा यांसारखे दुसरे नाट्याचे असलेले विभाग या सर्वांवर ह्याच ठिकाणीं विचार करतां येणें शक्य नाहीं. परंतु स्वरूपाच्या दृष्टीनें पाडलेल्या ( १ ) संगीत नाट्य आणि ( २ ) नीतिविषयक नाट्य ह्या दोन भागांबद्दल एक विशेष गोष्ट येथें सांगणें इष्ट आहे. त्यापैकीं गानप्रधान नाट्य हें मूळ नृत्यप्रकाराशीं बरेंच सदृश आहे व ह्या दृष्टीनें प्राचीन भारतीय नाट्य हें ह्या वर्गांतच समाविष्ट होईल. दुसरा प्रकार नीतिविषयक नाट्य हें धर्मविषयाच्या अध्येत्यास विशेष उपयोगी आहे. कारण ह्या प्रकारच्या नाट्यांत रूपककल्पनेनें गहन नीतिचे सिद्धांत दृश्य होतात. प्राचीन भारतीय नाट्यांतील "प्रबोधचंद्रोदय" हा याच प्रकारापैकीं नमुना होय.

**न ट व र्ग व ना ट्या चें नै ति क स्व रू प.**—प्राथमिक नाट्यांत निरनिराळीं कामें करणारे नटवर्ग यांस एकंदर समाजांत बराच चांगला दर्जा मिळत असावा असें प्राचीन ग्रंथांवरून अनुमान निघतें. उदा० पूर्वीं भारतवर्षांत देवदैत्यांच्या लढाया, वगैरेंसारखे प्रयोग होत असत; त्यावेळीं अर्थातच त्या नटवर्गास बराच मान मिळत असावा. याशिवाय दुसरें एक कारण म्हणजे मालविकाग्निमित्रांत दर्शित केल्याप्रमाणें एकंदर नटवर्गास व संगीत, नृत्य, नाट्य, इत्यादि ललितकलांस राजाश्रय मिळत असल्यामुळें साहजिकच नटवर्गाच्या आयुष्यक्रमास चिरस्थायी रूप प्राप्त होई व त्यामुळें एक प्रकारचा सामाजिक दर्जाहि त्यास प्राप्त होत असे. परंतु प्रसिद्ध रोमन ग्रंथकार क्लॉउज यानें म्हटल्याप्रमाणें जेव्हां नटवर्गाच्या आयुष्यास फिरती संवय लागूं लागली त्यावेळेपासून नटवर्गाबद्दल सामाजिक तिरस्कार उत्पन्न होऊं लागला. त्यामुळें नटवर्गास पुष्कळ तऱ्हेच्या नागरिकत्वाच्या हक्कास मुकावें लागलें. चीन देशांत नटास कायद्याच्या दृष्टीनें लायक साक्षीदार मानण्यांत येत नसे व तीन पिढ्या पर्यंत सार्वजनिक चढाओढीच्या परीक्षांस लायक उमेदवार मानलें जात नसे. हिंदुस्थानांत स्त्रीनटवर्ग तेवढा वेश्यावर्ग अशी समजूत आहे, व म्हणूनच येथें किंवा चीन देशांत, किंवा इंग्लंड देशांतहि सहसा स्त्रियांनां नटाचीं कामें करण्याची बंदी आहे व स्त्रियांच्या भूमिका देखील पुरुष किंवा लहान मुलें यांनांच घ्याव्या लागतात. सूक्ष्म दृष्टीनें पाहूं गेलें असतां कांहीं नटांचें, सामाजिक बंधनें झुगारून देऊन, व्यक्तिशः घडलेलें नीतिबाह्य आचरण हेंच मुख्यतः सामाजिक तिरस्काराचें कारण दिसतें. परंतु इतकें जरी आहे तरी ही नाट्याच्या धंद्याची दोषैकदृष्टीनें केलेली विचारसरणी होय. तसल्याच इतर धंदेवाईकांच्यापेक्षां नटवर्गाची नैतिक प्रगति जास्त आहे हें आंकडेशास्त्रानुसार सिद्ध करून दाखविलें म्हणजे अर्थातच ह्या धंद्याची उज्वल बाजू निदर्शनास येईल.

**नै ति क दृ ष्ट्या ना ट्य वि चा र.**—नैतिक दृष्टीनें नाट्याचा विचार करण्याचा प्रश्न ख्रिस्तेतर राष्ट्रांपुढें क्वचितच आला आहे. बौद्ध धर्मांत भिक्षूंकरितां घालून दिलेल्या दहा नियमांमध्यें नृत्य, गीत, वादन, खेळ वगैरे निषिद्ध सांगितले आहेत. नाट्याविरुद्ध आलेला मुख्य आक्षेप ख्रिस्ती धर्मीयांनीं आणला आहे. वास्तविक हा आक्षेप जी नाटकें, ख्रिस्ती धर्माच्या मतें मूर्तिपूजेसारखा खोटा धर्म वर्णन

करून त्याचाच पुरस्कार करतात अशा नाटकांविरुद्ध होता व तो आक्षेप कांहीं अंशी त्यांच्या दृष्टीनें बरोबर होता. परंतु ज्यावेळीं मूर्तिपूजेला धर्मबाह्य मानलें गेलें त्यावेळीं शिक्षणाचें साधन या दृष्टीनें नाटकाची योग्यता फारच वाढली. परंतु ख्रिस्ती धर्मांतील प्यूरिटन्स ह्या अति कडक धर्मपंथाचें मत एकंदर नाट्याविरुद्ध होतें. परंतु अजीबात नाट्यशास्त्रास नामशेष करणें हें शक्य नव्हतें व पुढेंहि कधीं होणार नाहीं. एकंदर चालू परिस्थितीकडे पाहून विचार करतां नाट्याचें उच्चाटन करून टाकणें स्तुत्य आहे काय? नाट्यांतून रंगभूमीवर दाखविण्यांत येणाऱ्या पुष्कळ गोष्टी अतिशय वाईट व घाणेरड्या असतात हें उघडच आहे,व अशा गोष्टी निषिद्ध समजल्या जाव्यात याबद्दल प्रयत्न करणें जरूर आहे. परंतु नाट्याच्या द्वारें दाखविण्यांत येणाऱ्या पुष्कळ गोष्टी नैतिकदृष्ट्या चांगल्याहि असतात व प्रार्थनालयांत न जाणाऱ्या जनसमूहाच्या दृष्टीनें हीं नाटकें अतिशय महत्त्वाचीं असतात हें विसरून चालणार नाहीं. दुसरी गोष्ट म्हणजे सांप्रत जगाला खरोखरीच नाट्याची जरूर आहे, नाहीं तर नाट्याविरुद्ध चालविलेली चळवळ कधींच विजयी झाली असती. सामान्य जनसमूहास कोणत्याहि तऱ्हेचें शिक्षण नाट्यद्वारां मजेंत देतां येतें. बुचर नामक ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं ' नाट्यें मानवी हृदयांतील दया, भीति इत्यादि सुप्त स्थितींत असलेले गुण बाहेर उचंबळून आकर्षण करतात. व त्यायोगें हृदयांतील खळबळीच्या नंतर सुख, मद व शांतता उत्पन्न होऊन एक प्रकारची हुशारी वाटते.

जा ग ति क दृ ष्टी नें ना ट्या चा वि चा र व नि र नि रा ळ्या अ व स्था.—नाट्याचा अगदीं व्यापक अशा जागतिक दृष्टीनें विचार करतां असें दिसून येतें कीं, प्राचीन भारतीय नाट्य हेंच फार पूर्वी म्हणजे ज्यावेळीं यूरोपीय राष्ट्रांतील लोक रानटी स्थितींत नागवे उघडे फिरत होते, त्याकाळीं उद्भूत झालें. प्राचीन भारतीयांचे मूळ जुने धर्मग्रंथ जे वेद त्यांपैकीं अति प्राचीन जो ऋग्वेद त्यामध्येंच संवादरूपानें आलेलीं बरींच आख्यानें आहेत, व हेच मूलभूत उल्लेख भारतीय नाट्याचें प्राचीनत्व सिद्ध करतात. ह्या प्राचीन भारतीय नाट्याचा अर्थातच चीन, जपान वगैरे देशांवर परिणाम घडलेला दिसतो.

प्राचीन पाश्चात्त्य नाट्य प्रथम स्वतंत्रपणें ईजिप्तमध्यें उद्भूत होऊन ग्रीक व रोमन सांस्कृतिक वर्चस्वाच्या काळीं फारच उदयास आलें, परंतु लवकरच पाश्चात्त्य देशांत मध्ययुगांत घडून आलेल्या सुधारणेमुळें मृतावस्थेस जात असलेल्या नाट्यास एकदम चैतन्य मिळून सध्यां दिसत असलेल्या अर्वाचीन पाश्चात्त्य नाट्याचें स्वरूप दिसत आहे व ह्याचा आपल्या पौरस्त्य नाट्यावर-विशेषतः भारतीय अर्वाचीन नाट्यावर-फारच परिणाम झाला आहे, व आणखीहि होत आहे. त्याप्रमाणें एकंदर जागतिक नाट्यप्रगतीच्या चार अवस्था दिसून येतात त्या पुढीलप्रमाणें:—( अ ) प्राचीन पौरस्त्य नाट्य, ( आ ) प्राचीन पाश्चात्त्य नाट्य, ( इ ) अर्वाचीन पाश्चात्त्य नाट्य, ( ई ) अर्वाचीन पौरस्त्य नाट्य; व ह्याच विभागांचा आपणांस स्वतंत्रपणें विचार करावयाचा आहे विषयविवेचनाच्या सोयीकरितां प्राचीन पौरस्त्य नाटकाचे आपणांस तीन भाग पाडतां येतील ते:—( १ ) भारतीय नाट्य, ( २ ) चिनी, जपानी नाट्यें, व ( ३ )इराणी, अरबी व इतर आशियामधील नाट्यें. प्राचीन पाश्चात्त्य नाट्याचा उद्भव ईजिप्तच्या प्राचीन सुधारणेपासून होऊन त्यामध्यें ग्रीक नाट्य व रोमन नाट्य हीं अंतर्भूत झालीं आहेत व त्यानंतर पाश्चात्त्यांच्या प्राचीन नाट्यास उतरती कळा लागल्याचें दिसून येतें.

अर्वाचीन पाश्चात्त्य नाट्याचा उद्भव मुख्यतः मूळ इटली देशांत सुरू होणाऱ्या परंतु कालांतरानें सबंध यूरोपखंडांत पसरलेल्या धार्मिक सुधारणेंत व विद्यावृद्धींत दिसून येत असून त्याचे ( १ ) इटालियन नाट्य; ( २ ) स्पॅनिश, पोर्तुगीज, फ्रेंच; ( ३ ) जर्मन, स्कँडिनेव्हियन, रशियन्; ( ४ ) व इंग्लिश नाट्य असे चार पोटविभाग पाडतां येतील.

अर्वाचीन पाश्चात्त्य नाट्याचा एकंदर पौरस्त्य वाङ्मयावर बराच परिणाम झाल्याचें दिसतें. विशेषतः आधुनिक भौतिक सुधारणेमुळें व सर्व जगामध्यें यूरोपियांची व्यापारांत भरभराट होत असल्यामुळें व मुख्यतः ब्रिटिश साम्राज्याच्या विस्तारामुळें एकंदर पौरस्त्य जगावर, विशेषतः भारतीयांवर फारच परिणाम घडून आले आहेत, ह्यामुळें इंग्लिश भाषेच्या सार्वत्रिक अभ्यासामुळें अर्वाचीन भारतीय नाट्याचें देखील बरेंच स्थित्यंतर झालें आहे. सांप्रतच्या भारतीय रंगभूमीवर विशेषतः महाराष्ट्रीय रंगभूमीवर तर पाश्चात्त्य नाट्यानें किती क्रांति केली आहे हें आपणांस स्पष्ट दिसत आहे. परंतु तत्पूर्वी प्राचीन भारतीय नाट्य परिणतावस्थेस कशा रितीनें पोहोंचलें ह्याबद्दल विचार करणें आवश्यक आहे.

भारतीय नाट्यशास्त्रकारांच्या मतानें नाट्य हा एक काव्याचा प्रकार आहे. साहित्यदर्पणांत ( ६.१ ) ऐकण्यास योग्य ( श्राव्य ) व पहाण्यास योग्य ( दृश्य ) असे काव्याचे दोन विभाग केले आहेत. दृश्य काव्य अभिनेय असल्यामुळें तें नाटकांतून दृष्टीस पडतें आणि म्हणून त्यास रूपक म्हणतात. शिवाय, नाटकांतील निरनिराळ्या पात्रांचीं स्वरूपें नटांच्या ठिकाणीं प्रतिबिंबित होत असतात म्हणूनहि त्यास रूपक म्हणणें रास्त होय.

## भारतीय नाट्यशास्त्रकार.

प्राचीन कालापासून भारतीयांचें नाट्यकलेच्या उपपत्तीकडे लक्ष होतेंसें दिसतें. पाणिनीनेंहि नट, नर्तक व मूक भावकरणारे यांचा उल्लेख केला असून त्यांच्या उपयोगाकरितां शैलाली व कृशाश्व यांनीं लिहिलेले नटसूत्रांचे ग्रंथ निर्दिष्ट केले आहेत ( ४. ३, ११० ). वेबरनें या नर्तक व मूक नटांच्या उपयोगाकरितां असलेल्या ग्रंथांचा विचार केला आहे आणि

त्यांच्या अस्तित्वाविरुद्ध जरी हिलेब्रँटनें आपला अभिप्राय व्यक्त केला असला तरी या बाबतींत वेबरचेंच मत ग्राह्य वाटतें. यापुढें भरताच्या नांवानें प्रसिद्ध असलेला नाट्यकलोपयोगी ग्रंथ रचण्याच्या कामीं या नटसूत्रांचा उपयोग केलेला आहे.

भ र त.—भरताचा काळ निश्चयानें ठरवितां येत नाहीं. तो मुनि असून फार प्राचीन काळीं म्हणजे काल्पनिक कृष्णयुगांत होऊन गेला अशा प्रकारच्या आख्यायिका प्रचलित आहेत. त्याचा " नाट्यशास्त्र " हा ग्रंथ नाटयवेदाचें रूपांतर असून तो वेद प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें लिहिला पण मानवांस कळविला नाहीं असा समज आहे. या बाबतींत यूरोपियन विद्वानांचीं मतें परस्परभिन्न आहेत. हेमनच्या मतानें भरत हा ख्रिस्ती शकारंभापूर्वी होऊन गेला असला पाहिजे तर तो सर्वोत्कृष्ट संस्कृत वाङ्मय उत्पन्न होण्यापूर्वी म्हणजे ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकांत झाला असावा असें रेमॉडचें मत आहे. पिशेलच्या मतें सहाव्या किंवा सातव्या शतकांत, तर श्री रा. प्रभाकर भांडारकर यांच्या मतें तो चवथ्या शतकांत झाला असावा. या सर्वांच्या मतांहून हरप्रसादशास्त्री यांचें मत भिन्न असून ख्रिस्ती शकापूर्वी दुसऱ्या शतकांत भरत झाला असावा असें ते मानतात.

ज्याअर्थी भासानें भरताचा उल्लेख केलेला आहे त्याअर्थी तो त्याच्यापूर्वी होऊन गेला असला पाहिजे हें उघड आहे. तथापि तो त्याच्या फार पूर्वी झाला नसावा. त्याचा ग्रंथ चांगल्या स्थितींत उपलब्ध झालेला नाहीं. त्याच्या निरनिराळ्या हस्तलिखित प्रतींत भिन्न पाठ व भिन्न विभाग केलेले आढळतात. त्यांतील कांहीं भाग तर मागाहून प्रक्षिप्त केले असले पाहिजेत असें उघड उघड दिसून येतें. त्याच्या ग्रंथांत संगीत, गान, नृत्य, शिल्प, विदुषकी, वेष, नाट्य, साहित्य, छंदःशास्त्र, विविध भाषाप्रयोग, रंगभूमिरचना, नट, श्रोतृसमाज इत्यादि सर्व नाट्यकलाविषयक विषयांचें विवेचन केलेलें आहे. प्रथम एडवर्ड हॉल यानें आपल्या "दशरूप" ग्रंथाच्या आवृत्तींत परिशिष्ट म्हणून १८–२० व २४ हे अध्याय प्रसिद्ध केले.त्यानंतर पॉल रेग्नॉड यानें अध्याय १६,१४–१५; ६–७ व जे. ग्रॉसे यानें अध्याय २८ प्रसिद्ध केले. पंडित शिवदत्त व काशीनाथ पांडुरंग परब यांनीं काय तो "भरत मुनीचें शास्त्र, मुंबई १८९४, काव्यमाला,४२" या नांवानें ग्रंथ छापून प्रसिद्ध केला.जोनी ग्रॉसेट याच्या नवीन आवृत्तींत आजपर्यंत १-१३ इतकेच अध्याय प्रसिद्ध झाले आहेत. मातृगुप्त, भट्टनायक, शंकुक ( ९ वें शतक ) व अभिनवगुप्त ( १० वें शतक ) इतक्या लेखकांनीं भरतच्या ग्रंथावर टीका लिहिल्या आहेत. परंतु त्यांपैकीं हल्लीं एकहि उपलब्ध नाहीं.

भरताच्या मागाहून झालेल्या शास्त्रकारांनीं भरताच्याच ग्रंथाचा आधार घेतला. त्यांचप्रमाणें अग्निपुराणांत याविषयीं जो सारांश दिला आहे(अ.३३७–३४१)तोहि त्याच्या ग्रंथावरूनच घेतलेला आहे. तथापि भरताच्या पश्चात् नाट्याचा जो विकास झाला त्यायोगानें नाटकाचे आनुषंगिक भाग—उदाहरणार्थ गायक, नर्तक, प्रहसन, मूक अभिनय इत्यादि—हे नाटक या मुख्य विषयापासून अगदीं वेगळे करण्यांत आले आणि भरताच्या पश्चात् झालेल्या शास्त्रकारांच्या ग्रंथांत भरताच्या फक्त नाटक या भागाचाच तेवढा प्रामुख्यानें विस्तार झाला आणि त्यामुळें भरताचा ग्रंथ मागें पडला.

दशरूपः—भरताच्या मागून झालेल्या नाट्यशास्त्रविषयक ग्रंथांत " दशरूप " हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. यांत नाटक हाच मुख्य प्रतिपाद्य विषय असून त्यांत भरताच्या ग्रंथाचा फार उपयोग केलेला आहे. त्याचा कर्ता विष्णुपुत्र धनंजय हा असून तो परमार राजा दुसरा वाक्पति माळव्याचा मुंज ( ९७४ ते सुमारें ९९५ ) याच्या वेळीं होऊन गेला. या " दशरूप " ग्रंथावर " अवलोक " या नांवाची एक टीका आहे. त्या टीकेचा कर्ता हा स्वतःस विष्णुपुत्र नांवें धनिक असें म्हणवितो; यावरून तो एकतर स्वतः धनंजयच असावा किंवा धनंजयाचा भाऊ असावा.

प्रतापरुद्रीयः—प्रतापरुद्रीय किंवा प्रतापरुद्रयशोभूषण याचा कर्ता विद्यानाथ यानें आपला ग्रंथ सर्वस्वी दशरूपाच्या आधारें लिहिला आहे. हा ग्रंथ सर्व साहित्यशास्त्रावर आहे. त्या ग्रंथाच्या नाटकविषयक पांचव्या भागांत ग्रंथकर्त्यानें नमुन्यादाखल एक पंचांकी नाटक दिलें आहे व त्यांत आपला आश्रयदाता काकतीय राजा प्रतापरुद्र ( सुमारें १२९१-१३२६ ) याची पुष्कळ स्तुति केली आहे.

साहित्यदर्पणः—हा ग्रंथहि फार मूल्यवान समजतात. हा सर्व साहित्यशास्त्रावर असून त्यांतील सहावा भाग फक्त नाटक या विषयावर आहे. तो मुख्यत्वेंकरून भरत व दशरूप यांच्या आधारानें रचलेला आहे. त्याचा कर्ता चन्द्रशेखराचा पुत्र विश्वनाथ कविराज हा होय. बोरू याच्या मतें तो बाराव्या शतकांत होऊन गेला. जगन्मोहन शर्मा याच्या मतें त्यानें आपला ग्रंथ पूर्वबंगाल्यांत ब्रह्मपुत्रेच्या तीरावर १५०० ( विक्रम संवत् ) या वर्षी लिहिला. परंतु या ग्रंथाचे प्रकाशक काशिनाथ पांडुरंग परब व पांडुरंग वामन काणे यांनीं तो चवदाव्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला असावा असें ठरविलें आहे. नाटयशास्त्रावरील या प्रमुख ग्रंथाशिवाय आणखीहि अनेक ग्रंथ आहेत परंतु ते सर्व हस्तलिखित असून छापून प्रसिद्ध झालेले नाहींत.

ना ट क गृ ह व न ट, नाटकगृहः—भरतानें व त्याच्या मागून झालेल्या शास्त्रकारांनीं नाटकगृहाची रचना व व्यवस्था यासंबंधीं अनेक नियम दिलेले आहेत. परंतु ते केवळ नाटकविषयक नसून त्यांत गायन व नृत्य यासंबंधींच्या नियमांचाहि समावेश केलेला आहे. या सर्वांचे प्रयोग देवालयांतून व राजगृहांतून होत असत हें निश्चित आहे. परंतु त्याच्या करितां स्वतंत्र इमारतीहि होत्या फार प्राचीनकाळीं काव्यग्रंथ तोंडपाठ म्हणून दाखविण्याकरितां एक गुहा होती ही

गोष्ट तिच्यांत असलेल्या ख्रिस्ती शतकाच्या पूर्वीच्या दुसऱ्या शतकांतील शिलालेखावरून सिद्ध झालेली आहे. परंतु तिच्यांत केवळ पठण किंवा नाटकें व नकला वगैरेहि होत असत हें निश्चयानें ठरवितां येत नाहीं. या लहानशा गुहा-नाटकगृहाच्या प्रवेशद्वारांतील फरशीला खोल भोकें पाडलेलीं आहेत. जर या भोंकांचा उपयोग त्याकाळीं नाटकाच्या पडद्याचीं दांडकीं बांधण्याकडे होत असला तर या गुहेंत नाटकांचे प्रयोग होत असले पाहिजेत हें उघड आहे. प्राचीन काळीं मनोरंजनाचीं ठिकाणें म्हणून गुहांचा फार उपयोग करीत असत असें लूडर्सनें प्रतिपादन केलें आहे आणि ज्या अर्थी भरतानें नाटकगृह हें पर्वताच्या गुहेसारखें व दुमजली असावें असा नियम घातला आहे त्यावरून अशा तऱ्हेच्या गुहा होत्या ही गोष्ट त्यानें गृहीत धरली आहे.

नाटकगृहाच्या रचनेसंबंधींचे नियम ( नाट्यगृह, नाट्यमण्डप, प्रेक्षागृह, प्रेक्षागार ) भरतानें आपल्या ग्रंथाच्या अध्यायांत दिलेले आहेत. त्यानें नाटकगृहाचे तीन प्रकार वर्णिले आहेत. (१) विकृष्ट, हें देवांकरितां असून त्याची लांबी १०८ हात ( प्रत्येक हात म्हणजे १८ इंच लांब ) असावी; (२)चतुरस्र, हें राजेलोकांकरितां असून त्याची लांबी६४हात व रुंदी३२हात असावी आणि (३)त्र्यस्र म्हणजे त्रिकोनी नाटकगृह, हें इतर जनांकरितां असून तें ३२ हात लांबीचें असावें. श्रवणाच्या सोयीच्या दृष्टीनें चतुरस्र मंडपाची शिफारस केली आहे.

नाटकगृहाचे दोन भाग असत; एक, प्रेक्षकस्थान व दुसरा रंगभूमि. प्रेक्षकस्थान हें स्तंभांच्या योगानें विभागीत असत. ब्राह्मणांची बसावयाची जागा असें दर्शविण्याकरितां अग्रभागीं एक धवलस्तंभ रोंवीत असत. त्यानंतर क्षत्रियांची बसावयाची जागा दाखविण्याकरितां एक रक्तस्तंभ रोंवीत असत आणि त्याच्या मागें वायव्येच्या बाजूस वैश्यांची जागा दाखविणारा पीतस्तंभ असून ईशान्येच्या बाजूस शूद्रांची जागा दाखविणारा एक निळाकाळा स्तंभ असे. प्रेक्षकांच्या बसावयाच्या जागा फळें व लांकूड इत्यादिकांच्या केलेल्या असत आणि त्या एकावर एक अशा तऱ्हेनें रचलेल्या असत. सर्व प्रेक्षकस्थानाच्या पुढें रंगभूमीशिवाय एक "मत्तवारणी" नांवाची ओसरी असे. तिला चार खांब असत आणि ती प्रेक्षक लोकांच्याच उपयोगाकरितां असे. प्रेक्षकगृहाच्या समोर सदर ओसरीच्या शेजारीं रंगभूमि असे ( रंग किंवा रंगपीठ ). ती आदर्शाप्रमाणें स्वच्छ असून तिच्यावर साधीं व ओल्या गिलाव्यावर काढलेलीं चित्रें असत. चतुरस्रमंडपांत ही रंगभूमि आठ हात लांब व तितकाच रुंद असे. या रंगभूमीच्या कडेला रंगशीर्ष म्हणत. हें रंगशीर्ष निरनिराळ्या आकृतींनीं सुशोभित केलेलें असे व त्यावरच बळी देण्यांत येत असत.

रंगभूमीच्या मागें एक रंगविलेला पडदा असे. त्यास पटी, अपटी, प्रतिसीरा किंवा यवनिका अशीं नांवें होतीं. यवनिका म्हणजे "आयोनिया प्रांतांतील" असा अर्थ होतो. परंतु "यवन" हा शब्द फक्त ग्रीक लोकांसच वापरीत नसत. त्याचप्रमाणें यवनिका या शब्दाचा अर्थहि केवळ नाटकाचा पडदा असा नसून तो इतर परदेशी वस्तूंसहि लावीत. वस्तुतः सर्व प्राचीन ग्रंथांतून हाच त्या शब्दाचा नेहमींचा अर्थ आहे.'यवनिका'शब्दाच्या जागीं जर 'यमनिका'हा शब्द होता असें मानलें तर त्यावरून सदर पडद्याचें कापड दुहेरी असे असें निष्पन्न होईल आणि तिसरा पर्यायशब्द जो "जवनिका" हें मूळ शब्दाचें प्राकृत भाषेंतील अपभ्रष्ट स्वरूप होय हें उघड आहे. कांहीं असलें तरी यवनिका (ज्याला पटी किंवा आपटी या शब्दाची जोड द्यावी लागते ) या संज्ञेवरून नाटकाच्या पडद्याची कल्पना प्रथम ग्रीक लोकांनीं काढली हें सिद्ध होत नाहीं आणि त्यापेक्षां भारतीयांनीं आपल्या नाट्याची कल्पना ग्रीक लोकांपासून घेतली हें तर मुळींच निष्पन्न होत नाहीं. जेव्हां एखादा नट एकदम किंवा त्वरेनें रंगभूमीवर प्रवेश करतांना पडदा बाजूला करतो तेव्हां त्यास "अपटिक्षेप" असें म्हणतात. पडद्याच्या मागें नटांची खोली ( नेपथ्यगृह ) असून तिला दोन प्रवेशद्वारें असत. त्या नेपथ्यगृहांत निरराळे नट आपापलीं सोंगें सजवीत असत. ज्यांचे प्रयोग रंगभूमीवर दाखवीत नसत म्हणजे उदाहरणार्थ नाटकांतील दंगल किंवा मारामारी इत्यादि प्रकार हे नटांच्या खोलींत ( नेपथ्ये ) गलबला करून दाखविण्यांत येत असत. नाटकांत जर देवतांचीं किंवा दैवी व्यक्तींचीं भाषणें असलीं तर तींहि तेथूनच करण्यांत येत. नेपथ्य-गृहाच्या दोन द्वारांच्या मधल्या जागेंत वाद्यस्थान असे.

रंगभूमिविषयकसामुग्री.–रंगभूमीला लागणारें सामान व नाटकांतील देखावे दाखविण्यास लागणारीं उपकरणें अत्यंत अल्पप्रमाणांत असत. निरनिराळीं स्थळें व त्यांतील वाटा दाखविण्याची कांहीं योजना नसून सर्व नाटकांत व सर्व प्रवेशांत एकाच पृष्ठभागाच्या पडद्याचा उपयोग करण्यांत येत असे. नाटकांतील निरनिराळीं दृश्यें अंशतःच दाखविण्यांत येत असून तीं सारीं "पुस्त" म्हणजे नमुने यांच्या योगानें दर्शविलीं जात. भरतानें ( २१.५. इ. ) या पुस्तांचे तीन प्रकार सांगितले आहेत. जेव्हां एखादें दृश्य बांबूचें करून त्यास कातड्याचें किंवा कापडाचें आच्छादन देण्यांत येई तेव्हां त्यास "संधिम", जेव्हां यांत्रिक साधनांचा उपयोग करण्यांत येई तेव्हां त्यास "व्याजिम" आणि जेव्हां केवळ वस्त्रांचा उपयोग करण्यांत येई तेव्हां त्यास "वेष्टित" असें म्हणत असत. या योगानें खडक, रथ, देवाचे रथ, घरें, पर्वतांच्या दऱ्या, घोडे, हत्ती वगैरे दाखवीत असत. उदयनचरितांत अशा प्रकारचा हत्ती करण्यांत आला होता असा दशरूपाच्या ( २. ५३ ) "अवलोक" टीकेंत निर्देश केलेला आहे. मृच्छकटिकांतील मृत्तिकाशकट, शाकुन्तल नाटकांतील जलाचे घट, बालरामायणांतील कळसूत्री बाहुल्या इत्यादि सर्व वस्तू "व्याजिम पुस्त" या सदरांत येतात.

अनेक बाहू किंवा कपि, अश्व आणि वृषभ यांचें शीर्ष असलेल्या राक्षसांचीं सोंगें सजवितांना मृत्तिका, लांकूड, मेण इत्यादिकांचा उपयोग करून नंतर त्यांस वस्त्रांनीं आच्छादित करावें असा निर्बंध होता. त्याचप्रमाणें आयुधें कठिण द्रव्याचीं करूं नयेत; त्याकरितां तृणाच्या कणखर पाती, बांबू, लाख वगैरेंचा उपयोग करावा, ठोसे व वार हे केवळ अभिनयांनीं किंवा जादूगाराच्या हातचलाखीप्रमाणें दाखविण्यांत यावेत अशा तऱ्हेचे नियम होते.

नेपथ्यः—भरतमुनीनें आपल्या ग्रंथाच्या २१ व्या अध्यायांत वेषासंबंधीं, रंग लावण्यासंबंधीं व अलंकार घालण्यासंबंधीं नियम सांगितले आहेत. या सर्व बाबतींत निरनिराळ्या वर्गांच्या व प्रांतांच्या चालीरीतींकडे लक्ष देणें जरूर होतें. " शुद्ध, " " विचित्र " व " मलिन " असे पोषाखांचे तीन प्रकार सांगितले असून ते कोणी व केव्हां घालावेत याविषयींहि निर्बंध होते. अभिर जातीच्या मुली निळीं वस्त्रें, संन्यासी हे चिंध्या किंवा वल्कलें, अंतःपुरांतील लोक काषायवस्त्रें, तसेंच राजे लोक विचित्र पोषाख व उच्च वर्गांतील लोक शुद्ध पोषक वापरीत असत. टोप कसा घालावा व दाढी कशी लावावी याविषयीं नियम होते. पिशाच्चें, भुतें व वेडे लोक यांचे केंस मोकळे असत आणि मुलें व नोकर यांचे केंस कापले नसले तर त्यांस तिन झुलपीं ठेवण्याची चाल होती. विदूषकास टक्कल असे. अवन्तीनगरांतील व साधारणतः बंगाल्यांतील मुलींचे केंस कुरळे असत. उत्तरेकडील स्त्रिया आपले केंस मस्तकावर बांधीत असत. परंतु वेणी घालण्याचा साधारण चहूंकडे परिपाठ होता. काळी, भोरी किंवा खरखरीत अशा तऱ्हेचे दाढीचे निरनिराळे प्रकार होते. या बाबतींतले सर्व नियम नेहमींच्या जीवनक्रमाकडे लक्ष देऊन ठरविले होते.

अंगास रंग लावण्याबद्दलचे ( अंगरचना ) नियम जुन्या प्रहसन–काळांतून घेतले होते. देव व दैविक व्यक्ति, निरनिराळ्या कुळांतील व जातींतील लोक यांस द्यावयाचे रंग शास्त्रकारांनीं ठरवून टाकले होते त्यावरून किरात, बर्बर, आन्ध्र, द्रविड, काशी, कोसल, पुलिन्द आणि दाक्षिणात्य यां लोकांचा रंग काळा ( असित ) होता; शक, यवन, पल्हव व बाल्हिक इत्यादि वायव्येकडील लोकांचा रंग गौर होता ( भरत, २१.६२; रक्तपीतसंयोगात् गौरः ); पांचाल, शूरसेन, माहिष, उड्र, मगध, अंग, वंग व कलिंग हे श्याम होते, ब्राह्मण व क्षत्रिय गौर होते व वैश्य आणि शूद्र हे श्याम होते. माळा व अलंकार यांचा शरीर शृंगारण्याकडे उपयोग करीत असत. हे अलंकार तांबें, अभ्रक, लाख इत्यादि पदार्थांचे करीत असत. याप्रमाणें निरनिराळे लोक ठराविक पद्धतींचे पोषाख व अलंकार घालीत असत. यावरून त्या पद्धतीचा उगम नृत्य व प्रसहन या काळांतून झाला असला पाहिजे हें उघड आहे. विद्याधर, यक्ष, अप्सरस् व नाग या जातींतील मुली हिऱ्यांमोत्यांचे अलंकार घालीत व नागकन्या डोक्यांत नागहि घालीत असत ( भ. २१.४२ ). यक्षकन्या या त्यांच्या बुचड्यांवरून ओळखल्या जात.

प्रेक्षकः—नटांप्रमाणें भरतानें प्रेक्षकांबद्दलहि विवेचन केलें आहे. भरतानें उत्कृष्ट प्रेक्षकांचें वर्णन असें दिलें आहे ( २७.५१ इत्यादि ) कीं, प्रेक्षकांचीं इंद्रियें तीक्ष्ण असावीत, त्यांच्या ठिकाणीं नाटकांचे गुणदोष विवेचन करण्याची पात्रता असावी आणि नटांच्या सुखदुःखांचा त्यांच्यावर परिणाम व्हावा. तथापि सर्वच गुण प्रेक्षकांच्या ठि ाणीं असत नाहींत. नाट्यपरिषदेंत उत्तम, मध्यम व अधम असे तीन प्रकारचे प्रेक्षक असतात. प्रयोग किती यशस्वी झाला हें ठरविण्याचें काम सर्वगुणमंडित अशा प्राश्निकांचें असतें ( भरत, २७.४७ इ. ). प्रेक्षक आपले अभिप्राय स्मित, हास्य, रोमांच, उद्गार, उत्थापन, टाळ्या इत्यादिकांच्या योगानें व्यक्त करतात. सभासद ( प्रेक्षक ) सुसंस्कृत व रसिक असल्याबद्दल नाटकांतूनहि उल्लेख केलेला दिसतो. श्रेष्ठ प्रतीच्या नाटकांत तर सभासद सुशिक्षित असल्याबद्दल गृहीतच धरण्यांत येतें. त्याचप्रमाणें सभापति हा राजपुत्र किंवा कोणी तरी श्रेष्ठ दर्जाचा असतो. साधारण सभासदांनांहि नटांच्या सर्व सरंजामाविषयीं माहिती असल्याचें दिसून येतें.

नटः—जुन्या व नव्या वाङ्मयांत अनेक नटवाचक शब्द आढळतात आणि त्यायोगानें नाट्यकला केव्हां उदयास आली या प्रश्नावर कांहींसा प्रकाश पडतो. "भरत" किंवा " भारत " या शब्दाचा आणि अलीकडील " भाट " या शब्दाचा अत्यंत निकट संबंध आहे, असें लेव्हि याचें म्हणणें आहे आणि तें बरोबर आहे. त्याचप्रमाणें " चारण" शब्दहि अलीकडे कवि किंवा गायक या अर्थानें प्रसिद्ध आहे. लेव्हीनें " कुशीलव " या शब्दाची आणि ज्यांनीं अगदीं प्रथम रामायण पाठ म्हणून दाखविलें असे रामपुत्र कुश आणि लव यांची सांगड घालून दिली आहे. कौटिल्य २१.८ यानें गीत व नृत्य यांसंबंधानें त्यांचा व रूपाजीवासंबंधानें छायानटांचा निर्देश केला आहे. त्याचप्रमाणें त्यांच्या ठिकाणीं गानचातुर्य विशेष असल्याबद्दल भरतानें (३५.३७) नमूद केलें आहे. प्रथम हे वीररसप्रधान काव्यें म्हणणारे व फिरते गायक असावेत असें दिसून येतें. वेबरनें शैलाली व कृशाश्वी यांची तुलना करून व ते विशिष्ट प्रकारचे नट होते असा आपला अभिप्राय देऊन ते शैलाली व कृशाश्व ( प्पा. ४ ) यांचे शिष्य होते असें नमूद केलें आहे. तथापि वाजसनेयि संहिता ( ३०.४ ) व तैत्तिरीय ब्राह्मण ( ३.४२ ) यांत पुरुषमेधाच्या वेळीं बळी द्यावयाचे शैलूष यांची व शैलाली यांची त्यानें पुढें सांगड घालून दिली आहे. सदर संहिता व ब्राह्मण यांच्यावरील भाष्यांत त्या ठिकाणीं सायणाचार्यानें शैलूष म्हणजे आपल्या स्त्रियांच्या व्यभिचारावर उपजीविका करणारे असें स्पष्टीकरण केलें आहे. परंतु मूळांत नृत्य व गीत यांत निष्णात असल्याबद्दलच तेवढा त्यांच्या संबंधीं उल्लेख आहे. त्यांचा व शैलालकांचा संबंध होता असें

मथुरा येथील प्राचीन शिलालेखावरून दिसून येतें. ल्यूडर्सनें त्यास " शौभिक " असा एक तिसराच पर्याय शब्द सुचवून त्याचा अर्थ मूळांत विदूषक, जादूगार, हातचलाखीचे खेळ खेळणारा असा होतो असें नमूद केलें आहे.

तथापि, नाटकांतील पात्रांस नेहमींचा शब्द " नट " असा आहे. नट शब्द नृत् = नाचणें या धातूपासून निघाला आहे. अर्वाचीन नटांचा व प्राचीन ऋग्वेद कालींहि प्रख्यात असलेले स्त्री-पुरुष नर्तक ( नृतु, नृतू ) यांचा संबंध असला पाहिजे. नाचण्याची कला प्राचीन कालीं लोकप्रिय असून तिचा उपयोग धर्मकृत्यांतहि करीत असत. प्राकृत भाषेंतील " नट " शब्दावरून नाचण्याच्या कलेचा सार्वलौकिक विकास झालेला होता आणि त्यावरून प्राचीन नट व अर्वाचीन नट किंवा नर, फिरते किनरीवाले, नाचे व कोल्हाटी यांची परंपरा एक होती असें जें हिलेब्रँटचें म्हणणें आहे तें सयुक्तिक वाटूं लागतें. नाचे लोक फिरते असत याबद्दल ग्रंथांतरींहि साक्ष मिळते. नट फिरते असल्यामुळें परागंदा झालेल्या आपल्या प्रियकरास परत आणण्याविषयीं शामा नांवाच्या वेश्येनें त्यांना सांगितल्याबद्दल कणवेर जातकांत नमूद केलें आहे ( जातक ३. पृ. ५८ इ. ). हे नट लोकांच्या करमणुकीकरितां बैठकी करीत असत आणि त्यावेळीं नाच, गीत व वादन यांचा रंग उडवीत असत. यांच्या विषयीं अनेक ठिकाणीं उल्लेख केलेला आढळतो ( उ. विनयपिटक २.१०७ ). ते केवळ नाचतच नसत तर गात व पाठ म्हणून दाखवीत असत याविषयीं महाभाष्यांत उल्लेख असल्याबद्दल वेबरनें लिहिलें आहे.

नटांस जे अनेक पर्यायशब्द आहेत त्यांवरून फिरते गायक, नाचे व मुख्या फासींतील नट यांच्या लौकिक कलेपासून नटांच्या कलेचा विकास झाला असावा असें दिसून येतें. ज्याप्रमाणें या लोकांस सध्यां समाजांत मान नाहीं त्याप्रमाणें त्यावेळींहि नव्हता. रंगोपजीवन हें बौधायन ( २.१;२.१३) याच्या मतानें उपपातक गणलें जात होतें आणि विष्णूच्या (१६-८) मतानें रंगावतरण हा अयोगवाचा धंदा होता व ( अयोगव म्हणजे शूद्र व वैश्य स्त्री यांची संतति ) कौटिल्य ( पृ. ७.१८ ) हा शूद्राच्या धंद्यांतच कुशीलवाच्या धंद्याचा अंतर्भाव करतो आणि प्रसन्नराघवांतहि तोच अभिप्राय दिलेला आहे. (१.२३,२४). मनु (१२.४५) हा नटांस झल्ल व मल्ल या सदरांत घालतो आणि त्यांचें दर्शन टाळण्याविषयीं उपदेश करतो. मनु. (४.२१५) व याज्ञव. (१.१६१) यांच्या मतानें ब्राम्हणानें नटाच्या ( रंगावतारक, रंगावतारी ) हातचें अन्न सेवन करूं नये. मनु ( ८.६५ ) याच्या मतानें कुशीलवाची व याज्ञवल्क्य ( २-७० ) याच्या मतानें रंगावतान्याची शपथ कायदेशीररीतीनें जमेस धरण्यासारखी नाहीं. न्यायाधिशानें कुशीलवास शूद्र समजावें ( मनु ८.१०२ ) आणि राजानें त्यास शहराबाहेर घालवून द्यावें.

नटाचा लौकिकहि वाईट होता व विशेषेंकरून त्यांच्या स्त्रिया अनीतिमान असल्याबद्दलचा समज जिकडे तिकडे प्रचलित होता. त्यामुळें कोशकारांनीं " नट " या शब्दाला " जायाजीव " ( म्हणजे आपल्या स्त्रीच्या कमाईवर चरितार्थ चालविणारा ) असा पर्यायशब्द दिला आहे.

तथापि कांहीं सत्कुलांतील मंडळीहि नाटकांत जात असत. वसन्तसेनेसारख्या वारयोषिताच केवळ नव्हे; तर मालविकेसारख्या उच्च कुळांतील बालिकाहि नाट्यकलेचें शिक्षण घेत होत्या. भरतमहामुनींच्या समोर झालेल्या स्वर्गांतील नाट्यप्रयोगांत उर्वशी ह्या अप्सरेनें भूमिका घेतल्याचें प्रसिद्ध आहे. प्रियदर्शिका नाटकांत उदयन राजा स्वतः रंगभूमीवर अवतीर्ण होत असे आणि त्याबद्दल त्यास कोणी दोष देत नव्हते. नट-लोक राजांचे अतिथी असल्याबद्दलचे व श्रेष्ठ कवींचे परम स्नेही असल्याबद्दचे ग्रंथांतरींचे दाखले लेव्ही या लेखकानें नमूद केले आहेत. ज्याअर्थी नाट्याचार्य भरतास महामुनि अशी पदवी प्राप्त झाली होती आणि श्रेष्ठ कुळांतील भारतीय लोक नाटकांत बिनदिक्कत भाग घेऊं लागले होते त्याअर्थी प्रथम जिच्या संबंधानें तिरस्कार वाटत असे अशी फिरत्या गाणाऱ्यांची व नाच्यांची संस्था जाऊन तिच्या जागीं श्रेष्ठ प्रतीची नाट्यकला उदयास आली होती असें दिसून येतें.

नटांमध्यें व विशेषेंकरून नाटककंपनीच्या व्यवस्थापकामध्यें श्रेष्ठ प्रतीचे गुण असावे लागत असत यावरूनहि तीच गोष्ट सिद्ध होते. भरताच्या मताप्रमाणें ( २४.९३ इ. ) नाटकाचा व्यवस्थापक सर्व शास्त्रांत व कलांत निष्णात असावयास पाहिजे. सर्व देश व तेथील चालीरीती व संवयी यांची त्यास माहिती पाहिजे. त्याचप्रमाणें विद्येचीं विविध अंगेंहि त्यास अवगत असावीत. नाटककंपनीच्या व्यवस्थापकास कांहीं ठिकाणीं नटग्रामणी ( नटगामणी ) असें म्हटलें आहे. त्यास नेहमीं सूत्रधार म्हणत असत. सूत्रधार याचा शब्दशः अर्थ सूत्रें धारण करणारा असा असल्यामुळें तो शब्द कळसूत्री बाहुल्यांच्या खेळापासून प्रचारांत आला असावा असें पिशेलचें मत आहे. कळसूत्री बाहुल्यांची स्थापना करण्याचें काम ज्यांच्याकडे होतें त्यास स्थापक म्हणत असत असें पिशेल म्हणतो. शिवाय नटकंपनीच्या व्यवस्थापकाकडे नाटकगृहाची तपासणी करण्याचें काम असल्यामुळें व सूत्रधार या शब्दाचा एक अर्थ शिल्पज्ञ, शिल्पकार असा असल्यामुळेंच सूत्रधार हा शब्द प्रचारांत आला असण्याचा संभव आहे.

सूत्रधार हा इतर नटांचा शास्ता व शिक्षक असल्यामुळें त्यास नाट्याचार्य म्हणतात व त्या शब्दाचा अर्थहि कधीं कधीं शिक्षक किंवा अध्यापक असा करतात. उदा. उत्तररामचरित्र (४.२२-२३) यांत सूत्रधारास तौर्यत्रिक म्हणजे गायन, वादन व नृत्य यांत निष्णात असलेला असें म्हटलें आहे.

नाटककंपनींत सूत्रधाराव्यतिरिक्त त्याचा एक साहाय्यक पारिपार्श्वक किंवा पारिपार्श्विक म्हणून असतो. आणि भरताच्या मतें (२४.१०१)सूत्रधारापेक्षां पारिपार्श्वकाच्या ठिकाणीं कांहीं गुण कमी प्रमाणांत असले तरी चालण्यासारखें असतें.

सूत्रधाराची गृहव्यवस्था बघण्याकरितां एक स्त्री असे व तिला नटीचेंहि काम करावें लागे. याशिवाय इतर अनेक स्त्री-पुरुष नट असत व त्यांची संख्या बरीच मोठी असावी. त्यांच्यांतहि सूत्रधाराचे सर्व गुण असावेत. परंतु ज्या मानानें त्यांच्यांत ते गुण वास करीत असतात त्या मानानें त्यांचे उत्तम, मध्यम व अधम असे तीन वर्ग करण्यांत येतात. त्याचप्रमाणें भरताच्या नियमांप्रमाणें ( भ. २६ ) भूमिकांचेहि तीन वर्ग केले आहेतः—( १ ) अनुरूप,ज्यांत पुरुष पुरुषांच्या व स्त्रिया स्त्रियांच्या भूमिका घेतात आणि जेव्हां नटांचें वयोमान व पात्रांचें वयोमान यांत सारखेपणा असतो. ( २ ) विरूप, जेव्हां एखादा तरुण, वृद्धाची भूमिका घेतो किंवा त्याच्या उलट जेव्हां एखादा वृद्ध तरुणाची भूमिका घेतो. ( ३ ) रूपानुरूप, जेव्हां एखादा पुरुष स्त्रीची भूमिका घेतो आणि जेव्हां एखादी स्त्री पुरुषाची भूमिका घेते ( भ. १२.१६६ इत्यादि ). नाजुक मनोविकारांच्या अभिनयाचें काम स्त्रियांकडे होतें आणि गायनाचें कामहि त्यांच्यावर सोपविण्यांत येत असे. स्त्रियांच्या भूमिका स्त्रियाच घेत असाव्यात असें दिसतें. भरताच्या लक्ष्मीस्वयंवर नाटकांत उर्वशीनें नायिकेची भूमिका घेतली होती. प्रियदर्शिका नाटकांतहि तोच प्रकार दृष्टीस पडतो. शिवाय प्रियदर्शिका नाटकांत एक परिचारिका राजाची भूमिका घेणार होती परंतु अखेर राजानेंच ती भूमिका घेतली. कांहीं वेळां स्त्रियांचीं कामें पुरुषहि करीत असत. उदाहरणार्थ, मालतीमाधव नाटकांत सूत्रधारच कामन्दकी-योगिणीची भूमिका घेतो. अशा रीतीनें वेष पालटून रंगभूमीवर येणाऱ्या नटास " महाभाष्यांत " भ्रूकंस म्हटलें आहे.

भा र ती य ना ट कां ची घ ट ना.—भारतीय नाट्य व यूरोपिअन नाट्य यांच्यांत पुष्कळ बाबतींत महदन्तर आहे. भारतीय नाट्यांत गायन व नृत्य यांचा बराच भाग असल्यामुळें त्याचें व ज्याला 'ऑपेरा' म्हणतात त्याचें पुष्कळ साम्य आहे. भारतीयांची गायन व नृत्य या विषयींची आवड ग्रीक लोकांच्याहि लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं. त्यामुळें त्यांच्या उत्सवप्रसंगींच्या नटांच्या कार्यक्रमांत गायन, वादन व नृत्य या तिन्हींचाहि समावेश करण्यांत येत असे व त्यांच्या नाट्यांत तोच प्रकार चालू होता. त्यावेळीं नृत्य फार लोकप्रिय असून, सर्व उत्सवांच्या वेळीं, विशेषकरून विवाह, जन्मोत्सव इत्यादिकांच्या प्रसंगीं तर त्याचा सार्वत्रिक उपयोग करीत असत असें भरतानें ( ४.२४६ इत्यादि ) नमूद केलें आहे. नृत्याचे दोन प्रकार होते. एक, नाजूक पद्धतीचें स्त्रियांचें नृत्य, ज्यास लास्य म्हणत असत तें व दुसरें अधिक दांडगेपणाचें, ज्यास तांडव म्हणत असत तें. नृत्याबरोबरच गीत म्हणण्याचा प्रघात होता. केवळ भाव उत्पन्न करणाऱ्या नृत्यापेक्षां रसोत्पत्ति करणारें नाट्य निराळें होतें हें सहज समजण्यासारखें आहे. नाटकांत ज्याचा संबंध येतो त्या संगीताचें भरतानें विवेचन केलें आहे. तंतुवाद्यांचेंहि त्यानें विशेष सविस्तर निरूपण केलें आहे परंतु त्याचा नाटकांतून कोठें उल्लेख केलेला आढळत नाहीं. नाट्यासंबंधींच्या या कला त्यापूर्वीच प्रचलित असल्या पाहिजेत आणि भरतानें त्यांचें वर्णन आपल्या पूर्वींच्या लेखांवरून घेतलें असावें.

गद्य व पद्य यांचें मिश्रण हें भारतीय नाटकांतील दुसरें वैशिष्ट्य होय. पिशेलच्या मतानें प्रथम नाटकांतील पद्यें कायम स्वरूपाचीं असून गद्यांत मात्र फेरबदल करून त्यास नवीन स्वरूप देण्यांत येत होतें आणि त्यावरून ऋग्वेदांतील आख्यानगीतापासून नाट्यसंप्रदायाचा उगम झाला पाहिजे असें त्यानें अनुमान काढिलें आहे. परंतु मूकनाट्यापासून नाट्याचा उगम झाला असावा असें जें हिलेब्रँडचें मत आहे तें अधिक बरोबर दिसतें. सर्व प्राचीन नाटकांत पद्याइतकेंच गद्याचेंहि स्वरूप कायम ठशाचें होतें. कांहीं असलें तरी ज्याअर्थीं प्राचीन काळांतील सर्व सार्वजनिक उत्सवांत गीताचा प्रमुख भाग होता, ज्या अर्थीं प्राचीन काळचे नट पद्यांतच समाजाला उद्देशून बोलत असत आणि ज्या अर्थीं नाटकांचीं संविधानकें ज्या वीररसप्रधान काव्यांतून घेण्यांत येत असत तीं पद्यमय होतीं त्याअर्थीं नाटकांत पद्यांचा अभाव असणें अगदीं असंभवनीय होतें.

अं क वि भा ग णी.—निरनिराळ्या अंकांत नाटकांचे विभाग करीत असत. नाटकाच्या विभागणीला साधारणपणें अंक हें नांव होतें ( भ. १८. १४. इ. दश. ३. २७. व सा. द. ६.१२ इ.). ' सट्टक ' नांवाच्या उपरूपकांत मात्र अंकाला जवनिकांतर अशी संज्ञा आहे. भरताच्या मतानें अंक हा रूढिशब्द आहे म्हणजे त्याची व्युत्पत्ति त्यास माहीत नव्हती. दशरूपावरील अवलोक टीकेचा कर्ता म्हणतो कीं, अंक शब्दाचा मूळ अर्थ गर्भाशय असा आहे व म्हणून ज्यांत पात्रांचे मानसिक भाव व अवस्था व्यक्त होऊन त्यांचें निरनिराळ्या रीतीनें आविष्कारण होत जातें व संविधानकाचा विकास होतो त्या नाटकाच्या विभागास अंक म्हणतात.

नाटक ज्या प्रकारचें असेल त्यामानानें त्याच्यांतील अंकांची संख्या असते. नाटकांच्या मुख्य मुख्य प्रकारांमध्यें अंकांची संख्या कमींत कमी पांच व जास्तींत जास्त दहा असते परंतु इतर नाटकांत ती संख्या एकापर्यंत उतरून चवदापर्यंतहि वाढत जाते.

प्रत्येक अंकांत नायक प्रेक्षकांच्या नजरेस पडला पाहिजे याकरितां शास्त्रकारांच्या मतानें पात्रांची संख्या फार मोठी असूं नये. साहित्य-दर्पणकारांच्या मतें पात्रांची संख्या तीन किंवा चार ही सोयीची असते.परंतु बहुतेक नाटकांतून ती संख्या यापेक्षां अधिक असते. एका अंकांत निवेदन

केलेला वृत्तांत एका दिनावधीपलीकडचा असूं नये व धार्मिक कर्तव्याची हेळसांड करण्यांत येऊं नये असाहि एक नियम शास्त्रकारांनीं घालून दिला आहे. निरनिराळ्या वृत्तांताची गर्दी मात्र एका अंकांत करतां येते. रंगभूमीवरून सर्व पात्रांचें निघून जाणें हें अंकाच्या समाप्तीचें निदर्शक असतें. कधीं कधीं प्रत्येक अंकाला विशिष्ट नांव असतें; उदा० मृच्छकटिक व अनेक रामनाटकें. येरवीं, अंकांची नुसती गणना करण्यांत येते.

मृत्यु, वध, युद्ध, राज्यच्युति, नगरपरिवेष्टन इत्यादि गोष्टी रंगभूमीवर दाखविण्यांत येऊं नयेत असा शास्त्रकारांचा निर्बंध आहे. परंतु एकंदर नाट्यविषयक निर्बंधांच्या निरनिराळ्या बाबतींत निरनिराळ्या शास्त्रकारांमध्यें मतवैचित्र्य दिसून येतें. ज्या बाबतींत भरतानें सवलती ठेविल्या आहेत त्यांत त्याच्या मागून झालेल्या शास्त्रकारांनीं कडक नियम घालून दिले आहेत. यामुळें मागाहून झालेल्या शास्त्रकारांच्या नियमांबर-हुकूम अगोदरच्या नाटककारांची नाट्यरचना दिसून येत नाहीं. उदाहरणार्थ, भास कवीच्या " ऊरुभंग " नाटकांत दुर्योधनाचा मृत्यु व मृच्छकटिक नाटकांत शकारानें केलेला वसंतसेनेचा वध हे दोन्हीहि प्रकार रंगभूमीवर दाखविण्यांत येतात.

ज्या गोष्टी रंगभूमीवर दाखवावयाच्या नसतात किंवा ज्या घडून येण्यास दीर्घकाल लागतो त्या दोन अंकांमध्यें—ज्याला अर्थोपक्षेपक म्हणतात त्यांत–निवेदन कराव्यात किंवा सोयीप्रमाणें कथानकामध्येंहि फेरफार करावेत ( भरत, १९. १०४; दश. १. ५२ व सा. द. ६. ५३; इ. ). या दोन अंकांमधील अर्थोपक्षेपकांचे पांच प्रकार आहेतः ( १ ) विष्कंभक, ( २ ) चूलिका, ( ३ ) प्रवेशक ( ४ ) अंकावतार, व ( ५ ) अंकमुख.

ज्या गोष्टी घडत आहेत किंवा घडलेल्या आहेत त्या अंकाच्या प्रारंभीं विष्कंभ किंवा विष्कंभक यांत सांगितल्या जातात. उदाहरणार्थ, दोन अंकांमध्यें जर पुष्कळसा काळ लोटला असेल किंवा महत्त्वाच्या गोष्टी घडल्या असतील तर नव्या अंकाचा प्रारंभ विष्कंभकानें करतात. मुखसंधीमध्येंच विष्कंभकाचा उपयोग करावा असा नियम भरतानें घालून दिला आहे. परंतु या नियमासंबंधानें इतर ग्रंथांची एकवाक्यता नाहीं. विष्कंभकाचें वैशिष्ट्य त्याच्यांतील पात्रांच्या दर्जावरून ठरविण्यांत येतें. हीं पात्रें जर मध्यम वर्गांतील असलीं तर त्या विष्कंभकास शुद्ध म्हणतात व तो संस्कृतांत असतो. व मध्यम वर्गांतील पात्रांबरोबर जर नीच वर्गांतील पात्रांनींहि प्रवेश केला तर त्या विष्कंभकास संकीर्ण म्हणतात व त्यांत नीच वर्गांच्या पात्रांची भाषा प्राकृत असते.

प्रवेशकः—हा अगदीं हुबेहूब विष्कंभकाच्या जातीचा असतो. तसेंच तो दोन अंकांच्या मध्यें असतो पण पहिल्या अंकाच्या प्रारंभीं नसतो. प्रवेशकांत फक्त नीच वर्गांतील पात्रेंच कायतीं प्राकृत भाषेंत बोलतात ( भरत १८. २६ व ८६, व १९.१०८; दश. १. ५४; सा द. ६. ५७ ).

चूलिकाः—कांहीं गोष्ट घडल्याबद्दलचा वृत्तांत जेव्हां पडद्यामागून निवेदन करण्यांत येतो तेव्हां त्यास चूलिका म्हणतात. ( भ. १९. १०७; दश. १. ५५; सा. द. ६. ५८ )

बाकी राहिलेले दोन अर्थोपक्षेपक कांहींसे निराळ्या स्वरूपाचे आहेत. अंकावतारामध्यें एका अंकाच्या शेवटीं पुढील अंकांत येणाऱ्या कथांशाचें दिग्दर्शन केलेलें असतें ( भ. १९.११०; दश. १.५६; सा. द. ६. ५८; इ. ).

अंकापासून विश्लिष्ट असलेल्या अंकारंभीं पुढील कथाभागाची अगाऊ सूचना देण्यांत येते तेव्हां त्यास अंकमुख म्हणावें असें भरताचें मत आहे ( १९.१११ ). दशरूपककार त्यास 'अंकास्य' म्हणतात आणि त्यांत पूर्वीच्या अंकाच्या शेवटीं पुढें येणाऱ्या अंकाचा प्रारंभ जाहीर करण्यांत येतो असें त्यांनीं त्याचें स्वरूप वर्णन केलें आहे. परंतु साहित्यदर्पणकाराच्या मतानें ( सा. द. ६.६० ) याविषयीं मतभेद असून कांहीं शास्त्रकार वर वर्णन केलेल्या प्रकारास अंकावतार असें म्हणतात आणि ज्यांत पुढील सर्व नाटकाचा सारांश एका अंकांत दिलेला असतो त्यास अंकमुख म्हणतात असें त्यानें नमूद केलें आहे.

नाटकांतील पात्रें.—नाटकांतील पात्रें कशीं असावींत याविषयीं शास्त्रकारांनीं विस्तृत नियम घालून दिलेले आहेत. परंतु ते नियम बहुतेक सर्व साहित्यग्रंथांत अन्तर्गत झाले असल्यामुळें नाट्येतिहासांत त्यांचें वैशिष्ट्य उरलें नाहीं.

नायकः—नायकाच्या गुणांवरून व चारित्र्यावरून त्याच्या अनेक जाती होतात. नायक, नेतृ आणि अशाच प्रकारच्या पुष्कळ जाती शास्त्रकारांनीं वर्णन केल्या आहेत ( भरत २४. ३; दश. २ १; सा. द. ३. ३०; इ. ). नायकाच्या विरुद्ध कृति करण्यास व त्याचा प्रतिद्वन्द्वी म्हणून नाटकांत एक प्रतिनायक असतो उदा. रामनाटकांतील रावण; तो तामसी व दुष्ट मनोवृत्तीचा दाखविला असतो. ( दश. २.८; सा. द. ३.१३१ ).

नायिकाः—नायिकांच्या अनेक जातींसंबंधाचे नियमहि सविस्तरपणें दिलेले आहेत ( भ. २४.६ व ११४; दश. २.१४; सा. द. ३.५६; इ. ). नायिकांच्या या जाती त्यांचे गुण, त्यांचा सामाजिक दर्जा व त्यांचें नायकाशीं असलेलें नातें हें सर्व लक्षांत घेऊन केलेल्या असतात. त्यामुळें त्या दिव्या, नृपपत्नी, कुलस्त्री किंवा गणिका या जातींच्या असतात. नायकाशीं असलेला त्यांचा संबंध लक्षांत घेतला तर त्या स्वा किंवा अन्या अथवा परकीया किंवा साधारणी या जातींच्या असतात. साधारणी नायिका अर्थात् गणिकावर्गांतील असते हें उघड आहे.

नायक व नायिका यांशिवाय इतर अनेक पात्रांचा शास्त्रकारांनीं निर्देश करून वर्णन केलें आहे. सदर पात्रांकडे नाटकांतील कामाचा फार थोडा भाग असतो आणि तीं

बहुतकरून मूक-नाट्य व प्रहसन यांच्यामधून घेतलेली असावींत. या पात्रांचे तीन वर्ग करण्यांत येतातः— पुरुष, स्त्री व नपुंसक. पुरुषवर्गांतील पात्रांचें व नायकाचें जवळचें किंवा लांबचें नातें असतें.

पीठमर्दः—नायकाच्या नर्मसचिवांमध्यें किंवा नर्मसुहृदांमध्यें पीठमर्द म्हणजे जो त्याची बसावयाची जागा साफसूफ करतो ( दश. २.७; सा. द. ३.३९ ) त्याचाहि शास्त्रकारांनीं अंतर्भाव केला आहे. त्यानें कपट करावें परंतु नायकाशीं अदबीनें वागावें. " पताका ", "प्रासंगिक इतिवृत्त" इत्यादि प्रकारांत तो जवळ जवळ नायकच असतो. रामनाटकांतील सुग्रीव व मालतीमाधवांतील मकरन्द हीं पीठमर्दाचीं उदाहरणें म्हणून देण्यांत येतात. परंतु नाटकांतून तसा कोठें उल्लेख करण्यांत आलेला नाहीं. उलट " मालविकाग्निमित्र " (१.१३-१४) नाटकांत तपस्विनी कौशिकी हिचें "पीठमर्दिका" असें वर्णन केलें आहे. आणि त्या शब्दाचा टीकेंत नर्मसुहृद असा अर्थ केला आहे. यावरून नाटकामध्यें पीठमर्द हें स्वतंत्र पात्र असल्याचा पुरावा सांपडत नाहीं.

विटः—हा धूर्त नागरिक असतो. तो वेश्यांशीं व्यवहार करण्यांत धूर्त, मनोरंजक संभाषण करण्यांत कुशल, गायनादि कलांत निष्णात ( भ. १२. ९७; २४. १०४; दश. २.८; सा. द. २.४१ ) आणि भरताच्या मतानें तो कवि असतो. वात्स्यायन म्हणतो कीं तो उधळ्या व विवाहित असतो ( कामसूत्र पृ. ५८. ). हें वर्णन नाटकांत दाखविण्यांत येणाऱ्या विटाशीं जुळतें आहे. नाटकांपैकीं फक्त मृच्छकटिकांतच " विट " हें पात्र दृष्टीस पडतें परंतु भाणांत मात्र तें अनेकदां दाखविण्यांत आलेलें आहे.

विदूषकः—भारतीय नाट्यांतील हें विनोदी पात्र अधिक महत्त्वाचें आहे. हा जातीनें ब्राह्मण असूनहि (भ. १२.१२१; २१. १२६; २४. १०६; दश. २.८; सा. द. ३.४२ ) लौकिक भाषा बोलतो. तो खुजा, कुबडा, दंताळा, विद्रूप चेहऱ्याचा, टकल्या, पीताक्ष, चिंध्यांचीं व कातड्यांचीं वस्त्रें वापरणारा आणि अंगास विभूति लावणारा असा असतो. तो असंबद्ध आणि पुष्कळ वेळां अश्लील भाषण करतो, विद्वत्ता अंगीं नसतांहि ती असल्याबद्दल वेळोवेळीं ऐट करतो. कलहप्रिय असून खाण्यापिण्याकडे त्याचें विशेष लक्ष असतें. दिसण्यांत, पोषाखांत, चालण्यांत व सर्व बाबतींत त्याचें वर्तन हास्यास्पद असतें. शिवाय तो नायकाचा विश्वासू सौंगडी व स्नेही असतो. नायक त्याला आपला वयस्य म्हणतो. आणि अडचणीच्या प्रसंगीं त्याची मदत घेतो. अशा वेळीं तो फार हुशारीनें वागतो. वसंतऋतूवरून किंवा एखाद्या कुसुमावरून त्याचें नांव ठेवण्यांत येतें. या नियमाशीं बहुतेक नाटकांतील प्रघात जुळता आहे परंतु " अविमारक " नाटकांत त्यास " संतुष्ट " हें नांव दिलेलें आहे.

विदूषक हें पात्र प्राचीन लौकिक नाटकांतून संस्कृत नाट्यलेखकांनीं घेतलें आहे असा सार्वत्रिक समज आहे. "विदूषक" या त्याच्या नांवावरून तो अपशब्द बोलणारा असतो असा बोध होतो आणि फार प्राचीन काळापासून असा अपशब्द बोलणारा ब्राह्मण असल्याबद्दलचा पुरावा श्रौत वाङ्मयांतूनहि उपलब्ध आहे. महाव्रतामध्यें एकमेकांस अपशब्द बोलून दगड मारणारे ब्रह्मचारी व मुलगी आणि विदूषक व त्याच्याशीं भांडणारी अशी भारत नाट्यांतून दाखविलेली दासी या दोहोंचाहि उगम लौकिक संप्रदायांत आहे. ज्यांचें संविधानक प्राचीन वीररसप्रधान नाटकांतून घेतलें नसून तें केवळ प्रत्यक्ष व्यवहारांतूनच घेतलेलें असतें अशा नाटकांतच विदूषक हें पात्र बहुधा दृष्टीस पडतें. " मालतीमाधव " हें भवभूतीचें नाटक तशा प्रकारचें असूनहि त्यांत " विदूषक " हें पात्र नाहीं. तथापि तेथेंहि जवळ जवळ त्याच्या तोडीचें "मकरन्द" नांवाच्या ( नायकाच्या ) नर्मसुहृदाचें पात्र आहे.

भारतीय नाटकांतील " विदूषक " हें पात्र ग्रीक नाट्यांतील इमानी गुलामापासून घेतलें असावें असें सिद्ध करण्याचा वुइंडिश साहेबानें प्रयत्न केला आहे. आणि रीच साहेबानेंहि तशाच प्रकारचा आपला अभिप्राय दिला आहे. परंतु विदूषक हें पात्र फार प्राचीन काळीं भारतीय नाटककारांच्या व नाट्यशास्त्रकारांच्या पूर्ण परिचयाचें होतें इतकेंच नव्हे तर त्याचा उल्लेख कामशास्त्रांतहि केलेला सांपडतो. शिवाय विदूषक हें ब्राह्मणजातीचें पात्र असल्यामुळें त्याची कल्पना ग्रीक गुलामापासून घेतली असावी ही कल्पना सयुक्तिक वाटत नाहीं. विदूषक हें पात्र लौकिक नाटकग्रंथांतून घेतलें असावें. कारण त्यांत हल्लींप्रमाणें उच्च जातीच्या लोकांची व विशेषेंकरून ब्राह्मणांची हेटाळणी केलेली असे

शकारः--विदूषकाप्रमाणें दुसरें मनोरंजक पात्र म्हटलें म्हणजे शकार हें होय. शकार म्हणजे राजाचा मेहुणा परंतु त्याच्या भगिनीशीं राजानें लग्न लावलेलें नसतें. अद्यापहि कोणास " साला " (श्यालक = मेहुणा) म्हटलें तर शिवी दिल्यासारखें होतें. भरत १२.१३०, २४. १०५; दशरूप २.४२; साहि. द. ३.४४ इत्यादि ग्रंथांतून त्याचें असें वर्णन केलें आहे. तो हलक्या जातीचा असतो, कारणावांचून रागावतो, फिरून शांत होतो, भपकेबाज पोषाख करतो, दागिन्यांनीं देह शृंगारतो, राजाशीं नातें असल्याबद्दल फुशारकी मारतो परंतु सर्वस्वी अजाण व कुचकामाचा असतो. वुइंडिशच्या मतानें हें पात्र ग्रीक नाटकांतील "बढाईखोर शिलेदार" ( "बोस्टफुल सोल्जर " ) या नमुन्यावर बनविलें आहे. परंतु या दोन पात्रांत फारच अल्प सादृश्य आहे असें लेव्हीचें म्हणणें आहे. तो सकाराच्या जागीं शकाराचा उपयोग करतो म्हणून त्यास "शकार" हें नांव प्राप्त झालें. परंतु भरताच्या मतानें तो मागधी भाषेंत बोलतो. लेव्हीच्या मतें तो मूळ शकवर्गांतील असल्यामुळें त्याला शकार म्हणण्याचा प्रघात पडला.

चेटः—हा नायकाच्या जवळपास असणाऱ्या मंडळींपैकीं एक असतो. भरतानें त्याच्या गुणधर्माचें वर्णन

केलें आहे. नायकाच्या बाह्य सहचरांमध्यें सेनापति, कुमार, मंत्री, सचिव किंवा अमात्य, प्राड्विवाक, प्रयोगाधिकृत, दूत, पुरोहित वगैरे असतात. स्त्रियांची भूमिका घेणाऱ्यांत नायिका, तिच्या सख्या, धात्री कन्या, दासी याशिवाय अनेक अंतः-पुरांत असणाऱ्या व्यक्तींचा समावेश होतो. या अंतःपुरांतील व्यक्तीस "अभ्यंतरगण" असें म्हणतात( भरत, २४. १५ ). सदहू गणांत पुढील व्यक्ती असतातः—महादेवी, देवी, वृद्धा, परिव्राजिका, संचारिका ( जिला कधीं कधीं यवनी असें म्हणतात. ), अनुचारिका, परिचारिका, प्रतिहारी इत्यादि. पात्रांच्या तिसऱ्या वर्गांत "नपुंसक" येतात. भरतानें( २४. ५० ) त्या वर्गांत पुढील पात्रांची गणना केली आहेः— विद्वान व चतुर ब्राह्मण ( स्नातक ), कंचुकीय किंवा कंचुकिन् आणि वर्षधर निर्मुण्ड अथवा औपस्थायिक. भरतानें पात्रांचे तीन विभाग केले आहेत तेः—( भ. २४.८५ ) उत्तम, मध्यम आणि अधम आणि प्रत्येक विभागाचे गुणधर्म सांगितले आहेत. त्याचप्रमाणें त्या त्या वर्गांतील पात्रांचें वैशिष्ट्य सांगितलें आहे ( भ. १७.६४; दश. २. ६२; सा. द. ६. १४४ इ. ).

भाषा.—भारतीय नाट्यांतील विशेष लक्षांत घेण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे त्यांतील भाषांची विविधता. भारतीय नाटकें कांहींशी संस्कृतांत व कांहीं अनेक प्राकृत भाषेत लिहिलेलीं आहेत. क्वचित एकाच भाषेतहि लिहिलेलीं कांहीं नाटकें सांपडतात; जसें भासाचें 'दूतवाक्य", यांत फक्त संस्कृत भाषेचाच उपयोग केला आहे; राजशेखराचें "कर्पूरमंजरी", यांत फक्त प्राकृताचाच उपयोग केला आहे.

संस्कृतः—शास्त्रकारांच्या मतानें ( भरत, १७. ३१ व ३६; दश. २. ५९; सा. द. ६. १५८ ) संस्कृत भाषा राजे, ब्राह्मण, ऋषी, मंत्री, सेनापती इ. उच्च जातींच्या लोकांनीं वापरावी. कधीं कधीं महिषी, तापसी स्त्रिया, वेश्या आणि इतर स्त्रिया या बोलतांना संस्कृत भाषेचा उपयोग करीत. याचीं उदाहरणें तुर्फान शिलालेखांतील अन्योक्तीनें दाखविलेल्या स्त्रीपात्रांच्या बाबतींत, प्रबोधचन्द्रोदयांत व तत्सदृश अन्य नाटकांत व मालविकाग्निमित्रांतील योगिनीच्या बाबतींत पहावयास सांपडतात. शिवाय युद्ध, समेट व शकुन इत्यादि विषयीं बोलतांना संस्कृताचा उपयोग करतात. भासाच्या "पंचरात्र" नाटकांत बृहन्नट हा युद्धाचें वर्णन करीत असतां प्राकृत भाषा सोडून संस्कृत भाषेत बोलूं लागतो. नाटकांतील संस्कृत भाषेच्या विशिष्ट शब्दप्रयोगासंबंधानें लिहितांना ( सा. द. ६. १४४ त ) "साधय" या शब्दाचा "जाणें" याअर्थी उपयोग करतात असें नमूद केलें आहे.

प्राकृतः—सामान्यतः स्त्रिया, मुलें व हलक्या दर्जाचे लोक प्राकृतांत बोलत. कांहीं वेळां उच्च दर्जाचे लोकहि त्याचा उपयोग करीत. उदाहरणार्थ, जेव्हां ते अडचणींत पडत आणि प्राकृत भाषेचा उपयोग करून त्यांनां आपली सुटका करावयाची असे. या सामान्य नियमांखेरीज आणखीहि ( भ.१७. ३२ दश. २. ६०; सा. द. ६.१६५ इ. ) पुष्कळ नियम आहेत. त्यावरून त्या सर्व नियमांची अंमलबजावणी फार कडक रीतीनें करण्यांत येत नसे असें दिसून येतें. बर्बर, किरात, आन्ध्र व द्रविड यांच्या भाषांच्या जागीं शौरसेनी भाषेचा उपयोग करीत परंतु त्या त्या भाषांचा उपयोग करण्यासहि हरकत नाहीं असें भरतानें सांगितलें आहे (भरत,१७.४४इ.५७ इ.) आणि दशरूप (२. ६१,) साहित्यदर्पण(६. १६८) यांचेंहि मत तसेंच आहे शास्त्रकारांनीं दिलेले नियम आणि प्रचारांत असलेल्या नाटकांतील वस्तुस्थिति यांचा जर आपण तौलनिक दृष्टीनें विचार केला तर आपणांस असें आढळून येईल कीं शास्त्रकारांनीं अनेक भाषांचा व तच्छाखांचा विचार केला आहे. परंतु हल्लीं उपलब्ध असलेल्या नाटकांतून त्यांचा कोठेंहि उपयोग केलेला दृष्टीस पडत नाहीं. याचें कारण असें असावें कीं शास्त्रकारांनीं यथाशास्त्र लिहिलेल्या नाटकांबरोबर फिरत्या नाटकवाल्यांच्या लौकिक नाटकांचाहि विचार केला असावा आणि म्हणून केवळ व्युत्पत्तीच्या दृष्टीनें त्यांच्या लिहिण्याची किंमत आहे.

भरतानें ( १७.४८ ) सात प्राकृत भाषांचा निर्देश केला आहे. त्या मागधी, अवन्तिजा, प्राच्या, शौरसेनी, अर्धमागधी, बाल्हिका आणि दाक्षिणात्या. या भाषांपैकीं शौरसेनी व मागधी यांचाच संस्कृत नाटकांत विशेष उपयोग केलेला आढळून येतो.

शौरसेनीः—शौरसेनी ही संस्कृत नाटकांतलि फार महत्त्वाची प्राकृत भाषा आहे. तिच्या नांवावरून ही यमुना व गंगा यांमधील दुआबप्रांताच्या लौकिक भाषेमधून निघाली असावी असें दिसतें. शास्त्रकारांच्या मतानें ( भ. १७ .४३; इ. दश. २. ६०; सा. द. ६.१५९ व १६४ ) ती भाषा नायिका व तिच्या सख्या व दासी आणि चांगल्या कुलांतील स्त्रिया यांनीं आणि मध्यम स्थितीच्या पुरुषांनींहि उपयोगांत आणावी. संस्कृत नाटकांतून विदूषक हा ब्राह्मण जातीचा असूनहि शौरसेनी भाषा बोलतो. भरत, (१७.५१) आणि सा. द. (६. १६१) या ग्रंथांत विदूषकाच्या भाषेला प्राच्या म्हटलेलें आहे. परंतु वास्तविक पाहिलें तर ती शौरसेनीच आहे. तसेंच अवन्तिजा ही धूर्त लोकांनीं वापरण्याची भाषा आहे ( भ. १७.५१; सा. द. ३. १६१ ) आणि तिच्या नांवावरून ती उज्जयिनीसभोंवारच्या प्रदेशांतील असावी. याला प्रमाण म्हटलें म्हणजे शौरसेनी व महाराष्ट्री यांच्या दरम्यानची ती भाषा आहे असें मार्कंडेयाचें ( ११.१ ) मत आहे. यावरून शास्त्रकारांनीं फार प्राचीन नाटक-ग्रंथांचा विचार केला असला पाहिजे हें उघड आहे. कांहीं असलें तरी त्या निरनिराळ्या भाषा नसून स्थानपरत्वें भिन्न झालेलीं शौरसेनीचींच स्वरूपें होत.

महाराष्ट्री—भरतानें या भाषेचा उल्लेख केलेला नाहीं परंतु शौरसेनी भाषा जीं पात्रें वापरतात त्यांच्या कवितेंत

या भाषेचा उपयोग करतात असें साहित्यदर्पणकारांनीं ( सा. द. ६.१५९ ) नमूद केलें आहे. साहित्यदर्पणकारांनीं फक्त स्त्रीपात्रांसंबंधानेंच हा नियम सांगितला आहे. परंतु प्रचलित नाटकांतून शौरसेनी भाषा बोलणाऱ्या पुरुषपात्रांसंबंधानेंहि हा नियम पाळलेला दृष्टीस पडतो. तथापि अतिशय प्राचीन नाटकांत, तुर्फानशिलालेखांत आणि भासाच्या नाटकांत ही भाषा आढळत नाहीं. यावरून भरतानें या भाषेचा कसा उल्लेख केला नाहीं याचा उलगडा होण्यासारखा आहे. नाटकांत महाराष्ट्री भाषा वापरण्याचा प्रघात शूद्रक राजाच्या वेळेपासून पडला असावा असें दिसतें. शूद्रक राजा महाराष्ट्रांत राज्य करीत होता अशी आख्यायिका आहे आणि तेथें महाराष्ट्रीय वीणाकाव्याचा फार प्राचीन काळींच विकास झाला होता.

अर्धमागधीः—ही भाषा ( भरत, १७.५०; सा. द. ६. १६० ) :चेट, राजपुत्र, श्रेष्ठी यांनीं बोलावयाची असून ती तुर्फानशिलालेखांत आणि भासाच्या "कर्णभारांत" वापरलेली पहावयास सांपडते. यावरून शास्त्रकारांनीं फार प्राचीन व अभियुक्त वाङ्मयरचनेपूर्वीच्या काळचे ग्रंथ लक्षांत घेऊन आपले नियम केले असावेत असें वाटतें.

मागधीः—ही महत्त्वाची भाषा आहे. शास्त्रकारांच्या मतानें ( भ. १७.५०; सा. द. ६.१६० ) ती अंतःपुरांत रहाणारे लोक, सुरंगाखनक, शौंडिक, रक्षी, संकटांत पडलेला नायक आणि शेवटीं शकार इतक्या लोकांची भाषा आहे. भ. २४.१०५ यांत व दश. २.६० यांत मागधी व पैशाची या भाषा अत्यंत हलके लोक बोलतात असें सांगितलें आहे. प्रचलित नाटकांत वरील नियमांस अनुसरून मागधी भाषेची योजना केलेली आहे परंतु पैशाची भाषा मात्र कोठें उपयोगांत आणलेली दृष्टीस पडत नाहीं.

राहिलेल्या भाषा प्रचलित नाटकांतून दृष्टीस पडत नाहींत. योद्धे, नागरिक आणि दीव्यत् ( खेळाडू ) हे दक्षिणात्या भाषा बोलतात असें भ. १७.५२ आणि सा.द. ६.१६१यांत सांगितलें आहे. त्याचप्रमाणें उदीच्य व खश लोक बाल्हीका भाषा बोलतात असेंहि सदर ग्रंथांत सांगितलें आहे.

भरत १७.४९ यांत शबर, अभीर, चण्डाल, सकर, द्रविड व ओड्र इत्यादि लोकांच्या विभाषा सांगितल्या आहेत.. मार्कंडेय ( १३ ) याच्या मतानें या सर्व मागधी भाषेच्या पोटशाखा आहेत. या सर्व विधानांचा पडताळा मृच्छकटिक नाटकांत पहावयास मिळतो. त्यांत शकार साकारी, चण्डाल, चाण्डाली आणि खेळाडू लोक ढक्की नांवाची एक नवीनच भाषा बोलतात असें सदर नाटकाचा टीकाकार पृथ्वीधर यानें नमूद केलें आहे. परंतु वास्तविक पाहूं गेलें तर ती मागधीच आहे आणि शकार ती भाषा बोलतो असें भरतानेंहि म्हटलें आहे. शबर, शक इत्यादि लोक शकार भाषा बोलतात असें भरत म्हणतो ( १७.५३ ) तर ते शाबरी बोलतात असें साहित्यदर्पणकाराचें मत आहे. भरताच्या मतानें ( भ. १७.५४ ) शाबर भाषा ही लोहार, पारधी व सुतार यांची व कांहीं अंशीं वनचरांची आहे. साहित्यदर्पणकारांचेंहि तसेंच मत आहे. भ. १७.५५, सा. द. ६.१६३ यांत धनगर लोक आभीरी अथवा शाबरी बोलतात; भ.१७. ५३, सा. द. ६.१६१ यांत चण्डाल हे चाण्डाली बोलतात आणि भ. १७.५५ सा. द. ६.१६२ यांत द्रविड द्राविडी बोलतात असें सांगितलें आहे. ओड्र लोकांच्या भाषेसंबंधानें कांहींच उल्लेख केलेला नाहीं. दश.२.६०, सा. द. ६.१६४ यांत पिशाच लोकांची भाषा पैशाची आहे असें सांगितलें आहे. संस्कृत ग्रंथांच्या हस्तलिखित प्रतींमध्यें प्राकृत भाषांची संस्कृत छाया दिलेली असते. फार पुरातनकाळींहि ही पद्धत प्रचलित होती असें राजशेखराचें "बालरामायण" (३.१५) यावरून दिसून येतें.

भा र ती य ना ट्या ची अं त र्र च ना.—नाट्याचें शरीर म्हणजे नाट्याचें इतिवृत्त किंवा वस्तु हें होय. यासंबंधानें शास्त्रकारांनीं ( भरत १९. १. दश. १.११; सा. द. ६.४२ इ.) अनेक नियम दिलेले आहेत. जें वस्तु आख्यायिकांतून घेतलेलें व सुप्रसिद्ध असतें, त्याला 'प्रख्यात' म्हणतात; कवीनें आपल्या कल्पनेनें रचलेलें जें असतें त्यास "उत्पाद्य" म्हणतात; आणि ज्यांत आख्यायिका व काल्पनिक भाग यांचें मिश्रण असतें त्याला "मिश्र" म्हणतात. या वस्तूचे निराळ्या तत्त्वांवर दोन प्रकार सांगतात. एक आधिकारिक आणि दुसरे प्रासंगिक. मुख्य कथाभागास आधिकारिक म्हणतात आणि तत्साहाय्यकारी इतर कथाभागास प्रासंगिक म्हणतात. जसें बालरामायण नाटकांत रामचंद्राचा जो कथाभाग आहे तो आधिकारिक असून सुग्रीवाचा कथाभाग प्रासंगिक आहे. ज्या गोष्टी रसाला विघातक किंवा नायकाच्या गुणाशीं विसंगत असतील त्या गाळाव्यात किंवा त्यांत बदल करावा असाहि एक नियम शास्त्रकारांनीं घालून दिला आहे.

पांच अर्थप्रकृतीः—अभीष्ट अर्थाच्या सिद्धीचे हेतुभूत जे इतर अर्थ म्हणजे इतर गोष्टी त्यांस अर्थप्रकृती असें म्हणतात. ह्या प्रकृती बीज, बिंदु, पताका, प्रकरी आणि कार्य अशा पांच आहेत. त्यांचीं लक्षणें येणेंप्रमाणें:—

बीज ( भ. १९.२१; दश. १.१६ सा; ६.६५ ):—म्हणजे नाटकांतील प्रधान हेतूची गुरुकिल्ली, जिच्यापासून अनेक इतर कार्यें उत्पन्न होतात. जसें:—रत्नावली नाटकांत यौगन्धराणाच्या प्रयत्नांनीं राजाचा विवाह घडून येतो.

बिंदु ( भ. १९.२२; दं. श. १.१६; सा. द. ६.६६ ):—जर नाटकांतील कथानकाचा विकास कांहीं कारणांनीं कुंठित झाला असेल तर ज्याच्या योगानें तो फिरून प्रस्थापित होतो त्यास बिंदु म्हणतात यास बिंदू म्हणण्याचें कारण असें कीं, पाण्यांत तेलाचा बिन्दू टाकिला असतां तो ज्याप्रमाणें विस्तार पावतो त्याप्रमाणें याच्यायोगानें कथानकाचा विस्तार होतो.

पताकाः-मूळ कथानकांत मिसळून जाऊन जें उपकथानक पुढें पुष्कळ विस्तार पावतें त्याला पताका म्हणतात ( भ. १९.२३, २७; दश. १.१३; सा. द. ६.६७ ). या ठिकाणीं ( भ. १९. २९; दश. १. १४; सा. द. ६. ४४ इ. ) या ग्रंथांतून पताकास्थानाचा विचार केलेला आहे. जेव्हां एखाद्या शब्दाचा, कृतीचा किंवा प्रसंगाचा दोन प्रकारांनीं अर्थ करतां येतो व त्यामुळें भलत्याच वळणावर बोललेलें कथानक योग्य मार्गावर येतें त्यास पताकास्थान म्हणतात.

प्रकरी ( भ. १९.२४ ):—ज्याचा मुख्य कथानकाशीं संबंध नाहीं असें जें एखादें उपकथानक त्यास "प्रकरी" म्हणावें असें भरताचार्यानें सांगितलें आहे. परंतु इतरांचें मत ( दश. १.१३; सा. द. ६.६८ ) ज्या उपकथानकाचा अल्प विस्तार केलेला असतो त्यास "प्रकरी" म्हणावें असें आहे.

कार्य.—अंतिम साध्यास शास्त्रकारांनीं ( भ. १९.२५; दश. १.१६; सा. द. ६.६९ ) "कार्य" असें म्हटलें आहे.

पांच अवस्था.—कार्यासंबंधीं पुढील पांच अवस्था सांगितल्या आहेत. आरंभ, प्रयत्न, प्राप्त्याशा, नियताप्ति व फलयोग,

आरंभः—किंवा प्रारंभ म्हणजे सुरवात, अंतिम साध्य, करून घेण्याची इच्छा.

प्रयत्नः—हा प्राप्त न झालेलें अंतिम साध्य, साध्य करून घेण्यासाठीं केलेले परिश्रम.

प्राप्त्याशा.—किंवा प्राप्तिसंभव म्हणजे अंतिम साध्य साध्य करून घेण्याची उमेद.

नियताप्तिः—किंवा नियताफलप्राप्ति म्हणजे मध्येंच उपस्थित झालेलीं संकटें जेव्हां निवारण होतील तेव्हां अंतिम साध्य, साध्य होईल अशा तऱ्हेचा विश्वास.

फलयोगः—अंतिम साध्य साध्य झालें म्हणजे त्यास "फलयोग" किंवा "फलागम" असें म्हणतात.

पांच संधी.—जेव्हां पांच अर्थप्रकृतींचा व पांच अवस्थांचा संयोग होतो तेव्हां पांच संधी उत्पन्न होतात ( भ. १९.३५; दश. १.२१; सा. द. ६. ७४ इ. ) हे सर्व संधी नाटकांत आलेच पाहिजेत असें नाहीं ( भ. १९.१६ ). हे संधी उपकथानकांतहि असूं शकतात. त्यावेळीं त्यांस अनुसंधि ( भ. १९.२७ ) असें म्हणतात व ज्यामानानें त्यांची आवश्यकता असेल त्यामानानें त्यांची संख्या कमीअधिक असते.

मुखः—ज्या ठिकाणीं नाटकाचें बीज पेरलें जातें आणि रसाची उत्पत्ति होते त्या ठिकाणास मुखसंधि म्हणतात. याच्याशीं आरंभाचा संयोग झालेला असतो. म्हणजे येथें नाटकाचा प्रारंभ झालेला असून परिस्फोटाचें बीज पेरलेलें असतें आणि अंतिम साध्य साध्य करून घेण्याची इच्छा प्रथमच प्रदर्शित केली जाते.

प्रतिमुखः—प्रतिमुखांत बीजाची वृद्धि होते परंतु या वर्धनक्रमांत तें कधीं कधीं दृश्य असतें व कधीं कधीं अदृश्य असतें. या ठिकाणीं बिंदू व प्रयत्न यांचा उपयोग केला जातो म्हणून नाटकाच्या या विकसनावस्थेंत अंतिम साध्य स्पष्टपणें दृग्गोचर होत नाहीं. तथापि त्यांत अंतिम साध्य काय असेल याचें अल्प दिग्दर्शन होतें आणि ज्याच्या योगानें अंतिम साध्य, साध्य होईल अशा प्रकारच्या प्रयत्नांस प्रारंभ केलेला असतो.

गर्भः—गर्भसंधीमध्यें अंतिमसाध्याकडे जाणाऱ्या नाटकाचा ओघ अधिक स्पष्टपणें दिसूं लागतो आणि अंतिमसाध्यसिद्धि संभवनीय वाटूं लागते. तथापि त्या सिद्धीबद्दल अद्याप खात्री वाटत नाहीं. परंतु ती सिद्धि संभवनीय वाटूं लागल्यामुळें वाटेंत येणाऱ्या अडचणी दूर करण्याचा प्रयत्न करण्यांत येतो आणि तसें करतांना पताकास्थान साहजिकच घडून येतें.

विमर्शः—किंवा अवमर्श. जेव्हां संशय, क्रोध, दुर्दैव, शाप इत्यादिकांनीं अंतिम साध्यसिद्धीस अडथळा उत्पन्न होतो व त्यामुळें प्रकरीचा उपयोग करावा लागतो तेव्हां त्यास विमर्श किंवा अवमर्श म्हणतात.

निर्वहणः—ज्यांत नाटकांतील भानगडीचा खुलासा केलेला असतो त्यास "निर्वहण" म्हणतात. त्यांत सर्व सूत्रें एकत्र ग्रथित केलेलीं असतात. अंतिम साध्य साधलेलें असतें व कार्यहि पूर्णत्वास जातें. या निर्वहणाच्या व्याख्येवरून भारतीय नाटक नेहमीं सुखपर्यवसायीच असलें पाहिजे हें ओघानेंच प्राप्त होतें.

निरनिराळे संधी सांगितल्यावर त्यांचीं निरनिराळीं अंगें सांगितलीं आहेत. प्रत्येक संधींत बारा ते चौदा अंगें असतात असें शास्त्रकारांनीं नमूद केलें आहे. एकंदर अंगांची संख्या ६४ किंवा ६५ इतकी आहे. परंतु भरताच्या मतानें ( भ.१९. १०० इ.) लागेल तेव्हां ती आणखीहि वाढविण्यासारखी आहे. ह्या सर्व अंगांची गरज नाहीं असेंहि म्हटलें आहे. वास्तविक पाहूं गेलें तर हीं अंगें म्हणजे नाटकांत येणाऱ्या सर्व वर्णनांचीं साहित्यविषयक, काव्यविषयक, भाषाविषयक आणि बाह्य साधनें होत. चौसष्ट कलांकडे लक्ष देऊन ही अंगांची संख्या चौसष्ट पसंत केली असावी.

निर्वहणाचीं शेवटलीं दोन अंगेंच फक्त सार्वत्रिक उपयोगाचीं आहेत कारण त्यांस अलीकडे व्यवस्थित स्वरूप प्राप्त झालें आहे. नाटकांतील रहस्याचा परिस्फोट झाल्यानंतर त्याचा काव्यसंहार किंवा उपसंहार होतो. नायकाची आणखी कांहीं प्रिय गोष्ट करावयाची आहे काय ? असें एखादें पात्र त्याला विचारतें ( "अतःपरमपि प्रियमास्ति" ) व त्यावर नायक उत्तर देतो कीं अमुक एक प्रिय गोष्ट होवो, आणि शेवटीं शुभ धन्यवाद असतो.त्यास शास्त्रकार "प्रशस्ति" असें म्हणतात आणि नाटकांत त्याला "भरतवाक्य" म्हणतात.

"काव्यसंहार" आणि "प्रशस्ति" ( भ. १९. ९७; दश. १. ४८; सा. द. ६.१४ ) हे त्यांच्या पूर्ण स्वरूपांत भासाच्या उत्तर नाटकांत प्रथम दृष्टीस पडतात आणि

ज्या अर्थी भरतानें त्याचा उल्लेख केला आहे त्या अर्थी तो भासाच्या फारसा पूर्वी झाला नसावा असें दिसून येतें.

पा रि भा षि क आ णि सा हि त्या त्म क उ प क र णें.– रसोत्पत्तीकरितां काव्याव्यतिरिक्त जीं सहाय्यकारक इतर अनेक उपकरणें लागतात त्यासंबंधींचे नियमहि शास्त्रकारांनीं दिले आहेत.

लास्यांगः—लास्यांगांत गायन, वादन व नर्तन या तिहींचाहि समावेश होतो. भरतानें या कलांसंबंधानें सविस्तर नियम दिले आहेत परंतु त्या कला सामान्य स्वरूपाच्या असून नाट्याशीं त्यांचा फारसा निकट संबंध नाहीं. लास्याचीं १० अंगें सांगितलीं तीं अशीं:—

गेयपदः—आसनावर बसून तंतुवाद्यांबरोबर म्हटलेलें गीत.

स्थितपाठ्यः—ताठ उभे राहून केलेलें गायन किंवा दुसऱ्या पाठांत सांगितल्याप्रमाणें कामसंतप्त स्त्रीनें प्राकृतांत केलेलें गायन.

आसीनः—वाद्याच्या सहाय्यावांचून, शोक आणि चिंता यांनीं युक्त अशा स्थितींत व बसून केलेलें गायन.

पुष्पगंडिकाः—गायन व वादन यांसहित पुरुषासारख्या वागणाऱ्या स्त्रियांचें नृत्य.

प्रच्छेदकः—त्रास व मत्सर यांनीं गांजलेल्या स्त्रीनें वीणा घेऊन केलेलें गायन.

त्रिमूढकः—साधे छंद, वीरश्रीच्या भावना आणि सौम्य शब्द यांनीं युक्त असें गायन किंवा त्रिगूढक स्त्रीवेषधारी पुरुषांचें मंजुळ गायन.

सैंधवकः—संकेतस्थानीं नायिका न आल्यानें खिन्न झालेला नायक वीणादिक वाद्यांसहित जें प्राकृत गान करतो तें.

द्विमूढक किंवा द्विगूढकः—विविधविषयात्मक व भावनाप्रचुर असें गीत.

उत्तमोत्तमकः—हस्तपादादिकांत निरनिराळ्या हालचाली करून म्हटलेलें भावनाप्रचुर व ललित गीत.

उक्तप्रत्युक्तः—परस्पर निर्भर्त्सना करून म्हटलेलें गीत.

वीथ्यंगः—'वीथ्यंग' हा वास्तविक साहित्याशास्त्राचा विषय आहे. परंतु शास्त्रकारांनीं ( म. १८. १५६; दश. ३. ११; सा. द. ६. ३३: व २६१ इ. ) त्याचा इतका खल केला आहे कीं, त्याचा थोडा उल्लेख करणें जरूर आहे. "वीथ्यंगें" अनेक आहेत तीं अशीं:—

उद्घात्य किंवा उद्घात्यकः—जेव्हां एखाद्या न समजलेल्या गोष्टीचें दुसऱ्याकडून स्पष्टीकरण करण्यांत येतें किंवा कोणी कांहीं अन्यार्थीनें उच्चारिलेल्या वाक्यापासून दुसरा त्याहून भिन्न असा दुसराच अर्थ काढतो तेव्हां त्यास " उद्घात्य " किंवा " उद्घात्यक " म्हणतात.

अवलगितः—जेव्हां कोणी कांहीं उच्चारिलेल्या वाक्यार्थावरून तत्सदृश अशा दुसऱ्याच कार्याची सिद्धि होते किंवा एका कामांत दुसऱ्या कार्याची सिद्धि होते त्यास अवलगित म्हणतात.

अवस्यंदितः—म्हणजे एखादें विधान करून नंतर तें नाकबूल करण्यांत येणें.

नालिकाः—म्हणजे अंतर्भागीं गूढ अर्थ ठेवून केलेलें विनोदी व कोड्यासारखें भाषण.

असत्प्रलापः—अर्थहीन भाषण, जसें झोंपेंत किंवा निद्रेंत करितात तसें किंवा जसें लहान मुलें करितात, किंवा ज्यांस तें अर्थहीन भाषण समजत नाहीं त्यांस केलेला उपदेश.

वाक्केलिः—प्रश्नोत्तर मालिकेंत केलेली द्व्यर्थी शब्दयोजना; याचा अर्थ अलीकडील शास्त्रकार निरनिराळ्या तऱ्हांनीं करितात.

प्रपंचः—सत्याला सोडून केलेलें भाषण आणि ज्याचा परिणाम हास्यविनोदांत होतो; याचाहि अर्थ अलीकडील शास्त्रकार निरनिराळ्या तऱ्हांनीं करितात.

मृदवः—गुणास दोष किंवा दोषास गुण मानणें.

अधिबलः—जेव्हां वक्ते अतिशयोक्ति करण्यांत एकमेकांवर ताण करण्याची पराकाष्ठा करितात तें.

छलः—गोड गोड बोलून दुसऱ्यास फसविणें.

त्रिगतः—ज्याच त्या शब्दाचे निरनिराळे अर्थ होतात ते.

व्याहारः—पाहिलेल्या गोष्टींचें हास्य उत्पन्न होईल अशा रीतीनें वर्णन करणें.

गंडः—प्रस्तुत गोष्टीस लागू पडेल असें कोणाचें भिन्नार्थक वाक्य.

अशा प्रकारचे साहित्यविषयक व लेखनशैलीविषयक अनेक प्रकार भारतीय नाट्यकारांनीं नमूद केले आहेत.

वृत्तीः—नाटकांतील पात्रांच्या चारित्र्यांचा विचार करून शास्त्रकारांनीं चार निरनिराळ्या वृत्ती सांगितल्या आहेत. त्या भारती, सात्वती, कैशिकी आणि आरभटी या होत.

भारतीः—भारतीवृत्ति ( भरत, २०. २४; दश. ३. ५; सा. द. ६. २९ ) विशेषेंकरून संभाषणात्मक आहे. तिच्यांत पुरुषपात्रें असून भाषा संस्कृत असते. विशेषेंकरून तिचा पूर्वरंगांत उपयोग करितात. हिचीं प्ररोचना, आमुख, वीथी आणि प्रहसन अशीं चार अंगें आहेत. ही वृत्ति सर्व रसाला उचित आहे.

सात्वतीः—सात्वती वृत्ति ही फार मनोवेधक असून ( भरत, २०. १२; २४, ३८; दश. २. ४९; सा. द. ६. १२८ इ. ) तिच्यांत भाषा व सर्व प्रकारचे अभिनय यांचा अंतर्भाव होतो. तिच्यांत हर्ष, शौर्य, दान, दया आणि दाक्षिण्य इत्यादि उत्साहयुक्त व पौरुषनिदर्शक गुण दृष्टीस पडतात आणि म्हणून ही वृत्ति मुख्यत्वेंकरून वीर, अद्भुत आणि रौद्र रसांकरितां उपयोगांत आणतात. हिच्यांत नटाची वागणूक भारदस्तपणाची असली पाहिजे आणि म्हणून क्रोधाचें फारसें आविष्करण हींत होतां उपयोगी नाहीं. त्याचप्रमाणें हिच्यांत प्रमुख भाग हर्षाचा असतो. हिचीं उत्थापक,

परिवर्तक, संलापक आणि संघातक अशीं ४ अंगें आहेत त्यांचीं लक्षणें:—

( १ ) उत्थापक—शत्रूला केलेलें आव्हान. ( २ ) परिवर्तक—प्रस्तुत कार्य समाप्त होण्यापूर्वी त्यांतून अन्य कार्यांत होणारें संक्रमण. (३) संलापक-एकमेकांस लाडून केलेलें गंभीर संभाषण व ( ४ ) शत्रूंमध्यें उत्पन्न केलेला भेद.

कैशिकीः—ही वृत्ति फार मनोहर असून हिच्यांतील एकंदर स्थिति फार सुंदर असते. नृत्य व गीत यांचा हिच्यांत मुख्य भाग असतो. हिच्यांत स्त्रिया असतात व शृंगाररस प्रधान असतो. हिचींहि ४ अंगें आहेत तीं येणेंप्रमाणें:—

(१) नर्म—चातुर्यानें केलेली थट्टा. (२) नर्मस्पुञ्ज किंवा नर्मस्पूर्ज—प्रियकरांच्या पहिल्या भेटींतील आनंद. ह्यावेळीं त्यांचा पोषाख व भाषा प्रेमनिदर्शक असतात परंतु प्रवेशाचा शेवट कसा होईल याबद्दल मन साशंक असतें. (३) नर्मस्फोट-नवविकसित प्रेमकलिकेचें अङ्कुर आणि (४) नर्मगर्भ—जेव्हां आपलें साध्य साधण्याकरितां नायक आपलें स्वतःचें रूपांतर करतो.

आरभटीः—ही आवेशाची वृत्ति असल्यामुळें ( भ. २०. १४, २४, ५५; दश. रू २. ५२ सा. द. ६. १३२. ) हिच्यांत अत्याचार, जबरदस्ती, युद्ध व गोंगाट, वञ्चना आणि इंद्रजाल इत्यादि प्रकार दृष्टीस पडतात. ही वृत्ति रौद्र व बीभत्सरसाला अनुकूल आहे. हिचीं ४ अंगें आहेत:—

(१) संक्षिप्तकः—एखाद्या वस्तूचें कृत्रिम उत्पादन उदाहरणार्थ, एखादा कृत्रिम हत्ति उत्पन्न करणें. (२) अवपात—गोंधळ किंवा दंगल. (३) वस्तूत्थापन—माया, इंद्रजाल इत्यादिकांच्या योगानें कांहीं वस्तू उत्पन्न करणें आणि ( ४ ) संफेट—कडाक्याचें भांडण.

लक्षणें.—नाटकांत आवश्यक म्हणून छत्तीस लक्षणें सांगितलीं आहेत. तीं नाट्यालंकाराप्रमाणें काव्याला भूषित करणारीं आहेत. तीं येणेंप्रमाणें:—( १ ) भूषण, ( २ ) अक्षरसंघात, ( ३ ) शोभा, ( ४ ) उदाहरण, ( ५ ) हेतु, ( ६ ) संशय, ( ७ ) दृष्टान्त, ( ८ ) तुल्यतर्क, ( ९ ) पदोच्चय, ( १० ) निदर्शन, ( ११ ) अभिप्राय, ( १२ ) प्राप्ति, ( १३ ) विचार, ( १४ ) दिष्ट, ( १५ ) उपदिष्ट, ( १६ ) गुणातिपात, ( १७ ) गुणातिशय, ( १८ ) विशेषोक्ति, ( १९ ) निरुक्ति ( २० ) सिद्धि, ( २१ ) भ्रंश, ( २२ ) विपर्यय, ( २३ ) दाक्षिण्य, ( २४ ) अनुनय, ( २५ ) माला, ( २६ ) अर्थापत्ति, ( २७ ) गर्हण, ( २८ ) पृच्छा, ( २९ ) प्रसिद्ध, ( ३० ) सारूप्य, ( ३१ ) संक्षेप, ( ३२ ) गुणकीर्तन, ( ३३ ) लेश, ( ३४ ) मनोरथ, ( ३५ ) अनुक्तसिद्धि, ( ३६ ) प्रियोक्ति.

अलंकार आणि गुण यांच्या योगास ' भूषण ' असें म्हणतात उदा.—

आक्षिपन्त्यरविन्दानि मुग्धे तव मुखश्रियम् ।
कोषदण्डसमग्राणां किमेषामस्ति दुष्करम् ॥

येथें अचेतन कमल याची निन्दा संभवत नाहीं म्हणून येथें उपमेंत पर्यवसान होतें म्हणून येथें ' निदर्शना ' हा अलंकार आहे. ' कोषदण्ड ' येथें श्लेष आहे आणि ' किमेषामस्ति दुष्करम् ' हा ' अर्थान्तरन्यास ' आहे. या अलंकारांचा माधुर्य आणि प्रसाद यांच्याशीं योग आहे म्हणून येथें ' भूषण ' हें ' लक्षण ' झालें.

चमत्कृतिजनक आणि परिमित अक्षरानें केलेल्या वर्णनास ' अक्षरसंघात ' असें म्हणतात. उदा. —

दुष्यन्तः—कच्चित्सखीं वो नातिबाधते शरीरसंतापः।
प्रियंवदाः—सांप्रतं लब्धौषधमुपशमं गमिष्यति ।

( शाकुन्तल )

प्रसिद्ध अर्थानें अप्रसिद्ध अर्थ ज्याठिकाणीं व्यक्त होतो आणि श्लेषानें जेथें अर्थवैचित्र्य उत्पन्न होतें तेथें ' शोभा ' हें लक्षण होतें. उदा.—

सद्वंशसंभवः शुद्धः कोटिदोऽपि गुणान्वितः ।
कामं धनुरिव क्रूरो वर्जनीयः सतां प्रभुः ॥

येथें वंश, कोटि, गुण आणि क्रूर हे शब्द द्व्यर्थी आहेत. प्रसिद्ध धनु या वस्तूनें अप्रसिद्ध क्रूर धनी हा अर्थ व्यक्त केला जातो. तुल्यार्थकवाक्यानें वक्त्याच्या अभिप्रायानुसार अभिमत अर्थ सिद्ध केला जातो, त्यास 'उदाहरण' असें म्हणतात. उदा.—

अनुयान्त्या जनातीतं कान्तं साधु त्वया कृतम् ।
का दिनश्रीर्विनार्केण का निशा शशिना विना ॥

हेतुसहित थोडक्यांत बोललेलें जें इष्टकार्य करणारें वाक्य त्यास ' हेतु ' असें म्हणतात. उदा०—

चेटीः—( भीमंप्रति ) एवं मया भणितं भानुमति, युष्माकममुक्तेषु केशेषु कथं देव्याः केशाः संयम्यन्ते । (वेणीसंहार)

येथें द्रौपदीचे केश न बांधल्याचें कारण भानुमतीचे केश सुटले नाहींत हें सांगितलें आहे. तात्पर्य दुर्योधन मेल्याशिवाय द्रौपदीचे केश बांधले जाणार नाहींत म्हणून हें हेतुलक्षण झालें. येणेंप्रमाणें ३६ लक्षणांचें विवेचन साहित्यदर्पणांत सांपडेल.

पूर्वरंग.—पूर्वरंगामुळें भारतीय नाट्याच्या अगदीं मूळारंभाकडे लक्ष जातें. प्राचीन नृत्य व मूकनाट्य यांत असणारे नृत्य-गीतांचे सर्व प्रकार पूर्वरंगांत दृष्टीस पडतात. परंतु त्यांचा विदग्धवाङ्मययुक्त नाटकांशीं कांहीं संबंध नाहीं. भरतानें यावर एक संपूर्ण अध्याय लिहिला आहे. हें नाटकाच्या प्रारंभीं ( पूर्व ) रंगभूमीवर ( रंग ) करून दाखवावयाचें असतें म्हणून त्यास ' पूर्वरंग ' म्हणतात असें भरताचें मत आहे ( भ. ५.७ ), किंवा साहित्यदर्पणकाराच्या मतानें नाटकास सुरवात करण्याच्या पूर्वी 'सर्वविघ्नोपशान्तये' नट जें करतात त्यास पूर्वरंग म्हणतात. दशरूपाचा अवलोकटीकाकार पूर्वरंग याचा " पूर्वं रज्यतेऽस्मिन्निति " असा

अर्थ करतो आणि नाटक सुरू होण्यापूर्वी ह्याच्या योगानें मनोरंजन होतें म्हणून ह्यास पूर्वरंग म्हणतात असें प्रतिपादन करतो. ह्यावरून प्रत्यक्ष नाटकास प्रारंभ करण्यापूर्वी जो भाग असतो त्यास पूर्वरंग म्हणावें असें अलीकडील शास्त्रकारांचेंहि मत आहे असें दिसून येतें.

भरताचार्यांच्या मतानें पूर्वरंगाचे २० भाग पडतात, ते पुढीलप्रमाणें:—

( १ ) प्रत्याहारः—संगीताचीं वाद्यें (कुटप) आणणें. यायोगानें अप्सरांचें समाधान होतें.

( २ ) अवतरणः—गायकांचें जमणें. या योगानेंहि अप्सरांचें समाधान होतें.

( ३ ) आरंभः—सर्वांनीं मिळून गायनास प्रारंभ करणें व नमुन्यादाखल गाणें. यायोगानें गंधर्वांचें समाधान होतें.

( ४ ) आश्रावणः—जीं वाद्यें ताडनानें वाजतात तीं वाजविणें. यायोगानें दैत्यांचें समाधान होतें.

( ५ ) वक्त्रपाणिः—वायुवाद्यें वाजविणें. यायोगानें दानवांचें समाधान होतें.

( ६ ) परिघट्टनाः—तंतुवाद्यें वाजविणें. या योगानें राक्षसांचें समाधान होतें.

( ७ ) संस्वेदनाः—( यास दुसरेहि अनेक पर्याय शब्द आहेत. ) स्वेदोत्पादक द्रव्य हाताला लावणें. यायोगानें गुह्यकांचें समाधान होतें.

( ८ ) मार्गासारितः—निरनिराळ्या वाद्यांचें एकाच वेळीं वादन. या योगानें यक्षांचें समाधान होतें.

( ९ ) आसारितः—नर्तिकांचा प्रवेश व नृत्यास प्रारंभ. यायोगानें यक्षांचें समाधान होतें. हे सर्व प्रकार पडद्याच्या मागें होतात. यानंतर नटांचा प्रवेश होऊन पुढील प्रकार दृष्टीस पडतात.

( १० ) गीतः—देवांच्या स्तुतिपर व ज्यायोगानें ते संतुष्ट होतील असें गायन.

( ११ ) वर्धमानः—तांडव म्हणजे मर्दानी नाच, व तो उत्तरोत्तर वाढत जातो. या योगानें रुद्रदेवास समाधान होतें.

( १२ ) उत्थापनः—इंद्राचें निशाण वर करण्याकरितां म्हटलेलें गीत. यायोगानें ब्रह्मा संतुष्ट होतो.

यावेळेस दोन पारिपार्श्वकांसहित सूत्रधार प्रवेश करतो. ते पारिपार्श्वक जलकुंभ आणि इंद्राचें निशाण धारण करतात. सूत्रधार फुलें उधळतो, इंद्राचें निशाण हातांत घेतो व कुंभांतील पाण्यानें मार्जन करतो.

( १३ ) परिवर्तनः—दिक्पालांची स्तुति करीत नटांचें रंगभूमीवर फिरणें; आणि इंद्राच्या निशाणाची पूजा करणें.

( १४ ) नांदीः—म्हणजे स्तुतिरूप किंवा आशीर्वचनरूप भाषण. हें सूत्रधार मध्यम स्वरांत म्हणतो. याचे १२ किंवा ८ पद असावेत. आणि प्रत्येक पदानंतर त्या दोघां पारिपार्श्वकांनीं ' एवमस्तु ' असें म्हणावें. पद या शब्दाचा स्पष्ट अर्थ काय याविषयीं अलीकडील शास्त्रकारांनींहि नीटपणें उलगडा केलेला नाहीं. कांहींच्या मतें त्याचा अर्थ शब्द तर कांहींच्या मतें वाक्य आणि कांहींच्या मतें पद्यांचा चतुर्थांश ( चरण ) असा आहे.

( १५ ) शुष्कावकृष्टा आणि शुष्कावकृष्टाः—म्हणजे प्रारंभींचें गीत. यांत सूत्रधार हलक्या आवाजांत एक ' जर्जरश्लोक ' नांवाचें पद म्हणतो. तें पद ज्या देवाचा उत्सव नुकताच सुरू केलेला असतो त्याच्या किंवा राजाच्या किंवा ब्राह्मणाच्या सन्मानार्थ म्हणावयाचें असतें. त्यायोगानें पितरांस आनंद होतो.

( १६ ) रंगद्वारः—येथें अभिनयास प्रारंभ होतो. सूत्रधार फिरून एक पद म्हणतो आणि इंद्राच्या निशाणास नमन करतो. या योगानें विष्णु संतुष्ट होतो.

( १७ ) चारीः—शृंगारनिदर्शक निरनिराळे पदन्यास व अभिनय या योगानें उमेस आनंद होतो.

( १८ ) महाचारीः—तसलेच पदन्यास परंतु अधिक जोरकस स्वरूपाचे. यायोगानें भुतें संतुष्ट होतात.

( १९ ) त्रिगतः—सूत्रधार, विदूषक आणि पारिपार्श्वक यांच्यांतील संभाषण. यांत विदूषक पुष्कळसा वाचाळपणा करतो.

( २० ) प्ररोचनाः–(भ.२०. २७) नाटकांतील विषयाचें दिग्दर्शन केल्यानंतर सूत्रधार व दोघे पारिपार्श्वक रंगभूमि सोडून जातात.

भरताच्या मतानें वर सांगितलेले हे पूर्वरंगाचे वीस विभाग आहेत. ह्या वीस विभागांच्या पूर्वरंगास चतुरस्र ह्मणतात. त्र्यस्र पूर्वरंग हा त्यासारखाच परंतु अतिसूक्ष्म स्वरूपाचा असतो आणि चित्रपूर्वरंगांत (भ. ५.१४०) देवांचे मोठी दुंदुभी वाजणें,फुलें उडविणें आणि नाच इत्यादि प्रकार होतात. पूर्वरंग हा वास्तविक नाटकाच्या बाहेरील असा स्वतंत्र भाग आहे. आणि हीच पद्धत पुढें चालू आहे. सोळाव्या शतकांत होऊन गेलेल्या गोकुळनाथाच्या अमृतोदय ग्रंथांत पूर्वरंग हा प्रत्यक्ष नाटकापासून अलिप्त ठेविला आहे.प्रेक्षकवर्गास कंटाळा येऊं नये म्हणून भरतानें ( ५.१४६ ) नृत्य, गीत व वादन यांचा अतिरेक न होऊं देण्याविषयीं बजाविलें आहे. पुढें पुढें पूर्वरंगाला फारच संक्षिप्त स्वरूप देण्यांत आलें. कांहीं झालें तरी पूर्वरंगांत नांदीहि ठेवलीच पाहिजे असें साहित्यदर्पणकारांचें मत आहे ( ६. २३ ). परंतु नांदी याचा अर्थ काय याविषयीं शास्त्रकारांमध्यें एकमत नाहीं. सामान्येंकरून बहुतेक नाटकांच्या प्रारंभीं जें मंगलाचरण असतें त्यासच नांदी म्हणतात. परंतु इतरांच्या मतें या मंगलाचरणाच्या कविता रंगद्वार या सदराखालीं येतात. आणि तेथून पुढें नाटकास प्रारंभ होतो. उर्वशी नाटकाच्या फार जुन्या हस्तलिखित प्रतीवरून ! ' नांद्यंते सूत्रधारः' । ह्या वाक्यानंतर प्रास्ताविक कविता आली आहे. हीच गोष्ट भासाच्या नाटकांत व मुद्राराक्षसाच्या एका चांगल्या हस्तलिखित प्रतींत दृष्टीस पडते. ह्या सर्व नाटकांमध्यें

"नांद्यंते ततः प्रविशति सूत्रधारः" हें विधान केल्यानंतर मंगलाचरणास प्रारंभ होतो. ही स्थिति अगदीं प्राचीन काळच्या नाटकांत दृष्टीस पडत असल्यामुळें नांदी ही नाटकापासून अलिप्त होती असें म्हणणें भाग पडतें. भासाच्या नाटकांतून आपणांस प्ररोचनाहि दृष्टीस पडत नाहीं. यावरून भरतानें जें पूर्वरंगाचें विस्तृत स्वरूप दिलें आहे त्यावरून पूर्वरंग व नाटक हें परस्परांहून भिन्न व अगदीं स्वतंत्र होतेंसें दिसतें.

परंतु पुढें पुढें झालेल्या नाटकांच्या प्रास्ताविक भागाकडे पाहिलें तर नांदी व प्ररोचना हे प्रत्यक्ष नाटकाचेच भाग झालेले दिसून येतात. शिवाय सदर भाग नाटककार लिहूं लागले तत्पूर्वीं त्या भागांची रचना करण्याचें काम सूत्रधाराकडे होतें. अशा प्रकारें सूत्रधारानें केलेली रचना, नाटककाराच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झालेल्या अशा मृच्छकटिक नाटकांत पहावयास सांपडते. परंतु ती पद्धत कालिदास व विशाखदत्त यांच्या कारकीर्दींत सार्वत्रिक झाल्याचें दृष्टीस पडत नाहीं. याप्रमाणें पूर्वरंगाचे कांहीं भाग जरी नाटकांत प्रविष्ट करण्यांत आले आणि त्यामुळें जरी पूर्वरंगाचें स्वरूप बरेंच संक्षिप्त झालें तरी नृत्य गीत व वादन हे जे त्याचे मुख्य भाग ते कायमच राहिले. 'अलमतिविस्तरेण।' इत्यादि नाटकाच्या प्रारंभींच्या विधानावरून वरील म्हणण्याची सत्यता प्रस्थापित होते.

प्रस्तावनाः—पूर्वरंग संपल्यानंतर व सूत्रधार आणि त्याचे अनुयायी हे रंगभूमीवरून गेल्यानंतर शास्त्रकारांच्या मतानें स्थापकानें प्रवेश करावा आणि नाटकास प्रारंभ करून द्यावा. ( काव्यमास्थापयति ) ( भ. ५. १४९; द. रू. ३. २; सा. द. ६. १२६; इ. ). स्थापक हा स्वरूपानें व त्याच्यांतील इतर गुणधर्मांनें सूत्रधाराप्रमाणेंच असतो; स्थापक हा प्रथम गीत गातो, चारी पद्धतींचें नृत्य करतो, नंतर देवब्राह्मणांची स्तुति करतो, प्रेक्षकांचें समाराधन करतो, नाटककाराचा नामनिर्देश करतो, आणि नाटकांतील संविधानक सांगून प्रस्तावनेस प्रारंभ करतो. त्यानें आपल्या पोषाखावरूनच नाटकाचें दिग्दर्शन करावें, आणि म्हणून त्यानें रंगभूमीवर प्रवेश करतेवेळीं देवाचा किंवा मानवाचा पोषाख करावा.

अलीकडे पूर्वरंगाचें अति संक्षिप्त स्वरूप झाल्यामुळें सूत्रधार व स्थापक या दोघांचींहि कामें सूत्रधार करतो असें साहित्यदर्पणकारानें म्हटलें आहे. अलीकडील नाटकांत स्थापक हा क्वचितच दृष्टीस पडतो. स्थापकास फांटा देण्याची सुरवात भासानें केली असें पिशेलचें म्हणणें आहे. परंतु त्या म्हणण्यास सबळ पुरावा नाहीं. पूर्वरंग वगैरेकडे भासानें मुळीच लक्ष दिलेलें दिसून येत नाहीं आणि राजशेखराची 'कर्पूरमंजरी' आणि माधवाचें 'सुभद्राहरण' इत्यादि नाटकांतून स्थापकाचें पात्र दृष्टीस पडत असल्यामुळें हें पात्र नाटकांत घालण्याची पद्धत अलीकडली होती असें दिसून येतें. दशरूपाच्या वेळीं ही पद्धत सर्वत्र चालू होती असें दिसतें. परंतु त्यास त्यावेळीं सूत्रधारच म्हणत असत, कारण बाह्य स्वरूपांत व इतर अनेक गुणधर्मांत त्याचें व सूत्रधाराचें पुष्कळसें साम्य होतें.

स्थापक अथवा सूत्रधार यानें प्रेक्षकांचें समाराधन केल्यावर आणि नाटककाराचा व नाटकाचा नामनिर्देश केल्यानंतर त्यानें भारतीय वृत्तांमध्यें एखाद्या ऋतूचें वर्णन करावें ( दश. ३. ४; सा. द. ६. २८ ). ह्या वर्णनानंतर प्रस्तावना, आमुख, किंवा स्थापना यास प्रारंभ होऊन तेथून पुढें खऱ्या नाटकाला सुरवात होते. ज्यांत सूत्रधार आणि नटी किंवा विदुषक यांचें भाषण चालतें, व ज्यांत त्यांचा धंदा व नाटकाचें संविधानक सांगण्यांत येतें त्यास प्रस्तावना म्हणतात ( भ. २०. २८; द. रू. ३; सा.द.६.३). संस्कृत नाटकांतून अशा प्रकारच्या प्रस्तावनेचें स्वरूप चोहोंकडे दृष्टीस पडतें. प्रस्तावनेचा वीथ्यंगाव्यतिरिक्त पांच तन्हेनें शेवट करतां येतो, त्या तऱ्हा येणेंप्रमाणेंः—उद्घाटक, कथोद्घात, प्रयोगातिशय, प्रवृत्तिक आणि अवलगित; यांपैकीं उद्घाटक आणि अवलगित हीं सामान्य स्वरूपाचीं आणि साहित्यपरिपोषक साधनें आहेत आणि म्हणून त्यांचा वीथ्यंगामध्यें अंतर्भाव केला आहे.

उद्घाट्यकः—याचें स्वरूप आपणांस मुद्राराक्षस नाटकांत पाहावयास सांपडतें. त्यांत सूत्रधार चंद्रग्रहणासंबंधीं बोलत असतां कोणीतरी चंद्रगुप्ताचा अपमान करीत आहे, असा चाणक्य त्याच्या बोलण्याचा अर्थ करतो आणि तेथून नाटकास प्रारंभ होतो. शाकुंतल नाटकांत आपणांस अवलगित हा प्रकार पाहावयास सांपडतो. तेथें ज्याप्रमाणें ह्या दुष्यंत राजाचें लक्ष सारंगा( हरिणा )कडे एकाग्रतेनें लागलें आहे, त्याप्रमाणें माझें लक्ष तुझ्या गाण्यानें वेधून घेतलें आहे, असें सूत्रधार म्हणतो आणि नंतर राजा प्रवेश करतो.

कथोद्घात ( भरत, २०. ३२; द. रू. ३. १; सा. द. ६. ३६. ):—ह्यांत एखादा नट सूत्रधारानें उच्चारलेला शब्द किंवा वाक्य ऐकतो, आणि त्यांचा (शब्द व वाक्य यांचा) पुढील नाटकांत उपयोग करतो; जसें:—रत्नावली नाटकांत सूत्रधार स्वतः परदेशांत जाऊन परागंदा असलेल्या जांवयास घरीं आणण्याचें वचन देऊन नटीचें सांतवन करतो. यौगंधरायण हें सूत्रधाराचें वाक्य रत्नावळीच्या बाबतींत लागू करतो, आणि त्या अर्थानें त्याचा पुनरुच्चार करतो.

प्रयोगातिशय ( भ. २०. ३३; दश रू. ३. १०; सा. द. ६. ३६. ):—यांत सूत्रधार स्वतःच्या व्यवसायाचा व नाटकांतील संविधानकाचा मेळ घालून देतो. पुष्कळ वेळां भासाच्या नाटकांत कांहींतरी गोंगाट सूत्रधाराच्या कानीं पडतो, आणि हें काय आहे याचा जों सूत्रधार शोध करावयास जातो तों त्यास नाटकास प्रारंभ झाल्याचें कळून येतें.

प्रवृ(त्त)त्तिक अथवा प्रवर्तक ( भ. २०. ३४; दश. रू. ३. १०; सा. द. ६. ३७ ):—यांत सूत्रधार एखाद्या वैराग्याचें

वर्णन करतो आणि उपमेयाच्या साहाय्यानें नाटकाच्या संविधानकास प्रारंभ करून देतो. प्रस्तावनेनंतर स्थापक किंवा सूत्रधार आपल्या अनुयायांसह रंगभूमीवरून निघून जातात आणि खऱ्या नाटकास प्रारंभ होतो.

नाटकांचे निरनिराळे प्रकार, दशरूपकें:— शास्त्रकार नाटकास रूपक ही संज्ञा देतात आणि त्या संज्ञेची ते कशा रीतीनें व्युत्पत्ति करतात, हें सांगितलेंच आहे. भरताचार्यांनें या रूपकांचे दहा प्रकार सांगितले आहेत. त्यानें या रूपकांचें केलेलें वर्णन व वर्गीकरण त्याच्या नंतरच्या शास्त्रकारांस आदर्शभूत असेंच आहे. परंतु कवि मात्र त्यांस बंधनकारक मानीत नाहीं. सदरहू वर्णनांत व वर्गीकरणांत मागाहून पुष्कळ फेरफार झाले, आणि म्हणून पुढल्या शास्त्रकारांनीं त्या रूपकांचें अधिक विस्तृत वर्णन व वर्गीकरण केलें आहे. तथापि त्यांनीं भरतानें सांगितलेल्या दशरूपकांत यत्किंचितहि बदल केलेला नाहीं. त्यांनीं नवीन केलेले प्रकार हे रूपकाचे पोटभेद किंवा उपरूपकें आहेत.

अलीकडील शास्त्रकारांनीं केलेलें रूपकांचें वर्गीकरण हें मुख्यत्वेंकरून मूळच्या सामुग्रीस दिलेलें नवीन स्वरूप आहे. भरतानेंहि तेंच केलें. त्यानें उपलब्ध असलेली सामुग्री व्यवस्थित केली आणि त्यास अवगत असलेल्या नाटकांचे त्यानें निरनिराळे प्रकार केले. प्रत्येक प्रकारचीं अनेक नाटकें असण्याची जरूरी नव्हती. वास्तविक पाहिलें तर 'समवकार' या सदरांत येणारें एकच नाटक त्यास माहीत होतें आणि त्यानें दिलेल्या इतर प्रकारासंबंधानेंहि असेंच म्हणावें लागेल. त्यावरून त्यावेळीं नाट्यवाङ्मयास नुकताच प्रारंभ झाला असून त्याच्या निरनिराळ्या प्रकारास व्यवस्थित स्वरूप प्राप्त झालें नव्हतें असें दिसतें.

नाटकः—भारतीय नाट्यांतील मुख्य प्रकारास नाटक ही संज्ञा आहे. या शब्दाचा मूळ अर्थ भरत. १९. ११८ यांत दिला आहे. तेथें ग्रंथकार म्हणतो "ज्यांत ऐहिक व्यवहार अंगाभिनयानें दाखविण्यांत येतात किंवा ज्यांत देव, ऋषी, राजे आणि सांसारिक मनुष्यें यांच्या चरित्रांचें चित्र रेखाटलें असतें त्यास नाटक म्हणावें," त्याचप्रमाणें नाटक लिहिणारानें सर्व ऐहिक व्यवहारांचें फार बारकाईनें अध्ययन करावें, असें ( भरत, १९. १२३ ) ठासून सांगितलें आहे. भासाच्या 'चारुदत्त' नाटकांत वसंतसेना या वारांगनेस 'नाड्यधिया' म्हणजे नाटककुमारी असें म्हटलें आहे. आणि बालरामायण यांत ( ४. १२,१३ ) इंद्राच्या रथावरील चित्रास मातली हा नाटक म्हणतो. चित्रांच्या प्रदर्शनानें आणि मूकनाट्यानेंहि कधीं कधीं नाटकाची उत्पत्ति होते आणि त्यास संभाषणाची आवश्यकता नाहीं. भरत. १८. ७ यांत नाटकास सर्व वृत्ती अनुकूल असतात असें सांगितलें आहे.

नाटकाचें मुख्य लक्षण असें आहे कीं, त्याचें संविधानक प्रख्यात वस्तूनें (भ. १८. १०) किंवा ख्यात वृत्तानें ( साहि. द. ६. ७ आणि दश. ३. २१ ) जमविलेलें असतें. प्रख्यात वस्तु किंवा ख्यात वृत्त याचा अर्थ प्रतापरुद्रीयकाराच्या मतानें इतिहासांतून घेतलेली गोष्ट असा होतो. एकंदर संविधानकांत पांच संधी असतात आणि वीर व शृंगार हे मुख्य रस असतात ( द. रू. ३. ३० व सा० द. ६. १० ). नाटकाच्या निर्वहणांत शेवटीं अद्भुत रस असतो.

नाटकांतील नायक प्रख्यात असतो;तो राजा, राजर्षि किंवा मनुष्य-देहधारी देव असा असतो ( भ. १८. १० व १२; द. रू. ३. २१; सा. द. ६. ९ ). नाटकाच्या नांवावरून त्यांतलि-आशय प्रेक्षकांच्या मनांत उतरला पाहिजे. त्याचे अंक कमींत कमी पांच व जास्तींत जास्त दहा असावे ( भ. १८. १०२; द. रू. १. ३४; सा. द. ६. ८ ). परंतु हा नियम सर्वत्र पाळण्यांत येत नाहीं. चार अंक असलेलीहि नाटकें दृष्टीस पडतात ( उदा० मधुसूदनाचें 'जानकीपरिणय', नारायणशास्त्री यांचें 'शर्मिष्ठाविजय', वेंकमणी यांचें 'गीतदिगंबर'; आणि श्रीनिवासाचें 'सौम्यसोम' इ. ). तीन अंक असलेलीहि नाटकें आढळतात ( उदा० घनःश्यामाचें 'नवग्रहचरित्र' ). दोन अंक असलेलीहि नाटकें कधीं कधीं दृष्टीस पडतात ( उदा० वेदांतवागीशाचें 'भोजचरित' ), आणि कधीं कधीं तर एकांकी नाटकें असतात ( उदा० रविदासाचें 'मिथ्याज्ञानविडंबन' ). तसेंच हनुमान नाटकाचे चौदा अंक आहेत. तथापि बहुतेक नाटकांत शास्त्रकारांनीं अंकांच्या संख्यामर्यादेसंबंधानें घालून दिलेले नियम पाळण्यांत येतात. दशांकी नाटकांत जर निरनिराळ्या पताका असतील तर त्यास महानाटक म्हणावें ( सा० द० ६. २२३ ).

नाटकांतील पात्रांची संख्या अतिशय मोठी असूं नये, चार किंवा पांच मुख्य पात्रें नाटकाला बेताचीं होतात (भ. १८. ८९; सा. द. ६. ११ ). नाटकाचा शेवट गोपुच्छासारखा असावा ( भर. १८. ९०; सा. द. ६. ११; इ. ). साहित्यदर्पणकारांचा टीकाकार याचा अर्थ पुढीलप्रमाणें करतोः—'ज्याप्रमाणें गाईच्या पुच्छाचे कांहीं केंस लांब असतात, व कांहीं आंखूड असतात त्याप्रमाणें नाटकांतील कारस्थानें कधीं एका संधींत तर कधीं दुसऱ्या संधींत दिलेलीं असतात. याचा मूळ अर्थ अंतिमसाध्य साध्य होईपर्यंत नाटकांतील संविधानकाचा हळू हळू विकास होत जातो, असा असावा असें दिसतें.

प्रकरणः—ज्या प्रकाराला प्रकरण ही संज्ञा आहे ( भ. १८. ९३; द. रू. ३. ३५. सा. द. ६. २२४; इ. ) त्यांत सर्व वृत्तींचा उपयोग करतात. ( भ. १८. ७ ). या प्रकारांत नाटककार नाटकाचें संविधानक आपल्या कल्पनेनें किंवा आपल्या आवडीप्रमाणें रचतो म्हणून त्यास प्रकरण म्हणतात असा समज आहे. भरताच्या मतानें प्रकरणांत

ब्राह्मण, व्यापारी, मंत्री, पुरोहित व दिवाण यांचीं चरित्रें व व्यवसाय वर्णिलेले असतात. प्रकरणाचा पांच संधींमधून विकास होतो (भ. १९.४२). दशरूपककाराच्या मतानें यांतील रस नाटकाप्रमाणेंच असतो व साहित्यदर्पणकारांच्या मतानें तो शृंगार असतो. दशरूपक व साहित्यदर्पण यांत प्रकरणासंबंधानें पुढील अधिक माहिती दिली आहे. त्यांतील नायक हा मंत्री किंवा ब्राह्मण किंवा व्यापारी असा असतो. तो अनेक संकटांतून आपला मार्ग काढतो आणि धर्मार्थकाम हें साध्य करून घेण्याचे नेहमीं प्रयत्न करतो. यांतील नायिका सत्कुलांतील असते किंवा वारांगना असते. किंवा कधीं कधीं दोन्हीहि प्रकारच्या असतात. यांशिवाय दास, विट आणि श्रेष्ठी यांचीहि पात्रें प्रकरणांत असतात. नाटकाप्रमाणेंच यांतील अंकांची संख्या कमींत कमी पांच व ज्यास्तींत ज्यास्त दहा असावी. साहित्यदर्पणकाराच्या मतानें प्रकरणाच्या नांवांत नायक व नायिका यांच्या नांवांचा अंतर्भाव व्हावा ( सा. द. ६. १४३ ).

ज्याअर्थी चतुरंकी 'प्रतिज्ञा यौगंधरायण' या नाटकास प्रकरण म्हटलेलें आहे आणि नांवासंबंधाचा नियम मृच्छकटिकाच्या बाबतींत पाळण्यांत आलेला नाहीं, त्यावरून असें दिसतें कीं प्रकरण याची व्याख्या मागाहून करण्यांत आलेली असावी. बहुतकरून सदर व्याख्या नाटिका या प्रकाराचा उदय झाल्यानंतर करण्यांत आली असावी. प्रख्यात अशा प्रकरणांची संख्या फारशी मोठी नाहीं. सर्वांत प्राचीन प्रकरण म्हटलें म्हणजे अश्वघोषाचें 'सारीपुत्र' प्रकरण हें होय. मृच्छकटिक व मालतीमाधव हीं विशेष प्रख्यात आहेत. यांशिवाय साहित्यदर्पणकारानें पुष्पभूषित नांवाच्या प्रकरणाचा निर्देश केला आहे. या पुष्पभूषितांतील नायक व्यापारी असावा असा समज आहे. पण याचा दशरूपककार पुष्पदूषितक असा निर्देश करतात, आणि सदर प्रकरणांतील नायिका कुलजा असून तरंगदत्तांतील नायिका वेश्या होती असें लिहितात. मृच्छकटिकांतहि वसंतसेना ही वारांगना असून चारुदत्ताची भार्या ही कुलजा होती, अशा दोन प्रकारच्या नायिका दृष्टीस पडतात. कुलजा संस्कृतांत भाषण करते व वेश्या प्राकृतांत करते असे कुमारस्वामीच्या टीकेंत म्हटलें आहे. परंतु मृच्छकटिकांत हा नियम पाळलेला दृष्टीस पडत नाहीं.

समवकारः—याचा विषय प्रख्यात असतो ( भ. १८. १०९; द. रू. ३.५६; सा. द. ६. २३४ ), आणि तो देवांच्या व असुरांच्या पौराणिक कथांतून घेतलेला असतो. यांत विमर्शसंधीखेरीजकरून बाकीच्यांचा उपयोग करतात आणि पहिल्या अंकांत दोन संधींचा उपयोग केलेला असतो. यांत बिंदूचा उपयोग करीत नाहींत. भरताच्या मतानें (भ. १८. ८) यांत कैशिकी वृत्तीचा उपयोग करणें युक्त नाहीं. त्याच्या मागाहून झालेल्या शास्त्रकारांच्या मतानें इतर वृत्तींबरोबर तिचाहि उपयोग करण्यास हरकत नाहीं. यांत उष्णिह अनुष्टुप आणि कुटिल या वृत्तांचा उपयोग करतात. या प्रकारांत ख्यातोदात्त असे नायक, देव व मानव असे असले पाहिजेत. यांची एकंदर संख्या १२ पर्यंत असल्यास हरकत नाहीं. त्यांपैकीं प्रत्येकजण आपापलें वेगळें साध्य, साध्य करून घेण्याच्या प्रयत्नांत असतो. या प्रकारांत तीन प्रकारचें कपट दृष्टीस पडतें. (१) जें नेहमींच्या व्यवहारांत दृष्टीस पडतें, (२) जें देवाच्या खटपटीनें उत्पन्न होतें आणि ( ३ ) जें शत्रूंच्या कारस्थानानें उत्पन्न होतें. त्याचप्रमाणें या प्रकारांत तीन प्रकारचे विद्राव दिसून येतात. (१) नैसर्गिक कारणानें उत्पन्न होणारें, जसें अग्निप्रलय, जलप्रलय, इत्यादि. (२) बाह्य शत्रूंपासून उत्पन्न होणारें, जसें युद्ध. आकस्मिक हल्ला वगैरे आणि (३) हत्ती आणि असेच अन्य वन्य पशू यांजकडून उत्पन्न होणारे. यांत तीन प्रकारचे शृंगारहि असतात व या तीन शृंगारांचा हेतु धर्म, अर्थ व काम (यथार्थ व अयथार्थ) हे साध्य करून घावयाचा असतो. यांत तेरा प्रकारचीं वीथ्यंगें यांचाहि उपयोग करतात.

यांत एकंदर तीन अंक असून प्रवेशक वगैरे कांहीं नसतात. तीन प्रकारचीं तत्त्वें ह्या तिन्ही अंकांत उपयोगांत आणलीं असतात. तीन प्रकारच्या शृंगारांसंबंधीहि दशरूपककारानें असेंच म्हटलें आहे. परंतु साहित्यदर्पणकाराच्या मतानें कामशृंगाराची योजना फक्त पहिल्या अंकांतच असते. प्रत्येक अंकांत नवीन संविधानक असतें. पण हीं निरनिराळीं संविधानकें एकमेकाला जोडण्यांत येतात. पहिला अंक बारा नाडिकापर्यंत चालावा, ( नाडिका म्हणजे चोवीस मिनिटें ) व दुसरा व तिसरा अंक दोन नाडिकापर्यंत चालावा.

यावरून एका विशिष्ट समवकाराकडे लक्ष देऊन भरतानें आपले नियम रचिले असावे. आणि त्याच्यामागून झालेल्या शास्त्रकारांनीं त्याचीच व्याख्या घेऊन ती विस्तृत केली. भरत हा समवकारास 'अमृतमंथन' असें म्हणतो ( ४.२ ) व त्यासच दशरूपककार ( ३.५८ ) 'अंबोधिमंथन' असें म्हणतात व साहित्यदर्पणकार ( ६.२४० ) 'समुद्रमंथन' असें म्हणतात. यावरून तें नाटक अमृत प्राप्त करून घेण्यास जें समुद्राचें मंथन केलें, त्याबद्दलचें असावें. भासाचें पंचरात्र हा एकच समवकाराचा नमुना उपलब्ध आहे. व तोहि अगदीं समवकाराच्या वर्णनाबरहुकूम नाहीं. उदाहरणार्थ, त्यांत फक्त अकराच नायक दृष्टीस पडतात. यावरून समवकार हा नाटकाचा प्रकार फारसा लोकप्रिय झाला नव्हता असें दिसून येतें. कदाचित् तो लौकिक नाट्यांत प्रमुख असावा.

ईहामृगः—यांत जी मृगीप्रमाणें उपलब्ध होण्यास कठिण अशा कुमारिकेचा नायक अभिलाष करतो म्हणून या प्रकारास ईहामृग असें म्हणतात असें दशरूपक व साहित्यदर्पण यांच्या

टीकाकारांचें मत आहे. यांतील संविधानक मिश्र असतें, म्हणजे त्याचा कांहीं भाग आख्यायिकेंतून घेतलेला असतो, व कांहीं काल्पनिक असतो. यांत कैशिकी वृत्ति वर्ज्य असते ( भरत, १८.८, १९.४४ ) व पहिले दोन आणि शेवटचा असें संधी दृष्टीस पडतात (भ. १९.४४ ). भरताच्या मतानें नायक दैविक पुरुष असतो. परंतु दशरूपककार आणि साहित्यदर्पणकार यांच्या मतानें नायक व प्रतिनायक हे देव किंवा मानव यांपैकीं कोणीहि असले तरी चालेल. नायकापासून एक दैवी स्त्री तिच्या मनाविरुद्ध पळवून नेण्याच्या प्रयत्नाबद्दल नायक व प्रतिनायक यांच्यामध्यें तंटा उत्पन्न होतो. त्यांच्यांतील युद्ध युक्तीनें टाळण्यांत येतें आणि आख्यायिकेंत वर्णिलेला वध रंगभूमीवर दाखविण्यांत येत नाहीं. यांतील अंकांची संख्या चार असावी. परंतु साहित्यदर्पणकाराच्या मतानें यांत एकच अंक असावा, आणि यांतील नायक देव असावा असें इतर शास्त्रकारांचें मत आहे. त्याचप्रमाणें इतर शास्त्रकारांच्या मतानें ईहामृगांत एका दैवी कुमारिकेच्या प्राप्तीकरितां सहा नायकांमध्यें लढा असावा. हाहि नाटकाचा प्रकार लोकप्रिय झालेला दिसत नाहीं. साहित्यदर्पणकारानें ईहामृगाचें उदाहरण म्हणून एका अप्रसिद्ध कुसुमशेखर नांवाच्या नाटकाचा उल्लेख केला आहे.

डिमः—दशरूपकाच्या टीकेंत ' डिमसंघाते ' या पदावरून या प्रकाराचें नांव डिम पडलें, असें म्हटलें आहे. ' डिमसंघाते ' म्हणजे यांतील नायक एकमेकांशीं लढतात ( भ. १८. १३०; द. रू. ३.५१; द. सा. ६.२४१; इ. ). यांतील संविधानक प्रख्यात असावें लागतें. यांत सात्वति आणि आरभटी या वृत्तींचा उपयोग करतात. व कैशिक वृत्ति वर्ज्य करण्यांत येते ( भ. १८.८ ). विमर्श खेरीजकरून यांत बाकीचे संधी दृष्टीस पडतात ( भ. १९.४३ ). यांत शृंगार व हास्य हे रस वर्ज्य समजावे व साहित्यदर्पणकाराच्या मतानें शांतरसहि वर्ज्य करावा. यांतील मुख्य रस म्हटला म्हणजे रौद्ररस हा होय. यांतील एक नायक किंवा अनेक नायक हे सुप्रसिद्ध पौराणिक व्यक्ती असतात. त्यांचा अत्याचार करण्याकडे नेहमीं कल असतो. त्यांचे एकंदर सोळा प्रकार असतात– देव, गंधर्व, यक्ष, राक्षस, नागासूर, भुतें, प्रेतें, पिशाच्चें, इत्यादि. झंझावात, उल्कापात, चंद्रसूर्यांची ग्रहणें, युद्ध, कलह व जादू इत्यादिकांचे देखावे या प्रकारांत दृष्टीस पडतात.

यांत चार अंक असतात. साहित्यदर्पणकाराच्या मतानें या प्रकारांत विष्कंभक आणि प्रवेशक हे वर्ज्य करावे. परंतु ते रामाच्या मन्मथोन्मथन या डिमांत दृष्टीस पडतात. भरताचार्यानें ' त्रिपुरदाह ' हें एक डिमाचें उदाहरण म्हणून दिलें आहे. त्याच्या मतानें तें डिम हिमालयावर शिवासमोर करण्यांत आलें होतें. डिम हाहि एक लौकिक नाट्याचाच प्रकार आहे.

व्यायोगः—डिमाप्रमाणें व्यायोग हाहि एक लौकिक नाट्याचा प्रकार आहे (भरत, १८.१३५; द. रू. ३. ५४; सा. द. ६.२३१; इ. ). यांतील पात्रें एकमेकांचा पाडाव करतात. म्हणून यास व्यायोग ( व्यायुज्यंते ) म्हणतात. यांतील संविधानक हें आख्यायिकेंतून घेतलेलें असून प्रख्यात असतें. यांतिल संविधानकाचा काल एक दिवसापलीकडे जाऊं नये, शिवाय यांत युद्ध व कलह बऱ्याच मोठ्या प्रमाणांत दृष्टीस पडतात. यांत स्त्रीभूमिकांचा अभाव असतो. कैशिकी वृत्ति ( भ. १८.८ ) गर्भ व विमर्श हे दोन संधी ( भ. १९.४४ ) आणि हास्य व शृंगाररस हे वर्ज्य करण्यांत येतात. भरत व साहित्यदर्पणकार यांच्या मतानें यांतील नायक राजर्षि किंवा देव असतो. दशरूपककाराच्या मतानें तो मानव असतो, यांत एकच अंक असून यांतील नांदी चैतन्यचंद्रोदयाप्रमाणें नेपथ्याच्या मागें म्हणतात. भासाच्या कांहीं नाटकांत व्यायोगाचे प्रकार दृष्टीस पडतात. साहित्यदर्पणकारानें ' सौगंधिकाहरण ' हें व्यायोगाचें उदाहरण दिलें आहे.

प्रहसनः—हा प्रकारहि प्राचीन लौकिक नाटकांतून घेतलेला आहे ( भरत, १८. १४६; द. रू. ३. ४९; सा. द. ६.२६४; इ.). यांतील संविधानक नाटककारानें नेहमींच्या व्यवहारांतून घेतलेलें असतें. यांत नेहमीं लुच्चे, लबाड, व बदमाष लोकांत चालू असणारे लबाडीचे प्रकार, कलह, विग्रह इत्यादिकांचें चित्र प्रामुख्यानें रेखाटलेलें असतें. वृत्तींपैकीं कैशिकी व आरभटी या दोन वृत्ती वर्ज्य करण्यांत येतात व संधींपैकीं मुख व निर्वहण या दोनच संधींचा उपयोग करतात ( भ. १९.४५ ). यांतील मुख्य रस हास्य हा होय. परंतु मधून मधून लास्यांगें व वीथ्यंगें यांचाहि उपयोग करावा.

प्रहसनाचे दोन प्रकार आहेत. एक शुद्ध व दुसरा संकीर्ण; शुद्धामध्यें निरनिराळ्या जातींचे लोक, ब्राह्मण व अगदीं हलक्या जातीचेहि लोक आपापली भाषा बोलतांना व आपापले धंदे करतांना दृष्टीस पडतात. संकीर्ण प्रकारामध्यें वेश्या, दासदासी, वर्षधर, विट आणि धूर्त अशा प्रकारचे लोक दृष्टीस पडतात. दशरूपककाराच्या मतानें ज्यांत वीथ्यंगाचा उपयोग करण्यांत येतो, तें प्रहसन संकीर्ण समजावें. दशरूपककार आणि साहित्यदर्पणकार यांनीं प्रहसनाच्या विकृत म्हणून एका तिसऱ्या प्रकारचा उल्लेख केला आहे. यांत वर्षवर व दासदासी ह्या एकमेकांच्या शृंगारचेष्टा करतात.

साहित्यदर्पणकाराच्या मतानें प्रहसनांत फक्त एक अंक असावा आणि विष्कंभक व प्रवेशक हे नसावेत. परंतु संकीर्ण प्रहसनांत दोन अंक असले तरी चालेल. ' कंदर्पकेलि ' हें शुद्ध प्रहसनाचें उदाहरण असून 'धूर्तचरित' व 'लटकमेलक' हीं दोन संकीर्ण प्रहसनाचीं उदाहरणें दिलीं आहेत.

भाणः—भाणाचीहि (भरत, १८. १५२; १९. ४५; द. रू. ३०.४४; सा. द. ६; २२७ इत्यादि) उत्पत्ति लौकिक नाटकांपासूनच झालेली आहे. यांतील संविधानक अगदीं स्वतंत्रपणें रचलेलें असतें. यांतील वृत्ति मुख्य भारतीच असून कैशिकीवृत्ति तर अगदींच वर्ज्य असते (भ.१८. ८ इत्यादि) आणि संधींपैकीं मुखसंधि व निर्वहणसंधि हेच कायते उपयोगांत येतात. वीरश्रींच्या पराक्रमाच्या वर्णनानें वीररस व शृंगारसौख्यानें उत्पन्न होणारा शृंगाररस हे त्यांत मुख्य रस असतात. ह्या नाटकाचा प्रकार एकच नट करून दाखवितो. तो विट असून त्यावेळचा विनोदी नागरिक असतो. तो आपले कांहीं अनुभव आकाशभाषिताच्या योगानें प्रगट करतो. म्हणजे 'काय म्हणतोस ?' इत्यादि प्रश्न कोणीं तरी विचारीत आहे अशी कल्पना करून तो त्याचें स्वतः उत्तर देतो. हीं प्रश्नोत्तरें चालवितांना तो त्याला अनुरूप असे हावभावहि करतो. भाण हें मूक नाट्यापासून किंवा नृत्यापासून परिणत झालें हें उघड आहे आणि त्यावरून त्यांत लास्यांगाचा कां उपयोग करतात याचाहि उलगडा होतो. भाणांत एकच अंक असतो व त्यांतील नांदी चैतन्यचंद्रोदयाप्रमाणें नेपथ्यशालेंत म्हणतात. साहित्यदर्पणकारानें 'लीलामधुकर' हें भाणाचें उदाहरण म्हणून दिलें आहे.

वीथीः—वीथीमध्येंहि एकच अंक असून हा नाटकाचा प्रकार भाणाच्या स्वरूपाचा आहे (भरत, १८. १५६; दशरूप ३. ६२; सा. द. ६. २२३) वीथी या शब्दाचा एक अर्थ माला असा होतो; साहित्यदर्पणकाराच्या मतानें यांत निरनिराळे रस एकत्रित केल्यामुळें जणूंकाय त्यांची माला गुंफिली जाते. वीथीमध्यें नमूद केलेल्या वीथ्यंगाचे जे निरनिराळे धर्म सांगितले आहेत त्यांचा अंतर्भाव होतो. दशरूपकार, साहित्यदर्पणकार व प्रतापरुद्रीयकार यांच्या मतें वीथीमध्यें कैशिकी वृत्तीचा उपयोग करतात. परंतु याच्या उलट यांत कैशिकी वृत्ति वर्ज आहे असें भरताचार्य यांचें मत आहे (१८.८). यांत मुखसंधि व निर्वहणसंधि हे येत असून अर्थ प्रकृती मात्र सर्व येतात. मुख्य रस शृंगार असतो; परंतु इतरांचेंहि दिग्दर्शन केलेलें असतें. वीथीमध्यें दोन नट असतात, परंतु एका अप्रसिद्ध ग्रंथकाराचा आधार घेऊन यांत उत्तम, मध्यम आणि अधम असे तीन नट असतात असें साहित्यदर्पणकाराचें मत आहे. डॉक्टर भांडारकर यांनीं प्रकाशित केलेल्या मालतीमाधवावरील टीकेंत (पृ. ८१) ह्या अप्रसिद्ध ग्रंथकाराचा आधार खुद्द भरताचार्यांचा आधार असें म्हटलें आहे. परंतु त्यांत भरताचार्यांच्या ग्रंथाचा उतारा दिलेला नाहीं आणि साहित्यदर्पणकारानें तर तो भरताचार्य नसून तो दुसराच कोणी ग्रंथकार होता, असें ध्वनित केलें आहे. तें कांहीं असलें तरी या नाटकाच्या प्रकारांत पुष्कळसें संभाषण काल्पनिक मनुष्याबरोबर म्हणजे आकाशभाषिताप्रमाणें होतें. साहित्यदर्पणकारानें 'मालविका' म्हणून वीथीचें उदाहरण दिलें आहे. ही मालविका कालिदासाच्या 'मालविकाग्निमित्र' या नाटकाहून भिन्न असली पाहिजे. मालतीमाधवाच्या पहिल्या अंकांत बकुलमालेचा संबंध येत असल्यामुळें त्यास बकुलवीथी असें म्हटलें आहे. परंतु वास्तविक तो वीथी या सदरांत येत नाहीं.

उपरूपकें:—साहित्यदर्पणकारानें उपरूपकें म्हणून आणखी नाटकांचे अठरा प्रकार वर्णिले आहेत. याचा अर्थ इतकाच कीं, जीं नाटकें मागाहून झालीं व ज्यांनां भरताचार्यांनें केलेलीं वर्णनें लागू पडलीं नाहींत त्यांचे निराळे प्रकार समजण्यांत येऊन त्यांस व्यवस्थित रूप देण्यांत आलें. यांतील मुख्य मुद्दा असा होता कीं, भरताचार्यांनें केलेल्या वर्गीकरणांत ढवळाढवळ करावयाची नाहीं. वर सांगितलेल्या अठरा उपरूपकांस त्यांतील नाटिका खेरीजकरून नाट्यवाङ्मयांत फारसें महत्त्व प्राप्त झालें नाहीं. यांपैकीं कांहीं प्रकार लौकिक नाट्यांतून घेतलेले असावे, हें संभवनीय दिसतें.

नाटिकाः—भरताचार्यांनें नाटी म्हणून एक नाटकाचा प्रकार सांगितला आहे (भरत, १८. १०६; द. रू. ३. ३९ सा. द. ६. २६९) (परंतु हें वाक्य भरताचार्यांच्या ग्रंथांत मागाहून कोणीतरी घुसडलें असावें आणि त्यासच मागाहून झालेल्या ग्रंथकारानें नाटिका हें नांव दिलें). नाटक व प्रकरण या दोहोंचें मिश्रण केलें म्हणजे तिला नाटिका असें म्हटलें आहे. भरताचार्यांच्या मतानें नाटिकेंतील संविधानक कांहीं प्रमाणांत आख्यायिकेपासून व कांहीं प्रमाणांत कविकल्पनेनें रचलेलें असतें असें आहे. परंतु इतरांच्या मतानें तें सर्वस्वी कविकल्पित असतें. यांतील वृत्ति कैशिकी असते व संधींपैकीं विमर्शाचा उपयोग करीत नाहींत. यांतील मुख्य रस शृंगार असतो. यांतील नायक पौराणिक कथेंतून घेतलेला एखादा राजा असतो. यांतील नायिका अंतःपुरांत असणारी व जिला नृत्यगीतांत आपला वेळ घालविण्याची आवड आहे अशी राजकन्या असते. यांतील नायक आपल्या मत्सरग्रस्त राणीची काळजी करतो परंतु ती राणी नायकनायिकेच्या संयोगाला आपली संमति देते. यांत चार अंक असतात किंवा दशरूपककाराच्या मतानें (३. ४०) ते तीन, दोन किंवा एकहि चालतात. नाटिकेचें नांव नायिकेच्या नांवावरून दिलेलें असतें.

नाटिका हा तिच्या नांवाप्रमाणें एक नाटकाचाच पोटविभाग आहे. खरें पाहूं गेलें तर 'मालविकाग्निमित्रा'सारखें नाटक व रत्नावलीसारखी नाटिका यांत वस्तुतः फारसा फरक नाहीं. परंतु नाटिका ही निराळ्या पोटविभागांत घालण्याचें कारण असें आहे कीं, भरताचार्यांनें नाटकास निदान पांच अंक तरी असावे असें सांगितलें आहे. नाटकाप्रमाणें नाटिकेंतहि तिचा मुळार्थाशीं असलेला संबंध कधीं कधीं दृष्टीस पडतो. उदाहरणार्थ, बालरामायणांत नाटिका याचा अर्थ 'विदूषकें' असा आहे.

त्रोटकः— त्रोटकांत पांच, सात, आठ किंवा नऊ अंक असतात व त्यांतील विषय देव व मानव यांच्या विषयींचा असतो. यांतील प्रत्येक अंकांत विदूषक रंगभूमीवर दृष्टीस पडला पाहिजे. त्रोटकाची सप्तांकी स्तंभितारंभ व पंचांकी विक्रमोर्वशीय अशीं दोन उदाहरणें देण्यांत येतात. परंतु यांपैकी दुसरेंच कायतें उपलब्ध आहे. विक्रमोर्वशीय यासहि त्याच्या बंगाली प्रतींतच कायतें त्रोटक म्हटलें आहे. एरवी त्यास नाटक म्हणण्याचा प्रघात आहे. बंगाली प्रांतांत विक्रमोर्वशीयाच्या ज्या अंकांत राजाला वेड लागून तो भटकत असतो, त्या अंकांत नृत्याबरोबर म्हणावयाच्या अनेक अपभ्रष्ट कविता आहेत. गर्भसंधीच्या दहाव्या अंगासहि तोटक किंवा त्रोटक असें म्हणतात ( भ. १९. ८२; द. रू. १. ३७; सा. द. ६. ९९ ) परंतु या शब्दाचा तेथें असंबद्ध व प्रक्षुब्ध असा अर्थ आहे. याशिवाय एका लौकिक नृत्यालाहि त्रोटक ही संज्ञा देतात. यावरून ज्या नाटकांत तसलें नृत्य किंवा गर्भसंधीचें दहावें अंग असेल त्यास त्रोटक किंवा तोटक म्हणावें. अशा तऱ्हेनें अर्वाचीन नाटककारांनीं एक नवीनच नाटकाचा प्रकार उत्पन्न केला.

गोष्ठीः—गोष्ठी हें एकांकी नाटक आहे ( सा. द. ६. २७४ ). यांत हलक्या दर्जाचे नऊ किंवा दहा पुरुष व पांच किंवा सहा स्त्रिया दृष्टीस पडतात. यांत कैशिकी वृत्ति असते आणि संधींपैकीं गर्भ व विमर्श हे वर्ज्य असतात. यांतील मुख्य रस कामशृंगार होय. या नाटकाच्या प्रकाराचें उदा० 'रैवतमदनिका' म्हणून दिलेलें आहे. रैवतमदनिका हें एरवी अज्ञात असल्यामुळें त्यांतील संभाषणाकडे लक्ष देऊन त्यास गोष्ठी असें म्हणूं लागले व त्यामुळें तो एक नाटकाचा निराळा प्रकारच असल्याबद्दल शास्त्रकारांनीं नमूद करून ठेविलें आहे.

सट्टकः—सट्टक हें जवळ जवळ प्राकृतांत लिहिलेली नाटिका होय असें म्हणण्यास हरकत नाहीं ( सा. द. ६. २७६ ) परंतु यांत विष्कंभक व प्रवेशक यांचा पूर्ण अभाव असतो. यांतील अंकास अंक न म्हणतां जवनिकांतर असें म्हणतात. त्रोटकाप्रमाणेंच सट्टक हें एकप्रकारचें नृत्य आहे. आणि तें नृत्य या प्रकारांत आहे म्हणून यास सट्टक हें नांव पडलें असावें. राजशेखरविरचित् 'कर्पूरमंजरी' हें एक उदाहरण देण्यांत येतें.

नाटय-रासकः—नाट्य-रासक हें बहुतालल्यस्थिति-पूर्ण एकांकी नाटक आहे ( सा. द. ६. २७७ इ. ). यांत नायक उदात्त असून उपनायक पीठमर्द असतो. नायिका वासकसज्जा असते ( वासकसज्जा म्हणजे नटून थटून आपल्या प्रियकराच्या रंगमहालामध्यें वाट पहात बसणारी स्त्री ). मुख्य रस हास्य असून त्यांत शृंगार घुसडलेला असतो. निरनिराळ्या लास्यांगांचाहि यांत उपयोग केलेला असतो. संधींपैकीं मुख व निर्वहण अथवा मुख, गर्भ, विमर्श आणि निर्वहण यांची योजना करतात. यांपैकी साहित्यदर्पणकारानें 'नर्मवती' हें पहिल्या प्रकाराचें व 'विलासवती' हें दुसऱ्या प्रकारचें उदाहरण दिलें आहे. वास्तविक पाहिलें तर नाटयरासक हें आपणास मूकनाटय व मूकनृत्य असल्याचें दिसून येतें.

प्रस्थानः—प्रस्थान किंवा प्रस्थानक हें थंकी असतें ( सा. द. ६. २८० ). यांतील नायक व नायिका ह्या दासदासी असून यांत एक हलक्या जातीचा नायकहि असतो. यांत सर्व प्रकारचे ताल, छंद व विनोद असतात. भारती व कैशिकी या दोन वृत्तींचा उपयोग करण्यांत येतो. पुष्कळशा मद्यप्राशनामुळें नाटकांतील गुह्यांचा उलगडा करण्यांत येतो. शृंगारातिलक हें एक याप्रकारच्या नाटकाच्या प्रकाराचें उदाहरण म्हणून दिलेलें आहे.

याच प्रकारास टागोर नामक ग्रंथकारानें प्रकाशिका असें नांव दिलें आहे. दशरूपावरील अवलोकटीकाकारानें प्रस्थान हा एक प्रकारचा नृत्यभेद, असून त्यांत व भाणांत पुष्कळ साधर्म्य आहे असें म्हटलें आहे व तें त्याचें म्हणणें बरोबर आहे.

उल्लाप्यः—उल्लाप्य हाहि एक एकांकी नाटकाचा प्रकार आहे ( सा. द. ६. २८२ इ. ). यांतील संविधानक पुराणेतिहासांतून घेतलेलें असतें, नायक उदात्त असतो, शिल्पकाचीं निरनिराळीं अंगें यांत मधून मधून प्रविष्ट केलेलीं असतात. यांत हास्य, शृंगार व करुण हे रस असतात. उल्लाप्यांत युद्धें व अस्त्रगीतें यांची गर्दी असते. संविधानविषयक संभाषणें पडद्याच्या मागें होतात. कांहींच्या मतानें यांत चार नायक व तीन अंक असावे. 'देवीमहादेव' नांवाचें एक नाटक या प्रकाराचें उदाहरण म्हणून दिलेलें आहे.

काव्यः—काव्यांतहि एक अंक असून पुष्कळसा हास्यकारक प्रकार असतो ( सा. द. ६. २८४ वगैरे ). आरभटी वृत्ति वर्ज्य करण्यांत येते. निरनिराळ्या प्रकारचीं गीतें; उदाहरणार्थ खंडमात्रा, द्विपदिका व भग्नताल यांचा उपयोग करावा असें सांगितलें आहे. यांत एक सुंदर दिसणारी वेश्या प्रवेश करते, आणि पुष्कळशीं शृंगारिक भाषणें होतात. नायिका ही उदात्त स्वभावाची असून मुख, प्रतिमुख व निर्वहण या संधींचा उपयोग करितात. 'यादवाभ्युदय' नाटक हें या प्रकारचें उदाहरण दिलें आहे. दशरूपकावरील अवलोक टीकाकाराच्या मतानें काव्य हें एक प्रकारचें मूक नृत्य आहे आणि वास्तविक पाहूं गेलें तर काव्य म्हणजे गीत व नृत्य यांचें एक मिश्रण आहे असें दिसून येतें.

प्रेंखणः—प्रेंखणांतहि एकच अंक असतो ( सा. द. ६. २८६. ). यांत नायक हलक्या जातीचा असून सर्व नाटकभर युद्धें व क्रोधाचीं भाषणें असतात. यांत विष्कंभक व प्रवेशक मुळींच नसतो. यांत सूत्रधारहि नसतो. आणि नांदी व प्ररोचनाहि पडद्याच्या मागें म्हणतात. यांत सर्व वृत्तींचा समावेश होतो. वालीवध हें या नाटकाच्या प्रकाराचें उदाहरण आहे.

रासकः—रासकांतहि एकच अंक असतो ( सा. द. ६. २८८. ). यांत पांच नट असतात. यांतील नायक मूर्ख असतो, तो उदात्त स्वरूपांत प्रवेश करितो आणि म्हणून त्याची व इतरांची बढाई मारण्यांत स्पर्धा चालते. यांत वीथ्यंगांचा उपयोग करतात. भारती व आरभटी या वृत्तींचा उपयोग केला तरी चालतो. संधींपैकीं मुख व निर्वहण आणि कांहींच्या मतानें प्रतिमुख याचाहि उपयोग करतात. नांदी नेहमीं द्यर्थवाचक असते. भाषा व विभाषा यांचा मुख्यत्वेंकरून उपयोग करण्यांत येतो. याचें मेनकाहित म्हणून एक उदाहरण दिलें आहे. दशरूपावरील अवलोक टकिाकारानें रासकास एकप्रकारचें नृत्य म्हटलें आहे. व त्याच्या मतानें त्यांत व भाणांत पुष्कळ साम्य आहे. हा नाटकाचा प्रकार गीत व नृत्य मिळून झालेला असावा असें वाटतें.

संलापकः—संलापकांत एक, तीन अथवा चार अंक असतात ( सा. द. ६. २९१ इ. ). यांतील नायक सांप्रदायिक असतो. यांत एखाद्या नगराला वेढा, चोऱ्या व मारामाऱ्या व गोंधळ यांचा सुकाळ असतो. यांतील वृत्ति भारती व कैशिकी असते. शृंगार व करुणरस वर्ज करण्यांत येतात. ‘ मायाकपालिक ’ हें एक प्रकाराचें उदाहरण म्हणून दिलेलें आहे.

श्रीगदितः—श्रीगदितांत एक अंक असतो. यांतील संविधानक व नायक हे दोन्हीहि आख्यायिकेंतून घेतलेले असतात. आणि नायिका प्रसिद्ध असते. भारती वृत्ति. मुख प्रतिमुख यांचा निर्वहण संधि करावा. यास श्रीगदित हें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं त्यांत श्री शब्द वारंवार येतो,किंवा श्री म्हणजे लक्ष्मी गातांना व पाठ म्हणतांना दृष्टीस पडते. ‘ क्रीडारस ’ हें या प्रकाराचें उदाहरण म्हणून दिलेलें आहे. दशरूपावरील अवलोक टीकाकाराच्या मतानें श्रीगदित हें एकप्रकारचें मूकनृत्य असून त्याचा व भाणाचा निकट संबंध आहे. ‘ सुभद्राहरण ’ हें एकच कायतें श्रीगदित आहे.

शिल्पकः—शिल्पकांत चार अंक असतात व त्यांत सर्व वृत्तींचा उपयोग करण्यास मोकळीक असते. यांत शांत व हास्य हे दोन रस वर्ज्य असतात.नायक ब्राह्मण असतो व त्याशिवाय हलक्या जातीचा एक उपनायक असतो. यांत स्मशानादिकांचीं उदाहरणें आढळतात. याचीं सत्तावीस अंगें दिलेलीं आहेत. तीं येणेंप्रमाणें:–आशंसा, तर्क, संदेह, ताप, उद्वेग, प्रसक्ति, प्रयत्न, ग्रथन, उत्कंठा, अवहित्था, प्रतिपत्ति, विलास, आलस्य, बाष्प, हर्ष, आश्वास, अश्लील, मूढता, साधनानुगम, उच्छ्वास, विस्मयप्राप्ति,लाभ, विस्मृति, संफेट, वैशारद्य, प्रबोधन व चमत्कृति. ‘कनकावती माधव’ हें एक याचें उदाहरण दिलेलें आहे.

विलासिकाः—विलासिकेंत एक अंक असतो ( सा. द. ६. ३०१ इ. ). मुख, प्रतिमुख व निर्वहण हे संधी असतात. शृंगार हा प्रमुख रस असतो. आणि दहा लास्यांगांचा उपयोग करितात. या नाटकांत घडणारें कार्य फार अल्प असून इतर थाटमाट पुष्कळ असतो. यांतील नायक हलक्या जातीचा असतो. विदूषक, विट व पीठमर्द हे या नाटकांत भाग घेतात. कांहीं ग्रंथकार या प्रकारास लासिका म्हणतात तर कांहीं दुर्मल्लिका म्हणतात, याचें उदाहरण दिलेलें नाहीं.

दुर्मल्लिकाः—दुर्मल्लिकेला चार अंक असतात ( सा. द. ६. ३०३ इ. ) यांत गर्भ खेरीजकरून बाकीचे संधी येतात. कैशिकी व भारती या वृत्ती असतात. यांतील नायक हलक्या जातीचा असून सर्व प्रकारचे नागरिक दृष्टीस पडतात. पहिला अंक तीन नाडीपर्यंत चालतो. ( प्रत्येक नाडी चोवीस मिनिटें असते ) नंतर विट प्रवेश करितो. दुसऱ्या अंकांत विदूषकाचें काम असतें. तो पांच नाडीपर्यंत चालतो. तिसरा सहा नालींपर्यंत चालतो. नंतर पीठमर्द येतो आणि चवथ्या अंकांत सर्व नागरिकांचें काम असून तो दहा नालीपर्यंत चालतो. बिंदुमती हे या प्रकाराचें उदाहरण दिलेलें आहे.

प्रकरणिकाः—प्रकरणिका हें एक नाटिकेचेंच स्वरूप आहे ( सा. द. ६. ३०६ इ. ). यांतील नायक व नायिका सार्थवाह वर्गांतील असतात.

हल्लीशः—हल्लीशांत एक अंक, कैशिकीवृत्ति व पहिला व शेवटला असे संधी असतात यांत एक पुरुष आणि सात आठ किंवा दहा स्त्रिया असतात. याची भाषा उच्च असून यांत पुष्कळ गीत व नृत्य असतें. ‘ केलिरैवतक ’ नांवाचें नाटक हें एक याचें उदाहरण आहे.

भारतीय नाट्याचा उदय,भारतीय नाट्याची परंपराः- भरताचार्यांच्या नाट्यशास्त्रांत दिलेल्या भारतीय नाट्यपरंपरेंत भारतीय नाट्य हें प्रत्यक्ष ब्रह्मदेवापासून अवतीर्ण झालें आहे, असें म्हटलें आहे. जो क्रीडानियक होईल, म्हणजे ज्यांत कांहीं तरी श्रवणीय, तसेंच दर्शनीय होईल, किंवा जो पांचव्या वेदाप्रमाणें होऊन सर्व वर्णांतील लोकांस सारखाच उपयोगी पडेल, अशा तऱ्हेचा शास्त्रग्रंथ उत्पन्न करण्याविषयीं प्रथम सर्व देवांनीं ब्रह्मदेवाची प्रार्थना केली, तेव्हां ब्रह्मदेवानें ऋग्वेदांतील पाठ्यभाग, सामवेदांतील गीतभाग, यजुर्वेदांतील अभिनयभाग व अथर्ववेदांतील रसांचा भाग घेऊन एक मानवांच्याकरितां नवीन वेद उत्पन्न केला. व तो सर्वांस जाहीर करण्याकरितां व इंद्राच्या ध्वजमहोत्सवाच्या वेळीं त्यांतील शिकवणुकीप्रमाणें प्रयोग करण्यासाठीं भरताचार्यास विज्ञप्ति केली. या कारणानें असुर संतप्त झाले. त्यामुळें इंद्रानें आपला ध्वज घेऊन त्याच्या दांड्यानें असुरांस मार दिला. या कारणामुळें इंद्राच्या ध्वजास जर्जर असें म्हणतात व इंद्राचें आम्हांस अभयदान आहे, असें दाखविण्याकरितां तो प्रत्येक नाट्यप्रयोगाच्या जागीं उभारण्याचा प्रघात पडलेला आहे ( भ. १. ८ इत्यादि ).

भरताचार्यानें ज्याचा उल्लेख केला आहे, असें पहिलें नाटक म्हटलें म्हणजे ‘ समवकार अमृतमंथन ’ हें होय. तें हिमालयावर शिवासमोर करण्यांत आलें होतें. त्यानंतर

त्रिपुरदाह नांवाचें डिमप्रकाराचें नाटक झालें; याप्रसंगीं शिवानें आपल्या तांडवनृत्याचें प्रदर्शन केलें.

वर दिलेल्या आख्यायिकेवरून हरप्रसादशास्त्री यांनीं इंद्राच्या ध्वजारोपणाचा भारतीय नाट्याच्या उदयाशीं संबंध जोडला आहे. शिशिरऋतूच्या शेवटीं निसर्गदेवीच्या नवजीवनाचा निदर्शक म्हणून जो एक 'मेपोल' नांवाचा दंड पाश्चात्य उत्सवांत अरण्यांतून आणतात, त्याच्याशीं या इंद्राच्या ध्वजाचें बरेंच साम्य आहे, अशीहि त्यानीं कल्पना केली आहे. परंतु भारतवर्षांत तो महोत्सव शरदृऋतूच्या शेवटीं करण्यांत येतो आणि त्यांच्या मतानें हा काळाचा फेरबदल इंद्रानें असुरांवर म्हणजे मेघांवर विजय मिळविला हें दाखविण्याकरितां केलेला असावा. सदर उत्सवास निरनिराळ्या प्रकारच्या आनंदोत्सवाची जोड देण्यांत आली व त्यांचा पुढें भारतीय नाटकांत व नेपाळप्रांतीय ललितांत विकास झाला. पुढें तो असें म्हणतो कीं नेपाळ प्रदेशांत अद्यापपर्यंत या घोषयात्रा नांवाच्या उत्सवास बरेंच महत्त्व देण्यांत येतें व या प्रसंगीं लांब हात केलेल्या इंद्राचीं चित्रें दाखविण्यांत येतात. ध्वज मात्र दाखविण्यांत येत नाहीं.

नाट्य व वनस्पत्यधिष्ठित असुर देवताः— ए. बेरीडेल कीथ यानेंहि अलीकडे एक अशाच तऱ्हेची कल्पना बसविली आहे. त्यानें ज्यांत अगदीं प्रारंभींच्या एका नाटकाचा उल्लेख केला आहे, अशा महाभाष्यांतील एका उताऱ्यावर आपल्या कल्पनेची उभारणी केली आहे. कृष्णाचे अनुयायी रक्तवर्णाचे व कंसाचे अनुयायी कृष्ण वर्णाचे दाखवून व त्यांच्यांत युद्ध झालें अशी कल्पना करून शेवटीं कंसावर कृष्णानें विजय मिळविला असें दाखविलें आहे. कीथच्या मतानें हें युद्ध म्हणजे शिशिरऋतू व वसंतऋतू यांच्यांतील युद्ध होय. यांत शरदृऋतुरूपी असुरांस मारण्याकरितां जीं यज्ञकर्मे प्राचीनकाळीं करण्यांत येत होतीं, त्यांचा आधार घेतला आहे. ऋग्वेदकाळीं यज्ञकर्मे करण्याचा फारसा प्रघात नव्हता म्हणून भारतीय नाट्याचा त्यावेळीं का उदय झाला नाहीं याचा उलगडा होतो. "ब्राह्मणां"नंतर भारतीय नाट्य उदयास आलें, ही गोष्ट त्यांतील एकंदर प्राकृत परिभाषेवरून लक्षांत येण्यासारखी आहे.

नाट्य व पितृपूजा.—अलीकडील भारतीय नाट्याचा पुष्कळसा उपयोग करून व कीथनें उद्धृत केलेल्या महाभाष्यांतील उताऱ्याचाहि नीट विचार करून विल्यम रिजवे यानें भारतीय नाट्य हें मृतांच्या सन्मानार्थ जे प्रयोग प्राचीनकाळीं करण्यांत येत होते, त्यांतून उत्पन्न झालें असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यावरून कीथ व रिजवे यांच्यामध्यें अतिशय निकराचा वाद माजला. तथापि त्यांची भिस्त ज्या महाभाष्यांतील उताऱ्यावर होती, तो त्या दोघांसहि नीटपणें समजलेला दिसत नसल्यामुळें त्यांनीं दिलेल्या उपपत्तीकडे फारसें लक्ष देण्याचें आपणांस प्रयोजन नाहीं. त्यांचा उपयोग जितका मानववंश-शास्त्रकारांस आहे, तितका भारतीय पुराणवस्तुसंशोधनकारांस नाहीं.

भारतीय नाट्याला आधारभूत असलेला वेदाचा भाग.—ऋग्वेदांत अशा पुष्कळ ऋचा आहेत कीं ज्यांचा उपयोग यज्ञकर्मांत होत नव्हता व ज्या नेहमींच्या स्तुतिपाठस्वरूपाच्याहि नाहींत परंतु ज्यांत वीरश्रीच्या दंतकथा असून त्या संभाषणस्वरूपाच्या आहेत. या ऋचास आख्यानेतिहास अथवा संवादऋचा असें म्हणण्याचा प्रघात आहे. ह्या ऋचा म्हणजे प्राचीन कथास्वरूपी काव्याचे खंड होत असें लोक मानतात या ऋचांत गद्य व पद्य या दोहोंचें मिश्रण आहे. या ऋचांचा उदय इंडो-जर्मानिक काळांत झाला असें दाखविण्यांत आलें.

मॅक्समुल्लर व लेव्हि यांच्या मतानें सदर ऋचांत भारतीय नाट्याचे पहिले अंक दृष्टीस पडतात. पिशेल यांचेंहि तेंच मत असून भारतीय नाट्यांत दृष्टीस पडणारें गद्यपद्यांचें मिश्रण हें त्या प्राचीन वाङ्मयांतून आलेलें असावें असें तो म्हणतो. हर्टेल यानेंहि भारतीय नाट्याची उत्पत्ति ऋग्वेदाला जोडून दिली आहे. त्याच्या मतानें वैदिक ऋचा या नेहमीं गायिल्या जात होत्या आणि संभाषणस्वरूपाच्या ऋचा एका उद्गात्याकडून गायिल्या जाणें शक्य नाहीं. कारण एका गाणाऱ्याच्या आवाजानें दोन निरनिराळे आवाज उत्पन्न होणार नाहींत, यावरून तो असें म्हणतो कीं या संभाषणऋचा नाट्यप्रयोगाच्या दृष्टीनें रचलेल्या असाव्या आणि म्हणून हा संभाषणऋचासंग्रह म्हणजे जवळ जवळ नाटकग्रंथच होय. सदर संभाषणऋचासंग्रहांत व गीतगोविंदासारख्या ग्रंथांत त्याच्या दृष्टीनें बरेंच साम्य आहे. हर्टेलच्या मतानें नाटकांतील अंकविभागणीप्रमाणें कांहीं ऋचासंग्रहांत विभागणी दृष्टीस पडते व ज्याप्रमाणें पाश्चात्य नाट्यामध्यें 'मिस्टरी' नांवाचा प्रकार होता, तशा तऱ्हेचा प्रकार सुवर्णाध्यायांत दृष्टीस पडतो; हें वैदिककाळचें नाट्यस्वरूप कालांतरानें परिणत झालें व त्याचें मूळ स्वरूप लौकिक यात्रांतून अद्यापि दृष्टोत्पत्तीस येतें. या व इतर लौकिक नाटकांवरून वैदिक संभाषणांचा अभियुक्तकाळांतील नाटकांचा निकट संबंध आहे, असें लेव्हीप्रमाणें त्याचेंहि मत आहे.

एलव्हीश रॉडर याच्या दृष्टीला संवादऋचांमध्यें प्राचीन 'मिस्टरी' चोहोंकडे दृष्टीला पडतात आणि त्यावरून तो आपल्या ह्या कल्पनेची उभारणी व्यापक मानववंशशास्त्रीय पायावर करतो. त्याच्या मतानें सर्व देशांत गीत-नृत्य व नाट्य यांचा निकट संबंध असतो व म्हणून प्राचीन 'मिस्टरी' 'हि इंडो-जर्मनिक प्रागैतिहासिक काळांतहि असावी, असें त्यानें प्रतिपादिलें आहे. ऋग्वेदांत कांहीं देव नृत्य करणारे होते असें दाखविलें आहे. म्हणजे त्यांचे प्रतिनिधी जे ऋत्विज हे 'मिस्टरी' मध्यें नृत्य करीत होते, असा त्याचा अर्थ घ्यावयाचा. त्याच्या मतानें संवादस्वरूपाच्या ऋचा व कांहीं एकपात्री भाषणाच्या ऋचा ह्या

सर्व सांप्रदायिक नाटकांच्या स्वरूपाच्या आहेत. त्यांत व मेक्सिकन लोकांप्रमाणें अर्धवट रानटी स्थितींत असणाऱ्या मूळच्या रहिवाशांत प्रचलित असणाऱ्या नाटकांमध्यें बरेंच साम्य आहे. ज्याप्रमाणें मेक्सिको व ग्रीस या देशांत नाट्य कलेचा उदय व लिंगपूजेसंबंधीं नृत्यें यांचा निकट संबंध दिसून येतो, त्याप्रमाणें तो प्राचीन ऋचांमध्यें दिसून येत नाहीं याचें कारण असें असावें कीं सदर ऋचांचे गायक व लेखक यांची कामासक्त सुर व असुर यांच्यावर भक्ति नसावी. नाट्यकलेचा उदय व आख्यायिका यांची सांगड घालून देणारे गंधर्व व अप्सरा ह्या मूळच्या कामासक्त व शृंगारोन्मुख देवता होत्या असें तो म्हणतो. परंतु प्राचीन भारतीय सांप्रदायिक नाट्य ही नाट्यकलेंतील शेवटची पायरी असून सुरवातीची नव्हती. आधुनिक यात्रा ह्या जवळ जवळ कृष्ण म्हणजे विष्णूपूजेचीं व रुद्र म्हणजे शिवपूजेचीं रूपांतरें आहेत.

विंटरनिट्झ यानें मधला मार्ग स्वीकारला आहे. त्याच्या मतानें कांहीं संवादऋचांमध्यें प्राचीन कथारूपी आख्यानस्वरूपाचीं गीतें आहेत व इतरांत सांप्रदायिक नाटकें आहेत. त्याला ऋचांमध्येंहि नाटकें दृष्टीस पडतात. परंतु या नाट्यांकुरामध्यें व अभियुक्त काळांतील नाटकांमध्यें फार अंतर आहे. सरतेशेवटीं गेल्डनेर हा जरी प्रथम आख्यानोपपत्तीचा पुरस्कर्ता होता तरी सदर गीतें हे पोवाडे होते असें त्यानें ठरविलें आहे.

यावरून हीं गीतें नाट्यस्वरूपाचीं होतीं याविषयीं सर्वांचें ऐक्यमत नाहीं व खरें पाहूं गेलें तर तें सिद्ध करण्यास लागणारा पुरावाहि नाहीं. तद्विषयक सर्व विवेचन केवळ कल्पनेवर बसविलें आहे व त्याला समर्पक उत्तर म्हणजे असें आहे कीं, भारतीय नाट्यपरंपरेंत प्राचीनकाळीं अशीं सांप्रदायिक नाटकें मुळींच अस्तित्वांत नव्हतीं आणि शिवाय भारतीय नाट्याच्या उत्पत्तीचा उलगडा करण्यास त्या कल्पनेची जरूरीहि नाहीं.

**भारतीयांनीं आपली नाट्यकल्पना ग्रीक लोकांपासून घेतली आहे काय?**—भारतीयांनीं आपली नाट्यकल्पना ग्रीक लोकांपासून घेतली आहे, असें कांहीं संशोधकांनीं प्रतिपादन केलें आहे. हें मत प्रथम वेबरनें प्रतिपादन केलें. परंतु त्याच्या मतांत कालांतरानें फरक पडत जाऊन शेवटीं भारतीय नाट्यांतील कांहीं भाग ग्रीक नाट्यांतून घेतलेला आहे, असें म्हणण्यापर्यंत त्याची मजल आली. त्याच्यामागून इ. ब्रॅंडिज व इ. वुइंडिश यांनीं त्या मताचा पुरस्कार केला. इ० वुइंडिश यानें आपलें मत सविस्तर रीतीनें मांडलें आहे. त्यांत व्ही. स्मिथ यानेंहि फारसा बदल केलेला नाहीं. वुइंडिशच्या मताविरुद्ध ओरीएन्टॅलिस्ट कॉंग्रेसच्या परिषदेंत पिशेल व याकोबी यांनीं निकराचा वाद उपस्थित केला व विशेषेंकरून पिशेल यानें भारतीयांनीं आपल्या नाट्याची कल्पना ग्रीक लोकांपासून घेतली, या कल्पनेस जोराचा विरोध केला. त्यानंतर लेव्ही यानें वुइंडिशनें दिलेल्या प्रमाणांचें स्वतंत्र रीतीनें परीक्षण केलें व त्यांत त्यानें त्या सर्व प्रमाणांचा निराळा अर्थ करतां येणें शक्य आहे असें दाखविलें आहे.

वुइंडिश याच्या प्रतिपादनाची सारी भिस्त मृच्छकटिक नाटकावर होती. त्याच्या मतानें हें फार प्राचीन भारतीय नाटक आहे. वास्तविक पाहिलें तर ग्रीक शोकपूर्ण नाटकें व प्राचीन आनंदरसपूर्ण नाटकें यांचा तुलनेकरितां उपयोग करणें सर्वस्वी अशक्य आहे. मृच्छकटिक व अर्वाचीन ग्रीक पद्धतीचीं आनंदपूर्ण नाटकें यांत पुष्कळ सादृश्य आहे असें वुइंडिश यानें प्रतिपादन केलें आहे. या बाबतींत अलेक्झांडर यानें, पुष्कळसे कलावंत लोक आपल्याबरोबर हिंदुस्थानांत आणले होते व पुष्कळसे ग्रीक राजेहि हिंदुस्थानांत येऊन त्यांनीं एक ग्रीक पद्धतीचें नाटकगृहहि बांधलें होतें याचें त्यानें वाचकांस स्मरण दिलें आहे. परंतु भारतीयांनीं आपली नाट्यकला ग्रीक लोकांपासून घेतली हें जितकें संभवनीय आहे तितकेंच त्यांनीं अलेक्झँड्रियन लोकांपासून ती घेतली हें संभवनीय आहे. परंतु यांपैकीं कोणती गोष्ट खरी आहे हें निश्चयानें ठरवितां येत नाहीं. तथापि आपणांस भारतीय नाट्याच्या उत्पत्तीचा उलगडा करण्यास ती त्यांनीं ग्रीक लोकांपासून घेतली या कल्पनेशिवाय गत्यंतर नसतें; तर तसें करणें भाग पडतें. परंतु आपणांस तो उलगडा अन्य तऱ्हेनें करतां येतो.

नाटकाचे अंकरूपानें निरनिराळे भाग पाडणें, अंकाच्या शेवटीं सर्व नटांनीं रंगभूमीवरून अदृश्य होणें, अंकांची निरनिराळ्या प्रवेशांत विभागणी करणें, प्रकाश, जनांतिक, अपवार्य इत्यादि बोलण्याच्या प्रकारांनीं ओळख पटविण्यास निरनिराळ्या योजना करणें, ठराविक पद्धतीचीं पात्रें रंगविणें व प्रस्तावना इत्यादि घालणें हे मुद्दे, भारतीयांनीं आपली नाट्यकल्पना ग्रीक लोकांपासून घेतली हें सिद्ध करण्याकरितां जे पुढें करण्यांत आले आहेत, ते सर्व बाह्य स्वरूपाचे असून त्यांच्यांत विशेष अर्थ दिसत नाहीं.

वर सांगितलेल्या सर्व गोष्टी प्रत्येक नाटकांतून साहाजिकपणेंच असतात व त्या सर्व मुद्यांवर भारतीयांनीं आपली नाट्यकल्पना कोणापासूनहि घेतली नाहीं अशा तऱ्हेचें समर्थनहि करितां येईल.

शिवाय कथाभागाचा पूर्ण विकास, त्यांतील रहस्य गुप्त ठेवण्याची पद्धति, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे भारतीय नाटकांचें संपूर्ण स्वरूप ग्रीक नाटकांच्या स्वरूपापेक्षां अगदीं भिन्न आहे. खरोखर पाहिलें तर भारतीय नाट्यास फारच अल्प नाटकी स्वरूप असल्याचें दिसून येतें. त्यांत पात्रें रंगविण्याची कला फार अप्रगल्भ स्थितींत दिसून येते, कारण तीं पात्रें बहुतेक ठराविक साच्याचीं व नमुन्याचीं असतात. त्यांच्यांत व्यवहारांत दृष्टीस पडणारें चारित्र्य दृष्टीस पडत नाहीं. नाटकांत भाग घेणाऱ्या पात्रांच्या स्वभावांत वैचित्र्य दृष्टीस पडत

नाहीं, त्याचप्रमाणें त्यांच्यांतील विरोधहि उत्तरोत्तर उत्कर्षाप्रत पोंचविलेला दृष्टीस पडत नाहीं. नाटकांतील रहस्य पुष्कळवेळां बाहेरील यदृच्छेनें घडून येणाऱ्या गोष्टींवर अवलंबून राहिलेलें असतें. जसें एखादा शाप, चित्रमालिका, किंवा अव्यवस्थित रीतीनें मांडलेले वीरश्रीचे देखावे इत्यादि.

संस्कृत व प्राकृत या भाषांच्या मिश्रणानें भारतीय नाटयास प्राप्त झालेलें बाह्यस्वरूप हें ग्रीक नाटयाशीं अगदीं विसंगत आहे. विदेशी वाङ्मयांतून घेतलेल्या प्रकारांत संस्कृत भाषेचा उपयोग कां करण्यांत यावा याचाहि समाधानकारक रीतीनें उलगडा करतां येणार नाहीं.

याशिवाय तोंडास मुखवटे लावून केलेलीं नाटकें व शोकपर्यवसायी नाटकें यांचा भारतीय नाटयांत अत्यंताभाव दृष्टीस पडतो आणि सरतेशेवटीं भारतीय नाटय हें ग्रीक नाटयावरून घेतलें आहे, ही कल्पना ज्या मृच्छकटिक नाटकावरून बसविण्यांत आली आहे तें नाटक सर्व भारतीय नाटकांत अत्यंत प्राचीन असल्याबद्दलचें मत चुकीचें ठरलें आहे. मृच्छकटिक नाटकाच्या पुष्कळ पूर्वी भारतीय नाटयास पुष्कळ व्यवस्थित स्वरूप प्राप्त झालें होतें असें आपणांस आतां कळतें व अत्यंत प्राचीन नाटकें जीं आपणांस हल्लीं उपलब्ध झालीं आहेत त्यांचें स्वरूप ग्रीक नाटकांच्या स्वरूपाहून अगदीं भिन्न व विसदृश असें आहे.

यावरून हार्मन रीच याचेंहि मत आम्हांस ग्राह्य वाटत नाहीं. त्याच्या मतानें भारतीय नाटय हें अभियुक्तकालांतील मूकनाटयासारखें असून आनंदपूर्ण नाटकांप्रमाणें नाहीं व याला प्रमाण म्हणून तो मृच्छकटिक नाटकाचें उदाहरण देतो. एरवीं त्याचें मत पूर्वीच्या संशोधकांच्या मतापेक्षां अधिक विचारणीय आहे. भारतीय नाटयांतील जवनिका व मूकनाटयाच्या काळांत उपयोगांत असलेला 'सिपरीयम' नांवाचा पडदा यांत पुष्कळ साम्य आहे ही गोष्ट नाकबूल करतां यावयाची नाहीं. परंतु, प्रथम 'सिपरीयम' पडदा ग्रीक नाटकाच्या काळांत उपयोगांत होता कीं नाहीं हें आपणांस निश्चयानें माहीत नाहीं व दुसऱ्या सर्व नाटकांस व रंगभूमीस ग्रीक नांव देण्याऐवजीं फक्त पडद्यासच तें नांव कां देण्यांत येतें हें समजणें कठिण आहे. अभियुक्तकालांतील मूकनाटय व भारतीय नाटय या दोहोंतहि तोंडाला मुखवटे लावण्याचे प्रकार व शोकपर्यवसायी नाटकें नव्हतीं, दोहोंतहि नटांची संख्या बरीच होती, दोहोंसहि पार्श्वपट रंगविणें माहीत नव्हतें, दोहोंतहि विविध भाषांचा उपयोग करण्यांत येत होता, आणि दोहोंच्यांहि ठराविक पात्रांत सादृश्य दिसून येतें, असें मत रीच यानें दिलें आहे. तथापि ज्यावेळीं ग्रीक नाटयांतून भारतीयांनीं आपली नाटयकला घेतली असावी असें म्हणतां येणार नाहीं, त्या काळींहि भारतीय नाटयांत मूकनाटकांची पद्धत परिणत झाली होती असें आम्हांस अनेक प्रमाणांवरून सिद्ध करून देतां येईल. आणि भारतीय नाटयांतील मुख्य प्रकार जो नाटक त्यांत व ग्रीक नाटय यांत कांहीं साम्य नाहीं.

रीच व तत्पूर्वीचे संशोधक यांची मोठी चूक ही आहे कीं, त्यांनीं भारतीय नाटयांतील प्राचीन नाटयांचा नीट विचार केला नाहीं. व भारतीय नाटय हें कसें उदयास आलें, हें जर स्वयंसिद्ध प्रमाणांनीं सिद्ध करतां येण्यासारखें नसतें, तर मात्र तें विदेशी नाटयावरून रचलें असावें असें म्हणण्यास जागा होती. परंतु तें तसें रचलें नसावें हें त्याच्या पूर्वपरंपरेवरून सिद्ध करून दाखविण्यासारखें आहे.

सीताबेंगी लेण्यांत असलेल्या भारत नाटकगृहांतील व्यवस्था व ग्रीक नाटकगृहाची रचना यांत पुष्कळसें साम्य होतें, असें दाखवून भारतीयांनीं आपली नाट्यकला ग्रीक लोकांपासून घेतली असें ब्लॉक साहेबांनीं दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु पिशेल व हिलेब्रँट यांच्या मतानें सदरहू भारतीय नाटकगृह व ग्रीक नाटकगृह यांच्यांत फारच थोडें साम्य आहे. शेवटीं भारतीय नाट्यशास्त्रांत ॲरिस्टॉटलच्या विचारसरणीची बरीच छटा दिसून येते, असें लिंडेनॉ यानें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु त्यानें दिलेलीं प्रमाणें याकोबीप्रमाणेंच आम्हांसहि ग्राह्य वाटत नाहींत.

**प्राचीन काळांतील नाटकांचे अवशेष.—** अभियुक्तयुगाच्या पूर्वी सर्वांगपरिपूर्ण नाटक होतें याविषयीं जरी आम्हांस निश्चयानें कांहीं म्हणतां येत नाहीं तरी पूर्वीच्या आचारपद्धतींत कांहीं नाटकांचे अवशेष दृष्टीस पडतात. सोमविक्रीचें व्यापार हे अशा प्रकारच्या अवशेषांपैकीं आहेत. यांत सोम विकत घेणारा ब्राह्मण असून सोम विकणारा शुद्र असतो, तदनंतर त्यांच्यांत एक तंटा उत्पन्न होतो, तदनंतर सोम विकणारानें सोम देण्याचें नाकारलें तर सोम विकत घेणारा मनुष्य सोम घेऊन पळून जातो. याउप्पर सोम विकणारानें जर तक्रार केली, तर तो त्यास लांकडाच्या दांड्यांनीं व चामड्याच्या पट्ट्यांनीं मार देतो.

महाव्रत उत्सवामध्यें देखील एक ब्राह्मण व दुसरा शूद्र यांच्यामध्यें एका वाटोळ्या कातड्याच्या तुकड्यासंबंधानें तंटा जुंपतो. त्यांत ब्राह्मणाचा जय होतो, व शूद्रास मार बसून त्यास हांकलून देण्यांत येतें. तदनंतर एक हलकट मुलगी व ब्रह्मचारी यांच्यांत शिवीगाळी होते. यावरून हिलेब्रँट याचें असें मत आहे कीं हा सर्व उत्सव जुन्या लौकिक उत्सवाच्या स्वरूपाचा आहे.

हे उत्सव म्हणजे प्राचीन भारतीय नाटयाचे अवशेष होत असें हिलेब्रँटप्रमाणें आमचें मत आहे. हिलेब्रँटच्या मतानें वर जो सोमविक्रीचा प्रकार दिला आहे त्यांतील सोम विकत घेणें म्हणजे गंधर्वापासून सोम विकत घेणें व ज्यास मार देऊन हांकलून देण्यांत आलें, तो आपल्याइकडील वाङ्मयांतील डेव्हिल, म्हणजे प्रत्यक्ष राक्षस असतो. तथापि आमच्या मतानें या उत्सवावरून प्राचीन लौकिक नाटकांचा बोध होत नाहीं. तसेंच हलकट

मुलगी व ब्रम्हचारी यांचें लाथाळें जें वर सांगण्यांत आलें त्यांत व पाश्चात्य नाटकांतील दासी व विदूषक यांच्यांतील भांडणांत बरेंच साम्य दिसून येतें.

यावरून अर्धवट नाटकी देखावे व संभाषणें, गालिप्रदानाचीं भाषणें व एकमेकांस ठोसे लगावणें इत्यादि प्रकार प्राचीन काळीं लौकिक भारतवर्षांत मनोरंजनाचे होते, असें आपणांस कबूल करावें लागतें. परंतु त्याचें मुख्य स्वरूप नृत्य, गीत व वादन होतें असें दिसून येते.

कौषीतकी ब्राह्मण ( २९.५ ) यांत शिल्प म्हणजे नृत्य, गीत व वादित असें म्हटलें आहे. स्नातक हा वरील तीन वर्गांतलि असतो. त्यानें समावर्तन प्रसंगीं स्नान केल्यानंतर त्याची उमेदवारी संपते. पारस्कर ( गृह्य. २.७,३ ) या सूत्रांत स्नातकानें नृत्य, गीत व वादित यांचा अभ्यास करूं नये असें म्हटलें आहे. फार झालें तर त्यानें गीतांचा अभ्यास करावा. यावरून या कला त्यावेळीं हलक्या समजल्या जात होत्या असें दिसतें.

प्राचीन काळीं नृत्य फार लोकप्रिय होतें असें वर सांगितलें आहे. शतपथ ब्राह्मणांत ( ३.२,४ व ६ ) नाचणारा व गाणारा पुरुष स्त्रियांनां फार आवडत असे असें सांगितलें आहे. परंतु प्राचीन ग्रंथांतून स्त्रियांनां गायक आवडत असत अशा तऱ्हेचा उल्लेख केलेला आहे.

नर्तन, गायन व वादन हीं नाट्यकलेचीं मुख्य अंगें होत. यावरून नाट्य हें सदर कलेंतूनच परिणत झालें असावें असें दिसतें. नट, नाटक आणि नाट्य हे तीन्ही शब्द नृत् म्हणजे नाचणें या धातूपासून निघाले आहेत ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. नाट्य हें नृत्याचें विकसित स्वरूप आहे असें प्रॉसचें मत आहे. द्वंद्वगीताला अभिनयाची जोड मिळाली म्हणजे त्याचेंच नाट्यांत रूपांतर होतें. त्याचप्रमाणें मूकनृत्यालाहि भाषणाची जोड मिळाली म्हणजे त्याचेंहि नाट्यांत रूपांतर होतें.

नाटकांतील परिभाषाहि आर्य संस्कृतीची जी श्रेष्ठ भाषा संस्कृत त्यांतून घेतलेली नसते. परंतु ती लौकिक भाषेंतून घेतली असते ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. त्याचबरोबर स्नातकानें नृत्य, गीत व वादित यांचा अभ्यास करूं नये असा जो वर पारस्कराचा अभिप्राय दिलेला आहे, त्यावरून ह्या तीन्ही कला लौकिक स्वरूपाच्या असून त्यांचा सामान्य लोकच फक्त अभ्यास करीत होते असें अनुमान निघतें. ह्या कला यज्ञाच्या वेळीं व धार्मिकोत्सवप्रसंगीं उपयोगांत आणीत असत असें दिसून येतें. कात्यायनश्रौतसूत्र ( २१.३ ११ ) यांत पितृमेधांत या कलांचा उपयोग करावा असें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें अतिरात्र व सात्रायण या यज्ञांच्या प्रसंगींहि नर्तन करण्याचा प्रघात होता. यज्ञकर्माच्या वेळीं या सामान्य कलावंत लोकांची मदत घ्यावी लागत असे. त्यावरून त्यांच्या कलांनां व्यवस्थित स्वरूप देणारी ग्रंथरचना उत्पन्न होणें जरूरीचें झालें, आणि अशा रीतीनें नटसूत्रें निर्माण झालीं.

आपणांस नटांच्या कलेसंबंधीं जी माहिती उपलब्ध आहे तीवरून त्यांत मुख्यत्वेंकरून नृत्य, गीत व वादन यांचा अंतर्भाव होतो ही गोष्ट सिद्ध होते. हे नट लोक उत्सवप्रसंगीं हजर असत. सदरहू उत्सवांस पालीमध्यें समज्जा व संस्कृतांत समाज असें म्हणण्याचा परिपाठ होता. त्याप्रसंगीं नाचणें, गाणें, वाजवणें इत्यादि सर्व प्रकार व दांडपट्टा-कुस्त्या, सर्व प्रकारचे जादूचे खेळ व क्वचित्प्रसंगीं कोंबड्यांच्या व इतर प्राण्यांच्या झुंजी वगैरे सर्व प्रकार होत होते. असल्या उत्सवप्रसंगीं स्नातकांनीं व बुद्ध भिक्षूंनीं जाऊं नये असे नियम केलेले दृष्टीस पडतात. यावरून हे उत्सव किती लोकप्रिय असत व किती प्राचीन काळापासून चालत आलेले होते हें सिद्ध होतें. कधीं कधीं हे उत्सव उंच डोंगरावर करण्याचा प्रघात होता आणि वर सांगितलेलें सीताबेंगी लेंणें हें कदाचित् असल्या उत्सवाची जागा असावी अथवा सदरहू लेंणें हें दुसऱ्या एखाद्या प्रकारच्या सार्वजनिक करमणुकीचें ठिकाण असण्याचा संभव आहे.

नट लोक हे असल्या प्रसंगीं कांहीं घडलेल्या प्रसंगांचीं वर्णनात्मक कवनें करून तीं म्हणून दाखवीत असत असें दिसून येतें. कधीं कधीं तर ते कमालीची बहार करीत. ह्या एकंदर सर्व प्रकारावरून, जरी आपणांस या उत्सवप्रसंगाच्या जलशांची पूर्ण माहिती नाहीं तरी ते खरोखरीच्या नाटकांचे प्रकार होते यांत बिलकुल शंका नाहीं.

अर्वाचीन लोकप्रिय नाटकांवरूनहि आपणांस कांहीं अनुमानें काढतां येण्यासारखीं आहेत. सतराव्या शतकांतील नेपाळी नाटकांवरून नाटकांत नृत्य, गीत व वादन यांचा केवढा भाग असतो हें दिसून येतें. त्याचप्रमाणें यात्राप्रसंगीं होणाऱ्या नाटकांत सफाईदार वाङ्मय, देवादिकांच्या इतिहासाची चर्चा व विशेषेंकरून कृष्णविषयक आख्यायिकांची मीमांसा या सर्व गोष्टी दिसून येतात. आलमोरा येथील लोकप्रिय नाटकावरून आपणांस अधिक माहिती उपलब्ध होते. त्या ठिकाणीं होलिका-पूजनाच्या वेळीं ढ्वारा नारक असुर-स्त्रीला संतुष्ट करण्याकरितां नवीन नाटकें करण्याचा प्रघात आहे. त्यांत निरनिराळ्या चालीरीतींची व विशेषेंकरून इंग्रजांच्या चालीरीतींची थट्टा करण्याचा मुख्य भाग असतो.

हिलेब्रँट यानें निरनिराळ्या प्रमाणांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, अगदीं मूळच्या भारतीय नाटकांतहि पुढील प्रकार असावेत—सूत्रधार व नटी यांचें संभाषण, निरनिराळ्या भाषांचा उपयोग, गद्यपद्यांचें मिश्रण, वादन व नृत्य यांचा संयोग, रंगभूमीचा साधेपणा व विदूषकाचें पात्र. रीच यानेंहि आपलें मत प्रस्थापित करण्याकरितां हींच प्रमाणें पुढें मांडलीं आहेत. परंतु भारतीय नाट्याचीं जीं हीं वर लक्षणें सांगितलीं आहेत, तीं इतकीं प्राचीन आहेत कीं त्यावरून ही कला

भारतीयांनीं ग्रीक लोकांपासून घेतली हें असंभवनीय आहे.

प्राचीन लौकिक नाटकांमध्यें भारतीय नाट्याचें मूळ सांपडतें हें हिलेब्रँटचें मत आम्हांस ग्राह्य वाटतें. परंतु यथासांग व संपूर्ण नाटकें बराच काळपर्यंत उत्पन्न झालीं नव्हतीं आणि अभियुक्तकाळांतील भारतीय नाटकांस इतर अनेक आनुषंगिक गोष्टी कारणीभूत झाल्या असाव्या असें दिसून येतें.

म हा का व्य प ठ ण.—वेदकाळींहि पुराणकथा व गीतें हीं पाठ म्हणून दाखविण्याचा परिपाठ होता. हे पाठ अश्वमेधादि श्रौतकर्मांत म्हणण्यांत येत असत. ऋग्वेदीय होता व यजुर्वेदीय अध्वर्यु यांचेंहि मधून मधून संभाषण चालत असे, ही पद्धत हिंदुस्थानांत अद्यापपर्यंत चालू आहे. शेंकडों श्रोत्यांच्या पुढें महाकाव्य–कथांचें वाचन व पठण हा अद्यापहि येथें महत्त्वाचा भाग आहे. प्राचीन काळींहि या महाकाव्य–कथा नाटकस्वरूपांत दाखविण्यांत येत होत्या, असें आपणांस महाभाष्यांतील एका उताऱ्यावरून ( पाणिनी ३.१-२६ ) दिसून येतें. कंसवधाची कथा व बलीबंधनाची कथा या कांहीं शौभिक स्वतः करीत असत, व कांहीं ग्रंथिक करीत असत. ते आपले निरनिराळे मेळे करीत, व आपलीं तोंडें विविध रीतींनीं रंगवीत असत. आजपर्यंत भारतीय नाट्याच्या उदयाची चर्चा करतांना वरील महाभाष्यांतलि उताऱ्याला बरेंच प्राधान्य देण्यांत येत होतें आणि या महाभाष्याच्या उताऱ्यांत कृष्णपूजाविषयक भारतीय नाट्याचा प्रथमच उल्लेख करण्यांत आला आहे, असें समजण्यांत येत होतें. परंतु आतां ल्यूडर्स यानें वरील उताऱ्याचें वेबरनें केलेलें भाषांतर चुकीचें आहे, असें दाखविल्यापासून वरील सर्व अनुमानें ढासळून पडलीं आहेत. 'कंसं घातयति' या वाक्यांत तो कंसाला मारवितो किंवा पतंजलीप्रमाणें कंसाच्या वधाचें कथन करतो आणि 'बलिं घातयति' या वाक्यांत तो बलीला बांधवितो, किंवा बलीच्या बंधनाचें कथन करतो, या दोन्ही अर्थीहि वर्तमानकाळाचा उपयोग करतां येण्यासारखा आहे. म्हणजे शौभिकांनीं व ग्रंथिकांनीं प्रत्यक्ष नाटकें करून त्यांत कंसाचा वध केला असला व बलीचें बंधन केलें असलें तरीहि वर्तमानकाळाचा उपयोग करतां येण्यासारखा आहे व तशीं नाटकें न होतांनाहि भूतकालीन कंसवध व बलिबंधन यांचें केवळ निरूपण करतांनाहि वर्तमानकाळाचा उपयोग करतां येण्यासारखा आहे. वर शौभिक व ग्रंथिक हे आपलीं तोंडें विविध रीतींनीं रंगवीत असत असें जें सांगितलें आहे, त्याचा अर्थ इतकाच कीं, कंसवध व बलिबंधन या कथा ऐकणारांमध्यें कांहीं कंसाचा पक्ष धरीत तर कांहीं वसुदेवाचा पक्ष धरीत आणि पक्षाभिमानानें त्यांचे मनोविकार जेव्हां प्रक्षुब्ध होत तेव्हां त्यांच्या चेहऱ्याचें मान पालटत असे. आम्हांस ल्युडर्स यानें केलेला अर्थ अधिक ग्राह्य वाटतो आणि त्यामुळें पतंजलीच्या वेळीं नाट्याचा उदय झाला होता असें निश्चयानें म्हणवत नाहीं.

महाकाव्य–कथांचें वाचन किंवा पठण चालतेवेळीं चित्रें दाखविणें किंवा शौभिकांनीं कांहींतरी चमत्कार करून दाखविणें हे प्रकार होत होते. ते चमत्कार म्हणजे मूकनाट्याचे व छायाचित्रप्रदर्शनांचे प्रकार असावेत असें ल्युडर्सप्रमाणें आमचेंहि मत आहे. ज्याअर्थीं शौभिक हे जादूगार व हातचलाखीचीं कामें करणारें होते, असें त्याचें मत होतें, त्याअर्थीं वरील चमत्कारांचे प्रकार म्हणजे छायाचित्रप्रदर्शनाचे प्रकार होते असें म्हणणें अधिक सयुक्तिक दिसतें. भरतानेंहि हातचलाखीचे खेळ व छायाचित्र वगैरेंचा उल्लेख केला आहे. अद्भुतदर्पण नामक नाटकाच्या सात व आठ अंकांत एक उपनाटक प्रविष्ट केलें असून त्यास मायानाटिका ही संज्ञा दिली आहे.

छा या ना ट कें.—छायानाटकें ख्रिस्ती शकापूर्वी दुसऱ्या शतकांत होत असत, याविषयीं आतां शंका उरलेली नाहीं. छायानाटकांचा महाभारतांत व थेरीगाथांतहि उल्लेख केलेला आढळतो असें पिशेलचें म्हणणें आहे. हिलेब्रँटच्या मतानें थेरीगाथांमध्यें असलेले प्रकार विदूषकी स्वरूपाचे होते. पिशेल व हिलेब्रँट यांच्या मतांत कांहीं फरक होता असें आम्हांस ल्यूडर्सप्रमाणेंच वाटत नाहीं. शिवाय अशोकाच्या चवथ्या शिलाशासनांत ज्या रूपांचा उल्लेख केला आहे त्या रूपांत देवांचे रथ, हत्ती, अग्नीनें केलेली नासधूस इत्यादि प्रकारांचीं वर्णनें आहेत. यावरूनहि त्याकाळीं छायानाटकें अस्तित्वांत होतीं असें दिसून येतें. सीताबेंगी लेण्यामध्यें नाटकें करण्याची जागा होती असें जें पूर्वी आम्हीं सांगितलें आहे त्या त्या लेण्यांतील प्रवेशद्वाराजवळ जीं भोंकें आहेत, त्यांचा उपयोग छायानाटकांतील पडदे अडकविण्याकडे होत असावा असें वाटतें. शिवाय 'नेपथ्य' शालेच्यापुढें पडदा लावण्याची चालहि कदाचित् छायानाटकांपासून घेतली असावी असें वाटतें. वेबर आणि लेव्हि यांच्या मतानें 'नेपथ्य' हा शब्दहि प्राकृत असून 'नैपथ्य' या संस्कृत शब्दापासून निघालेला आहे, व त्याचें मूळ स्वरूप 'निपथ' (उतरता रस्ता) असें असावें व 'निपथ' हेंहि प्राकृत 'नेवच्छा' या शब्दाचें चुकीचें संस्कृत स्वरूप असावें. 'नेवच्छा' हा प्राकृत शब्दहि 'नैपक्य' किंवा 'नैपाक्य' या शब्दांतून निघाला असण्याचा संभव आहे. व 'नेपठ्य' किंवा 'नैपाठ्य' हे शब्दहि 'निपठ' अथवा 'निपाठ' या शब्दांतून निघाले असावेत ( पाणिनि ३.३,६४ ). म्हणजे नेपथ्य या शब्दाचा अर्थ वाचकाची अथवा पाठकाची जागा असा होतो. नाटकास लावलेला रूपक शब्द यांचा रूपाशीं संबंध असून तो प्रथम छायानाटकास लावीत असत असें जें पिशेलचें म्हणणें आहे, तें आम्हांस बरोबर दिसतें.

क ळ सू त्री बा हु ल्यां चे खे ळ.—छायानाटकांप्रमाणेंच हिंदुस्थानांत फार प्राचीन काळींहि कळसूत्री बाहुल्यांचे खेळ प्रचलित होते असें दिसतें 'कळसूत्री बाहुल्या' [विभाग १० पहा]. कै. शंकर पाडुरंग पंडित यांनीं सूत्रधार या शब्दावरून

असें अनुमान काढलें आहे कीं, बाहुल्या व कागदांच्या केलेल्या आकृती यांचे खेळ हे नटवर्गानें केलेल्या नाटकाच्या अगोदर केलेले असावेत. पिशेलनें या विषयाचें सविस्तर विवेचन एका स्वतंत्र निबंधांत केलें आहे. आणि त्यांत त्यानें सूत्रधार व स्थापक हे दोन्हीहि शब्द कळसूत्री बाहुल्यांच्या पद्धतीपासून प्रचारांत आले असावे असें म्हटलें आहे.

फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत कळसूत्री बाहुल्यांचे खेळ प्रचलित होते, आणि ते खेळ दाखविण्याकरितां एक स्वतंत्र नाटकगृह महाभारतकालींहि असावें असें पिशेलचें मत आहे. या कळसूत्री बाहुल्यांच्या खेळांत विदूषकाचें पात्र हटकून असावयाचें असेंहि पिशेलचें म्हणणें आहे. परंतु आमच्या मतानें तें पात्र मूक नाट्यपद्धतीपासून नाटकांत आलें असावें. पिशेलनें विदूषकाचें व हान्सवर्स्ट ( वफून = विनोदी ) आणि अशा इतर यूरोपियन पात्रांचें कितीहि सादृश्य दाखविलें तरी त्यानें आमच्या म्हणण्यास बाध येत नाहीं. कळसूत्री बाहुल्यांच्या मदतीनें नाटक करून दाखविण्याची पद्धत हिंदुस्थानांत फार प्राचीन काळींहि प्रचलित होती, इतकेंच नव्हे तर याचा मूळ उदयहि हिंदुस्थानांत झाला, असें पिशेलचें म्हणणें आहे. परंतु आपणांस इतकें खोलांत जाण्याचें कारण नाहीं. कारण भारतीय नाट्याचा उदय कसा झाला याविषयीं त्याचें फारसें महत्त्व नाहीं. तथापि कळसूत्री बाहुल्यांची पद्धत हिंदुस्थानांत फार प्राचीन काळीं प्रचलित होती हें पिशेलचें मत पुष्कळ लोकांस पसंत पडलें आहे.

हिलेब्रँटचें मत कळसूत्री बाहुल्यांचीं नाटकें व छायानाटकें यांच्यापूर्वी नटकृत नाटकें असावी असें आहे. ज्याप्रमाणें नाटकें मानवी चरित्राचें अनुकरण करून रचलेलीं असतात, त्याचप्रमाणें कळसूत्री बाहुल्यांचे खेळ हे नाटकांचें कांहीं अल्प प्रमाणांत अनुकरण करून बसविलेले असतात, व त्याचप्रमाणें छायानाटकेंहि नाटकांच्या नमुन्यावरच तयार करण्यांत येतात, असें त्याचें म्हणणें आहे. परंतु जावा बेटांत ' वयंगटोपेंग ' व ' वयंगवोंग ' हीं नाटकें छायानाटकांनंतर प्रचारांत आलीं, असें दाखवून ल्युडर्स यानें हिलेब्रँटच्या विरुद्ध मत प्रतिपादन केलें आहे. कळसूत्री बाहुल्यांचे खेळ हे कळसूत्री बाहुल्यांशीं खेळतांना पाहून रचण्यांत आले असावेत. बाहुल्यांशीं खेळणें हें आपणांस प्रत्यक्ष व्यवहारांत पहावयास सांपडतें, त्यास नाटकें पहाण्याची जरूरी नाहीं; या म्हणण्याची सत्यता आपणांस लहान मुलांच्या खेळाकडे पाहून कळून येईल. या बाहुलीस पुत्रिका, पुतली, पुत्तलिका, दुहितृका इत्यादि जे अनेक शब्द आहेत व ज्या सर्वांचा लहान मुलगी असा अर्थ होतो, त्यावरून वरील म्हणण्याची सत्यता सहज दिसून येते.

अ भि यु क्त का लां ती ल ना ट कां चा उ द य.—या काळापूर्वी नाटकांचे अवशेष व कांहीं मोडकीं तोडकीं नाटकें अस्तित्वांत होतीं. म्हणून अभियुक्तयुगांतील नाटकांचा प्रकार व कळसूत्री बाहुल्यांच्या खेळांचा प्रकार या दोहोंचें मिश्रण केल्यावर व बाहुल्यांच्या जागीं नटांची योजना केली गेल्यावर नाटकांची उत्पत्ति होण्यास फारसा अवधि लागला नाहीं.

याप्रमाणें या दोन उद्गमस्थानांतून नाटकाचा उदय झाल्याबद्दलचीं चिन्हें त्यांत दिसून येतात. उदाहरणार्थ, विदूषक हें पात्र मूकनाट्यांतून घेतलें आहे. त्यामुळें जीं नाटकें पौराणिक कथाभागांवर रचलेलीं असतात, त्यांत त्या पात्राला कायमचें स्थान नाहीं; त्याचप्रमाणें भासाच्या चारुदत्त नाटकाच्या पायावर रचलेलें जें मृच्छकटिक-प्रकरण त्यांत नांदीमध्यें सूत्रधार हा संस्कृतांत न बोलतां प्राकृतांत बोलतो. जीं नाटकें पौराणिक कथाभागावर रचलेलीं आहेत, त्यांतील साधारण घरगुती प्रसंगांतहि संस्कृत भाषेचा उपयोग केलेला आढळतो.

भारतीय नाटकें हीं मुख्यत्वेंकरून दैवी उत्सवांच्या वेळीं करण्यांत येत होतीं व त्यांचा आणि महानट व महानर्तक जो शिव याचा निकट संबंध असे.

अशा रीतीनें जरी नाट्यकलेचा उदय झाला तरी जर प्रतिभासंपन्न कवींनीं तो विषय हातीं घेऊन त्यांत स्वतंत्र ग्रंथरचना केली नसती तर त्या कलेस जें आतां महत्त्वाचें स्थान मिळालें आहे तें मिळालें नसतें.

भा र ती य ना ट्य क ले च्या उ द या चा का ळ व ति ची ज न्म भू मि.—भारतीय नाट्यकलेचा विकास फार प्राचीनकाळीं झाला, अशाविषयींची कांहीं माहिती उपलब्ध नाहीं. ज्या महाभारताच्या उताऱ्यांत अशाच तऱ्हेच्या नाटकांचा निर्देश केलेला आहे, तो उतारा मागाहून प्रक्षिप्त केलेला असून मल्याळम्-हस्तलिखित प्रतींत सांपडत नाहीं. त्या ठिकाणीं मूकनाट्याचाहि निर्देश केलेला आढळत नाहीं. परंतु नृत्याचे प्रयोग होत असल्याबद्दल वारंवार सांगितलें आहे. या वीररसपूर्ण महाकाव्याच्या वेळीं नाटकें करण्याची चाल होती, असें हिलेब्रँटचें मत आहे तें खरें आहे. तथापि त्यानें सांगितलेला नट—जो अनेकांचीं रूपें धारण करीत असे तो—केवळ नकला करणारा होता, किंवा खरोखरीचा नट होता, हें निश्चयानें ठरवितां येण्यासारखें नाहीं. खरोखरीची नाट्यकला फार प्राचीनकाळीं अस्तित्वांत होती ही गोष्ट हरिवंशांत नाटकांचा उल्लेख केलेला आहे यावरून सिद्ध होण्यासारखी नाहीं, कारण त्या ग्रंथाचा रचनाकाल अलीकडचा आहे.

रामायणांत नाटकांचे उल्लेख आलेले आहेत, त्यावरूनहि वरील अनुमानास फारशी बळकटी येणार नाहीं, कारण त्यांत उल्लेखिलेलीं नाटकें हीं खरोखरींचीं नाटकें होतीं कीं नाहीं हें ठरवितां येत नाहीं. वास्तविक तीं तशीं असणें संभवनीय नाहीं. पाली विधिविषयक ग्रंथांत ज्यांचा उल्लेख केलेला आहे, अशा 'विसूक दस्सन' व 'पेक्ख' या पदांवरूनहि कांहीं उलगडा होत नाहीं.

वरील पदें नाटकांसंबंधानें उपयोजिलीं आहेत, असें खात्रीलायक समजलें तरच त्या पदांवरून कांहीं अनुमान काढतां येईल. परंतु तशी माहिती उपलब्ध नाहीं. प्राचीन नाट्यकलेवरून ते खरोखरीचे नट होते, अशाविषयीं आपणांस कांहीं तर्क करतां येत नाहीं. कारण नाटक शब्दाचा विविध रीतीनें उपयोग करीत असत हें आपणांस मागील विवेचनावरून समजलेंच आहे. 'विलूक दस्सन' याचा तर कांहींच अर्थ कळत नाहीं, व 'पेख्ख', 'प्रेक्षा' याचा अर्थ 'एक त्रुटित भाग, प्रयोग' असा होतो. आणि त्यावरून आपणांस फक्त सामान्य स्वरूपाचा बोध होतो.

शौभिक आणि ग्रंथिक यांचा जेथें उल्लेख केलेला आहे, त्या महाभाष्यांतील भागांत नाटकाचा उल्लेख केलेला नाहीं, यावरूनहि आपणांस निश्चयात्मक असें अनुमान काढितां येत नाहीं. पतंजलीला आपल्या मुद्यांचें समर्थन करण्याकरितां नाटकांचीं उदाहरणें देणें सोयीचें झालें असतें, असें असूनहि तो नाटकांचा उल्लेख करीत नाहीं, ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. प्राचीन ग्रंथांच्या संशोधनानें आपणांस निश्चित अनुमान करितां येण्यासारखें नसल्यामुळें ख्रिस्ती शकानंतर दुसऱ्या शतकाच्या मध्यांत आपणांस नाटकाचें पूर्ण विकसित स्वरूप दृष्टीस पडेपर्यंत खऱ्या नाटकाचा इतिहास आपणांस माहीत होत नाहीं असें म्हणावें लागतें.

भारतीय नाट्याचा उदयकाल ठरविण्यासाठीं लेव्हि यानें निराळाच मार्ग स्वीकारला आहे. त्यानें राजे व दरकदार यांस नाट्यशास्त्रकारांनीं लाविलेलीं संबोधनात्मक विशेषणें व संस्कृत भाषेचा उपयोग करणें, यांची व हिंदुस्थानाच्या पश्चिम भागांतील क्षत्रप लेण्यांच्या शिलालेखांत दृष्टीस पडणारा संप्रदाय याची सांगड घालून दिली आहे. त्याच्या मतानें नाट्यशास्त्रकारांनीं राजाला व युवराजाला 'स्वामिन्' असें व राजपुत्राला 'भर्तृदारक' असें जें म्हटलें आहे, तें त्यांनीं प्रत्यक्ष व्यवहारावरूनच म्हटलें असलें पाहिजे, त्याचप्रमाणें नाटकांतून येणाऱ्या संभाषणांवरून तो असें अनुमान काढतो कीं, तीं नाटकें ज्यावेळीं संस्कृत भाषा केवळ ब्राह्मणांचीच पवित्र भाषा राहिली नसून तिचा इतर सुशिक्षित लोकहि उपयोग करूं लागले होते, अशा काळांतली असावीं. हा काळ सुराष्ट्र व माळवा येथील क्षत्रपांच्या काळाशीं तंतोतंत जुळतो असें त्याचें म्हणणें आहे. विशेषेंकरून माळव्यांत शौरसेनी, मागधी व महाराष्ट्री या तीन प्राकृत भाषांचा विशेष प्रचार असल्यामुळें तीच भारतीय नाट्याची जन्मभूमि असावी असें स्पष्टपणें दिसून येतें.

इंडो-सिथियन लोकांच्या हातीं राज्यसूत्रें गेल्यापासून भारतीय नाट्याचा उदय झाला, हें लेव्हीचें म्हणणें आम्हांस ग्राह्य वाटतें. नाटकांतून राजाला 'स्वामिन्' असें म्हणण्याची चाल वरील विधानास फार अनुकूल आहे. भरताच्या ग्रंथांतील ( १७.७५ ) हा भाग हस्तलिखित प्रतींत अस्पष्ट झाला असल्यामुळें तेथें 'स्वामिन्' हें पद दिसत नाहीं, परंतु त्या पदाचा उल्लेख दश. २ ६४ व सा. दर्पण, ६. १४० यांत केलेला आहे. वास्तविक पाहिलें तर राजाला 'स्वामिन्' म्हणण्याची चालू वहिवाट नव्हती, परंतु तें पद शक लोक ( सिथियन लोक ) आपल्या राजास जें मुरुंड म्हणून उपपद लावीत असत त्याचें भाषांतर होऊन आलें आहे.

तथापि माळव्याच्या पश्चिम क्षत्रपासंबंधानें लेव्हीनें जें म्हटलें आहे, तें आम्हांस ग्राह्य वाटत नाहीं. नाटकांतून ज्या अनेक प्राकृत भाषांचा उल्लेख केलेला दृष्टीस पडतो त्यांवरून तर त्याचें मत चुकीचें ठरतें. जुन्या नाटकांतून महाराष्ट्र भाषा दृष्टीस पडत नाहीं, आणि शौरसेनी ही तिकडील सुशिक्षित स्त्रियांची भाषा असून तिचा चहूंकडे प्रसार होता, ही गोष्ट निश्चित आहे. विदूषकाचा विनोद सर्वांस कळणें अवश्यक असल्यामुळें त्याची भाषा कळण्यासारखी असावयास पाहिजे, परंतु त्यानें तर प्राच्या म्हणजे पूर्वेकडील भाषा बोलावी असें सांगितलें आहे. ती भाषा म्हणजे वास्तविक शौरसेनी होती, व प्राच्या या शब्दावरून आपणांस माळवा या प्रदेशाचा बोध होत नाहीं.

वरील कारणांकरितां शौरसेनांचा प्रदेश हा भारतीय नाट्याची जन्मभूमि असावी, हें लॉसनचें मत आम्हांस सयुक्तिक दिसतें. येथें ख्रिस्ती शकाच्या प्रारंभीं जे शक राजे होते ते आपल्या शिलालेखांत 'स्वामिन्' या पदाचा उपयोग करतात व आपणांस माहीत असलेला अत्यंत प्राचीन नाटककार जो अश्वघोष तो मथुरेचा शक राजा कनिष्क ( ख्रिस्ती शकाच्या दुसऱ्या शतकाच्या मध्यांत ) याच्या दरबारीं होता.

अश्वघोषाच्या वेळीं नाट्यकलेचा पूर्ण विकास झालेला दिसून येतो. यावरून त्याच्या पूर्वी कांहीं नाटककार होऊन गेले असावे असें वाटतें. ख्रिस्ती शकाच्या दुसऱ्या शतकांत होऊन गेलेल्या भरताचार्यानें लहान सहान नाटकांचें जें वर्गीकरण केलें आहे, त्यावरून त्याच्यावेळेस नाटक-ग्रंथसमूह फार अल्प प्रमाणांत असावा असें दिसतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अश्वघोषाच्यापूर्वी शंभर वर्षांपेक्षां अधिक मागें नाट्यकलेच्या उदयाचा काळ जात नाहीं, असें म्हणणें प्राप्त होतें. शूरसेनाची राजधानी जी मथुरा तेथें शक लोकांची राजसत्ता स्थापित होण्याचा काळ हाच भारतीय नाट्यकलेच्या उदयाचा काळ असें जरी मानलें तरी तो काळ फार झालें तर ख्रिस्ती शकाच्या प्रारंभापर्यंत जाऊन पोंचतो.

सर्वांत प्राचीन नाटककार अश्वघोष असावा असें विंटरनिट्झ व स्टेनकनो यांनीं मत व्यक्त केलें आहे. त्याचा मुख्य ग्रंथ 'सारिपुत्र-प्रकरण' हा होय [ अश्वघोष पहा ].

**इतर प्राचीन बौद्ध नाटकें.**—अश्वघोषाशिवाय इतर अनेक बौद्ध नाटककार होऊन गेले. तुर्फान कागदपत्रांत अशा दोन नाटकांचे अवशिष्ट भाग सांपडतात परंतु त्यांचे कर्ते कोण होते, याचा पत्ता लागत नाहीं. त्यांपैकीं एक नाटक लाक्षणिक स्वरूपाचें असून त्यांत

वैदग्ध्य, दृढ भक्ति व कीर्ति हीं पात्रें दृष्टीस पडतात, व तीं बुद्धाची स्तुति करतात. ज्यांत निरनिराळ्या पंथांतील वाद व निरनिराळ्या तत्त्वज्ञानाच्या शाखेंतील लोकांची चर्चा दिलेली आहे, अशीं अर्वाचीन काळांतहि अनेक नाटकें आहेत. त्यांतील वादावरून त्या लाक्षणिक स्वरूपाच्या नाटकांचें साहित्य त्याकाळीं समाजांत प्रचलित असलेल्या वादविवादावरून घेतलें पाहिजे हें उघड आहे. दुसऱ्या नाटकांत नायक वृद्ध भिक्षु असून नायिका वेश्या आहे.

दक्षिणी नटांनीं शोभावतीच्या राजासमोर एक बौद्धनाटक करून दाखविलें व बिंबिसार राजाच्या समोर एका दक्षिणी नटानें बुद्धास ज्ञान होण्यापूर्वीचें त्याचें चरित्र नाटकरूपानें दाखविलें इत्यादि मजकूर तिसऱ्या शतकांत ज्यांचे चिनी भाषेंत भाषांतर झालें आहे, अशा अवदानशतकग्रंथांत सांपडतो.

भास.—भास हा कवि आपल्यापूर्वीं होऊन गेला, असें कालिदासानें 'मालविकाग्निमित्र' या नाटकांत म्हटलें आहे. तो फार विख्यात नाटककार होता. आजपर्यंत साहित्यशास्त्रकारांनीं उद्धृत केलेल्या व सुभाषितसंग्रहकारांनीं आपल्या संग्रहांत दाखल केलेल्या त्याच्या कांहीं कविताच तेवढ्या उपलब्ध होत्या कीं ज्यांत सूत्रधारानें प्रारंभ केला आहे अशीं नाटकें लिहून भासानें कीर्ति मिळविली असें बाण कवीनें आपल्या हर्षचरिताच्या उपोद्घातांत(१५वें पद्य)म्हटलें आहे. भासानें स्वप्नवासवदत्ता म्हणून एक नाटक लिहिलें व तें अग्नींत टाकिलें असतांहि जळालें नाहीं अशा तऱ्हेची आख्यायिका राजशेखर कवीनें आपल्या एका पद्यांत दिली आहे. गौडवहो ( पद्य ८०० ) यांत भासाला जलणमित्त असें जें म्हटलें आहे तें बहुतकरून या आख्यायिकेवरूनच म्हटलें असावें.

जेव्हां हें नाटक व त्याबरोबरच इतर नाटकें दक्षिणहिंदुस्थानांत प्रथम उपलब्ध झालीं व तीं सर्व एकाच ग्रंथकारानें लिहिलीं असावीं, असें स्पष्ट रीतीनें दिसून आलें, तेव्हां तीं सर्व नाटकें भासकवीचींच असावीं, असा सर्वांचा समज झाला. तो त्यांचा समज खरा आहे असें आम्हांस वाटतें व त्यावरून भासाचा काळ अधिक निश्चितपणें ठरवितां येण्यासारखा आहे. त्यानें केलेल्या 'प्रतिज्ञायौगंधरायण' नाटकांत (१.१८) अश्वघोषाच्या बुद्धचरिताचा (१.६०) उल्लेख केला असल्यामुळें तो अश्वघोषानंतर झाला असावा असें खात्रीनें म्हणतां येण्यासारखें आहे. परंतु तो तिसऱ्या शतकांत होऊन गेलेल्या शूद्रक कवीच्या आधीं झाला असावा असें वाटतें. म्हणून आम्हीं त्याचा काळ ख्रिस्ती शकाच्या दुसऱ्या शतकाचा शेवट हा धरून चालतों.त्याच्या अनेक नाटकांच्या शेवटीं दृष्टीस पडणारें 'राजसिंह' हें पद पश्चिमेकडील क्षत्रप पहिला रुद्रसिंह याच्याविषयीं योजिलेलें असावें. असें दिसतें. हा पहिला रुद्रसिंह इसवी सन १८१–८८ व १९१–९६ या काळांत महाक्षत्रप होता. शिवाय भासानें आपल्या दोन नाटकांत उदयनकथेचा ( ही कथा उज्जयिनीकडे फार लोकप्रिय होती असें कालिदासाच्या मेघदूत काव्यावरून दिसून येतें ) बराच उपयोग केला आहे ही गोष्टहि आमच्या वरील विधानास परिपोषक आहे.

भासाची नाट्यलेखनपद्धति सामान्य नाटकांत दिसून येणाऱ्या पद्धतीहून कांहीं बाबतींत निराळी असल्याचें दिसून येतें. बाणभट्टानें म्हटल्याप्रमाणें त्याच्या सर्व नाटकांत सूत्रधार अगदीं पहिल्याप्रथम प्रवेश करतो. त्याच्या 'मध्यमव्यायोग' नाटकांत तर नांदीचाहि पत्ता नाहीं. त्याचें अपूर्ण स्थितींत राहिलेलें चारुदत्त नाटक खेरीजकरून त्याच्या इतर सर्व नाटकांत 'नांद्यंते ततः प्रविशति सूत्रधारः' हें वाक्य दृष्टीस पडतें. ग्रंथकाराच्या नांवाचा कोठेंहि उल्लेख केलेला नाहीं. नाटकाचा शेवट ठराविक पद्धतीनें केलेला आहे. 'तुम्हाला संतुष्ट करण्यास मीं आणखी काय करावें?' हा नेहमीचा ठराविक मंत्र 'अविमारक', 'प्रतिज्ञायौगंधरायण', 'बालचरित' व 'दूतवाक्य' या सर्व नाटकांत दृष्टीस पडतो. नेहमीं नाटकाच्या शेवटीं देण्यांत येणारें भरतवाक्य त्याच्या पुढील नाटकांत दृष्टीस पडत नाहीं. उदाहरणार्थ, 'मध्यमव्यायोग '( यांत उपेंद्राची म्हणजे विष्णूची स्तुति केली आहे. ), 'दूतघटोत्कच ' ( यांत विष्णूच्या आज्ञा जाहीर केल्या आहेत), 'पंचरात्र ' (यांत राजसिंह राजानें सर्व जगावर राज्य करावें अशी आशा प्रदर्शित केली आहे) आणि 'ऊरुभंग' (यांत राजानें आपले शत्रू जिंकावे व सर्व भूतलावर राज्य करावें अशी आशा प्रदर्शित केली आहे ). बाकीच्या नाटकांतील भरतवाक्यांस अधिक परिणत स्वरूप प्राप्त झालेलें दिसतें. उदाहरणार्थ, 'कर्णभारांत' सर्व आपत्ति नष्ट होवोत असें म्हटलें आहे; 'प्रतिमा' नाटकांत रामाचा व सीतेचा व त्याच्या इतर आप्तांचा संयोग झाला त्याप्रमाणें राजास सुख प्राप्त होवो अशी आशा प्रदर्शित केली आहे; 'अभिषेक ' नाटक , 'अविमारक ' आणि 'प्रतिज्ञायौगंधरायण ' यांत राजसिंहानें आपल्या शत्रूंचा नाश करून सर्व जगावर राज्य करावें, अशी आशा प्रदर्शित केली आहे. आणि शेवटीं 'स्वप्नवासवदत्ता ','दूतवाक्य ' आणि 'बालचरित '.यांत राजसिंह हा सार्वभौम व्हावा अशी अपेक्षा केली आहे. रुद्रसिंह राजाच्या राज्यावर इ. स. १८८–९१ पर्यंत शत्रूंकडून हल्ले करण्यांत येत होते त्यामुळें जर आपणांस वरील राजसिंहाची व या रुद्रसिंहाची सांगड घालून देतां आली, तर भासाच्या निरनिराळ्या नाटकांचीहि कालमर्यादा ठरवितां येईल. चारुदत्त नाटकाचा अखेरचा भाग उपलब्ध नाहीं व तें अपूर्णावस्थेंत राहिलेलें भास कवीचें शेवटचें नाटक असावें. ह्या कवीच्या पहिल्या नाटकांचीं संविधानकें महाभारतांतून घेतलीं असावींत असें वाटतें.

मध्यमव्यायोगः—मध्यमव्यायोग हा प्रकार व्यायोग असून यांत भीम व हिडिंबा यांचा पुत्र जो घटोत्कच हा आपल्या मातेस एका मनुष्यदेहाचा बळी अर्पण करण्यास

मिळावा म्हणून एका ब्राम्हण कुटुंबावर हल्ला करतो. त्या कुटुंबांत जे मातृपितृस्थानीं होते ते आपला मध्यम मुलगा अर्पण करण्यास तयार झाले. इकडे घटोत्कच कांहीं वेळ वाट पाहून आपला बळी आपणांस केव्हां मिळतो याविषयीं उतावीळ झाला व मध्यमास हांक मारूं लागला, त्यावेळीं पांडवांत मध्यम जो भीम तो त्याच्यापुढें येऊन उभा राहिला. घटोत्कचाचें व भीमाचें त्यावेळीं युद्ध झालें व त्यांत घटोत्कचाला भीमाला जिंकतां आलें नाहीं. तथापि भीम, घटोत्कचाची माता जी हिडिंबा तिच्याकेडस जाण्यास तयार झाला. हिडिंबेनें भीमास पाहिल्याबरोबर त्याचा पतीप्रमाणें सन्मान केला.

दूतघटोत्कचः—हा प्रकारहि एक व्यायोगच आहे. जयद्रथानें अभिमन्यूस मारल्यामुळें कौरवांस फार आनंद झाला. परंतु याचा परिणाम कांहींतरी अनिष्ट होईल, असें धृतराष्ट्रानें त्यांस बजावलें. नंतर घटोत्कच येऊन अभिमन्यूच्या वधाबद्दल अर्जुनानें सूड उगविण्याची प्रतिज्ञा केल्याचें निवेदन करतो.

तीन अंकी पंचरात्रः—हें समवकार या सदराखालीं येईल. द्रोणाचार्यांनें दुर्योधनाकरितां एक यज्ञ करविला, व पांडवांस अर्धें राज्य द्यावें, ही त्या यज्ञाची दक्षिणा म्हणून दुर्योधनापाशीं मागणी केली. आणि दुर्योधनानेंहि ती कांहीं अटीवर देण्याचें कबूल केलें. या प्रसंगीं विराट हजर नव्हता, कारण, शंभर कीचकांस मारल्यामुळें त्याला सुतक आलें होतें. शंभर कीचक मारण्यांत भीमाचा हात असावा, असें भीष्माचें म्हणणें पडल्यामुळें विराटाच्या गाईंवर हल्ला करावा असा कौरवांनीं विचार केला. पांडव हे त्यावेळीं विराटाच्या राज्यांत अज्ञात स्वरूपांत राहात असल्यामुळें त्यांनीं तो हल्ला परतवून लावला. या झटापटींत अभिमन्यु पकडला गेला व त्याचें आणि विराट कन्येचें लग्न झालें. कौरवांकडील सारथ्यांनीं जी हकीकत सांगितली तिवरून वर सांगितलेल्या युद्धांत भीम व अर्जुन यांनीं भाग घेतला होता ही गोष्ट उघड झाली, तथापि दुर्योधन आपलें वचन पाळण्यास आणि अर्धें राज्य देण्यास तयार होतो.

ऊरुभंगः—हें नाटक अंक किंवा व्यायोग या सदरांत पडण्यासारखें आहे. यांत भीम व दुर्योधन यांच्यातील द्वंद्वयुद्धाचें वर्णन आहे. सदर युद्धांत दुर्योधनाची मांडी भग्न पावते. या अवस्थेंत त्याचा मुलगा दुर्जय हा त्याच्याकडे येऊन त्याच्या मांडीवर बसावयास जातो. आपली मांडी भग्न झाली आहे ही गोष्ट त्याच्या ध्यानांत येऊं नये म्हणून दुर्योधन दुर्जयाला मांडीवर बसूं देत नाहीं. तदनंतर दुर्योधनाचे आईबाप व कुटुंबांतील स्त्रिया त्याला भेटावयास येतात व तो त्यांचें समाधान करतो. शेवटीं आपले भाऊ व अप्सरा ह्या दृष्टीस पडतात, असा त्याला भास होतो, आणि त्याचें देहावसान होतें.

कर्णभारः—हें कदाचित् व्यायोग या सदरांत जाईल. यांत कर्ण अर्जुनाबरोबर लढाई करण्याची तयारी करतो व आपण परशुरामाकडून शस्त्रास्त्रें कशीं प्राप्त करून घेतलीं परंतु तीं शस्त्रें आपणांस संकटसमयीं उपयोगांत आणतां येणार नाहींत अशा तऱ्हेचा परशुरामानें कसा शाप दिला हें तो शल्यास सांगतो. इंद्र हा ब्राह्मणाचें रूप धारण करतो आणि कर्णापासून त्याचें चिलखत व कर्णकुंडलें मागून घेतो. ज्यावेळीं कर्ण आणि शल्य युद्धभूमीवर प्राप्त होतात त्यावेळीं अर्जुनाच्या रथाचा आवाज त्यांच्या कानीं पडतो.

यापुढील भासाचीं नाटकें रामायणांतून संविधानकें घेऊन रचलेलीं आहेत.

प्रतिमानाटकः—प्रतिमानाटक हें सात अंकी नाटक आहे. यांत पुढील हकीकत सांगितली आहे—कैकेयी रामाला राज्याभिषेकसमयीं विघ्न उपस्थित करते व राम, सीता व लक्ष्मण यांच्याबरोबर वनवासास जातो, यामुळें दशरथास अत्यंत दुःख होतें आणि जेव्हां ते तिघे वनवासास गेल्याची हकीकत सुमंत्र त्यास निवेदन करतो तेव्हां त्याच्या मनास मोठा धक्का बसून त्याचें तात्काळ प्राणोत्क्रमण होतें. तदनंतर प्रतिमागृहांत त्याच्या पूर्वजांबरोबर त्याचा पुतळा ठेवण्यांत येतो. यावेळीं भरत परदेशीं असतो. तो घरीं परत आल्यावर त्याला आपल्या पित्याचा अंत कसा झाला याची हकीकत समजते. त्याच्या मनांत राज्यावर बसण्याचें नसल्यामुळें तो रामाची भेट घेण्यास जातो. तेथें राम त्यास उपदेश करतो व तो त्याच्या गैरहजरींत राज्य चालविण्यास कबूल होतो. तथापि तो रामाचा निरोप घेतेवेळीं राज्यासनावर ठेवण्याकरितां त्याच्या पादुका मागून आणतो. यानंतर राम आपल्या मृत पित्याची म्हणजे दशरथाची अंत्येष्टि करीत असतां, रावण तेथें येतो व त्याला कांचनमृगाचा बळी देण्यास सांगतो. अशा तऱ्हेचा कांचनमृग त्याच वेळीं दृष्टीस पडल्यामुळें राम त्याचा पाठलाग करण्यास गेला. इतक्यांत रावण सीतेस घेऊन निघतो. वाटेंत त्यास जटायू बराच अडथळा करतो, परंतु त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. तदनंतर राम किष्किंधा येथें जातो, व तेथें वालीच्या विरुद्ध सुग्रीवास मदत करतो, नंतर रामरावणांचें युद्ध होऊन त्यांत रावणाचा पराजय होतो व राम आणि सीता जनस्थानास परत येतात. तदनंतर पुष्पक विमानांतून अयोध्येस आल्यानंतर रामाचें राज्यारोहण होतें. भासाच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या सर्व नाटकांमध्यें प्रतिमानाटक हें एकच नाटक असें आहे कीं, तें त्यानें लिहिलें असावें किंवा नाहीं अशाविषयीं बरीच शंका उत्पन्न होते.

अभिषेकनाटकः—यांत सहा अंक आहेत. सीतेला धरून नेल्यापासून रामाच्या अभिषेकापर्यंतचा कथाभाग या नाटकांत आला आहे. रामानें वालीला जिंकिलें, आणि सीतेचा शोध लावण्याकरितां हनुमान लंकेला गेला, व तेथें रामाचा निरोप रावणास सांगतां यावा म्हणून तो आपण होऊन शत्रूच्या स्वाधीन झाला. नंतर बिभीषण रामास

येऊन मिळाला. नंतर समुद्रावर बाण सोडून त्याला वाट देण्यास भाग पाडावें असा त्यानें रामास सल्ला दिला. ह्यानंतर वरुणानें रामाच्या सैन्यास जाण्याकरितां वाट दिली. रावणानें सीतेचें मन वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. राम व लक्ष्मण निवर्तल्याचेंहि त्यानें तिला सांगून पाहिलें परंतु कशाचाहि उपयोग झाला नाहीं. शेवटीं त्याला युद्ध करावें लागलें; त्यांत त्याचा पराजय केल्यानंतर राम राज्यावर बसला.

अविमारकः—या नाटकाचे सहा अंक आहेत. यांतील संविधानक एका कथेपासून घेतलें आहे तें—कुंतिभोजाला कुरंगी नांवाची एक उपवर कन्या होती. तिला एका अज्ञात मनुष्यानें एका प्रसंगीं हत्तीच्या तडाक्यांतून वांचविलें, आणि त्यामुळें त्या दोघांचें एकमेकांवर प्रेम जडलें. तो तरुण मनुष्य अविमारक होता. कांहीं शापामुळें त्याला अशा निकृष्टावस्थेंत राहणें भाग पडलें होतें. राजाच्या मनांत कुरंगीला एका सौवीर राजपुत्राला द्यावयाचें होतें, परंतु तो कोठें अदृश्य झाल्याचें समजल्यावरून त्यानें तिला काशीराजपुत्राला देण्याचें ठरविलें. इतक्यांत वर सांगितलेला तरुण पुरुष अविमारक याची व कुरंगीची एकांतांत भेट करून देण्याची व्यवस्था तिच्या सखीनें केली. अविमारक हा चोराचा वेष घेऊन रात्रीं राजकन्येला भेट देण्याकरितां गेला. परंतु अशा तऱ्हेचा कांहीं तरी अनिष्ट प्रकार अंतःपुरांत घडत असल्याची बातमी राजाच्या कानावर गेल्यामुळें अविमारकास तेथून पाय काढावा लागला; त्यास अत्यंत खेद होऊन त्याची आत्महत्या करण्यापर्यंत मजल गेली, परंतु त्याची व एका विद्याधराची गांठ पडल्यानंतर त्या विद्याधरानें त्याचें शांतवन केलें, व तो कोणाच्या दृष्टीस पडणार नाहीं असा जिचा धर्म आहे, अशा प्रकारची एक अंगठी त्यानें त्यास दिली. या रीतीनें त्याचा फिरून राजवाड्यांत प्रवेश झाला व ज्यावेळीं कुरंगी आत्महत्या करण्याच्या बेतांत होती त्याचवेळीं तो तेथें येऊन दाखल झाला. शेवटीं अविमारक हा दुसरा तिसरा कोणी नसून अग्नि व काशीची राणी सुदर्शना यांचा पुत्र आणि अदृश्य झालेला सौवीर राजपुत्र तो हाच आहे, असें उघडकीस आलें. शेवटीं अविमारक व कुरंगी यांचें लग्न होतें, व त्यामुळें सर्वांस आनंदीआनंद होतो.

प्रतिज्ञायौगंधरायण, प्रतिज्ञानाटिका किंवा वत्सराजचरितः—ही नाटिका चार अंकी आहे. यांतील कथानक बृहत्कथेपासून घेतलें आहे. स्थापनेमध्यें हें नाटक 'प्रकरण' आहे असें म्हटलें आहे. यांतील पहिल्या अंकाचा एक भाग भामहानें उद्धृत केला आहे आणि चौथ्या अंकांतील तिसऱ्या श्लोकाचा शेवट जो कौटिलीय या ग्रंथांतहि सांपडतो, तो वामनानें उध्दृत केला आहे. सदरहू नाटकाचा पांचवा अंक अद्यापहि मंत्रांक-नाटक या नांवाखालीं केरळ प्रदेशांत करण्यांत येतो. या नाटकांतील कथानक असें:—

उदयन हा हत्तीची शिकार करण्याकरितां आपली घोषवती नांवाची विणा घेऊन अरण्यांत गेला असतां तेथें त्याला उज्जयिनीचा राजा प्रद्योत महासेन याच्या सैनिकांनीं कपटानें पकडलें. ही वार्ता ऐकून त्याचा मंत्री यौगंधरायण यानें या विश्वासघाताबद्दल सूड उगविण्याची प्रतिज्ञा केली. इकडे उज्जयिनीमध्यें महासेन राजा आपल्या वासवदत्ता कन्येच्या विवाहाबद्दलच्या गोष्टी आपल्या राणीबरोबर करीत असतां वत्सराजा जो उदयन त्याला पकडल्याची बातमी त्यांच्या कानावर आली. त्यानंतर वासवदत्तेनें उदयनाकडून संगीताचें शिक्षण घ्यावें असें राजानें ठरविलें. वासवदत्ता उदयनापासून संगीताचें शिक्षण घेत असतां त्या दोघांचें प्रेम जडलें. उदयनाची सुटका करण्याकरितां यौगंधरायण व त्याचे मित्र वेषांतर करून उज्जयिनीस आले. या त्यांच्या प्रयत्नामुळें उदयन हा वासवदत्तेसह उज्जयिनींतून निसटून गेला, परंतु यौगंधरायण मात्र बंदिखान्यांत पडला. तदनंतर वस्तुस्थिति काय आहे हें सर्व महासेनाच्या लक्षांत येऊन त्यानें आपली मुलगी व उदयन यांच्या विवाहाची एक तजवीज केली. शिवाय राजा व त्याचा मंत्री या दोघांनींहि यौगंधरायण याचा उत्तम रीतीनें सन्मान केला.

स्वप्नवासवदत्ताः—उर्फ स्वप्ननाटक, हें भासाचें सुप्रसिद्ध नाटक आहे. वर सांगितल्याप्रमाणें याचा केवळ राजशेखरानेंच उल्लेख आहे असें नसून वामन व अभिनवगुप्त यांनींहि त्याचा उल्लेख केला आहे. हें नाटक सहा अंकी असून त्यांत प्रतिज्ञायौगंधरायण या नाटकांतील कथाभागाचा उत्तरार्ध आलेला आहे. यांतील कथानक—

उदयन राजास सार्वभौमपद प्राप्त होण्याकरितां त्याचा व मगध राजकन्या पद्मावती यांचा विवाहसंबंध झाला पाहिजे ही गोष्ट यौगंधरायणाच्या ध्यानांत आली होती. परंतु उदयन राजा वासवदत्तेचा त्याग करण्यास तयार होईना. म्हणून यौगंधरायण यानें वासवदत्ता ही अग्नींत दग्ध झाली, अशी खोटीच वदंता पसरवून तिला पद्मावतीकडे पोहोंचती केली. ही माझी बहीण आहे असें म्हणून त्यानें वासवदत्तेला पद्मावतीच्या स्वाधीन केलें. ह्यानंतर पद्मावतीनें उदयनाच्या मागणीचा स्वीकार केला, व वासवदत्तेला त्या विवाहप्रसंगीं पद्मावतीची वैवाहिक माला गुंफावी लागली. परंतु राजाला अद्याप आपल्या पूर्वीच्या पत्नीचें विस्मरण झालें नाहीं असें ज्यावेळीं पद्मावतीला कळून येतें, तेव्हां तिला मस्तकशूल उत्पन्न होतो. यावेळीं राजा तिचें शांतवन करण्यास जातो परंतु ती त्याला कोठें सांपडत नाहीं म्हणून तो जरा विश्रांति घेण्याकरितां पडतो, आणि निद्रावश होतो. इतक्यांत पद्मावतीची शुश्रूषा करण्याकरितां आलेली वासवदत्ता, ही पद्मावतीच आहे असें समजून राजाच्या जवळ बसते. परंतु ज्यावेळीं राजा झोंपेंत कांहीं तरी बरळूं लागतो तेव्हां तिची चूक तिच्या लक्षांत येऊन ती निघून जाते. परंतु जातां जातां ती राजाच्या नजरेस पडते. तिला आपण स्वप्नांत पाहिली

असावी असा राजाला भ्रम उत्पन्न होतो परंतु इतक्यांत सर्व शत्रूंचा नाश झाल्याचें वर्तमान त्यास कळतें, व महासेनाच्या दरबारीं पाठविलेले वकीलहि परत येतात. त्या वकिलांनीं उदयाच्या व वासवदत्तेच्या विवाहाच्या वेळची तजवीरहि बरोबर आणलेली असते.त्या तजविरींतील वासवदत्तेची प्रतिमा यौगंधरायणानें बहीण म्हणून हवाली केलेल्या मुलीसारखी आहे असें पद्मावतीच्या लक्षांत येते. सरतेशेवटीं यौगंधरायण येऊन सर्व गोष्टींचा खुलासा करतो व त्यामुळें जिकडे तिकडे आनंदीआनंद होतो.

दूतवाक्यः—हें व्यायोग आहे. त्यांतील कथाभाग महाभारतावरून घेतलेला आहे.दुर्योधनाच्या मुख्य मंत्र्याच्या जागेवर भीष्माचार्यांची नेमणूक झाल्यानंतर भगवान् कृष्ण येऊन दाखल झाल्याची वर्दी येते. कृष्णास कोणत्याहि तऱ्हेचा मान द्यावयाचा नाहीं अशा प्रकारची स्वपक्षीयांस ताकीद देऊन ज्यांत द्रौपदीची विटंबना केली आहे, अशा तजविरी समोर तो बसतो. परंतु कृष्ण येतांच त्याच्या तेजाची सर्वांवर छाप पडल्याशिवाय रहात नाहीं. प्रत्यक्ष दुर्योधनहि आपल्या आसनापासून भ्रष्ट होतो. कृष्ण पांडवांकरितां अर्ध्या राज्याची मागणी करतो. आणि जेव्हां दुर्योधन ती नाकबूल करतो. आणि तो कृष्णास बांधून त्याच्यावर हल्ला करण्याचा प्रयत्न करू लागतो, तेव्हां कृष्ण आपली अस्त्रें बोलावतो परंतु शेवटीं तो शांत होतो, व धृतराष्ट्र त्याचा योग्य सन्मान करतो. पुढें झालेल्या हरिदूत नांवाच्या नाटकांत दूत वाक्याचें अनुकरण केलें आहे.

बालचरितः—दूतवाक्यानंतर भासानें बालचरित कृष्णनाटक लिहिलें.हें बालचरित नाटक पांच अंकी आहे.वृष्णीच्या कुळामध्यें कृष्ण या नांवानें भगवान् विष्णु जन्मास आले. कंसाच्या शत्रुत्वापासून त्याचा बचाव करण्याकरितां वसुदेवानें त्यास यमुनेच्या पलीकडे नेऊन नंद गवळ्याच्या स्वाधीन केलें. तुझा लौकरच निःपात होईल असें निरनिराळ्या जणांनीं येऊन कंसास सांगितलें. गोपांच्या संगतींत कृष्ण व संकर्षण यांनीं विविध चेष्टा व अद्भुत चमत्कार करावेत, व गोपींबरोबरहि विनोद करावेत, असा क्रम चालू होता. अखेर मथुरेंतील एका उत्सवप्रसंगीं कंसानें त्यास पाचारण केलें. याप्रसंगीं कंसानें कृष्णास मारण्याचा प्रयत्न केला. परंतु तो निरुपयोगी होऊन उलट तोच कृष्णाकडून मारला गेला. असा कथाभाग यांत आहे. हें नाटक नाटकी स्वरूपाचें नसून वीररसप्रधान महाकाव्यस्वरूपाचें आहे.

यांतील दुसरा अंक विशेष मनोरंजक आहे. त्यांत कंसाला जीं निरनिराळीं दुःस्वप्नें पडतात, तीं सांगितलीं आहेत. हीं दुःस्वप्नें नाचाच्या किंवा छायाचित्रांच्या साधनांनीं त्यावेळीं कशीं दाखवितां येत होतीं हें समजण्याला मार्ग नाहीं.

चारुदत्तः—हें चार अंकी नाटक आहे.याच्या सुरवातीचा भाग उपलब्ध नसून यांतील अखेरच्या कविताहि उपलब्ध नाहींत. बहुतकरून तें ग्रंथकर्त्याकडूनच अपूर्ण राहिलें असावें. बहुतकरून ती भासाची शेवटची कृति असावी.अभिनवगुप्तानें 'दरिद्र चारुदत्त' या नांवाच्या एका नाटकाचा उल्लेख केलेला आहे. परंतु तें भासाचें नाटक असल्याबद्दल खात्रीलायक पुरावा उपलब्ध नाहीं. याच्या पायावरच मृच्छकटिकाचे चार अंक रचलेले आहेत. आणि यांतील १. १९ ही कविता ( बालचरित १. १५ = मृच्छकटिक १. ३४ ) दंडीनें आपल्या काव्यादर्शांत ( २. २२६ ) दरिद्रचारुदत्तांतील म्हणून दिली आहे. यांतील कथानकः—

श्रेष्ठी चारुदत्त हा आपल्या औदार्यामुळें दरिद्री झाला होता. त्याची व वसंतसेना या वेश्येची एका महोत्सवप्रसंगीं गांठ पडली; त्यांचे एकमेकांवर प्रेम जडलें. राजशालकाकडून पुष्कळ छळ झाल्यामुळें वसंतसेना चारुदत्ताच्या घराकडे धांवत गेली व तेथून परत येतांना तिनें आपले मौल्यवान् अलंकार चारुदत्ताजवळ ठेविले. तदनंतर पूर्वी चारुदत्ताच्या नोकरींत असलेल्या व सांप्रत सावकाराच्या तावडींत सांपडलेल्या एका द्यूतकारास तिनें सोडविलें इत्यादि.

शूद्रकः—मालविकाग्निमित्र नाटकांत कविकुलगुरु कालिदासानें आपल्या पूर्वगामी कवींत भासाशिवाय सौमिल्ल कविपुत्र या दोन कवींचा निर्देश केला आहे. भासाच्या कवितेबरोबर त्यांच्या नांवावर असलेल्या कांहीं कविता कोठें कोठें दृष्टीस पडतात. एरवीं कविपुत्राचें नांव प्रख्यात नाहीं. कदाचित् कविपुत्र हें विशेषनाम नसण्याचाहि संभव आहे. कदाचित् कविपुत्र हें पद भास व सौमिल्ल अशांसारख्या कवींस केवळ बहुमानानें लावलें असण्याचाहि संभव आहे. सौमिल्ल याचें नांव कदाचित् सोमिल असें असावें, कारण राजशेखरानें भास व रामिल यांच्याबरोबर एका सोमिल कवीचा निर्देश केला आहे. सौमिल्ल या नांवांतील ल्ल या उपपदावरून तो महाराष्ट्रीय असण्याचा संभव आहे.

राजशेखराच्या दुसऱ्या एका कवितेंत सोमिल आणि रामिल या दोघांनीं मिळून एक शूद्रक कथा लिहिली असें समजतें. त्यांत राजा शूद्रकाचा सर्व वृत्तांत सांगितलेला आहे. यावरून शूद्रक हा सोमिल्लाच्या व कालिदासाच्याहि पूर्वी होऊन गेला असावा असें सिद्ध होतें.

राजा शूद्रक हा अनेक भारतीय आख्यायिकांचा विषय आहे. राजतरंगिणीमध्यें ( ३.३४२ ) त्याचा विक्रमादित्याबरोबर निर्देश केला आहे व स्कंदपुराणांत तो आंध्रभृत्यांत पहिला होता असेंहि म्हटलें आहे. वेतालपंचविंशतीच्या चौथ्या कथेंत त्याला वर्धमान अथवा शोभावती येथील राजा केला आहे व तो शंभर वर्षेपर्यंत जगला असें म्हटलें आहे. आणि कादंबरींत विदिशा ही त्याची राजधानी होती असें सांगितलें आहे. कांहीं आख्यायिका, तो शातवाहनाचा मंत्री होता असें त्याचें वर्णन करतात, तर कांहींत त्यानें उज्जयिनीच्या राजाच्या मदतीनें शातवाहनापासून प्रतिष्ठान घेतलें असें म्हटलें आहे. शूद्रक हा मृच्छकटिक नाटकाचा कर्ता होता असेंहि मानतात. तो आपल्या वयाच्या शंभराव्या

वर्षी निवर्तला असें सदर नाटकाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. यावरून ती प्रस्तावना त्यानें लिहिली नाहीं, हें सिद्ध होतें.

मृच्छकटिक नाटकाच्या काळाविषयीं व त्याच्या कर्त्याविषयीं मतैक्य नाहीं. तें सर्वांत प्राचीन नाटक समजण्यांत येतें आणि भारतीयांनीं आपली नाट्यकला ग्रीक लोकांपासून घेतली असें प्रतिपादन करणाऱ्या संशोधकानें आपल्या तर्काची सर्व इमारत या नाटकाच्या प्राचीनत्वावर रचली आहे. परंतु सदर नाटकाच्या नवव्या अंकांत दिलेली न्यायनिवाडा करण्याची पद्धति सहाव्या व सातव्या शतकांतील धर्मशास्त्रविषयक ग्रंथांत सांगितल्याप्रमाणें आहे, असें जॉली यानें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. मृच्छकटिक नाटक हें भास कवीनें लिहिलें असावें असें पिशेलचें प्रथम मत होतें. परंतु तें दंडीनें लिहिलें असावें, असें दाखविण्याचा पुढें त्यानें प्रयत्न केला आहे. लेव्ही यानेंहि सदर नाटकास बरेंच अलीकडे ओढलें आहे, परंतु मागाहून त्याच्या मतांत फरक पडला. जाकोबी याच्या मतानें शूद्रक हा कालिदासाच्या मागाहून झाला, परंतु मृच्छकटिक नाटकाचा कर्ता राजा होता व त्याचें नांव शूद्रक होतें याविषयीं त्याला यत्किंचितहि शंका नाहीं. एका मेषाला बळी देऊन शूद्रकाचें दुखणें बरें झालें आणि त्यानें आपल्या मुलास राज्यावर बसवून अश्वमेध करविला व त्याच्या वयाच्या शंभराव्या वर्षी त्याचें देहावसान झालें इत्यादि मृच्छकटिकाच्या प्रस्तावनेंत सांगितलेल्या गोष्टी इतक्या निश्चित स्वरूपाच्या आहेत कीं, त्यांवरून शूद्रक हा ऐतिहासिक पुरुष होता, याविषयीं शंका रहात नाहीं. हा शूद्रक राजा व आभीर राजा शिवदत्त हे दोन्ही एकच असावेत असें आमचें मत आहे. या शिवदत्ताचा पुत्र ईश्वरसेन यानें आंध्रांच्या राजसत्तेचा उच्छेद केला व त्याच प्रसंगीं, २४८–४९ या वर्षी चेदि शकाला आरंभ झाला.

मृच्छकटिकांत गोपाल आर्यकानें पालक राजास पदच्युत केलें असें जें सांगितलें आहे, त्याचा वरील हकीकतीशीं मेळ बसतो. परंतु वरील कथाभाग कृष्णआख्यायिकेवरून घेतला असावा असें वुईंडिश यांचें मत आहे. म्हणून शूद्रक हा तिसऱ्या शतकाच्या मध्यांत होऊन गेला असें आम्ही म्हणतो व त्यानें प्रतिष्ठान म्हणजे हैद्राबाद संस्थानांतील हल्लींचें पैठण ही आपली राजधानी केली अशासंबंधींची जी आख्यायिका आहे ती आम्हास विश्वासनीय वाटते. ज्यांत महाराष्ट्रीय भाषेचा उपयोग केला आहे असें मृच्छकटिक हेंच पहिलें नाटक आहे. या गोष्टीचाहि वरील हकीकतीशीं मेळ बसतो. अर्थात् मृच्छकटिक रचण्याच्या कामीं शूद्रकाच्या दरबारीं असणारे पंडित जे सोमिल व रामिल यांनीं त्यास मदत केली किंवा नाहीं, याविषयीं आम्हांस निश्चयानें कांहीं म्हणतां येत नाहीं.

मृच्छकटिक नाटकांतील पहिले चार अंक हे भासाच्या चारुदत्त नाटकाचेंच जवळ जवळ रूपांतर आहे. संस्कृताचें प्राकृतांत संक्रमण कसें झालें, हें आपणास मृच्छकटिक नाटकाच्या प्रस्तावनेंतील सूत्रधाराच्या संभाषणांत दिसून येतें. शूद्रकानें गोपाल आर्यकासंबंधींचा राजकीय भाग नवीन घातला असें वुईंडिश याचें मत आहे. यामूळें एकंदर संविधानक वाढून हें दशांकी प्रकरण झालें.

मृच्छकटिकाचे पहिले चार अंक व चारुदत्त नाटक यांत अत्यंत साम्य आहे ही गोष्ट वर सांगण्यांत आलीच आहे. फक्त नांवांत मात्र थोडासा फरक केलेला आहे. उदारणार्थ, राजाच्या मेहुण्यास संस्थानक असें म्हटलें आहे. आणि वसंतसेनेचे अलंकार चोरणाऱ्या चोरास शर्विलक हें नांव देण्यांत आलें आहे. इतरहि कांहीं किरकोळ फरक केले आहेत. उदाहरणार्थ, जेव्हां शर्विलक वसंतसेनेच्या दासीबरोबर तिच्या घरांतून बाहेर पडतो, तेव्हां गोपाल आर्यकाला, तो पुढें राजा होईल असें भविष्य वर्तविल्यामुळें पालक राजानें बंदींत टाकिलें अशी वार्ता त्याच्या कानावर येते. तसेंच वसंतसेना आपले अलंकार घेऊन चारुदत्ताकडे जाते व त्याच्या घरीं रात्र घालविते दुसऱ्या दिवशीं सकाळीं वसंतसेनेची व चारुदत्ताचा मुलगा रोहसेन यांची गांठ पडते. रोहसेनाचा शकट मृत्तिकेचा असल्यामुळें तो असंतुष्ट झालेला असतो तेव्हां वसंतसेना रोहसेनाला सुवर्णाचा शकट घेतां यावा म्हणून त्याच्या शकटांत आपले सर्व अलंकार घालते. या कथाभागावरूनच नाटकांस मृच्छकटिक हें नांव देण्यांत आलें आहे. इतक्यांत चारुदत्ताचा रथ वसंतसेनेस न्यावयास येतो, इत्यादि कथाभाग आहे.

कालिदासः—सर्व भारतीय नाटककारांमध्यें कविकुलगुरु कालिदास यासच अग्रपूजेचा मान दिला पाहिजे. विल्यम जोन्स यानें शाकुंतलाच्या भाषांतराला जो उपोद्घात लिहिला आहे त्यांत असें म्हटलें आहे कीं, त्यानें एकेवेळीं सर्व भारतीय नाटकांत उत्कृष्ट नाटक कोणतें असें एका गृहस्थास विचारलें असतां त्यानें पुढील उत्तर दिलें:—

कालिदासस्य सर्वस्वमभिज्ञानशकुन्तलम् ।
तत्रापिच चतुर्थोऽङ्को यत्र याति शकुन्तला ॥

यूरोपीयन भाषाभिज्ञांनींहि असाच निर्णय दिला आहे. इतकेंच नव्हे तर कालिदासाचें ' उपरिनिर्दिष्ट ' नाटक सर्व जगाच्या कौतुकास पात्र झालें आहे.

यामुळें त्याचा चरित्रक्रम कसा होता व तो कोणच्या काळांत होऊन गेला, याविषयीं निश्चयात्मक माहिती उपलब्ध नसावी ही गोष्ट अत्यंत शोचनीय आहे.

त्याच्याविषयीं सर्वसाधारण अशी आख्यायिका आहे कीं, तो मूळचा एक सामान्य मनुष्य असून त्याला कोणत्याहि प्रकारचें शिक्षण मिळालेलें नव्हतें. परंतु पुढें तो काली देवीच्या प्रसादानें मोठा कवि झाला. त्याचें कालिदास हें म्हणजे कालीचा दास नांव हें त्यास पुढें प्राप्त झालें असा

समज आहे. आणि त्याचें खरें नांव काय होतें, हें आपणांस माहीत होण्याचा संभव नाहीं. मातृगुप्त म्हणून जो कवि होता, तोच कालिदास असा कांहींनीं तर्क केला आहे. खरोखर पाहूं गेलें तर उच्च जातींतील आर्यांचें नांव कालिदासास असणें संभवनीय दिसत नाहीं आणि या गोष्टीवरूनच वरील आख्यायिका प्रचलित झाली असावी. तथापि सदर आख्यायिकेचा आपणांस ऐतिहासिक दृष्ट्या कांहीं उपयोग करतां येण्यासारखा नाहीं.

याशिवाय कालिदासाचा व अनेक राजांचा संबंध जोडणाऱ्या आख्यायिकाहि प्रचलित आहेत. कालिदास हा अकराव्या शतकांत धारच्या भोज राजाच्या पदरीं होता असें ज्यांत सांगितलें आहे तो भोजप्रबंध नांवाचा ग्रंथ आपण तूर्त एका बाजूस ठेवूं. दुसऱ्या एका सिंहलद्वीपांतील आख्यायिकेवरून कालिदास हा कुमारदासाचा समकालीन होता असें समजतें. हा कुमारदास कांहींच्या मतें सहाव्या शतकांत तर कांहींच्या मतें तदनंतर झाला असावा.

तथापि सर्वांत अधिक विश्रुत अशी जी आख्यायिका आहे तीवरून कालिदास विक्रमादित्य राजाचा समकालीन होता. हा विक्रमादित्य उज्जयिनीचा राजा असून त्यानें शकांच्या राजसत्तेचा नाश केला, व विक्रमशकास प्रारंभ केला म्हणून हिंदुस्थानांत कालिदास हा इ. स. पूर्वी किंवा त्याच्याहि आधीं होऊन गेला असा सार्वत्रिक समज प्रचलित आहे. उज्जयिनींत त्याच्या नांवाची परंपरा अद्यापिहि चालू आहे.

कालिदास इतक्या प्राचीन काळीं झाला असावा ही गोष्ट अनेक कारणांवरून संभवनीय दिसत नाहीं. कालिदास हा भासानंतर व निश्चयानें शूद्रकानंतर झाला असावा असें आम्ही वर दाखविलें आहे, व याकोबी यानें ज्योतिषाच्या आधारेंहि तो इ. स. ३५० च्या पूर्वी झाला असावा ही गोष्ट संभवनीय दिसत नाहीं असें म्हटलें आहे.

याकरितां आणखीहि अधिक पुरावा गोळा करणें भाग पडतें. एका सुप्रसिद्ध कवितेंत तो विक्रमादित्याच्या दरबारांतील नवरत्नांपैकीं एक होता असें म्हटलें आहे. या रत्नांतीलच एक ज्योतिषी वराहमिहिर हा सहाव्या शतकांत होऊन गेला म्हणून कालिदास हा सहाव्या शतकांत होऊन गेला असें कर्न व पिशेल म्हणतात. आणि लेव्ही याचेंहि तेंच म्हणणें आहे. फर्ग्यूसनच्या मतानेंहि हा काल व विक्रमादित्याच्या आख्यायिकेचा काल हे दोन्ही जुळण्यासारखे आहेत, कारण त्याच्या मतानें इ. स. ५४४ त जेव्हां विक्रमादित्यानें कोरूरच्या लढाईत जय मिळविला तेव्हां त्याचें स्मारक म्हणून विक्रम-शक सुरू करण्यांत आला. परंतु वरील काळाच्या पूर्वीचे विक्रमशकाचे शिलालेख उपलब्ध झाल्यापासून वरील मत ग्राह्य धरण्यासारखें नाहीं. तथापि विक्रमादित्य हें नांव नसून ज्याअर्थी ती एक बहुमानाची पदवी आहे त्याअर्थी कालनिर्णयाच्या कामीं त्याचा फारसा उपयोग नाहीं.

कालिदासाचा आश्रयदाता जो विक्रमादित्य तो शिलादित्य हर्ष राजाच्या पूर्वी होऊन गेला असावा असें फर्ग्यूसन व मॅक्समुल्लर यांचें म्हणणें आहे. परंतु होर्ले याच्या मतें हूणांवर जय मिळविणारा व मध्यहिंदुस्थानांत राहणारा जो यशोधर्मन् राजा तोच कालिदासाचा आश्रयदाता विक्रमादित्य असावा. कालिदासानें रघुवंश ( ४.६८ ) यांत हूणांचा निर्देश केला आहे; रा. पाठक यांच्या मतानें रघुवंशांत दिलेल्या स्थलवर्णनावरून काश्मीरचा बोध होतो आणि त्यावरून कालिदास हा सहाव्या शतकांत होता असें त्यांनीं अनुमान काढलें आहे. कालिदासाच्या मेघदूतांतील (५.१४) या श्लोकाचें जें मल्लिनाथानें स्पष्टीकरण दिलें आहे त्याचाहि वरील अनुमानास आधार देण्यांत आला आहे. मेघदूताच्या सदर श्लोकांत सुप्रसिद्ध बुद्धधर्मीय दिङ्नाग याचा उल्लेख आहे. व दिङ्नागाचा काल सहावें शतक हा समजण्यांत येतो. तथापि दिङ्नागासंबंधानें केलेला उल्लेख निश्चितपणें स्पष्ट नाहीं. शिवाय कालिदास हा सहाव्या शतकांत झाला असावा हें फारसें संभवनीय दिसत नाहीं. हूण हे हिंदुस्थानाच्या सरहद्दीवर रहाणारे लोक होते व तदनंतर त्यांनीं हिंदुस्थानचा बराच भाग पादाक्रांत केला असें कालिदासाच्या ग्रंथांवरून समजतें असें बी. सी. मुजुमदार यानीं दाखविलें आहे. इ. स. ६३४–३५ सालच्या एका शिलालेखांत कालिदासाचा नामनिर्देश आहे इतकेंच नव्हे तर इ. स. ४७३–७४ च्या शिलालेखांत त्याच्या लेखनपद्धतीचेंहि अनुकरण केल्याचें दृष्टीस पडतें. कालिदास हा ४०० पासून ६०० च्या काळांत केव्हां तरी झाला असावा असें सर्व पुराव्याचें निरीक्षण करून हूथ यानें ठरविलें आहे. कालिदास हा विक्रमादित्याचा समकालीन होता, अशाविषयीं ज्या आख्यायिका हिंदुस्थानांत प्रचलित आहेत त्यांवरून हा विक्रमादित्य गुप्त राजघराण्यांतील असावा असें ज्या संशोधकांनीं ठरविलें आहे त्यांचें तें म्हणणें संभवनीय दिसतें. निरनिराळ्या लेखकांनीं पुढीलप्रमाणें निरनिराळ्या राजांचा व विक्रमादित्याचा मेळ घालून देण्याचा प्रयत्न केला आहे. जसें—लॅसेन यानें दुसरा चंद्रगुप्त व कुमारगुप्त यांचा; वेबर यानें समुद्रगुप्त आणि त्याच्या पूर्वी होऊन गेलेले व व मागून झालेले यांचा; चक्रवर्ती, लेविक, कोलिन्स व गावरोन्स्की यांनीं स्कंधगुप्ताचा; ब्लोच व कीथ यांनीं दुसऱ्या चंद्रगुप्ताचा आणि मुजुमदार यांनीं कुमारगुप्त व स्कंधगुप्त यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न केला आहे.

आमच्या मतानें दुसरा चंद्रगुप्त हा कालिदासाचा आश्रयदाता असावा. तो उज्जयिनींतील गुप्तघराण्यांतील पहिला राजा होता. व त्यानेंच प्रथम विक्रमादित्य ही पदवी धारण केली. तो ज्यावेळीं माळव्यांत राज्य करीत होता आणि ज्यावेळीं त्याचा पिता समुद्रगुप्त यानें अश्वमेध यज्ञ केला, त्यावेळीं घडलेल्या गोष्टीस अनुलक्षून मालविकाग्निमित्रांतील कांहीं मजकूर लिहिला गेला असावा असें वाटतें. विक्रमादित्याच्या नांवावरून विक्रमोर्वशीय हें या नाटकाला नांव

देण्यांत आलें असण्याचा संभव आहे. कुमारसंभव या काव्यांत कुमारगुप्ताच्या जन्मोत्सवाचें वर्णन केलें असावें म्हणून त्याचा काळ चौथ्या शतकाच्या शेवटीं व पांचव्या शतकाच्या प्रारंभीं निर्णीत करण्यास हरकत नाहीं. त्याच्या ग्रंथांपैकीं फक्त नाटकग्रंथांचाच आपणांस येथें विचार करणें आहे. आपणांस कालिदासाचीं मालविकाग्निमित्र, उर्वशी व शाकुंतल हीं तीन नाटकें उपलब्ध आहेत. या नाटकांत मालविकाग्निमित्र ही त्याची पहिली कृति होय, आणि नवीन नाटक रंगभूमीवर आणलें म्हणून प्रेक्षकांनीं आपल्या कृतीकडे फार करड्या नजरेनें पाहूं नये अशी त्यानें ग्रंथारंभीं प्रेक्षकवर्गाजवळ याचना केली आहे. त्याचप्रमाणें उर्वशी नाटकांतहि प्रेक्षकांनीं आपल्या कृतीचें सदय अंतःकरणानें निरीक्षण करावें असें म्हटलें आहे. परंतु अशी विज्ञप्ति शाकुंतल नाटकांत केली नाहीं. कॅपेलर यानें मालविकाग्निमित्र ही कालिदासाची अखेरची कृति होय असें आपलें मत दिलें आहे ही गोष्ट खरी आहे. परंतु तें त्याचें एकट्याचेंच मत आहे. मालविकाग्निमित्र ही कालिदासाची कृतीच नव्हे असें कांहीं संशोधकांचें मत आहे. परंतु त्याविरुद्ध वेबर, पंडित कॅपेलर, ह्यूम व लेव्ही या सर्वांनीं संशोधनपूर्वक आपलें निश्चित मत दिल्यामुळें वरील मताचा विचार करण्याचें कारण उरलें नाहीं. हें नाटक पांच अंकी असून वासंतिक महोत्सवाकरितां कदाचित व विदिशा नगरीमध्यें लिहिण्यांत आलें असावें.

मालविकाग्निमित्राचें कथानकः—विदिशा नगरीचा राजा अग्निमित्र याच्याकरितां मालविका नांवाची एक विदर्भ राजकन्या पसंत करण्यांत आली होती. परंतु विदर्भ राजपुत्राचें आणि अग्निमित्राचें वांकडें असल्यामुळें त्या राजपुत्रानें मालविकेस विदिशा नगरीस घेऊन जाणाऱ्या मंडळीवर हल्ला केला. मालविका त्या हल्लयांतून निसटून विदिशानगरीस गेली. तेथें तिला कोणी न ओळखल्यामुळें तिचा धारिणी राणीच्या अंतःपुरांत प्रवेश झाला. एका उत्कृष्ट शिक्षकाकडून तिला नृत्य शिकविण्याविषयीं राणीनें व्यवस्था केली. तिची प्रतिमा राजाच्या दृष्टीस पडल्यावर तो तिच्यावर मोहित झाला. राजाची व तिची गांठ पडावी म्हणून विदूषकानें मालविका व दुसरी एक नृत्यविद्यार्थिनी यांच्यांमध्यें चढाओढीचा सामना करण्याची व्यवस्था केली. तो सामना पाहण्याकरितां राजा, राणी आणि कौशिकी नांवाची एक योगिनी हीं सर्व हजर असावींत अशी विदूषकानें योजना करून ठेवली होती. या सामन्यांत मालविकेस यश मिळालें आणि त्यामुळें राजाचें तिच्यावर अधिकच प्रेम जडलें. तदनंतर आपल्या पादाघातानें अशोकवृक्षाला मोहोर आणण्याकरितां राणीनें मालविकेस उद्यानांत पाठविलें मालविकेनें आपल्या सखीबरोबर केलेल्या संभाषणावरून तिचें प्रेम आपल्यावर आहे ही गोष्ट राजास कळून आली म्हणून तो तिला भेटावयास गेला. परंतु त्या दोघांच्या भेटीमध्यें इरावती नांवाच्या दुसऱ्याच एका राणीनें विघ्न उपस्थित केलें आणि धारिणी राणीनें मालविकेस बंदींत टाकिलें. यानंतर विदूषकानें मोठया चातुर्यानें राजा व मालविका यांच्या दुसऱ्या भेटीचा योग जुळवून आणला. परंतु त्या भेटींतहि इरावती राणीनें अडथळा केला. इतक्यांत दूताबरोबर बाहेरून एक चांगली बातमी कानावर आली; विदर्भ प्रांतांत अग्निमित्राच्या सेनेस जय मिळाल्याची ही वार्ता होती. परत आलेल्या दूतांनीं मालविका हीच हरवलेली विदर्भ राजकन्या होय असें ओळखिलें. राजाचा पिता पुष्पमित्र यासहि जय प्राप्त झाल्याची बातमी समजून येते, आणि याच सुमारास अग्निमित्र व धारिणी यांच्या पुत्रानें, अश्वमेधाचें रक्षण करीत असतां सिंधुनदाच्या तीरावर यवनांस पादाक्रांत केल्याचीहि बातमी कानावर आली. मालविकेच्या पादाघातानें अशोक वृक्षास चांगला मोहोर प्राप्त झाला, तर तिला एक पारितोषिक देण्याविषयीं धारिणी राणीनें अभिवचन दिलेलें होतें, त्या शर्तींतहि समाधानकारक परिणाम घडून आल्यामुळें तिनें आतां मालविकेबरोबर विवाह करण्यास राजास विनंति केली.

उर्वशीः—या नाटकाचे पांच अंक आहेत, व यांतील संविधानक एका प्राचीन दंतकथेवरून घेतलेलें आहे. ही दंतकथा निरनिराळ्या स्वरूपांत दृष्टीस पडते. कालिदासानें जिचा आधार घेतला आहे ती दंतकथा बहुतकरून मत्स्यपुराणावरून घेतली असावी. हें नाटक एकेकाळीं हिंदुस्थानांत बरेंच लोकप्रिय होतें, म्हणून त्यांत कसकसे फरक पडत गेले याविषयींची निश्चित माहिती आपणांस उपलब्ध आहे. साहित्यदर्पण ( ६. २५ ) यांत दिलेल्या माहितीवरून ह्या नाटकाचाहि प्रारंभ भासाच्या नाटकाप्रमाणेंच "नांद्यंते सूत्रधारः" येथूनच करण्यांत येत असे. कालांतरानें त्यांत फरक करण्यांत आले.

या नाटकाच्या हस्तलिखित प्रतींत इतके पाठभेद आहेत कीं, त्यांवरून या नाटकाच्या मुळांतच दोन प्रती होत्या कीं काय अशी शंका उत्पन्न होते. या नाटकाचें एक स्वरूप बंगाली प्रतींत व अनेक नागरी हस्तलिखित प्रतींत दिसून येतें. ह्यावर रंगनाथानें आपली 'विक्रमोर्वशी प्रकाशिका' या नांवाची टीका इ. स. १६५६ त लिहिली. सदर नाटकाचें दुसरें स्वरूप दक्षिण हिंदुस्थानांतलि बहुतेक हस्तलिखित प्रतींत दृष्टीस पडतें. त्यावर कोंडुविडु येथील रेड्डी राजपुत्र कुमारगिरी याचा मंत्री काटयवेम यानें इ. स. १४०९ मध्यें आपली टीका लिहिली आहे.

वर सांगितलेल्या नाटकाच्या दोन स्वरूपांपैकीं पहिल्या स्वरूपाच्या प्रतींत या नाटकास विक्रमोर्वशी असें ह्मणून त्यास 'त्रोटक' या सदरांत घातलें आहे. दुसऱ्या प्रतींत त्यास विक्रमोर्वशीय हें नांव देऊन 'नाटक' या सदरांत घातलें आहे.

नाटकाच्या या दोन स्वरूपांतील फरक त्याच्या चवथ्या अंकांत विशेषेकरून दृष्टीस पडतो उत्तर हिंदुस्थानांतील प्रतींत पुष्कळसे अपभ्रंश भाषेंत श्लोक असून ते कसे म्हणून दाखवावे व म्हणतांना कसे हावभाव करावे या विषयींच्या सूचना आहेत. परंतु दक्षिण हिंदुस्थानांतील प्रतींत तसला प्रकार दृष्टीस पडत नाहीं.

राजाच्या तोंडीं अपभ्रंश भाषेंत श्लोक घालणें अनुचित आहे, संविधानकाचा विकास करण्यास त्याचा यत्किंचितहि उपयोग होत नाहीं, उलट कांहीं अंशीं त्याचा अडथळा मात्र होतो. या मुद्यावर दक्षिण हिंदुस्थानांतील प्रत अधिक विश्वसनीय आहे, असें कै. शंकर पांडुरंग पंडित यांनीं आपल्या विक्रमोर्वशीय या नाटकाच्या आवृत्तींत म्हटलें आहे. परंतु पिशेलच्या मतानें बंगाली प्रतींत आपणांस अधिक शुद्ध प्राकृत दृष्टीस पडतें, आणि त्यांत आपणांस अधिक चांगले पाठहि उपलब्ध होतात.

अलीकडील कालांतील विक्रमोर्वशीय या नाटकाच्या ज्या हस्तलिखित प्रती उपलब्ध आहेत त्यांवरून बंगाली प्रत मूळची होती हें सिद्ध होत नाहीं. आणि चवथ्या अंकाचें ज्या ज्या ग्रंथांत अनुकरण केलें आहे, त्यांत अपभ्रंश भाषेंत श्लोक दृष्टीस पडत नाहींत ( उदाहरणार्थ भवभूति–मालतीमाधव, अंक ९; राजशेखर–बालरामायण, अंक ५; जयदेव–प्रसन्नराघव, अंक ६; महानाटक, अंक ४ ) इत्यादि विधानें आपणांस बंगाली प्रतीच्या विरुद्ध करतां येण्यासारखीं आहेत. अपभ्रंश श्लोकांच्या भाषेवरून ते फार जुने असावेत असें दिसतें. ते कधीं राजाच्या तोंडीं घातले नाहींत. परंतु भासाच्या बालचरित नाटकाच्या दुसऱ्या अंकांत ज्यावेळीं कंसाला निरनिराळ्या पिशाच्चांचें दर्शन होतें, त्या वेळच्या श्लोकांप्रमाणें ज्यांच्यांत गीत आहे अशा तऱ्हेचें नृत्य व मूकनाटय तीं गीतें उत्पन्न करतात; अपभ्रंश श्लोक आणि तत्पूर्वीचें गद्य भाषण यांच्यांत जे मधून मधून विरोध दृष्टीस पडतात, आणि इतक्या प्राचीनकाळीं अपभ्रंश कविता उत्पन्न झाली नसावी अशाबद्दलचीं जीं प्रमाणें आहेत, त्यांस अधिक महत्त्व दिलें पाहिजे. या नाटकास मागें ‘ त्रोटक ’ असें जें नांव देण्यांत आलें आहे, त्याचें कारण यांत अपभ्रंश श्लोक आहेत हें होय. खरोखर पाहूं गेलें तर याला ‘ नाटक ’ या सदरांतच घातलें पाहिजे. ज्या ठिकाणीं राजाचा व उर्वशीचा वियोग होतो म्हणजे ती जेव्हां कुमाराच्या उपवनांत जाते त्या ठिकाणीं अपभ्रंश श्लोकांची योजना केलेली आहे. त्या श्लोकांत राजानें उर्वशीला शोधणें, व उर्वशीच्या भेटीविषयीं त्याची आतुरता यांचें फार सुंदर वर्णन दिलेलें आहे.

अभिज्ञानशकुन्तला अथवा अभिज्ञानशाकुन्तलम्:—याचे सात अंक आहेत. हें एका आख्यायिकेच्या आधारावर रचलें आहे. ती आख्यायिका महाभारता( १ ६९ ते ७४ )वरून घेतली आहे. परंतु महाभारताच्या आख्यायिकेपेक्षां कालिदासाच्या नाटकांत बराच फरक केलेला दृष्टीस पडतो. हें नाटक भारतीय लोक फार उत्कृष्ट समजतात आणि म्हणून आज पर्यंत त्याच्या अनेक प्रती छापून प्रसिद्ध झाल्या आहेत. या नाटकांतील आख्यायिका ही एका स्वरूपाची नाहीं. आणि या नाटकाच्या जितक्या हस्तलिखित प्रती मूळांत होत्या तितकीं त्याचीं स्वरूपें दृष्टीस पडतात; बंगाली, देवनागरी, काश्मिरी व दक्षिण हिंदुस्थानांतील इतक्या या नाटकाच्या निरनिराळ्या प्रती आहेत, याशिवाय केवळ हस्तलिखित स्वरूपांत राहिलेली अशी एक मिश्र स्वरूपाची प्रतहि उपलब्ध आहे.

बंगाली प्रतीचें विल्यम जोन्स यानें भाषांतर केल्यामुळें ती प्रत यूरोपांत प्रथम प्रसिद्ध झाली. देवनागरी प्रतीचा ब्रॉकहॅन्स व वेस्टर गार्ड यांनीं शोध लाविला, या दोघां संशोधकांनीं जमविलेली सामुग्री त्यांनीं बोथलिंक याच्या हवालीं केली. त्यानें ती देवनागरी प्रत बॉन येथें स. १८४२ त प्रसिद्ध केली. दक्षिणहिंदुस्थानांतील प्रत पिशेलनें प्रकाशित केली. काश्मिरी प्रतीचा बुल्हरनें शोध लाविला व ती बर्खर्डे यानें प्रसिद्ध केली.

यांपैकीं तीन प्रतींवर भारतीय लेखकांनीं लिहिलेल्या टीका आहेत. बंगाली प्रतीला डमरुवल्लभ, शंकर, कृष्णनाथ व चंद्रशेखर इतक्या टीकाकारांची टीका आहे. देवनागरी प्रतीवर राघवभट्टाची व दक्षिणहिंदुस्थानांतील प्रतींवर अभिराम, श्रीनिवासाचार्य, मृत्युंजय, निःशंक भूपाल, काटयवेम व नारायणभट्ट इतक्या टीकाकारांच्या टीका आहेत.

देवनागरी प्रत ही बराच काळपर्यंत अगदीं मूळची प्रत अशी मानण्यांत येत होती. स्टेंझ्लर व रुकर्ट हे दोघेहि मात्र बंगाली प्रत तीहून अधिक चांगली आहे असें म्हणणारे होते. परंतु या मताचा पिशेल यानें खरा पुरस्कार केला. बंगाली प्रतीत प्राकृत भाषा अधिक शुद्ध स्वरूपांत दृष्टीस पडतात. व देवनागरी प्रतींतील निरनिराळे पाठ बंगाली प्रतीचें स्पष्टीकरण करण्यास उपयोगी पडण्यासारखे आहेत असें त्यानें सिद्ध केलें. लेव्हीचेंहि मत पिशेलप्रमाणेंच आहे. आणि हर्षानें व कालिदासाच्या पश्चात झालेल्या इतर कवींनीं बंगाली प्रतीचाच नमुना आपल्यापुढें ठेवला असावा असें त्यानें दाखविलें आहे. परंतु वेबरनें तितक्याच निश्चयात्मक रूपानें देवनागरी प्रतीबद्दल आपला अनुकूल असाच अभिप्राय दिला आहे, आणि अलीकडे चॅपेलर व कर्वेकर यांनींहि आपलें मत वेबरप्रमाणेंच दिलें आहे. बोलेनसेनच्या मतानें बंगाली प्रत व देवनागरी प्रत या दोन्हींहि मूळच्या असाव्या. परंतु देवनागरी प्रत ही कालिदासानें कदाचित प्रयोगाच्या सोयीकरितां तयार केली असेल. हल्लीं उपलब्ध असलेल्या अनेक प्रतींपैकीं एकहि प्रत मूळची कालिदासाची नसावी, असें अलीकडे बहुतेक लोकांचें मत आहे. प्राकृत भाषांच्या कमीअधिक शुद्ध स्वरूपाकडे पाहण्याची अलीकडील पद्धत पिशेलपेक्षां निराळी आहे. हल्लीं उपलब्ध असलेल्या प्राकृत व्याकरणाचे कर्ते जरी फार

प्राचीन नाहींत तरी त्यांचा काळ शाकुन्तल नाटकाच्या सर्व हस्तलिखित प्रतींपेक्षां अधिक प्राचीन आहे. आणि बंगाली प्रतीमध्यें जें प्राकृत भाषेचें शुद्ध स्वरूप दृष्टीस पडतें तें नाटकाच्या नकला करणारांच्या अधिक श्रेष्ठ ज्ञानाचा परिणाम आहे असें म्हणावें लागतें. बंगाली प्रतींतील अनेक पाठ हे मूळच्यासारखे दिसतात हें खरें आहे. तथापि कांहीं ठिकाणीं देवनागरी प्रत बंगाली प्रतींपेक्षां अधिक चांगली असल्याचें दिसून येतें. फक्त बंगाली प्रतींतच आढळणाऱ्या अनेक कवितांमध्यें दुसऱ्या कवितांची पुनरुक्ति केल्याचें दिसून येतें. शिवाय त्यांत विशेष प्रकारची काव्यप्रतिभाहि दृष्टीस पडत नाहीं. मूळची कालिदासाची प्रत कशी असावी हें हल्लीं उपलब्ध असलेल्या प्रतीवरून समजण्यासारखें नाहीं. आणि ती कधीं उपलब्ध होईल किंवा नाहीं याविषयीं आम्हांस हर्टेलप्रमाणेंच शंका आहे.

विशाखदत्तः—विशाखदत्त किंवा ज्यास कांहीं हस्तलिखित प्रतींत विशाखदेव असें म्हटलें आहे, हा ज्याला कोणी भास्करदत्त म्हणतात व कोणी पृथु म्हणतात अशा एका प्रधानाचा किंवा महाराजाचा मुलगा होता, आणि वटेश्वरदत्त नांवाच्या एका मांडलिक राजाचा नातू होता. हा प्रधान किंवा तो मांडलिक राजा हे कोण होते, याविषयीं आपणांस कांहींच माहिती उपलब्ध नाहीं.

मुसुलमानांच्या विरुद्ध लढत असतां इ. स. ११९२ मध्यें लढाईत जो कैद झाला तो चाहमान राजा पृथिराज तोच पृथु होता असें विलसननें म्हटलें आहे व विशाखदत्ताच्या नाटकांत ज्या म्लेच्छांचा उल्लेख केला आहे ते पाटणचे राजे होते असेंहि त्यानें म्हटलें आहे. विशाखदत्त हा इतक्या अलीकडचा कवि असावा हें मत आतां कोणासहि ग्राह्य वाटणार नाहीं, शिवाय त्याच्या नाटकांतील शेवटच्या श्लोकावरून त्याच्या कालाचा निर्णय करण्याकडे अलीकडे प्रवृत्ति झाली आहे.

या ग्रंथकाराच्या नाटकांत एके ठिकाणीं चंद्रगुप्त राजाला शुभाशीर्वाद देण्याचा प्रसंग आलेला आहे. कांहीं हस्तलिखित प्रतींत चंद्रगुप्ताच्या जागीं रंगीवर्मन, न्हंतवर्मन् किंवा वंतीवर्मन् म्हणजे अवंतीवर्मन् अशीं नांवें सांपडतात. ज्याच्या पुत्राचें कनोजच्या हर्षराजाच्या कन्येबरोबर लग्न झालें, असा मौखरी राजा अवंतीवर्मन त्याचाच येथें निर्देश केलेला आहे, असें तेलंग व त्याच्या अगोदर हिलेब्रँट यांचें मत होतें. परंतु याकोबीचें मत हा अवंतीवर्मा म्हणजे ज्यानें इ. स. ८८५ पासून ८९३ पर्यंत राज्य केलें, तो काश्मीरचा राजा होय असें होतें. याकोबीनें विशाखदत्ताच्या नाटकांत सांपडणाऱ्या ज्योतिषविषयक विधानांवरून तें नाटक इ. स. २ डिसेंबर ८६० या दिवशीं लिहिण्यांत आलें असावें असें निर्णीत केलें आहे. विशाखदत्तानें रत्नाकराचें अनुकरण केलें असेंहि त्यानें प्रतिपादन केलें आहे. परंतु रत्नाकरानेंच त्याचें अनुकरण केलें व हा रत्नाकर इ. स. ६०० मध्यें होऊन गेला असें प्रो. ध्रुवांचें मत आहे.

विशाखदत्ताची भाषा व लेखनपद्धति ही फार प्राचीन पद्धतीची दिसून येते, आणि पुष्कळ बाबतींत तो आपणांस भासाची आठवण करून देतो. ज्याप्रमाणें भासाच्या नाटकांत नाटकाच्या अगदीं प्रारंभीं सूत्रधार रंगभूमीवर येतो त्याचप्रमाणें विशाखदत्ताच्या नाटकाच्या एका उत्कृष्ट हस्तलिखित प्रतींत तोच प्रकार दृष्टीस पडतो व त्यावरून आपणांस भासाच्या प्रतिज्ञायौगंधरायण या नाटकाची आठवण होते, ह्याशिवाय त्या नाटकाच्या उत्कृष्ट हस्तलिखित प्रतींत शेवटल्या श्लोकांत चंद्रगुप्त असें नांव आहे, व चंद्रगुप्त नांवाच्या जागीं अवंतीवर्मन हें नांव घालण्याचा जो फरक झाला तो त्या नांवाच्या राजाच्या कारकीर्दींत सदर नाटकाचा प्रयोग झाल्यावरून झाला असावा असें दिसतें. हा चंद्रगुप्त पाटलिपुत्रांत राज्य करीत होता असें दिसतें. कारण ती त्याची राजधानी असल्याबद्दल नाटकांत सर्वत्र उल्लेख आहे.

ह्युएनत्संगच्या वेळीं पाटलिपुत्राचा पूर्ण नाश झाला होता व तेथील वस्तीहि उठून तें उजाड झालेलें होतें म्हणून विशाखदत्त हा अधिक प्राचीनकाळांत होऊन गेला असें आम्हांस वाटतें, आणि विशाखदत्ताचा आश्रयदाता गुप्तराजा, दुसरा चंद्रगुप्त हा असावा व विशाखदत्त हा कालिदासाच्या अगदीं मागोमाग होऊन गेला असावा असें आमचें इतर अनेक संशोधकांप्रमाणेंच मत आहे.

विशाखदत्ताच्या मुद्राराक्षस नांवाच्या नाटकांत सात अंक आहेत व त्याला धुंडिराज, रतिनाथ, महेश्वर, वटेश्वर आणि तदनंतर झालेल्या कांहीं ग्रंथकारांनीं टीका लिहिली आहे. या नाटकाचें संविधानक इ. स. पूर्वी चौथ्या शतकांत चंद्रगुप्त आणि चाणक्य यांनीं नंद घराण्यांतील राजांचें उच्चाटन केलें अशा तात्पर्याचें असून तें निरनिराळ्या आख्यायिकांवरून रचलेलें आहे.

हें नाटक मुख्यतः बृहत्कथेवरून रचलें आहे असें दशरूपावरील अवलोकटीकेंत म्हटलें आहे ( १. ६१ ) व यास त्याच्या विश्वनाथ टीकाकारानें बृहत्कथामंजरी ( १. २, २२६ ) हा आधार दिलेला आहे. परंतु हा अवलोकटीकेंतील सर्व भाग प्रक्षिप्त असावा असें आम्हांस वाटतें.

या नाटकास आधारभूत असलेल्या आख्यायिका बऱ्याच प्रख्यात होत्या. त्या आपणांस बृहत्कथेच्या काश्मिरी प्रतीवरून, हेमचंद्राच्या परिशिष्ट पर्वावरून, धुंडिराजाच्या मुद्राराक्षसावरील टीकेवरून आणि सिंहली कथेवरूनहि कळून येतात. इतकेंच नव्हे तर ह्या आख्यायिका यूरोपपर्यंतहि जाऊन पोहोंचल्या, ह्यावरून नाटककारानें अत्यंत लोकप्रिय झालेल्या संविधानकाचाच आधार आपल्या नाटकास घेतला व त्यामुळें नीतिशास्त्रतत्त्वें प्रसृत करण्याचा त्याचा हेतूहि सिद्धीस गेला.

चंद्रः—सुप्रसिद्ध वैय्याकरणी चंद्र किंवा चंद्रगोमिन् यांचेंहि नांव नाटककारांच्या पटांत दाखल केलें पाहिजे. म्हणजे तो केव्हां होऊन गेला याविषयींहि अद्याप एकमत नाहीं. त्याच्या "शिष्यलेखा" चा प्रकाशक मिनयेफ यानें तो चौथ्या शतकांत किंवा पांचव्या शतकाच्या प्रारंभीं होता असें म्हटलें आहे. परंतु जी गोष्ट त्यांनीं आपल्या डोळ्यांनीं पाहिली नाहीं परंतु जी त्याच्या आयुष्यांत घडली तिचें वर्णन करतांना त्यानें आपल्या "चंद्रवृत्ति" ग्रंथांत एका क्रियापदाचा अपूर्ण भूतकाळ योजिला आहे. या आधारावरून लिबिग यानें चंद्र हा ४६५ पासून ५४४ पर्यंत झाला असावा असें म्हटलें आहे. ज्या वाक्यांत त्यानें अपूर्ण भूतकाळाचा उपयोग केला आहे तें असें:- "अजयज्जर्तो हूणान्।" यावरून जाट राजानें हूणांवर जो जय मिळविला तो चंद्रगोमिनच्या हयातींत मिळविला असला पाहिजे असें लिबिगचें म्हणणें आहे. तथापि तो सातव्या शतकांत होऊन गेला असावा असें लेव्हीनें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. इत्सिंग यानें महासत्वचंद्र याची एक कविता उध्दृत केली आहे. ती कविता चंद्रगोमिन्‌ची म्हणजे चंद्रगोमिन्‌ची होती, असें सुभाषितवलि ३३६८ यांत म्हटलें आहे, आणि ती खरोखरच शिष्यलेखा या ग्रंथांत सांपडते. यावरून ज्यावेळीं इत्सिंग हिंदुस्थानांत होता त्यावेळीं चंद्र हयात होता असें लेव्हीचें म्हणणें आहे. परंतु यावर लिबिग म्हणतो कीं इत्सिंग हा चंद्रास नेहमीं चंद्रदास असें म्हणतो. आणि चंद्रगोमिन् अशारीतीनें संबोधित नाहीं आणि शिवाय काशिका या ग्रंथाचा कर्ता जो जयादित्य होता तो आपल्या पूर्वीं निवर्तून तीस वर्षें झालीं होतीं असें इत्सिंग म्हणतो. त्यानें चंद्राच्या व्याकरणाचा उपयोग केला आहे. यावरूनहि लिबिग हा आपल्या म्हणण्याचें समर्थन करतो. आतां इत्सिंगनें चंद्राची म्हणून जी कविता दिली आहे ती शिष्यलेखाच्या तिबेटी भाषांतरांत सांपडत नाहीं. यावरून इत्सिंगाचा चंद्रदास हा चंद्रगोमिनपासून निराळा असावा. वास्तव चंद्रगोमिन्‌चा काळ इ. सन ६५० च्या पूर्वी जातो, व तो जयादित्याच्या मृत्यूशीं आणि जाट राजानें हूण राजावर जो जय मिळविला त्याच्याशीं मिळता आहे. जाट राजा म्हणजे मालवराजा जो यशोधर्मन तोच दहुतकरून असावा. त्याचा मंदसोर येथील शिलालेख विक्रमसंवत् ५८९ या सालचा आहे. यावरून चंद्रगोमिन्‌चा काळ सहाव्या शतकाचा उत्तरार्ध असावा असें दिसतें.

चंद्रगोमिन्‌नें केलेलें लोकानंद नांवाचें नाटक आपणांस उपलब्ध आहे.तें एका मणिचूडाच्या आख्यायिकेवरून रचलेलें बौद्ध नाटक आहे. सदर नाटक अवदानशतक, आणि हर्षाचें नागानंद अशीं तिन्हींहि एकत्र करून व ज्यास तिबेटी भाषांतर जोडलें आहे असें एक पुस्तक तँजूरमध्यें उपलब्ध आहे. मणिचूडानें आपलीं बायकामुलें एका ब्राह्मणाच्या स्वाधीन केलीं व त्याच्या जवळचा राजा त्याचा हत्ति बळकविण्याची इच्छा करतो इत्यादि वर्णन सदर नाटकांत केलेलें आहे असें लेव्हीनें वर्णन केलें आहे. लेव्हि हा इत्सिंगनें निर्दिष्ट केलेला चंद्रदास व चंद्रगोमिन हे दोन्ही एकच म्हणतो. चंद्रदासानें विश्वंतर आख्यायिकेवर एक काव्य लिहिलें असें ऐकिवांत आहे. सदर काव्यगीत नृत्यासह पंच देशांत करीत असत. असें म्हटलें असल्यामुळें तें नाटक असावें. आतां चंद्रसेन व चंद्रगोमिन हे एकच होते असें जें लेव्हीनें म्हटलें आहे त्याविषयीं निश्चयात्मक निर्णय देतां येण्यासारखा नाहीं. त्याचप्रमाणें विश्वंतर नाटक व तुंजिन राजाच्या कारकीर्दीत एका चंदक किंवा चंद्रक या कवीनें एक नाटक लिहिलें असें जें कल्हणाच्या राजतरंगिणींत (२. १६) म्हटलें आहे, त्याचा काय संबंध होता हेंहि निश्चयानें सांगतां येण्यासारखें नाहीं. हा चंदक किंवा चंद्रक कवि व अभिमन्यु राजाच्या कारकीर्दींत असणारा जो वैय्याकरणी चंद्र किंवा चंद्रगोमिन राजतरंगिणींत ( १७६ ) उल्लेखिला आहे, तो भिन्न असावा. यावरून ते दोघे एक होते असें जें लेव्हीचें म्हणणें त्यास बाध येतो. बौद्ध कवीनें रचलेले दिसत नाहींत असे चंदक किंवा चंद्रक याचे श्लोक पुढील ग्रंथांत उपलब्ध होतात. सुभाषितावलि ( पृ. ३२ ६६, ६९, १६२९, २२७५), शार्ङ्गधरपद्धति ( पृ. ३५६५, ३५९६ ) व औचित्यविचारचर्चा (पृ. १२२, १२३,१२९,१३० ).

हर्षः—सर्व भारतीय नाटककारांमध्यें ज्याच्याकालासंबंधानें आपणांस निश्चयात्मक निर्णय करितां येतो असा नाटककार म्हटला म्हणजे रत्नावलि, प्रियदर्शिका व नागानंद ह्या तीन नाटकांचा कर्ता जो राजा श्रीहर्ष तो होय.

हर्ष किंवा श्रीहर्षवर्धन शिलादित्य हा भारतीय मध्ययुगीन राजांमध्यें अत्यंत प्रख्यात असा राजा होऊन गेला. त्यानें सर्व उत्तर हिंदुस्थानांत हिमालयापासून नर्मदेपर्यंत आपली राजसत्ता प्रस्थापित केली. त्याची राजधानी प्रथम स्थाण्वीश्वर येथें होती. स्थाण्वीश्वर हें हल्लींचें पंजाबांतील ठाणेश्वर हें होय. तदनंतर त्यानें गंगाकाठीं असलेलें व कनोज या नांवानें हल्लीं प्रसिद्ध असलेलें कान्यकुब्ज शहर ही आपली राजधानी केली. हा बाणभट्टरचित हर्षचरिताचा नायक असून त्यानें चिनी प्रवासी ह्युएनत्संग यास आपल्या दरबारीं आश्रय दिला होता. त्यानें ६०६ सालीं एका नवीन शकास प्रारंभ केला व ज्यांत कालाचा निर्देश केला आहे, असे त्याचे शिलालेखहि हल्लीं उपलब्ध आहेत. म्हणून त्याच्या काळाचा निश्चयानें निर्णय करतां येतो. तो काळ म्हणजे ६०६ पासून ६४८ हा होय.

त्याच्या नांवावर प्रसिद्ध असलेलीं जीं तीन नाटकें, त्यांचा तो खरोखरीच कर्ता होता कीं नाहीं ही गोष्ट वादग्रस्त आहे. मम्मटाच्या काव्यप्रकाशाच्या उपोद्घातांत ( १. २ ) असें सांगितलें आहे कीं श्रीहर्षादि राजांपासून धावकादि

कवींनां त्यांच्या काव्यकर्तृत्वाबद्दल पुष्कळसें धन प्राप्त झालें. यावर कांहीं टीकाकार असा तर्क करतात कीं धावकानें हर्षाच्या नांवावर रत्नावलि ही नाटिका लिहिली आणि त्याबद्दल त्यास हर्षाकडून चांगलें पारितोषिक मिळालें. परंतु यासंबंधानेंहि अनिश्चितपणा कायमचा आहे, कारण कांहीं हस्तलिखित प्रतींत जर 'धावक' असा पाठ आहे तर कांहींत 'बाण' असा आहे.

यावरून ह्या नाटकांचा बाण हाच खरोखरीचा लेखक होता असें हॉल व बुल्हर यांनीं अनुमान केलें आहे. परंतु रत्नावलि नाटिका ही बाणानें लिहिली व नागानंद नाटक हें धावकानें लिहिलें असें कॉवेल यानें आपलें मत दिलें आहे. पिशेल याच्या मतें हीं तिन्हीं नाटकें एकाच लेखकाचीं असावींत व त्याच्या मतानें तो लेखक धावक किंवा दुसरा कोणीतरी हर्षाचा समकालीन कवि असावा.

हर्षाच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या नाटकांच्या लेखनाचें श्रेय हर्षास कां देऊं नये, याविषयीं वेबरच्या मतानें समाधानकारक खुलासा करण्यांत आलेला नाहीं. हर्ष हा ग्रंथकार होता ही गोष्ट इतक्या प्राचीन काळींहि प्रसिद्ध होती कीं, हर्ष त्याच्या काळीं तरी निदान ग्रंथकार म्हणून प्रसिद्ध होता, याविषयीं शंका घेतां येण्यासारखी नाहीं. राजा शिलादित्य म्हणजे हर्ष यानें जीमूतवाहन याच्या आख्यायिकेवर एक काव्य लिहिलें, तें संगीताच्या चालीवर बसवून नृत्य व नकला यांच्या साहाय्यानें त्याचा प्रयोग केला वगैरे गोष्टी सातव्या शतकाच्या शेवटीं हिंदुस्थानांत येणाऱ्या इत्सिंगच्या नजरेस आल्या. वरील इत्सिंगच्या लिहिण्याचा सर्व रोंख नागानंद नाटकावर होता हें निःसंशय आहे. याशिवाय काश्मीरचा राजा जयापीड (७७९ ते ८१३ किंवा कांहींच्या मतानें ७५५ ते ७८६) याच्या पदरीं असलेल्या दामोदरगुप्तानें रत्नावलींतील उतारे देतांना ती नाटिका एका राजानें लिहिली असें म्हटलें आहे.

हर्षाच्या नांवावर असलेल्या नाटकांपैकीं दोन नाटकांचा तो कर्ता होता असा समज सातव्या व नवव्या शतकांत होता, आणि ज्याअर्थीं तिन्हींहि ग्रंथ एकाच ग्रंथकाराचे होते त्याअर्थीं तो सर्व नाटकांचा कर्ता होय असें आपण मानलें पाहिजे. मम्मटाचें म्हणणें नीटपणें न समजून त्याच्या टीकाकारांनीं वरीलप्रमाणें त्याच्या म्हणण्याची मीमांसा केली असावी. जर "बाण" हा पाठ बरोबर असेल तर त्यानें "हर्षचरित" लिहिल्याबद्दल राजानें त्याला योग्य पारितोषक दिलें हा अर्थ सहज लागण्यासारखा आहे. त्याच्या पदरच्या पंडितांनीं त्याला ग्रंथरचनेच्या कामीं मदत केली असावी या गोष्टींत अस्वाभाविक व असंभवनीय असें कांहीं नाहीं.

हर्षाच्या नाटकांमध्यें रत्नावलि ही नाटिका प्रथम प्रकाशित झाली. त्या नाटिकेंत चार अंक आहेत. जिचा पूर्ण विकास झाला आहे अशा प्रकारची नाटिका आपणांस या हर्षाच्या कृतींतच पाहावयास सांपडते.

आपल्या राजास सार्वभौम पद प्राप्त व्हावें म्हणून उदयनाचा मंत्रि जो यौगंधरायण हा उदयन राजाचा व सिंहलराजकन्या रत्नावलि यांचा विवाहसंबंध घडवून आणण्याचा प्रयत्न करतो. ज्या नौकेंतून रत्नावलि समुद्रप्रयाण करते ती नौका खडकावर आपटते. या संकटांतून निभावल्यानंतर सागरिका या नांवानें रत्नावलि वासवदत्ता राणीच्या आश्रयास राहते. ज्या उदयनराजाचा व तिचा विवाहसंबंध व्हावयाचा होता त्यास ती येथें पाहते आणि त्याच्या प्रेमांत गुरफटून जाते. प्रथम तिची प्रतिकृति उदयनाच्या दृष्टीस पडते, नंतर तो तिला प्रत्यक्ष पहातो व तिचें आपणावर प्रेम आहे असें त्याला समजून येतें आणि तोहि तिच्यावर मोहित होतो. त्यांच्या भेटीमध्यें राणी वासवदत्ता व्यत्यय आणते. दुसऱ्या एका प्रसंगीं त्यांच्या भेटीचा संकेत ठरला असतां त्याची बातमी वासवदत्तेस लागते आणि तीच सागरिकेचा वेष घेऊन संकेतस्थानीं जाते. तिला सागरिका समजून राजा प्रणयप्रदर्शनाचा अतिरेक करतो; त्यावर राणी आपलें खरें रूप प्रगट करते आणि रागानें निघून जाते. नंतर खऱ्या सागरिकेची भेट झाल्यावर तिला वासवदत्ता समजून राजा तिची परोपरीनें क्षमा मागतो. सागरिकेला वासवदत्ता समजण्यांत आपली चूक झाली असें समजून आल्यावर त्याला फार आनंद होतो परंतु त्यांच्या भेटींत राणीकडून फिरून बिघाड करण्यांत येतो. इतकेंच नव्हे तर ती सागरिकेला कोंडूनहि ठेवते. तिला उज्जयिनीस पाठविलें अशीहि बातमी लौकरच राजाच्या कानीं येते परंतु तिकडे जाण्यापूर्वी ती आपली रत्नावलि ( माला ) राजाकडे पाठवून देते. नंतर राजाच्या सैन्यास जय मिळाला अशी बातमी कानावर येते व राणीची भाची रत्नावलि हिला पाठविली असतां तिची नौका खडकावर आपटून फुटली इत्यादि हकीकत सिंहली वकील निवेदन करतात. इतक्यांत एकदम राजवाड्यास आग लागते त्यामुळें अजून सागरिका राजवाड्यांतच कोंडली आहे तिला आगींतून वांचवावें असें वासवदत्ता धावऱ्या धावऱ्या येऊन राजास सांगते. राजा एकदम राजवाड्यांत शिरतो व सागरिकेस सोडवून घेऊन येतो, त्यानंतर सागरिका म्हणजे दुसरी तिसरी कोणी नसून ती रत्नावलिच आहे या गोष्टीचा उलगडा होतो. हा सर्व व्यूह यौगंधरायण यानें रचला व राजवाड्यास जी आग लागली ती खरी नसून तो एक जादूगाराकडून यौगंधरायणानेंच चमत्कार घडवून आणला होता, ह्या सर्व गोष्टी पुढें उघडकीस येतात. त्यानेंच वासवदत्ता वारल्याची खोटीच अफवा उठविलेली असते कारण एरवीं सिंहल राजानें आपली कन्या उदयनास दिली नसती. राजाची व रत्नावलीची भेट होऊन त्यांची एकमेकांवर प्रीति बसावी या हेतूनें त्यानेंच तिला राजवाड्यांत आणिलें होतें. शेवटीं राणीच्या अनुमतीनें रत्नावलीचा व राजाचा विवाह होतो.

प्रियदर्शिकाः—या नाटिकेचें संविधानक वरच्यासारखेंच आहे. प्रियदर्शिका ही अङ्ग राजाची कन्या होती, व तिचें आणि उदयनाचें लग्न व्हावयाचें ठरलें होतें परंतु कलिंग राजाच्या मनांत तिला वरण्याचें असल्यानें त्यानें अङ्गावर स्वारी केली. प्रियदर्शिकेला विंधकेतु राजानें बलात्कारानें नेलें त्यामुळें उदयनाच्या सैन्यानें त्याच्या राज्यावर चालून जाऊन त्याची बरीच नासाडी केली. तदनंतर प्रियदर्शिकेची सुटका करून आरण्यिका या नामांतरानें तिचा उदयनाच्या अंतःपुरांत प्रवेश होतो. या ठिकाणीं तिचें व राजाचें प्रेम जमतें. ज्यांत आपली व उदयनाची उज्जयिनीमध्यें भेट झाली आहे असें एखादें नाटक करविण्याची वासवदत्ता राणीस इच्छा होते. या नाटकांत आरण्यिकेनें वासवदत्तेची भूमिका घ्यावी असें ठरतें व राजानें उदयनाची भूमिका घ्यावी असें विदूषक राणीच्या नकळत घडवून आणतो. परंतु इतकी उघड गोष्ट राणीला कळल्यावांचून रहात नाहीं व त्यामुळें ती आरण्यिकेला बंदींत टाकिते. अङ्ग राजा हा राणीचा चुलता होता त्यामुळें तिनें जेव्हां त्याच्यावर शत्रूंनीं स्वारी केली आहे असें ऐकलें तेव्हां त्यास उदयन राजाकडून मदत कां होत नाहीं असें ती त्यास विचारते, परंतु जें कांहीं करावयाचें होतें तें सर्व केलें असून अङ्ग राजावरच्या संकटाचें निवारण केलें आहे असें राजा तिला आश्वासन देतो. हें ऐकून राणीस हर्ष होतो व ती आरण्यिकेस बंधमुक्त करते. पुढें आपली चुलत्याची कन्या प्रियदर्शिका हीच आरण्यिका आहे अशी राणीला ओळख पटते आणि म्हणून ती आपण होऊनच तिचा व राजाचा विवाह घडवून आणते.

नागानंदः—हें बौद्ध नाटक असून त्यांत पांच अंक आहेत. त्यांतील संविधानक 'बृहत्कथा' नांवाच्या कथा व आख्यायिका यांच्या संग्रहांतून घेतलें आहे. कांहीं हस्तलिखित प्रतींत तें विद्याधरजातकांतून घेतलें असें म्हटलें आहे. सदर नाटकाचा नायक जो जीमूतवाहन तो बोधिसत्त्व होता, इतकें समजून चालावें या नाटकांतील कथानक असें—

विद्याधराच्या राज्याचा वारस जो जीमूतवाहन तो वनवासांत असणाऱ्या आपल्या आईबापांच्या सेवेंत नेहमीं तत्पर असे. तो अरण्यांत असतां त्याची व सिद्धराजकन्या मलयवती हिची गांठ पडून त्यांचें एकमेकांवर प्रेम जडतें. मध्यंतरीं थोडासा गैरसमज झाला होता तो दूर होऊन त्यांचा विवाहहि होण्याचें निश्चित झालें. तदनंतर ज्यांत एक दारू प्यालेला विट विदूषकासच आपली प्रिया समजतो असा प्रवेश झाल्यावर नवविवाहित असें जीमूतवाहनव मलयवती यांचें जोडपें दृष्टीस पडतें. जीमूतवाहन हा अतिशय व्यवस्थित व सभ्य वर्तनाचा होता व त्याची पत्नी फार लाजाळू होती. इतक्यांत आपल्या राज्यावर शत्रू स्वारी करणार आहेत. अशी बातमी जीमूतवाहनाच्या कानावर येते परंतु युद्ध किंवा कोणच्याहि तऱ्हेचा अत्याचार घडूं नये अशी जीमूतवाहनाची मनापासून इच्छा असते. कारण तो सात्त्विक असून त्यानें बौद्ध धर्माची दीक्षा घेतलेली असते व त्याचें सर्व लक्ष आध्यात्मिक उन्नतीकडे होतें. नंतर ज्या ठिकाणीं मारलेल्या नागांच्या हाडांचा भला मोठा ढीग पडला आहे अशा समुद्रकिनाऱ्यावर तो आपल्या दृष्टीस पडतो. इतर नागांस न कळवितां आपणास मी रोज एक नागाचा बळी देईन असा करार नागराजानें गरुडाशीं केलेला असतो. आतां अशा रीतीनें बळी जाण्याची ज्या नागाची पाळी असते त्याच्या जागीं आपल्या स्वतःचा बळी द्यावयाचा असें जीमूतवाहन ठरवितो व त्याप्रमाणें होतें. तेव्हां गरुडानें त्याचा संहार केला हें सर्व वर्तमान त्याच्या आप्तांस व पत्नीस समजल्यावर ते त्याचा शोध करतात. तेव्हां गरुडानें जरी जीमूतवाहनाचा संहार केल्याचें ऐकलें तरी तो अद्याप जिवंत आहे असें त्यांस समजतें. आपण दुसऱ्याकरितां आपला प्राण खर्ची घातला याबद्दल नागानंदाला फार आनंद होतो. पुढें तो मृत्यु पावल्यावर त्याचे बांधव त्याच्या मागून जाण्याची इच्छा करतात. परंतु मलयवती गौरीची आराधना करते व ती जीमूतवाहनास व मृत नागांस फिरून जिवंत करते व यापुढें आपण त्यांची हत्या करणार नाहीं असें गरुडहि अभिवचन देतो.

भट्टनारायणः—भट्टनारायण हा अतिशय लोकप्रिय असलेल्या वेणीसंहार या भारतीय नाटकाचा कर्ता होता. सदर नाटकांतील प्रास्ताविक भाषणावरून तो मृगराज लक्ष्मण या नांवानेंहि प्रसिद्ध होता असें समजतें. परंतु यापलीकडे त्याचा काळ व चरित्रक्रम याविषयीं विश्वसनीय माहिती उपलब्ध नाहीं. आनंदवर्धनाच्या 'ध्वन्यालोकां'त त्याच्या ग्रंथांतील उतारा दिला असल्यामुळें तो नवव्या शतकाच्या मध्यांत प्रसिद्धीस आलेला कवि होता असें दिसतें. कान्यकुब्जाचा राजा आदिशूर किंवा आदीश्वर यानें त्या नांवाचा जो ब्राह्मण बंगालमध्यें बोलाविला होता, तो व भट्टनारायण कवि हे एकच होत असें विल्सनसाहेबाचें मत आहे. या मतास वेणीसंहाराचा भाषांतरकार शौरींद्रमोहन टागोर यानें दुजोरा दिला आहे आणि आपणहि त्या भट्टनारायणाचे वंशज आहोंत असें सदर भाषांतरकारानें म्हटलें आहे.

या आदिशूरासंबंधानेंहि आपणास कांहीं विश्वसनीय माहिती नाहीं. पाल राजघराण्याच्या पूर्वी जें राजघराणें बंगालवर राज्य करीत होतें त्याचा तो मूळ पुरुष होता, असा समज आहे. या राजघराण्यांत एकंदर अकरा राजे झाले. आणि यावरून आदिशूर हा आठव्या किंवा नवव्या शतकांत झाला असावा असें विल्सनचें म्हणणें आहे. परंतु तो सातव्या शतकांत झाला असावा असें लॉसनचें व साहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत झाला असावा असें ग्रिलचें मत आहे.

हर्षाचा राज्यविस्तार बंगाल्यांतहि झाला होता व त्याचा समकालीन जो मगध राजा माधवगुप्त त्याचा पुत्र आदित्यसेन यानें कान्यकुब्ज राजाच्या पारतंत्र्यांतून आपणांस मुक्त

करून घेतलें असें आपणांस अन्य पुराव्यांवरून समजतें.आदिशूर राजघराण्याच्या मागून जे पाल राजघराणें अधिकारारूढ झालें त्याच्या हातांत आठव्या शतकाच्या मध्यापर्यंत राजसत्ता होती हेंहि आपणास दिसून येतें. म्हणून आदिशूर राजाचा काळ हर्ष व पाल राजघराणें या दोन कारकीर्दीच्या मध्यें होता असें म्हणावें लागतें. हा काळ बंगाल्यांत मोठा खळबळीचा होता आणि ज्यांत अकरा राजे होते, असें आदिशूर राजघराणें व त्याचप्रमाणें ज्यांत अकरा राजे होते असें मगधाचें गुप्त घराणें, हीं दोन्ही घराणीं एकच होतीं असें संभवनीय दिसतें. आदिशूरानें कान्यकुब्जाच्या वर्चस्वांतून आपली सुटका केली ही गोष्ट सिद्ध करतां आली म्हणजे कान्यकुब्जांतून ब्राह्मण कां बोलाविले या गोष्टीचा सहज उलगडा करतां येण्यासारखा आहे. आदिशूर व आदित्यसेन हे दोन्ही एकच होते असेंहि आपणांस म्हणतां येईल. कारण ६७१ या सालचा एक शिलालेख आपणांस उपलब्ध आहे. परंतु हल्ली उपलब्ध असलेल्या माहितीवरून आम्हांस निश्चयात्मक असें कांहींच विधान करतां येत नाहीं. तथापि भट्टनारायण हा सातव्या शतकाच्या उत्तरार्धांत होता या म्हणण्याला कसलाहि विरोध येईल असें वाटत नाहीं.

वेणीसंहार हें षष्ठांकी नाटक आहे व त्यांतील कथानक महाभारतांतून घेतलें आहे.कौरवांनीं द्रौपदीचा अपमान केल्या वर तिनें आपली वेणी मोकळी सोडली व तिच्या अपमानाचा सूड उगविण्याची भीमानें प्रतिज्ञा केली. दुर्योधन कोणत्याहि प्रकारच्या समेटाला कबूल होईना आणि त्यामुळें युद्धास सुरवात झाली. पुढें एकामागून एक वीर धारातीर्थी कसे पडले याची हकीकत यांत दिली आहे आणि शेवटीं भीम व अर्जुन यांनीं दुर्योधनाला आव्हान केलें आहे. तो पळून जात असतां त्यास गांठून भीमानें त्याच्यावर प्रहार केला व शेवटीं द्रौपदीची बेअब्रु केल्याचा चांगला सूड घेतल्यावर भीमानें द्रौपदीची फिरून वेणी घातली आहे.

**भवभूति.**—कालिदासाव्यतिरिक्त भारतनिवासी लोक भवभूतीइतका मान इतर कोणत्याहि नाटककारास देत नाहींत. कांहींच्या मतानें उत्तररामचरित्रांत तर त्यानें कालिदासावरहि ताण केली आहे.

विदर्भ देशांत पद्मपुर येथें उदुंबर नांवाचें ब्राह्मणकुटुंब रहात होतें त्यांत माझा जन्म झाला असें त्यानें स्वतःच म्हटलें आहे. त्याचें घराणें काश्यपगोत्री व तैत्तिरीय शाखीय होतें. त्याचा बाप नीलकंठ हा भट्टगोपालाचा पुत्र होता आणि त्याचा पांचवा पूर्वज हा मोठा यज्ञयाग करणारा व कवि होता. त्याच्या आईचें नांव जातुकर्णी असून त्याला स्वतःला श्रीकंठ असें म्हणत. तो एका ज्ञाननिधीचा शिष्य होता, पण हा ज्ञाननिधि कोण, याविषयीं कांहींएक माहिती उपलब्ध नाहीं.

मालतीमाधवाच्या कांहीं हस्तलिखित प्रतींत सातव्या शतकांत होऊन गेलेल्या सुप्रसिद्ध कुमारिलभट्टाचा भवभूति हा शिष्य होता व कुमारिलभट्टाच्या 'मीमांसावार्तिकेवर' टीका लिहिणारा जो मीमांसाध्यापक अंबेक तो व भवभूति एकच होत असें म्हटलें आहे.डॉ.भांडारकर हे आपण मीमांसेचा अभ्यास केला असें जरी म्हणत नाहींत तरी ते भवभूतीसंबंधीं वरील विधान बरोबर असल्याबद्दल आपलें मत देतात. भवभूतीनें आपल्या प्रत्येक नाटकाच्या प्रस्तावनेंत स्वतःस पदवाक्यप्रमाणज्ञ असें म्हटलें आहे, यावरून त्यानें व्याकरण, न्याय आणि मीमांसा यांचें अध्ययन केलें होतें असा इतरांचा तर्क आहे.

भवभूति हा कान्यकुब्ज देशाचा राजा यशोवर्मन् याच्या पदरीं असलेला राजकवि होता असें राजतरंगिणींत ( ४. ४४ ) म्हटलें आहे. यशोवर्मन् राजाचा, काश्मिरचा राजा जो मुक्तापीड ललितादीप्त यानें आठव्या शतकाच्या पूर्वार्धांत पराभव केला. यशोवर्म्याचें गुणवर्णन करण्याकरितां जें गौडवाहू काव्य लिहिलें आहे त्यांत ( ५.७९९ ) भवभूतीसंबंधानें अशा तऱ्हेचा उल्लेख केला आहे कीं, त्यावरून तो यशोवर्मन्चा पराभव झालेला पाहण्यासहि जिवंत नसावा आणि म्हणून तो सातव्या शतकाच्या शेवटीं व आठव्या शतकाच्या प्रारंभीं झाला असावा असें वाटतें. त्यानें आपलें सर्व आयुष्य कान्यकुब्ज येथें घालविलें नाहीं हें निश्चित आहे. त्यानें आपलीं तीन्ही नाटकें कालप्रियनाथाच्या यात्रोत्सवप्रसंगाकरितां लिहिलीं होतीं. हा कालप्रियनाथ म्हणजे उज्जयिनीचा महाकाल होय. यावरून भवभूतीचा काळ बहुतेक निश्चित आहे व तो कालिदासाचा समकालीन असल्याबद्दल जी शास्त्री लोकांची समजूत आहे त्या समजुतीला वस्तुस्थितीचा आधार नाहीं.

काश्मीरच्या जयापीड राजाचा ( सन ७७९ ते ८१३ ) मंत्री जो वामन यानें व इतर अनेक साहित्यशास्त्रकारांनीं भवभूतीच्या ग्रंथांतील उतारे घेतले आहेत. भवभूतीनें 'महावीरचरित,' 'मालतीमाधव' व 'उत्तररामचरित' अशीं तीन नाटकें लिहिलीं व तीं वरील क्रमानेंच लिहिलीं, ही गोष्ट सर्वांस मशहूर आहे.

वरीलपैकीं पहिलें व शेवटचें हीं रामकथाविषयक आहेत. भवभूति हा रामायणांतील कथाभाग घेऊन त्याच्यावर नाटक रचणारा पहिलाच नाटककार होय असा आजपर्यंत समज होता ,परंतु आतां त्याच्यापूर्वी होऊन गेलेल्या भास नाटककारानें रामायणांतील कथाभागावर नाटकें रचलीं होतीं असें कळून आलें आहे. भवभूतीचें दुसरें नाटक हें प्रकरण असून ज्यांत विदूषक दृष्टीस पडत नाहीं अशा प्रकारचें हें पहिलेंच नाटक असल्यामुळें त्याचें महत्त्व आहे. निरनिराळ्या सुभाषितसंग्रहांत भवभूतीच्या नांवावर अशा कांहीं कविता आढळतात कीं, ज्या त्याच्या सुप्रसिद्ध नाटकांत दृष्टीस पडत नाहींत; यावरून या ग्रंथकाराचे इतरहि ग्रंथ असावे व ते कालगतीनें नष्ट झाले असावे असें वाटतें.

**महावीरचरितः**—या सात अंकी नाटकांत रामाचा कथाभाग वर्णन केला आहे. त्याच्यामागून झालेल्या राम

नाटकांत त्याचेंच अनुकरण केलेलें आहे. या नाटकांत रामकथेचे सर्वच भाग दाखविण्यांत येत नसून ते कांहीं पात्रांच्या मुखानें प्रेक्षकांस कळविण्यांत येतात. याप्रमाणें राम व सीता यांच्या पहिल्या भेटीपासून राज्यारोहणाकरितां त्यांच्या अयोध्येंत परत येण्यापर्यंत रामायणांतील मुख्य मुख्य कथाभाग नाटकरूपानें दाखवितां येण्यासारखा होता. परंतु भवभूतीनें केवळ पहिलाच भाग म्हणजे पांचव्या अंकाच्या शेहेचाळीसाव्या कवितेपर्यंत स्वतः लिहिला व यापुढील भाग सुब्रह्मण्य कवीनें लिहिला अशी आख्यायिका प्रचलित आहे.

उत्तररामचरित्रः—हेंहि नाटक सप्तांकी असून यांत महावीरचरित्रांतील कथाभाग पुढें चालू ठेवून लोकापवाद कानीं आल्यामुळें रामानें वनामध्यें सीतेचा त्याग केला व ती गरोदर असल्यामुळें तिनें दोन पुत्रांस जन्म दिला व त्या दोन पुत्रांस वाल्मिकीनें शिक्षण दिलें इत्यादि प्रकार वर्णन केले आहेत. जेथें पूर्वी राम आणि सीता यांनीं एकमेकांच्या सहवासांत काळ घालविला तेथें जेव्हां राम फिरून जातो, तेव्हां सीता त्याच्याजवळ असूनहि त्याच्या दृष्टीस पडत नाहीं. त्यांचे पुत्र जे कुश आणि लव हे वाल्मिकीपासून रामायण शिकतात. रामाच्या अश्वमेध यज्ञांतील अश्व धरण्याची लवास इच्छा होते. रामहि त्या ठिकाणीं प्राप्त होतो व त्या तपोवनांत वाल्मिकीनें केलेल्या नाटकाचा त्यावेळीं चालू असलेला प्रयोग दृष्टीस पडतो आणि त्या प्रयोगावरून सर्व गोष्टींचा उलगडा होतो आणि शेवटीं रामाचें व सीतेचें पुनर्मीलन होतें.

हीं दोन्हीहि रामनाटकें आपल्या कल्पनेप्रमाणें नाटक या सदराखालीं येत नाहींत. परंतु दोहींतहि मार्दव व काव्यप्रतिभा आणि निसर्गाचें यथावतवस्तुनिरूपण अतिशय सोज्वल रीतीनें दृष्टीस पडतें व त्यावरून भवभूति हा इतका लोकप्रिय कसा झाला हें कळून येतें.

मालतीमाधवः—हें दशांकी प्रकरण असून बहुधां भवभूतीचें कपोलकल्पित नाटक असावें. भूरिवसु नांवाच्या प्रधानानें आपली कन्या मालती व आपला जुना मित्र जो विदर्भदेशाचा प्रधान देवरात त्याचा पुत्र माधव यांचा विवाह घडवून आणण्याच्या कामावर कामंदकी या बुद्ध योगिनीची योजना केली असते. देवरातहि आपल्या पुत्रास कुंडिनपुराहून पद्मावतीस पाठवितो. परंतु नंदन हा राजाचा नर्मसुहृद असून त्याच्या मनांत मालतीला वरावयाचें होतें. त्यामुळें ज्या योगानें मालती व माधव हें एकमेकांच्या प्रेमांत गुंतून आपल्या आईबापांच्या अनुज्ञेवांचूनहि आपला विवाह लावतील असें कार्य कामंदकीला घडवून आणवावयाचें असतें. आणि असें झालें तरच नंदनाच्या बाबतींत राजाचा निरुपाय होण्याचा संभव होता. याप्रमाणें मालती व माधव एकमेकांवर प्रेम करूं लागतात, व माधवाचा मित्र मकरंद याचें व नंदनाची बहीण मदयंतिका हिचें प्रेम जडतें. माधव व मालती यांच्या एका भेटीच्या प्रसंगीं मदयंतिका ही एका वाघाच्या तावडींत सांपडण्याच्या बेतांत असते. परंतु त्या अरिष्टापासून मकरंद तिची सुटका करतो. मकरंदाची व वाघाची झटापट चालूं असतां मकरंदास जखम होते यामुळें तर मदयंतिकेच्या व त्याच्या प्रणयाचें अधिकच दृढीकरण होतें. परंतु यानंतर त्यांची परिस्थिति बरीच बिकट होत जाते. मालतीनें नंदनास वरावें अशाबद्दल राजाची खटपट चालू होते. आपणांस कांहींतरी दैवी शक्ति प्राप्त व्हावी, अशा इच्छेनें माधव स्मशानांत जाऊन मनुष्यमांस विक्रीचें कार्य करूं लागतो. येथें कापालिक अघोरघंटानें करालादेवीस बळी देण्यास चालविलेली मालती त्याच्या दृष्टीस पडते व तो तिची सुटका करतो. परंतु त्यायोगानें त्यानें व अघोरघंटाची शिष्या कपालकुंडला हिचें वैमनस्य उत्पन्न होतें. मालतीला नंदनाकडे नेण्याची वेळ जवळ येतांक्षणींच कामंदकी मालती माधव यांचा गुप्तरीतीनें विवाह घडवून आणते आणि मकरंदाला मालतीचा वेष देऊन नंदनाकडे पाठविते. विवाहरात्रीं या सोंगाड्या मालतीचें नंदनाशीं इतक्या बेपर्वाईचें वर्तन असतें कीं त्यामुळें नंदनाला अतिशय संताप येतो व तो तेथून निघून जातो. तदनंतर मदयंतिका आपल्या भावजयीची म्हणजे त्या सोंगाड्या मालतीची भेट घेण्यास येते व तेथें आपल्या मित्रांचें अनुकरण करून आपल्या आईबापांची अनुज्ञा न घेतांच आपला विवाह लावण्याचा मकरंद व मदयंतिका यांचा विचार होतो. तदनंतर मकरंद गांवाबाहेर जात असतां त्याची व पहारेकऱ्यांची झटापट होते. माधव त्याच्या मदतीस धांवून जातो. ही माधवमकरंदाची व पहारेकऱ्यांची झुंज राजाच्या नजरेसमोर होते. त्यामुळें राजाच्या मनांत त्या दोन तरुणांविषयीं प्रेम उत्पन्न होऊन तो त्यांच्या विवाहाला आपली अनुमति देतो. परंतु इतक्यांत कपालकुंडलेनें मालतीस धरून नेल्याची दुष्ट वार्ता कानावर येते व त्यामुळें माधवास अत्यंत उद्विग्नता प्राप्त होते व उर्वशीनाटकाच्या चौथ्या अंकांत ज्याप्रमाणें पुरूरवा याला आपली प्रियतमा सर्वत्र दृष्टीस पडते त्याप्रमाणेंच माधवाचीहि स्थिति होते. या ठिकाणीं पुरूरव्याच्या विरहावस्थेप्रमाणेंच माधवाच्या विरहावस्थेचें वर्णन केलें आहे. इतक्या संकटांतून गेल्यानंतर नाटकाच्या शेवटीं नायकनायिकेचें मधुरमीलन दाखविलें आहे.

यशोवर्मन्ः—भवभूतीचा आश्रयदाता कान्यकुब्जचा राजा यशोवर्मन् यानेंहि रामकथेवर प्रतिकूल टीका करून "रामाभ्युदय" नांवाचें नाटक लिहिलें. आनंदवर्धन यानें आपल्या ध्वन्यालोकांत, धनिकानें आपल्या दशरूपांत ( १.४२ ) आणि साहित्यदर्पणांत ( ६. १४२ ) या नाटकाचा उल्लेख केलेला आहे. परंतु त्याची हस्तलिखित प्रत अद्याप उपलब्ध झाली नाहीं.

अनंगहर्ष मात्रराजः—अनंगहर्ष मात्रराज हा नरेंद्रवर्धन याचा पुत्र होता. त्यानें 'तापसवत्सराजचरित' या नांवाचें

नाटक लिहिलें. आनंद व त्याचा टीकाकार अभिनवगुप्त यांनीं सदर नाटकाचा उल्लेख केलेला आहे. आनंदवर्धन हा नवव्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला असल्यामुळें अनंगहर्ष हा त्याच्या आधीं झाला असावा हें उघड आहे. शिवाय त्यानें रत्नावलीचा उपयोग केला असें दिसत असल्यामुळें त्याचें नाटक सातव्या व नवव्या शतकाच्या दरम्यान लिहिलें असावें असें हुल्टस्चें मत आहे.

तापसवत्सराजचरितांत भासाच्या स्वप्नवासवदत्ता या नाटकांतीलच कथाभाग आहे. पण त्यांत पुढील भाग नवीन आहे. वासवदत्तेच्या निधनाची वार्ता कानीं आल्यावर उदयन विरक्त होतो, आणि पद्मावतीहि यौगंधरायणानें राजाची प्रतिमा तिच्या हवालीं केल्यापासून प्रेमानें वेडी होते, आणि शेवटीं विरक्त होते. या नाटकांत उदयन व वासवदत्ता यांच्या भेटीचा प्रवेश नाहीं. शेवटीं जेव्हां दोघेहि वैतागून अग्निकाष्ठ भक्षण करण्याच्या बेतांत असतात त्यावेळीं त्यांची प्रयाग येथें गांठ पडते. अखेर सर्व गोष्टींचा उलगडा होतो व राजाच्या सैन्यालाहि जय मिळाल्याची बातमी रुमण्वताकडून समजते.

मायुराजः—'उदात्तराघव' या नाटकांतील उतारे साहित्यशास्त्रकारांनीं दिले आहेत. सदर नाटकाचा प्रथम दशरूपाच्या अवलोकटीकेंत ( २. ५४ ) उल्लेख केलेला आढळतो. सदरहू नाटक भासप्रणीत आहे, असा समज दक्षिण हिंदुस्थानांत जिकडे तिकडे प्रचलित आहे. परंतु हा समज खरा असणें शक्य नाहीं. कारण हें नाटक मायुराजानें लिहिलें असें दशरूपाच्या अवलोकटीकेंत ( ३. २२ ) स्पष्ट म्हटलें आहे, असें भट्टनाथ स्वामिन् यानीं दाखविलें आहे.

भट्टनाथ स्वामींनीं मायुराजाविषयींची वरीचशी माहिती एकत्र केली आहे. राजशेखराच्या एका कवितेंत त्याला करचूली म्हटलें आहे तर त्याच कवितेच्या दुसऱ्या एका पाठांत त्यास कलीचूरी असें म्हटलें आहे. यावरून त्याचा जन्म कलचुरी घराण्यांत झाला असावा असें दिसून येतें. मायुराजाच्या कांहीं कविता निरनिराळ्या सुभाषितसंग्रहांत उद्धृत केलेल्या दृष्टीस पडतात. याशिवाय त्याची आपणास कांहीं माहिती नाहीं. ज्याअर्थी राजशेखरानें त्याची स्तुति केली आहे, त्याअर्थीं तो नवव्या शतकाच्या पूर्वीं झाला असावा. त्याप्रमाणेंच तो भवभूतीनंतरहि झाला असावा असें वाटतें; त्याला राजा हा किताब लावण्यांत आला असल्यामुळें तो कलचुरी घराण्यांतील राजा असावा. परंतु सहा, सात व आठ या शतकांतील कलचुरी घराण्याचा इतिहास बहुतेक अज्ञातच असल्यामुळें आठव्या शतकाच्या मध्यापासून ते नवव्या शतकाच्या अखेरपर्यंत मायुराज राजा होऊन गेला असावा असें म्हणूनच आपण आपलें समाधान करून घेतलें पाहिजे.

नाटकरचनेच्या कामीं तो व भवभूति यांत फार अंतर दिसून येतें. उदाहरणार्थ, रामानें वालीला कपटानें मारिलें असें तो आपल्या नाटकांत दाखवीत नाहीं. याचप्रमाणें मायावी कांचनमृगाला पाहून प्रथम लक्ष्मण त्याच्यामागें जातो व त्याच्या मागाहून राम जातो असें त्यानें आपल्या नाटकांत दाखविलें आहे. ज्या अंकांत रावणानें सीतेचें हरण केलें आहे त्यास त्यानें कुलपत्यंक असें नांव दिलें आहे.

शिवस्वामिन्ः—काश्मीरचा राजा अवंतिवर्मन् ( ८५५ ते ८८३ ) याच्या कारकीर्दींत कोणी एक शिवस्वामिन् नाटककार प्रसिद्धीस आला व तो रत्नाकराचा समकालीन होता, असें राजतरंगिणीचा ( ५.३४ ) कर्ता जो कल्हण त्यानें म्हटलें आहे. सूक्तिमुक्तावलींतील एका कवितेवरून तो मोठा चतुर लेखक असावा असें दिसतें. त्यानें बरींच नाटकें लिहिलीं असें दिसून येतें ( नाटक-नाटिका-प्रकरण प्रायान् प्रबंधान् बहून् ). सुभाषितसंग्रहांतून ज्या त्याच्या थोड्याबहुत कविता उपलब्ध आहेत त्यांवांचून त्याची कांहींएक माहिती उपलब्ध नाहीं.

मुरारि.—अनर्घराघवाचा कर्ता जो मुरारि त्यानें स्वतः जी आपली माहिती दिली आहे, तेवढ्यावरूनच आपणांस त्याच्यासंबंधीं माहिती मिळते. त्याचें गोत्र मौद्गल्य होतें व तो भट्टश्रीवर्धमान आणि तंतुमती यांचा पुत्र होता. त्यानें आपल्या स्वतःस महाकवि असें म्हटलें आहे. इतकेंच नव्हे तर तो आपल्याला बालवाल्मीकि असाहि किताब लावून घेतो. त्याच्या नाटकाच्या पहिल्या अंकांतील सहा व सात या दोन पद्यांच्या मध्यें जो गद्य भाग आहे त्यांत त्यानें उत्तररामचरित्र या नाटकांतील उतारा दिला आहे ( ६.३०, ३१ ) आणि त्याच्यामागून झालेल्या ग्रंथकारांनीं त्याचा व भवभूतीचा अशा रीतीनें उल्लेख केला आहे कीं, त्यावरून तो भवभूतीच्या मागून झाला असावा असें वाटतें. त्याचप्रमाणें ज्याअर्थी रत्नाकरानें त्याचा उल्लेख केला आहे व रत्नाकर नवव्या शतकाच्या मध्यांत होऊन गेला त्याअर्थी तो रत्नाकराच्या पूर्वीं म्हणजे नवव्या शतकाच्या पूर्वीं झाला असवा. परंतु भट्टनाथस्वामींच्या मतानें असें म्हणणें बरोबर होणार नाहीं. भोज व इतर प्राचीन साहित्यशास्त्रकार यांनीं मुरारीचा उल्लेख केलेला नाहीं व मंख यानें श्रीकंठचरितांत ( २५.७४ ) त्याचा उल्लेख केला आहे. यावरून तो १०५० पासून ११३५ पर्यंत झाला असावा असा भट्टनाथाचा तर्क आहे.

मुरारि हा इतक्या अलीकडचा कवि असेल असें आम्हांस वाटत नाहीं. एक तर अनर्घराघवाचें ( ७.८३ ) प्रसन्नराघवांत ( २.३४ ) अनुकरण केलेलें दृष्टीस पडतें. दुसरें, मंखानें राजशेखराच्या पूर्वी मुरारीचा उल्लेख केलेला आहे. यावरून तो राजशेखराच्या आधीचा असावा व तिसरें अनर्घराघवाच्या सातव्या अंकांतील ११४ व ११५ पद्यांच्या मधल्या गद्यांत माहिष्मतीला कलचुरी राजांची अग्रमहिषी असें म्हटलें आहे व माहिष्मतीच्या वर्णनावरून ती राजघराण्याचें राहाण्याचें मुख्य ठिकाण असावें असें दिसतें. यावरून माहिष्मती

येथें राज्य करणाऱ्या एका कलचुरी राजाच्या पदरचा मुरारि कवि असावा असें आपणांस अनुमान करतां येण्यासारखें आहे. माहिष्मती म्हणजे नर्मदाप्रांतांतील हल्लींचें मांधाता नांवाचें ठिकाण होय. सांप्रत त्याच्या चरित्रक्रमाची व त्याच्या वेळच्या सामाजिक परिस्थितीची आपणांस अधिक माहिती मिळणें शक्य नाहीं.

'अनर्घराघव' हें सात अंकी नाटक आहे. यांत राम विश्वामित्राकडे गेल्यापासून रावणाचा पराभव करून अयोध्येस परत येईपर्यंतचा कथाभाग आहे. या ग्रंथकाराची नाटकरचनाशैली भवभूतीच्या नाटकाप्रमाणेंच आहे, म्हणजे वस्तुस्थितीच्या मनकुरांपेक्षां वर्णनानें बराच मोठा भाग व्यापलेला असतो. टीकेच्या साहाय्यावांचून ग्रंथ कळण्यास बराच कठिण जातो. भावात्मकता, कर्णमाधुर्य व अलंकारविपुलता या गोष्टींस ग्रंथकर्त्यानें बरेंच महत्त्व दिलें आहे.

राजशेखरः—राजशेखर कवि हा महाराष्ट्रीय व क्षत्रिय व यायावर कुटुंबांतील होता. तो आपली वंशपरंपरा थेट रामचंद्रापर्यंत लावीत असे; त्याचा बाप दुर्दुक अथवा दुहिक या नांवाचा महामंत्रि होता, व त्याच्या आईचें नांव शीलवती असें होतें. त्याचा आजा आकालजलद व इतर पूर्वज सुरानंद, तरल आणि कविराज हेहि सुप्रसिद्ध कवी होते. त्याची पत्नी अवंतिसुंदरी ही चाहमानवंशांतील होती. तो जरी शैव होता तरी अगदींच धर्मवेडा नव्हता. त्याचा जन्म जरी दक्षिणेंत झाला होता व त्याला दक्षिण हिंदुस्थानाची व दक्षिण हिंदुस्थानांतील परिस्थितीची जरी पूर्ण माहिती होती तरी महोदयाच्या (कान्यकुब्ज) प्रतिहारांच्या दरबारीं त्यानें बरीच कीर्ति संपादन केली. कर्पूरमंजरी हें त्याचें बहुतेक पहिलेंच नाटक होतें. तें नाटक राजाज्ञेवरून नव्हे तर त्याच्या पत्नीच्या विनंतीवरून करण्यांत आलें होतें. यांत तो स्वतःस बालकवि, कविराज व निर्भय किंवा निर्भर राजाचा अध्यापक इत्यादि प्रकारच्या पदव्या लावून घेतो. परंतु निर्भय ही प्रतिहार महेंद्रपाल याची मानाची पदवी असल्याबद्दल ८९३ पासून ९०७ पर्यंतचे शिलालेख साक्ष देतात. राजशेखराच्या बालरामायण नाटकाचा प्रयोग महेंद्रपालाच्या आज्ञेवरून करण्यांत आला व अपूर्ण स्थितींत राहिलेल्या बालभारताचा प्रयोग महेंद्रपालाचा वंशज जो महीपाल राजा याच्या दरबारीं व्हावयाचा होता. सदरहू महीपालाचे शिलालेख ९१४ ते ९१७ या काळांतील आहेत.

राजशेखराचें चवथें नाटक विद्धशालभञ्जिका हें कलचुरी राजा पहिला युवराज जो त्रिपुराचा केयूरवर्ष याच्या आज्ञेनें करण्यांत आलें आणि त्यांत त्याच्यासंबंधीं उल्लेखहि आहेत. यावरून महेंद्रपालाच्या निधनानंतर राजशेखर हा त्रिपुरींमध्यें चेदींच्या दरबारीं कांहीं काळ राहिला असावा असें दिसतें. त्याच्या पूर्वजांचा व चेदींचा संबंध असणें संभवनीय दिसतें, परंतु त्याचें शेवटलें अपूर्ण राहिलेलें नाटक कान्यकुब्जांत व्हावयाचें होतें, त्यावरून राजशेखर हा फिरून प्रतिहाराच्या दरबारीं परत आला असावा असें दिसतें. वरील हकीकतीवरून राजशेखराचा काळ निश्चितपणें ठरवितां येतो. बालरामायणांत ( १. १२ ) त्यानें आपण सहा ग्रंथ लिहिल्याचें म्हटलें आहे आणि ज्या कवितेंत त्यानें असें म्हटलें आहे, ती कविता जर मागाहून प्रक्षिप्त केली नसेल तर त्या सहा ग्रंथांत बालभारत व विद्धशालभंजिका या दोन ग्रंथांचा अंतर्भाव केला नसला पाहिजे हें उघड आहे. निरनिराळ्या सुभाषितसंग्रहांच्या ग्रंथांमध्यें त्याच्या नांवावर बऱ्याच कविता सांपडतात व त्या कवितांमध्यें जुन्या कवींचे विशिष्ट गुणधर्महि दिलेले आहेत. या राजशेखराच्या नांवावर असलेल्या कविता त्याच्या असण्याचा संभव आहे व त्याच्या नष्ट झालेल्या ग्रंथांतील असण्याचाहि संभव आहे. परंतु त्या ग्रंथाचें स्वरूप कसें असावें हें समजण्याला मार्ग नाहीं.

कांहीं अंशीं त्याची भाषापद्धति कृत्रिम स्वरूपाची आहे व त्याला आपल्या निरनिराळ्या भाषांच्या ज्ञानाविषयीं अभिमान वाटत असावा असें दिसतें. तथापि शौरसेनी व महाराष्ट्री या ज्या दोन प्राकृत भाषांचा तो उपयोग करतो त्यांतील भेद नीट रीतीनें त्याच्या लक्षांत आलेला दिसून येत नाहीं. प्राकृत भाषेंत ज्या अनेक विलक्षण शब्दांची त्यानें योजना केली आहे ते बहुतेक अन्य भाषेंतून घेतलेले असावे. त्याला सुभाषितांचा उपयोग करण्याची, काव्यमय वाक्यरचना करण्याची व निरनिराळ्या प्रदेशांतील निरनिराळ्या चालीरीतींचें दिग्दर्शन करण्याची आवड होती असें दिसून येतें. तो फार मोठा नाटककार होता असें नाहीं. परंतु त्याची लेखनशैली सफाइदार व चित्तवेधक असून त्याला आपल्या भणिती गुणाचा अभिमान वाटत असे व त्याच्या मागून झालेल्या कवींनीं त्याचें बरेच वेळां अनुकरणहि केलेलें आहे. त्याच्या उपरिनिर्दिष्ट चार नाटकांमध्यें कर्पूरमंजरी हें अगदीं प्रारंभींचें असावें. तें सट्टक असून त्यांत चार अंक अथवा जवनिकांतरें आहेत. तें प्राकृत भाषेंत लिहिलेलें आहे. त्यांत चंडपाल राजानें ( यावरून तें वर्णन कदाचित् महेंद्रपालास अनुलक्षून केलेलें असावें, कारण चंड व महेंद्र हीं दोन्हींहि शिवाचीं नांवें आहेत ) सार्वभौम पद प्राप्त करून घेण्याकरितां कुंतल राजकन्या कर्पूरमंजरी हिच्याशीं विवाह केला इत्यादि कथाभाग आहे. यांतील कथाभाग साधारण नाटिकेप्रमाणेंच आहे. राजा एका जादुगाराच्या मदतीनें एक रूपवती कन्या बघतो. वास्तविक ती राणीची भाची असते. राजा व ती रूपवती कन्या यांचें एकमेकांवर प्रेम जडतें. पुढें त्यांची भेट होते, त्यामुळें राणीस मत्सर उत्पन्न होतो, व ती त्या कन्येस बंदींत टाकते, नंतर फिरून राजाची व तिची गांठ पडते, त्यांत फिरून राणीकडून विघ्न उपस्थित होतें, आणि शेवटीं राणीच्या अनुमतीनें त्या दोघांचा विवाह होतो इत्यादि, नाटकांत नेहमीं सांपडणारा कथाभागच या नाटकांत आहे.

बालरामायणः—हें दशांकी महानाटक आहे. यांत मुरारि व भवभूति यांच्याप्रमाणेंच रामाचा कथाभाग दिलेला आहे. त्याच्यापूर्वी होऊन गेलेल्या रामकथेवर लिहिणाऱ्या ग्रंथकारांमध्यें तो वाल्मिकी, भर्तृमेंठ व भवभूति यांचा निर्देश करतो. परंतु भर्तृमेंठ यानें तो कथाभाग काव्यरूपानें लिहिला किंवा नाटयरूपानें लिहिला हें आम्हांस निश्चयानें सांगतां येत नाहीं. राजशेखरानें आपल्या नाटकांत पुढील फेरफार केले आहेतः—(१) तिसऱ्या अंकांत भरतकृत सीतास्वयंवर घुसडलें आहे. (२) चौथ्या अंकांत इंद्राच्या रथावरील चित्रांचें वर्णन दिलें आहे व (३) रावण व त्याचा कामांधपणा यांचें शमन करण्याकरितां सीता व तिची धात्रेयी यांच्या जागीं कळसूत्री बोलत्या बाहुल्या प्रविष्ट केल्या आहेत.

विद्धशालभंजिकाः—ही चार अंकी नाटिका आहे. हींत राजा विद्याधरमल्ल हा नायक असून लाटराजा चंद्रवर्मन् याची कन्या मृगांकावली ही नायिका आहे. सदरहू राजास सार्वभौम राजा करण्यास त्या राजाचा मंत्री त्या दोघांचा विवाह घडवून आणण्याचा प्रयत्न करितो. मृगांकावलीस एका तरुण पुरुषाचा वेष देऊन राणीच्या सान्निध्यांत ठेवण्यांत येतें. नेहमींप्रमाणें परस्परांचें प्रेम जडणें, भेटी घेणें, त्यांत व्यत्यय येणें इत्यादि प्रकार घडून येतात. आपल्या धात्रेयिकेची चेष्टा केल्याबद्दल विदूषकाचा सूड घेण्याकरितां राजाचा व त्या वेषधारी तरुण पुरुषाचा विवाह लावण्याची राणी व्यवस्था लावते. परंतु शेवटीं तो तरुण पुरुष राणीचा भाऊ असल्याचें उघडकीस येतें व अखेर राणीच्या पसंतीनें राजाचा खरोखरीचा विवाह होतो. पहिल्या अंकांत राजानें मृगांकावलीच्या मूर्तीला ज्यांत माळ घातली आहे अशा प्रवेशावरून ह्या नाटकास मृगांकावली हें नांव देण्यांत आलें आहे.

बालभारतः—यास कोणी प्रचंडपांडवहि म्हणतात. हें नाटक अपूर्ण राहिल्यामुळें त्याचे दोनच अंक उपलब्ध आहेत. नाटकाचा कथाभाग महाभारतांतून घेतलेला असून द्रौपदीस्वयंवर, युधिष्ठिर व दुर्योधन यांच्यांतील द्यूतक्रीडाप्रसंग व तदनंतर द्रौपदीची विटंबना इत्यादि कथाभाग या नाटकांत आहेत.

भीमटः—राजशेखराच्या एका कवितेवरून कालिंजरपति भीमट यानें पांच नाटकें लिहिलीं असें समजतें. त्यांत स्वप्नदशानन हें सर्वोत्कृष्ट आहे नाटक ('प्राप पबंध राजत्वम्'). या नाटककाराची कांहींएक माहिती उपलब्ध नाहीं. परंतु ज्या अर्थी त्याला कलिंजरपति असें म्हटलें आहे त्या अर्थी तो बहुतकरून चंदेल राजा असावा. जेजाकभुक्तीचा चंदेल महाराजाधिराज हर्ष हा राजशेखराचा आश्रयदाता, कान्यकुब्जचा महीपाल याचा समकालीन होता आणि यावरून भीमट हा हर्षाचा आप्त व राजशेखराचा समकालीन होता. त्याच्या स्वप्नदशानन या नाटकावरून आपणांस भासाच्या 'स्वप्नवासवदत्ता' या नाटकाची आठवण होते. हें नाटक बहुधा रामायणांतील कथाभागावरून रचलें असावें.

क्षेमीश्वरः—हा नाटककार राजशेखराच्या मागून लवकरच झाला असावा. हा चंडकौशिक नाटकाचा कर्ता होता. या नाटकाचा प्रयोग महीपालदेव याच्या आज्ञेवरून करण्यांत आला असें समजतें, आणि ज्याच्या इच्छेवरून राजशेखरानें बालभारत रचण्याचा उपक्रम केला होता तोच हा प्रतिहार महीपाल असें जें पिशेलनें म्हटलें तें आमच्या मतें बरोबर आहे. आपल्या आश्रयदात्यानें कर्णाटांचा पराभव केला असें क्षेमीश्वरानें म्हटलें आहे, त्याचप्रमाणें राजशेखराच्या आश्रयदात्यानें दक्षिणेंत बऱ्याच लढाया केल्या असें बालभारता(१.७) वरून समजतें. राष्ट्रकूट राजा तिसरा इंद्र याचे ९१४ व ९१६ या सालांतले शिलालेख उपलब्ध आहेत आणि त्यावरून तो कान्यकुब्जाचा प्रतिहार महीपाल याचा समकालीन होता असें दिसतें व आपण कान्यकुब्जाच्या महोदयाचा पराभव केला असें त्यानें म्हटलें आहे. तथापि ज्या अर्थी महीपालाच्या वंशजांनीं कान्यकुब्जांत राज्य चालविल्याचें दिसून येतें त्या अर्थी " पराभव केला " याचा अर्थ इतर शिलालेखांप्रमाणेंच करावयाचा असून निराळा करावयाचा नाहीं, म्हणजे युद्धांत सामील होणारे दोन्हीहि पक्ष आपण दुसऱ्याचा पराभव केला असें म्हणत असत. महीपालानें कर्णाटाचा पराभव केला, व इंद्रानें महोदयाचा केला. हीं दोन्हीहि विधानें बहुतेक एकाच गोष्टीसंबंधानें असावीत. कारण जय कोणाला जरी मिळाला तरी दोन्हीहि पक्ष आम्हांलाच जय मिळाला असें प्रतिपादन करीत असत.

चंडकौशिक नाटकाच्या तंजावर येथील हस्तलिखित प्रतींत या कवीस क्षेमेंद्र असें म्हटलें आहे. यावरून हा क्षेमेंद्र व बृहत्कथेचा कर्ता क्षेमेंद्र हे दोन्हीहि एकच होते कीं काय असा बर्नेलनें प्रश्न उपस्थित केला आहे. परंतु पिशेलच्या मतानें हा प्रश्न उपस्थित करण्याचें कारणच नाहीं. कारण या क्षेमेंद्राच्याच 'नैषधानंद' या नाटकांत ग्रंथकर्त्याचें नांव क्षेमीश्वर असें दिलें आहे. शिवाय क्षेमीश्वराच्या पणजाचें नांव विजयकोष्ठ अथवा विजयप्रकोष्ठ असें होतें असें नैषधानंदांत सांगितलें आहे व त्याला स्वतःला आर्य म्हणत असत असें चंडकौशिक नाटकावरून समजतें व त्याला आचार्य म्हणत असत असें नैषधानंद नाटकावरून समजतें.

नैषधानंदः—हें सप्तांकी नाटक आहे व त्यांत बहुधा नलासंबंधीं कथाभाग घेऊन त्यावर नाटयरचना केलेली आहे. तें अद्याप प्रकाशित झालेलें नाहीं.

चंडकौशिकः—हें पचांकी नाटक आहे. तें मार्कंडेयपुराणांतून घेतलेल्या हरिश्चंद्रकथेवर रचलेलें आहे. एक तपस्वी अग्नींत कुमारिकांची आहुति देत असल्याचें राजाच्या दृष्टीस पडतें, व तीस सोडविण्याकरितां तो जातो. वास्तविक पाहिलें तर त्यावेळीं कौशिक विश्वामित्र हा विद्याभ्यास करीत असतो आणि म्हणून तो राजास शाप देतो. परंतु जेव्हां

हरिश्चंद्र त्यास सर्व पृथ्वी व १००० सुवर्णमुद्रा देण्याचें अभिवचन देतो तेव्हां त्याचा राग शांत होतो. ती १००० सुवर्णमुद्रेची रक्कम प्राप्त करण्याकरितां राजा आपल्या पत्नीस व मुलास एका ब्राह्मणाला विकतो व स्वतःला एका चांडालास विकून तो त्याच्या आज्ञेवरून स्मशानाची रखवाली करतो, व प्रेतवस्त्रें गोळा करतो. एके दिवशीं त्याची पत्नी आपल्या मुलाचें प्रेत घेऊन स्मशानांत येते व त्यावेळीं हें सर्व त्याची कसोटी पहाण्याकरितां घडवून आणलें होतें अशा तऱ्हेचा उलगडा होतो. हरिश्चंद्राचा पुत्र जिवंतच असतो व तदनंतर त्यास राज्याभिषेक होतो, आणि असें झाल्यावर हरिश्चंद्र ब्रह्मलोकाप्रत गमन करतो.

जयदेवः—जयदेव हा साहित्यशास्त्रकार व नाटककारहि होता. याच्या बापाचें नांव महादेव व आईचें सुमित्रा असें होतें. त्याचा जन्म वऱ्हाड प्रांतांत कुंडिन येथें झाला असावा. त्याचे 'चंद्रालोक' व 'प्रसन्नराघव' नाटक असे ग्रंथ उपलब्ध आहेत. 'चंद्रालोक' हा साहित्यशास्त्रावरील ग्रंथ असून तो अप्पय्या दीक्षित यांनीं आपल्या कुवलयानंदांत समाविष्ट केला आहे. यावरून जयदेव हा सोळाव्या शतकाच्या अगोदर झाला असावा हें उघड आहे. प्रसन्नराघवांत ( १. १७–१८ ) तो आपल्या स्वतःस नैयायिक म्हणवून घेतो. यावरून त्या नाटकाचे प्रकाशक परांजपे व पानसे हा जयदेव व नैयायिक जयदेव पक्षधर हे दोन्ही एकच होते असें म्हणतात, आणि म्हणून १५०० पासून १५७७ पर्यंत तो झाला असावा असें ते म्हणतात. परंतु ज्याअर्थी चौदाव्या शतकांत झालेल्या शार्ङ्गधर पद्धतींत प्रसन्नराघव नाटकांतील उतारा दिलेला सांपडतो त्याअर्थी जयदेव त्याच्या पूर्वी झाला असावा. या 'प्रसन्नराघव' नाटकांत (१.२२) जयदेवानें चोर, मयूर, भास, कालिदास, हर्ष व बाण इत्यादि कवींचा उल्लेख केलेला आहे. यांपैकीं चोर खेरीजकरून बाकीचे सारे जुनेच कवी आहेत. चोरासंबंधीं कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. बिल्हणाच्या पंचाशिकेचा कर्ता कोणी चोर नांवाचा कवि होता अशी आख्यायिका आहे. ह्या आख्यायिकेच्या मुळाशीं कांहीं तरी गैरसमज असावा. परंतु जरी आपणांस चोर किंवा चौर याचा काळ निश्चयानें ठरवितां येत नाहीं, तरी तो केव्हां तरी होऊन गेला असावा ही गोष्ट निर्विवाद आहे.

जयदेवाच्या काळाचा निर्णय करण्याकरितां प्रसन्नराघवांतील कांहीं श्लोक महानाटकांत घेतले आहेत ही गोष्ट महत्त्वाची आहे, असें लेव्हीनें म्हटलें आहे. यावरून जयदेव हा अकराव्या शतकानंतर झालेला नसावा व त्याचप्रमाणें तो मुरारीच्या पश्चात् झाला. तो नाट्यलेखनाच्या कामीं पूर्वीच्या नाटककारांचें अनुकरण करतो परंतु त्याचे श्लोक साधारणपणें सौमनस्यकर असून कांहीं ठिकाणीं तर अप्रतिम आहेत.

प्रसन्नराघव हें सप्तांकी नाटक आहे व त्यांत सीतेच्या स्वयंवरापासून रामचंद्र अयोध्येस परत येईपर्यंतचा रामचरित्रांतील कथाभाग आहे. यांतील कांहीं कथाप्रसंग दोन विद्याधरांनीं करावयाच्या ऐंद्रजालिक नाट्यप्रयोगांत येतो.

महानाटकः—महानाटक किंवा हनुमन नाटक हा एक भारतीय नाट्यवाङ्मयांतील विशिष्ट भाग आहे. यांतील बऱ्याचशा भागांत वर्णनपर कविता असून कोठें कोठें संभाषणाविषयीं केवळ सूचना केलेल्या असतात. यांत अभिनयादि सूचनाहि दिलेल्या नसतात, आणि या प्रकारच्या नाटकाचें साधारण नाटकापेक्षां महाकाव्याशीं अधिक सादृश्य दिसून येतें.

या नाटकाच्या एक बंगाली व दुसरी पश्चिमेकडील अथवा नागरी अशा दोन आवृत्त्या प्रसिद्ध आहेत. पहिल्या आवृत्तींत त्यास हनुमन् नाट्य म्हटलें असून त्याचे चवदा अंक आहेत. चवदा ही संख्या बहुतेक चवदा जगां(लोकां)वरून पसंत केली असावी. दुसऱ्या आवृत्तींत याचे नऊ अंक आहेत, व त्या नाटकास येथें महानाटक असें म्हटलें आहे.

या दोन्हीहि आवृत्तींत कपिराज हनुमान हा त्या ग्रंथाचा कर्ता होता असें म्हटलें आहे. महानाटकाच्या परिसमाप्तींत तें फिरून 'विक्रमैः' ( म्हणजे विक्रमादित्यानें ) यानें पुढें लिहिलें (प्रत्युद्धृत) असें म्हटलें आहे. हनुमानानें हें नाटक एका खडकावर लिहून तें समुद्रांत बुडविलें असें चंद्रशेखर टीकाकारानें स्पष्टीकरण केलें आहे. विक्रमादित्यानें कोळ्यांच्या मदतीनें तें वर काढून त्याची मधुसूदनमिश्राकडून दुरुस्ती केली. कांहींनीं या गोष्टीचा असा अर्थ केला आहे कीं, हा ग्रंथ राक्षसांनीं चोरून नेला होता व तो कोणी एकानें आपल्या पराक्रमानें ( विक्रमैः ) परत आणला.

हनुमन् नाटकाच्या परिसमाप्तींत असें म्हटलें आहे कीं तो ग्रंथ वातात्मज जो हनुमान यानें लिहिला होता. परंतु त्याला अमृत समजून वाल्मीकीनें सागरांत बुडवून टाकिलें. कालांतरानें त्याला भोजानें वर काढिलें व दामोदरानें त्याची पुनर्रचना केली. मोहनदास टीकाकार म्हणतो कीं, हनुमानानें आपला ग्रंथ आपल्या पंजानें डोंगर पोंखरून त्याच्या उदरांत ठेविला होता. परंतु तो आपल्या रामायणावरहि ताण करील अशी वाल्मीकीस भीति वाटल्यावरून त्यानें हनुमानास तो ग्रंथ समुद्रांत बुडवून टाकण्यास सांगितलें, व त्याप्रमाणें हनुमानानें केलें. तदनंतर भोजानें तो ग्रंथ समुद्रांतून फिरून बाहेर काढिला.

भोजप्रबंधावरून असें समजतें कीं जिच्यावर कांहीं लेख खोदलेले आहेत अशी एक मळी मोठी शिळा कोळी लोकांस नर्मदेंत सांपडली व ती त्यांनीं भोज राजाकडे आणली. हनुमानानें एक रामायण ग्रंथ लिहून तो पाण्यांत बुडविला होता असें भोज राजास माहीत असल्यामुळें त्यानें त्या शिळेचा सांचा बनविला, व आपल्या पदरच्या पंडितांकडून त्या ग्रंथाची नवीन प्रत तयार करविली. विल्यम जोन्स यानेंहि

बंगालच्या पंडितांपासून अशाच तऱ्हेची आख्यायिका ऐकली होती. येणेंप्रमाणें दंतकथेवरून तरी हा ग्रंथ खडकावर खोदलेल्या एका जुन्या नाटकाची नक्कल व पुनरावृत्ति आहे. या नाटकाचा कर्ता जो मधुसूदन याच्याविषयीं आपणांस कांहीं माहिती उपलब्ध नाहीं, परंतु भोजप्रबंधामध्यें भोज राजाच्या पदरीं असलेल्या कवींच्या मालिकेंत दामोदराचा उल्लेख केलेला आहे; व तो अकराव्या शतकाच्या पूर्वार्धात होता असें म्हटलें आहे.

या दोन आवृत्त्यांपैकीं मूळची आवृत्ति कोणती असावी हें समजण्यास मार्ग नाहीं. परंतु हा ग्रंथ भोजराजाच्या वेळेपासून चालत आला असावा असें दिसतें. रामायण, हितोपदेश, बालरामायण, अनर्घराघव व प्रसन्नराघव इत्यादि अनेक ग्रंथांतील कविता यांत सांपडतात. शिवाय तेराव्या शतकांत होऊन गेलेल्या सुभटानें या ग्रंथाचा उपयोग केलेला दृष्टीस पडतो.यावरून हा ग्रंथ दहाव्या व तेराव्या शतकांच्या दरम्यान केव्हां तरी निर्माण झाला असावा असें वाटतें.

तथापि या ग्रंथाचा मुख्य भाग याहून प्राचीन काळींहि होणें संभवनीय आहे व तो विक्रमादित्याच्या वेळीं तयार झाला असावा अशीहि आख्यायिका प्रचलित आहे. आनंदवर्धनानें आपल्या ध्वन्यालोकांत ( २.१,२३.३.१६ ) महानाटकांतील ( ५.७; ४.३४; ९.१४; ) तीन कविता उद्धृत केल्या आहेत आणि जरी या तीन कविता आपणांस माहीत नसलेल्या एखाद्या रामनाटकांतून घेतल्या असणें संभवनीय आहे तरी त्या महानाटकाच्या प्राचीन प्रतीवरून घेतल्या असणें अधिक संभवनीय आहे. ही प्राचीन प्रत आनंदवर्धनाच्यापूर्वी म्हणजे नवव्या शतकाच्या उत्तरार्धांत झाली असावी व सदरहू नाटकास महानाटक (१.११) व भोजप्रबंध यांत म्हटल्याप्रमाणें रामायण हें नांव दिलेलें असावें असें वाटतें.

वास्तविक पाहिलें तर रामाच्या आयुष्यांतील अनुभवांची त्या नाटकांत एक त्रोटक रूपरेषा आंखलेली आहे व ज्यांस रामायणांतील आख्यायिका परिचित आहे, त्यांसच तेवढें तें नाटक समजण्यासारखें आहे.तें सर्व संस्कृत भाषेंत लिहिलेलें असून ज्यास पूर्वीच्या सुप्रसिद्ध कवींच्या ग्रंथांतील उतारे ओळखण्याची पात्रता असेल अशांसच फक्त समजावें या हेतूनें तें लिहिलेलें दिसतें.

हनुमान नाटक प्रथम खडकावर लिहिलें होतें अशी जी आख्यायिका आहे तिच्यावर अगदींच विश्वास ठेवतां येत नाहीं, कारण अलीकडे शिलांवर खोदलेल्या अनेक नाटकांचा शोध लागलेला आहे.

हा ग्रंथ नाटक नसून महाकाव्यस्वरूपाचा होता व भारतीय नाट्याच्या सुरवातीच्या काळांत तो लिहिला असावा असें मॅक्समुल्लर साहेबाचें म्हणणें होतें. पिशेलनेंहि आपलें तसेंच मत प्रदर्शित केलें होतें व पुढें त्याला त्या ग्रंथांत व दूतांगद या ग्रंथांत साम्य दिसून आलें व शेवटीं छायाचित्रांच्या प्रदर्शनाच्या वेळीं पाठ म्हणून दाखविण्याकरितां रचलेलें तें छायानाटक होतें असें ल्यूडर्स यानें सिद्ध केलें. प्राचीनकाळीं छायानाटकें लोकांमध्यें प्रचलित होतीं, परंतु पुढें त्यांचा ब्राह्मणांनीं राजदरबारीं प्रवेश केला. दूतांगद नाटकानें याच्या पुढची पायरी गांठली व त्यामुळें छायानाटकांच्या स्वरूपांत बराच फरक पडून त्यांत संभाषणाचा बराच मोठा भाग येऊं लागला.

या नाटकाच्या दोन्हीहि प्रतींतील मजकूर जवळजवळ एकच आहे. महानाटकाच्या शेवटीं रामचरित्राच्या उत्तरार्धांतील कांहीं प्रवेश आहेत व ते हनुमान नाटकांत नाहींत इतकाच काय तो दोहोंत फरक आहे.हा जो महानाटकांत अधिक मजकूर आहे म्हणून सांगितलें त्यांत वाल्मिकीनें सीतेचें संरक्षण केलें, तिच्या मुलांस रामायण शिकविलें आणि शेवटीं रामाचें स्वर्गारोहण कसें झालें, इत्यादि कथाभाग आहे. हा मजकूर मागाहून प्रक्षिप्त केला असल्याचा संभव आहे. एरवीं महानाटक व हनुमान नाटक यांत फारसा फरक नसून त्यांच्यांतील अंतर्रचनेचें तौलनिक साहश्य पुढीलप्रमाणें दाखवितां येईलः—

| | |
|---|---|
| महानाटक १ला अंक | = हनुमन्नाटक १ ला अंक प्रारंभ. |
| महा „ २ रा अंक | = हनु० अवशिष्ट १ व २ अंक. |
| महा „ ३ रा अंक | = हनुमन्नाटक ३ व ४ अंक. |
| महा „ ४ ते ७ अंक | = हनुमन्नाटक ५ ते ८ अंक. |
| महानाटक ८वा अंक | = हनुमन्नाटक ९ ते १० अंक. |
| महा „ ९वा अंक | = हनुमन्नाटक ११ ते १४ अंक. |

उत्तरकालीन छायानाटकें.—ग्रंथकारानें आपल्या "महानाटका"स छायानाटक असें म्हटलें नाहीं. परंतु यापुढें झालेल्या तत्सदृश नाटकांस छायानाटकें असें स्पष्ट नांव देण्यांत आलें आहे. त्यांत सुभटाचें दूतांगद नाटक सर्वांत प्राचीन आहे. सुभट आपल्या स्वतःस महाकवि व आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या व भवभूतीप्रमाणें पदवाक्यप्रमाण पारंगत ( व्याकरण, न्याय व मीमांसा यांत ज्यानें प्रावीण्य मिळविलें आहे असा ) म्हणवितो. कुमारपालदेवाचा सन्मान करण्याकरितां व गुजराथ येथील अनहिलपट्टणाचा चालुक्य राजा त्रिभुवनपाल याच्या निमंत्रणावरून इ. स. १२४३ सालीं मार्च महिन्याच्या ७ व्या तारखेस सुभटाच्या या नाटकाचा प्रयोग करण्यांत आला, असें ग्रे साहेबाचें म्हणणें आहे.शिवाय सुभट हा आपला समकालीन लेखक होता असें सोमेश्वरानें आपल्या कीर्तिकौमुदींत ( १.२८ ) म्हटलें आहे.

दूतांगद नाटकांत एकच अंक आहे, व महानाटकाच्या सातव्या अंकांत आलेला कथाभाग हाच त्याचा विषय आहे. सीतेच्या मुक्ततेची मागणी करण्याकरितां रामानें अंगदास रावणाकडे पाठविलें. रावणानें तसें करण्याचें नाकारून सीतेचें माझ्यावर प्रेम आहे, अशी अंगदाची समजूत घालण्याचा त्यानें प्रयत्न केला. या योगानें अंगद फसला गेला नाहीं, व रावणास धमकी देऊन तो तेथून निघून गेला. यापुढें

लवकरच रामानें रावणाचा पराजय केला याची हकीकत सांगण्यांत आली आहे. हें नाटक चांगल्या स्थितींत राहिलेलें नाहीं. याच्या दोन निरनिराळ्या आवृत्त्या उपलब्ध आहेत. या दूतांगद नाटकांत गुणधर्मविवेचन प्रथम पिशेलनें केलें.

भूभट्टाचें अंगद नाटकः—हें नाटक अद्याप हस्तलिखित स्वरूपांत असून छापून प्रसिद्ध झालेलें नाहीं. यांत व दूतांगद नाटकांत बरेंच साम्य असावें. नाटककर्त्याचें नांव चुकीचें असण्याचा संभव आहे.

यानंतर रायपुरच्या कलचुरि राजाच्या दरबारीं एक रामदेव अथवा व्यासश्री रामदेव हा छायानाटकाचा कर्ता होऊन गेला. ब्रह्मदेव किंवा हरिब्रह्मदेव हे त्याचे आश्रयदाते होते. त्याच्या आश्रयदात्यांचे स. १४०२ व १४१५ या सालांतील शिलालेख उपलब्ध आहेत. मेरु हा त्याचा भाऊ होता व रणमल्लदेव हा त्याचा नातू होता. त्यानें तीन छायानाटकें लिहिलीं होतीं अशी माहिती मिळते.

सुभद्रापरिणय हें नाटक हरिब्रह्मदेवाच्या अनुज्ञेनें करण्यांत आलें व त्यांत अर्जुनाच्या आज्ञेनें सुभद्रेच्या आत्माकडे वसुभूतीस पाठविलें इत्यादि हकीकत आहे. पुढें अर्जुनहि प्रगट होतो, सुभद्रेला वश करतो व नंतर वासुदेवाच्या अनुमतीनें त्यांचा विवाह होतो. या नाटकाची हस्तलिखित प्रत ब्रिटिश म्यूझियममध्यें असून इ. स. १४२२ हा सन त्यावर नमूद केला आहे. हस्तलिखित प्रतींच्या यादीमध्यें रघुनाथाचार्यांचें सुभद्रापरिणय व एका अज्ञातग्रंथकाराचें सुभद्रापरिणय अशा दोन नाटकांचा उल्लेख केलेला आहे. कदाचित् रामदेवाचें नाटक व तीं नाटकें हीं एकच असावीत. रामदेवाचें दुसरें छायानाटक रामाभ्युदय हें महाराणा मेरु याच्या कारकीर्दींत रचण्यांत आलें. या नाटकाच्या दोन अंकांत लंकेचा वेढा, सीतेची आत्मशुद्धि व रामाचें अयोध्येस पुनरागमन इत्यादि कथाभाग दिलेला आहे. रामदेवाचें तिसरें नाटक पांडवाभ्युदय हें होय. या नाटकाचा प्रयोग रणमल्ल देवाच्या कारकीर्दींत करण्यांत आला. त्याच्या दोन अंकांत द्रौपदीचा जन्म व विवाह इत्यादिविषयक कथाभाग आहे.

एका अज्ञात लेखकानें लिहिलेलें एक छायानाटक हरिदूत नांवाचें आहे. त्याच्या तीन प्रवेशांत युधिष्ठिरानें दुर्योधनाकडे शिष्टाई करण्याकरितां कृष्णास पाठविल्याची हकीकत आहे. यांतील संविधानक व भासाच्या दूतवाक्यांतील संविधानक हीं जवळ जवळ एकच आहेत.

शंकरलालांचें ' सावित्रीचरित ' हें अधिक मोठें नाटक आहे. शंकरलाल हा महेश्वराचा पुत्र होय. या नाटकांत सात अंकांमध्यें सावित्रीची कथा दिलेली आहे. हें नाटक बरेंचसें अर्वाचीन आहे.

दुर्गादास चक्रवर्तिन्‌चा पुत्र कृष्णनाथ सार्वभौम भट्टाचार्य याचें ' आनंदलतिका ' हें नाटक छायानाटकच आहे. ह्या नाट्यकाव्याचे पांच कुसुम आहेत. त्यांत सम व रंवा यांच्या प्रणयाची हकीकत आहे. त्यांत कथानकात्मक व वर्णनात्मक कविता, संभाषणें व अभिनयविषयक सूचना आहेत.

नदियाचा राजा ईश्वरचंद्र याच्या विनंतीवरून गोविंदमहोत्सवाकरितां वैद्यनाथ वाचस्पति यांनीं ' चित्रयज्ञ ' नांवाचें एक छायानाटक लिहिलें. त्यांत पांच अंकांमध्यें दक्षकथा दिलेली आहे. विठ्ठल नांवाचेंहि एक छायानाटक होतें असें समजतें.

कृष्णमिश्रः—कृष्णमिश्र हा प्रबोधचंद्रोदयाचा कर्ता होता. त्यानें त्या नाटकाच्या उपोद्घातांत असें म्हटलें आहे कीं, गोपाळाच्या शिफारशीनें राजा कीर्तिवर्मन् याच्यासमोर त्या नाटकाचा प्रयोग करण्यांत आला. सदरहू गोपाळ यानें चेदिराजा कर्ण याचा पराभव झाल्यानंतर कीर्तिवर्म्यास त्याचें गमाविलेलें राज्य फिरून प्राप्त करून दिलें होतें. यावरून कीर्तिवर्मन् हा जेजाकभुक्तीचा चंदेल राजा जो कीर्तिवर्मन् तोच होय. या चंदेल राजाचा देवगड येथें इ. स. १०९८ मधला एक शिलालेख उपलब्ध आहे. महोबा शिलालेखावरून या चंदेल कवीनें लक्ष्मीकर्ण म्हणजे त्रिपुरीचा चेदिराजा कर्ण याचा पराभव केला होता. या चेदि राजाचा इ. स. १०४२ मधला एक शिलालेख उपलब्ध आहे. विक्रमांकदेवचरित (१८.९३) यांत कर्णाला ' कालः कालिंजरगिरिपतेः ' असें म्हटलें आहे व हें वर्णन कृष्णमिश्राच्या लिहिण्याशीं बरोबर जुळतें. गोपाळ कोण होता याविषयीं कांहीं माहिती मिळत नाहीं. महेश्वर टीकाकार म्हणतो कीं, तो कीर्तिवर्मन्‌चा सेनापति असून ब्राह्मण होता. तें कांहीं असलें तरी कृष्णमिश्र हा अकराव्या शतकाच्या उत्तरार्धांत झाला असला पाहिजे असें दिसतें.

प्रबोधचंद्रोदयः—हें षडांकी नाटक आहे. यांत भागवत अद्वैतसिद्धांताच्या तत्त्वांचें मंडन केलें आहे. यापुढें झालेल्या सर्व अन्योक्तिरूप नाटकांचा या नाटकानें पाया घातला. त्याचप्रमाणें पुढें झालेल्या राम व कृष्ण यांच्या पराक्रमवर्णनविषयक नाटकांप्रमाणें या नाटकाचा व यापुढें झालेल्या हिंदुधर्मविकासाचा अत्यंत निकट संबंध आहे.

या नाटकांत निरनिराळ्या मानवी भावनांवर चेतनधर्मांचा आरोप करून त्यांस पात्रें बनविलीं आहेत. राजा विवेक व त्याचा भाऊ महामोह यांच्यांत कलह चालू असतो. विवेक राजा आपली भार्या जी उपनिषद् हिची व आपली फिरून भेट व्हावी अशी इच्छा करतो. यामुळें महामोहाचे जे भक्त त्यांस संताप येतो. दंभाच्या मदतीनें महामोहास बनारस येथें विजय प्राप्त झाल्यामुळें तो आपलें ठाणें तेथेंच देतो.परंतु अनेक वदंता त्याच्या कानीं आल्यामुळें त्याचें मन अस्वस्थ होतें. विशेषेंकरून विष्णुभक्तीकडून आपणांवर मोठेंच संकट गुदरेल अशी त्यास भीति वाटते, आणि म्हणून धर्म, शान्ति इत्यादि जे आपले वैरी त्यांनां बंदींत टाकण्याचा तो प्रयत्न करतो. दरम्यान शान्ति ही जैन, बौद्ध, शैव व संन्यासी इत्यादि पंथांत श्रद्धेचा तपास करते. हे सर्व

पंथीय आमच्यांतच श्रद्धा राहाते असें सांगितात. परंतु ती श्रद्धा खरी नसून खोटी आहे असें दिसून येतें. शिवाय इच्छा, पूर्ति व भोगवृद्धि यांचे ते उपासक आहेत असेंहि निदर्शनास येतें. अखेर विष्णुभक्तीमध्यें खरी श्रद्धा आहे असें कळतें. तदनंतर लौकरच ती प्रगट होते. परंतु विवेकाला जय मिळवून देण्याकरितां महामोहाच्या अनुयायांवर आपल्या अनुयायांकडून हल्ला चढविते. लौकरच आपणांस विजय प्राप्त झाला असें विष्णुभक्तीकडे येऊन ती निवेदन करते. यापुढें पुरुषाच्या राजवाड्यांत उपनिषद् व विवेक यांची भेट होते, व त्यांच्यापासून प्रबोधचंद्राचा जन्म होतो, तो पुरुषाकडे जातो व त्याचे आईबाप विष्णुभक्तीकडे जातात.

**उत्तरकालीन अन्योक्तिरूप नाटकें.**—उत्तरकालीन अन्योक्तिरूप नाटकांमध्यें वैद्य शिवानंद सेन याचा पुत्र जो परमानंददास कविकर्णपूर याच्या चैतन्यचंद्रोदयाइतकें कोणतेंहि दुसरें नाटक प्रख्यात झालेलें नाहीं. हा परमानंददास कविकर्णपूर नडिया जिल्ह्यांत कांचनपल्ली या ठिकाणीं इ. स. १५२४ मध्यें जन्मला असें म्हणतात परंतु तें खरें असणें संभवनीय दिसत नाहीं. आख्यायिकेवरून असें समजतें कीं, त्यानें लहानपणींच एक काव्य लिहिलें. तें पाहून चैतन्य यानीं आपलें समाधान व्यक्त केलें व त्याबरोबरच त्यानीं त्यास कविकर्णपूर हें नवीन नांव दिलें. तेव्हांपासून तो चैतन्याचा शिष्य झाला आणि त्यानें अनेक ग्रंथ लिहिले. त्या ग्रंथांतच चैतन्यचंद्रोदय नाटकाचा समावेश होतो.

या नाटकाच्या प्रस्तावनेवरून त्या नाटकाचा प्रयोग ओरिसा प्रांताचा राजा प्रतापरुद्र (इ. स. १४९६ ते १५३९) याच्या आज्ञेनें करण्यांत आला असें समजतें. ऑफ्रेक्ट यानें या नाटकाचा लेखनकाल इ. स. १५४३ हा दिला आहे. परंतु या म्हणण्यास त्याला काय आधार होता हें त्यानें सांगितलें नाहीं. चैतन्यचंद्रोदयांतील शेवटीं दिलेल्या एका कवितेवरून काव्यमालेचे प्रकाशक यानीं तें नाटक इ. स. १५७९ त लिहिलें असें म्हटलें आहे.

शके चतुर्दशशते रविवाजियुक्ते
गौरो हरिर्धरणि मण्डल आविरासीत् ।
तस्मिंश्चतुर्नवति भाजि तदीय लीला
ग्रंथोऽयमाविरभवत्कतमस्य वक्त्रात् ॥

वरील कवितेवरून चैतन्य म्हणजे गौरहरि हा शके १४०७ मध्यें म्हणजे इसवी. सन. १४८४ मध्यें जन्मला व प्रस्तुत नाटक हें त्यानंतर ९४ वर्षांनीं रचलें गेलें असें सिद्ध होतें. तथापि चैतन्यचंद्रोदयाचा काल ठरविण्याकरितां जीं हीं प्रमाणें पुढें करण्यांत येतात त्यांचा व प्रतापरुद्राच्या कारकीर्दीच्या काळचा मेळ बसत नाहीं. वर दिलेली कविता जर बिनचूक असेल तर तें नाटक चैतन्याच्या जन्मानंतर ३६ वर्षांनीं म्हणजे इ. स. १५३० मध्यें लिहिलें असावें अशा त्या कवितेच्या उत्तरार्धाचा अर्थ केला पाहिजे, परंतु अशा रीतीनें 'चतुर्नवति' याचा अर्थ '९ ची चौपट' असा करावा लागेल परंतु तसा अर्थ करणें सरळ अर्थाच्या दृष्टीनें वाजवी होणार नाहीं.

ह्या नाटकांत एकंदर १० अंक आहेत. त्यांत चैतन्याच्या मानसिक विकासाची कथा मोठ्या भपकेदार भाषेत सांगितली आहे. परंतु त्यांत नाट्यकौशल्याचा भाग फारच थोडा आहे. कलि आणि अधर्म यांच्या मनांत विश्वंभराच्या कर्तृत्वाचा विचार त्यांनां येऊन फार धास्ती वाटूं लागते, व उलटपक्षीं कलि व अधर्म यांस जय प्राप्त होतो कीं काय, याविषयीं विरागास चिंता उत्पन्न होते. परंतु भक्तिमार्ग हा विरागाचें शांतवन करतो, व विष्णूचा एक नवीन अवतार म्हणजे विश्वंभर अवतीर्ण झाला आहे असें त्यास सांगतो. हा विष्णूचा अवतार म्हणजेच कृष्णचैतन्य या नांवानें प्रसिद्ध असलेला संन्यासी हा होय. त्याची लोक भक्ति करूं लागतात व खुद्द प्रतापरुद्राचा जो मंत्रि, त्याच्या अनुज्ञेनें त्याचा जगन्नाथाच्या मंदिरांत प्रवेश होतो. फार काय पण प्रतापरुद्र राजाहि त्याचा अनुयायी होतो. बरेंचसें देशपर्यटन केल्यावर चैतन्य हा जगन्नाथास परत येतो.

सोळाव्या शतकांत शुकदेवाचा पुत्र भूदेव शुक्ल यानें धर्मविजय नांवाचें एक पांच अंकी अन्योक्तिरूप नाटक लिहिलें. सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांत मैथिल कृष्णदत्त या नांवाचा एक लेखक होऊन गेला. यानें कुवलयाश्वीय व सांद्रकुतूहल हें प्रहसन व दिवाकर पुरुषोत्तमाच्या समोर ज्याचा प्रयोग करण्यांत आला, तें अन्योक्तिरूप नाटक पुरंजनचरित्र हे ग्रंथ लिहिले.

हरिदासाच्या नांवावरहि एक पुरंजन नाटक आहे. पुरंजन म्हणजे आत्मा, चैतन्यतत्त्व, हाच कोणी एक राजा अशी कल्पना केली आहे.

सतराव्या शतकांत ज्याच्या हातांत राज्यसूत्रें होतीं अशा सगरराजघराण्यांत भगवंतराय म्हणून एक राजा होता. त्याच्या पदरीं एक शुक्लेश्वरनाथ म्हणून एक नाटककार उदयास आला व त्यानें प्रबोधोदय नांवाचें नाटक लिहिलें त्यांत निरनिराळ्या तत्त्वपद्धतींचे अभिमानी, आत्मा अमर आहे याविषयीं आपापसांत चर्चा करतात.

भवस्वामिन् व लक्ष्मी यांचा पुत्र श्रीनिवास अतिरात्रयाजिन् हा यानंतर झाला. तो तांडूर जिल्ह्यांत (तंजावर आणि मदुरा यांच्यामध्यें) सुरसमुद्र या ठिकाणीं होता. त्यानें एक पंचांकी भावनापुरुषोत्तम नामक नाटक लिहिलें.

आनंदरायमखिन् यानें आपल्या 'विद्यापरिणयन' ग्रंथांत वरील नाटकाचा उल्लेख केलेला आहे. सदरहू आनंदरायमखिन् हा भारद्वाज कुळांतील नृसिंह किंवा नरसिंह याचा पुत्र असून तो तंजावरचे राजे शहाजी (१६८० ते १७११) व शरभोजी (१७११ ते १७२७) यांच्या कारकीर्दींत होऊन गेला. त्याचें सप्तांकी 'विद्यापरिणयन' नाटक हें खरोखरच वेदकवीनें लिहिलें असून तें त्यानें

आनंदरायाच्या नांवावर विकूं दिलें. तंजावरचा राजा शहाजी याच्या एका १६९३ सालच्या दानपत्रिकेंत वेदकवीचा उल्लेख असल्यामुळें त्याचा काळ निश्चित करतां येतो.

विद्यापरिणय नाटकांत प्राकृत भाग मुळींच नाहीं, व विदूषकाचेंहि पात्र नाहीं. हें नाटक शरभोजीच्या कारकीर्दीत लिहिलें असून त्यांत ज्याचा उल्लेख केला आहे अशा प्रबोधचंद्रोदय नाटकाच्या स्वरूपाचें आहे. या नाटकांत शिवभक्ति ही निवृत्तीच्या मदतीनें जीवराजा व विद्या यांचा विवाह घडवून आणण्याकरितां जीवराजा व त्याची पत्नी अविद्या यांच्यामध्यें बिघाड उत्पन्न करते. आणि राजाचा नर्म सचिव जो चित्तशर्मन याचीहि तिला मदत असते. जीवानें विद्येचें रूप पाहिल्यापासून त्याच्या ठिकाणीं तिच्याविषयीं आवड उत्पन्न होते. अविद्या ही आपल्या बाजूनें आपले हस्तक, आपलीं पाखंडीं मतें, आपले मनोविकार यांच्या साहाय्यानें जीवास आपल्या कह्यांत ठेवण्याचा प्रयत्न करिते परंतु तिचीं सर्व साधनें निरुपयोगी ठरून जीव व विद्या यांच्या विवाहाचा काळ प्राप्त झाला आहे असें जीव जाहीर करतो.

आनंदरायानें जीवनंदन नांवाचें दुसरें एक सप्तांकी अन्योक्तिरूप नाटक लिहिलें आहे. ज्याअर्थी हें नाटक शहाजीराजाकरितां लिहिलें आहे, त्याअर्थी तें आधींचें असावें. त्यांत जीवराज व राजयक्ष्मा यांच्या युद्धाचें वर्णन आहे. त्या राजयक्ष्मास निरनिराळ्या व्याधी मदत करतात. परंतु जीवराज व राणी बुद्धि हे आपल्या प्रधानांच्या सल्ल्यावरून शिवाकडे जातात, व त्यांच्यापासून रसगंधक व इतर पुष्कळ गुणकारी वनस्पती मिळवितात व त्या योगानें ते शत्रूचा पाडाव करतात. हें युद्ध बरेंच निकराचें होतें व अखेर शिवाच्या मदतीनें राजास योगसिद्धि प्राप्त झाल्यामुळें त्यास विजय प्राप्त होतो.

विद्यापरिणय नाटकांत आनंदरायानें व्यंकटनाथ वेदान्ताचार्य कवितार्किकसिंह यानें केलेल्या संकल्पसूर्योदय नाटकाचा उल्लेख केलेला आहे यावरून हें नाटक आनंदरायाच्यापूर्वी लिहिलें असावें असें दिसतें. हें दशांकी अन्योक्तिरूप नाटक असून त्यांत रामानुजाचीं तत्त्वें प्रतिपादन केलीं आहेत. ऑफ्रेट याच्या 'कॅटलॉगांचा कॅटलाग' यांत सदरहू नाटकाच्या अनेक हस्तलिखित प्रती असल्याचें सांगितलें आहे. यावरून तें नाटक बरेंच लोकप्रिय होतें असें दिसून येतें.

सतराव्या शतकाच्या शेवटीं व अठराव्या शतकाच्या प्रारंभीं महामहोपाध्याय गोकुळनाथशर्मा या नांवाचा एक मैथिल ब्राह्मण नाटककार होऊन गेला. तो पितांबरशर्मन् व उमादेवी यांचा पुत्र होता. सदरहू पितांबरशर्मन् हा मंगराणी येथील फणदाह कुटुंबांतील होता. हा गोकुळनाथ शर्मा बनारस येथें आपल्या वयाच्या ८० व्या वर्षी निजधामास गेला. त्यानें कांहीं साहित्यविषयक व कांहीं तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ लिहिल्यावर एक अमृतोदय नाटक लिहिलें. या नाटकाचे पांच अंक आहेत. त्यांत सर्व प्रकारच्या विरोधास न जुमानतां अपवर्गानें शेवटीं आपणास क्षेत्रज्ञ नगरामध्यें राज्याभिषेक करवून घेतला याचें वर्णन आहे.

इतर अनेक अन्योक्तिरूप नाटकें अगदीं अलीकडच्या काळांतील आहेत. कांहींचा काळ अद्याप निश्चित झालेला नाहीं. त्यांपैकीं कांहीं नाटकांचा व त्यांच्या कर्त्यांचा पुढें उल्लेख करीत आहों.

अनुमितिपरिणय, याचा कर्ता नृसिंह कवि; तो व्यंकटकृष्ण याचा पुत्रः भारद्वाजगोत्रीय. आनंदचंद्रोदय, याचा कर्ता रंगिलाल; हें नाटक बडोद्यांत १८४९ सालीं लिहिण्यांत आलें. चित्सूर्यालोक नाटक, या पांच अंकी नाटकाचा कर्ता राज्ञी महामिचित् नृसिंहदैवज्ञ हा होता. चित्तवृत्तिकल्याण व जीवन्मुक्तिकल्याण, यांचा कर्ता नल्ला दीक्षित. जगन्मोहन, कर्ता अप्रसिद्ध. ज्योतिःप्रभाकल्याण नाटक, याचा कर्ता ब्राह्मसूर्य. क्षेमचंद्रबोध, कर्ता अप्रसिद्ध. मिथ्याज्ञानविडंबन अथवा मिथ्याज्ञानखण्डन, यांत एकच अंक आहे, तथापि त्यास नाटक म्हटलें आहे; याची इंडिया ऑफिसांत असलेली हस्तलिखित प्रत ( नं. ६२०० ) स. १८१२ मध्यें लिहिलेली आहे. याचा कर्ता कवि रविदास होता. जुन्या आख्यायिकांचें व चालीरीतींचें त्यानें मंडन केलें आहे. याशिवाय आणखीहि नाटकें आहेत. उदाहरणार्थः— मोहपराजय, कर्ता यशःपाल. मुक्ताचरित, याचा कर्ता कृष्ण कवि हा होय; मुक्तिपरिणय, याचा कर्ता गोविंदपुत्र सुंदरदेव; प्रपञ्चपिंडीकरणनिरास, याचा कर्ता वाधूल गोत्रोत्पन्न घट्टशेषार्थ; पूर्णपुरुषार्थचंद्रोदय, कर्ता जातवेदस्; सन्मत नाटक, कर्ता जयंतभट्ट; शांतिरस, कर्ता वैकुंठपुरी; शांतिचरित, हें नाटक बौद्ध धर्मविषयक आहे. सत्संगविजय, हें पांच अंकी नाटक असून याचा कर्ता वैद्यनाथ हा आहे; शिवभक्तानंद—कर्ता अप्रसिद्ध; स्वानुभूति नाटक, कर्ता अनंतराम; विवेकविजय, हें दशांकी असून कर्ता पूर्णगुरुपुत्र रामानुज कवि हा आहे. यतिराजविजय अथवा वेदान्तविलास, या नाटकाचा कर्ता वरदाचार्य अथवा अम्मलाचार्य; हा वैष्णव होता; याचें राहण्याचें ठिकाण कांची असून तो सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात व अठराव्या शतकाच्या प्रारंभीं झाला. त्याच्या बापाचें नांव घटिकाशत सुदर्शनाचार्य असें होतें. याचे सहा अंक आहेत. यांत रामानुजांच्या तत्त्वांचें प्रतिपादन करून त्यांचा विजय वर्णिला आहे. महिसूरशांतीश्वरप्रतिष्ठानाटक, हें जैनधर्मीय आहे. म्हैसूर येथील शांतीश्वराच्या तसबिरीच्या सन्मानार्थ १८९७ सालीं लिहिलें. याचा कर्ता ब्रह्मसूरीपुत्र पद्मराज पंडित हा होय. ज्ञानसूर्योदय, याचा कर्ता वादीचंद्रसूरि; कुमुदचंद्र, याचा कर्ता यशचंद्र; व राजीमति प्रबोध हें पंचांकी नाटक त्यानेंच लिहिलें आहे. नेमि हा या नाटकांतील नायक होता. अंतर्व्याकरण नाट्य परिशिष्ट हें वाचस्पति कृष्णानंद सरस्वती यानें लिहिलें. यांतील कविता दुर्थी असून त्या

एका पक्षीं व्याकरणाचे नियम प्रतिपादन करतात तर दुसऱ्या पक्षीं नैतिक व तत्त्वज्ञानविषयक तत्त्वांचें विवेचन करतात.

उत्तरकालीन रामनाटकें.—भवभूतीच्या वेळेपासून विशेषेंकरून रामकथेवर नाटकें रचण्याची वहिवाट प्रचलित होती. अशा प्रकारचीं अनेक रामनाटकें हल्लीं केवळ नाममात्रानें उपलब्ध आहेत. परंतु त्यांच्या केवळ नाममात्रापलीकडे कांहीं एक माहिती उपलब्ध नाहीं. त्यांपैकीं कांहीं कदाचित् महानाटकांहून प्राचीन आहेत हें विधान निदान 'छलितराम' या नाटकसंबंधानें तरी खरें आहे. दशरूपाच्या ( १.४१ ) अवलोकटीकेंत तसेंच सरस्वतीकंठाभरण व साहित्यदर्पण या ग्रंथांत सदरहू छलितराम नाटकाचा उल्लेख केला आहे. एका हस्तलिखित ग्रंथांच्या यादींत जें 'छलितराम' म्हणून नाटक आढळतें तें बहुतेक हेंच असावें. या वर निर्दिष्ट केलेल्या नाटकांहून इतर नाटकें बहुतेक अलीकडचीं आहेत.

आपल्या नाटकास काय नांव द्यावें यासंबंधी निरनिराळ्या नाटककारांचा अगदीं भिन्न भिन्न रिवाज आहे. ज्यावेळीं हें नांव अगदीं सामान्य स्वरूपाचें असतें, व नाटककाराच्या नांवाचा स्पष्ट निर्देश केलेला नसतो त्यावेळीं अमुक एक नाटक हेंच आहे किंवा याहून निराळें आहे हें ठरवितां येत नाहीं. उदाहरणार्थ, साहित्यदर्पणांत रामचरित ( ६.६७ ) व बालचरित ( ६.८५ ) यांचा उल्लेख आहे. एक रामचरित नांवाचें नाटक हस्तलिखित स्वरूपांतहि उपलब्ध आहे. रामनाटक व रामचंद्रनाटक हीं नांवें अगदींच संदिग्ध स्वरूपाचीं होत. रामायणनाटक, ज्यावर नाटककाराचें नांव नाहीं तें, व सोमेश्वर देवानें लिहिलेलें—ज्याची संवत् १५३७ त केलेली एक हस्तलिखित प्रत उपलब्ध आहे, तें—हीं दोन्ही एकच होत कीं काय हें ठरवितां येत नाहीं. त्याचप्रमाणें भट्टसुकुमार ऊर्फ भूषण याचें 'रघुवीरचरित' नाटक व आधुनिक कवि नृत्यगोपालकविरत्न याचें 'रामाभ्युदय' नाटक, हीं दोन्हीहि नाटकें पंचांकी व रामकथाविषयक अशीं आहेत. आणि त्यांचीं नांवें अगदींच सामान्य स्वरूपाचीं आहेत. त्याचप्रमाणें 'दर्पशातन' नांवाच्या नाटकांतहि रामकथेचा परशुरामविषयक जो कथाभाग आहे तो दिलेला आहे.

तथापि कांहीं रामनाटकांचीं नांवें अशीं आहेत कीं, त्यांवरून तीं निरनिराळीं असावींत असें कळण्यास अडचण पडत नाहीं. उदाहरणार्थ, सुंदरमिश्रानें लिहिलेलें 'अभिराम नाटक' हें १५९९ सालीं लिहिलें असून, त्यांत सात अंकांमध्यें रामकथाभाग दिला आहे.

कृष्णसूर्यपुत्र व कौडिण्यगोत्रीय महादेव याचें 'अद्भुतदर्पण' नाटक प्रख्यात आहे. महादेवाचें कुटुंब तंजावर प्रांतांत पालमारनेरी येथें राहात होतें. तंजावरचा राजा शहाजी यानें १६९३ सालीं वांटून दिलेल्या शहाजीराजपुराचे दोन वांटे महादेवाच्या वांट्याला आले होते. शिवाय या महादेवचा गुरु जो बालकृष्ण तो नीलकंठ दीक्षिताचा समकालीन होता. ह्या नीलकंठ दीक्षिताचा 'नीलकंठविजयचंपु' हा १६३६ सालीं रचला असल्याबद्दल स्पष्ट निर्देश आहे. अद्भुतदर्पण हें दशांकी नाटक असून रावणाकडे शिष्टाई करण्याकरितां अंगदास पाठविल्यापासून ते रामास विजयप्राप्ति होऊन त्याचें अयोध्येस पुनरागमन होईपर्यंतचा रामचरितांतील कथाभाग यांत आहे. लंकेंत घडलेलें सर्व इतिवृत्त राम व लक्ष्मण हे एका मायावी दर्पणांत पहातात व सर्व युद्धाची एकंदर हकीकतहि त्याच दर्पणांत दृष्टीस पडते म्हणून या नाटकास 'अद्भुतदर्पण' ( मायारूपक अथवा मायानाटिका ) हें नांव देण्यांत आलें आहे. सर्व रामनाटकांत दृष्टीस न पडणारें पात्र जें विदूषक तेंहि यांत असल्यामुळें हें नाटक मनोरंजक झालें आहे. हा महादेव नाटककार व उन्मत्तराघवाचे कर्ते महादेवशास्त्री हे दोन्ही एकच होते कीं काय याविषयीं निर्णय करतां येत नाहीं. वनमालिमिश्रविरचित 'अद्भुतराघव' नाटक यांत महावीरचरिताचें अनुकरण केलेलें दृष्टीस पडतें.

रामभद्र दीक्षित हा महादेवाचा समकालीन होता. तो कौंडिण्यगोत्रीय यज्ञराम दीक्षिताचा पुत्र व बव्हृच नल्ला दीक्षिताचा पौत्र होता. तो कुंभकोणमूपासून सात कोसांवर असलेल्या कंडरमाणिक्य येथें जन्मला, परंतु पुढील आयुष्यांत तो शहाजीराजपुरांत रहात असे. हें शहाजीराजपूर जेव्हां १६९३ सालीं शहाजीराजानें वांटून दिलें तेव्हां ४ वांटे ह्याच्या वांट्याला आले होते. तो नीलकंठमखिन् याच्यापासून काव्यशास्त्र शिकला व चोक्कनाथ याच्यापासून व्याकरण शिकला. व चोक्कनाथाच्या ज्येष्ठ कन्येशीं त्याचा पुढें विवाह झाला. महादेवाचा गुरु म्हणून ज्या बालकृष्णाचा निर्देश केलेला आढळतो त्याच्यापासून त्याला भक्तिज्ञान झालें. हा विविधविषयलेखक होता. त्यानें व्याकरण, शब्दकोश, रामगुणवर्णनपर अनेक काव्यें, शृंगारतिलकभाण व जानकीपरिणय इत्यादि ग्रंथ लिहिले. रामनाटकांपैकीं जीं नाटकें लोकप्रिय झालीं त्यांपैकीं हें एक (जानकीपरिणय) होतें. हें नाटक सप्तांकी असून रामाचा व सीतेचा विवाह झाल्यापासून त्यांचें अयोध्येस पुनरागमन होईपर्यंत सर्व रामकथाभाग यांत आहे.

जानकीपरिणय हें नांव अनेक ग्रंथकारांनीं आपल्या नाटकास दिलें आहे इतकेंच नव्हे तर कित्येक अनामिक नाटकांस हें नांव दिलेलें आढळतें. दर्भंगातील 'हत्ती' चा रहिवासी ब्राह्मणपुत्र मधुसूदन यानें शके १७८३ मध्यें एक 'जानकी-परिणय' नाटक लिहिलें. या नाटकास चारच अंक आहेत. यावरून प्रत्येक नाटकास निदान पांच अंक तरी असावेत हा नियम या नाटकांत पाळलेला दिसत नाहीं. भट्टनारायण ( हा बहुतेक वेणीसंहाराचा कर्ता नसावा ) व सीताराम यांनींहि 'जानकीपरिणय' नांवाचीं नाटकें लिहिलीं

आहेत. जैनधर्मी हस्तिमल्लसेन यानेंहि जानकीपरिणयसमानार्थक एक मैथिलीपरिणय नाटक लिहिलें असून दुसरीं अनेक नाटकें लिहिलीं आहेत. हें मैथिलीपरिणय नाटक व ज्याचा कर्ता जैन होता परंतु ज्याचें नांव माहीत नाहीं तें 'मैथिली' नाटक हीं दोन्ही एकच असावींत असें वाटतें. काश्यपगोत्रीय कृष्णसूरिपुत्र सुब्रह्मण्य कवि यांचें सप्तांकी 'विजयेंदिरापरिणय' नाटक व पंचांकी 'सीताविवाह' नाटक हीं नाटकेंहि जानकीपरिणयनाटकसमानार्थकच आहेत.

रामनाटकास बऱ्याच लेखकांनीं 'राघवाभ्युदय' असेंहि नांव दिलेलें आहे. रामभद्र दीक्षिताच्या मागोमाग झालेल्या भगवंतराय नाटककारानेंहि आपल्या नाटकास तें नांव दिलेलें आहे. त्याचप्रमाणें गंगाधर सूनूनेंहि आपल्या सप्तांकी नाटकास तें नांव दिलेलें आहे. तसेंच रामचंद्र हा जो हेमचंद्राचा शिष्य त्यानें याच नांवाचें नाटक लिहिलें असून शिवाय रघुविलास हेंहि नाटक लिहिलें आहे. या रघुविलासास रघुविलाप असेंहि कोणी म्हणतात. परंतु तें बरोबर दिसत नाहीं. यज्ञनारायण या अर्वाचीन नाटककारानें रघुनाथविलास नांवाचें एक पंचांकी नाटक लिहिलें आहे. याप्रमाणें रामनाटकास निरनिराळीं नांवें देण्यांत आलीं आहेत. अनर्घराघवाचा टीकाकार रुचिपति ( २. १३.१४ ) यानें एका रामानंद नांवाच्या नाटकाचा उल्लेख केलेला आहे. साहित्यदर्पणकारानें ( ६. ५६ ) त्याच नाटकास रामाभिनंद असें नांव दिलें आहे.

रामनाटकास खालील निरनिराळीं समानार्थक नांवें दिलेलीं सांपडतातः—बालकृष्णाचें मुदितराघव; मनातूर येथील धर्मराजपुत्र व्यंकटेश्वर यानें लिहिलेलें सप्तांकी राघवानंद, यासच कोणी राघवाभ्युदय म्हणतात; चवदाव्या शतकाच्या शेवटीं नेपाळी नाटककार मणिक यानें लिहिलेलें अभिनव राघवानंद व सत्यमंगल रत्नखेट; श्रीनिवासपुत्र राजचूडामणि दीक्षित यांचें आनंदराघव नाटक. शक्तिभद्र यानें लिहिलेलें सप्तांकी आश्चर्यचूडामणि नाटक; तसेंच वल्लिपरिणय नाटकाचा कर्ता वीरराघव याचें सप्तांकी रामराज्याभिषेक नाटक; यांत रामाच्या राज्याभिषेकानंतरचा कथाभाग वर्णिला आहे.

या रामचरित्रविषयक नाटकांत सीतेच्या नांवाचाहि उल्लेख कोठें कोठें केलेला आढळतो. उदाहरणार्थ, दक्षिण अर्काटप्रदेशांतील श्रीमुष्ण येथें होऊन गेलेल्या वरदगुरुपुत्र श्रीनिवास कवि यानें लिहिलेलें सीतादिव्यचरित नाटक; वैष्णव गुरु ताताय॑ यानें लिहिलेलें सीतानंद नाटक; रामपाणीवार अथवा रामवारीयर यानें लिहिलेलें सीताराघव नाटक; मैथिलीय नाटकांत सर्व रामकथेवर टीका केलेली नसून फक्त मिथिलेंतील सीताचरित्रावर केली आहे. या नाटकाचा कर्ता कुम्भकोणमचा भट्ट श्रीनारायणशास्त्री यानें अनेक नाटकें केलीं आहेत. रामकथेचे निरनिराळे भाग घेऊन त्यांच्यावरहि नाटकें रचण्याचा परिपाठ होता. उदाहरणार्थ, १७ व्या शतकांतील दोन नाटककारांनीं रामपुत्रांची कथा नाटकरूपानें वर्णिली आहे. स. १६३६ त लिहिलेल्या 'नीलकंठविजयचंपू 'चा कर्ता नारायण दीक्षिताचा पुत्र, अप्पय्या दीक्षिताचा पौत्र, निलकंठ दीक्षिताचा कनिष्ठ बंधु अतिरात्र यज्विन यानें रामाचा पुत्र कुश व त्याची भार्या कुमुद्वती यांच्या संबंधींचें एक पंचांकी नाटक ' कुशकुमुद्वतीय ' या नांवाचें लिहिलें आहे. त्याच सुमारास वाधूलगोत्रोत्पन्न, व्यंकटाद्रि व मङ्गलाबिका यांचा पुत्र व्यंकटकृष्ण दीक्षित यानें एक 'कुशलवविजय' नाटक लिहिलें आहे; सदरहू व्यंकटकृष्ण यास तंजावरचे शहाजी राजे यांच्याकडून सन १६९३ मध्यें कांहीं वर्क्षास मिळालें होतें व त्यानें आपलें नाटक शहाजीच्या आज्ञेवरून लिहिलें या गोष्टीवरून त्याचा काल निर्णीत करतां येतो.

सुंदरचरिताचा कर्ता व अगदीं अलीकडील नाटककार छविलाल याचें ' कुशलवोदय' नाटक हेंहि एक रामनाटकांपैकींच आहे. सरतेशेवटीं रामकथात्मक नाटकांमध्यें उपरिनिर्दिष्ट जैनधर्मी हस्तिमल्लसेन याच्या अंजनापवनंजय या नाटकाचाहि निर्देश करणें जरूर आहे.

कृष्ण नाटकें.—रामाप्रमाणें कृष्णकथेवरहि अनेक नाटकें आहेत. चैतन्याच्या मागाहून झालेल्या रामानन्दरायानें ओरिसाचा राजा प्रतापरुद्र ( १४९६–१५३९ ) याच्या आज्ञेवरून कृष्णाच्या साहसावर टीका करून ' जगन्नाथवल्लभ ' नाटक लिहिलें. शिवाय हस्तलिखित प्रतीवरून मधुसूदनसरस्वतीचें कृष्णकुतूहल' नाटक;कवीश्वरानें 'माधवानल' नाटक; आनंदधराचें 'माधवानल' नाटक आणि रामचंद्राचें 'यादवाभ्युदय' नाटक; इत्यादि नाटकांचा परिचय होतो. आपदेवात्मज अनंतदेवाचें ' कृष्णभक्तिचंद्रिका' हें अगदीं त्रोटक आहे.

सोळाव्या शतकांत होऊन गेलेल्या कृष्णराय नाटककारानें आपल्या पंचांकी'जांबवती–कल्याण' या नाटकामध्यें कृष्णाच्या जांबवतीबरोबर झालेल्या विवाहाच्या कथेसंबंधीं वर्णन आहे. कृष्णानें गोपींच्या सहवासांत जें आयुष्य घालविलें व राधेसंबंधीं त्याच्या ज्या प्रणयविषयक लीला झाल्या त्यांच्याविषयीं नाटकें विशेष लोकप्रिय आहेत. त्यांतील कांहीं आम्ही येथें देतों.

रामानुजाचा शिष्य व गुजराथचा रहिवासी देवजीतिपुत्र रामकृष्ण याचें' गोपालकेलिचंद्रिका ' हें नाटक छायानाटकाप्रमाणें आहे. एका अप्रसिद्ध नाटककाराचीं ' गोपीचंदन ' व ' गोविंदवल्लभ ' हीं नाटकें; गोपालभट्टाचें सदानंदगोविंद' नाटक; नारायणतीर्थाचें ' कृष्णलीलातरंगिणी ' नाटक; या नाटकांत गीतगोविंदाचा उपयोग केलेला आहे. त्याचप्रमाणें वैद्यनाथाचें कृष्णलीला हें नाटक आणि ज्या नाटकांच्या नांवांत माधव हें नांव सर्वत्र आढळतें अशीं अन्य नाटकें आहेत. उदाहरणार्थः—कन्यामाधव–कर्ता अप्रसिद्ध; गीतगोविंदाचें रूपांतर गोविंद कविभूषणकृत समृद्धमाधव; राधामाधव, सप्तांकी कर्ता अप्रसिद्ध; विदग्धमाधव, कर्ता

अप्रसिद्ध; विदग्ध–माधव, कर्ता शंकरदेव; विदग्धमाधव कर्ता रूपगोस्वामिन्.

रूपगोस्वामिन् हा कुमाराचा पुत्र व मुकुंदाचा पौत्र असून हुसेनशहाचा मंत्री होता व तो वैष्णवसुधारक चैतन्य ( सन १४८४ ते १५२७) याचा पहिला अनुयायी होता. त्यानें कृष्ण व राधा यांच्या लीलांसंबंधीं अनेक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांत विदग्धमाधव व ललितमाधव हीं दोन नाटकें आहेत.

विदग्धमाधवः—या नाटकाचे सात अंक असून गोकुळामध्यें विक्रमशक १५८९ त (सन १५३२–३३) तें लिहिलें. त्यांत राधा व कृष्ण यांच्या चरित्राचें व लीलांचें रसभरित वर्णन आहे. ह्या त्यांच्या लीला कृष्णोत्सवामध्यें झाल्या होत्या. पौर्णमासीच्या मनांत राधाकृष्णांचा संगम घडवून आणविण्याचें होतें. परंतु जटिलेच्या मनांत तिचा पुत्र अभिमन्यु याच्याशीं राधेनें विवाह करावा असें होतें. कृष्ण व राधा यांच्या भेटीमध्यें अनेक व्यत्यय उत्पन्न करण्यांत येतात, आणि सरतेशेवटीं अभिमन्यूवर कांहींतरी संकट येणार आहे व गौरी हीच त्याला त्यांतून पार पाडील अशा तऱ्हेनें अभिमन्यु व जटिला यांची समजूत घालण्यांत येते. कृष्ण हा गौरीचें रूप घेतो व राधा ही त्या गौरीची म्हणजे कृष्णाची उपासना करण्यास अभिमन्यु व जटिला यांस सांगते.

ललितमाधव यांतीलहि विषय तत्समानच आहेत. आणि त्यासारख्याच कथाभागानें याचे दहा अंक भरले आहेत. कृष्ण व रुक्मिणी यांच्या लीलाविषयक कथा हाहि पुष्कळ नाटककारांच्या आवडीचा विषय आहे. त्या विषयावरील पुढील हस्तलिखित नाटकें उपलब्ध आहेतः—१६७५ पूर्वी होऊन गेलेला शेषनृसिंहपुत्र शेषचिंतामणि याचें रुक्मिणीहरण नाटक; आनंदराघवाचा कर्ता राजचुडामणि दिक्षित याचें रुक्मिणीकल्याण हें नाटक; सरस्वतिनिवास याचें रुक्मिणी नाटक. कवि तार्किकसिंह याचें रुक्मिणीपरिणय नाटक;वरदकवीचें सप्तांकी रुक्मिणीपरिणय नाटक आणि रामवर्म्याचें ( १७३५–८७ ) रुक्मिणीपरिणय नाटक; रामवर्मन् हा कांचीचा राजा रामवर्मन् याच्या वहिणीचा मुलगा होता. ही कांची म्हणजे त्रावणकोर प्रांतांतील कुरूर या नांवानें हल्लीं प्रसिद्ध आहे. रामवर्मन स्वतः युवराज होता व त्यानें शृंगारसुधाकरभाण नामक एक दुसरें नाटक लिहिलें आहे. रामवर्मनच्या रुक्मिणीपरिणय नाटकाचें पांच अंक असून ते वाचीत असतां राजशेखराच्या कर्पूरमंजरींतील पुष्कळशा भागांची आठवण होते. त्यांत वसुभद्रकृष्ण हा रुक्मिणीच्या स्वयंवराच्या प्रसंगीं प्राप्त होतो, तिला शाल्व राजानें पळवून नेलें असतां तो तिची सुटका करितो, तिचा भाऊ रुक्मि याच्या मनांत तिचा विवाह शिशुपालाशीं घडवून आणण्याचा असतो. शिशुपाळ रुक्मिणीचें रूप धारण करणाऱ्या अनंगसेनेस घेऊन जातो आणि शेवटीं वसुभद्र हा रुक्मिणीस घेऊन द्वारकेस परत येतो इत्यादि कर्पूरमंजरी प्रमाणेंच कथाभाग आहे. केरल प्रदेशांतील इलत्तूर अग्रहारचा रहिवाशी वरदराजपुत्र सुंदरराज यानें त्याच कथानकावर वैदर्भीवासुदेव नांवाचें पांच अंकी नाटक लिहिलें आहे.

कृष्ण व रुक्मिणी यांचा पुत्र प्रद्युम्न व त्याची कांता प्रभावती यांच्या परस्पर प्रेमासंबंधींहि अनेकांनीं नाटकें लिहिलीं गेलीं आहेत. उदाहरणार्थ, विश्वनाथ कविराज यानें एक प्रभावतीपरिणय म्हणून नाटक लिहिलें आहे. त्याचा त्यानें आपल्या साहित्यदर्पण ग्रंथांत ( ३. ५८; ६. ८९; १८२; २०४; २६० व २६२ ) इत्यादि ठिकाणीं उल्लेख केलेला आहे. त्याच नांवाचें एक सप्तांकी नाटक हरिहर नांवाच्या नाटककारानें लिहिलें आहे.

हरिश्चंद्र पुत्र भगवतीदास याच्याकरितां आल्हादपुत्र रामकृष्णसूरि यानें एक प्रभावती–प्रद्युम्न नांवाचें पंचांकी नाटक लिहिलें होतें. एका अप्रसिद्ध नाटककाराचें प्रद्युम्नाभ्युदय नांवाचें नाटक व १२६६ त जन्मलेल्या केरल राजपुत्र रविवर्मभूप याचें त्याच नांवाचें नाटक हीं दोन्ही एकच असावींत असें वाटतें. यानंतर १८व्या शतकाच्या उत्तरार्धांत बालकृष्ण पुत्र शंकर दीक्षित यानें एक प्रद्युम्नविजय नांवाचें नाटक लिहिलें. हें नाटक बुंदेल राजा सभासिंह याच्या राज्यारोहणप्रसंगीं लिहिलें होतें. त्याच्या सात अंकांमध्यें प्रद्युम्नानें वज्रनाभावर जो विजय मिळविला त्याचें हरिवंशाप्रमाणें वर्णन आहे. प्रद्युम्नाचा पुत्र जो अनिरुद्ध त्याचा व रोचना हिचा जो प्रणयप्रसंग, त्यावर वल्लीसहाय कवि यानें रोचनानंद नांवाचें नाटक लिहिलें आहे.

याशिवाय सत्यभामाविषयक पुढील नाटकें आहेतः—व्यंकटगिरीचा कुमार तातय्या याचें पंचांकी पारिजात नाटक; गोपालदासानें पारिजात अथवा परिजातक नाटक; हिंदुपति हरिहरदेव यांच्या कारकीर्दीत लिहिलेलें उमापतीचें पारिजात हरण. अकबर बादशहाच्या कारकीर्दीत होऊन गेलेला नृसिंहपुत्र शेषकृष्ण उर्फ कृष्णकवि याचीं सत्यभामापरिणय व सत्यभामाविलास हीं नाटकें. कृष्ण कवि याचें एक मुरारिविजय नांवाचें नाटक असून त्यानें तोडरमल्लचा पुत्र गिरिधारी यानें सांगितल्यावरून कंसवध म्हणून आणखी एक नाटक लिहिलें. या नाटकाचे सात अंक असून यांतील संविधानक व भासाच्या बालचरितांतील संविधानक हीं दोन्हींहि एकच असावींत; दामोदरकृत कंसवध म्हणून एक नाटक प्रसिद्ध आहे तें व हें हीं दोन्हीं एकच असावींत असें वाटतें.

नरहरि दीक्षित याचा पुत्र सामराज दीक्षित यानें आपल्या श्रीदामचरित नाटकांत श्रीदामाची कथा वर्णिली आहे. हें नाटक बुंदेलराजपुत्र आनंदराय याच्या सांगण्यावरून स. १६८१ मध्यें लिहिण्यांत आलें. याचे पांच अंक आहेत. त्यांत दारिद्र्यपीडित जो श्रीदाम त्यास आपली स्थिति सुधारण्याकरितां त्याचा मित्र जो श्रीकृष्ण याच्याकडे जाण्याविषयीं त्याची भार्या त्याचें मन वळविते, त्यानंतर तो

कृष्णाकडे जाऊन व त्याचें वैभव पाहून आश्चर्यचकित होतो, तो जसा जातांना दरिद्रि होता तसाच परत येतांनाहि कसा दरिद्रि असतो परंतु घरीं आल्यावर कृष्णानें आपणांस श्रीमंत व संपन्न केल्याचें त्यास समजतें, इत्यादि कथाभाग दिला आहे शेवटीं कृष्णविषयक नाटकांमध्यें श्रीनिवासाचार्यांच्या सुदर्शनविजय नाटकाचा उल्लेख केला पाहिजे. यांत कृष्णानें आपल्या सुदर्शन चक्रानें पौंड्रकाचा नाश केल्याचें सांगितलें आहे.

महाभारत नाटकें.–रामायणाप्रमाणें महाभारतांतीलहि कथाभाग अनेक भारतीय नाट्यकवींनीं आपल्या नाटकाच्या संविधानाकरितां उपयोगांत आणिला आहे. अनंतराज राजाच्या कारकीर्दींत ( १०२८–६३ ) होऊन गेलेला काश्मिरी ग्रंथकार जो क्षेमेंद्र, त्यानें 'चित्रभारत' म्हणून एक नाटक लिहिलें आहे. त्यानें स्वतःच या नाटकाचा आपल्या औचित्यविचारचर्चा ( ५.३१ ) व कविकंठाभरण( ५.१ ) या ग्रंथांत निर्देश केला आहे.

मैथिलीपरिणय नाटकाचा कर्ता जो जैनधर्मीय हस्तिमल्लसेन त्यानें अर्जुनराज नाटक, भारतराज नाटक व मेघेश्वर अशीं तीन नाटकें महाभारतांतील कथाभागावर लिहिलीं आहेत. सभापर्वांतील कथाभागावर महेश्वरानें सभानाटक लिहिलें आहे. त्याचप्रमाणें बनेपच्या नेपाळी राजा जयरणमल्ल यानें सभापर्वनाटक उर्फ पांडवविजय नाटक लिहिलें आहे.

शीतलचंद्र विद्याभूषण यानें अगदीं अलीकडे प्रसिद्ध केलेल्या आपल्या दशांकी घोषयात्रा नाटकांत दुर्योधनचरित्राचा कथाभाग वर्णिला आहे. त्याचप्रमाणें सुकुमारपिल्ले यानें आपल्या लक्ष्मणास्वयंवर नाटकांत दुर्योधनाची कन्या लक्ष्मणा हिचा सांबाशीं झालेला विवाह वर्णिला आहे.

शुक्लया राजपुत्र लक्ष्मणमाणिक्य ( १६ व्या शतकाच्या शेवटीं ) यानें आकर्णभरणांत कथाभाग आपल्या षष्ठांकी विख्यातविजय नाटकांत दिला आहे. तथापि पांडवांस नाटकांचे नायक करण्याविषयीं नाटककारांचा विशेष कल दिसून येतो. युवराज प्रल्हाद यानें पार्थपराक्रम नांवाचें नाटक लिहिलें आहे. त्याचा भाऊ चंद्रावतीचा राजा धारावर्ष हा इ. स. १२०८ मध्यें राज्य करीत होता. कृष्णसूरि यानें द्रौपदीपरिणय हें नाटक लिहिलें आहे. एका अप्रसिद्ध नाटककाराच्या सुभद्राविजय नाटकांत व कौशिकगोत्री छंदोग बालचंद्र मखींद्रपुत्र नल्लकवि याच्या सुभद्रापरिणय नाटकांत अर्जुन व सुभद्रा यांची कथा आधारास घेतली आहे. या नल्ल कवीचा जन्म कुम्भकोणमूच्या जवळ कंदरमाणिक्य अग्राहारांत झाला होता व तो रामनाथमखींद्र व सदाशिव ब्रह्मेंद्र याचा शिष्य होता. त्याचप्रमाणें ही अर्जुनसुभद्राकथा आपणांस सुधींद्रयतीच्या सुभद्रापरिणय नाटकांत, गुरुरामाच्या सुभद्राधनंजय नाटकांत व विजयींद्रयतीच्या आणि कुलशेखरवर्म्याच्या त्याच नांवाच्या नाटकांत पाहावयास सांपडते. कुलशेखरवर्मा हा केरळकुलांतील एक दैदीप्यमान तारा होता व तो १० व्या शतकाचा उत्तरार्ध व बाराव्या शतकाचा पूर्वार्ध यांच्या दरम्यान केव्हांतरी होऊन गेला असें दिसतें. महाभारतांतील तपति व संवरण यांच्या संबंधाचें तपतिसंवरण नाटकहि त्यानेंच लिहिलें आहे. शेवटीं सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेलेल्या सुमतिजितामित्रमल्लदेव या भटगांवच्या राजानें आपल्या अश्वमेध नांवाच्या नाटकांत जैमिनीय भारताच्या आधारानें युधिष्ठिराचा अश्वमेधयज्ञ वर्णिला आहे.

पौराणिक नाटकें—पुष्कळशा नाटकांचीं संविधानकें दैवतकथांवरून घेतलीं आहेत. उदाहरणार्थ, एका अप्रसिद्ध नाटककाराच्या अहिल्यासंक्रंदन नाटकांत व कादंबरामकृष्णकृत अदितिकुंडलाहरण नाटकांत इंद्रविषयक कथा वर्णिली आहे.

शिवनाटकें अनेक आहेत. त्यांपैकीं कांहीं नाटकें व त्यांचे कर्ते पुढें दिले आहेत. भैरवप्रादुर्भाव, ग्रंथकर्ता अप्रसिद्ध; चंद्रशेखरविलास, तंजावरचा राजा शहाजी ( सन १६८७ ते १७११ ) यानें लिहिलेलें; हरकेलि, कर्ता चाहमान राजा विशालदेव विग्रहराजः त्याचा एक ११६४ मधील शिलालेख व त्याच्या हस्तलिखित नाटकाचा एक भाग हीं उपलब्ध आहेत. लिंगदुर्भेद, कर्ता दाडिमभट्ट; त्रिपुरारि नाटक, याचा कर्ता अप्रसिद्ध आहे.

शिव व पार्वती यांच्या विवाहाचा विषय हाहि अनेक नाटककारांच्या आवडीचा विषय आहे. उदा०—गौरी दिगंबर, कर्ता वैशेषिक सूत्राचा टीकाकार शंकरमिश्र; यानें आपला बाप भवनाथमिश्र, यानें सांगितल्यावरून या नाटकाचा प्रयोग करविला; गीतदिगंबर, कर्ता रामचंद्र सूमुनुवंशमणि; या नाटकाचे चार अंक आहेत, व त्यास रूपक म्हणतात. हें नाटक स. १६५५ त खाटमांडूचा राजा प्रतापमल्ल याच्या तुलापुरुषदानाप्रीत्यर्थ लिहिलें होतें. हरगौरी विवाह, हें संगीत नाटक नेपाळचा राजा जगज्ज्योतिर्मल्ल ( १६१७–३३ ) यानें स. १६२९ मध्यें लिहिलें. पार्वतीस्वयंवर व पार्वतीपरिणय नाटक, यांपैकीं पार्वतीपरिणय हें नाटक फार लोकप्रिय असून अनेक वेळां प्रकाशित झालें आहे. कारण तें हर्षाच्या दरबारीं असलेला बाण कवि यानें लिहिलें असावें असा समज प्रचलित आहे. शिवाय त्यांत व कालिदासाचें कुमारसंभव काव्य यांत पुष्कळ साम्य आहे. परंतु कृष्णम्माचार्यांनें असें प्रतिपादन केलें आहे कीं, सदरहू नाटक बाणभट्टाचें नसून तें शृंगारभूषण भाण व सर्वचरित या दोन ग्रंथांचा कर्ता जो वामनभट्ट बाण, त्याचें आहे. हा वामनभट्ट बाण–यास कोणी अभिनवबाण असेंहि म्हणतात–हा कोंडुविडूचा रेड्डिराजपुत्र वेम ( चवदाव्या शतकाचा शेवट व पंधराव्या शतकाचा प्रारंभ ) याच्या दरबारीं कवि होता. या अभिनव बाणानें आपल्या आश्रयदात्याचा सन्मान करण्याकरितां एक

वीरनारायणचरित नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्याच्या पार्वतीपरिणय नाटकाचा व कुमारसंभव काव्याचा विषय एक असून भाषाहि अगदीं सारखीच आहे. त्यांत शिवपार्वतीच्या विवाहाची कथा सांगितली असून शिवानें कामदेवाला भस्मसात केल्याचेंहि रसभरित वर्णन आहे.

या कामदेवविषयक कथांशाकडे लक्ष देऊन आणखी कित्येक नाटककारांनीं आपल्या नाटकांस नांवें दिलीं आहेत. उदाहरणार्थ, व्यंकटराघवाचार्य यानें आपल्या शिवपार्वतीची कथा वर्णन करणाऱ्या नाटकास मन्मथविजय हें नांव दिलें आहे. ही कामविषयक कथा पंचांकी रतिमन्मथ नाटकांतहि आढळते. या रतिमन्मथ नाटकाचा कर्ता तंजावरच्या कामेश्वराचा शिष्य जगन्नाथ हा होता. कदाचित हा जगन्नाथ व जगन्नाथ पंडितराय हे दोन्हीहि एकच असावेत. कामाचें भस्मीभवन झाल्यावर तो फिरून तंजावरचा देव शौरीराज पेरुमाल याच्या पोटीं जन्मास आला, इत्यादि अगदीं अलीकडची कथा एका अप्रसिद्ध नाटककारानें आपल्या पंचांकी अर्थपंचाल या नाटकांत व विश्वगुणादर्शाचा कर्ता रघुनाथपुत्र व्यंकटाचार्य यानें आपल्या अष्टांकी प्रद्युम्नानंदीय या नाटकांत उपयोगांत आणिली आहे. शिव व कामक्षीचें रूप धारण करणारी दुर्गा यांचा विवाह हा कामाक्षिपरिणय नाटकाचा विषय आहे. शिवपत्नीच्या आणखी अन्य कथाहि नाटकस्वरूपानें वर्णिल्या आहेत. उदाहरणार्थ,रुद्रशर्मन् त्रिपाथिन याचें चंडीविलास अथवा चंडीचरित. या रुद्रशर्म्यास दरिद्रिरुद्र असेंहि म्हणतात. एका अप्रसिद्ध नाटककाराचें प्रसन्नचंडिका नाटक, जीवानंद जोतिर्विदाचें संस्कृत व हिंदी नवमांकी मंगल नाटक यांतहि शिवपत्नीकथानकच आहे.

शिवकथाविषयक आणखींहि नाटकें आहेत तीं येणेंप्रमाणें:—वैद्यनाथ व्यास याचें गणेशपरिणय हें सप्तांकी नाटक असून मिथिलेंतील सिद्धिविनायक पूजोत्सवाच्या वेळीं राजा बाबू जनेश्वरसिंह यानें उत्तम नाटकास जें एक बक्षीस ठेविलें होतें त्याकरितां लिहिलें आहे. घनश्याम चौंडाजीपंत याचें कुमारविजय हें नाटक पंचांकी आहे, व यांतील कथा दारकदैत्यावर कुमारानें जो विजय मिळविला तेथपर्यंत आली आहे. हा घनश्याम अथवा आर्यक हा महादेव व काशी यांचा पुत्र असून मराठा राजा तुक्कोजी याचा मंत्री होता. त्यानें आपल्या ग्रंथांत राजशेखर कवीचा उल्लेख केला आहे. त्यानें इतरहि अनेक नाटकें लिहिलीं. उदाहरणार्थ, डमरुक, मदनसंजीवन, एक तीन अंकी नवग्रहचरित व एक अन्योक्तिरूप प्रचंड राहूदय नाटक. स्कंदकथेवर वीरराघवकृत वल्लीपरिणय नाटक व त्याच नांवाचें भास्करयज्वन् याचें, अशीं दोन नाटकें आहेत. श्रीनिवासाचार्य याच्या उषापरिणय नाटकांत व चयनीचंद्रशेखररायगुरु याच्या अष्टांकी मधुरानिरुद्ध नाटकांत उषाकथेचा उपयोग केला आहे.

राम व कृष्ण अवतारांखेरीज विष्णु अवताराच्या कथेचाहि कांहीं थोड्या नाटकांत उपयोग केलेला आहे. उदाहरणार्थ, श्रीशैलसूरिपुत्र वीरराघव याचें इंदिरापरिणय नाटक; रामानुज सर्वक्रतुपुत्र श्रीनिवास चतुष्कवींद्रदास याचें लक्ष्मीस्वयंवर नाटक व चवदाव्या शतकाच्या मध्यांत होऊन गेलेल्या विरूपाक्षाचें पंचांकी नारायणीविलास नाटक. देवताविषयक कथेच्या आधारें रचलेलीं दुसरीं नाटकें म्हटलीं म्हणजे अमृतोदय नाटक; गंगावतरण नाटक. केशवनाथाच्या गोदापरिणय नाटकांत देवराज अथवा वरदराज या रूपांत असलेला विष्णु व गोदा यांचें जें लग्न झालें त्याच्यावर प्रतिकूल टीका लिहिलेली आहे. एका अप्रसिद्ध नाटककाराचें गोदावरीपरिणय नाटक; वृ. शरणांवपुत्र रामानुजाचार्य याचें वासलक्ष्मीकल्याण नाटक, वीरराघवशरणांबाचें कनकवल्लीपरिणय, वार्धिकन्यापरिणय आणि कदाचित् त्याचेंच नागराज नाटक. कांचीं मंडलांतील ब्रह्मदेशाग्रहार येथें राहणारा लक्ष्मीधरपुत्र नारायण यानें कांची येथील कामाक्षिवल्लभ यात्रेकरितां लिहिलेलें कमलाकंठीरव नाटक हेंहि देवताकथाविषयकच आहे.

यांशिवाय कांहीं नाटकें चंद्रकथाविषयकहि आहेत. उदाहरणार्थ, नारायणकविकृत चंद्रकला नाटक; नंजराजाचा आश्रित व शिवरामसुधिमाणि याचा पुत्र नृसिंह कवि यानें लिहिलेलें पंचांकी चंद्रकलापरिणय अथवा चंद्रकला कल्याण; एका अप्रसिद्ध नाटककाराचें पंचांकी चंद्ररेखाविद्याधर नाटक; गंगाधरकृत चंद्रविलास नाटक; एका अप्रसिद्ध नाटककाराचें इंदुमतीपरिणय नाटक; तंजावरच्या तुळसाजी करितां (१७६३–८७) रामचंद्र कवीनें लिहिलेलें सप्तांकी कलानंद नाटक आणि त्याच नाटककाराचें एक अष्टांकी ऐंदवानंद नाटक; आणि एका अप्रसिद्ध नाटककाराचें विक्रमचंद्रिका नाटक. कौंडिण्यगोत्रीय वरददेशिकपुत्र श्रीनिवासकवि यानें लिहिलेलें एक पंचांकी अंबुजवल्लीकल्याण नाटक; परित्तियूर रामस्वामीकृष्णशास्त्री याचें कौमुदीसोम नाटक; उपरिनिर्दिष्ट गुरुरामाचें पंचांकी रत्नेश्वरप्रसादन नाटक; श्रीनिवासविरचित चतुरंकी सौम्यसोम नाटक व कांचीजवळील हस्तगिरीच्या स्तुतिपर लिहिलेलें हस्तिगिरीमहात्म्य; इत्यादि नाटकांचाहि पौराणिक नाटकांत समावेश केला पाहिजे.

वी र श्री प्र धा न ना ट कें.—पुष्कळशा नाटकांचीं कथानकें वीरश्रीच्या पौराणिक कथेंतून घेतलीं आहेत. परंतु तीं नक्की कोठून घेतलीं हें बऱ्याच वेळां ठरवितां येत नाहीं. उदाहरणार्थ, चवदाव्या शतकाच्या पूर्वी होऊन गेलेला नेपाळी कवि मणिक यानें भैरवानन्द नाटक लिहिलें आहे. तो अभिनवराघवानन्द नाटकाचा कर्ता होता. जयस्थितिमल्ल व राजल्लादेवी यांचा पुत्र युवराज जयधर्ममल्लदेव याच्या विवाहप्रसंगीं भैरवानन्द या नाटकाचा प्रयोग करण्यांत आला. या नाटकाचा नायक भैरव असून नायिका मदनावती ही कांहीं शापामुळें मृत्युलोकांत जन्मलेली देवांगना होती.

कलावती व काशीचा राजा कामरूप यांच्यासंबंधीं केरळकवि कृष्णदास यानें लिहिलेलें कलावतीकामरूप नाटक

हेंहि या सदरांत पडतें. भर्तृहरीच्या कथेवर हरिहरानें भर्तृहरीनिर्वेद नाटक लिहिलें आहे. ज्या अर्थी या नाटकांत १५ व्या शतकाच्या सुरवातीस होऊन गेलेल्या गोरक्षनाथयोगी याचा उल्लेख आहे, त्याअर्थी हरिहर हा त्याच्या पूर्वी होऊन गेला नसला पाहिजे हें उघड आहे. भर्तृहरिनिर्वेद नाटकांत भर्तृहरि व त्याची पत्नी भानुमती यांची हकीकत पांच अंकांत दिली आहे. राजा शिकारीस गेला असतां तेथेंच त्याला कांहीं अपघात होऊन तो इहलोक सोडून गेला, अशी खोटीच बातमी राणीच्या कानावर आल्यावरून तिचा अंत होतो, यामुळें राजाला अत्यंत क्लेश होतात; नंतर एक योगी येऊन त्याचें शांतवन करितो; तथापि राणीला जेव्हां फिरून जिवंत करण्यांत येतें, तेव्हां तो तिच्याकडे किंवा आपल्या प्रत्यक्ष मुलाकडेहि दुर्लक्षच करीत राहातो. हरिहर हा पूर्वी सांगितलेल्या प्रभावतीपरिणय या नाटकाचाहि कर्ता आहे.

सोळाव्या शतकाच्या शेवटीं होऊन गेलेल्या अप्पय्या दीक्षितानें आपल्या वसुमती-चित्रसेनविलास या नाटकांत चित्रसेन व वसुमती यांची कथा वर्णिली आहे. एका निनांवी ग्रंथकाराच्या नांवावर असलेलें वसुमती-चित्रसेन नाटक व वरील वसुमती-चित्रसेनीय नाटक हीं दोन्ही एकच असावींत असें वाटतें. वर निर्दिष्ट केलेल्या रतिमन्मथ नाटकाचा कर्ता जो जगन्नाथ त्याच्या वसुमतीपरिणय नाटकाचाहि येथें उल्लेख केला पाहिजे.

ज्याप्रमाणें क्षेमीश्वरानें आपल्या चंडकौशिक नाटकाला हरिश्चंद्राख्यान हें लक्ष्य घेतलें आहे, त्याचप्रमाणें हरिश्चंद्रयशश्चंद्रचंद्रिका नाटकांत व रामचंद्राच्या सत्यहरिश्चंद्र नाटकांत त्या आख्यानाचा उपयोग केला आहे. हा रामचंद्र बाराव्या शतकांत होऊन गेला. येथें नेपाळी राजा सिद्धिनरसिंह ( सुमारें १६२०–५७ ) याच्या हरिश्चंद्रनृत्य या नाटकाचा निर्देश करणें जरूर आहे.

कुवलयाश्व याच्या कथेलाहि पुष्कळांनीं नाटकी रूप दिलें आहे. सोळाव्या शतकांत होऊन गेलेला व वर सांगितलेल्या विख्यातविजय नाटकाचा कर्ता भुलुयाचा राजपुत्र लक्ष्मण माणिक्य यानें एक कुवलयाश्व नांवाचें नाटक लिहिलें आहे.

सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेलेला व पूर्वी सांगितलेल्या पुरंजनचरित व सांद्रकुतूहल या नाटकांचा कर्ता मैथिल कृष्णदत्त यानें एक सप्तांकी कुवलयाश्वीय हें नाटक लिहिलें आहे; त्याचप्रमाणें रामभट्टाचें मदालसा नाटक, गोकुलनाथ याचें त्याच नांवाचें पण स्वतंत्र नाटक व एका अप्रसिद्ध नाटककाराचें मदालसापरिणय नाटक हींहि नाटकें लिहिण्यांत आलीं आहेत. याच सदरांत पडणारीं व ज्यांत दोन भाषांचा उपयोग केला आहे अशीं नाटकें म्हटलीं म्हणजे भटगांवचा राजा जगज्ज्योतिर्मल्ल ( १६१७–३३ ) याचें कुवलयाश्व नाटक आणि रामभद्रानें स.१६६५ मध्यें लिहिलेलें आणि नेपाळचा राजा श्रीनिवासमल्ल ( १६५७–८० ) याच्या आश्रयाखालीं नाटकप्रयोग रूपानें करण्यांत आलेलें ललितकुवलयाश्व नाटक, हीं होत. माधव व सुलोचना यांची कथा रामममणिक कविराज यानें आपल्या कृतार्थमाधव या नाटकांत वर्णिली आहे. नलकथा हीहि नाट्यलेखकांच्या फार आवडीची कथा आहे व तीवर पुढील नाटकें झालीं आहेत:—रत्नखेट दीक्षित यानें लिहिलेलें भैमीपरिणयनाटक; शठकोपाचार्य यानें लिहिलेलें त्याच नांवाचें नाटक व व्यंकटाचार्य यानें लिहिलेलें तसल्याच प्रकारचें एक नाटक; एका अप्रसिद्ध नाटककारानें लिहिलेलें भैमीपरिणय नाटक; परवस्तु व्यंकटरंगनाथाचार्य याचें मंजुलनैषध नाटक; एका अप्रसिद्ध नाटककाराचें नलभूमिपालरूपक; नीलकंठ विजयचंपु ( १६३६ त लिहिलेला ),याचा कर्ता नारायण दीक्षित याचा पुत्र व अप्पय्य दीक्षित याच्या भावाचा पौत्र असा जो नीलकंठ दीक्षित त्याचें नलचरित्र; जीवविबुद्ध याचें सप्तांकी नलानंद नाटक ( १६६५ सालीं लिहिलेली याची एक हस्तलिखित प्रत हल्लीं उपलब्ध आहे ); तसेंच रामचंद्रानें लिहिलेलें नलविलास नाटक आणि नारायणानें लिहिलेलें कलिविधुनन नाटक. रत्नकेतूदय नाटकाचें नांवच फक्त आपणांस माहीत आहे परंतु त्याचा आणि बोधिसत्व रत्नकेतु याचा कांहीं संबंध आहे किंवा नाहीं हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. सामवत्कथा ही अंबिकादत्त व्यासाच्या पंचांकी सामवत नाटकांत व संवरणकथा ही वर निर्दिष्ट केलेल्या कुलशेखरवर्म्याच्या तपतीसंवरण नाटकांत वर्णिली आहे. भास, हर्ष व अनंगहर्ष यांनीं वर्णिलेल्या उदयनकथा ह्या साहित्यदर्पणांत (६.१३६) निर्दिष्ट केलेल्या उदयनचरित नाटकाचा विषय आहेत. दंडीच्या दशकुमारचरितावरून आपणांस माहीत झालेली उपहारवर्म्याची कथा आधुनिक ग्रंथकार श्रीनिवासशास्त्री यानें आपल्या उपहारवर्मचरित नाटकांत वर्णिली आहे.

महारतांतील वसु व गिरिका या कथेलाहि नाटकाचें रूप देण्यांत आलें आहे. उदाहरणार्थ, सुसुलकामशास्त्री याचें पंचांकी गिरिकाकल्याण नाटक; पेरसूरीचें वसुमंगल नाटक हेंहि त्याच सदरांत येतें. हरिजीवनमिश्र याच्या विजयपारिजात नाटकांत विजयाची कथा वर्णिली आहे.

ययाति व शर्मिष्ठा यांची कथा रुद्रदेव अथवा रुद्रचंद्रदेव यानें आपल्या सप्तांकी ययातिचरित्र नाटकांत, वल्लीसहाय कवि यानें आपल्या पंचांकी ययातितरुणानंद नाटकांत व अगदीं अलीकडील कुम्भकोणमूचा नाटकावर भट्ट श्रीनारायणशास्त्री यानें आपल्या शर्मिष्ठाविजय नाटकांत वर्णिली आहे. या नारायणशास्त्रीच्या शर्मिष्ठाविजय नाटकांत फक्त चारच अंक आहेत. त्यानें दुसरींहि अनेक नाटकें लिहिलीं आहेत. त्याच्या कलिविधुनन नाटकांत दहा अंक असून कलि व दमयंती यांची कथा वर्णिली आहे. त्यानें दुसरेंहि एक शूरमयूर नांवाचें सप्तांकी नाटक लिहिलें आहे. आणि जैत्रजयवात्रक म्हणूनहि त्याचें एक सप्तांकी अगदीं स्वतंत्र व

स्वकपोलकल्पित असें नाटक आहे. एका अप्रसिद्ध ग्रंथकाराचें ययातिदेवयानीचरित म्हणून एक नाटक आहे. त्यांत ययाति—देवयानी यांची कथा दिलेली आहे. परंतु त्याची अंकवारीनें विभागणी केलेली नाहीं. नीलकंठपुत्र नारेरी कवि नीलकंठ याच्या षष्ठांकी कमलिनीकलहंस नाटकाचें संविधानक एका अद्भुत कथेंतून घेतलेलें आहे. या नाटकांत चंद्रवर्म्याची कन्या कमलिनी व कलहंस यांच्या विवाहावर प्रतिकूल टीका केलेली आहे. तसेंच पूर्णज्योतिर्मुनीचा शिष्य जो पूर्णसरस्वति त्याच्या पंचांकी कमलिनीराजहंस नाटकांत कमलिनी व राजहंस यांच्या प्रणयाचें व विवाहाचें वर्णन आहे. शेवटीं रामकवि नांवाच्या राजपुत्राच्या सुवालावज्रतुंड नाटकाचा उल्लेख केला पाहिजे, याचे पांच अंक असून त्यांत वज्रतुंड मूषकानें, आपली भार्या सुवाला हिला भ्रष्टविल्याबद्दल रत्नांगद सर्पास ठार मारलें याचें वर्णन आहे.

नायिकेच्या नांवावर प्रसिद्ध असलेलीं नाटकें.—पुढें दिलेलीं नाटकें नायिकेच्या नांवावर प्रसिद्ध आहेत, परंतु तीं कोणत्या कथेच्या आधारानें रचलेलीं आहेत हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. एका अप्रसिद्ध नाटककाराचें कल्याणीपरिणय नाटक, तसेंच कनकवल्लीपरिणय नाटक व तंजावरचा राजा शहाजी ( १७३८—३९ ) याच्या वेळीं असलेला, टिप्पा अध्वरिन् व नरसाम्बा यांचा पुत्र व रसविलासभाण याचा कर्ता अप्पानाथ याचें पंचांकी कान्तिमतीपरिणय नाटक. त्याचप्रमाणें नागय्याचें पंचांकी कुंडमाला नाटक, सारस्वतादर्शाचा कर्ता अप्पाशास्त्री याचें लवलीपरिणय नाटक व ज्याची हस्तलिखित प्रत १७०० या सालांतली आहे तें विलीनाथ कवीचें पंचांकी मदनमंजरी नाटक; श्रीनिवासदासाच्या पंचांकी मरतकवल्लीपरिणय नाटक; एका अप्रसिद्ध कवीचें सौगंधिकापरिणय नाटक; तसेंच सेवंतिकापरिणय नाटक व शठकोपयतीनें वासंतिकापरिणय नाटक ( या शठकोपयतीचें खरें नांव तिरुमल असें होतें, हा १६ व्या शतकांत अहोबिल मठाचा गुरु होता, व तो वर सांगितलेल्या भैमीपरिणय नाटकाच्या कर्त्याहून निराळा होता ); एका अप्रसिद्ध नाटककाराचें वज्रभ्रुकुटीविलास नाटक इत्यादि. याच वर्गांत राघवानन्दाचा कर्ता व्यंकटेश्वर यानें लिहिलेल्या नीलापरिणय नाटकाचाहि समावेश केला पाहिजे.

ऐतिहासिक नाटकें:—खरोखर पाहूं गेलें तर हिंदुस्थानांत ऐतिहासिक नाटकें नाहीं म्हटलें तरी चालेल, परंतु कधीं कधीं एखाद्या राजपुत्राच्या उत्सवाच्या वेळीं किंवा एखाद्या उत्सवप्रसंगाचें वैभववर्णन करण्याकरितां रचलेलीं अशीं कांहीं नाटकें आहेत. नन्द घराण्याचा अधःपात या विषयाचा विशाखदत्तानें परामर्ष घेतला होता. तथापि रामदेव तर्कवादी शमद्याचार्य याचा पुत्र व विष्णुसिद्धान्त भट्टाचार्य याचा पौत्र वाणेश्वर शर्मा यानें त्याच विषयावर चंद्राभिषेक म्हणून एक नाटक लिहिलें आहे. मानाधिपति चित्रसेन राजा हा माझा आश्रयदाता होता असें वाणेश्वर म्हणतो परंतु हा चित्रसेन कोण हें निश्चित ठरवितां येत नाहीं. या नाटकाचे सात अंक आहेत. बाराव्या शतकाच्या उत्तरार्धांत राज्य करणारा शाकम्भरीचा चाहमान राजा विसलदेव विग्रहराज या आपल्या आश्रयदात्यास अर्पण करण्याकरितां सोमदेव यानें ललितविग्रहराज नाटक लिहिलें होतें. या नाटकाचे कांहीं भाग शिलालेखस्वरूपांत हल्लीं उपलब्ध आहेत.

काकतीय राजा वरंगळचा प्रतापरुद्र ( याचे १२२१ पासून १३३२ पर्यंतचे शिलालेख उपलब्ध आहेत ) याच्या पदरीं असलेला ग्रंथकार विद्यानाथ यानें आपल्या आश्रयदात्याचा सन्मान करण्याकरितां एक पचांकी प्रतापरुद्र कल्याण या नांवाचें नाटक लिहिलें. हें नाटक हिंदुस्थानांतच प्रकाशित झालें आहे. विजयानगरचा राजा मल्लिकार्जुन याचा सहकारी चंपकपूरचा ( चंपानेरचा ) राजा गंगादास सूवल्लभ प्रतापदेव याच्या पदरीं असलेला गुजराथी ग्रंथकार गंगाधर यानें आपला आश्रदाता व गुजराथचा शहा दुसरा महंमद ( १४४३–५२ ) यांच्यामध्यें झालेल्या युद्धाचें वर्णन करण्याकरितां गंगादास-प्रतापविलास या नांवाचें नाटक लिहिलें. शिवनारायणदास यानें आपल्या पंचांकी नन्दिघोषविजय अथवा कमलाविलास या नाटकांत कमला व पुरुषोत्तम ( विष्णु ) यांच्यांतील संबंध व रथयात्रामहोत्सवांतील कांहीं प्रसंग यांचें वर्णन केलेलें आहे. इतकेंच नव्हे तर नाटककारानें आपला आश्रयदाता गजपतिराज नरसिंहदेव ( १६ व्या शतकाचा मध्य ) याचेंहि एक पात्र सदरहू नाटकांत प्रविष्ट केलेलें आहे. इ. स. १६९३ मध्यें तंजावरचा शहाजी याचें जें दानपत्र आहे त्यांत पेरिअप्पा कवि याचा निर्देश केलेला आहे. या पेरिअप्पा कवीनें शहाजीराजाच्या सन्मानार्थ 'शृंगारमंजरीशाहराजीय' या नांवाचें नाटक लिहिलें. वेदान्तवागीश भट्टाचार्य यानें सूरिजान पुत्र भोजराज याच्या सन्मानार्थ भोजराजसत्चरित अथवा भोजसत्चरित या नांवाचें नाटक लिहिलें. भोजराज हा बनारस, हरिद्वार व मथुरा मिळून जो एक वृन्दावती नांवाचा प्रदेश होतो, त्याचा राजा होता, असें त्याचें वर्णन केलेलें आहे. नाटकाचे जरी दोनच अंक आहेत तरी त्यास नाटक म्हटलें आहे. कविभूषणानें लिहिलेल्या द्वादशांकी अद्भुतार्णव नाटकांत नवद्वीपाचा ईश्वरीय याच्या दरबारांतील चालीरीतींचें वर्णन आहे.

पुढील नाटकें हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य झाल्यानंतर लिहिलेलीं असून त्यांतील कांहीं इंग्रजीसत्ताप्रशंसनपर आहेतः—बिंदुमाधवानें लिहिलेलें कंपनीप्रतापमंडल; सातव्या एडवर्डच्या राज्यारोहणप्रसंगीं मुडुम्ब नृसिंहाचार्यस्वामी यांनीं लिहिलेलें जयसिंहाश्वमेधीय नाटक, जॉर्ज राजाच्या दरबारप्रसंगीं लक्ष्मणसूरीनें लिहिलेलें दिल्लीसाम्राज्य नांवाचें नाटक.

मिश्र नाटकें.—कित्येक साहित्यशास्त्रकारांच्या ग्रंथांतून व हस्तलिखित ग्रंथांच्या यादींतून निर्दिष्ट केलेलीं नाटकें

कोणत्या सदरांत पडतात, हें निर्णीत करतां येत नाहीं. साहित्यदर्पण या ग्रंथांत निर्दिष्ट केलेली पंचांकी किंपंचाचरित्र व नमभूपतिग्रह हीं नाटकें राधवानन्द मंत्र्याच्या नांवावर आहेत. शार्ङ्गधरीय नाटक शार्ङ्गधराच्या नांवावर व वृत्तिवल्लभ नाटक लघुव्यासाच्या नांवावर आहे. आर. कृष्णमाचारी यांनीं एका शेक्सपियरच्या नाटकाचें रूपांतर करून त्यास वासंतिकास्वप्न हें नांव दिलेलें आहे.

प्र क र ण.—नाटकांशीं तुलना केली, तर प्रकरण हा जो नाटकाचा प्रकार आहे तो भारतीय नाटककारांमध्यें फारसा लोकप्रिय झाला नाहीं. भवभूतीनंतर विशेष नांव घेण्यासारखें असें एकच प्रकरण लिहिण्यांत आलें असें म्हटलें तरी चालेल; व तें उद्दण्डिन् अथवा उद्दण्डनाथ याचें मल्लिकामारुत हें होय. मल्लिकामारुत या नाटकाच्या कर्त्याचें नांव त्याचा टीकाकार जो रंगनाथदंडी, यानें निर्दिष्ट केलें आहे. हा नाटककार व सुप्रसिद्ध साहित्यकार दंडी हे दोघे एकच होते असेंहि कांहीं लोक म्हणतात. वास्तविक पाहिलें तर तो कुक्कुटक्रोड येथील झामोरिन मानविक्रम याच्या दरबारीं पंडित होऊन गेला; व त्याच्याच विनंतीवरून प्रस्तुत नाटक लिहिण्यांत आलें होतें.

मल्लिकामारुत नाटकाचे दहा अंक आहेत. त्यांत विद्याधर राजाची कन्या मल्लिका हिचा कुंतलराजपुत्र मारुत याच्याशीं विवाह कसा घडून आला, ही कथा वर्णिली आहे. प्रथम सिंहलराजा मल्लिकेस मागणी घालतो व त्यामुळें मारुताचें मन खिन्न होतें. मारुताचा मित्र कलकंठ हाहि आपली प्रियतमा रमयंतिका हिच्या प्राप्तीच्या बाबतींत तसाच खिन्न असतो. अशा स्थितींत त्या दोघांनांहि आपापल्या प्रियतमेस मदांध हत्तीच्या तडाख्यांतून सोडविण्याचा प्रसंग येतो. या हत्तीच्या झटापटींत कलकंठ हा गतप्राण झाला असें कळतें आणि म्हणून मारुत आत्महत्या करण्यास उद्युक्त होतो. पण ऐनवेळीं कलकंठ प्रकट होऊन तसें करण्यापासून मारुतास परावृत्त करतो. पुढें कांहीं काळानें मल्लिकेस एक राक्षस घेऊन जातो व मारुत तिला त्याच्यापासून सोडवून आणतो, व ज्याअर्थी तिचा व सिंहलराजा यांचा विवाह होण्याचें घाटत असतें, त्याअर्थी मारुत तिला घेऊन पळून जातो. कलकण्ठ हाहि आपली प्रियतमा रमयंतिका हिला घेऊन जातो. मल्लिकेस फिरून एक राक्षस घेऊन जातो व त्यामुळें मारुतास वेड लागतें. शेवटीं सर्व अडचणी नाहींशा होऊन दोन्हीहि जोडप्यांच्या मनासारखी स्थिति घडून येते असें दाखविलें आहे.

महामहोपाध्याय तर्कालंकार यांचें एक कौमुदीसुधाकर प्रकरण प्रकाशित झालें आहे असें म्हणतात; परंतु तें आमच्या पाहण्यांत नाहीं. एका अप्रसिद्ध ग्रंथकाराचें वक्रतुण्डगणनायक व पीतांबराचा पुत्र व रामभद्राचा पौत्र जगन्नाथ नाटककार याचें एक सप्तांकी अतंद्रचंद्रिकाप्रकरण, अशीं दोन प्रकरणें हस्तलिखित स्थितीमध्यें आहेत. सदरहू जगन्नाथ हा मैथिल असून त्यानें तें प्रकरण फत्तेशहाच्या आज्ञेवरून लिहिलें होतें. साहित्यशास्त्रकारांनीं दुसऱ्याहि कांहीं प्रकरणांचा उल्लेख केलेला आहे परंतु तीं अद्याप उपलब्ध झालेलीं नाहींत. उदाहरणार्थ, दशरूप (३. ३८) यावरील अवलोकटीकेंत तरंगदत्त व पुष्पदूषितक या दोन प्रकरणांचा उल्लेख केलेला आहे. हें पुष्पदूषितक व साहित्यदर्पण (६. २२५) यांत निर्दिष्ट केलेलें पुष्पभूषित हीं दोन्हींहि एकच असावीं असें वाटतें.

ना टि का.—प्रकरण या नाटकाच्या प्रकारापेक्षां नाटिका या प्रकारचीं नाटकें अलीकडील ग्रंथकारांनीं बरींच अधिक लिहिलीं आहेत. नाटक व नाटिका यांच्यांतील भेदहि फार सूक्ष्म आहे. यामुळें उपनिर्दिष्ट पुष्कळ नाटकांपैकीं नाटककारांनीं त्यांतील पुष्कळशीं नाटकें नाटिका लिहिण्याच्या हेतूनेंहि लिहिलीं असण्याचा संभव आहे. कधीं कधीं नाटकास चार अंक असले कीं, लागलीच ती नाटिका झाली असें म्हणतात; परंतु नाटककारानेंच नाटक हें नांव दिलेलीं अशीं अनेक चार अंकी नाटकें वर नमूद केलीं आहेत. नाटक व नाटिका यांत जो असा घोंटाळा करतात त्याचें उत्तम उदाहरण आपणास रामदासपुत्र नेपाली कवि धर्मपुत्र, याच्या नाटकासंबंधानें पहावयास मिळतें. जययथासिंह याच्या सांगण्यावरून प्रस्तुत कवीनें हरिशंकरयात्रेकरितां एक चतुरंकी रामायण नाटक लिहिलें. कालांतरानें त्यानें त्या नाटकाची प्रस्तावना बदलून त्यास रामांकनाटिका असें नांव दिलें. ही गोष्ट १३६० सालीं घडली.

अनंतराज (इ. स. १०२८ ते १०६३) व त्याच्या नंतर झालेला कलश (१०६३–१०८९) या दोघांच्या कारकीर्दींत होऊन गेलेला काश्मिरी कवि क्षेमेन्द्र यानें ललितरत्नमाला नांवाची नाटिका लिहिली. सदरहू ग्रंथकाराच्या औचित्यविचारचर्चा या ग्रंथांत प्रस्तुत नाटकांतील जें एक अवतरण दिलें आहे त्यावरून या नाटकाचें हें नांव आपणांस माहीत होतें व त्या ग्रंथावरूनच प्रस्तुत नाटकाचें संविधानक उदयनकथेवरून घेतलें होतें हीहि गोष्ट कळून येते.

कर्णसुंदरी नाटिकेचा कर्ता बिल्हण याचाहि काळ आपणांस साधारणपणें ठरवितां येण्यासारखा आहे. बिल्हण हा कौशिकगोत्री असून ज्येष्ठकलश व नागदेवी यांचा तो पुत्र होता. तो काश्मीर प्रांतांत खोनमुश—ज्यास हल्लीं खुनमो म्हणतात—येथें जन्मला. कलशराजाच्या कारकीर्दींत (१०६३–१०८९) त्यानें आपली जन्मभूमि सोडली व पुष्कळ प्रवास करून शेवटीं पश्चिमेकडील चालुक्य, सहावा विक्रमादित्य त्रैलोक्यमल्ल (१०७७–११२५) याच्या दरबारीं तो विद्यापति झाला. बिल्हणचरित्र रचून झाल्यावर तो अनहिलपट्टणचा राजा वैरिसिंह याच्या दरबारीं रहावयास गेला. यावरून नवव्या शतकांत होऊन गेलेला अनहिलवाडचा राजा वैरिसिंह हा येथें उद्दिष्ट नाहीं. ज्याप्रमाणें दुसऱ्या भीमदेवास जयसिंह हा किताब होता त्याच

प्रमाणें अकराव्या व बाराव्या शतकांत होऊन गेलेल्या अनहिलवाड राजास वैरिसिंह हा किताब असावा. ज्याअर्थी कर्णसुंदरी ही नाटिका अनहिलवाडच्या यात्रामहोत्सवाकरितां लिहिली होती आणि तिच्या नांवावरूनहि त्यावेळीं राज्य करीत असलेल्या अनहिलवाड राजाचा बोध होतो त्याअर्थी त्यावेळीं त्या ठिकाणीं चालुक्य राजा कर्णदेव त्रैलोक्यमल्ल ( १०६४-१०९४ ) हा राज्य करीत होता व बिल्हण विक्रमादित्याच्या दरबारीं कवि होण्याच्या अगोदर त्या कर्णदेव त्रैलोक्यमल्लाच्या दरबारीं तो वागत होता असें वाटतें. यावरून कर्णाच्या दरबारीं असतांना बिल्हणानें ही कर्णसुंदरी नाटिका लिहिली, व ती बहुतेक कर्ण व कर्णाट राजा जयकेशी याची कन्या मियानल्लदेवी यांच्या विवाहाप्रीत्यर्थ लिहिली असावी असें आम्ही खात्रीपूर्वक म्हणू शकतो. हेमचंद्राच्या द्व्याश्रयग्रंथांत असें लिहिलें आहे कीं कर्णाला एका चित्रावरून प्रथम त्या राजकन्येचा परिचय झाला व कर्णसुंदरी नाटिकेंतहि त्या चित्राचा प्रमुखपणें उल्लेख केला आहे. कर्णाचा मियानल्लेशीं जेव्हां विवाह झाला, तेव्हां तो बराच वयस्क होता; यावरून कर्णसुंदरीचा रचनाकाल १०८० ते १०९० यांच्या दरम्यान पडतो.

कर्णसुंदरी नाटिकेंत चालुक्यराजा हा विद्याधर राजाची कन्या कर्णसुंदरी हिच्याशीं विवाह करून सार्वभौम राजा होतो असें वर्णिलें आहे. राजाचा मंत्री प्रथम त्या राजकन्येस अंतःपुरांत आणतो व राजा तिला प्रथम स्वप्नांत व नंतर चित्रांत पाहतो, पुढें तिचें व त्याचें प्रेम जडतें; त्यामुळें राणीस मत्सर उत्पन्न होतो, त्यामुळें ती त्यांच्या भेटींत व्यत्यय आणते. एकदां तर ती त्यांच्या भेटीच्या ठिकाणीं कर्णसुंदरीचा वेष घेऊन येते. तदनंतर कर्णसुंदरीचा वेष दिलेल्या एका मुलाबरोबरच राजाचा विवाह लावून देण्याचा ती प्रयत्न करते. या ठिकाणीं त्या मुलाच्या जागीं खरोखरीची कर्णसुंदरीच प्राप्त होईल अशी राजाचा मंत्री व्यवस्था करतो. यानंतर नेहमींप्रमाणें राजाच्या सैन्यास जय प्राप्त झाल्याची बातमी येते व सर्वांच्या मनाप्रमाणें सर्व गोष्टी घडून येतात.

पारिजातमंजरीचा कर्ता मदन याचाहि काल निश्चित करतां येण्यासारखा आहे. मदनाचें दुसरें नांव बालसरस्वती असें होतें. तो मूळचा बंगालचा रहिवासी असून तो पुढें धारचा परमार राजा अर्जुनवर्मा याचा अध्यापक होता. सदरहू राजाचे मदनानें लिहिलेले १२१२,१२१३ व १२१५ या सालचे ताम्रपट उपलब्ध आहेत.

पारिजातमंजरी अथवा विजयश्री ही नाटिका असून हिचे पहिले दोन अंक मध्यहिंदुस्थानांत धार येथें हल्लीं शिलालेखस्वरूपांत सांपडतात. या नाटिकेचा प्रयोग धारानगरींतील एका वसंतोत्सवप्रसंगीं करण्यांत आला होता. त्यांत जयसिंहाचा म्हणजे अनहिलपट्टणचा चालुक्य राजा दुसरा भीमदेव याचा पराभव झाल्यानंतर राजा अर्जुनवर्मा याच्या वक्षस्थलावर एकाएकी एक पारिजातमंजरी येऊन पडते व तिचें तात्काल कुमारिकेंत रूपांतर होतें. वास्तविक ती चालुक्य राजाचीच कन्या असते; तिला खजिनदाराच्या स्वाधीन करण्यांत येतें; पुढें तिचें व राजाचें प्रेम जडतें; नेहमींप्रमाणें राणीला मत्सर उत्पन्न होणें, राजा व कुमारिका यांचे भेटी घेण्याचे प्रयत्न होणें, त्यांत राणीनें व्यत्यय आणणें इत्यादि प्रकार घडून येतात. ही नाटिका नमुनेदार असावी असें वाटतें व कर्णसुंदरीप्रमाणेंच हिच्यांतहि तत्कालीन गोष्टींचा उल्लेख केलेला आहे.

साहित्यदर्पणांत त्याच्या कर्त्याच्या वडिलानें म्हणजे चंद्रशेखरानें पुष्पमाला नांवाची नाटिका लिहिली होती असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें त्यानें म्हणजे स्वतः विश्वनाथानें, आपण एक चंद्रकला नांवाची नाटिका लिहिली आहे, असें साहित्यदर्पणांत ( ६.१८३-१९२ ) म्हटलें आहे.

रामचंद्र नांवाच्या कवीनें एक वासंतिका नांवाची नाटिका लिहिली होती. तिच्यांतील नायक पुष्पपुरचा राजा हंसकेतु हा असून, नायिका वासंतिका नांवाची गाणारीण आहे. राजाचें व वासंतिकेचें प्रेम पाहून राणीस मत्सर उत्पन्न होतो परंतु अखेर असें कळून येतें कीं वासंतिका ही दुसरी तिसरी कोणी नसून प्रत्यक्ष राणीचा चुलता जो केसरपुरराज मलयकेतु, याची कन्या आहे. यामुळें राणीच्या अनुमतीनें राजाचें व वासंतिकेचें लग्न होतें व त्यामुळें राजाला सार्वभौमपद प्राप्त होतें.

आलमोराचा रहिवाशी लक्ष्मीधरपुत्र विश्वेश्वर यानें आठराव्या शतकाच्या प्रारंभीं नवमालिका नांवाची नाटिका लिहिली. विश्वेश्वरानें शृंगारमंजरी नांवाचें सट्टकहि लिहिलें आहे. बऱ्याच नाटिकांच्या कालाचा निर्णय करतां येत नाहीं त्या नाटिका व त्यांचे कर्ते पुढें दिले आहेतः—चंद्रप्रभा, कर्ता अप्रसिद्ध; कमलिनीकलहंसनाटिका, या नाटिकेचा कर्ता राजचूडामणि दीक्षित हा होता. यानें आनंदराघव व शृंगारसर्वस्वभाण हीं दोन नाटकेंहि लिहिलीं आहेत. कुवलयवती, हिचा कर्ता कृष्णकविशेखर हा होता. हिच्यांत माधव म्हणजे कृष्ण आणि कुवलयवती यांच्यांतील प्रणय व राधेचा मत्सर यांवर टीका केली आहे. कुंदमाला—हिचा साहित्यदर्पण ( ६. ३६) यांत उल्लेख केला आहे व हींत रामकथा वर्णिली आहे; मुकुंदमाला, हिचाहि साहित्यदर्पण (३. २६१) यांत उल्लेख केला आहे. कदाचित् कुन्दमाला व मुकुन्दमाला हीं दोन्हीं एकच असूं शकतील. मृगांकलेखकर्ता त्रिमलदेवपुत्र विश्वनाथ; हा विश्वनाथ नाटककार जरी गोदावरी प्रदेशांतला राहणारा होता तरी तो नेहमीं बनारस येथें राहात असे. मृगांकलेखा नाटिकेंत कलिंग राजा कर्पूरतिलक व कामरूप राजाची कन्या मृगांकलेखा यांच्या प्रणयाचें वर्णन आहे. प्रथम शंखपाल राक्षसानें मृगांकलेखेचें हरण केलेलें असतें; परंतु राजानें राक्षसाचा वध करून तिला सोडविलें. आपल्या राजास सार्वभौमपद प्राप्त व्हावें म्हणून त्याचा प्रधान

शिकारीच्या जागीं राजा व मृगांकलेखा यांच्या प्रथमभेटीचा योग जुळवून आणितो, असें कथानक यांत आहे.

रंभामंजरी—हिचा कर्ता नयचंद्र हा असून ती अगदीं अलीकडे लिहिली असावी असें दिसतें. तिचे फक्त तीनच प्रवेश असल्यामुळें तिला नाटिका म्हणावें किंवा नाहीं हेंहि संशयितच आहे.

शिवनारायणभंजमहोदयनाटिका—हिचा कर्ता नरसिंह हा होता. या नाटिकेच्या कर्त्यानें आपला आश्रयदाता जो केओन्झरचा भंजराजा शिवनारायण याचें वैभव वर्णिलें आहे. प्रस्तुत नाटकाचा काल निश्चित करतां येत नाहीं.

शृंगारतरंगिणीः—हिचा कर्ता सुरपुरचा व्यंकटाचार्य हा होता. हस्तलिखित प्रतींच्या यादींत या नाटिकेला नाटक म्हटलें आहे. कोणी यास भाणहि म्हणतात.

शृंगारवाटिका अथवा शृंगारवापिकाः—हिचा कर्ता महादेवपुत्र व धुंडिराजशिष्य चित्तपावन विश्वनाथभट्ट राणदा हा होता. ही नाटिका राजा रामसिंह याच्या आज्ञेवरून लिहिण्यांत आली होती. तिच्यांत अवंतिराजा चंद्रकेतु व त्यानें स्वप्नांत पाहिलेली चंपावतीचा राजा रत्नपाल याची कन्या कांतिमती यांच्या प्रणयाचें वर्णन आहे. राजाचें सदर कांतिमतीवर प्रेम जडतें व त्या दोघांची शृंगारवाटिकेंत गांठ पडून शेवटीं त्यांचा विवाह होतो. ज्याअर्थी इंडिया–ऑफिस मील हस्तलिखित प्रतीवर सतराव्या शतकांतील मध्य, हा काळ नमूद केला आहे त्याअर्थी हा ग्रंथ त्याच्या कांहींसा अगोदर लिहिलेला असावा.

उषारागोदयनाटिकाः—हिचा कर्ता रुद्रचंद्रदेव अथवा रुद्रदेव हा होता. यानें ययातिचरित नांवाचें नाटकहि लिहिलें आहे. या उषारागोदय नाटिकेंत हरिवंशाच्या आधारानें बाणकन्या उषा व अनिरुद्ध यांच्या प्रणयाची कथा वर्णिली आहे.

वृषभानुजाः—हिचा कर्ता कायस्थ मथुरादास हा होता. हा गंगा व यमुना यांच्या कांठचें सुवर्णशेखर या गांवचा रहिवासी होता. यांतील संविधानक कृष्ण व राधा यांच्या कथेवरून घेतलें आहे. यांत राधा व कृष्ण यांच्या भेटींत अनेक वेळां विघ्नें उपस्थित झालेलीं दाखविलीं आहेत. एके प्रसंगीं 'ही घ्या आपल्या प्रियतमेची प्रतिकृति' म्हणून विदूषक कृष्णाला एक तसबीर आणून देतो व तें पाहून राधेला संताप येतो; परंतु शेवटीं जेव्हां ती प्रतिकृति आपलीच आहे असें तिला कळून येतें तेव्हां तिचा राग शांत होतो.

स ट्ट क.—या चार अंकी नाटकांत नाटिका हा मुख्य प्रकार आहे. परंतु त्यांचे आणखीहि प्रकार आहेत. सट्टक व नाटिका यांच्यांत बरेंच साम्य आहे. कांहीं सट्टकें व त्यांचे कर्ते पुढें दिले आहेत.

आनंदसुंदरीः—या सट्टकाचा कर्ता मराठा राजा तुकोजी याचा प्रधान घनःश्याम हा होता. शृंगारमंजरी—या सट्टकाचा कर्ता अलमोऱ्याचा रहिवासी विश्वेश्वर हा होता. तो अठराव्या शतकाच्या प्रारंभीं होऊन गेला. यानेंच उपरिनिर्दिष्ट नवमालिका नाटिका लिहिली आहे.

ई हा मृ ग, वीरविजयः—हें ईहामृग कृष्णमिश्रानें लिहिलें आहे. सर्वविनोदनाटक—या ईहामृगाचा कर्ता कृष्णअवधूतघटिकाशत महाकवि हा होता. हें ईहामृग प्रकाशित झालें असून यांत शृंगार, बीभत्स, हास्य व वैराग्य हे रस आहेत असें म्हणतात. परंतु तें आमच्या पहाण्यांत नाहीं.

डि म.—आतांपर्यंत एकच डिम प्रकाशित झालें आहे, व तें म्हणजे रामविरचित मन्मथोन्मथन हें होय. यांतील संविधानक शिव व पार्वती यांच्या कथेवरून घेतलें आहे. आपली कन्या शिवाकडे पाठवावी अशी हिमवताला व पार्वतीसंबंधीं शिवाच्या मनांत प्रेम उत्पन्न करण्याविषयीं कामाला इंद्र आज्ञा करतो. तारकानें देवांचा पराभव केल्यावर काम हा आपली पत्नी रति व पार्वती यांच्यासहवर्तमान प्रगट होतो; शिवाच्या मनांत पार्वतीविषयीं अनुराग उत्पन्न होतो; परंतु जेव्हां काम त्याच्या नजरेस पडतो तेव्हां तो त्याला जाळून भस्म करतो. तदनंतर रति सती जावयास निघाल्यानंतर तिचा व तिच्या पतीचा फिरून समागम होईल असें तिला महादेव आश्वासन देतो.

उपरिनिर्दिष्ट घनःश्यामानेंहि एक डिम लिहिलें आहे. व्यंकटवरद यानेंहि एक कृष्णविजय नांवाचें डिम लिहिलें आहे. यांशिवाय सिंगभूपालाच्या रसार्णवसुधाकरांत वीरभद्रविजृंभणडिम याचा उल्लेख केला आहे.

प्र ह स न.—हा नाटकाचा प्रकार हिंदुस्थानामध्यें फार प्राचीन कालींहि माहीत होता. परंतु या प्रकारचीं नाटकें मात्र अगदीं अलीकडच्या काळांतीलतेवढींच उपलब्ध आहेत. उपलब्ध असलेल्या प्रहसनांमध्यें लटकमेलक हें प्रहसन सर्वांत प्राचीन आहे. सदरहू नाटकाचा कर्ता शंखधर कविराज हा कान्यकुब्जराजा गोविंदचंद्र याच्या कारकीर्दींत बाराव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेला. लटकमेलक प्रहसनांत दंतुरा नांवाच्या कुट्टिनीचें घर हेंच या प्रहसनाचें स्थळ आहे. या कुट्टिनीजवळ पुष्कळ संभावित गृहस्थ आपले अनेक भिकार दागिने गहाण ठेवितात. त्याचप्रमाणें मदनमंजरी नांवाच्या विश्वयोषितेचें प्रेम संपादन करण्याकरितां इतरहि अनेक पात्रें प्रगट होतात. सदरहू वारांगनेच्या घशांत अडकलेला मत्स्यास्थि काढण्याकरितां एका जंतुकेतु नांवाच्या वैद्याचा प्रवेश दिला आहे. त्याच्या चमत्कारिक प्रयोगपद्धतीकडे पाहून त्या वारांगनेस हंसू येतें; म्हणून त्या वैद्याचा प्रयोग यशस्वी होतो परंतु तें सर्व आपल्या प्रयोगचातुर्यानेंच घडून आलें अशी तो वैद्य मागाहून आपलीच फुशारकी मारतो. त्या वारयोषितेशीं आसक्त असलेले अनेक कामी लोक परस्परांशीं भांडतात व एकमेकांवर सरशी करण्याची खटपट करतात. त्यांपैकीं एक तर आपल्या मातेसच गहाण टाकावयास जातो; सरतेशेवटीं ती कुट्टिनी

दंतुरा व कोणी एक दिगंबर यांचा विवाह झाल्याचें दाखविलें आहे.

धूर्तसमागमप्रहसनः—हें १५ व्या शतकांत किंवा १६ व्या शतकाच्या प्रारंभीं लिहिलेलें असावें. त्याचा कर्ता ज्योतिरीश्वर कविशेखर हा होता. तो धनेश्वरपुत्र व रामेश्वरपौत्र व धीरेश्वरकुलोत्पन्न असा होता. त्यानें आपलें प्रहसन विजयानगरचा राजा नरसिंह (इ.स.१४८७-१५०७) याच्या कारकीर्दीत लिहिलें. सदरहू प्रहसनाच्या नेपाळी हस्तलिखित प्रतींत ग्रंथकर्त्याच्या बापाचें नांव धीरसिंह असें दिलें असून आश्रयदात्या राजाचें नांव हरसिंह असें दिलें आहे. हा हरसिंह व सिमराओनचा हरिसिंह (१३२४) हे एकच होते असें हरप्रसादशास्त्री यांचें म्हणणें आहे, परंतु आपण जर सदर नाटकाच्या उपोद्घाताकडे लक्ष दिलें तर तो विजयानगरचा राजा असावा असें खात्रीलायक दिसून येतें. या नाटकांत दोन संधी असून त्यांत एक विश्वनगर नांवाचा वैरागी व त्याचा शिष्य दुराचार हे दोघे वेश्यांवर आसक्त असतात. कालांतरानें त्या वैराग्याचें आपल्या शिष्याच्या वेश्येवरच मन बसतें, व त्यामुळें गुरुशिष्यांत तंटा उपस्थित होतो. त्या तंट्याचा निकाल लावण्याकरितां ते असज्जातिमिश्र यास पंच नेमून त्याचा निर्णय प्रमाण मानण्यास तयार होतात. परंतु या असज्जातिमिश्र पंचाच्याच मनांत त्या वेश्येविषयीं अभिलाष उत्पन्न होतो इतकेंच नव्हे तर नाटकांतील विदूषकहि तिला वश करण्याची खटपट करतो इत्यादि कथाभाग आहे.

ज्याला हल्लीं नोआखली म्हणतात त्या भूलुयाचा राजा लक्ष्मण माणिक्यदेव याच्या पदरीं एक राजोपाध्याय होता. तो सोळाव्या शतकांत होऊन गेला. मी कवितार्किक असून वाणीनाथाचा पुत्र आहे असें तो आपल्या स्वतःचें वर्णन करतो. त्यानें एक कौतुकरत्नाकर या नांवाचें प्रहसन लिहिलें आहे. या प्रहसनांत सुशीलांतक नांवाचा पोलिस अम्मलदार जरी जवळ झोंपलेला असतो तरी राणीची चोरी होते. तथापि वसंतोत्सव साजरा करण्याचा राजा बेत करतो व त्यांत राणीची जागा एका वेश्येनें भरून काढावी असें सुचवितो. राजांच्या गुरूचें मन राणीवर जडतें, परंतु ती फक्त त्याला वर उचलून खालीं टाकून देते, त्यामुळें त्याचें नाक रक्तबंबाळ होतें. राणीला भ्रष्ट करण्याचा आरोप त्याच्यावर करण्यांत येऊन तो शावीत धरला जातो. परंतु अखेर वसंतोत्सवाच्या वेळीं सर्व गोष्टींचा खुलासा होतो.

सतराव्या शतकांत होऊन गेलेला व श्रीदामचरिताचा कर्ता जो सामराज यानें धूर्तनर्तकप्रहसन नांवाचें प्रहसन लिहिलें, त्यांत दोन संधी आहेत. या प्रहसनांत मुरेश्वर नांवाचा एक शैव एका वेश्येवर आसक्त होतो व आपलें रहस्य आपल्या दोघां शिष्यांस सांगतो. हे दोघे शिष्य त्या वेश्येकडे संधान लावतात व राजा पापाचार याच्यापुढें आपल्या गुरूवर दुराचरणाचा आरोप करतात, परंतु त्यांत त्यांनां यश येत नाहीं. याप्रमाणें इतर अनेक प्रहसनें आहेत. परंतु त्यांचे काल निर्णीत करतां येत नाहींत. तीं प्रहसनें व त्यांचे कर्ते पुढीलप्रमाणें:—भगवदज्जुक–कर्ता अप्रसिद्ध; व्यंकटेशाचें भानुप्रबंध; उन्मत्तप्रहसन; व्यंकटेश प्रहसन; देवदुर्गति प्रहसन—याचा कर्ता राम्मय विद्याभूषण; धूर्तचरित व कंदर्पकेलि हीं प्रहसनें साहित्यदर्पण (६.५६६) यांत निर्दिष्ट केलीं आहेत.

धूर्तविडंबन—याचा कर्ता महेश्वर. हास्यचूडामणि—कर्ता वत्सराज.

हास्यार्णवः—कर्ता जगदीश्वर, आपल्या राजधानीमध्यें कांहींतरी कृष्णकारस्थानें चालू असतात असें अनयसिंधु राजाच्या कानांवर गेल्यामुळें तो बंधुरा नांवाच्या कुट्टिणीकडे जाऊन पाहतो तों तेथें त्याला बरीच रंगेल मंडळी जमलेली दृष्टीस पडते. तेथें राजोपाध्याय व त्याचा शिष्य हे एका मृगाकलेखा नांवाच्या वेश्येसंबंधानें भांडत आहेत, नवीन नवीन कामुक तेथें जमत आहेत व त्यांत एक वैरागी व त्याचा शिष्य हेहि आले आहेत इत्यादि प्रकार त्याच्या दृष्टीस पडतो. कांहीं विधी करण्याकरितां ते दोघे गुरु वेश्येला घेऊन जातात व शिष्य त्या कुट्टिणीबरोबरच रममाण होतात. इतक्यांत एक नवीन उपाध्याय प्रवेश करतो व दुहेरी विवाह साजरा करतात. परंतु त्याच वेळीं तो नवीन उपाध्याय आपल्या स्वतःकरितांच त्या वेश्येला वश करण्याचा प्रयत्न करतो.

हृदयगोविंद—कर्ता कविपंडित. कालेयकुतूहल—कर्ता भारद्वाज.

कौतुक सर्वस्वः—कर्ता गोपिनाथ चक्रवर्तिन्. या प्रहसनांत कलिवत्सल राजा आपल्या मंत्र्याबरोबर भांग पिण्यापासून फायद्यासंबंधीं विवेचन करीत असतो. त्यावेळीं एक सत्याचार नामक सत्पात्र ब्राह्मण तेथें प्राप्त झाल्याबरोबर त्यास राजाकडून हांकलून देण्यांत येतें. त्यावर सत्याचार व इतर बंदीत पडलेले ब्राह्मण यांच्यामध्यें त्या राजनगरींतील अनीतिमत्तेबद्दल संभाषण होतें. राजा प्रणयाच्या बाबतींत स्वातंत्र्य जाहीर करतो पण एका वेश्येच्या बाबतींत राजाचा व इतरांचा तंटा होतो. इतक्यांत राणीकडून राजाला बोलावणें येतें. परंतु त्यामुळें एका नर्तिकेस मत्सर उत्पन्न होतो. तिची समजूत घालण्याकरितां सर्वजण निघून जातात. शेवटीं तिच्या विनंतीवरून सर्व ब्राह्मणांनां हद्दपार करण्यांत येतें.

लंबोदरप्रहसन—कर्ता कालिदास व्यंकटेश्वर लंबोदरप्रहसन.—कर्ता अप्रसिद्ध; प्रहसननाटक.–कर्ता कालिदास(?) वरील दिन्हीं नाटकें एकच असावींत असें वाटतें. मुंडित प्रहसन–कर्ता शिवज्योतिर्विद्; नाटवाटप्रहसन–कर्ता वासुदेव चयनीपुत्र यदुनंदन; पलांडुमंडन–कर्ता अप्रसिद्ध; सांद्रकुतूहल–पुरंजन नाटकाचा कर्ता कृष्णदत्त मैथिल हाच ह्या प्रहसनाचा कर्ता होय. हा सतराव्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेला; सोमवल्लीयोगानंदप्रहसन–कर्ता अरुणगिरिनाथ

डिंडिम कवि सार्वभौम; सुभगानंद–कर्ता अप्रसिद्ध; विनोदरंगप्रहसन–कर्ता सुंदरदेव.

अंक.—अंक हा नाट्यप्रकार एकांकी नाटकाचा पाया होय. नाटकाच्या विभागासहि अंक म्हणतात. बालरामायणाच्या अंकांत यालाच प्रेक्षणक ही संज्ञा दिलेली आहे. भास्करकवीच्या ' उन्मत्तराघव ' नाटकाला प्रेक्षणक हेंच नांव दिलेलें आहे. परंतु तें नाटक हें केवळ अंकच आहे.

हा भास्कर कवि कोण होता याची कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. विद्यारण्यास मानपत्र देण्याकरितां जमलेल्या परिषदेपुढें त्याच्या नाटकाचा प्रयोग करण्यांत आला. विद्यारण्य हें जर सुप्रसिद्ध सायण यांचें नांव होतें असें मानलें तर आपणांस भास्कराच्या काळाचा निर्णय करतां येईल. त्याच्या नाटकांत उर्वशीच्या चवथ्या अंकाचें अनुकरण केलें आहे. म्हणजे राम व लक्ष्मण सुवर्णमृगाचा पाठलाग करीत असतां दुर्वासाच्या शापानें सीता मृगी होते व ती दिसेनाशी झाल्यामुळें रामास वेड लागतें व तो जो कोणी भेटेल त्या पुरुषास व प्राण्यास तिच्यासंबंधीं विचारूं लागतो आणि शेवटीं अगस्तीच्या मदतीनें त्याचें व तिचें पुनर्मीलन होतें इत्यादि प्रकार यांत वर्णिले आहेत.

कृष्णाभ्युदय—कर्ता लोकनाथभट्ट. ग्रंथकर्त्यानें याला प्रेक्षणक म्हटलें आहे. हें नाटक कांची येथील श्री हस्तिगिरि नाथाच्या ( विष्णूच्या ) वार्षिक यात्रेकरितां लिहिलें होतें. वास्तविक रीतीनें ह्या नाटकाचा अंक ह्या सदरांतच समावेश केला पाहिजे.

शर्मिष्ठाययातिः—या नाटकास साहित्यदर्पण ( ६.१५२ ) यांत अंक म्हटलें आहे. भागवतकृष्ण कवींचें याच नांवाचें जें एक हस्तलिखित नाटक उपलब्ध आहे तेंच हें असावें असें वाटतें.

कमलाकरुणविलासः—कर्ता हरिमोहन प्रामाणिक; स्वर्णमुक्ताविवाद—कर्ता महेशपंडित; हें नाटक सुमारें स. १७०० मध्यें लिहिलें असावें. यांत सुवर्ण व मुक्ता यांचा संवाद असून त्यांत ते प्रत्येकजण दुसऱ्यापेक्षां आपण श्रेष्ठ आहों असें प्रतिपादन करतात.

गैर्वाणिविजय—म्हणजे संस्कृत भाषेचा विजय; हें नाटक त्रावणकोर येथें स्थापन झालेल्या संस्कृत पाठशाळा उघडण्याच्या समारंभप्रसंगीं राजवर्मन् बालकवि ह्यानें लिहिलें. स्वर्ण स्नुषाविजय—कर्ता वरदराजपुत्र व वैदर्भी वासुदेव नाटकाचा कर्ता सुंदरराज हा होय.

व्यायोग.—विश्वनाथाचें सौगंधिकाहरण याचें प्रेक्षणक असें वर्णन केलें आहे. परंतु त्यालाच साहित्यदर्पणांत ( ६. २३३ ) व्यायोग म्हटलें आहे. त्यावरून तें नाटक साहित्यदर्पणाच्या पूर्वीचें असलें पाहिजे हें उघड आहे. विश्वनाथानें आपला आश्रयदाता प्रतापरुद्र राजा होता असें म्हटलें आहे. अर्थात हा प्रतापरुद्र म्हणजे वरंगळचा काकतीय राजा प्रतापरुद्रच होय. सदरहू प्रतापरुद्राच्या वेळचे शिलालेख इ. स. १२९१ ते १३२२ या काळांतील आहेत. आपल्या आश्रयदात्याच्या सैन्यानें समुद्रकिनाऱ्यावर तळ दिला असें विश्वनाथानें म्हटलें आहे. आणि प्रतापरुद्रानें स. १३१६ मध्यें पांड्यांचा पराजय करून कांची हस्तगत केली ही गोष्ट आपणांस माहीत आहे.

सौगंधिका हरणाचें संविधानक असें आहेः–भीमसेन द्रौपदीकरितां कांहीं पाणकमळें आणण्याकरितां कुबेराच्या कमलकासाराकडे जातो. हनुमान त्याच्या आड येतो, परंतु अखेर त्यानें आपलें रूप प्रकट केल्यामुळें दोघांचीहि ओळख पटते व ते एकमेकांस प्रेमालिंगन देतात. पुढें भीमाच्या कार्यांत यक्ष आडवे येतात व त्या दोघांची चालू झालेली झुंज कुबेर व त्याचा खजिनदार हे दोघे वर्णन करितात. शेवटीं भीमाचा विजय होतो व पांडव कुबेरनगरींत येतात आणि द्रौपदीसहि फुलें मिळतात.

कांचनाचार्यांच्या धनंजयविजयाचा काळ निश्चितपणें ठरवितां येत नाहीं. या नाटकांतील दोन श्लोक व हनुमान नाटकांत सांपडतात ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे असें लेव्हि म्हणतो. परंतु यावरून कांचन हा भोजाच्या पूर्वी होऊन गेला असें खात्रीनें म्हणवत नाहीं. शिवाय प्रस्तुत नाटकांतील प्रास्ताविक कविता विजयानगरच्या राजांच्या अनेक शिलालेखांतून दृष्टीस पडतात; आणि त्यावरून कांचन हा विजयानगरच्या एखाद्या राजाच्या पदरीं दरबारीकवि असणें असंभवनीय वाटत नाहीं. याचा बाप उपाध्याय असून त्याचें नांव नारायण असें होतें. त्याला वादीश्वर हा किताब मिळाला होता. जयदेवाच्या सांगण्यावरून त्याच्या नाटकाचा प्रयोग करण्यांत आला असें दिसतें. या जयदेवाच्या पदरीं कोणी एक गदाधर नामक होता, यांपेक्षां अधिक माहिती उपलब्ध होत नाहीं.

धनंजयविजयांत दुर्योधनाच्या सैन्यावर अर्जुनानें जो विजय मिळविला त्याची कथा वर्णिली आहे. हा अर्जुनाचा विजय म्हणजे पांडव अज्ञातवासांत विराटाच्या घरीं राहात असतां त्याच्या गोग्रहणाच्या वेळीं मिळविलेला होय. विराटपुत्र ज्याचें सारथ्य करीत आहे असा अर्जुन व कौरव यांच्यांतील युद्ध विद्याधर व प्रतिहारी वर्णन करतात अशा रीतीनें अर्जुनाला विजय प्राप्त झाल्यावर पांडव आपलें रूप प्रकट करतात व तदनंतर अर्जुनपुत्र व विराटकन्या यांचा विवाह होतो. हस्तलिखित ग्रंथांच्या यादींत धनंजयविजयव्यायोग हें कोणा एका यशोधरानें लिहिलें असें म्हटलें आहे. हे दोन्हीहि ग्रंथ एकच असावेत असें वाटतें. आतांपर्यंत उपलब्ध झालेल्या व्यायोगांची संख्या विशेष मोठी नाहीं. मोक्षादित्याचा भीमविक्रमव्यायोग याची एक स. १३२८ मधील हस्तलिखित प्रत उपलब्ध आहे. यांतलि कथानकहि वरील व्यायोगासारखेंच आहे. रामचंद्र महाकवीच्या निर्भयभीमव्यायोग यांतहि तीच कथा आहे. सदाशिवाच्या प्रचंडभैरवव्यायोगांत शिवकथा व एका

अप्रसिद्ध नाटककाराच्या प्रचंडगरूडव्यायोगांत व बनारसचा कवि शेषयज्ञेश्वरसूनु गोविंद याच्या विनतानंदव्यायोगांत गरुडसंबंधीं कथा आहे.

विजयानंगरचे भागवत व्यंकटशास्त्री यांचे पुत्र भागवत लक्ष्मीनारायण शास्त्री यांच्या रामविजयव्यायोगांत रामकथा असून कृष्णकथेवरहि दोन व्यायोग आहेत. रामचंद्र वेल्लाळ याच्या कृष्णविजयव्यायोगांत कृष्ण व रुक्मिणी यांच्या कथेचा उपहास केला आहे, व बनारसच्या पर्वतेश्वरपुत्र धर्मसूरि याच्या नरकासुरविजयव्यायोगांत नरकासुरावर कृष्णानें मिळविलेल्या विजयाचें वर्णन आहे. पुरुषोत्तम, शचीं व त्यांचे अनुचर यांनीं या कृष्णनरकाच्या युद्धाचें वर्णन केलें आहे. शेवटीं ज्याचा आम्ही अनेक वेळां उल्लेख केला आहे त्या घनःश्यामानेंहि एक व्यायोग लिहिला आहे.

भाण.—भाण हा नाटकाचा प्रकार प्राचीन आहे. परंतु त्या प्रकारचीं बहुतेक नाटकें अर्वाचीन आहेत. हल्लीं प्रचलित असलेले सर्व भाण दक्षिण हिंदुस्थानांत लिहिलेले आहेत, कारण हा नाटकाचा प्रकार तिकडे बराच लोकप्रिय झालेला दिसतो. सर्व भाणांचीं बाह्य व अंतःस्वरूपें जवळ जवळ सारखीं असतात. या तऱ्हेच्या कांहीं नाटकांची मोडणी एकदां लक्षांत आली म्हणजे तीवरून या जातीच्या सर्व नाटकांची सहज अटकळ करतां येण्यासारखी आहे. ज्यांनीं भाण लिहिलें त्यांनीं अन्य तऱ्हेचींहि नाटकें लिहिलीं असल्यामुळें आतांपर्यंत बऱ्याच भाणकारांचा नामनिर्देश केला गेला आहे.

चवदाव्या शतकाच्या शेवटीं व पंधराव्या शतकाच्या प्रारंभीं पार्वतीपरिणयाचा कर्ता वामनभट्टबाण यानें शृंगारभूषण नांवाचा एक भाण लिहिला,त्यांतील कथानक थोडक्यांत असें आहेः—यांतील मुख्य विट विलासशेखर हा आपल्या प्रियतमेबरोबर विलास केल्यावर सायंकाळीं अनंगमंजरीचा प्रथमार्तोत्सव साजरा करण्याचा बेत करतो. तो वेश्यांच्या मोहोल्ल्यांत जातो, तेथें असलेल्या कामीजनांबरोबर गप्पा मारतो व ते भांडूं लागले तर त्यांस दोन उपदेशाच्या गोष्टी सांगतो. एडक्यांच्या टकरा, कोंबड्यांच्या झुंजी, कुस्ती इत्यादि प्रकार पाहातो. तेथेंच दोन प्रतिस्पर्ध्यांमध्यें चाललेली निकराची लढालढीहि पाहातो. अनंगमंजरीच्या उत्सवांतहि भाग घेतो व आपण केलेल्या प्रश्नांस दुसऱ्यांनीं द्यावयाचीं उत्तरेंहि आपण स्वतःच म्हणून दाखवितो. प्रेक्षकांस कोणी बोलणारे दिसत नसतांहि ते अमुक अमुक बोलत आहेत अशीं त्यांचीं भाषणें हा स्वतःच म्हणून दाखवितो इत्यादि.

सतराव्या शतकाच्या शेवटीं व अठराव्या शतकाच्या प्रारंभीं होऊन गेलेला जानकीपरिणय नाटकाचा कर्ता तंजावरचा कवि रामभद्र दीक्षित यानें एक शृंगारतिलक नांवाचा भाण लिहिला आहे. रामभद्राचा शिष्य रघुनाथ याच्या सांगण्यावरून हा भाण लिहिण्यांत आला होता. रामभद्राचा समकालीन यतिराजविलासाचा कर्ता वैष्णवगुरु वैष्णवाचार्य उर्फ अम्मालाचार्य यानें वसंततिलकभाण व चोलभाण असे दोन भाण लिहिले आहेत. वसंततिलकभाण यास अम्मातिलकभाण असेंहि म्हणतात. अम्मा याचा अर्थ कन्या असा आहे. आणि ज्या अर्थी रामभद्रास त्याचे शिष्य अय्या म्हणजे युवा असें म्हणत असत, त्या अर्थी त्याच्या भाणास अय्याभाण असें म्हणूं लागले; शिवाय रामभद्र व अम्मालाचार्य या दोघांच्याहि भाणांचा विरोध स्पष्ट रीतीनें उघड व्हावा म्हणून हीं अम्माभाण व अय्याभाण अशीं दोन नांवें पडलीं असावीं.

शृंगारतिलकभाण हा मीनाक्षीपरिणय–महोत्सवाकरितां मदुरा येथें लिहिण्यांत आला होता. यांतील नायक भुजंगशेखर हा आपली प्रियतमा हेमांगी ही तिच्या पतिगृहीं जावयास निघाली असल्यामुळें विषण्ण वदन झालेला दिसतो. हेमांगीची व तुझी गांठ घालून देतों असें एक मित्र त्यास अभिवचन देतो व तो तसें घडवून आणतो. वेश्येच्या मोहोंल्ल्यांत एका ऐंद्रजालिकाचा खेळ चालू असतां भुजंगशेखर तेथें जातो. वाटेंत तो आपल्या परिचित स्त्रीपुरुषांशीं विनोदानें व जलदीनें भाषण करितो. तरुण पुरुषांमध्यें चाललेल्या विलासांचे व कलहांचें वर्णन करितो, तसेंच इतर भाणांप्रमाणें एडक्यांच्या टक्करी, कोंबड्यांच्या झुंजी व कुस्त्या, अहितुंडिकांचे ( सर्पांचे ) खेळ व इतर जादूचे खेळ यांचें वर्णन करितो. या भाणाच्या शेवटीं हेमांगीचें व नायकाचें पुनर्मीलन झालेलें दाखविलें आहे.

सुभद्रापरिणय कर्त्याचा समकालीन नल्लकवि याचा शृंगारसर्वस्व या नांवाचा भाणहि अशाच प्रकारचा आहे. त्यानें आपला मित्र वैद्यनाथ दीक्षित याच्या सांगण्यावरून आपल्या वयाच्या२०व्यावर्षाच्या आंतच सदरहू नाटक व सदरहू भाण लिहिला असें म्हणतात.या भाणांत अनंगशेखर हा नायक असून, त्याची व जिची ताटातूट झाली अशी त्याची कनकलता नांवाची प्रियतमा नायिका आहे बाकी इतर मजकूर इतर भाणांप्रमाणेंच आहे. यांतील नवीन प्रकार म्हटला म्हणजे एक मदोन्मत्त हत्ती मोकळा सुटला असल्यामुळें रस्त्यांतील सर्व लोकांची दाणादाण झाली आहे. भाणांतील नायक त्याला गणेश समजून त्याची आराधना करतो व तूं शिवाचा दूत आहेस त्या अर्थी माझ्या सर्व कामना पूर्ण करण्यास मदत कर अशी त्यास विनंति करितो;हत्ती त्यास प्रसन्न होतो व अखेर त्याची व कनकलतेची गांठ पडते.

रससदनभाणांतील मजकूर इतरांपेक्षां थोडा निराळा आहे. याचा कर्ता आपणांस युवराज म्हणवितो. तो केरळ प्रदेशांतील कोटिलिंग या गांवचा रहिवासी असतो. बार्नेटच्या मतानें तो व सदाशिव हे एकच होत. प्रस्तुत भाणांतील नायक प्रमुख विट होता इतकेंच कायतें त्याचें वर्णन केलेलें आहे. आपला मित्र जो मंदारक याच्या गैरहजेरींत त्याची प्रियतमा खंडनमाला हिला मदत करण्याविषयीं तो वचन देतो. तो तिच्याबरोबर देवदर्शनास जातो, तिला घेऊन फिरावयास

जातो; एके प्रसंगीं एका मदोन्मत हत्तीला पकडण्याचा देखावाहि ते पाहातात; तेव्हां तिला घरीं पोहोंचविण्याकरितां तो तिच्याबरोबर जातो; तिला घरीं सोडून तो आपल्या प्रियतमेकडे जातो; व तिच्याशीं विनोदपूर्ण भाषण करतो; तेथून निघून आपल्या तरुण मित्रांबरोबर गप्पा मारतो, कांहीं बाबतींत त्यांस सल्ला देतो; त्यांचे व त्यांच्या प्रेमपात्राचे संकेत व भेटी जुळवून देतो. दुसऱ्या गांवच्या तरुणींकडून बोलावणें आल्यामुळें तो त्यांस भेटावयास जातो. अशा रीतीनें रमत गमत अखेर तो खंडनमालेकडे येतो, तों तेथें मंदारक परत आलेला त्याच्या दृष्टीस पडतो. इत्यादि कथाभाग यांत आहे.

अनेक भाणांच्या हस्तलिखित प्रती हल्लीं उपलब्ध आहेत. आनंदतिलकभाण याचा कर्ता कोण होता हें कळत नाहीं. अनेक भाणांच्या नांवांत मदनवाचक शब्द आढळतो अशा तऱ्हेचे भाण म्हणजे: अनंगजीवन अथवा अनंगसंजीवन या भाणाचा कर्ता वरदाचार्य होता. तो श्रीनिवास याचा पुत्र असून तोंडीरमल्लचा रहिवाशी होता (तोंडीरमल्ल म्हणजे तंजावर–मदुरा यांच्यामधील किनाऱ्यालगतचा भाग) वर जो वसंततिलकभाण याचा कर्ता वरदाचार्य किंवा अम्मल्लाचार्य म्हणून सांगितला आहे, त्याहून प्रस्तुत वरदाचार्य हा निराळा आहे. एक तिसरा वरदाचार्य भाण लेखक होता. सदरहू वरदाचार्यांस वरदार्य असेंहि म्हणतात. तो वाधूलगोत्रोत्पन्न होता. त्याच्या भाणाचें नांव अनंगब्रह्मविद्याविलासभाण हें आहे. नरसिंहाचार्यपुत्र लक्ष्मीनरसिंह ह्याचा अनंगसर्वस्वभाण; श्रीनिवास पुत्र जगन्नाथ पंडितकवि याचा अनंगविजयभाण; भट्टरंगाचार्यपुत्र गोविंद ह्याचा गोपलीलार्णव; हरिदास ह्याचा हरिविलासभाण. त्याचप्रमाणें इतर भाणांचाहि निर्देश करणें जरूर आहे. ते भाण येणेंप्रमाणें:—चंद्ररेखाविलासभाण–कर्ता अप्रसिद्ध; कामविलासभाण–कर्ता व्यंकप्पा; कंदर्पदर्पणभाण–कर्ता कांचीचा रहिवाशी व्यंकटकवी; कंदर्पदर्पण भाण–कर्ता काश्यपगोत्रीय अभिनवकालिदासपुत्र श्रीकंठ; कंदर्पविजयभाण–कर्ता कौशिकगोत्रीय वरदगुरुपुत्र घनगुरुवर्य; केरलाभरणभाण—कर्ता रामचंद्र दीक्षित; कुसुमबाणविलासभाण–कर्ता अप्रसिद्ध; लीलामधुकर–याचा साहित्यदर्पण ( ६. २३० ) यांत निर्देश केला आहे; मदनभूषणभाण–कर्ता अप्रसिद्ध; मदनगोपालविलासभाण—कर्ता गुरुराम कवि; मदनमहोत्सवभाण–कर्ता शामैयार्यपुत्र श्रीकंठ उर्फ नंजुंद; मदनसंजीवनभाण–कर्ता घनश्याम; मालमंगलभाण उर्फ महिषमंगलभाण–कर्ता पुरुवनम् महिषमंगलकवि; पंचबाणविजयभाण–कर्ता वाधूलगोत्रोत्पन्न रंगाचार्य; पंचबाणविलास–कर्ता अप्रसिद्ध; पंचायुधप्रपंचभाण–कर्ता पुण्यग्रामाचा त्रिविक्रम पंडित; रसविलासभाण–कर्ता कांतिमतीपरिणयाचा कर्ता चोक्कनाथ; रसिकजनरसोल्लासभाण–कर्ता वेदान्तदेशिकपुत्र व्यंकट; रसिकामृतभाण–कर्ता शंकरनारायण; रसिकरंजनभाण–कर्ता श्रीनिवासाचार्य; रसोल्लासभाण–कर्ता श्रीनिवास वेदान्ताचार्य; संपतकुमारविलासभाण अथवा माधवभूषणभाण–कर्ता रंगनाथ महादेशिक; शारदानंदनभाण–कर्ता वरदाचार्यपुत्र श्रीनिवास; शारदातिलकभाण–कर्ता शंकर; सरसकविकुलानंदभाण–कर्ता रामचंद्र.

कांहीं भाणांच्या नांवाचा शृंगार या पदानें आरंभ होतो असे भाणः—शृंगारचंद्रिका–कर्ता अप्रसिद्ध; शृंगार-दीपकभाण–कर्ता विंजीमूर राघवाचार्य; शृंगारजीवनभाण–कर्ता अप्रसिद्ध; शृंगारकोशभाण–कर्ता गीर्वाणेंद्र याचा बाप नीलकंठ दीक्षित. यानें आपला नीलकंठविजयचंपू नांवाचा ग्रंथ इ. स. १६३६ मध्यें लिहिला. शृंगारकोशभाण–कर्ता अभिनव कालिदास काश्यप; शृंगारमंजरीभाण–अथवा श्रीरंगराजभाण–कर्ता जक्कुल व्यंकटेंद्र आणि वीरनाम्बा यांचा पुत्र गोपालराय; शृंगारपावनभाण–कर्ता कृष्णकविपुत्र वैद्यनाथ; शृंगारराजतिलकभाण–कर्ता वंदवासी रामपुत्र अविनाशीश्वर; शृंगारसर्वस्वभाण–कर्ता स्वामिमिश्र अथवा स्वामिशास्त्री; शृंगारसर्वस्वभाण– कर्ता आनन्दराघव नाटकाचा कर्ता राजचूडामणि दीक्षित; शृंगारशृंगातकभाण– कर्ता श्री रंगनाथ; कदाचित् हा भाण व उपरिनिर्दिष्ट भाण हे दोन्ही एकच असावेत. शृंगारस्तबकभाण–कर्ता मदुरेचा रहिवाशी नृसिंह; शृंगारसुधाकरभाण–कर्ता रुक्मिणीपरिणय नाटकाचा कर्ता रामवर्मा युवराज; शृंगारसुधार्णवभाण–कर्ता रामचंद्र कोराड; शृंगारतरंगिणीभाण–कर्ता रामभद्र; शृंगारतरंगिणीभाण–कर्ता सुरपूरचा व्यंकटाचार्य; इत्यादि.

मिश्रभाण हा भाणाचाच एक प्रकार आहे. या प्रकारचा मिश्र भाण एकच प्रसिद्ध झाला आहे व तो काशीपती कविराज याचा मुकुंदानंद भाण हा होय. या कविराजानें संगीतरत्नाकरावरहि टीका लिहिली आहे. हा संगीतरत्नाकर आणि गंगाधराचा संगीतसेतु हे दोन्ही ग्रंथ एकच असावेत. सदरहू संगीत सेतूमध्यें इ. स. १२१० पासून १२४७ पर्यंत लिहिलेल्या शार्ङ्गदेवविरचित संगीतरत्नाकरावर टीका आहे. यावरून काशीपति हा तेराव्या शतकाच्या पूर्वीचा नसावा. त्यानेंच एक मिश्रभाण नांवाचा भाणाचा प्रकार आहे असें नमूद केलें आहे. मुकुंदानंद भाणामध्यें भुजंगशेखर हा नायक असून तो मुकुंदाचें म्हणजे कृष्णाचें रूप घेतो. या भाणांत कृष्णचरित्र म्हणजे कृष्णानें गोपीसहवर्तमान केलेल्या क्रीडा यांचें वर्णन आहे. यावरून मिश्रभाण हें नांव दोन अर्थानें दिलें आहे हें समजून येईल. शृंगाररसोदय या नांवाचा दुसरा एक मिश्रभाण आहे. त्याचा कर्ता राम सुकविशेखर अथवा लिंगमगुंटमराम हा होता.

इतर एकांकी नाटकें:—हल्लीं उपलब्ध असलेल्या नाटकांमध्यें एकांकी नाटकें फारच अल्प प्रमाणांत आहेत. पंधराव्या शतकांत होऊन गेलेला व ललितमाधव आणि विदग्धमाधव यांचा कर्ता रूपगोस्वामिन् याची एक दानकेलिकौमुदि नांवाची भाणिका हल्लीं प्रकाशित झाली आहे. तिच्यांत कृष्णकथेंतील भाग आहे. महादेव कवीशाचार्य सरस्वती याची

दानकेलिकौमुदीची हस्तलिखित प्रत हल्लीं उपलब्ध आहे. कदाचित ही कौमुदी व वरील भाणिका या दोन्हीहि एकच असाव्यात.

श्री ग दि त.—हाहि एक नाटकाचा प्रकार कोठें कोठें आढळतो. हरिहराचा भाऊ व मंडलेश्वरभट्ट आणि इंदुमती यांचा पुत्र माधव यानें एक सुभद्राहरण नांवाचें श्रीगदित लिहिलें आहे. यानें आपल्या ग्रंथास श्रीगदित म्हणण्याचीं जीं कारणें दिलीं आहेत तींच कारणें साहित्यदर्पणांत श्रीगदिताची व्याख्या करतांना दिलीं आहेत सुभद्राहरणाची एक हस्तलिखित प्रत विक्रमसन १६६७ तील उपलब्ध आहे. यावरून पंधराव्या शतकाचा मध्य व सतराव्या शतकाचा प्रारंभ यांच्या दरम्यान केव्हां तरी माधव होऊन गेला असावा असें वाटतें.

सुभद्राहरणांत जी एक वर्णनात्मक कविता आहे (५.१५) तिच्यावरून या नाटकाच्या प्रकारांत व छायानाटकांत बरेंच साम्य दिसून येतें. या नाटकांत अर्जुन सुभद्रेचें हरण करतो. अर्जुन यतीचा वेष घेऊन बलरामाच्या घरांत येतो, तेथें त्याची व सुभद्रेची गांठ पडते,आणि वसंतोत्सवाच्या वेळीं दोघेहि घरांतून पलायन करतात, त्यांनां मदत करण्यास कृष्ण आपला रथ पाठवितो, त्यांस अटकाव करण्याची पहारेकऱ्यांची छाती होत नाहीं आणि शेवटीं झाली ही गोष्ट वावगी झाली नाहीं अशी कृष्णहि सारवासारव करतो, त्यामुळें बलदेव व उग्रसेन हेहि त्यांच्या विवाहास अनुमति देतात.

भा र ती य ना ट्या चा अ ति भा र ती य वि स्ता र.—भारतीय पौराणिक कथावाङ्मयाचा पूर्वेकडे प्रसार झाला व त्यास स्थानिक इतिहासाच्या पुस्त्या जोडल्या गेल्या, याचें स्थूल स्वरूप पहिल्या विभागांत दिलेंच आहे. तथापि भारतीय नाट्यशास्त्र तेथें गेलें नाहीं व त्यामुळें तेथील नाट्यविकास हा देशाच्या स्वयंस्फूर्तीचाच परिणाम आहे.तिकडे हिंदुस्थानी कथानकें गेलीं व कळसूत्री बाहुल्यांचे खेळहि गेले असतील पण अभिजातनाट्यकला गेली नाहीं. तेथील नाट्यकलेविषयीं कांहीं माहिती येथें देतों.

जावाबेटांतील नाटकें पौरस्त्य देशांतील नाटकांपैकीं अत्यंत गमतीदार नाटकांत गणतां येण्यासारखीं आहेत, आणि हें इतकें गमतीदार स्वरूप त्यांनीं 'छायानाटक' नामक नाट्यप्रकाराला फार परिणत स्वरूप दिल्यामुळें प्राप्त झालेलें आहे. जावाबेटांतील नाटकांचे निरनिराळे सात प्रकार आहेत. (१) व यं ग पू र्वा, हीं नाटकें बैलाच्या कातड्याच्या बाहुल्यांची छाया पडद्यावर पाडून करतात. या नाटकांतील संविधानकें महाभारत, रामायण, किंवा जावाबेटांतील म नि क म य या ग्रंथांतील असतात; (२) व यं ग गे दो ग, हीं नाटकें वरच्या सारखींच असतात; फक्त यांतील विषय तद्देशीय जावानी पं जी वीरचरित्रकाव्यांतील असतात; (३) व यं ग के लि ति क अथवा के रु ट यि ल, हीं नाटकें लांकडाच्या सपाट वस्त्रहीन बाहुल्यांनीं करून दाखवितात, व यांतील कथाभाग ड म र बु ल न च्या वीरचरित्रकाव्यांतील असतात; (४) व यं ग गो ले क हीं वस्त्रयुक्त वाटोळ्या बाहुल्यांनीं करून दाखवितात, व यांचे विषय ड म र बु ल न व मुसुलमानी अ मि र अं ब्य ह या वीरचरित्रकाव्यांतलि असतात; (५) व यं ग टो पें ग, या नाटकांतील कथाभाग वर सांगितलेल्या पहिल्या तीन प्रकारांतल्याप्रमाणें असतात, आणि हीं नाटकें मुखवटे घातलेले नट करून दाखवितात; (६) व यं ग वों ग, यांत सर्व प्रकार पांचव्या प्रकाराप्रमाणें असतात, परंतु नट मुखवटे मात्र घालीत नाहींत; (७) व यं ग बे बे र, यांतील कथाभाग मागल्या प्रकारांतल्याप्रमाणेंच असतात; प्रयोग मात्र रंगविलेल्या चित्रपटावरून दाखवितात व दलंग चित्रांसंबंधानें माहिती समजावून सांगतो. वयंगचा प्रयोग दाखविण्याची नेहमीची पद्धति येणेंप्रमाणें:—एका लांकडाच्या चौकटीवर पांढरा पडदा लावतात. चौकटीच्या वर एक दिवा टेवून त्याचा उजेड पडद्यावर पडेल अशी व्यवस्था करतात. दिव्याच्याच बाजूला 'सूत्रधार' (दलंग) उभा राहतो. त्याच्या डाव्या हातांत एक पेटी असते त्यांत बाहुल्या असतात. त्या पेटीच्या एका बाजूवर धातूच्या पट्ट्या बसविलेल्या असतात, त्यांवर आघात करून दलंग रणध्वनीप्रमाणें आवाज काढतो. शिवाय सूत्रधाराजवळ एक धूपाचा पेला व देवतांनां अर्पण करण्याकरितां एका पात्रांत कांहीं वस्तू असतात. सूत्रधार उभा असतो त्याच बाजूला पुरुषप्रेक्षक बसलेले असतात; स्त्रीप्रेक्षक मात्र विरुद्ध बाजूला बसतात त्यामुळें त्यांनां प्रत्यक्ष बाहुल्या न दिसतां त्यांच्या पडद्यावर पडलेल्या छाया मात्र दिसतात. बोलून दाखविण्याचा सर्व मजकूर दलंग स्वतःम्हणून दाखवितो, आणि जसजशीं पात्रें बदलतील त्याप्रमाणें स्वतःच्या आवाजांत फेरफार करून व इतर हावभावांनीं प्रेक्षकांनां त्याची जाणीव करून देतो. वर सांगितलेल्या नाटकांच्या बहुतेक प्रकारांत आणि वयंगवोंगमध्यें किंवा बिनमुखवट्याचे मानवनट कामें करीत असतांहि हें बोलण्याचें सर्व काम सूत्रधार एकटाच करतो. फक्त वयंग टोपेंग या मुखवटे घालून पात्रें कामें करीत असलेल्या नाटकांत मात्र बोलणीं पात्रेंच म्हणून दाखवितात. जुन्या संस्कृत नाटकांतल्याप्रमाणें येथील नाटकांत पुरुष व स्त्रिया दोघेहि नटांचीं कामें करतात.

जावानी नाटकांतला दलंग हा भारतीय नाटकांतला सूत्रधारच होय. या शब्दाचा व्युत्पत्त्यर्थच 'सूत्रें' हालविणारा असा असून जावानी नाटकांपैकीं कित्येक प्रकारांत सूत्रांनीं बाहुल्या हालविण्याचेंच काम तो प्रत्यक्ष करीत असतो.

जावाबेटांतील वयंग नाटकांचें मूळ धार्मिक आहे ही गोष्ट देवतांनां वस्तू अर्पण करण्याच्या पद्धतीवरून, प्रयोगाला आरंभ करण्यापूर्वीं धूप जाळण्याच्या पद्धतीवरून व भूतपिशाचें संचार करतात अशा रात्रीच्या वेळीं नाटकें करतात यावरून सिद्ध होतें. शिवाय अशीं नाटकें करविणें हें

कृत्य पुण्यकारक मानतात, तसेंच व्यक्तीच्या आयुष्यांतील किंत्येक विशिष्ट प्रसंगीं, उदाहरणार्थ, गर्भारपणाच्या सातव्या महिन्यांत किंवा नाळ कापण्याच्या दिवशीं हा नाटकाचा प्रयोग करावा अशी समजूत आहे. यांवरून नाटकें करण्याची पद्धति धार्मिक समजुतीशीं संबद्ध आहे असें हॅझेनचें मत आहे. त्याचें असेंहि मत आहे कीं,छाया-नाटकें करण्याचा हेतु मृतपूर्वजांचीं भुतें छायांच्या रूपानें दाखविणें असा असतो; आणि अशा नाटकांतला दलंग पडद्यावर छाया पाडून त्यांचीं बोलणीं स्वतः म्हणून दाखवितो त्याअर्थी तो मूळ मृतपूर्वजासंबंधानें कांहीं धार्मिक विधि करणारा पुरोहितच असला पाहिजे.

जावाबेटांत नाटकें प्रथम केव्हां सुरू झालीं तें नक्की सांगतां येत नाहीं, परंतु वाङ्मयांत आलेल्या त्यांच्या उल्लेखावरून पाहतां तीं इसवी सन ११ व्या शतकाच्या प्रारंभीं लोकप्रिय झालेलीं होतीं असें स्पष्ट दिसतें. त्यांचा मूळ आरंभ कसा झाला याबद्दल निश्चित मत देणें अधिक अवघड असून या बाबतींत प्रमुख अधिकारी लेखकांत दोन धुरांइतकीं परस्पर विरुद्ध मतें आहेत. जावानी नाटकांवर भारतीय नाट्याचा फार मोठा परिणाम झालेला आहे, असें सेरुरियर, हेमगन, पोएनसेन वगैरे लेखकांचें मत आहे; तर उलट भारतीय नाटकांच्या नमुन्यावर वयंग नाटकें झालेलीं आहेत हें मत क्रॉफर्ड, नीमन, ब्रँडस् व विशेषतः हॅझेन नाकबूल करतात. याबद्दल प्रस्तुत उपलब्ध असलेल्या माहितीवरून निश्चित मत देतां येण्यासारखें नसलें तरी जावानी नाटकांची कल्पना स्वतंत्रपणें निघालेली असावी असें साधारणपणें वाटतें. भारतीय नाट्यप्रकारांत 'छायानाटक' हा प्रकार आहे हें खरें आहे. सुभटाचें दूतांगद हें एकच छायानाटक हिंदुस्थानांत हल्लीं प्रसिद्ध आहे व तें जावानी वयंगच्या धर्तीप्रमाणें कांहींसें तयार झालेलें आहे असें मानण्यास महत्त्वाचा प्रत्यवाय नाहीं. तथापि हिंदुस्थानांतील रामायणावरून रामलीला नामक नाटक करून दाखविण्याची पद्धति जावाबेटांतील रामकथात्मक नाटकप्रयोगांशीं तुलना करून पाहतां जो फरक दिसतो तो फार महत्त्वाचा आहे. भारतीय वाङ्मयाचा जावानी वाङ्मयावर झालेला मोठा परिणाम सर्वविश्रुत आहे, आणि हिंदु धर्म व मुसुलमानी धर्म या दोघांनीं जावानी नाटकांना कथाभाग पुरविलेले आहेत हेंहि खरें आहे. या एकंदर गोष्टींचा विचार करतां असें म्हणतां येईल कीं, जावाबेटांतील वयंग प्रयोगपद्धति ही मूळ तद्देशीय असून जावानी नाटकांतील कथाभाग मात्र बहुतांशीं परकी आहेत.

जावाबेटांमधून नाटकें करण्याचा प्रचार ब्रह्मदेश,सयाम व कांबोडिया या देशांत पसरला असावा असें दिसतें. या तिन्ही देशांत रामचरित्रपर नाटकेंच विशेषतः फार होत असतात; ब्रह्मदेशांत मात्र बौद्धधर्मी नाटकें वरीच होतात. ब्रह्मी नाटकाचे दोन प्रकार आहेत. एक प्रकार पुरुष व मुलें (स्त्रिया कधींच नाहींत) यांनीं करावयाचा, व दुसरा बाहुल्यांनीं करावयाचा. येथें नाटकांना धार्मिक स्वरूप आहे, आणि तें नाटकांतील कथाभागापुरतेंच आहे असें नाहीं तर प्रयोग करण्याच्या काळासंबंधानेंहि आहे. उदाहरणार्थ अपत्य जन्माच्या वेळीं नाटक करणें,इत्यादि.तसेंच नाटकप्रयोग फक्त रात्रीं करतात व त्याचा उद्देश भूतपिशाच्चें पळवून लावणें हाच असतो. सयामी नाटकांतील पद्यें मात्र प्रथम लिहून तयार केलेलीं असतात, गद्यभाग आयत्यावेळीं तयार करावयाचा असतो; व ह्या नाटकांतील कथाभाग बहुधां रामचरित्रपर असतो. येथील नाटकांचे निरनिराळे प्रकार जावाबेटांतल्यासारखेच असतात.

सरतेशेवटीं मलायाद्वीपकल्पासंबंधानें पहावयाचें. येथें तर रामायण हाच बहुतां कथाभाग असतो. प्रयोगपद्धतीवर जावानी, भारतीय व चिनी या तिन्ही पद्धतींचे परिणाम झाल्याचें दिसतें. या नाटकांचा मूळ आधार धार्मिक आहे ही गोष्ट प्रयोगप्रसंगीं करण्यांत येणाऱ्या देवतांच्या प्रार्थना व भूतपिशाच्चांच्या आराधना यांवरून स्पष्ट होतें. मलायांत छायानाटकाचा शोक फार आहे; जावाबेटांत सूत्रधारच सर्व भाषणें म्हणून दाखवितो; तर सयामांत या बोलण्यांना दोन माणसांतील संभाषणाचें स्वरूप असतें. एकंदरीनें पाहतां जावाबेटांत व ब्रह्मदेश–सयामांत नाटकें बहुधां छायानाटकें असतात किंवा मुखवटे घालून केलेलीं नाटकें असतात.अर्थात पॉलिनेशियन लोकांतील नटांमार्फत हावभाव व नृत्ययुक्त होणाऱ्या नाट्यप्रयोगांशीं त्यांचें फारसें साम्य नाहीं. उलटपक्षीं मुखवटे घालून नाटकांतील कामें करणें हें नाट्यकलेचें अगदीं प्राथमिक स्वरूप होय, ही गोष्ट अमेरिकेंतील इंडियन लोकांच्या नाटकांवरून तसेंच ग्रीक लोकांतील दुःखपर्यवसायी (ट्रॅजेडी) नाटकांवरून स्पष्ट दिसतें. हल्लीं उपलब्ध असलेल्या माहितीवरून येवढें निश्चित म्हणतां येतें कीं, जावा व ब्रह्मदेशसयामादि देशांतील नाट्यकला तद्देशीय आहे हें खरें आहे; पण तिच्यावर भारतीय नाट्यकलेचे परिणाम झालेले आहेत हेंहि खरें आहे.

**चिनी नाट्य.**—भारतीय नाट्याप्रमाणें चिनी नाट्य हें देखील मूलतः नृत्यकला व संगीतकला ह्यांच्या संमिश्रणापासून उत्पन्न झालें आहे. कारण ज्यापासून चिनी नाट्याची परिणति झाली असे मुग्ध हावभावदर्शक प्रयोग फारच प्राचीन काळापासून म्हणजे इ. सनापूर्वी अकराव्या शतकापूर्वीपासूनच चालत आहेत. दुसऱ्या कांहीं विद्वानांच्या मतें इ. सनानंतर ५८० च्या सुमारास होऊन गेलेल्या वनते नामक चीनच्या बादशहानें नाट्यकला शोधून काढली व कोणी हा मान संगीतकलेचा पुरस्कर्ता युएनत्सुंग ह्या इ. सनानंतर ७२० च्या सुमारास झालेल्या चिनी बादशहास देतात. ह्या तारखेपासून मात्र चिनी नाट्याच्या परिणतीच्या निरनिराळ्या चार अवस्था करण्यांत येतात व

ह्या ऐतिहासिक कालविभागांपैकीं प्रत्येकाची एक विशिष्ट नाट्यपद्धति ठरलेली असून त्या पद्धतींच्या विशिष्ट संज्ञाहि ठरलेल्या आहेत.

ह्याप्रमाणें चिनी नाट्यपरिणतीचे ऐतिहासिक दृष्ट्या जे चार कालविभाग पाडलेले आहेत त्यांपैकीं पहिला कालविभाग इ. स. ७२० पासून ९०७ पर्यंत धरतात. ह्यावेळीं तअंग राजघराण्याचा चीनमध्यें अम्मल असतांना जे नाट्यग्रंथ रचले गेले त्यास 'तच्युऐन्खाइ' अशी संज्ञा असून यामध्यें असाधारण महत्त्वाच्या वृत्तांचें दिग्दर्शन केलें असून त्या दृष्टीनें हीं नाटकें वीररसपरिप्लुत आहेत असें म्हणतां येईल.

नाट्यपरिणतीचा दुसरा कालविभाग सुरू होण्यापूर्वींच मध्यंतरीं चीनमध्यें उत्पन्न झालेल्या आपसांतील यादवीमुळें कांहीं काळ प्रथम सुरू झालेली नाट्यरचना बंद पडली. परंतु पुन्हां 'सुंग' राजघराण्याचा अम्मल इ. स. ९६० मध्यें सुरू झाला व त्यावेळीं 'हीखिओ' संज्ञा असलेलीं नाटकें प्रचारांत आलीं. तीं इ. स. ११९९ पर्यंत राहिलीं. ह्यावेळींच चिनी नाट्यांत एक मुख्य गाणारें पात्र उपयोगांत आणण्याचा रिवाज पडला.

सर्वांत महत्त्वाचा व सर्वप्रसिद्ध असा चिनी नाट्याचा तिसरा कालविभाग यापुढील असून त्याची मर्यादा इ.स.११२५ते १३६७ ही आहे. चीनमध्यें ह्यावेळीं "किन" व "युएन्" ह्या राजघराण्यांचा अम्मल असून, ह्याकाळीं उत्पन्न झालेल्या नाट्यास "युएन्पेन्" व "सात् की" अशा संज्ञा आहेत. "सात् की" नाटकें बहुतेक हीखिओ नाट्यासारखींच असून त्यांमध्यें विविध विषयाचा उहापोह आला आहे. मुख्यतः "युएन्पेन्" संज्ञक नाटकापासूनच चिनी नाट्याचें वाङ्मयविषयक ज्ञान दिसून येतें. "येन्किया" नांवाचे छोटे नाट्यप्रयोग ह्याच तऱ्हेचे परंतु अगदीं लहान आहेत. चिनी वाङ्मयाच्या इतिहासांतील प्रसिद्ध असा "युएन्" राजघराण्याच्या अम्मलाचा काळ इ. स. १२६० ते १३६८ च्या दरम्यान पडतो, ह्या कालामध्यें एकंदर ८५ नाटककार उदयास येऊन ह्यांनीं लिहिलेलीं व उत्पादक माहीत नसलेलीं अशीं सुमारें ५६४ नाटकें उपलब्ध आहेत. त्यांपैकीं बऱ्याच नाटकांचीं भाषांतरें अठराव्या शतकाच्या अखेरीस कित्येक पाश्चात्य ग्रंथाकारांनीं करून प्रथमच यूरोपखंडास चिनी नाट्यवाङ्मयाची ओळख करून दिली.

चिनी नाटकांपैकीं गुणानुरूप प्रसिद्ध असें "पिपाकी" अथवा 'वीण्याची कथा' हें नाटक वरील तृतीय कालभागानंतर म्हणजे इ. सनाच्या चवदाव्या शतकाच्या अखेरीस "काओटोंकिआ" नामक विद्वानानें "मिंग"नामक राजघराण्याचा अम्मल चालू असतांना लिहिलेलें असून, त्यांत एकंदर चिनी गृहस्थितीचें भावनापूर्ण चित्र रंगविलें असून हें नाटक त्याच्या योग्यतेनुरूप लोकादरास पात्र झालें आहे. परंतु ह्याखेरीज दुसरा कोणताहि नाट्यग्रंथ इ. स. १३६८ ते १६४४ च्या दरम्यान चवथ्या कालविभागांत झाला नसून, ह्या कालांतच एकंदर चिनी नाट्यास उतरती कळा लागली ती पुन्हां बंद होण्याचें थांबलेलें दिसत नाहीं.

चिनी नाट्याचे प्रकारः—भारतीय नाट्याप्रमाणेंच चिनी नाट्यांत आनंदपर्यवसायी व शोकपर्यवसायी हे प्रमुख भेद दिसून येत नाहींत. परंतु एकंदर विषयानुरूप नाट्याचें बारा प्रकारांत वर्गीकरण केलें आहे. त्यांपैकीं धार्मिक विषयास अनुसरून लिहिलेलीं नाटकें बरींच आहेत, व त्यांपैकीं बौद्ध धर्मांतील अहिंसादि तत्त्वें बऱ्याच नाटकांतून उपदेशिलीं आहेत. चिनी वाङ्मयांत ऐतिहासिक नाटकें बरींच दिसून येतात. कायद्याच्या अन्वयें पूर्वकालीन बादशहा, राजे, महाराजे, सेनापती, महाराण्या वगैरेंचीं पात्रें रंगभूमीवर आणण्यास बंदी आहे, तरी देखील आचरणामध्यें हा कायदा क्वचितच पाळला जातो. त्याचप्रमाणें कित्येक नाटकें उत्तम गृहस्थिति, समाजस्थिति, वगैरेसंबंधीं आदर्शभूत होऊन राहिलीं आहेत.

चिनी नाट्यांतील पात्रांचें वैविध्य व संविधानकचातुर्यः— चिनी नाट्यांतून निरनिराळ्या सामाजिक दर्जाचीं पात्रें रंगविलेलीं दिसतात. आधुनिक भारतीय समाजाप्रमाणें चिनी समाजांत जातिबंधनें फार शिथिल असल्यामुळें मनुष्याच्या योग्यतेवर त्याचा सामाजिक दर्जा अवलंबून असतो व अर्थातच ही योग्यता निरनिराळ्या प्रकारच्या चढाओढीच्या परीक्षांनीं अजमावली जाते. त्याचप्रमाणें अशा रीतीचा सामाजिक दर्जा प्राप्त झालेलीं निरनिराळीं पात्रें घेऊन त्यांच्या गुणदोषांचें सुबक, जसेंच्या तसें चित्र रंगविण्यांत बिलकुल कसूर झालेली दिसत नाहीं. चिनी नाट्यांत स्त्रीपात्रांचें वैविध्य कांहीं कमी नाहीं. साम्राज्याकरितां आपल्या प्राणाची आहुति देणाऱ्या मानधन नायिकेपासून तो सुखस्थितींत वाढलेल्या व "स्त्रियांनीं ह्या जगांत आज्ञाधारक होण्याकरितां, रेशमाच्या लडींचे धागे निराळे करण्याकरितां व शिवणकाम करण्याकरितां जन्म घेतला आहे" असें बडबडणाऱ्या तरुण युवतीपर्यंत, त्याचप्रमाणें मोलकरणीपासून तो वारांगनेपर्यंत निरनिराळ्या तऱ्हेचीं स्त्रीपात्रें रंगविलीं गेलेलीं आढळून येतात.

चिनी नाटकांचे प्रयोग व संविधानकें बरींच चित्ताकर्षक असून काल व स्थल यासंबंधीं कोणत्याहि तऱ्हेचीं नियंत्रणें त्यांत दिसून येत नाहींत. एकंदर संविधानक कधीं कधीं अनेक वर्षांचा काल व लांबलांबचीं स्थळें व्यापून टाकतें. चिनी नाटकांचे सरासरी चार अंक पाडलेले असून, त्यांत प्रवेश केलेले असतात, परंतु कधीं कधीं अत्यंत लोकप्रिय "पिपाकी" सारख्या नाटकांचे कधीं कधीं चोवीस किंवा बेचाळीस असे विभाग पाडलेले असतात व हे प्रयोगहि आठ दहा दिवस चालतात. रंगभूमीवर कोणत्या गोष्टी दाखवाव्यात व कोणत्या दाखवूं नयेत ह्याबद्दल वर्ज्यावर्ज्य नियम नसल्यानें मृत्यु, जादू, चाबकाचे फटके मारणें, भूतें वगैरे सर्व गोष्टी मोकळेपणानें चिनी रंगभूमीवर संचार करतांना दिसतात.

उत्तरचीनमध्ये नाट्यप्रयोगाकरितां घरें तात्पुरतीं वेगळीं राखून ठेवण्याचा प्रघात आहे. परंतु दक्षिणेत जागजागीं रस्त्यांत नाटकगृहें बांधलेलीं आहेत. परंतु कोणत्याहि तऱ्हेचे देखावे वगैरेंचा चिनी रंगभूमीवर पूर्ण अभावच असतो. परंतु एकंदर पोषाख वगैरे त्या त्या कालास अनुसरून वापरलेले जातात. चीनमध्यें नटवर्गास समाजांत मान नाहीं, व चढाओढीच्या सार्वजनिक योग्यतादर्शक परीक्षास बसण्याचा कायद्यानें त्यांस प्रतिबंध आहे. स्त्रियांनीं भूमिका घ्यावयाची नाहीं व स्त्रियांचीं सोंगें पुरुष पात्रांकडूनच दाखविलीं जातात.

चिनी नाटकांचे विशिष्ट गुणावगुण व ध्येयः—वर सांगितलेंच आहे कीं, चिनी नाट्याचें वैशिष्ट्य जर कशांत असेल तर त्यांतील प्रमुख पात्र म्हणजे नायक किंवा नायिका ह्यांपैकीं कोणीहि संबंध प्रयोगांत गाण्याचें काम करीत असतें हें होय. संवादामध्यें मधून मधून घातलेले काव्यमय उतारे, त्याचप्रमाणें उपदेशपर म्हणी इत्यादि संगीतांत म्हटल्या जातात व अशा रीतीनें प्रेक्षकांना वैचित्र्य मिळून त्यांची करमणुक होते. अशा रीतीनें पात्रांचें वैचित्र्य, संविधानकचातुर्य वगैरे गुणांतच चिनी नाट्य सरस आहे असें नाहीं, तर निवडक प्रसंगाची रेलचेल,उदात्त व गंभीर कल्पना,विनोदयुक्त कोटिक्रम इत्यादि प्रकार देखील चिनी नाट्यांत उणीव भासूं देत नाहींत.

तात्त्विक विवेचनाच्या दृष्टीनें चिनी नाट्याखेरीज दुसरें कोणतेंहि नाट्य इतक्या उदात्त व गंभीर तऱ्हेचें नाहीं. कारण चिनी नाट्यशास्त्राप्रमाणें प्रत्येक नाटकांतून कांहीं तरी उपदेश व गूढार्थ निघालाच पाहिजे असा नियम आहे. जे कोणी अनीतीला उत्तेजन देणारीं नाट्यें रचतात ते, जोंपर्यंत त्या नाटकांचे प्रयोग चालू आहेत तोंपर्यंत भयंकर नरकांत खितपत पडतात असा चिनी शास्त्राचा धर्मोपदेश आहे. परंतु प्रयोगाच्या दृष्टीनें पाहातां चिनी नाट्यांपैकीं एकहि, ध्येयानुरूप लोकशिक्षणाचें काम बजावण्यास समर्थ आहे असें म्हणतां येणार नाहीं.

ना ट्य क ले चा अ र्वा ची न का ळ.—नाट्यकला उच्च वर्ग सोडून हलक्या लोकांच्याच आश्रयानें ललितांच्या रूपानें मुसुलमानी काळांत जीवंत राहिली होती; कारण तिचा उपासक उच्च हिंदूंचा वर्ग तो दक्षिणेखेरीज अस्तित्वांत नव्हता. दक्षिणेकडे देखील नाट्य उच्च प्रतीस पोंचलें नाहीं. मराठींतील जुनें तंजावरी नाटक म्हणजे संस्कृत साहित्याशीं अपरिचित अशा एखाद्या अरबी गांवठी कवीची ही मराठी नक्कल म्हणावें लागतें. नाट्यकला इतकी लुप्त झाली होती कीं, जोन्सला नाटक म्हणजे काय हें व्याख्येवरून समजेना, आणि नाटक म्हणजे ड्रामा हें संस्कृत नाटकें प्रत्यक्ष वाचलीं तेव्हां कळलें. त्यावेळेस नाटकें अस्तित्वांतूनच गेलीं होतीं. अर्वाचीन देशी नाट्यकला बहुतेक इंग्रजी अमदानींतली आहे. फरुकशेअरच्या वेळची व लखनौ दरबारच्या काळची नाट्यकला म्हणजे वर उल्लेखिलेल्या तंजावरी नाटकास लागणाऱ्या कलेपेक्षां वरचें स्थान खात्रीनेंच मिळवीत नाहीं. तथापि उर्दूचाच आपण अगोदर समाचार घेऊं.

उर्दू नाट्याचा उदय व वृद्धि.

पहिलें उर्दूतलें नाटक म्हणजे फरुकशेअर बादशहाच्या सांगण्यावरून नवाज किंवा निवाज कवीनें जगप्रसिद्ध शाकुंतल या संस्कृत नाटकाचें केलेलें भाषांतर होय, असें मानण्यांत येतें. उर्दू शाकुंतल कोठल्याहि ग्रंथसंग्रहालयांत किंवा दुकानांत आढळत नसून केवळ उर्दू वाङ्मयाच्या इतिहासांत त्याचा उल्लेख आढळतो. तेव्हां त्याचें गुणदोषविवेचन करणें शक्य नाहीं. त्यांतील दोष कांहीं असले तरी येवढें उघड दिसतें कीं, हिंदी रंगभुमीवर उर्दू नाटक उत्तम वेळीं आणि स्फूर्ति व प्रतिमेय यांचीं उत्कृष्ट साधनें घेऊन आलें. कारण हिंदुस्थानांतील नाट्यप्रबंधकौशल्य आणि उत्कृष्ट दृश्यांचें आविष्करण करण्याची कला शाकुंतल नाटकांत अगदीं शिखरास पोहोंचली होती असें म्हणतां येईल; आणि अवरंगझेबाच्या मृत्यूनंतर मोंगल बादशहाच्या दरबारानें वैभव व डामडौल, त्याचप्रमाणें सुख व चैन हीं पुढें एक शतक वृद्धिंगत होत होतीं.

तथापि हें भाषांतरित नाटक निवडक लोकांनां किंवा सर्वसाधारण लोकांनां आवडलेलें दिसत नाहीं. कारण तें रंगभूमीवर आल्याचें कोठें लिहिलें नाहीं. ज्याला रंगेल बादशहा या नांवानें ओळखतात त्या महमदशहाच्या कारकीर्दींत सुद्धां नांव घेण्यासारखें एकहि वाङ्मयीन नाटक लिहिलें गेलें नाहीं. असें जरी आहे तरी राजाच्या व दरबारी लोकांच्या करमणुकीखातर भाण्ड किंवा नकली लोक जीं प्रहसनें रचीत व करून दाखवीत अशा प्रहसनांचा त्यावेळीं निःसंशय अगदींच दुष्काळ नव्हता.

दिल्लीला जी कोणती कला सुरू होई ती लखनौ या प्रतिस्पर्धी शहरीं चटकन् हातीं घेऊन चालू करण्यांत येई. लखनौचा नबाब वजीद अल्लीशहा याची कारकीर्द हिंदी कलेच्या इतिहासांत एक ऱ्हासकाल म्हणून संस्मरणीय होईल.या समृद्धीच्या व चैनीच्या काळांत स्त्रैणपणा, अश्लील अनुकरण आणि कलेसंबंधीचा अपकर्ष, मोठ्या प्रमाणावर संगीत, काव्य, चित्रकला व शिल्प यांतून दिसून येतो. त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट म्हणजे ख्याल व कव्वालीमध्यें लिहिलेली कांहीं थोडीं संगीत प्रबंधें आणि "इंदरसभा" नांवाचें उर्दूमध्यें लिहिलेलें एक आनंदपर्यवसायी संगीत नाटक हीं या काळांतलीं दिसतात.

"इंदरसभा" हें उर्दूतील पहिलें स्वतंत्र नाटक असून उत्तर हिंदुस्थानांतील नाट्यपुनरुज्जीवनांत याची कामगिरी मोठी आहे. अमानत हें नांव धारण करणाऱ्या एका मनुष्यानें तें लिहिलें असून त्याचें संविधानक फारच साधें आहे. नाटकाचा पहिला देखावा इंद्रसभेचा असून त्यांत एका भव्य दिवाणखान्यांत उच्च सिंहासनावर राजा इंद्र बसला असून त्याच्या दोहों बाजूंला दरबारी लोक बसले आहेत

व लालदेव आणि काळादेव असे दोन देव त्या ठिकाणीं असल्याचें दाखवितात. नंतर पुख–( पुष्प )राजपेरी ( परी ) पहिल्यानें, मागाहून निलमपेरी, नंतर लालपेरी, आणि शेवटीं खेळांतली नायिका सब्जपेरी अशा एकामागून एक पऱ्या येतात. प्रत्येक परी गज्जल, छंद, ठुमरी, वसंत, धनवहार, होळी आणि सवन इत्यादि राग गाऊन व नाचून प्रेक्षकांचीं मनें रिझवितात व नंतर पडदा पडतो.

दुसऱ्या प्रवेशांत सब्जपरी काळदेवाला संबोधून कांहीं भाषण करते व त्याला आपल्या विश्वासांत घेऊन आपलें मनोगत सांगते. हें मनोगत म्हणजे गुल्फम नांवाच्या मानवी राजपुत्राची प्रथमच दृष्टादृष्ट झाल्यावेळीं आपण त्याच्या प्रेमपाशांत अडकलों आहोंत, ही होय. नंतर तो त्याला आपल्या प्रियकराला आणण्याकरितां धाडते, व लागलीच तिच्या मनाप्रमाणें घडून येतें. गुल्फम जागा होऊन पाहतो तों आपण पऱ्यांच्या प्रदेशांत असून एक स्वर्गीय परी जवळ आहे असें त्याला आढळून येतें. आश्चर्य, संकोच आणि घरची आठवण इत्यादि गुल्फमचे मनोविकार क्षणिक ठरून लौकरच तो सब्जपरीचा प्रेमी आग्रह आणि आणाभाका यांच्या दडपणामुळें विरघळून जातो. आणि शेवटीं त्याला काल्पनिक गोष्टींमध्यें ऐकलेला 'इंदरका आखाडा' पाहाण्याची इच्छा होते. सब्जपरी तसें न करण्याविषयीं त्याचें मन वळविते पण गुल्फम ऐकत नाहीं व ही गोष्ट करूं दिल्याशिवाय मी तुझें आलिंगन स्वीकारणार नाहीं असें जेव्हां गुल्फम तिला निक्षून सांगतो, तेव्हां ती कबूल करते. त्याप्रमाणें गुल्फमला ती घेऊन जाते व चोरून इंद्रसभेचें अतुल वैभव त्याला दाखविते; पण लालदेव इंद्राला कोणी आगंतुक मनुष्य आल्याची वर्दी देतो, तेव्हां दोघांनांहि कडक शिक्षा होते. गुल्फमला मरेपावेतों बंदिवान् करून खितपत पडण्याकरितां विहिरींत ढकलून देण्यांत येतें व सब्जपरीचे पंख कापून तिला हद्दपार करण्यांत येतें. इकडे गुल्फम बंदिवासांत खितपत पडला असतां सब्जपरी जोगिणीचा वेष घेऊन फिरते. कांहीं काळानंतर अतिशय नाजूक व रूपवान अशी एक भटकी गाणारीण म्हणून तिची ख्याति होऊन ती इंद्र राजाच्या कानापर्यंत जाते, व तो तिला बोलावणें पाठवितो. आपल्या गायनानें ती त्याला इतकी मोहित करते कीं, आपल्या राज्यांतील तिला आवडेल ती वस्तु घेण्याची तो तिला परवानगी देतो. आपला प्रियकर गुल्फम याची जेव्हां ती मागणी करते, तेव्हां ती ओळखूं येते. पण राजानें अगोदरच तिला वर दिला असल्याकारणानें तो त्याला माघारा घेतां येत नाहीं तेव्हां तिच्या मागणीचा तो आनंदानें स्वीकार करतो. हें प्रेमी जोडपें मोठ्या आनंदानें एकमेकांनां भेटतें व जिकडे तिकडे आनंदीआनंद होतो; व शेवटीं भरतवाक्य होऊन खेळ आटोपतो.

संस्कृत नाटकाच्या जुन्या नियमांनां आणि अर्वाचीन यूरोपियन नाटकाच्या नवीन प्रमाणाला लावून पाहतां हा खेळ अगदीं खालच्या दर्जाचा ठरतो. एक परी आणि एक राजपुत्र म्हणजे एक स्वर्गीय व दुसरी मानवी व्यक्ति यांच्यांतील प्रेमाची कथा शक्यतेच्या कोटींतील वाटत नसून कलानियमाविरुद्ध दिसते. आणखी, कोहीकाफच्या पऱ्या आणि देव, हिंदु पुराणांतील इंद्राच्या सभेंत उचलून ठेवणें हें एक कालविपर्यासाचें चमत्कारिक उदाहरण होईल. या खेळांत फारसा उठाव नसून स्वभावचित्र तर मुळींच नाहीं. तथापि भाषा साधी, स्वच्छ व प्रगल्भ असून मुकाफाच्या कृत्रिम यमकापासून अलग आहे. छंदहि अनुद्धत व अस्खलित आहेत. हिंदींमधील ठुंबरी, होळी इत्यादि प्रकार काव्य आणि संगीत ह्यांच्या दृष्टीनें खरोखरीच उच्च दर्जाचें आहेत. त्यांपैकीं कांहीं गाणाऱ्यांनां चलनी नाण्याप्रमाणें उपयोगी पडतात.

या 'इंदरसभे'ला अप्रतिम यश आलें. लखनौ शहरांतच नव्हे तर जेथें रंगभूमि असे तेथें लोकांची गर्दी आकर्षण करण्यास हटकून इंदरसभेचे प्रयोग होत. इतकेंच नव्हे तर हा खेळ इतका लोकप्रिय झाला कीं, जत्रांतून व इतर जनसमुदायाच्या ठिकाणीं पैशाइतक्या स्वस्त दरानें हा दाखवीत. ज्याच्याकरितां मूळ हा खेळ रचिला होता, आणि ज्याच्या दरबारानें पृथ्वीवरील दुसरी इंद्रसभाच अशी वाहवा मिळविली होती त्या अयोध्येच्या नवाबाला हा खेळ आवडायलाच पाहिजे होता. हा चवचाल नवाब स्वतः त्यांत इंद्राची भूमिका घेई. लोकांत हा खेळ प्रिय झाला याचें कारण त्याच सुमाराला इंग्लिश नाटकगृहांच्या नमुन्यावर मोठमोठ्या शहरीं लोकांची करमणूक करून पैसे मिळविण्याकरितां नाटकगृहें बांधण्यांत आलीं होतीं.

गेल्या शतकाच्या मध्यांत कांहीं दुसऱ्या लेखकांनीं हाच विषय घेऊन आपली बुद्धि चालविलेली दिसते. संयुक्त प्रांतांतील एका मदरीलाल नांवाच्या इसमानें इंद्रसभा नांवाचें एक नाटक रचिलें. अमानतच्या इंद्रसभेशीं तुलना करतां नाटकाच्या दृष्टीनें दोहोंत साम्य असलें तरी, वाङ्मयीन दृष्टीनें मदरीलालची इंद्रसभा गौण ठरते.

या नाटकांची लोकप्रियता आणि यांनां पैशाच्या बाबतींत आलेलें यश यांनीं उर्दूत नाटकें लिहिण्याला इतकें जोराचें उत्तेजन दिलें कीं, तितकें पूर्वी संस्थानिकांनीं व राजेरजवाड्यांनीं आपल्या देणगीनें किंवा आश्रयानें कधींच दिलेलें नसेल. १८७७ सालीं व्हाइसरॉय लॉर्ड लिटनच्या कारकीर्दीत जो एक मोठा बादशाही दरबार भरला त्यावेळीं व्हिक्टोरिया नाटक कंपनी नांवाच्या एका नाटक मंडळीनें दिल्ली येथें एक नाटकगृह बांधून काशींतील मुनशी विनायक प्रसाद तलीब याला आपल्याकरितां नाटकें लिहावयास सांगितलें. त्यानें साधारण प्रतीचीं कांहीं नाटकें लिहिलीं आहेत.

यानंतर थोड्याच दिवसांत रंगभूमीवर आणि पुस्तकांच्या दुकानांत उर्दू नाटकाचें भलें मोठें पीक आलें. त्यांपैकीं कांहीं

नाटकांचीं नांवें येथें देतों:—( १ ) हवई मजलस; ( २ ) गुलबकावली; ( ३ ) अलीबाबा आणि चाळीस चोर; ( ४ ); अल्लाउद्दीन आणि आश्चर्यकारक कंदील; ( ५ ) गूलरू झरीना; ( ६ ) खंडन हुमन; ( ७ ) फिरोज गुलनार; ( ८ ) लैला मजनून; (९) शिरीन फरहद; (१०) संगीन बकावली; (११) चंद्रावली; (१२) नलदमयंती; ( १३ ) राजा हरिश्चंद्र; ( १४ ) राजा मथरू ( भर्तृहरि ); इत्यादि.

गेल्या वीस वर्षांत लोकांचें रंजन करणारीं हीं व अशाच पद्धतीचीं दुसरीं नाटकें, सोयीकरितां व्हिक्टोरिया युगांतील नाटकें किंवा थोडक्यांत बोलावयाचें झाल्यास व्हिक्टोरिया-नाटकें अशा संज्ञेस पात्र आहेत; कारण व्हिक्टोरिया राणीच्या कारकीर्दींतील हीं नाटकें असून व्हिक्टोरिया नाटक कंपनी-करितांहि रचिलीं होतीं.

वरील नाटकांचीं संविधानकें प्रचलित कादंबऱ्यांतून उदाहरणार्थ,' किसई गुलबकावली ' किंवा ' गुलझरी ई नस्सीम ' ( कर्ता पंडित दयाशंकर नस्सीम ) आणि ' अलीफ ई लैला' ( अरेबियन नाइट्स् ) यांच्यांतून जशींच्या तशीं किंवा थोडा फेरफार करून घेतलेलीं आहेत. यांतलीं बहुतेक सर्व अप्रसिद्ध लेखकांकडून पैसे देऊन लिहून घेतलीं आहेत. बहुतेक लेखक मोठाल्या जुन्या घराण्यांतील गरीब स्थितीला पोंचलेले असे इसम होते. आपल्या तारुण्याच्या व समृद्धीच्या दिवसांत वाटेल तसें वागल्यावर साहजिक ओढवणाऱ्या गरीबीला भिऊन त्यांनीं रंगभूमीचा आश्रय केला व तेथें त्यांनां आपल्या दुःखी आत्म्यांनां अंजन लावतां आलें, व आपण अद्यापहि राजे, दरबारी लोक, नायक आणि प्रणयीजन यांचे खेळ खेळत आहोंत अशी कल्पना करणें त्यांनां शक्य झालें. संस्कृत आणि हिंदी वाङ्मयांत नाट्यविषयावर केवढें भांडार भरलें आहे, हें त्यांनां माहीत नव्हतें. सर विल्यम जोन्स, मोनियर विल्यम्स् आणि प्रो. विल्सन यांनीं संस्कृत नाटकांचीं केलेलीं भाषांतरें त्यांनां अगदीं दुर्गम होतीं. अमीर खुश्रु, शाह वलिउल्ला, शहाहातीम, मिर्झा रफीया सौदा, मीरदर्द, मीर सोझ, मीर तकी, सय्यद इन्शा, शेख नसीख, ख्वाजा अतीश, मोमीन झौक आणि घालीब या सोळाव्या, सतराव्या, अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकांतील पूर्वतर भाग, यांतील उर्दू कवींनीं, स्वतः संस्कृत भाषेपेक्षां पर्शियन, तुर्की आणि अरबी भाषांत पंडित असूनहि आपल्या पुढील लोकांनां नाट्यप्रबंधांत अनुकरण करण्यासारखें कांहींच ठेविलें नाहीं. वरील कारणामुळेंच मौलवी करिम उद्दीन, मौलवी महंमद हुसेन अझद आणि मौलवी अल्तफ हुसेन अली हे उर्दू नाटकांकडे कांहींच लक्ष्य देत नाहींत किंवा त्यांच्यावर टीकाहि करीत नाहींत. ज्या थोड्या लेखकांनीं या विषयासंबंधीं लिहिलें आहे, तें लिखाण हल्लींच्या उर्दू नाटकाच्या दैन्यावस्थेचें दुःखप्रदर्शनच म्हणतां येईल.

या नाटकांची भाषा ही गद्यापेक्षां खराब असें स्खलित पद्य तरी आहे, किंवा अतिशयें कृत्रिम यमकात्मक गद्य आहे. यमकात्मक गद्याचा प्रघात फार मागें म्हणजे अरबी व पर्शियन ग्रंथकारांत आढळून येतो; व तो हल्लीं सुद्धां नाटककारांत दिसून येतो. उत्तम ग्रंथकार सुद्धां मुकाफा गद्याचा उपयोग करतात व याला उदाहरण म्हणून ' पुरानी रोशनीकी नाइ डिक्शनरी ' याचा कर्ता मौलवी महमद हुसेन अझद याचें देतां येईल. पण उत्तम कलाभिज्ञाच्या हातीं असलें म्हणजे जें संगीताप्रमाणें लागतें व अनुकरणानें त्याचा उपयोग केला असतां तें कर्णकटोर बनतें. ' मुबाझद बीबी ऑफ् गुलदस्त पंच पान १३० ' याशीं अलीबाबा आणि चाळीस चोर ( व्ही. पी. तालीब ) पान २३ याची तुलना केली असतां असें दिसून येईल कीं, कल्पनांमागून शब्द येण्याऐवजीं शब्दांमागून कल्पना येतात.

या नाटकांचा नैतिक दर्जा फार खालचा आहे. इंग्रजी लोकप्रिय नाटकाचे दोन दिशांनीं जें अंधानुकरण झालें आहे, त्यायोगानें उमलतें उर्दू नाट्य खुडलें गेलें आहे. पहिली दिशा म्हणजे नीतितत्त्वें, चाली व रीती यांच्या संबंधींचीं समाजांतील जुनीं ध्येयें यांची थट्टा करून तीं गाडून टाकण्याचा प्रयत्न करीत असलेलीं स्वैर, साधी व अश्लील अशीं इंग्रजी नाटकें, उर्दू नाट्याच्या बाल्यावस्थेंत त्याची नैतिक हानी करण्यास कारणीभूत झालीं. आणि दुसरी दिशा म्हणजे यूरोपीय संगीताचे अलाप हिंदी रंगभूमींत अतिशय बेढौल रीतीनें घुसडल्याकारणानें कवींनीं उर्दूमध्यें एक नवीनच छंद उत्पन्न केला आहे. हें अतिशय हास्यास्पद दिसतें. कारण उर्दू कविता इंग्रजी आलापाच्या सांच्यांत कोंबल्यासारखें व त्यांतील शब्दांचे विनाकारण हाल हाल केल्यासारखें दिसून येतें. तथापि या प्रकारांतील कांहीं आलाप व पदें लोकांनां प्रिय झालीं असून तीं नेहमीं त्यांच्या तोंडीं असतात. कल्पनांकडे पाहतां भाषा किंवा रूप यांच्यापेक्षां त्यांचा दर्जा मोठा लागतो असें नाहीं. नायक आणि नायिका यांच्यांतील प्रेम, सौंदर्याकरितां तारुण्यांत उद्भवत असलेल्या विकाराहून वेगळें नाहीं. हा विकार कधीं कधीं इतका बळावलेला असतो कीं, तो प्रणयीजनाला अनीति व चोरटें प्रेम करावयास लावतो. कांहीं थोडीं वगळल्यास सरसकट सर्व प्रहसनें हीन दर्जाचे तमाशे होते असें म्हणतां येईल. विचार, भाषासौष्ठव, प्रयोग व वचन यांचा योगक्षेम व नियंत्रणा, संविधानकाची हळूहळू वृद्धि व कूटाविष्करण यांत उच्च दर्जाचें नाट्यकौशल्य जें उपयोगांत आणावयाचें असतें त्यांचा या नाटकांत बहुतेक अभावच होता असें म्हटलें पाहिजे.

आतां या प्राचीन नाट्यवर्गांतून बाहेर पडून दुसऱ्या जवळ जवळ आपल्याला समकालीन अशा नाट्यवर्गांत शिरूं. येथें आपणांस कांहीं आनंद व आराम वाटेल यांत संशय नाहीं. काशीचे बाबू हरिश्चंद्र आदिकरून विद्वान कविसमूहानें

द्यानें हा वर्ग निर्माण केला आहे. संस्कृत वाङ्मयांत पंडित, आणि कालिदास व भवभूति यांच्या सौंदर्यकल्पनेंतील मुरब्बी हा हरिचंद्र बंगालच्या बंकिमचंद्र चतर्जीच्या तोडीचा उत्तम हिंदी नाटककार आहे. पुराणांतील कथानकें घेऊन त्यांवर मोठ्या मार्मिकतेनें व कौशल्यानें आपलीं संविधानकें बसविण्यांत बाबूसाहेबांचा हातखंडा असे.त्यांची भाषा निव्वळ हिंदी असल्यानें त्यांच्या नाटकांचा विचार येथें आपणांस कर्तव्य नाहीं. तथापि हें कबूल केलें पाहिजे कीं, त्यांच्या नाटकांचा बराचसा पगडा त्यांच्या पुढील काळांतील उर्दू नाटकांवर बसलेला आहे. उदाहरणादाखल राजा हरिश्चंद्र, रुक्मनी (रुक्मिणी)मंगल, व बिलव(बिल्व)मंगल,हीं नाटकें देतां येतील.

दुसऱ्या एका वर्गांतील लेखकांनीं उर्दू नाट्यवाङ्मयावर आपली जी थोडी छाप बसविली आहे, ती लक्षांत घेणें अवश्य आहे. कारण या प्रतिभाशाली लेखकांनीं या नाट्यक्षेत्रांत जास्त लक्ष घातलें असतें तर, उर्दू नाट्याला त्यांनीं चांगलें गौरविलें असतें. मौलवी महंमद हुसेन अझ्द यांनीं "दरबार-ई-अकबरी-किसासी-हिंद" आणि "पुरानी रोशनीकी नई डिक्शनरी" यांत जी तेजस्वी दृश्यें आणि स्वभावचित्रें घातलीं आहेत, त्यांवरून कर्त्याच्या ठिकाणीं असलेली नाट्यविषयक अंतर्दृष्टि दिसून येते. मुनशी ज्वाला प्रसाद बार्क (लखनौ) हे केवळ 'औध पंचा'चे लेखक होते.इतकेंच नव्हे तर त्यांनीं "मापुक-ई-फरंग" सारखीं एक दोन नाटकें लिहिलीं आहेत. त्यांवरून त्यांची नाट्यप्रतिभा आणि भाषा-प्रभुत्व चांगलें दृग्गोचर होतें. पण्डित त्रिभुवननाथ सप्रू यांनींहि आपल्या ठायीं असलेली चटकदार गद्यरचना व विनोद प्रत्ययास आणून दिला आहे. उदाहरणार्थ, त्यांचें " मोरम-उल्-हराम " आणि " नाश-कीं-तरंग " पहा. अकबर हुसेन यांच्या काव्यप्रबंधांतून नाट्यसौंदर्य आणि उत्साह दिसून येतो. आपल्या "मुखमास किताई हिंद" यांत एक जुन्या गताचा मुसुलमानी वैद्य आणि एक सुधारक सय्यद यांच्यांमधील एक मोठा मजेदार काल्पनिक संवाद आला आहे. मच्छूबेगसारखे इतर दुसरे लेखक होऊन गेले, पण त्यांच्यापेक्षां अतिशय श्रेष्ठ व्यक्ति म्हणजे पण्डित रतननाथ सर्शर यांनीं फिसनई अझ्दच्या चार खंडांत आपलें सूक्ष्मावलोकन, स्वतंत्र कोटी आणि नाट्यलेखकाला आवश्यक अशी तेजस्वी व खोंचदार लेखनशैली लोकांच्या चांगलीच नजरेस आणून दिली. 'हंसवणारा खोजी' आणि 'ओसाला फीलका वान'ही सरावाची शिवी देणारा मित्रा बंगाली बाबू हीं पात्रें उर्दू बोलणारांच्या तोंडांत म्हणीप्रमाणें बसलीं आहेत.

विसाव्या शतकाच्या आरंभीं उर्दू दर्जांत व गुणधर्मांत बराचसा फरक पडलेला दिसतो. पुढील नाटकें या काळाचें द्योतक म्हणून देतां येतीलः—(१) राम नाटक-कर्ता मुनशी दयानरेन उफक, लखनौ; (२) सय्यद-ई-हविस; (३) मुमाई उम्मेद; ( ४ ) सिल्व्हर किंग; ( ५ ) आत्म परतमा—बिल्वे मंगल किंवा सुरदासः ( ६ ) राजा हरिश्चंदर-कर्ता पण्डित दुर्गादास दिलखुष, लाहोर; (७) महाभारत;( ८ ) रामायण; (९) राजदुलारी; (१०) मुरारी दादा; (११) ब्रह्माण्ड नाटक कर्ता प्रिन्सिपाल कनवर सैन; (१२) स्वामी दयानंद; (१३) महाराणा प्रताप, कर्ता बी राधाकृष्णदास, आग्रा; (१४) बुद्धदेव, कर्ता मुनशी विशेवर साहाय्य, मीरत; (१५) वीरविशाल, कर्ता पण्डित मुल्खराज शर्मा; (१६) गंगा अवतरण-कर्ता वीर अभिमन्यु;(१७) नूर-ई-वतन आणि इत्तीफक्. या यादींत, मुनशी प्रेमचंदानें ज्या लहान लहान नाटकी गोष्टी लिहिण्याचा परिपाठ घालून दिला, तीं नाटकें घातलीं पाहिजेत.

या नाट्यवाङ्मयाला 'व्हिक्टोरियाच्या-पश्चात् उर्दू नाट्य' म्हणतां येईल. हें याच्या आधीच्या नाट्यापेक्षां तीन बाबतींत सरस आहे. पहिली बाब म्हणजे यांतील विषय बहुविध व मनोरंजक असून, गोष्टी-दंतकथेपासून तों प्राचीन भारतीय धार्मिक महाकाव्यें, नाट्य आणि इतिहास यांपर्यंतचें अफाट क्षेत्र यांत आलेलें आहे. सामाजिक, राजकीय व शास्त्रीय क्षेत्रांतहि यांची गति आहे; उदाहरणार्थ ," ब्रह्मांड नाटकां " त शास्त्र, "राजदुलारी" व "मुरारी दादा" यांतून सामाजिक दृश्य, आणि "नूर इ-वतन व इत्तीफक्" यांत राजशासन ग्रथित केलेलें आहे. दुसरी बाब ही कीं, यांचा नैतिक दर्जा उच्च असून भाषाहि पवित्र आहे. तिसरी बाबत, या नाट्यांतील संविधानक जास्त गुरफटलेलें, हळू हळू प्रवृद्ध होत गेलेलें व शेवटीं कांहीं गूढाचा परिस्फोट पावलेलें असें आहे. येथें या नाटकांतील संविधानकांची रूपरेषा न देतां, फक्त कांहीं प्रसिद्ध लेखकांच्या नाटकांवर अभिप्राय देण्याचें योजिलें आहे.

अघा महंमद हशरचीं नाटकें विकारी नाटकांसारखीं वाटतात. त्यांतील पात्रांचे मनोविकार फार तीव्र असल्यानें तीं उठावदार दिसतात. त्यांतील प्रेम उत्कट असतें, करुणरस हृदयाला पीळ पाडणारा असतो व शोकरसाला तर सीमाच नसते.जेव्हां हा कवि दोन अगदीं विरुद्ध स्वभावांच्या पात्रांना एकमेकांसमोर आणतो त्यावेळीं त्याचें विविधज्ञान, गद्यपद्यावरील त्याचें स्वामित्व आणि रंगेल विचार उत्कृष्टरीतीनें आपल्या नजरेस येतात ( उदाहरणार्थ (१) "सिल्वर किंग" अं. ३ प्र. २ यांतील असद न परविन यांच्यामधील संवाद; ( २ ) " सुरदास " अं. १ प्र. ६ यांत रामदास आपला मुलगा बिह्लू याला, आपला तुला वारस करणार नाहीं असा धाक घालतो, त्याला बिह्लू प्रत्युत्तर करतो इ. ). हशरचें " सिल्व्हरकिंग " हें नाटक नाटकाला जाणाऱ्या लोकांनांच केवळ अति आवडतें झालें आहे असें नसून शिक्षकविद्यार्थ्यांतहि तें प्रिय आहे व त्याचे प्रयोग शाळा-कॉलेजांतून मोठ्या हौसेनें करण्यांत येतात. " बिल्वो मंगल " किंवा " सुरदास " ( हल्लीं याला आत्मा आणि परमात्मा म्हणतात ) यांमध्यें, उत्तम उर्दू नगांत हिंदीचे नाजुक रेशमी धागे विणण्याच्या कामीं त्याला पुष्कळच यश आलेलें आहे.

याच नांवाच्या बाबू हरिश्चंद्रच्या मूळ नाटकास हश्ररनें कांहीं एक धक्का लाविला नसून उलट त्याच्या विविधतेंत व ऐश्वर्यांत भरच टाकिली आहे.

नाटकांत आवेश व ओज घालण्यांत हश्ररनें जसे मार्लोचे गुण उचलले आहेत तसेच त्यांचे दोषहि उचलले आहेत. नाजुकपणापेक्षां तीव्रतेकडे जास्त भर, तसेंच सुंदर छटांपेक्षां भडक रंग व कडक विरोध यांकडे ज्यास्त प्रवृत्ति, हे दोष होत. याचा परिणाम विशेषतः जेव्हां अति भयंकर गुन्हे रंगभूमीवर दाखविले जातात, तेव्हां कोमल व हळव्या मनावर फार होतो. "सिल्व्हरकिंग" व "बिल्वो मंगल"मध्यें असे कांहीं प्रसंग आहेत.

बेतबच्या महाभारत नाटकानें आरंभीं कांहीं दिवस लोकांत खळबळ उडवून दिली होती व सध्यां देखील तें अत्युत्कृष्ट उर्दू नाटकांपैकीं एक गणलें जातें. व्यासाचें चिरंजीव लिखाण हेंच एक थोर नाटक असल्यामुळे पंडितजींनां या ज्ञानकोशांतून एक सुंदर संविधानक निवडून काढण्यास फार श्रम पडले नसतील. तथापि मध्यवर्ती कल्पना निवडून त्याभोंवतीं खुबीदार धागे गुंडाळण्यांत त्यांची विद्वत्ता दिसून येते. हिंदीवरच्या आपल्या प्रभुत्वाची जाणीव ठेवून त्यांनीं नाटकांत हिंदीचा उपयोग केला आहे; व त्याचा चटकन् परिणामहि होतो. कारण पदांत किंवा भावनोत्तेजक प्रबंधांत उर्दूपेक्षां हिंदी अतिशयच सरस वाटते.

श्रीकृष्णाचें बोट कापलें असतां द्रौपदी आपली रेशमी जरीची साडी फाडते व त्याचें बोट बांधिते, यावर श्रीकृष्ण तिच्या मायेची हजारपट फेड करण्याचें कृतज्ञताबुद्धीनें तिला आश्वासन देतो ही कथा, भगवानानें नंदन्हाव्याचें रूप घेऊन त्याप्रमाणें वागल्याची कथा, सेवा चांभार पाणी काढण्याविषयीं परवानगी मागतो, किंवा चेट चांभार नदीवर आपल्या देवतेला आव्हान करतो ही कथा, या सर्व संविधानकांत फारच खुबीनें घालून व त्यापासून बोध काय घ्यावा हें दाखवून, आपल्या नाट्यकृतीच्या सौंदर्यांत पंडितजींनीं विशेष भर टाकिली आहे.

या नाटकांतील विशेष दोष म्हणजे स्वर्ग व नरक दाखविण्याचा केलेला प्रयत्न होय. ज्वलज्ज्वाला, आळेपिळे देणारे सर्प, रक्त व पू यांचीं डबकीं आणि किळसवाणे प्राणी हे नरकद्योतक म्हणून व सुंदर लताकुंज, खळखळणारे ओढे, नाचणारीं कारंजीं, किलबिल करणारे पक्षी आणि चरणाऱ्या गाई इत्यादि स्वर्गद्योतक म्हणून जें योजतात तें अति पोरकट व रानटी दिसतें. जी तीव्र भावनामय मानसिक स्थिति ती जडरूपांत ठेवण्याचा प्रयत्न करणें हा एक नाट्यदोष म्हणतां येईल.

बेतबच्या रामायण नाटकाविषयीं हेंच म्हणतां येईल. या नाटकांतून विकार तीव्र असून पात्रें आवेशाचीं असतात पण गोष्टींत कांहीं दोष आढळतात. ते पुढीलप्रमाणें:— (१) यमकात्मक गद्य फार ठिकाणीं अद्याप आढळतें. (२) अरबी व फारसी शब्दांच्या जोडीला संस्कृत शब्द व प्रयोग वारंवार वाटेल तसे योजलेले असल्यानें विसंगतता उत्पन्न होते. (३) फार वेळां, मोठ्या कडाक्याच्या वादांत देखील संभाषणांतून पदें घालण्यांत येतात. यामुळे प्रवेशाला कृत्रिम स्वरूप येतें. गद्य नाटकांत एखादा प्रासंगिक दोहोरा किंवा पद्यसुभाषित घालण्यास हरकत नाहीं, उलट त्याचा चांगला परिणाम होतो; विशेषतः प्रणयी वातावरणांत सबंध गज्जल उपयोगिलें तरी चालतें. पण प्रक्षोभाच्या वेळीं किंवा विकार बळावल्यावेळीं हे योजणें अयोग्य होतें. उदाहरणार्थ, रागाच्या वेळीं तुटक तुटक वाक्येंच जास्त स्वाभाविक दिसतात. याशिवाय, नाटकाचा सूर वराच चढला म्हणजे रहस्य कायम राखण्यासाठीं कधीं कधीं मोठमोठ्यानें बोलणें, बळेंच कांहीं नवीन प्रसंग घालणें या गोष्टी करण्याची इच्छा होते.

हे वर दाखविलेले दोष बहुधां मुनशी बिशंबर (विश्वंभर) सहाइ याच्या "बुद्धदेव" नाटकांत दिसत नसून, उर्दू वाङ्मयांत याला मोठें स्थान मिळण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. यांत भारदस्त विचार असून, रचनाहि मोठ्या खुबीची आहे. यांत शांतरसाचें आधिक्य दृष्टीस पडतें व यामुळें हें एक शांत नाटक बनलें आहे. रंगभूमीवरहि हें चांगलें वठतें. "राजदुलारी" व "मुरारी दादा" हीं गद्य सामाजिक नाटकें पंडित ब्रिजमोहन दत्तात्रय यांनीं लिहिलीं असून, त्यांत सुशिक्षित हिंदी लोकांनां जगाचा आदर्श दाखविला आहे व सुधारणा घडवून आणण्याविषयीं उपदेश केला आहे. समाजांतील वरच्या मध्यम दर्जाच्या स्त्रीपुरुषांचे विचार व विकार, दौर्बल्य, छंद आणि क्षुद्रता हीं उत्तम रीतीनें वठविलीं आहेत. जरी हीं गद्यांत लिहिलीं आहेत तरी तीं गद्य नसून त्यांत अनेक नाजुक वैदग्ध्याच्या छटा दृष्टीस पडतात. रचना आवडेल अशीच असून भाषा पूर्णपणें भारदस्त व सच्छील आहे. त्या जणू काय बर्नार्ड शॉ यानें नाट्यरूप दिलेल्या जेन ऑस्टेनच्या कादंबऱ्याच होत. फक्त पंडितजींमध्यें अर्वाचीन मत त्याच्या तार्किक शेवटापर्यंत नेण्याइतकें शॉचें धैर्य दिसत नाहीं. त्यांचा 'सुवर्णमध्य' नियमावर विश्वास आहे. या निबंधाचा लेखक कुनवर सैन प्रस्तुत लेखांत आपल्या स्वतःच्या नाटकांसंबंधानें मत देण्याचें टाकून, फक्त आपल्या ब्रह्मांडनाटकांत स्वर्गीय पात्रें आणून त्याला नवीन वाङ्मयीन वळण दिल्याचें सांगतो.

पृथ्वी, मंगळाच्या प्रेमपाशांत सांपडून आपला प्रेमसंदेश त्याला पोंचविण्याच्या कामीं चपलेची योजना करते. धूमकेतू तारा पृथ्वीकरितां मध्यस्थी करून ग्रहमंडळाचा अधिपति म्हणजे घरचा यजमान, जो सूर्य त्याची या दोघांचें लग्न लावून देण्याबद्दल परवानगी मागतो. सूर्य रागावून परवानगी देत नाहीं; तेव्हां पृथ्वी वेडी होऊन बहकूं लागते. पण शेवटीं विश्वाच्या घटनेची यथार्थता तिला कळून येते. हें नाटक म्हणजे केवळ कल्पनेचा खेळ होय. तारांनीं खचलेलें आकाश पाहून तरुणाच्या मनांत ज्या अनंत कल्पना उद्भवतात,

त्यांचेंच हें एक दृश्यफल होय. खगोलाच्या गायनाच्या तालावर चालणाऱ्या ताऱ्यांच्या सतत गतींत त्याला ब्रह्मांडाचें नाटक दिसतें. इरॅस्मस् डॉर्विनच्या ' लव्हज् ऑफ दि प्लँट्स् ( वनस्पतींचें प्रेम )' वरून कवीला ' लव्हज् ऑफ दि प्लॅनेट्स् ' ( ग्रहांचें प्रेम ) सुचलें. कृष्ण मिसरांच्या प्रबोध-चंद्रोदयात वेदांताला नाटकाचें रूप दिलें आहे. हें पाहून शास्त्रीय तत्त्वाला नाटकी वेष चढविण्याचें कुनवर सैनाच्या मनांत आलें. त्याप्रसंगीं हॅलेचा धूमकेतू दृश्यमान होता. तेव्हां त्या प्रसंगानें हें कथानक लिहिण्यास त्याला उद्युक्त केलें.

निरनिराळया उर्दू मासिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झालेल्या मुनशी प्रेमचंदाच्या छोट्या गोष्टी लोकांनां फारच प्रिय होऊन त्यांच्या एकत्र स्वरूपांत अनेक आवृत्त्या निघाल्या इतकेंच नव्हे तर हिंदी, बंगाली, गुजराथी इत्यादि अनेक भाषांतून यांचीं भाषांतरें झालेलीं आहेत. उर्दू कथानकांचें स्वरूप आणि नाटकी लक्षण अशा तऱ्हेच्या या नवीन वाङ्मय-रूपाचा मुनशी प्रेमचंद निःसंशय जनक व पोषक होय. त्याच्या या वाङ्मयीन क्षेत्रांत त्याचें अनुकरण करण्यास अनेक लोक आले आहेत.

ऐतिहासिक नाटकांचा विचार करतां असें दिसून येतें कीं, त्यांतील कांहीं नाटकें बंगालीवरून घेतलेलीं किंवा भाषांतर केलेलीं असून तीं बऱ्यांपैकीं आहेत. बाबू राधाकृष्ण दासांचे "महाराणा" हें नाटक टॉडचें राजस्तान आणि रजपूत भाटांचा इतिहास यांवरून लिहिलें आहे. नाटक या दृष्टीनें पाहातां त्यांत आवेश मुळींच नाहीं. 'वीरबृबल' हें चंद्रगुप्त मौर्याच्या साहसांचें कथानक आहे. आर्य समाजाचा मोठा संस्थापक जो महाशय सुदर्शन त्याचें ' स्वामी दयानंद ' हें नाटक आहे. हीं उत्तम नाटकें असून तीं सध्यां उर्दूंत नाटकांची गति कोणत्या बाजूला आहे हें दाखवितात. "नूर-ई-वतन आणि इत्तीफक् " यांचा विषय उघड राजकीय आहे.

यांशिवाय उर्दूंत आणखी बरींच चांगलीं नाटकें आहेत. " गंगा अवतरण " हें त्यांपैकींच एक होय. गेल्या कांहीं वर्षांपासून सुशिक्षित व सुसंस्कृत माणसें आपलें लक्ष इकडे वेधून नाटकें लिहावयाला लागलीं आहेत व उच्च दर्जाच्या नाटकांची लोकांनां आवड उत्पन्न झाली आहे हें सध्यांच्या काळचें आशाजनक व सुखकर लक्षण आहे असें म्हणतां येईल. पंजाबमध्यें मिसेस रिचर्ड्स यांच्या उत्साहा-मुळें या कलाक्षेत्रांत नाट्योत्पत्ति व भाष्य यांनां उत्तेजन मिळालें आहे. सारांश उर्दू भाषेच्या बाल्यावस्थेंत त्याला कांहीं रूप नव्हतें. घालीब ( इ. स. १८६९ ) पर्यंत कोणत्याहि उर्दू गद्यपद्य लेखकांनीं उर्दू नाटक लिहिलें नव्हतें; मोंगल साम्राज्याचा ऱ्हास झाल्यानंतर उर्दू नाटकांचा जन्म झाला. पूर्वींचे प्रयत्न वस्तू व रूप या बाबतींत अति हिणकस असे होते; त्याचें कारण साधनें किंवा उपमान ह्यांचा अभाव होता असें नसून तांत्रिक ज्ञानाचा व कौशल्याचा लेखकांच्या ठिकाणीं असणारा अभाव होय. व्हिक्टोरिया कालांतील नाटकें खालच्या दर्जाच्या लोकांनांच फक्त आवडण्यासारखीं अशुद्ध बीजाचीं खंडोगणतीं नाटकें असून त्या कालानंतर नाटक या संज्ञेला पात्र अशा नाटकांचा उदय होऊं लागला. अजूनहि प्राचीन संस्कृत किंवा अर्वाचीन यूरोपीय नाटकांशीं तुलना करतां उर्दू नाट्यवाङ्मय कमी प्रतीचें ठरेल. कालिदास आणि शेक्सपियर यांच्या पात्रांच्या अंगीं असणारी गूढ मोहकता, आविर्भाव आणि चेष्टा अद्यापि उर्दूंत यावयाचीं आहेत.

उर्दू नाटकांचें भवितव्य सांगणें मोठें धाडसाचें होईल. तथापि मागील गोष्टींवरून तर्क करून आपलें मत देण्यास हरकत नाहीं. उर्दू नाटकांनीं आपल्या जोमाचीं व वाढीचीं चिन्हें प्रत्ययास आणून दिलींच आहेत. त्यांत लोकांनां उत्थापन देण्याचीं प्रबळ साधनें विद्वान पुढाऱ्यांनां खचित दिसतील व नाटकाच्या दृष्टीनें अतिशय मागासलेल्या इराणामध्यें ऐतिहासिक राजकीय नाटकांची जशी लाट उसळली तशीच यापुढें येथेंहि उसळेल. शेक्सपियरच्या 'किंगहेनरी'सारखीं ऐतिहासिक नाटकें अजून येथें व्हावयाचीं आहेत. त्यांतून आणि त्यानंतर कदाचित कालपरत्वें खऱ्या अद्भुतरम्य नाटकांचा उदय होईल आणि अगदीं त्याच वेळीं जगातील अत्युत्कृष्ट नाटकांच्या बरोबरीनें उर्दू नाटकांचा हक्काचा दर्जा लागेल.

गुजराथी नाटकांचें विवेचन गुजराथी वाङ्मयांत केलेलें आहे. तामिल व तेलगु यांची नाट्यकला महाराष्ट्रीय नाट्यकलेपेक्षां अधिक विकास पावली नाहीं. बंगाली नाट्यवाङ्मय पुष्कळच आहे (बंगाली वाङ्मय पहा). बंगालमध्यें नाट्यकलेला कांहीं वेश्यावर्गांतील स्त्रिया वाहिलेल्या आहेत. तेथें एका रात्रींत दोन नाटकें करून रात्रभर नाटकगृह वापरलें जातें.

### मराठी नाटकें.

प्राचीन कालांतील संस्कृत नाटकें आणि आजचीं मराठी नाटकें यांच्या मध्यंतरीचा काल महाराष्ट्रीयांस बराच धामधुमीचा होता. यांतील कांहीं कालांत मुसुलमानी सत्तेनें महाराष्ट्र देशास व्यापून टाकलें होतें व पुढील कांहीं काल हें राष्ट्र उदयोन्मुख असल्यामुळें त्यांत शांतता नव्हती. तेव्हां त्या काळीं नाटकादि ललितकलांकडे लोकांचें लक्ष गेलें नाहीं हें सहाजिकच होतें. या कालांत महाराष्ट्रांत बरेच कवी झाले, व त्यांतील बरेच संतकवी झाल्यामुळें त्यांनीं आपल्या काव्याचा ओघ नाटकादि ललितकलांकडे वळविला नाहीं. रा. राजवाडे यांनीं आपल्या ' संकीर्ण लेखसंग्रह ' या ग्रंथमालेंतील प्रकरणांत एक ' लक्ष्मीनारायणकल्याण ' नांवाचें नाटक प्रसिद्ध केलें आहे. हें नाटक एकांकी आहे. हें तंजावरच्या शाहूराजाच्या वेळीं झालेलें आहे. म्हणजे हें नाटक शके १६०४ च्या नंतर दहा पांच वर्षांत रचलेलें आहे. रा. राजवाडे यांच्या मतें ज्ञानेश्वरापासून विष्णुदासभाव्यापर्यंतच्या ६०० वर्षांच्या कालांत महाराष्ट्रांत नाटकें होत आलीं

आहेत पण हें मत प्रत्यक्ष नाटकांच्या अभावीं ग्राह्य वाटत नाहीं.

म रा ठी रं ग भू मी चा पा या.—मराठी रंगभूमीचा आजमितीला जी स्थिति आहे तिची सुमारें नव्वद वर्षांपूर्वी महाराष्ट्रांतील लोकांनां कल्पनाहि नव्हती. त्यावेळीं व तत्पूर्वी नाटकाचे प्रकार कायते दोन माहीत होते. एक तमाशा व दुसरें ललीत; पैकीं ललिताचा प्रकार फार दिवसांचा असून देवादिकांच्या उत्सवप्रसंगीं अथवा नवरात्राच्या अखेरच्या दिवशीं बहुधा तीं पुष्कळ ठिकाणीं होत असत. ललितांमध्यें आरंभीं देवादिकांचीं सोंगें आणून दशावतारांतील थोडथोडी ईश्वरलीला करून दाखवीत असत, व शेवटीं रामाकडून रावणाचा वध करवून ललीत संपवीत असत. यांत जीं सोंगें आणीत तीं ओबडधोबड अशींच आणीत व रात्रीं दिवलांत सरक्या घालून किंवा तेलाचे काकडे पेटवून त्याच्या उजेडांत खेळ करीत. खेळाला सामानसुमानहि फार लागत नसे. पुढें एक अलवानीचा पडदा, पांच चार धोत्रें व लुगडीं, एक दोन किरीट, थोडा पालापाचोळा आणि राळ, एवढें झालें म्हणजे झालें. अशा रीतीचीं ललितें पूर्वीं कोंकणांत पुष्कळ होत असत व हल्लींहि कोठें कोठें होतात. ललितांत अभिनय, संगतवार भाषण, वगैरेंचा अभाव असून सरासरी धांगडधिंग्यांतलाच प्रकार नेहमीं चाले. त्यांतल्या त्यांत पुणें शहराजवळ चिंचवड गांवची मंडळी ललीत करी तें अंमळ बरें होई असें म्हणतात.

तमाशे हे मुसुलमानी अमदानींत सुरू झाले असून बादशाही वैभवाबरोबर जे कांहीं चैनीचे व करमणुकीचे प्रकार अस्तित्वांत आले त्यांत यांची गणना होते व पुढें यांचेंच अनुकरण मराठी राज्यांत झालें. तमाशाचें सामान्य स्वरूप म्हणजे पाठीमागें डफतुणतुण्यावर गाणें, पुढें नाचापोराचा नाच, आणि मधून मधून सोंगाची बतावणी हें होय. ललितापेक्षां यांत ग्राम्य प्रकार फार. यांत ज्या लावण्या म्हणतात त्या बहुतेक शृंगारिक असून त्यांत बीभत्सपणाहि पुष्कळ असतो. अशा प्रकारचे तमाशे रावबाजीच्या (शेवटच्या) कारकीर्दीत विशेष प्रचारांत आले. त्यावेळीं रामजोशासारखे ब्राह्मण गृहस्थहि 'कलगीतुऱ्याच्या नादांत असून लावण्याच्या छंदावर कवनें करून, स्वच्छंदानें डफतुणतुणें, सारंगी आणि नाचेपोरे हातीं घेऊन चरितार्थ चालवूं लागले.

ललितें व तमाशे यांखेरीज गोंधळाचाहि थोडाबहुत संबंध मराठी रंगभूमीशीं पोहोंचतो. गोंधळांत कांहीं गोंधळी नकला करणारे फार उत्तम होते. ललितांत किंवा तमाशांत निरनिराळीं सोंगें आणून जशा नकला करीत तशा गोंधळांत करीत नसत. तरी आरंभीं घातलेल्या साध्या पोषाखानेंच पुढें येऊन बोलणें, चालणें वगैरेंत एखाद्याची नक्कल हुबेहुब वठवून देत. ललिताहून तमाशे आणि गोंधळ यांचा प्रकार किंचित् भिन्न आहे. ललितांत बहुतकरून पौराणिक कथेवर खेळ करून दाखवीत. तमाशांत व गोंधळांत साधारणपणें त्या त्या वेळच्या स्थितीवर व माणसांवर कवनें करून बतावणी करीत असत. निजामच्या दरबारांत एकदां तमाशा होऊन त्यांत सवाई माधवराव व नाना फडणवीस यांचीं सोंगें आणल्याचें इतिहासांत प्रसिद्धच आहेत.

ललितवाले, तमासगीर व गोंधळी यांच्याप्रमाणें बहुरूपी यांनींहि नाटकाचा पाया रचण्यास बरीच मदत केली आहे. रोज नवीं नवीं सोंगें आणून त्यांची बेमालूम रीतीनें बतावणी करणारे बहुरूपी आजपर्यंत कितीतरी होऊन गेले. याप्रमाणें ललितें, तमाशे व कांहीं अंशीं गोंधळ आणि बहुरूप्यांचीं सोंगें हा मराठी रंगभूमीचा पाया होय. आतां या पायावर पुढें कोणी कोणी कशी इमारत रचली, तिचें अंतर्बाह्य स्वरूप काय, त्यांत व्यवस्था व गैरव्यवस्था कोणत्या आहेत, त्यांतील उपयुक्त भाग कोणता, मनोहर भाग कोणता, त्यांत काय दोष आहेत व सुधारणा कोणत्या झाल्या पाहिजेत वगैरे गोष्टींचा विचार करणें आहे.

आद्य मराठी नाटकें:—मराठी नाटकांस सुरवात करण्याचा मान सांगली संस्थानाधिपति कै. श्री आप्पासाहेब यांच्याकडे आहे. स. १८४१ त सांगलीस उत्तर कानडा प्रांतांतील एक भागवत नांवाची मंडळी आली होती, व तिचे कांहीं खेळ श्री. आप्पासाहेब यांनीं पाहिले. अशा प्रकारचे खेळ मराठींत झाले तर बरें होईल असें श्रीमंतांस वाटून त्याप्रमाणें करण्याचें अवश्य तें काम त्यांनीं आपले आश्रित रा. विष्णुपंत भावे यांच्याकडे सोंपविलें.त्यांनीं बरीच खटपट करून हें काम श्रीमंतांच्या मर्जीप्रमाणें तडीस नेलें, आणि तेथूनच मराठी नाटकांस सुरवात झाली. रा. भावे यांनीं रचलेलें पहिलें नाटक 'सीतास्वयंवर' हें होय. याचा प्रथम प्रयोग स. १८४३ मध्यें श्री. आप्पासाहेब यांच्यापुढें करून दाखविला. यानंतर रा. भावे यांनीं बरींच नाटकें पुढें आणलीं, परंतु तीं साहित्याच्या दृष्टीनें महत्त्वाचीं नाहींत. या वेळचीं नाटकें पुराणांतील कथांवर रचलेलीं असून त्यांत जुन्या कवींच्या कवितांचा बराच उपयोग केलेला असे. जेथें जुन्या कवींच्या कवितेनें काम होण्यासारखें नसेल, किंवा ज्या कथाभागावर जुनी कविता उपलब्ध नसेल, तेथें नवीन नवीन कविता करून भर घालावी लागे.या नाटकाच्या प्रयोगाचें स्वरूप सद्यःकालीन नाट्यप्रयोगाहून बरेंच भिन्न होतें. त्याकाळीं नाटकांतील पात्रांनां कथानकाच्या अनुसंधानानें नाट्य करावयाचें, अवश्य असेल तेथें थोडेसें भाषण करावयाचें, व बाकीचा कथाभाग सूत्रधारानेंच म्हणावयाचा असे. उत्तर हिंदुस्थानांत प्रचारांत असलेल्या 'रामलीला, व 'कृष्णलीला' यांच्या प्रयोगांवरून या सुरवातीच्या नाटकांच्या प्रयोगांची कल्पना करतां येईल. हीं नाटकें त्यांतील राक्षसांच्या प्रवेशाच्या वेळच्या त्यांच्या आरोळ्यांच्या अनुसंधानानें 'अललडुर्र नाटकें' या नावानें संबोधिलीं जात.

रा. भावे यांच्या नाटकाची पद्धत म्हणजे प्रथम सूत्रधाराचें मंगलाचरण; नंतर विदुषकाचे चाळे व विनोदी भाषण; पुढें गणराज व सरस्वती यांचें आगमन व त्यांचा आशीर्वाद; यांच्यामागून देव, राक्षस व स्त्रिया यांच्या कचेऱ्या; लढाया; वगैरे. असा हा नाटकाचा प्रयोग चालला असतां पात्रांनां विश्रांति देणें, त्यांनां पद्यांतून भाषणें सुचविणें, वगैरे कामें सूत्रधाराकडे असल्यामुळें त्याला आरंभापासून अखेरपर्यंत साथीदारांसह गायनवादनाचें साहित्य घेऊन सज्ज रहावें लागत असे. पुढच्या एका पडद्यावर काम चाले, व तो कच्या लावून दोरीनें ओढून गोळा करून घेण्यासारखा असे.

त्यावेळीं जीं पौराणिक नाटकें होतीं त्यांपैकीं कांहींचीं नांवें दिलीं आहेतः—सुभद्राहरण, वत्सलाहरण, सीताहरण, कीचकवध, दुःशासनवध, वृत्रासुरवध, रावणवध, दक्षप्रजापतियज्ञ, कचदेवयानी, सुरतसुधन्वा, लहुअंकुश-आख्यान, बाणासुरवध, रासक्रीडा, नरनारायणचरित्र, नारदाची नारदी, कौरवपांडवयुद्ध, किरातार्जुनयुद्ध, हरिश्चंद्र नाटक, इंद्रजितवध, श्रियाळचरित्र, वगैरे वगैरे.

१८५७ सालीं मराठी नाटकांस सुरवात झाल्यापासून आतांपर्यंतच्या सुमारें ६३ वर्षांत मराठी वाङ्मयाच्या इतर प्रकारांपेक्षां नाटकांचीच वाढ जास्त झाली आहे असें आपणास दिसतें. आजपर्यंत मराठींत सुमारें ९०० नाटकें प्रसिद्ध झालीं आहेत. ही मराठी नाटकांची वाढ एकाच प्रकारची नसून त्यांत बहुविध प्रकार आहेत. गद्यपद्यमिश्र ( संस्कृत नाटकांच्या धर्तीवर ), गद्य, संगीत, प्रहसनें, साररूपक अशा अनेक प्रकारचे नाट्यग्रंथ मराठींत झालेले आहेत. शिवाय अलीकडे नाट्यविषयक वाङ्मयासहि मराठींत सुरवात झालेली आहे. १८५७ सालीं मराठी नाटकांस सुरवात झाल्यापासून पुढील तीन वर्षांत दोन नवीन नाटकें प्रसिद्ध झालीं, व तींहि संस्कृत नाटकांचीं भाषांतरेंच होतीं. तीं 'उत्तररामचरित्र' आणि 'प्रसन्नराघव,' हीं होत. १८६१ ते १८७० या दशकांत २२ नाटकें प्रसिद्ध झालीं असून या कालांतील नाटकें संस्कृत नाटकांचीं भाषांतरें, इंग्रजी नाटकांचीं भाषांतरें, पौराणिक व काल्पनिक अशीं अनेक प्रकारचीं आहेत. यापुढील दशकांत मराठी नाटकांची ही वाढ चालू राहिली. या वेळांत सुमारें ३८ नाटकें लोकांसमोर आलीं. यानंतरचें दशक म्हणजे १८८१–१८९०; हा काळ मराठी नाटकांच्या इतिहासांत विशेष महत्त्वाचा आहे. या दशकांत २०० हून जास्त नाटकें जन्मास आलीं. हीं नाटकें अनेक प्रकारचीं होतीं एवढेंच नव्हे तर, त्यांत प्रहसनांची भर याच वेळीं पडली. तसेंच १८७९ सालीं अवतीर्ण झालेला संगीत नाटकांचा प्रकार १८८० सालीं स्थापन झालेल्या किर्लोस्कर नाटकमंडळीच्या द्वारें लोकप्रसिद्ध व लोकप्रिय झाला. या कालांत मराठींत जितकीं नाटकें झालीं तितकीं यापुढील कोणत्याहि दशकांत आजपर्यंत प्रसिद्ध झालीं नाहींत.

**पाश्चात्त्य नाट्यकलेचा परिणाम.**—विश्वविद्यालयाची स्थापना होऊन महाराष्ट्रांत कॉलेजमध्यें शेक्सपियरादि आंग्ल कवींच्या व कालिदासादि भारतीय संस्कृत कवींच्या नाटकांतील रसास्वाद चाखण्याची संधि जेव्हां आमच्या लोकांस मिळूं लागली, तेव्हां लोकांमध्यें 'नाटकग्रंथ', 'नाटकप्रयोग' वगैरे विषयांसंबंधाची चर्चा सुरू होऊन आमच्यांतील विद्वान लोकांचें लक्ष्य तिकडे लागलें; व कॉलेजांतील विद्यार्थ्यांकडून चांगल्या चांगल्या इंग्रजी आणि संस्कृत नाटकांचे प्रयोगहि होऊं लागले.

यावेळीं मुंबईस इंग्रजी नाटककंपन्या येत असत व त्यांचे इंग्रजी भाषेंत अभिनययुक्त खेळ होत असत. या कंपन्यांची टापटीप, प्रयोग करण्याची पद्धत, त्या त्या पात्रांच्या स्वभावाबद्दल लोकांच्या मनावर ठसा उमटविण्याची त्यांची शैली, हर्ष-शोकादि प्रसंगीं तावडतोब चेहरा बदलण्याची त्यांची हातोटी, मनोविकार व विचार चेहऱ्यावर व्यक्त करण्याचें त्यांचें कसब, इत्यादि नाट्यकलेचीं अनेक अंगें-उपांगें दृष्टीस पडल्यावर आमच्यांतील कित्येक विद्वानांचें तिकडे लक्ष वेधलें व त्यांचें अनुकरणहि ते करूं लागले. याच सुमारास शाकुंतलादि संस्कृत नाटकांचीं इंग्रजी भाषेंत भाषांतरें होऊन यूरोपियन लोकांचें लक्ष आमच्या प्राचीन विद्येकडे लागलें होतें; व आमचे प्राचीन रीतीरिवाज, आचारविचार, स्थिति वगैरे समजून घेण्याकडे त्यांचीहि प्रवृत्ति झाली होती. मुंबईस 'कालिदास एल्फिन्स्टन सोसायटी' या नांवाची मंडळी निघून तिनें शाकुंतल नाटकाचा प्रयोग इंग्रजी भाषेंत केला होता.

नाट्यकलेकडे मुंबईंत नव्या सुशिक्षित विद्वानांचें व कॉलेजांतील प्रौढ विद्यार्थ्यांचें असें लक्ष लागलें होतें तसेंच पुण्यांतील लोकांचें व विद्यार्थ्यांचेंहि लक्ष लागलें होतें व विद्यार्थ्यांनां इंग्रजी नाटकांचें रहस्य समजून देण्याकरितां कॉलेजांत कांहीं यूरोपियन नटहि मुद्दाम बोलवीत असत. पुण्यांत स. १८७२ च्या सुमारास विश्रामबाग हायस्कूलच्या चौकांत त्या शाळेतील विद्यार्थ्यांनीं 'ज्युलिअस सीझर' नामक नाटकाचा प्रयोग इंग्रजी भाषेंत पहिल्यानें केला. यानंतर रा. बाबा गोखले यांच्या शाळेंतील विद्यार्थ्यांनीं 'मर्चंट ऑफ व्हेनिस' या शेक्सपियरच्या नाटकाचा प्रयोग इंग्रजी भाषेंत करून दाखविला. इंग्रजी नाटकांच्या प्रयोगाप्रमाणेंच त्या वेळीं वेणीसंहार, मृच्छकटिक, मुद्राराक्षस, वगैरे संस्कृत नाटकांचेहि प्रयोग या उच्चप्रतीच्या पाठशाळांतून होऊं लागले व त्यांत काम करणारे इसम सुशिक्षित आणि विद्वान असल्यामुळें ते प्रयोगहि मोठ्या बहारीचे होत असत. वेणीसंहार नाटकामध्यें प्रख्यात निबंधमालाकार कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं धर्मराजाची भूमिका घेतली होती. उत्तररामचरितामध्यें कै. वा. शि. आपटे यांनीं सीतेची भूमिका घेतली होती.

आजपर्यंत मराठी भाषेंत बरींच नाटकें झालीं आहेत. पण सर्व काळ लोकांचें मनोरंजन करण्याचें सामर्थ्य बहुतेक नाटकांत नसल्यामुळें, ज्या प्रसंगांनां अनुलक्षून तीं तयार केलेलीं असतात त्यांची आठवण बुजली, म्हणजे हीं नाटकें नामशेष होतात. याचीं उत्तम उदाहरणें, 'तरुणीशिक्षण-नाटिका' व 'संमतिकायद्याचें नाटक' वगैरे. हीं नाटकें लिहिलीं गेलीं त्यावेळीं त्यांनीं मोठी खळबळ उडवून दिली होती. परंतु आज त्यांच्याकडे कोणी ढुंकूनसुद्धां पहात नाहीं.

मराठी नाटकांचे गद्य व संगीत नाटकें असे दोन मुख्य प्रकार आहेत. गद्यनाटककारांमध्यें कीर्तने, शंकर मोरो रानडे, नारायण बापूजी कानिटकर, प्रो. वासुदेवराव केळकर, रा. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर, वासुदेव रंगनाथ शिरवळकर, कै. वासुदेवशास्त्री खरे व रा. नरसिंह चिंतामण केळकर हे प्रमुख आहेत. कै. परशुराम तात्या गोडबोले यानां मराठी नाटककारांत अग्रमान आहे तरी त्यांचीं निव्वळ संस्कृत नाटकांचीं जशींच्या-तशीं भाषांतरें असल्यामुळें त्यांचा विचार येथें केला नाहीं. 'निबंधमाला' कारानीं कीर्तन्यांचीं 'जयपाळ' व 'थोरले माधवराव' हीं नाटकें त्यांच्या वेळेपर्यंत झालेल्या नाटकांत उत्तम ठरविलीं होतीं. परंतु हल्लीं हीं फारशीं प्रसिद्ध व उपलब्ध नाहींत. रा. रानड्यांत लेखनशक्ति व मार्मिकता हे गुण चांगल्या प्रतीचे असून ते चांगल्यापैकीं कवीहि होते. 'नाट्य-कथार्णव' मासिक पुस्तकांतून त्यांचीं पुष्कळ नाटकें प्रसिद्ध झालीं. परंतु त्यांपैकीं रंगभूमीवर येऊन लोकप्रिय अशीं कोणतींच झालीं नाहींत. रा. कानिटकर यांचीं विशेष प्रसिद्ध नाटकें त्यांच्या वेळच्या सामाजिक स्थितीला अनुलक्षून लिहिलेलीं होतीं. त्यांच्या मतानें सामाजिक सुधारणेच्या नांवाखालीं जे अनिष्ट प्रकार सुरू होण्याचा संभव होता, त्यांवर त्यांच्या नाटकांतून खूप कोरडे ओढलेले आहेत. आज निःपक्षपाती बुद्धीनें वाचणाऱ्यांस त्यांत अतिशयोक्तीचा व विपर्यासाचा बराच भाग दिसून येईल. विशिष्ट स्थितींत व संमति वयाचा कायदा, क्रॉफर्ड प्रकरण यांसारख्या विशेष प्रसंगांवर यांचीं नाटकें लिहिलेलीं असल्यामुळें तीं फार दिवस लोकांपुढें राहतीलसें वाटत नाहीं. प्रो. केळकर यानीं इंग्रजींतील बऱ्याच नाटकांचीं व प्रहसनांचीं मराठींत भाषांतरें केलीं आहेत. त्यांत 'त्राटिका' हें अत्यंत लोकप्रिय आहे. रा. वासुदेवराव शिरवळकर यानीं जीं कित्येक स्वतंत्र नाटकें लिहिलीं आहेत त्यांपैकीं 'पानिपतचा मुकाबला', 'राणा भीमदेव', 'श्रीएकनाथ' व 'श्रीतुकाराम' यांचे प्रयोग रंगभूमीवर यशस्वी झाले व होत आहेत. पहिल्या दोन नाटकांत वीर आणि करुणरस व दुसऱ्या दोहोंत भक्तिरस चांगला साधला आहे. 'श्रीएकनाथ' नाटकांत एकनाथ व प्रसंगानुरोधानें येणारीं इतर पात्रें यांच्या मनोवृत्ती स्वाभाविक दाखविल्या असून त्या योग्य भाषेत प्रदर्शित केल्या असल्यामुळें हें नाटक परिमाणकारक झालें आहे.

रा. खाडिलकर व रा. नरसोपंत केळकर हे विद्यमान गद्य-नाटककारांत अग्रणी समजले जातात. रा. खाडिलकरांच्या नाटकांपैकीं 'बायकांचें बंड' व 'प्रेमध्वज' हीं इंग्रजी नाटकांचीं रूपांतरें आहेत. बाकीचीं ऐतिहासिक किंवा पौराणिक आधार घेऊन रचिलेलीं नाटकें आहेत. रा. खाडिलकरांच्या नाटकांतील मुख्य गुण, उत्तम भाषेची योजना व मुख्य मुख्य पात्रांचे विशेष गुण स्पष्टपणें खुलवून दाखविण्याची हातोटी हे आहेत. रा. केळकरांचीं आतांपर्यंत, 'तोतयाचें बंड', 'चंद्रगुप्त', 'अमात्यमाधव' व 'कृष्णार्जुनयुद्ध' वगैरे नाटकें लोकांच्या समोर आलीं आहेत. संविधानकाची जुळणी, मुख्य पात्रांच्या स्वभावांचा परिपोष, भाषापद्धति वगैरे महत्त्वाच्या बाबतींकडे योग्य लक्ष पुरवून यांचीं नाटकें लिहिलेलीं असतात. यामुळें यांची नाट्यविषयक कृति बहुधां निर्दोष असते व लोकोत्तर गुण जरी तींत सांपडले नाहींत तरी तिच्याबद्दल वाचकांचा व प्रेक्षकांचा चांगला ग्रह होतो.

वर येऊन गेलेल्या नाटकांशिवाय रा. वासुदेवशास्त्री खरे यांचीं 'तारामंडळ', 'शिवसंभव' व 'उग्रमंगल', रा. देवल यांचें 'दुर्गा' व रा. भिलवडीकर यांचें 'नरवीर मालुसरे' हीं नाटकेंहि चांगलीं आहेत. शेक्सपियरच्या पुष्कळ नाटकांचीं मराठींत गद्यभाषांतरें झालीं आहेत. त्यांमध्यें अथेल्लो (झुंझारराव), मॅकबेथ (मानाजीराव), हॅम्लेट (विकारविलसित), टेमिंग ऑफ धि श्रयू (त्राटिका), सिंबेलाइन (तारा), व वुइन्टर्स टेल (मोहविलसित) यांचीं अनुक्रमें देवल, परांजपे, आगरकर, केळकर व महाजनी यानीं केलेलीं भाषांतरें विशेष प्रसिद्ध आहेत. रा बेलसरे यानीं शेक्सपियरच्या समग्र नाटकांचीं भाषांतरें तयार करून छापून काढण्याची योजना अंगावर घेतली होती व त्याप्रमाणें त्यांनीं कित्येक नाटकें प्रसिद्धहि केलीं होतीं. परंतु दुर्दैवानें ते मध्यंतरींच वारल्यामुळें तें काम अर्धवटच राहिलें आहे.

मराठी रंगभूमीवर संगीत नाटकें सुरू करण्याचें श्रेय त्रिलोकेकर व रा. किर्लोस्कर या जोडीला दिलें पाहिजे. थोडक्याच अवधींत यांनीं गद्य नाटकांस मागें टाकून पद्य नाटकांस सुरवात केली. त्यांत रा. किर्लोस्कर, रा. डोंगरे, रा. देवल व रा. कोल्हटकर हे प्रमुख होत.

किर्लोस्करांचीं 'सौभद्र', 'शाकुंतल' व 'रामराज्यवियोग' हीं संगीत नाटकें प्रसिद्ध आहेत. रा. डोंगरे यानीं लिहिलेल्या संगीत नाटकांपैकीं 'चंद्रसेना' व 'चंद्रहास' हीं लोकांच्या जास्त परिचयाचीं आहेत. रा. देवलानीं 'विक्रमोर्वशीय', 'मृच्छकटिक', 'शापसंभ्रम' व 'शारदा' अशीं चार संगीत नाटकें लिहिलीं आहेत. 'कादंबरी' सारख्या गुंतागुतीच्या कथानकांतून नाटकाला साजेल असें संविधानक बसविण्यांत देवलानीं पुष्कळ चातुर्य दाखविलें आहे. संस्कृतांतील उत्तम कवींनी रचना पुढें असल्यामुळें 'शापसंभ्रम' व 'मृच्छकटिक'

यांत सरस पद्यांचा भरणा पुष्कळ आहे. परंतु या दोन नाटकांपेक्षां 'शारदा'नाटकामुळें देवलांचें नांव महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं झालें आहे. कवित्वाच्या दृष्टीनेंच पाहिलें असतां या नाटकाची प्रत बरीच खालीं लागेल तथापि नाटकाचा विषय, त्यांतील मनोवेधक संविधानक, शारदा, भुजंगनाथ, भद्रेश्वर दीक्षित, कांचनभट वगैरे पात्रांचे उत्तम रीतीनें रेखाटलेले स्वभाव, यांमुळें 'सौभद्र' शिवाय दुसऱ्या कोणत्याहि संगीत नाटकानें याच्या इतकी लोकप्रियता संपादन केलेली नाहीं.

संगीत नाटककार म्हणून प्रसिद्धीस आलेले चौथे गृहस्थ रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे होत. यांनीं 'वीरतनय', 'गुप्तमंजूष', 'मूकनायक' व 'मतिविकार' इत्यादि संगीत नाटकें रचिलीं आहेत. काव्याला अवश्य असणारी प्रतिभा यांच्या ठिकाणीं पुष्कळ प्रमाणानें वसत आहे. गद्य भाषा लिहिण्याची यांची शैली उत्तम असते. मार्मिक कोटयांवरून त्यांच्या योगानें हास्यरस उत्पन्न करण्याची कलाहि यानां चांगली साधली आहे. परंतु या गुणांबरोबर यांच्या कृतींत कांहीं दोषहि दिसून येतात. क्लिष्ट पद्यरचना व गुंतागुंतीचीं संविधानकें हे त्यांच्यातील दोन ठळक दोष आहेत.

अलीकडे रा. खाडिलकरांनीं गद्यनाटकें लिहिण्याचें सोडून संगीतांत प्रवेश केला आहे. त्यांचीं 'मानापमान','विद्याहरण', 'स्वयंवर' व 'द्रौपदी' हीं संगीत नाटकें आतांपर्यंत रंगभूमीवर येऊन बरींच लोकप्रिय झालीं आहेत. त्यांचीं संगीत नाटकें लोकांस आवडलीं तीं त्यांच्या गद्य नाटकांतहि दिसून येणाऱ्या गुणांमुळें व पदांसाठीं निवडलेल्या गोड चालींमुळें आवडलीं, त्यांच्या कवित्वामुळें नव्हे. रा. खाडिलकरांच्या अंगीं कवि होण्यास अवश्य लागणारे गुण उत्कटपणें वसत आहेत असें दिसत नाहीं. त्यामुळें गद्यरचनेंत चतुर असलेल्या एका लेखकानें कवितादेवीस जबरदस्तीनें अनुकूल करून घेण्याचा यत्न केला आहे असें त्यांच्या पद्यांवरून वाटतें. दुर्बोधतेच्या दोषांत तर त्यांचीं पदें कधीं कधीं कोल्हटकरांच्या पदांवर ताण करतात.

कै. राम गणेश गडकरी हे अलीकडेच नाटककार म्हणून प्रसिद्धीस आले होते. ते अल्पावकाशांत लोकप्रिय झाले असले तरी त्यांच्या नाटकांत कोल्हटकर व खाडिलकर यांच्या गुणावगुणांचा अतिरेक झालेला आहे यांत शंका नाहीं. यांचें 'एकच प्याला' हें संगीत सामाजिक नाटक फारच परिणामकारक व इतर नाटकांपेक्षां चांगलें वठलें आहे.

मराठी नाटकांचें (१) पौराणिक, (२) रोमँटिक (कल्पनारम्य), (३) ऐतिहासिक, (४) सामाजिक व (५) धार्मिक असें वर्गीकरण केल्यास या महत्त्वाच्या शाखांत कितपत भर पडली आहे हें ताबडतोब कळून येईल. एखादें नाटक कोणत्या वर्गांत पडेल हें ठरविणें नेहेमींच सोपें होणार नाहीं. या प्रत्येक शाखेंत कोणतीं नाटकें उच्च दर्जाचीं व महत्त्वाचीं झालीं आहेत हें समजण्याकरितां पुढील वर्गीकरण उपयोगी पडेल.

(१) पौराणिकः—सौभद्र, कृष्णार्जुनयुद्ध, स्वयंवर, विद्याहरण, सत्त्वपरीक्षा, कुंजविहारी, इत्यादि.

(२) रोमँटिकः—शापसंभ्रम, वीरतनय, मूकनायक, गुप्तमंजूष, मानापमान, लीलावती, इत्यादि.

(३) ऐतिहासिक नाटकांत तोतयाचें बंड, सवाईमाधवराव पेशवे, पानिपतचा मुकाबला, शिवसंभव, बेबंदशाही हीं येतील.

(४)सामाजिक नाटकांत शारदा, हाच मुलाचा बाप, प्रेमसंन्यास, एकच प्याला, सौभाग्यलक्ष्मी,आशानिराशा इत्यादि.

(५) धार्मिक नाटकें संत सखूबाई, तुकाराम इत्यादिकांस म्हणतां येईल.

नाट्यपरीक्षणः—लोकाभिरुचीस योग्य वळण लावण्याकरितां नाटकग्रंथांचें व प्रयोगांचेंहि योग्य परीक्षण झालें पाहिजे. असल्या टीकात्मक लेखांत रा. ळेले यांची संस्कृत नाटकावरील 'सार व विचार' माला, डॉ. बेलवलकरकृत 'उत्तररामचरित' नाटकाचें परीक्षण, 'तोतयाचें बंड' या नाटकाचें रा. कोल्हटकरकृत परीक्षण, 'नाट्यकलारुक्कुठार' हें पुस्तक,'नाटक्याचे तारे' ही मनोरंजनांतील लेखमाला, हीं पुस्तकें उपयुक्त आहेत.

येथपर्यंत मराठी नाट्याचा इतिहास झाला. आतां त्यासंबंधानें थोडीबहुत तात्त्विक चर्चा केल्यास ती पुढील नाटककारांस बरीच मार्गदर्शक होणार आहे. म्हणून एक एक मुद्दा घेऊन त्यावर थोडें विवेचन केलें आहे.

नाटकांचा हेतुः—ऐतिहासिक नाटकांत एखाद्या ऐतिहासिक चरित्राचें किंवा प्रसंगाचें विशदीकरण करून गतकालाबद्दल अभिमान उत्पन्न करणें, किंवा एखादें ऐतिहासिक प्रमेय लोकांपुढें मांडणें हा हेतु असतो. सामाजिक नाटकांत सामाजिक चालीरीतींनां नवें वळण लावणें हा हेतु असतो. पौराणिक नाटकांत वरीलपैकींच एखादा हेतु किंवा धार्मिक विषयाचें उद्घाटन असतें. केवळ काल्पनिक नाटकांत एखादें नीतितत्त्व सांगण्याचा हेतु असावा. तथापि नैतिक हेतुविरहित असें नाटकहि उत्तम असूं शकेल. नाटकाचा मुख्य हेतु मनोरंजन; तें योग्यमार्गानें होत असल्यास त्या नाटकाला वाङ्मयांत स्थान मिळण्यास हरकत नाहीं.

नाटकांतील काव्य व भाषाः—नाटकांत चांगल्या चांगल्या कल्पना व तदनुकूल भाषा असल्याशिवाय मनोरंजन होणारच नाहीं. स्वतःच्या कल्पना संस्कृतप्रचुर भाषेंत मांडण्याकडे रा. कोल्हटकरांचा आणि जुन्या ऐतिहासिक भाषेमध्यें मांडण्याकडे कै. गडकरी यांचा ओढा विशेष दिसतो; पण त्यामुळें त्यांच्या नाटकांनां दुर्बोधता आली आहे. भारदस्तपणा कायम राखूनहि भाषणांत व पदांत सुबोधता हा भाषेचा गुण शारदा नाटकाइतका इतर ठिकाणीं क्वचित् आढळतो. केवळ काव्यकल्पना सुंदर असल्यानें नाटक प्रयोगदृष्ट्या योग्य ठरतें असें मात्र नाहीं. उदा० शेक्सपियरचें 'मिड्समर नाईटस् ड्रीम' हें उच्च दर्जाचें नाटक प्रयोगदृष्ट्या हीन ठरतें.

शृंगार व विनोदः—नाटक हें संसाराचें चित्र असल्यामुळें संसाराप्रमाणें तें स्त्रीपुरुषमिश्रित असणारच व त्यांत शृंगाराला अजीबात फांटा देणें शक्य नाहीं व योग्यहि नाहीं. 'मुद्राराक्षस' नाटकासारखें शृंगाररसहीन असूनहि लोकरंजनक्षम नाटक क्वचित्. नाटकांत शृंगार हवा हें खरें असलें तरी स्त्रीपुरुषमिश्र अशा प्रेक्षकसमूहाच्या विनयशील स्वभावास धक्का पोहोंचेल असा शृंगार असतां कामा नये. सौभद्रांतील कृष्णरुक्मिणीचा प्रवेश किंवा प्रेमबंधनांतील बाजीराव-मस्तानीचा प्रवेश हे या दृष्टीनें आक्षेपार्ह आहेत. कै. पाटणकर किंवा राणे यांच्या नाटकांतील शृंगारविषयक प्रवेश तर तमाशेवजाच भासतात. पतिपत्नीच्या एकांतांतील पवित्र मानलेले प्रसंग रंगभूमीवर दाखविणें सदभिरुचीस पटत नाहीं. म्हणून उत्तान शृंगारापेक्षां व्यंग्यशृंगार व संभोगश्रृंगारापेक्षां विप्रलंभश्रृंगार योजण्याबद्दलचा संस्कृत नाट्याचार्यांचा नियम मराठी नाटककारांनीं नीट ध्यानांत घ्यावयास पाहिजे. या नियमाचें पालन 'मूकनायकां'तील विक्रांत व सरोजिनी यांच्या बागेंतील भेटीच्या प्रवेशांत किंवा 'मानापमाना' तील भामिनी व धैर्यधर यांच्या चौथ्या अंकांतील प्रवेशांत आणि शाकुंतल व रोमियो आणि जुलियट या नाटकांत पहावयास मिळतें. शृंगाराप्रमाणें हास्यरसहि आवश्यकच गणला पाहिजे. नाटकांचें कार्य जें मनोरंजन तें त्या रसावर बरेंच अवलंबून असतें व शिवाय हॅम्लेट, पुण्यप्रभाव, एकच प्याला, सौभाग्यलक्ष्मी, वगैरे करुण, रौद्र, भयानक रसांनीं युक्त अशा व सर्वच शोकपर्यवसायी नाटकांत प्रेक्षकांच्या मनोवृत्तींवर जो ताण पडतो त्याला विनोदरसाची जोड देण्याशिवाय भागणारच नाहीं. जुन्या नाटकांत विदूषक किंवा मैत्रेय यांची योजना केवळ हास्यरसाकरितांच असे. भाषेंत श्लेष व विनोद घालून हास्यरस आणतां येतो. एकाच शब्दाच्या भिन्न अर्थांमुळें वाक्यार्थांतील चमत्कृति म्हणजे श्लेष आणि पात्रांच्या विरोधात्मक स्थितीनें वैलक्षण्य उत्पन्न होऊन जी चमत्कृति वाटते तो विनोद. श्लेष व विनोद हे दोन्ही अलंकार कोल्हटकर, केळकर, खाडिलकर व गडकरी या चौघां प्रमुख नाटककारांनीं चांगले हस्तगत केले आहेत. तथापि रा. कोल्हटकर व केळकर यांचे श्लेषविनोदाचे प्रसंग जितके निर्दोष असतात तितके बाकीच्या दोघांचे नसतात असें म्हणावें लागतें. हास्यरसाकरितां मैत्रेयासारखा एखाद-दुसऱ्या पात्राऐवजीं अनेक पात्रांच्या तोंडीं श्लेषविनोदयुक्त भाषा घालणें, मुख्य कथानकाशीं संबंध नसणारीं पात्रें निर्माण करणें, इतकेंच नव्हे तर एक उपकथानक मुख्य नाटकाला जोडून देणें असल्या अयुक्त युक्त्या रा. खाडिलकर व कै. गडकरी यांनीं योजल्या आहेत. विद्याहरणांतील शिष्यवर, प्रेमध्वजांतील क्षय व वृद्धि, प्रेमसंन्यासांतील गोकुल, पुण्यप्रभावांतील चार विनोदी पात्रांचें एक उपनाटक या हास्यरसाकरितां केलेल्या युक्त्या गैर आहेत. सत्वपरीक्षा व स्वयंवर या नाटकांतील विनोद एकाच प्रकारचा असल्यामुळें आनंदाऐवजीं कंटाळा उत्पन्न करतो. विचित्रलीलेंतील विचित्र या मुख्य पात्रानेंच स्वभाविक विनोद चांगला साधला आहे. पण 'कन्याराशीवर बसून शुक्राची प्रार्थना कशी करावयाची हें मला शिकवा' असें बाळ्या आपल्या बापास–वर्गभटास म्हणतांना पाहून कवीच्या विनोदाची कींव येते. विनोदाचें उत्तम उदाहरण मृच्छकटिक नाटक व त्यांतील शकार याचें होय. विनोदाच्या बाबतींत वरच्या दर्जाच्या मराठी नाटकांत बायकांचें बंड, मानापमान, शारदा, तोतयाचें बंड, अमात्यमाधव, वधूपरीक्षा, वगैरे नाटकांची गणना होईल.

संगीतः–नाटकांची लोकप्रियता वाढण्याचें संगीत हें एक मुख्य साधन आहे. या अंगाच्या बाबतींत कै. अण्णा किर्लोस्कर यांच्या वेळेपासून आजपर्यंत अनेक प्रकारची क्रांति झालेली आहे. नाटकांतील पद्यासंबंधानें त्यांची संख्या, प्रसंग, चाली व भाषा हे प्रकार महत्वाचे मुद्दे आहेत. प्रथम प्रथम पदांची संख्या फार मोठी म्हणजे शें सव्वाशें असून नाटकप्रयोग ६–७ तास लांबत असे, त्याऐवजी ती संख्या आतां सरासरी ५० पर्यंत उतरली आहे, व प्रयोगाला ४–४॥ तास पुरतात. तसेंच सरसकट सर्व पात्रांच्या तोंडीं पद्यें पूर्वी असत त्याऐवजीं निवडक पात्रांच्या तोंडीं योग्य प्रसंग पाहूनच पद्यें घालण्याकडे नाटककारांचें हल्लीं लक्ष असतें. पद्याला योग्यायोग्य प्रसंग निवडण्यास कवीच्या अंगीं मार्मिकता चांगलीच पाहिजे. पद्यांच्या चाली निवडतांना प्रेक्षकांची संगीताभिज्ञता वाढेल त्याप्रमाणें अधिक लक्ष पुरविणें भाग होत जाणार आहे. पंडित विष्णु दिगंबर म्हणतात कांहीं कांहीं राग ठराविक वेळीं व ठराविक स्थळींच गावयाचे असतात नाहींतर त्यांचें माधुर्य कमी होऊन बेरंग होतो. झिंझोटी, जिल्हा, काफी, पिलू, वगैरे राग जरी वाटेल तेव्हां म्हटले तरी चालतात. तथापि नाटकांच्या आरंभीं व नांदीला ते योग्य नाहींत. प्रारंभ गंभीर व उदात्त पदांनीं केला तर प्रेक्षकांवर छाप पडून नाटकाला रंग येतो. म्हणून अशा वेळीं हंमीर भूप, कल्याण, पूर्वी, यमन, छायानट, असले राग असावेत, व ताल चौताल असावा. नाटकांतील मध्यभागीं केदार, कानडा, शंकरा, मालकौंस, असे राग आणावे. शेवटीं शेवटीं बागेसरी, ललत, बसंत, बिभास असे राग आणावेत. असावरी किंवा मांड ह्या रागांत शृंगारयुक्त पदें नसावींत. शिवाय गायन म्हटलें म्हणजे शृंगार व करुण या दोनच रसांचें पोषक असतें, तर नवरसयुक्त नाटकांत पदांना स्थान कोठें कोठें द्यावयाचें यांची निवड नाटककारांनीं फार बारकाईनें करावयास पाहिजे. पदांची भाषा अत्यंत दुर्बोध म्हणून रा. कोल्हटकरांच्या 'गुप्तमंजूष' वर नाट्यकलारुक्कुठारानें केलेली टीका संगीत नाटककारांस बरीच मार्गदर्शक झाली आहे.

ना ट्य प्र यो ग.—नाटकांच्या रंगभूमीवरील प्रयोगासंबंधानें विचार करणें तो ( १ ) अभिनय, ( २ ) पोषाख, ( ३ ) सीनसीनरी, ( ४ ) नटवर्ग, व ( ५ ) नाटक कंपन्या, या पांच मुद्यांसंबंधी होय.

(१)अभिनयः—याचें शास्त्रीय विवेचन ६ व्या विभागांत ('अभिनय 'पहा ) दिलें आहे. अभिनयासंबंधीं शेक्सपियरनें आपल्या हॅम्लेट या पात्राच्या तोंडीं कांहीं नियम घातले आहेत. अभिनयाकडे पूर्ण लक्ष लागण्याकरितां अगोदर नटाला स्वतःचें बोलणें अगदीं उत्तम पाठ येत असलें पाहिजे. भाषणाची नक्कल नीट पाठ नसल्यास पुढें काय म्हणावयाचें इकडे लक्ष गुंतून अभिनयाचा क्षणोक्षणीं खून होतो. आवाज, चेहरा व हातवारे शब्दार्थांनां अनुरूप ठेवणें हीं अभिनयाचीं मुख्य तीन अंगें होत. भाषणाचा योग्य परिणाम प्रेक्षकांवर होण्याकरितां विनाकारण फाजील हातवारे न करतां आवाज व चेहरा यांत योग्य तो फरक करणें ही कला फार अवघड आहे. पाश्चात्त्य कलेंत हातवारे कमी करून आवाज व चेहरा पालटण्याकडे अधिक लक्ष देतात व ती कला कै. गणपतराव जोशी यांनीं पाश्चात्त्य नटांपेक्षांहि अधिक साध्य केली होती. त्यांच्या तोडीचा दुसरा नट मराठी रंगभूमीवर अद्याप चमकला नाहीं. उलटपक्षीं मराठी रंगभूमीवर उच्च दर्जा मिळविलेल्या महाराष्ट्र नाटक मंडळींतहि कांहीं ठळक दोष आढळतात. उच्च मराठी ऐतिहासिक शिवसंभव वगैरे नाटकांत शहाजी सारखीं मुख्य पात्रें आपली सर्व भाषणें तार स्वरांत म्हणतांना आढळतात.

(२)पोषाखः—या बाबतींत 'चित्रकला' ( तेरावा विभाग पृ. १००)या लेखांत दाखविलेल्यापैकीं दोन दोष म्हणजे युगविपर्यास व चालीरीतींचा विपर्यास यांकडे लक्ष दिलें पाहिजे. नाटकाचें कथानक ज्या काळांतलें असेल त्या काळाला अनुरूप असेच पोषाख व नाट्यप्रवेशांतील इतर सर्व वस्तूंची मांडणी असली पाहिजे. तसेंच कथानक ज्या देशांतलें किंवा ज्या लोकसमाजाबद्दलचें असेल त्या समाजाची राहणी, पोषाख व इतर गोष्टी स्टेजवरील मांडणींत प्रतिबिंबित झाल्या पाहिजेत. या तत्त्वानुसार सामाजिक नाटकें स्टेजवर सजविणें सोपें असतें परंतु ऐतिहासिक व पौराणिक नाटकें बसवितांना पोषाखाचा प्रश्न फार अवघड असतो हें खरें.तथापि कित्येक वेळां सारासार विचार व सदभिरुचि यांनां अगदीं फांटा देऊन हास्यकारक किंवा उद्वेगजनक पोषाख केलेले दिसतात. विशेषतः स्त्रीपात्रांच्या वेषांत वैगुण्य फार आढळतें. पुरुषच स्त्रीपार्टें घेतात त्यामुळें मूळ शरीररचनाच सदोष असते. पुरुषांचें शरीर नैसर्गिकच रांठ,कणखर व पिळदार असते.उंची अधिक, हात राकट, स्वर कर्कश, चालण्याची तऱ्हा उलट, याप्रमाणें सर्व स्त्रीवेषाला प्रतिकूल गोष्टी असतात. शिवाय अर्धरंगित शरीर तर फारच चमत्कारिक दिसतें. डोक्यावर नैसर्गिक केंस न वाढवितां टोप बसवितात; ते बेडौल असून त्यांत भांग नसतो व केंस रांठ असतात. चोळया अर्ध्या दंडापर्यंतच ठेवून वर गळा व खांदे उघडेच टाकतात. स्त्रीपात्रांनीं नेसलेलीं लुगडीं एखाद्या काठीला गुंडाळल्यासारखीं दिसतात. पदर फार आंखूड काढल्यामुळें तो ताठ घ्यावा लागतो; चुण्या मुळींच पडत नाहींत त्यामुळें उरोभाग फार स्पष्ट दिसतो. पदर अंगावर नीट राहात नाहीं त्यामुळें वरचेवर सांवरावा लागतो. शिवाय ज्या त्या भूमिकेस साजेसाहि पोषाख नसतो.राणी व दासी या दोघींचीं लुगडीं बहुतेक सारखींच उंची व पायघोळ ओचे सोडून नेसलेलीं असतात. दासीलाहि हिऱ्यामोत्यांचे दागिने, केसांतील गजरे वगैरे एवं श्रीमंती थाट असतो. शारदानाटकांतील इंदिराकाकूला भटीण म्हणून ओळखणें अशक्य पडतें; वगैरे टीका सौ. मथुराबाई द्रविड यांनीं केली आहे.

(३)सीनसीनरीः—ड्रॉप, महाल, जंगल, रस्ता व किल्ला एवढे पांच आवश्यक पडदे होत अशी प्रथमारंभीं समजूत होती. अद्यापहि द्रव्यसामर्थ्याभावीं पुष्कळ मंडळ्या चारपांच पडद्यांवरच सर्व नाटक उरकतात. वास्तविक नटांचें कौशल्य जास्त खुलून दिसावें व रसपरिपोष व्हावा म्हणून देखाव्याची योजना असते, तेव्हां प्रत्येक प्रवेशाला अनुरूप अशी सीनसीनरी व पडदे पाहिजेत. मोठा दरबार भरला असतो तेव्हां व उलटपक्षीं नायिका आपल्या मैत्रिणीशीं हितगुज करीत असते अशा दोन्ही वेळीं मागें ६०।७० सत्तर फूट लांबीचा व मोटमोठ्या खांबांचा दिवाणखाना रंगविलेला एकच पडदा असणें योग्य नाहीं, किंवा चारुदत्ताला सुळी देण्याकरितां नेतेवेळीं सर्व शहरचे लोक त्याला पाहावयास लोटल्यामुळें गर्दी झाली असें वर्णन असतांहि पडद्यावरील सबंध रस्ता ओसाड दाखविणें हास्यास्पद होय. रसपरिपोष योग्य होण्याकरितां पडद्यांनां रंगहि अनुरूप पाहिजेत. करुणशोकरसाच्या प्रसंगीं भस्मी रंगाचे मळकट दिसणारे पडदे प्रेक्षकांच्या मनाला उदासपणा आणण्यास मदत करतील; लालभडक रंगाची रेलचेल केल्यानें बीभत्सरसाला भर येईल; शृंगाररसाच्या वेळीं पडद्याचे शुद्ध पण मृदु रंग विशेष शोभा आणतील; हास्यरसाला चित्रविचित्र रंगांचे व आकृतींचे पडदे मनाच्या वृत्ती उल्हासित करण्यांत मदत करतील; आणि भयानकरस काळ्या रंगानें व अंधुक प्रकाशानें चांगला साधेल. अलीकडे पाश्चात्त्य नाटकगृहांतील कांहीं सीनसीनरी इकडील मोठ्या कंपन्यांतून दाखविली जाते पण तिला फार खर्च येतो.एखाद-दुसरा ' कट्सीन ' करण्यानें स्वाभाविकता दिसून न येतां उलट नाटकांतील रहस्याविषयीं आदर कमी होतो. वाटेल तेव्हां भपकेदार सीन दाखविणें चांगलें नाहीं.प्रसंग ओळखून व इतर प्रवेशांनां अनुसरूनच याची योजना झाली पाहिजे.

(४)नटवर्गः—इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका या देशांत नाटककंपन्यांत चांगले सुशिक्षित लोक असून कित्येक कंपन्यांचे चालक स्वतः चांगले नट असतात, इतकेंच नव्हे तर ते नाटककर्तेहि असतात. नाटक हा सुशिक्षितांचा धंदा आहे हें तत्त्व अद्याप आपल्याकडे पटलेलें नाहीं. पुष्कळ कंपन्यांत

अशिक्षित नटच बहुतेक असतात आणि केवळ रूप किंवा आवाज अशा गुणांवर पैसे मिळूं लागतांच त्यांपैकीं पुष्कळसे दुर्व्यसनीहि बनतात. स्त्रीवेष घेतलेला पाहूं नये अशी जुनी धार्मिक समजूत असल्यामुळें नाटकें पहावीं कीं नाहीं असा वाद १८८०-९० च्या सुमारास चांगल्या विद्वान मंडळींत माजलेला होता. शिवाय नटवर्गांचें सामान्यतः आढळणारें दुर्वर्तन नाटकी धंद्याला अद्यापि कमीपणा आणण्यास कारणीभूत झालेलें आहे. तथापि सुशिक्षण व सद्वर्तन या दोन्ही बाबतींत अलीकडे नाटकमंडळ्यांत सुधारणा होत आहे. नाटकांत स्त्रिया असाव्या कीं नाहीं हाहि एक महत्त्वाचा प्रश्न आपल्याकडे उपस्थित झाला आहे. कांहीं महाराष्ट्रीय व पारशी नाटकमंडळ्यांत व बंगाल्यांत स्त्रिया नाटकांत कामें करतात. कलेच्या दृष्टीनें पाहतां स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीं केल्यास चांगल्या वठतील हें उघड आहे. उलटपक्षीं पुरुषांनीं स्त्रीवेष घ्यावयाला प्रौढपणा न आलेलीं मुलेंच निवडतात, तेव्हां अल्प वय व अनुभवशून्यता या दोन कारणांमुळें स्त्रीभूमिकेस लागणारी शारीरिक व मानसिक सिद्धता पुरुषवर्गीय नटांच्या अंगीं मुळींच नसते. त्यामुळें बेडौल अभिनय व कर्कश आवाज हे मुख्य दोष पुष्कळ स्त्रीपार्टांत आढळतात. तात्पर्य स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीं करणें हें केवळ पाश्चात्यांचें अंधानुकरण नसून नाट्यकलेच्या वाढीचें एक स्वरूप आहे. प्राचीन व अर्वाचीन दोन्ही प्रकारच्या संस्कृतींवरून पाहतां नाट्यकलेच्या विकासास ही अवस्था आल्यावांचून रहाणार नाहीं असें म्हणावें लागतें. प्राचीन भारतीय नाट्यग्रंथांवरून पाहतां आपल्याकडे नाटकांतील स्त्रियांच्या भूमिका अप्सरांनीं करण्याची चाल शिष्टसंमत होती हें उघड आहे. पाश्चात्त्य देशांतहि शेक्सपियरच्या वेळीं स्त्रियांच्या भूमिका पुरुष करीत असत असें हॅम्लेट नाटकावरून दिसतें; पण पुढें दुसऱ्या चार्लस राजाच्या वेळेपासून नाटकांत स्त्रिया कामें करूं लागल्या; इतकेंच नव्हे तर आज अशा स्त्रियांशीं अमीर-उमराव व बडे लोकहि लग्नें लावतात. तथापि पाश्चात्त्य समाजरचना आणि आपल्या इकडील समाजरचना यांत फार अंतर आहे. तिकडे स्त्रियांनीं पुरुषांबरोबर समाजांत हिंडणें, फिरणें, बोलणें, बसणें रूढ असल्यामुळें उभयतांतील भीड मोडून केवळ सान्निध्यानें किंवा अंगस्पर्शानें उत्पन्न होण्याऱ्या मनोवृत्ती बोथट झालेल्या असतात. आमच्याकडे तशी स्थिति नसल्यानें नाटकांत स्त्रिया असण्यापासून नैतिक दृष्ट्या अनिष्ट परिणाम होतात. तेव्हां अशी स्थिति असल्यामुळें कुलीन स्त्रियांची जोड रंगभूमीला मिळणें दुरापास्त आहे. शिवाय नाटकाचा धंदा हा नयनमनोहर रूप, कर्णमधुर स्वर, उज्वल रमणीय देखावे इत्यादिकांमुळें जात्याच वृत्तिचांचल्यास इतका अनुकूल असतो कीं, नाटकमंडळ्यांतील नटांची नीतिमत्ता अढळ राहणें फार कठिण आहे. पाश्चात्त्य देशांतहि जॉनसनसारख्या तत्त्ववेत्त्यांनीं रंगपटांत आपली वृत्ति रंगेल झाल्याबद्दल कबुली दिली आहे. मग आपल्याकडे नाट्यमंडळी स्त्रीपुरुषमिश्रित असल्यास काय अनिष्ट परिणाम होतील त्याची सहज कल्पना येईल. तात्पर्य, कुलीन स्त्रिया या धंद्यांत शिरण्याचा संभव दिसत नाहींत. तथापि गीत व नृत्य करणाऱ्या स्त्रियांचे कांहीं विवक्षित वर्ग आपल्याकडे असून वेश्याव्यवसायांतीतील स्त्रिया आज नाटकाचा धंदा बंगालकडे करूं लागल्या आहेत. पण अशा अनिष्ट पूर्वचारित्र्याच्या स्त्रियांनीं स्टेजवर सभ्य स्त्रीपुरुषापुढें व विद्यार्थ्यांपुढें कामें करून प्रशंसा मिळवावी ही गोष्टहि अनिष्टच आहे. मूळ वेश्याव्यवसायांतल्या स्त्रियांची सार्वजनिक रीत्या वर्तमानपत्रादिकांतून त्यांच्या स्टेजवरील कामाबद्दल स्तुति होणें ही गोष्ट प्रथम नैतिकदृष्ट्या अनिष्ट आहे. मग स्टेजवर गायनाभिनयादिकांमुळें या तरुण स्त्रिया तरुण प्रेक्षकांच्या मनावर काय अनिष्ट परिणाम करीत असतील त्याची कल्पना सहज होते. तात्पर्य, शरीरविक्रया सोडून नाट्यव्यवसायानें उपजीविका करणें वेश्यांच्या दृष्टीनें इष्ट असलें तरी सामाजिक दृष्ट्या तें अनिष्टच आहे, अशी टीका मॉडर्न रिव्ह्यूच्या संपादकानीं केली आहे (आगष्ट, १९२५चा अंक). या वादग्रस्त प्रश्नासंबंधीं शेवटचा मुद्दा असा कीं, नाट्यकलेच्या दृष्टीनें पाहिलें तरी स्त्रियांनीं स्त्रियांची भूमिका करण्यापेक्षां पुरुषांनींच स्त्रीवेष घेऊन हुबेहुब स्त्रियांप्रमाणें भाषण–अभिनयादि करून दाखविणें यांत अधिक चातुर्य व स्वारस्य आहे, आणि स्त्रीपार्ट करण्यांत सर्व बाबतींत खुद्द स्त्रियांवरहि ताण करणारे बालगंधर्वासारखे पुरुषनट महाराष्ट्र रंगभूमीला लाभले आहेत.

(५) नाटकमंडळ्याः—नाटकमंडळी उभारून ती चालविणें हें मोठ्या खर्चाचें काम असल्यामुळें 'उत्पद्यंते विलीयंते' अशी आजवर अनेक कंपन्यांची स्थिति झाली आहे. गेल्या ४०।५० वर्षांत स्थापन होऊन बुडालेल्या नाटककंपन्यांची संख्या साठ–सत्तराहून अधिक आहे, आणि सांप्रत चालू असलेल्या वीस-तीस कंपन्यांपैकीं चिरस्थायिकत्व निम्यामध्यें तरी आहे कीं नाहीं ही शंकाच आहे. एखाद्या संस्थानिकाच्या आश्रयाखालीं कंपनी काढणें व चालविणें ही एक रूढी पडत चालली आहे, आणि नाटकमंडळी अनेक कलांचें संवर्धन करीत असल्यामुळें तिला आश्रयाखालीं घेणें यांत कमीपणा कांहींच नाहीं. तथापि स्वतःचा पैसा योग्य कार्यीं लागावा आणि कंपनींत सुशिक्षित, निर्व्यसनी व प्रतिष्ठित इसम राहून त्यांनीं नाट्यकलेचा उत्कर्ष करावा, ह्यावरहि देखरेख संस्थानिकांनीं ठेवणें अवश्य आहे. बऱ्या संस्थानिकांच्या आश्रयानें चाललेल्या कंपन्यांतहि अंतःकलह माजून त्यांची वरचेवर शकलें व्हावीं किंवा त्या अजीबात नष्ट व्हाव्या ही गोष्ट उभयतांसहि भूषणावह नाहीं. या धंद्याच्या बाबतींत अखेर पाश्चात्त्य वळण म्हणजे कंपन्या बनवून सर्वांनीं एकत्र राहाण्याचें बंद करून निरनिराळ्या स्वतंत्रपणें राहिलेल्या धंदेवाईक नटांनां फक्त नाट्यप्रयोगापुरते एकत्र आणून धंदा चालविण्याची रीत सुरू होईल कीं नाहीं हें आज निश्चित सांगतां येत नाहीं. मात्र यामुळें तंटाभांडणें व फाटाफूट

इत्यादि प्रसंग टळतील आणि घरोघर संसारांत राहिल्यानें नटांची नीतिमत्ता वरी राहील. असें असल्यामुळें धंद्याच्या उन्नतींतील ती पुढील पायरी आहे व ती गांठणें योग्य आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. यामुळें आणखीहि एक फायदा होणार आहे. नाटयव्यवसायांतून नंतर कीर्तन व्यवसायांत पडणारे इसम सांप्रत आढळतात आणि भाषण-गायनादिकांचा चांगला सराव असल्यामुळें असे इसम तो अत्यंत पवित्र धंदा आकर्षक रीतीनेंहि चालवूं शकतात. पण या धंद्याच्या उच्च पावित्र्यास अनुरूप असें कीर्तनकारांचें पूर्वचारित्र्य उज्वल पाहिजे व तें असल्यास वरीलप्रमाणें व्यवसायांतर करण्यास हरकत नाहीं.

उपसंहार.—संशोधकांस भारतीय नाट्यकलेचें अस्तित्व कौरवपांडव व रामरावण काळापर्यंत म्हणजे ख्रि. पू. दोन-तीन हजार वर्षांपर्यंत अनुमानितां येतें. तथापि शूद्रक, कालिदास, वगैरे उपलब्ध असलेल्या आद्य नाटककारांच्या कृती ख्रिस्ती शकारंभाच्या सुमाराच्या आहेत. त्याच्या पूर्वीचीं नाटकें उपलब्ध नाहींत. ख्रिस्तोत्तर नवव्या शतकापासून मराठी भाषा चांगली रूढ झालेली दिसते. तथापि ब्रिटिश अमदानीपूर्वीचे मराठींतले नाटकग्रंथ उपलब्ध नाहींत. संस्कृत नाटकांची परंपरा आजपर्यंत चालू होती असें १९ व्या शतकांतील मिथ्याज्ञानविडंबन(१८९२),आनंदचंद्रोदय ( १८४९), महिसुरि शांतीश्वर प्रतिष्ठा (१८९२)या नाटकावरून व त्याहून अर्वाचीन म्हणजे इंग्रजी अमदानींतील २० व्या शतकांतील बिंदुमाधवकृत कंपनीप्रतापमंडल, मुडुंब नृसिंहकृत नृसिंहाश्रमीय नाटक इत्यादि नाटकांवरून दिसून येतें. मराठी नाटकांतील 'लक्ष्मीनारायणविवाह' हें एकच कायतें १७ व्या शतकांतील नाटक उपलब्ध आहे. तात्पर्य, संस्कृत व मराठी मिळून नाटकग्रंथांची परंपरा दोन हजार वर्षांची आहे. ब्रिटिश अमदानींत पाश्चात्त्य कलेच्या परिचयानें महाराष्ट्रीय नाट्यक्षेत्रांत जी भर पडून उन्नति झाली ती अभूतपूर्व आहे यांत शंका नाहीं. नाट्यशास्त्र व कला या दोन्ही अंगांची म्हणजे नाटकग्रंथ, नाटयटीकाग्रंथ, नाटकगृहें, पोषाख, सीनसीनरी, अभिनय, गायन, वगैरे सर्वांची गेल्या ४०-५० वर्षांत महाराष्ट्रीयांनीं जी सुधारणा केली आहे ती चिरपूर्वकालापेक्षां व सांप्रतच्या इतर भारतीय प्रांतांपेक्षां सरस आहे. गद्य नाटकांत खाडिलकर, गडकरी, केळकर, खरे,इ. संगीत नाटकांत देवल, कोल्हटकर, खाडिलकर, इ. अभिनयांत गणपतराव जोशी, प्रधान, भागवत, बोंडस, बालगंधर्व; गायनांत वाघोलीकर, नाटेकर, भाऊराव कोल्हटकर, बालगंधर्व, केशवराव भोसले, सरनाईक; पोषाख व सीनसीनरींत किर्लोस्कर, महाराष्ट्र, गंधर्व, या कंपन्या; यांनीं जें अग्रस्थान मिळविलें आहे तें कौतुकाभिमानास्पद आहे. व या सर्वांच्या प्रगतीचें श्रेय रंगभूमी व नाट्यकला मासिकें; महाराष्ट्रीय नाट्यसंमेलनें; न कै. अ. वा. वरवे, शं. बा. मुजुमदार व इतर सुशिक्षित नट, नाटककार व टीकाकार यांच्या निर्भीड, विद्वत्तापूर्ण व सुविचारपरिप्लुत चर्चेस आहे.

तथापि पाश्चात्त्य देशांत नाट्यकलासंवर्धनार्थ जितक्या संस्था आहेत त्यांच्या अल्पांशानेंहि इकडे तशा संस्था नाहींत, असें दुःखानें म्हणावें लागतें. यूरोपअमेरिकेंत कशा प्रकारच्या नाट्यविषयक संस्था आहेत हें पुढील यादीवरून दिसून येईल.

पाश्चात्त्यांतील नाट्यविषयक संस्थाः—आपल्याकडे अद्याप नाट्यविषयाच्या सुधारणेला किती वाव आहे ही गोष्ट लक्षांत येण्याकरितां पाश्चात्त्यांच्या अशा संस्थांची त्रोटक माहिती पाहिजे. लंडन शहरांत पुढील नाट्यकलाविषयक संस्था आहेत. ( १ ) 'ॲक्टर्स असोसिएशन' ( नटवर्गीयांची संस्था), ही नाट्यकलेसंबंधानें कायदेकानू व इतर सरकारी कामें यांकडे लक्ष देते. ( २ ) 'दि थिएटर्स अलायन्स, ही नाटकगृहांचे व्यवस्थापक व मालक यांची संस्था असून एकमेकांच्या हिताविषयीं विचार करून एकवाक्यतेनें कायद्याच्या अडचणीचे प्रश्न सोडवते व एकमेकांस प्रोत्साहन देते. (३) 'ट्रॅव्हलिंग थिएटर मॅनेजर्स असोसिएशन', ही ज्या नाटकमंडळयांबरोबर प्रवासांत नेण्यासारखीं नाटकगृहें (पोर्टेबल थिएटर्स) असतात त्यांच्या मॅनेजरांची व मालकांची संस्था आहे. हक्क विकत घेतलेल्या नाटकांचे प्रयोग चोरून केले जाऊ नयेत यासंबंधानें हक्कसंरक्षण करण्याचें कामहि ही संस्था करते. (४) 'दि सोसायटी ऑफ ऑथर्स', ही ग्रंथकारांची संस्था असून तिचीच एक ड्रामॅटिक सब-कमिटी आहे. ती नाटककारांच्या प्रयोगाचे हक्क (कॉपी राईट), संविधानकासंबंधीं हक्क व सिनेमाटोग्राफकरितां चित्रें घ्यावीं लागतात तत्संबंधीं प्रश्न यांचा विचार करते. या संस्थेंतील एका नाटककाराच्या नाटकावर कादंबरी रचून ती आपल्या वर्तमानपत्रांत प्रसिद्ध केल्याबद्दल अमेरिकेंतील एका वर्तमानपत्रकारापासून या संस्थेनें नुकसानी भरून घेतली. हिंदुस्थानांत इंग्रजी नाटकांच्या आधारें जीं नाटकें होत आहेत त्यांकडेहि या संस्थेचें लक्ष आहे. (५) प्ले प्रोड्यूसिंग सोसायटी ( नवीं नाटकें लिहून तीं रंगभूमीवर आणणाऱ्या संस्था )–दि इंग्लिश प्लेसोसायटी, दि ड्रामा सोसायटी, दि मॉरॅलिटी प्ले सोसायटी, दि जर्मन थिएटर कंपनी ( जर्मन मार्षेतल्या उत्तम नाटकांची इंग्लिश समाजास ओळख करून देणारी संस्था ), एलिझाबेथन स्टेज सोसायटी, स्टॉकपार्ट गॅरिक सोसायटी, दि व्यूरी स्टेज सोसायटी वगैरे संस्था ( ६ ) 'थिएट्रिकल क्लब' म्हणजे नाट्यविषयक समाज; यांतील दि ग्रीन रूम क्लब, दि रीहर्सल क्लब, दि ॲक्टर्स सोर्ड क्लब, दि गॅरिक क्लब, दि सॅव्हेज क्लब वगैरे क्लब, नाट्यकलाविषयक चित्रांचा व वस्तूंचा संग्रह करतात. 'ॲक्टर्स चर्च यूनियन' ही संस्था धर्मोपदेशकांच्या वर्गांतले जे लोक नाटकधंद्यांत गुंतले असतात त्यांना शिक्षण देते. (७) 'थिएट्रिकल लेडीज गिल्ड' ही नाटकधंद्यांतील स्त्रियांस मदत करणारी संस्था आहे. (८)

ॲक्ट्रेसेस फ्रांचाइज लीग व वीमेन रायटर्स सफ्रेज लीग या संस्था नटस्त्रियांनां व लेखकस्त्रियांनां मतदानाचा हक्क मिळविण्यासाठीं खटपट करतात. (९) अकॅडमी ऑफ ड्रामॅटिक आर्ट या संस्थेंत नाट्यकलेचें शिक्षण दिलें जातें. (१०) प्ले गोअर्स क्लब म्हणजे प्रेक्षकांचे क्लब:हे अनेक असून त्यांचे उद्देश नाटकांवर टीकात्मक चर्चा करणें, नटांचा गौरव करणें वगैरे असतात. त्यांत 'ग्यालरी फर्स्ट नायटर्स क्लब' नांवाच्या क्लबांत नाटकाचा पहिला प्रयोग ग्यालरींत बसून व पैसे देऊन पाहणारे लोक असून फुकट नाटकें पाहून भिडस्त अभिप्राय देणाऱ्यांचा ते निषेध करतात. (११) 'ॲक्टर्स बेनेव्होलंट फंड, ॲक्टर्स ऑर्फेनेज फंड, रॉयल जनरल थिएट्रिकल फंड, वगैरे नाट्यकलापोषक संस्था आहेत.

मराठी काव्यवाङ्मयाप्रमाणें मराठी नाट्यवाङ्मयालाहि जागतिक वाङ्मयांत स्थान अद्याप मिळण्यासारखी स्थिति आली नाहीं असें म्हणावें लागतें. कारण शेक्सपियरकृत हॅम्लेटमॅकबेथच्या किंवा कालिदासकृत शाकुंतलच्या तोडीचीं नाटकें मराठींत(सौभद्र सोडून)अद्याप झालीं नाहींत. वास्तविक मद्यपान, द्यूत, परस्त्री-अभिलाष, राज्यतृष्णा, स्वातंत्र्यप्राप्ति, स्वातंत्र्यसंरक्षण, धर्मांतर, पतितोन्नति, वरनिर्णय, वधूनिर्णय, विजोडदांपत्य ( वय, विद्या किंवा धन यांच्या विषमतेमुळें बनलेलें ), अपत्यप्रेम, वगैरे विषय अखिल मानवसमाजाला जिव्हाळ्याचे असल्यामुळें एतद्विषयक नाट्यकृति उत्कृष्ट असल्यास ती कोणत्याहि भाषेंतील असली तरी जगमान्य होण्यास हरकत नाहीं. वरीलपैकीं निरनिराळ्या विषयांवर मराठींत नाटकें झालीं आहेत. पण मद्यपानविषयक ( खाडिलकरांच्या विद्याहरणांत तो विषय गौण असल्यामुळें तें विचारार्हच नाहीं ) गडकऱ्यांचें 'एकच प्याला' हें नवव्यास ताळ्यावर आणण्याच्या कामीं कांहीं एक न करणारी दारूबाजाची स्त्री, तळीरामाचा बेसूर विनोद, उपदेशांचीं लांबलचक चऱ्हाटीं, इत्यादि दोषांमुळें; द्यूतविषयक खाडिलकरांचें 'द्रौपदी' हें विकृत स्वरूपांत पौराणिक पात्रांनां बसविल्याच्या दोषामुळें; परस्त्रीअभिलाषपर गडकऱ्यांचें 'पुण्यप्रभाव' हें आर्य स्त्रीच्या पातिव्रत्याच्या कल्पनांची परकीयांच्या दृष्टीनें बेसुमार झालेली ओढाताण, इत्यादि दोषांमुळें बरींच वरच्यासारखीं प्रमुख नाटकेंहि जागतिक दर्जा पटकवण्यास लायक ठरणार नाहींत. दत्तक, विधवाविवाहबंदी, हुंडा, वगैरे हिंदु समाजाच्या विशिष्ट चाली इतर देशांतील व धर्मांतील लोकांत नसल्यामुळें सदर विषयांस वाहिलेलीं मायेचापूत, सौभाग्यलक्ष्मी, ह्याच मुलाचा बाप वगैरे नाटकांस जागतिक कीर्तीची आशा नाहीं. मराठी नाटकांचें सूक्ष्मावलोकन केल्यास हॅम्लेट, मॅकबेथ व त्याची स्त्री इत्यादिकांप्रमाणें पात्रांच्या मनोवृत्तींचें संभाषणद्वारां किंवा आत्मगतभाषणद्वारां अखिल मानवजातीला उद्बोधक होईल असें एकच प्यालांतील सुधाकरासारखें चित्र रेखाटण्याच्या प्रयत्नांत मराठी नाटककारांनां कांहींसें यश आलेलें आढळतें. तथापि सर्वांगसुंदर व जगमान्य होण्यालायक असें नाटक मराठींत अजून व्हावयाचेंच आहे असें तौलनिक नाट्यवाङ्मयाभ्यासकास वाटणार नाहीं. मराठी नाटकांवर मध्यम वर्गाच्या मनोवृत्तीचा पगडा विशेष बसल्यामुळें सर्वजनसमूहास तीं तितकीं चित्ताकर्षक वाटत नाहींत पण तीं नैतिक दृष्ट्या इतर नाटकांपेक्षां बरींच उच्च दर्जाचीं ठरतात.

इतर पौर्वात्य व पाश्चात्य भाषांतील नाटकांचें विवेचन त्या त्या वाङ्मयाखालीं दिलेलें आढळेल; उदा. इंग्रजी वाङ्मय, जर्मन वाङ्मय, इत्यादि.

[संदर्भग्रंथ, सामान्यः—आरिस्टॉटल—पोएटिक्स लंडन १८९५ ); एल्. कॅम्बेल—ट्रॅजिक ड्रामा इन एस्थिलस, सोफोक्लीस ॲंड शेक्सपियर ( लंडन १९०४ ); डब्ल्यू. एल्. कोर्टने—दि आयडिया ऑफ ट्रॅजडी इन एन्शन्ट ॲंड मॉडर्न ड्रामा (वेस्टमिन्स्टर १९००); जे. ड्रायडन—एसे ऑफ ड्रामॅटिक पोएसी; जी. एच्. लेवेस—ऑन ॲक्टर्स ॲंड आर्ट ऑफ ॲक्टिंग (लंडन १८७५); सर टी. मार्टिन—एसेज ऑन ड्रामा ( लंडन १८७४ ); के. मॅन्टझियस—हिस्टरी ऑफ थिएट्रिकल आर्ट इन एन्शन्ट ॲंड मॉडर्न, भाषांतर एन्. व्हॉन कोसेलचें ( लंडन १९०३ ); जी. मेरेडिथ—एसे ऑन कॉमेडी ( वेस्टमिन्स्टर १८९७ ); ए. डब्ल्यू. व्हॉन श्लेगेल—लेक्चर्स ऑन ड्रामॅटिक आर्ट ॲंड लिटरेचर ( इंग्रजी भाषांतर, लंडन १८४६ ), सर डब्ल्यू. स्कॉट—एसेस ऑन शिव्हलरी, रोमान्स ॲंड दि ड्रामा; डब्ल्यू. डेव्हनपोर्ट आडॅम्स—ए डिक्शनरी ऑफ दि ड्रामा.

इंग्रजीः—कोलीयर—हिस्टरी ऑफ इंग्लिश ड्रामॅटिक पोएट्री (१८७९ ); डिबडिन—ए कंप्लीट हिस्टरी ऑफ दि इंग्लिश स्टेज (लंडन १८००); डब्ल्यू. सी. हॅझ्लिट—ड्रामॅटिस्टस् ऑफ दि रेस्टोरेशन, अर्लि इंग्लिश ड्रामॅटिस्टस्, दि इंग्लिश ड्रामा ॲंड स्टेज अंडर दि टयूडर ॲंड स्टुअर्ट प्रिन्सेस; एल्. एन्. चेस—दि इंग्लिश हिरॉइक प्ले ( न्यूयॉर्क १९०३ ); डब्ल्यू. हॅझ्लिट—ड्रामॅटिक लिटरेचर ऑफ दि एज ऑफ एलिझाबेथ, ए व्ह्यू ऑफ दि स्टेज; डब्ल्यू. निकलसन—दि स्ट्रगल फॉर ए फ्री स्टेज इन लंडन; सी. ए. हेस—मिरॅकल प्लेज ॲंड सेक्रेड ड्रामाज; एट्न—इंग्लिश मिस्टरीज ॲंड मिरॅकल प्लेज ( १८६७ ); एस्. डब्ल्यू. क्लार्क—दि मिरॅकल इन इंग्लंड ( १८९७ ); ए. डब्ल्यू. पोलर्ड—इंग्लिश मिरॅकल प्लेज, मोरॅलिटीज ॲंड इंटरल्यूडस्.

ग्रीक-रोमन ( क्लासिकल ):—एल्. व्हिबले—ए कंपॅनियन टु ग्रीक स्टडीज; जे डब्ल्यू. डोनाल्डसन—दि थिएटर ऑफ दि ग्रीक्स( १८६० ); ए. इ. हेच—दि ट्रॅजिक ड्रामा ऑफ दि ग्रीक्स ( १८९६ ); आर. जी. मोल्टन—दि एन्शंट क्लासिकल ड्रामा ( ऑक्सफोर्ड १८९६ ); डब्ल्यू. एस. टयूफेल—हिस्टरी ऑफ रोमन लिटरेचर.

फ्रेंचः—ए. फिलन—दि मॉडर्न फ्रेंच ड्रामा (लंडन १८९८); एफ्. हॉकिन्स—ॲनल्स ऑफ दि फ्रेंच स्टेज( लंडन १८८४ ).

चिनीः—एच. ए.जाईल्स—हिस्टरी ऑफ चाइनीज लिटरेचर ( लंडन १९०१ ).

जपानीः—एफ्. ब्रिंकले-जपान, इट्स हिस्टरी, आर्टस् अँड लिटरेचर ( बोस्टन अँड टोकिओ, १९०१ ).

संस्कृतः-एम्. स्कुयेलर-बिब्लिओग्राफी ऑफ दि संस्कृत ड्रामा ( न्यूयार्क १९०६ ); एच्. एच्. विल्सन-सिलेक्ट स्पेसिमेन्स ऑफ दि थिएटर ऑफ दि हिंदूज; सिल्व्हन लेव्ही--ले थिएटर इंदिआं; स्टीन कानौ-दि हिस्टरी ऑफ इंडियन ड्रामा.

उर्दुः—हिंदुस्थान रिव्ह्यू, फेब्रुवारी १९२२; 'हिंदुस्थानी वाङ्मय' पहा.

मराठीः—श्री. वि. कुळकर्णी--मराठी रंगभूमिः ना. भ. पावगी--भारतीय नाटकशास्त्र व नाट्यकला; रंगभूमि मासिक; फाटक व वर्वे--नाट्यविषयाची सुशिक्षित चर्चा; रा. भि. जोशी-मराठी भाषेची घटना; विविधज्ञानविस्तार; पुस्तक ४८; ल. ज. खरे--मराठी वाङ्मयाची गेल्या शंभर वर्षांतील वाढ; व. ह. पंडितकृत-मराठी नाटकें; विविधज्ञानविस्ताराची निबंधावलि; शं. वा. मुजुमदार-विलायतेंतील नाट्यसंवर्धक संस्था; याशिवाय निरनिराळ्या भाषेंतील वाङ्मयावरील लेख पहा. ]

**नाडगांवडा-नाडगौडा**—नाडू म्हणजे प्रांत अथवा जिल्हा आणि गांवडा ( गौडा ) म्हणजे त्यावरील एक अधिकारी. हा कानडी शब्द आहे. चोलसाम्राज्यांत हे नाडू पुष्कळ होते. सांप्रत कुर्ग प्रांतांत नाडू हा शब्द जिल्ह्यांनां लावलेला आढळतो. नाडगौडा हा अधिकारी महाराष्ट्रांतील देशमुखदेशपांड्यांच्या दर्जाचा असतो. मोकासबाब जी चौथाईंत दाखल केलेली असे, त्या मोकाशांतून एकंदर चौथाईच्या शेंकडा तीन टक्के इतकी रक्कम हक्काबावत या नाडगौडास सरकारांतून मिळे. तिलाच नाडगौडी म्हणत. नाडगौडाचा अधिकार खुद्द छत्रपति देत व तो वाटेल त्याला मिळे व वाटेल तेव्हां काढून घेतां येई; हा हक्क वंशपरंपरेचा नसे. [ एल्फिन्स्टनचा रिपोर्ट. ]

**नाडीव्रणरोग**—शस्त्रवैद्यकांत नाडीव्रण म्हणजे शरीराच्या भागापासून शरीराच्या आंतील एखाद्या पोकळीकडे जाणारा अथवा मार्गाकडे जाणारा अथवा अशा दोन पोकळी अथवा दोन मार्ग एकमेकांशीं विकृत रीतीनें जोडणारा विकृत मार्ग होय. असे विकृत संबंध व मार्ग शरीरास कांहीं इजा किंवा रोग झाल्यामुळें बनतात. शरीराच्या निरनिराळ्या जागीं असे व्रण होण्याचा संभव असल्यामुळें त्या त्या स्थानानुसार त्या व्रणांनां निरनिराळीं नामाभिधानें प्राप्त झालीं आहेत. त्यांतलि कांहीं खालीं देतों.

अ श्रु ना डी व्र ण.—डोळ्यांमध्यें अश्रुपिंडांतून अश्रु वाहून नेणारी नळी असते तिचा वरील भाग जो नाकाच्या मुळाशीं व डोळ्याच्या कोपऱ्यांत असतो तेथें बारीक गळूं होऊन तें फुटतें व मागाहून हा विकृत मार्ग तेथें कायम होऊन त्याच्या छिद्रावाटे अश्रु क्षिरपत असतात.

ला ला ना डी व्र ण.—लालारस वाहून नेण्याच्या नळींतील पोकळींत बारीक गळूं होऊन तें फुटून तेथें बरें झाल्यानंतर अडथळा उत्पन्न करतें व त्याच्या मागें तुंबलेला लालारस गालाच्या मांसाच्या पोकळींत शिरून बाह्य त्वचेंत उतरतो.

गु द ना डी व्र ण उ र्फ भ गं द र.—वरीलप्रमाणें प्रथम गळूं, नंतर मार्गांत अडथळा व शेवटीं व्रण हाच क्रम येथेंहि आढळतो. इतकीं हीं उदाहरणें पहिल्या प्रकारच्या म्हणजे बाह्यत्वचेपासून आंतील पोकळीकडे विकृत मार्ग व संबंध असलेल्या मार्गांचीं म्हणजे व्रणांचीं झालीं. आतां पुढें दुसऱ्या म्हणजे शरीरांतील दोन पोकळींत रोगांमुळें जडलेला विकृत-संबंध जडल्यामुळें होणाऱ्या व्रणाचीं उदाहरणें देतों.

( १ ) गुदमूत्राशय नाडीव्रणः—या व्रणांत मूत्राशय व गुद या दोन पोकळींमध्यें रोगामुळें दळणवळण सुरू होतें. ( २ ) योनिमूत्रमार्गव्रणः—यामध्यें योनिमार्ग व मूत्राशय यांमध्यें जखम पडून दोहोंमध्यें संबंध जडतो. याशिवाय पहिल्या प्रकारच्या नाडीव्रणाचें मूत्रमार्गनाडीव्रण हें एक प्रचारांतील उत्तम उदाहरण आहे.

वि कृ त र च ना.—हा मार्ग सरळ असतो किंवा कधीं नागमोडीसारखा असतो किंवा कधीं वराच पोकळ असतो अगर कधीं अगदींच बारीक असतो.

कारणेंः—वर सांगण्यांत आलेंच आहे कीं रोगामुळें किंवा इजा होऊन अश्रु, लाल, लघवी, नेहमींच्या मार्गानें सुयंत्र निघून जाण्यास मधील अडथळ्यामुळें अडचण होते व हे अश्रू, लाल, लघवी इत्यादि पदार्थ तुंबून रहातात. ते तुंबले म्हणजे तेथें दाह, आग, व्रणोपक्रम होऊन गळूं बनतें व तें एकदां फुटलें म्हणजे त्यांतलि पू पोटांतील इतर भागांत किंवा बाहेरलि त्वचेखालीं नळीवाटे येऊन वाहूं लागतो. व ही नळी अथवा विकृतमार्ग पू कमी झाल्यावर बंद होत नाहीं व त्याचाच पाठीमागून व्रण बनतो. जोंपर्यंत ज्या पोकळींशी अथवा मार्गाशीं व्रणाचा संबंध आहे, त्यांतील पदार्थ त्या व्रणामार्गे जाऊं शकतात तोंपर्यंत तो व्रण बरा होत नाहीं. तो बरा करून व्रणाचें तोंड मिटण्यासाठीं रोगाच्या किंवा जखमेच्या दाहामुळें उत्पन्न झालेला मधील अडथळा शस्त्रानें काढून टाकून त्या पोकळींतील पदार्थ स्वाभाविक मार्गावाटे पूर्ववत वहातील अशी तजवीज करावयाची असते. उदाहरणार्थः—अन्ननलिकेवाटे तुंबलेले अश्रू नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें डोळ्यांच्या कोपऱ्यांतुन नासामार्गांत उतरावेत यासाठीं नासानलिका छेदली पाहिजे. आणि मग तेथील व्रण ( लासूर ) बंद होतो. मूत्रमार्गव्रण अथवा लालामार्ग व्रण झाले असतां याच धोरणावर शस्त्रानें चिरावें लागतें. पण याशिवाय वहुधां तो मार्ग नीट चिरून, उघडून, त्यावर वाढलेलें विकृत कीट पूर्णपणें शस्त्रानें खरवडून घ्यावें लागतें. असें केलें म्हणजे मात्र हा व्रण आमूलतः उत्तम रीतीनें बरा होतो. निव्वळ वर लेप लावून व औषधांत

भिजविलेली वात अगर काकडा घालून हा व्रण बरा होत नाहीं. कधीं कधीं या व्रणाच्या बाह्य छिद्राच्या दोन्ही बाजू साफ कातरून घेऊन ( मागें सांगितलेली शस्त्रक्रिया करून नंतर ) त्या बाजू शिवून टाकितात.

**नाडोर**—एक हिंदु शेतकरी जात. यांची वस्ती मुंबई इलाख्यांत कानडा जिल्ह्यांत आहे. लोकसंख्या सुमारें ७००० आहे. नाडु ( म्हणजे जिल्हा ) या शब्दापासून हें ज्ञातिनाम बनलें असावें. चार शतकांपूर्वी मोगलांच्या छळामुळें आपण कोचीनहून इकडे आलों असें हे लोक सांगतात. यांच्यांत टोकें नाडोर व उप्पुनाडोर असे दोन परस्पर शरीरसंबंध करणारे वर्ग आहेत. शिवाय या जातींत जे १२ 'बली' आहेत ते देवकसंप्रदायी असून लग्नप्रसंगीं यांनां आपल्याहून निराळ्या बलीची नवरी किंवा नवरा पाहावा लागतो. तसेंच आपला जो बली असेल त्याचें झाड किंवा तो प्राणी यांनां न दुखवितां उलट मोठा मान द्यावा लागतो. उदाहरणार्थ, नागबली माणूस नागचाफ्याचें फूल केसांत घालणार नाहीं. भाषा, राहाणी किंवा पोषाख यांत नाडोर लोक हळवक्की वक्कलांसारखे दिसतात. मुलांमुलींचीं लग्नें लहानपणीं होतात. पुनर्विवाह निषिद्ध नसूनहि फारसा रूढ नाहीं. घटस्फोट मान्य आहे. वारसासंबंधीं हिंदु कायदा पाळण्यांत येतो. तिरुपत्तीचा वेंकटराम यांची कुलदेवता आहे. हे गोलिबीर, शांतप्पा, केंगल व इतर ग्रामदेवता यांचीहि उपासना करतात. यांचे उपाध्याय हविग ब्राह्मण आहेत. हे लोक मांस खातात पण दारू पीत नाहींत. हे फक्त ब्राह्मणांच्याच हातचें अन्न खातात [बॉंबे ग्याझोटियर; एन्थोवेन.]

**नाणकशास्त्र**—एकंदर शास्त्रीय वाढीचा आजमितीस विचार करतां नाणकशास्त्र हें नुकतेंच उदयास आलें आहे असें दिसेल; कारण प्राचीन लोकांनीं नाण्यांचे सार्वजनिक संग्रह केले असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं, कदाचित् उत्तम कौशल्याचे नमुने म्हणजे व्यक्तिशः कांहीं लोकांजवळ नाण्यांचा खाजगी संग्रह असण्याचा संभव आहे. नाण्यांचा छोटा संग्रह करण्याचा मान पेट्रार्क यास देण्यांत येतो, आणि त्यावरून पेट्रार्कच्या कालांत प्राचीन नाण्यांबद्दल लोकांची जिज्ञासा उत्पन्न झाली असण्याचा संभव आहे. त्या कालापासून उपलब्ध अशा अनेक नाण्यांसंबंधीं परिश्रमपूर्वक संशोधन करणें हें महत्त्वाचें काम असून त्या बाबतींत शास्त्रज्ञांनीं आजपर्यंत पुष्कळ प्रयत्नहि केले आहेत.

ह्या नाणकशास्त्राचा उपयोग जगाचा इतिहास, त्यांत प्रचलित असलेल्या धर्मसमजुती, निरनिराळ्या लोकांचे आचारविचार, त्यांनीं प्रगल्भ दशेस आणलेल्या विविध कला यांच्या ज्ञानास अत्यंत उपकारक होतो इतकेंच नव्हे तर शिल्पासारख्या कलेचा सांप्रत शास्त्रशुद्ध अभ्यास करूं इच्छिणाऱ्यास देखील ह्या शास्त्राचें महत्त्व फार आहे. निरनिराळ्या ऐतिहासिक युगांत ह्या शिल्पकलेच्या कोणत्या पद्धती प्रचलित असाव्या हें प्राचीन नाण्यांवरून स्पष्ट कळून येऊन पुढेंहि ह्या कलांची वाढ कशी करावयाची याची दिशा कळते. तसेंच सध्यांच्या नाण्यांतील निरनिराळ्या उणीवा काढण्यास ह्या शास्त्राचा उपयोग होणार आहे.

सध्यां उपलब्ध असलेल्या नाण्यांत अत्यंत प्राचीन नाणीं ख्रि. पूर्व सातव्या शतकांत ग्रीक लोकांनीं पाडिलेलीं होत. इ. सनाच्या चौथ्या शतकांत सर्व सुसंस्कृत जगांतील निरनिराळ्या राष्ट्रांत पैशाची देवघेव चालत असून नाण्यांचा प्रसार झाल्याचें सिद्ध झालें आहे.

**व र्गी क र ण प द्ध ति.**—ह्या नाण्यांचें वर्गीकरण करण्याबद्दल कांहीं सर्वसामान्य पद्धति अद्याप निघालेली नाहीं, तरी पण सध्यां ठोकळमानानें ह्या नाण्यांचे तीन वर्ग करण्यांत येतात, तेः—(१) प्राचीन ग्रीक व रोमन नाणीं, (२) मध्ययुगीन व अर्वाचीन कालांतलि नाणीं, व ( ३ ) पौर्वात्य नाणीं. ह्या ठोकळ वर्गांतलि नाण्यांचें त्यांतल्यात्यांतच पोटवर्गीकरण कसें करावयाचें याबद्दल कांहीं नियम ठरलेले नाहींत. परंतु ग्रीक नाण्यांचें वर्गीकरण प्रथम भौगोलिक क्रमानें म्हणजे पश्चिमेकडून पूर्वेकडे प्रांतवार व नगरवार करण्यांत येतें व नंतर कालक्रमानुसार करण्यांत येतें; रोमन नाण्यांचें वर्गीकरण मात्र भौगोलिक क्रम लक्षांत न घेतां केवळ कालक्रमानुसार करण्यांत येतें; मध्ययुगांतलि व अर्वाचीन कालांतील नाण्यांचें वर्गीकरण ग्रीक नाण्यांसारखेंच करण्यांत येतें; पौर्वात्य नाण्यांचें वर्गीकरण ग्रीक नाण्यांसारखेंच परंतु जरा ठोकळ रीतीनें करण्यांत येतें.

### प्राचीन ग्रीक व रोमन नाणीं

या ग्रीक नाण्यांसंबंधानें भौगोलिक क्रमानुरूप वर्णन देण्यापूर्वी त्यांचें सामान्य स्वरूप, प्रमुख संज्ञा, त्याच्यावरील सुबक अक्षरें इत्यादि गोष्टींविषयीं प्रथम विचार केला पाहिजे. या ग्रीक नाण्यांचा काल ख्रि. पूर्व ७०० पासून इ. स. २६८ पर्यंत म्हणजे जवळ जवळ हजार वर्षांचा ठरतो. आकार, घडण व सामान्य स्वरूप ह्या दृष्टीनें वर्गीकरण करूं लागलें तर ह्या नाण्यांचे ( १ ) पुरातन, ( २ ) सामान्य, आणि ( ३ ) ग्रीको-रोमन पद्धतीचीं असे तीन भेद पडतात. पहिल्या वर्गांतील नाणीं रुपें, सोनें किंवा इलेक्ट्रम या धातूंचीं केलेलीं असून दिसण्यांत ओबडधोबड व एका बाजूस कांहीं तरी अक्षरें व दुसऱ्या बाजूस चौकोनी अगर लंबचौकोनी आकाराचा ठसा असलेलीं असतात. दुसऱ्या वर्गांतील नाणीं, सोनें, रुपें, इलेक्ट्रम व कांसें ह्यांचीं केलेलीं असून, पहिल्यापेक्षां बरींच पातळ असतात, व तिसऱ्या प्रकारचीं बहुतेक काशाचीं असून अगदीं सपाट, रुंद परंतु पातळ व पुढील बाजूस रोमन बादशहाचा मुखवटा असलेलीं असतात.

याशिवाय त्यांची पुढीलप्रमाणें आणखी वर्गवारी होतेः—( १ ) नगरराज्यांतील प्रचलित, मुखवटा नसलेलीं, ( २ ) बादशाही मुखवट्यांचीं, ( ३ ) बादशाही, मुखवट्याचा ठसा नसलेलीं अगर असलेलीं ग्रीको--रोमन् बादशाही नाणीं.

ह्यांपैकीं पहिल्या वर्गांतील नाण्यांवरील ठसे पुढील प्रकारचे असतः—(१) एखाद्या विशिष्ट नगरांतील किंवा विशिष्ट लोकांच्या उपास्य देवतेचें मस्तक अगर आकृति, (२) विशिष्ट देवतांस प्रिय समजण्यांत आलेले घुवड, कांसव ह्यांसारखे प्राणी, ऑलिव्हसारख्या वनस्पतींची फांदी, देवतांचीं हत्यारें; (३) स्थानिक नदी किंवा पर्वत यांच्या देवतेचें मस्तक अगर आकृति; (४) एखाद्या कल्पित दैत्याचें अगर देवाचें मस्तक; (५) कल्पित प्राण्यांच्या आकृती; (६) युलिसेस्, टॉरस् ह्यांसारख्या योद्धयांचीं किंवा वंशप्रस्थापकांचीं मस्तकें अगर आकृती; (७) ह्या योद्धयांशीं संबंध असलेले प्राणी अगर पदार्थ; (८) देवतांचीं सुप्रसिद्ध अशीं खरीं किंवा कल्पित पर्वत, टेंकड्या वगैरे निवासस्थानें व (९) सार्वजनिक व धार्मिक उत्सवांचे देखावे, जत्रा वगैरे.

नाण्याच्या पुढील व मागील बाजू निरीक्षण करून त्यांतलि परस्पर संबंध शोधून काढणें हें अत्यंत महत्त्वाचें काम आहे. बहुतेक एकाच नाण्याच्या दोन्ही बाजूंस असलेल्या दोन्ही पदार्थांत कांहीं तरी संबंध आढळून येतो. उदाहरणार्थ, कॅमॅरिन्ना येथील रुप्याच्या " डिड्रॅच " ह्या नाण्याच्या एका बाजूस " हिप्पारिस् " या नदीदेवतेचें मस्तक असून मागलि बाजूस हंसावर बसून पाण्यांतून चाललेली एक तडागदेवता दाखविली आहे. कधीं कधीं नाण्याच्या पुढील बाजूस यावेळीं एखाद्या देवतेचें मस्तक असतें. त्याच्या मागलि बाजूस त्या देवतेचा संबंध असलेले पदार्थ आढळून येतात. उदाहरणार्थ, अथेन्समधील सामान्य 'टेट्रॅड्रॅकम्' या नाण्याच्या पुढील बाजूवर अथेनी देवतेचें मस्तक असून मागील बाजूस त्याच देवतेचा प्रिय असा घुवड पक्षी किंवा ऑलिव्हची खांदी दिसून येते. नाण्यांवरील वीरपुरुषांच्या ठशांमध्येंहि अशाच प्रकारचा संबंध आढळून येतो. निरनिराळ्या राज्यांच्या नाण्यांवर बहुधा स्थानिक माहिती दर्शविणारे ठसे आढळून येतात, ह्याचें कारण तत्कालीन लहान लहान राज्यांचा विस्तार फार नसून कांहीं राज्यांची मर्यादा तर त्या शहरापुरतीच असे.

ह्या बादशाही मुखवट्यांच्या नाण्यांचें निरीक्षण केलें असतां निराळा प्रकार दृष्टीस पडतो. ज्या नाण्यांवर देवतेचे ठसे असतात त्यांवर बराच कालपर्यंत राजे, बादशहा वगैरेंच्या आकृती उमटवीत नसत कारण मनुष्यें व त्यासंबंधीं माहिती नाण्यावर खोदणें अयोग्य आहे अशी तत्कालीन धार्मिक समजूत होती. पुढें राजाला देवाचा अवतार मानून मग त्याची प्रतिमा नाण्यावर घेऊं लागले. उदाहरणार्थ, लिसिमॅकस् येथील नाण्यावरील अलेक्झांडरची आकृति, ही येथें तो झ्यूस् ॲमन ह्या देवतेचा पुत्र म्हणून त्याची आकृति दिली आहे. हा प्रकार पुढें इतका वाढला कीं, ग्रीक साम्राज्याचा मोड झाल्यानंतर निरनिराळ्या वंशांतलि प्रत्येक राजानें आपला मुखवटा नाण्यावर खोदविला. अलेक्झांडरनें निरनिराळ्या ठिकाणच्या नाण्यांतील स्थानिक भेद काढून टाकून सरसकट आपल्या स्वतःच्या बादशाही नाण्यांचा प्रचार सुरू केला. त्याच्या वंशजांनीं हीच पद्धति पुढें चालविली, व अशा नाण्यांत स्थानिक खुणा (शहरांचीं नांवें वगैरे) त्यांच्या मागील बाजूस असतात. ग्रीको-रोमन नाणीं मात्र, रोमन लोकांनीं ग्रीक राज्यांचा पाडाव केल्यावर निरनिराळ्या देशांत भिन्न भिन्न काळीं प्रचारांत आलीं. हीं बहुतेक सर्व कांशाचीं आहेत. ह्यांच्यावर सुप्रसिद्ध पुरुषांचे मुखवटे खोदलेले आहेतच, शिवाय कांहींवर 'आशा, वगैरे देवता कोरलेल्या आढळतात. ह्या वर्गांतलि नाण्यांवरील ठसे तीन प्रकारचे असतातः—(१) होमर कवीसारख्या सुप्रसिद्ध किंवा हिरोडोटस सारख्या अज्ञात विभूतींच्या आकृती; (२) अथेनी देवता आपली दुहेरी सनई वाजवीत आहे हा किंवा असेच दुसरे देखावे, (३) 'आशा' वगैरे देवता. ह्यांखेरीज एक ग्रीको-रोमन नाण्यांचा प्रकार म्हणजे रोमकालीन वसाहतींत प्रचारांत असलेलीं लॅटिन लेखांकित नाणीं होय. ह्याशिवाय सर्व गोष्टींत हीं नाणीं ग्रीक बादशाही नाण्यासारखींच दिसतात.

ह्या ग्रीक नाण्यांचे स्थानभेदानें ३ वर्ग असून त्यांमध्येंहि कित्येक पोटभेद आहेत. 'मध्यग्रीस वर्ग'; हा पहिला असून, त्यांत थ्रेस व मॅसिडोनिया प्रांतांतलि उत्तरेकडील पोटभेदांचा समावेश करण्यांत येत असून 'पेलोपोनेसिस' येथील दक्षिणेकडील आणि क्रीट व सीरेन या दूरच्या ठिकाणचे विशिष्ट पोटभेद समाविष्ट होतात. दुसरा आयोनियन वर्ग; ह्यांत आयोनिया, मायसिया, एओलिस, ऱ्होड्स व केरिआ या प्रांतांतील नाण्यांच्या पोटभेदांचा व शिवाय आशियामायनर, इराण, फिनिशिया, इत्यादि देशांच्या नाण्यांच्या पोटभेदांचाहि समावेश केला जातो. पश्चिम ग्रीस वर्ग; यांत इटाली व सिसिली या दोन देशांतील नाण्यांच्या पोटभेदांचा समावेश होतो.

या वर्गांची कालमर्यादा, इराणी लोकांचा पराजय व अलेक्झांडरचा राज्यस्वीकार या गोष्टींवरून ख्रि. पू. ४८० तें ३३२ च्या दरम्यान नियमित झाली आहे. यापूर्वीची स्थिति बरीच अज्ञात आहे. ह्या प्रत्येक वर्गांतील नाण्यांचा अभ्यास करावयाचा म्हणजे त्या वर्गाचा मूलभूत विशेष काय व मागाहून निरनिराळ्या शिल्पकलाभिज्ञ कारागिरांनीं केलेल्या कार्यांचे त्याजवर काय काय परिणाम झाले हें पाहिलें पाहिजे. मध्यग्रीस या वर्गाचें शिल्पक्षेत्र फार विस्तृत आहे. फीडिअसच्या शिल्पकामाशीं तुलना करतां येण्याजोगे नमुने ह्याच वर्गांत सांपडतात. ह्या वर्गांतील प्रथम प्रथम तयार झालेल्या कामांत एक प्रकारचा साधेपणा व उच्च दर्जाचें आत्मसंयमन दिसून येतें. ह्यानंतर शिल्पकलानिष्णात लोकांच्या शिल्पकामांत उठाव, व उच्च प्रकारचें वैभव दिसून येतें. एखाद्या क्षुल्लक प्राण्याच्या खोदकामांत देखील नमुनेदार सुबकपणा आढळून येतो. यानंतरच्या 'प्रक्झाटेलीस' व 'स्कोप्स' यांच्या

कामांत चित्रकलेचा शिरकाव झाल्याचें दिसतें. आयोनियन वर्गाची सांखळी मात्र इराणच्या अनिष्ट परिणामामुळें थोडी तुटल्यासारखी दिसते, आणि त्यामुळें ह्या कालांत पहिले व शेवटचे नमुनेच उपलब्ध होतात. ह्यांपैकीं फक्त शेवटचीं नाणीं मात्र मध्यप्रसि वर्गातील नाण्यांबरोबर तुलना करण्यालायक आहेत. यांचा विशेष शिल्पकौशल्यांत नसून भावनाविष्करण करण्यांत आहे. याकाळीं हेलॉस या ठिकाणी ज्याप्रमाणें उत्तमोत्तम शिल्पकार जन्मले त्याचप्रमाणें प्रश्चिम आशियामायनर प्रांतांत, रंगकामामध्यें अत्यंत सुप्रसिद्ध अशा पॅालिमाटससारखे पुष्कळ लोक उदयास आले.

पश्चिम वर्गातील नाण्यांची अत्यंत पूर्ण अशी वाढ इटली देशांत झालेली दिसते व ह्या वर्गाचें विशेष स्वरूप सिसिली या बेटांत जास्त एकवटलेलें दिसतें. या वर्गाच्या पूर्वावस्थेंत देखील एक प्रकारचें सौंदर्य व सफाई आणण्याचा प्रयत्न केलेला दिसतो, व इतर वर्ग नामशेष झाले असतां देखील मागाहून बराच कालपर्यंत ह्या वर्गाचा वरील विशेष गुण आढळून येतो. त्याचप्रमाणें योग्य आकार व शेवटची सफाई देणें यासंबंधींचें ज्ञान ह्या वर्गांत पूर्णपणें आढळून येतें. ह्यापैकीं अत्यंत महत्त्वाचा वर्ग म्हणजे 'क्रीटन' होय. या वर्गांतील सर्व काम पूर्ण कलाविकासाच्या वेळीं झालेलें असून त्याच्या शिल्पकामांत एक प्रकारचा जिवंतपणा व स्वतंत्र वातावरण आढळून येतें.

ह्यानंतर एकेलच्या विभागणीप्रमाणें प्रत्येक देशाचीं नाणीं क्रमवारीनें पाहतां प्रथम स्पेन, गॉल व ब्रिटन हे देश येतात. ह्या वर्गातील नाणीं एकाच जातीचीं नसून निरनिराळ्या विशिष्ट गुणांनीं युक्त अशा अनेक पोटभेदाचीं आहेत. ह्या वर्गातील प्राथमिक नाणीं म्हणजे मासिडोनच्या दुसऱ्या फिलिपच्या सोन्याच्या व रुप्याच्या नाण्यांच्या नकलाच होत. ह्यानंतरचीं नाणीं रुप्याच्या रोमन नाण्यांच्या बरहुकूम आहेत.

स्पेनः—गॉल, स्पेन या देशांत, वरील नाण्यांच्या बरोबरीनें वसाहतींतील ग्रीक नाणींहि चालू असलेलीं आढळून येतात. अर्वाचीन स्पेन व पोर्तुगाल देशांशीं जुळणाऱ्या प्राचीन हिस्पॅनिया प्रांतांतील नाण्यांचे सरासरी दोन वर्ग पडतात. पहिला वर्ग प्राचीन असून जास्त प्रचलित असावा. ह्या नाण्यांवरून आयोनिअन लोकांचें समुद्रावरील वर्चस्व सिद्ध होतें. स्पेनमधील कार्थेजी नाणीं वरील नाण्यांच्या वेळींच प्रचलित झालेलीं दिसतात. ऐतिहासिक व भौगोलिक माहितीच्या दृष्टीनें ह्या नाण्यांस फार महत्त्व आलें आहे. हिस्पॅनियाच्या प्रांतिक बादशाही नाण्यांचे दोन वर्ग पडतात. मोठा वर्ग ग्रीक बादशाही नाण्यांचा असून, दुसरा वर्ग रोमन वसाहतींतील नाण्यांचा होता. यांच्या पुढील बाजूस बहुतेक बादशहाचा किंवा बादशाही कुटुंबांतील दुसऱ्या एखाद्या पुरुषाचा मुखवटा आढळतो व मागील बाजूस, बैलांनीं ओढला जाणारा नांगर चालविणारा उपाध्याय किंवा बैल, किंवा एखादें देऊळ वगैरे प्रांतिक जातीचे ठसे मारलेले दिसतात.

गॉल देशः—गॉल देशाचें नाणें त्या देशाचें म्हणण्यापेक्षां तेथील लोकांचें समजावें. ह्या नाण्यांचा उत्तर इटलींतील नाण्यांवर बराच परिणाम झाला. ह्या प्रांतांत चार वर्गांचीं नाणीं आढळून येतात. ह्यांचा कालानुक्रम ठरविला असतां हीं नाणीं मॅसिलीआ (मार्सेलीस) येथील ग्रीक वसाहत, आणि मध्य व पश्चिम यूरोपखंड यांतील लोकांमध्यें चालू होतीं असें दिसतें.

इटलीः—इटलींतील प्राचीन नाणीं ६ व्या शतकाच्या आरंभापासून नंतरच्या ५०० वर्षांच्या पाडलेलीं दिसतात. ह्यापैकीं पुष्कळशीं नाणीं रोमन सत्तेच्या विस्तारापूर्वींचीं आहेत. रोमन सत्तेच्या विस्तारानंतर सर्व इटलीमध्यें रोमन नाणीं सर्रास चालू झालीं. ह्या नाण्यांचे खरीं इटालियन व ग्रीको इटालियन असे दोन वर्ग पाडण्यांत येतात. खरीं इटालियन नाणीं सोनें, रुपें, कांसे यांचीं आहेत. इटालियन नाण्यांवरील शिल्पकला ग्रीक चालीची आहे व लेख लॅटिन व ऑस्कन भाषेंत आहेत. ग्रीको इटालियन वर्गातील नाण्यांमध्येंहि सोन्याचीं,रुप्याचीं व कांशाचीं नाणीं आढळतात. ह्या ठिकाणी एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं इटालियन कांशाचीं नाणीं व ग्रीक रुप्याचीं नाणीं ह्या दोन्हीं प्रकारच्या नाण्यांचा उपयोग सर्वसंमत झाला.

सिसिलीः—सिसिली बेटाचें नाणें ग्रीक असून ख्रि. पूर्व ६ व्या शतकापासून रोमन लोकांनीं तें बेट हस्तगत करून घेईपर्यंत चालू असलेलें दिसून येतें, कारण ह्यानंतर कांहीं थोड्या नगरराज्यांनीं बादशाही किंवा वसाहतींतील नाण्यांचा उपयोग केला आहे. सिसिलीच्या मुख्य नाण्याचें नांव टेरॅंकम ( द्रम्म ) आहे. येथील सर्व प्रकारचीं नाणीं एक प्रकारची उत्तम सफाई व चतुर कारागिरी दिग्दर्शित करतात. ह्या नाण्यांचा एक विशेष असा आहे कीं बहुतेक सर्व नाण्यावर कारागिरांच्या सह्या असून हें कौशल्य जडावकाम करणारांचें दिसतें. ह्या बेटांतील प्रमुख अशा सायराक्यूझ शहरांतील नाण्याविषयीं विचार करतां ह्या ठिकाणी घडून आलेल्या राजकीय उलाढालींवर चांगलाच प्रकाश पडतो.

थ्रेस व मॅसिडोनियाः—थ्रेसमधील नाणीं अत्यंत चित्ताकर्षक आहेत. थ्रेस व मॅसिडोनिआ या ठिकाणींच प्रथम रानटी स्थितींतील जातींनीं खाणींतून काढलेल्या रुप्याचीं नाणीं पाडलेलीं दिसतात. अत्यंत जुनीं नाणीं ख्रि. पू. ५ व्या शतकाच्या आरंभांतील असून, तेथपासून पुढें वरील प्रदेश स्वतंत्र असतांच्या, व नंतर रोमन लोकांच्या हस्तगत झाले असतांच्या, ह्या सर्व काळांतील नाणींहि सांपडलीं आहेत. ह्यापैकीं कांहीं नाणीं उत्तम कौशल्याचीं निदर्शक असून, थ्रेसवरील रोमन सत्तेचा व कांहीं कालपर्यंत मॅसिडोनियन राजांचा इतिहास दिग्दर्शित करतात.

मॅसिडोनियांतील नागरिक व बादशाही अशीं दोन्ही प्रकारचीं नाणीं त्यांतील वैचित्र्य व चित्ताकर्षकता सिद्ध करतात. ह्यांचा आरंभ ख्रि. पू. सहाव्या शतकांत झालेला दिसतो. अत्यंत जुनीं नाणीं रुप्याचीं व कांशाचीं असून ख्रि.पू.४ थ्या शतकाच्या मध्यकालापासून सोन्याचींहि नाणीं दिसून येतात. एकंदर मॅसिडोनियन नाण्यांची तऱ्हा सिसिलियन नाण्यांसारखीच असून बरींच प्राचीन नाणीं फिनेशियन, बाबिलोनियन व ॲटिक पद्धतीचीं दिसतात. ह्यांपैकीं सर्वांत मोठीं नाणीं पहिल्या अलेक्झांडरच्या वेळचीं ( ख्रि. पू. ४९८–४५४ ) असून तीं, एकंदर व्यापारी चळवळीपेक्षां ह्या प्रदेशांतील खनिज संपत्तीची उत्तम साक्ष देतात.

थेसली:–उत्तर ग्रीस, थेसली, एपायरस, कॉर्सीरा, ॲकर्नेनिया व एटोलिया ह्या प्रांतांतील सर्व नाणेपद्धती मूळांत ईजायनेटन असून त्यांच्यावर पश्चिमच्या बाजूस कॉरिंथियन पद्धतीचा व नंतर रोमन पद्धतीचा परिणाम झाला असें म्हणतात. प्राचीन थेसली नाणीं फारच थोडीं आहेत. हीं बहुधा सिसिली व इटली ह्या प्रदेशांतील उत्तम नमुन्यांचीं पण जास्त साधीं आहेत. यावर घोडा व घोडेस्वार यांचे ठसे सर्वसामान्य आढळून येतात. कांहींवर ओक वृक्षाचें शिरोभूषण घातलेलें 'झ्यूस' देवतेचें मस्तक, किंवा युद्ध करीत असलेल्या ॲथेना इटोनिया या देवतेचें चित्र कोरलेलें आढळतें.

बिओशिआ:—बिओशिआमधील नाणीं अलेक्झांडरच्या स्वारीनंतरचीं असून, निरनिराळ्या नगरराष्ट्रांनीं पाडलीं; ह्यांपैकीं प्राचीन नाणीं म्हणजे ख्रि. पू. ६०० ते ५०० च्या दरम्यान पाडलेले 'ड्रॅम्स' होत.

अथेन्सः—अटिकामध्यें अथेन्स येथील नाणकपरंपरेचें वर्चस्व आहे. अथेनियन नाणेपद्धति सोलन यानें अमलांत आणली असून प्रारंभींचे डिड्रॅकम युबोइक धर्तीचे असूनहि अथेनियन नाण्यांच्या प्रसिद्धीमुळें त्यांनांहि ॲटिक हें नांव मिळालें. ह्या नाण्यांवरून ऐतिहासिक माहिति फारच थोडी आढळते, परंतु अथेनियन लोकांनीं आपल्या नाण्यांत जी कृत्रिम प्राचीनता उत्पन्न केली, तिचें कारण अथेन्सचा जगाशीं चाललेला व्यापार हें आहे.

इजायनाः—'इजायना' बेटांतील नाणीं म्हणजे प्रथमचीं खरीं ग्रीक नाणीं अशीं होत. ख्रि. पू. सातव्या शतकापासून ह्यांचा आरंभ आहे. ह्यांपैकीं अत्यंत प्राचीन नाणीं म्हणजे प्राथमिक अवस्थेंतील डिड्रॅकम असून त्यांच्यावर समुद्रकांसवाचें चित्र असतें.

कॉरिंथः—कॉरिंथमध्यें एक मोठी नाणकपरंपरा सांपडते. ह्यांचें वजन ॲटिक नाण्याइतकेंच असून स्वरूप ॲटिक डिड्रॅकमसारखेंच आहे. शिल्पकलेच्या भरभराटीचें युग व उतरतो काळ ह्यांतील बरेंचसें कारागिरीचें काम कॉरिंथमध्यें आढळतें. कॉरिंथ ही एक वसाहत झाल्यावर तेथें एक निराळी नाणकपरंपरा अस्तित्वांत आली.

क्रीटः—क्रीट बेटांतील अत्यंत प्राचीन नाणीं ख्रि. पू. ५०० च्या सुमाराचीं आहेत. ह्यानंतरच्या १०० वर्षांत फारच थोड्या नगरांनीं नाणीं पाडलीं. यानंतर मात्र एकदम नाण्यांची विपुलता आढळते. ह्यांत कांहीं अत्यंत सुंदर तर कांहीं अगदींच रानटी तऱ्हेचीं दिसतात. यांच्यावर स्थानिक विशेष पुष्कळ आहेत. यांवरील मुख्य देवता म्हणजे झ्यूस, हेरा, पोसीडन् वगैरे असून सिसिलीप्रमाणें येथील नाण्यांवर सृष्टिपूजेचे उल्लेख ( विशेषतः वृक्ष ) वारंवार आढळतात. ह्या प्रकारचें शिल्पचातुर्य क्रीटन नाण्यावर जास्त दिसतें.

आशियामायनरः—आशियाखंडांतील नाणकसंप्रदायाचा आरंभ आशियामायनर प्रांतांतील नाण्यापासून होतो. ह्या नाण्यांचे मुख्यतः सरासरीनें मोठमोठे असे तीन वर्ग पाडतात: ( १ ) सोनें व इलेक्ट्रमचीं प्राचीन नाणीं, ( २ ) लीडियन् व ग्रीक नाणीं, ( ३ ) व नंतरचीं इलेक्ट्रम, सोनें व रुपें यांचीं नाणीं. सत्रपांच्या चांदीच्या नाण्यांत इराणी छाप उघड दिसते; ग्रीक नाणीं फक्त पश्चिम किनाऱ्यावरील कांहीं नगरांत चालू होतीं असें दिसतें. परंतु ख्रि. पू. १९० वर्षांच्या सुमारास झालेल्या मॅग्नेशियाच्या स्वारीनंतर जसजसे रोमन लोकांच्या अमलाखालीं एक एक संस्थान जाऊं लागलें व त्या सर्वांचा मिळून एक प्रांत बनला, तसतशी मोठमोठ्या शहरांची स्वशासनसत्ता अगदींच कमी झाली. तथापि ह्या वेळचीं असंख्य बादशाही नाणीं प्राचीन ग्रीक नाण्यांच्या धर्तीवर असून पुराणकथाभ्यासास उत्कृष्ट अशीं आहेत. त्यांपैकीं जुनें नाणें लीडिया प्रांतांतील इलेक्ट्रम असून ह्याचा प्रचार ख्रि. पू. ७ व्या शतकापासून सुरू झाल्याचें दिसतें. ईजायनेटिक व इलेक्ट्रम ह्या दोन्ही नाण्यांचा उद्भव एकाच वेळीं झाला असेल.

बॉस्परस, कॉल्चिस व पाँटसः—आशियामायनरमधील पहिले प्रदेश बॉस्परस, कॉल्चिस हे असून त्यामानानें इकडील नाणीं अगदीं थोडीं व कमी महत्त्वाचीं आहेत. पाँटस्मधील नाणीं मात्र पुष्कळ आहेत. ॲमिसस् नामक नगरामध्येंच बरीचशीं वरील नाणीं पाडलीं गेलीं. ह्या काशांच्या नाण्यांवरील शिल्पकामाचा सर्वसाधारण विषय म्हणजे ह्या प्रदेशांतील लोकांच्या आवडत्या पर्सिअस व मेडूसा याविषयींच्या कथा होत.

मायसियाः—आशियाखंडांतील सर्वांत उत्तम ग्रीक नाणेंपद्धति मायसिया देशांत सुरू झाली. इकडील सीझिमस् नांवाचें नगर नाणकशास्त्राच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे. ही पद्धति ख्रि. पू. ६ व्या शतकांत सुरू होऊन सुप्रसिद्ध इलेक्ट्रम् सिझिकेन नाणीं सुमारें दीड शतकपर्यंत पाडलीं गेलीं. हीं नाणीं नुसत्या आशियामायनरमध्यें नव्हे तर ईजियनच्या दोन्ही किनाऱ्यांवर सामान्यपणें चालू असत. ट्रोड् नगरांतील नाण्यांचें महत्त्व त्या नाण्यांवरील ट्रोजन युद्धांतील प्रसंगांच्या चित्रांमुळें आहे.

आयोनियाः—येथील नाणीं सुंदर असून पुष्कळ आहेत व तीं ख्रि.पू. ७००-५४५च्या काळांत पाडलीं गेलीं. ह्या नाण्यावरून ख्रि. पू. ४९४ मधील आयोनिक् बंड, रोमन साम्राज्याचा विस्तार वगैरेंचा बोध होतो. ह्यांपैकीं मुख्य महत्त्वाचीं नाणीं म्हणजे सोन्याचें डुकम् व टेट्रॅड्रॅकम् यांवर अपोलो देवतेचा दोन प्रकारचा मुखवटा खोदलेला असून त्याखालीं आशियांतील सुप्रसिद्ध शिल्पकार थिओडोटस् ह्याची सही आहे.

इफेसस्ः—इफेसस् येथील नाणीं ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचीं आहेत, परंतु त्यांतील सौंदर्यकल्पनेचा अभाव पाहतां शिल्पकलेच्या दृष्टीनें यांना फार थोडें महत्त्व आहे. यांवरील ठसा मधमाशीचा असून, कधीं कधीं काळवीट किंवा 'अर्टेमिस्' देवतेचा मुखवटा कोरलेला असतो. ख्रि. पू. चवथ्या शतकांत स्मर्नामध्यें अपोलो देवतेचा चेहरा व वीणा कोरलेलीं दुर्मिळ नाणीं पाडलीं गेलीं. ह्या ठिकाणाच्या बादशाही नाण्यावर अनेक ठसे आहेत व त्यांतच अलेक्झांडर यास स्वप्नांत दिसलेल्या दोन नेमिसेस् देवताहि खोदल्या आहेत.

कॅरियाः—कॅरियाच्या नाण्यांत परंपरा अशी कसलीच नाहीं. प्रथमप्रथमचीं चांदीचीं नाणीं अगदीं थोडीं असून त्यांचा घाटहि चांगला नाहीं. हेकॅटोम्नस्, मॅसोलस् यावरील खोदलेलीं नांवें पहातां त्यांच्यावरून केरियन् सत्रपांच्या संपत्तीची खात्री पटते. केरियाच्या ताब्यांतील " कॅलिम्ना " व " कॉस् " ह्या बेटांतहि नाणीं सांपडलेलीं आहेत.

र्‍होडस्ः—र्‍होडस् बेट व्यापार व कलाकुसरीच्या कामांत सुप्रसिद्ध असल्यामुळें अर्थातच ह्याची नाणकपरंपरा फार उच्च दर्जाची आहे. र्‍होडस् शहर, ख्रि. पू. ४०८ या वर्षी, कॅमिरस्, इआलिसस् व लिंडस् ह्या तीन शहरांतील लोकांनीं तीं शहरें सोडून दिल्यावर स्थापन झालें, त्यामुळें इकडे तिन्हीं प्रकारचीं नाणीं सांपडतात.

लीसियाः—लीसियांतील प्राचीन नाण्यांवरून आशियातील देवता, कला व वाङ्मय यांच्याबद्दल कल्पना येऊं लागते. ख्रि. पू. ५२० च्या सुमारास असलेलीं नाणीं अथेनियन धर्तीचीं आहेत. लीसियन अक्षरें आशियामायनरमधील प्राथमिक मूलवर्णांपैकीं असून त्यांत ग्रीक वर्णांखेरीज इतर तद्देशीय परंतु अद्यापहि न उगमलेल्या वर्णांचें मिश्रण असावें. ह्या नाण्यांवरील शिल्प ठराविक असून त्यावर निरनिराळ्या प्राण्यांचे आकार आढळतात. कांहीं कांहीं नाण्यांवर स्वस्तिकासारखीं त्रिकोणी चिन्हें आहेत. ह्या ठिकाणीं निरनिराळ्या प्रसंगांच्या दर्शक अशा बऱ्याच नाण्यांच्या मालिका आहेत, व शिवाय ह्या सर्वसामान्य नाण्यांशिवाय लीशियन संघांतील नगरांची स्वतःपुरतीं भिन्नभिन्न नाणीं आहेतच.

पॅंफीलिया, सिलिसियाः—पॅंफीलियांतील नाण्यांत आशियाटिक शिल्पांचे कांहीं नमुने मिळतात. परंतु ह्यापेक्षां सिसिलिया प्रांत, बहुतेक किनाऱ्यालगतच असल्यामुळें नाणकशास्त्रदृष्ट्या फार महत्त्वाचा आहे. सिसिलियामध्यें पूर्वकालीं चालू असलेलीं पुष्कळ नाणीं आहेत.

सीरियाः—सीरियन नाण्यांच्या परंपरेंत सेल्युसिड् राजवंश व टॉलेमी राजवंश येतो. टॉलेमी नाणीं मुखवट्यांच्या ठशामध्यें जास्त सुंदर आहेत, परंतु सोन्याचीं नाणीं व ईजिप्शियन, मोठ्या आकाराचीं व उत्तम कौशल्याचीं कांशाचीं नाणीं मात्र फारच कमी आहेत. सेल्युसिड् नाण्यांतहि ठशांचें काम फार सुबक असून एकंदर मुखवट्याचा विचार केला तर त्यांपासून ख्रि. पू. १--२ शतकांचा संपूर्ण इतिहास तयार होईल.

फिनेशियाः—फिनेशियांतील नाणीं अत्यंत चित्ताकर्षक व विपुल आहेत. किनाऱ्यावरील व्यापारी नगरांची संपत्ति ह्यावरून चांगलीच सिद्ध होते. ख्रि. पू. ५ व्या शतकाच्या मध्यांत ह्या नाण्यांस सुरवात झाली व ह्यांच्यावरील लेख फीनेशियन वर्णांतच खोदलेले आहेत. ह्या नाण्यांचीं एकंदर तीन युगें पडतातः-( १ ) अलेक्झांडरपूर्वयुग, ( २ ) अलेक्झांडरटॉलेमीसेल्युसिड् युग, आणि ( ३ ) साम्राज्यसत्तायुग. पहिल्या युगांत अरॅडस् शहराचें नाणें बाबिलोनी पद्धतीचें असून इतर सर्व शहरांचीं नाणीं फिनेशियन पद्धतीचीं आहेत; त्यापैकीं बरीचशीं नाणीं पहिला व दुसरा स्ट्रॅटो, टेनेस्, व मॅझ्यूस नांवाचे सत्रप यांनीं पाडिलेलीं आहेत. दुसऱ्या युगांतील अलेक्झांडरचीं रुप्याचीं नाणीं व टॉलेमी व सेल्युसीडस् या राजांचीं बादशाही नाणीं यांखेरीज कांहीं मोठीं व महत्त्वाचीं अशीं चांदीचीं टेट्रॅड्रकम्स् नाणीं असून तीं निरनिराळ्या नगरांनीं आपल्या स्थानिक सत्ताधिकारांत पाडलेलीं आहेत. तिसऱ्या साम्राज्ययुगांत कांशाचीं कांहीं मोठीं नाणीं आढळलीं आहेत.

पॅलेस्टाइनः—पॅलेस्टाइनच्या निरनिराळ्या प्रांतांत भिन्नभिन्न तऱ्हेचीं बादशाही व स्थानिक नाणीं असल्याचें दिसतें, परंतु सर्वांत जूडिया प्रांतांची नाणकपरंपरा फारच चित्ताकर्षक आहे. जेरुसलेम येथील नाण्यांमध्यें, सातवा ॲंटिओकस याचीं कमळाची आकृति असलेलीं नाणीं मॅकॅबिअन यांनीं पाडलेलीं नाणीं, रोमन वकिलांचीं नाणीं, अशीं विविध नाणीं आहेत. गाझा येथील नाण्यांसहि बरेंच महत्त्व आहे. ह्यांतील प्रथमप्रथमचीं नाणीं म्हणजे रानटी पद्धतीचे अथेनियन नमुन्याचें ॲटिक ड्रॅकम्स असून, ह्याठिकाणच्या बादशाही नाण्यावर मनी, मिनोस व इओ ह्या देवतांचीं नांवें खोदलीं आहेत.

यहुदी नाणकपद्धतिः—स्वतंत्र यहुदी नाणेपद्धतीचा आरंभ 'शेकेल' नाण्यांनीं होतो. ऐतिहासिक पुराव्यावरून हीं नाणीं सातवा ॲंटिओकस यानें दिलेल्या अधिकाराप्रमाणें सॉयमन मॅकॅब्यूस यानें पाडलीं असें दिसतें. शेकेल किंवा 'अर्धशेकेल' नाणीं फिनेशियन टेट्रॅड्रकम् व डिड्रॅकम्च्या वजनाचीं आहेत. ह्यांपैकीं कांहीं नाण्यांवर १, २, ३, ४, ५ असे हीं नाणीं पाडलेल्या वर्षांचे आंकडे आहेत. ह्याशिवाय जेरुसलेम येथें इ. स. ६६-७० व इ. स. १३५ च्या सुमारास ज्या दोन बंडाळ्या उद्भवल्या त्यावेळचीं तद्देशीय पद्धतीचीं नाणीं आहेत.

अरेबिया, मेसापोटेमिया व बाबिलोनियाः—रोमन अरबस्तानांत कांशाचीं बादशाही नाणीं सांपडतात. मेसापोटेमियांतील 'एडेसा' शहरानें पाडलेलीं चांदीचीं व कांशाचीं नाणीं बरींच महत्त्वाचीं आहेत.

आ फ्रि कें ती ल ना णीं.—इतर दोन खंडांपेक्षां आफ्रिका खंडांतील नाणीं फार थोडीं आहेत. कारण ग्रीक, फोनेशियन व रोमन संस्कृतीचा प्रवेश ह्या खंडांत, ईजिप्त व पश्चिमच्या बाजू-उत्तर किनारा ह्यापलीकडे झाला नाहीं. ईजिप्तमधील परंपरेमध्यें एक प्रकारचा भौगोलिक क्रम आढळतो, तेथें अद्यापि अलेक्झांडरच्या मागाहूनचीं कोणतींच नाणीं उपलब्ध नाहींत. इराणी सत्ता ईजिप्तमध्यें सुरू झाल्यावर इराणी नाणीं या ठिकाणीं चालू झालीं असलीं पाहिजेत. सत्रप अर्यंडेस ह्यानें चांदीचीं नाणीं प्रचलित केलीं असें म्हणतात. अलेक्झांडरपासून ग्रीक नाणकपद्धति सुरू झाली. अलेक्झांडरचीं कांहीं नाणीं ईजिप्त येथील टांकसाळींत पाडलेलीं आहेत. ह्या ठिकाणीं टॉलेमी राजाबरोबर सुरू झालेली नाणकपद्धति सुमारें तीन शतकेंपर्यंत चालली. ह्या पद्धतींतील विशेष म्हणजे सोन्याचीं अत्युत्कृष्ट नाणीं व कांशाच्या नाण्यांचा मोठा आकार हा होय. पुढें ज्यावेळीं सेल्युसिड राजांनीं उत्तम नाणीं पाडण्याचा उपक्रम सुरू केला, त्यावेळीं टॉलेमी नाणीं सौंदर्य व कला या बाबतींत खालावत चाललीं.

रोमन अम्मलांतील नाण्यांमध्यें अलेक्झांड्रियामधील बादशाही नाणीं व साम्राज्यांत अंतर्भूत झालेल्या ईजिप्त प्रांतांतील नाणीं विस्तार व नमुन्यांची विविधता ह्या दृष्टीनें सुप्रसिद्ध आहेत. ह्या नाण्यांचा आरंभ ऑगस्टसपासून व शेवट अकिलिस ह्याच्या अमदानींत होतो. ह्यांपैकीं बहुतेक नाण्यांवर बादशाही कारकीर्दीचीं वर्षें L ह्या अक्षरानें दर्शित केलीं आहेत. ह्या नाण्यांमध्यें (१) ग्रीक, (२) ग्रीकोरोमन, व(३) ग्रीको-ईजिप्शियन; असे तीन वर्ग पडतात. ग्रीको-ईजिप्शियन नमुन्यांचें महत्त्व, हीं नाणीं ईजिप्तमधील दैवतकथांचें मागाहूनचें स्वरूप दर्शवितात ह्या दृष्टीनें आहे.

आफ्रिकेंतील ग्रीक नमुन्याची "सिरेनैका" नाणेपरंपरा ७ व्या शतकांत बॅटस वंशांत सुरू होऊन पुढें रोमन बादशहा ऑगस्टसपर्यंत हीं नाणीं चालू होतीं. ह्या नाण्यांवरील शिल्पकाम अगदीं स्पष्ट असून संक्रमणयुगांतील व भरभराटीच्या कालांतील नाण्यांत ग्रीक नाण्याचे सर्व गुण एकत्र झाले आहेत.

रोमन नाणीं.—रोमन नाणकपद्धतीचे प्रथम दोन मोठे वर्ग पडतात; (१) रोमन प्रजासत्ताक राज्याच्या वेळचीं व (२) रोमन साम्राज्याच्या वेळचीं नाणीं. ह्यांपैकीं प्रजासत्ताक राज्यांतील नाण्यांचा काल, रोममधील नाण्याच्या उद्भवापासून ख्रि. पू. १६ व्या सालांतील ऑगस्टस बादशहाच्या सुधारणेपर्यंत होय; व दुसरा साम्राज्यकला ख्रि. पू. १६ पासून स. ४७६ मध्यें पश्चिमेकडील साम्राज्याचा नाश होईपर्यंतचा होय. अत्यंत प्राचीन रोमन नाण्याचा आरंभ ख्रि. पू. ४ थ्या शतकांतील मध्यापासून होतो. इटालियन लोक इतिहासपूर्वकालापासून देवघेवीकरतां तद्देशीय तांबें वापरीत. ख्रि. पू. ३३८ ते १६ पर्यंतच्या प्रजासत्ताक राज्यासंबंधीं नाण्यांच्या इतिहासाचे मुख्यतः दोन कालविभाग पडतात, व ह्या विभागांपैकीं दुसऱ्या कालविभागास ख्रि. पू. २९६ मध्यें दिनारी नाणकपद्धतीच्या उपक्रमानें विशेष महत्त्व आलें. पहिल्या कालविभागावरून इटलीची मध्यवर्ती सत्ता कसकशी परिणत होत गेली ह्याचें दिग्दर्शन होतें. प्रथमपासून रोमन नाणीं रोम व कॅपूआ ह्या दोन्ही टांकसाळींत पडलीं जात. वरील पहिल्या कालविभागांत कांशाचें ओस्कोलेंटिन व चांदीचे डिड्रॅकम् हीं नाणीं रोम येथील टांकसाळींत पाडलीं जात असून कॅपूआ येथील टांकसाळींत लहान, कांशाचीं नाणीं व चांदीचे डिड्रॅकम् पाडले जात. दुसऱ्या कालविभागांत कॅपूआ येथील टांकसाळींतील नाणें पाडण्याचें काम जोरांत चाललेलें दिसतें, व शेवटच्या पोटकालविभागांत दोन्ही टांकसाळींतील नाण्यांत सारखेपणा दिसतो व पूर्वीपेक्षां कांशाच्या नाण्याचें महत्त्व व किंमत कमी झालेली दिसते.

ह्यानंतर (ख्रि. पू. २९६) चांदीचीं दिनेरियस, त्याची अर्धी क्विनेरियस व पांच सिस्टेरिटस ह्या नाण्यांचा व्यवहारांत प्रवेश झाल्यावर मग मात्र नाणकपद्धतींत कोणत्याच तऱ्हेचे फेरबदल, हें प्रजासत्ताकराज्ययुग संपेतोंपर्यंत झाले नाहींत.

नंतर लौकरच 'दिनेरियस्' नाण्यांनीं बाकीच्या सर्व नाण्यांस मागें टाकून आपलें वर्चस्व थोडक्या कालांत स्थापन केलें. प्रजासत्ताक काळाच्या अखेरपर्यंत सोन्याचीं नाणीं फार क्वचित पाडण्यांत येत. रोमन प्रजासत्ताक राज्यकालीन नाण्यांचे नमुने फारच चित्ताकर्षक आहेत, परंतु त्यामानानें त्यांवरील शिल्पकाम अगदीं मध्यम तऱ्हेचें आहे. अति प्राचीन दिनारी, क्विनारी व सेस्टरेटी ह्या नाण्यांवर शिरस्त्राणघातलेला असा 'रोमा' देवतेचा मुखवटा खोदलेला असतो. ख्रि. पू. १९० च्या पुढील नाण्यावर रथांत बसलेल्या डायना देवतेचें चित्र आढळतें. शिवाय कांहीं नाण्यांवरील न समजणारे देखावे, रोमन दैवतकथांतील बारीक सारीक गोष्टींचें ज्ञान झाल्यावांचून समजणार नाहीं.

रोमन साम्राज्यकालीन नाण्यांचा इतिहास जास्त भानगडीचा आहे. ऑगस्टस ( ख्रि. पू. १६-१५ ) ) बादशहानें सोन्याचीं नाणीं बादशहानेंच पाडावयाचीं व रोमन सीनेट सभेनें फक्त कांशाचीं नाणीं पाडावयाचीं अशा अटी ठरविल्या. त्याचा परिणाम असा झाला कीं सीनेटला बादशहाच्या लहरीवर अवलंबून राहवें लागलें. ऑगस्टसच्या कारकीर्दींत ही पद्धति सर्व साम्राज्यांत राजमान्य झाली. बादशहाच्या परवानगीशिवाय कोणत्याहि स्थानिक टांकसाळीचें अस्तित्वच शक्य नव्हतें. ह्या बादशाही नाण्यावरील ठसे बहुतेक बादशाही व्यक्तींचे असत. ज्यावेळीं ही व्यक्ति पुरुष असेल त्यावेळीं डोक्यावर मुकुट किंवा उघडें डोकेंच दाखविण्यांत येतें, व स्त्री असते त्यावेळीं डोकें कधीं कधीं बुरख्यानें

आच्छादित किंवा उघडे दाखविण्यांत येतें. नाण्यांवर बादशाही व्यक्तींचीं नांवें किंवा स्तुतिपर वाक्यें असतात. ह्याच वेळीं हलकें हलकें क्रॉस्सारखीं ख्रिस्ती चिन्हें न कळत नाण्यावर खोदलेलीं दिसूं लागतात.

मध्ययुगीन व पश्चात्कालीन

यू रो पि य न ना णीं.—यूरोपीय नाण्यांच्या मध्ययुगास आरंभ रोमन साम्राज्याच्या नाशापासून होतो.

बायझंटाइन साम्राज्यः—बायझंटाइन नाण्यांचा आरंभ ॲनॅस्टॅशिअस ( इ. स. ४९१--५१८ ) राजाच्या कारकीर्दींत झाला. बायझंटाइन नाणीं तिन्हीं धातूंचीं आहेत, परंतु चांदीचीं तुरळक आहेत. प्रथमचीं सोन्याचीं व चांदीचीं नाणीं सुबक आहेत परंतु साम्राज्याच्या अखेरचीं बरीच हिणकस धातूचीं आहेत. तेराव्या शतकांत इटालियन सोन्याच्या नाण्यांचा प्रवेश होईतोंपर्यंत सर्व ठिकाणीं सोन्याचीं बायझंटाइन् नाणीं चालू होतीं. त्यांच्या वजनांत अनेक फरक झाले. त्यांचे ठसे बहुतेक धार्मिक आहेत. जुन्या नाण्याच्या मागील बाजूवर क्रॉस हातांत धरलेली विजयदेवता आहे, परंतु मागाहूनच्या नाण्याच्या मागील बाजूस " तारक प्रभु " किंवा " कुमारी मेरी " हिचें चित्र आहे. लेखांची लिपी प्रथम लॅटिन होती, पुढें हेरेक्लसपासून ग्रीक झाली. तत्कालीन धर्मोपदेशकांतील शिल्पकलाज्ञानाची कल्पना ह्या नाण्यांवरून चांगली होते, पण घाट व सुबकपणा या दृष्टीनें हीं नाणीं कमी दर्जाचीं आहेत.

इ त र यू रो पी य ना ण क प रं प रा.—इतर पश्चिमेकडील देशांच्या नाण्यांचे ठळक ठळक असे कालदृष्ट्या पांच वर्ग पाडतां येतात, ते वर्गः—( १ ) संक्रमणयुग, रोमन साम्राज्यनाशापासून खऱ्या मध्ययुगापर्यंत—म्हणजे शार्लमेनच्या राज्यारोहणापर्यंत; ( २ ) मध्ययुग, शार्लमेनच्या राज्यारोहणा पासून स्वेबिअन् घराण्याच्या नाशापर्यंत; ( ३ ) पूर्वपुनरुज्जीवनयुग, फ्लॉरेन्समध्यें सन १२५२ मध्यें फ्लारिन् नाण्याच्या सुरवातीपासून; ( ४ ) पुनरुज्जीवनयुग, स.१४५० पासून १६०० पर्यंत व ( ५ ) अर्वाचीन युग.

( १ ) संक्रमणयुगः—पश्चिमेकडील देशांतील ह्या कालांतील नाण्यांचा विचार करतां असें दिसून येतें कीं, हीं नाणीं ५ ते ८ शतकांचा इतिहास समजण्यास अत्यंत महत्त्वाचीं आहेत. ह्या नाण्यांवरील कोरीव कामाचे नमुने एकाच तऱ्हेचे ( रोमन बादशहा व स्थानिक सत्ताधारी यांचे छातीपर्यंत मुखवटे, कांहीं विशिष्ट तऱ्हेचे क्रॉस ) आहेत. ह्यांचें शिल्प अगदीं असंस्कृत असून, रोमन किंवा बायझंटाईन नाण्यांच्या नक्कलबरहुकूम तयार केलेल्या ह्या प्राचीन नाण्यांचें वर्गीकरण करणें कठिण आहे.

( २ ) मध्ययुगः—रोजच्या जीवनास लागणाऱ्या आवश्यक गोष्टींच्या संबंधानें सोन्याच्या नाण्याची किंमत जास्त असल्यामुळें त्यामुळें गैरसोय होऊन सोन्याच्या नाण्याबद्दल चांदीच्या नाण्याचा उपयोग सुरू केला. याचा प्रसार फ्रान्स, जर्मनी, इटली, इंग्लंड, स्कँडिनेव्हिआ, कॅस्टाइल व ॲरॅगान इत्यादि सर्व देशांत झाला. ह्या नाण्यावरील ठसे बहुतेक नवे ( क्रॉस, ख्रिस्ती प्रार्थनामंदिर ) आहेत.

( ३ ) पूर्वपुनरुज्जीवनयुगः—बादशहा दुसरा फ्रेड्रिक हाच या युगाचा प्रवर्तक होय. ह्यानें जरी पश्चिमेकडील मुसुलमानी प्रदेशांत प्रचारांत असलेलीं अरबी नाणींच चालू ठेवलीं तरी देखील त्यानें ( १२१५–१२५० ) आपल्या स्वतःच्या नांवाचीं 'सॉलिडी, वगैरे रोमन सोन्याचीं नाणीं पाडलीं. शिल्पाच्या दृष्टीनें मध्ययुगांतील अत्यंत सुबक नाणीं हींच होत. पुढें फ्लॉरेन्सला आलेलें व्यापारी महत्त्व व १२५२ पासून पाडण्यांत आलेल्या नव्या " फ्लॉरिन् " नामक सोन्याच्या नाण्याची शुद्धता ह्यामुळें सर्व यूरोपखंडांतील प्रदेशांत अशा पद्धतीचीं नाणीं पाडण्यास सुरवात झाली. अर्थात व्हेनिस्, जिनोआ इत्यादि शहरांत व इंग्लंड, फ्रान्स ह्या देशांतहि फ्लारिन्सारखींच अनेक नाणीं पाडण्यांत येऊं लागलीं. जड अशा चांदीच्या नाण्यांची गरज भासूं लागल्यामुळें १४ व्या शतकापासून मोठ्या आकाराचे दिनार पाडण्यास सुरवात झाली. यानंतरच्या नाण्याचें शिल्प धार्मिक कक्षेंतून निघून स्वतंत्र बनलें.

( ४, ५ ) पुनरुज्जीवनयुग आणि अर्वाचीनयुगः—पुनरुज्जीवन कालापासूनच अर्वाचीन तऱ्हेच्या कल्पनांस सुरवात झालेली दिसते यूरोपखंडांतील अनेक राष्ट्रांच्या शोधपूर्वक तयार झालेल्या नाणकपद्धतीचा आरंभ ह्याच कालांत व्हावयाचा. १५१८ सालीं जर्मनीमध्यें डॉलर नाणें पाडण्यास सुरवात झाल्यापासून चांदीच्या नाण्यांनां सार्वत्रिक महत्त्व आलें. डॉलरचीं निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं वजनें व आकार असल्यामुळें रोमन दिनारासारखा त्याचा सार्वत्रिक प्रचार झाला नाहीं. ह्या कालांतील शिल्प उत्तम असून ह्या नाण्यांनीं एक प्रकारचें सौंदर्य उत्पन्न केलें. शिल्पकलेनें पूर्वीच्या युगांत घातलेलीं बंधनें झुगारून देऊन एक प्रकारचा स्वाभाविकपणा धारण केला. मोठमोठे शिल्पकलाकुशल लोक उत्पन्न होऊन त्यांनीं उत्तम उत्तम पदकें व नाणीं तयार केलीं, परंतु ज्यावेळीं ह्या धंद्यांत व्यापारी दृष्टी उत्पन्न झाली त्यावेळीं अर्थातच शिल्पसौंदर्य नाहींसें होऊन नाण्यांत पूर्वीचा असंस्कृतपणा येऊं लागला. ह्या वेळच्या कलेंत नांवाजलेले देश म्हटले म्हणजे इटली व जर्मनी हे होत.

अ र्वा ची न का ला तील ना णीं पोर्तुगाल व स्पेनः—पोर्तुगाल देशांतील नाण्यांचा आरंभ, पहिल्या अल्फान्झोपासून (१११२) होतो. पोर्तुगॉल, स्पेनमध्यें बाराव्या शतकाच्या मध्यांत सोन्याचीं नाणीं पाडण्यास सुरवात झाली. १४७९ सालीं ज्यावेळीं दोन्ही देशांची शासनसत्ता संयुक्त बनली तेव्हांपासून पुष्कळ नाणीं पाडण्यांत आलीं व १७–१८ व्या शतकांतील स्पॅनिश डॉलर पाश्चात्य देशांतील प्रमुख नाणें होतें. सध्याचें स्पेनमधील प्रमुख चलन 'पेसोटा' नांवाचें असून तें सोनें व रुपें ह्या दोन्ही धातूंचें पाडण्यांत येतें. पोर्तुगॉल देशांतील चलन

सोन्याचें 'क्राउन', रुप्याचें 'टेस्टून' व निकलचें व कांशाचें 'री' नाणें होय.

फ्रान्सः—इ. स. ७५१ मध्यें पिपिन् यानें पूर्वींचीं सोन्याचीं नाणीं बंद करून चांदीचें दिनार नाणें उपयोगांत आणलें. यानंतर शार्लमेननें इटली, जर्मनी वगैरे अनेक देशांतील नाणीं प्रचारांत आणलीं. पुढें नाण्यांत पुष्कळच विविधता आली. चवदाव्या लुईनें उपयोगांत आणलेली नाणकपरंपरा शिल्पसौंदर्याच्या दृष्टीनें निरुपयोगी होती. फ्रान्समधील सांप्रतचें प्रमाणभूत चलन 'फ्रँन्क' नाणें असून तें सोनें व रुपें या दोन्ही धातूंमध्यें पाडलें जातें.

ग्रेटब्रिटनः—इंग्लंडमध्यें चांदीचें 'पेनी' नाणें प्रथम मर्सियाचा राजा ओफा यानें स. ७५७ च्या सुमारास प्रचारांत आणलें. पुढें हें मर्शियन चलन मागें पडून कँटरबरीच्या आर्चबिशपनें नाणीं पाडण्याचें काम १० व्या शतकाच्या आरंभापर्यंत चालू ठेवलें होतें. तिसऱ्या एडवर्डनें १३४३ सालीं सोन्याचीं 'फ्लॉरिन' व 'नोबल' हीं दोन नाणीं नवीनच प्रस्थापित केलीं. ह्यानंतर इंग्लिश सोन्याच्या व चांदीच्या चलनास इतकें महत्त्व आलें कीं ह्या नाण्याच्या बऱ्याच प्रतिकृती देशांत होऊं लागल्या. १५६२ सालीं यांत्रिक सामग्रीनें नाणीं तयार करण्यास सुरवात झाली. परंतु पूर्वींची हातोड्याच्या साहाय्यानें नाणीं तयार करण्याची पद्धत नाहींशी होण्यास एक शतक लागलें. इंग्लिश चलनाचा अत्युत्कृष्ट नमुना म्हणजे दुसऱ्या चार्लस राजाच्या कारकीर्दींत पाडलेला "पिटिशन क्राउन" होय.

स्कॉटलंडः—येथील नाणीं प्रथमपासून इंग्लंडच्या नाण्यासारखींच परंतु जास्त ओबडधोबड अशीं असत. चांदीचीं पेनी नाणीं हीं प्रथमचीं असून पुढें तर स्कॉटलंड व आयर्लंड ह्या दोन्ही देशांत इग्लंडचें नाणेंच सुरू झालें.

१८३६ सालीं नवीन सोन्याचीं व चांदीचीं नाणीं पाडण्यास आरंभ होऊन बहुतेक थोड्याफार बदलांत तींच नाणीं आजमितीस प्रचारांत आहेत. ह्यांपैकीं सोन्याच्या 'सॉव्हरिन' नाण्याच्या नमुन्यांत १८८७ सालीं व्हिक्टोरियाच्या ज्युबिलीसमारंभानिमित्त थोडा फेरबदल करण्यांत आला. परंतु हा नवीन फेरबदल सर्वसम्मत न झाल्यामुळें पुन्हां सातव्या एडवर्डच्या कारकीर्दींत पूर्वींसारखीं सॉव्हरिन नाणीं पाडण्यांत आलीं. स्कॉटलंड व आयर्लंड ह्या देशांत त्याचप्रमाणें अमेरिकेंत व हिंदुस्थानांतहि ग्रेटब्रिटनच्या साम्राज्यस्थापनेमुळें ह्या नाण्यांना सार्वत्रिक महत्त्व मिळालें. सांप्रत जगावरील सर्वसामान्य नाणेंपद्धति इंग्लिश आहे.

बेलजम व हॉलंडः—बेलजमच्या नाण्यांचा आरंभ ११ व्या शतकापासून झाला आहे. बेलजमच्या नाण्यामध्यें विशिष्ट असा स्वतंत्र गुण कांहींच नसून बहुतेक नाणीं परकीयच आहेत. बेलजमची नाणकपद्धति एका बाजूनें फ्रेंच व दुसऱ्या बाजूनें जर्मन पद्धतीच्या अगदीं जवळ जवळ आहे. ह्यापैकीं महत्त्वाचीं नाणीं बर्गंडीच्या घराण्यानें पाडलीं. प्रथम हॉलंडचीं नाणीं ह्याच पद्धतीचीं असून डच "डॉलर" नाणीं १६ ते १८व्या शतकापर्यंत बरीच महत्त्वाचीं व सार्वत्रिक प्रचार असलेलीं अशीं होतीं. डच ऐतिहासिक पदकें अत्यंत महत्त्वाचीं असून त्यांवरून स्थानिक गोष्टींचा इतिहास कळतो, इतकेंच नव्हे तर मुख्य यूरोपियन शासनसत्तांसंबंधीं पुष्कळ माहिती मिळते. १८३२ सालीं मात्र बेलजमनें पूर्णपणें फ्रेंच नाणेपद्धतीचा स्वीकार केला.

स्वित्झर्लंडः—या देशांत प्रथमप्रथम फ्रँकिश राजांचीं सोन्याचीं नाणीं व शार्लमेन बादशहानें प्रचारांत आणलेलीं चांदीचीं 'दिनार' नाणीं, चालू होतीं. १० ते १३ शतकांपर्यंत निरनिराळ्या धार्मिक संस्था, निरनिराळे धर्माधिकारी ह्यांना आपापलीं स्वतंत्र नाणीं पाडण्याचा हक्क मिळाला होता. चवदाव्या शतकांत सुप्रसिद्ध 'स्विस्‌राष्ट्रसंघ' निर्माण झाला आणि निरनिराळ्या परगण्यांनीं आपापलीं नाणीं पाडण्यास सुरवात केली. परंतु धार्मिक संस्थांनीं व ह्या निरनिराळ्या परगण्यांनीं पाडलेल्या अनेक प्रकारच्या नाण्यांमध्यें गोंधळ उडाल्यामुळें १८४८ सालीं हीं सर्व नाणीं बंद करून सर्व देशांत एक चलन सुरू करण्यांत आलें. हें चलन अर्थातच फ्रेंच होतें. सध्याचें स्वित्झर्लंडमधील नाणें निकलचें 'सेंटिम' व सोन्याचांदीचे 'फ्रँक' होत.

इटली व सिसिलीः—ह्या दोन्ही देशच्या चलनी नाण्यांत कांहीं विशेष गोष्टी साधारणपणें आढळतात. प्रथमप्रथम असंस्कृत नाणीं व पौर्वात्य साम्राज्याचें पुनःस्थापन दिग्दर्शित करणारीं बायझंटाइन नाणीं ह्यांची भेसळ आढळून येते. पुढें सिसिलि येथील नॉर्मन लोकांच्या पौर्वात्य नाण्यांवर अरबी वर्चस्वाचा परिणाम झालेला दिसतो. ह्यानंतर शार्लमेन व त्याच्यामागाहूनच्या बादशहांनीं पाडलेलीं 'दिनार' नाणीं आणि दुसरा फ्रेडरिक व नॉर्मन लोकांचीं सोन्याचीं नाणीं प्रचारांत होतीं. इटलीमध्यें झालेल्या पुनरुज्जीवनाचा तेथलि नाण्यांवर परिणाम झाला, ह्या नाण्यांवर प्रगतीच्या प्रत्येक लाटेचा थोडाबहुत ठसा उमटलेला दिसतो.

ह्याच वेळे(७७२-७९५)पासून पोप धर्मगुरूंनीं बायझंटाइनलाँबर्डियन पद्धतीचे दिनार पाडण्यास सुरवात केली. या नाण्यावर पोप व रोमन बादशहा ह्यांचीं नावें उठविलेलीं आहेत. शिल्पकामापेक्षां ऐतिहासिक दृष्टीनें ह्या नाणकपरंपरेस महत्त्व आहे. सिसिली म्हणजे सध्यांच्या नेपल्स व सिसिली ह्या दोन्ही ठिकाणच्या नाण्यांचा आरंभ नॉर्मन लोकांपासून होतो. ह्यावेळच्या शिल्पकलेचा विचार केला तर इटालियन शिल्पकारांनीं ह्या मध्ययुगांत तयार केलेलीं पदकें ग्रीक कलेच्या खालोखाल महत्त्वाचीं आहेत. ह्या शिल्पकारांचें उत्कृष्ट काम १५ व्या शतकांत व १६ व्या शतकाच्या प्रारंभींच्या ओतीव पदकांवर दिसून येतें. ह्या पदकावरील चित्रकला चेहऱ्याचा ठसा हुबेहुब वठवितें. ऐतिहासिक दृष्ट्या असें म्हणतां येईल कीं फ्लॉरेन्स व रोम

येथील नाण्यांमध्यें जे दोष आढळतात त्यांची भरपाई ह्या इटालियन पदकांनीं केली आहे.

१८६५ सालीं तेथील प्रमाणभूत चलन,१०० सेंटिसिमिची किंमत असलेलें फ्रँकच्या बरोबरीचें "लीयर" नामक नाणें हें ठरविण्यांत आलें. अर्थातच हें नाणें सोनें, चांदी, व कांसें या तिन्ही धातूंमध्यें पाडण्यांत येतें.

जर्मनीः—इटलीप्रमाणें जर्मनींतील नाण्याचा विस्तार बराच आहे. फ्रँकिश कालांत मेंझ, स्ट्रासबुर्ग वगैरे अनेक शहरांतील टांकसाळींत दिनार व ऑबोल नाणीं पाडण्याचें काम चालत असे. पुढें ज्यावेळीं रोमन साम्राज्यांतर्गत प्रदेशास आपापलीं स्वतंत्र नाणीं पाडण्याचे अधिकार मिळाले त्यावेळीं जर्मनींतील नाण्यांमध्यें इतके स्थानिक भेद उत्पन्न झाले कीं त्यायोगानें बादशाही नाण्यांमध्यें देखील एकसूत्रता बिलकुल राहिली नाहीं. सोन्याचे फ्लॉरिन व ग्रोसस ह्या नाण्यांचा १४ व्या शतकांत प्रवेश झाल्यापासून जर्मनीच्या अर्वाचीन युगास प्रारंभ होतो. प्रथम "ब्रेक्टेटे" व 'थेलर' हीं सॅक्सन नाणीं ११ व्या शतकापर्यंत प्रचारांत असलेलीं दिसतात. नंतर १५ व्या शतकाच्या शेवटीं शेवटीं सोन्याच्या नाण्याचा झालेला बराच प्रसार ह्या ठिकाणच्या सोन्याच्या विपुलतेची साक्ष पटवितो. याशिवाय धार्मिक संस्थांनीं पाडलेलीं निरनिराळीं नाणीं आहेतच. जर्मन पदकांमध्यें शिल्पकलेच्या दृष्टीनें कमी गुण आहेत; तरी इटलीच्या खालोखाल जर्मन पदकांचें बरेंच महत्त्व आहे.

इ. स. १८७१पासून जर्मन साम्राज्याच्या चलनाची बरीच पुनर्घटना करण्यांत आली. ह्यावेळीं एक नवीन चांदीचें 'मार्क' नाणें प्रमाणभूत चलन मानण्यांत आलें व त्यावरूनच १० मार्क व २० मार्क किंमतीचीं "क्राउन" व "डबल् क्राउन" अशीं सोन्याचीं नाणीं पाडण्यांत आलीं. सर्व नाण्यांच्या मागील बाजूस साम्राज्याचें चिन्ह गरुडपक्ष्याचें चित्र असून पुढील बाजूस राज्यावर असलेल्या राजा व राणी यांचे मुखवटे असतात.

आस्ट्रियाहंगेरीः—१८५५सालीं अस्ट्रियाचा जर्मनीबरोबर तहनामा झाला व त्यानंतर अस्ट्रियानें "फ्लोरिन्" चांदीचें नाणें प्रमाणभूत धरून आपली नाणकपद्धति आंखली. पुढें १८६८ सालीं आस्ट्रियानें संघ सोडला. परंतु तींच नाणीं कायम ठेविलीं. आस्ट्रियन् सोन्याच्या नाण्यावर बादशहाचा मुखवटा व दोन शीर्षांचा गरुड याचें चित्र असतें. परंतु हंगेरियन नाण्यावर बादशहाची उभी प्रतिमा व राष्ट्रीय ढाल यांचे ठसे असतात.

रशियाः—प्राचीन रशियन नाण्यांचा आरंभ १० व्या शतकाच्या अखेरीस होतो. ह्या नाण्यावर बायझंटाइन सत्तेचा परिणाम झाल्याचें दिसतें. पिटर दि ग्रेट ह्या बादशहानें सोन्याचीं नाणीं पाडण्याचा उपक्रम करून नाणेपद्धतींत बरीच सुधारणा केली. इ. स. १८२५ च्या सुमारास पहिल्या निकोलसनें नाणकपद्धतींत प्लॅटिनम धातु उपयोगांत आणली. इ. स. १८८५ च्या पूर्वीच्या रशियन 'रुबल' नाण्याचें वजन २७८ ग्रेन होतें तें १०० करण्यांत आलें. ह्या सोन्याच्या व चांदीच्या नाण्यावर बादशहाचा मुखवटा व गरुड असतो.

अमेरिकेंतील संयुक्त संस्थानेंः—अमेरिकाखंडाच्या नाण्याविषयीं कांहींएक लिहिण्यासारखें नाहीं. कारण हीं सर्व वसाहतीचीं नाणीं मातृदेशाच्या पद्धतीचीं असून ह्या सर्वांत मुख्य नाणें 'डॉलर' होय. डॉलर प्रथम चांदीचा असून त्याचें वजन ४१२½ ग्रेन होतें. पुढें १८७३ सालीं सोन्याचा 'डॉलर' पाडला जाऊन त्याची किंमत २५.८ ग्रेन करण्यांत आली. याशिवाय चिनी व्यापाराच्या सोईकरितां पुढें ४२० ग्रेन वजन चांदीचा एक "ट्रेड् डॉलर" पाडण्यांत आला.

पौर्वात्य नाणीं.

पौर्वात्य नाण्यांचे एकंदर चार वर्ग पाडण्यांत येतात ते असेः—( १ ) प्राचीन इराणी व अरबी नाणीं, ( २ ) मध्ययुगांतील इराणी व अफगाणी नाणीं, ( ३ ) जपानी, चिनी व इतर पौर्वात्य नाणीं. आणि ( ४ ) भारतीय नाणीं.

वरीलप्रमाणें वर्गवारी करण्याचें कारण ऐतिहासिक आहे. या नाण्यांत पहिल्या प्रतीचीं नाणीं प्राचीन इराणी साम्राज्यांतील 'पार्थियन' व 'सस्सानियन' लोकांचीं होत, व ह्यानंतर अरबी सत्तेच्या वर्चस्वाबरोबर नव्या अरबी चलनास प्रारंभ झाला. अर्वाचीन इराणी व अफगाणी नाण्यांचा एक दुसरा स्वतंत्र वर्ग पाडण्याचें कारण इतकेंच कीं हीं दोन्हीं प्रकारचीं नाणीं प्राचीन अरबी चलनापासून उत्पन्न झालीं असून दोन्ही नाण्यांवरील हस्तलेखांत अरबी व इराणी भाषेचें मिश्रण आहे चीन, जपान, कोरिया इत्यादि देशांतील नाण्यांमध्यें एक प्रकारचा परस्परसंबंध असल्यामुळें त्या सर्वांचा एक वर्ग पाडण्यांत येतो व भारतीय नाण्यांचा इतिहास फारच विविध तऱ्हेचा असल्यामुळें ह्या वर्ग निराळाच करण्यांत आला आहे.

प्रा ची न इ रा णी व अ र बी ना णीं:—पहिल्या दरायस राजानें इराणी साम्राज्याची ज्यावेळीं प्रांतविभागणी केली, त्यावेळीं करवसुलीकरितां सर्व साम्राज्यांत सारखें चलन राखण्याची जरुरी भासूं लागली, व ही उणीव दूर करण्याकरितां ग्रीक लोकांतील सोन्याचें ८.४ ग्रॅम वजनाचें 'शेकेल' नाणें व चांदीचें ५.४८ ग्रॅम वजनाचें 'ड्रॅकम्' नाणें अशीं नाणीं निवडण्यांत येऊन त्याबरहुकूम सोन्याचीं 'डेरिक्' नाणीं व चांदीचीं 'सिग्लॉस्' नाणीं पाडण्यांत आलीं. हीं सोन्याचीं नाणीं पाडण्याचा अधिकार राजाचा असून चांदीचीं नाणीं प्रांताधिकाऱ्याकडून पाडण्यांत येत. ह्या नाण्यांचे पुढील पोटविभाग होते—( १ ) बादशाही, ( २ ) प्रांतानिहाय पाडलेलीं सत्रपी, ( ३ ) व इतर मांडलिक शासनसंस्थांनीं पाडलेलीं. ह्यापैकीं बादशाही नाणीं 'डेरिक्' व 'सिग्लॉस्' अशीं दोन्हीं प्रकारचीं असून, त्यांच्या पुढील बाजूवर हातांत धनुष्य घेतलेल्या राजाची

प्रतिमा व मागील बाजूवर चौकोनी खूण असते.सत्रपी नाणीं अत्यंत महत्त्वाचीं व चित्ताकर्षक आहेत. ह्यापैकीं नमुनेदार नाण्यावर, दाढी असलेल्या चेहेऱ्याची प्रतिमा असून मागील बाजूस विविध प्रकारचे ठसे आहेत. ह्याखेरीज टार्सस् येथें पाडलेलीं सिसिलियन नाणीं व टिरिबेझस् येथें पाडलेलीं डॅटॅमिस् नाणीं चांगल्यापैकीं आहेत. पर्थियन काळ.तील ख्रि. पू. इराणी नाणीं ग्रीक पद्धतीचीं असून त्यांवरील प्रत्येक राजाचें नांव ' आर्सेकस ' असें आढळतें. ह्यानंतर ख्रि. पू. तिसऱ्या शतकाच्या उत्तरार्धांत पर्सिसची नाणकपद्धति चालू असून त्यानंतर इ. स. २२० च्या सुमारास सस्सनियन लोकांनीं अर्देसरच्या नेतृत्वाखालीं पार्थियन लोकांपासून राज्य बळकावलें. ह्या घराण्यानें पौर्वात्य चलनांचा उपक्रम सुरू केला. अर्देसरनें झरथुष्ट्र धर्माचा स्वीकार केला असल्याची साक्ष ह्या कालांतील नाण्यावरील ठशांवरून व पह्लवी भाषेंतील लेखावरून स्पष्ट पटते.

अरबी चलन पौर्वात्य चलनांत प्रमुख असून ह्या काल साडेबारा शतकांचा आहे व ह्याचा विस्तार भूगोलशास्त्रदृष्ट्या मोरोक्कोपासून चीन देशाच्या सरहद्दीपर्यंत झालेला आढळतो. जेव्हां अरब लोक जास्त जास्त मुलुख आपल्या सत्तेखालीं आणूं लागले, तेव्हां त्यांनां चलनाची आवश्यकता भासूं लागली. प्रथम त्यांनीं ठिकठिकाणचीं पूर्वींचींच इराणी बायझंटाइन नाणीं प्रचारांत आणलीं. खरें मुसुलमानी नाणें बसरा येथें ६६० सालीं ' अली ' नामक खलिफानें पाडलें व पुढें ( ६९५ ) अब्दुलमलिकनें एक टांकसाळच पौर्वात्य तऱ्हेचीं स्वतंत्र नाणीं पाडण्याकरितां स्थापन केली. ह्यावेळीं मुख्य तीन नाणीं होतीं. ह्यापैकीं सोन्याचें ' दिनार ' नाणें रोमन डिनेरियम् नाण्याची प्रतिकृति असून, चांदीचें 'डिर्‌हेम्' नाणें ग्रीक ' ड्रॅकम् ' नाण्याची सुधारलेली आवृत्ति होय. त्याचप्रमाणें तांब्याचीं " फेल्स् " नाणीं ग्रीक साम्राज्यांतील " फॉलिस् " नाणीं होत. ह्या नाण्यांवर सहसा कोणतेच ठसे नसून बहुतेक दोन्ही बाजूंवर धार्मिक लेख आहेत. पुढें पुढें नाण्यावर खलिफाचीं नांवें आढळतात. कांहीं कालपर्यंत सर्व घराण्यांतून मुख्य खलिफाचें धार्मिक वर्चस्व औपचारीकरीत्या मानण्यांत येत असे, व त्याप्रमाणें नाण्यावरहि बराच कालपर्यंत मुख्य खलिफाचें नांव घालण्यांत येत असे. खिलाफतीचा नाश झाल्यानंतर दिनार व डिर्‌हेम् यांपेक्षां जास्त वजनाचीं नाणीं प्रचारांत आलीं. परंतु इटलींतील संस्थानांच्या वाढलेल्या व्यापारी वर्चस्वामुळें तुर्क, मूर इत्यादि लोकांनां व्हेनेशियन सोन्याचें नाणें उपयोगांत आणणें भाग पडलें, व नंतर अर्वाचीन कालांत भूमध्यसमुद्राच्या सीमेवरील संस्थानांत डॉलर नाण्यांचा प्रवेश झाला. ग्रीक नाण्याप्रमाणें अरबी नाण्याचें शिल्पकाम उत्तम नाहीं हें उघड आहे, परंतु ह्या नाण्यावरील लेखामध्यें एक प्रकारचें मध्ययुगीन सौंदर्य दिसून येतें.

मध्ययुगीन इराणी व अफगाणी नाणीं.—उमाईद नाण्यांचें ऐतिहासिक दृष्ट्या इतकेंच महत्त्व आहे की ह्या चांदीच्या नाण्यावरून त्यावेळच्या अरबी साम्राज्याचा विस्तार किती होता ह्याचा पुरावा सांपडतो. ह्या साम्राज्याची पहिली विभागणी इ. स. ७५० च्या सुमारास झाली. बगदाद येथील घराण्याकडून दिनार नाणीं उत्तम प्रकारें पाडण्यांत येत, परंतु स्पॅनिश उमाईद घराणें फक्त चांदीचीं नाणीं पाडीत असे. इ. स. ९६२–११८६ च्या दरम्यानकाळांत अफगाणिस्तानमध्यें गझनी घराण्याची सत्ता प्रबळ झाली व ह्यावेळीं सोन्याचीं व चांदीचीं नाणीं पाडण्यांत आलीं. ह्यानंतर सेल्जुक घराण्यानें साम्राज्यस्थापना केली व ह्याच वेळीं आधुनिक अरबी नाणीं प्रथम पाडण्यांत आलीं.

सेल्जुक साम्राज्याचीं पुढें अनेक संस्थानें झालीं व ह्यावेळीं मध्यवर्ती संस्थानावर १२ व्या व १३ व्या शतकांत आताबेग व उर्तुक घराण्यांतील तुर्क लोक राज्य करीत.ह्या लोकांनीं पाडलेलीं नाणीं बहुतेक तांब्याचीं असून त्यांच्यावर ग्रीक, रोमन किंवा बायझंटाईन पद्धतीचे ठसे आढळतात. ह्याच काळांत ख्वारिझम येथील महत्त्वाचें परंतु अल्पायुषी साम्राज्य होऊन गेलें. पुढें स्पेनची खिलाफत मोडली. फातिमाइट घराण्याच्या जागीं सलादिनाचा आयुबाइट वंश ईजिप्त, सीरिया व मेसापोटेमिया ह्यांच्यावर राज्य करूं लागला. तैमूरलंगाच्या वंशानें चांदी, कांसें, व तांबें या तिन्ही धातूंचीं नाणीं पाडली आहेत. ह्यानंतरचीं आटोमन् लोकांनीं पाडलेलीं सोनें, रुपें, कांसें ह्या धातूंचीं नाणीं ऐतिहासिकदृष्ट्या निरुपयोगी आहेत.

इराणः—इराणच्या शहांनीं पाडलेल्या नाण्यांचा आरंभ स.१५०२ मध्यें राज्य करीत असलेल्या इस्माईलपासून होतो. हीं नाणीं तिन्ही धातूंमध्यें पाडलेलीं असून त्यांच्यावरील लेख फारच सुंदर असून अरबी व इराणी अशा दोन्ही लिपींत आढळतात. अफगाणिस्तानांतील अमीरांच्या नाण्यांचा एक निराळा वर्ग पडतो व ह्या नाण्यांचा आरंभ इ. स. १७४७ मधील अहमदशहा दुराणी याच्यापासून होतो. ह्या नाण्यांवरील लेख इराणी लिपींतच असून काव्यमय भाषेंत आहेत. इराणच्या अर्वाचीन नाणकपद्धतीचा आरंभ सन १८७९ त होतो. त्या वेळेपासून ' लॅटिन चलनसंघ ' ह्यांतील तत्त्वाप्रमाणें इराणानें क्रान नांवाच्या ' फ्रँक ' नाण्याच्या बरहुकूम नवीन नाणें पाडलें. इराणी सोन्याचें नाणें ' टोमन ' हें असून त्याची किंमत १० क्रानबरोबर आहे व १ चांदीचें 'क्रान' नाणें तांब्याच्या २० शाही नाण्यांबरोबर आहे.

चिनी, जपानी व इतर पौर्वात्य नाणीं, चीनः—चीनच्या नाण्यांच्या इतिहास अत्यंत प्राचीन आहे. प्राचीन चिनी वाङ्मयांतील उल्लेखावरून असें दिसतें कीं ख्रि. पू. ३ऱ्या सहस्रकापासून तेथें कोणत्यातरी चलनाचा उपयोग होत असावा परंतु ख्रि. पू. ७ व्या शतकापूर्वी चालू असलेलें

चलन, विन ठशाच्या धातूचे तुकडे, रेशमी, कूर्मकवच, कवड्या अशांसारख्या ओबडधोबड स्वरूपांत असावें. मागाहूनच्या कालांतहि शिंपांच्या चलनाचा बराच प्रचार आढळून येतो. ख्रि. पू. ३३५ मध्यें हें चलन बंद करण्यांत आलें, परंतु हॅन वंशीय 'वंगमंग' नामक राजानें ह्याचें पुनरुज्जीवन केलें. सध्यां सांपडलेल्या नमुन्यावरून अत्यंत प्राचीन अशीं धातूचीं चिनी नाणीं ओतीव काशाचीं होतीं. ह्या कांशाच्या नाण्यांचे साधारणतः दोन वर्ग पडतात. ह्यांपैकीं पहिला वर्ग प्राचीन नाण्यांचा असून त्याच्यावर कुदळी, सुऱ्या, इत्यादि हत्यारांचीं चित्रें कोरलेलीं असून, दुसऱ्या वर्गांतील मागाहूनचीं नाणीं धातूचींच परंतु वर्तुलाकार असून मधोमध त्यांस एक चौकोनी भोंक असतें, व हीं नाणीं दोरींत एकत्रित ओवतां येतात. ख्रि. पू. २२१ च्या सुमारास "त्सिन" राजवंशाची स्थापना झाल्यापासून पहिल्या प्रकारचीं नाणीं पाडणें बंद झालें. तथापि एकंदर चिनी चलनाचा इतिहास म्हणजे संशयात्मक अर्थशास्त्रीय युक्त्या, हिणकस धातूची भेसळ इत्यादिकांनीं परिपूर्ण आहे. नाण्यांची किंमत त्यांच्या वजनावर अवलंबून असल्याचें मानण्यांत येत असे, परंतु नाण्यावर लिहिलेलें वजन नेहमीं खरेंच होतें असें नाहीं. मधून मधून लोहनाणींहि पाडण्यांत आलीं होतीं. स. ६२२ मध्यें तअंग राजवंशाच्या अमदानींत क्युऑन नमुन्याचीं नाणीं पाडण्याचा उपक्रम झाल्यापासून अर्वाचीन नाण्यास सुरुवात होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. ९ व्या शतकांत कागदी चलनाचा उपयोग करण्यांत आला. सांप्रतच्या 'कॅश' ह्या तांब्याच्या चिनी नाण्यावर पुढील बाजूस कारकीर्दीचें नांव व "टंगपाओ" ( प्रचलित नाणें ) हीं अक्षरें असून मागील बाजूवर टांकसाळीचें नांव असतें. मँचू राजघराण्याच्या अमदानींत हीं नाणीं ठराविक मुदतीनें पाडलीं जात. सर्वांत महत्त्वाचीं चिनी नाणीं प्रतिस्पर्धी राजघराण्यांचीं व बंडवाल्या लोकांचीं असून चीनच्या इतिहासांतील अज्ञात गोष्टींवर प्रकाश पाडण्यास ह्या नाण्यांचा बराच उपयोग होणार आहे. कोरिया व आनाम ह्या देशांतील नाणीं चिनी नाण्यासारखींच असून 'जावा' बेटांतहि बराच कालपर्यंत चिनी नाणीं प्रचारांत होतीं. परंतु अलीकडे मुसुलमानी नाण्यांचा प्रसार त्या ठिकाणीं सुरू झाला आहे.

इ. स. १८९० मध्यें चीननें अमेरिकन संयुक्त संस्थानांतील चांदीच्या डॉलरबरहुकूम व जपानी 'येन' नाण्यावरहुकूम चांदीचा 'डॉलर' पाडण्यास सुरवात केली; तसेंच २ शि. ११ ३/४ पेन्स किंमत असलेलें एक "टेल" नाणें असून ह्याशिवाय ५०, २५, १०, ५ सेंट अशींहि नाणीं पाडण्यांत आलीं आहेत. ह्या नाण्यांवर पुढील बाजूस चिनी ड्रॅगन व लेख, टांकसाळ व किंमतीची खूण इंग्लिशमध्यें असते व मागील बाजूस चिनी भाषेत किंमतीची खूण व 'मँचू' नांव असतें. स. १८६६ मध्यें हाँगकाँग बंदरीं अमेरिकन संयुक्त संस्थानच्या धर्तीवर चांदीचा "ट्रेड डॉलर" पाडण्यांत आला. ह्या नाण्याच्या पुढील बाजूवर हातांत त्रिशूल व ढाल घेतलेली "ब्रिटानिया" व मागील बाजूस चिनी व मलाया भाषेत नाण्याचें नांव आहे.

जपानः—साम्राज्यांतील नाण्याचा उगम चिनी नाण्यापासून आहे, परंतु जपानी नाण्यामध्यें एक प्रकारचें स्वातंत्र्य आढळून येतें. धातूच्या चलनास पांचव्या शतकांत आरंभ झाला. अत्यंत प्राचीन जपानी नाणीं म्हणजे ओबडधोबड वर्तुळाकार असे चांदीचे तुकडे असून त्यांमध्यें एक भोंक असतें. सातव्या शतकापासूनचीं तांब्यांचींहि अशाच नमुन्याचीं नाणीं सांपडतात. ७००–९५८ च्या अडीच शतकांच्या अवधींत पाडलेल्या बारा प्रकारच्या नाण्यांना "सेन" अशी संज्ञा आहे. सोळाव्या शतकाच्या शेवटीं म्हणजे 'टेनशू' कालांत, सोनें, रुपें, तांबें व लोखंड ह्यांचें सुव्यवस्थित चलन सुरू करण्यांत आलें. ह्याशिवाय १६०१ ते १८५९ च्या दरम्यान हिणकस धातूचीं नाणीं पाडण्यांत आलीं. इचिबू व निबू नांवाचीं लहान चौकोनी नाणीं १९ व्या शतकांतील आहेत. त्याचप्रमाणें ओबान व कोबान नांवाचीं मोठ्या व लहान आकाराचीं सोन्याचीं तबकडीवजा नाणीं १६ व्या शतकापासून अगदीं अर्वाचीन कालापर्यंत पाडण्यांत आलीं आहेत. परंतु इ. स. १८७० मध्यें, २० 'येन' पासून खालीं सोन्याचीं नाणीं, १ 'येन्' पासून खालीं रुप्याचीं, निकलचें ५ 'सेन्' व तांब्याचें २ 'सेन' अशी यूरोपीय नमुन्यांची चलनपद्धति जपाननें स्वीकारली. सध्याच्या सर्व नाण्यांच्या पुढील बाजूवर 'ड्रॅगन' चें चित्र असून मागील बाजूस फुलांची माळ व किमतीची खूण असते.

कोरियाची प्राचीन नाणीं चिनी पद्धतीचीं असून स.१९०५ पासून जपानी पद्धतीबरहुकूम नवीं नाणीं पाडण्यांत आलीं.

## भारतीय नाणीं

हिंदुस्थानांत प्राचीन काळीं प्रसिद्ध किंवा माहीत असलेल्या अशा नाण्यांचें ऐतिहासिक दृष्टीनें वर्णन देतांना पुरातन आणि मध्यकालीन नाण्यांचे मुख्यतः तीन विभाग पडतातः ( १ ) प्राचीन भारतीय नाणीं, ( २ ) उत्तरेकडील म्हणजे ज्या नाण्यांवर परकीय पद्धतीचा बराच परिणाम झाला अशीं व ( ३ ) दक्षिणेकडील म्हणजे जीं नाणीं निव्वळ हिंदुस्थानांतील पद्धतीलाच अनुसरून काढिलीं अशीं.

**अ त्यं त प्रा ची न भा र ती य ना णें**:—हिंदुस्थानांतील सर्वांत जुनें नाणें मनुस्मृतींत ( अ. ८, श्लोक १३२ ) वर्णिलेल्या भारतीय ( किंवा संस्कृत ) पद्धतीस अनुसरून आहे व त्याच्यावर परकीय पद्धतीचा परिणाम झालेला दिसत नाहीं. या पद्धतीचें मूलमाप, रति ( रक्तिका ) अथवा गुंज हें होय. एका गुंजेचें वजन अजमासें १.८३ ग्रेन = ११८ ग्रॅम्स् इतकें आहे. ८० रतींचें सोन्याचें नाणें (सुवर्ण = १४६ ग्रेन अथवा ९.४८ ग्रॅम्) याचा नमुना कोठें आढळत नाहीं. परंतु ३२ रतींचें चांदीचें पुराण अथवा धरण = ५८.६६ ग्रेन

# नाणीं

कनिष्ककुशान.



ठसे (मुद्रा) उठविलेलीं नाणीं.









टॉलेमीफिलाडेल्फस
(इजिप्तचाअशोककालीनराजा.)



कनिष्ककुशानदुसरें.




कनिष्ककुशानतिसरें(बौद्धनाणें)



हुविष्ककुशान.




वासुदेवकुशान.




प्यांटालिऑन(ख्रि.पू. २रें शतक)




आगाथोक्लेस (ख्रि.पू. २रें शतक)




नीरो.






उज्जनीचेंनाणें.



आदिवराह(भोज)




सबकतेगीन




पूर्वचालुक्य.




परमर्दी.




सुलतानरझिया.



# नाणीं

बलबन



फिरोजशहा.



हिंदी-पोर्तुगीज.






हिंदी-पोर्तुगीज.







हिंदी-डच






हिंदी-डयानिश.





हिंदी-फ्रेंच.





हिंदी-इंग्लिश (एलिझाबेथनें पाडलेलें)





कदंबाचें पद्मटंक (इ.स.५ वें शतक.)



निजामउल्मुल्क (हिजरी १२८२)





शेवटचा शहाआलम (हिजरी ११८०)





शिवाजीचा होन




लारी (आरबीनाणे. आदिलशाही अर्धा रुपाया.)



किंवा ३७९ ग्रेम, व ८० रतींचें तांब्याचें कार्षापण किंवा अशाच प्रकारचीं इतर नाणीं यांचे नमुने हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं सांपडले आहेत. या पद्धतींतील नाण्यांपैकीं अत्यंत जुनाट नाणें ख्रि. पू. निदान चवथ्या शतकाच्या आरंभींचें तरी असलें पाहिजे.

ख्रि. पू. दुसऱ्या शतकामध्यें वायव्येकडून आलेल्या ग्रीक वसाहतवाल्यांमुळें या पद्धतींत बराच फरक पडला; परंतु हिंदुस्थानांतील इतर भागांमध्यें मात्र हीच पद्धत चालू राहिली. या नाण्यांचा आकार साधारणतः समचौकोन किंवा लांबट चौकोन असून तीं जवळ जवळ धातूचे विशिष्ट वजनाचे तुकडेच होत. त्यांच्यांवर त्यांचा खरेपणा दाखविणारे निरनिराळ्या वेळचे निरनिराळे छाप मुद्रित केलेले आहेत; यांवरून त्यांनां ठसे( पंच )नाणीं असें म्हणतात. बुल्हर ह्या ज्यांनां निरनिराळ्या धंद्याच्या संघांचीं चिन्हें असें म्हणतो तीं याच कालानजीकचीं नाणीं होत; तशींच हिंदुस्थानांतील पूर्वींच्या पद्धतीचीं अक्षरें किंवा चिन्हें वर असलेलीं हीं ओतीव तांब्याचीं नाणीं याच वेळेचीं होत.

हिं दु स्था नां ती ल प्रा ची न प र की य ना णीं.—प्राचीन इराणी नाणीं एकिमेनियन साम्राज्याच्या ( ख्रि. पू. ५०० ते ३३१ ) अमदानींत पंजाबांत आलीं. सोन्याचीं, दोन्हीं धातूंनीं मुद्रित अशीं स्टेटर्स् नाणीं ख्रि. पू. ४थ्या शतकांत हिंदुस्थानांत पाडलीं गेलीं. चांदीच्या सिग्लोइ नाण्यांपैकीं बऱ्याच नाण्यांत व ठसेमुद्रित भारतीय नाण्यांत पुष्कळसें साम्य आहे; या वरून तीं दोन्हीं एकाच वेळीं प्रचलित असावीं असें दिसतें. शिवाय सिग्लोईवर ब्राह्मी व खरोष्ठी या लिपींतील अक्षरें दिसून येतात, यावरूनहि वरील गोष्ट सिद्ध होते. प्राचीन इराणी नाण्यांचें जें प्रमाण ( सिग्लोस् = ८६४५ ग्रेन्स अथवा ५६०१ ग्रॅम्स् ) तेंच पुढें ग्रीक राजांच्या नाणें पाडण्याच्या पद्धतींत स्वीकारलें गेलें.

अथीनियन नाणीं:—अगदीं प्रथमतः व्यापाराच्या ओघांत अथेन्सचें ' औल्स ' नांवाचें नाणें हें पूर्वेकडे गेलें; आणि अथीनियन टांकसाळींतून पुरवठ्याचा जेव्हां तुडवडा पडूं लागला ( ख्रि. पू. ३२२ च्या अगोदर एक शतकापासून) तेव्हां उत्तर हिंदुस्थानामध्यें त्या नाण्यांसारखीं नाणीं होऊं लागलीं. यांपैकीं कांहीं नाणीं अगदीं अस्सलबरहुकूम आहेत; पुढें निघालेल्या कांहीं नाण्यांमध्यें एका बाजूला घुबडाच्या ऐवजीं गरुड आहे. सोफायटिस् ( संस्कृत-सौभूति)चीं नाणीं ही बहुधा याच नाण्यांची प्रतिकृति असावीं. ( हा राजा अलेक्झांडरच्या स्वारीच्या वेळेस असेसिन्सच्या म्हणजे असिग्नि उर्फ चिनाब नदीच्या तीरावरील प्रदेशावर राज्य करीत होता ).

अलेक्झांडरचीं नाणीं:–हिंदुस्थानांतील समचौकोनी आकाराचीं तांब्याचीं कांहीं नाणीं बहुतकरून अलेक्झांडरनेंच पाडलीं असावीं ( तीं मूळचीं ओतीव नाणीं असावीं असें कित्येकांचें म्हणणें आहे ).

हिंदुस्थान व सेल्युकसः—सेल्युकसच्या पूर्वेकडील स्वाऱ्यांपासून, ख्रि. पू. ३०६ या वर्षी चंद्रगुप्ताशीं त्याचा तह झाल्यापासून सिरियामधील सेल्युकसचें राज्य व उत्तरहिंदुस्थानांतील मौर्यांचें साम्राज्य यांमध्यें सारखें दळणवळण सुरू झालें, ही गोष्ट मेगॅस्थिनीस व डायामेकस हे पाटलिपुत्र येथील दरबारीं वकील ठेवले होते यावरून व अशोकाच्या शिलालेखामध्यें ग्रीक राजांचीं नांवें आलीं आहेत यावरूनहि सिद्ध होतें. सेल्युकिड नाण्यावरील हत्तींचें चित्र, व सेल्युकस आणि सोफाएटिस यांच्या नाण्यांतील सारखेपणा याहि गोष्टींचें कारण वरील दळणवळणच होय.

ग्रीको-बॅक्ट्रियाचा परिणामः—ख्रि. पू. दुसऱ्या शतकाच्या आरंभापर्यंत परकीय अंमलामुळें हिंदुस्थानांतील नाण्यांमध्यें विशेषसा फरक पडला नाहीं. उत्तर हिंदुस्थानांतील नाण्यांचें रूप व आकार यांमध्यें विशेष असा फरक डायोडोटसनें स्थापिलेल्या बॅक्ट्रियाच्या राज्याच्या अंमलामुळेंच झाला.

पार्थियन परिणामः—बॅक्ट्रियामधील शक आणि पार्थियन यांच्यामधील संघट्टणामुळें हिंदुस्थानांतील शक-नाण्यामध्यें बरींच पार्थियनविशिष्ट चिन्हें सांपडतात; यांतील प्राचीन म्हणजे मॉईसचीं ( ख्रि. पू. दुसऱ्या शतकांतील ) आहेत. रोमन नाणीं दक्षिण व उत्तर हिंदुस्थानामध्यें पुष्कळ सांपडतात.

रोमन पद्धतीचा परिणामः—( १ ) कुशान घराण्याच्या तांब्याच्या नाण्यांपैकीं ' कोझोला कडाफीस ' अशी लिपि असलेल्या नाण्यांवरील मुखवटा हें रोमन बादशहा ऑगस्टस याच्या मुखवट्याचें अनुकरण आहे. ( २ ) कुशान राजांच्या सोन्याच्या नाण्यांचें वजनीमाप व रोमन नाण्याचें वजनीमाप हीं एकच आहेत.

सस्सानियन पद्धतीचा परिणामः—इराणचें सस्सानियन राज्य व काबूलचें कुशान राज्य यांच्यामधील इ. स. ३०० ते ४५० या सुमारास दळणवळण होतें व त्याचा परिणाम ऑक्सस् नदीच्या प्रदेशांत निघालेल्या सायथो-सस्सानियन नांवाच्या नाण्यामध्यें दिसून येतो.

नंतर ५ व्या शतकामध्यें हूणांनीं जेव्हां स्वारी केली तेव्हां सस्सानियन खजिन्यांतील बरीचशी लूट व नाणीं त्यांनीं हिंदुस्थानांत आपणांबरोबर आणलीं. त्यांनीं यांपैकीं कांहीं पुन्हां तशींच नाणीं टांकसाळींत पाडलीं.व कांहीं चलनी नाणीं म्हणून तशींच राहिलीं आणि यांच्या नमुन्यावरूनच हूण व इतर हिंदुस्थानी नाणीं पाडलीं गेलीं. याप्रमाणें एकीकडे राजाचा मुखवटा, व दुसरीकडे अग्निकुंड असा सस्सानियन नाण्याचा नमुना हिंदुस्थानांतील कांहीं भागांमध्यें रूढ झाला व तो कित्येक शतकेंपर्यंत चालला. ७ व्या शतकामध्यें सुद्धां नाण्यांच्या प्रसारावरून असें सिद्ध होतें कीं,सस्सानियन राज्य मुलतान व सिंध या प्रांतांत होतें.

ग्रीक हिंदुस्थानी नाणीं, युथिडिमस् आणि डिमिट्रियसः—हिंदुस्थान देशावर ग्रीक लोकांच्या पहिल्या स्वाऱ्या युथिडिमसच्या कारकीर्दीत झाल्या आणि त्या बहुतेक त्याचा मुलगा डिमिट्रियस याच्या नेतृत्वाखाली झाल्या. याचा पुरावा म्हणजे डिमिट्रियसच्या नांवाचें एक नाणें आहे आणि तें ग्रीक व हिंदुस्थान यांच्या नाण्यांच्या पद्धतींतील एकीकरण दर्शविणारें पहिलेंच उदाहरण आहे त्या नाण्यामध्यें ग्रीक पद्धत अनुसरली आहे, परंतु हिंदुस्थानी पद्धतीप्रमाणें आकार समचौकोन आहे, आणि त्यावर एका बाजूला दुसऱ्या बाजूवरील ग्रीक लेखाचें खरोष्ठी लिपीमध्यें भाषांतर आहे.

युक्रेटाइडीसः—याच्या हिंदुस्थानावर स्वाऱ्या ख्रि. पू. १९०-१६० वर्षें यांमध्यें झाल्या त्याचीं नाणीं बल्ख, सीस्तान, काबूल व क्वचित् पंजाब या ठिकाणीं सांपडतात.

ग्रीक-हिंदुस्थानी नाण्यांवरील तारखाः—यांचा काल समजण्याला प्लेटोचें टेट्रॅड्रम् ( चतुर्द्रम्म ) पदक ( युक्रेटाइडीच्या टेट्रॅड्रमसपासून घेतलेलें) हें एक महत्त्वाचें साधन आहे. त्यावर सेल्युसिड् शकाचें १४७ वें वर्ष ( ख्रि. पू. १६५ ) हा काल आहे. दुसऱ्या बॅक्ट्रियन नाण्यांचा काल इतका निश्चित नाहीं.

पँटाऊिॲान अॅगथॉक्लिसः—हे युक्रेटाइडीनच्या वेळेस होते आणि यांचीं नाणीं काबुल व पश्चिम-पंजाब या प्रांतांत सांपडतात. सर्व ग्रीक राजांच्या नाण्यांपैकीं यांच्याच नाण्यांवर कायती ब्राम्ही लिपी लिहिलेली आहे. अॅगथॉक्लिसच्या कित्येक तांब्याच्या नाण्यांवरील दोन्ही बाजूंवर खरोष्ठीमध्यें लेख आहेत.

अॅगथॉक्लिसः—बॅक्ट्रियन कारागिरीचीं कित्येक पदकें अॅगथॉक्लिसनें केलीं आहेत. आणि त्यांच्यावर अॅलेक्झांडर दि ग्रेट्, अँटिओकस् निकेटर, डायोडोटस, युथिडिमस यांच्या नाण्यावरहुकुम मुखवटे, नमुने व नांवनिशी आहेत. बॅक्ट्रियन राजा अँटिमेखस याच्या पदकांवरहि डायोडोटस व युथिडिमस यांच्या वरीलप्रमाणें प्रतिमा वगैरे आहेत.

अँटिमेखसः—अँटिमेखसच्या नाण्यावरील चित्रांचे प्रकार त्यानें सिंधू किंवा दुसऱ्या कोणत्यातरी मोठ्या दर्यावर मिळविलेल्या जयाचे निदर्शनात्मक आहेत.

हेलिओक्लिसः—( ख्रि. पू. १६०-१२० ) या राजाच्या कारकीर्दीत पुष्कळ ग्रीक राजांनीं बॅक्ट्रिया व हिंदुस्थान या दोन्ही देशांवर राज्य केलें होतें, आणि त्यांनीं ग्रीक अक्षरांनीं मुद्रित बॅक्ट्रियन कारागिरीचीं नाणीं, आणि द्विभाषामुद्रित हिंदुस्थानी कारागिरीचीं नाणीं अशीं दोन्हीं प्रकारचीं नाणीं पाडलीं होतीं. यावेळेपर्यंत सर्व रुप्याचीं नाणीं पूर्वीच्या जुन्या अॅटिकप्रमाणेंच पाडलीं जात असत ( ड्रॅम् = ६७.५ ग्रेन = ४.३७ ग्रॅम् ). यानंतर हळू हळू इराणी वजन सुरू झालें. हेलिऑक्लिस्, पहिला अपोलोडोटस् व अँटिआल्किडस् यांच्या नाण्यांत दोन्ही प्रमाणें वापरतात. नंतरचे सर्व ग्रीक राजे फक्त इराणी प्रमाणाचा उपयोग करीत.

हिंदुस्थानावर स्वाऱ्या करणाऱ्या सिथियन लोकांचीं नाणीं सिथियन लोकांचीं दोन निरनिराळीं घराणीं व कांहीं अनिश्चित स्वरूपाचे इतर सिथियन सत्ताधारी व कांहीं हिंदु राज्यें हीं ख्रि. पू. २ ऱ्या शतकांत उत्तर हिंदुस्थानांत एकाच कालीं अस्तित्वांत होतीं असें नाण्यांवरून समजतें.

हिंदुस्थानांतील शकांच्या पूर्वीच्या नाण्यांवर पार्थियन चिन्हें आहेत याचें कारण बहुधां ही त्यांची मैत्रीच असेल. नंतर ख्रि. पू.१० या वर्षी युएची लोकांनीं बॅक्ट्रियावर स्वारी करून तें राज्य आपल्या कबजांत घेतलें. शकांच्या ताब्यांतील मुलूख युएची लोकांनीं हिसकावून घेतल्यामुळेंच शकांच्या हिंदुस्थानांतील पहिल्या स्वाऱ्या झाल्या असाव्यात. नंतर अजमासें एका शतकांत युएची लोकांच्या पांच जातींपैकीं कुशान या जातीचे लोक सर्वांत श्रेष्ठ झाले व पॅरोपॅमिस् पर्वत ओलांडून काबूलमध्यें ग्रीक सत्तेचा जो अवशेष राहिला होता त्याचा त्यांनीं समूळ नाश केला आणि सबंध हिंदुस्थान ताब्यांत घेतलें.

जुन्या नाण्यांचें शकांकडून अनुकरणः—शक लोक बॅक्ट्रियामध्यें राज्य करीत असतांनाच मॅसिडोनियन्, सेल्युकिड् बॅक्ट्रियन व पार्थियन नाणीं यांचें अनुकरण करण्यांत आलें. या नाण्यांवरील नांवनिशी वगैरे ग्रीक नांवनिशीची विकृत अशी प्रतिकृतीच आहे. परंतु कित्येकांवर कांहीं लेख आहेत. ते तुर्कस्तानांतील अरेमियन लेखनपद्धतीचीं अत्यंत जुनाट उदाहरणें म्हणून गणिलीं गेलीं आहेत.

मॉइस किंवा मोआः--हिंदुस्थानांत शकांपैकीं सर्वांत पहिलें घराणें मॉइस् किंवा मोआचें आहे. तक्षशिला येथें तांब्याच्या पत्र्यावर भोज नांव आहे तें व हें नांव बहुतकरून एकच असावें आणि त्याचा काल ख्रि. पू. १२० वर्षांपूर्वीचा असावा. शकाच्या नाण्यांच्या कारागिरीवरून सुद्धां हेंच सिद्ध होतें; कारण ती कारागिरी नंतरच्या ग्रीक राजांच्या कारागिरीपेक्षां उत्कृष्ट आहे आणि त्यांपैकीं कांहीं नाण्यांत डिमिटियस्, अपोलोडोटस् वगैरेंसारख्या पूर्वीच्या ग्रीक राजांच्या नाणकपद्धतीचें अनुकरण केलेलें आहे. मॉइसनें पार्थियन नांवनिशी त्यांवर मुद्रित केली आहे. ही प्रथम पहिल्या मिथडेटिसच्या नाण्यावर दिसून येतें. मॉइसच्या घराण्याचीं नाणीं फक्त पंजाबमध्यें सांपडतात ( अफगाणिस्तानांत सांपडत नाहींत ). यावरून असा तर्क निघतो कीं शकांची ही जात हिंदुस्थानांत काराकोरम घाटानें शिरून काश्मीरमधून पंजाबमध्यें आली.

व्होनोनीसः—या घराण्याचीं नाणीं कंदाहार, गझनी, व सीस्तन यांसभोंवतालच्या प्रदेशांमध्यें सांपडतात. या राजांचीं नांवें पार्थियन नांवांसारखींच लागतात ( म्हणून त्यांना कधीं कधीं इंडो--पार्थियन असेंहि म्हणतात ). हा प्रदेश पहिल्या शतकामध्यें एका ( गोंडो फेरीज या ) पार्थियन घराण्याच्या अमलाखालीं होता. यावरून हे मूळचे

पार्थियन होते हें सिद्ध होतें. मात्र मॉईस हा शक होता व व्होनोनीस हा पार्थियनच होता असें विधान करणें बरोबर नाहीं.

व्होनोनीस् व अझीझः--ज्याअर्थीं व्होनोनीस व मॉइसच्या नंतरचा राजा अझीस हे एकत्र मिळून नाणीं पाडीत असत त्याअर्थीं त्या नाण्याचा काल ख्रि. पू. पहिलें शतक हा असावा. या दोन घराण्यांमध्यें संबंध कोणता होता हें सांगतां येत नाहीं; परंतु एवढें मात्र दिसतें कीं त्यांचीं जेव्हां एकत्र नाणीं निघत तेव्हां बहुशः व्होनोनीसच्या घराण्यांतील मंडळींचीं नांवें नाण्याच्या एका बाजूस असून दुसऱ्या बाजूस मॉइसच्या घराण्यांतील मंडळींचीं नांवें असत. असल्याच दुसरीकडे आढळलेल्या उदाहरणांच्या प्रमाणावरून अशी कल्पना करतां येईल कीं व्होनोनीसच्या घराण्याचा एक प्रकारचा या दोहोंमध्यें वरिष्ठपणा असला पाहिजे. अझीस एक कीं दोन, व ते मॉइसच्या घराण्यापैकींच आहेत कीं काय, या गोष्टी निश्चित नाहींत.

मथुरेचे सत्रपः—मथुरेचे सत्रप यांनां शकसत्रपच बहुधां समजतात. ते बहुधां ख्रि. पू ५० पासून ख्रिस्ती शकाच्या आरंभापर्यंत होते. त्यांच्या इतिहासावर मथुरेंतील सिंहाच्या मूर्तींवरील लेख व इतर नजीकचे शिलालेख यांनीं बराच उजेड पडतो.

रंजुबुलः—पहिला सत्रप रंजुबुल हा ग्रीक राजा दुसरा स्ट्रॅटो याच्या नाण्यांसारखें नाणें पाडीत असे. सिंहलेखांतील मोठा सत्रप कुसुलअपतिक आणि लियककुसुलकाचा मुलगा छत्रपपतिक हे एकच असले पाहिजेत. रंजुबुलाच्या नाण्यांचा दुसरा एक वर्ग ( ज्यांच्यावर राजुबुल हें नांव ब्राह्मीमध्यें लिहिलेलें आहे ) आणि मथुरेच्या सत्रपांचीं नाणीं यांचा व पंचालांचीं ( शुंगांचीं ) व मथुरेच्या हिंदु राजांचीं नाणीं यांचा, कारागिरी व प्रकार यांच्या दृष्टीनें पाहतां साधारणतः परस्परसंबंध दिसून येतो.

दुसरे शकसत्रपः--कुशान सत्तेच्या पूर्वीच्या कालांत अस्तित्वांत होते अशी ज्यांच्याविषयीं साधारणपणें समजूत आहे अशा दुसऱ्या कांहीं सिथिक राजांच्या नाण्यांचा काल सध्यां अनिश्चित आहे. त्यांपैकीं कांहीं माडझनंतरचे राजे--एझिस् आणि एझिलिसिस् यांच्या नाण्यांवरून घेतलीं आहेत, आणि त्यांच्यावर 'सत्रप' हें नांव असल्यामुळें तीं बहुधां याच घराण्यांतील सत्रपांनीं पाडलीं असावींत. यांपैकीं सत्रप झीओनिसिस् याचा काल बहुधां ख्रि. पू. ८० वर्षें हा असावा. अर्तासचा मुलगा खरभोस्ट याचीं ओबडधोबड नाणीं या कालानंतरच्या कालांतील होत.

अनिश्चित वर्गः—पुढील सिथिक राजे कोणत्या देशाचे अथवा जातीचे तें अनिश्चित आहे ( त्यांचीं नाणीं ख्रि. पू. पहिल्या शतकांतील उत्तर भागांतलींच असावींत असें दिसतें).

मायस् किंवा हिरेअस्ः—प्रथम हा शक असावा असें मानण्यांत आलें होतें आणि त्याच्या पदकावरील लेख वाचून त्याचा अर्थ शकांचा राजा असा केला होता. परंतु कोणी त्याला दुसऱ्या जातीचा मानतात. द्विभाषायुक्त असें एक तांब्याचें नाणें मायसनेंच पाडलें असें कोणी म्हणतात; पण हें कितपत खरें आहे याची जबरदस्त शंका आहे. मायसच्या नाण्याची कारागिरी व वरील चित्र हीं हिरक्रोडिसच्या नाण्यांच्यासारखींच आहेत ( हीं नाणीं ख्रि. पू. १२० वर्षांनंतर बॅक्ट्रियामध्यें कुशान किंवा युएची यांनीं पाडलेल्या नाण्यांपैकींच असावींत ). ननैया देवीचें नांव असणारीं सपलीझिसचीं नाणीं याच वर्गांतलीं होत.

हिंदु-चिनी नाणींः—काशगरच्या आसमंतात् कांहीं तांब्याचीं नाणीं सांपडलीं आहेत, त्यांच्यावर खरोष्ठी व चिनी लिपींतील अक्षरें आहेत. चिनी लिपीमध्यें नाण्यांचें वजन किंवा किंमत दिलेली आहे. खरोष्ठीमध्यें लिहिलेलीं अक्षरें अपूर्णच आहेत, परंतु तीं राजांचीं नांवें आहेत यांत शंका नाहीं.

स्था नि क ना णीं, ( इ. स. ५० पर्यंतचीं. )अल्मोराः—हिमालयांत अल्मोरा जिल्ह्यांत तीन प्रकारचे नमुने आढळले आहेत. रुपें व इतर कांहीं धातू यांच्या मिश्रणापासून नाणीं बनविलेलीं दिसतात, व हिंदुस्थानांतील इतर नाण्यांपेक्षां तीं जड आहेत. त्यांच्यापैकीं दोन्हीवर शिवरत व शिवपालित हीं नांवें ब्राह्मी लिपीमध्यें लिहिलीं आहेत. पंचालांच्या नाण्यांप्रमाणें उलट्या बाजूला चैत्याचा कठडा आहे आणि सुलट्या बाजूला कुणिंदाच्या नाण्याप्रमाणें एक हरिण दिसतें.

अपरान्तः—या नाण्यांवर 'महाराजस अपलातस' हीं अक्षरें आहेत. ज्याअर्थीं तीं मथुरेच्या क्षत्रपाच्या नाण्यांसारखीं व नजीकच्या हिंदु राजांच्या नाण्यांसारखीं आहेत त्याअर्थीं त्यांचा काल ख्रि. पू. १ ल्या शतकाचा उत्तरार्ध अथवा इ. सनाच्या १ ल्या शतकांतील पूर्वार्ध हा असावा.

आर्जुनायनः—हीं नाणीं वरील नाण्यांच्या वर्गांतलींच आहेत आणि त्यांचा कालहि तोच आहे. या नांवाचा उल्लेख अलाहाबाद येथील समुद्रगुप्ताच्या स्तंभावरील शिलालेखांत सांपडतो.

औदुम्बर अथवा ओदुम्बरः—पठाणकोट प्रांतामध्यें सांपडलेली नाणीं ग्रीक राजा अपोलोडोटस् याच्या हेमिड्रॅम्स ( अर्धद्रम्म ) सारखीं आहेत व तीं व हीं दोन्ही एकत्रच सांपडतात. म्हणून त्यांचा काल बहुधां ख्रि. पू. १०० वर्षें हा असावा. त्याचप्रमाणें औदुंबर नाणें व अझिलिसिसचें एक नाणें यांमध्येंहि तसाच सारखेपणा आहे. कुनिंदांच्याप्रमाणेंच औदुम्बरांच्यावर ब्राह्मी व खरोष्ठी लिपींतील अक्षरें आहेत.

अयोध्याः—येथील जुनाट नाणीं केवळ ओतीव तुकडेच आहेत. त्यांचा काल बहुधां ख्रि. पू. २०० वर्षें हा असावा. बरीचशीं ओतीव समचौकोनी नाणीं ख्रि. पू. २ ऱ्या शतकांतील असून याच किंवा यानंतरच्या शतकांतील मित्र हीं

अक्षरें शेवटीं असलेल्या नांवानीं युक्त अशीं दुसरीं नाणीं असावींत. या मित्र नाण्यांचा व उत्तरपंचालांतील नाण्यांचा संबंध व दोन्हींचाहि शुंग घराण्याशीं संबंध यांविषयीं सध्यां बरीच अनिश्चितता आहे.

बारानः—संयुक्तप्रांतांतील बुलंदशहराचें हें जुनें नांव होतें असें कनिंगहॅम म्हणतो व त्या नाण्यांवरील नांवाचा पाठ 'गोमितस बारानाया' आहे असें कित्येकांचें म्हणणें आहे; परंतु बुल्हरनें दाखविल्याप्रमाणें या गांवाचें पाहिलें नांव वरण होतें, हा गोमित्र व मथुरेच्या राजांपैकीं एक गोमित्र हे एकच समजले जातात. परंतु त्यांच्या नाण्यांची तऱ्हा निराळी आहे आणि त्यांवरील ब्राह्मी लिपी अधिक पुरातनकालाची दिसते.

एरण-ऐरकिनः—मध्यप्रांत, सागर प्रदेशांतील या शहरांत सांपडलेलीं नाणीं म्हणजे शुद्ध भारतीय नाण्यांचा नमुना म्हणून प्रसिद्ध आहेत. ठसेपद्धतीची पुढें सांचापद्धत कशी केली हें येथें समजतें. प्रथम कांहीं चिन्हें किंवा खुणा नाण्यांवर वेळोवेळीं ठसा मारून करीत असत. नंतर ठशामधून काढून या सर्व चिन्हांचा एक सांचा बनविला. परकीय पद्धतीचा ज्या भागांमध्यें प्रसार झालेला नव्हता, अशाच भागांमध्यें वरील प्रकार बहुधां घडत असे.

जनपदः—[ राजम ( राजन्य ) अशा नांवाचे हे लोक असावेत ] जनपद अशीं अक्षरें लिहिलेल्या नाण्यांबद्दल कांहीं समाधानकारक माहिती नाहीं ( हीं अक्षरें कधीं ब्राह्मींत तर कधीं खरोष्ट्रींत लिहिलेलीं असत ). राजसत्ता असा त्यांपासून अर्थ निघतो असें कित्येकांचें म्हणणें आहे. खरोष्ट्रींत लिहिलेलीं नाणीं अधिक पूर्वीचीं असावींत असें दिसतें.

काडः—काड हीं ब्राह्मीमध्यें लिहिलेलीं अक्षरें ज्यांच्यांवर आहे तीं ओंतीव तांब्याचीं नाणीं कोणी केलीं हें निश्चित नाहीं. 'काड राजाचें' असा कित्येक त्याचा अर्थ बसवितात.

कोसाम्बी किंवा वत्स-पट्टणः-( अलाहाबाद जिल्ह्यांमधील एक जुनें शहर) मोठीं ओंतीव नाणीं ( ज्यांची वर वर्णिलेल्या 'काडस' नांव असलेल्या नाण्यांशीं तुलना करतां येईल ) ख्रि. पू. ३ ऱ्या शतकांतील असावींत; दुसरीं पुढच्या दोन शतकांतील असावींत. पंचालांचीं नाणीं व अयोध्येचीं नाणीं यांच्याशीं त्यांची तुलना करतां येईल.

कुनिंदः—सतलजच्या दोन्ही बाजूंवरील डोंगराळ प्रदेश हा कुनिंदांचा प्रांत असावा ( त्या प्रांतांत हल्लीं कुनेत किंवा कुनाईत लोक राहतात ). या नाण्यांचे दोन निरनिराळे काल होतात; त्यांपैकीं प्रथमच्या कालांतल्या ( ख्रि. पू. १०० वर्षें ) नाण्यांवरील अक्षरें औदुंबरच्या नाण्याप्रमाणें ब्राह्मी व खरोष्ट्री या दोन्ही लिपींमध्यें आहेत, व तीं अपोलोडोटसच्या अर्धद्रम्म बरोबरच सांपडतात. नंतरचीं नाणीं बहुतेक इ. स. ३ किंवा ४ यांमधील असावींत. त्यांवरील ब्राम्ही लिपी अलीकडल्या पद्धतीची आहे आणि त्यांच्यावर कुशानांच्या तांब्याच्या नाण्यांचा परिणाम झालेला दिसतो.

यौधेयांच्या नाण्यांचे सुद्धां असेच वर्ग पडतात; यावरून हीं हिंदु घराणीं ग्रीक कुशानांच्या नंतर उदयास आलीं.

मालवः—'मालवानां जय' अशीं अक्षरें असलेलीं नाणीं पूर्वी जुनीं म्हणून समजलीं जात; त्यांच्या नांवनिशीची तऱ्हा व पद्मावतीच्या नागांच्या नाण्यांप्रमाणें त्यांची कारागिरी यावरून इ. स. ५ वें शतक या पूर्वीचा त्यांचा काल नसला पाहिजे असें दिसतें.

मथुराः—मथुरेच्या आसपास ख्रि. पू. निदान तिसऱ्या शतकापूर्वीचें एक जुनाट नाणें सांपडलें, त्यावर उपातिक्या हीं अक्षरें ब्राह्मी लिपींमध्यें आहेत. बलभूतीच्या नाण्यांवर ख्रि. पू. २ ऱ्या शतकांतील ब्राम्ही लिपीचीं अक्षरें आहेत. कित्येकांच्या मतें मथुरेंतील इतर दुसऱ्या नाण्यांचा काल म्हणजे मथुरेंतील इतर शकांच्या ऱ्हासाचा काल होय. परंतु रामदत्ताचीं कांहीं नाणीं निःसंशय यापूर्वीचीं दिसतात, कारण त्यांच्यावर पंचालांच्या नाण्यांचा विशेष जो चतुष्कोणी खोल ठसा तो एका बाजूला आहे. बलभूतीचीं नाणीं व बहसतिमिताचीं ( सं. बृहस्पतिमित्र ) नाणीं यांच्यावर एक चैत्य-वृक्ष आहे आणि त्यांच्यावरील अक्षरें सारखीं आहेत. यावरून असें दिसेल कीं त्या हिंदु राजांपैकीं कांहींजण तरी शक-क्षत्रपांच्या पूर्वीं झाले असले पाहिजेत व शकांनीं हिंदु राजांच्यासारखींच नाणीं पाडलीं असावींत.

पंचालः—हीं नाणीं शुंग किंवा 'मित्र' घराण्यांतील राजांनीं पाडलीं असें समजतात; परंतु यांत अडचणी अशा आहेतः—( १ ) हीं बरींचशीं नाणीं पूर्वीच्या पंचाल देशांत म्हणजे सध्यांच्या रोहिलखंडामध्यें सांपडतात; आणि दुसऱ्या अनेक गोष्टींवरून असें दिसतें कीं शुंगांचें राज्य पूर्व माळव्यामध्यें होतें. ( २ ) नाण्यांवर एकंदर १२ नांवें आहेत आणि त्यांपैकीं एकच ( अग्निमित्र ) पुराणामध्यें दिलेल्या शुंग घराण्याच्या यादींत सांपडतें. परंतु पुन्हां दोन्हींतील नांवांचीं अंत्याक्षरें 'मित्र' हीं आहेत; आणि पुराणांवरून कल्पिलेला शुंगांचा काल ( ख्रि. पू. १७६-६६ ) आणि नाण्यांच्या पद्धतीवरून वगैरे दिसून येणारा त्यांचा काल एक आहेत. या नाण्यांमध्यें व अयोध्येंतील मित्रांच्या नाण्यांमध्येंसुद्धां कांहीं तरी संबंध असावा. या पंचालनाण्यांवर ब्राह्मी अक्षरें आहेत.

पुरी व गंजमः—ओरिसांतील पुरीमध्यें आणि त्यालगतच्या मद्रासमधील गंजम जिल्ह्यांत ब्रॉंझ ( कांसें ) धातूचीं कांहीं चमत्कारिक नाणीं सांपडतात. त्यांच्यावर नांवनिशी वगैरे कांहीं नाहीं; परंतु त्यांची घाटणी कनिष्काच्या वेळेच्या कुशानांच्या कांशाच्या नाण्यापासून घेतलेली दिसते. म्हणजे एका बाजूवर राजाची उभी मूर्ति आणि दुसऱ्या बाजूवर कोणत्यातरी देवतेची मूर्ति असते. हीं नाणीं पुरीमध्यें सांपडलीं म्हणून जेव्हां प्रसिद्ध झालीं त्यावेळीं तीं व साधीं ब्रॉंझ धातूचीं कुशान नाणीं हीं एकत्र आढळलीं. यावरून तीं दोन्ही एकाच वेळीं प्रचलित होतीं असें दिसतें. एवढें खरें

कीं, कुशान नाणीं साधारणतः पुरी किंवा गंजमपर्यंत आलीं नाहींत. यावरून खऱ्या नाण्यांसारखीं जीं औतीव नाणीं केलीं तीं बहुतेक त्याच कारणास्तव केलीं असावींत; म्हणून तीं नाणीं अशी न गणतां अलीकडील 'रामटंकां'प्रमाणें देवाला द्यावयाच्या भेटी म्हणून समजलीं जावीं. कसेंहि असलें तरी कनिष्काची कारकीर्द व कुशान राज्याचा शेवट यांच्यामधल्या कालांत तीं असावींत.

सिबीः—हे चितोडच्या आसपासचे रहिवाशी असून यांचीं नाणीं चितोडजवळ नगरी(प्राचीन'मध्यमिका')येथें सांपडतात.

तक्षशिलाः—( रावळपिंडीप्रांत, हल्लींची शाहढेरी किंवा ढेरीशाहान ) ठशांनीं नाणें पाडण्याची कला हिंदुस्थानांत येथेंच प्रथम माहीत झाली. अगदीं प्रथमच्या नाण्यांवर एकाच बाजूला छाप आहे आणि धातु अर्धवट तापविलेल्या स्थितींत असतांना छाप मारला आहे. यामुळें ठशाचा छाप नाण्यावर खोल पडला असून ठशावरील चिन्हें स्पष्ट उमटलीं आहेत. या तक्षशिलेंतील समचौकोनी नाण्याप्रमाणें, ग्रीक राजे पँटालिऑन् व ॲगॅथॉक्लिस् ( ख्रि. पू. १९० ) यांनीं ताम्र्यांचीं नाणीं पाडलीं; यांच्यावर दोन्हीं बाजूला ठसे होते.

त्रिपुरी किंवा त्रिपुराः—जबलपुर, तेवारचें जुनें नांव; या नाण्यांवर ख्रि. पू. ३ ऱ्या शतकांतील ब्राम्ही लिपींचीं अक्षरें आहेत.

उज्जनीः—पूर्वींच्या नाण्यांवर ख्रि. पू. २ ऱ्या शतकांतील ब्राम्ही लिपीमध्यें 'उजेनिय' असें नांव आहे. सध्यां माहीत असलेल्या दुसऱ्या नाण्यांवर कोणतीं नांवनिशी नाहीं. परंतु त्यांच्यावर या प्रांताला विशिष्ट असलेलें एक चिन्ह आहे.

वटस्वकः—पँटालिऑन् व ॲगॅथॉक्लिस् यांच्या तांब्याच्या समचौकोनी नाण्यांप्रमाणें यांच्यावरील नांव ब्राम्हीमध्यें आहे. हीं नाणीं पूर्वींच्या एक ठशाच्या नाण्यांपासून घेतलीं असल्यामुळें वटस्वक नाण्यांचा काल ख्रि. पू. २०० वर्षांचा असावा.

यौधेयः—हल्लींचे भावलपूरचे जोहिये व हे एकच असें समजतात, परंतु पूर्वीं त्यांचा देश यापेक्षां अधिक विस्तृत होता. यांच्या नाण्यांचे दोन भाग पडतात. ( १ ) लहान तांब्याचीं नाणीं; जरी यांची कारागिरी ओबडधोबड होती तरी त्यांची इतर बाबतींत पूर्वींच्या औदुंबर व कुणिंद यांच्या नाण्यांशीं तुलना करतां येईल. ( २ ) मोठीं तांब्याचीं नाणीं; यांची कारागिरी व प्रकार पाहातां यावर कुशानांचा परिणाम झालेला दिसतो;या नाण्यांवर सहा डोक्यांच्या देवतेचा-कदाचित कार्तिकेयाचा-ठसा आहे. तीं त्यांतल्यात्यांत नंतरच्या कालांतील असावींत; पहिलीं ख्रि. पू. १०० सुमारचीं आहेत.

इंडो-पार्थियन नाणींः—इंडो-पार्थिअन या घराण्यांतील गोंडोफेरीज हा पुरुष फार सुप्रसिद्ध झाला.

गोंडोफेरीजः—तख्त-इ-बाहि येथील लेखांतील १०३ हें विक्रम संवत् धरून अशी माहिती मिळते कीं, गोंडोफेरीजच्या कारकीर्दीतील सन २१ हें पहिलें वर्ष होतें. याचा व नाण्यांवरील ग्रीक नांवांवरून वगैरे मिळणाऱ्या पुराव्याचा मेळ बसतो. अस्पवर्मा हा प्रथम एझीस याचा व नंतर गोंडोफेरीज याचा मांडलिक किंवा सत्रप ( सुभेदार ) होता असें नाण्यांवरून सिद्ध होतें. या गोष्टीनें त्या दोन घराण्यांचा संबंध जुळतो. गोंडोफेरीजच्या अगर त्याचा पुतण्या ॲब्दगेसीस याच्या वेळेच्या सुमारास त्यांचे तक्षशिलेच्या आसपास सुभेदार किंवा मांडलिक असलेले 'सस्सन, सपेदन, सतवस्त्र' इत्यादि राजांचीं रुप्याचीं नाणीं तक्षशिला येथील उत्खननांत अलीकडे उघडकीस आलेलीं आहेत. सस्सानियन कारागिरीच्या कांहीं नाण्यांनां इंडोपार्थियन असें कित्येकांनीं चुकीनें म्हटलें आहे. परंतु तीं बहुतेक उत्तरहिंदुस्थानांतील कोणत्यातरी घराण्यानें केलीं असावीं; त्यांचा काल इ. स. ६ वें शतक असावा.

कुशान नाणींः—ख्रि. पू. १२० या वर्षांच्या सुमारास युएची लोक हे बॅक्ट्रिआ व पॅरोपॅनिसस्चा उत्तरेकडील प्रदेश, यांमध्यें फार बळाढ्य होऊन बसले.

हरमेऑसः—कुजुल कडफिसेस व हरमियसचें राज्य कुशानांनीं कसें घेतलें याचा पुरावा नाण्यांवरून मिळतो. प्रथम हरमेऑसचीं एकट्याचींच नाणीं होतीं मग कुजुल कडफिसेस व हरमेऑस यांचीं व नंतर फक्त कुजुल कडफिसेस याचीं होतीं. हिंदुस्थानावरील स्वारी त्याच्या नंतरच्या राजानें केली असें म्हणतात. या राजानें कोणतीं नाणीं पाडलीं यासंबंधीं तितकी खात्री नाहीं. ऑगस्टस्च्या दिनारासारखीं त्याचीं नाणीं होतीं.

पंजाब, कंदाहार व काबुल या ठिकाणीं सर्वत्र एका निनांवी राजाचीं पुष्कळशीं नाणीं सांपडतात,यावरून त्याच्या राज्याचा विस्तार दिसून येतो.त्या नाण्यांवरील कारागिरी व अक्षरें यावरून कित्येक गोष्टी सिद्ध करतां येतात.त्यांचा व मिऑसच्या नाण्यांचा ठसा सारखा आहे. म्हणजे उलट्या बाजूला घोडेस्वार आहे आणि कडेला नक्षीहि सारखी आहे. शिवाय तो निनांवी राजा जी खूण वापरतो तीच खूण व्हिमकडफिसेस व त्याच्यानंतरचे राजे यांचीहि आहे; एका नाण्यावर एका बाजूस दोन तोंडें असलेला मुखवटा आहे व एका तोंडापुढें निनावी राजाचें व दुसऱ्यापुढें व्हिमकडफिसेसचें अशीं चिन्हें आहेत; यावरून हे दोन्ही राजे एकाच कालांतले असावेत. फॉन् गुशमिड्च्या मतें तो हिंदु राजा आग्निवेश्यच असावा. निनांवी राजा व विक्रमादित्य हे एकच असाहि कित्येक संशोधकांचा तर्क आहे. ( कनिंगहॅमच्या मतें खरोष्ठीमधील 'वि' हें विक्रमादित्याचें आद्याक्षर असावें आणि हा निनावी राजा जर विक्रमादित्यच असेल तर विक्रम-संवत् हा त्याच्या जन्मदिवसापासूनच सुरू झाला असें धरलें पाहिजे.).

व्हिमकडफिसेस यानेंच सुवर्णाचीं नाणीं प्रथम काढलीं व पुढें उत्तरहिंदुस्थानची मालकी गुप्तांच्याकडे आल्यावर

त्यांनींहि तीच पद्धत चालू ठेवली. युक्रेटाइरीचीं दोन किंवा तीन सुवर्ण नाणीं, मिनँदरचें एक, कदाचित् तक्षशिलेचें एक; यांशिवाय हिमकडफिसेसच्या पूर्वी दोन शतकांमध्यें पाडलेल्या नाण्यांचे नमुने, हल्लीं उपलब्ध नाहींत. कुशानांनीं इतकीं सोन्याचीं नाणीं पाडण्याचें कारण हेंच कीं त्यावेळीं रोममधून बरेंचसें सोनें हिंदुस्थानांत आलें होतें. यावेळीं रोमन-लोकांचेंच वजनाचें प्रमाण स्वीकारण्यांत आलें होतें ( औरीज् १२४ ग्रेन;अ. = ८०३५ ग्रेन ). दोन आवरींच्या वजनाचीं नाणीं फक्त हिमकडफिसेसनेंच पाडलीं होतीं. त्याच्या-नंतरच्या राजांचीं सर्वांत मोठीं सुवर्णनाणीं फक्त आवरीच आहेत. त्यांच्या नाण्यांवरील अक्षरें ग्रीक व खरोष्ठीमध्यें आहेत. त्याच्यानंतरच्या ३ राजांच्या नाण्यांवरील अक्षरें फक्त ग्रीकमध्येंच आहेत. नंतर ग्रीक अक्षरें ओळखतां येईनात म्हणून नागरी अक्षरें व शिक्के प्रचारांत आले.

कनिष्क व हुविष्कः—यांचीं नाणीं फार महत्त्वाचीं आहेत. त्यांच्यावरून त्या काळीं पाहिजे त्या धर्मांतील पाहिजे तीं मतें व दैवतें घेण्याचें धर्मस्वातंत्र्य दिसून येतें; कारण त्यांच्या नाण्यांच्या उलटया बाजूवर ग्रीक व सिथिक देवांच्या आणि बुद्धाच्या प्रतिमा आहेत.

इ. स. १८० नंतर कुशानांचीं सुवर्णाचीं व तांब्याचीं नाणीं चालू राहिलीं, परंतु ग्रीक लेखावरून यानंतर कांहीं माहिती मिळूं शकत नाहीं. त्या नाण्यांच्या उलटया बाजूवर कोठें कोठें अर्थहीन नागरी अक्षरें किंवा छाप उठविलेले आढळतात. हीं नाणीं बहुतकरून स. १८० पासून तें स. ४२५ पर्यंत चालू असावींत.

नाण्यांच्या स्थलावरूनहि त्यांचें पौर्वापर्य ठरवितां येण्यास मदत होईल. ज्या नाण्यांवर शिव आणि नंदी यांचा छाप, कुशान वासुदेवाच्या नाण्यांवरील छापासारखा आहे तीं नाणीं बहुतेक काबूलमधील असावींत;तींच पद्धत सिथो–सस्सानियन लोकांनीं घेतली. ज्यांच्यावर एक बसलेली देवता आहे तीं बहुतेक कुशानांच्या राज्यांतलि पूर्वेकडील भागांतील असावींत; त्यांचीच नक्कल किदार, कुशान व गुप्त यांनीं केली. उलटया बाजूवर आपल्या पूर्वजांचीं ग्रीक नांवें तशींच्या तशींच ठेवून हीं नाणीं पुढें कुशानांनींच पाडलीं असतील हेंहि शक्य आहे.

सिथो-सस्सानियनः—पॅरोपोनिससच्या उत्तरेकडील ऑक्सस-सवरील प्रांतांतून बहुधां हीं नाणीं येतात; परंतु तीं काबुल-मध्येंहि केव्हां केव्हां सांपडतात. त्यांचा कालावधि पुढील गोष्टींवरून साधारणतः ठरवितातः—( १ ) कांहीं अगदीं पूर्वीच्या नाण्यांवर सस्सानियन राजा दुसरा अहुर्मझ्द याचा मुकुट व नांव आहे ( अहुर्मझ्द दुसरा. स. ३०१-३१० ). (२) यानंतरचा काल म्हणजे इ. स. ४५० हा होय. या निर-निराळ्या नाण्यांवर तत्कालीन सस्सानियन राजाचा मुकुट आणि वाईट अशा ग्रीक लिपीमध्यें त्याचें नांव व पदव्या यांचा छाप असतो. डूरुइनच्या मतें, हीं नाणीं युएची किंवा कुशान या लोकांचीं स्वतःचींच आहेत; आणि सस्सानियन नांवें व मुकुट जे त्यांच्यावर आहेत त्याचें कारण असें आहे कीं,युएची व सस्सानियन राजे यांच्यामधील पुष्कळ दिवसांच्या मैत्रीमुळें युएची लोकांनीं तीं दोन्हीं त्यांच्यापासून घेतलीं असावीं. ॲरेकोसिआ आणि बॅक्ट्रिया या प्रांतांत तीं नाणीं पाडलीं गेलीं.

किदार किंवा लहान कुशानः—चिनी ग्रंथांवरून असें दिसतें कीं, किदार कुशान हे उत्तरेकडे सिंधूच्या पश्चि-मेला चित्रळ व गिलजीतमध्यें व पूर्वेस परश्वली व काश्मीर मध्यें गेले; त्यांचीं नाणीं काश्मीरमध्यें सांपडतात. किदार कुशानांच्या नाण्याच्या एका बाजूला एक बसलेली देवता आहे. व तीच नंतरच्या मोठ्या कुशानांच्या नाण्यांची विशिष्ट खूण आहे. यावरून गांधारपेक्षां काश्मीरमध्येंच तीं पाडलीं असा-वींत. त्यांच्या एका बाजूवर घराण्याचा संस्थापक जो किदार त्याचें नांव आहे आणि दुसऱ्या बाजूवर राज्यावर असणाऱ्या त्या त्या राजाचें नांव आहे.

क्षहरातः—नहपान याचें वर्णन क्षहरात ( ब्राह्मी) = छह-रात ( खरोष्ठी ) असें त्याच्या नाण्यांवर केलेलें आहे. या घराण्याचींच अशीं खात्रीचीं नाणीं नहपानाच्या नाण्या-शिवाय रुथ्यां माहीत नाहींत.

सुराष्ट्राचे सत्रपः—या घराण्यांतील पहिला पुरुष चष्टन; यानेंच शककालाची स्थापना केली अशी समजूत आहे. पहिले दोन सत्रप चष्टन व जयदाम यांच्या कारकीर्दींत आंध्रांच्या सार्वभौमत्वाविषयीं लढा सुरू होऊन तें सार्वभौ-मत्व पुन्हां प्रस्थापित झालें असावें. अगदीं पूर्वींच्या नाण्यां-वरील पदव्या ‘ महासत्रप ’ व ‘सत्रप’ या असून यांमधील भेदाची फोड पुढीलप्रमाणें करतां येईल—

नहपान आणि चष्टन व त्यांच्यानंतरचे राजे यांचीं रुप्याचीं नाणीं हीं पंजाबच्या ग्रीक राजांच्या अर्धद्रामापासून घेतलीं आहेत आणि त्यांच्या वजनाचें प्रमाणहि त्यांच्याचसारखें आहे ( फारशी–हेमिद्राम = ४३२ ग्रेन किंवा २८ ग्रॅम ). नाण्यांवर ग्रीक लिपीमध्यें लिहिलेलीं कांहीं तुटक तुटक अक्षरें दिसून येतात यावरून ही वरील गोष्ट सिद्ध होते. हीं अक्षरें पुढें केवळ शोभा म्हणून सत्रप नाण्यांच्या एका बाजूवर उठवीत असत.

चष्टनाच्या नाण्यांवर, नहपानाच्या नाण्याप्रमाणें नागरी व खरोष्ठीमध्यें अक्षरें आहेत, व नंतरच्या सर्व नाण्यांवर फक्त नागरी अक्षरेंच आहेत. यावेळचें नाणें बहुतेक रुप्याचें आहे. परंतु तांबें व मिश्रधातु यांच्याहि नाण्यांचे मासले आहेत. राज्यावर असलेल्या सत्रपाचें व त्याच्या बापाचें अशीं दोन्हीं नांवें व त्यांच्या पदव्या या नाण्यांवर आहेत. या गोष्टी व एका बाजूवर असलेल्या तारखा यांच्या साहाय्यानें या घराण्याची रूपरेषा बरीच बिनचूक रीतीनें काढतां येते. पहिल्या दामाजदश्रीचा मुलगा सत्यदामन् याच्या नाण्यांवर शुद्ध संस्कृतांतील अक्षरें आहेत. सत्रप नाण्यांवरील तारखा किंवा सन हे रुद्रदामन्च्या जुनागड येथील शिलालेखांतील

७३ व्या वर्षापासून सुरू होतात. नाण्यावरील सन पांचवा सत्रप जीवदामन् याच्या कारकीर्दीतील १०० या वर्षापासून सुरू होतात व घराण्याच्या शेवटापर्यंत ते आहेत. गुप्तांच्या हल्ल्यामुळें जेव्हां सत्रपांचें घराणें मोडकळीस येऊं लागलें तेव्हां कोणतीच नाणीं न पाडलीं जाणें शक्य आहे. हिंदुस्थानांतील या भागांत प्रथम जीं गुप्तांनीं नाणीं पाडलीं त्यांचे सन नीट वाचतां येत नाहींत.

आभीरः—पुराणांतील घराण्यांच्या यादीवरून व नाशिक येथील शिलालेखावरून हीं नांवें आपणांस समजतात. त्यांच्या वेळचा ईश्वरदत्त हा आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या व दुसऱ्या वर्षी नाणीं पाडतो. नांवाची तऱ्हा आणि कारकीर्द नोंदण्याची पद्धत यांपासूनहि वरील तर्काला आधार मिळतो.

आंध्र.—आंध्र ( आंध्रभृत्य किंवा सातवाहन ) यांच्या अंमलाखालीं फक्त दक्षिण हिंदुस्थानांतील प्रांतच होते. त्यांच्या नाण्यांच्या वेळेचा त्यांचा इतिहास क्षहरांत व सुराष्ट्र आणि माळवा यांचे सत्रप यांच्या इतिहासाशीं संलग्न आहे. आंध्र नाण्यांचे दोन मुख्य वर्ग व राज्याचे पूर्व व पश्चिम असे दोन विभाग यांचा एकमेकांशीं मेळ बसतो. दोन्हीं वर्गांतील नाण्यांवर नांवें तींच आहेत. परंतु पश्चिमेकडील नाणीं, जीं कोल्हापूर संस्थानांत मुख्यत्वें सांपडतात, त्यांमध्यें व गोदावरी व कृष्णा प्रदेशामध्यें मुख्यत्वें सांपडणारीं पूर्वेकडील नाणीं यांमध्यें तफावत अशी दिसतें कीं त्यांचे सांचे निराळे आहेत. आणि पश्चिमेकडील नाण्यांवर दिसून येणाऱ्या पदव्या किंवा नांवें हीं पूर्वेकडील नाण्यांवर आढळून येत नाहींत.

पूर्व आणि पश्चिम आंध्र नाण्यांच्या प्रकारावरून पुढील गोष्टी सुचतात. ( १ ) चष्टन व त्याच्यानंतरचे राजे यांच्या नाण्यांवरील वैशिष्टयदर्शक जें 'चैत्य'चिन्ह तें आंध्रांच्यापासून घेतलें आहे. चष्टन घराण्याचीं तांब्याचीं नाणीं मूळ आंध्रांपासून घेतलीं असावींत असें दिसतें. (२) दुसऱ्या नाण्यांची पद्धत व सांचे यांच्यावरून कांचीच्या पल्लवांच्या नाण्यांशीं त्यांचा संबंध होता असें दिसतें.

वर जीं आंध्र नाणीं सांगितलीं तीं सर्व शिशाचीं किंवा तांब्याच्या एका विशिष्ट मिश्रणाचीं आहेत. त्यांच्यावरील कारागिरी उत्तरेकडील नाण्यांपेक्षां फार निराळी आहे. आणि त्यांच्या वजनाच्या प्रमाणाविषयीं कांहींच निश्चयपूर्वक सांगतां येत नाहीं. आणखी एक तिसरा वर्ग आहे; त्याचा नमुना सोपारा येथील स्तूपांत सांपडला. तीं नाणीं रुप्याचीं आहेत. त्यांची कारागिरी व पद्धत हीं सुराष्ट्र व माळवा येथील सत्रपांच्या प्राचीन नाण्यांप्रमाणें आहेत. आणि बहुधां दोहोंचेहि वजनाचें प्रमाण सारखेंच असावें.या नाण्यांवर "सिरियञ गोतमीपुत सातकर्णि" हीं अक्षरें आहेत.

आंध्र घराण्यांतील कोणते राजे कोणाच्या मागून राज्यावर बसले व केव्हां बसले व कोणतीं नाणीं कोणत्या राजानें पाडलीं हें अनिश्चित आहे. 'रञो गोतमीपुतस विसिळि रायकुरस ' हीं अक्षरें असलेलीं नाणीं कित्येकांच्या मतें गोतमीपुत्र १ ला शातकर्णी यानें पाडलीं आहेत. तर कित्येकांच्यामतें सिरियञ गोतमीपुत दुसरा सातकर्णी यानें पाडलीं आहेत.उलटपक्षीं गोतमीपुत १ ला सातकर्णी याच्यानंतरचा राजा वासिठीपुत पुळुमायि (हा बहुतेक चष्टनाच्या वेळचा असावा) याचीं म्हणून जीं नाणीं आहेत तीं मात्र खात्रीपूर्वक त्याचींच आहेत.

'माढरिपुत व वासिठीपुत श्री वदसत' हीं अक्षरें असलेलीं नाणीं यांचा आंध्रांच्या नाण्यामध्यें कोणता काल येतो हें निश्चित नाहीं.

कारवारचे नंद ( ? ) राजे:–कारवारच्या दोन राजांचीं नांवें ( चुटुकुलानंद व मुळानंद ) वर असलेल्या नाण्यांची पद्धत व कारागिरी हीं आंध्रांच्या मोठ्या नाण्यांप्रमाणेंच आहेत, यावरून बहुधां आंध्रांचा व यांचा काल एकच असावा.

गु प्त व त त्का ली न रा जे.—गुप्त घराण्याचा संस्थापक गुप्त किंवा श्रीगुप्त ( इ. स. २६० ) आणि त्याचा मुलगा घटोत्कच हे फक्त शिलालेखांत वर्णिलेल्या वंशावळीवरून माहीत आहेत. या घराण्यांतील तिसरा पुरुष पहिला चंद्रगुप्त याच्या कारकीर्दींत नाणीं सुरू होतात. हीं नाणीं यानें पाडलीं नसून याच्या मुलानें पित्याच्या संस्मरणार्थ पाडलीं असें आतां समजतात. या वंशांतील राजांची कारकीर्द पुष्कळशी बरोबर रीतीनें ठरवितां येते व त्यांच्या नाण्यांची परंपरा पूर्ण आहे. चंद्रगुप्ताच्या सुवर्ण नाण्यांवरील एका बाजूवर 'लिच्छवयः' हीं अक्षरें व त्याची राणी कुमारदेवी हिचें नांव हीं आहेत.

सार्वभौम गुप्तांचीं नाणकपद्धतिः–राज्यांतील मुख्य भागांतील नाणीं प्रथमतः सुवर्ण व तांबें यांचीं होतीं. नंतरच्या मोठ्या कुशानांच्या पूर्वेकडील टांकसाळीपासून प्रथम या पूर्वेकडील सोन्याच्या नाण्यांचे सांचे घेतले आहेत; परंतु त्यानंतरच्या सुधारणेचें श्रेय मात्र त्यांचें त्यांनाच दिलें पाहिजे,आणि खरोखरच तीं नाणीं म्हणजे हिंदुस्थानांतील कलाकुसरीचें एक अत्युत्कृष्ट उदाहरण आहे. सत्रपांचें राज्य आपल्या राज्याला जोडल्यानंतर गुप्तांनीं वर तारीख असलेलें असें एक रुप्याचें नाणें त्या राज्यांत चालू ठेवलें. हें नाणें त्यांच्या पूर्वीच्या राजांच्या नाण्यांसारखेंच होतें; फक्त एका बाजूवर चैत्या–ऐवजीं गुप्तांचें नेहमीचें चिन्ह मोर यांचें चित्र आहे. पुढें त्या राज्याच्या दुसऱ्या भागामध्यें याच नमुन्याचें परंतु निराळ्या कारागिरीचें एक रुप्याचें नाणें पाडलेलें दिसतें. चंद्रगुप्त, दुसरा विक्रमादित्य याच्या रुप्याच्या नाण्यावरील कालासंबंधीं वादच आहे; परंतु त्याच्या नंतरचे राजे पहिला कुमारगुप्त व स्कंदगुप्त यांच्या नाण्यांवरील सन मात्र अधिक खात्रीचे आहेत.

रोमन लोकांच्या ऑरीपासून कुशानांनीं जें वजनाचें प्रमाण घेतलें तेंच प्रथमतः या सुवर्णनाण्यांमध्यें घेतलेलें दिसतें; परंतु नंतरच्या सुवर्णनाण्यांमध्यें या हिंदुस्थानांतील सुवर्णाचें प्रमाण धरलें आहे ( १४६.४ ग्रेन किंवा ९.४८ ग्रॅम ) आणि याचें कारण बहुधां प्राचीन भारतीय वजनाच्या

प्रमाणाचें पुनरुज्जीवन हें असावें. या दोन्ही प्रमाणांचीं नाणीं एकदमच प्रचलित असावीं आणि शिलालेखांत आढळणाऱ्या 'दिनार' व 'सुवर्ण' या शब्दांनीं त्या दोन नाण्यांमधील भेद दाखविला जात असावा असें दिसतें. स्कंदगुप्ताच्या कारकीर्दींत रोमन लोकांच्या प्रमाणाचा त्याग केला हें खचित, परंतु सुवर्णाचा पुन्हां स्वीकार त्याच वेळीं प्रथम करण्यांत आला की त्याच्यापूर्वी करण्यांत आला हें मात्र तितकें निश्चित नाहीं. फारसी प्रमाणाचे अर्धद्रम्म म्हणून सत्रप राजांचीं नाणीं पाडण्यांत आलीं त्यांचीच नक्कल गुप्तांनीं आपल्या रुप्याच्या नाण्यांमध्यें केल्यानें वजनाचें प्रमाण अर्थात तेंच चालू राहिलें.

चंद्रगुप्त, दुसरा विक्रमादित्य याच्या कारकीर्दींत सुराष्ट्र व माळवा या प्रांतांत प्रथमतः पाडलेलीं हीं गुप्तांचीं रुप्याचीं नाणीं यांचाच नमुना पुढील दोन राजांच्या कारकीर्दींत त्या राजाच्या उत्तर व मध्यप्रदेशांतील रुप्याच्या नाण्यांच्या बाबतींत घेतला असावा. ह्या उत्तरेकडील व मध्यप्रदेशांतील रुप्याच्या नाण्यांमध्यें कारागिरी व कुसराई यांमध्यें बराच भेद आहे. मध्यप्रदेशांतील नाणीं जाडीला कमी व अधिक सपाट असून अधिक काळजीपूर्वक केलेलीं आहेत आणि त्यांवरील मोराचा पिसारा अधिक विस्तृत दाखविला आहे. या तऱ्हेचें एक प्रकारचें हलकें तांब्याचें नाणें (परंतु वर रुप्याचा मुलामा असलेलें) बहुतकरून ज्यावेळीं वलभी प्रांत गुप्तांच्या राज्यांतच होता त्यावेळीं त्यांमधें पाडलें असावें. त्यावर कुमारगुप्त व स्कंदगुप्त यांचीं नांवें आहेत. परंतु एका बाजूला मोराच्याऐवजीं एक त्रिशूळ आहे. राज्यांतील मुख्य भागांतील तांब्याच्या नाण्यांचा सांचा मागील कोणत्याहि पद्धतीचा नसून बऱ्याच नवीन पद्धतीचा आहे.

उत्तरेकडील गुप्तराजेः—पहिला कुमारगुप्त(महेंद्रादित्य) यानंतर ओळीनें गादीवर आलेले या शाखेंतील तीन पुरुष भितरी येथें सांपडलेल्या मोहोरेवरून कळतात. 'प्रकाशादित्य' ही पदवी असलेलीं नाणीं याच राजाची असतील असें कोणी म्हणतात. वर सांगितलेल्या भितरी मोहोरेवरून कळून येणारा त्याचा मुलगा नरसिंहगुप्त व नाण्यांवरील नर( गुप्त ) बालादित्य हे एकच होते असें म्हणतात; विष्णुगुप्त चंद्रादित्य यांचीं नाणीं नर(गुप्त)बालादित्य, कुमारगुप्त दुसरा, आणि क्रमादित्य यांच्यासारखीं आहेत.

पूर्व माळव्याचे गुप्तः—स्कंदगुप्तापासून झालेली ही शाखा इ. स. ५१० च्या सुमारास विलयास गेली. यांचीं उपलब्ध असलेलीं नाणीं म्हणजे फक्त बुधगुप्ताचें रौप्य अर्धद्रामव होत आणि यांची कारागिरी गुप्तांच्या मध्यदेशीय नाण्याप्रमाणेंच आहे.

पूर्व मगधाच्या नंतरचे गुप्त राजेः—उपलब्ध असलेल्या नाण्यांपैकीं कोणतीं नाणीं या घराण्यानें पाडलीं असावीं याबद्दल शंका आहे. यांचीं म्हणून पूर्वी प्रसिद्ध असलेलीं पुष्कळशीं वाईट सोन्याचीं नाणीं बहुतकरून उत्तरेकडील शाखेचीं असावींत.

अनिश्चित गुप्तांचीं नाणींः—पुढील नाणीं कोणीं पाडलीं याविषयीं समाधानकारक माहिती मिळालेली नाहीं:—(१) वीर (सेन किंवा सिंह) क्रमादित्य हें नांव असलेलीं सोन्याचीं नाणीं; काल बहुधां इ. स. ८ वें शतक; त्यांचें वजन १६०–१७० ग्रेन्स किंवा १०३६ ते ११०१ ग्रॅम्स यांच्यामध्यें आहे, आणि त्यांच्या प्रमाणाचा फारसी व भारतीय फारसी प्रमाणांशीं संबंध आहे किंवा नाहीं हें सांगतां येत नाहीं (द्विद्राम = १७२९ग्रेन किंवा ११२ग्रॅम; भारतीय = ११०रती = १८२५ ग्रेन किंवा ११८२ ग्रॅम). ( २ ) जय (गुप्त) याचीं सोन्याचीं नाणीं (३)रुप्याचीं नाणीं( वर्ष १६६ = इ.स. ४८५ ) त्यांच्यावर श्रीहरिकान्त हीं अक्षरें आहेत. ( ४ ) (श्री) महाराज्ञी (ह) रिगुप्तस्य हीं अक्षरें असलेलीं तांब्याचीं नाणीं.

पश्चिममगधाच्या मौखरिघराण्याचीं नाणीं—शिलालेखांवरून हे व पूर्व मगधाच्या नंतरचे गुप्त हे समकालीन असून एकमेकांचे प्रतिस्पर्धी होते असें दिसतें. मध्यदेशीय नाण्यांवरून घेतलेलीं यांचीं रुप्याचीं नाणीं उपलब्ध आहेत व त्यांच्यावर या घराण्यापैकीं दोन पुरुषांचीं नांवें आहेत (ईशानवर्मन् स.५४ व ५५ व त्याचा मुलगा शर्ववर्मन् स.५८).तसेंच सूर्यवर्मन् अंतवर्मन्, इत्यादींहि नांवाचीं नाणीं सांपडलीं आहेत.अशींच 'शिलादित्य' म्हणून नांव असलेलीं नाणीं आहेत तीं प्रसिद्ध हर्षवर्धन याचीं असावींत.

वलभीः—उलटया बाजूवर ' त्रिशूळाचें ' चित्र असलेलीं कांहीं रुप्याचीं नाणीं वलभीच्या राजांनींच पाडलीं असें म्हणतात; त्यांवरील लेख कोणत्या तरी वाईट अक्षरांमध्यें लिहिलेले आहेत; तीं अक्षरें पूर्ण अशीं ओळखतां येत नाहींत. परंतु त्यांमध्यें भट्टारक ही पदवी आलेली दिसते. गुप्तांच्या रुप्याच्या नाण्यांचा पश्चिमेकडील नमुना वरील नाण्यांमध्यें घेतलेला दिसतो.

भीमसेनः—याच्या नाण्यांवर कारागिरी व लेखाची तऱ्हा यांमध्यें मध्यदेशीय गुप्तांची पद्धत दिसून येते; त्यांच्यावरील तारखा ( किंवा मित्या ) निश्चयात्मक रीतीनें वाचतां येत नाहींत, परंतु त्यांचा शक व तोरमाणाच्या तसल्याच नाण्यांवरील शक हे एकच असावेत.

कृष्णराजः—या नाण्यांची कारागिरी पश्चिमेकडील गुप्तांसारखी आहे व तीं मुंबई इलाख्यांतील नाशीक जिल्ह्यांमध्यें सांपडतात, आणि तीं वरील कृष्णराज नांवाच्या एका राष्ट्रकूट ( इ. स. ३७५–४०० ) राजानें पाडलीं असें म्हणतात; परंतु हीं नाणीं या प्रांतांत प्रचलित असलेल्या अगदीं अलीकडच्या गुप्तांच्या नाण्यांपासून घेतलेलीं आहेत, आणि त्यांच्या पद्धतीवरून वरील कालाच्या तीं फार नंतरचीं असावींत असें दिसतें म्हणून तीं कोणीं पाडलीं याविषयीं वरील समजूत चुकीची आहे असें दिसतें. त्याच

कारणामुळें अधिक प्रसिद्ध जो कृष्णराज राष्ट्रकूट (इ. स. ७५६) याच्या कालामध्येंहि तीं असणें अशक्य आहे. म्हणून तीं कोणी पाडलीं हें सध्यां अनिश्चित आहे. कोणी म्हणतात कीं तीं कृष्णराजा कलचुरि याचीं आहेत हें निश्चित झालें आहे.

नरवरचे नऊ नागः—पुराणांमध्यें पद्मावतीचे पवाया (ग्वाल्हेर संस्थान) नाग व मगधाचे गुप्त यांची सांगड घातली आहे. या घराण्यांतील सहा पुरुषांचें पूर्ण नांव नाण्यांवर आढळतें परंतु दुसऱ्या दोघांचीं फक्त पुसट पुसट नांवेंच दिसतात. वरील नाण्यांसारखींच दुसरीं कांहीं नाणीं आहेत व त्यांच्यावर 'अच्यु' हीं अक्षरें आहेत, आणि निःसंशय अलाहाबाद येथील शिलालेखांत जो अच्युत आहे त्यानेंच तीं पाडलीं असावीत. हा अच्युत नागराजांपैकीं एक असावा हें शक्य आहे.

पारिव्राजक महाराजेः—गुप्तांच्या या दोस्त राजांनीं डभाल (लहान) आणि अठरा वनराज्यांचा प्रदेश यांवर राज्य केलें. 'रात्रहस्ति' हीं अक्षरें वर असलेलीं कांहीं नाणीं महाराज हस्तिन् यानें पाडलीं असावीं. त्याच्या लेखांमध्यें १५६ ते १९१ = स. ४७५–५१० हे सन आहेत. 'विग्रह' हीं अक्षरें वर असलेलीं कांहीं लहान नाणीं आहेत; त्यांचा आकार व कारागिरी वरील नाण्यांच्याप्रमाणेंच आहे. माणिक्याला स्तूपांत जनरल व्हेंचुराला या नाण्यांचे कांहीं नमुने व इ. स. ७ व्या व ८ व्या शतकांतील नाणीं सांपडलीं.

हूणः—हिंदुस्थानावर स्वारी करणारे हूण एफ्थलाइटस् किंवा गोरे हूण या लोकांच्या पोटजातींपैकीं एक होत.

हूण नाणीं:—या नाण्यांचा ठळकपणें दिसून येणारा विशेष म्हणजे हा कीं त्यांच्यामध्यें नवीनपणा कांहीं नाहीं. तीं नाणीं बहुतेक सस्सानियन्, कुशान किंवा गुप्त यांच्या नाण्यांवरून घेतलीं आहेत, किंवा त्यांमध्यें यांची हुबेहुब नक्कल तरी केली आहे. म्हणून तीं नाणीं म्हणजे हूणांच्या स्वाऱ्यांचा विस्तार व सुधारणा यांच्याविषयीं सबळ पुरावे आहेत. सस्सानियन् कारागिरीचीं जीं पातळशीं नाणीं आहेत तीं अर्थात् सर्वांत प्राचीन होत; आणि त्यांतील ज्या नाण्यांवर सिसयो-सस्सानियन् नाण्यांवर दिसून येणाऱ्या ग्रीक मूळाक्षरांच्या पद्धतीप्रमाणें अक्षरें आहेत तीं नागरी लेख असलेल्या नाण्यांपेक्षां निःसंशय अधिक पूर्वीचीं आहेत आणि कदाचित् अंशतः तरी हिंदुस्थानांतील एफ्थलाइटस लोकांच्या स्वारीपूर्वीं, त्यांनीं(म्ह० एफ्थलाटसनीं )चालू केलेलीं असावीत. या पूर्वीच्या हूण नाण्यांपैकीं(उ० ज्यांवर 'पाहि जाबुव्लः' असें नांव आहे तीं) बरीचशीं, सस्सानियनांचीं पातळ नाणीं आयतींच घेऊन त्यांवर हूणांच्या पुढाऱ्याचा मुखवटा, छापावर नाणें ठोकून उठावांत उमटविला आहे; यामुळें उलटया म्हणजे खोलगट बाजूवरील ठसा–सस्सानियन् अग्निकुंड–जवळ जवळ नाहींसा झाला आहे. यानंतरचीं नाणीं पाडतांना याच नाण्यांचा नमुना पुढें ठेवला गेला असला पाहिजे यांत संशय नाहीं.

या लोकांचीं दुसरीं कांहीं नाणीं प्रचलित सस्सानियन् नाण्यांची, त्यांतल्या त्यांत फीरूझच्या कारकीर्दींतील उत्तर भागामध्यें निघालेल्या नाण्यांचीं ( इ. स. ४७१–४८६ )केवळ प्रतिमा आहेत. मूळ नाण्यांवरहुकुम जवळ जवळ असणारीं पहिलीं नकली नाणीं पुष्कळशीं मारवाडमध्यें आढळतात, व तीं तोरमाण ( इ. स. ४९०–५१५ ) याचीं असावीत. हा जो सस्सानियन् नमुना हिंदुस्थानांत सुरू केला गेला तो पुढें ३००–४०० वर्षांमध्यें गुजराथ, राजपुताना व अंतर्वेदि यांमधील नाणकपद्धतींत प्रमुख होऊन बसला. पूर्व माळव्यांतील नंतरच्या गुप्त राज्यावरील ( किंवा सर्व गुप्त साम्राज्यावरील) हूणांच्या स्वारीचा पुरावा तोरमाणाच्या रौप्य अर्धद्रामावरून मिळतो.हे अर्ध–द्राम अथवा द्रम्म म्हणजे बुधगुप्ताच्या अर्धद्रामाची सूक्ष्मरीतीनें नक्कल केली आहे. फक्त सुलटया बाजूवरील राजाच्या मुखवटयाची दिशा उजवीकडे नसून डावीकडे आहे. या नाण्यांवरील सन ५२ हा आहे. परंतु तो कोणत्या कालमानास धरून आहे हें मात्र समाधानकारक रीतीनें ठरविलेलें नाहीं. तोरमाणाच्या अर्धद्रामाच्या शकासंबंधीं बरेच मतभेद होते.

तोरमाणाचा मुलगा मिहिरकुल त्याच्यानंतर गादीवर बसला. त्याच्या रौप्य नाण्यांची कारागिरी सस्सानियन कारागिरीसारखी आहे. तोरमाण व मिहिरकुल या दोघांच्याहि तांब्याच्या नाण्यांवर सस्सानियन व गुप्त यांच्या नाणकपद्धतीचा एकदमच परिणाम झालेला दिसतो. हीं मुख्यत्वेंकरून पूर्वपंजाब व राजपुताना यांमध्यें आढळतात, आणि कित्येक अशीं उदाहरणें आढळतात कीं मिहिरकुलाचे सांचे व लेख तोरमाणाच्या नाण्यांवर उमटविले आहेत. हूण तोरमाणाचीं नाणीं म्हणून ज्यांनां म्हणतां येईल अशा तांब्याच्या नाण्यांचा हाच एक वर्ग आहे. परंतु मिहिरकुलाचे दुसऱ्याहि नाण्यांचे वर्ग प्रसिद्ध आहेत. यांपैकीं एका वर्गावर कुशानांचा नेहमींचा सांचा आहे; परंतु दुसऱ्या एका वर्गावरील सांचे कोणापासून घेतले आहेत याची तितकी खात्री नाहीं.

पुष्कळ प्रकारचीं अशीं हूण लोकांचीं नाणीं सांपडतात कीं त्यांच्यावर जीं पूर्ण किंवा अर्धवट नांवें असतात तीं दुसरीकडे कोठेंहि आढळत नाहींत. एकापेक्षां अधिक अशीं हूणांचीं घराणीं एकाच वेळीं राज्यावर असतील हें शक्य आहे; किंवा राज्याच्या निरनिराळ्या प्रांतांवर अंमल चालविणाऱ्या सुभेदारांनीं तीं नाणीं पाडलीं असावीत. हूणांच्या नाण्यांची कालमर्यादा इ. स. ५४४ पर्यंत आहे.

हूण किंवा पर्शियन यासंबंधीं अनिश्चितताः—कांहीं सुप्रसिद्ध नाणीं कोणत्या राष्ट्रामध्यें झालीं हें बरोबर ठरवितां येत नाहीं. त्यांच्या पातळपणावरून व त्यांच्या उलटया बाजूवरील अग्निकुंडावरून तीं सस्सानियनांचीं असावीत असें

दिसतें. म्हणून त्यांचे कांहीं गुण हूणांच्या नाण्यांशींहि जुळतात आणि कांहीं पंजाब व सिंध येथील पर्शियन राजांच्या नाण्यांशींहि जुळतात. या संशयित नाण्यांच्या वर्गांपैकीं 'नब्की मल्क' हीं अक्षरें वर असलेला वर्ग फार प्रसिद्ध आहे.

पूर्व, पश्चिम, उत्तर व मध्य हिंदुस्थानांतील कांहीं नाणीं,व पंजाब व सिंध येथील पर्शियन राजेः–हिंदुस्थानांतील कांहीं नाणीं वायव्य भागांत सांपडतात.त्यांचा सांचा व कारागिरी हीं सस्सानियनांच्या सारखीं आहेत. त्यांच्यावर नागरी, सस्सानियन, पह्लवी, व अद्यापपावेतों न वाचतां आलेल्या एका लिपींतील अक्षरें आहेत. ही शेवटली लिपी सिथो--सस्सानियनांनीं उपयोगांत आणलेल्या ग्रीक लिपिचें नंतरचें रूपांतर असावें. हीं अक्षरें नंतरच्या हूणांचीं आहेत असें कोणीं म्हणतात पण याला पुरेसें कारण नाहीं. तीं बहुतांशीं सिंध व मुलतान यांवर राज्य करणाऱ्या कोणत्यातरी सस्सानियन घराण्यानें किंवा घराण्यांनीं पाडलीं असावींत, हें नाण्यांच्या पद्धतीवरून व सस्सानियन पह्लवीलिपीच्या उपयोगावरून दिसून येतें श्री वासुदेव हें नांवच फक्त नागरीमध्यें असलेलें व बाकीचीं सर्व अक्षरें पह्लवीमध्यें असलेल्या एका नाण्याचा काल, दुसरा खुश्रु ( परवीज ) याच्या कारकीर्दीतील३७व्या (म्हणजे इ. स. ६२७) वर्षी त्यानें पाडलेल्या नाण्यांशीं असलेल्या वरील नाण्याच्या सादृश्यावरून साधारणतः ठरविला जातो. तसेंच शाहितिगिनच्या नाण्यावर नागरांत 'हितिवि च ऐरान च परमेश्वर' ( हिंदुस्थान व इराण यांचा राजा ) व सस्सानियन पह्लवीमध्यें 'तकान खोरासान मल्का' ( पंजाब व खोरासान यांचा राजा ) ह्या पदव्या आहेत. त्या नाण्यांचा वासुदेवाच्या नाण्यांशीं व वर सांगितलेल्या दुसऱ्या खुश्रूच्या विवक्षित नाण्यांशीं निकटचा संबंध आहे. कारण त्याच्या मागील बाजूवरील ठसा—ज्याच्या योगानें मुलतान येथील सूर्यदेवता दर्शविली जाते अशी समजूत आहे तो-एकच आहे. या इंडो-पार्शियन वर्गांतील दुसरीं नाणीं कोणी पाडलीं व त्यावरील अक्षरांचा अर्थ काय याविषय पूर्ण खातरी नाहीं परंतु त्यांचा देश व काल दुसऱ्या नाण्यांच्याप्रमाणेंच असावा असें दिसतें.

कनोज ( कान्यकुब्ज ):—कनोजच्या मध्यकालीन राज्यांतील पुढील घराण्यांपैकीं राजांचीं नाणीं उपलब्ध आहेतः—

( १ ) रघुवंशी घराणें—श्रीमदादिवराह हीं अक्षरें असलेलीं रौप्यनाणीं भोजदेवानें पाडलीं होतीं ( इ. स. ८५०-९०० ).

(२) तोमर घराणेंः—या घराण्यांतील राजांच्या ताब्यांत प्रथम कनोज व दिल्ली ही दोन्ही होतीं, परंतु इ. स. १०५० मध्यें कनोजवर राठोडांनीं स्वारी केल्यानंतर दिल्ली एकटीच त्याच्या ताब्यांत राहिली असें दिसतें. यांच्या सोन्याच्या नाण्यांचा सांचा कल्चुरी नाण्यांप्रमाणें आहे;हलक्या रुप्याच्या नाण्यांचा घाट गंधार येथील ब्राह्मणशाही राजांच्या नाण्यांप्रमाणें आहे.

( ३ ) राठोड ( गांहडवाल अथवा गढवाल) घराणेंः—मदनपाल देव ( इ. स. १०८० ) याच्यापासून नाण्याची परंपरा सुरू होते आणि तिच्यामध्यें इ. स. ११९३ पर्यंत राज्य करणाऱ्या दोन राजांचीं नाणीं येतात.या नाण्यांचे सांचे तोमर घराण्यांतील सांच्याप्रमाणेंच आहेत.

( ४ ) मगध येथील पाल घराणेंः—या घराण्याचीं अशीं खात्रीचीं नाणीं प्रसिद्ध नाहींत; श्रीविग्रह हें नांव असलेलीं सस्सानियनांपासून घेतलेलीं नाणीं इ. स. ९१० तील मगधाचा राजा पहिला विग्रहपाल याचींच असातील हें असंभवनीय नाहीं.

काश्मीरः—कनिष्कानें पाडलेल्या नाण्यापासूनच बहुधा काश्मीर नाण्यांच्या सांच्याचा उगम झाला असावा; आणि या वेळेपासून ते १३ व्या शतकांत मुसुलमानांनीं जेव्हां काश्मीर जिंकलें तेव्हांपर्यंत हे नाण्यांचें सांचे–एका बाजूला असलेला उभा राजा व दुसऱ्या बाजूला बसलेली देवता–न बदलतां तसेच राहिले. या कालांतील कारागिरी इतकी ओबडधोबड आहे कीं, पहिल्या संशोधकांनीं त्यावरील आकृतीचा भलताच अर्थ लावला.

कनिंगहॅमच्या न्युमिस्मॅटिक क्रॉनिकलमध्यें उल्लेखिलेलीं हूणांचीं काश्मिरींनाणीं किदार कुशानांच्या नाण्यासारखीं दिसतात. आणि ह्या नंतरच्या नाग किंवा कर्कोटक घराण्याच्या सर्व नाण्यावर किदार हें नांव आहे. काश्मीरच्या हर्षाच्या कांहीं सुवर्णनाण्यांवर ( इ. स. १०९० ) दक्षिण हिंदुस्थानांतील नाण्यांची हुबेहुब नक्कल केली आहे.

नेपाळः—नेपाळचीं अत्यंत प्राचीन नाणीं तांब्याचीं आहेत. आणि त्यांच्यामध्यें यौधेय नाण्यांपैकीं दुसऱ्या वर्गाच्या नाण्यांमध्यें कांहींसें साम्य आहे. या साम्याचें कारण तीं दोन्ही एकाच कुशानांच्या नाण्यापासून घेतलीं हें असावें. त्यांचा काळ इ. स. च्या ५ व्या शतकाच्या आरंभापासून ते ७ व्या शतकाच्या शेवटापर्यंत आहे.ज्याच्यावर मानांक हें नांव आहे तीं मानदेववर्मनूचीं ( इ. स. ४२५ ) आहेत असें म्हणतात आणि ज्यांच्यावर गुणांक हें नांव आहे तीं त्याच्या नंतरचा राजा गुणकामदेववर्मन् ( इ. स. ४५० ) याचीं आहेत असें समजतात. हीं नांवें फक्त नाण्यांवर व तद्देशीय घराण्यांच्या यादींतच आढळतात; शिलालेख किंवा दुसरा कोणताहि कालनिश्चय झालेला लेख यांमध्यें त्यांचा अद्यापि कोणताच उल्लेख असलेला आढळत नाहीं, म्हणून जे सन दिलेले आहेत ते सरासरी बरोबर आहेत. अंशुवर्मन् आणि विष्णुगुप्त नाण्यांचा काल मात्र अधिक खात्रीचा आहे, कारण सातव्या शतकांतील शिलालेखांवरून हे दोन्ही राजे प्रसिद्ध आहेत. पशुपति व वैश्रवण हीं नांवें असलेल्या नाण्यांचा काल बरोबर सांगता येत नाहीं. हीं देवतांचीं नांवें आहेत, आणि हीं नाणीं कोणीं पाडलीं हें सांगतां येत नाहीं;परंतु त्यांची पद्धत व कारागिरी यांवरून तीं व दुसरीं तत्सदृश नाणीं एकाच कालांतील होतीं हें दिसून येईल.

काबूलशाही नाणें:—या नाण्याचा कालवर्ग पुढीलप्रमाणें करतां येईल:—(१) प्राचीन कुशानांचीं नाणीं, (खि. पू. २५ ते शक इ. स. १८०). (२) यांच्यासारखींच नंतरचीं नाणीं, यांच्यावरूनच हिंदुस्थानावर स्वारी करणाऱ्या ससानियन लोकांनीं (इ. स. ३००--४५०) नाणीं पाडलीं. (३) गांधार काबीज करणारा किदार कुशान यांचीं नाणीं (इ. स. ४२५-४७५). परंतु किदार कुशानांच्या गंधारच्या राज्यामध्यें हीं नाणीं पाडलीं कीं काश्मीरच्या राज्यामध्यें पाडलीं याचा संशय आहे. (४) गंधारमध्यें पाडलेलीं हूणांचीं नाणीं (इ. स. ४७५--५३०), या नाण्यांवर 'षाहि' या पदवीचा उपयोग याच कारणामुळें केला असावा. (५) हूणांच्या नंतर इ. स. ६३० मध्यें जेव्हां ह्युएनत्संग आला होता, त्या वेळीं गंधारचा राजा एक क्षत्रिय होता. यावरून असें दिसतें कीं, कुशान घराणें हिंदु बनलें. या कालांतील नाणीं कोणतीं असावींत हें सांगतां येत नाहीं. कदाचित् नंतर ज्यांमध्यें कुशान सांचाची ओबडधोबड नक्कल केली होती तीं तांब्याचीं नाणीं या कालांतील असावीत. (६) अल्बेरुणी असें म्हणतो कीं एका ब्राह्मण वजीरानें किंवा प्रधानानें राज्य बळकावून घेतलें आणि घराण्याची स्थापना केली. ज्या नाण्यांनां त्यांच्यामधील प्रमुख दिसणाऱ्या सांचावरून, 'बैल आणि घोडेस्वार सांच्याचीं नाणीं' असें नांव दिलें होतें तीं नाणीं याच ब्राह्मणी घराण्यांतील निरनिराळ्या पुरुषांनीं पाडलीं असें म्हणतात (इ. स. ८६०--७०). (७) यानंतरच्या अवशिष्ट कालांत म्हणजे गझनीच्या महंमदाकडून घराण्याचा नाश होईपर्यंत (इ. स. ९५०-१०२६) निरनिराळ्या राजांचीं नांवें शिलालेखावरून कळतात पण त्या राजांचीं अशीं कोणतीच नाणीं प्रसिद्ध नाहींत.

डहालाचे कलचुरी:—या वंशांतील मध्यकालीन राज्यांतील गांगेयदेव नांवाच्या एकाच राजाचीं नाणीं उपलब्ध आहेत (इ. स. १००५--१०३५). या नाण्याच्या एका बाजूवर बसलेल्या देवतेचा पूर्वीपासून चालत आलेल्या नमुन्याचा ठसा आहे, परंतु दुसरी सर्व बाजू राजाच्या नामाक्षरांनीं भरून गेली आहे. त्याचीच नक्कल जेजाकभुक्तीचे चंदेल, दिल्लीचे तोमर आणि कनोजचे राठोड यांनीं केली.

महाकोसलाचे कलचुरी:—यांतील ३ राजांचीं नाणीं उपलब्ध आहेत. डहालाच्या कलचुरींच्या नाण्यांप्रमाणें या नाण्यांवरील एका बाजूवर नुसतीं अक्षरें आहेत परंतु दुसऱ्या बाजूला बसलेल्या देवतेचा ठसा दिसून येत नाहीं.

जेजाकभुक्ति (अथवा महोबा) येथील चंदेल:—यांमध्यें जे ९ राजे झाले त्यांपैकीं ७ राजे नाण्यांवरून कळून येतात. तीं नाणीं डहालाच्या कलचुरींच्या नाण्यावरून घेतलीं आहेत.

दिल्ली व अजमीरचे चव्हाण:—ज्या चव्हाणांच्या नाण्यांवरील नांवें नीट वाचतां येतात तीं, शेवटचे दोन राजे सोमेश्वर व पृथ्वीराज (इ. स. ११६२ ते ११९२) यांचीं आहेत. चव्हाणांच्या नाण्यांचा सांचा 'बैल व घोडेस्वार' हाच आहे. तोच पुढें कांहीं पिढ्या दिल्लीच्या सुलतानांच्या नाण्यांमध्यें चालू राहिला. नरवर नंतरच्या रजपूत नाण्यांवरून इ. स. १२३० ते १२९० पर्यंतच्या ६ राजांपैकीं राजे ४ कळून येतात. यावरील सन विक्रमादित्यसंवतांतील आहेत.

कांगडा:—येथील राजांच्या नाण्यांचा काल हा बहुधां इ. स. १३३० ते १६१० यांमधील असावा. त्यांचा येथें निर्देश करण्याचें कारण एवढेंच कीं मुसुलमानांच्या स्वारी नंतर 'बैल व घोडेस्वार' या सांचाचीं जीं नाणीं पुढें पुष्कळ शतकें अस्तित्वांत राहिलीं त्या नाण्यांचें हें एक उदाहरण आहे.

अनिश्चित व अनामक नाणीं:—सतलजपासून पूर्वेकडे काशीपर्यंत व हिमालयापासून दक्षिणेकडे नर्मदेपर्यंत खालीं दिलेल्या तीन प्रकारचीं नाणीं पुष्कळच सांपडतात.

(१) ससानियन तऱ्हेचीं पातळ रुप्याचीं नाणीं खरोखरीच्या ससानियन नाण्यांची ज्या नाण्यांमध्यें नुसती ओबडधोबडश नक्कल केली आहे तीं-बहुतांशीं हूणांचीं आहेत असें म्हणतात. यानंतरचीं जीं त्यांच्यासारखीं नाणीं आहेत तीं मूळच्या नाण्यांहून बरींच निराळीं आहेत; त्यांच्यामध्यें पूर्वींच्या नाण्यांची नक्कल तितकी अस्सल नाहीं, व जाडपणाहि थोड्या वाढत्या प्रमाणावर आहे; तीं बहुधां हिंदुस्थानांतीलच असावीं. पण तीं कोणत्या घराण्याचीं असावींत हें मात्र सांगतां येत नाहीं. तीं गंगेकडील प्रदेशांत आढळतात, परंतु मेवाड-मारवाड व सर्व राजपुताना 'यांमध्यें तीं अधिक' प्रमाणांत आढळून येतात. तीं दुसऱ्या वर्गांतील नाण्यांच्या अगोदर तरी झालीं असावीं, किंवा त्यांचा एकमेकांशीं कांहीं संबंध नसून तीं दोन्ही फक्त एकाच मूळ सांच्यावरून घेतलीं असावींत. या दोन्ही वर्गांतील नाण्यांचें वजन सारखेंच आहे. आणि ज्या अर्थीं कित्येक नाण्यांचें ६० ते ६५ ग्रेन किंवा ३.८ ते ४.२ ग्रॅम इतकें वजन भरतें त्या अर्थीं तीं बहुतेक मूळच्या ससानियन नाण्यांप्रमाणें ग्रीक ड्रामापासून घेतलीं असावींत. कांहीं नाण्यांवर ह किंवा ज हीं अक्षरें आहेत, आणि कनिंगहॅमचें म्हणणें असें आहे कीं, कनोजच्या हर्षवर्धनाच्या नांवांतील ह हें तें आद्याक्षर असावें. कनोजच्या भोजदेव (किंवा श्रीमदादिवराह) याच्या नंतरचीं नाणीं, यांची कारागिरीसुद्धां तशीच आहे व बहुतेक तीं नाणीं त्याच मूळ नाण्यांवरून (ससानियन) घेतलीं असावींत. कनिंगहॅमचें असेंहि म्हणणें आहे कीं ज्यांच्यावर 'श्री विग्रह' हें नांव आहे तीं भोजदेवाच्या नंतरच्या कोणत्या तरी राजानें पाडलीं असावीं; परंतु, मगधाच्या पहिल्या विग्रहपालाचीं तीं असावींत हें अधिक संभवनीय दिसतें.

(२) रुप्याचीं जाड नाणीं ससानियन सांचांतून काढिलीं आहेत. परंतु त्यांची कृति इतकी बिघडलेली आहे कीं, त्यांच्यामध्यें व मूळ नाण्यांमध्यें फारच थोडा सारखेपणा दिसून येतो. त्यांनां पैसा 'गधिया' किंवा 'गधैया' (ससानियन

राजाच्या मुखवटयाचें रूप या नाण्यांवर गाढवासारखें भ्रष्ट दिसतें म्हणून) असें म्हणतात. आणि कनिंगहॅमच्या मतें तीं व जौनपूरच्या शिलालेखांतील षडबौद्धिक द्रम्म हीं एकच आहेत. तीं नैर्ऋत्य-राजपुताना, मेवाड, माळवा व गुजराथ या प्रांतांत आढळतात. त्यांच्या सुलटया बाजूवरील सांचावरून त्यांचा दुसऱ्या एका वर्गांतील नाण्यांशीं संबंध दिसून येतो; त्या वर्गांतील नाण्यांच्या उलटया बाजूवर विकृत अशा अग्निकुंडाऐवजीं सोमलदेव हें नांव आहे व सुलटया बाजूवर घोडेस्वाराचा सांचा (बहुधा गांधार येथील ब्राह्मणशाहीपासून घेतलेला) असलेल्या नाण्यांवरहि तेंच नांव आहे.

(३) अतिशय ओबडधोबड कारागिरांची तांब्याचीं नाणीं हीं बहुधा नंतरच्या कुशानांच्या नाण्यांची प्रतिकृति असावी. सुलटया बाजूला उभ्या असलेल्या राजाचें चित्र आहे. उलटया बाजूला शिव आणि नंदी यांचें चित्र आहे. परंतु कारागिरी इतकी वाईट साधलेली आहे कीं, त्यांच्या सुलटया बाजूवर सस्सानियन अग्निकुंडच आहे असें पुष्कळदां समजतात. कनिंगहॅमची अशी समजूत आहे कीं, इ. स. ५०० ते ८०० शतकांतील पंजाब व राजपुताना यांतील प्रचलित तांब्याचीं नाणीं तीं हींच असावींत.

**दक्षिण हिंदुस्थानांतील नाणीं.**—उत्तर हिंदुस्थानांतील नाण्यांच्या इतिहासांत वारंवार होणाऱ्या परकीय लोकांच्या स्वाऱ्यांच्या योगानें, पुष्कळच महत्त्वाचे भाग सहजीं पडतात. पण तसें दक्षिणहिंदुस्थानांतील नाण्यांच्या इतिहासांत पडत नाहींत. येथें वर अक्षरें लिहिलेल्या नाण्यांचें प्रमाण कमी आहे व त्यांचें वर्गीकरण, त्यांच्या नमुन्यांचें प्राप्तिस्थल, कारागिरीची तऱ्हा व सांचांची पद्धत, यांवरच पुष्कळसें अवलंबून आहे. शिवाय जसें उत्तरेकडील नाण्यांच्या पद्धतशीर अभ्यासानें महत्त्वाचे ऐतिहासिक शोध लागले आहेत तसें त्यांचें सशास्त्र विवेचन अजून झालेलें नाहीं. या पूर्वीची ठसे-पद्धत उत्तरेपेक्षां दक्षिणेमध्येंच अधिक कालपर्यंत होती असें दिसतें; आणि कांहीं अशीं उदाहरणें आहेत कीं, तेथील नाणकपद्धतींत नंतर सुधारणा म्हणून जी झाली ती नाणें पाडण्याची परकीय पद्धत स्वीकारून झाली नाहीं, तर पूर्वीच्याच पद्धतीची वाढ म्हणून झाली.

पुष्कळशीं रोमन रौप्य व सुवर्णनाणीं दक्षिणहिंदुस्थान व सिलोन (लंका) यांमध्यें सांपडतात; आणि तीं बहुधा त्याच प्रांतामध्यें प्रचलित नाणीं म्हणून उपयोगांत आलीं असावींत आणि उत्तरेमध्यें रोमन लोकांच्या सोन्याच्या नाण्यांचें बरेंचसें सोनें कुशानांच्या मोठया सुवर्ण नाण्यांच्या उपयोगी पडलें असावें (मिरीं, तांदूळ, मसाले, चंदन, वैडूर्यादि मणि यांच्या मोबदला हीं नाणीं रोमन व्यापारी देत असत असें दिसतें).

पांड्यः—प्राचीन अशा ठसेमुद्रित नाण्यांनंतर इतर ठिकाणांप्रमाणें पांड्य देशांतील नाण्यांचा आकार समचौकोनी असून एका बाजूवर हत्तीचा छाप किंवा सांचा आहे व तो मुद्रांतून उठविलेला दिसतो. याच्या नंतरच्या नाण्यांवर दोन्ही बाजूंवर हत्तीचे छाप आहेत. दक्षिणहिंदुस्थानांतील रीतिरिवाजाप्रमाणें मुख्य मुख्य प्रकारच्या नाण्यांवर कांहीं सांकेतिक चिन्हांनीं ऐतिहासिक गोष्टींचा निर्देश केला जातो हें सिद्ध आहे व या चिन्हांच्या बदलणाऱ्या संख्येवरून कालनिर्णयास एक साधन मिळणें संभवनीय आहे. हीं नाणीं इ. स. ३०० च्या पूर्वीच्या कालांतील असावीं, आणि त्यांची पद्धत व कारागिरी आणि आंध्र आणि पल्लव नाण्यांची पद्धत व कारागिरी यांमध्यें जें साधारणपणें साम्य दिसून येतें त्यांवरूनहि वरील कालमर्यादा शक्य आहे असें दिसतें.

इ. स. ३००–६०० यामधील पांड्यांचीं नाणीं कोणतीं असावींत याविषयीं बरीच अनिश्चितता आहे. सर्व पांड्यांचें, नंतरचें चिन्ह जो 'मासा' तो वर असलेलीं सोन्याचीं नाणीं इ. स. ७–१० या शतकांतील असावींत असें म्हणतात; नंतरच्या ताम्र नाण्यांवर (म्हणजे १०५० च्या सुमारास) चोल राजांनीं पांड्यांचें राज्य घेतलें त्याचा परिणाम झालेला दिसतो.

चेरः—इ. स. ८७७ तील चोलांच्या स्वारीपूर्वीच्या चेर घराण्याच्या अत्यंत भरभराटीच्या कालांत अमकीं चेरांचींच नाणीं असें सांगतां येत नाहीं. या सनानंतर ज्या कित्येक प्रांतांवर चेरांची सत्ता होती व ज्यांच्यावर त्यांनीं सुभेदार नेमले होते ते प्रांत स्वतंत्र झाले. अशा प्रांतांपैकीं दोन प्रांतांत पाडलेलीं नाणीं प्रसिद्ध आहेत.

(१) कोंगु देशः—ज्या सुवर्ण व ताम्र नाण्यांवर चेरांचें चिन्ह 'धनुष्य' व इतर चिन्हें सांपडतात तीं नाणीं या प्रांतांतील आहेत असें म्हणतात. या सोन्याच्या नाण्यांवरील हत्तीचा छाप मुख्य आहे आणि ज्याअर्थीं काश्मीरच्या हर्षदेवानें त्यांची नक्कल केली आहे त्याअर्थीं त्यांचा काल इ. स. १०९० पूर्वीचा असावा. ह्या नाणकपद्धतीचा निर्देश काश्मीरच्या राजतरंगिणीमध्यें केलेला उघड उघड दिसून येतो.

(२) केरळः—या प्रांतावर राज्य करणाऱ्या घराण्याचें एक नाणें ब्रिटिश म्युझियममध्यें आहे, व त्यावर ११ व्या किंवा १२ व्या शतकांतील नागरी लिपीमध्यें 'श्री वीरकेरलस्य' हीं अक्षरें आहेत.

चोलः—दक्षिण हिंदुस्थानांत ज्यावेळीं चोल हे सार्वभौम राजे झाले होते त्यावेळचीं हीं सर्व नाणीं आहेत. त्यांचे दोन वर्ग होतात.—(१) इ. स. १०२२ च्या पूर्वीचीं म्हणजे राजराज चोल याचें राज्य सुरू होण्यापूर्वीः या नाण्यांवरून असें दिसतें कीं, चोल हे अगोदरच बलाढ्य होत चालले होते. चोलांच्या निशाणावर मध्यें व्याघ्र असून त्यांच्या दोन्ही बाजूस पांड्य व चेर यांचीं चिन्हें मासा व धनुष्य हीं आहेत. नाण्यांवरील अक्षरें नागरीमध्यें आहेत आणि तीं चोल राजांचीं नांवें किंवा पदव्या आहेत. परंतु तीं नांवें व घराण्यांच्या यादींतील नांवें एकच आहेत किंवा नाहींत याविषयीं मात्र मतभेद आहे. (२) इ. स. १०२२ नंतरचीं,

राजराजाच्या राज्याबरोबर एक अगदीं निराळ्या सांचाचें नाणें येतें. सुलटया बाजूवर उभ्या राजाचें चित्र व उलटया बाजूला बसलेल्या राजाचें, चोलांच्या सत्तेच्या विस्ताराबरोबरच या पद्धतीच्या नाण्यांचा दक्षिणहिंदुस्थानांतील बऱ्याचशा भागांत प्रसार झाला. चोलांनीं जेव्हां सिंहलद्वीप घेतलें तेव्हां अर्थात वरील नाण्यांचा उपयोग तेथेंहि होऊं लागला आणि कँडीच्या स्वतंत्र राजांनींहि तींच नाणीं पुढें चालू ठेवलीं. त्यांपैकीं एक प्रकारचीं पातळ सोन्याचीं, पाठीमागून ठोकून बनविलेलीं नाणीं ( पूर्वेकडील चालुक्य, चालुक्यचंद्र व दुसरा राजराज यांच्या नाण्यासारखीं ) चोळ राजाचीं ( बहुधां कुलोत्तुंग पहिला चोल इ. स. १०७० याचीं ) आहेत म्हणतात.

सिलोन अथवा सिंहलद्वीपः—कँडीच्या राजांनीं आपल्या पूर्वीच्या चोल राजांच्या नाण्यांची पद्धत विशेष फेरफार न करतां स्वीकारली होती. त्यांच्या नाण्याचा काल स. ११५३ ते १२९६ हा आहे. या कालाच्या पूर्वी सिंहलद्वीपामध्यें जीं नाणीं प्रचलित होतीं त्यांचा विशेष असा कोणताच नाहीं. तीं पूर्वीच्या ठसेपद्धतीचीं तरी असावीं, किंवा परकीय व्यापार किंवा स्वाऱ्या यांमुळें बाहेरून आंत तरी आलेलीं असावीं.

पह्लवः—यांच्या नाण्यांचे दोन वर्ग होतात. (१) आंध्रांच्या नाण्यांसारखीं असलेलीं ( ज्यांना इलियटनें कोठें कुरुंबर आणि कोठें पल्लव किंवा कुरुंबर अशी संज्ञा दिली आहे म्हणून ) आंध्रांशीं समकालीन असावीं ( इ. स. २ रें व ३ रें शतक). उलटया बाजूवर एक जहाज आहे त्यावरून पह्लव लोकांची ज्या परदेशी व्यापाराकरितां( नौकायनाकरितां ) प्रसिद्धि होती त्याची साक्ष पटते. ( २ ) दुसऱ्या वर्गांतील नाणीं नंतरच्या कालांतील असून सोनें व रुपें यांचीं आहेत, परंतु त्यांच्या कालाविषयीं निश्चित पुरावा कांहीं नाहीं. या सर्व नाण्यांवर पह्लवांचें निशाण 'आयाळ असलेला सिंह' हें आहे व वर कांहीं कानडी व संस्कृत अक्षरेंहि आहेत.

चालुक्यः—यांच्या दोन्ही शाखांतील सुवर्ण नाण्यांवर यांचें चिन्ह ( उर्फ लांछन ) वराह हें आहे, आणि तीं नाणीं हिंदुस्थानांतील ठसेपद्धतीचें एक विशिष्ट उदाहरण म्हणून प्रसिद्ध आहेत. त्या पद्धतीमध्यें विशिष्ट लेखनचित्राचा प्रत्येक भाग नाण्यांवर निरनिराळ्या ठशांनीं उमटविला जातो. पश्चिमेकडील चालुक्यांचीं बरीचशीं नाणीं जाड सोन्याचीं आहेत आणि त्यांचा आकार बहुधां पेल्यासारखा असतो. इलियटची समजूत अशी आहे कीं कदंबांच्या पद्म—टंकांचीं हीं नाणीं प्रतिकृति असावीत( पद्म—टंकांचीं कृति त्या नाण्यांसारखीच आहे आणि त्याच्यामतें तीं ५ व्या किंवा ६व्या शतकांतलीं आहेत ). परंतु दोन्हींहि इतक्या पूर्वीच्या कालांत झालीं होतीं अशाविषयीं पुरावा नाहीं आणि पौरस्त्य चालुक्यांच्या नाण्यांवरून पाहतां, त्यांचा काल याहूनहि अधिक पुढचा असला पाहिजे.

पौरस्त्य चालुक्यांच्या उपलब्ध असलेल्या नाण्यांचा काल निश्चित झाला आहे. पितळ—मिश्रित धातूच्या नाण्यांचे कांहीं नमुने नुकतेच विजगापट्टम् प्रांतांतील येल्लमांचिलीनजीक सांपडले आहेत; त्यांच्यावर 'विषम—सिद्धि' हीं अक्षरें आहेत. ( पौरस्त्य चालुक्य राजा विष्णुवर्धन याचें एक टोपण नांव अथवा बिरुद ' विषमसिद्धि ' होतें ).

दुसऱ्या नाण्यांवर चालुक्यचंद्र उर्फ शक्तिवर्मन ( इ. स. १०००—१०१२ ) व दुसरा राजराज ( इसवी सन १०२१—१०६२ ) यांचीं नांवें आहेत. या नाण्यांवर अतिशय पातळ सोन्याच्या तुकड्यावर चालुक्यांचें वराह चिन्ह व नांवाचें एक अक्षर हीं पाठीमागून भिन्न भिन्न ठशांनीं उमटविलीं आहेत. हीं नाणीं पौरस्त्य चालुक्यांचीं असावींत हें निर्विवाद दिसतें. परंतु एवढें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे कीं बहुतेक नाणीं जीं उपलब्ध आहेत तीं आराकानच्या किनाऱ्यालगत अशा चे दुबाच्या बेटामध्यें सांपडलीं आहेत. फ्लीटच्या मतें हीं नाणीं इ. स. च्या ६ व्या व ७ व्या शतकांतील पश्चिमेकडील चालुक्यांचीं आहेत.

कदंबः—कदंबांच्या सुवर्णनाण्यांची कारागिरी व कृति पाश्चिमात्य चालुक्यांच्या नाण्यांप्रमाणें आहे. इलियटच्या मतें हीं पद्मटंकें—पद्मटंक म्हणण्याचें कारण नाण्याच्या मध्यभागीं पद्म किंवा कमळ आहे हें होय—इ. स. ५ व्या शतकांतील कदंबाच्या भरभराटीच्या कालांतील आहेत; परंतु पाश्चिमेकडील चालुक्यांच्या नाण्यांप्रमाणें, तीं याहूनहि पुढील कालांतील असावींत हें संभवनीय दिसतें. त्यांच्यावर जीं संस्कृत अक्षरें आहेत त्यांच्या वळणावरूनहि हींच गोष्ट सिद्ध होतें.

राष्ट्रकूटः—या घराण्याच्या अत्यंत भरभराटीच्या काळांत ह्यांचीं अशीं नाणींच नाहींत ( इ. स. ७५७ ते ९७३ ).

कल्याणपुरचे कलचुरीः—या घराण्यांतलि दुसरा राजा सोमेश्वर ( इ. स. ११६७—११७५ ) याचीं नाणीं प्रसिद्ध आहेत. देवगिरीचे व द्वारसमुद्राचे यादव ह्यांचीं नाणीं इलियटच्या पुस्तकांत दिलीं आहेत.

विजयानगरः—या राज्याचा उदयकाल म्हणजे हिंदुस्थानच्या इतिहासांत व नाणकशास्त्रांत एक महत्त्वाची गोष्ट आहे; कारण कृष्णेच्या दक्षिणेकडील देशांमध्यें ते वरिष्ठ होऊन बसले आणि तेथें दक्षिण हिंदुस्थानांतीलच नाण्यांची पद्धत ठेवण्यांत आली; पण कृष्णेच्या उत्तरेकडील देश बहुतेक मुसुलमानांच्या हातांत गेला होता, आणि कांहीं थोड्या नाण्यांशिवाय बाकीच्या सर्व नाण्यांच्या हिंदुस्थानी पद्धतीच्या जागीं त्या प्रांतांत मुसुलमानी पद्धतीचाच पगडा बसला. [ रॅप्सन—इंडियन कॉईन्सवरून तयार केलेलें व रा. के. एन्. दीक्षित यांनीं तपासलेलें ]

मराठी राज्यांतील नाण्यांसंबंधानें कांहीं माहिती.—शिवाजीनें आपल्या नांवानें नाणें पाडण्यापूर्वी विजापूरच्या

पातशाहींत "आदिलशाही" नाणें चालत असे. विशेषेंकरून मोहोरा व होन हे प्राचीन काळापासून चालत आहेत. होन हा मूळ "होन्नु" ह्या कर्नाटकी शब्दाचा अपभ्रंश आहे. होन्नु ह्याचा अर्थ "सोनें" असा आहे. कर्नाटकामध्यें प्राचीन हिंदु राज्यें जेवढीं होतीं, तेवढ्या सर्व राज्यांमध्यें होन हें नाणें चालत होतें. गजपति, अश्वपति वगैरे होनाचीं जीं नांवें आहेत, तीं सर्व त्याच्या प्राचीनत्वाचीं दर्शक होत. विजयानगरच्या राज्यामध्यें होन चालत असत. रुपयाचें नाणें मुसुलमानी अमलांत चालू झालें असावें. शिवाजीच्या वेळेस जे होन चालत त्यांचीं नांवें सभासदाच्या बखरींत दिलीं आहेत तीं येणेंप्रमाणें:—(१) पातशाही, (२) शिवराई, (३) कावेरीपाकी, (४) सणगरी, (५) अच्युतराई, (६) देवराई, (७) रामचंद्रराई, (८) गुत्ती, (९) धारवाडी, (१०) गंजीकोटी, (११) पाल्नाईकी, (१२) आदवाणी, (१३) जडमाल, (१४) ताडपत्री, (१५) आफराजी, (१६) त्रिवाल्लुरी, (१७) त्रिशुळी, (१८) चंद्रावरी, (१९) बिलदधी, (२०) उलफकरी, (२१) महमदशाही, (२२) वेलुरी, (२३) कंठेराई, (२४) देवनहल्ली, (२५) रामनाथपुरी, (२६) कुंदगोळी, इ.

ह्या जुन्या होनांखेरीज बहादुरी व सुलतानी नांवाचे दोन होन हैदर व टिप्पू यांनीं पाडले. त्यांशिवाय अलमगिरी वगैरे होन दिल्लीच्या बादशहांनीं पाडले. शिवाजीच्या कारकीर्दीत शिवराई होन, शिवराई रुपये, शिवराई हीं नाणीं पाडण्यास सुरवात झाली. हे शिवराई होन व शिवराई रुपये सांप्रत फार क्वचित् दृष्टीस पडतात. जुने होन पुष्कळ दृष्टीस पडतात, पण त्यांच्यावरील अक्षरें बहुतकरून फारशी लिपींत अस्पष्ट अशीं आहेत. कित्येकांवर श्रीकृष्णाची मूर्ति व कोठें (चालुक्यांचा) वराह अवताराचें चित्र दिसतें.

शिवाजीच्या वेळेस रायगड या राजधानीच्या ठिकाणीं त्याची टांकसाळ होती. संभाजी व राजाराम यांच्या धामधुमीच्या कारकीर्दीत नाणें पाडण्यासंबंधानें काय व्यवस्था होती याची माहिती मिळत नाहीं. राजारामानें चंदीस तक्त नेलें, त्यावेळीं त्यानें तेथें अठरा कारखाने सुरु केले होते. शिवाजीच्या वेळचीं सर्व वर्षासनें होनांत असत. शाहूनें सातान्यास टांकसाळ सुरु करून आपल्या नांवानें नाणें पाडण्यास सुरवात केली. "शाहूशिक्का" म्हणून जे रुपये व पैसे निघाले ते शाहूच्या कारकीर्दीतले होत. सातान्याप्रमाणें कोल्हापुरासहि टांकसाळ सुरु झाली. कोल्हापुर ही राजधानी होण्यापूर्वी (१७८८) पन्हाळा येथें टांकसाळ होती; या टांकसाळीमध्यें शंभुशिक्का किंवा शंभुपीरखानी व पन्हाळी रुपये निघत असत. शंभु या हिंदु नांवाजवळ मुसुलमानी पीरखानाचें नांव कां आलें तें समजत नाहीं. कोल्हापुरास इतर कोणत्याहि राजाच्या कारकीर्दीमध्यें शंभुशिक्क्याखेरीज निराळ्या शिक्क्याचें नाणें पाडल्याचें दिसत नाहीं.

सातारा येथें शाहूच्या कारकीर्दीमध्यें भिकाजी नाईक रास्ते, परशुराम नाईक, अनगळ प्रभृति नामांकित सावकार होते. त्यांच्याकडून छत्रपति कर्ज घेत असत, व त्याच्या फेडीस सरकारी टांकशाळेंतून रुपये पाडून त्यांस देत असत. मराठी राज्याचा जसजसा विस्तार होत गेला, तसतशा निरनिराळ्या ठिकाणीं टांकसाळा स्थापन होऊं लागल्या. नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दीमध्यें नाणें पाडण्याबद्दल ठिकठिकाणच्या सावकारांस व इतर लोकांस परवानगी देण्यांत आली. सन १७४४ मध्यें नागोठाणें येथील बाळाजी बापूजी यास तीन वर्षांच्या करारानें परवानगी मिळाली होती, व प्रत्येक वर्षी ५०७५१०० प्रमाणें सरकारास नजर देण्याचा हुकूम झाला होता. रेवदंडा येथील सावकार बहिरोराम दातार यास प्रत्येक वर्षी ६०, ९० आणि १२० प्रमाणें सरकारनजर देऊन नाणें पाडण्याची परवानगी मिळाली. सन १७४८ मध्यें किल्ले माहुली येथील बहिरोशेट व प्रल्हादशेट यांस १२० रुपये नजर घेऊन नाणें पाडण्याबद्दल सनद दिली. अशा प्रकारें नाणें पाडण्याबद्दल पुष्कळ ठिकाणच्या लोकांस परवाने मिळाले होते. धारवाड येथें सन १७५३ मध्यें जी टांकसाळ प्रथम संस्थापित झाली ती त्याच पेशव्याच्या कारकीर्दीमध्यें झाली. त्याचप्रमाणें बागलकोट येथें विजापूरच्या बादशहापासून जी टांकसाळ चालत होती, ती ह्याच पेशव्यानीं पुन्हां सुरु केली.

थोरल्या माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दींतहि पुष्कळ टांकसाळी सुरु झाल्या. नाशीक येथें सन १७६५मध्यें लक्ष्मण आप्पाजी यांच्या देखरेखीखालीं व सन १७७२ मध्यें चांदवड येथें तुकोजी होळकर यांच्या विद्यमानें एक टांकसाळ सुरु झाली. सवाईमाधवराव पेशवे यांच्या कारकीर्दींत सन १७८२ मध्यें कोंकण प्रांतांत दुल्लभशेट गोविंदजी व गोविंद पांडुरंग यांस नाणें पाडण्याबद्दल परवानगी मिळाली.

मराठ्यांची राज्यसत्ता जसजशी वाढत चालली तसतशा नाणें पाडण्याकरितां, अनेक सरदारांच्या व जहागीरदारांच्या विद्यमानें सर्व प्रांतांमध्यें टांकसाळा सुरु झाल्या. शिंदे, होळकर यांच्या उज्जनी व इंदूर येथें टांकसाळी होत्या. त्यांच्याशिवाय माळव्यामध्यें भोपाळ, प्रतापगड, भिलसा, गंजबसोडा, सिरोंज आणि कोटा येथें वेगवेगळ्या टांकसाळी होत्या. नागपूर येथें भोंसल्यांची एक मोठी टांकसाळ होती. भडोच शिंद्याकडे आल्यानंतर तेथें त्यांनीं टांकसाळ सुरु केली ह्याशिवाय शिंद्यांच्या कांहीं टांकसाळी खानदेशामध्यें होत्या; तेथें बऱ्हाणपुरी रुपये पाडीत असत. होळकरांची वाफगांवीं टांकसाळ होती. तेथील रुपयास वाफगांवी असें नांव असे. पेशवाईच्या अखेर प्रत्येक सरदारानें निरनिराळ्या ठिकाणीं टांकसाळी सुरु करण्याचा प्रयत्न केला होता. टांकसाळीबद्दलची सरकारपद्दी दिली म्हणजे वाटेल त्यास परवानगी मिळत असे. आंग्र्यांची टांकसाळ कुलाब्यास होती. तेथें श्रीशिक्का रुपये पाडीत असत. जंजिऱ्यास जंजिऱ्याच्या हबशांची टांकसाळ होती. तेथें हबसाणी अथवा निशाणी रुपये निघत, त्यांवर

'ज' हें अक्षर असे. तें जंजिरा या शब्दाचें द्योतक होतें. कर्नाटकामध्यें प्रत्येक प्रमुख ठिकाणच्या देसायाची व जहागीरदाराची टांकसाळ होती. ह्या सर्व टांकसाळींबद्दल पेशवेसरकारास कांहीं नियमित पट्टी मिळे. कर्नाटकांतील टांकसाळींमध्यें खोटें नाणें फार पडूं लागल्यामुळें, पेशव्यानीं सन १७६५ मध्यें धारवाड येथें पांडुरंग मुरार ह्याच्या देखरेखीखालीं सरकारी टांकसाळ सुरू करून, कर्नाटकांतील इतर टांकसाळी बंद करण्याबद्दल हुकूम फर्माविले.

प्रत्येक प्रांतामध्यें एकाच प्रकारचें नाणें पाडीत असत असें दिसत नाहीं. बागलकोट येथें मल्हार भिकाजी रास्ते हा पेशव्यांचा मुख्य सुभेदार होता. त्याच्या हुकुमानें जे रुपये पाडले त्यांस मल्हारशाई रुपये म्हणत; याची किंमत १५ आणे असे. हे रुपये पेशव्यांनीं सर्व प्रांतांमध्यें चालू करण्याचा प्रयत्न केला. त्यांनीं शेंकडा दोन रुपये बट्टा देऊन सर्व नाणें मल्हारशाही करावें असा विचार केला. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत अंकुशी रुपयांचें महत्त्व फार वाढलें होतें. अंकुशी अथवा चांदवडी रुपये एकाच प्रकारचे होते; हे पुण्यास पाडीत. या रुपयावर दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत मामलेदार लोक वाटेल तो बट्टा घेत असत. पुण्यास हे रुपये तीन प्रकारचे होते. कोरा निर्मळछापी, मध्यमछापी व नारायणछापी. या रुपयांतील चांदीच्या शुद्धाशुद्ध प्रमाणांवरून हीं नांवें पडलीं होतीं. पुण्याची टांकसाळ सन १८२२ मध्यें बंद झाली असा चापलिन साहेबाच्या एका रिपोर्टांत उल्लेख आहे. नाण्याची तूट आल्यामुळें पुन्हां ती सुरू केली होती, पण सन १८३४ मध्यें ती कायमची बंद झाली. बागलकोट, कोल्हापूर, कुलाबा वगैरे बहुतेक ठिकाणच्या टांकसाळी ह्याच सुमारास बंद झाल्या.

मराठ्यांच्या राज्यामध्यें प्रांतोप्रांतीं निरनिराळें नाणें चाले. दक्षिण महाराष्ट्रामध्यें हुकेरी, निलकंठी, पन्हाळी, चितुरशहापुरी, गणपाडी, सूतपाडी, वगैरे रुपये चालत. निजामशाहीमध्यें बागचलनी, हुकूमचलनी आणि हेटचलनी असे तीन प्रकारचे रुपये असत. तेच निजामाच्या सरहद्दीवरील पेशव्यांच्या मुलुखांतहि चालत असत.'हाली शिक्का' व समशेरी हें सर्व निजामशाही नाणें असे; हें पेशवाईच्या अखेरपर्यंत चालत होतें. खानदेश व नाशिक या प्रांतांत बेलापुरी, चांभारगोंदी, चांदवडी, बऱ्हाणपुरी, वाफगांवी, जरीफटका वगैरे रुपये चालत. कुलाबा प्रांतामध्यें आंग्र्यांचे कुलाबी रुपये विशेषेंकरून चालत असत. रत्नागिरी प्रांतामध्यें चांदवडी, दौलताबादी, हुकेरी, चिकोडी वगैरे नाणें चाले. दक्षिण कोंकणांत टांकसाळ स्थापन करण्यांत आली नाहीं. ह्या सर्व रुपयांचे भाव निरनिराळे असत. थोरल्या माधवराव व सवाई माधवराव यांच्या कारकीर्दीत मल्हारशाही रुपयाप्रमाणें बट्टा कापून घेत असत. चांदवडी व अंकुशी हेच पेशवाईअखेर सर्व महाराष्ट्रामध्यें प्रमुख ठरीव नाणें होतें.

रुपयांवर बहुतेक फारशी अक्षरें असत. शिवाजी व शाहु यांच्या शिक्क्यांवर मात्र मराठी नांवें उठविलेलीं असत. त्याचप्रमाणें आंग्र्यांच्या रुपयावर श्री काढलेली असे. यशवंतराव होळकरानें आपल्या रुपयावर मराठी छाप उठविला होता. ह्यांशिवाय मराठी शिक्क्याचे रुपये फारसे आढळण्यांत येत नाहींत. जरीफटका म्हणून नाशकास एक रुपया पेशव्यांनीं पाडला होता; तो हरिपंत फडक्यांचा होता असें म्हणतात. शिवाजीच्या भगव्या झेंड्याप्रमाणें जरीफटक्याचें माहात्म्य पेशव्यांच्या कारकीर्दीत फार वाढलें होतें. त्याचें दर्शक हा रुपया असेल असें वाटतें. १८०३ सालीं सिधोजी नाईक निपाणकरानें आपल्या शिक्क्याचा रुपया तयार केला होता. बडोद्यास सयाशाही म्हणून पहिला सयाजीराव, व बाबाशाही म्हणून पहिला फत्तेसिंग बाबा यांनीं रुपये पाडले होते. सयाशाही रुपयावर देखील तरवार, हिजरी सन आणि "शिक्के मुबारिक सेनाखासखेल समशेर बहादूर" असा फारशी लेख असे. तात्पर्य, मराठी अक्षरांचे रुपये फार क्वचित् दृष्टीस पडत. पेशव्यांच्या कारकीर्दीमध्यें पाडलेल्या बहुविध रुपयांवर प्रत्येक सालाचे हिजरी सन मराठीमध्यें घातले आहेत. पण त्यांवरील शिक्के फारशी आहेत. ह्यावरून फारशी शिक्के उमटविण्याची पूर्वापार चालत आलेली पद्धति पेशव्यांनीं बंद केल्याचें दिसत नाहीं.

पेशव्यांच्या राज्यामध्यें रुपयाच्या खालोखाल अधेल्या, आणि चवल्या हीं नाणीं होतीं. रुप्याच्या नाण्यांखेरीज सर्व महाराष्ट्रामध्यें तांब्याचें नाणें चालत असे व तें मात्र अगदीं एक प्रकारचें होतें. नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत शिवाजीचा शिवराई पैसा पुष्कळ प्रचारांत होता. ह्या पैशामध्यें कोठेंहि फेरबदल केल्याचें दिसून येत नाहीं. कुलाब्यास आंग्र्यांच्या, कोंकणांत पनवेलच्या व कर्नाटकांत धारवाडच्या टांकसाळींमध्यें "शिवराई" पैसे पाडीत.

साताऱ्याची टांकसाळ शाहूपासून शहाजीपर्यंत चालू असावी. प्रतापसिंहाच्या कारकीर्दीमध्यें येथें चांदवडी कोरे रुपये पाडीत असत. त्यानें आपल्या नांवाचा छाप निराळा केला नव्हता;पैसे शिवाजीच्या नांवाचेच पाडीत. प्रतापसिंहानें आपल्या राज्यांत सर्वच चांदवडी शिक्का कायम केला होता. सावकारलोकहि त्याच शिक्क्यावर इतर जातींच्या रुपयांचा वर्तावळा घेत. सरकारी नोकरांस पगारहि त्याच भावानें देत व शेंकडा २॥ बट्टा कापून घेत. सन १८३० सालापासून पुणें कोरे रुपये व चांदवडी अंकुशी रुपये ह्यांमध्यें बट्टा ठरल्यामुळें साताऱ्च्या राज्यांत ३४५७१ रुपये वर्तावळ्याची रक्कम जमा झाली,असा साताऱ्चा कमिशनर ओगल्वी याच्या एका रिपोर्टांत उल्लेख सांपडतो. शहाजीच्या कारकीर्दीत सर्व कामदारांकडून ४। रुपये बट्टा कापून घेत. दिवाण, फडणवीस वगैरे मुख्य मुख्य कामदारांच्या पगारांतूनहि बट्टा वजा होत असे. सन १८३५ नंतर ईस्ट इंडिया कंपनीचे रुपये राज्यामध्यें चालू झाले.

सातान्याजवळ रहिमतपूर येथें एक टांकसाळ प्रतापसिंहाच्या कारकीर्दीत होती. तेथें शिवराई पैसे पाडीत असत. त्या टांकसाळीवर जे अधिकारी होते त्यांस टांकसाळे असें नांव असे. [ विविधज्ञानविस्तार–१९००, सप्टेंबर व आक्टोबर. ]

आंतां आज जगांत निरनिराळ्या देशांतून कोणतीं नाणीं –विशेषतः सोन्यारुप्याचीं–प्रचलित आहेत तें पाहूं.

## ब्रिटिश साम्राज्यांतील नाणीं.

ग्रे ट ब्रि ट न आ णि आ य र्लं ड.—

सोन्याचीं नाणीं:—पांच पौंडांचें एक, दोन पौंडांचें एक, साव्हरिन ( १ पौंड ) व अर्धा साव्हरिन.

रुप्याचीं नाणीं:—क्राउन ( ५ शिलिंग ), दोन फ्लोरिन ( ४ शिलिंग ), अर्धा क्राउन, फ्लोरिन, शिलिंग, सहा पेन्स, ग्रोट, तीन पेन्स, दोन पेन्स व पेनी.

ब्रॉंझचीं ( मिश्रधातूचीं ):—पेनी ( १ पेन्स ), अर्धा पेनी व फार्दिंग ( ¼ पेन्स ).

ब्रि टि श व सा ह ती:—पुढील वसाहतींत साम्राज्यांतील साव्हरिन नाणीं चालतात. न्यूझीलंड, यूनियन ऑफ साउथ आफ्रिका आणि दक्षिणआफ्रिका ( सामान्यतः ), फाकलंड बेट, फिजी, जिब्राल्टर, सेंट हेलेना व वेस्ट इंडीज.

साम्राज्याच्या नाण्यांखेरीज विशिष्ट नाणीं पुढील साम्राज्य वसाहतींत चालतात.

ऑस्ट्रेलियन कॉमनवेल्थ:—विशिष्ट फ्लोरिन, शिलिंग, सहा पेन्स, तीन पेन्स हीं रुप्याचीं व पेन्स व अर्धा पेन्स हीं ब्रॉंझचीं.

ब्रिटिश ग्वायाना:—विशिष्ट ग्रोट अथवा चार पेन्सचें.

ग्वेर्नसे:—आठ डबल ( = १ पेनी ), ४, २ व १ डबल.

जमेका:—निकल व ब्रॉंझ, पेन्स, अर्धापेन्स व फार्दिंग

जर्सी:—विशिष्ट पेन्स, अर्धापेन्स व फार्दिंग.

माल्टा:—फार्दिंगचा ⅓ ( ब्रॉंझ ).

ब्रिटिश पश्चिम आफ्रिका:—रुप्याचें व मिश्रधातूचें, एक पेनीचें, अर्ध्या पेनीचें, व $\frac{1}{10}$ पेनीचें ( निकल–ब्रॉंझ ).

## ब्रिटिश वसाहतींतील विशिष्ट नाणीं.

| देश | यूनिट | किंमत शि. पे. | सोन्याचीं नाणीं | रुपें व इतर धातूंचीं नाणीं |
|---|---|---|---|---|
| एडन | ( हिंदुस्थान पहा ) | | | |
| ऑस्ट्रेलेशिया | ब्रिटिश साव्हरिन | २०–० | ब्रिटिश | रुपें व ब्रॉंझ |
| ब्रिटिश हॅंडयूरास | सोन्याचे डॉलर | ४–१⅓ | ,, व यु. स्टेटस् | रुपें, निकल व ब्रॉंझ |
| ब्रिटिश उत्तर बोर्निओ | डॉलर | २–४ | ... | निकल व ब्रॉंझ |
| कानडा | रुप्याचे डॉलर | ४–१⅓ | कानडाचें व ब्रिटिशांचे | रुपें, निकल व ब्रॉंझ |
| सिलोन | हिंदुस्थानचा रुपया | २–० | ब्रिटिश | रुपें, निकल व तांबें |
| सायप्रस | पीआस्ट्रर | ०–१⅓ | ,, | रुपें व ब्रॉंझ |
| फेडरेटेड मलया संस्थानें | डॉलर | २–४ | ,, | (स्ट्रेट्स् सेटलमेंट्स् पहा) |
| हॉंगकॉंग व लाब्वन | डॉलर | २–७ | ... | रुपें व ब्रॉंझ |
| हिंदुस्थान | रुपया | २–० | ब्रिटिश | निकल व तांबें |
| केनिया | शिलिंग | १–० | ... | रुपें, निकल व ब्रॉंझ |
| मॉरिशस व सैचेलेस | हिंदुस्थानचा रुपया | २–० | ... | रुपें व ब्रॉंझ |
| मेसापोटेमिया | ( ब्रिटिश हिंदुस्थानप्रमाणें ) | | | |
| न्यू फाउंडलंड | डॉलर | ४–१⅓ | ... | रुपें व ब्रॉंझ |
| प्यालेस्टाईन | ( सुदानप्रमाणें ) | | | |
| स्ट्रेट्स् सेटलमेंटस् | डॉलर | २–४ | ब्रिटिश | रुपें व ब्रॉंझ |
| सुदान | सोन्याचा पौं.(१००पीआ.) | २०–३$\frac{3}{7}$ | ईजिप्शियन पौंड | रुपें |
| टांगानिका, युगांडा | ( केनियाप्रमाणें ) | | | |
| पश्चिम आफ्रिका | ब्रिटिश साव्हरिन | २०–० | ब्रिटिश | रुपें व अलॉय किंवा मिश्रधातु व निकल |

## परदेशांतील नाणीं.

| देश | प्रमाणनाणें | किंमत पौं. शि. पे. | सोन्याचें नाणें | रुप्याचें नाणें |
|---|---|---|---|---|
| आबिसीनिया | तालारी | ०– २– ० | | तालारी |
| अल्बेनिया | ( धातूचें नाणें नाहीं ) | | | |
| अर्जेंटिना | | ... | पेसो | पेसो व सेंटाव्होस |
| | १०० सेंटाव्होस = १ सोन्याचा पेसो | ०– ३–११ १/२ | ... | ... |
| | १०० ,, = १ कागदी पेसो | ०– १–८ ३/४ | ... | ... |
| ऑस्ट्रिया | १०० क्रोन = १ हेलर | ०– ०–१० | क्रोन | क्रोन |
| बेलजम | १०० सेंटाईम्स = १ फ्रँक | ०– ०–९.५१३ | फ्रँक | फ्रँक व सेंटाईम्स |
| बोलिव्हिया | १०० सेंटाव्होस = १ बोलिव्हियानो | ०– ४–० | बोलिव्हियानो | सेंटाव्होस |
| ब्राझिल | ( मिलरिस ) | ०– २–३ | मिलरिस | मिलरिस व रेझ |
| बलगेरिया | १०० स्टोटिनकी = १ लेव्ह | ०– ०–९.५१३ | लेव्ह | लेव्ह व स्टोटिनकी |
| चिली | १०० सेंटाव्होस = १ पेसो | ०– १–६ | पेसो | पेसो व सेंटाव्होस |
| चीन | १०० सेंटस् = १ यान | ०– २–६ | ... | यान |
| कोलंबिया | १०० सेंटाव्होस = १ पेसो | ०– ४–० | पेसो | पेसेटा |
| कोस्टा-रिका | १०० सेंटेसिमॉस = १ कोलोन | ०– १–१०.९ | कोलोन | सेंटेसिमॉस |
| क्यूबा | १०० सेंटाव्होस = १ रुप्याचें पीआस्टर | (चलन नाहीं) | | |
| | स्पेनचा सोन्याचा डॉलर | ०– ३–९ १/२ | ... | ... |
| | यू. एस्. चा सोन्याचा डॉलर | ०– ४–१.३२ | ... | ... |
| चेको–स्लोव्हाकिया | ( फ्रँक ) | ... | ... | ... |
| डेन्मार्क | १०० ओरे = १ सोन्याचा क्रोन | ०– १–१ १/२ | क्रोन | क्रोन व ओरे |
| इक्वेडोर | १०० सेंटाव्होस = १ रुप्याचें स्यूक्रे | ०– २–० | स्यूक्रे | स्यूक्रे व सेंटाव्होस |
| ईजिप्त | १०० पीआस्टर = १ सोन्याचा पौंड | १– ०–३ ३/४ | पौंड व पीआस्टर | पीआस्टर |
| इस्तोनिया | मार्क | ०– ०–११.७४८३ | ... | ... |
| फिनलंड | १०० पेनी = १ सोन्याचा मार्क | ०– ९–९.५१३ | मार्क | मार्क व पेनी |
| फ्रान्स | १०० सेंटाईम्स = १ फ्रँक | ,, | फ्रँक | फ्रँक व सेंटाईम्स |
| अल्जीरिया | ( फ्रान्सप्रमाणें ) | | | |
| इन्डो–चायना | १०० सेंट = १ डॉलर | ०– ३–४ १/२ | ... | पीआस्टर |
| मादागास्कर | ( फ्रान्सप्रमाणें ) | | | |
| ट्यूनिस | ,, | | | |
| जर्मन संस्थानें | १०० फेनिज = १ मार्क | ०– ०–११.७४८३ | मार्क | मार्क व फेनिज |
| ग्रीस | १०० लेप्टा = १ ड्राक्मा | ०– ०–९.५१३ | ड्राक्मा | ड्राक्मा व लेप्टा |
| ग्वाटेमाला | १०० सेंटाव्होस = १ रुप्याचा पेसो | ०– ४–० | पेसो | पेसो व रीलेस |
| | कागदी पेसो | ०– ०–२ | ... | ... |
| हायटी | १०० सेंटाव्होस = १ सोन्याचा गॉर्डे | ०– ३–११ १/२ | गॉर्डे | गॉर्डे व सेंटाव्होस |
| | कागदी गॉर्डे | ०– ०–८ १/३ | ... | ... |
| होंडुरस | १०० सेंटाव्होस = १ रुप्याचा पेसो | ०– ४–० | ... | पेसो व सेंटाव्होस |
| हंगेरी | १०० हेलेर = १ क्रोन | ०– ०–१० | क्रोन | क्रोन |
| इटली | १०० सेंटेसिमी = १ लिरा | ०– ०–९.५१३ | लिरा | लिरा व सेंटेसिमी |
| ट्रिपोली | ( इटालीप्रमाणें ) | | | |
| जपान | १०० सेन = १ सोन्याचा येन | ०– २–१/२ | येन | सेन |
| कोरिया | १०० चोन = १ वोन | ०– –२–१/२ | वोन | चोन |

| देश | प्रमाणनाणें | किंमत पौं. शि. पे. | सोन्याचें नाणें | रुप्याचें नाणें |
|---|---|---|---|---|
| लाटव्हिया | १०० ग्रासची = १ सोन्याचा लाट | ०-- --०--९.५१३ | लाट | लाट व ग्रासची |
| लायबेरिया | १०० सेंटस = १ यु. एस्. चा डॉलर | ०-- ४--१.३२ | ... | सेंट |
| लक्झेंबर्ग | फ्रँक ( ८० फेनिज = १ फ्रँक ) | ०-- ०--९.५१३ | ... | ... |
| मेक्सिको | १०० सेंटाव्होस = १ सोन्याचा डॉलर | ०- २--½ | डॉलर | ... |
| | रुप्याचा डॉलर | ०-- ३--५½ | ... | डॉलर व सेंटाव्होस |
| मोनाको | १०० सेंटाईम्स = १ फ्रँक | ०-- ०--९.५१३ | फ्रँक | ... |
| मॉटेनिग्रो | १ आस्ट्रियन क्रोन = १ पेरपेर | ०-- ०--१० | पेरपेर | पेरपेर |
| मोरोक्को | ५ फ्रँक = १ रुप्याचें पीआस्टर | ०-- ३--० | ... | पीआस्टर |
| नेदर्लंडस् | १०० सेंटस = १ सोन्याचा फ्लोरिन–अथवा गुल्डेन | ०-- १--७.८२४ | फ्लोरिन | फ्लोरिन त सेंट |
| जाव्हा | सोन्याचा ड्यूकेट | ०-- ९--४½ | ... | ... |
| क्यूराको | ( नेदर्लंडस्प्रमाणें ) | | | |
| निकारागुआ | १०० सेंटाव्होस = १ सोन्याचा कोरडोवा | ०-- ४--१.३२ | ... | सेंटाव्होस |
| | कागदी पेसो ... | ०-- ०--४ | ... | ... |
| नॉर्वे | १०० ओरे = १ सोन्याचा क्रोन | ०- १--१½ | क्रोन | क्रोन व ओरे |
| ओमान | २० गाडचा एक मुहंमदी | १- ०--१½ | ... | डॉलर व हिंदी रुपया |
| पनामा | २ पेसोचा एक सोन्याचा बलबोआ | ०-- ४- २ | बलबोआ | पेसो व सेंट |
| पाराग्वे | १०० सेंटाव्होस = १ पेसो | ०-- ३--११½ | ... | पेसो व सेंटाव्होस |
| | कागदी पेसो | ०-- ०--३ | ... | ... |
| प्रशिया | २० शाही = रुप्याचा क्रान | ०-- ०--७ | टोमन व क्रान | क्रार |
| पेरु | १०० सोल = १ लिब्रा | १-- ०--० | लिब्रा | सोल, डिनेरो व सेंटाव्होस |
| पोलंड | ( १०० फेनिज = पोलस्का मार्क ) | धातूचीं चलनें नाहींत | | |
| पोर्तुगाल | एसक्यूडो | ०-- ४--५¼ | एसक्यूडो | मिलरेस व टेस्टोन |
| | कागदी | ०-- ३--४ | ... | ... |
| पोर्तुगीज हिंदुस्थान | ४०० रीस = १ रुपाया | ०-- १--४ | ... | रुपया |
| रुमानिया | १०० बानी = १ सोन्याचा ल्यू | ०-- ०--९.५१३ | लेई | लेई व बानी |
| रशिया | १०० कोपेक्स = १ सोन्याचा रूबल | ०-- २--१½ | रूबल | रूबल व कोपेक्स |
| साल्व्हाडोर | १०० सेंटाव्होस = १ सोन्याचा पेसो | ०-- ३--११½ | पेसो | पेसो व सेंटाव्होस |
| | कागदी पेसो | ०-- १--३½ | ... | ... |
| सर्व्हिया | १०० पारा = दिनार | ०-- ०--९.५१३ | दिनार | दिनार व पारा |
| सयाम | १०० सटांग्ज = १ टिकल | ०-- १--६½ | १० टिकलचा डॉस | टिकल |
| स्पेन | रुप्याचा पेसेटा | ०-- ०--९.५१३ | पेसेटा | डॉस, पेसेटा व सेंटिमो |
| | कागदी पेसेटा | ०-- ०--९ | ... | ... |
| स्वीडन | १०० ओरे = १ सोन्याचा क्रोना | ०-- १--१½ | क्रोन | ओरे |
| स्विझरलंड | १०० सेंटाईम्स = १ फ्रँक | ०--०--९.५१३ | फ्रँक | फ्रँक व सेंटाईम्स |
| तुर्कस्तान | १०० पीआस्टर = १ लिरा | ०--१८--० | पीआस्टर | पीआस्टर |
| युनायटेडस्टेट्स | १०० सेंट = १ डॉलर | ०-- ४--१.३२ | डॉलर | डॉलर व डिमे |
| फिलिपाईन्स | फिलिपिनो = ५० यू. एस्. सेंट | ०-- २--०.६६ | ... | ... |
| युरुग्वे | १०० सेंटेसिमॉस = १ सोन्याचा पेसो | ०-- ४ -३ | ... | पेसो व सेंटेसिमॉस |
| व्हेनेझुएला | १०० सेंटाव्होस = १ सोन्याचा बालिव्हर | ०-- ०--९½ | बालिव्हर | बालिव्हर व सेंटाव्होस |
| जुगोस्लाव्हिया | | धातूचीं चलनें नाहींत. | | |

**नाणेंघाट**—पुणें, जुन्नर तालुका. जविधन किल्ल्याजवळ. ठाणें जिल्ह्यांतून मुरबाडहून जुन्नरला जाणारा रस्ता या घाटांतून जातो. हा घाट फार जुना आहे. येथें लेणीं असून तीं बौद्ध लोकांनीं बांधिलेलीं आहेत. त्यांत आंध्र (भृत्य) सातवाहन राजांच्या मूर्ती व शिलालेख वरेच आहेत. तसेंच त्या शिलालेखांतून या शालिवाहन राजांचीं, त्यांच्या बायकांचीं व मोठमोठ्या पुरुषांचीं वर्णनें दिलीं असून, त्यांनीं ज्या जमिनीच्या वगैरे देणग्या दिल्या आहेत, त्या सतत चालू रहाव्या असा मजकूर आहे हे आंध्रभृत्य पहिल्या व दुसऱ्या शतकांत राज्य करीत होते. नाणेंघाटास चुकीनें नानाघाट असें म्हणतात. पुणें जिल्ह्यांतील मावळापैकीं नाणेंमावळ, हें नाणेंघाट व जुन्नर यांच्या दरम्यान कुकडी नदीच्या खोऱ्यांत पश्चिम बाजूस आहे.

**नांत**—राजपुताना, कोटा संस्थान. लादपुरा जिल्ह्यांतील खेडें.हें कोटयाच्या वायव्येस ३ मैलांवर आहे.१८व्या शतकारंभीं कोटयाच्या झाला फौजदारांनां हें जहागिरींत दिलें होतें व झालिमसिंगाच्या वेळीं हें भरभराटींत होतें; पण हल्लीं हें फक्त एक खेडें आहे.त्यांत ३००गुन्हेगार जाती आहेत; यांनां दरबार प्रामाणिक शेतकरी बनविण्याचा प्रयत्न करीत आहे. झालिमसिंगाचा राजवाडा रजपूत सरदाराच्या वसतिस्थानाचा उत्तम नमुना आहे, पण याची बऱ्याच दिवसांपासून दुरुस्ती ना केल्यामुळें याचे दिवाणखाने, कारंजीं वगैरे सर्व पडून गेलीं आहेत.

**नाताळ**—दक्षिण आफ्रिकासंघांतील एक समुद्रकिनाऱ्यावरील प्रांत.हा दक्षिण अक्षांश २७°आणि ३१° व पूर्व रेखांश २९° आणि ३३° यांत हा वसला आहे. याच्या आग्नेयीस हिंदीमहासागर; नैर्ऋत्येस केप प्रांत व बासुटो लँड; वायव्येस ऑरेंजफ्रीस्टेट व उत्तरेस व ईशान्येस ट्रान्सव्हाल व पोर्तुगीज ईस्ट आफ्रिका आहे. नाताळचा समुद्रकिनारा ६० मैल लांबीचा आहे. क्षेत्रफळ ३५२९१ चौरस मैल आहे. या प्रांताचे खुद्द नाताळ व झुलुलँड असे दोन भाग आहेत.

नाताळदेशाचा आकार एखाद्या भव्य व सुबेजा जिन्याप्रमाणें आहे. हा जिना चढून गेलें म्हणजे पलीकडे विस्तृत सपाटीचा प्रदेश लागतो. ड्रेकन्सबर्ग पर्वतांची ओळ मध्यें भिंतीसारखी उभी आहे. या पर्वतांतून पुष्कळ नद्यांचा उगम आहे. पर्वताच्या आग्नेय बाजूस दाट जंगल आहे, व किनाऱ्यावर वनराजी इतकी दाट आहे कीं त्यायोगें नाताळला 'उद्यानवसाहत' ( गार्डन कॉलनी ) असें नांव पडलें आहे. नाताळमधील सर्व नद्यांचे उगम ड्रेकन्सबर्ग पर्वतांतून आहेत. सर्वांत मोठी नदी टुगेला ही होय. ग्रिक्वालँड ईस्ट व नाताळमधील सरहद्द उमझिमकुलु नदी ही आहे. या नदीच्या खोऱ्यांतून फारच रमणीय देखावा दिसतो.

**हवामान.**—नाताळची हवा बदलणारी असली तरी रोगकारक मात्र नाहीं. खोऱ्यांची व किनाऱ्यावरील हवा फारच उष्ण आहे, इतकी कीं अत्यंत कडाक्याची थंडी पडली असतांहि शेगड्यांची गरज भासत नाहीं. आक्टोबरमध्यें उन्हाळा सुरु होतो व मार्चमध्यें संपतो. बाकीच्या काळांत हिंवाळा असतो. नाताळच्या रहिवाश्यांनां छातींतील रोगाची बाधा मुळींच होत नाहीं.

**रहिवासी.**—१९ साव्या शतकाच्या आरंभींच्या वर्षांत झुलु लोकांनीं येथील एतद्देशीयांचा पुरा नाश केला. याच्या पूर्वी एतद्देशीयांची संख्या एक लाख होती. बुशमनांखेरीज करून बाकीचे सारे एतद्देशीय लोक बांटु वंशाचे आहेत. आज सर्व जातींत झुलु रक्ताचें बरेंच मिश्रण झालेलें आहे. नाताळांतील एतद्देशीयांनीं आपली जातिविषयक संघटना बरीच केली आहे. झुलु लोकांच्या अत्याचारापूर्वी येथील एतद्देशीय काफीर राष्ट्रजातीची शाखा जी आमाक्सोसा, त्या शाखेचे होते. याशिवाय अमानीउस्वा, अमाकुनु या राष्ट्रजातींचीहि या ठिकाणीं वस्ती आहे. गौरकाय व आशियाखंडस्थ लोक देखील येथें राहतात.

**मोठीं शहरें.**—पिटरमारित्झबर्ग हें प्रांतिक सरकारच्या राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण आहे. याशिवाय डंडी, न्यूकॅसल, युट्रेच, ग्रे टाउन, व्हेरूलम हीं मुख्य शहरें आहेत.

**दळणवळण.**—केपटाउन किंवा सुवेझ ह्या बाजूनें यूरोपकडे जाणाऱ्या-येणाऱ्या बऱ्याच आगबोटींचे रस्ते दरबानवरून गेले आहेत. मोठालीं व महत्वाचीं स्थळें आगगाड्यांनीं जोडलीं आहेत. येथें सुव्यवस्थित असें पोस्टखातें व तारायंत्र खातें आहे.

**शेतकी व धंदे.**—विविध प्रकारचें हवामान व अनेक तऱ्हेची जमीन, यांमुळें शेतीपासून उत्पन्न होणाऱ्या जिन्नसांतहि अनेक प्रकार दृष्टीस पडतात. खडकाळ जमीन व खेळत्या पाण्याचा अभाव यांमुळें कृषिकर्मास कांहीं ठिकाणीं अडथळा उत्पन्न होतो. मोठ्या प्रमाणांत ज्याचें पीक येतें, असें धान्य म्हणजे मका होय. एतद्देशीयांचें तें मुख्य खाद्य आहे. याशिवाय एतद्देशीय लोक, तंबाखू, दुधेभोंपळे, रताळीं वगैरेंचीहि लागवड करतात. मध्यदेशीय व डोंगराळ भागांत गहूं, जव, व ओट हीं धान्यें उत्पन्न होत असून त्यांची लागवड गौरकाय शेतकरी करतात. सखल व दलदलीच्या भागांत ऊंस, चहा, कॉफी, तंबाखू, आरारोट, कापूस इत्यादि जिन्नसांची पैदास होते. मध्यदेशीय व डोंगराळ प्रांतांतून गुरांच्या पैदासीचा धंदा विस्तृत प्रमाणांत चालतो. गुरांच्या बाजाराची मुख्य पेठ जोहान्सबर्ग ही होय. दुधदुभत्याचा धंदाहि चांगला भरभराटींत आहे व नाताळच्या लोण्यास मागणी फार असते. सरकारनें कृषिकर्माच्या प्रयोगशाळा काढल्या असून गुरांकरितां म्हणून एक वैद्यकखातेंहि काढलें आहे. कोळसा, लोखंड, तांबें आणि सोनें हीं खनिज द्रव्यें आहेत. येथें निघणारा कोळसा फार उत्तम असतो, १९१९ सालीं २८ लाख टन कोळसा बाहेर पडला.

आ या त मा ल.—लोखंडी सामान, सूत, कापड, शेतकी आणि खाणीविषयक यंत्रें, तंबाखू आणि खाद्यवस्तु वगैरे.

नि र्ग त.—कोळसा, लोंकर, कातडीं, चहा, साखर, फळें इत्यादि.

स र का र व शा स न प द्ध ति.—१८९३ पासून १९१० पर्यंत नाताळ ही स्वयंशासित वसाहत होती. सध्यां नाताळ येथील सीनेट व सभागृह यांचे अनुक्रमें आठ व सतरा सभासद संयुक्त पार्लमेंटमध्यें आहेत. काळ्या लोकांनां, ते काळे आहेत म्हणून मत देण्याचा अधिकार नाहीं, असा जरी सरकारी कायदा नसला, तरी, 'विशिष्ट कायदे व न्यायसभा यांनीं नियंत्रित असलेल्या' कोणाहि व्यक्तीस मतदानाचा हक्क नसल्यामुळें, व या सदरांत सर्वच एतद्देशीयांचा समावेश होत असल्यामुळें, एतद्देशीयांनां मतदानाचा हक्क नाहीं असेंच म्हणावें लागतें. याच संबंधांत दुसरा जो कायदा आहे त्याचाहि परिणाम एतद्देशीयांनां मतदानाधिकारी पुरुषांच्या मालिकेंतून वगळण्यांतच होतो.

प्रांतीय राज्यव्यवस्थेच्या शिरोभागीं 'संयुक्तप्रधानमंडळानें' निवडलेला अधिकारी असतो. हा पांच वर्षेपर्यंत अधिकारावर असतो. प्रांतिक मंडळानें निवडलेल्या चार सभासदांचें एक कार्यकारी मंडळ याच्या मदतीस असतें. प्रांतिक मंडळाचे २५ सभासद असून त्या मंडळास निव्वळ प्रांतिक कारभार पाहण्याचाच अधिकार आहे. या मंडळाची मुदत तीन वर्षांचीच असते. स्थानिक राज्यकारभाराच्या सोयीकरितां नाताळचे लहान लहान परगणे पाडले आहेत. झुलुलँड मात्र निराळ्या विशिष्ट शासनयंत्राखालीं आहे. मोठमोठ्या शहरांचा कारभार म्युनिसिपलसंघ व लहान शहरांचा कारभार लोकलबोर्डें पाहतात.

का य दा व न्या य.—१९०९ च्या साउथ आफ्रिका ॲक्टानें दक्षिण आफ्रिकेमध्यें वरिष्ठ कोर्ट स्थापण्यांत आलें व नाताळ येथील पूर्वीचें वरिष्ठ कोर्ट या कोर्टाचा एक प्रांत विभाग करण्यांत आला. नाताळमध्यें रोमन-डच कायदा क्वचित ठिकाणीं फरक करून व सुधारून लावण्यांत येतो. एतद्देशीयांनां होतां होईतों त्यांचेच कायदे व चालीरीती लागू करण्यांत येतात.१८७८-८७सालीं एतद्देशीय कायद्यांचा सुधारून सुव्यवस्थित संग्रह करण्यांत आला व १९०१ पासून त्याच्या अंमलबजावणीस सुरुवात झाली. परदेशांतून येथें आलेल्या मजुरांकरितां विशिष्ट कायदे पास केलेले आहेत. मॅजिस्ट्रेटला लहानसहान बाबतींत दिवाणी व फौजदारी अधिकार आहेत. मॅजिस्ट्रेटच्या निकालावर प्रांतिक कोर्टाकडे अपील करतां येतें. आपसांतील भांडणांचा निकाल एतद्देशीय मुख्य अधिकारी लावूं शकतात. खुनासारख्या गुन्ह्यांच्या बाबतींत मात्र त्यांनां तसें करतां येत नाहीं.

ध र्म.—गोऱ्या रहिवाश्यांपैकीं बहुसंख्यांक लोक प्रॉटेस्टन्ट पंथाचे आहेत. १९०४ सालीं केलेल्या खानेसुमारींत ४०८८० अँग्लिकन्स; १२१८४ प्रेस्बिटेरीअन्स; ११९९२ वेस्लेयन मेथॉडिस्ट; ११३४० 'धी डच रिफार्म चर्च'चे अनुयायी; ४८५२ लुदरन्स; व २१९३ बॅप्टिस्ट; १०४१९ रोमन कॅथॉलिक व यहुदी समाजाचे १४९६ होते. आशियाखंडस्थ लोकांपैकीं हिंदूंची संख्या ८७२३४ व मुसुलमानांची १०१११ भरली.

शि क्ष ण.—प्राथमिक शिक्षणाखेरीज करून इतर शिक्षण सर्व संयुक्त सरकारच्या हातीं आहे. गौरकाय लोकांच्या मुलांनां प्राथमिक शिक्षण सार्वजनिक व खासगी शाळांतून देण्यांत येतें. शिक्षण सक्तीचेंहि नाहीं किंवा मोफतहि नाहीं, पण फीचे दर फारच कमी आहेत. स. १९०९ च्या डिसेंबरमधील ॲक्टानें मारित्झबर्ग येथें एक नॅशनल युनिव्हर्सिटी कॉलेज काढण्यांत आलें आहे. एतद्देशीय मुलांकरितां मिशनऱ्यांनीं शाळा चालविल्या आहेत. सरकारच्या मदतीशिवाय चालविलेल्या खाजगी शाळा व विद्यालयेंहि आहेत.

वृ त्त प त्रें.—नाताळमधील पहिलें वर्तमानपत्र 'नेटलीअर' हें होय. याच्यानंतर 'पेट्रिअट' पत्र निघूं लागलें. हीं दोन्हीं डच पत्रें होतीं. 'नेटलविटनेस'हें पहिलें इंग्रजी पत्र असून त्याचप्रमाणें 'नेटल मरक्युरी' 'नेटल ॲडव्हर्टाइझर' हीं वृत्तपत्रेंहि आहेत.

इ ति हा स.—१४९७ सालीं वास्को द गामानें दरबान बंदराच्या प्रवेशद्वाराजवळील उंच किनारा पाहिला व त्यानें त्या भागास टेरा नाटालिस असें नांव दिलें. १५७६ सालीं मॅन्युअल डी मेस्किटा पेरीस्ट्रोलो यानें दक्षिण आफ्रिकेचा किनारा शोधून काढून नाताळची साग्र हकीकत लिहून काढली. १६८३ सालीं जोहान्ना नांवाचें इंग्रजी गलबत डेलागोआबेच्या किनाऱ्यास लागलें व त्यावरील तांडेल नाताळ येथें उतरले. दुसरें एक इंग्रजी गलबत १६८४ सालीं नाताळ बंदरांत आलें. १६८५ व ८६ सालीं एक इंग्रजी व एक डच अशा दोन गलबतांचा या ठिकाणीं नाश झाला. १६८९ सालीं केपटाउन येथील गव्हर्नरानें 'नुर्ड' नांवाचें गलबत हस्तिदंताचा व्यापार करण्यास व डेलागोआबेची मालकी मिळविण्यास पाठविलें त्याप्रमाणें डेलागोआ बे हें ५० पौंडांस खरेदी करण्यांत आलें.१७२१ मध्यें केप सरकारनें येथें वखार घातली पण ती लगेच मोडण्यांत आली. यानंतर एक शतकपर्यंत नाताळकडे यूरोपीयनांनीं लक्ष दिलें नाहीं. १८२४ सालीं केपकॉलनी ग्रेटब्रिटनच्या ताब्यांत देण्यांत आली.

नाताळमध्यें ज्यावेळीं ब्रिटिशांनीं प्रथम वखार घातली त्यावेळीं झुलु लोकांचा मुख्य जो चाका त्यानें आपल्या अनन्वित अत्याचारानें नाताळचें अप्रतिहत स्वामित्व मिळविलें होतें.१८२३सालीं फ्रॅन्सिस जार्ज फेअरवेल यानें आग्नेय किनाऱ्यावरील लोकांशीं व्यापार करण्याकरितां एक कंपनी काढली. फेअरवेलनें पोर्ट नाताळ येथें जाऊन चाकाची भेट घेतली व त्याची जखम बरी करून आपल्या कंपनीकरितां नाताळ

बंदर व भोंवतालचा प्रदेश यांची कायमची मालकी मिळविली.स. १८२४ आगस्टच्या २७ व्या तारखेस या मुलुखावर ब्रिटिशांची मालकी जाहीर करण्यांत आली. या ठिकाणीं निरनिराळ्या वखारी घालण्यांत आल्या. १८२८ त चाकाचा भाऊ डिंगान यानें त्याचा वध केला. १८२९ त फेअरवेलहि मारला गेला. १८३१ त डिंगान यानें ब्रिटिश ठाण्यांवर हल्ला केला. स.१८३४त केपटाउन येथील व्यापाऱ्यांनीं नाताळ येथें ब्रिटिश वसाहत स्थापण्याकरितां अर्ज केला पण तो मान्य झाला नाहीं. १८३५ त दरबान शहराची स्थापना करण्यांत आली. १८३७ त कॅप्टन गार्डीनर याला ब्रिटिश सरकारनें व्यापाऱ्यांवर शासनसत्ता गाजविण्याचा अधिकार दिला. पण इंग्रज व्यापारी या गोष्टीस कबूल होईनात.

केपकॉलनी येथील बोअरांनां ब्रिटिश अंमलाचा कंटाळा आल्यामुळें त्यांचे थवेच्या थवे जमिनीच्या मार्गानें नाताळमध्यें येऊं लागले.बोअरांची पहिली टोळी पीटर रेटीफ याच्या नेतृत्वाखालीं येथें आली. डिंगान यानें रेटीफला त्याच्या अनुयायांसह पोर्ट नाताळ व लगतच्या भागांत राहण्याची लेखी परवानगी दिली. या परवान्यावर सही होऊन दोन दिवस होतात तोंच त्यानें बोअरांवर अचानक छापा घालून त्यांची कत्तल केली, तींत रेटीफ हाहि मारला गेला. या धांदलीचा फायदा घेऊन दरबान येथील इंग्रज वसाहतवाल्यांनीं डिंगानवर चाल केली; परंतु त्यांचें बहुतेक सैन्य कामास आलें. इकडे बोअर लोकांनीं आपली जमवाजमव करून डिंगानवर हल्ला केला व निकरानें लढून त्याचा पराभव केला. बोअरांनीं राजधानींत शिरून डिंगानच्या सहीचा तो परवाना अगोदर हस्तगत केला. नाताळचे एकछत्री मालक आपण आहोंत असें आतां त्यांनां वाटूं लागलें.

बोअर लोक विजयानंदांत निमग्न आहेत तोंच इकडे ब्रिटिशांनीं पोर्ट नाताळ काबीज केलें. इकडे बोअरांनीं पीटर मारित्झबर्गची स्थापना केली व नाताळच्या राज्यावर डिंगानचा भाऊ पांडा याला बसविलें. अर्थात हा राजा बोअरांच्या हातांतील बाहुलें होतें हें सांगावयास नकोच.

येवढ्या परिश्रमानें विजय विकत घेतल्यावर आतां बोअरांनां आपण स्वतंत्र व्हावें असें वाटल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं. ' रिपब्लिक ऑफ पोर्ट नाताळ अँड ऍडजेसेंट कंट्रीज ' या नांवाखालीं एक स्वतंत्र राज्य स्थापण्याची त्यांनीं केपकॉलनीच्या गव्हर्नराजवळ परवानगी मागितली. ' आमच्या स्वतःच्याच प्रजाजनांचें स्वातंत्र्य आम्ही मान्य करूं शकत नाहीं, वाटल्यास इतर ब्रिटिश प्रजाजनांनां बरोबरीचे व्यापारी हक्क आपण देऊं ' असें राणीसरकारचें उत्तर आलें. बोअरांनीं या उत्तराचा निषेध केला. तेव्हां केपकॉलनीचा गव्हर्नर नेपीअर यानें पोर्टनाताळची लष्करी नाकेबंदी करण्याचा जाहीरनामा काढिला. या वेळीं बोअरांनां आपल्याला नेदरलंड्सची मदत मिळेल अशी आशा वाटून त्यांनीं इंग्लंडला विरोध करण्याचें निश्चित केलें.

अशा रीतीनें एकंदर युद्धाची भूमिका तयार झाल्यावर रणशिंग फुंकावयास मुळींच वेळ लागला नाहीं. दोन्ही दळांनीं हालचाल सुरू केली. पहिल्याच धडकीस कॅप्टन स्मिथ याला बोअरांनीं चीत केलें. या अपयशाची बातमी जोहान्सबर्ग येथें पोंचून तेथून ब्रिटिशांच्या साहाय्यार्थ कुमक येऊन ठेपली. या नूतन सैन्यानें पीटर मारित्झबर्गवर चाल करून बोअरांचें शासनमंडळ जें व्होल्क्सराड त्याला शरण यावयास भाग पाडलें. तरीहि ब्रिटिश सरकारास नाताळ ब्रिटिश वसाहत करणें योग्य वाटलें नाहीं. तथापि सर जार्ज नेपीअर याच्या आग्रहामुळें शेवटीं एकदाचें सरकार नाताळ ब्रिटिश वसाहत बनविण्यास कबूल झालें. पण अशी एक अट ठेवण्यांत आली कीं केवळ वर्णभेद, भाषाभेद, अथवा धर्मभेद यांचा कायद्याच्या समान अंमलबजावणीच्या बाबतींत अडथळा येऊं नये. यावेळीं बोअर लोकांत दोन विरुद्ध पक्ष उत्पन्न झाले पण शेवटीं व्होल्क्सराडनें सरकारी योजनेस आपली संमतीहि दिली. विरुद्ध पक्षाचे बोअर नाताळ सोडून ट्रान्सव्हाल व ऑरेंजफ्रीस्टेट येथें जाऊन राहिले. पांडा यानेंहि टयुगेला व वफेलो नद्यांमधील मुलुख ब्रिटिशांच्या स्वाधीन केला. १८४३ सालीं नाताळ ब्रिटिश वसाहत म्हणून जाहीर करण्यांत आलें व १८४४ त केपकॉलनीला जोडण्यांत आलें. १८५६त पुन्हां तो केप कॉलनीपासून विभक्त करण्यांत आला. यावेळीं नाताळला १६ सभासदांचें एक कायदे कौन्सिल देण्यांत आलें. त्यापैकीं १२ सभासद लोकनियुक्त असून ४ सरकारनियुक्त असतात. चहाची लागवड करण्याकरितां स.१८६०मध्यें येथें हिंदी मजूरांनां मुदतबंदीनें आणण्यांत आलें. १८६६ सालीं काफ्रेरियाचा कांहीं भाग वसाहतीस जोडण्यांत आला. इतक्या कालावधींत एतद्देशीयांत शिक्षणप्रसार करण्याचे किंवा त्यांनां सुधारण्याचे सरकारनें मुळींच प्रयत्न केले नाहींत. पांडाच्या जुलमास कंटाळून एतद्देशीय राष्ट्रजातीचे थवेच्या थवे नाताळांत येत होते. आम्हालुबी या राष्ट्रजातीचा नायक लंगालीबालेली यानें ब्रिटिश सत्तेविरुद्ध बंड उभारलें. पण १८७४ सालीं त्याला पकडण्यांत येऊन बंडाचा बींमोड करण्यांत आला.

बिशप कोलेंझो याला सरकारनें आम्हालुबी राष्ट्रजातीशीं केलेलें वर्तन आवडलें नाहीं व त्यानें त्याचा जोरानें निषेध केला. याचा कांहीं एक विशेष फायदा न होतां सरकारनें एतद्देशीयांविषयींच्या आपल्या धोरणांत थोडे फेरफार केले इतकेंच. या कोलेंझोनें मरेपर्यंत एतद्देशीयांची बाजू उचलून धरल्यामुळें त्याला ' लोकपिता ' असें म्हणत असत. सन १८७२ मध्यें पांडा याचा मुलगा केटावाया हा गादीवर आल्यामुळें झुलु लोकांशीं कटकटी उपस्थित झाल्या. १८७८ सालीं नातालकडे त्याची वक्रदृष्टि फिरल्यामुळें सरकारनें केटीवायोविरुद्ध युद्ध पुकारून झुलु सत्तेचा समूळ नाश केला. हें भय नाहींसें होतें न होतें तांच ट्रान्सव्हाल येथील बोअरांनीं बंड उभारलें ( १८८०-८१ ). माजुबा

वगैरे ठिकाणीं बोअरांनीं ब्रिटिशांचा पराभव केला. याचा परिणाम ट्रान्सव्हाल रिपब्लिक स्थापण्यांत झाला.

सर गार्नेट वुलसे यानें नियुक्त केलेल्या नूतन झुलु नायकांत लागलेलीं भांडणें बोअरांनीं मध्यें पडून मिटविल्यामुळें बक्षीस म्हणून बोअरांनीं झुलु देशाचा ८००० चौरस मैल भाग आपल्या राज्यास जोडून त्याला 'न्यू रिपब्लिक' असें नांव दिलें. या बोअरांच्या कृत्यानें नाताळवासीय इंग्रज अधिकच खवळले. तथापि स.१८८६ मध्यें या रिपब्लिकला ब्रिटिश सरकारनें आपली मान्यता दिली व १८८८सालीं तें ट्रान्सव्हालमध्यें समाविष्ट करण्यालाहि ब्रिटिश सरकारनें अनुमति दिली. १८८७ त झुलुलँडचा शेषभाग ग्रेटब्रिटननें आपल्या राज्यास जोडला. १८८४ते ९१च्या दरम्यान दरबानचा व्यापार फारच वाढल्यामुळें तें बंदर बनविणें अत्यावश्यक झालें. १८९७ त या कामास सुरवात होऊन स. १९०४ मध्यें तें पुरें झालें. १८८२ सालीं नाताळ वसाहतीस साम्राज्यसरकारनें स्वराज्य देऊं केलें पण वसाहतवाल्यांनीं तें नाकारलें. १८८३ सालीं कायदेकौन्सिलाची पुनर्रचना करण्यांत येऊन २३ लोकनियुक्त व ७ सरकारयुक्त सभासद देण्यांत आले. स. १८९३ मध्यें स्वराज्याचा कायदा पास होऊन व त्याला साम्राज्यसरकारची संमति मिळून नाताळला स्वराज्य मिळालें. १८९७ मध्यें झुलुलँड नाताळला जोडण्यांत आला. इकडे प्रिटोरियन सरकारनें जय्यत लष्करी तयारी चालविल्यामुळें नाताळ येथील प्रधानमंडळाचें धाबें दणाणलें. स.१८९९ मध्यें युद्धाग्नि भडकला. बोअरांनीं फ्रीस्टेट सरहद्दीवरील एक नाताळ आगगाडी ताब्यांत घेतली. यानंतर त्यांनीं लँगस नेक, न्यूकॅसल हीं शहरें घेतलीं. टालाना येथील लढाईत बोअरांच्या एका टोळीचा पराभव झाला. इलँडसलोगेट येथेंहि बोअरांचा पराभव झाला. यानंतर बोअर सैन्यानें लेडीस्मिथला वेढा दिला. १९००सालच्या फेब्रुवारीच्या२८व्या तारखेस वेढा उठविण्यांत येऊन शहराची मुक्तता करण्यांत आली. तेव्हां बोअर सैनिकांनां नाताळ सोडून जाणें भाग पडलें. या युद्धाचा परिणाम असा झाला कीं ट्रान्सव्हालचा सुमारें ७००० चौरस मैलांचा भाग नाताळला जोडण्यांत आला. यायोगानें नाताळमधील गोऱ्या लोकांची संख्या एकदशांशानें वाढली व काळ्यांचीहि संख्या तिनकीच वाढली. अशा प्रकारें युद्धाचा यशस्वी रीतीनें निकाल लागला तरी सरकारच्या मागची साडेसाती कांहीं संपेना. ज्या डच वसाहतवाल्यांनीं युद्धांत शत्रूला कुमक केली त्यांनां क्षमा करण्यांत आली. पण तद्देशीय लोकांच्या बंदोबस्ताचा प्रश्न तितका सुलभ नव्हता. केटीवायोचा मुलगा दिनीझुला याची, आपल्या घराण्यांत पूर्वी राज्य चालत असे ही आठवण अजून जिवंत होती. या सर्व कारणांमुळें नेटिव्ह प्रश्नांचा सांगोपांग विचार करण्याकरितां सरकारनें १९०३–०४मध्यें एक कमिशन नेमलें. त्या कमिशननें नेटिव्हांनां वसाहतीच्या कारभारांत प्रतिनिधित्वाचा हक्क मिळावा व प्रत्येक वयांत आलेल्या नेटिव्हावर निदान एक पौंड तरी डोईपट्टी बसवावी अशी शिफारस केली. त्याप्रमाणें १ पौंड डोईपट्टी एतद्देशीयांवर बसविण्यांत आली. यामुळें १९०६ सालीं नेटिव्हांनीं बंड उभारलें. मुख्य मुख्य बंडखोरांनां दयामाया न करतां फांसावर चढविण्यांत आलें. या सर्व अनर्थांचें पाप दिनी झुला याच्या माथीं लादण्यांत येऊन बंडखोरांनां आश्रय दिल्याच्या क्षुल्लक आरोपावर त्याला अपराधी ठरविण्यांत आलें. स.१९०६मध्यें फक्त नाताळ–नेटिव्हांचाच विचार करण्याकरितां कमिशन नेमण्यांत आलें. त्या कमिशनचा रिपोर्ट स.१९०७ मध्यें प्रसिद्ध झाला. त्या रिपोर्टान्वयें एतद्देशीयांचा कारभार चार डिस्ट्रिक्ट कमिशनरांच्या हातीं देण्यांत येऊन, एतद्देशीय प्रश्नांचा विचार करण्याकरितां एक कौन्सिल निर्माण करण्यांत आलें.

नाताळ–नेटिव्हांचा प्रश्न हातावेगळा होतो न होतो तोंच हिंदी लोकांचा प्रश्न पुढें दत्त म्हणून उभा राहिला. स.१८९० पासून नाताळमध्यें हिंदी लोकांची दाटी होऊं लागली. काळ्या हिंदी लोकांनीं 'स्वतंत्र' म्हणून येथें राहावें हें गौरकाय यूरोपीयनांस खपलें नाहीं. तेव्हां 'इंडियन इमिग्रेशन रजिस्ट्रेशन ॲक्ट,' 'डीलर्स लायसेन्सेस ॲक्ट' वगैरेंसारख्या ॲक्टांच्या मालिका हिंदी लोकांनां येथें राहणें व येणें अशक्य व्हावें म्हणून पसार करण्यांत आल्या. स. १९०८ मध्यें नेमलेल्या कमिशननें तर असा निकाल दिला कीं 'मजूर या नात्यानें हिंदी लोकांनीं येथें राहणें अवश्यच आहे, कारण त्याशिवाय आम्हांला चहाकॉफी कशी प्यावयास मिळणार! परंतु या गुलामाच्या नात्याव्यतिरिक्त लोकांनां स्वतंत्र म्हणून येथें राहूं न देतां स्वदेशीं जाण्यास भाग पाडावें. १९०९ सालच्या जूनमध्यें नाताळ दक्षिणआफ्रिका संघांत सामील करण्याचें ठरलें. स. १९१०च्या मेच्या ३१व्या तारखेस हा संघ स्थापण्यांत आला व नाताळ त्यांत सामील केलें.

**लोकसंख्या.**—स. १९११च्या खानेसुमारींत नाताळची लोकसंख्या ११९४०४३ होती. तीपैकीं ९८११४ गौरवर्णी लोक व उरलेल्या लोकांत बांटू आशियाटिक व इतरांचा समावेश होतो. स. १९१८ मध्यें गौरकायी लोकांची संख्या १२११३१ होती. नाताळमध्यें गौरकायांची संख्या इतर वसाहतींतील शहरांपेक्षां अधिक आहे. नाताळांत दरबान, पीटरमारित्झबर्ग व लेडीस्मिथ हीं तीन शहरें आहेत. पीटरमारित्झबर्ग या राजधानीच्या शहरीं नाताळ–विश्वविद्यालय (कॉलेज) आहे. तसेंच या ठिकाणीं प्रांतिक कौन्सिलची इमारत वगैरेंसारख्या पुष्कळ सुंदर इमारती आहेत. स्वायत्तसंस्थान या नात्याचा दर्जा बदलून आफ्रिकन यूनियनमध्यें नाताळचा समावेश होऊं लागल्यापासून, नाताळमधील गोऱ्या लोकांनां जितकें स्वातंत्र्य पाहिजे तितकें मिळेनासें झालें आहे. त्यामुळें त्यांच्या अंगाचा चडफडाट झाला आहे. यूनियन कौन्सिलमध्यें नाताळच्या प्रतिनिधींनीं इंग्रज सरकारशीं राजनिष्ठ राहण्याचें ठरवून आपलें स्वतंत्र अस्तित्व कायम राखिलें. नाताळचा

अंतःकारभार पक्षभेदापासून अलिप्तपणें चालविण्यांत येतो. नाताळचा पहिला कारभारी स्मिथ हा होता. तो स.१९१८ मध्यें मरण पावल्यानंतर, स्मीमन हा मुख्य कारभारी झाला. १९१७--१८ सालामध्यें नाताळचें उत्पन्न १७२००० पौंड होतें. यूनियन सरकारकडून ३६१००० ते ३७५००० पौंड मदत मिळत असे. १९१७--१८ सालीं नाताळचा वार्षिक खर्च सुमारें ३४०००० पौंड होता. त्यापैकीं १६९००० पौंड शिक्षणाकडे खर्च करण्यांत आले.

नाताळमध्यें हिंदी लोकांची बरीच संख्या असल्याकारणानें ( १९२१ सालीं १४१३३६ ) व तेथें त्यांनीं निरनिराळ्या उद्योगधंद्यांनां मदत केल्यामुळें आपल्या हक्काबद्दल त्यांच्या मनांत जागृति उत्पन्न होऊं लागली होती. आफ्रिकेंतील गोऱ्या लोकांनां हें कसें पटणार ? त्यांनीं अधिक हिंदी लोक नाताळमध्यें येऊं नयेत याबद्दल खटपट चालविली. हिंदुस्थान सरकारलाहि ही गोष्ट आवडली नाहीं; व त्यानें हिंदुस्थानांतून मुदतबंदी मजूर मिळविण्याची बंदी या गोऱ्या आफ्रिकन लोकांस केली. महात्मा गांधी हे यावेळीं आफ्रिकेंत होते; त्यांनीं हिंदी लोकांची बाजू उत्तम रीतीनें पुढें मांडण्यास सुरवात केली. त्यांनीं तेथील हिंदी लोकांची उत्कृष्ट प्रकारची संघटना करून, गोऱ्या लोकांच्या जुलमी कायद्याला प्रतिरोध करण्यास सुरवात केली. गोऱ्या लोकांच्या उद्दामपणामुळें १९१३ सालीं कांहीं दंगेधोपे झाले. १९१४ सालीं, हिंदी लोकांवरचा मिठावरील कर कमी करण्यांत आला. जादा हिंदी लोकांनां नाताळमध्यें येण्याची बंदी करण्यांत आली. पण त्यावेळीं जे हिंदी लोक येऊन राहिले होते त्यांच्या हितसंबंधांचें संरक्षण करण्यासंबंधीं गांधी व स्मटस् यांच्यामध्यें करारनामा झाला. [ 'दक्षिणआफ्रिका, पहा. ]

**नातू, बाळाजी नारायण**—पेशवाईच्या अखेरीच्या ऐतिहासिक माणसांत हा एक होता. हा मोठा धोरणी व व्यावहारिक माणूस होता. यानें शनवारवाड्यावर इंग्रजांचें निशाण लावण्याचा देशद्रोह केला एवढीच कायती माहिती त्याच्याबद्दल बहुतेकांस असल्याचें दिसतें.

बाळाजीपंत मूळ कोंकणांत (पेण तालुका ) वाक्रुळ येथील राहणारा; त्यानें रोजगारासाठीं म्हणून भोरास येऊन त्या ठिकाणीं दरमहा पांच सहा रुपयांची नोकरी पत्करली. पुढें तो पुण्यास आला, व रास्त्यांच्या पदरीं राहिला. त्यापूर्वी तो भिवाजी नाईक हुजरे, नंतर हसबनीस यांच्याकडे कारकून होता असें एके ठिकाणीं लिहिलेलें आढळतें. यावेळीं रावबाजी व रास्ते यांच्यांत बेवनाव असून, रास्ते पेशव्यांच्या भीतीनें इंग्रजांशीं दोस्तीनें वागत. संगमावर राहणारा ब्रिटिश रेसिडेंट याच्याशीं बोलणें करण्याकरितां रास्त्यांनां गुमास्ता ठेवावा लागे; व तो पूर्ण विश्वासू व मुत्सद्दी असा असणें अवश्य होतें. बाळाजीपंताची पारख करून रास्त्यांनीं त्याला या कामगिरीवर नेमलें. पेशवे हे रास्त्यांचे शत्रु असल्यानें त्यांच्या चहाड्या किंवा गुप्त गोष्टी साहेबास सांगितल्यास आपल्या यजमानाचें आपण जास्तच हित केल्यासारखें होईल, असा मनाशीं विचार करून, बाळाजीपंत रेसिडेंटास पेशव्यांकडील बातम्या देई. १८०३ सालापासून बाळाजीपंताचा इंग्रजांशीं संबंध येत गेला. त्यावेळीं पुण्यास सर बॅरी क्लोज हा रेसिडेंट होता. क्लोजबरोबर १८१० सालीं बाळाजीपंत माळव्यांत होता; त्यावेळीं "पालखी, पंचवीस स्वार व पन्नास माणूस" त्याच्या तैनातींत होतें; यानंतर एल्फिन्स्टन रेसिडेंट झाला. पुढें पेशवे व इंग्रज यांच्यामध्यें वितुष्ट वाढत जाऊन गंगाधरशास्त्र्याच्या खुनानें त्यावर कळस चढविला. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं बाळाजीपंताचें साहाय्य एल्फिन्स्टन यास अत्यावश्य वाटून, त्यानें त्याला आपल्या नोकरींत घेतलें ( १८१६ ). पेशवेहि असा मनुष्य आपल्या हातचा जाऊं देऊं नये म्हणून खटपट करीत होते; पण त्यांची या कामीं निराशा झाल्यावर त्यांनीं फोर्डमार्फत रेसिडेंटास सांगून पाठविलें कीं, हा मनुष्य आपल्याजवळ येऊं देऊं नये. तथापि एल्फिन्स्टनास या मनुष्याची पूर्ण पारख असल्यानें त्यानें जामीन देऊन बाळाजीपंतास आपल्याजवळ ठेवून घेतलें.

अशा रीतीनें इंग्रजांजवळ बाळाजीपंत दादाचें वजन वाढतां वाढतां तो रेसिडेंटाचा प्रायव्हेट सेक्रेटरीसारखा होऊन राहिला होता. एल्फिन्स्टनचा हुकूम पेशव्यांकडे रुजूं करण्यास तो वाड्यांत येई. कधीं कधीं पेशव्यांसहि इंग्रजांशीं नमून वागण्यास उपदेश करी. नातूमुळें इंग्रजांस पेशव्यांच्या अंतस्थ बातम्या कळूं लागल्या व त्याकारणानें पेशव्यांचीं कारस्थानें फसूं लागलीं. पेशव्यांनीं शेवटीं इंग्रजी लष्करांत फितुरी आरंभिल्याचा जो बोभाटा झाला त्याची बातमी प्रथम बाळाजीपंतानें एल्फिन्स्टन यास देऊन सावध केलें. याप्रमाणें नातू एल्फिन्स्टनचा उजवा हात बनून राहिला पण त्याचे स्वजन त्याला दुष्मानाप्रमाणें लेखीत. पेशवे पुणें सोडून गेल्यावर दादानेंच शनवारवाड्यावर इंग्रजांचा बावटा लावला. अशा रीतीनें इंग्रजांचें काम फत्ते करून दिल्याबद्दल एल्फिन्स्टननें दादाची खूप वाहवा केली, व त्याला एक जहागिरी देण्याबद्दल गव्हर्नर जनरलला लिहिलें; व जहागिरीमुळें कदाचित् त्याचें पेन्शन कमी करतील या भीतीनें पेन्शन पूर्ववत् तितकेंच चालू ठेवण्याविषयीं एल्फिन्स्टननें मुद्दाम याच शिफारसपत्रांत गव्हर्नर जनरलला लिहिलें. दादाचें वर्णन त्याला प्रत्यक्ष पाहून अर्वाचीनकोशकारांनीं पुढीलप्रमाणें दिलें आहे. "बाळाजीपंत दादा मोठ्या उंच आकृतीचा, गौरवर्णाचा व साधाच परंतु इभ्रतदार पुरुष होता. यास आम्ही स्वतः पाहिलेलें आहे. याचे सर्व कामांत नियम बांधलेले असत ". प्रतापसिंह छत्रपतीचें पेशव्यांविरुद्ध जें कारस्थान चालें तें दादामार्फत चालें. पुढें प्रतापसिंह इंग्रजांविरुद्ध कारस्थान करूं लागला तेव्हां त्याची बातमी दादानेंच इंग्रजांस दिली.

दादाला सातारा येथें ग्रँट डफच्या हाताखालीं दुय्यम रेसिडेन्ट नेमिलें होतें. डफच्या सांगण्यावरून त्यानें एक

तत्कालीन हकीकतीची बखर लिहिली होती. डफ म्हणतो कीं ती फार उपयुक्त व मोठी असून तिचें भाषांतर रिचर्ड मॅरिस यानें ( इंग्रजींत ) केलें होतें; ती बखर दादाजवळच शेवटपर्यंत होती. तत्कालीन सरदार लोकांचे इंग्रजांशी जे तहनामे ठरले ते याच्यामुळें ठरले. बाळाजीनें श्रावणमासाची दक्षणा कायम करविली व देवस्थानांच्या नेमणुकाहि कायम करविल्या. इनामदार व जहागिरदार यांनींहि इनामें त्यानें इंग्रजांकडून पुढें चालविण्याबाबत पुष्कळ खटपट केली. यास तीन पुत्र व दोन कन्या होत्या. पैकीं एक कन्या प्रसिद्ध नीलकंठशास्त्री थत्ते यांची सून होय. पुत्रांपैकीं वडील गणपतराव यानें लिंगपुराणावर एक संस्कृत टीका लिहिली आहे. बाळाजीपंत हा शेवटीं सहकुटुंब काशीस जाऊन राहिला व तेथेंच वारला. हल्लीं याचे वंशज पुण्यास आहेत. [ भा. इ. मं. इतिवृत्त १८३८; अ. कोश; चित्रमयजगत, मार्च १९२३; बसू—सातारा. ]

**नातेंपुतें**—नातेंपुतें हें पुणें-सोलापूर सडकेवर माळशिरसच्या पश्चिमेस ५ मैलांवर आहे. हें पूर्वी खेडें असून बहामनी राजांचा दिवाण मलिकसुंदर यानें या गांवास उर्जितावस्थेस आणलें असें सांगतात. या गांवी गाणाऱ्या नायकिणींचीं घरें बरींच आहेत. येथें बुधवारीं मोठा बाजार भरतो. येथें दोन महादेवाचीं देवळें व दोन तळीं आहेत. येथून जवळच गुप्तलिंग नांवाचें हिंदूंचें पवित्र क्षेत्र आहे व त्याजवळच ज्योतिर्लिंगांपैकीं शिखर-शिंगणापूर हें पवित्र महादेवाचें स्थान आहे. [बॉम्बे ग्याझे. पु. २०. ]

**नाथद्वार**, सं स्था न.—हें उदेपुरापासून १२ कोसांवर आहे. तें उदेपुरकर राण्यांपैकीं एका राण्यानें वसविलें असें म्हणतात. स. १८०२ मध्यें नाथद्वारावर होळकरानें स्वारी करून तीन लक्ष रुपये खंडणी वसूल केली तेव्हां तेथील मुख्य पुजारी दामोदरजी यानें प्रजाधिशाच्या मूर्तीचा बचाव करण्याकरितां देवाची संस्थानासुद्धां उदेपुरास रवानगी करून दिली. पुढें नाथद्वार सहा महिनेंपर्यंत अगदीं उजाड पडलें होतें. श्रीनाथजीची मूर्ति उदेपुरास नेऊन ठेविली होती खरी, परंतु तेथेंहि तिच्या सुरक्षिततेबद्दल खात्री नसल्यामुळें त्यानें ती मूर्ति उदेपुरापासून जवळच गासीयार नांवाचा डोंगर आहे त्या डोंगरांत नेवून ठेविली; व तेथेंच नाथजीचा मुख्य पुजारी दामोदरजी हा जाऊन राहिला. पुढें दामोदरजी यानें आपल्या देवाच्या संरक्षणासाठीं त्या डोंगरावर एक मजबूत किल्ला बांधला. राण्याकडून त्या मूर्तीच्या रक्षणार्थ चारशें स्वारांची तैनात नेमून देण्यांत आली. येणेंप्रमाणें नाथद्वाराचें संस्थान त्या डोंगरावर वसलें व तेथूनच दामोदरजी आपल्या संस्थानच्या इतर लहान लहान देवळांवर देखरेख ठेवूं लागला. [ लोकहितवादी—राजस्तानचा इतिहास. ]

श ह र.—राजपुताना, उदेपूर संस्थानांतील तटबंदीचें शहर. हें बनास नदीवर उदेपूर-चितोड-रेल्वेवरील मावली स्टेशनाच्या वायव्येस २० मैलांवर आहे. १९०१ सालीं येथें ८५९१ लोक होते. पण अशा यात्रेच्या जागेची लोकसंख्या आठवड्यांनीं देखील बदलते. हें वैष्णवांचें परमपूज्य स्थान असून येथें इ. सनाच्या १२ व्या शतकापासून असलेली एक कृष्णमूर्ति आहे. ही मूर्ति वल्लभाचार्यांनें सन १४९५ मध्यें एका लहानशा देवळांत ठेविली व इ. स. १४१९ त हिला गोवर्धन येथें नेलें. देवस्थानाचें आधिपत्य गोसावी महाराज यांच्याकडे असून ब्राह्मणी वल्लभाचार्य पंथाचा हा मुख्य असतो. याशिवाय गोस्वामीकडे इतर ३० गांवें व बडोदा, भरतपूर, बिकानेर, केरवली, कोटा, प्रतापगढ, व इतर संस्थानांतील कांहीं भाग आहेत. याचें वार्षिक उत्पन्न २ लक्षांचें असून देवापुढच्या प्राप्तीचें उत्पन्न जवळ जवळ ५ लक्षांचें आहे. येथील लोक लहान लहान सोन्याचांदीचें सुंदर अलंकार करून यात्रेकरूंनां विकतात.

**नाथपंथ**—हा पंथ बराच जुना आहे; या पंथाचा मूळ उत्पादक आदिनाथ होय. कांहीं लोकांचें व नाथपंथांतील पुढील लोकांचेंहि म्हणणें कीं आदिनाथ हा दुसरा कोणी मनुष्य नसून साक्षात शंकर होय. शंकरानें अध्यात्मज्ञानाचा उपदेश पार्वतीस केला त्यामुळें तिला उदोनाथ असें नांव प्राप्त झालें. हा उपदेश चालू असतां, माशाच्या पोटांत असलेल्या मत्स्येंद्रानें तो ऐकला व पुढें त्यानेंच या पंथाचा प्रसार केला. या पंथांतच ज्ञानेश्वर होऊन गेला. मत्स्येंद्राचा शिष्य गोरक्ष, त्याचा गैनी, त्याचा निवृत्ति व त्याचा ज्ञानेश्वर अशी ही शिष्यपरंपरा आहे.

मत्स्येंद्रानें जसा या पंथाचा प्रसार केला, तसाच जालंधर नांवाच्या दुसऱ्या एका नाथसंप्रदायी पुरुषानेंहि तो वाढविला. जालंधरनें आपला प्रसार बंगाल्याच्या बाजूस केला व मत्स्येंद्रानें पंजाब, मलबार, महाराष्ट्र इकडे केला. जालंधर हाहि आदिनाथाचाच शिष्य होता. जालंधरानें बंगालचा (?) राजा गोपिचंद व त्याची आई मैनावती यांनां गुरूपदेश दिल्याचें प्रसिद्ध आहे. मत्स्येंद्र स्त्रीराज्यांत ( मल्याळ ? ) गेला व तेथेंच राहिला असतां, त्याच्या गोरक्ष या शिष्यानें त्याला तेथून बाहेर काढल्याची गोष्टहि ऐकण्यांत आहे.

हा पंथ शैव असून यांत ब्राह्मण व इतर वर्ण यांचा समावेश होतो. गोरक्ष हा ब्राह्मण होता व गोपिचंद राजा हा क्षत्रिय होता. यांच्यांत जातिबंधनें पुष्कळ सैल आहेत. या पंथाचा हठयोगावर व तंत्रमंत्र यांवर विशेष भरंवसा असे. बंगाल्यांत एका जागीं प्राचीन काळीं एक वटवृक्ष असे, त्यावर ६४ कला व तंत्रमंत्र आणि सिद्धि इत्यादींच्या देवता असत व तेथें तप करून आणि देवतांस तपानें प्रसन्न करून तांत्रिक गोष्टी नाथपंथीयास साध्य करून घ्याव्या लागत असें वर्णन त्यांच्या ग्रंथांत आढळतें. यांच्यांत स्त्रियांनांहि उपदेश देत. मैनावती ही पहिली पौराणिक नाथपंथी स्त्री होती. राशीनच्या गंगाबाईस नाथसंप्रदायांत गेल्यावर गुप्तनाथ असें नांव मिळालें. तुकारामाच्या वेळची बहिणाबाई हिलाहि नाथसंप्रदायांत जागा मिळाली होती. नाथाजवळ शिंगी, पुंगी या

वस्तू असतात. जेवण्याच्या वेळीं हें पुंगी वाजवून मग भोजन करतात. दीक्षा घेतांना कान फाडून त्यांत कांच, स्फटिक किंवा काळ्या लांकडाचीं लहान लहान वलयें ( मुद्रा ) घालतात.

या लोकांनां किमया येते अशी लौकिक समजूत आहे. गोरक्षाच्या किमयेवर वरेच ग्रंथ आहेत.तसेंच हे लोक वैद्यकी करतात; रसविद्येंत यांची गति होती असें म्हणतात. हे लोक भिक्षेवर आपली उपजीविका करतात; भिक्षेच्यावेळीं फोका नांवाची लहानशी एकतारी वाजवून गाणीं म्हणतात. यांनां कानफाटे असेंहि सामान्य नांव दिलेलें आढळतें. यांच्यांत पौराणिक काळीं प्रख्यात असे नऊ पुरुष होऊन गेले; त्यांचीं चरित्रें नवनाथभक्तिसार या ग्रंथांत दिलेलीं आहेत. नाथ-लीलामृत नांवाचा आणखी एक ( शके १६३५ ) ग्रंथ असून त्यांतहि या पंथांतील सत्पुरुषांची महति वर्णन केली आहे. ( जास्त माहितीसाठीं ज्ञानकोश, विभाग १० 'कानफाटे' पहा ).

**नाथमुनि**—कर्नाटक-तेलंगणांत प्राचीन काळीं बारा आळवार होऊन गेले. त्यांच्यानंतर साधारणतः साडेतीन शतकांनीं कांहीं आचार्य झाले. हे आचार्य सहा असून सातवा प्रख्यात रामानुजाचार्य हा होता.यांच्यापैकींच पहिला आचार्य नाथमुनि हा होय. यांच्याच परंपरेंत रामानुज झाला; त्याचा काल १०१७-११३७ हा बहुतेक मान्य झाला आहे. त्या-वरून नाथमुनीचा काळ ९००-९२० हा धरण्यास हर-कत नाहीं. नम्माळवार यानें केलेला तिरुवोयमोळी ( मुखां-तील वचनें ) हा ग्रंथ पूर्वी श्रीरंगम् येथील विद्यापीठांत पढविला जात असे. परंतु शेवटचा आळवार मरण पावल्यावर साडेतीनशें वर्षांच्या अवधींत त्याचा पाठ खंडित झाला व त्या ग्रंथाचा अर्थहि लोकांस चांगलासा समजत नसे.नाथमुनीनें या ग्रंथाचा तिरुनगरीजवळ उत्तम अभ्यास करून व संशोधन करून मग पुन्हां श्रीरंगम् येथील पीठांत त्याचा पाठ देण्यास प्रारंभ केला. प्रसिद्ध तामिळ रामायणकार कंबन हा याचा समकालीन होता. कंबननें आपलें रामायण श्रीरंगम् येथील ज्या संगमसभेपुढें परीक्षणार्थ मांडलें त्या सभेचा नाथमुनि हा अध्यक्ष होता. हा साडेतीनशें वर्षें योगामुळें जगला अशी तत्प्रांतस्थ वैष्णव लोकांत एक दंतकथा आहे. वर सांगित-ल्याप्रमाणें शेवटचा आळवार व नाथ.चा जन्म या दोहोंत ३५० वर्षांचें अंतर पडत असल्यानें ही दंथकथा उत्पन्न झाली असावी. न्यायतत्त्व व योगरहस्य हे दोन ग्रंथ नाथमुनि याच्या नांवानें प्रसिद्ध आहेत. [ नेल्सन सीरीजमधील 'वैष्ण-वाईट रिफॉमर्स ऑफ इंडिया;' अय्यंगार—एन्शन्ट इंडिया.]

**नांदगांव, तालुका.**—मुंबई, नाशीक जिल्ह्यांतील आग्ने-यीकडील तालुका. उत्तर अक्षांश २०°९' ते २०°३१' व पूर्व रेखांश ७४°२७' ते ७४°५६'. क्षेत्रफळ ४३१ चौरस मैल. यांत नांदगांव हें मुख्य शहर व ८८ खेडीं आहेत. लोक-संख्या ( १९११ ) ४४९१६. सर्व जिल्ह्यांत कमी दाट वस्ती असलेला हा तालुका आहे. पूर्व भागांत अंजन झाडें फार आहेत.पश्चिम भागांत झुडपें फार आहेत.येथील हवा कोरडी व निरोगी आहे.

गां व.—तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें जी. आय. पी. रेल्वेवर वसलें आहे. लोकसंख्या (१९११) ६९६१. येथें एक जीन, एक इंग्रजी शाळा व एक दवाखाना आहे.

**नांदगांव संस्थान**—मध्य प्रांतांतील एक संस्थान. उत्तर अक्षांश २०° ५०' ते २१° २२' व पूर्व रेखांश ८०°२६' ते ८१° १३'. क्षेत्रफळ ८७१ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) १४७९०६. या संस्थानांतील नांदगांव आणि डोंगरगांव हे परगणे खैरागड संस्थानच्या दक्षिणेस आणि चांदा आणि द्रुग जिल्ह्यांमध्यें आहेत.राजधानी राजनांदगांव ही असून ती बंगाल-नागपूर रेल्वेचें एक स्टेशन आहे.सेवनाथ आणि वागनदी ह्या संस्थानांतील नद्या आहेत. सेवनाथ महानदीस मिळत असून तिच्या कांठीं राजनांदगांव वसलेलें आहे. वागनदी पुढें वैनगंगा नदीस मिळते. गेल्या पंधरा वर्षांची पावसाची सरासरी ४८.२८ इंच आहे. येथें कधीं कधीं उन्हाळा फारच भासतो.

इतिहास.—हल्लींच्या संस्थानचे एकंदर चार परगणे आहेत. हे पूर्वी भोसल्यांच्या अमलाखालीं असून त्या निर-निराळ्या जमीनदाऱ्या होत्या. अठराव्या शतकाच्या अखेरीस रतनपुरच्या राजाच्या आश्रयाखालीं कोणी एक प्रल्हाददास नांवाचा पंजाबांतील सोहपूरचा शाली विकणारा बैरागी व्यापारी येऊन राहिला. हा बराच श्रीमंत झाला व याच्या मृत्यूनंतर त्याची सर्व मालमत्ता त्याचा मुख्य चेला महन्त हरिदास याच्याकडे आली.पुढें हरिदासानें सावकारी सुरु केली. त्यानें जमीनदारीच्या तारणावर पांडादाहच्या जमीनदारास कर्ज दिलें.त्यास कर्ज परत देतां आलें नाहीं म्हणून ती जमीन-दारी याच्या ताब्यांत आली. याच्यानंतर याचा चेला राम-दास यानेंहि नांदगावच्या मुसुलमान जमीनदारास असेंच कर्ज दिलें व कांहीं काळानें तीहि जमीनदारी याच्याकडे आली. महन्त रामदासानंतर महन्त रघुवरदास व त्याच्यामागून महन्त हिमंचलदास आला. त्याला भोसल्यांनीं मोहगांव परगणा इनाम करून दिला. याच्या-नंतर महन्त मंजीराम यास डोंगरगांव परगणा मिळाला. महन्त मंजीरामानंतर त्याचा शिष्य घासीदास यास पुढें गादी मिळाली. स. १८६५ मध्यें ब्रिटिशांनीं यास संस्थानिक म्हणून मानलें व सनद दिली. घासीदासाच्या कारकीर्दींत राज्याची बरीच सुधारणा झाली. १८८३ सालीं हा मरण पावला व त्याच्यामागून त्याचा अज्ञान मुलगा बळ-रामदास गादीवर बसला. १८८७ सालीं त्यास राजा हा किताब मिळाला. पुढें यानेंहि बऱ्याच सुधारणा केल्या व सन १८९३ मध्यें त्यास राजा बहादूर हा किताब मिळाला. १८९७ सालीं हा मरण पावल्यावर त्याचा दत्तक मुलगा महन्त राजेंद्रदास हा गादीवर बसला.

पुराणवस्तुसंशोधन.—या संस्थानांत जुनाट वस्तू फारशा नाहींत. पट्टा परगण्यांतील एका कच्च्यावर एक लेणें असून आंत एक दगडी तलवार आहे. ही तलवार येथील पूर्वीचा गोंड राजा पेलीत असे असें म्हणतात.

छत्तिसगडी, हिंदी, गोंडी व तिच्या उपभाषा या येथील भाषा होत. मराठी बोलणारे ५००० लोक या संस्थानांत आहेत. दोन द्वितियांश लोक शेतकी करतात. मुख्य पीक भात असून दुय्यम पिकें जवस, गहूं, हरभरा, कोडन आणि कुटकी हीं आहेत.

धंदे.—राजनांदगांव येथें कापसाच्या गिरण्या आहेत. शिवाय घोंगडया, नवार व देशी बिडया येथें होतात. जंगलचें क्षेत्रफळ १४० चौरस मैल असून त्यांत चांगलें इमारती लांकूड फारसें नाहीं. संस्थानचें उत्पन्न सुमारें १० लाख रुपये आहे. संस्थानास. ८०००० रुपये खंडणी ब्रिटिश सरकारास द्यावी लागते संस्थानिकास दत्तक घेण्याचे वगैरे सर्व अधिकार मिळाले आहेत. संस्थानांत शिक्षण, रजिस्ट्रेशन, दवाखाना, देवी टोंचणें, अबकारी, पोलिस वगैरे सर्व खातीं आहेत.

**नांदगिरी किल्ला उर्फ कल्याणगड**—मुंबई, सातारा जिल्हा. हा साताऱ्यापासून ईशान्येस ७ कोसांवर आहे. याची उंची ३५३७फूट असून शंभूमहादेवटेंकडीच्या एका शृंगावर हा आहे. सर्व बाजूंनीं कडे तुटलेले आहेत. पूर्वेचा गवीकडा प्रसिद्ध आहे. पायथ्याच्या धुमळवाडींतून वर जावें लागतें. चढण फार कठिण व वळणावळणाची आहे. अर्ध्या वाटेवर खाम नांवाचें मुबलक पाणी असलेलें तळें लागतें. किल्ल्यास उत्तराभिमुख दोन दरवाजे आहेत. किल्ल्यावर सपाट मैदान असून त्यांत ४ तळीं, एक पडकी कचेरी, तट आणि शिपायांच्या बराकी आहेत. तळ्यास मुबलक पाणी असतें येथील दोन तोफा १८५७ सालच्या बंडांत हलविण्यांत आल्या. मराठी राज्यांत हा किल्ला एका तालुक्याचें ठिकाण होतें व येथें खजीन. आणि मामलतदार, फडणवीस, सबनीस, हवालदार, दफ्तरदार, २ कारकून, ३ नाईक, आणि १६० शिपाई रहात असत. हा किल्ला पन्हाळ्याच्या दुसऱ्या भोजराजानें बांधला अशी दंतकथा आहे. १६७३ सालीं हा किल्ला शिवाजीच्या ताब्यांत गेला. थोरला बाजीराव पेशवे याच्याकडे हा १७२४ सालीं गेला; त्यापूर्वी हा प्रतिनिधींच्या ताब्यांत होता. [ सातारा ग्याझेटियर. ]

**नादिरशहा**—उर्फ तहमस्पकुली उर्फ नादिरकुलीखान; याचा जन्म खोरासानांत १६८७ सालीं झाला. नादिरचा बाप धनगर असून मेंढ्यांच्या चामड्यांचे कोट, टोप्या वगैरे करून विकीत असे. लहानपणापासून नादिराचें आयुष्य अनेक प्रकारच्या साहसांत गेलें. सतरा वर्षांचा असतांना तो उझबेगांच्या कैदेंत सांपडला. याचा स्वभाव, क्रूर, विध्वंसक, परहिताविषयीं निष्ठुर व मानवी संस्कृतीला विरोधी असा होता. कैदेंतून सुटल्यावर बापाच्या मेंढ्या विकून तो लुटालूट करूं लागला. अफगाणांनीं इराण देश काबीज केला त्या धामधुमींत ६ हजार पुंड लोक जवळ बाळगून नादिरनें हिरातचा किल्ला हस्तगत केला; आणि त्याचा चुलता तेथील अंमलदार होता, त्यास त्यानें ठार मारलें. इराणचा शहा तामस्प दुसरा याचें राज्य अश्रफ या अफगाणानें हिसकून घेतल्यानें शहानें नादीरची मदत मागितली व नादिरनें अश्रफचा पराभव करून शहाला पुन्हां गादीवर बसविलें (१७३०). यानें अनेक युद्धें करून पांच वर्षांच्या आंत इराणच्या राज्याची हद्द प्राचीन काळीं होती तितकी विस्तृत केली. तामस्प यानें तुर्कांशीं अपमानकारक व आपल्या गैरहजेरींत तह केल्याचें निमित्त ठेऊन त्यानें त्याला पदच्युत केलें व त्याच्या अब्बास नांवाच्या लहान मुलास गादीवर बसवून आपण सर्वाधिकारी झाला (सन १७३२). पुढें त्यानें तुर्कांपासून आपले प्रांत परत घेतले. अब्बास याच वेळीं मेल्यानें (कदाचित नादीरनें खून केला असावा) त्यानें आपल्या जागेचा राजिनामा पाठविला. परंतु त्याच्याच कारवाईनें राज्यांतील सरदारांनीं त्याला गादीवर बसण्यास सांगितलें व त्याप्रमाणें तो तक्तावर बसला (१७३६). हा सुनीपंथाचा असून इराण देश पूर्वीपासून शियापंथी होता; इराणचें राज्य स्वीकारल्यावर त्यानें थोड्याच दिवसांत बहुतेक लोकांस सुनी पंथ स्वीकारण्यास भाग पाडिलें. त्यानें १७३७ सालीं अफगाणिस्तान जिंकून तो इराणास जोडिला, आणि अफगाणांनीं जे अनर्थ केले होते, त्यांचा पुरेपूर सूड उगविला. तथापि पुढें सौम्यवृत्ति धारण करून त्या लोकांचा त्यानें फायदा केला. याप्रमाणें नादिरची सत्ता वाढून राज्याची हद्द मोंगल राज्यास भिडली. त्यामुळें हिंदुस्थानावर स्वारी केली असतां पुष्कळ फायदे होतील यासाठीं कांहीं सबब तो शोधूं लागला. त्याच्या ताब्यांतील कित्येक अफगाण लोक गझनीनजीक मोंगल राज्यांत जाऊन राहिले होते त्यांस परत पाठविण्याविषयीं त्यानें दिल्लीच्या बादशहास लिहिलें. दिल्लीहून त्या पत्राचा कांहींच जबाब गेला नाहीं. तेव्हां नादिरशहा मोंगलांच्या मुलुखावर चालून आला (१७३९ फेब्रुवारी) व मोठी लढाई होऊन तींत मोगलांचा पराभव झाला. तेव्हां निजामास नादिरशहाकडे बोलणें करण्यास पाठवून मागाहून महंमदशहा स्वतः त्याच्या छावणींत जाऊन त्यास भेटला. नंतर ते दोघे दिल्लीस येऊन राहिले. एकदां नादिरशहा फिरावयास जात असतां लोकांनीं आपल्या घरांतून त्याच्यावर गोळ्यांचा वर्षाव सुरू केला. एक गोळी जवळच्या एका उमरावास लागून तो मेला, तेव्हां अतिशय चीड येऊन नादिरशहानें दिल्लींतील लोकांची कत्तल करण्याविषयीं आपल्या लोकांस हुकूम सोडला. दोन लक्ष प्रेतांचे ढीगच्या ढीग पाहून महंमदशहाच्या डोळ्यास पाणी आलें व कत्तल बंद करण्याविषयीं त्यानें नादिरशहास विनंति केली; ती त्यानें मान्य केली. पुढें दोन

महिनेपर्यंत दिल्ली शहरांत नादिरशहानें साडेचवदा कोटी रुपयांची लूट केली. दिल्लीचें सुप्रसिद्ध मयूरसिंहासन व कोहिनूर हिरा याच वेळीं त्यानें इराणांत नेला. परत जातांना त्यानें महंमदास बादशाही पदावर बसविलें आणि त्यास अनेक प्रकारचा उपदेश केला. 'बादशहाविरुद्ध बंड कराल, तर मी पुनरपि येऊन तुमचा संहार करीन' अशी सर्व लोकांस जाहीर दहशत घालून आणि दिल्लीच्या एका राजकन्येशीं आपल्या मुलाचें लग्न लावून, नादिरशहा इराणांत परत गेला. हिंदुस्थानांत केलेल्या दुष्ट कृत्यांमुळें नादिरशहाचा स्वभाव फारच निष्ठुर बनला. उत्तरोत्तर तो आपल्या लोकांस इतका छळूं लागला कीं, त्यांच्या मनांतील त्याच्यावरची भक्ति नाहींशी झाली. त्यानें प्रत्यक्ष आपल्या मुलाचे डोळे काढविले ( १७४३ ). त्यानें शियापंथी इराणी लोकांस तर कोठेंच थारा राहिला नाहीं. अखेरीस त्याचे आवडते अफगाण लोकहि त्यास कंटाळले व खुद्द त्याचा पुतण्या अलीकुलीखान याच्या हातून त्याचा खून झाला. ( १७४७ ). त्याचें थडगें मशाद येथें आहे. [ ज्ञा. को वि. ८ वा इराण पहा. ]

नादिरशहाचा जन्म हलक्या कुळांत असून त्यास विद्याहि कांहीं येत नव्हती. परंतु नशिबाच्या व अकलेच्या जोरावर अनेक राज्यांची उलथापालथ करण्याचें त्यास सामर्थ्य आलें. त्याच्यानंतर अलीकुली इराणचा शहा झाला व त्यानें नादिरचे पुत्र व नातू मिळून १३ जण ठार केले. फक्त एक शाहरूख नांवाचा नातु जिवंत सुटला; तो पळून आस्ट्रियाच्या राज्यांत गेला. तेथें त्यानें आस्ट्रियन सरकारची नौकरी पत्करली. तिकडे त्याला बॅरन व्हॉन सेमेलिन म्हणत;तो व्हिएन्ना येथेंच मरण पावला [ बील; इलियट अँड डॉसन. आयर्व्हिन. ]

**नांदुरा**—वऱ्हाड. बुलढाणा जिल्हा व मलकापूर तालुका. जी. आय. पी. रेल्वेवरील भुसावळ–नागपूर फांट्यावरील हें एक स्टेशन आहे. पूर्वी हा गांव फार लहान होता परंतु अठराव्या शतकाच्या अखेरीस पिंपळगांव राजाच्या परगण्यांत पेंढारी व महादजी शिंदे यांच्या स्वाऱ्या सुरू झाल्यावर तेथून पळून आलेले लोक या ठिकाणीं वस्ती करून राहिले. हल्लीं येथें व्यापार बराच आहे. रंगाच्या कारखान्याविषयीं हा गांव बराच प्रसिद्ध असून येथें साड्या चांगल्या निघतात. येथें धमणी नांवाच्या गाड्या विकावयास येत असून दूरदूरचे लोक त्या विकत घेण्याकरितां येतात.

**नांदेड**, जिल्हा.—हैद्राबाद संस्थान, औरंगाबाद विभागांतील जिल्हा. क्षेत्रफळ ३५९७ चौरस मैल. नांदेड व वऱ्हाड यांमध्यें पैनगंगा वहाते. जिल्ह्याच्या पूर्वेस निझामाबाद, दक्षिणेस बिदर व पश्चिमेस परभणी आहे. थानावरी पर्वत ईशान्येकडून वायव्येकडे पसरला आहे. नांदेड,कंदहार, उस्माननगर,वगैरे ठिकाणीं लहान लहान पर्वत आहेत. गोदावरी, पैनगंगा या मोठया नद्या जिल्ह्यांतून वहातात. येथील हवा कोरडी व निरोगी आहे. पाऊस सरासरी ३६ इंच पडतो.

इतिहासः—हा पूर्वी चालुक्य व यादव राज्यांचा भाग असून नर्नगिरी हा जुना किल्ला म्हणजे हल्लींचें नांदेड असा समज आहे. १४ व्या शतकारंभीं हा भाग अल्लाउद्दीन खिलजीनें जिंकला. पुढें हा बहामनी राज्यांत व नंतर कुत्बुशाहींत मोडूं लागला. नंतर अवरंगझेबानें हा मोंगल राज्यास जोडला परंतु हैद्राबादबरोबर हाहि पुन्हां १८ व्या शतकांत स्वतंत्र झाला. यांत एकंदर शहरें ६ व खेडीं १३०२ आहेत. लोकसंख्या (१९११) ७०४५४९. शेंकडा७०च्या वर लोक मराठी भाषा बोलतात. सध्यां या जिल्ह्यांत ६ तालुके आहेत. कुणबी, वाणी, कोमटी, धनगर, महार, मांग या येथील जाती असून यांत फक्त सुमारें १०००० ब्राह्मणवस्ती आहे.

शेतकीः—कंदहार खेरीजकरून सर्व जमीन काळीभोर आहे. यांत रब्बी पिकें अर्थात ज्वारी, हरभरा, वाटाणा, गहूं व गळिताचीं धान्यें मुख्यत्वेंकरून होतात. खरीप पिकेंहि थोड्या प्रमाणांत होतात. येथें रयतवारी धारापद्धति अंमलांत आहे. येथील गुरें बरीं असतात.

व्यापारः—नांदेड येथें फारच सुरेख मलमल होते. डेलगूर व भैसा येथें जाडें कापड पडद्याकरितां तयार करतात. नांदेड येथें कलाबतूहि होतो. मुजाहिद पेठ येथें कागद होतो. मुरवेर येथें पितळेचीं व तांब्याचीं भांडीं होतात.

निर्यात माल कापूस, जवस, तेलें, तूप, ज्वारी, कापड व मलमल,नीळ व धान्यें असून आयात माल कापड व लोंकरी सामान, कच्चें रेशीम, रुईं, चांदी, तांदूळ, साखर, रॉकेल तेल, अफू, तांब्यापितळेचे पत्रे वगैरे आहे.

राज्यव्यवस्थाः—यांत तीन पोटविभाग आहेत. या सर्वांवर तालुक्दार देखरेख ठेवतो. तालुक्यावर तहशिलदार असतो. जिल्हा न्यायकचेरीला नाझिम–इ–दिवाणी म्हणतात. यावर एक न्यायाधीश असतो. तालुक्दारहि न्यायाधीशांचें काम करतात. येथें शेंकडा १.२ लोकांनां लिहितां वाचतां येतें.

ता लु का.—नांदेड जिल्ह्यांतील पश्चिमेकडील तालुका. क्षेत्रफळ ५६२ चौरस मैल. लोकसंख्या १९११ सालीं जहागिरीसुद्धां १०३००९ होती. यांत नांदेड हें जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण व २११ खेडीं आहेत; पैकीं २६ जहागिरी आहेत यांतून गोदावरी नदी वहाते.

गां व.—नांदेड जिल्हा व तालुका यांचें मुख्य ठिकाण. हें गोदावरीच्या उत्तर तीरावर वसलें आहे. लोकसंख्या (१९११) १७६२५. येथें पूर्वी शहाजहानच्या वेळेस तैलंगणची राजधानी होती. यांत मुख्य कचेऱ्यांखेरीज २ दवाखाने, ५ शाळा व पोस्टऑफिसें आहेत. येथें आठवड्याचा बाजार भरतो. नांदेड हें येथील मलमल, जरीकांठी लुगडीं व उपरण्यांकरितां प्रसिद्ध आहे. येथें कलमच्या राजानें बांधलेला

किल्ला आहे; तेथें हल्लीं तुरुंग आहे. येथें गुरुद्वार अर्थात शिखांचा गुरुगोविंद याचें थडगें आहे. हें हैद्राबाद-गोदावरी-व्हॅली-रेल्वेवरील नांदेड स्टेशनाहून एक मैलावर आहे.

**नांदोद**—मुंबई, रेवाकांठा. राजपिप्पला संस्थानचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या ( १९११ ) ११११२०. हें शहर करजण नदीच्या एका वळणावर आहे. १३४० सालीं येथील नांदोद सरदाराला मुसुलमानांनीं हांकून दिलें. पुढें त्यानें व त्याच्या वंशजांनीं स.१८३० पर्यंत बराच भाग जरी परत मिळविला तरी त्यांनीं आपली राजधानी परत नांदोदला आणली नाहीं. भाजीपाल्याशिवाय येथील बाजारांत कापड, कलावतू, किराणा व मसाल्याचे जिन्नस, तंबाखू, अफू, बांगड्या, खेळणीं व मेवामिठाई वगैरे सामान मिळतें. स.१८५५ मध्यें या शहरचीं पाणीदार लोखंडी हत्यारें, तरवारी लटकवण्याचे कमरपट्टे व सांबराच्या कातड्याचा थैल्यांबद्दल प्रसिद्धि होती.

**नादोल**—राजपुताना, जोधपूर संस्थान, देसुरी जिल्ह्यांतील खेडें. हें राजपुताना-माळवा-रेल्वेच्या जवळील स्टेशनापासून ८ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९०१ ) ३०५०. हें पूर्वी चव्हाण राजांचें ठिकाण होतें. १० व्या शतकाच्या शेवटीं सांबरचा चव्हाण राव वाक्पतिराय याचा मुलगा लखन किंवा लछमनराज ह्यानें येथें वस्ती केली व याचे वंशज येथें नंतर २०० वर्षेंपर्यंत, कुतबुद्दीननें पराभव करून हांकून लावीपर्यंत राज्य करीत होते. नंतर येथें उदेपूरचा अंमल होता व शेवटीं हें जोधपूरच्या हातांत पडलें. याच्या पश्चिमेस एक पडका किल्ला आहे.या किल्ल्यांत जैन लोकांचें मारुतीचें फारच सुंदर देवालय आहे. इतर जुनाट वस्तूंपैकीं खेतल काशतान हें अनेक खांबांचें देऊळ होय. हें फार जुनें असून याचे हल्लीं फक्त ३ खांबच शिल्लक आहेत. याच्या पूर्वेस जुन्या नादोल् शहराच्या मोडक्या तोडक्या अवशेषांचा ढीग आहे. यांत ४ देवळें व खोदींव तोरण किंवा दरवाजा ह्यांहि मोडून पडलेला आहे.

**नानक**—शीख पंथाचा संस्थापक बाबा नानक उर्फ नानकशहा हा इ. स. १४६९ मध्यें देहरा ( तलवंद ) गांवीं जन्मला. हें गांव लाहोरपासून आग्नेयीस तीस कोसांवर रावी नदीच्या कांठीं आहे. हल्लीं या गांवास नानकाच्या स्मरणार्थ नानकाना असें म्हणतात व शिखांच्या गुरुद्वारांपैकीं हें एक मुख्य गुरुद्वार आहे. नानकाच्या बापाचें नांव काळू होतें. हा वेदी कुळांतील खत्री असून शेतकरी होता. नानकहि आरंभीं हिंदूच असून, धान्याचा वगैरे व्यापार करीत असे. नानकानें वेदांचा अभ्यास केला होता असें म्हणतात. त्याला लहानपणापासून साधुसंतांच्या संगतीची गोडी होती. त्याचें लग्न होऊन श्रीचंद व लक्ष्मीदास अशीं दोन मुलें त्याला होतीं. त्याच्या बायकोचें नांव सोलखनी असें होतें. सुलतानपूर येथें सुभेदाराच्या पदरीं तो प्रथम नोकर होता. त्यावेळीं तो कविता करी; त्या त्याचा एक डम( मुसुलमान ) जातीचा मित्र लिहून काढी. त्याचें नांव मर्दाना असें होतें, हा शेवटपर्यंत नानकाबरोबर होता. पुढें नानकास वैराग्य प्राप्त झालें व तो कबीराचा शिष्य बनला, आणि लोकांस एकेश्वरमताचा उपदेश करूं लागला. पंजाव प्रांतांत लहान लहान हिंदु जमीनदार राज्य करीत होते. त्यांपैकीं एका राजानें नानक यास आपल्या मुलुखांत धर्मोपदेश करण्याची परवानगी दिली. तेथून तो उपदेश करीत सर्व हिंदुस्थानभर फिरला. तसेंच मक्का, मदीना, येथेंहि तो गेल्याचें ( ? ) सांगतात. धर्माच्या कामांत आग्रह नसावा, कोणीहि मनोभावानें केलेली सेवा ईश्वरास सारखीच आवडते हा त्याच्या शिकवणीचा मुख्य मुद्दा होता. ह्या उपदेशाचा विशेष परिणाम पंजाबांतच झाला. त्याच्या अनुयायांस शीख ( शिष्य ) हें नांव मिळालें. नानकाचे 'शिष्य' ते शीख. नानकानें आपल्या शिष्यांचा एक नवीन पंथ काढला. या पंथाचा, अनुयायांनीं सर्व माणसांशीं मैत्रीनें वागावें असा कटाक्ष होता. अंगद नांवाचा नानकाचा एक मुख्य शिष्य होता, त्याच्याकडे त्यानें ह्या नवीन पंथाचें आधिपत्य दिलें; आपल्या मुलास दिलें नाहीं. अंगदानंतर अमरदास हा शिखांचा मुख्य झाला. नानक आपल्या वयाच्या ७० व्या वर्षीं म्हणजे आगस्ट १५३९ सालीं कतरिपुर येथें मरण पावला. तीर्थयात्रा झाल्यावर तो गुरुदासपुर येथें व कतरिपुर येथें शेवटचे दिवस घालवीत असे. कांहीं लोक म्हणतात कीं याचा गुरु कबीर नसून हसन दरवेशी नांवाचा एक मुसुलमान होता ( अर्वाचीन कोश ). नानकास मुसुलमान लोक नानकशहा म्हणत.

यानें पुष्कळ फुटकळ कविता केल्या आहेत, त्यांचा व त्याच्या वचनांचा संग्रह शिखांच्या आदिग्रंथ नांवाच्या धार्मिक ग्रंथांत केला आहे ( 'आदिग्रंथ' पहा ). नानकाच्या चरित्रांना 'जन्मसाखी' असें नांव असून या जन्मसाख्या पंजाबी भाषेंत पुष्कळ आहेत; पण त्यांत चमत्कार व अद्भुत गोष्टींचा भरणा फार आहे. आदिग्रंथा( ग्रंथसाहेब)वरून नानकाच्या मनाची रचना व धर्माच्या सुधारणेसाठीं त्याच्या मतें त्यानें केलेली खटपट यांचा अंदाज बांधतां येतो.

त्याची महत्त्वाची शिकवण म्हणजे हिंदु व मुसुलमान असे धार्मिक भेद नाहींत, ते मिथ्या आहेत. पण यामुळें तो दोन्ही धर्मांच्या लोकांनां थोडासा अप्रिय झाला. मूर्तिपूजेचा त्यानें निषेध केला आहे. परमेश्वर निराकार असून एकच प्रेमस्वरूप व सत्तत्वरूप आहे, मनुष्य पापी असल्यानें गुरूशिवाय त्याला परमेश्वरप्राप्ति व्हावयाची नाहीं, जग ही परमेश्वराची लीला आहे व तिच्या पलीकडे परमेश्वर आहे, तो सर्व सद्गुणी व मनुष्य दुर्गुणाचा पुतळा आहे अशी त्याची शिकवणूक असे. त्यानें परमेश्वरास निर्गुण मानलें असलें तरी त्याच्या सगुणरूपाबद्दलहि त्याला प्रेम वाटत असे.

बाह्य आचारविचार व विधी यांपेक्षां मोक्षप्राप्तीस इंद्रियदमन हाच उपाय श्रेष्ठ आहे असें तो म्हणे;त्याचा रोंख पोकळ बाह्यविधींवर असे. नानकाच्या काळीं लोदी व मोंगल घराण्यांचा अंमल उत्तरेकडे सुरू असून मुसुलमानी धर्मच

प्रसार जबरदस्तीनें चालला होता, मुसुलमानांतहि भेदाभेद उत्पन्न झाले होते. नानकानें हिंदुस्थानांतील सर्व तीर्थयात्रा केल्या. अमीनाबाद येथें असतांना त्याला पकडून बाबरबादशहाकडे नेलें, परंतु त्यानें बाबरची समजूत पटविल्यानें बाबरनें त्यास सोडून दिलें. नानकानें हिंदु धर्माचा त्याग केला नाहीं आणि मुसुलमानी धर्माचा स्वीकारहि केला नाहीं.मात्र दोहोंतील ग्राह्य तेवढा भाग त्यानें घेतल्यानें हिंदु, मुसुलमान दोघेंहि त्याचे अनुयायी झाले. त्याचें प्रेत दहन करावयाचें किंवा दफन करावयाचें यावद्दल वाद चालून शेवटीं त्याच्या वस्त्राचे दोन तुकडे करून एकाचें दफन व दुसऱ्याचें दहन करण्यांत आलें ( प्रेत तर कोणीं शिष्यानें त्यावेळीं पळविलें असें म्हणतात ). तो ज्या ज्या ठिकाणीं गेला त्यास व त्याचा ज्या ज्या वस्तूंशीं संबंध आला त्यांस पावित्र्य देण्यांत येतें. सुलतानपूरच्या नदीच्या काठीं जेथें त्याला वैराग्य प्राप्त झालें त्या स्थळास पवित्र मानून त्यास संतघाट असें नांव दिलें आहे. [ कस्ट-लाईफ ऑफ नानक; एनसायक्लो. ऑफ रिलिजन अँड एथिक्स; अर्वाचीन कोश; बील. ]

**नानपारा, त ह शी ल.**—संयुक्तप्रांत. बहरेख जिल्ह्यांतील उत्तरेकडील तहशील. क्षेत्रफळ. १०३१ चौरस मैल. लोकसंख्या३१५२४०.यांत ५२३ खेडीं, एक शहर (मुख्य ठिकाण) नानपारा आहे. यांत राखीव जंगल बरेंच आहे. यांतून किंवा याच्या सीमेवरून गिरवा, घोग्रा व शरयू या नद्या वाहतात. पश्चिमेकडील भाग बराच सुपीक आहे. स. १९०३-०४ मध्यें एकंदर लागवड केलेली जमीन ५२४ चौरस मैल असून फक्त २० चौरस मैलांनां कालव्यांचें पाणी पुरविलें जाई.

**गां व.**—याच नांवाच्या तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें बंगाल आणि नॉर्थवेस्टर्न--रेल्वेवर आहे. लोकसंख्या( १९११) ९७८२. दंतकथेवरून हें शहर निदहई या तेल्यानें वसविलें असून पहिल्यानें जें निदहई पुरवा हें नांव होतें. त्याचा प्रथम नादपारा असा अपभ्रंश झाला असल्याचें समजतें. इ. स. १६३० च्या सुमारास एका अफगाणाला शहाजहानें नानपारा व इतर कांहीं खेडीं इनाम दिलीं. त्यापासून हल्लींच्या नानपारा इस्टेटचा उद्भव आहे. येथें सर्वसाधारण कचेऱ्या व एक दवाखाना आहे. येथून धान्य बाहेर जातें व थोडासा नेपाळशींहि व्यापार चालतो. येथें दोन शाळा आहेत.

**इ स्टे ट.**—संयुक्तप्रांत, अयोध्येंतील बहरेख व गोंदा जिल्ह्यांतील एक तालुकदारी इस्टेट. क्षेत्रफळ सुमारें ६०० चौरस मैल शहाजहानानें बहरेख येथील वंजारांचा पाडाव करण्याच्या हेतूनें रसूलखानला येथील अधिकारी करून त्याला ५ खेडीं व कराचा एकदशांश देण्याचें कबूल केलें. याच्या वंशजांनां बरीच इस्टेट मिळाली. स. १८४७ मध्यें तोफेच्या आकस्मिक बारामुळें राजा मुनव्वरखान मेला व त्याच्या बायकांच्या भांडणामुळें या इस्टेटीचें बरेंच नुकसान झालें. हा प्रांत जोडल्यानंतर येथला खरा वारस शोधून काढला. सरजंग बहादुरखान के. सी. आय. ई. यांच्या वेळेस या प्रांताची भरभराट होती. हल्लींचे राजा मुहम्मद सदीकखान हे इ. स. १९०२ मध्यें गादीवर आले.

**नाना फडणवीस**—नानांचें चरित्र म्हणजे मराठी साम्राज्याची चाळीस वर्षांची हकीकत होय;म्हणून तें जरासें विस्तृत स्वरूपानें देणें अपरिहार्य असल्यानें येथें तसें देण्यांत आलें आहे. यांचें मूळ नांव बाळाजी जनार्दन भानू; रहाण्याचें गांव रत्नागिरी जिल्ह्यांतील बाणकोटच्या खाडीवरील दक्षिण तीरावरचें वेळास; खाडीच्या उत्तरेकडे श्रीवर्धन आहे. वेळासेस महादाजी कृष्ण भानू हा वतनदार होता. त्याला नारायण, हरि, रामचंद्र व बळवंत हीं चार मुलें झालीं. महादाजीच्या पश्चात नारायण वेगळा राहिला व बाकी तिघे एकत्र राहिले. श्रीवर्धनास बाळाजी विश्वनाथ भट हे देशमुख होते, त्यांचा व या तिघांचा स्नेह असे. हबशाच्या त्रासानें रोजगारानिमित्त भट हे घाटावर निघाले; त्यांच्याबरोबर हे तिघेहि निघाले. भटांनीं भानूंस सांगितलें कीं, आमच्या सबंध भाकरींत तुमचा चतकोर ठेवूं. घाटावर येतांना वाटेंत अंजनवेलीस हबशानें भटांस पकडलें, परंतु भानूंनीं खटपट करून त्यांची सुटका केली.

बाळाजीपंतानें धनाजी जाधव सेनापतीकडे नौकरी धरली; रामाजीपंत भानूस सचिवाकडे काम मिळालें व हरि व बळवंत हे बाळाजीजवळ राहिले. बाळाजीनाना हे पेशवे झाल्यावर त्यांनीं सर्व राज्याची फडणविशी शाहूकडून आपल्याकडे मागून घेतली व तीवर हरिपंतास नेमिलें; त्याप्रमाणें भानू हे मराठी राज्याचे फडणवीस झाले. रामाजीस लोहगडची सबनिशी दिली व नाणेमावळची सबनिशी हरिपंतास दिली ( १७१४ ). पुढें चार पांच महिन्यांनीं हरिपंत जेजुरीस वारला. तो निपुत्रिक असल्यानें बाळाजी ( बळवंत ) पंतास फडणविशी मिळाली.

सय्यदांस मदत करण्यास पेशवे दिल्लीस गेले असतां, सय्यदांच्या विरुद्ध पक्षाची व पेशव्यांची जी लढाई झाली तींत बाळाजीपंत ठार झाला ( १७१७ ). चौथ व सरदेशमुखीच्या सनदा पेशव्यांचा वेष घेऊन आणीत असतां बाळाजी मारला गेला अशी एक दंतकथा आहे; पण तिला ऐतिहासिक आधार नाहीं. नंतर रामाजीपंतास फडणविशीचीं वस्त्रें मिळालीं; तो पुढें सहा वर्षांनीं वारला ( १७२३ ). यावेळीं त्याचा पुत्र बाबूराव व पुतण्या जनार्दन बल्लाळ हे लहान होते; तरी पण नानासाहेब पेशव्यांच्या वेळच्या कारकीर्दींत यांनां प्रत्येक मोहिमेंत हजर रहावें लागे. जनार्दन बल्लाळ यांस बळवंतराव मेहेंदळे यांची बहीण रखमाबाई ही दिली होती; तिला एकच-नाना-अपत्य झालें. नानांचा जन्म सातान्यास शके १६६३ माघ कृष्ण ४, शुक्रवारीं ( १२ फेब्रुवारी १७४२ ) झाला.

बाबूरावाचा मुलगा मोरोबा हा नानाहून थोडा लहान होता. लहानपणीं नानांस आईनेंच शिक्षण दिलें. नाना तेव्हांपासून मातृभक्त होते. लहानपणीं त्यांनां कथाकीर्तन, देवपूजा वगैरेंचा नाद फार होता. मुंजीनंतर पेशव्यांनीं नाना व मोरोबा यांस विश्वासराव व माधवराव (पेशवे) यांच्याबरोबर अभ्यासासाठीं ठेविलें. नानासाहेब व भाऊसाहेब पेशवे यांचा नानांवर लहानपासूनच फार लोभ होता. तत्कालिन अवश्य असलेलें ज्ञान नानांनीं मिळविलें. मोरोबा मंद होता; त्यामुळें तो नानांचा मत्सर करी; हा मत्सर त्यानें अखेरपर्यंत सोडला नाहीं. नानांचें पहिलें लग्न दहाव्या वर्षी झालें; या स्त्रीचें नांव यशोदाबाई. जनार्दनपंतास पोटशुळाची व्यथा होती; रघुनाथरावदादाच्या स. १५२६ च्या स्वारींत जनार्दनपंत या व्यथेनेंच मृत्यू पावले; थोड्या दिवसांनीं नानांस फडणविशीचीं वस्त्रें पेशव्यांनीं दिलीं ( २९ नोव्हें० १७५६) व स्वतः हैदराबाद स्वारी केली, तींत नानांस बरोबर घेतलें. नानांची ही स्वारींतील पहिलीच खेप होती.

यानंतर तीन वर्षें नाना पुण्यासच होते. मोरोबाचें व त्यांचें पटेना, म्हणून ते विभक्त झाले. सोळा वर्षें वय होण्यापूर्वीच नानांवर विषयवासनेचा पगडा बसला; मात्र त्याबद्दल त्यांस कसा वारंवार पश्चात्ताप होई व तिचें दमन करण्यास त्यांनीं कसा भगीरथ प्रयत्न केला, या गोष्टी त्यांच्या आत्मचरित्रांत दिलेल्या आहेत. त्यासाठीं कांहीं दिवस ते कायगांवटोकें येथें पुरश्चरण करीत राहिले होते.

पानपतावर भाऊसाहेब निघाले, त्यांच्याबरोबर तीर्थक्षेत्रें पहावीं या उद्देशानें, आई व बायको यांच्यासह नानाहि निघाले. वाटेंत त्यांस अमांशाचा आजार होई, तेव्हां त्यांच्यावरील प्रेमानें भाऊसाहेब फौज सोडून त्यांच्याजवळ राहात. त्यांच्या सांगण्यावरून नाना दिल्लीस बादशहास भेटले; बादशहानें त्यांचा फार मान केला. कार्तिकी अमावास्येस नानांचा मामा बळवंतराव मेहेंदळे पराक्रम करून लढाईंत ठार झाला; त्याच्याबरोबर त्याची स्त्री सती गेली; यामुळें नानांस फार दुःख झालें. पौष शुद्ध अष्टमी बुधवारीं ( १४ जाने. १७६१ ) पानपतचा शेवटचा संग्राम झाला. सकाळपासून अखेरपर्यंत नाना हे भाऊसाहेबांच्या जवळ होते. शेवटच्या गर्दींत त्यांस पळून जाण्यास एका माणसानें सांगितलें असतांहि ते गेले नाहींत. भाऊसाहेब दिसेनासे झाल्यावर मात्र, जेव्हां सायंकाळीं सर्व लोक पळाले तेव्हां शेवटीं नानाहि तेथून निघाले. होळकर व गायकवाडांसारखे फौजबंद शूर सरदारहि जेथून आधींच पळाले, तेथून सर्वस्व नाहींसें झाल्यावर जीव बचावण्यासाठीं पळ काढावा लागला याबद्दल वास्तविक नानांस वाईट वाटण्याचें कारण नव्हतें. तथापि, भाऊसाहेब गेल्यावर आपण समरांतच प्राण कां दिला नाहीं, याबद्दल नानांस नेहमीं पश्चात्ताप होई. "लक्ष सैन्य...मोठमोठे सरदार...एकहि त्या समयीं श्रीमंतांस आप्त न जाहला ( मजवर ) भाऊसाहेबीं कृपा पुत्रवत् केली." असे ते नेहमीं उद्‌गार काढीत. पानपताहून देशीं परत येतांना वाटेंत नानांचे फार हाल झाले; 'शुद्ध लंगोटी लावून' त्यांनीं कांहीं दिवस प्रवास केला. दोन तीनदां गिलच्यांनीं त्यांनां पकडलें, परंतु ठार केलें नाहीं, 'हे सत्ता ईश्वराची.' गवतांत लपून जीव वाचवावा लागे; बोरीचा पाला खाऊन भूक शमवावी लागे; याप्रमाणें कष्टानें नाना रेवडी या गांवीं आले. तेथें भालेराव या गृहस्थानें त्यांचा परामर्ष घेऊन त्यांची दींग भरतपूरकडे रवानगी करून दिली. वाटेंत त्यांची स्त्री यशोदाबाई भेटली. पानपतास नानांचा पत्ता लागेना, तेव्हां तिनें वेष पालटून दिल्लीचा रस्ता धरला; तेथून ती सोबतीनें भरतपुरास निघाली, तेव्हां वाटेंत नानांची भेट झाली. भरतपुरास पानपतचा पळ बराच आला होता. त्यांतील नानांच्या खिदमतगारानें सांगितलें कीं, तुमची आई पळांत नाहींशी झाली. त्यामुळें नानांस फार वाईट वाटलें व वैराग्याच्या भरांत काशीवास करण्यास परतून ते ग्वालेरपर्यंत गेले. तेथें पार्वतीबाई पेशवे व मल्हारबा होळकर यांनीं त्यांची समजूत घालून त्यांस परतविलें. पुढें पुष्कळ वर्षें आईची ( "स्वतःचें सर्वस्व देऊनहि" ) खरी बातमी काढण्याविषयीं नानांची खटपट चालू होती. एकदां त्यांनीं दिल्लीस हिंगणे वकीलास याबद्दल आग्रहाचें पत्र लिहिलें. मात्र त्यावेळींहि त्यांची धर्मनिष्ठा दिसून येते; 'आईच्या जातीचा शोध व्हावा, ती शुद्ध असल्यास तिला पाठवावी व बाटली असल्यास परभारें प्रयागास गंगेंत देह अर्पण करण्यास पाठवावी,' असा खुलासा त्यांनीं त्या पत्रांत केला होता. नाना ब्रह्माणपुरीं नानासाहेब पेशव्यांस भेटून कायगांवटोकें येथें कांहीं दिवस राहिले व पेशवे पुण्यास वारल्यावर, पुण्याहून निघाल्यापासून १४ महिन्यांनीं नाना पुण्यास परत आले ( जुलै १७६१ ).

थोरले माधवराव हे पेशवे झाल्यावर त्यांच्या आज्ञेनें नाना हे कारभारांत लक्ष्य घालूं लागले. यावेळीं त्यांचें वय २१ वर्षांचें होतें. त्यांनीं यापूर्वीच अनेक दुःखाचे प्रसंग पाहिले होते त्यामुळें अखेरपर्यंत त्यांच्या स्वभावावर कांहींशी खिन्नतेची छाया पडलेली होती. राज्यकारभाराचा अनुभवहि त्यांनीं थोडाफार मिळविला. पेशव्यांच्या बरोबर नेहमीं राहिल्यानें मोठमोठे मुत्सद्दी, सरदार, सावकार यांच्या स्वभावाची त्यांस ओळख झाली. खुद्द नानासाहेब पेशवे, भाऊसाहेब पेशवे व रामचंद्रबाबा शेणवी या राजकारस्थान्यांचीं उदाहरणें त्यांच्या डोळ्यासमोर होतीं. आपसांतील दुहीचा व हटवादीपणाचा काय परिणाम होत असतो तो पानपतास त्यांनीं प्रत्यक्ष पाहिला होता. या सर्व गोष्टींचा विचार करून यापुढील आयुष्याचें धोरण त्यांनीं आंखलें.

नानांचे आतांपर्यंतचे विश्वासु मित्र हरिपंत फडके, यांचा बाप बाळाजी हा, बाबूराव फडणवीस यांचा उपाध्याय असल्यामुळें नाना व हरिपंत यांचा लहानपणापासून स्नेह जमला व नानांनींच हरिपंतास दरबारांत प्रसिद्धीस आणलें.

माधवरावसाहेब व दादासाहेब यांच्या कुरबुरींत दादांनीं व सखाराम बापूनें दौलतीचा कारभार पाहाण्याचें सोडून दिलें. तेव्हां त्यांचें आर्जव न करतां माधवरावांनीं त्रिंबकरावमामा, गोपाळराव पटवर्धन, नाना फडणवीस, मोरोबा फडणवीस व हरिपंत फडके यांचें कारभारीमंडळ नेमून राज्यकारभार सुरू केला.त्यावेळीं दादा हे निजामाकडे जाऊन त्याची फौज घेऊन पुण्यावर येऊं लागले; म्हणून माधवरावांनीं दादांच्या हातीं कारभार देऊन गृहकलह मिटविला. दादा मुखत्यार झाल्यावर त्यांनीं फडणिशी भानूकडून काढून रायरीकरास दिली, त्यामुळें बापूराव व मोरोबा हे निजामास मिळाले. पुढें राक्षसभुवनच्या लढाईनंतर, माधवराव हे पुन्हां कारभार करूं लागल्यावर,त्यांनीं पुन्हां नानास फडणविशी व मोरोबास कारभारीपणा दिला. माधवरावांचा नानांवर फार विश्वास असे. प्रत्येक कामांत ते नानांचा विचार घेत. त्यांनीं हैदरावर केलेल्या अनेक स्वाऱ्यांत राज्याचा सर्व भार इकडे नानांच्याच माथीं असे. तो सांभाळून शिवाय पेशव्यांस नियमित दारूगोळा, धान्यधुन्य व पैका वेळच्यावेळीं व भरपूर पुरविण्याचें जोखमेचें कामहि नानांनीं पुरें पाडलेलें होतें. माधवरावांनीं शेवटीं थेऊर येथें नारायणरावांची व राज्याची जबाबदारी विश्वासपूर्ण नानांवरच टाकली होती. तुकोजी होळकर व महादजी शिंदे यांनां सरदारकीचीं वस्त्रें मिळवून देण्याच्या कामीं ( दादासाहेबांच्या विरुद्ध ) नानांनींच प्रयत्न केल्यानें, हे दोघे सरदार दादांच्या विरुद्ध मसलतींत नानांस अनुकूल असत.

नारायणराव पेशवे हे तापट व गैरमुत्सद्दी होते. त्यांनीं आईच्या सांगण्यावरून व नाना आणि बापू यांच्या संमतीच्याविरुद्ध दादासाहेबांस कैद केलें. कैदेंतून पळून जाण्याचा दादांनीं प्रयत्न केल्यानें पेशव्यांनीं त्यांची कैद फार कडक केली व त्रासहि दिला; त्याचा परिणाम पेशव्यांच्या खुनांत झाला. नारायणरावांस धरण्याचा कट झाल्याची कुणकुण नानांस होती व त्यांनीं तिची सूचना (पेशव्यांनीं थट्टेनें नानाचें पागोटें बोथाटीनें उडविलें असतां, नानांनीं ' माझ्या पागोट्याची किंमत नाहीं, श्रीमंतांनीं आपलें पागोटें सांभाळावें " याप्रमाणें ) पेशव्यांस दिलीहि होती, पण पेशव्यांनीं तिकडे दुर्लक्ष्य केलें.' पेशव्यांस फक्त धरून, कैदेंत ठेवून दादांनीं कारभार पहावा' असाच मूळचा कट होता; मारण्याचा बेत हा अगदीं आयत्या वेळीं झाला व तो आनंदीबाई व तिचे लोक यांनीं केला. यामुळें तो त्या मंडळीच्या बाहेर फुटला नाहीं; अर्थात तो नानांस मुळींच माहीत नव्हता. खुद्द पेशव्यांसहि जेव्हां स्वतःस पकडण्याच्या कटाची बातमी लागली तेव्हां त्यांनीं हरिपंतास त्याचा बंदोबस्त करण्यास आज्ञा केली होती व ती नानांनीं ऐकली होती. सारांश, या कामीं नानांवर ( निष्काळजीपणाशिवाय इतर दुसरा ) कोणताहि आरोप येऊं शकत नाहीं.

आपणांवर मुलाप्रमाणें प्रेम करणाऱ्या नानासाहेबांचा मुलगा व शेवटीं विश्वासानें माधवरावांनीं ज्याला आपल्या स्वाधीन केलें,तो नारायणराव आपल्या देखत मारला गेला ही गोष्ट नानांच्या मनास कायमची लागली व ती घडवून आणणाऱ्या दादासाहेबांबद्दल त्यांच्या मनांत अत्यंत तिटकारा आला आणि त्या भरांत त्यांनीं प्रख्यात बारभाईचें कारस्थान उभें केलें. सखारामबापूस बाह्यतः वडीलकी देऊन, नानांनींच हें कारस्थान पार पाडलें. बापू दुटप्पी असल्यानें त्याचा भरंवसा नव्हता ( आणि अखेरीस त्यानें फितूर केलाहि ). पुढें एकदां मोरोबा फडणवीस, बजाबा पुरंदरे व बाबूजी नाईक ह्या बारभाईंतील मंडळींहि दादांस फितूर होऊन गंगाबाई, सवाई माधवराव, बापू व नाना यांनां कैद करण्याचा त्यांनीं कट उभारला होता. मात्र त्याचा योग्यवेळीं नाना व बापू यांनीं बंदोबस्त केला. याप्रमाणें खुद्द बारभाईंतील सुद्धां कांहीं मंडळी फुटलेली होती; त्यामुळें कार्याची सर्व जबाबदारी एकट्या नानांवर होती न ती त्यांनीं यशस्वी रीतीनें पार पाडलीहि.

नारायणरावांच्या खुनाचें निमित्त काढून निजाम पुण्याकडे येऊं लागला; तेव्हां दादासाहेब त्याच्यावर निघाले. बरोबर बापू व नाना हे होते; परंतु आजारीपणाच्या सबबी सांगून ते पुण्यास परत आले. त्यांनीं गंगाबाईस पुरंदरावर ठेवून, दादांच्या पक्षपाती लोकांनां पकडून गंगाबाईची द्वाही फिरविली व स्वतः कारभारी बनले. दादास बंडखोर ठरवून त्यांनीं भोंसले व निजाम यांनां मिळवून घेतलें आणि खुद्द दादांच्या फौजेंतच फितूर केला. ही हकीकत समजतांच दादा पुण्याकडे वळले. कारभाऱ्यांनीं त्रिंबकराव मामास त्यांच्या तोंडावर पाठविलें; मामानें उतावीळ केल्यानें त्याचा पराभव होऊन तो पकडला गेला. त्यावर हरिपंत फडक्यास पाठविण्यांत आलें;त्यानें भोंसले व निजाम यांच्यासह दादांचा पाठलाग केला. तेव्हां दादा इंदुराकडे पळाले. तेथें शिंदे व होळकर यांनीं त्यानां मदत करण्याचें कबूल केलें.

इतक्यांत इकडे सवाई माधवरावांचा जन्म झाला ( १८ एप्रिल १७७४). त्यामुळें दादांचा पेशव्यांच्या गादीवरील हक्क कायमचा नष्ट झाला; तरी सुद्धां ते भांडण्यास तयारच होते. नानांची यावेळीं स्थिति फार बिकट झाली होती. बारभाईंत आपसांत दुही, राज्यांत सर्वत्र फितूर, कोणांवर विश्वास ठेवावा हें समजण्याची पंचाईत; पैक्याची टंचाई, फौज व सरदार बेकैदी, प्रजा उदासीन, भोंसले व निजाम स्वार्थसाधू असा एकंदर प्रसंग बनला होता. वर सांगितलेले मोरोबा, बजाबा व बाबूजी यांचें कारस्थान या वेळींच झालें होतें. पुरंदरास पावसाळ्यांत हवा सर्द असते म्हणून बालपेशव्यांसह कारभारी सासवडास राहिले होते आणि त्यावेळीं त्यानां पकडण्याचा वरील मंडळीचा बेत होता या कटाचीं पत्रें हरिपंतानें ( दादांच्या पाठलागावर बऱ्हाणपुरास असतांना )

पकडल्यानें कट उघडकीस आला. सासवडची सर्व मंडळी पुरंदरावर गेली आणि फितुऱ्यांनां कडक शिक्षा झाल्या.

पावसाळा संपल्यावर दादा हे शिंदेहोळकरांच्या फौजेसह नर्मदा उतरले, तेव्हां समेट झाल्यास पहावा म्हणून नाना व बापू हे तापी कांठीं त्यांनां जाऊन भेटले. त्यांची बोलणीं चालणीं झालीं, परंतु दादांची समजूत पटेना. तेव्हां कारभाऱ्यांनीं शिंदे होळकरास फोडून हरिपंतासह त्यांनां दादांवर पाठविले. दादा गुजराथेंत पळाले. तेथें त्यांनां गोविंदराव गायकवाड मिळाला. तरीहि हरिपंतानें महीवर दादांचा पराभव केला. तेव्हां दादा खंबायतेहून सुरतेस इंग्रजाकडे गेले

साष्टी बेट मुंबईजवळ असल्यानें त्यावर इंग्रजांचा पूर्वीपासून डोळा होता. मागें नानासाहेब पेशव्यांशीं दोस्तीचा तह केलेल्या इंग्रजांनीं आतां तो मोडून व वरील गृहकलहाचा फायदा घेऊन साष्टी काबीज केली; परंतु ती पचावी कशी या भीतीनें इंग्रज चूर असतां, दादांनीं आयतीच त्यांच्याकडे मदत मागितली. तीन हजार फौज मदतीस आल्यास साष्टी व शिवाय वसई वगैरे सव्वा एकोणीस लाखांचा प्रांत इंग्रजांस बहाल करण्यास दादा तयार झाले. मग इंग्रजांची फौज घेऊन दादा खंबायतच्या खालीं उतरले, पण यावेळीं त्यांच्या व हरिपंताच्या किरकोळ लढाया झाल्या ( १७७६ ). याच वेळीं हैदर व कोल्हापूरकर हे पेशवाईवर उठले होते; राज्यांत अंदाधुंदी माजली होती; पैशानें हलाखी आली होती व चोवीस लाखांचा प्रांत इंग्रजांनीं काबीज केला होता. तेव्हां या एकंदर नुकसानापेक्षां साष्टी व भडोच वगैरे सहा लक्षांचा मुलुख इंग्रजांस देऊन आणि मुख्यतः घरभेद्या दादांस हातीं घेण्याचें ठरवून नानांनीं त्याप्रमाणें पुरंदरचा तह केला(१७७६). मग नानांनीं हरिपंतास हैदराची बंडाळी मोडण्यास व महादजी शिंद्यास कोल्हापूरकराचा दंगा नाहींसा करण्यास तिकडे पाठविलें. त्यांनीं सोंपविलेली कामगिरी बरोबर बजाविली.

याच वेळीं मोरोबानें आणखी एक मोठें कारस्थान रचिलें; त्यांत दादासाहेबांच्या पक्षाची एकूणएक मंडळी होती, इतकेंच नव्हे तर बारभाईंतील एकट्या नानाखेरीजकरून सर्व ( प्रत्यक्ष बापू सुद्धां ) माणसें त्यांत सामील झालीं होतीं. हा नानावर कठिण प्रसंग होता. इंग्रजांच्या बळावर प्रतिस्पर्धी प्रबळ झाले होते, जिवलग मित्रहि उलटले होते, जवळ फौज व पैका नव्हता, अशी चोहोंकडून अडचण आली होती. तथापि त्यांनीं आपल्या विलक्षण बुद्धिसामर्थ्यानें हें कारस्थान हाणून पाडलें. त्यांनां एके दिवशीं रात्रीं पकडावयाचें ठरलें होतें व रात्रीं १२घटकेस पुण्यास जी तोफ उडत असे ती पकडण्याची वेळ ठरवली होती. वेळेच्या आधीं बापू हा नानांकडे बराच वेळ येऊन बसला होता. नानांनीं पुण्याच्या तोफेच्या गोलंदाजास आधींच सांगून ठेविलें कीं, पुरंदरच्या ५ तोफा झाल्यावर आज तोफ उडवा. बापू गेल्यावर तावडतोब नाना एकटे निघून पुरंदरीं पोहोंचले; त्यांच्या आश्रितास सुद्धां ही बातमी समजली नाहीं. पुरंदरच्या तोफा झाल्या व मग पुण्याची तोफ झाली. कटवाल्यांच्या ५०० स्वारांनीं नानांच्या वाड्यास घेरा घातला. पण नाना सांपडले नाहींत! पुढें मोरोबानें पार्वतीबाई पेशव्यांकडून स्वतःस कारभाऱ्याचीं वस्त्रें घेतलीं. पुण्याच्या इंग्रज वकिलानें मुंबईस ही बातमी आनंदानें कळविली व दादांस तावडतोब साहाय्य करण्यास लिहिलें. मोरोबाकडे होळकर, विंचूरकर, मेहेंदळे वगैरे सर्व सरदार ३०।४० हजार फौजेसह होते. याप्रसंगीं काळवेळ जाणून व इंग्रजांनीं दादांस आणून गादीवर बसविण्याच्या पूर्वींच नानांनी बापूच्या मध्यस्थीनें मोरोबाशीं समेट केला. त्याच्या हातीं पुण्याचा व दौलतीचा सर्व कारभार दिला व आपल्या हातीं पुरंदर आणि बालपेशव्यांचा कारभार ठेवला. मुख्य धनी हातीं असल्यावर त्याच्या नांवावर आपल्याला पुढें पाहिजे ती मसलत करतां येईल, हें धोरण यांत होतें. नानाच्या या धोरणांत मोरोबा फसला व खुद्द बापूसहि भुरळ पडली. नानांनीं हळू हळू मोरोबावर आपली छाप बसवून, दादांना गादीवर बसविण्याची त्याची मसलत मोडून काढिली आणि शिंदे व फडके यांस कोल्हापूरकर व हैदर यांच्या मोहिमांवरून तावडतोब परत बोलाविलें ( त्या दोघांनीं तिकडे जय मिळविलाच होता.). तेव्हां मोरोबादि मंडळीस संशय न येईल अशा बेतानें ते दोघे हळू हळू येऊन पुरंदरीं दाखल झाले मग नानांनीं आपलें स्वरूप उघड केलें. लागलीच त्यांनीं ९ लाख रुपये देऊन होळकरास फोडलें. शेवटीं शिंद्याच्या फौजेनें एकदम पुण्यास जाऊन मोरोबास पकडून नानांच्या स्वाधीन केलें. मग सर्व कटवाल्यांनां शिक्षा झाल्या. बापूस मात्र नजरकैद झाली व नाना पुन्हां मुख्य कारभारी झाले ( ११ जुलै १७७८ ).

पण यामुळें इंग्रजांनीं उचल केली. त्यांनीं पुरंदरच्या तहांतील बहुतेक अटी आपण होऊन मोडल्या. ठरल्याप्रमाणें अठरा लाखांचा मुलुख पेशव्यांस परत दिला नाहीं, दादांस मुंबईस ठेवलें, सुरत व भडोचच्या फौजा परत नेल्या नाहींत, भाऊसाहेबाच्या तोतयास मदत केली व त्याचें शासन झाल्यावरहि त्याच्या लोकांस ठाण्यास आसरा दिला. याप्रमाणें इंग्रजांनीं आगळिकी केल्या. त्यामुळें त्यांच्या नेकीबद्दल नानांचें मत प्रतिकूल होऊन त्यांस त्यांचा फार राग आला. तेव्हां त्यांनीं पुढील युक्ति योजली. फ्रान्सच्या बादशहाकडून या सुमारास एक सेंट ल्युबिन म्हणून वकील पेशवेदरबारीं आला होता. व 'आपणांस चौल बंदर दिल्यास आपण फ्रान्सहून फौजा आणून इंग्रजांस हांकून देऊं.' असें त्यानें बोलणें लाविलें होतें. नानांनीं त्यास हातीं धरून इंग्रजांच्या वकिलाचा ठिकठिकाणीं पाणउतारा केला; त्याच्या घरावर पहारे बसवून त्याला शहरांत येण्याची बंदी केली. यूरोपांत याच सुमारास इंग्रज-फ्रेंचांची लढाई चालू होती. तेव्हां इंग्रजांस फार काळजी लागून त्यांनीं वरील कारणासाठीं पुण्यावर चाल करण्याचें ठरविलें. ही बातमी नानांस तात्काल समजली व त्यांनीं आपलीहि सर्व तयारी तावडतोब केली. इंग्रज सैन्य कॅप्टन इगर्टन

याच्या हाताखालीं दादासाहेबासह मुंबईहून निघून घाटाकडे येत असतां, पानशांनीं त्याच्यावर गनिमी हल्ले करून त्यांतील नांवाजलेला इटूर फांकडा ( कॅ. स्टुअर्ट ) यास ठार केलें व त्यांचें मुंबईचें दळणवळण तोडलें. अखेर तळेगांव–वडगांव येथें इंग्रजांचा सपशेल पराभव होऊन, नाना म्हणतील त्याप्रमाणें सर्व अटी त्यांस कबूल कराव्या लागल्या. हा तह इंग्रजांच्या दृष्टीनें मोठ्या नामुष्कीचा होता. नानांस कारभारावरून काढून दादांस गादीवर बसवून पेशवाई आपल्या हातीं घेण्याचा त्यांचा कट पुरा फसून नानांचेंच वर्चस्व अधिक वाढलें आणि दादांस त्यांच्या स्वाधीन करून निमूटपणें इंग्रजांस परत फिरावें लागलें. यावेळींच फितुरीचे अस्सल कागद सांपडल्यावरून बापूस कैद करण्यांत आलें; यापुढें मरेपर्यंत बापू कैदेंतच होता.

वरील प्रसंगामुळें इंग्रज जास्त चिडले. कलकत्त्याहून गाडर्ड हा पुण्यावर चालून येत होता. त्यानें हें वडगांवचें वर्तमान ऐकून आपला रोंख गुजराथेवर धरून फत्तेसिंग गायकवाडास फितूर करून अहमदाबाद व डभई घेतली. याच वेळीं शिंद्यांच्या ताब्यांतून दादासाहेब पळून जाऊन भडोचेस इंग्रजांकडे गेले. त्यामुळें शिंद्यानें इंग्रजांवर मोहीम केली; तेंव्हां इंग्रजांनीं गोहदच्या राण्याच्या मदतीनें शिंद्यांस पुष्कळ त्रास दिला. इकडे गाडर्डनें ठाणें–साष्टीकडे मोहीम करून व रामचंद्र गणेश याचा पराभव करून वसई घेतली; आणि कल्याणपासून बोरघाटापर्यंत प्रांत काबीज केला. तेव्हां नानांनीं डचांशीं संगनमत करून त्यांनां इंग्रजांविरुद्ध उठविलें आणि पुढीलप्रमाणें एक मोठें राजकारण केलें —शिंदे, होळकर, भोंसले यांनीं पूर्वेस व उत्तरेकडे थेट कलकत्त्यापर्यंत; निजाम, फ्रेंच व हैदर यांनीं दक्षिणेस थेट मद्रासेवर आणि पश्चिमेस आपण स्वतः थेट मुंबईपर्यंत याप्रमाणें एकाच वेळीं चारी बाजूंनीं स्वाऱ्या करून इंग्रजांस ताण बसवावा व त्यांनां हांकून द्यावें असा नानांचा मनसुबा होता. तो सिद्धीस जाता तर निराळाच इतिहास बनला असता; परंतु तसें झालें नाहीं. भोंसले हा इंग्रजांकडून १६ लाख रुपये लांच घेऊन तटस्थ राहिला, होळकर फौजेस फांटा देऊन स्वस्थ बसला आणि निजामानें टाळाटाळ केली. फक्त हैदरानें व फ्रेंचांनीं मद्रासकर इंग्रजांची रेवडी उडविली, शिंद्यानें उत्तरेकडे इंग्रजांस शह दिला व बोरघाटावर पेशव्यांनीं गाडर्डचा पराभव करून व त्याचा गोट लुटून त्यास मुंबईकडे पिटाळून लाविलें आणि गुजराथेंतहि सुरतेपर्यंत लुटालूट करून इंग्रजांचा पिच्छा पुरविला. यामुळें इंग्रज अगदीं दीन झाला व तहासाठीं भोंसले, शिंदे, अर्काटकर नबाब यांच्यामार्फत खटपटी करूं लागला. इंग्रजांस यावेळीं पक्कें कळून चुकलें कीं, मराठी राज्याचा मुख्य अधिकार जोंपर्यंत नानाच्या हातीं आहे, तोंपर्यंत तें राज्य जिंकण्याची आपली आशा मृगजळाप्रमाणें होय. नानाच्या व शिंद्यांच्या मनांत दिल्लीचा बादशहा आपल्या हातीं आणून त्याच्या निमित्तानें मराठी राज्याचा दरारा सर्व उत्तरेंत आणि इंग्रज, निजाम, रजपूत, अर्काटकर वगैरे मंडळींवर बसवावा असें होतें. यापूर्वीं दिल्लीस इंग्रजांचा शह बसला होता. आतां इंग्रज इतका घाबरला कीं, दिल्लीचा पातशहा व सारी भानगड मराठ्यांस देण्यास तो कबूल होऊन नाना सांगतील त्या अटींवर तह करण्यास तयार झाला. शेवटीं शिंद्याच्या मार्फत सालबाई येथें तह होऊन, साष्टीखेरीज मराठ्यांचा घेतलेला सर्व मुलुख आणि दादासाहेब यांस इंग्रजांनीं मराठ्यांच्या हवालीं केलें. याप्रमाणें हें सहा वर्षें चाललेलें युद्ध यावेळीं बंद झालें ( १७८२ ).

या प्रसंगीं इंग्रजांनीं एक डाव टाकला होता, पण नानांनीं तो ओळखला व खोडूनहि टाकला. फत्तेसिंग गायकवाड हा इंग्रजांस मिळाला होता. इंग्रजांनीं फत्तेसिंगाच्या मदतीनें अहमदाबाद घेतलें. इंग्रजांचें म्हणणें कीं अहमदाबाद फत्तेसिंगास द्यावें. नाना म्हणत, फत्तेसिंग हा आमचा जहागीरदार, त्याला ही गुजराथची सरकारी राजधानी काय म्हणून द्यावी ? शिवाय स्वराज्यावर प्रसंग आला असतां फत्तेसिंग फितूर झाला, मग अशाला काय ही बक्षिसी द्यावयाची ? तसेंच, फत्तेसिंगास त्याच्या जहागिरींतील कांहीं प्रांत इंग्रजांस द्यावयाचा काय अधिकार ? तो स्वराज्यांतील एक नौकर होय. अशामुळें जहागीरदार स्वतंत्र बनतील व मराठी साम्राज्याचे दुवे निखळतील. हे दुवे निखळण्याच्याच उद्देशानें इंग्रजांनीं हा फत्तेसिंगाचा डाव टाकला होता. शेवटीं नानांनीं फत्तेसिंगास अहमदाबाद दिलें नाहीं व पेशव्यांस पूर्ववत खंडणी देऊन त्यांची सांगतील ती नौकरी बजाविण्याची त्याची कबुली घेतली आणि इंग्रजांचा डाव विसकटून टाकला.

नानांस इंग्रजांच्या स्वभावाच्या बारीकसारीक गोष्टी माहीत होत्या. इंग्रज लोक इतरांशीं तहनामे करतांना कसे दुटप्पी शब्द वापरतात व त्यांच्या बळावर पुढें कशीं राजकारणें करतात याबद्दल नानांनीं महादजीस लिहिलें कीं, " इंग्रजांशीं तहनामा करणें तो फार विचार करून करावा लागतो. त्यांचे बोलण्यांत व लिहिण्यांत एका अक्षरांत फार पेंच असतात. ही पुरती माहितगारी येथें (आम्हांस) आहे. ...पुढील मागील गुणदोष फार पहावे लागतात. "

सवाईमाधवराव सव्वातीन वर्षांचे झाल्यावर मातुश्री गंगाबाई ही नवज्वरानें वारली ( १३ जुलै १७७७ ). ग्रँट डफ व नानांचा चरित्रकार म्याकडोनल्ड यांनीं गंगाबाई व नाना ह्यांच्याबद्दल कुत्सित व खोटी गोष्ट लिहिली आहे. ही गोष्ट दादांच्या पक्षानें उठविली. तसेंच दादांची बाजू तेवढी चांगली, त्यांस पदच्युत करणारे सगळे लबाड व नीच, असें ठरविण्याकरितां तत्कालीन मुंबईकर इंग्रजांनीं भलभलतें लिहून ठेविलें. "गोपिकाबाईनें दादा व बापू यांच्या खुनाचा बेत केला होता. सवाईरावसाहेब हा मुली गंगाबाईचा पुत्रच नाहीं... बापू हा अक्षरशत्रु " वगैरे. "असले खोडसाळ प्रकार लिहिणारांनींच, नाना व गंगाबाई यांच्याविषयीं ही बातमी

कशावरून उठविली नसेल ? " (खरे–नानांचें च. पृ. १०७). नानांवर पेशवेकुलाचे फार उपकार होते, त्यांबद्दल त्यांनीं काढलेले अनेक कृतज्ञतेचे उद्गार आढळतात. त्यांची स्वामिभक्ति निस्सीम होती, ते धर्मशील, पापभीरु व सदाचरणी होते; एकदां नानासाहेब पेशव्यांच्या दुसऱ्या बायकोनें त्यांनां जेवण्यास स्वतः वाढलें असतां, "मातोश्रीकडून लेंकरास वाढविलें " असे उद्गार नानांनीं काढले आहेत. एकंदरींत असल्या वर्तनाच्या माणसाकडून वरील गोष्ट घडणें शक्य नाहीं. शिवाय डफनें आपल्या म्हणण्यास आधार दिला नाहीं. तसेंच मराठी किंवा मुसुलमानी कोणत्याहि बखरींत किंवा जुन्या कागदपत्रांत चुकूनहि असला उल्लेख आढळत नाहीं; सारांश, ही गोष्ट निखालस खोटी आहे.

सवाईरावसाहेबांस लहानपणीं नाना फार जपत. त्यांच्या परवानगीशिवाय पुरंदरास कोणाचाहि प्रवेश होत नसे. पांच वर्षें झाल्यावर पेशव्यांस पुण्यास आणलें. त्यांची मुंज व लग्न नानानींच मोठ्या हौसेनें व लाखों रुपये खर्चून केलें. लग्नाच्या थाटाची हकीकत पेशव्यांच्या बखरींत दिलेली आहे. पेशव्यांनां सर्व प्रकारचें शिक्षण नानांनीं दिलें. पेशवे थोडेसे मोठे झाल्यावर नाना त्यांस दररोज चार घटका दरबारांत घेऊन बसत. याप्रमाणें राज्यकारभाराचेंहि ज्ञान नानांनीं त्यांस थोड्या काळांत करून दिलें. यापुढें हैदरावरील मोहिमांत नानांनीं लक्ष्य घातलें. मराठे हे इंग्रजांकडे गुंतले असतां हैदरानें त्यांचा कृष्णेकडील प्रांत बळकावला, व नेहमींची खंडणीहि दिली नाहीं. तेव्हां नानांनीं एक मसलत केली; हैदरापासून उपद्रव होऊं नये व इंग्रजांसहि जरब बसावी, म्हणून नानांनीं हैदराशीं तह केला. व त्याला इंग्रजांवर पाठविलें. हैदरास नवीन राज्य जिंकावयाचें होतें, तर नानांस स्वराज्य राखावयाचें होतें, म्हणून हैदराची व इंग्रजांची झुंपली कीं, तो परस्पर तितका हीनबल होईल, मग आपल्यास त्याच्यापासून आपला प्रांत सोडवून घेतां येईल आणि इंग्रजांनांहि यामुळें आयती तंबी पोंहोचेल; याप्रमाणें कांट्यानें कांटा काढण्याची नानांची मसलत होती. इतक्यांत हैदर मेला; त्याबद्दल नाना म्हणतात " हैदर वारला, तेव्हां इंग्रज शेर ( वाघ ) होतील.... हैदरास इंग्रज वचकत होता. "

पुढें टिप्पू खंडणी देईना म्हणून नानांनीं निजामची मदत घेऊन त्याच्यावर स्वारी करण्याचें ठरविलें. यासाठीं निजामअल्ली व नाना यांची भेट यादगिरी येथें झाली. टिप्पूनें निजामास आपला मांडलिक म्हणून संबोधून आपलीं वजनेंमापें सुरू करण्यास हुकूम पाठविला होता. या अपमानानें चिडल्यानेंच निजाम हा नानांस मिळाला.

मध्यंतरीं नानांस पकडण्याचा एक कट उघडकीस आला व नानांनीं त्याचा बंदोबस्तहि केला. हा कट कोपरगांवीं असलेल्या आनंदीबाईनें शनवारवाड्यांतील बळवंतराव पटवर्धनाच्या साहाय्यानें केला होता. नानांनीं आनंदीबाईस मात्र कांहीं शासन केलें नाहीं ( आणि याबद्दल डफ त्यांची स्तुतीच करतो); कारण पेशव्यांच्या राज्यास धोका न पोंचावा म्हणून दादा व त्यांची मंडळी यांचा जरी नानांनीं कडक बंदोबस्त केला होता, तरी त्यांच्याशीं वागण्यांत त्यांनीं सेवकपणाचें अतिक्रमण केलें नव्हतें. शिवाय नाना दयाळु व अधिकाराच्या जोरावर यत्किंचितहि अन्याय घडूं नये म्हणून काळजी वाहणारे असत. त्यांचा खासगी द्वेष, ते सरकारी कामांत केव्हांहि आणीत नसत. शत्रूवरील स्वाऱ्यांच्या पूर्वीं त्यांच्याकडील फौजेंतील व राज्यांतील लोक आणि फौजबंद सरदार भेद करून त्यांनां कमकुवत करण्यांत नेहमीं नानांच्या मसलती चालत; याबद्दलचीं त्यांचीं पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत.

नानांचा वचक सरदारांस फार असे. बदामीच्या लढाईंत बरेच दिवस वेढा पडून झाले तरी किल्ला पडेना, म्हणून एके रात्रीं लष्करांतील व्यवस्था पहाण्यास नाना वेष पालटून बाहेर पडले. पटवर्धनांच्या तंबूंत परशुरामभाऊ व इतर सरदार बुद्धिबळें खेळत होते, तें नानांनीं चोरून पाहिलें, इतक्यांत भाऊचें लक्ष्य त्यांच्याकडे गेलें. त्यावर लगेच सर्व सरदार एकत्र बसून दुसऱ्या दिवशीं हल्ला करण्याचें ठरून पुढें लवकरच किल्ला घेतला गेला. टिप्पूवरील या पहिल्या लढाईंत त्याचा पराभव होऊन मराठ्यांनां ३० लाख रुपये रोख व बदामी, कित्तूर, नरगुंद वगैरे प्रांत मिळाला ( १७८७ मार्च व एप्रिल ). नाना बदामीहूनच परत फिरले होते.

टिप्पूचा समूळ नाश करण्याच्या विरुद्ध नाना होते. टिप्पू ही एक इंग्रजांच्या उरावर सर्वकाळ लटकणारी तरवार आहे, ती नाहींशी झाल्यास ते प्रबळ होऊन पेशवाईस उपद्रव देतील; यासाठीं टिप्पू दीन होईपर्यंत मात्र त्याच्या विरुद्ध इंग्रजांस मदत द्यावयाची; त्याला जमीनदोस्त करावयाचें इंग्रजांनीं मनांत आणिल्यास त्यांस नाना तऱ्हांनीं अडवून तसें होऊं द्यावयाचें नाहीं, याप्रमाणें नानांचा निश्चय होता व या मोहिमेंत तसें वागण्याबद्दल त्यांनीं हरिपंत व परशुरामभाऊ यांस हुकूम दिला होता ( १७९१ ). त्यामुळेंच इंग्रजांनीं श्रीरंगपट्टणाच्या तहाच्या वेळीं टिप्पूनें सबंध राज्य घेण्याचा हट्ट धरला असतां हरिपंतानें सक्तीची रदबदल करून टिप्पूचें अर्धें राज्य घेऊन त्यास कायम राखलें.

नाना व महादजी शिंदे यांच्यांत चुरस होती, ती या सुमारास वाढत गेली. महादजी हा शूर, चतुर पण महत्त्वाकांक्षी होता; पेशवाईचा सारा कारभार आपण पहावा, एवढेंच नव्हे तर आपण पेशव्यांपासून स्वतंत्र व्हावें अशीहि त्याची इच्छा व प्रयत्न होता. प्रथम नानांप्रमाणेंच त्याचा इंग्रजांशीं द्वेष होता, पण पुढें त्यानें त्यांच्याशीं गुळवट बोलणीं सुरू केलीं. वडगांवच्या लढाईनंतर दादा व त्यांची मंडळी यांनां, प्रसंगीं नानांच्या विरुद्ध सोडण्यासाठीं त्यानें आपल्याजवळ ठेवून घेतली. सालबाईच्या तहांत महादजी हा स्वतंत्र संस्थानिक असून, त्यावर आपला विश्वास आहे आणि पेशव्यांनां कांहीं [illegible] आपल्याशीं करावयाचें झाल्यास तें

महादजीमार्फत करावें, असें इंग्रजांनीं जाहीर केलें. यामुळें नानांच्या मनांत महादजीबद्दल तेढ आली. त्यावेळीं प्रसंग पाहून ते गप्प बसले. पुढें पुढें स्वतःचा कारभार महादजी घेईल, यापेक्षां तो पेशव्यानां निर्माल्यवत करून स्वराज्यांत इंग्रजांचा शिरकाव करून देईल ही भीति नानांस जास्त वाटे. यासाठीं नानांनीं होळकर, भोंसले, पटवर्धन वगैरे जुने नवे मराठे व ब्राह्मण सरदार एकत्र करून प्रत्येक मसलत सर्वांच्या विचारें करण्याचा प्रघात पाडला, व शिंदे-इंग्रजांची जूट फोडण्याचा प्रयत्न चालविला, तो पुढें बव्हंशीं सिद्धीस गेला. याच सुमारास पाटीलबावानें दिल्ली व आग्रा ताब्यांत घेऊन,पातशहास दरमहा ६५ हजारांचा तनखेदार करून आणि वकील-ई-मुतलखीचें पद पेशव्यांसाठीं मिळवून दख्खनमध्यें प्रयाण केलें ( १७९२ ).

मध्यंतरीं दिल्लीच्या राज्यांतील कांहीं मुसुलमानी अमीर व रजपुतांनीं बंड केल्यानें व तें मोडण्यासाठीं महादजीनें मदतीची विनंति केल्यावरें, नानांनीं मनांत मत्सर वगैरे न ठेवतां तावडतोब होळकर व अलिबहादर यांस मोठ्या सैन्यासह महादजीच्या कुमकेस पाठविलें होतें. एकदां तर महादजीनें नानांच्या मत्सरानें आम्ही " आणखी छायेस पोट भरूं " असें त्यानां कळविलें असतां त्यांनीं त्यांचें समाधान करून लिहिलें कीं, " ज्यांच्या घराण्याचे एकनिष्ठेचे बाणे चालत आले त्यांच्या चित्तांत हीं अक्षरें येणारच नाहींत ... रती इतकी दरज ( फट ) असतां शत्रूस बळ येतें. "

पाटीलबाबा पुण्यास कां आला, याबद्दल त्यावेळीं अनेक तर्क प्रचलित झाले. त्यांपैकीं एक, नानांच्या जागीं आपण कारभारी व्हावें असा होता असें म्हणतात. यासाठीं दरबारांत त्यानें अति लीनतेची वागणूक ठेविली, परंतु त्याचा उपयोग होईना;शेवटीं खुद्द श्रीमंतांसच आपलेसें करण्याचा त्यानें प्रयत्न केला. वय लहान असल्यानें श्रीमंतांनीं त्याचें बोलणें ऐकून घ्यावें. या जोरावर एकदां महादजीनें भर दरबारांत नानांची निर्भत्सना केली. महादजी म्हणे, उत्तरेकडील मुलुख मीं मोठ्या कष्टानें मिळविला, त्याची वहिवाट मला सांगावी व त्याबद्दल झालेला खर्च मिळावा. नाना म्हणत आजपर्यंतचा जमाखर्च दाखवा मग जें काय देणें घेणें निघेल तें पाहूं. एके दिवशीं संधी साधून पर्वतीच्या तळ्यांत ( लोहगांवच्या नदींत असें एके ठिकाणीं लिहिलें आहे ) महादजीनें, नानांनां घरीं बसवून आपल्याला कारभारी करण्याबद्दल स्पष्टपणें श्रीमंतांस विनंति केली; तेव्हां, त्यांनीं नाना व तुम्ही माझे दोन हात आहांत असें सांगून त्यास गप्प बसविलें. ही बातमी नानांनां समजल्यावर त्यांनीं पेशव्यांची एकांतांत गांठ घेऊन, स्वराज्याची आपण कशी सेवा केली, पेशवे गर्भस्थ असल्यापासून आतांपर्यंत दौलतीचा कसा बचाव केला, तें सांगून आपला वीट आला असल्यास आपल्यास काशीस जाण्यास परवानगी द्यावी अशी त्यानां स्पष्ट विनंति केली. "तेव्हां श्रीमंतांस गहिंवर आला व ते नानांच्या गळां पडले. " त्यांनीं हा बेत खोडून काढला. पुढें आपला बेत सिद्धीस जात नाहीं असें पाहून दूरदर्शी महादजीनें हरिपंत फडक्याच्या विद्यमानें नानांशीं समेट केला. परस्परांनीं आणभाक घेऊन मराठी राज्याकरितां एकत्र खटपट करण्याचें ठरविलें. नानांनीं पाटीलबावास सांगितलें कीं, " सरदारी माझी व फडणविशी तुमची " असें म्हटलें व पाटिलबावानें " जेथें आपण आहां तेथें मी आहें. ...आपण भाऊ भाऊ खावंद एक " असें म्हटलें. परंतु दुर्दैवानें यानंतर थोड्याच दिवसांत पाटीलबावा वारला ( मार्च १७९४ ). त्यामुळें नानांचा एक हात तुटला; इंग्रजांची जरब नाहींशी झाली. हरिपंत फडकेहि याच वेळीं मरण पावून मराठी राज्याची व नानांची मोठी हानी झाली.

यानंतर खर्ड्याची लढाई झाली. तिच्या पूर्वीं इंग्रजांनीं एक डाव टाकला होता; पण तो नानांनीं व शिंद्यांनीं मोडून काढला. निजामाकडे दोन कोटींची मराठ्यांची बाकी होती; तो ती देईना तेव्हां इंग्रज म्हणू लागले कीं, आपण दोघांत सख्य करून देतों; आणि जो कोणी ऐकणार नाहीं, त्यावर दुसऱ्याची मदत घेऊन चढून जातों. यावर नाना म्हणाले कीं, आमचें वाजवी येणें वसूल करण्यास आम्हांस कोणाचें भय आहे ? व ही मध्यस्थी कशास पाहिजे ? मध्यस्थाच्या ढोंगानें इंग्रज आमचे हातपाय बांधून टाकणारा कोण ? टिप्पूस समूळ बुडविल्यानें इंग्रज प्रबळ होणार होता तसा निजाम समूळ बुडविल्यास आम्ही प्रबळ होऊं अशी इंग्रजांस भीति वाटल्यानें ते ही ढवळाढवळ करीत आहेत. शेवटीं नानांनीं इंग्रजांस धुडकावून लावलें व हा इंग्रजांचा डाव हुकला.

नानांच्या इच्छेप्रमाणें सर्व मराठे व महाराष्ट्र पेशव्यांच्या अंमलाखालीं एक होऊन या खर्ड्याच्या लढाईत उभा राहिला.मराठ्यांचें सर्व वैभव जें यावेळीं दिसलें तें अखेरचेंच. या मोहिमेंत अथपासून इतिपर्यंत सर्व कारभार नानांनींच केला. त्यावेळचा त्यांच्या हातचा पत्रव्यवहार ग्रँटडफनें पाहिल्याचें त्यानें लिहून ठेविलें आहे. खुद्द पेशवे व नाना या लढाईत हजर होते ( १७९५ मार्च ). या लढाईनें भर दरबारांत स्वतःचें व पेशव्यांचें सोंग आणविणाऱ्या निजामास नानांनीं दांतीं तृण धरण्यास लाविलें व त्याला जाणविलें कीं, " ब्राह्मणी राज्य कैदवार, एकापेक्षां एक मसलती."

यापुढें नानांस वाईट दिवस येत चालले.नाना अचाट कल्पक होते परंतु त्या कल्पना कृतींत उतरण्यास त्यास पूर्वीं महादजी व हरिपंत यांच्यासारखे स्नेही होते. यानंतर मात्र ते नसल्यानें नानांनीं जरी मोठमोठीं कारस्थानें लढविलीं तरी मराठी साम्राज्य तगलें नाहीं व स्वतः त्यांसहि अनेक संकटें भोगावीं लागलीं.

नानांनीं हैदर, निजाम, इंग्रज वगैरे परकीय दरबारीं आपले विश्वासू वकील ठेविले होते. त्यांच्या कचेरीस फड

म्हणत व तींत ३००-४०० कारकून असत. या कचेरींत सर्व राज्याच्या जमाबंदीचे, लष्करचे व जहागिरीचे हिशेब तपासले जात. नानांच्या वेळीं रामशास्त्री प्रभुणे व अय्याशास्त्री हे मुख्य न्यायाधीश असल्यानें न्याय चोख मिळत असे. परराज्यांशीं लढाया व कारस्थानें करण्याकडे नानांचा काळ फार गेला. त्यामुळें राज्यांत अंतर्गत व्यवस्था करण्यास त्यास फारसें फावलें नाहीं. तरी पण त्यांनीं प्रजेच्या सुखासाठीं कांहीं गोष्टी नवीन केल्या व कांहीं जुन्यांत फेरफार केला; न्यायाच्या कामीं शेवटचें अपील नानांकडे ( व पेशव्यांकडे ) येई. देहांत शिक्षेस पेशव्यांची मंजुरी लागे. नानांच्या कारकीर्दींत ( सवाईरावसाहेबांच्या वेळीं ) पेशवाईचें उत्पन्न दहा कोटींचें होतें. त्यांत खुद्द पेशव्यांच्या हाताखालीं अडीच कोटींचा प्रांत होता सदाशिवरावभाऊनें स्वराज्याची मोजणी करून जमिनीची प्रतबंदी सुरू केली होती; तीच पुढें नानांनीं पूर्ण केली ( १७८० ); हिला 'कमाल' असें म्हणत. बागाईत जमिनीस दर बिघ्यास सहा रुपये, व तीन रुपये; आणि जिराईत जमिनीस दर बिघ्यास दोन रुपये; सव्वा रुपया; एक रुपया; बारा आणे अशी वर्गवारी लाविली होती; महालावरील मामलेदार दर वर्षीं बदलले जात; त्यांना नेमतांना त्यांच्याजवळ मागच्या वर्षांच्या पक्क्या जमाखर्चाचें पत्रक देत व त्या धोरणानें अंदाजपत्रक आंखून खर्च करण्यास सांगण्यांत येई. साल अखेरीं सरसालचा जमाखर्च गतसालच्या जमाखर्चापेक्षां जास्तकमी झाल्यास मामलेदारास त्याचीं कारणें दाखवावीं लागत असत. यावरून प्रजेचीहि स्थिति कळून येत असे. जमिनीवर सारा अमुक मर्यादेपर्यंत बसवावयाचा असा कायमचा नवीन नियम नानांनीं केला; गांवच्या हिशेबांतून विनपिकाऊ जमीन गाळून टाकली; पूर्वी तिच्यावरहि सारा आकारीत. यामुळें, अखेरीस तोटा न होतां सरकारचा व प्रजेचा फायदाच झाला. तगाई, सारामाफी, तहकुबी वगैरे प्रकार सुरू होते. सारावसुलीसाठीं सरकारनें कुळाचें घरदार कधींहि विकलें नाहीं. सरकारी अधिकाऱ्यानें जुलूम केल्यास प्रजेच्या फिर्यादीकडे नाना तावडतोब लक्ष्य देऊन, योग्य तो निकाल देत. शेतकरी व गरीबगुरीब यांचे नाना हे मित्र होते. त्यांची जमाबंदींतील वाकबगारी, न्यायनिष्ठुरता व दयाळु अंतःकरण त्याकाळीं प्रसिद्ध होतें. त्यांच्या कारकीर्दीत प्रजा सुखी असल्याचें प्रमाण असें कीं, इ. स. १७९२ मध्यें महाराष्ट्रांत भयंकर दुष्काळ पडला, तरी पण रयत परागंदा न होतां जागींच राहून तिनें तें वर्ष काढलें.

नाना हे उंच, सडपातळ, किंचित काळसर, गंभीर मुद्रेचे असून त्यांचे डोळे अतिशय पाणीदार, तीक्ष्ण व चंचल होते असें ग्रँटडफ लिहितो आहारविहार अत्यंत नियमित असल्यानें त्यांची प्रकृति निरोगी होती; मात्र उत्तारवयांत वर्जिलाजित पोटशुळाची व्यथा त्यांना जडली होती. अतिरिक्त विषयवासनेशिवाय त्यांना कोणताहि दुर्गुण नव्हता. ते अत्यंत भक्तिमान होते. या परस्परविरुद्ध गोष्टींविषयीं पहातां असें दिसतें कीं, नानासाहेब पेशव्यांच्या वेळेपासून पेशवाईत वाढलेल्या मिजासीचा त्यांनां संपर्क झाला असावा, मात्र त्यांचा मूळचा अंकुर वैराग्याकडे वळलेला असावा. ते स्वतः म्हणत कीं 'ही पापवासना माझ्या मामाच्या वंशाकडून (मेहेंदळे घराणें) माझ्या अंगीं खिळली.' ते अत्यंत उद्योगी, चतुर, अतिशय नियमित, सचोटीचे, वचनाचे धड, धर्मनिष्ठ, खरें बोलणारे, दयाळु, परोपकारी ( परोपकाराच्या गोष्टी त्यांच्या हातून फार घडल्या) होते. त्यांच्या उघड स्वामिभक्तीबद्दल व स्वदेशाभिमानाबद्दल सांगण्याची जरूरीच नाहीं. त्यांचा वतनी गांव वेळास हा इंग्रजांच्या ताब्यांत होता; तो त्यांनीं सहज सोडवून घेतला असता, पण ते म्हणत कीं, "सरकारची साष्टी सुटली नसतां आपला गांव सोडवून घ्यावा हें ठीक नाहीं." त्यांनीं सातारकर महाराजांस प्रतिबंधांत ठेविलें याचें कारण, महाराज ठरलेल्या राज्यव्यवस्थेंत ढवळाढवळ करूं लागले त्यामुळें स्वराज्यास उपसर्ग होऊं लागला हें होय. गंभीर वृत्ति, मोजकें भाषण व बहुश्रुतपणा त्यांच्या अंगीं होता. मोरोपंतानें नानांची वकिली आपल्या 'गंगावकिलीं'त केली आहे. नानानां थट्टामस्करी आवडत नसे व ते फारसे कधीं हंसत नसत. त्यांस हंसविण्यास लावल्याच्या व त्यांच्या चातुर्याच्या अनेक गोष्टी प्रसिद्ध आहेत.

त्यांची दिनचर्या अशी असे-अरुणोदयीं मुखमार्जनाच्या नंतर अगदीं जरूरीचीं कामें पाहून मग स्नानसंध्येंत दोन तास जात. पुढें प्रहर दिवस बेलबागेंत पूजा करतांना शहरांतील बातम्या व बाजारनिरख ऐकणें; मग भोजन; त्यावर विश्रांति; त्यानंतर राज्यकारभार, तो सायंकाळपर्यंत चाले; नंतर सरकारवाड्यांत अगर देवदर्शनास जाणें; यापुढें निरनिराळ्या कामगारांच्या वर्धा घेणें व नवीन कामें नेमून देणें; रात्रीं संध्या व जेवण झाल्यापासून मध्यरात्रीपर्यंत गुप्त हेरांच्या बातम्या ऐकणें, राजकारणीं पत्रव्यवहार करणें, व मसलती रचणें. नाना झोंप कायती दीड प्रहरच घेत असत.

नानांचें कुलदैवत गणपति व जोगेश्वरी; परंतु हरिहरांवर त्यांची फार भक्ति असल्यानें त्यांनीं त्यांचींच देवळें बांधलीं. ज्योतिषावर त्यांचा फार विश्वास होता. आपल्या आप्तमंडळीस त्यांनीं योग्यतेवांचून सरकारी नौकऱ्या दिल्या नाहींत, त्यांनां आपल्या खाजगींतून नेमणुका मात्र करून देत. त्यांस अनेक राजकारणें खेळावीं लागलीं, अनेकदां संकटांस तोंड द्यावें लागलें, अशा वेळीं पैसा उपयोगी पडतो हें त्यांस माहीत असल्यानें त्यांनीं पैशाचा संचय आस्थेनें केला. त्यांनीं आपल्या ठेवी हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं नामांकित पेढ्यांवर ठेविल्या होत्या; तीं ठिकाणें त्यांचीं त्यांसच माहीत होतीं. आयुष्याच्या शेवटच्या प्रसंगीं स्वराज्याकरितां व स्वतःच्या अब्रूसाठीं त्यांनीं दीड कोटींचा खर्च केला; ते कंजूष नव्हते.

नानांजवळ इतकी संपत्ति कशी आली ? त्यांनीं लांचलुचपतीनें ती मिळविली, असें अज्ञानामुळें कांहींजण म्हणतात;

तें मिथ्या आहे. याबद्दल खरी हकीकत अशी आहे–त्यानीं थोरल्या माधवरावांच्या कारकीर्दीच्या प्रारंभीं (नाना कारभारी होण्याच्या आधींच) त्यांच्याजवळ पुष्कळ पैसा होता ( सिले. स्टेट पेपर्स बाँबे, २५० ), म्हणजे तो वडिलोपार्जित होता. त्या काळीं सर्व हिंदुस्थानांत अशी पद्धत होती कीं, जहागिरदार किंवा संस्थानिक मेल्यास त्याचा वारसा द्यावयाचा असेल, सरदारा ! गुन्हा माफ करावयाचा असेल, परकीय दरबारास मदत मागावयाची असेल, किंवा तह करावयाचा असेल, तर अशा वेळीं सम्राट दरबारास व त्यांतील मुख्य मुख्य कारभाऱ्यांस नजराणा, दरबारखर्च, गुन्हेगारी अशा कांहीं तरी रूपानें लाखों रुपये मिळत; त्या रीतिप्रमाणें खुद्द पेशवे व त्यांचे कारभारी ( यांत नानाहि असत ) यांनां या रकमा मिळत. हैदरानें एका तहाच्या वेळीं शिंदे, फडके व नाना आणि इतर दोन मुत्सद्दी या सर्वांनां ३॥ लक्ष होन दिले; त्यांत नानांच्या वाटणीस १ लाख होन आले ( पत्रें, यादी २२९ ). याप्रमाणें नानांच्या ४० वर्षांच्या कारकीर्दींत सर्व हिंदुस्थानांत झालेल्या उलाढालींत त्यानां कोट्यावधि रुपये मिळण्याचा संभव आहे. या रिवाजास त्याकाळीं लांच घेणें असें मुळींच मानीत नसत. त्यावेळचे खुद्द इंग्रजहि असा लांच खात. इंग्रज वकील डेव्हिड अंडरसन यानें एकदां पाटीलबावांस सांगितलें कीं सालबाईचा तह नानांच्या मर्जीप्रमाणें मी करून देतों. मला पेशवेसरकारानीं १॥ लाखाची जहागीर द्यावी. नानांस सरकारांतून त्यांच्या इतमामाप्रीत्यर्थ ३ लाखांचें सालीना उत्पन्न होतें; तसेंच साऱ्या मराठी साम्राज्यांतील फडणवीस नेमण्याचा त्यांचा हक्क होता, त्याबद्दल त्या त्या लोकांकडून त्यांस १॥ लाख मिळत;शिवाय छत्रपति, त्यांचे अष्टप्रधान आणि परराज्यें यांच्याकडून त्यानां मिळालेल्या जहागिरींचें उत्पन्न ५५ हजार येई; सारांश, सालीना एकंदर त्यांचें उत्पन्न पांच लाखांचें होतें, आणि एकंदर खर्च ३–३॥ लाखांचा होता.

गारदी हे गोऱ्या लोकांनीं शिकविलेले व मुख्यतः ( मराठ्यांशिवाय ) परकीयांचा भरणा असलेले लोक, त्यांच्यावर नानांचा मुळींच विश्वास नसल्यानें त्यानीं ५ हजार अरब चाकरीस ठेविले होते. गारद्यांच्या विश्वासघाताचीं उदाहरणें त्यांच्या देखत घडलेलीं होतीं.

त्यांचें गुप्तहेरखातें उत्तम होतें; वाटेल तेथील गुप्त बातमी मिळविण्याबद्दल त्यांची ख्याति आहे व त्याबद्दलच्या अनेक गोष्टी प्रसिद्ध आहेत इंग्रज आणि फ्रेंच यांचा संबंध आल्यापासून कलकत्ता, मद्रास, मुंबई, पांदेचरी, माही येथील बारीक सारीक बातम्याहि त्यानीं मिळविल्या. हिंदुस्थानाबाहेरील या लोकांच्या चळवळीकडे त्यांचें लक्ष असे. इंग्रज व अमेरिकेचें युद्ध, इंग्रज व फ्रेंच यांचीं भांडणें हीं त्यानां अवगत होतीं. मात्र मराठी राज्यांत दुही पसरल्यानें या परदेशीय राजकारणाचा जितका फायदा करून घेतां आला असता तितका त्यांस घेतां आला नाहीं.

नानानीं नळ बांधून पुण्यास ( सदाशिव पेठेच्या मोठ्या व पुष्करणीच्या लहान हौदांत ) पाणी आणलें;बेलबाग संस्थान तयार केलें ( त्याचे नियम त्यानींच करून ठेविले आहेत ). स्वतःचा वाडा बांधला, काळ्यावावरांत मोठा बाग केला, गणेश पेठ व स्वतःची ( नानाची ) पेठ वसविली.

नानांचीपेठ.––श्रीमंत सवाईमाधवराव पेशवे यानीं कसबे पुणें येथें मुजुमदार यांची २५ बिघे जमीन होती तींतील ७ बिघे जमीन नानांची पेठ वसविण्याकरितां घेतली. तिच्या मोबदला हवेली तालुक्यांतील धानोरी येथील तितकीच जमीन मुजुमदार यानां देण्यांत आली. ता. २० एप्रिल १७९० रोजीं जमीन पेठेकरितां देण्यांत आली. गणेशपेठेच्या पूर्वेस, भवानीपेठेच्या उत्तरेस व रास्ते यांच्या पेठेच्या दक्षिणेस ओढा आहे तेथपर्यंत.दक्षिणोत्तर रुंदी गज ४५० व पूर्वपश्चिम लांबी नागझरीपासून गज ६०० याप्रमाणें जागा पेठेच्या वसाहतीस दिली. या पेठेंत वसाहत करणाऱ्या व्यापाऱ्यांनां सात सालांची जकातीची माफी देण्यांत आली.या पेठेचें शेटेपण नानांचा नौकर फिरंगोजी खाडे यास देण्यांत आलें होतें. [ सवाईमाधवराव यांची रोजनिशी. भाग ३, पृष्ठ ३५७. ]

शिवाय नानानीं १०–१२ वाडे बांधले. आवळस व खोपवलीस मोठा तलाव व धर्मशाळा बांधली, कोंकणांतून पुण्यास येण्याच्या वाटेवर हें गांव असल्यानें तेथें एक अन्नसत्र ठेविलें. भीमाशंकराचें देऊळ बांधण्यास प्रारंभ केला (त्यांच्या पत्नीनें तें पुढें पुरें केलें ), कायगांवटोकें, वेरूळ, काशी, मेणवली येथें घाट बांधले. यांशिवाय त्यानीं देवळें, मोठमोठ्या रस्त्यांवर पूल, धर्मशाळा, विहिरी, अन्नसत्रें, सडकेच्या बाजूनें झाडें लावणें वगैरे अनेक परोपकाराचीं कृत्यें केलीं. त्यांस कलाकौशल्याचा, चित्रांचा वगैरे नाद होता.

नानांस एकूण नऊ बायका होत्या; पैकीं सात त्यांच्या हयातींत वारल्या; आठवी त्यांच्या मृत्यूनंतर चवदाव्या दिवशीं वारली; फक्त नववी जिऊबाई ही एकटीच मागें राहिली. नानांस एकंदर तीन अपत्यें ( दोन मुली व एक मुलगा ) झालीं, पण तीं अल्पवयांतच मेलीं.

नानानीं सवाईरावसाहेबांस निर्माल्यवत केलें हा समज चुकीचा आहे. घाशीराम कोतवाल, तळेगांवदाभाड्याची मुसुलमान शिकलकराची पंचायत वगैरे प्रकरणांत नानांस न जुमानतां श्रीमंतानीं आपले अधिकार गाजविले होते. खर्ड्याहून परत आल्यावर ते अविचारी लोकांच्या नादीं लागल्यानें त्याचा परिणाम राज्यास अपायकारक होईल म्हणून मात्र नानानीं त्यांस प्रतिबंध केला होता. दादांच्या पक्षाच्या लोकांनीं सवाईरावसाहेबांस रावबाजीबद्दल अनेक बनावट व करुणपर गोष्टी सांगितल्या; श्रीमंत वयानें लहान व दूरदर्शी नसल्यानें त्यांच्या मनावर त्याचा परिणाम होऊन त्यांचा व रावबाजीचा पत्रव्यवहार सुरू झाला. नानानीं याबद्दल प्रथम सामोपचारानें श्रीमंतास अनेक प्रकारें सांगितलें

परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं; तेव्हां वरील पत्रव्यवहार पकडून त्यांचा बहुत निषेध केला. त्याचा परिणाम उलटा झाला. पेशवे उदास झाले व पुढें त्यांच्या बुद्धीस दिवसेंदिवस भ्रंश पडत चालला. त्यांत रावबाजीच्या मंडळीनें जास्तच भर घालावी. शेवटीं या भ्रमांतच वाताचा झटका येऊन सवाईरावसाहेबांनीं कारंज्यावर उडी टाकली व त्यानंतर तीन दिवसांनीं ते वारले ( १७९५ ) आणि येथूनच नानासहि उतरती कळा लागली.

यानंतर गादीवर रावबाजीचा हक्क सहजच आला. परंतु नाना त्यास खालील कारणानें विरुद्ध होते. रावबाजी अदूरदर्शी, हलक्या कानाचा, कच्च्या दिलाचा, अविश्वासी, नाकर्ता होता. राज्यांत शांतता राखण्याचें, सरदार व फौज खूष ठेऊन त्यांच्याकडून राष्ट्रोपयोगी मोठमोठीं कामें घडवून आणणें, परराज्यांत मसलती उभारून सर्व हिंदुस्थानांत मराठी साम्राज्याचा दरारा बसविण्याचें हीं कामें घडवून आणण्याची कुवत त्याच्यांत नव्हती. त्यामुळें प्रजेची पायमल्ली होईल, सरदार बिथरून दंगे करतील, ते मोडण्यासाठीं रावबाजी हा इंग्रजांस घरांत घेईल आणि शेवटीं इंग्रजी बावटा शनवारवाड्यावर लागेल अशी नानांची विचारसरणी असल्यानें ( व आपण दादांस व रावबाजीस नेहमीं विरोध केल्यानें तो आपल्या प्राणावरहि उठेल या कारणानेंहि ) नानांनीं प्रथम रावबाजीस गादीवर बसविण्याचें टाळलें व सरदारमंडळाच्या मदतीनें दत्तक घेऊन राज्य चालविण्याचें ठरविलें; आणि त्याप्रमाणें शिंदे, होळकर, भोंसले, पटवर्धन व रास्ते यांच्यापासून " कायावाचामनःपूर्वक " शपथपत्रें घेतलीं. पण पुढें सर्वच उलट झालें; आणि रावबाजीबद्दलचें नानांचें भविष्य खरें ठरलें.

यापुढें सर्व घोंटाळा माजला. रावबाजीनें शिंद्याचा कारभारी बाळोबा पागनीस या शेणवी कारगान्यास व त्याच्यामार्फत दौलतरावास फोडलें व त्यांच्याकडून आपल्यास गादीवर बसविण्याचें वचन घेतलें. हें नानांस कळतांच त्यांनीं परभारें परशुरामभाऊस पाठवून रावबाजीस शिवनेरीहून आणून गादीवर बसविण्याचें ठरविलें. हें ऐकतांच शिंदा मोठ्या फौजेसह एकदम रावबाजीस येऊन वाटेंतच मिळाला; त्यामुळें नाना घाबरले; बाळोबाचा नानांवर फार राग होता; त्याची महत्त्वाकांक्षा आपण नानाप्रमाणें कारभारी व्हावें. या बाळोबानेंच यापुढील बहुतेक सर्व इतिहास घडवून आणून मराठी राज्याचें नुकसान केलें. इंग्रजांस घरांत घेण्याच्या कामीं अनर्दी मूळ कारण हाच होय. यानें कारस्थान करून परशुरामभाऊस नानाविरुद्ध फितूर केलें. जो भाऊ आतांपर्यंत नानांचा विश्वासु मित्र होता तोहि कारभारीपदाच्या आमिषानें फितूर होऊन राष्ट्राचें नुकसान करणारा बनला. हा एक मोठा कलंक भाऊच्या चरित्रावर आहे. नानांनीं रावबाजीचा निरोप घेऊन साताऱ्यास प्रयाण केलें. इकडे बाळोबानें रावबाजीस नजरकैद करून ( कारण तो आपल्या कह्यांत राहणार नाहीं म्हणून ) परशुरामभाऊच्या मदतीनें रावबाजीचा धाकटा भाऊ चिमाजीआप्पा यास यशोदाबाईच्या मांडीवर दत्तक देऊन कारभार चालविला व भाऊकडे नानांस धरून आणण्याचें काम सोंपविलें. नानांच्या मित्रानें ( भाऊनें ) तें काम पत्करिलें आणि नानांवर फौज पाठविली. तेव्हां नाना साताऱ्याहून वांईस गेले, तेथेंहि पटवर्धनांची फौज आल्यावर नाना महाडास गेले.

महाडास असतांना नानांनीं जें राजकारण उभारलें, तें अत्यंत महत्त्वाचें व त्यांच्या आयुष्यांतील शेवटचें होतें त्यांत त्यांची परिपक्व तारतम्यबुद्धि, मनुष्यस्वभावाची पारख, साधनऔचित्य, व महाराष्ट्रांतील त्यांच्या नांवाचा दरारा हीं दिसून येतात. या कारस्थानाचा थोडक्यांत सारांश असाः—स. १७९६ चा पावसाळा जवळ आल्यानें चार महिन्यांत नानांनीं आपली सर्व तयारी केली. कोंकणांतील सर्व घाट व प्रतापगड, रायगडादि किल्ले यांचा बंदोबस्त केला व दहा हजार फौज जमविली. तेव्हां भाऊनें पावसाळ्यांतहि नानांवर चालून जाण्याचा मनसुबा केला, परंतु नानांचे मित्र फडके, चक्रदेव यांनीं ( हे पुण्यासच होते ) त्यास मोडता घातला. तेव्हां भाऊनें नानांची जहागीर व त्यांचे पुण्यांतील वाडे जप्त केले. नानांनीं प्रथम दौलतराव शिंद्यास दहा लक्षांची जहागीर वगैरे देण्याचें कबूल करून बाळोबाच्या विरुद्ध फोडलें; बाळोबाच्या साऱ्या उड्या शिंद्याच्या फौजेवर होत्या. तुकोजी होळकर पूर्वींपासून नानांच्याच बाजूचा होता, त्यानें आपली सर्व फौज त्यांच्या हवाली केली. बाबा फडक्यानें गुजरात फितवून ठेवली. खुद्द रावबाजी व मानाजी फांकडे नानांस मिळून त्यांनीं नानांनीं पाठविलेल्या पैक्यानें फौजभरती चालविली, त्यामुळें भाऊ आणि बाळोबास संशय येऊन त्यांनीं रावबाजीस सर्जेराव घाटग्याबरोबर बऱ्हाणपुराकडे जबरीनें रवाना केलें. वाटेंत रावबाजीनें दौलतरावास दोन कोटींची बक्षिसी व सर्जेरावास त्याची दिवाणगिरी कबूल करून मध्येंच मुक्काम केला. इकडे फांकड्यानें फौज घेऊन वांईस मुक्काम केला. मशीरउल्मुल्क पुण्यास कैदेंत होता, त्यास व त्याच्या तर्फें निजामअलीस नानांनीं वळवून घेतलें; रघुजी भोंसलाहि नानांस मिळाला. भाऊच्या विरुद्ध नानांनीं कोल्हापूरकरास उठविलें व पटवर्धन मंडळींत भाऊबंदकी माजविली. इतकें कारस्थान शिजल्यावर नानांचे जे मित्र बाह्यतः भाऊच्या हाताखालीं होते, त्यांनीं मशीर यास सोडून आपल्या( भाऊ )ला मदत करण्यास त्यास सांगावें असें भाऊस सांगितलें; त्याप्रमाणें भाऊनें व बाळोबानें केलें. मशीरनें वरून त्यांचें म्हणणें कबूल केलें, आंतून तर तो नानांस सामील होता. शेवटीं (२७ आक्टो.) नेमल्या दिवशीं दौलतरावानें बाळोबास कैद केलें, मशीरनें भाऊस धरण्यास फौज पाठविली, पण भाऊ चिमाजी आप्पास घेऊन जुन्नरास पळाला; तरी नारोपंत चक्रदेवानें त्या दोघांस

धरलेंच; नंतर भाऊस व बाळोबास व कैदेंत ठेविलें; मग नाना महाडाहून पुण्यास आले रावबाजीहि तेथें दाखल झाले. नानांच्या सांगण्यावरून शिंदे व निजाम यांनीं रावबाजी तुम्हांस दगा देणार नाहीं अशी हमी त्यांस लिहून दिली व खुद्द रावबाजीनेंहि असेंच स्वदस्तुरचें पत्र लिहिलें. अखेर रावबाजीस गादीवर बसवून नाना त्याचे कारभारी झाले (२५ नोव्हें.). चिमाजीआप्पाचें दत्तविधान अशास्त्र ठरून भाऊच्या व बाळोबाच्या पक्षाच्या लोकांनां शिक्षा झाल्या. यावेळीं नानांच्या बरोबरीचे कर्ते मुत्सद्दी व मित्र नाहींसे होऊन जी नवीन पिढी आली तींत बहुतेक नादान, अदूरदर्शी, हलक्या कानाचे व कुचकामाचे लोक होते. दौलतराव शिंदा, रघूजी भोंसला, काशीराव होळकर, गोविंदराव काळे व खासा रावबाजी हे लोक असे होते. या लोकांनां नानानें स्वराज्यासाठीं केलेल्या श्रमांची व खाल्लेल्या खस्तांची कल्पना नव्हती, एवढेंच नव्हे तर स्वराज्याचीहि फारशी किंमत नव्हती; फक्त आपपला स्वार्थ माहीत होता. दौलतराव पैशाचा लोभी व निर्बुद्ध होता, त्याचा कारभारी जिकडे वळवील तिकडे तो जाई. त्यानें रावबाजी गादीवर बसण्याच्या आदल्या दिवशीं नानांस 'अकृत्रिमपणें' चालण्याबद्दल 'उदी, बेलभंडार व पाटीलबावाचे पायाची शपथ' दिली, पण पुढें थोड्याच दिवसांत विश्वासघातानें नानानां कैद केलें.

भोंवतीं हलकट लोकांचा बुजबुजाट व खुद्द धनी दुर्बल आणि आपला द्वेष्टा असें पाहून राज्यकारभार सोडून स्वतः काशीस जाण्याबद्दल नानानीं रावबाजीस विनंति केली परंतु त्यानें ती नाकारली. कारण त्याला शिंद्याविरुद्ध कांहीं दिवस नाना पाहिजे होते. इतक्यांत तुकोजी होळकर वारल्यानें नानांचा शेवटचाहि आधार तुटला. यावेळीं शिंद्यानें रावबाजीस दोन कोटींच्या रकमेचा तगादा लाविला. तेव्हां त्यानें नानांस कैद केल्याशिवाय इतकी रक्कम शहरांतून उभी रहाणार नाहीं (कारण आपल्या स्वतःजवळ इतका पैका नाहीं) असें सांगितलें. शिंद्यानें तें कबूल केलें व या कामीं भोंसल्यास आपल्याकडे वळविलें; परंतु नानांस हें समजतांच त्यानीं भोंसल्याची समजूत १० लाख रुपये रोख (आपल्या खाजगींतून) देऊन केली व त्यास वऱ्हाडांत पाठविलें. नानांस धरण्याच्या मसलतींत इतरहि पुष्कळ मंडळी होती. मध्यंतरीं दौलतरावानें नानांच्या घरीं जाऊन गोड बोलून आपल्याबद्दलचा त्यांच्या मनांतील संशय काढून टाकला व पुढें एकदोन महिने त्यानें नानांच्या मर्जीप्रमाणें वागणूकहि केली. यामुळें मात्र नाना फसले. त्यानीं हें सर्व खरेंच मानलें आणि थोड्याच दिवसांनीं दौलतरावानें आपल्या छावणींत दिलेलें जेवण्याचें आमंत्रण स्वीकारलें.

मेजवानीच्या पूर्वी एक दोन दिवस पदरच्या विश्वासू मंडळीनीं, जेवणास जाऊं नये म्हणून नानांस पुष्कळदां सांगितलें, परंतु तें त्यानीं एकलें नाहीं. याच वेळीं शिंद्याचा एक यूरोपियन सेनापति मायकेल फेलोज यानें कपटनाटक करून नानांस फसविलें. "त्या दगलबाज टोपीवाल्यानें बायबलावर हात ठेवून (दौलतराव तुम्हांस कैद करणार नाहीं अशी) शपथ घेतली व नानांस खातरजमेचें पत्र लिहून दिलें" (खरे, पृ. २१२). शेवटीं ठरलेल्या दिवशीं सायंकाळीं ५ हजार अरब बरोबर घेऊन नाना वानवडीस निघाले. भवानीपेठेपर्यंत गेल्यावर फेलोजच्या खात्रीवरून त्या सर्वांनां नानानीं जबरीनें परत फिरविलें. नंतर छावणींत दाखल झाल्यावर दौलतराव हा भेटीसाठीं सामोरा आला. थोड्याच वेळांत खलबताच्या निमित्तानें शिंदा, त्याचा कारभारी व फेलोज आणि नाना असे चौघे एका तंबूत गेले आणि तेथेंच ठरल्याप्रमाणें फेलोजनें नानास कैद केलें. नानाबरोबर त्यांचे शेलूकर, शिरवळकर, वगैरे ५-६ विश्वासू लोकहि कैद केले (३१ डिसें. १७९७). पटवर्धनाचा वकील म्हणतो 'याउपरी श्रीमंतांच्या राज्याचा आळ गेला'. नानांस कैद केल्यावर त्यांच्या पक्षाच्या माणसांनां कैद करून त्यांचे वाडे लुटले; खुद्द नानांचाहि वाडा जप्त झाला आणि त्यांत सर्जेराव रहावयास लागून रोज 'अजापुत्रांचा' वध होऊं लागला. पुणें शहरांतील लोकांस नानाबद्दल फार प्रेम वाटत होतें, नाना गेल्यावर दोन कोटींची उभारणी करण्यासाठीं पेशव्यांच्या संमतानें सर्जेरावानें पुण्यावर हत्यार धरिलें. मोठमोठे सरदार, शेट, सावकार, यांनां पकडून त्यांच्यापासून द्रव्य उकळण्याचा त्यानें सपाटा चालविला व अतिशय अनन्वित कृत्यें केलीं.

दौलतराव व महादजीच्या बायका यांच्यामध्यें या सुमारास वेबनाव झाला. त्यांत सर्जेरावानें जास्त भर घातली. बायांस नानांचें पूर्वीपासूनच साहाय्य होतें त्यामुळें नानांस वानवडीस ठेवल्यास अधिक घोंटाळा होईल म्हणून तीन महिन्यांनंतर दौलतरावानें त्यांची नगरच्या किल्ल्यांत रवानगी केली (६ एप्रिल १७९८). भोंसल्यास व निजामास जें पाहिजे होतें तें मिळाल्यानें त्यांनीं यावेळीं आपली (रावबाजीकडून नानांच्या केंसास धक्का लावूं देणार नाहीं ही) हमी धाब्यावर बसविली.

नाना गेल्यावर थोड्या दिवसांनीं पेशवे व शिंदे यांत वितुष्ट येऊं लागलें. शिंद्यास त्याच्या सावत्र आयांनीं फार त्रास दिला. यावेळीं सातारकर महाराज हे स्वतंत्र होऊन त्यानीं कोल्हापुरकरांस मिळून स्वराज्यांत दंगा माजविला. तेव्हां पेशव्यांनीं परशुरामभाऊ, चक्रदेव आणि पिंगळे यांची सुटका करून तो थांबविला. यापुढें चक्रदेव व पिंगळे हे नानांचे विश्वासू असल्यानें त्यांनीं पेशवे व शिंदे यांत मुद्दाम (नानांची सुटका होण्यासाठीं) तेढ उत्पन्न केली. त्यानीं शिंद्यांच्या बायांस चिथविलें; त्या बायांनीं—शिंद्यानें त्यांनां कैद करण्याचा प्रयत्न केल्यानें—अमृतराव पेशव्यांचा आसरा घेतला; तेव्हां सर्जेराव घाटग्यानें अमृतरावावरच हल्ला केला. यामुळें रावबाजीनें चिडून दौलतरावाचें

पारिपत्य करण्यासाठीं निजामाची मदत मागितली व होळकर वगैरे सरदारांहि बोलाविलें. इकडे बायां कोल्हापुरकरांस मिळून त्यांनीं थेट गोदावरीपर्यंत जाळपोळ व लुटालूट केली. त्यांना शिंद्यांच्या पदरचें सारें शेणवीमंडळ मिळालें; फौजेंतहि बरीच फितुरी झाली; उत्तरेस बंडाळी माजली; खर्चाची ओढ होऊन सावकारांचीं धरणीं बसलीं. याप्रमाणें सर्व बाजूंनीं अडचणींत आल्यावर दौलतरावानें नानांस सोडण्याचें ठरविलें. सुटकेबद्दल दहा लाख व पुन्हां कारभारीपदावर नेमल्यानंतर पंधरा लाख रुपये देण्याचें ठरवून नानास पुण्यास आणलें( २१ जुलै १७९८ ). याप्रमाणें नाना पावणेसात महिन्यांनीं बंदींतून सुटले.

नाना सुटल्यावर त्यांनीं निजामास गप्प बसाविलें, पेशव्यांस स्वस्थ केलें, सर्जेरावास कैद केलें आणि बायांचीहि समजूत करून दौलतरावास दहा लाख रुपये रोख देऊन पैशाच्या अडचणींतून सोडविलें. यापुढें त्यांचें पेशव्याशीं साडेचार महिने समेटाचें बोलणें चाललें होतें. शेवटीं गारपिरावर दोघांच्या भेटी होऊन ( ८ सप्टेंबर ) नाना व शिंदे पेशव्यांकडे भोजनास गेले आणि मग नाना वानवडीहून पुण्यास प्रथम वानवळयाच्या वाड्यांत राहावयास गेले. नंतर स्वतःच्या वाड्याचें उद्घाटन करून मग ते त्यांत रहावयास आले ( २३ डिसेंबर ).

नाना सुटल्यानें रावबाजीस पुन्हां भीति वाटल्यानें शिंदे पुणें सोडून जात होते त्यास त्यानें गुप्तपणें सांगितलें कीं, तुम्ही जाऊं नये, नानांच्या विरुद्ध आमचें रक्षण करण्यास येथेंच रहावें. इकडे पेशवे नानांचींहि आर्जवें करीत कीं, तुम्ही हातांत कारभार घ्यावा. परंतु नानांनीं त्यास स्पष्ट सांगितलें कीं, तुमच्यावर माझा बिलकुल विश्वास नाहीं. शेवटीं दौलतराव रहात नाहीं असें पाहून, एके दिवशीं मध्यरात्रीं वेष पालटून, पेशवे नानांच्या वाड्यांत येऊन त्यानी त्यांच्या पायावर डोकें ठेवून व डोळ्यांत आसवें आणून नानांची प्रार्थना केली कीं, ही मराठापातशाही तुम्हींच सांभाळावी, तुम्हांस पकडण्यांत माझें अंग बिलकुल नव्हतें, तुम्ही मला वडिलासारखें आहां. याप्रमाणें दीनवाणें भाषण ऐकून नानांनीं पुन्हां कारभार करण्याचें कबूल केलें. परंतु वरीलप्रमाणें शपथ घेऊनहि पेशव्यांनीं पुन्हां एकदां नानांस पकडण्याची मसलत चालविली. ती नानांस समजल्यावर त्यांनीं पेशव्यांची कानउघाडणी करून कारभारांतील लक्ष्य कमी केलें व स्वतःचा वाडा सोडून सरकारवाड्यांत जाण्याचें टाळलें आणि चक्रदेव यांच्या हातीं बहुतेक कारभार सोंपविला.

या सुमारास हिंदुस्थानांत लॉर्ड वेलस्ली हा गव्हर्नर जनरल आला. इंग्रज राज्यसंस्थापक मुत्सद्दी गव्हर्नर जनरलमध्यें याचें स्थान पहिलें धरितात. एतद्देशीय राजांच्या वैभवास व स्वातंत्र्यास मुठींत आणण्याची त्यानें एक मुत्सद्देगिरीची युक्ति योजली; ती म्हणजे प्रसिद्ध तैनाती फौजेची मराठ्यांच्या चौथसरदेशमुखीसारखीच ही सर्वग्रासी युक्ति होती. या युक्तीस नामशेष करण्याचें सामर्थ्य त्यावेळीं सर्व हिंदुस्थानांत फक्त एकट्या नानांच्याच अंगीं होतें. एकजण मराठी साम्राज्य असू पहाणारा होता व दुसरा आपल्या सर्वस्वानें तें तारूं पहाणारा होता. प्रथम निजामानें तैनाती फौजेचा तह केल्यावर इंग्रजांनीं पेशव्यांस विनंति केली; परंतु नानांच्या सल्ल्यानें पेशव्यांनीं ती नाकारली. यावेळींच परशुरामभाऊ व नाना यांचा समेट झाला.

यापुढें इंग्रजांनीं टिप्पूवर शेवटची स्वारी केली, तींत ठरल्याप्रमाणें आपल्या सैन्याची मदत पाठवावी असें नानांनीं पेशव्यांस सांगितलें; पण शिंद्यामार्फत टिप्पूनें पेशव्यांस तेरा लक्ष रु. चारले होते, त्यामुळें पेशव्यांनीं फौजेची टाळाटाळ केली. पुढें इंग्रजांनीं टिप्पूचें राज्य घेतल्यावर पेशवे खजील होऊन मुलुखाची वांटणी मागण्यास तयार झाले. तेव्हां वेलस्लीनें एक पेंच टाकला. प्रथम तर वांटणीचें त्यानें नाकारलेंच, परंतु जर पेशवे तैनाती फौज ठेवतील, मराठे–निजामाचें भांडण तोडण्याचा मध्यस्थाचा अधिकार आपल्यास देतील, भोंसल्यास स्वतंत्र सत्ताधीश मानतील, पदरच्या फ्रेंचांस हांकलून देतील तर दहा लाखांचा प्रांत आपण देतों, असें तो म्हणूं लागला. साल्बाईच्या तहानें महादजीला पेशव्यांच्या ताटाखालून जसें काढलें तसेंच आतां भोंसल्यास काढून पेशवाई दुर्बळ करावयाची ही युक्ति होती. ही कबूल करणें म्हणजे इंग्रजांच्या हातीं जाणें असा उघड अर्थ होत होता म्हणून नानांनीं तें सर्वच फेंटाळून लाविलें. अर्थात टिप्पूच्या राज्याची वांटणी मराठ्यांस मिळाली नाहीं.

इकडे कोल्हापूरकरांनीं फार त्रास दिला, त्यास सातारकर चतुरसिंग यांचें साहाय्य होतें. या दोघांनीं इतर सरदारांचा पराभव केल्यानें, नानांनीं परशुरामभाऊस त्यांच्यावर पाठविलें. भाऊनें उतावळीनें पावसाळ्यांतच कोल्हापूरकरांवर स्वारी केली, तींत पट्टणकुडीच्या लढाईंत भाऊ ठार झाला. हें वर्तमान ऐकून नानांस फार दुःख झालें; मध्यंतरीं जरी दोघांत बिघाड आला होता, तरी नाना म्हणत कीं "भाऊ निदानीचे सोबती होते." नंतर नानांनीं रामचंद्र आप्पा ( भाऊचा पुत्र ) याच्या हाताखालीं सरकारी फौज कोल्हापुरावर पाठविली व तिनें कोल्हापूरकरांस पराभूत केलें. पण याच सुमारास नानांची प्रकृति फार बिघडली. नगरहून सुटल्यापासून त्यांची प्रकृति ढांसळलीच होती, बरोबरची मित्रमंडळी बहुतेक नाहींशी झाली होती, दरबारांत हलक्या लोकांचा भरणा होऊन, रावबाजीसारखा दुर्बळ धनी गादीवर आला होता, त्यामुळें नानांचें लक्ष्य कारभारांतून उडालें होतें. शके १७२१ च्या माघ वद्यांत त्यांस ज्वर येऊं लागला, तो दिवसेंदिवस वाढत चालला. फाल्गुन शुद्ध अष्टमीस पेशवे समाचारास आले. अखेर फाल्गुन वद्य तृतियेस गुरुवारीं मध्यरात्रीं नानांचें देहावसान झालें ( १३ मार्च १८०० ). प्राणोत्क्रमणसमयीं पेशवे आले होते. अरबांनीं आपल्या पगाराचा

फडशा करून घेतल्यावर मग नानांचें शव बाहेर काढूं दिलें. " नदीवर दहा सहस्र माणूस मिळालें होतें. नानांकरितां शहरांत ते दिवशीं हाहाकार झाला. " याप्रमाणें या थोर पुरुषाच्या आयुष्याचा शेवट झाला.

नानांच्या स्वभावाची व गुणावगुणांची माहिती मागें आली आहेच. नाना वारले व मराठी साम्राज्य नष्ट झालें एवढें सांगितलें म्हणजे पुरे. ज्या इंग्रजांशीं त्यानीं आमरण वैर चालविलें, त्यांपैकीं एक ( कर्नल पामर ) म्हणतो कीं, " नाना गेले व त्यांबरोबरच मराठी राज्यांतील शहाणपणा व नेमस्तपणा हीं लयास गेलीं. " लॉर्ड वेलस्लीनें पेशव्यांनां पाठविलेल्या दुखवट्याच्या पत्रांत लिहिलें कीं, " बाळाजी पंडित हे बुद्धिमत्तेनें, कर्तृत्वानें आणि थोर सद्गुणांनीं ख्याति पावले होते, अशांचें मरण सर्वदा दुःखास कारण होतें. त्यांच्या वागणुकीचे नियम सचोटीचे असून त्यांचे हेतु प्रशंसनीय होते; ते आपल्या धन्याच्या राज्याचें कल्याण व उत्कर्ष होण्यासाठीं सतत झटले. " शत्रूंनीं ज्याची अशी स्तुति गायिली, त्याला त्याच्या लोकांनीं " खूप शर्तीनें राज्य राखिलें यशवंत फडणिस नाना " असें म्हटल्यास कांहीं नवल नाहीं.

नाना वारले तेव्हां त्यांच्या दोघी स्त्रिया बगाबाई व जिऊबाई या देवसेवेसाठीं सिद्धटेकास होत्या; त्यांनां हें वर्तमान समजतांच त्या पुण्यास येण्यास निघाल्या. वाटेंत त्यांनां ताब्यांत घेण्यासाठीं पेशव्यांनीं फौज पाठविली परंतु तिला बायांच्या बरोबरच्या अरबांनीं हुसकावून दिलें असें म्याकडोनल्ड म्हणतो. बाया पुण्यास आल्यावर बगाबाई नानांच्या पश्चात चवदा दिवसांनीं वारली. जिऊबाईचें वय यावेळीं नऊ वर्षांचें होतें.

नानांच्या अरबांचा पगार चुकता करून पेशव्यांनीं त्यांचे वाडे, जहागीर व इनामी गांवें जप्त करून जिऊबाईस शनवारवाड्यांत आणून ठेविलें. नानांजवळील अफाट संपत्ति हातीं येण्यासाठीं पेशव्यांनीं बाईस वाड्यांत आणिलें. दौलतराव शिंद्याचीहि त्या संपत्तीवर दृष्टी असल्यानें, त्यानें बाईस दत्तक देऊन आपल्या ताब्यांत देण्याबद्दल पेशव्यांस विनंति केली,पण पेशव्यांनीं ती नाकारली. मागें नाना फाशीस जाण्यास निघाले असतां त्यांनीं रावबाजीकडून ज्या अटी कबूल करून आपला बेत रहित केला, त्यांत आपल्यास दत्तक घेण्याची अट होती व ती रावबाजीनें स्वहस्तानें ' येणेंप्रमाणें करार ' म्हणून कबूलहि केली होती. परंतु यावेळेस त्यानें तें सर्व नाकारलें आणि नानांचा पक्का सूड उगवला.

यानंतर नानांच्या पक्षाच्या सर्व मंडळीस पेशव्यानीं प्रतिबंधांत ठेविलें. यशवंतराव होळकरानें पुणें जाळलें, तेव्हां रावबाजी पळून गेले होते. जिऊबाई वाड्यांतच होती. नानांचा व आपल्या घराण्याचा पूर्वापार संबंध जाणून यशवंतरावानें बाईस लोहोगड ( हा किल्ला नानांस सरकारांतून बक्षीस मिळाला होता ) किल्ल्यावर नानांचा विश्वासु नौकर धोंडोपंत निस्पुरे याच्या स्वाधीन केलें. नानांचा मुख्य खजिना येथेंच असे. पुढें दोन वर्षांनीं जनरल वेल्स्लीनें मध्यस्थी करून बाईस दरसाल बारा हजारांची नेमणूक करून देऊन पेशव्यांच्या आग्रहावरून बाईस लोहोगड किल्ला सोडावयास लावला. नंतर बाई इंग्रजांच्या आसऱ्यानें पनवेलीस पेशवाई नष्ट होईपर्यंत राहिली. पेशव्यानीं तिला आपल्या ताब्यांत आणण्याची फार खटपट केली, पण ती त्यांच्याकडे आली नाहीं.

इंग्रजी झाल्यावर एलफिन्स्टननें बाईस पुण्यास आणून बारा हजारांची नेमणूक कायम करून, बेलबाग संस्थान व मेणवली गांव जप्तींतून मोकळें केलें. नंतर बाई मेणवलीस जाऊन राहिली. तिनें इ. स. १८२७ मध्यें मिरजेच्या गंगाधरराव भानू नांवाच्या मुलास इंग्रजांच्या संमतीनें दत्तक घेऊन त्याचें नांव माधवराव ठेविलें व त्यास आपली बारा हजारांची नेमणूक, बेलबाग संस्थान व मेणवलीची वहिवाट मिळावी म्हणून फार खटपट केली; परंतु इंग्रजांनीं तिचें कांहीं एक ऐकलें नाहीं. अखेर स. १८५४ च्या मार्चमध्यें जिऊबाई वारली. ती शहाणी व सदाचरणी असून तिनें अखेरपर्यंत नानांचें नांव निष्कलंक राखिलें. बाई वारल्यावर तिची नेमणूक इंग्रजांनीं बंद करून, इनामकमिशनच्या द्वारें मेणवली व बेलबाग जप्त केला. डलहौसीच्या संस्थानजप्तीच्या पुढील कार्याचा हा प्रथमचा प्रारंभ होता. पुढें माधवराव बल्लाळ फडणवीस यांच्या खटपटीनें बेलबाग संस्थान जप्तींतून सुटून, मेणवली गांवहि वंशपरंपरा इनाम मिळाला. माधवराव हे इ. स. १८९० त वारले. त्यांस संतान नव्हतें म्हणून त्यांच्या पत्नीनें भानूंच्या घराण्यांतील एका मुलास दत्तक घेऊन त्याचें नांव बाळाजी ठेविलें. सांप्रत हेच श्री. बाळाजी माधवराव ऊर्फ नानासाहेब फडणवीस विद्यमान आहेत ( १९२५ ).

[ संदर्भग्रंथः—पेशव्यांची, भाऊसाहेबांची व नागपूरकर भोंसल्याची बखर; पत्रें, यादी—आत्मचरित्र; खरे—नाना फडणविसांचें चरित्र; अधिकारयोग; ऐ. ले. सं. भा. ४ ते ११; डफ; सिलेक्शन फ्रॉम स्टेट पेपर्स, बॉबे; पुणें ग्याझे. भा. ३; राजवाडे—खंड. २, ४, ७, १०, १३, १४; पेशवाईची अखेर; म्याकडोनल्ड—लाईफ ऑफ नाना फडणवीस; धाकटे शाहुराजे यांचें चरित्र; नॅरेटिव्ह बॉबे इनाम कमिशन; कैफियती. ]

**नानांचें दप्तर.**—मेणवली येथें नानांचें दप्तर होतें; त्यापैकीं पुष्कळसे रुमाल इनाम कमिशनच्या वेळीं सरकारनें नेल्याचें समजतें. त्यांतून जवळ जवळ १०० रुमाल शिल्लक राहिले होते. ते रा. वि. का. राजवाडे यानीं इ. स. १८९७ त तपासले. त्यावेळीं त्यानीं त्यांची तपासणी करून व वर्गवारी लावून कालक्रमानुसार पुडकीं बांधून ठेविलीं होतीं. त्यानीं त्यांचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें होतें—

"शंभरापैकीं निम्मे रुमाल जाबसाली पत्रांनीं भरलेले आहेत. बाकीचे हिशेबी आहेत. लहान मोठ्या जाबसाली पत्रांची

संख्या २५ हजार आहे. नारायणराव पेशव्यांच्या कारकीर्दीपासून नानांच्या मृत्यूपर्यंत झालेल्या अनेक राजकीय घडामोडींचे हे कागद आहेत.त्यावेळच्या कांहीं गुप्त मसलतींचीहि पत्रें यांत आढळतात. तत्कालिन मराठी राज्यांतलि व परराज्यांतील मोठ्या मुत्सद्यांचीं, किंबहुना हिंदुस्थानांत त्यावेळीं जो जो कोणी मातब्बर म्हणून माणूस झाला त्याचीं पत्रें या दप्तरांत आहेत. एकंदर सर्व प्रकारच्या कागदांची संख्या ५० हजार आहे. नारायणरावाच्या खुनापासून सवाईरावसाहेबांच्या मृत्यूपर्यंतची माहिती त्यांत पुष्कळशी आलेली आहे. तेथून पुढें नानांच्या मृत्यूपर्यंतची हकीकत मात्र त्रोटक सांपडते.

या दप्तरांत एक नकाशांचा रुमाल असून, त्यांत लढाया, वेढे, किल्ले, इंग्रजी आरमार, हिंदुस्थान, निजाम, हैदर, इंग्रज, मराठे यांचा राज्यें,व कोंकण इत्यादींचे नकाशे आहेत. कोंकणचा नकाशा ५--५० हात लांब असून त्यांत घाट, किल्ले वगैरे सर्व दाखविले आहेत. परकीय राजकारणाचीं माहितीपत्रें यांत आढळतात. फ्रेंच राजाराणीची फांशी, तत्कालिन यूरोपांतील व निरनिराळ्या व राष्ट्रांतील तह,कलकत्त्याच्या इंग्रजी कौन्सिलांतील रिपोर्ट, सवाईमाधवरावांची डायरी वगैरे ऐतिहासिक साधनें या दप्तरांत आहेत. "

याप्रमाणें रा. राजवाडे यांनीं वर्णिलेल्या या मेणवलीच्या दप्तरांपैकीं कांहीं भाग इतिहाससंग्रहांत प्रसिद्ध झाला असावा असें वाटतें. ' मेणवली दप्तर ' या नांवाखालीं या मासिकांत कागदपत्र प्रसिद्ध होत असत. [ केसरी.१ जून, १८९७.]

**नानासाहेब** ( धोंडोपंत पेशवे )—रावबाजी ब्रह्मावर्तास गेल्यानंतर त्यांना तीन मुली झाल्या; तत्पूर्वी त्यांना एक मुलगा झाला होता; पण तो लहानपणींच वारला. यानंतर पुत्रसंतति होण्याची निराशा वाटून रावबाजींनीं नानासाहेब, दादासाहेब व बाळासाहेब असे तीन पुत्र दत्तक घेतले. तीन घेण्याचें कारण एक वारल्यास पूर्वजांस पाणी पाजण्यास कोणी तरी असावा.

कुलाबा जिल्ह्यांत कर्जत तालुक्यांत कर्जतपासून दीड दोन कोसांवर वेणगांव येथें माधवराव नारायण भट राहत होते; त्यांच्या पत्नीचें नांव गंगाबाई. यांचाच मुलगा धोंडोपंत उर्फ नानासाहेब. नानासाहेबांचा जन्म ८ डिसेंबर १८२४ रोजीं झाला. रावबाजीबरोबर जी मंडळी ब्रह्मावर्तास गेली होती, तींत माधवराव भटहि होता. तेथेंच धोंडोपंतावर रावबाजींची मर्जी बसून त्यांनीं त्यांना शेवटीं दत्तक घेतलें (७ जून१८२७) आणि त्याबद्दल व आपला सर्व वारसा नानासाहेबांस देण्याबद्दलहि त्यांनीं इंग्रजांना कळविलें; तेव्हां कंपनीनें कळविलें कीं, याचा सहानुभूतिपूर्वक विचार तुमच्या पश्चात करण्यांत येईल. या भरंवशावर रावबाजी व नानासाहेब राहिले होते. पुढें रावबाजी वारल्यानंतर ( २८ जाने. १८५१ ),त्यांना मिळत असलेल्या सालिना आठ लक्षांच्या नेमणुकीवर नानासाहेबानीं आपला हक्क सांगितला; परंतु, ती कारकीर्द डलहौसीची असल्यानें त्यांचें म्हणणें कोणी ऐकलें नाहीं. पंचवीस वर्षांपूर्वीचें वचन पाळण्यांत आलें नाहीं. रावबाजींनीं आपली शिल्लक इंग्रज कंपनीच्या सरकारी कर्जरोख्यांत गुंतविली होती; त्यांनीं इंग्रजांना एकदां सैन्याची व पैशाची मदतहि ( ब्रह्मावर्तास आल्यावर ) पाठविली होती; या उपकाराबद्दल नानांस आपले वारस म्हणून इंग्रज कबूल करतील असें रावबाजीस वाटलें होतें. परंतु पुढें नानासाहेब दत्तक म्हणून त्यांचा हक्क नामंजूर झाला. फक्त बिठूर व त्याच्या आसपासचा थोडासा प्रदेश त्यांच्याकडे कायम ठेवला आणि ५०० पायदळ व एक घोडदळाचा रिसाला आणि तीन तोफा राहूं दिल्या

नानासाहेब सात्त्विक, सरळ, मधुरभाषी, दुसऱ्यावर एकदम विश्वास टाकणारे असून इंग्रज कमिशनरच्या सल्ल्यानें आपला कारभार करीत असत. त्याबद्दल के या इंग्रज इतिहासलेखकानें त्यांची स्तुति केली आहे. वडिलांच्या पश्चात त्यांचे ३०लाख रुपये कंपनीच्या शिलकेंत असलेले नानासाहेबांस मिळाले. त्यांच्या पेन्शनीच्या मागणीस बिठूरच्या कमिशनरनें सुद्धां संमति दिली होती. परंतु डलहौसीनें म्हटलें कीं, " रावबाजींनीं ४३ वर्षें सालिना ८ लाख पेन्शन घेतलें आहे व पुष्कळ शिल्लक टाकली आहे. त्यापैकीं पुष्कळशी रक्कम नानासाहेबांस मिळाली आहे म्हणूनच आतां त्यांना पैशाची जरूर नाहीं. शिवाय ते औरस पुत्र नाहींत म्हणून त्यांना पेन्शन मुळींच मिळणार नाहीं. " इतकेंहि करून डलहौसी थांबला नाहीं. जहागिरींत रावबाजीचे जे अधिकार चालत होते त्यांपैकीं दिवाणी व फौजदारी अधिकार त्यानें नानासाहेबांकडून काढून घेतले ( १८५२ ).

या निकालाविरुद्ध विलायतेस अपील करण्यासहि प्रथम बिठूरच्या कमिशनरनें हरकत घेतली, परंतु पुढें नानासाहेबांच्या रामचंद्रपंत भिडे नांवाच्या कारभाऱ्याच्या खटपटीनें गव्हर्नर जनरलच्या मार्फत कंपनीच्या डायरेक्टरांकडे अपील रवाना झालें. त्यांत इंग्रज व रावबाजी यांच्यांत झालेल्या (१८१८) तहाचा उल्लेख केला होता व त्या तहान्वयें ("पेशवे व त्यांचा वंश यांस पेन्शन मिळेल " या कलमाप्रमाणें ) आपल्यास पेन्शन मिळण्याबद्दल लिहिलें होतें पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. डायरेक्टरांनीं डलहौसीचाच निकाल कायम केला ( १५ मे १८५२ ). हा निकाल लागण्यापूर्वीच नानासाहेबानीं अजीमुल्लाखान नांवाचा आपला एक वकील लंडन येथें पाठविला.त्यास इंग्लिश,जर्मन व फ्रेंच भाषा येत होत्या. तो तेथें गेल्यावर त्यानें बीडन नांवाच्या एका इंग्रज वकिलाच्या साहाय्यानें बरीच खटपट केली, पण तिचाहि उपयोग झाला नाहीं; शिवाय या अजीमनें काम सोडून तिकडे चैनबाजी चालविली. तो मूळचा खानसामा असल्यानें मुत्सद्दीपणा त्याच्या अंगीं बेताचाच होता. इतकें झालें तरी नानासाहेब इंग्रजांशीं चांगल्या तऱ्हेनें वागत होते. बऱ्याच इंग्रज अधिकाऱ्यांनीं त्यांचा पाहुणचार घेऊन

त्यांची स्तुति गायली आहे. एका इंग्रज मित्राचा मुलगा आंत मेल्यामुळें त्यांनीं आपली आवडती गाडी जाळली व घोडा ठार केला होता. डानिअल नांवाच्या एका इंग्रज अधिकाऱ्यास त्यांनीं आपली एक मौल्यवान अंगठी बक्षिस दिली होती. अझीमउल्ला इकडे परत येत असतां क्रिमीयाची लढाई चालू होती, तींत होत असलेला इंग्रजांचा पराभव पाहून अझीमनें हिंदुस्थानांत आल्यावर नानासाहेबांस इंग्रजांविरुद्ध लढण्यास प्रोत्साहन दिलें. नानासाहेब हे भोळे व दूरवर विचार करणारे नसल्यानें त्यांनीं त्याचा सल्ला मानला.

नानासाहेबांचे दत्तक बंधु दादासाहेब ( सदाशिवराव ) व बाळासाहेब ( गंगाधरराव ) आणि दादासाहेबांचे दत्तक चिरंजीव रावसाहेब ( पांडुरंगराव ) हे सर्व बिठुरासच असत; दादासाहेब स.१८५७ पूर्वीच वारले होते. तात्याटोपी हे नानासाहेबांचे सवंगडी व दिवाण होते उत्तरेकडे त्यावेळीं झांशीच्या राणीशिवाय नानासाहेबांसारखा घोड्यावर बसणारा दुसरा कोणी नव्हता असें सांगतात. अमृतराव पेशव्यांच्या वंशजानें स. १८५६ च्या सुमारास नानासाहेबांवर वाडिलार्जित संपत्तीच्या वांटणीचा दावा लाविला होता.

शिपायांच्या बंडास सुरवात होऊन तें कानपूरपर्यंत पसरलें ( १८५७ मे ). कानपुरास कंपनीचा १०-१२ लाखांचा खजिना होता. तेथील कलेक्टरचा नानासाहेबांवर फार विश्वास होता त्याच्या विनंतीवरून नानासाहेबानींहि कानपूरच्या इंग्रजांच्या बायका, मुलें आणि खजिना रक्षण करण्याचें कबूल केलें आणि आपले तीनशें लोक व दोन तोफा घेऊन ते स्वतः कानपुरास आले ( २२ मे ). कानपुराहून ब्रह्मावर्त ५ कोस आहे.

कोणी म्हणतात कीं, नानासाहेबांनीं अझीमउल्ला परत आल्यावर लागलीच इंग्रजांच्या विरुद्ध कारस्थानें करण्यास सुरवात केली. अयोध्या, झांशी, करोली वगैरे ठिकाणच्या, ज्यांचीं राज्यें कंपनीनें छिनवून घेतलीं अशा व इतरहि विद्यमान असलेल्या संस्थानिकांशीं व तालुकदारांशीं त्यांनीं पत्रव्यवहार सुरू केला. प्रथम हे लोक या कामीं दचकत असत; पण पुढें त्यांच्यावर या पत्रांचा परिणाम होऊं लागला. प्रथम लखनौचा नबाब व राजा मानसिंग यांची अनुमति मिळाली.

नंतर शिपायांचें संगटन सुरू झालें व राजे लोक त्यांनां गुप्तपणें मदत करूं लागले; इतक्यांत काडतुसांचें प्रकरण उद्भवून त्यांच्या कार्यास दुप्पट जोर आला. वझीर (वाजीद?) अली अयोध्येचा नबाब हा कलकत्त्यास गुप्तपणें तयारी करीत होता. जगदीशपूरचा राजा कुमारसिंह यानें नानासाहेबांच्या सल्ल्यानें युद्धसामुग्रीची जुळवाजुळव चालविली. फैझाबादेस मौलवी अहंमदशहा यानेंहि तयारी चालविली होती. इंग्रजांविषयीं इतका द्वेष पसरला कीं, एकदां लखनौचा चीफ कमिशनर हेनरी लॅरेन्स हा लखनौला आला असतां ( १८ एप्रिल १८५७ ) लोकांनीं त्याला ढेकळें मारलीं पण त्याच दिवशीं नानासाहेब तेथें गेले असतां, त्यांची मिरवणूक काढिली. त्यांची संघटना इतकी गुप्त होती कीं, इंग्रजांनां कानपूरच्या उठावाच्या आदल्या दिवसापर्यंत सुद्धां बंडाची बातमी लागली नाहीं.

ब्रह्मावर्ताच्या त्यावेळच्या लोकांकडून असें समजतें कीं, नानासाहेबांचा पत्रव्यवहार आपल्यासारख्या समदुःखी संस्थानिकाशीं जरी चालू होता व धर्मासाठीं उठलेल्या पलटणीच्या ऑफिसरांशीं जरी त्यांच्या मुलाखती होत होत्या, तरी स्वपरबलाबल जाणून बंडाचें पुढारीपण घेण्यास त्यांचें मन तयार नव्हतें. असें असतां, एके दिवशीं संध्याकाळीं ब्रह्मावर्तास घाटावर ते संध्या करावयास बसले असतां, एक पलटणी अंमलदार भरधांव घोडा फेंकीत तेथें आला व त्यानें पेशव्यांस विनंति केली कीं, मिरत येथें मुसुलमान पलटणींचें बंड होऊन त्यांनीं दिल्लीच्या बादशहाची द्वाही फिरविली; हिंदु पलटणीहि धर्मासाठीं मरण्यास तयार आहेत, परंतु त्यांस आपल्याशिवाय आधार नाहीं, तरी आपण आमचे पुढारी होऊन कानपुरास चलावें. नानासाहेबानीं हें ऐकून एक क्षण स्वस्थ विचार केला व शेवटीं उद्गार काढले कीं, बरें आहे, जर हजारों लोक धर्मासाठीं प्राण देण्यास तयार आहेत, तर मीहि आपल्या बायकापोरांची आशा सोडतों; असें म्हणून त्यांनीं वाड्यांत येऊन बाळासाहेब वगैरेंनां हकीकत सांगून आपल्याबरोबरच्या लोकांसह कानपूरचा रस्ता धरिला. तेथें गेल्यावर बंडवाल्यांनीं त्यांनां आपले पुढारी केलें. तेथून त्यांनीं तात्या टोप्यास ग्वालेरीस शिंद्याकडे मदत मागण्यास पाठविलें होतें, परंतु जयाजीराव त्यांनां मिळाला नाहीं. नानासाहेबानीं निजाम, होळकर व म्हैसूरच्या राजाकडेहि प्रेष लाविला होता. नानासाहेबांचे दुसरे हस्तक ज्वालाप्रसाद व महंमदअली यांनीं या पूर्वींच गुप्त सभा भरवून व शिपायांच्या गुप्त संस्था स्थापून इंग्रजांविरुद्ध चळवळ पसरविली. चळवळीचें मुख्य ठिकाण ब्रह्मावर्त व कानपूरमधील नबाबगंज ( पेठ ) होतें. नानासाहेब कानपुरास आल्यावर नबाबगंज पेठेंत कोटींत राहत असत.

कानपुरास गंगातटांत धूस (वाळूच्या गोण्या तटासारख्या) रचून त्याच्या आंत गोरे राहिले होते त्यांवर पेशव्यांच्या फौजेनें ता. ५ जून रोजीं हल्ला चढविला. धुसाच्या आश्रयानें गोरे लढत होते. पुष्कळ प्रयत्न केले तरी धूस फुटेना तेव्हां एका नेपाळी मनुष्यानें सांगितल्याप्रमाणें मोर्चे बांधून, आंत विषाच्या धुराचे गोळे पेशव्यांच्या सैन्यानें सोडले; त्यामुळें गोऱ्यांच्या डोळ्यांनां इजा होऊन त्यांचा पुष्कळ नाश झाला; हें युद्ध तीन आठवडे चाललें. शेवटीं गोरा सेनापति व्हीलर हा पेशव्यांस शरण आला. हत्यारें व दारुगोळा सोडून व्हीलरनें उरलेल्या सैन्यासह प्रयागास जावें असें पेशव्यानीं फर्माविलें ( २६ जून ). वरील लढायांत खुद्द बाळासाहेब तोफखान्यावर होते. दुसऱ्या दिवशीं व्हीलर हा आपले उरलेले सर्व लोक घेऊन पेशव्यानीं दिलेल्या नावांत जाऊन बसला. गंगेवर त्याला पोंचविण्यास बंडवाल्यांच्या

एक दोन तुकडया आल्या होत्या. या प्रसंगाच्या आधीं थोडे दिवस इंग्रजांनीं दिल्लीस एका रस्त्यानें जाणाऱ्या निरपराधी म्हाताऱ्यास व त्याच्या छोट्या नातवास पकडून जिवंत जाळलें होतें; शिवाय गांवांतील बिनअपराधी रयतेस ठिकठिकाणीं झाडांस फांशीं दिलें होतें. या गोष्टी कानपूरच्या बंडवाल्यांच्या लक्षांत होत्याः व त्यामुळें ते मनांत चिडलेले होते. म्हीलर हा आपल्या लोकांनिशीं नावांत बसल्यावर एकाएकीं बिगुल वाजला आणि सतीचौरघाटाच्या किनाऱ्यावरून त्या सर्व नावांवर बंदुकांचा व तोफांचा मारा होऊं लागलाः सर्व गोरे घाबरले व त्यांनीं गंगेंत उड्या टाकल्या; पण ४५० पैकीं ३२५ लोक मरण पावले.

ही गोष्ट पेशव्यांच्या आज्ञेशिवाय बंडवाल्यांनीं केली. या कृत्यास पेशव्यांची मुळींच अनुमति नव्हती असें तात्या टोपी यानीं आपल्या जबानींत सांगितलें आहे व त्यांस नानासाहेबांची बहीण कुसुमावाई यानींहि दुजोरा दिला आहे. नानासाहेबानां जेव्हां ही हकीकत कळली, तेव्हां त्यानीं तावडतोब हें कृत्य बंद करविलें आणि त्यामुळेंच १२५ लोक वांचले. या लोकांनां पेशव्यांनीं विबिखाना नांवाच्या एका ठिकाणीं कैदेंत ठेविलें ( २७ जून ).

याप्रमाणें जय मिळाल्यावर गोऱ्या लोकांचा दारूगोळा, खजिना वगैरे सर्व सामान पेशव्यांनीं ताब्यांत घेऊन आपल्या नांवाची द्वाही फिरवून व बाजार उघडून सर्व व्यवहार सुरू करविला; आणि नंतर मोठ्या थाटानें ब्रह्मावर्तास प्रयाण केलें. दुसऱ्या दिवशीं सर्वत्र थाटमाट करून नानासाहेबानीं स्वतःस राज्याभिषेक करवून घेतला ( १ जुलै ), आणि पुढीलप्रमाणें आपलें मंत्रिमंडळ नेमिलें—मुख्य कारभारी बाळासाहेब, मुख्य सेनापति रावसाहेब व तात्या टोपी, दुय्यम सेनापति टीकासिंह व बाकरअली, न्यायाधीश बाबाभट्ट, परराष्ट्रमंत्री ज्वालाप्रसाद आणि उल्लाससिंह हा कोतवाल होता.

कांहीं लोकांचें म्हणणें असें आहे कीं, नानासाहेब हे कानपूरला दंगा होईपर्यंत ( ५ जून ) इंग्रजांच्याच बाजूचे होते; पुढें ते बंडवाल्यांच्या आग्रहानें त्यांनां मिळाले. मिरत वगैरे ठिकाणीं इंग्रजांचा पराभव झाल्यानंतर अजीमुल्लानें त्यांनां बंडांत मिसळण्याचा सल्ला दिला; परंतु तो त्यानीं मानला नाहीं, उलट वर सांगितल्याप्रमाणें ते कानपुरास इंग्रजांचें रक्षण करण्यास आले. यावेळीं, कानपूरच्या इंग्रजांच्या दुसऱ्या रिसाल्याचा मुख्य अंमलदार टीकासिंह यानें स्वतः व अझीमकडून एकसारखा प्रयत्न करून नानासाहेबानां वळविण्याची पराकाष्ठा केली; शेवटीं एकदां त्यानां रात्रीं एकाकी गंगेकांठीं एका नावेंत नेऊन शेवटची विनंति केली आणि ती न ऐकल्यास ठार करण्याची धमकी देऊन उत्तर मिळेपर्यंत कैदेंत ठेविलें. अखेर इतका प्रकार झाल्यानंतर मग नानासाहेबांनीं पुढारीपण घेण्याचें कबूल केलें.

ब्रह्मावर्तास गादीवर बसल्यानंतर पेशव्यानीं तेथील व कानपूरचें रक्षण मोर्चे वगैरे लावून (ध्रुव घाटापासून मोर्चेबंदी केली होती) केलें. या सुमारास फत्तेगडाहून एक नाव प्रयागाकडे जात होती, तींत बायका, मुलें व पुरुष मिळून १०० गोरे असून, दारुगोळा व युद्धोपयोगी सामान होतें. ती नाव ध्रुवघाटावरील गोलंदाजांनीं पाहून पेशव्यांस कळविलें; परंतु आंत बायका आहेत म्हणून नावेवर गोळा टाकूं नका असा त्यांनीं हुकूम दिला. पुढें नांव ध्रुवघाटावरून पुढें गेली; मात्र मुक्तेश्वरानजिक वाळूंत रुतली तेव्हां गोलंदाजानें तिच्यावर नेम धरून गोळा टाकला. तो दारुखान्यांत पडून भडका होऊन पुष्कळ लोक मेले. उरलेल्यांनां पकडून कैदेंत ठेविलें. व नावेवरील खजिना ताब्यांत घेतला.

यानंतर अलाहाबादेहून हॅवलॉक व रेंडेल हे इंग्रज सेनापती कानपूरची बातमी समजल्यामुळें तिकडे चालून येत होते. पेशव्यानीं कानपूरची मजबुती करून ज्वालाप्रसादास हॅवलॉकवर पाठविलें. त्या दोघांची गांठ फत्तेपुरास पडली. येथें ज्वालाप्रसाद मोठ्या शौर्यानें लढला; परंतु त्याच्या सैन्याजवळील बंदुका कमी पल्ल्याच्या असून इंग्रजांपाशीं अगदीं नवीन तयार केलेल्या लांब पल्ल्याच्या (३०० यार्डांच्या)बंदुका असल्यानें, त्याचा शेवटीं मोड झाला ( १२ जुलै ). हॅवलॉकनें फत्तेपूर घेऊन तेथें एकदम बीजन सुरू केलें.

ही हकीकत समजतांच पेशव्यांनीं हॅवलॉकवर बाळासाहेबानां पाठविलें. त्यानीं हॅवलॉकला कानपूरहून ११ कोसांवरील अवंग गांवीं गांठलें. हॅवलॉकपाशीं चांगला व भरपूर तोफखाना होता. बाळासाहेबांजवळ दोनतीनच तोफा होत्या. हॅवलॉकच्या तोफखान्याचा मारा चुकविण्यासाठीं त्यांनीं चक्कर घेऊन त्याच्या पिछाडीवर हल्ला केला, परंतु बाळासाहेबांच्या एतद्देशीय फौजेनें शेवटीं कच खाल्ली व ते मागें हटले व मागें पांडू नांवाची एक नदी होती तिच्या पुलावरून नदीपार झाले. हॅवलॉक पुलापाशीं आला असतां पुन्हां त्यांनीं त्याच्याशीं निकराची लढाई दिली. परंतु तेथेंहि इंग्रजी तोफखान्यानें त्यानां मागें परतावयास लाविलें; अखेर संध्याकाळीं ते कानपुरास परत आले ( १५ जुलै ).

या दिवसाच्या आधीं थोडे दिवस पुढील गोष्ट घडून आली होती. कानपुरास विबिखान्यांत जी गोरेमंडळी कैदेंत ठेविली होती, त्यांनां चांगल्या रीतीनें वागविण्यांत येई. दररोज सकाळीं झाडयाकरितां सर्वांनां गंगेवर नेण्यांत येई. व विधी आटपल्यावर परत आणीत. असें असतां, एके दिवशीं एका गोऱ्या बाईनें एक भंगीण फितूर करून, दोन मोहरा तिला देऊन आपण लिहिलेलें पत्र प्रयागास हॅवलॉककडे नेण्याचें तिच्याकडून कबूल करविलें. दुसऱ्या दिवशीं तिनें प्रयागच्या गोऱ्या अधिकाऱ्यास पत्र लिहिलें कीं, नानासाहेब नाचतमाशांत गुंग आहेत, फौजेचा बंदोबस्त नीट नाहीं, तुम्हीं सत्वर चालून यावें. झाडयाच्या वेळीं हें पत्र भंगिणीनें उचलल्याचें पहारेकऱ्यानें पाहून त्या दोघींनां पकडून पेशव्यांकडे नेलें. ही गोष्ट ऐकून पलटणवाले

विथरले व बिबिखान्यांतील लोकांची कत्तल करण्याबद्दल पेशव्यांची परवानगी मागू लागले. तेव्हां स्त्रियांस व मुलांस मारण्याची त्यांनीं मनाई केली, मात्र फक्त फितुरी लोकांस कडक शिक्षा देण्याचें कबूल केलें. ही भानगड मिटते न मिटते तोंच, एक दोन दिवसांनीं बाळासाहेबांचा मोड होऊन ते परत कानपुरास आले. यामुळें पलटणवाले फार चिडले, त्यांत अजीमुल्लानेंहि भर घातली आणि पेशवे नको नको म्हणत असतांहि पलटणवाल्यांनीं कैदेंतील बायका, मुलें वगैरे कैद्यांची कत्तल केली ( १५ जुलैच्या रात्रीं ).

दुसऱ्या दिवशीं पेशव्यांनीं हॅवलॉकवर स्वतः चालून जाण्याचें ठरविलें. त्यांनीं आपल्याबरोबर रावसाहेब, बाळासाहेब, तात्या टोपी, लालपुरी बोवा व जळका रामभाऊ यांनां घेतलें होतें, पेशव्यांची फौज पांच हजार होती. तिच्यासह त्यांनीं कानपूरच्या दक्षिणेस दोन कोसांवर अहरवा येथें हॅवलॉकची गांठ घेतली. पेशव्यांनीं आपली सैन्यरचना उत्तम केली होती. त्यामुळें हॅवलॉकनें—त्याची फौज पेशव्यांच्या फौजेपेक्षां पुष्कळ होती तरी—आपण होऊन त्यांच्यावर चाल केली नाहीं. त्याचें सैन्य दुप्पट असून त्याचा तोफखानाहि जबर होता. पेशव्यांकडून युद्धास तोंड लागलें. हॅवलॉकचे लोक कानपुरास असलेल्या कैद्यांनां सोडविण्यासाठीं (त्यांनां कत्तलीची बातमी या वेळीं समजली नव्हती असें म्हणतात),तर पेशव्यांचे लोक धर्मासाठीं व राज्यासाठीं जिवावर उदार होऊन लढले. तोफांवर स्वतः पेशवे व बाळासाहेब मेहनत करीत होते. पलटणवाल्यांनीं इंग्रजांकडील तोफांच्या कान्यांत खिळे ठोकण्याचें काम करून, त्यांच्या बऱ्याचशा तोफा निकामी केल्या. संध्याकाळपर्यंत भयंकर लढाई चालू होती; इतक्यांत पेशव्यांच्या समोरच्या दिशेकडून वादळ उठून त्यांच्या सैन्यास त्रास होऊं लागला. शत्रूकडील व स्वतःकडील धूर, धूळ वगैरे सर्व त्यांच्या सैनिकांच्या तोंडावर येऊन ते गोंधळून गेले. ही संधी साधून हॅवलॉकनें आपले हायलँडर्स घेऊन एकदम त्यांच्यावर हल्ला केला. तेव्हां पलटणवाले फुटून पळूं लागले. बाळासाहेबांनीं त्यांनां एकत्र करण्याचा प्रयत्न करून स्वतः तोफा डागल्या, पण कांहीं उपयोग झाला नाहीं, त्या गडबडींत तात्या टोपीची व पेशव्यांची चुकामूक झाली. शेवटीं नाइलाजानें पेशवे व बाळासाहेब आणि रावसाहेब हे रात्रीं ब्रह्मावर्तास आले ( १६ जुलै ). दुसऱ्या दिवशीं हॅवलॉकनें कानपूर घेतलें व तेथें एकसहा बीजन सुरू केलें; स्त्री, मूल, म्हातारे—कोतारे वगैरे कांहीं एक न पाहतां जवळ जवळ १० हजार लोकांची कत्तल इंग्रजांनीं केली ( कायें-भाग २, पृ. ३११ ) आणि पुष्कळ अत्याचार केले. एका ब्राह्मण सुभेदारास बिबिखान्यांतील रक्त साफ करावयास लावून दुसऱ्या मुसुलमान सुभेदारास तें रक्त जिभेनें चाटावयास लाविलें.

पेशव्यानीं ब्रह्मावर्तास येऊन तेथील मंडळीस हें वृत्त कळविलें. नंतर त्यांनीं एका शेल्यांत वडिलार्जित मौल्यवान वस्तू बांधून घेतल्या ( त्यांत समर्थांनीं शिवाजीस दिलेल्या भगव्या छाटया होत्या. त्यांची तेव्हांपासून आजपर्यंत (१८५७) देवांत ठेवून पूजा होत असे; तसेंच थोरल्या माधवरावांस मिळालेलें वडाचें फूल, दक्षिणावर्त शंख, गौरीशंकर बाण वगैरे वस्तू होत्या ) व आपल्या स्त्रियांसह गंगेवर ठेवलेल्या नावेंत ते जाऊन बसले, व गंगेची पूजा केली. पेशवे मंडळी जात आहे असें पाहून ब्रह्मावर्तांच्या त्यांच्या आश्रितांस फार वाईट वाटलें. बरोबर फक्त एका शागीर्दास घेऊन नावेवर मेणबत्त्या पेटवून श्रीमंतांनीं नांव हाकारली. धारेंत नांव गेल्यावर श्रीमंतांनीं एकदम मेणबत्त्या विझविल्या व शेल्यांतील जिन्नस त्यांनीं गंगार्पण केले. उजेड नाहींसा झाल्याचें पाहून नाव बुडाली व पेशव्यांनीं जलसमाधि घेतली असें कांठावरच्या लोकांस वाटलें.

गंगापार लखनौच्या हद्दींत जाऊन तेथें बेगमेच्या मदतीनें पुन्हां लोक जमा करून आणखी एकदां प्रयत्न करावयाचा असा पेशव्यांना उद्देश होता. नाव घाटास लागल्यावर मंडळी खालीं उतरली. कांठावरील गांव लखनौच्या हद्दींतीलच होता. प्रथम तेथें या मंडळीचे फार हाल झाले; परंतु तेथील मामलेदारास ही बातमी लागतांच त्यानें त्यांची सर्व व्यवस्था ( बेगमेच्या हुकुमावरून ) लावून दिली.

इकडे हॅवलॉकनें ब्रह्मावर्तावर हल्ला करून ( तेथें अडथळा कोणींच केला नाहीं ) चार प्रहर बीजन केलें. त्यांत हजारों लोक मेले. मग लुटीस प्रारंभ केला. श्रीमंतांचा वाडा सर्व धुवून फस्त करून शेवटीं तो जाळून टाकला. शहरचा तट व मंदिरें पाडलीं आणि मूर्ती फोडल्या. लुटींत पेशव्यांची तीन लाख रुपये किंमतीची रत्नजडित तलवार इंग्रजांनां मिळाली ( १९ जुलै ).

लखनौस बेगमेकडे गेल्यानंतर, तात्या टोपींचा निरोप आल्यावरून पेशव्यानीं रावसाहेबांस काल्पीस रवाना केलें. कारण तात्यानें काल्पी काबीज करून पुन्हां जम बसविला होता. पुढें काल्पी येथेंहि रावसाहेब पेशव्यांचा पराभव झाल्यावर नानासाहेब नेपाळकडे वळले. या पुढील हकीकत त्यांची बहीण ( रावबाजींची औरस कन्या ) कुसुमाबाईसाहेब यांनीं प्रत्यक्ष सांगितलेली पुढें दिली आहे.

नानासाहेबांचा पराभव होण्याचें कारण त्यांच्या जवळील लोकांत शिस्तीचा अभाव व कमी पल्ल्याचीं हत्यारें; हाताखालील लोक त्यांनां न विचारतां वाटेल ते करीत. आयोध्या प्रांतांत असतांनाच तात्या टोपी व पेशवे यांची शेवटची भेट झाली. लखनौहून ( तेथील बेगमेचा पराभव झाल्यानंतर?) श्रीमंत अनेक अडचणी व हालअपेष्टा खात नेपाळांत शिरले. त्यांच्याबरोबर त्यावेळीं त्यांच्या मातुश्री सईबाई व मैनाबाई, त्यांचें कुटुंब, बाळासाहेब व त्यांची स्त्री ( कुसुमाबाई म्हणतात कीं, रावसाहेबहि होते व पुढें तीन महिन्यांनीं ते इंग्रजी हद्दींत गेले ), कुसुमाबाई व इतर आश्रित मंडळी

होती ही मंडळी १ वर्ष कधीं नेपाळ तर कधीं इंग्रज हद्दींत लपून छपून रहात असे. नेपाळांत जंगबहादूरचा अंमल होता. तो यांनां आश्रय देईना. अशा स्थितींत स.१८५८चा सप्टेंबर आला; स. १८५७ च्या जुलैपासून आतापर्यंत १४ महिने ही मंडळी वनवासांत होती. सप्टेंबरांत नेपाळांत ठाडा गांवापासून सात कोसांवर देवखरी या स्थळीं स्वारीचा मुक्काम पडला; तेथें नानासाहेबांस दोषी ज्वर लागला व त्यांतच त्यांचा अंत देवखरीच्या रानांत एका ओढयाच्या कांठीं शके १७८० भाद्रपद वद्य १४ बुधवारीं( ६ आक्टोबर १८५८ )झाला; तेथेंच दहनविधि झाला व मंडळी ठाडयास आली; तेथें बारावा व तेरावा करून कांहीं दिवस मंडळी तेथेंच राहिली. नानासाहेब समजून पुढें पुष्कळ दिवस बऱ्याच लोकांनां त्रास होत असे.नानासाहेबांस पकडण्यासाठीं कॅनिंगनें एक लाखांचें बक्षिस लाविलें होतें ( १८५८ मार्च ).

नानासाहेबांच्या पूर्वी ज्येष्ठी अमावास्येस ( १० जुलै ) डांग ( नेपाळ ) येथें बाळासाहेब वारले होते. रावसाहेब हे सियालकोटकडे असतांना, त्यांच्या मुक्कामाची बातमी त्यांच्या एका मराठा जातीच्या अश्रितानें विश्वासघात करून इंग्रजांस दिल्यानें, ते धरले जाऊन, त्यांनां ब्रह्मावर्तास श्रावण वद्य१०,शके १७८४ (२० आगष्ट१८६२)रोजीं फांशी दिलें. त्यांची स्त्री रमाबाई यांचाहि भयंकर अंत झाला असें म्हणतात.

नानासाहेबांस तीन बायका होत्या; त्याः—करमरकरांची मुलगी सारजाबाई, पाटणकरांची सारजाबाई व करमरकरांची कृष्णाबाई. दादासाहेबांची स्त्री काशीच्या कार्लेकरांची मुलगी रोहिणीबाई असून, बाळासाहेबांची स्त्री काशीबाई ही गोडबोल्यांची मुलगी होती. दादासाहेब लवकर वारल्यानें रोहिणीबाईनीं रावसाहेबास दत्तक घेतलें होतें. हेहि वेणगांवचेच भट होते; यांची बायको ओकघराण्यांतील रमाबाई म्हणून होती. रावसाहेब हे दत्तक जाण्यापूर्वी दादासाहेबांचे चुलत बंधूच होते.

वरील प्रसंगानंतर रावबाजींच्या स्त्रिया मैनाबाई व सईबाई, बाळासाहेबांची स्त्री काशीबाई, नानासाहेबांची कृष्णाबाई व रावबाजींची मुलगी कुसुमाबाई (यांस बयाबाई म्हणत ) या खाशा स्त्रिया राहिल्या. नानाच्या मृत्यूनंतर मात्र यांनां नेपाळसरकारनें त्रास न देतां नेपाळांत राहण्यास परवानगी दिली. यांच्याबरोबर तात्या टोपी याचे चार नातू व इतर आश्रित मंडळी होती. बळवंराव टोप्यानें या बायकांची आजन्म सेवा केली. नंतर ही मंडळी काटमांडूस गेली व तेथें जवळचें जवाहीर विकून थापोथळींत जागा विकत घेऊन त्यांनीं एक वाडा बांधला व तीन चार जहागिरी गांव खरेदी घेतले व त्यांवरील उत्पन्नावर आपला गुजराण चालविला.

जहागिरींत राणीगंज म्हणून एक गांव वसवून या बायांनीं तेथें पेशव्यांची गादी स्थापून व राम आणि लक्ष्मीनारायण यांचीं देवळें बांधून तेथें मराठयांचा भगवा झेंडा रोविला. अद्यापिहि तेथें गादी व निशाण आहे असें म्हणतात. सईबाई या इ. स. १८९६ त वारल्या व त्यांच्या पूर्वी थोडेच दिवस, मैनाबाई, काशीबाई व कृष्णाबाई या वारल्या होत्या. यानंतर नेपाळसरकारनें त्यांची जहागीर बिनवारशी म्हणून जप्त केली; मात्र गादी व झेंडा असलेलें देवस्थान चालू ठेविलें.

कुसुमाबाई यांचें लग्न नानासाहेबानीं लाविलें. त्यानां लष्करचे रावसाहेब आपटे यानां दिलें होतें. त्यांचें सासरचें नांव सरस्वतीबाई असून त्यानां बंडाची सर्व हकीकत आठवत असे. कानपूरच्या विविखानाकत्तलीशीं नानासाहेबांचा मुळींच संबंध नव्हता असें त्यानीं सांगितलें आहे. बंडाची स्थिरस्थावर झाल्यावर कुसुमाबाईनां त्यांच्या श्वशुरानें ग्वाल्हेरीस नेलें. त्यांचे पति वारल्यावर त्या काशीवास करून असत.त्यानां इंदूर व ग्वाल्हेर या संस्थानांकडून कांहीं तैनात असे; इंग्रजसरकार मात्र कांहींहि देत नसे.बाई निस्पृह, धैर्यशाली व अभिजात होत्या. त्या स.१९१७ च्या आगष्टांत वारल्या. आतां पेशवे घराण्याचा औरसवंश मुळींच राहिला नाहीं.

नानासाहेबांचे डोळे पाणीदार व वाघासारखे होते, त्यांच्या बोलण्यांत विनोद असे, ते दरबारांत किनखापी पोषाक करीत, कानपूरच्या कत्तलींत मारला गेलेल्या टॉड नांवाच्या इंग्रजाकडून ते रोज वर्तमानपत्रें वाचून घेत. त्यानां इंग्रजी व फारशी चांगलें येई. त्यांच्या युद्धाचीं सूत्रें चांगलीं शिस्तीचीं अशीं असत. त्यानीं उभारलेल्या या प्रयत्नास अद्यापहि उत्तरेंत 'नानागर्दी'' म्हणतात. नानासाहेबांचा वाडा अलीपूर कलकत्ता येथें होता, या वाड्यांतच ते इंग्रजाचा सत्कार करीत आणि इंग्रजांविषयीं अत्यंत स्नेह बाळगणारा म्हणून त्यांची ख्याति बंडापूर्वी झाली ती याच वाड्यांतल्या सत्कारामुळें झाली. तो वाडा पुढें सरकारनें जप्त केला व तो पुढें कुचविहारकरांनीं घेतला; त्याला आज वुडहाउस म्हणतात. याशिवाय कुचविहारकरांनीं पेशवेघराण्यापासून एक लाख रुपयांस एक मोत्यांचा हार घेतला, इत्यादि माहिती राजकुमार व्हिक्टरनारायण सांगतात.

[ संदर्भग्रंथः—कलेक्शन ऑफ ट्रीटीज, भा. ३, ५; लाईफ ऑफ मालकम; कायें–सीपॉय वॉर, भा. १,२; मार्टिन–इंडियन एंपायर. भा. २; रसेल–डायरी इन इंडिया, भा.१; गुब्बिन–म्युटिनी इन औध; थॉम्सन–कानपूर; शेपर्ड–कानपूर; ट्रिव्हेलियन–कानपूर; स्वातंत्र्य. वर्ष ३ अं. ३६ ते ४१; द्विवेदी—गदरका इतिहास ].

**नान्किंग**—चीन देशांतल्या क्यांग्सू प्रांताच्या क्यांगनिंग राजधानीचें हें नांव आहे. हें नांव कित्येक शतकांपासून प्रचलित आहे. येथील लोकसंख्या सुमारें ( १९१० ) ३७७४५९ असून हें शहर उ. अ. ३२° ५' व पू. रे. ११८° ४७' यांवर वसलेलें आहे. हें शहर वेगवेगळ्या राजांच्या वेळेस निरनिराळ्या नांवांनीं प्रसिद्ध होतें. क्यांगनिंग हें नांव

मांचु घराण्याच्या वेळेस पडलें. मिंग घराण्यांतील पहिल्या दोन बादशहांच्या वेळेस नान्किंग हें राजधानीचें ठिकाण होतें.

टैपिंग बंडवाल्यांनीं हें शहर १८५३ सालीं हल्ला करून घेतलें. प्रसिद्ध व महत्त्वाच्या इमारतींचा नाश याच वेळेस झाला. शहराच्या ईशान्य कोपऱ्यांत हंगवु बादशहानें बांधलेला राजवाडा होता. स. १८६४ त बंडवाल्यांपासून हें शहर परत घेतेवेळेस हा राजवाडा जळाला. बादशहा युंगलो ( १४०३–१४२८ ) यानें आपल्या आईच्या प्रीत्यर्थ बांधलेला चिनी मातीचा बुरूज अतिशय प्रसिद्ध होता. १२ व्या शतकापूर्वी याच ठिकाणीं एका हिंदु भिक्षूनें बुद्धाच्या कांहीं अवशेषांवर भव्य मंदिर उभारिलें युएन घराण्याच्या वेळच्या बंडाळींत या मंदिराचा नाश झाला. या जागीं नंतर युंगलोनें चिनी मातीचा बुरूज बांधला.पूर्वी नान्किंग हें विद्येचें माहेरघर समजलें जात असे व त्याचप्रमाणें येथें पक्का माल तयार करण्याचे कारखाने असत. ब्रिटिशांनीं स. १७४२ त हें शहर काबीज केल्यावर सर हेनरी पॉटिंजर यानें नान्किंग तहनाम्यावर याच ठिकाणीं सही केली. १८९९ सालीं चिनी सरकारनें नान्किंग परराष्ट्रीय व्यापारास खुलें केलें.

नान्किंग हें पहिल्या प्रतीचें महत्त्वाचें शहर आहे. येथील सुभेदार इतर प्रांतांतील अधिकाऱ्यांपेक्षां अधिक सत्ताधीश आहे. शांघाय व इतर दक्षिणेकडील बंदरांचा परराष्ट्रीय व्यापार याच्या देखरेखेखालीं चालतो. शहरांत दारूगोळा करण्याचा एक कारखाना आहे. शिवाय लष्करी व दर्यावर्दी शिक्षणाचीं विद्यालयें आहेत. मिंग घराण्यांतील पहिल्या तीन पुरुषांच्या कबरी नान्किंग शहरांत आहेत. परंतु त्या सध्यां मोडकळीस आल्या आहेत.

**नाभा, संस्था न.**—पंजाबांतील फुलकन संस्थानांपैकीं एक संस्थान आहे. याचे दोन भाग केले आहेत. (१) अमलोह निझामत,हा पवाध नदीच्या कांठचा सुपीक प्रदेश आहे; व (२) फूल निझामत किंवा जंगली प्रदेश. बावल हा वास्तविक राजपुताना मरुभूमींतील भाग आहे. क्षेत्रफळ ९९६ चौरसमैल व लोकसंख्या ( १९२१ ) २६३३३४.

**इतिहासः**—इ. स. १७६३ त नाभा स्वतंत्र होईपर्यंत फुलकन संस्थानांचा जो इतिहास तोच नाभाचा इतिहास होय. या वर्षी शीख लोकांनीं सरहिंद घेतलें व मुलुखांची वांटणी केली; त्यांत हमीरसिंगाकडे नाभा आलें. इ. स. १७७४ त झिंदचा राजा गणपतसिंग यानें संगूर, अलमोह व भादसोन घेतलें पण पतियाळाच्या मध्यस्थीनें अलमोह व भादसोन हे भाग परत केले. इ. स. १७७६ त हमीरसिंगाला रोरी हा भाग मिळाला. हमीरसिंगानंतर त्याचा मुलगा जसवंतसिंग हा आपल्या आई–राणी देसूच्या देखरेखीखालीं गादीवर बसला. इ. स. १८०४मध्यें जसवंतसिंगानें लॉर्ड लेकशीं मित्रत्वाचें बोलणें लावलें. पुढें नाभा, झिंद आणि पतियाळ यांमध्यें युद्ध झालें; त्यावेळेस नाभानें रणजितसिंगाची मदत मागितली. या लढाईनंतर रणजितसिंगानें मालेरकोटला येथील मुसुलमान घराणें नष्ट करून जसवंतसिंगाला कोटबसिया, तलवंदी, जंगरांवन यांतील भाग दिले. स. १८०८ त रणजितसिंगानें सिस-सतलज प्रांतावर स्वारी करून जसवंतसिंगाला खान्न प्रांत मिळवून दिला.

पुढें इ. स. १८०९ त सर्व संस्थानें ब्रिटिशांच्या संरक्षणाखालीं गेलीं. जसवंतसिंगाचे शेवटचे दिवस त्याच्या मुलाच्या बंडामुळें फार वाईट गेले. इ. स. १८४० त याच्या मरणानंतर देवींद्रसिंग हा गादीवर आला. मुडकी व फिरोझपूर या शीख लढायांनंतर आणि सोबरानच्या अखेरच्या लढाईनंतर नाभा संस्थानावर ब्रिटिश अंमल जाहीर करण्यांत आला. त्यावेळीं तेथील राजाला पदच्युत करून ५०००० रुपयांचें पेन्शन दिलें. १८४७ सालीं याच्या वडील मुलाला–भारपूरसिंग यास सत्ता दिली. १८५७ सालच्या बंडांत दाखविलेल्या अप्रतिम राजभक्तीबद्दल याला बावल निझामत बक्षीस दिली. भारपूरसिंग इ. स. १८६३ त मेला व इ. स. १८७१ त भगवानसिंग हाहि मरण पावला. याला मुलगा नव्हता. तेव्हां हिरासिंग यास गादीवर बसविण्यांत आलें. हा १९११ सालीं वारल्यावर त्याचा मुलगा रिपुदमनसिंग गादीवर आला. १९२३ सालीं नाभा व पतियाळा संस्थानांतील अंतस्थ भांडणावरून रिपुदमनसिंगानें गादीचा त्याग करून आपला अल्पवयी मुलगा गादीवर बसविला व आपण पेन्शन घेऊन स्वस्थ राहिला. सध्यां संस्थानचा कारभार हिंदुस्थान सरकारच्या प्रतिनिधीमार्फत चालतो. नाभा संस्थानांतील जैतो येथील शीख सत्याग्रहामुळें या संस्थानचें नांव २।३ वर्षें सर्वतोमुखीं झालें होतें ( 'जैतो' पहा ). येथील सत्याग्रह नुकताच संपला आहे.

यांत ४९० खेडीं व ६ शहरें आहेत. लोकसंख्या ( १९२१ ) २६३३३४. यांत अमलोह, बावल व फूल या तीन निझामती आहेत. मुख्य ठिकाण नाभा असून हें शीख लोकांचें पहिल्या प्रतीचें संस्थान आहे. बहुतेक लोक पंजाबी भाषा बोलतात. परंतु बावल निझामतींत सुशिक्षित लोक हिंदी भाषा बोलतात. शीखांखेरीज इतर जाती म्हणजे जाठ, रजपूत व अहीर ह्या होत.

**शेतकीः**—या संस्थानांतील निझामतींत शेतकीच्या बाबतींत फरक आहेत. अमलोह ही निझामत ओलाव्यामुळें साहजिकच सुपीक आहे. फूल निझामत रेताळ आहे व कालवे सुरु करीपर्यंत येथें पाण्याची कमताई असे. मुख्य पिकें हरभरे, गहूं, डाळी, बाजरी, जव, ऊंस व थोडा कापूस हीं होत. जंगाल येथें गुरांची पैदास होते. फूल व जैतो येथें गुरांचे बाजार भरतात. अमलोह व नाभा येथेंहि असेच बाजार भरतात. फूल व बावल येथें धान्य नेण्यास व नांगरण्यास वगैरे ( कधीं कधीं ) उंटांचाहि उपयोग करतात. येथें कालव्यांनीं बऱ्याच जमिनीला पाणी पुरवितात. पाऊस व कालव्यांनीं पुरविलेलें पाणी यांचें व्यस्त प्रमाण आहे.

व्यापारः—येथें सोन्याचांदीचे दागिने व पितळेचीं भांडीं (स्थानिक उपयोगाकरितां) यांचा जास्त व्यापार आहे. गोटा (जर) नाभा येथें तयार होऊन बाहेरगांवीं जातो. तसेंच अमलोह येथें गबरून व सुशी हीं कापडें तयार होतात. नाभा व अलमोह येथें संत्रंज्या तयार होतात. नाभा येथें कापूस दाबण्याचा कारखाना आहे.मुख्य निर्यात माल कापूस व धान्य होत. यांत नार्थ वेस्टर्न रेल्वेच्या शाखा आहेत. बी. बी. सी. आय. रेल्वे बावल निझामतींतून जाते. येथील पोस्टखातें व ब्रिटिश पोस्टखातें हीं परस्परांचीं कामें करतात व "नाभा संस्थान" अशीं अक्षरें असलेलीं तिकिटें ब्रिटिश सरकार मूळ किंमतीला नाभा संस्थानाला देतें.

राज्यव्यवस्थाः—फुलकिआन संस्थानें व भावलपूरचा पोलिटिकल एजंट पतियाळा येथें राहतो. येथील राजा हा मुख्य असून याला इजलासिआलिआ नांवाचें सल्लागार मंडळ मदत करतें. न्यायांत अखेरचा निकाल हेंच मंडळ देतें. येथील मुख्य अधिकारीः—(१) मीर मुनशी अर्थात परराष्ट्रीय मंत्री. याला आणखीहि पोस्टखातें, कालवे, शिक्षणखातें वगैरेंकडे लक्ष द्यावें लागतें. (२) बक्षी अर्थात सेनाध्यक्ष; यांच्याकडे सेनेचें व पोलिसचें काम असतें. (३) हकीम–ई–अदालतीसदर अर्थात मुख्य न्यायाधीश. (४) दिवाण–इ–मालसदर; याच्याकडे खजिना, करवसुली, इत्यादि काम असतें. प्रत्येक निझामतीचे "ठाणा" या नांवाचे पोटविभाग आहेत. प्रत्येक निझामतीवर एक नाझीम असून याला एक तहाशिल्दार मदत करतो. नाझीमच्या निकालावर अदालतसदर येथें फिर्याद करतां येते व सरतेशेवटीं अखेरचा निकाल इजलास–ई–आलिया येथें होतो. या न्यायमंदिराचें अध्यक्षस्थान राजाकडे असतें. नाझीमला मदत करणारे मुनसिफ असून यांकडे हलके मुकदमे ऐकण्याचें काम असतें. या ठिकाणीं इं. पि. कोड व प्रोसीजर कोड हीं कांहीं फेरफार करून लागू पडतात.

नाभा रुपयाची किंमत १५ आणे आहे. येथील टांकसाळ कधीं काळीं (उदाहरणार्थ एखाद्या राज्यारोहणाच्या वेळीं) चालू होते. संस्थानचें उत्पन्न सुमारें २२॥ लाख रुपये आहे. इ. स. १८६० त बहुतेक सर्व प्रांतांत व १८७५ सालीं लोहातवद्दी परगण्यांत करवसुलीचे पैसे घेण्याची पद्धत सुरू झाली. यापूर्वी धान्य वगैरे घेत. नाभा येथें दारु काढण्याची परवानगी लिलांवानें ठरविली जाते. येथें माळव्याहून कच्ची अफू आणून ती शुद्ध करून विकतात. म्युनिसिपालिटी अशी फक्त नाभा येथेंच आहे. यांत लिहितां वाचतां येणाऱ्यांचें प्रमाण शेंकडा ४.२ असें पडतें.

शहर.–नाभा संस्थानाचें मुख्य ठिकाण. उ. अ. ३०°२३' व पू. रे. ७६° १०' यावर नार्थ वेस्टर्न रेल्वेच्या राजपुरा–भटिंडा शाखेवर हें आहे. लोकसंख्या (१९११) १३६२०. हें १७५५ त हमीरसिंगानें वसाविलें. याच्या भोंवतीं दगडी असलेली चिखली भिंत आहे. शहराच्या मध्यें एक दगडी किल्ला आहे. एका भागांत खासगी घरें असून दुसऱ्या भागांत संस्थानी कचेऱ्या आहेत. शामबागांत पूर्वीच्या राजांचीं संगमरवरी स्मारकें आहेत. मुबारक बगीच्यांत एल्गिन हाऊस नांवाचें सुंदर घर आहे.शहराच्या बाहेर छावणी व तुरुंग आहे. निर्यात माल धान्य, गळिताचीं धान्यें, कांतलेला कापूस असून, आयात माल साखर व कापड हा आहे. येथें एक इंग्रजी शाळा व लॅन्सडाऊन हॉस्पिटल नांवाचा दवाखाना आहे.

**नामकई** (ब्रह्मी नार्के)—ब्रह्मदेश, दक्षिण शानसंस्थानें, मैलात पोटविभागांतलें लहानसें संस्थान. क्षेत्रफळ ८६ चौरस मैल. येथील बऱ्याच भागांत गवत आहे. परंतु पश्चिमेकडील भाग थोडा खडकाळ आहे. लोकसंख्या (१९११) ७८४१. यांत ७१ खेडीं आहेत. यांत बहुतेक लोक तांगथस जातीचे आहेत. संस्थानिक पॉइन येथें राहतो. इ. स. १९०४–०५ मध्यें कराचें उत्पन्न ५००० रुपये असून पैकीं ३००० रुपये ब्रिटिश सरकारला खंडणी म्हणून मिळालें.

**नाभादास** (सुमारें १६००)—एक हिंदुस्थानी संतकवि. हा जातीनें डोम होता. याला नारायणदास असेंहि म्हणतात. हा वल्लभपंथाचा एक गुरु जो अग्रदास त्याचा शिष्य होता. अशी कथा सांगतात कीं, लहानपणीं नाभाच्या आईबापांनीं दुष्काळांत त्याला एका अरण्यांत सोडून दिलें असतां अग्रदासाला अवचित तो सांपडला. पुढें अग्रदासानेंच त्याला वाढविलें. नाभा मोठा झाल्यावर अग्रदासानें त्याला "भक्तमाला" ग्रंथ लिहिण्याविषयीं आज्ञा केली. हा ग्रंथ १५८५-१६२३ या काळांत लिहिलेला दिसतो. भारतीय धार्मिक इतिहासांत भक्तमालेला महत्त्वाचें स्थान द्यावें लागेल. १७१२ सालीं प्रियादासानें यावर एक टीका लिहिली आहे. या भक्तमालेचें भाषांतर बहुतेक देशी भाषांतून आढळतें.

**नाभानेदिष्ठ**—एक वैदिक ऋषि. पुराणवाङ्मयांत नाभाग, नाभागदिष्ट, नाभागनेदिष्ठ अशींहि याचीं दुसरीं नांवें आहेत. हा वैवस्वत मनूच्या नभग पुत्राचा पुत्र. हा ब्रह्मचर्याश्रमांत असतांना याच्या भावांनीं आपापसांत दायभाग वांटून घेतला. पुढें यानें रुद्रास संतुष्ट करून त्याच्यापासून संपत्ति व ब्रह्मविद्या मिळविली. यजुर्वेद व ऐतरेयब्राह्मण यांतून नाभानेदिष्ठाचे उल्लेख सांपडतात.

**नामकरण**—आर्यांच्या सोळा संस्कारांपैकीं एक संस्कार. बालकाचें नांव ठेवणें हाच या संस्कारांतील मुख्य हेतु होय. प्रयोगकारांनीं या संस्कारांगभूत, पुण्याहवाचन, नांदीश्राद्धादि करावें असें लिहिलें आहे. सूत्रकारांनीं नामकरणाचा काल स्पष्ट सांगितला नाहीं. प्रयोगकार व इतर ग्रंथकारांच्या मतें जन्मदिन, दशमदिन अथवा द्वादशदिन हा काल नामकरणास उक्त आहे. कवर्गादि जे पांच वर्ग त्यांपैकीं प्रत्येकाच्या शेवटचीं तीन अक्षरें, आणि ह, य, व, र, ल, हीं पांच अक्षरें, यांपैकीं कोणतेंहि अक्षर ज्याच्या आदि आहे; य, र, ल, व या अंतस्थ वर्णांपैकीं कोणतेंहि वर्ण ज्याच्यामध्यें आहे व ज्याच्या शेवटीं विसर्ग आहे

असें दोन अक्षरीं अथवा चार अक्षरीं नांव ठेवावें. अक्षरांची समसंख्या असलेलें पुरुषाचें नांव असावें व विषमसंख्या असलेलें स्त्रिचें नांव असावें असें आश्वलायन गृह्यसूत्रांत सांगितले आहे.

**नामक्कल**, ता लु का.—मद्रास, सालेम जिल्ह्यांतील तालुका. क्षेत्रफळ ६१३ चौरस मैल. याच्या ईशान्येस कोल्ले मलदू नांवाची पर्वतांची रांग आहे.यांतून कावेरी नदी वहाते. व या भागांत केळीं, विड्याचीं पानें, नारळ वगैरेंच्या बागा आहेत. लोकसंख्या (१९२१) ५८७८५६. यांत ३५६ खेडीं असून नामक्कल व सेंदमंगलम् हीं दोन शहरें आहेत.

गां व.—याच नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. याला करूर नांवाच्या साउथ-इंडियन-रेल्वेस्टेशनाहून २० मैल जावें लागतें. लोकसंख्या ( १९११ ) ५९९६. नामक्कल खडकावरील नामगिरी अम्मन देऊळ फार प्रसिद्ध आहे. नामक्कल टेंकडी ह्या २०० फूट उंच खडकाचा सुळा असून त्यावर एक किल्ला आहे. हा लांबून दिसतो. याचा रंग पांढरा आहे. हा चांगल्या स्थितींत आहे. या किल्ल्याखेरीज येथें एक देवालय व मुसुलमानी मनोरा आहे. हें देऊळ कोणी रामचंद्र नाइक या पाळेगारानें व कोणी म्हैसूरच्या राजाचा नोकर लक्ष्मीनरसैय्या यानें बांधिलें असें म्हणतात. हें २०० वर्षांपूर्वीच्या कालांतील असावें. हें इ. स.१७६८ त ब्रिटिशांनीं घेतलें परंतु हैदरनें लगेच तें परत घेतलें.कमलालयम् नांवाचें गोडया पाण्याचें तळें आहे. येथें एक बगीचाहि असून त्याचप्रमाणें १ शाळाहि आहे. येथें पहिल्या प्रतीचें तूप मिळतें.

**नामदेव**—एक महाराष्ट्रीय संतकवि. सातारा जिल्ह्यांत कन्हाडाजवळ नरसिवामणी नांवाचें एक खेडें आहे तें नामदेवाच्या घराण्याचें मूळचें रहाण्याचें ठिकाण होय. याच खेडयास सध्या भये नरसिंगपूर अगर कोळें नरसिंगपूर म्हणतात. नामदेवाचे पूर्वज जातीनें शिंपी असून ते शिंप्याचा अगर कापड विकण्याचा धंदा करीत. नामदेवाच्या बापानें नांव रामाशेट असून आईचें नांव गोणाबाई होतें. हीं दोघें पंढरपुरास गेलीं व तेथेंच शके ११९२ मध्यें नामदेवाचा जन्म झाला. नामाच्या गणगोताची माहिती पुढील अभंगांत आहे.

गोणाई राजाई । दोघी सासु सुना ।
दामा नामा जाणा । बाप लेक ॥
नारा महादा गोंदा । विठा चौघे पुत्र ।
जन्मले पवित्र । त्याचे वंशीं ॥
लाडाई गोडाई । येसा साखराई ।
चौघी सुना पाहीं । नामयाच्या ॥
लिंबाई ती लेकी । आऊबाई बहीण ।
दासी वेडी जनी । नामयाची ॥

नामदेवास थोडेंसें व्यवहारिक शिक्षण देण्यांत आलें तथापि पिढीजाद चालत आलेल्या धंद्यांत त्याची गति मुळींच दिसून आली नाहीं. हा पुढें मोठा विठ्ठलभक्त झाला. विसोबा खेचर हा नामदेवाचा गुरु होय. विसोबा खेचरास मूर्तिपूजा मान्य नव्हती असें म्हणतात. कारण आपल्या गुरुनें आपणास 'पाषाणाचा देव बोलेचिना कधीं। हरी भवव्याधि कैंवी घडे॥' ( तुकारामतात्या प्रत, अभंग १९१; अगर गाथापंचक; नामदेवगाथा, अभंग १५५ ) या अभंगांत सांगितल्याप्रमाणें उपदेश केला असें नामदेव म्हणे. "तुझिया सत्तेनें वेदांसि बोलणें । सूर्यासि चालणें तुझिया बळे" या अभंगांत ईश्वर कसा सर्वशक्तिमान आहे हें चांगल्या रीतीनें दाखविलें आहे. तेव्हां यावरून असें दिसून येईल कीं जरी नामदेव पंढरपूरच्या विठोबाच्या मूर्तीस भजत असे तरी ईश्वराच्या वास्तविक स्वरूपाचें त्यास ज्ञान होतें; व याच ईश्वराची प्राप्ति करून घेण्यास तो अहर्निश झटत होता. "व्रत तप न लगे करणें सर्वथा । नलगे तुम्हां तीर्थां जाणें तया" या अभंगांत अंतःकरणाची शुद्धि करून ईश्वरप्राप्ति करून घेण्यास व्रत, तप, दान, तीर्थयात्रा वगैरे व्यर्थ होत असें नामदेव म्हणतो.

"सर्वांभूतीं पाहें एक वासुदेव । पुसोनिया ठाव अहंतेचा । तोचि साधु ओळखावा निका । येर ते आईका मायाबद्ध" या अभंगांत जो वासुदेवाचा भक्त आहे व जो वासुदेवास सर्वत्र पाहतो अशा माणसाची शुद्ध वृत्ति अगर स्थिति वर्णन करून लोकनिंदेकडे लक्ष न देतां त्यास शरण जाण्याबद्दल नामदेवानें उपदेश केला आहे.

अंतःकरणाची शुद्धि, नम्रता, आत्मसमर्पण, क्षमा, ईश्वराची भक्ति हें नामदेवाच्या सर्व उपदेशाचें सार आहे. नामदेवानें हिंदीमध्येंहि कांहीं अभंग केले आहेत. शिखांचा मुख्य धर्मग्रंथ जो ग्रंथसाहेब किंवा आदिग्रंथ त्यांत नामदेवाचे अभंग असून शीख लोक नामदेवाला फार मान देतात. पंजाबांत गुरुदासपूर जिल्ह्यांत घुमन येथें एक नामदेवाची समाधि बांधिलेली असून त्यावरून पंजाबांत महाराष्ट्रांतल्याप्रमाणेंच नामदेवावर केवढी श्रद्धा आहे हें दिसून येतें.

महाराष्ट्रांतील भक्तिमार्गाचे अध्वर्यू ज्ञानदेव, नामदेव व तुकाराम हे म्हणतां येतील. त्यांतल्यात्यांत शेवटच्या दोघां संतांनी महाराष्ट्रांतील खालचा निरक्षर समाज आपल्याकडे ओढून त्याला कसें धार्मिक व सदाचारी बनविलें आहे, हें वारकरी पंथाकडे पाहिल्यास कळून येईल. नामदेवाचे अभंग फार सोपे व परिणामकारक असे आहेत. त्यांचें विवेचन 'अभंग' या लेखांत आढळेल.

नामदेवाच्या ग्रंथांची जी संप्रदायशुद्ध म्हणून गाथा, रा. आवटे यांनीं छापिली आहे ती अविश्वसनीय आहे ( भा. इ. सं. मं. १८३३ ),कारण तींत ( १ ) विष्णुदास नामा ( शके १५१७) याचे अभंग नामदेवाच्या नांवीं घातले आहेत. (२) संप्रदायशुद्ध गाथेमधील भाषा नामदेवकालीन नाहीं, विष्णुदासकालीनहि नाहीं, तर वर्तमानकालीन आहे, ( ३ ) नामदेवानंतर झालेल्या स्त्रीपुरुषांची ( उदाहरणार्थ,

भानुदास, मिराबाई, कबीर, संताजी पवार रांजणगांवकर, बोधलेबोवा धामणगांवकर ) चरित्रें नामदेवकृत म्हणून दिलीं आहेत. नामदेवाचा जन्मकाल शके ११९२ हा ( स. १२७० ) सांगितला आहे. या सनांमाणें पाहिलें तर तो ज्ञानदेवाचा समकालीन ठरतो. कारण ज्ञानेश्वरांचा काळ इ. स. १२९० हा आहे पण ज्ञानेश्वरीची मराठी भाषा निर्विवाद अधिक जुनी आहे; व नामदेवाच्या अभंगांची भाषा बरीचशी अर्वाचीन धर्तीवर आहे. नामदेवाच्या हिंदी अभंगाची भाषा देखील इ. स. १३ व्या शतकांतील हिंदी भाषेहून अधिक अर्वाचीन स्वरूपाची भासते. याचें कारण काय हें सांगणें कठिण आहे; तथापि नामदेवाचा जन्मकाल बराचसा मार्गे लोटून म्हणजे शके ११९२ हा कल्पून त्यास ज्ञानदेवाचा समकालीन बनविला असला पाहिजे. विष्णुस्वामीच्या अनुयायांत ( त्याच्या मागून येणाऱ्यांत ) नाभाजीनें ज्ञानदेवाचा प्रथम उल्लेख केला आहे. नामदेवाच्या मराठी व हिंदी भाषेच्या स्वरूपावरून पाहतां त्याचा काळ जवळ जवळ एक शतक अलीकडे ओढला पाहिजे.

नामदेव केव्हां होऊन गेला याची कांहींशी कल्पना, विसोबा खेचरानें ( नामदेवाचे गुरु ) मूर्तिपूजेचें वैय्यर्थ्य जोरदार शब्दानें वर्णन केलें आहे असें नामदेव म्हणतो, त्यावरून करतां येण्यासारखी आहे विसोबा खेचर मूर्तिपूजेच्या अगदीं विरुद्ध होता असें त्याच्याविषयीं उपलब्ध असलेल्या माहितीवरून दिसतें. रामानुजादि पूर्वीच्या ग्रंथकारांनीं व त्याच्यानंतर झालेल्या कित्येकांनीं मूर्तिपूजेचें कोणत्याना कोणत्या रीतीनें समर्थन केलें आहे. खेचर तर मूर्तिपूजेच्या अगदीं विरुद्ध होता; तेव्हां यावरून तो व त्याचा शिष्य नामदेव हे मुसुलमानी अंमल ( अगर वर्चस्व ) पूर्णपणें स्थापित झाल्यानंतर होऊन गेले असावेत. दक्षिणेंत मुसुलमानांचा अंमल इ. स. १४ व्या शतकांत सुरू झाला. नामदेवकालीं मुसुलमानांचा मूर्तिपूजेविषयींचा द्वेष हिंदुधर्मांत शिरून सुमारें १०० वर्षांचा काळ लोटला असला पाहिजे. पण दक्षिणेंत मुसुलमानी अंमल सुरू झाल्यानंतर नामदेव होऊन गेला याविषयीं अगदीं प्रत्यक्ष प्रमाण अगर खात्रीचा पुरावा म्हटला म्हणजे नामदेवानें आपल्या एका अभंगांत तुरकांनीं मूर्ती विध्वंसिल्याबद्दल उल्लेख केला आहे हा होय ( तुकारामतात्या प्रत, अभंग ३६४). हिंदु लोक पूर्वी मुसलमानांस "तुरक" म्हणत असत हें प्रसिद्ध आहे. तेव्हां नामदेव बहुतकरून चवदाव्या शतकाच्या अखेरीच्या सुमारास होऊन गेला असावा असें प्र.वा. डॉ.भांडारकर सिद्ध करतात.[वैष्णविझम, शैविझम अँड अदर मायनर रिलिजिअस सिस्टिम्स ]. नामदेवाच्या सर्व कुटुंबानें एकाच वेळीं पंढरपुरच्या देवद्वारीं समाधी घेतली अशी आख्यायिका असून विठोबाच्या देवळांत नामदेवाच्या समाधीची पायरी दाखविण्यांत येते. नामदेव शिंपासमाज या पायरीला आपलें पवित्र धर्मस्थान मानतो; व ती जागा बडव्यांच्या ताब्यांतून घेण्याचा त्या समाजाचा प्रयत्न चालू आहे.

**नामदेव शिंपी**—'शिंपी' पहा.

**नामशूद्र**—या जातीची उत्पत्ति शूद्र पुरुष व ब्राह्मण स्त्री यांच्यापासून झाली असें मनूचें मत आहे. या लोकांचा समाजांतील दर्जा फारच हलका असून ते मासे पकडण्याचा व नावाड्याचा धंदा करतात. यांची एकंदर लोकसंख्या सुमारें २१ लाख आहे. नुसत्या बंगाल्यांत नामशूद्र १९ लाखांपर्यंत आहेत. त्यांच्यांत चार पोटजाती आहेत.त्या हलिया,चासी,करंटी,आणि जलिया.पहिल्या दोन जाती शेतकी करतात,तिसरी सुतारकाम व चवथी जात मच्छीमारीचा धंदा करते. जलियाखेरिज इतर पोटजातींत शरीरसंबंध होतो. जलियांनां अगदीं हलकें मानण्यांत येऊन त्यांच्याशीं कोणी संबंध ठेवल्यास उच्च वर्गांत ( हलिया इ. ) त्याला घेत नाहींत. नामशूद्रांनां आतां चांडाल हें मूळचें नांव दिलेलें आवडत नाहीं. त्यांनीं चांडालाचें नांव नामशूद्र करून आतां ते नामशूद्रब्राह्मण म्हणविण्याचा अट्टाहास करीत आहेत.त्यांनां चांडाळ अथवा चारल आतां म्हणत नाहींत परंतु ब्रह्मपुत्रा खिंडींत चारल हा शब्द अद्याप प्रचारांत आहे. आसामांतहि दोडपावणेदोन लाख नामशूद्र आहेत.

**नामूर**—बेल्जम, नामूर प्रांताचें मुख्य शहर. लोकसंख्या ( १९११ ) ३२४५३. हें शहर फार सुंदर आहे. म्यूज व सेंबर या नद्यांच्या संगमावर हें वसलेलें आहे. येथें एक जुना किल्ला आहे. येथें चाकू-कात्र्या चांगल्या होतात व कमावलेल्या चामड्याच्या वस्तूहि चांगल्या बनविल्या जातात. याच्या आसपास रोमन लोकांच्या बऱ्याच पुराणवस्तू सांपडल्या; त्या साऱ्या येथील पुराणवस्तुसंग्रहालयांत सांठवून ठेवल्या आहेत. १६९५ सालीं डॉनजान या आस्ट्रियाच्या राजानें नामूर हें आपलें लढाईचें मुख्य ठाणें केलें. परंतु तिसऱ्या विल्यम यानें तें परत घेतलें. १७९२ सालीं तें फ्रेंचांनीं घेतलें. १८८८ सालीं या शहराभोंवतीं ९ किल्ले बांधले. याप्रमाणें हें फार मजबूत शहर झालें आहे.

**नायकनहट्टी**—म्हैसूर संस्थान, चितळदुर्ग जिल्हा, चल्लकेरे तालुक्यांतील एक शहर हें चल्लकेरे शहराच्या वायव्येस १४ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९०१ ) सालीं २८५८ याचें नांव पूर्वी 'हट्टी' असें होतें. हें शहर एका नायकानें वसविलें असें म्हणतात. चितळदुर्गाधिपतीजवळून तें हैदरअल्लीनें हस्तगत केलें. एका लिंगाईत महापुरुषाची येथें समाधि व देऊळ आहे.

**नायक राजे(मदुरेचे)**—मदुरा ही प्रथम पाण्ड्य राजांची राजधानी होती.मदुरा हें शहर प्रथमतः विजयानगरच्या नायक सेनापतीच्या हातीं १५५९ सालीं आलें. त्यांनीं तेथें आपलें निराळेंच घराणें स्थापन करून विजयानगरची सत्ता नाकबूल केली.या घराण्यांतील पहिला राजा विश्वनाथ नांवाचा झाला.

विश्वनाथ नायक (१५५९-१५६३).—१५५८ पूर्वी चन्द्रशेखर पाण्डय हा मदुरेस पाण्डय देशाच्या गादीवर बसला; हा शेवटचाच पाण्डय राजा होय. तंजावरचा चोल राजा वीरशेखर यानें युद्ध करून पाण्डय राज्य जिंकलें. चंद्रशेखर विजयानगर येथें आश्रयास पळून गेला. विजयानगरकर रामराजानें (सदाशिवराय ?) चोलराजास हांकून देण्याकरितां कोटियनागम नायक या सेनापतीस पाठविलें. त्यानें चोल राजास हांकून मदुरा घेतलें परंतु पाण्डय राजास गादीवर न बसवितां तो स्वतःच कारभार पाहूं लागला. यामुळें रामराजानें नागम याच्याच विश्वनाथ नांवाच्या मुलास सैन्य देऊन बंड मोडण्यास पाठविलें. विश्वनाथ यानें बापाचा पराभव करून त्यास कैद केलें व स्वतःच कारभार चालविला. यावेळीं विश्वनाथाबरोबर आर्यनायक मुदलियार उर्फ आर्यनाथ हा होता. यानें विश्वनाथास पुष्कळ मदत केली. याच आर्यनाथानें मदुरा येथें सहस्र स्तंभांचा मंडप बांधला; हा फार प्रसिद्ध पुरुष होता. विश्वनाथ यानें नांवाला चंद्रशेखर पाण्डयास गादीवर बसविलें. थोड्याच दिवसांनीं तो मेल्यावर विश्वनाथ हा स्वतःच सर्व राज्यकारभार पाहूं लागला. चंद्रशेखराच्या वंशांत पुढें कोणीच न उरल्यानें विजयानगरकरानें विश्वनाथासच मदुरेचा राजा केलें. त्यानें आर्यनाथ यास 'दळवाय' ही पदवी देऊन आपला सेनापति व मुख्य प्रधान नेमिलें. हाच राजा असावा याबद्दल प्रजेनेंहि विजयानगरकडे मागणी केली होती. प्रजेचें याच्यावर फार प्रेम होतें. यानें फार शहाणपणानें राज्य केलें. तटबंदी केली, देवालयें बांधलीं, कालवे खोदले, गांवें वसविलीं व तंजावर प्रांतांतील त्रिचनापल्लीच्या किल्ल्यापर्यंतची सर्व जमीन लागवडीखालीं आणिली. त्यानें तंजावरच्या राजाजवळ वल्लम व त्रिचनापल्ली यांची अदलाबदल करून त्रिचनापल्ली आपल्या राज्यांत घेतलें; व तेथील प्रख्यात टेंकडीवरील किल्ला बांधून रस्त्याची सुधारणा केली.

आर्यनाथ तिनवेल्ली प्रांताची पहाणी करून जमाबंदी ठरविण्याकरितां गेला असतां तेथें त्यास पांच राजे शत्रू उत्पन्न झाले. ते आपणांस पाण्डय म्हणवीत असत व त्यांची दक्षिणेमध्यें बरीच सत्ता होती. यावेळीं विश्वनाथ हा आर्यनाथाच्या मदतीकरितां दक्षिणेंत गेला परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. विश्वनाथानें, यश मिळत नाहीं असें पाहून त्या पांचहि जणांस द्वंद्वयुद्धास आव्हान केलें व अशी अट घातली कीं, ज्याचा पराजय होईल त्यानें देश सोडून निघून जावें. त्यांनीं, आपणांपैकीं एकाबरोबर लढून विश्वनाथानें युद्धाचा शेवट करावा असें ठरविलें. द्वंद्वयुद्धामध्यें विश्वनाथानें आपल्या प्रतिपक्ष्यास ठार मारलें तेव्हां बाकीचे चार राजे आपापलीं सैन्यें घेऊन परत गेले, अशी दंतकथा आहे. याप्रमाणें विश्वनाथ हा सर्व प्रदेशाचा मालक झाला. त्यानें वसाहत करण्याकरितां ७२ सरदारांस पाळेयम् दिलीं. विश्वनाथ हा १५६३ सालच्या डिसेंबर महिन्यांत मृत्यु पावला. व्हीलरची नायक घराण्याच्या संस्थापकाची हकीकत थोडी निराळी आहे, पण ती विश्वसनीय नाहीं.

कुमार कृष्णप्पा (१५६३-१५७३).—आर्यनाथ हा उत्तरेकडे मुसुलमानांशीं युद्ध करण्यांत गुंतला असतां दक्षिणेंत दंबीछि नायक या पाळेगारानें बंड केलें परंतु तें लवकरच मोडलें. यावेळीं आर्यनाथ हाच खरोखरीचा राजा होता; यानें पुष्कळ लोकोपयोगी कामें केलीं, कांहीं देवालयें बांधलीं व कांहीं गांवें वसविलीं. यानें सिलोनवर स्वारी करून तेथील लोकांच्या सैन्याचा पराभव केला. पुढें दुसऱ्या लढाईंत सिंहली लोकांच्या राजानें स्वतः सेनापत्य स्वीकारिलें होतें परंतु त्याचा पराभव होऊन तो मारला गेला. नंतर कुमार कृष्णप्पा यानें सिंहली लोकांचें राज्य घेऊन तेथें आपल्या मेहुण्यास प्रतिनिधि नेमिलें; परंतु या गोष्टीस आधार सांपडत नाहीं. हा इ. स. १५७३ मध्यें मरण पावला.

कृष्णप्पा व विश्वनाथ (दुसरा) (१५७३-१५९५).—कृष्णप्प यासच वीरप्पा असें दुसरें नांव आहे. हे दोघेहि एकमतानें राज्यकारभार पहात असत. हे दोघे कुमार कृष्णप्पाचे पुत्र असून त्यांनां आर्यनाथ यानें गादीवर बसविलें होतें व ते त्याच्या आज्ञेंत वागत असत. यांनीं महाविलिवानराज (कदाचित पाण्डय असावा) नांवाच्या एका सरदाराचें बंड मोडून त्रिचनापल्ली व चिदंबरम् या किल्ल्यांची मजबुती केली. विश्वनाथ हा प्रथम मेला असावा, कारण कृष्णप्पाच्या मृत्यूनंतर त्याचेच पुत्र इ. स. १५९५ मध्यें गादीवर बसले.

लिंगय्या व विश्वप्पा (तिसरा विश्वनाथ) (१५९५-१६०२)-: लिंगय्या यासच दुसरा कुमार कृष्णप्पा असें दुसरें आहे. हे दोघे एकमतानें राज्यकारभार पहात असत यांच्या कारकीर्दींत देशाची भरभराट पुष्कळ झाली. आर्यनाथ इ. स. १६०० त मरण पावला. विश्वनाथ बहुतकरून आपल्या भावाच्या पूर्वी मेला असावा. लिंगय्या हा इ. स. १६०२ मध्यें मरण पावला. पुढें त्याचा चुलता कस्तुरीरंगय्या यानें राज्य बळकाविलें, परंतु एका आठवड्यांतच त्याचा खून झाला व लिंगय्याचा पुत्र मुत्तुकृष्णप्पा यास गादी मिळाली.

मुत्तुकृष्णप्पा (१६०२-१६०९).-यानें रामनद येथील सेतुपति राजांच्या प्राचीन वंशाची पुन्हां स्थापना केली. याच्या कारकीर्दींत जेसुइट पंथाचा पाद्री रॉबर्ट दि नॉबिलिबस यानें इ.स.१६०६ मध्यें मदुरा येथें येऊन आपण रोम येथील संन्यासी आहों असें जाहीर केलें व त्याच्या हाताखालीं जेसुइट पंथाच्या लोकांनीं ख्रिस्ती धर्माचा बराच प्रसार केला. मुत्तुकृष्णप्पा हा स. १६०९ मध्यें मरण पावला. यास तीन मुलगे होते. त्यांचीं नांवें-मुत्तुवीरप्पा, तिरुमल व कुमार मुत्तु मुहम्मदशरीफ हनफी (१६०८) यानें आपल्या मजालिस-इ-सलातीन (इलियट ३) मध्यें लिहिलें आहे कीं, मदुरा येथील राजा मरण पावला त्यावेळीं त्याच्या ७०० बायकांनीं

सहगमन केलें. हा राजा मुत्तुकृष्णाप्पा असावा. पण ही अतिशयोक्ति असावी.

मु त्तु वी र प्पा (१६०९ ते १६२३).—याच्या कारकीर्दींत तंजावरकराबरोबर एक लहानसें युद्ध व कांहीं म्हैसूरकडील लुटारू टोळ्यांशीं चकमकी झाल्या. यावेळीं ख्रिस्ती धर्माच्या प्रसारास आळा पडला. हा त्रिचनापल्ली येथें रहात असे.

ति रु म ल ना य क (१६२३–१६५९).—प्रसिद्ध तिरुमल हाच होय. यालाच "महाराज,मान्य-राज-श्री तिरुमल शेवरि नायणि आय्युलु गारु" असें म्हणत. यानें त्रिचनापल्ली सोडून मदुरा येथें कायमचें वास्तव्य करून मदुरा येथें मोठमोठीं देवालयें व राजवाडे बांधले व विजयानगरची सत्ता झुगारून देऊन स्वतंत्र होण्याचा निश्चय केला. याचा दळवाय रामप्पय्या यानें, म्हैसूरच्या सैन्यानें केलेल्या स्वारीचा प्रतिकार करून त्यांचा पाठलाग करून त्यांचा एक किल्ला घेतला. इ. स १६२३ मध्यें रॉबर्ट दि नोबिलिबस हा पुन्हां मदुरा येथें आला.यानंतर रामनद येथील सेतुपतीबरोबर युद्ध झालें, त्यांत तिरुमलास यश आलें नाहीं. याला जरी विजयानगरापासून स्वतंत्र होण्याची इच्छा होती तरी हा नेहमीं त्यांची सत्ता कबूल करीत असे व त्यांस नजराणा पाठवीत असे. परंतु ही वरवरची राजनिष्ठा त्यांच्या लक्षांत येऊन त्यांनीं १६५७ त तिरुमलबरोबर युद्ध सुरू केलें. तिरुमल यास तंजावर व जिंजी येथील नायक येऊन मिळाले. विजयानगरचा राय जिंजीवर चालून गेला परंतु तिरुमल याच्या चिथावणीनें मुसुलमानांनीं त्याच्या राज्यावर स्वारी करून पुष्कळ मुलूख जिंकला. परंतु पुढें मुसुलमानांनीं दक्षिणेकडील तिरुमलच्याच प्रांतावर चढाई केली, तेव्हां तिरुमल यास मदुरा येथें जावें लागलें. मुसुलमानांनीं मदुरेस वेढा देऊन लढल्याशिवायच शहर ताब्यांत घेतलें. नंतर तिरुमलानें कुतुबशहाबरोबर तह केला व त्यांच्या सहाय्यानें विजयानगर व म्हैसूर राज्यांवर चढाई केली. तिरुमलाच्या या विश्वासघाताचा सूड घेण्याकरितां म्हैसूरच्या उरैय्यूरनें त्यावर स्वारी केली. अनेक चकमकी होऊन शेवटीं (१६५९) तिरुमल यास जय मिळाला. त्याच वर्षी तो मरण पावला. कांहीं ब्राह्मणांनीं त्याचा खून केला असण्याचाहि बराच संभव आहे नेल्सन यानें याच्या मरणाबद्दल पुष्कळ दंतकथा लिहिल्या आहेत. याचा ख्रिस्ती धर्माकडे फार ओढा होता असा समज आहे. याच्यानंतर कायदेशीर वारस कुमारमुत्तु यास बाजूस सारून तिरुमलचा दासीपुत्र तिरुमलमुत्तु अरकाद्री हा जबरदस्तीनें गादीवर बसला.

तिरुमल नायकासंबंधानें इतिहासज्ञांत बराच गैरसमज आढळतो. नायक घराण्यांतील तो सर्वांत मोठा राजा होता असें नेल्सन यानें लिहिल्यापासून पुष्कळ लोकहि तसेंच म्हणूं लागले आहेत,परंतु ही गोष्ट सत्यास धरून नाहीं. तिरुमलच्या काळच्या बखरींचा नीट अभ्यास केल्यास असें आढळेल कीं खऱ्या वीराच्या अगर मुत्सद्याच्या अंगीं लागणाऱ्या गुणांपैकीं त्याच्या अंगीं एकहि गुण नव्हता.पोकळ पदव्या मिळविण्याची महत्त्वाकांक्षा धरून असत्य गोष्टींच्या मागें लागल्यामुळें त्याच्या जवळच्या उत्कृष्ट वस्तूहि तो गमावून बसला. मुत्सद्याची दूरदृष्टि अथवा देशाभिमान्याचे गुण त्याच्या अंगीं नसून, उलटपक्षीं तो देशद्रोही असल्यामुळें त्याच्याच राज्यांत नव्हे तर सर्व दक्षिणेंत मुसुलमानी सत्ता कायमची स्थापन झाली. त्याच्या अगोदर तीनशें वर्षांपूर्वी, मुसुलमानांनीं पांड्य व चोल यांच्या राज्यांत आपला शिरकाव करण्याचा प्रयत्न केला होता परंतु तो फसला.विजयानगरची सत्ता कमी झाल्यामुळें विजापूर व गोवळकोंडा यांची सत्ता कमी अधिक काळानें स्थापन झाली; सती ही गोष्ट खरी असली तरी तें संकट लवकर येण्यास तोच कारणीभूत झाला असें म्हणावें लागतें. याप्रमाणें त्याच्या कारकीर्दींत हिंदूंचें स्वातंत्र्य नष्ट झालें व मदुरेच्या सामर्थ्याला आणि वैभवाला जबरदस्त धक्का पोंचला. इतकें असूनहि त्याचे अपराध व दोष लोक विसरून गेले आहेत याचें कारण, वास्तुशास्त्र, खोदकाम अथवा मूर्तिशिल्पशास्त्र व चित्रकला, या कलांची त्यानें केलेली सेवा हें होय. नायक घराण्यांतील पुष्कळ राजे या कलांचे भोक्ते असून त्यांनीं देवालयें, राजवाडे, उद्यानें वगैरे तयार करून आपलें औदार्य व आपली अभिरुचि व्यक्त केली होती, परंतु या बाबतींत तिरुमल हा सर्वांपेक्षांहि श्रेष्ठ होता. एकसारख्या लढाया सुरू असतांहि, शांततेच्या काळांतील या कलांनां उर्जितावस्थेंत आणण्याकरतां वेळ व पैसा वांचवून एवढी मदत केल्याबद्दलच लोक त्याचा जयजयकार करितात.

मु त्तु अ र का द्रि (मुत्तुवीरप्पा) (१६५९–१६६०).—यानें मुसुलमानांस हांकून देण्याचा निश्चय केला व त्यासाठीं त्रिचनापल्ली येथील किल्ल्याची पुष्कळ मजबुती केली. मुसुलमानांनीं तंजावर वगैरे जिंकून त्रिचनापल्लीस वेढा दिला, परंतु त्यांस माघार घ्यावी लागली. हा १६६० सालीं मरण पावला. त्याच्या मागून त्याचा पुत्र गादीवर बसला.

चो क्क ना थ (चोक्कलिंग उर्फ चोक्कप्प) (१६६०–१६७७ व १६७८–१६८२).—हा राज्यावर आला त्यावेळीं फक्त १६ वर्षांचा होता. प्रथम कांहीं दुष्ट मंत्र्यांच्या तावडींत सांपडला असतां त्यांनीं यास पदच्युत करण्याचा घाट घातला होता. परंतु त्यांतून पार पडून त्यानें राज्यकारभार स्वतःच्या हातांत घेऊन स्वतःच्या सैन्याचें आधिपत्य स्वीकारलें, तेव्हां ते मंत्री तंजावरकडे पळाले; त्यांचा पाठलाग करून त्यानें त्यांचा पराभव केला. त्यांत तंजावरचा नायक शरण आला. पुढें (१६६३–६४) मुसुलमानांनीं या प्रांतावर स्वारी केली व त्रिचनापल्लीस वेढा दिला परंतु त्यांस तो उठवणें भाग पडलें. यावेळीं त्यांनीं पुष्कळ खेडीं उध्वस्त करून लोकांची कत्तल केली. नंतर चोक्कनाथ यानें तंजावरच्या विजय राघवावर त्यानें मुसुलमानांस मदत केल्यामुळें स्वारी केली, व त्याचा पराजय करून त्यास शरण आणिलें. नंतर लवकरच सेतुपति यानें बंड केल्यामुळें चोक्कनाथ यानें त्याच्यावर स्वारी केली परंतु तींत यश आलें नाहीं. त्यानें १६७४ सालीं

तंजावरावर पुन्हां स्वारी केली. तींत विजयराघव नायक याचा पराभव होऊन तो बहुतेक सर्व कुटुंबासुद्धां मारला गेला. याच्या मरणाची करुण-कहाणी नेल्सन यानें विस्तारानें लिहिली आहे. अलगिरी नायक यास तंजावरवर प्रतिनिधि नेमण्यांत आलें. पुढें ( १६७५ ) चोक्कनाथानें मंगम्माळ हिच्याशीं विवाह केला.हीहि पुढें इतिहासांत फार प्रसिद्धीस आली. नंतर मुत्तुअरकाद्रि या भावावर राज्यकारभार सोंपवून चोक्कनाथ हा विलासांत दंग होऊन त्रिचनापल्ली येथें राहिला. तेव्हां मंत्र्यांनीं चोक्कनाथ यास पदच्युत करून अरकाद्रि यास गादीवर बसविण्याबद्दल कारस्थान सुरु केलें. याच वेळीं मुसुलमान लोकांनीं एकोजी ( व्यंकोजी ) राजे भोंसले यांच्या साहाय्यानें व त्यांच्याकडे पळून आलेल्या तंजावरच्या एका राजपुत्रास बरोबर घेऊन तंजावरावर स्वारी करून तो प्रदेश जिंकला.

चोक्कनाथ हा या वेळीं आळशी बनल्यामुळें मुसुलमानांनीं बहुतेक मदुरा प्रांताहि काबीज केला (१६७६). पुढें चोक्कनाथानें तंजावर येथील मुसुलमानांवर स्वारी करण्याची तयारी केली व म्हैसूरच्या राजानेंहि मदुरेवर स्वारी करण्याची तयारी केली. यावेळीं शिवाजीनें दक्षिणेंत एक मोठी स्वारी केली. तो परत फिरला असतां एकोजीनें त्याच्या जिंजी या ठाण्यावर चाल केली परंतु त्यास हार खावी लागली. याच सुमारास चोक्कनाथ यानें तंजावरवर स्वारी केली होती. त्यावेळीं इकडे शिवाजीच्या सैन्यानें मदुरा घेतलें. तेव्हां चोक्कनाथ हा त्रिचनापल्लीस गेला.मग शिवाजीच्या सैन्यानें जिंजीचा बंदोबस्त केला व वेलोर प्रांत आपल्या ताब्यांत घेतला. पुढें (१६७७) म्हैसूरच्या राजानें मदुरेवर स्वारी केली तेव्हां प्रधानमंडळानें चोक्कनाथ यास पदच्युत करून कैद केलें व त्याच्या भावास गादीवर बसविलें.

मुत्तुलिंगप्पा ( १६७७ ).—यानें थोडे महिने राज्य केल्यावर त्यास पदच्युत करून पुन्हां चोक्कनाथ यास गादीवर बसविलें. यापुढें चोक्कनाथ हा मुसुलमानी सत्तेस फार नमून राहिला. इ. स. १६८० मध्यें म्हैसूरच्या सैन्यानें त्रिचनापल्लीस वेढा दिला त्याच वेळीं चोक्कनाथाच्या इतर शत्रूंनींहि त्याच्यावर स्वारी केली.एकदां तर त्रिचनापल्लीभोंवतीं म्हैसूरकर, रामनदचा राजा आणि तंजावरचे मराठे अशा तीन सैन्यांनीं गराडा दिला होता. त्यावेळीं मराठ्यांनीं म्हैसूरच्या सैन्याचा पराजय करून आजूबाजूचा सर्व प्रदेश बळकावला. थोड्याच दिवसांत त्रिचनापल्लीशिवाय बाकी सर्व प्रदेश गेल्यामुळें हृद्रोग लागून चोक्कनाथ मरण पावला. नंतर त्याचा मुलगा राज्यावर आला.

रंगकृष्ण मुत्तु वीरप्पा (१६८२-१६८९).—यावेळीं सर्व देशभर अराजकता नांदत होती. तंजावरकर एकोजी यानें सर्व देवळांचीं इनामें व मालमत्ता जप्त केली. शिवाजीनंतर जिंजीचा किल्ला संभाजीच्या ताब्यांत गेला. मदुरा प्रांताचे पांच विभाग होऊन ते पांच राजांनीं वांटून घेतले ते-( १ ) नायक, ( २ ) म्हैसूर, (३) रामनदचे सेतुपति, (४) जिंजी येथें संभाजी व ( ५ ) तंजावरचा एकोजी. परंतु ही स्थिति हळू हळू सुधारत जाऊन, नायक हे म्हैसूरपासून थोडथोडे स्वतंत्र होऊन लवकरच त्यांनीं आपली राजधानी परत घेऊन सेतुपति यानें जिंकलेला प्रदेश परत मिळविला. या नायकानें राज्यकारभार मोठ्या उत्साहानें व शहाणपणानें चालविला. इ. स. १६८६ मध्यें सेतुपतीनें मदुरेविरुद्ध पुन्हां बंड पुकारलें व तंजावरच्या मदतीनें कांहीं जय मिळविले. लवकरच रंगकृष्ण हा देवी येऊन मरण पावला. त्याच्या मरणानंतर त्याच्या विधवा ( मुक्तमाळ ) राणीस एक पुत्र झाला. त्या नंतर तिनें आत्महत्या केली.

चोक्कनाथाची विधवा स्त्री मंगम्माळ ( १६८८ ते १७०४ ).—मंगम्माळ ही उदार होती परंतु तिला पापपुण्याचा विचार नसे. ही हिंदु धर्माप्रमाणें ख्रिस्ती धर्माचेंहि रक्षण करीत असे. स. १६९३ मध्यें रामनदच्या सेतुपतीनें जेसुइट पाद्री दि-ब्रिटो यास हाल करून मारलें. स. १६९८ मध्यें मंगम्माळ हिचें सैन्य त्रावणकोरमध्यें खण्डणी वसूल करण्याकरितां गेलें असतां तेथें त्याचा पराजय झाला. नंतर तिनें त्रावणकोरविरुद्ध युद्ध पुकारून त्यांत जय मिळविला असें म्हणतात. पुढें(१७००)तुतिकोरीन येथील डच लोकांनीं या कारकीर्दींत मोतीं काढण्याचा सर्व हक्क मिळविला. यावेळीं बौचे नांवाच्या पाद्र्यास दरबारांत चांगला मान मिळाला. या सुमारास तंजावरकराचा, मदुरेच्या दळवाय नरसप्पय्यानें पराजय करून सर्व तंजावर प्रांत उध्वस्त करून टाकला. तेव्हां तंजावरकरानें खंडणी दिली. पुढें (१७०२ ) सेतुपतीबरोबरच्या एका लढाईंत दळवाय नरसप्पय्या हा मारला गेला. सन १७०४-०५ च्या सुमारास नायक राजा वयांत आल्यावर त्यानें राज्यकार हातीं घेतला व मंगम्माळ हिच्याविरुद्ध एक पक्ष तयार होऊन तिला उपाशी ठेवून जीवें मारलें.

विजयरंग चोक्कनाथ ( १७०४ ते १७३१ ).—याच्या वेळीं स. १७०९ मध्यें भयंकर दुष्काळ पडला व महापूर आले व पुढें पुन्हां स. १७१० मध्यें जो दुष्काळ पडला तो दहा वर्षें ( १७२० ) तसाच कायम राहिला. या वर्षी रामनदच्या सेतुपतीविरुद्ध पदुकोट्टइ तोंडमान यानें बंड केलें म्हणून तें मोडण्याकरितां जात असतां वाटेंत सेतुपति मरण पावला; तेव्हां रामनदच्या मसनदीबद्दल तंटे उपस्थित झाले. शेवटीं रामनदच्या प्रदेशाचे विभाग होऊन एक तंजावरकडे गेला व दुसरा पूर्वीच्या सेतुपतीच्या हक्क सांगणाऱ्या वारसांपैकीं जो विजयी झाला त्यास मिळाला. हा प्रांत म्हणजे शिवगंगा प्रांत होय. हा नायक इ. स. १७३१ मध्यें निपुत्रिक मरण पावला.

मीनाक्षी ( १७३१-१७३६ )—विजयरंग चोक्कनाथ याच्या विधवा राणीनें बंगारु तिरुमल याचा पुत्र दत्तक घेतला. परंतु तो स्वतःच राज्यावर हक्क सांगूं लागला. त्याच्या पक्षानें

त्रिचनापल्ली येथें राणीस ठार मारण्याचा बेत केला, परंतु तो फसला. स. १७३४ मध्यें सफदर अल्लीखान याच्या आधिपत्याखालीं मुसुलमानांनीं ह्या प्रदेश व त्याप्रमाणेंच तंजावर, त्रावणकोर, व सर्व पश्चिम किनारा उध्वस्त करून टाकला. वंगारु तिरुमल यानें सफदरअल्लीच्या साहाय्यानें आपण राजा म्हणून जाहीर केलें, तेव्हां राणीस भीति वाटून तिनें पुष्कळ द्रव्य देऊन चंदासाहेब यास वश करून घेतलें. तेव्हां वंगारु तिरुमल हा मदुरा येथें निघून गेला. पुढें स. १७३६ मध्यें चंदासाहेब परत आला व राणीहि सर्व प्रकारें त्याच्या तंत्रानें कारभार पाहूं लागली. त्यानें वंगारु तिरुमल याच्याविरुद्ध दिंदिगल व मदुरा येथें सैन्य पाठविलें. त्या सैन्यानें विजय मिळवून मदुरेंत प्रवेश केला परंतु वंगारु तिरुमल हा शिवगंगा येथें पळून गेला. याप्रमाणें मदुरा शहर चंदासाहेब याच्या हातांत आल्यामुळें त्यानें राज्य बळकाविलें व मीनाक्षीनें निराशेनें आत्महत्या केली. याप्रमाणें मदुरा येथील हिंदु राज्याचा शेवट झाला. वंगारु तिरुमल यानें चंदासाहेब याच्याविरुद्ध साताऱ्याहून मराठ्यांची मदत मागितली. तेव्हां इ. स. १७३९ मध्यें रघुजी भोंसले यानें मोठें सैन्य घेऊन मदुरेवर स्वारी केली. त्यावेळीं मुसुलमानांची भयंकर कत्तल उडून त्यांचा पराभव झाला व दोस्तअल्ली हा मारला गेला. नंतर मराठ्यांनीं त्रिचनापल्लीस वेढा देऊन किल्ला सर केला व चंदासाहेब यास कैद करून नेलें ( १७४१ ). याप्रमाणें मदुरेचें राज्य अराजकतेस बळी पडलें.

नंतरची हकीकत.—त्रिचनापल्लीच्या किल्ल्यावर मराठ्यांनीं मुरारराव घोरपडे याची नेमणूक करून दुसरा एक सरदार मदुरा येथें कारभार पाहण्याकरितां नेमला होता. स. १७४३ मध्यें निझामानें स्वारी करून हा सर्व प्रदेश काबीज केला. निझामानें वंगारु तिरुमल यास आपल्या नियंत्रणाखालीं घेतलें परंतु त्याला लवकरच विषप्रयोग करण्यांत आला. त्याचा मुलगा मदुरा येथें परत आला परंतु त्यानें राज्य मिळविण्याचा मुळींच प्रयत्न केला नाहीं. स. १७४८ मध्यें महम्मदअल्ली यानें त्रिचनापल्ली घेऊन आपण अर्काटचा नबाब आहों असें जाहीर केलें. चंदासाहेब यानें फ्रेंचांच्या मदतीनें त्याच्याबरोबर युद्ध केलें. तेव्हां महम्मदअल्ली यानें इंग्रजांची मदत घेतली. चंदासाहेब हा विजयी झाला (१७५१). महम्मदअल्लीनें मदुरा घेण्याचा प्रयत्न केला व इंग्रजांनींहि त्यावर हल्ला केला परंतु त्यांस यश आलें नाहीं. पुढें मदुरा येथील सरदारानें तें शहर द्रव्य घेऊन म्हैसूरकरांच्या स्वाधीन केलें, तेव्हां इंग्रज परत आले व त्यांनीं तें शहर बळकाविलें. मदुरेवर रामनदच्या सेतुपतीनें त्यांना हांकून देऊन तेथील गादीवर मीनाक्षीच्या दत्तक मुलास बसविलें ( १७५३ ). नंतर २ वर्षें सर्वत्र अव्यवस्था होती. इसवी सन १७५५ मध्यें महम्मदअल्ली यानें इंग्रजांच्या मदतीनें पुन्हां मदुरेवर कांहीं सैन्य पाठविलें. तें सैन्य आल्याबरोबर शहर त्यांच्या हवालीं करण्यांत आलें. तेव्हां शहरांत गोरी शिबंदी ठेवून एका मुसुलमानास सुभेदार नेमण्यांत आलें. यानंतर बरेच घोंटाळे होऊन शेवटीं इ. स. १७५८ मध्यें मदुरा शहर महम्मदअल्लीकडे कायमचें गेलें. यानंतर कांहीं पाळेगार व कल्लण लोकांबरोबर बारीक सारीक युद्धें झालीं. इ. स. १७६० मध्यें हैदरअल्ली यानें मदुरा व तिनेवेल्ली हीं शहरें घेण्याचा प्रयत्न केला पण तो फुकट गेला. येथील सुभेदार महम्मद युसुफ यानें सर्व पाळेगारांपासून व त्रावणकोरपासून खंडणी वसूल केली व रामनद आणि शिवगंगा हे प्रांत लुटले. परंतु त्यानें सर्व पैसा स्वतःच ठेवून घेऊन इंग्रजांस अथवा महम्मदअल्लीस कांहींच न दिल्यामुळें त्याला धरून राजद्रोही म्हणून फांशीं दिलें ( १७६३ ). नंतर दुसरा सुभेदार नेमून त्याच्या दिमतीस व त्यावर देखरेख ठेवण्याकरितां कांहीं इंग्रज अधिकारी नेमले. याप्रमाणें स. १७७२ पर्यंत व्यवस्था चालली. नंतर स. १७८० मध्यें हैदरनें कर्णाटकवर स्वारी केली व त्याच वेळीं पाळेगारांनींहि बंड केलें. स. १७८३ मध्यें कर्नल फुल्लरटन यानें सैन्य घेऊन जाऊन सर्व प्रदेशावर अम्मल बसविला. यानंतर या प्रदेशाचा कारभार इंग्रज स्वतःच पाहूं लागले. १७९० सालीं मदुरा येथें इंग्रजांनीं पहिला कलेक्टर नेमिला.

मनूची.—यानें नायक घराण्याच्या संस्थापनेची व्हीलर पेक्षांहि निराळी माहिती दिली आहे. तो म्हणतो, २०० वर्षांमागें रामराजा नांवाचा अत्यंत उदार राजा होऊन गेला. तो इतका उदार असे कीं, त्याच्याजवळ मागितलेली कोणतीहि वस्तु मागणाऱ्याला ती त्याच्याकडून मिळाल्याशिवाय रहात नसे. त्याच्या या उदार स्वभावामुळें त्यानें आपल्या राज्यापैकीं निरनिराळ्या भागांचा कारभार आपले नोकर व गुलाम यांजकडे देऊन टाकला; आणि स्वतःकडे फारच थोडा मुलुख ठेवला. यानंतर थोड्याच अवधींत नायकांनीं बंड करून कांहींनीं मदुरा देश बळकावला व दुसऱ्यांनीं, तंजावर, म्हैसूर, वगैरे भाग आपल्या ताब्यांत घेतले; व रामराजाच्या मृत्यूनंतर ते स्वतःस राजे म्हणवून घेऊं लागले.

नायकांच्या राज्यपद्धतींतील विशेष.—नायक घराण्याच्या संस्थापनेचा इतिहास कसाहि असला, तरी दक्षिण हिंदुस्थानच्या इतिहासांत, नायक घराण्याची स्थापना बरीच महत्त्वाची आहे. कारण पुढील २ शतकें कावेरीपासून कन्याकुमारीपर्यंत व पश्चिम घाटापासून सिलोनपर्यंत सर्व मुलुख विश्वनाथाच्या वंशांतील पुरुषांकडे होता. ते सर्वच असामान्य होते असें नाहीं; परंतु त्यांच्या अंमलाखालीं आलेल्या सर्व ठिकाणीं त्यांचीं स्मृतिचिन्हें असून, त्यामुळें हिंदी कलेच्या इतिहासांत त्यांचें नांव अजरामर राहील. त्यांनीं बांधलेलीं असंख्य देवालयें, इमारती, धर्मशाळा, तळीं व गांवें हीं त्यांच्या औदार्याची, व त्यांनीं तयार केलेल्या किल्ल्यांच्या मालिका या अद्यापहि त्यांच्या लढवय्येपणाची साक्ष पटवितात. परंतु पुष्कळ वेळां त्यांच्या ह्या शिल्पविषयक आवडीमुळें लोककल्याणाकडे त्यांचें असावें तितकें लक्ष नसे. त्यांच्या अंमदानींत जबर कर असत व लोकांची

मालमत्ता सुरक्षित नसे. दोनशें वर्षांच्या अवधींत, ज्यांत युद्धाची धामधूम चालू नाहीं असें एकहि दशक गेलें नाहीं.तथापि नेल्सन म्हणतो त्याप्रमाणें, विश्वनाथासारखे मुत्सद्दी मधून मधून होऊन गेल्यामुळें राज्यव्यवस्था नेहमींच वाईट नसे; मात्र हिंदु धर्म आणि हिंदु संस्कृति यांची त्यांनीं केलेली सेवा बिनमोल होती.

पा ळे गा र प द्ध ति.—मदुरेच्या नायक घराण्यांतील पहिला राजा विश्वनाथ यानें आपल्या राज्यांत पाळेगारपद्धति ( प्रथम ? ) सुरू केली. जमीन वांटणाऱ्या कुळांच्या वर्गाखेरीज इतर बाबतींत ही पद्धत पुष्कळ अंशीं यूरोपांत मध्ययुगांत चालू असलेल्या फ्यूडलपद्धतीसारखीच होती. बहुधां दहा अथवा बारा गांवांचा एक याप्रमाणें सर्व राज्याचे भाग केलेले होते. या भागांनां "पाळयम्" असें नांव असून प्रत्येक "पाळयम्" वर एकेक पाळेगार नेमलेला असे. त्यांनां आपल्या उत्पन्नाचा तिसरा हिस्सा राजाला खंडणीदाखल द्यावा लागे, व ऐपतीप्रमाणें जवळ सैन्य ठेवून राजा बोलावील त्यावेळीं त्याच्या मदतीस जावें लागे. पाळयम्‌मधील प्रजेच्या संरक्षणाची सर्व जबाबदारी पाळेगारांवर असून पाळयम्‌च्या आसपास असलेल्या राजाच्या गांवांतील लोक व त्यांची मालमत्ता हीं सुरक्षित ठेवण्याचें, म्हणजे फौजदाराचें ( कावलगार ) कामहि केव्हां केव्हां त्यांच्याकडे असे. ही योजना फार शहाणपणाची व फायदेशीर होती. कारण तीमुळें पाळेगारांनां राजाच्या गांवांत दरवडे वगैरे घालतां येत नसत, येवढेंच नव्हे तर, त्या गांवांच्या सुरक्षितपणाची जबाबदारीहि त्यांच्यावर असे. परंतु हें काम त्यांनां मोफत करावें लागत असे, असें नाहीं. कावलगार किंवा फौजदारी कामाबद्दल, ज्या गांवांची फौजदारी त्यांच्याकडे असेल त्या गांवांत एक प्रकारचा कर वसूल करण्याची परवानगी त्यांनां असे, किंवा त्या भागांत वंशपरंपरागत कांहीं जमिनी त्यांनां दिलेल्या असत. फौजदारी काम चांगल्या रीतीनें पार पाडण्याकरतां पाळेगार आपल्या हाताखालीं प्रत्येक गांवांत "तलयारी" नेमी; त्या वेळच्या चालीप्रमाणें गांवांत एखादी चोरी होऊन चोरीचा माल परत न मिळाल्यास त्याबद्दल त्यांनां भरपाई करून द्यावी लागे.

पाळेगारपद्धतीपासून १६ व्या शतकांत पुष्कळ फायदा झाला. पाळेगारांनीं जंगल साफ करून बरीच जमीन लागवडीखालीं आणली; व हिंस्र पशूंचें भय कमी केलें.निर्जन ठिकाणीं वसाहती केल्या, ज्या जातींचा कारभार अव्यवस्थितपणें चालला होता त्यांच्यांत सुरळितपणा आणला,व देशाच्या प्रत्येक भागांत सुधारणेचा अंमल प्रस्थापित केला.ह्या पद्धतींत कांहीं तोटेहि होते. त्यांपैकीं मुख्य म्हणजे, पाळेगारांच्या आजूबाजूचा प्रदेश साधारणतः दुर्गम असल्यामुळें राजापासून स्वतंत्र होण्याची प्रवृत्ति त्यांच्यांत उत्पन्न होत असे; व राजा दुर्बल असल्यास ते त्याचा फायदा तावडतोब घेत. [ इंडि. अँटि. मा. १०, ३५, ४३; बर्नेल–साउथ इंडियन पॅलिओग्राफी; नेल्सन–मदुरा कंट्री: साउथ इंडियन डिनॅस्टीज ].

**नायगाराफाल्स शहर**—अमेरिका, न्यूयॉर्कमधील नायगारा विभागांतलि एक शहर, हें नायगारा नदीच्या पूर्वकिनाऱ्यावर धबधब्यालगत वसलेलें असून याची एकंदर लोकसंख्या सुमारें १९००० आहे. त्यांपैकीं ७००० परकीय आहेत. येथील कांहीं इमारती(नायगाराफाल्स मेमोरियल हॉस्पिटल, फेडेरल बिल्डिंग्ज, वगैरे ) प्रेक्षणीय आहेत. त्याचप्रमाणें 'कार्नेजी' वाचनालय, 'नायगारा विश्वविद्यालय,' रोमन कॅथॉलिकांची एक संस्था, वगैरे प्रसिद्ध आहेत. शहराच्या नैर्ऋत्य बाजूस एक उद्यान ( पास्पेक्टपार्क ) पहाण्यासारखें आहे. व्यापाराच्या दृष्टीनें शहर महत्त्वाचें असून येथें बरेच कारखाने चालतात. या कारखान्यांत प्रतिवर्षी अंदाज दीड कोटी डॉलर किंमतीचा माल तयार होतो. हें शहर नायगारा तालुक्याच्या पश्चिम भागांत नाव्यस्थलांत मुख्य ठिकाण आहे. शहराशीं बऱ्याच रेल्वेंचें दळणवळण आहे. नायगारा धबधब्यामुळें शहरास, एक प्रकारचें महत्त्व आलें आहे. धबधब्यापासून विद्युत्‌शक्ति निर्माण करतात.

**नायगांव रेबई**—मध्यहिंदुस्थान, बुंदेलखंड एजन्सीच्या सत्तेखालीं असणारें एक संस्थान. क्षेत्रफळ १२ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) २३९३. येथील जहागिरदार जातीनें अहीर आहे. पूर्वी हें जैतपूर संस्थानांत मोडत असे. लछमनसिंगला ब्रिटिशांनीं आपलासा करून त्याला इ. स. १८०७ मध्यें ५ गांवांची सनद दिली. याच्यानंतर त्याचा मुलगा जगत्‌सिंग व त्याच्या नंतर त्याची बायको लरइदुल्हया ही सरकारच्या परवानगीनें कारभार पाहात असे. हिनें कुंवर विश्वनाथला दत्तक घेतलें. हे सध्यां राजे आहेत. या संस्थानांत ४ खेडीं आहेत.

**नायगेरिया**—पश्चिम आफ्रिकेंतील एक ब्रिटिश संरक्षित वसाहत. नायगर नदीकांठचा प्रदेश व नायगर चॅड सरोवर यांमधील प्रदेश या संस्थाननें व्यापिला आहे. यांत फ्युला साम्राज्य व बोर्कूचा बराच मोठा भाग यांचा समावेश होतो. या संस्थानाचें क्षेत्रफळ सुमारें ३३६ हजार चौरस मैल आहे.या देशाचे स्थूलमानानें तीन विभाग करतां येथील:-(१) नदीमुखाजवळचा प्रदेश, ( २ ) अरण्यें, व ( ३ ) डोंगर पठार. नदी मुखाजवळील प्रदेश हा फार दलदलीचा आहे. या प्रदेशापलीकडे गेलें म्हणजे कोरडी जमीन लागते. ही जमीन अरण्याच्छादित असून हळू हळू उंच उंच होत जाते. ही डोंगर पायथ्याची जमीन होय. या ठिकाणीं फारच विरळ झाडी आहे. संस्थानांत नायगर नदीस आगस्ट व सप्टेंबर महिन्यांत महापूर येतो.

हा देश उष्णकटिबंधांत वसला आहे. किनाऱ्यालगतच्या भागाची हवा अत्यन्त रोगकारक आहे. जुलैपासून आक्टोबरपावेतों अतिशय पाऊस असतो. डोंगरपठारावर पाऊस

फार कमी पडतो. कोड हा येथील सर्वसाधारण रोग आहे. विशेषतः अन्तर्भागांतील शहरांत याचें प्राबल्य फार आहे.

र हि वा शी.—नायगेरियाची लोकसंख्या अंदाजें १६५००००० आहे, पैकीं सुमारें २७०० यूरोपीयन आहेत. नदीमुखप्रदेश व वनप्रदेश या ठिकाणीं नमुनेदार निग्रो लोक पहावयास मिळतात. किनाऱ्यावर जेकाय, आयजॉस, ऐव्हॉक, ॲरॉस वगैरे राष्ट्रजाती राहतात. या सर्व जाती वन्यधर्मीय आहेत. एफिक्स नांवाची जी एक राष्ट्रजात आहे, तिनें यूरोपीयन रीतिरिवाज उचलले असून तिच्यांतील सुशिक्षित लोक सरकारी नोकरींत आहेत. या लोकांची एगबो म्हणून एक गुप्त संस्था आहे. प्रत्येक राष्ट्रजात निराळी भाषा अथवा प्रांतभाषा बोलते. दिव्य करून निवाडा देण्याची चाल व घरगुती गुलामगिरी यांच्यांत असून या प्रतिष्ठित संस्था मानण्यांत येतात. उत्तर नायगेरियांतील महत्त्वाची राष्ट्रजात म्हणजे हौसा ही होय. १३ व्या व १४व्या शतकांत यांच्यातील वरिष्ठ वर्गाच्या लोकांनीं मुसुलमानी धर्म स्वीकारला. यांची राज्यव्यवस्था फार सुधारलेली असून, यांच्या न्याय व वसुलाच्या घटनेवरून यांची कार्यक्षमता दिसून येते. १९ व्या शतकाच्या सुमारास फ्युला या मुसुलमान जातीनें हौसा राष्ट्र-जातीचा मुलूख जिंकला. नायगर व बेन्यु नद्यांच्या तीरांवरून निग्रो व मूर्तिपूजक लोक राहतात. यांपैकीं मुन्शी, बत्ता व योराधम या मुख्य जाती होत.

शे ती व व्या पा र.—खरा शेतीचा धंदा उत्तरेकडील सपाटीच्या प्रदेशांत व नदीखोऱ्यांतून चालतो. पुष्कळ भागांत गव्हाचें व तांदुळाचें पीक होतें. रताळीं, भुईमूग, कांदे, यांचें पिक बरेंच येतें. नीळ व कापूस हे जिन्नस तर सर्वत्र उत्पन्न होतात. ताडाचें तेल, रबर, कोको, इमारतीचें लांकूड इत्यादि निर्गत व्यापाराचे मुख्य जिन्नस होत. रबर ही निर्गत व्यापारी दृष्टीनें अत्यन्त महत्त्वाची वस्तु आहे. उत्तर नायगेरिया हें कापसाच्या लागवडीस उत्कृष्ट स्थळ आहे असें दिसून आल्यामुळें कापसाचें पीक जेणेंकरून जास्त वाढेल व किफायतशीर होईल असे प्रयत्न चालू आहेत. ग्रेटब्रिटनमधून या ठिकाणीं सुती सामान व लोखंडी सामान येतें. १९१७ सालीं नायगेरियांत ९७५ मैलांचा आगगाडी-रस्ता होता. लॅगॉस ते झारियापर्यंत एक बोटगाडी जाते.

इ ति हा स.—नायगेरियाचा किनारा पोर्तुगीजांनीं १५ व्या शतकांत शोधून काढला. नदीमुखप्रदेशांत पोर्तुगीजांनीं व्यापारी वखारी घातल्या, ब्रिटिश व्यापारी १७ व्या शतकांत या ठिकाणीं आले व १८ व्या शतकाच्या अखेरीस सबंध व्यापार त्यांनीं एकटयांनींच काबीज केला. १८०५ त मंगोपार्क यानें नायगर नदीचा सेगुपासून बुसापर्यंतचा भाग शोधून काढला.

डॉ. बार्थ यानें १८५२-५५ सालीं नायगेरियाच्या अन्तर्भागांत प्रवास करून त्या भागाची माहिती पुस्तकरूपानें संकलित केली. लोकोजा येथें ब्रिटिश वकील ठेवण्यांत आला. १८६१सालीं ब्रिटिशांनीं लॅगॉस बेटाचा ताबा घेतला. १८६५ सालीं लोकोजा येथील वकिलात बंद करण्यांत आली, पण ती फिरून लवकरच सुरू करण्यांत आली. १८८० सालीं फ्रान्सनें नायगरच्या खालच्या भागांत दोन व्यापारी पेढ्या स्थापल्या. यांत फ्रान्सचा हेतु, आपला वोज सेनिगालपासून आंतलि भागापर्यंत वाढावा असा राजकीय स्वरूपाचा होता. नायगर नदीवर एक ब्रिटिश प्रांत स्थापन करण्याच्या हेतूनें स. १८७९ मध्यें एक युनायटेड आफ्रिकन कंपनी काढण्यांत आली. या कंपनीनें आपला व्यापार इतक्या झपाटयानें वाढविला कीं, फ्रेंच पेढ्यांची चलती कमी होऊन, फ्रान्सला त्या १८८४ सालीं वरील कंपनीला विकाव्या लागल्या. फ्रान्सला याप्रमाणें हुसकावून लावल्यावर १८८५ सालीं 'आईल रिव्हर्स' म्हणून प्रसिद्ध असलेल्या किनाऱ्यालगतचा प्रदेश ब्रिटिश संरक्षणाखालीं घेण्यांत आला. १८८६ सालीं युनायटेड आफ्रिकन कंपनीस बादशाही सनद मिळून तिचें रॉयल नायगर कंपनींत रूपांतर झालें. 'ऑईल रिव्हर्स' किनाऱ्यावरील प्रदेश या कंपनीच्या अंमलाखालीं देण्यांत आला. १८८६-९३ सालीं नायगेरिया व कामेरूनमधील सरहद्द आंखण्यांत आली. १८९०-९८सालीं नायगेरियाच्या उत्तर व पश्चिम सरहद्दीवरील फ्रेंच व ब्रिटिश मुलुखाच्या मर्यादा ठरविण्यांत आल्या.

ग्रेटब्रिटनची सत्ता आंतलि भागावर प्रस्थापित करण्याच्या प्रश्नाकडे आतां कंपनी वळली. स. १८९७ त कंपनीच्या सैन्यानें न्यूपवर चाल करून तेथील अमीरास पदच्युत केलें व तो मुलुख कंपनीच्या सत्तेखालीं आणला. निश्चिन्त मनानें कंपनीनें आपलें सैन्य परत नेलें तोंच मागें पदच्युत झालेल्या अमीरानें आपलें राज्य पुन्हां बळकाविलें.

इंग्लंड व फ्रान्स यांच्यामधील पश्चिम सरहद्दीवरील संबंध जाचूं लागल्यामुळें एवढया मोठ्या अफाट प्रदेशाची जबाबदारी व्यापारी कंपनीकडे राहूं देणें साम्राज्यसरकारास धोक्याचें वाटून नायगेरिया प्रत्यक्ष राणीसरकारच्या अंमलाखालीं घेण्याचें ठरलें. त्याप्रमाणें १९०० सालच्या जानेवारीच्या पहिल्या तारखेस कंपनीनें आपले अधिकार राणी सरकारच्या स्वाधीन केले. यापुढें नायगेरियाचे दोन विभाग करण्यांत येऊन प्रत्येक विभागाला ' प्रोटेक्टोरेट ऑफ सदर्न नायगेरिया ' व ' प्रोटेक्टोरेट ऑफ नार्दर्न नायगेरिया ' अशीं नांवें देण्यांत आलीं.

कंपनीनें आपल्या हयातींत दोन कायदे करून ठेवले होते; एक गुलामगिरीच्या बंदीविषयीं (१८९७), व दुसरा दारूच्या व्यापाराच्या बंदीसंबंधीं. स. १८९७ मध्यें बेनी लोकांचा देश दक्षिण नायगेरियास जोडण्यांत आला कंपनीनें आपले अधिकार राणीसरकारास दिल्यानंतर कॉंटागोरा व न्यूप येथील अमीरांच्या कुरापती धोरणास आळा घालण्याचें काम ब्रिटिश सरकाराकडे आलें. स. १९०१ मध्यें येथील अमीरांस पदच्युत करण्यांत येऊन त्यांच्या जागीं नवीन अमीर बसविण्यांत

आला. यानंतर एकामागून एक असे सर्व नेटिव्ह प्रांत ब्रिटिशांस शरण आले. प्रत्येक प्रांतांत ब्रिटिश रेसिडेंट नेमण्यांत आले. स. १९०१ मध्यें योला येथील अमीरास पदच्युत करण्यांत येऊन त्याच्याहि जागीं नवीन अमीरास बसविण्यांत आलें. याप्रमाणें हळू हळू सर्व अमीरांस त्यांच्या अधिकारावरून काढण्यांत येऊन त्या सर्वांच्या जागांवर ब्रिटिशांनीं आपलीं बाहुलीं बसविलीं. सोकोटो, गांडो, कानो, हीं मुसुलमानी राज्यें स्वतंत्र राखण्यांत आलीं होतीं, पण १९०१ सालीं कानो व सोकोटोवर स्वारी करण्यांत येऊन या दोन मुसुलमानी राज्यांचा पराभव करण्यांत आला व ब्रिटिश वर्चस्वाचा झेंडा सबंध नायगेरियावर अप्रातिहतपणें फडकूं लागला.

राज्यव्यवस्था.—सरकारी नोकर व सर्व एतद्देशीयेतरांकरितां एक वरिष्ठ न्यायासन असे. सबंध देशाचे १७ प्रांत पाडलेले असून प्रत्येक प्रांतांत एका रेसिडेंटाच्या अध्यक्षतेखालीं दिलेलें प्रांतिक न्यायासन असे. एक फौजदारी कायदेसंग्रह तयार केला होता. मुख्य मुख्य एतद्देशीय शहरांच्या ठिकाणीं एतद्देशीय न्यायपीठें असत. या न्यायपीठांचें अध्यक्षपद मुसुलमान कायदेपंडित अथवा अमीर यांजकडे असे. या न्यायासनांवरून एतद्देशीय कायद्याप्रमाणें व रिवाजाप्रमाणें निवाडे देण्यांत येत. या न्यायासनांचे फौजदारी अधिकार फारच आकुंचित असत, पण दिवाणी दाव्यांत त्यांनां पूर्ण वाव असे. मृत्यूची शिक्षा द्यावयाची झाल्यास या न्यायपीठांनां रेसिडेंटाची अनुमति घ्यावी लागत असे. फ्युलानी वंशांतलि बंडखोर अमीरांचा बीमोड करून, त्यांच्या जागीं आपले हस्तक अमीर बसविल्यानंतर जमिनीचा मालकी हक्क त्या वंशापासून काढून ब्रिटिश सरकारनें आपल्याकडे घेतला. त्याचप्रमाणें खनिज द्रव्याचाहि सर्व हक्क इंग्रज सरकारनें आपल्याकडे राखून ठेविला. कायदेशीर गुलामगिरीस पायबंद घालण्यांत आला. राज्यकारभाराच्या सोयीकरितां प्रथम देशाचे सतरा विभाग पाडण्यांत आले. पण ही व्यवस्थाहि पुढें बदलण्यांत आली. इलोरीन, न्यूल व काबा यांचा मिळून एक प्रांत करण्यांत आला. स.१९०६ मध्यें लॅगॉस व दक्षिण नायगेरिया हे प्रांत एकत्रित करण्यांत येऊन एकाच शासनसत्तेखालीं घेण्यांत आले. स.१९१४त उत्तर व दक्षिणनायगेरिया प्रोटेक्टोरेट यांचा "कॉलनी अँड प्रोटेक्टोरेट ऑफ नायगेरिया" या नांवाचा एक संघ बनविण्यांत आला, व त्यावर एक गव्हर्नर-जनरल नेमला. सांप्रत लॅगॉस हें मध्यवर्ती सरकारचें ठाणें आहे. [ बर्न्स—हँडबुक ऑफ नायगेरिया; लिओनार्ड–दि लोअर नायगर अँड इट्स ट्राइब्स; टॅमर्जि–दि नायगर अँड दि वेस्ट सूदन; वार्षिक अहवाल. ]

**नायडस** ( आधुनिक–टेकिर ).— हें प्राचीन शहर आशियामायनरमध्यें सॉसच्या आखाताच्या दक्षिणेस असलेल्या द्वीपकल्पाच्या टोंकावर वसलेलें होतें. याचा कांहीं भाग ट्रिओपियन बेटांत होता. अफ्रोडाइट नांवाचा प्रॅक्झीटेलेसनें (वडील) केलेला पुतळा नायडस येथें ठेवण्याकरितां होता. डिमेटरचा पुतळा येथेंच सांपडला.

नायडस हें फार प्राचीन शहर होतें व लॅसेडी मोनियन वसाहत येथेंच असावी. ह्या शहरांत ६० सभासदांची अल्पजनसत्ताक सभा ही राज्यकारभार चालवीत असे. परंतु या राज्यघटनेंत लोकमताप्रमाणें फरक होत गेला. व्यापाराला हें शहर फार सोईचें होतें व पुढें हें बरेंच संपत्तिमानहि झालें. प्रथम सायरसच्या ताब्यांत हें शहर गेलें. युरिमिडन युद्धापासून पेलोपोनेशियन युद्धापर्यंत हें अथेनियन लोकांच्या ताब्यांत होतें. इ. स.पूर्वी ३९४त कॉनानच्या युद्धांत स्पार्टन घुरीणत्व येथेंच नाहींसें केलें. येथें रोमन स्वामित्व फार लौकर स्थापित झालें. बायझंटाइन काळीं येथें बरीच लोकवस्ती असावी. ज्योतिषी युडोक्सस, इराणी इतिहासलेखक टेसिअस, व अलेक्झांड्रिया येथील प्रसिद्ध फेरो बांधणारा सोस्ट्रेटस हे येथील रहिवासी इतिहासप्रसिद्ध आहेत.

**नायडू**—बोया, कापू, गोल्ला वगैरे मद्रासी तेलगू जातीचे लोक आपल्यास नायडू असें म्हणवून घेतात. तामिळी माणूस नायडू म्हणविणाऱ्या तेलगू माणसासंबंधानें बोलतांना त्याला नाइकर किंवा नाइकन असें संबोधितो. मुंबई इलाख्यांत पुणें व बेळगांव या भागांत कांहीं कारकुनी पेशाचे नायडू आहेत.

**नायर**—मलबार किनाऱ्यावरील शूद्र लोकांत बहुतेक भरणा नायरांचाच आहे. अंबलवासींच्या खालोखाल या नायरांनां मान मिळतो. "नायर" हें नांव संस्कृत "नायक" शब्दापासून बनलें असावें असें म्हणतात. कोणी नायर हा नागर शब्दाचा अपभ्रंश आहे असें मानतात. नायरांची एकंदर लोकसंख्या ( १९११ ) ११२९४६६; या पैकीं त्रावणकोर संस्थानांत ५९२६५५, मद्रास ४१२६१८व कोचीन संस्थानांत १२१९९१ आहेत. पूर्वी हे क्षत्रिय होते पण १०० वर्षे अखंड शांततेंत राहिल्यानें त्यांचें क्षात्रतेज बहुतेक नष्ट झालें आहे. परंतु त्यांचे खेळ, पदव्या व इतर गोष्टींवरून त्यांच्या क्षात्रतेजाचा अल्पांश अद्यापहि दिसतो. यांच्या उत्पत्तीसंबंधानें अनेक कथा आहेत. केरळमाहात्म्यांत नंबुद्रि ब्राह्मण व देव, गंधर्व आणि राक्षस बायका यांच्या संयोगापासून ही जात झाल्याचें सांगितलें आहे. फासेट, लोगन यांच्यासारखे आधुनिक यूरोपीयन संशोधक यांचा संबंध उरिया किंवा पल्लव क्षत्रिय जातीशीं लावितात. कसेंहि असलें तरी एका द्राविडी जातीवर ब्राह्मण संस्कृतीचा पगडा बसून ही जात तयार झाली असें म्हणावयास हरकत नाहीं.

आज बऱ्याच गोष्टींत नायरांची प्रगति दिसत आहे. इंग्रजी शिक्षणाचा बराच प्रसार त्यांच्यामध्यें झाला असून ते सर्व बौद्धिक कामांमध्यें (मोठ्या प्रमाणांत) आढळून येतात. तथापि नायर लोकांतील बराच मोठा भाग गरीब शेतकऱ्यांचा व शेतावर काम करणाऱ्यांचा आहे. त्यांच्यामध्यें कांहीं लोक मोठे शेतकरी व जमीनदार आहेत. मलबारांतील सुखवस्तु

असणाऱ्या हिंदु कुटुंबांत बहुतेक नायर जातीचे लोक नोकर आहेत.

नायर लोकांमध्यें पुष्कळ पोटजाती आहेत. ब्रिटिश मलबार, कोचीन व त्रावणकोरमध्यें त्या पोटजातींनां निरनिराळीं नांवें आहेत. उदाहरणार्थ, सर्वांत श्रेष्ठ पोटजातीस मलबारमध्यें किरियम असें म्हणतात. तिलाच कोचीनमध्यें वेलयमा असें म्हणतात. यांशिवाय हलके नायर हे नंबुद्रि ब्राह्मणांच्या घरांत कांहीं घरगुती व कांहीं धार्मिक कामें करतात. धार्मिक काम करणाऱ्या शूद्र नायरास इलत्तुनायर व घरगुती काम करणाऱ्यांस स्वरुपत्तिलनायर असें म्हणतात. चारण नायर हे राजे, महाराजे यांच्या पदरीं नोकर असतात. पालिचन हे राजे व ब्राह्मण यांच्या पालख्या वाहून नेतात आणि वदेकदन हे देवळांत व नंबुद्रि ब्राह्मणाच्या घरीं तेल आणून देतात. ओदत्तुनायर हे घरें शाकारतात. आंदरु नायर हे मातीचीं भांडीं बनवितात. आणि आत्तकुरुमु नायर इतर नायर लोकांच्या उपाध्यायाचें काम करितात. या मुख्य पोटजाती होत; प्रत्येक पोटजातीमध्यें आणखी पुष्कळच भेद आहेत. प्रत्येक नायर आपल्या नांवापुढें पदवी लावतो, ती त्यास मिळालेली असते किंवा वंशपरंपरागत आलेली असते. ज्यांनां कोणतीहि पदवी नसते ते आपल्या नांवापुढें नुसतें नायर असें लावतात.

अच्चना करटा, कैमल, व नम्बदियिर या सरदारांच्या पदव्या असून पनिकल, कुरुप, आणि कुरुप्पल या पदव्या, लष्करी शिक्षणाच्या शाळा वंशपरंपरागत चालविणाऱ्यांच्या आहेत. बौद्धिक काम करणाऱ्या नायर लोकांची सर्वसाधारण पदवी 'मेनन' ही होती परंतु ती आतां मध्यम स्थितींतल्या लोकांमध्यें सर्वसाधारण उपयोगांत येत आहे.

हिंदुस्थानांतील अति सुंदर जातींपैकीं नायरांची एक जात आहे. यास कारण त्यांचा प्रदेश व रहाणी हेंच असेल. नायर स्त्रीपुरुष दोघेहि फार स्वच्छ असतात. पण हे काटक मात्र नाहींत. ते कपडे फार कमी वापरतात पण जे वापरतात ते फार स्वच्छ असतात. यांचीं घरें एकमेकांपासून तुटक व लांकूड आणि नारळाच्या झांवळ्या यांचीं केलेलीं असतात पण तीं टिकाऊ, आरोग्यकारक व नीटनेटकीं असतात.

ओनम हा यांच्यांतील महत्त्वाचा सण आहे. हा सण गरीब-श्रीमंत सर्व पाळतात. या सणांत धनुष्यबाणांचें महत्त्व असतें. नायरांत अनुलोमविवाहाची पद्धत आहे. या जातींत लग्नाचे दोन प्रकार आहेत-तालिकेट्टु व संबंधम्. पहिला कौटुंबिक व सार्वजनिक स्वरूपाचा असून दुसरा खासगी वैयक्तिक देवघेवीचा प्रकार आहे. दोन्हीहि प्रकार सारखेच गंभीर रीतीनें व धार्मिक विधीनें पार पाडावयाचे असतात. पहिल्या प्रकारानें मुलगी विवाह्य झाली असें मानावें. ताली ( मंगलसूत्र ) बांधण्याकरितां एखादा तात्पुरता नवरा बघतात. कधीं कधीं एकाच वेळीं तो अनेक मुलींच्या गळ्यांत ताली बांधून हा समारंभ उरकवितो. त्याला याबद्दल दक्षिणा मिळते. तालिकेट्टुचा समारंभ मोठा असतो. तालिकेट्टुविधि संपल्यानंतर मुलगी इच्छेस येईल त्याच्याबरोबर संबंधम् करिते. संबंधम् म्हणजे वस्त्रदानाचा विधि होय. संबंधम् ज्याच्याशीं झाला असेल त्याची ती खरी पत्नी होते. अशा रीतीनें प्रत्येक नायर स्त्रीचे दोन पती असतात. एक लग्न लावणारा व दुसरा शरीरसंबंध करणारा एक स्त्री अनेक बंधूंचीहि पत्नी होऊं शकते. नायराचे वारस अनुक्रमें त्याची आई, बहीण व तिचीं मुलें असतात; म्हणजे वारसा स्त्रियांकडे जातो.

नायर स्त्री आपल्या बापाच्या तरवाडीं( घरां )त रहाते. नवऱ्याच्या तरवाडींत रहात नाहीं. ब्राह्मणजातीप्रमाणें नायरजातहि खालच्या वर्गांचा विटाळ मानते. नायरांत नागपूजा विशेष आढळून येते. मलबार ही जादूची भूमि म्हणतां येईल तेव्हां नायर हे जादूटोण्यांवर विश्वास फार ठेवितात हे सांगावयास नकोच. नायरांतील धार्मिक व सामाजिक चालीरीती ब्राह्मणांप्रमाणेंच आहेत. तेव्हां त्यांचें वर्णन निराळें करण्याचें कारण नाहीं. शिक्षणाच्या बाबतींत नायर लोक फार पुढें आहेत. विशेषतः इकडील विस्तृत स्त्रीशिक्षण कोठल्याहि प्रांतांत दिसून येणार नाहीं. आपल्या मल्याळी मातृभाषेखेरीज संस्कृत भाषाहि नायर विद्यार्थी शिकतात. इंग्रजी शिक्षणांत तर ते फार पुढें गेलेले दिसतात. ( 'नंबुद्रि' व ' मलबार ' पहा. )

[ संदर्भग्रंथः—मद्रास गव्हर्मेंट म्यूझियम बुलेटीन, पु. ३ नं. १ व ३; सेन्सस रिपोर्ट, १९०१, पु. २६ व १९११, पु. २३; मलबार ग्याझेटीयर; फासेट-नायर (ए. रि. ए. मधील लेख ); नागमअय्या-त्रावणकोर स्टेट मॅन्युअल. ]

**नायसिआ** ( आधुनिक-इस्निक )—हें आशियामायनरमधील प्राचीन शहर बिथिनियांत अस्कानिया सरोवरावर होतें. अँटीगोनसनें हें शहर वसविलें(इ.स. पूर्वी ३१६).लिसिमॅकसनें याचें अँटीगोनस हें नांव बदलून त्यास नायसिआ हें आपल्या पत्नीचें नांव दिलें. रोमन साम्राज्यांत नायसिआ व निकोमेडिआ या दोन शहरांपैकीं राजधानीचें शहर कोणतें करावयाचें याबद्दल वाटाघाट चालली होती. कान्स्टांटिनोपल, साम्राज्याची राजधानी झाल्यावर ह्याचें महत्त्व वाढलें. जेव्हां धर्मयोद्धयांनीं कान्स्टांटिनोपल घेतलें त्यावेळीं बायझन्टाईन सम्राट् येथें येऊन राहिला होता.शहराभोंवतालचा दुहेरी तट व रोमन दरवाजे अजून चांगल्या स्थितींत आहेत. शहराच्या मालकीबद्दल ग्रीक व तुर्क लोक यांचा बरेच दिवस झगडा होता. आटोमन अंमलांत ह्याचें महत्त्व कांहीं दिवस होतें परंतु पुढें तेंहि नाहींसें झालें.

**नायिका व नायक**—नायकाची जी मुख्य स्त्री तीस, किंवा नायकाप्रमाणें जी फलाधिकारिणी असते तीस नायिका म्हणतात. जसें शाकुंतल नाटकांत शकुंतला, रत्नावलींत सागरिका.नायिकेचे मुख्य ३ भेद आहेत ते असेः-(१)स्वीया; म्हणजे स्वस्त्री, (२) परकीया; म्हणजे परस्त्री, आणि

(३) साधारणी; म्हणजे वेश्या. ह्यांत आणखीहि पोटभेद आहेत ते असेः—

स्वी या.—(१) हिचे; पोटभेद (अ) मुग्धा, (आ) मध्या व (इ) प्रगल्भा असे आहेत. (अ) मुग्धाः—जिच्या यौवनास नुकताच आरंभ झाला आहे, जिचा क्रोध सौम्य असतो, रतीविषयीं जी पराङ्मुख असते आणि लज्जा जिला विशेष असते ती. (आ) मध्या; जिचा काम आणि यौवन हीं प्ररूढ असतात, जिला लज्जा थोडी असते, भाषणांत चतुरता असते ती. (इ) प्रगल्भा—जिचें तारुण्य पूर्ण, जी कामानें व्याप्त, रतींत कुशल, जिच्यांत लज्जा फारच थोडी ती. ह्यांशिवाय शृंगाररसांत अवस्थेनुरूप आणखी स्वीया नायिकेचे आठ भेद केले आहेत. ते असेः—

स्वाधीनपतिकाः–जिच्यावर पति फार आसक्त असतो ती.

खंडिताः—स्वपति अन्यस्त्रीसंभुक्त पाहून जी ईर्ष्येनें कुपित होते ती.

अभिसारिकाः—गुप्त रीतीनें रति करण्यास्तव जी कांताकडे संकेतस्थळीं जाते किंवा त्यास बोलाविते ती.

कलहांतरिताः—कांत अनुनय करीत असतांहि त्याचा अनादर करून मागून जी पश्चात्ताप पावते ती.

विप्रलब्धाः—कांतानें संकेतस्थळीं येण्याचा निश्चय केला असतां त्याप्रमाणें तो न आल्यामुळें जी अवमानित होते ती.

प्रोषितभर्तृकाः—जिचा पति दूरदेशीं गेल्यामुळें कामदुःखानें जी व्याकुल झालेली असते ती.

वासकसज्जाः—आज आपला पति येणार आहे अशा इच्छेनें क्रीडागृहांत अलंकारादिक घालून जी वाट पहात बसते ती.

विरहोत्कंठाः—पतीच्या संगमाचा निश्चय असतां पति लवकर न आल्यामुळें त्याच्याकरितां जी विरहव्याकुल होत्साती उत्कंठित होते ती.

(२) प र की याः—हिचे दोन भेद आहेत; एक दुसऱ्याची स्त्री, तिस परोढा असें सांकेतिक नांव आहे, व दुसरा, कन्यका म्हणजे जिचें लग्न झालें नाहीं ती; ही पिता इत्यादिकांच्या आधीन असते म्हणून हिचा परकीयांतच अंतर्भाव करतात.

(३) सा धा र णी.—म्हणजे वेश्या; ही सर्वत्र प्रसिद्धच आहे. ही अन्तःकरणापासून कोणावरहि अनुरक्त नसते. क्वचित् असली तर मात्र तीस रूपकांत नायिका मानितात. जसें—मृच्छकटिकांतील वसंतसेना. [साहित्यदर्पण, ९७–११२; रसमंजरी ३.९४ शिवाय 'नाटशास्त्र' पहा.]

ना य क.—रूपकांत वर्णिलेल्या मुख्य फलाचा जो अधिकारी असतो त्यास नायक असें म्हणतात. जसें शाकुंतल नाटकांत दुष्यंतराजा, रत्नावलींत वत्सराजा, उत्तररामचरितांत रामचंद्र हे त्या त्या रूपकांत वर्णिलेल्या फलांचे भोक्ते आहेत म्हणून हे त्या त्या रूपकांचे नायक होत. संस्कृतांत नायकाचे त्याच्या कुलावरून तीन आणि त्याच्या स्वभावावरून चार असे सात भेद केले आहेत.

(१) कुलावरूनः—दिव्य–देवतादिक. जसें पार्वतीपरिणय नाटकांत शंकर. अदिव्य–मनुष्यादिक. जसें शाकुंतलांतील दुष्यंतराजा. दिव्यादिव्य—देव असून ज्यांनीं मनुष्यावतार धारण केल्यामुळें ज्यांचें चरित्र मनुष्याप्रमाणें असतें तेः जसें उत्तररामचरितांतलि रामचंद्र. (२) स्वभावावरूनः–धीरोदात्त—जो स्वभावतः आत्मश्लाघा न करणारा, क्षमाशील, गंभीर, हर्षशोकादिकांनीं पराभूत न होणारा, अंगीकृताचा निर्वाह करणारा, गर्व न करणारा, असतो तो. जसें–रामचंद्र, युधिष्ठिर, नलराजा, दुष्यंतराजा इत्यादिक. धीरोद्धत—जो स्वभावानें धीट, कार्याच्या ठिकाणीं अस्थिर मति, कांहींसा कपटयुक्त, गर्विष्ठ, बलिष्ठ, आत्मश्लाघा करणारा असा असतो तो. जसें–भीमसेन. धीरललित–नाना प्रकारच्या कलांमध्यें निपुण, विलासी, चतुर, ज्यास थट्टा फार आवडते, अनेक प्रकारच्या युक्तींनीं कामें करणारा, नृत्यगायनाचा रसिक, शोकी असा जो पुरुष तो. जसें—श्रीकृष्ण, वत्सराज इत्यादि. धीरप्रशांत—वर सांगितलेले जे विशेष गुण ते नसून साधारण जे सभ्य मनुष्याच्या अंगीं गुण असतात त्या गुणांनीं जो युक्त असतो तो. जसें—मालतीमाधवांतील माधव.

ह्याशिवाय शृंगाररसांत स्त्रियांशीं जें नायकाचें वर्तन असतें त्यावरून आणखी नायकाचे चार भेद केले आहेत.

दक्षिणः—सर्व स्त्रियांवर सारखी प्रीति ठेवणारा.

धृष्टः—स्त्रीनें धिक्कार केला तरी लज्जा न बाळगतां समोर येणारा, आपले दोष स्त्रीस प्रत्यक्ष दिसले असतां खोटें बोलून ते लपविणारा, व अपराध करूनहि जो निःशंक असतो तो.

अनुकूलः—एकाच स्त्रीच्या ठायीं जो आसक्त असतो तो.

शठः—वरून वरून एकाच स्त्रीच्या ठायीं प्रीति दाखवून गुप्तरीतीनें विप्रिय आचरण करणारा.

हे भेद केवळ शृंगाररसापुरतेच आहेत.

येणेंप्रमाणें नायकाचे जरी भेद सांगितले आहेत तरी ह्यांहून अधिक भेद होण्याचा संभव आहे. रूपकांत जे अनेक प्रकार आहेत, त्यांमध्यें नाटक म्हणून जो एक प्रकार आहे त्यांत नायक उत्तम स्वभावाचाच असला पाहिजे असा नियम आहे. परंतु इतर प्रकारच्या कांहीं रूपकांत लबाड, कपटी, धूर्त अशा स्वभावाचे पुरुषहि नायक असतात. त्या ठिकाणीं त्यांचें चरित्र त्यांच्या स्वभावाप्रमाणेंच वर्णन करावें लागतें. [साहित्यदर्पण; दशरूप इ.]

**नार (पूर्वेकडील)**—मुंबई इलाखा, सिंध मधील एक महत्त्वाचा प्रवाह. याला सिंधुनदाची नैसर्गिक शाखा असें संबोधितात. येथें ब्रिटिश अंमलापूर्वी सिंधमधील पूर्वेकडील वाळवंटांत एक लहानसा प्रवाह होता. लेफ्टनंट फाइफच्या शिफारसीवरून १८५८–५९ सालीं सरकारनें रोहरी येथें १२ मैल लांबीचा कालवा बनविला.

इ. स. १७५४ ते ५८ पर्यंत नाराचा डावीकडील पक्का भाग जामराव मुखापासून हल्लींच्या थर कालव्याच्या टोंकापर्यंत बांधून काढला. इ. स. १८६० ते ६७ च्या दरम्यान मखीवेरपासून थारवेरपर्यंत म्हणजे ४० मैल लांब व १५० फूट ( सरासरी ) रुंद असा कालवा तयार केला. १८७६ते १८८६ पर्यंत हेंच काम थारनेरच्या पुढें चालू ठेवलें.इ. स. १८८४ त पहिल्यानेंच सरकारनें अल्लाबंड नांवाचा एक जमिनीचा, भूकंपापासून (१८१९ च्या) उद्भवलेला कडा थोडासा कापला. नार कालवा दक्षिणेकडे वहात असून प्रथम मीर व खैरपूर प्रदेश,नंतर थर व पारकर या जिल्ह्यांतून वहात जाऊन शेवटीं पुराणसिंधूच्या जुन्या प्रवाहाला मिळतो हा प्रवाह ८० मैलांनंतर कच्छचें रण येथें समुद्रास मिळतो.

ना रा पा सू न का ढ ले ले का ल वे.—जामराव ( ५८८ मैल ); मिथराव (लांबी २५५ मैल); थर (७२ मैल). हिरल ( ४१ मैल ). जामराव खेरीजकरून इतरांची किंमत १९०३–४ सालीं ६५·२७ लक्ष रुपये. होती.

जामराव हा स. १८९४–१९०२ त बांधला. हा थर, पारकर व हैद्रराबाद ( सिंध ) जिल्ह्यांनां पाणी पुरवितो. नारासप्लाय चॅनल व ईस्टर्न नारा व मिथराव हे मिळून ४२५ मैल लांबीचा प्रवाह बोटीनें जाण्यायेण्यासारखा आहे.

**नारद**—एक ऋषि. याच्यासंबंधीं वैदिक वाङ्मयांतील माहिती शब्दसृष्टि ( विभाग ३ ) या प्रकरणांत आलीच आहे. पुराणवाङ्मयांत नारद नांवाच्या अनेक व्यक्तींचा उल्लेख आढळतो. परंतु त्या सर्व व्यक्ती प्रसिद्ध नसून ज्यास ब्रह्मर्षि व ब्रह्मदेवाचा पुत्र म्हटलें आहे तोच नारद विशेष प्रसिद्ध आहे. नारद ही कलहप्रिय व्यक्ति असून तिनें लाविलेल्या कलहाच्या अनेक कथा पुराणांत आहेत. आणि याच गोष्टीचा फायदा घेऊन कांहीं व्यावहारिक भांडणासहि नारदाचा संबंध जोडण्याची प्रवृत्ति फार वाढली. पुराणवाङ्मयांत नारदाची दुसरी कामगिरी म्हणजे इकडून तिकडे बातमी पोंचविणें. या कार्यांतहि या व्यक्तीचें स्वरूप पुराणवाङ्मयांत बरेंच रंगलेलें दिसतें. कलहप्रियता व संदेशवाहन या दोन गुणांमुळें नारद या व्यक्तीनें पुराणांत चांगलेंच वैशिष्ट्य उत्पन्न केलें आहे.भारतांत (शांतिपर्व अ.२९,श्लो. ३०) नारदाचा सृंजयराजाच्या कन्येशीं विवाह झाल्याचा उल्लेख असून त्या बाबतींत त्याचें पर्वतऋषीशीं भांडण होऊन 'तुझें मर्कटासारखें मुख होईल' असा पर्वतानें नारदास शाप दिल्याचा उल्लेख आहे. देवीभागवतांत ( ६.२८ ) नारदास स्त्रीरूप प्राप्त होऊन तालध्वज याच्याशीं विवाह झाल्याचा उल्लेख आहे.

ना र द पु रा ण.—अठरा उपपुराणांपैकीं एक उपपुराण. हें नारद व सनत्कुमार यांच्या संवादात्मक आहे. याचे पूर्वखंड व उत्तरखंड असे दोन भाग असून पहिल्यांत १२५ व दुसऱ्यांत ८२ अध्याय आहेत. इतर पुराणांप्रमाणें यांत सृष्टिवर्णन, धर्मशास्त्र, तीर्थमाहात्म्य, अध्यात्म, मंत्रशास्त्र इत्यादि विषय आले आहेत; परंतु कथाभाग मात्र अगदींच थोडा आहे. यांतील विशेष म्हणजे याच्या पूर्वखंडांत अठराहि मुख्य पुराणांतील विषयांची अनुक्रमणिका दिली आहे.

ना र द शी क्षा.—व्याकरणविषयक ज्या अनेक शीक्षा आहेत त्यांत नारदशीक्षा ही एक आहे. सामगानांतील व लौकिकगानांतील नियमांसंबंधीं या शीर्षेत विवेचन आहे. विज्ञानेतिहास ( ज्ञानकोश विभाग ५, पृ. १६४ ) यांत या शीक्षेसंबंधीं विवेचन आलें आहे.

ना र द स्मृ ति.—नारदस्मृति अथवा नारदीय धर्मशास्त्र याचा मनुस्मृतीशीं अत्यंत निकट संबंध असल्यामुळें याचें महत्त्व फार आहे. सुमारें सव्वाशें वर्षांपूर्वी हा संबंध सर विल्यम जोन्स यानें आपल्या मनुस्मृतीच्या प्रस्तावनेंत दाखविला. नारदानें मनु, नारद, मार्कंडेय आणि भृगुपुत्र सुमति यांनीं केलेल्या मनुस्मृतीच्या रूपांतरांचा उल्लेख केला आहे. खुद्द नारदस्मृति ही एकलक्ष श्लोकांची जी मनुस्मृति आहे तींतील व्यवहाराध्यायाची म्हणजे नवव्या अध्यायाची एक संक्षिप्त प्रतच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. तींतील पहिल्या भागास नारदानें 'व्यवहारमातृका' असें नांव दिलें आहे. अलीकडे उपलब्ध झालेल्या माहितीवरून तर मनु आणि नारद यांचा अत्यंत निकट संबंध होता हें सप्रमाण सिद्ध झालें आहे. मनुस्मृतीवर मेधातिथीनें जी टीका लिहिली आहे तींत नारदस्मृतींतील उपोद्घाताचा उल्लेख आलेला आहे. प्राचीन स्मृतींचा जो कांहीं नारदानें इतिहास दिला आहे त्याला पुराणांतूनहि आधार सांपडतो. स्वायंभुव मनूनें जो मूळ धर्मग्रंथ लिहिला तोच पुढें भृगु, नारद, बृहस्पति आणि अंगिरस यांच्याकडून लिहिला गेला नेपाळांत जी नारदस्मृतीची प्रत सांपडली तिच्या शेवटीं 'इति मानवधर्मशास्त्रे' असे शब्द सांपडतात; व मनुस्मृतीसहि मानवधर्मशास्त्रच म्हणतात. कांहीं अध्यायांतील मजकूर जसाच्या तसाच मनुस्मृतींत सांपडतो (नारद चौरप्रतिषेध = मनु,अ. ९ श्लो.२५२–२९३). शिवाय ब्रह्मदेशांत 'धमत्थत्' म्हणून जे मनुस्मृतीच्या आधारें कायदे आहेत असें समजलें जातें त्यांतील कित्येक मनुस्मृतींत न सांपडतां नारदस्मृतींत सांपडतात.

आतां या दोन स्मृतींपैकीं पहिल्यानें कोणती लिहिली गेली असावी? दोन्ही ग्रंथांची तुलना केली असतां असें अनुमान निघतें कीं मनुस्मृति प्रथमतः लिहिली गेली असावी. नारदस्मृतींतील कित्येक विषय व तद्विषयक कल्पना या मूळ मनुस्मृतींत असून नारदानें त्यांचें विवरण फार कुशलतेनें केलें आहे ( नारद. प्रस्तावना, पान १३ ). विशेषतः न्यायदानपद्धतीसंबंधानें जे कायदे आहेत त्यांत तर तो मनूपेक्षां फार श्रेष्ठ आहे. एकंदरींत समग्र ग्रंथ वाचला असतां नारदानें लिहिलेला ग्रंथ अलीकडचा असावा असें सिद्ध होतें. इतकेंच नव्हे तर नारदाला मनुस्मृति किंवा त्याच्याबरहुकूम असलेल्या

ग्रंथांचें चांगलेंच ज्ञान असलें पाहिजे. कित्येक वेळां तर नारदानें मनुस्मृतीचा उल्लेखहि केला आहे.

असें जरी आहे तरी नारदानें मनूचें जसेंच्या तसेंच केवळ उचललें आहे असें नाहीं. कित्येक गोष्टींत त्यानें अगदीं स्वतंत्र विचार प्रदर्शित केले आहेत. दिवाणी आणि फौजदारी कायद्यासंबंधानें तर त्याच्याइतका स्वतंत्र ग्रंथ कोणी लिहिलेला नाहीं. प्रायश्चित्तविधि व इतर असेच धार्मिक विधी यांचा विचार न करितां केवळ कायद्यांचाच विचार त्यानें केला आहे. या ग्रंथावरून आपणांस तत्कालीन राजकीय आणि सामाजिक संस्थांसंबंधीं बरीच माहिती मिळते. कित्येक गोष्टी तर मनूनें ग्रथित केलेल्या गोष्टींहून अगदीं उलट आहेत. उदाहरणार्थ, नियोग, द्यूत, पुनर्विवाह, पितृ मरणानंतर मातेचा आणि अविवाहित भगिनीचा संपत्तीच्या वांटणींत हक्क असणें आणि दंडनीति वगैरे गोष्टींत मनूच्या उलट नारदाचीं मतें आहेत.

आतां एक शंका निघणें स्वाभाविक आहे व ती ही कीं, नारदानें जें हें मतस्वातंत्र्य मनूच्या मताविरुद्ध प्रदर्शित केलें आहे त्याला कांहीं तरी आधार असला पाहिजे व हा आधार मनूच्या पूर्वी जे स्मृतिकार होऊन गेले त्यांच्या स्मृतींचा असावा. नारदानें एके ठिकाणीं म्हटलेंच आहे कीं पूर्वी मनुस्मृतीचे एकलक्ष श्लोक होते आणि पुढें ते चार ग्रंथांतून वांटले गेले. ह्या उक्तीची संगति आतां बरोबर लागते. नारदाच्या पूर्वी, नारदाच्या वेळीं, व मागाहूनहि कांहीं दिवस मनुस्मृतीबरोबर वृद्धमनु किंवा वृहत्मनु यांच्या स्मृतींचा मुख्य भाग उपलब्ध असला पाहिजे; कारण त्याचा उल्लेख महाभारतांत, मेधातिथीच्या मनुभाष्यांत व जगन्नाथाच्या ग्रंथांतहि सांपडतो. समग्र नारदस्मृतीची रूपरेषा कळणें थोडेसें कठिण असून तें बरेचसें कल्पनेवर अवलंबून आहे, कारण मागाहून जे ग्रंथकार होतात ते आपला ग्रंथ पूर्वीच्या कोणत्या तरी प्रसिद्ध व्यक्तीच्या नांवावर प्रसिद्ध करितात. संस्कृत ग्रंथांतून ही पद्धति फार अनेक स्थलीं येते.

नारदस्मृतीचा काल ठरवितांना मनुस्मृतीचा काल लक्षांत घेतला पाहिजे. पण मौज अशी आहे कीं मनुस्मृतीचा काल ठरवावयाच्या वेळीं नारदस्मृतीचा काल प्रमाणभूत मानितात. दोहोंमध्यें बराच काल लोटला असला पाहिजे हें निर्विवाद आहे. आतां प्रोफेसर ब्यूलरच्या मतें ममुस्मृतीचा काल इसवी सनाच्या पूर्वी दोन शतकांपासून तों इसवी सनाच्या दुसऱ्या शतकापावेतों कोणता तरी आहे. हें जर खरें असेल तर नारदस्मृतीचा काल चवथ्या किंवा पांचव्या शतकापूर्वी येणें शक्य नाहीं, हें अनुमान स्वतंत्र रीतीनेंहि सिद्ध होण्याजोगें आहे.

पुष्कळशा बाबतींत व विशेषतः पुराव्याच्या कायद्यांत नारदस्मृति याज्ञवल्क्य, विष्णु, व्यास, बृहस्पति आणि कात्यायन या स्मृतींशीं जुळते. यांपैकीं शेवटल्या तीन स्मृती स्मृतिकालांतील अगदीं शेवटल्या असून पहिल्या दोन मात्र तिसऱ्या शतकाच्या पुढील आहेत; आणि म्हणूनच नादरस्मृति त्यांच्यापेक्षां कांहीं गोष्टींत पुढें गेली आहे. दुसरी गोष्ट अशी कीं मृच्छकटिक नाटकांत न्यायासनापुढील चौकशीचें जें वर्णन आलें आहे तें नारदस्मृतीशीं तंतोतंत जुळतें. आतां नारदीय धर्मशास्त्र आणि मृच्छकटिक हीं जर समकालीन मानिलीं तर नारदस्मृतीचा काल पांचवें किंवा सहावें शतक ठरतो. याला आणखीहि एक पुरावा देतां येईल. नारदस्मृतींत 'दिनार' शब्द पुन्हां पुन्हां येतो. हें 'दिनार' नाणें आणि 'डेनॅरियस' अथवा 'सुवंर्ण' हीं रोमन नाणीं एकच. कांहीं ठिकाणीं (२-३४) 'दिनार' हा सुवर्णवस्तुवाचक शब्द आहे व ज्याप्रमाणें सध्यां पुतळ्यांची अथवा मोहोरांची माळ घालण्याचा प्रघात आहे त्याप्रमाणें त्यावेळेस 'दिनारमाला' घालीत असत व दिनारमाला हा शब्द भद्रबाहूच्या कल्पसूत्रांत सांपडतो. परंतु अन्यत्र 'दिनार' शब्द नाणकवाची आहे. अर्थात या नाण्याचा प्रसार नारदस्मृतीच्या पूर्वीचा असला पाहिजे. 'दिनार' हें नाणें रोमन बादशहाचें असल्यामुळें हिंदुस्थानांत त्याचा प्रसार तिसऱ्या शतकापासून होता. सहाव्या शतकांत लिहिल्या गेलेल्या बाणाच्या कादंबरींत प्रथमतः नारदीय धर्मशास्त्राचा उल्लेख आढळतो. पंचतंत्रांतहि नारदस्मृतीचा उल्लेख आहे म्हणतात तें संशयित आहे. कारण कांहीं प्रतींत तो नाहीं. मेधातिथीच्या मनुभाष्यांत या स्मृतीचा उल्लेख सांपडतो. हें मनुभाष्य नवव्या शतकांत लिहिलें गेलें आहे परंतु तत्पूर्वीच असहाय नांवाच्या मनुष्यानें यावर एक विस्तृत टीका लिहिली आहे. या सर्व प्रमाणांवरून नारदस्मृतीचा काल पांचवें किंवा सहावें शतक होय असें निर्विवाद सिद्ध होतें.

नारदस्मृतीच्या प्रती मूलभूत अशा मानलेल्या पुष्कळ आहेत. परंतु मि. बेंडाल यानां जी नेपाळांत ताडपत्रावर लिहिलेली प्रत सांपडली आहे तीच खरी समजण्यांत येते. त्यांत एक नवीन अध्याय उपलब्ध झाला आहे. असहायाची टीका फार महत्त्वाची गणली जाते. नेहमींच्या व्यवहारांतील दृष्टांत देऊन विषयविवेचन करण्याची हातोटी त्यास फार चांगली साधली आहे. असहायाची टीका निष्काळजी लेखकांनीं विघडवल्यामुळें कल्याणभट्टानें तींत नवीनच शोध घातले आहेत.

**नारळ** ( माड )—याची लागवड उष्णकटिबंधांत फार प्राचीन काळापासून होत आहे. तरी जगाच्या व्यापारी दृष्टीनें याला अलीकडे म्हणजे ३०–४० वर्षांतच महत्त्व प्राप्त झालें आहे. माडाची लागवड सर्व उष्णकटिबंधांत समुद्रकाठीं होते तरी फिलिपाईन बेटांत हल्लीं फारच मोठ्या प्रमाणावर लागवड करतात. सर्व जगांत व्यापाराकरितां म्हणून जेवढें खोबरें तयार होतें त्याचा तिसरा हिस्सा फिलिपाईन बेटांत तयार होतो. खोबरें व खोबरेलतेल यांचा खप जर्मनी व फ्रान्स देशांत फार होतो. माडाची पैदास डच ईस्ट इंडीज, स्ट्रेट सेटल्मेन्टस्, फिलिपाईन बेटें, सिलोन, हिंदुस्थान,

झांजीबार, मलाया स्टेट्स्, निकोबार, लखदिव व मालदिव बेटें वगैरे देशांत मुख्यत्वेंकरून होते.

इ ति हा स.—हिंदी महासागर व पॅसिफिक महासागर यांमधील बेटांत हीं झाडें असल्यामुळें त्यांचीं फळें तेथून अमेरिका, चीन, सयाम, ब्रह्मदेश व हिंदुस्थान येथें वहात आलीं असावीं असा समज आहे. स्पॅनिश, पोर्तुगीज व डच प्रवाश्यांनीं यांचा प्रसार बराच केला असावा; सध्यां नारळाला निरनिराळ्या देशांत इतकीं निरनिराळीं नांवें आहेत त्यावरून त्या त्या देशांत नारळ गेल्यास फार का ावधि झाला असला पाहिजे. परंतु पूर्वेकडे अमेरिकेपासून पश्चिमेकडे मादागास्करपर्यंत नारळाला जीं नांवें आहेत त्यांतील बरींच संस्कृत भाषेतील ' नारीकेल ' शब्दापासून झालेलीं आहेत. यावरून हें झाड मूळचें अमेरिकेंतील नसून आशियांतील असणें अधिक संभवनीय आहे. यावरून तें हिंदुस्थानांतीलच असेल असें नाहीं तर संस्कृत भाषेच्या प्रसाराबरोबर नारळाची लागवड वाढत गेली एवढेंच म्हणतां येईल. तथापि नारळाच्या उत्पत्तिस्थानासंबंधीं बराच वाद आहे.

हिंदुस्थानांत माडाची लागवड मलबारचा किनारा, मद्रासचा पूर्व किनारा, कारवारचा पश्चिम किनारा, कोंकण, काठेवाड वगैरे प्रांतांत फार आहे. गोदावरीच्या मुखाजवळील माड फार उत्तम समजले जातात. त्या ठिकाणीं दर माडास २०० नारळ म्हणजे बेताचें उत्पन्न समजलें जातें. माडाची लागवड फार प्राचीन आहे, तरी त्यामानानें त्याच्या जाती फार थोड्या आहेत असें म्हणावें लागतें. माडाची लागवड बियांपासून होत असल्यामुळें त्याच्या जाती फारशा नाहींत ही गोष्ट लागवडीच्या दृष्टीनें फार महत्त्वाची आहे. नाहीं तर रायवळ आंब्याची जशी स्थिति आहे तशीच माडाचीहि झाली असती. एकंदरींत ज्या जातीचें बीं त्याच जातीनें झाड उत्पन्न होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां खोबऱ्यासाठीं माडाची लागवड करावयाची असेल तर बियांसाठीं नारळ मोठेच असले पाहिजेत असें नाहीं. कारण नारळ लहान असला तरी त्यापासून खोबरें मोठ्या नारळापेक्षां जास्त निघण्याचा संभव असतो. म्हणून ज्या माडास पुष्कळ नारळ येतात त्याचेच नारळ बियांसाठीं घ्यावे हें उत्तम. मोठे परंतु थोडे नारळ ज्या झाडास येतात त्याचे नारळ बियांसाठीं घेण्यांत फायदा होणार नाहीं. लवकर लागास येणाऱ्या माडाचे नारळ बियाकरितां घ्यावे. ते नारळ माडावरून उतरून घ्यावे, वरून टाकूं नयेत. कारण वरून टाकल्यामुळें तो दुखावतो व कदाचित् त्याला चीर पडते व त्यामुळें तो रुजत नाहीं. नारळ उतरल्यानंतर कोरड्या हवाशीर जागीं महिनाभर नीट ठेऊन द्यावे. रुजत घालतेवेळीं त्यांतील बहुतेक पाणी आटून जावयास पाहिजे व खोबरें घट्ट झालेलें असावें, तसेंच बियाचे नारळ फार लहान माडाचे किंवा फार ढांकीचे(जुन्या झाडांचे)हि काढूं नयेत, मध्यम वयाच्या झाडाचे काढावे कित्येक ठिकाणीं पेंदीच्या ( लोंबऱ्याच्या ) शेवटाकडील नारळ बियासाठीं ठेवण्याची वहिवाट आहे; परंतु यांचा उपयोग खरोखर होतो किंवा नाहीं हें खात्रीनें सांगतां येत नाहीं.

नारळ रुजत घालण्याच्या पद्धतीमध्यें स्थानपरत्वें फरक दिसतो. फिलिपाईनबेटांत हल्लीं माडाचीं लागवड फार मोठ्या प्रमाणावर होत असल्यामुळें तिकडे मोठमोठे वाफे करून त्यांत नारळ रुजत घालतात. ही जमीन पहिल्यानें बऱ्याच वेळां चांगली नांगरतात व आंतील सर्व घाण, तण मुळ्या, वगैरे काढून टाकतात. जमीन निदान एक फूटपर्यंत तरी खोल पोकळ व्हावयास पाहिजे वाफे सहा ते आठ फूट रुंद असून मधून रस्ते असतात. नारळ रुजत टाकतात त्यांमध्यें ४ इंच अंतर ठेवतात. नारळ वाफ्यांत आडवाच ठेवून त्याचा अर्धा किंवा दोनतृतीयांश भाग जमिनींत पुरून टाकतात, व पेंढा, गवत किंवा असेंच दुसरें कांहीं गवत बारीक कापून तें त्यावर पातळ आंथरतात. याच्यायोगानें वाफ्यामध्यें ओलावा चांगला रहातो व नारळ वाळून जात नाहींत. एकदां पाणी दिल्यानंतर पुन्हां पाणी देण्याचें कांहीं कारण नाहीं. नारळ रुजून कोंब २–२॥ फूट वाढला व मुळ्या ४–८ इंचांपर्यंत बाहेर आल्या म्हणजे रोपा लावण्यास योग्य झाला असें समजतात. यापेक्षां मोठा झाल्यास तो काढून लावण्याच्या जागीं नेण्यास व लावण्यास त्रास पडतो. रोपा लहान असला म्हणजे नारळांतील अन्नरस कोंबाला मिळत असल्यामुळें त्याला अपाय वगैरे कांहीं होत नाहीं व म्हणून तो लवकर जीव धरतो. लहान रोपा लावण्यास खर्चहि फार कमी येतो. तसें मोठ्या रोप्याचें होत नाहीं.

हिंदुस्थानांत नारळ काढल्यावर ते एक दोन महिने घरांत ठेऊन नंतर जमिनींत तिरपे लावून पुरून टाकतात, व ते रुजल्यावर हिंवाळ्यांत किंवा पाऊस बेताचा असेल तर पावसाळ्यांत कायमच्या जागीं लावतात. कित्येक ठिकाणीं रोपे दोन वर्षांचे होईपर्यंत कायमच्या ठिकाणीं लावीत नाहींत. कारवारकडे नारळ विहिरीमध्यें टाकून त्यांनां मुळ्या व कोंब फुटल्यावर ते विहिरींतून काढून एकदम कायमच्या जागीं लावतात. जावा वगैरे बेटांत नारळ घराच्या वळचणीला टांगून ठेवून तेथेंच त्यांनां मुळ्या व कोंब फुटल्यावर ते कायमच्या जागीं लावून देतात. गोवा प्रांतांत नारळ जमिनीमध्यें अर्धा पुरतात.

माडाला जमीन पुळणवट लागते. काळ्या किंवा चिकण जमिनींत पाण्याचा चांगला निचरा होत नसल्यामुळें माड चांगले होत नाहींत. कोंकणांतील आगराचें गांव समुद्रालगत असल्यामुळें तेथील (समुद्रकांठची) बागेंतील जमीन जास्त पुळणवट असते व पूर्वेकडील जमीन जरा बऱ्यापैकीं असते. पूर्वेकडील भागांत पोफळी लावतात व पश्चिमेकडील भागांत माड लावतात. जमिनी फारच चढत्या असल्यामुळें रहाटाचें पाणी साध्या पाटानें शेवटच्या माडापर्यंत पोंचत नाहीं यासाठीं [illegible] त्यांतून पाणी न्यावें लागतें.

दुष्काळाच्या वर्षी किंवा उन्हाळ्यांत विहिरींनां पाणी कमी पडल्यास जेवढें पाणी मिळेल तेवढें प्रथम पोफळींनां देऊन राहिल्यास माडांनां देतात किंवा मुळींच देत नाहींत. गोवा प्रांतांत व इतर कित्येक ठिकाणीं खाजणांमध्यें तीन चार फूट उंचीचे व पंधरा फूट रुंदीचे लांब लांब बांध असतात त्यांवर माड लावण्याची वहिवाट आहे.हे बांध म्हणजे खाचरांतील माती काढून त्याचेच केलेले असतात. दोन बांधामधील चरांतून भरतीचें पाणी येत असतें.बांधावरच्या माडांनां लहान आहेत तोंपर्यंत हातपाणी द्यावें लागतें. अशा रीतीनें जरी या माडांची जोपासना केली तरी त्यांनां चांगलीशी फळें येत नाहींत.रोंपे लावण्यासाठीं खड्डे तीन फूट हम चौरस खणावे. रोंपे लावतेवेळीं एखादें विशेष खत घालण्याची वहिवाट नाहीं. रोप्याचा नारळ जमिनींत सुमारें फूट सव्वाफूट राहील अशा बेतानें लावावा. पुढें खड्डा आपेआप भरून येईल. कोंकणांत रोंपे लावण्याची वेळ म्हणजे हिंवाळा ही होय.

झाडें जितकीं जास्त तितकें उत्पन्न जास्त अशी सामान्य समजूत असल्यामुळें झाडें दाट लावण्याची मालकाची नेहमीं प्रवृत्ति असते. परंतु ही पद्धत फार घातक आहे. कारण माडाला ऊन व हवा विपुल मिळेल तर माड चांगला लागास येतो. यासाठीं रोंपे २५ फुटांपेक्षां जवळ लावूं नयेत; त्यांमध्यें अंतर ३० फूट असल्यास चांगलेंच. वाऱ्यापासून माडांचें रक्षण व्हावें म्हणून त्यांच्या भोंवतीं दुसरीं झाडें लावावीं; या कामासाठीं विशेषतः करंज व भेंड झाडें हीं फार चांगलीं; कारण करंजापासून तेलासाठीं बिया, रावासाठीं पाला व कवळ मिळतें; भेंडीचीं झाडें फार लवकर वाढतात आणि त्यांच्या लांकडाला भावहि चांगला येत असल्यामुळें यांच्यापासूनहि उत्पन्न चांगलें मिळतें. समुद्रकिनाऱ्यालगत पाऊस फार असल्यामुळें पावसाळ्यांत नारळाच्या बागेंत दुसरें कसलेंहि पीक घेणें शक्य नसतें. तागाचें वगैरे बीं पेरल्यास त्यावर झांपावरील पाणी पडून तें मरून जातें. कदाचित् भाद्रपद महिन्यांत ताग पेरल्यास विवड चांगलें तयार होण्याचा संभव आहे. परंतु यासंबंधीं प्रयत्न झालेले नाहींत. कोंकणांत माडांनां पावसाळ्याच्या आरंभीं एक एक ओझें पांढऱ्या कुज्याचा टाळ घालण्याची वहिवाट आहे. ऐपत असल्यास कांहीं लोक शेणखत व मीठ (दर माडास एक पायली किंवा चार पौंड) देतात. मीठ देण्याची वेळ श्रावण महिना होय. ज्यांनां वर्षास मीठ घालण्याची ऐपत नसेल त्यांनीं दोन वर्षांनीं एकदां द्यावें. वेंगुर्ल्याकडे दर माडास दहा पौंडप्रमाणें मासळी देतात.

माड लहान आहेत तोंपर्यंत त्यामध्यें कोणतेंहि पीक घेण्यास हरकत नाहीं. परंतु बाग जुनी असली व मेलेले माड भरून काढावयाचे असले म्हणजे पीक काढतां येणार नाहीं. कारण पूर्वीच्या माडांमुळें भरपूर सावली होऊन दुसरें पीक काढणें किफायतशीर होणार नाहीं. तरी सुद्धां केळी,पोपया, अननस, काफी वगैरे पिकें काढतात. माडाच्या बागेंतील जमीन नांगरण्याची इकडे वहिवाट नाहीं. परंतु फिलिपाईन बेटांत माड दोन वर्षांचे झाले व रोप्यांनीं मुळ्या चांगल्या धरल्या म्हणजे वर्षांतून दोनदां सर्व जमीन नांगरानें नांगरून व तव्याच्या कुळवानें कुळवून घेतली असतां पीक उत्तम येतें असें दिसून आलें आहे.नांगरतांनां झाडाच्या जवळ तीन फूट जमीन सोडली पाहिजे व नांगरहि चार इंचांपेक्षां खोल लावूं नये. माडाच्या मुळ्या फारशा खोल नसल्यामुळें नांगरीनें कांहीं मुळ्या तुटतील ही गोष्ट खरी आहे, तरी माडाला ७००० पेक्षां जास्त मुळ्या असल्यामुळें त्यांपैकीं थोड्या दुखविल्या तरी हरकत नाहीं. मुळ्यांची लांबी ७–१८ फूट असते व त्या ३–४ फुटांपेक्षां खोल जात नाहींत. त्यांची जाडी ३ इंच असते. नांगरानें नांगरल्यावर खालच्या मुळ्यांनां चलन मिळून त्याच खोल जाऊं लागतील व पुढील नांगरणीच्या वेळीं मुळ्या त्यामानानें फारशा दुखविल्या जाणार नाहींत. नांगरटीनें जमिनींतील द्रव्यें मोकळीं होऊन तीं खोल गेलेल्या मुळ्यांनां मिळूं लागतील, हा नांगरटीचा विशेष फायदा होय. तो न नांगरलेल्या जमिनींतल्या माडांनां मिळत नाहीं. ज्या बागांतून शक्य असेल त्यांत नांगरट करून काय फायदा होतो तो पहावा.

खतासंबंधीं सविस्तर माहिती वर सांगितलीच आहे; याशिवाय माडाचे जे भाग निरुपयोगी असतील ते सर्व जाळून त्यांची राख माडाच्या बुंधाशीं पुरून टाकावी.

सिलोनमध्यें नारळाचीं सर्व चोडें (सालें) माडाच्या बुंधाशीं अळ्यासारखीं ठेवतात; याच्या योगानें अळें झांकलें जाऊन त्याच्यांतील पाणी निघून जात नाहीं; नंतर शेवटीं तीं कुजलीं म्हणजे त्यांचें खत होतें. आपल्याकडे थरपे(दांडे)पोया,चोडें, करट्या वगैरे सर्व सर्पणासाठीं वापरतात; यासाठीं त्यांची राख होईल तेवढी तरी निदान माडाला परत दिली पाहिजे. मद्रास इलाख्यांत ज्या माडांनां कांहींच नारळ येत नाहींत त्यांच्याभोंवतीं चांगलीं अळीं करून घैचाचें ( तांबड्या देंठाच्या शेवरीचें) विवड,शेणखत व ६.७ पौंड मासळीचें खत दिल्यानें ज्या माडांनां पूर्वी दहा नारळ सुद्धां येत नसत त्यांनां दुसऱ्याच वर्षी ४७ नारळ आले असा अनुभव आहे

फिलिपाईन बेटांत नारळांचा उपयोग विशेषतः तेल गाळण्यासाठीं करतात. तिकडे खोबऱ्याची किंमत रंगावर व वजनावर असते; तेलाच्या प्रमाणावर नसते. परंतु ही स्थिति जाऊन तेलाच्या प्रमाणावर त्याची किंमत केली जाईल असा रंग दिसत आहे. नारळ चांगला जून झालेला असला म्हणजे त्याचें तेल जसें निघतें तसें कोंवळ्या नारळाचें निघत नाहीं. शिवाय कोंवळ्या नारळाचें खोबरें वाळल्यानंतर देखील त्याच्या अंगीं हवेंतील पाणी शोषून घेण्याची शक्ति असते त्यामुळें त्याला एक प्रकारचा वास येतो व त्यावर बुरशी येते त्यामुळें त्यांतील बरेंच तेल नाहींसें होतें. यासाठीं उत्तम प्रकारचें

खोबरें पाहिजे असेल तर माडावरून नारळ मुद्दाम न पाडतां आपोआप पडतील तेवढेच गोळा करणें चांगलें असा अनुभव फिलिपाईन बेटांत आला आहे. परंतु इकडचा अनुभव असा आहे कीं नारळ सुमारें पाऊण हिस्सा जून झाला म्हणजे त्यापासून तेल जास्त निघतें. शिवाय आपल्याकडील बागा फार लहान असल्यामुळें व चोरांचें भय फार असल्यामुळें नारळ पडेपर्यंत झाडावर राहूं देणें शक्य नसतें. खोबऱ्यासाठीं नारळ पाडावेच लागले तर एक महिनाभर तरी ते कोरड्या जागेंत सांठवून ठेवावे.

माडावर चढण्यासाठीं त्याच्यावर खांचा करण्याची वहिवाट आहे. परंतु ही पद्धत फार नुकसानकारक आहे. खांचा करणें झाल्यास त्यांत पाणी रहाणार नाहीं अशा बेतानें त्या कराव्या. पायंड्यांच्या साह्याय्यानें वर चढणें चांगलें.

उत्पन्न.—माड फार दाट लावले असल्यास उत्पन्न फार कमी येतें. कांहीं ठिकाणीं दर झाडास १० नारळ देखील लागत नाहींत. ज्या ठिकाणीं माडांची उत्तम प्रकारची निगा आहे त्या ठिकाणीं उत्पन्नाचें प्रमाण असें असतेंः—सातव्या वर्षी १५ नारळ, आठव्या वर्षी २५ नारळ, नवव्या वर्षी ४० नारळ व दहाव्या वर्षी ६० नारळ. यापुढें ५० ते ६० वर्षेंपर्यंत उत्पन्न इतकेंच रहातें. सुमारें साडेचार नारळांपासून एक शेर (२पौंड) खोबरें निघतें व दहा नारळांपासून पावणेदोन पाइंट तेल ( सुमारें २ शेर ) निघतें. कित्येक ठिकाणीं याहिपेक्षां जास्त उत्पन्न येतें. गांवठी घाण्यांत तेल काढल्यास पुष्कळ तेल फुकट जातें, म्हणजे शेंकडा तीस ते पन्नासपर्यंत निघतें. परंतु नवीन तऱ्हेच्या यंत्राच्या साह्याय्यानें तेल काढल्यास शेंकडा ६५ ते ७० पर्यंत तेल निघतें. यंत्राच्या साह्याय्यानें तेल काढण्याचे कारखाने फक्त मलबारांत कोचीन येथें आहेत. कोचीन येथील तेल इतर ठिकाणच्या तेलापेक्षां चांगलें समजलें जातें. याचें कारण तेथील नारळ पूर्ण जून झालेले असतात व खोबरें वाळवतात; त्यावर कसलीहि घाण पडूं देत नाहींत.

खोबरेल तेलाचा उपयोग खाण्याकडे व मेणबत्त्या आणि साबण करण्याकडे होतो. कार्डलिव्हर ऑईल,सिट्रोनेला ऑईल वगैरे तेलांत मिसळण्यासाठींहि याचा उपयोग होतो. खोबरेल तेलापासून एक प्रकारचें लोणी तयार करितात; तें गाईम्हशींच्या लोण्यापेक्षां किंवा चरबीपेक्षां उत्तम असतें. कारण तें मुळींच नासत नाहीं. यामुळें त्याचा उपयोग पावबिस्किटें वगैरे करण्यासाठीं फार होतो. फ्रेंच सरकारनें या लोण्याचा उपयोग सैनिकाकरतां करण्याची परवानगी दिल्यामुळें खोबरेल तेलाला व त्यापासून तयार केलेल्या लोण्याला फार भाव येतो. तेल काढल्यानंतर जी पेंड शिल्लक रहाते तिला पुन्नाक असें म्हणतात. या पेंडींत तेल जितकें जास्त असेल तितकी ती जास्त कसदार समजतात व त्यावर तिची किंमत ठरविली जाते. खोबऱ्याच्या व पेंडीच्या किंमतीचें प्रमाण ४:३ असें असतें. पेंडीचा उपयोग दुभत्या जनावरांकरितां व बैलासारख्या कामाच्या जनावरांकरितां करितात.

खोबरें उन्हांत वाळवितात परंतु त्यांत पाणी शेंकडा ९ पर्यंत असतें. उत्तम खोबऱ्यांत शेंकडा सहापेक्षां जास्त पाणी असूं नये. यासाठीं खोबरें वाफेनें किंवा गरम हवेनें तापवितात. याच्यायोगानें ओले ताजे नारळ वाफेनें वाळविल्यास १५ तासांत व गरम हवेंत वाळविल्यास ४ तासांत तयार होतात. धुरानें वाळविलेल्या खोबऱ्यांत पाणी शेंकडा २० पेक्षां देखील जास्त राहतें म्हणून ही पद्धत फार वाईट होय.

माडापासून होणारे कांहीं जिन्नस, सुंभः—सुंभासाठीं नारळ काढावयाचे असल्यास ते साधारणपणें कोंवळेच काढावे लागतात. अगदीं कोंवळे नारळ असल्यास काथ्या लवकर तुटतो. पूर्ण जून झालेल्या नारळाचीं चोडें कुजत नाहींत. सुंभ काढण्याचे कारखाने सिलोन, मलबार, लखदिवबेटें, फेडरेटेड मलायास्टेटस् यांमध्यें आहेत. काथ्या करण्यासाठीं पहिल्यानें खाजणांत खाऱ्या पाण्यांत चोडें कुजत टाकतात. गोड्या पाण्यांत चोडें चांगलीं कुजत नाहींत व काथ्या वाईट होतो असें म्हणतात. तेथें तीं सहा महिनेपर्यंत कुजल्यावर तीं काढून कुटून त्यांच्यापासून काथ्या तयार करतात. काथ्या चांगला किंवा वाईट हें माडाच्या जातीवर अवलंबून आहे असें दिसतें. सिलोनमध्यें चाळीस नारळांपासून सहा पौंड काथ्या निघतो. मद्रासकडे १८ नारळांपासून व लखदिवकडे ६० नारळांपासून सहा पौंड काथ्या निघतो; परंतु लखदिवच्या एक पौंड काथ्यापासून २२० फूट लांब सुंभ बनतें, व मद्रासच्या तेवढ्याच काथ्याचें १३२ फूट सुंभ होतें. यंत्राच्या साह्याय्यानें दोरखंडें व सुंभ तयार करण्याचे कारखाने मुंबई इलाख्यांत नाहींत. सुंभ हातांनींच वळून त्याचा घरगुती कामाकडेच फक्त खर्च होतो. व्यापारी दृष्ट्या याला महत्त्व नाहीं.

माडीः—माडाची पोय कोंवळी कापल्यास तिच्यांतून जो रस येतो त्याला माडी म्हणतात. मद्रास इलाख्यांत ताडापासून ताडी काढतात. ठाणें व सुरत या जिल्ह्यांत शिंदीपासून शिंदी काढतात. रत्नागिरी, कारवार वगैरे जिल्ह्यांत माडापासून माडी काढतात. माडाची पोय कापल्यावर फूल व फळ धरत नाहींत. माडाची लागवड आहे तेथें माडी काढण्याची पद्धत सर्वत्र चालू आहे. रत्नागिरी जिल्ह्यांत ब्राह्मण लोक सहसा आपले माड माडीसाठीं वहावयास देत नाहींत; भंडारी लोक देतात. एका माडापासून १.४० लिटर माडी रोज निघते. माडाच्या एक ते तीन पोया कापतात. यापेक्षां जास्त पोया एकाच वेळीं कापीत नाहींत. पोयींतून २५ ते ४० दिवसपर्यंत माडी वहात असते. माडी दिवसांतून तीन वेळ काढतात व प्रत्येक वेळीं नवीन काप घेतात म्हणजे रस जोरानें येतो. एका माडावरून दुसऱ्या माडावर जाण्यासाठीं बांबू बांधून त्याचा उपयोग करण्याची

वहिवाट इकडे नाहीं. परंतु फिलिपाईन बेटांत व इतर कित्येक देशांत ही पद्धत आहे.

गूळ:—गोवा प्रांतांत ताज्या माडीपासून गूळ करतात. या गुळाचा खाण्याकडे हि उपयोग करितात. गूळ सीमेंट व चुना यांच्यामध्यें मिसळला असतां तो घट्ट होऊन त्यावर पॉलिश अथवा तकाकी चांगलीच चढते.

रोग.—माडाला अनेक प्रकारचे रोग होतात. त्यांत 'कोंब कुजणें' या नांवाचा रोग मद्रास इलाख्यांत फार भयंकर आहे. मुंबई इलाख्यांत हा रोग फारसा नाहीं. या रोगापासून क्यूबा बेटांत भयंकर नुकसान झालेलें आहे. त्याचप्रमाणें हा रोग जमेका, त्रिनिदाद, मद्रास, सिलोन, पोर्तुगॉल आफ्रिका या देशांत आहे. दुसरा एक रोग झांपांच्या शेवटच्या पात्यांवर दिसून येतो.याच्यायोगानें पात्या पांढऱ्या होऊन गळून पडतात. याला उपाय म्हणजे रोगट पानें तोडून जाळून टाकावीं आणि नंतर बार्डोमिश्रण शिंपडावें. १५-२० दिवसांनीं हेंच मिश्रण पुन्हां शिंपावें. मुंबई इलाख्यांत हा रोग फक्त ताडावर पडतो, माडावर फारसा आढळत नाहीं; तरी तो माडावरहि पडण्याचा संभव आहे. तिसरा रोग माडांतून तांबूस रस गळणें; हा रोग एका प्रकारच्या अळिंबापासून होतो. हा रोग विशेषतः सिलोन व दक्षिणमलबारांत आहे. खास उपाय—हा रोग दिसल्या बरोबर रोगट जागा पूर्णपणें कापून काढून जाळून टाकणें. रोग फार झाला असल्यास सर्व झाड तोडून जाळून टाकावें.

भुंगे:—माडाला दोन प्रकारचे भुंगे लागून त्यांपासून फार नुकसान होतें. या भुंग्यांवर औषध, विष वगैरे कांहींच लागू पडत नाहीं. यामुळें ही कीड कमी करण्याचा उपाय म्हणजे लांकूडफांटा वगैरे कुजणारे जिन्नस बागेंत राहूं देऊं नयेत. दुसरा उपाय म्हणजे ८-१० फूट लांबरुंद व तीन फूट खोल असे खड्डे खणून ते धाणेरड्या कचऱ्यानें, शेण, कुजकीं लांकडें यांनीं भरून काढावे. म्हणजे त्यांमध्यें हे भुंगे अंडीं घालतात, व त्याच ठिकाणीं त्यांच्या आळ्या होतात.दोन महिन्यांनीं हे खड्डे उकरून पाहिल्यास खड्ड्याच्या कडेला पुष्कळ किडे सांपडतील, ते सर्व वेंचून मारून टाकावे.

माडाला दुसरा शत्रु म्हणजे उंदीर. उंदरापासून नारळांचें संरक्षण होण्याकरितां माडावर पांचसहा फुटांवर पत्रे मारतात. हे पत्रे खालच्या बाजूला सुटे व बाहेर झुकते असतात. शिवाय त्यांची खालची बाजू थोडी कातरलेली असते. यामुळें उंदरांना या पत्र्यावरून वर चढतां येत नाहीं. माडाच्या झाडाचा जितका उपयोग होतो तितका दुसऱ्या कोणत्याहि झाडाचा बहुधां होत नसेल. माडाचीं बहालें, वांसे, पन्हळ वगैरे चांगलीं होतात. पानांचे झांप वळून त्यांनीं घरें शाकारतात. पात्यांचे हीर काढून त्यांचे खराटे उत्तम होतात. नारळाच्या करवंटीचा उपयोग गुडगुडी, लहान लहान भांडीं, बटणें वगैरे करण्याकडे होतो.

**नारायण**—हें फार प्राचीन व बहुमानदर्शक नांव असून तें हिंदूंच्या अनेक देवांनां लावलेलें आढळतें. तें कोणत्याहि एका स्वतंत्र देवतेचें नांव नाहीं. पुरुष म्हणून जी आद्य मानव व्यक्ति होती तिला उद्देशून पुरुषसूक्त हें महत्त्वाचें सूक्त ऋग्वेदसंहितेंत (१०.९०)आहे; हें सूक्त फार महत्त्व पावलें आहे. सदरहू पुरुषालाच शतपथब्राह्मणांत पुरुष—नारायण असें म्हटलें आहे. सर्वानुक्रमणीप्रमाणें नारायण हा पुरुषसूक्ताचा कर्ता आहे. महानारायण नांवाचें (दशोपनिषदांपैकीं)एक उपनिषदहि आहे. कृष्णयजुर्वेदाच्या मैत्रायणीसंहितेंत मात्र पुरुष हें शिवाला आणि नारायण हें विष्णूला उपपद लाविलें आहे. ख्रिस्ती शकाच्या आरंभाच्या सुमारास नारायण शब्दाची निराळीच व्युत्पत्ति दिली आहे.हें सर्व जग पाण्यापासून निर्माण झालें असें ऋग्वेद व कृष्ण-यजुर्वेदाच्या तैत्तिरीय संहितेंत म्हटलें आहे.प्रथम या पाण्यावर जी एक व्यक्ति दिसूं लागली तीच नारायण होय (नारा = पाणी; अयन = हलणें, सरणें ). जगाचा मूळ जो कर्ता विष्णु तोच नारायण असें वैष्णव म्हणूं लागले. उलट शिव हा मुख्य देव मानणारे शैव लोक नारायणालाच शिव म्हणूं लागले. अद्वैतमताचे प्रस्थापक आद्य शंकराचार्य ब्रह्म किंवा जगाचा जो मूळ कर्ता तोच नारायण असें प्रतिपादूं लागले. जैन लोक नारायण हा नऊ कृष्ण वासुदेवांपैकीं किंवा तीर्थंकरांपैकीं आठवा आहे असें मानतात. बौद्धांच्या महायानपंथाच्या सद्धर्म-पुंडरीक नांवाच्या ग्रंथांत बोधिसत्वाच्या देहाची नारायणाच्या देहाशीं तुलना केली आहे. सांप्रत हिंदु लोक नारायण हें विष्णूचें एक नांव आहे असें सर्वत्र मानतात. नारायणीय धर्माचें सविस्तर विवेचन 'बुद्धोत्तर जग' (ज्ञा. को. वि. ४, प्रकरण ६ वें.) यांत आढळेल.

**नारायण**—राजपुताना, जोधपुर संस्थान, सांबर निझामतींतील याच नांवच्या तहशीलीचें मुख्य ठिकाण. हें राजपुताना—माळवा रेल्वेवर आहे.लोकसंख्या ५५६६. हें दादूपंथी लोकांचें ( नाग नांवाचे सैनिक यांतलेच होत )मुख्य ठिकाण आहे. ('दादू' पहा.)

**नारायणगंज, पोटविभाग.**—डाका जिल्ह्यांतील ईशान्येकडील पोटविभाग. क्षेत्रफळ ६४१ चौरस मैल. लोकसंख्या (१९११)७७९५६४.मुख्य शहर एकच असें नारायणगंज आहे. नारायणगंज, वैद्यबाजार व मेघना नदीवरील नरसिंगडी हीं व्यापाराचीं ठाणीं आहेत. सोनारगांव हें ऐतिहासिक शहर आहे. नांगलबंद येथें स्नानासाठीं जत्रा भरते. यांत तीन तालुके आहेत. नारायणगंज तालुक्याचें क्षेत्रफळ ११६ चौरस मैल असून लोकसंख्या १८७८६१ आहे.

**गांव.**—याच नांवाच्या पोटविभागाचें मुख्य शहर. हें लखा व धालेश्वरी या नद्यांच्या संगमावर आहे. लो. सं.

(१९११) २७८७६. हिंदु व मुसलमान निम्मेनिम्म आहेत. हें डाक्क्याहून खुष्कीच्या मार्गानें ९व जलमार्गानें २० मैल दूर आहे. हें पूर्व बंगालांतील फार भरभराटीचें शहर आहे. मीर जुमल्यानें आराकानी लोकांच्या स्वाऱ्यांशीं टक्कर देण्याकरितां येथें बरेच किल्ले बांधले. येथील कदमरसूल नांवाच्या मशिदीला मुसुलमान लोक फार मान देतात.

हें गांव १०० वर्षांपूर्वीपासूनच व्यापारी आहे. पण अलीकडे तागाच्या गिरण्या व आगगाड्यांचे रस्ते वगैरेंमुळें याला फारच महत्त्व आलें आहे. येथून बंदरांनां लवकर जातां येतें. येथून चितागांग व कलकत्त्याला बोटी जातात. येथें बऱ्याच गिरण्या,तागाचे प्रेस, लोखंडाचे कारखाने वगैरे आहेत. येथें ७-८ हायस्कूलें व दोन ग्रंथालयें आहेत.

**नारायणगड**—पुणें जिल्हा.जुन्नराजवळ नारायणगांवच्या पूर्वेस दीड कोसावर हा किल्ला एका स्वतंत्र डोंगरावर असून याच्या पूर्वेशिवाय तिन्ही बाजूंस कडे तुटलेले आहेत. हा बाळाजी विश्वनाथ पेशवे यांनीं बांधला. यावर हटसाबाईचें देऊळ, दोन पाण्याचीं टाकीं व पुष्कळ हौद आहेत.एका टाक्यांतील नारायणाची मूर्ति १८३० सालीं सांपडली. मुख्य दरवाजा शाबूत असून त्यावर नारायणाची मूर्ति व वाघांचीं चित्रें आहेत. इंग्रजांनीं १८२० सालीं हा किल्ला बहुतेक पाडून टाकला.

**नारायणगढ**—पंजाब, अंबाला जिल्ह्याची तहशील. ही हिमालयाच्या पायथ्याशीं वसली आहे. क्षेत्रफळ ४४६ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) १०७७९८. यांत एक शहर व ३१८ खेडीं आहेत. पैकीं नारायणगढ हें मुख्य ठिकाण असून यांत करोह हें शिखर आहे यांतील प्रदेश खडकाळ असल्याकारणानें पिकाची शेतकऱ्यांना पंचाईत पडते. दक्षिणेकडील भाग बराच सपाट आहे.

**नारायणगांव**—मुंबई, पुणें जिल्हा. जुन्नरच्या आग्नेयीस ९ मैलांवर मीनातटाकीं असलेला गांव. येथें शनवारीं आठवड्याचा बाजार भरतो.गांवास ' जुन्नर दरवाजा ' व 'पुणें दरवाजा ' असे दोन दरवाजे आहेत. नारायणगांवाच्या दक्षिणेस एका मैलावर असलेल्या टेंकडीवर गंजपीरचें थडगें असून तेथें चैत्र शुद्ध नवमीस मोठी जत्रा भरते. येथून तीन मैलांवर नारायणगड नांवाचा किल्ला आहे ( पहा ).

**नारायणपूर**—मध्यप्रांत, छत्तिसगड संस्थानें. जशपूर संस्थानच्या हेटघाट टप्प्यांतील महत्त्वाचें खेडें. हें राजधानीपासून नैर्ऋत्येस १६ मैलांवर असून येथें दरसाल माघ महिन्यांत यात्रा भरत असते. जवळच एका टेंकडीवर या संस्थानचे संस्थापक राजे-सुजानराय हे राहत असत.

**नारायणपेठ**—हैद्राबाद संस्थान, मह्बूबनगर जिल्हा. मखताल तालुक्यांतील एक शहर. लोकसंख्या ( १९११ ) १२४४९.हें रेशमी कापड व सुती लुगडीं यांच्याकरितां तसेंच रंगीत कातडी जोडे यांच्या व्यापाराकरिता प्रसिद्ध आहे.दुय्यम तालुकदाराचें हें ठिकाण असून येथें एक मुनसिफ कचेरीहि आहे. येथें दवाखाना व मुलांमुलींच्या शाळा असून, हें जी. आय. पी. रेल्वेच्या एका शाखेवरील स्टेशन आहे.

**नारायणराव बल्लाळ पेशवे**(१७५५-१७७३)—पांचवा पेशवा. नानासाहेब पेशव्यांचे हे धाकटे पुत्र; हे स्वभावाचे तापट व स्नानसंध्याशील असून पोरवयामुळें त्यांनां पेंचपांच, भारदस्तपणा व सारासार विचार कमी होता. यांचा जन्म ता. १०-८-१७५५ रोजीं होऊन, मुंज २८ मे स. १७६२ त दादासाहेबांच्या हातून झाली. यांचें लग्न २२ एप्रिल १७६३ रोजीं सिंहगडास कृष्णाजी हरि साठे ( तपकीर गल्लींतील ) यांच्या कन्येशीं होऊन तिचें नांव गंगाबाई ठेवण्यांत आलें; एकदां गुलटेकडीवर साठमारी पहात असतां एक हत्ती माधवराव व नारायणराव बसले होते तिकडे चालून आला. नारायणराव उठून जाऊं लागले. तेव्हां माधवरावांनीं, नारायणा, जाऊं नकोस, गेल्यास तुझ्याबद्दल तवारिखकार काय म्हणतील ? असें म्हटल्यावर हे तेथें बसून राहिले. यावरून ग्रँटडफ म्हणतो कीं, जर ते जगते तर धाडशी बनण्याचा संभव होता. परंतु १८ व्या वर्षींच त्यांचा अंत झाल्यानें त्यांच्या गुणावगुणाबद्दल ठाम मत देतां येणें शक्य नाहीं.

माधवरावांनीं आपल्या मृत्युसमयीं दादासाहेबांच्या हातीं नारायणरावांचा हात देऊन, एकमतानें चालण्याबद्दल बापू, नाना व मामा पेठे यांच्या देखत त्यांनां सांगितलें व तें दादांनीं कबूल केलें. बापूनेंहि वचन दिलें कीं, जिवांत जीव असे तोंपर्यंत मी नारायणरावांस अंतर देणार नाहीं. नंतर श्रीमंतांनीं कैलासवास केला. त्यांच्याबरोबर रमाबाई सती गेल्या; धर्मशिळेवर उभ्या असतांना त्यांनींहि नारायणरावांचा हात दादांच्या हातीं देऊन वडीलपणें सर्वांचा संभाळ करण्यास सांगितलें ( १८-११-१७७२ ). त्यांचें उत्तरकार्य नारायणरावांनींच केलें. नंतर मंडळी पुण्यास आली. पर्वतीं नारायणरावांचा व दादांचा संकेत ठरला कीं, झालें तें गेलें; यापुढें दोघांनीं एकविचारें सर्व गोष्टी व कारभार एके ठिकाणीं बसून करावा. "द्यावें" नारायणरावांनीं व "देवावें" दादांनीं करावें. परंतु हा ठराव थोड्याच दिवसांत फोल झाला. साताऱ्याहून पेशवाईचीं वस्त्रें आणण्यास नारायणराव पुण्याहून निघाले ( १-१२-१७२ ) तेव्हां दादांनीं बरोबर चलण्याविषयीं त्यांनीं आग्रह केला. त्यावेळीं दादांनीं स्वतःस २२ लक्षांचा सरंजाम देण्याबद्दल हट्ट घेतला. परंतु नारायणराव व इतर मुत्सद्दी यांनीं त्यांची युक्तीनें समजूत घातली. साताऱ्यास पोंचल्यावर, वेण्येच्या कांठीं मुक्काम करून नारायणरावांनीं छत्रपतींनां व त्यांच्या राण्यांनां मेजवानी व नजरा केल्या व छत्रपतींनीं नारायणरावांनां पेशवाईचीं वस्त्रें व शिक्के-कटयार आणि जरीपटका दिला(१३डिसेंबर,१७७२) मग श्रीमंत पुण्यास परत आले.

श्रीमंतांचा प्रथम नाना व फडके यांच्यावर बराच विश्वास होता; मात्र बापूवर फारशी मर्जी नव्हती. पुढें एकदां तर त्यांनीं बापूचें न ऐकतां त्यांस दुरुक्ति बोलून त्यांचें मन

दुखविलें. त्यामुळें त्या पाताळयंत्री मुत्सद्यानें उदासीन राहून बहुतेक कारभार अंगावाहेर टाकला; या सुमारास हलक्या लोकांची रीघ श्रीमंतांजवळ पडत चालली व ते त्यांच्या गोष्टी ऐकूं लागले; त्यांनीं बाबाजी बर्वे यास कारभार सांगितला. या सुमारास फिरंग्यांनीं वसई, साष्टी वगैरे आपला गेलेला प्रांत परत मिळविण्याची जय्यत तयारी करून विजयदुर्ग व रत्नागिरी बंदरांत ते ससैन्य उतरले. त्यामुळें पुण्यास आरमाराचे सरदार होते त्यांनां श्रीमंतांनीं आणखी जास्त मदत देऊन तिकडे पाठविलें, परंतु त्यापूर्वींच कृष्णाजी धुळप यानें शिलकी आरमारासह फिरंग्यांचा सडकून पराभव करून मालवणापर्यंत त्यांचा पाठलाग केला ( जाने. १७७३ ).

इकडे दादा व आनंदीबाई यांच्या, आपल्याविरुद्ध मसलती चालल्या आहेत असें कोणी कळविल्यावरून, पुरती चौकशी न करितां व बापू आणि नानांच्या मताविरुद्ध श्रीमंतांनीं दादांनां सहकुटुंब कैदेंत टाकिलें ( एप्रिल ). या सुमारास रायगडच्या किल्लेदारानें शिद्यांच्या तर्फे कांहीं गडबड केल्यानें श्रीमंतांनीं छत्रपतींनां ४० हजार रुपये देऊन रायगड आपल्या हातीं घेतला.

तिकडे उत्तरेकडे सुजाउद्दौला व इंग्रज यांच्या चिथावणीवरून दिल्लीच्या बादशहानें नजीबखानाच्या मार्फत तेथें असलेल्या मराठ्यांच्या( होळकर व विंचूरकर )वर स्वारी करविली; परंतु तींत त्याचाच पराभव झाला. या लढाईंत कांहीं कवायती इंग्रजी पलटणेंहि बादशहाच्या बाजूस होतीं. बादशहानें घाबरून तह करून पूर्वींप्रमाणें वागण्याचें कबूल केलें. पुढें मराठ्यांनीं सुजाउद्दौला, इंग्रज व रोहिले यांची जूट मोडण्यासाठीं रोहिल्यांवर स्वारी केली व त्यांचा मोड केला; तेव्हां हाफिज रहिमत रोहिला हा तहास तयार झाला. इतक्यांत सुजा व इंग्रज त्याच्या मदतीस आले. या सर्वांची फौज ६०।७० हजार व मराठे ३० हजार असल्यानें आणि पावसाळाहि नजीक आल्यानें मराठे दुआबांतून परतून दिल्लीस आले.

नागपूरकर भोंसल्यांच्या घरांतहि पेशव्यांप्रमाणें यावेळीं भाऊबंदकी माजली होती. जानोजी वारल्यावर माजी पेशव्यांनीं सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें रघूजीस देऊन मुधोजीस त्याचा कारभारी केलें होतें. पुढें मुधोजी हा दादासाहेबांच्या पक्षास मिळाला व त्याचा भाऊ साबाजी हा माधवराव व नारायणराव यांनां मिळाला. यावेळीं नारायणरावांनीं रघूजीचें सेनासाहेबसुभ्याचें पद काढून तें साबाजीस दिलें व त्याच्या कुमकेस पुण्याहून सैन्यहि पाठविलें. त्याच्या साहाय्यानें तिकडे साबाजीनें मुधोजीशीं भांडण चालविलें ( मे ).

इकडे दादांनीं मसलत करून कैदेंतून सुटण्याचा प्रयत्न चालविला. गुप्तपणें ठिकठिकाणीं फौज जमवून, मुधोजीशीं त्याच्या वकिलामार्फत पत्रव्यवहार ठेवला. तसेंच हैदराच्या पुण्यास असलेल्या वकिलाच्या द्वारें खटपट सुरू केली. इतक्यांत श्रीमंत हे मातोश्रीस भेटण्यास गंगापुरास गेले. ही संधि साधून दादांनीं शनवारवाड्यांतून पळून जाण्याचा प्रयत्न केला; परंतु आयत्या वेळीं बेत फुटला व नारो आप्पाजी यानें त्यांनां पकडून पुन्हां कैदेंत ठेविलें. ही बातमी समजतांच श्रीमंत तातडतोब पुण्यास आले. हैदराकडील फितुराचे कागद पकडून त्यांनीं त्याच्या वकिलास व इतर फितुऱ्यास कैदेंत टाकून दादांची कैद कडक केली व त्यांचा जमलेली फौज उधळून लाविली.

हैदरानें वरील आगळीक करून, शिवाय माधवरावांच्या वेळच्या आपल्या पराजयांचें उट्टें काढण्यासाठीं त्यानें या सालीं पेशव्यांविरुद्ध तयारी चालविली. त्यामुळें दसऱ्याअखेर त्याच्यावर स्वारी करण्यासाठीं श्रीमंतांनींहि तयारी चालविली आणि उत्तरेकडून विंचूरकर व होळकर यांनां परत बोलाविलें. त्यांनां यावेळीं परत बोलाविणें योग्य नव्हतें. कारण यावेळीं उत्तरेकडे मोंगल, रजपूत, इंग्रज, पठाण, रोहिले, बुंदेले हे सारे एक होऊन मराठ्यांविरुद्ध उठले होते. अर्थात वरील मराठी सेनापतींच्या मदतीस उलट इकडूनच आणखी फौज जावयास पाहिजे होती; म्हणजे वरील शत्रूंवर दाब बसून आज तीन वर्षांत मिळविलेला आग्रा, दिल्ली मथुरा, कनोज वगैरे प्रांत हातांत राहिला असता. हैदराची समजूत चतुराईनें पाडतां आली असती. परंतु हें सामर्थ्य सांप्रतच्या श्रीमंतांस नव्हतें व त्यांच्या कारभाऱ्यांनींहि हें लक्षांत घेतलें नाहीं असें रा. खरे यांनीं म्हटलें आहे. तिकडे मुधोजीनें एलिचपूरच्या नबाबाच्या साहाय्यानें साबाजीचा पराभव केला; तेव्हां त्याच्या मदतीस स्वतःच जाण्याचें श्रीमंतांनीं ठरविलें, तत्पूर्वींच त्यांचा अंत झाला.

याच सुमारास चांद्रसेनीय कायस्थांचें प्रकरण उपस्थित झालें. त्याबद्दल वा. कै. खरेशास्त्री यांचा ( ऐ. ले. संग्रह. भाग चवथा, पृ. १९५६-६० ) उतारा पुढें देतों. "प्रभु लोक आपण क्षत्रिय असून आपणांस वेदोक्त कर्मांचा अधिकार आहे असें म्हणून त्याप्रमाणें वागणूक करीत असत. पूर्वींपासून या बाबतींत ब्राह्मणांची व त्यांची कलागत होत आली असून अनेक वेळां उभय पक्षांकडून सरकारांत फिर्यादीहि गेल्या परंतु त्या त्या वेळचे अधिकारी या जातीजातींच्या कलहाचा निकाल कोणच्याहि पक्षाचा अभिमान न धरितां, पूर्वीं चालत आलें आहे तसें चालवावें...असा करून ती वेळ भागवून नेत. प्रस्तुत ब्राह्मणांकडून प्रभूंवर सरकारांत फिर्याद आल्यावरून नारायणरावसाहेबांनीं प्रभू क्षत्रिय नाहींत, त्यांस वेदोक्त कर्मांचा अधिकार नाहीं, शूद्राप्रमाणें त्यांनीं वागावें असा ठराव केला व त्या अर्थाचा प्रभूंपासून नऊ कलमांचा कतबा लिहून घेतला, प्रभूंचें म्हणणें, 'आपण कतबा खुषीनें दिला नाहीं...पेशव्यांनीं...नानाप्रकारें जुलूम केला त्यामुळें निरुपाय होऊन ... लिहून दिला. ' यामुळें ती सारी जात खवळून गेली व इतिउत्तर तिनें दादांचा पक्ष धरिला. दादा व आनंदीबाई यांचा अनन्वित छळ पेशव्यांनीं केल्याविषयीं प्रभूंनीं जे लेख लिहिले आहेत ते सर्व खरे

आहेत असें आम्हांस वाटत नाहीं. सदर लेखांविषयीं आमचें (खरेशास्त्री) मत ग्रांटडफच्या मताप्रमाणेंच आहे. तें हेंच कीं, या पेशव्यांच्या हातून मूलपणामुळें जे अल्पस्वल्प दोष घडले असतील, त्यांचे पक्षाभिमानास प्रवृत्त झालेल्या लोकांनीं तिखटमीठ लावून वर्णन केलें आहे."

पेशवे हे मुधोजीवर जाणार म्हणून त्यानां इकडेच अडकवून ठेवण्यासाठीं व त्यांतल्यात्यांत दादानां मोकळे करण्यासाठीं पुण्यास एक कट झाला, प्रथम याचें स्वरूप भयंकर नव्हतें. दादानां सोडवून लांब न्यावें व फौज जमविण्यास त्यास मदत करावी; त्यांनीं फौज जमवून धामधूम केली कीं, पेशवे इकडेच अडकतील, असा हा कट होता. मुधोजीचे वकील व्यंकट काशी व लक्ष्मण काशी आणि दादांचा विश्वासु सरदार सखाराम हरि हे तिघे प्रभु या कटाचे मूळ उत्पादक होत. यापुढें या कटांत बडीं बडीं प्रस्थें मिसळून त्याचा पहिला रंग बदलून आतां निराळीच मसलत ठरली. ती म्हणजे नारायणरावानां कैदेंत टाकून दादानां गादीवर बसवावयाचें. भवानराव प्रतिनिधि, सदाशिव रामचंद्र शेणवी, विठ्ठल रायरीकर व सखारामबापू हे यांत होते. सर्व व्यवस्था दादांच्या संमतीनें चालली. हा कट फार गुप्त व अत्यंत जलद झाला असावा. हा कट तयार होतो तोंच कांहीं दुष्ट लोकांनीं आनंदीबाईच्या संमतीनें किंवा आज्ञेनें त्या कटांत आणखी एक पोटकट उभा केला. तो म्हणजे श्रीमंतांस कैद करण्याऐवजीं ठार मारावें. या पोटकटाची बातमी दादानां किंवा मुख्य कटांतील माणसांनां माहीत नसावी.

श्रीमंतांस धरण्याचें काम वाड्यावरील पहारा करणाऱ्या गारद्यांच्या सुमेरसिंग, खरकसिंग, महंमदइसब या तीन जमातदारांवर सोंपविलें. त्यांनां दादांनीं स्वदस्तुरचा हुकूम दिला. त्यांत नारायणराव यांस "धरावें" असें वाक्य होतें. परंतु पूर्वी ठरल्याप्रमाणें, आनंदीबाईनें तो हुकूम मागून घेऊन दादानां न कळत त्यांतील "ध" चा "मा" केला. गारद्यांस या कामासाठीं साष्टी,नगर व पुरंदर हे तीन किल्ले आणि पांच लक्ष रुपये देऊं केले होते. यांपैकीं मुख्य कटवाल्यांनीं रक्कम कबूल केली असावी व पोटकटवाल्यांनीं किल्ले कबूल केले असावेत असें वाटतें.या कटास इतरहि गोष्टी अनुकूल बनल्या; पावसाळ्यामुळें फौजा घरीं गेल्या होत्या; पुण्यास ३।४ हजार फौज उरली होती. आपणांस कोणी कैद करील किंवा मारील अशी कल्पना सुद्धां श्रीमंतांस नव्हती; त्यामुळें ते गैरसावध होते. एकदां पर्वतीस बोथाटी खेळत असतां त्यांनीं नाना फडणविसाचें पागोटें उडविलें व थट्टा केली; त्यावेळीं नानांनीं "श्रीमंतानीं माझें उडविल्यास हरकत नाहीं, स्वतःचें सांभाळावें" अशी सूचना त्यांनां केली होती; पण तिकडे त्यांनीं फारसें लक्ष दिलें नाहीं. नानानां या पकडण्याची थोडीशी कुणकुण होती. गारदी दंगा करणार किंवा पेशवे कैद होणार या गोष्टी त्याकाळीं अश्रुतपूर्व नव्हत्या. कारण गारदी नेहमींच पैशासाठीं कटकटी करीत; तसेंच खुद्द थोरले माधवराव १ वर्ष व दादा तर ५ वर्षें कैदेंत होते. त्यामुळें पकडण्याच्या कटाबद्दल फारशी काळजी कोणीं (त्याचप्रमाणें नानानींहि) घेतली नाहीं. मात्र खरेशास्त्री म्हणतात त्याप्रमाणें मारण्याचा कट झाला आहे, याची कोणासच कल्पना नव्हती. "गारद्यांच्या हातें पेशव्यांचा खून करण्यासारखी भयंकर मसलत कोणाहि मराठी मुत्सद्द्याच्यानें कबूल करवली नसती ...यावरून बायकांच्या व अल्पबुद्धि दुष्ट लोकांच्या संमतीनें ती आयत्यावेळीं ठरली असावी हें निःसंशय होय."

भाद्रपद शुद्ध १३ शके १६९५ (३० आगष्ट १७७३) रोजीं सकाळीं कुलाब्याहून आलेल्या रघोजी आंग्र्याची भेट घेऊन व पर्वतीस जाऊन श्रीमंत वाड्यांत आले. वाटेंत त्यास गारदी आज दंगा करणार म्हणून समजल्यावरून त्यांनीं हरिपंत फडक्यास गारद्यांचा बंदोबस्त करण्यास सांगितलें. परंतु हरिपंतानें तात्काळ बंदोबस्त न करतां तो कोठें जेवावयास गेला, जेवणानंतर बंदोबस्त करण्याचें त्यानें ठरविलें; दंग्याबद्दल त्याला विशेष वाटलें नाहीं. वरील आज्ञा, तुळाजी खिदमतगार जवळ होता त्यानें ऐकून कटवाल्या मंडळीस कळवून लवकर कृत्य आटोपलें. तो फितुरी होता. दुपारीं बारा वाजतां सुमेरसिंगादि मंडळीनें ७००-८०० गारदी हजेरीच्या निमित्तानें एकत्र जमवून, दिल्लीदरवाज्यावर चाल करून व पहारेकरी कापून सर्वत्र आपल्या चौक्या बसविल्या आणि एकसारखी लुटालूट व कत्तल चालविली. देवघर झाडून लुटलें. ब्राह्मण ७८ असामी, दोन गाई, दोन कुणबिणी, यांखेरीज चौकीदार मारले गेले. सुमेरसिंग व महंमद इसब एक टोळी घेऊन श्रीमंतांचा शोध करीत होते. श्रीमंत झोंपले होते; ते दंग्यानें जागे होतात तोंच सुमेरसिंगादि मंडळी जवळ येऊन ठेपली. यावेळीं श्रीमंतांच्या जवळ एक दोन पुरुषच होते; ते पळाले तेव्हां श्रीमंत हे दादांच्या खोलींत जाऊन त्यानां मिठी मारून प्राण वांचविण्याबद्दल काकुळत करूं लागले. तों गारदी आले; दादानीं त्यानां पेशव्यांस न मारण्याबद्दल सांगितलें तेव्हां त्यांनीं आतां आम्हास मार्ग सरतां येत नाहीं, पेशव्यास तुम्हीं सोडा, नाहीं तर दोघेहि मराल असें सांगितलें. त्याचवेळीं सुमेरसिंगानें एक वार केला, त्यानें दादांस जखम झाली; तेव्हां त्यानीं पेशव्यांस लोटून दिलें. इतक्यांत तुळाजी पवार यानें पेशव्यांचे पाय धरून खालीं पाडलें; तों चापाजी टिळेकर नांवाचा एक विश्वासू खिदमतगार त्यांच्या अंगावर पडला; परंतु कांहीं उपयोग न होतां गारद्यांनीं त्या दोघांनां ठार केलें, इच्छारामपंत ढेरेहि यावेळीं मारला गेला. नंतर दादा सदरेस आले, त्यांच्या नांवाची द्वाही वाड्यांत गारद्यांनीं फिरविली. पेशव्यांची स्त्री गंगाबाई माहेरून तावडतोब आली व सती जाण्याबद्दल हट्ट घेऊन बसली; तेव्हां तिला पार्वतीबाईनें, तुला कांहीं दिवस गेले आहेत असें सांगून खोलींत कोंडलें (कोठें आनंदीबाईनें कोंडलें असेंहि म्हटलें आहे). वाड्यांत गारद्यांचा दंगा झाल्याचें शहरांत समजलें.

तेव्हां लोक घाबरले व बापू, नाना, मामा वगैरे मुत्सद्दी कोतवालचावडींत जमा होऊन त्यांनीं शहरची नाकेबंदी केली. परंतु वाडा गारद्यांच्या ताब्यांत राहिला व आंतील बातमी बाहेर समजेना. वाड्यास तोफा लावून गारद्यांस बाहेर काढावें असें कोणीं सुचविलें, परंतु मुत्सद्द्यांस तें पटेना. कारण वाड्यांत श्रीमंत अद्यापि जिवंत असतील असेंच त्यांनां वाटत होतें. इतक्यांत दादांच्या स्वदस्तुरची चिठ्ठी बापूस आली कीं, " आतां व्यर्थ खटपट कशास करितां ? चिरंजीव राव गारद्यांच्या कटकटींत मारले गेले." मग बापू वाड्यांत गेला व दादांस भेटला. श्रीमंतास कैद करावें येथपर्यंतच्या मसलतीस बापूची संमति होती, पण घडलेली भयंकर गोष्ट पाहून त्याचें मन विटलें. दादानें त्यास कारभार हातीं घेण्यास सांगितलें, तेव्हां आपले शरीरीं समाधान नाहीं, फडणविसास बोलवा.असें म्हणून तो घरीं गेला. सायंकाळीं त्रिंबकमामास बोलावून दादानीं श्रीमंतांच्या शवाची व्यवस्था करावयास सांगितलें; त्यावर मामानें मध्यरात्रीं शवाचें दहन करविलें. [ नारायणराव पेशव्यांची बखर; खरे- ऐ. ले. सं. भा. ४; ग्रँटडफ; पेशव्यांची बखर ]

**नारायणसार**—मुंबई, कच्छ. भुजच्या वायव्येस ८१ मैलांवरील खेडें व यात्रेचें ठिकाण. येथील देवळांनां तटबंदी आहे, व तिच्या बाहेर लोकांची वस्ती आहे. नारायणसार हें प्राचीन काळीं तलावाकरितां फार प्रसिद्ध होतें. याशिवाय तेथें एक आदिनारायणाचें फार पुरातन देऊळ होतें. रावदेसलची पत्नी वाघेली महाकुंवार हिनें स. १७३० पासून येथें लक्ष्मीनारायण, त्रिकमराय, गोवर्धननाथ, द्वारकानाथ, लक्ष्मी वगैरे देवांचीं मंदिरें बांधलीं. किल्ल्याजवळील मऊ व वाळूच्या खडकांत देवळें व गुहा कोरलेल्या आहेत. त्यांनां रामगुंफा, लक्ष्मणगुंफा, शेषगुंफा अशीं नांवें आहेत. येथें चैत्र व कार्तिक महिन्यांत जत्रा भरते, त्यावेळेस आसपासच्या बहुतेक सर्व भागांतील लोक येथें जमतात.

**नारू**—ह्याला इंग्रजींत "गिनीवर्म" असें म्हणतात. व प्राणिशास्त्रांत याचें नांव "फिलॅरिया मेडिनेन्सिस्" असें आहे. हा एक परकायोपजीवी कीटक आहे, व हा केव्हां केव्हां मनुष्याच्या शरीरांत आपलें ठाणें देतो व मनुष्यप्राण्यास पुष्कळ इजा करतो. हा प्राणी हिंदुस्थानांत दक्षिण, सिंध या प्रांतांत, व इराण, तुर्कस्तान, अरबस्तान व आफ्रिकेच्या उष्ण प्रदेशांत आढळून येतो. हा या सर्व ठिकाणीं सारख्याच प्रमाणांत आढळून येत नाहीं. कांहीं ठिकाणीं कमी व कांहीं ठिकाणीं जास्त अशा प्रमाणानें आढळून येतो. दक्षिणेंत कांहीं कांहीं ठिकाणीं वर्षा व शरदृतूंत साधारणतः अर्ध्या लोकांनां हा नारूचा रोग होतो. व आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील बहुतेक सर्व निग्रो लोकांनां या रोगानें पछाडलेलें आढळतें. यूरोपांत हा रोग क्वचितच होतो. कारण त्यास कायमचें ठाणें देण्यास हवापाण्याचें आनुकूल्य मिळत नाहीं. तेथें कधीं कधीं हा रोग मनुष्येतर प्राण्यांस म्हणजे गाय, बैल, कुत्रा, घोडा इत्यादि प्राण्यांसहि होतो. अगदीं लहानाहून लहान नारूची लांबी १२॥। इंच असते. व अगदीं मोठ्याहून मोठ्या नारूची लांबी ४० इंच असते. व सरासरीनें पहातां याच्या तंतूची लांबी ३० इंच असते. या किड्याचा व्यास सरासरीनें ·६ इंच असतो. याचें शरीर लांब, गुळगुळीत, व दोऱ्यासारखें एकसारखें असतें व याचा वर्ण दुधासारखा पांढरा असतो. याच्या शेपटीचें टोंक थोडेंसें वळलेलें असून त्या टोंकाचा मनुष्याच्या शरीराच्या भागाशीं चिकटून राहण्याकरितां आंकडीसारखा उपयोग होतो असें म्हणतां येईल. या किड्याचें डोक्यावरील टोंक बोथट असतें, व शेवटीं या टोंकाचें शिरकवच होतें. या किड्याचें तोंड फार लहान असून त्रिकोनी असतें.

मनुष्याचे हात, पाय, व शरीराचा मुख्य भाग यांच्या चामडीच्या खालील भागांत नारू आपलें ठाणें देतो. नारू म्हणजे या किड्याची मादी होय. हा नारू पूर्णदशेस पोंचला म्हणजे तो आपल्या स्वाभाविक बुद्धीनें हळू हळू वाट काढीत खालीं जाऊं लागतो व शेवटीं तंगडींत किंवा पायांत येतो. शेंकडा ८५ रोग्यांस पायालाच नारू होतो. नारू आपल्या अंतिमस्थानीं आला म्हणजे तो आंतल्या जाड त्वचेस भोंक पाडतो. या ठिकाणीं कांहीं दाहजनक पदार्थ उत्पन्न झाल्यामुळें वरील पातळ त्वचेवरहि एक लहानसा फोड उत्पन्न होतो.कांहीं काळानें हा फोड फुटून त्याच्या जागीं एक लहानसा उथळ व्रण दिसून येतो. या व्रणाच्या मध्यभागीं एक लहानसें छिद्र असतें. कधीं कधीं फोड फुटतांच या छिद्रांतून नारूचें डोकें बाहेर आलेलें दिसतें. पण साधारण नियम असा आहे कीं, नारू असा पहिल्याप्रथम बाहेर दिसत नाहीं. व्रणाजवळ जर स्पंजाच्या तुकड्यानें थंड पाण्याचा प्रवाह सोडला व असें करतांना व्रणाच्या मध्यभागीं असलेल्या छिद्राकडे बारकाईनें पहात राहिलें, तर नारूचें अस्तित्व दिसून येतें. ह्या छिद्रांतून बाहेर पडलेल्या पदार्थाचा एक थेंब जर सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं ठेवून पाहिला तर त्यांत वेटाळ्यासारखे व कांहीं हालचाल करीत नसलेले असे लक्षावधि नारवांचे गर्भ दृष्टीस पडतात.

सायक्लॉप्सच्या (खेंकड्याच्या वर्गांतील सूक्ष्म प्राणी) शरीरांत जें नारूचें स्थित्यंतर होतें त्याचा शोध पहिल्यानें तुर्कस्तानांतील फेडस्केन्को या शास्त्रज्ञानें लाविला. या शास्त्रज्ञाचें असें मत होतें कीं, हा सायक्लॉप्स प्राणी पिण्याच्या पाण्याबरोबर मनुष्याच्या पोटांत जातो व तेथें त्याचें पचन होऊन जातें. अशा रीतीनें त्याच्या शरीरांतील नारू मोकळे होतात व हळू हळू मनुष्याच्या त्वचेखालच्या भागांत येतात.

नराबद्दल कांहीं खात्रीलायक माहिती नाहीं.तशीच मादीची गर्भधारणा केव्हां व कोठें होते याबद्दल सुद्धां कांहीं खात्रीची माहिती नाहीं. बहुतकरून मादी मोठी होण्यापूर्वीच तिची गर्भधारणा होत असावी; आणि नरानें काम झाल्याबरोबर तो मरत असावा व मादीच्या शरीरांतच त्याचें शोषण होत

असावें असें दिसतें. मनुष्याच्या शरीरांत नारूची पूर्ण वाढ झाली म्हणजे नारू पायाकडेच जातो व पायावरील किंवा तंगडीवरील कातडीला भोंक पडतें. कारण पाण्याच्या डबक्याशीं (ज्यांत नारूचा मध्यस्थ म्हणजे सायक्लॉप्स असतो त्या) शरीराच्या इतर भागापेक्षां पायांचाच अधिक स्पर्श होतो. तसेंच नारू झालेल्या भागाला पाण्याचा स्पर्श झाला म्हणजे नारू आपलीं अंडीं बाहेर टाकतो. तसेंच नारू पिकला म्हणजे लोक त्यावर पाण्याची धार सोडतात, अथवा नदींत किंवा तळ्यांत पाय ठेवतात. याचें कारण पाणी पाहून नारू आपलीं अंडीं घालण्याकरितां बाहेर निघावयाचा संभव असतो. पण नदींत पाय ठेवल्यानें नारवाचा प्रसार होण्यास मात्र आयतेंच साधन होतें.

मनुष्याच्या शरीरांत नारू केव्हां केव्हां पूर्णावस्थेस येण्यापूर्वीच मरून जातो. अथवा पूर्णावस्थेस पोंचला तरी एखाद्यावेळीं कातडीस भोंक पडत नाहीं. या दोन्ही गोष्टींपैकीं कोणतीहि गोष्ट घडून आली तरी तेथें विद्रधि होण्याचा संभव असतो अथवा नारूचें खडूसारख्या पदार्थांत रूपान्तर होतें. असें झालें म्हणजे पुष्कळ वर्षेपर्यंत चामडीखालीं एखाद्या कठिण दोरीप्रमाणें नारूचीं वेटाळीं हाताला लागतात.

उ प चा र.—फार दिवसांपासून, नारू झाला म्हणजे त्याचा बाहेर निघालेला भाग एखाद्या काडीला बांधून त्या काडीला रोज एक दोन फेरे देऊन हळू हळू नारूला बाहेर काढण्याचा प्रयत्न करतात. केव्हां केव्हां या प्रयत्नाला यश येतें, परंतु यामुळें नारू तुटूनहि जातो. अशा रीतीनें नारू तुटला म्हणजे त्याचे परिणाम फार वाईट होतात; नारूचे असंख्यात गर्भ बाहेर पडून शरीरांत प्रवेश करतात व त्या जागेचा दाह होतो व ताप येतो, नंतर गळवें होतात व तो भाग सडून जाण्याचा संभव असतो. यांतून नीटपणें बरें होण्यास फार दिवस लागतात. कधीं कधीं कायमचा अनिष्ट परिणाम घडून येतो. म्हणजे हाताचे अगर पायाचे सांधे जखडले जातात. केव्हां केव्हां तर मृत्यूहि येतो. म्हणून अशा रीतीनें नारूस जबरीनें बाहेर काढण्याचा मार्ग बरा नव्हे. कांहीं वैदू लोक नारू काढण्याच्या कामांत वाकबगार असतात. जें काम डॉक्टर-वैद्यांकडून होत नाहीं तें हे लोक सहज व थोड्या पैशांत करतात. पण पुष्कळांचा या लोकांवर विश्वास नसतो.

नारू झालेल्या भागास जर कांहीं इजा होऊं दिली नाहीं, व तो भाग वारंवार थंड पाण्यानें धुतला तर नारूच्या गर्भाशयांतील अंडीं हळू हळू आपोआप बाहेर येतात. अशा रीतीनें सर्व अंडीं बाहेर पडेपर्यंत नारू बाहेर येत नाहीं; त्यास बाहेर काढूं लागलें तर तो त्याचा प्रतिकार करतो. बहुतकरून नारूच्या शेपटीला असलेल्या आकडीमुळें त्याला चिकटी धरून राहतां येतें. परंतु १५-२० दिवसांत सर्व अंडीं बाहेर आलीं म्हणजे नारू आपोआप बाहेर येतो. यावेळेस हळू हळू एखाद्या काडीला गुंडाळून नारू बाहेर काढण्याचा प्रयत्न केला तर त्याच्या बाहेर पडण्यास पुष्कळ मदत होते. सर्व अंडीं बाहेर पडण्याच्या पूर्वीं मात्र कधींहि ओढाताण करूं नये. पाण्याचे हपके मारून नारू धूत असतांना जर कांहींहि बाहेर आलें नाहीं तर बहुतकरून सर्व अंडीं बाहेर पडलीं असें समजावें.

एमिली नांवाच्या फ्रेंच शस्त्रवैद्यानें नारूवर एक दुसराच उपचार सुचविला आहे. हा उपाय केला तर नारूचीं सर्व अंडीं बाहेर पडण्याची वाट पहात राहावें लागत नाहीं; अथवा नारू तुटून जे भयंकर परिणाम होतात त्यांचेंहि भय बाळगावें लागत नाहीं. नारू जर बाहेर दिसत असला, तर त्या नारूच्या छिद्रांत १०००त १ या प्रमाणाचें मर्क्युरिक लोशन, किंवा रसकापराचें पाणी प्रॅव्हॅझच्या पिचकारीनें घालावें. म्हणजे नारू मरतो. नंतर चोवीस तासांनीं नारू सहज बाहेर काढतां येतो. जर नारू बाहेर दिसत नसला, तर जेथें तो हाताला लागत असेल त्याच्या अगदीं होईल तितक्या जवळ वरील मर्क्युरिक लोशनची पिचकारी मारावी. नारूच्या सभोंवतीं ४५ निरनिराळ्या ठिकाणीं असें करावें, म्हणजे हा नारू मरतो. या मेलेल्या नारूचें पुढें शरीरांत शोषण होऊन जातें. अथवा चिरा देऊन त्याला काढावा म्हणजे झालें. या उपायाचा काळजीपूर्वक उपयोग केला म्हणजे कोणत्याहि प्रकारचा घातक परिणाम होत नाहीं. याशिवाय अमरपत्ती नांवाच्या वनस्पतीचीं पानें नारूवर रामबाण आहेत असें म्हणतात. त्याचप्रमाणें जास्त प्रमाणांत हिंग पोटांत घेतला असतांहि नारू मरतो असें म्हणतात [भिषग्विलास, पु. १५].

**नारो आप्पाजी तुळशीबागवाले**—तुळशीबाग संस्थानचे मूळ संपादक नारो आप्पाजी हे पुणें प्रांताचे सरसुभेदार असून, पेशवाईंतील दोनचार आणीबाणीच्या प्रसंगीं यांनीं विशेष प्रकारची कामगिरी केलेली आहे. हे मूळ सातार्‍याखालील पाडळी गांवचे वतनदार कुलकर्णी असून, यांचें उपनांव खिरे हें होय. बालपणीं कांहीं तंटेबखेडे होऊन हे रुसून पुण्यास आले व खाजगीवाले यांच्या आश्रयास राहिले. त्यावेळीं हल्लींच्या तुळशीबागेच्या ठिकाणीं खरोखरीचा ' तुळसीबाग ' असून, त्याचें स्वामित्व खासगीवाल्यांकडे होतें. नारायणाकडे ह्या बागेंतील तुळशी वगैरे तोडून आणण्याचें काम असे, त्याची तरतरी पाहून खासगीवाल्यांची नारायणावर मर्जी बसली व पुढें त्यांनीं 'तुळशीबाग' त्यास बहाल केला. लागलीच नारोपंतानें तुळशीबागेंत श्रीरामाच्या मूर्तीची स्थापना करून, त्याच्या सेवेंत राहण्याचा क्रम आरंभिला. पुढें कर्मधर्मसंयोगानें जमाबंदीच्या मुख्याच्या जागीं याची नेमणूक झाली. अण्णाजी दत्तो याच्यानंतर जमाबंदीची व्यवस्था चांगल्याप्रकारें नारोपंतांनेंच केली. त्र्यंबकेश्वरी मुक्काम असतांना गौतमाश्रमींच्या एका सत्पुरुषाच्या कृपेनें नारोपंतास श्रीराम व जानकी अशा दोन मूर्ती मिळाल्या व त्यांचीच आपल्या तुळशीबागेंत शके १६८३ च्या सुमारास त्यांनीं मोठ्या समारंभानें स्थापना केली. लक्ष्मणाची मूर्ति बखतराम नामक सुप्रसिद्ध

कारागिराकडून मुद्दाम तयार करविली. तुळसीबाग संस्थानास पेशवे सरकार यांची पहिली देणगी शके १६८५ त मिळाली. नारोपंताचा पुत्र रामचंद्र हा होळकराच्या दंग्याच्या वेळीं हयात होता. [ भा. इ. मं. इतिवृत्त १८३७ ].

**नारो त्र्यंबक हणमंते**—उर्फ नारायण त्रिमल. हा मूळ मलिकंबरच्या हाताखालीं तयार होऊन लुखजी जाधवाचे पदरीं राहिला. जिजाबाईच्या लग्नानंतर नारोपंत यास लुखजीनें तिच्या बरोबर भरंवशाचा माणूस म्हणून भोसल्याकडे पाठविलें. शहाजीनें त्याला आपल्याबरोबर कर्नाटकांत नेलें (१६३८). तेथें यानें पुष्कळ कामें केलीं. त्याचा भाऊ बाळकृष्ण म्हणून होता, त्यास पुढें शिवाजीनें मुजुमदार केलें. नारोपंत राजनिष्ठ व मुत्सद्दी होता; तसाच तो विद्वान असून पंडितहि होता. त्याच्यामुळें कर्नाटकांत शहाजीचा अंमल स्थिर झाला. याला रघुनाथ व जनार्दन असे दोन पुत्र होते. हा बंगलोर येथें १६५३ त वारला. [ सप्तप्रकरणात्मक बखर; सभासद. ]

**नारोपंत चक्रदेव**—हरिपंत फडक्याचा मुलगा रामचंद्र बाबा याचा कारकून. हा नानाफडणविसाचा माणूस होता. ज्यावेळीं नानाफडणविसानें महाडचें कारस्थान चाललें होतें त्यावेळीं बाळोबा तात्या पागनिसानें बाबास पकडून तुरुंगांत टाकलें. तेव्हां यानें मशीरउल्मुल्क याच्या छावणींत लपून स्वतःचा बचाव केला. महाडचें कारस्थान पक्कें शिजल्यावर याच्याबरोबर कांहीं शिंद्याचे व कांहीं मशीरउल्मुल्कचे लोक देऊन यास परशुरामभाऊस पकडण्याकरितां पाठविलें होतें ( १७९६ ).

नाना पुन्हां येऊन कारभाऱ्याचें काम पहूं लागल्यावर त्यांनीं पेशव्यांच्या सैन्याचें आधिपत्य नारोपंताकडे दिलें ( १७९७ ). इकडे शिंद्यानें नानास पकडलें त्याच वेळेस रावबाजीनें नारोपंत चक्रदेव वगैरे नानांच्या पक्षाच्या लोकांस कांहीं कामाकरितां म्हणून आपल्या भेटीस बोलावून त्यांना कैद करविलें ( जानेवारी १७९८ ). पुढें सातारकर छत्रपतींनीं दंगा आरंभल्यावर त्यांच्या पारिपत्यासाठीं पेशवे आपली फौज पाठवूं लागले असतां तिनें आमचा मागील पगार द्या अशी ओरड सुरू करून दंगा केला. तेव्हां तो शांत करण्यास दुसरा कोणी समर्थ नाहीं असें दिसून येतांच गोविंदराव पिंगळ्याच्या शिफारसीवरून रावबाजीनें नारोपंतास बंधमुक्त केलें व त्याजकडे तें काम सोंपविलें. पेशव्यांच्या फौजेचा नारोपंतावर विश्वास असल्यामुळें त्यानें अवघ्या एका दिवसांत सर्व सैन्यांत शांतता स्थापन केली. यानें पुढें नानांच्या सुटकेसाठीं पुष्कळ खटपटी केल्या; दौलतराव शिंदे व पेशवे यांच्यांत तेढ आणली; दौलतराव व त्याच्या सावत्र आया यांचीं भांडणें वाढविलीं. शेवटीं याच्या मनाप्रमाणें नानांना शिंद्यानें मुक्त केलें. अमृतराव पेशवे यांचें व दौलतरावाचें यानेंच जुळवून दिलें. बापू गोखल्याच्या पूर्वी व परशुरामभाऊच्या नंतर हा मराठ्यांचा सेनापति होता [ नानाफडणवीस पहा ]. नानांनीं शेवटीं शेवटीं आपला कारभार नारोपंताच्याच हातीं दिला होता. नाना वारल्यावर रावबाजीनें नारोपंतास कैद केलें. पुढें यशवंतराव होळकरानें पुणें जाळलें तेव्हां त्यानें याची सुटका केली [ शिंद्याचा गृहकलह; डफ; पेशव्यांची बखर ]

**नारोराम मंत्री**—हा सावंतवाडी नजीक कोचरें गांवचा कुलकर्णी, सारस्वत ब्राह्मण होता. यास नारबा मंत्री म्हणत. स. १७०७च्या सुमारास तो धनाजी जाधवाजवळ येऊन राहिला. स. १७१३ त त्यास शाहूनें चंद्रसेन जाधवाकडून काढून मंत्रिपदाचा अधिकार दिला. कारण पूर्वीचा मंत्री पुंडे हा ताराबाईच्या पक्षाचा होता. नारोमंत्री आपल्या वंधूंसह सातारा जिल्ह्यांत बांगणी येथें रहात असे. अद्यापि हा गांव त्या घराण्याकडे इनाम चालतो. याच्या मार्फत पोर्तुगीजांनीं १७३९ च्या सुमारास चौल, मरोळ वगैरे ठाणीं मराठ्यांस देण्याची खटपट चालविली होती. बाजीराव वारल्यावर नानासाहेब पेशव्यास साताऱ्यास नेण्यासाठीं छत्रपतींकडून हाच पुण्यास आला होता. नारबा विशेष कर्तृत्ववान नव्हता, तथापि तो सुस्वभावी असून पेशव्याशीं उघड विरोध करीत नसे. तो सन १७४८ त मरण पावल्यावर घनशाम नांवाच्या त्याच्या पुतण्यास त्याच्या बायकोच्या मांडीवर दत्तक देऊन त्याच्या नांवानें शाहूनें मंत्रिपद चालविलें. रामराजाच्या वेळेस घनश्याम नारायण मरण पावला आणि त्याचा मुलगा रघुनाथ यास मंत्रिपदाचीं वस्त्रें मिळालीं. तो इस्लामपूर येथें राहूं लागला. इ. स. १७५३ त साताऱ्यास मंत्र्याचा वाडा आग लागून जळाला होता. रघुनाथाचा भाऊ नारायण याचा व रघुनाथाचा तंटा लागला. त्याचा वंश तुकाईच्या वाडीस आहे. रघुनाथ वारल्यावर त्याचा पुत्र जयवंत यास धाकट्या शाहूनें मंत्रिपदाचीं वस्त्रें दिलीं. जयवंतानें आपला भाऊ बजाजी याचा मुलगा रघुनाथ हा दत्तक घेतला. जयवंतराव स. १८२९ च्या सुमारास मरण पावल्यावर रघुनाथरावाकडे मंत्रिपदाचा अधिकार चालला. रघुनाथरावास दोन मुलगे, आनंदराव व माधवराव या नांवाचे होते. [ अष्टप्रधानांचा इतिहास; शाहुमहाराज रोजनिशी; राजवाडे खंड. ६ ]

**नारोवाल**—पंजाब, सियालकोट जिल्हा, राय तहशीलींतील एक शहर. हें रावी नदीच्या उत्तर किनाऱ्यावर वसलें आहे. लो. सं. (१९०१) ४४२२. चौथ्या शतका पूर्वी बाजवांसी पैकीं नारु नांवाच्या मनुष्यानें हें वसविलें. त्यावरून त्याला नारोवाल असें नांव पडलें. येथें मुख्यत्वेंकरून पितळेचीं भांडीं व नक्षीदार जोडे बनवितात. येथें एक मिशन शाळा, दवाखाना व पंजाबी आंग्लोव्हर्नाक्युलर शाळा आहेत.

**नारो शंकर**—याचें आडनांव दाणी. शंकरराव हा निजामाकडे नोकर होता; त्याचे आबाजी, लक्ष्मण व नारायण असे तीन पुत्र होते. नारोपंत प्रथम उदाजी पवाराच्या हाताखालीं शिलेदारीवर होता. माळव्यांत मराठ्यांनीं जी प्रथम हालचाल सुरू केली, त्यावेळीं (१७२०) याचा उल्लेख उदाजीबरोबरच आढळतो. नंतर वा ( १७३० ) त्याचा उल्लेख मल्हारराव

होळकराच्या पदरीं असल्याबद्दलचा सांपडतो. मल्हाररावानें याला इंदूरचा सुभेदार नेमलें होतें. पुढें त्यानें लोकांस हैराण केल्यामुळें पेशव्यांनीं त्यास माळव्याच्या कामावरून परत बोलाविलें.

बुंदेलखंडाची खंडणी वसूल करीत असतां मराठ्यांचा सुभेदार मल्हार कृष्ण याचा ओर्च्छेकरानें विश्वासघातानें खून केल्यामुळें पेशव्यानें मल्हाररावाच्या सांगण्यावरून नारोपंतास त्याच्यावर पाठविलें. नारोपंतानें ओर्च्छा घेऊन व त्यावर गाढवांचा नांगर फिरवून राजास कैद करून झांशीच्या किल्ल्यांत ठेविलें. यानेंच झांशीची वसाहत केली व किल्ल्याची डागडुजी केली (१७४२); ओर्च्छाचें ३०।३५ लाखांचें राज्य यानें खालसा करून स्वराज्यांत मिळविलें. तेव्हां यालाच त्या प्रांताचे सुभेदार नेमण्यांत आलें. त्यानें झांशीस राहून हा कारभार १४ वर्षे केला. यावेळीं त्यास जरीपटका, साहेबी नौबत व १५ लाखांचा सरंजाम मिळाला होता. पुढें त्याच्याबद्दल कागाळ्या आल्यावरून त्यास पेशव्यांनीं परत बोलाविलें. नंतर तो गुजराथच्या व सावनूरच्या मोहिमांत हजर होता (१७७५). या लढायांत त्यानें बराच पराक्रम गाजविल्यानें व पुढें दत्ताजी शिंद्याच्या मध्यस्थीनें पेशव्यांची गैरमर्जी नाहींशी होऊन तो पुन्हां उत्तरेकडे गेला (१७५७).

या सुमारास अबदालीनें दिल्लीवर स्वारी केली, त्यावेळीं बादशहाचें रक्षण करण्याचें काम याच्याकडे असतां, हा पळून गेला. ही त्याची नामर्दी पाहून बादशहानें पेशव्यांकडे तक्रार केली. पुढें पानपतच्या वेळीं भाऊसाहेबांनीं दिल्लीचें रक्षण करण्याचें आणि रसद पोहोंचविण्याचें काम त्याच्यावर सोंपवून, सुजाउद्दौला यास अबदालीकडून फोडण्याची कामगिरी सांगितली; परंतु त्यांपैकीं एकहि काम त्याच्याकडून पुरें झालें नाहीं. पानपतचा पळ दिल्लीस आल्यानंतर मल्हारराव होळकर व नारोपंत हे दख्खनमध्यें निघाले. वाटेंत नानासाहेब पेशव्यांची व यांची गांठ पडल्यावर त्यांनीं या दोघांवर जबर ठपका ठेवला. थोरल्या माधवरावांनींहि यास नांवें ठेवल्यामुळें, हैदरअल्लीवरील व निजामाविरुद्ध झालेल्या लढायांत हा पेशव्यांबरोबर हजर असे; त्यावेळीं त्यानें चांगला पराक्रम करून त्यांचा राग घालविला.

राघोबादादांनीं आपल्याकडे पेशवाईचा कारभार घेतला, तेव्हां (१६७२) भवानराव प्रतिनिधीवर त्यांची इतराजी होऊन, त्यांनीं आपल्या अल्पवयी मुलास प्रतिनिधि करून, त्याचें मुतालिकपद नारोपंतास दिलें. पुढें माधवरावानीं पुन्हां भवानरावास त्याचें पद परत केलें (१७६३). नारोपंत बहुतेक दादांचा पक्षपाती असे. त्याच्या सैन्यांत अरबांचा भरणा फार असे.

याच्या ताब्यांत दिल्ली असतांना, याला बादशहानें राजेबहाद्दर हा किताब व मालेगांव हा गांव जहागीर देऊन शिवाय इतर गांवेंहि सरंजामादाखल दिलीं होतीं. यानें इ. स. १७४० त मालेगांव येथें दिल्लीचे कारागीर आणून एक किल्ला बांधला. लष्करीदृष्ट्या याची बांधणी फार उत्तम आहे. मालेगांवचा किल्ला हा खानदेशचें नांक होय असें तत्कालीन इंग्रज लष्करी तज्ज्ञांनीं म्हटलेलें आहे.

नाशिक येथील रामेश्वराचें देऊळ यानें १७४७ सालीं बांधलें; हें दक्षिणेंत आढळणाऱ्या शिल्पकामाचें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. याचें नकशीकाम उत्तम आहे. यास १८ लाख रु. खर्च लागला. येथें नारोपंतानें (बहुधा वसईहून आणिलेली) एक फिरंगी कारागिरीची प्रचंड घंटा ठेविली आहे. तिच्यावर १७२१ हा आंकडा इंग्रजींत कोरलेला असून तिचा घेर सहा फूट आहे. जवळचा घाटहि नारोपंतानेंच बांधलेला आहे; त्यास ६० हजार रु. खर्च लागला. या घंटेस, देवळास व घाटास नारोशंकरी म्हणतात. त्यानें नाशकास एक वाडाहि बांधला. याचा भाऊ लक्ष्मणपंत हाहि याच्या बरोबर उत्तरेकडील राजकारणांत भाग घेत असे. हा प्रथम काल्पी व झांशी येथें सुभेदार होता. त्याचा मुलगा विश्वासराव हाहि कांहीं दिवस या सुभेदारीवर असे. नारोपंताचा दुसरा भाऊ आबाजी हा सुद्धां त्याच्या बरोबर उत्तरेकडे वावरत असे. नारोपंताच्या मृत्यूनंतर त्याच्या त्र्यंबक व रघुपत या दोन मुलांत सरंजामाबद्दल भांडण लागलें असतां, तें पेशव्यांनीं मोडलें. त्र्यंबकराव हा शिंद्याचा दिवाण होता. त्याचा पुत्र गोपाळराव यानें महादजी व दौलतराव शिंद्याबरोबर राहून मराठी राज्याची चाकरी केली. पुढें पेशवाईअखेर हा इंग्रजांस मिळाला. परंतु याचे अरब लोक मालेगांवचा किल्ला इंग्रजांच्या स्वाधीन करीनात. त्यामुळें त्यांनीं किल्ल्यास महिना-तीनवार वेढा देऊन किल्ला घेतला. या वेढ्यांत त्यांचें बरेंच नुकसान झालें (एप्रिल १८१८). किल्ला घेतल्यावर इंग्रजांनीं तो पाडून टाकला. गोपाळरावाचा पुत्र शिवराव नांवाचा होता.

मल्हारबा होळकर, विठ्ठ शिवदेव, हिंगणे, अंताजी माणकेश्वर वगैरे मंडळी ही पेशव्यांशीं फटकून उत्तरेकडे आपला स्वतः सुभा थाटण्याच्या विचाराची होती. यामुळें मध्यवर्तीसरकारचा फार तोटा होत असे. पानपतच्या अपयशाच्या अनेक कारणांपैकीं या लोकांची ही अराजनिष्ठा किंवा अराष्ट्रनिष्ठा हेंहि एक कारण होतें. या लोकांचा तत्कालीन पत्रव्यवहार वाचून पाहिल्यास ही बाब लक्ष्यांत येईल. याचा नाशिकचा वाडा यशवंतराव होळकर व त्र्यंबकजी डेंगळ्यानें जाळला होता. [ भारतवर्ष भाग १; डफ; राजवाडे खंड १, ६; ब्लॅकर-मराठा वॉर्स; लेक—सीजेस भा. ३ ].

**नार्थक्लिफ, लॉर्ड** (१८६५–१९२४)—हा प्रसिद्ध आंग्ल वृत्तपत्रकार व मुत्सद्दी डब्लिन येथें जन्म पावला. याचा बाप वकील असून ग्रेटनार्दर्न रेल्वेकंपनीचा सल्लागार होता. त्याची आई मॅकेट नांवाच्या एका आयरिश सावकाराची मुलगी असून ती अत्यंत बुद्धिमान होती. लॉर्ड नार्थक्लिफच्या घराण्याचें नांव हार्म्सवर्थ असून, नॉर्थक्लिफचें नांव आल्फ्रेड असें होतें. आल्फ्रेड हा लहानपणापासूनच मोठा

तरतरीत, मेहनती व अधाशी मुलगा असे.वयाच्या तेराव्या वर्षी त्यानें शाळेंत असतांना 'स्कूल मॅगेझाईन' नांवाचें एक मासिक चालविलें.स. १८८१मध्यें तो केंब्रिज येथें एका शिक्षकाजवळ विद्याभ्यासाकरतां राहिला व तेथें असतांना बायसिकलिंग, ग्लोब इत्यादि मासिकांनां त्यानें पुष्कळ लेख लिहून दिले. पुढें लॉर्ड लिफर्डच्या मुलांचा सोबती या नात्यानें त्यानें त्यांच्याबरोबर यूरोपची सफर केली. यूरोपहून परत आल्यानंतर वयाच्या १७ व्या वर्षी त्याला लंडनन्यूजच्या संपादकानें उपसंपादकाची जागा दिली. सन १८८८ मध्यें यानें 'ॲनसर्स टु कॉरसपांडन्ट्स' नांवाचें साप्ताहिक चालविलें व या पत्राची थोडक्याच दिवसांत प्रसिद्धि झाली. त्या पत्रामुळें जो फायदा झाला त्यावर त्यानें 'अमलमेटेड प्रेस' या नांवाची संस्था स्थापन केली. या धंद्यांत त्याला त्याचा भाऊ हॅरॉल्ड (लॉर्ड रादरमीयर) हा येऊन मिळाला. या संस्थेतर्फे जें वाङ्मय प्रसिद्ध झालें त्याच्या विक्रीमुळें त्याला दरवर्षी ५०००० पौंड फायदा होऊं लागला. ग्लॅडस्टन यानेंहि त्याच्या लेखांची स्तुति केली. १८९० नंतर त्यानें यूरोप, आफ्रिका, हिंदुस्थान, कानडा, अमेरिका इत्यादि देशांत प्रवास केला.

१८९४ मध्यें त्यानें आपल्या भावाच्या साहाय्यानें लंडन येथील ईव्हिनिंग न्यूज या पत्राची मालकी घेतली.हें पत्र यापूर्वी तोट्यांतच चाललें होतें. पण आल्फ्रेडनें तें हातीं घेतांच त्याचा खप वाढून त्याची एकदम भरभराट होऊं लागली. १८९४ त जॅक्सन नांवाच्या नामांकित संशोधकाबरोबर तो उत्तरध्रुवाच्या सफरीला गेला. सन १८९२ मध्यें तो पार्लमेंटच्या निवडणुकीला उभा राहिला पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. १८९६ मध्यें त्यानें 'डेली मेल' नांवाचें अर्ध्या आण्याला मिळणारें पत्र सुरू केलें. यांत जगांतील शास्त्रीय, राजकीय, सामाजिक घडामोडींची हकीकत येत असल्याकारणानें त्याची लवकरच प्रसिद्धि झाली. या पत्रानें वर्तमानपत्रकाराच्या धंद्यांत सर्व दृष्टींनीं क्रांति घडून आणली म्हटलें तरी चालेल. बोअर युद्धांत या पत्राचा दैनिक खप सहा लक्षांवर होत होता. १९०३ मध्यें त्यानें 'डेली मिरर' नांवाचें पत्र सुरू केलें. प्रथम या पत्रांत त्याचा तोटा होऊं लागला. पण या पत्राची किंमत एक आणा होती ती अर्धा आणा केल्यामुळें, या पत्राचा खप भराभर वाढत चालला व या पत्रांत त्याला फायदा होऊं लागला. १९०५ मध्यें डेलीमेल हें पत्र यूरोपमधील सर्व भाषांत निघूं लागलें. याच सालीं नार्थक्लिफ यास बॅरोनेटची पदवी देण्यांत आली.

१९०८ मध्यें लॉर्ड नॉर्थक्लिफ यानें टाईम्स पत्र आपल्या ताब्यांत घेतलें, आणि ताब्यांत घेतांच नवीन यंत्रसामुग्रीच्या साहाय्यानें तें पत्र छापविण्यास सुरवात त्यानें केली. 'वीकली डिस्पॅच' हेंहि पत्र त्यानें विकत घेतलें, व 'डेलीमिरर' हें आपल्या भावाला विकलें. महायुद्ध सुरू होण्यापूर्वी, त्याच्या ताब्यांत टाइम्स व दि टाइम्स वीकली एडिशन, डेलीमेल, ओव्हरसीमेल, ईव्हिनिंग न्यूज, वीकली डिस्पॅच हीं पत्रें होतीं. त्यानें वृत्तपत्राच्या धंद्यांत पुष्कळ इष्ट फेरफार घडवून आणले. संपादकांनीं आठवड्यांत पांच दिवस काम करावें असें ठरविण्यांत आलें व त्यांनां वार्षिक नफ्यामध्यें भागीदार करण्यांत आलें.

१९०० सालापासूनच त्यानें राजकारणावर आपल्या वर्तमानपत्राच्या साहाय्यानें छाप बसविली होती. इंग्लंड व जर्मनी या राष्ट्रांत सलोखा घडवून आणण्याचा त्याचा प्रथमपासून प्रयत्न चालू होता. पण बोअर युद्धानंतर त्यानें तो नाद अशक्य म्हणून सोडून दिला. पुढें फ्रान्स, रशिया व अमेरिका यांच्याशीं सलोखा करण्याचे त्यानें प्रयत्न चालविले. महायुद्धांत त्यानें अलौकिक कामगिरी बजावली. महायुद्ध जर्मनीचा पूर्ण नक्षा उतरेपर्यंत चालवावें, या मताचा तो होता. दोस्त राष्ट्रांनां जय मिळावा यासाठीं इंग्लंडनें काय काय गोष्टी केल्या पाहिजेत यासंबंधीं त्यानें वृत्तपत्रांतून जोरानें मतें पुढें मांडण्यास सुरवात केली. तो स्वतः महयुद्धांत निरनिराळ्या रणक्षेत्रांवर जाऊन आला. सरकारी नोकरी पत्करावयाची नाहीं असा त्याचा बाणा होता. त्यामुळें त्याला त्याचीं मतें निर्भीडपणें मांडतां येत असत. पण त्याला सिव्हिल एरियल कमीटीचा अध्यक्ष म्हणून नेमण्यांत आलें, व तें कार्य अगदीं स्वतंत्र असें असल्यामुळें त्यानें तें पत्करलें. वॉशिंग्टन येथें वकील या नात्यानें काम करण्याची जागा त्याला देण्यांत आली, पण त्यानें ती नाकारली. पण युद्धमंडळाच्या इच्छेनुरूप तो अमेरिकेंत गेला व तेथें असतांना विल्सन वगैरे अमेरिकन मुत्सद्यांची गांठ घेऊन त्यानें इंग्लंड व अमेरिका या राष्ट्रांमध्यें सलोख्याचें वातावरण उत्पन्न केलें. १९१७ मध्यें तो इंग्लंडमध्यें परत आला. नंतर त्याला व्हायकौंटची पदवी देण्यांत आली.

१९१७ मध्यें त्याला विमानखात्याच्या अध्यक्षाची जागा देण्यांत आली. प्रथम त्यानें ती नाकारली. पुढें त्याला स्वतंत्र मत प्रतिपादन करण्याची मुभा मिळाल्यानें त्यानें मतप्रसाराचें काम पत्करलें; व जुगोस्लाव्हिया, इटली इत्यादि राष्ट्रांत त्यानें एकी घडवून आणून ऑस्ट्रियाच्या विरुद्ध वातावरण उत्पन्न केलें. युद्धहक्कबीपरिषदेच्या वेळीं तो आजारी होता. पण शांततापरिषदेंत त्यानें इंग्लंड व फ्रान्स यांच्यामध्यें सलोखा रहावा यासाठीं फार खटपट केली. १९२१ त तो जगाच्या प्रवासास निघाला. जगाचा प्रवास करून आल्यानंतर थोड्याच दिवसांनीं तो मरण पावला.

लॉर्ड नॉर्थक्लिफ याला लहानपणापासूनच मोटरिंग व गोल्फ हे खेळ अतिशय आवडत असत. मोटरिंगवर त्यानें पुष्कळ ग्रंथ प्रसिद्ध केले. पार्लमेंटमधील त्याचें पहिलें भाषण वैमानिक खात्यांत सुधारणा घडवून आणण्यासंबंधीं होतें. त्याची भाषा सरळ व जोरदार होती; त्याची टीका मार्मिक असे. त्याला विनोदी भाषा उत्तम लिहितां येत असे. राजकारणाचा त्याचा जाडा अभ्यास होता. सायकलवर बसणें, व

घोड्यावर बसणें त्याला अतिशय आवडत असे. त्याचें लग्न रॉबर्ट मिल्नर नांवाच्या वेस्ट इंडियन व्यापाऱ्याच्या मुलीशीं झालें होतें. त्याच्या पत्राचा अतोनात खप होत असे व त्यामुळें राजकारणावर त्याच्या लेखाचा फार परिणाम होत असे. २० व्या शतकांत नार्थक्लिफ ही एक बडी व्यक्ति होऊन गेली असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**नॉर्थब्रुक, लॉर्ड** ( १८२६-१९०४ )—स. १८५७ त हा कॉमन्स सभेंत निवडून आला. स. १८६६ त बापाच्या मृत्यूनंतर लार्डाच्या सभेंत जाईपर्यंत कॉमन्सचा लिबरल सभासद होता. १८६१-६४ या काळांत हा हिंदुस्थानचा अंडर-सेक्रेटरी होता. हा हिंदुस्थानच्या गव्हर्नरजनरलच्या जागेवर १८७२ पासून १८७६ पर्यंत होता. याच्या वेळेस बंगाल्यांत मोठा दुष्काळ पडला असतां, यानें चांगली व्यवस्था ठेवून लोकांस फारसा त्रास होऊं दिला नाहीं. माजी बादशहा सप्तम एडवर्ड स. १८७५ त हिंदुस्थानांत आले होते. याच सुमारास बडोद्याचा महाराज मल्हारराव गायकवाड यास राज्यावरून काढून सांप्रतचे श्री. सयाजीराव महाराज यांची गादीवर स्थापना झाली. दुसरें अफगाण युद्ध टाळण्यासाठीं नार्थब्रुकनें कांहीं योजना सुचविली होती पण त्यावेळच्या सेक्रेटरी ऑफ स्टेटनें ती फेटाळून लाविली. तेव्हां त्यानें राजीनामा दिला. ग्लॅडस्टनच्या दुसऱ्या प्रधानकीच्या अमदानींत (१८८०-८५)नार्थब्रुक फर्स्ट लॉर्ड ऑफ ॲडमिरॅलिटी या मोठ्या हुद्यावर होता. ईजीप्तची आर्थिक व राजकीय स्थिति पहाण्यासाठीं त्याला ग्लॅडस्टननें स्पेशल कमिशनर म्हणून तिकडे पाठविलें होतें. पण याच्या जाण्यापासून कांहीं एक निष्पन्न झालें नाहीं. शेवटचीं १०-१५ वर्षें यानें राजकारणांतून अंग काढून घेतलें होतें. [ मॅलेट-थॉमस जॉर्ज, अर्ल ऑफ नॉर्थब्रुक ( १९०८ ); स्मिथ-ऑक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया. ]

**नॉर्थाम्प्टन**—हें इंग्लंड देशांतील नॉर्थाम्प्टनशायर याचें कांउंटी गांव व म्युनिसिपल, कांउंटी व पार्लमेंटरी बरो आहे. लोकसंख्या ( १९२१ ) ९२३००. हें निन नदीवर आहे. जुन्या सात प्रार्थनामंदिरांपैकीं येथें चार मंदिरें आहेत. येथें रोमन कॅथोलिक बिशप राहतो. किल्ल्याच्या कांहीं भागाची दुरुस्ती केलेली आहे.नगरभवन, कांउंटीभवन, धान्याची पेठ, प्राचीन वस्तु व भूस्तर-पदार्थ-संग्रहालय या येथील मुख्य इमारती आहेत. येथें बऱ्याच शाळा व शिक्षणसंस्था आहेत. शहराच्या उत्तरेस शर्यतीचें पटांगण आहे. येथें मुख्य व्यापार जोड्यांचा चालतो. शिवाय कातडी कमावणें, दारू गाळणें, लोखंड गाळणें, विटा व कौलें तयार करणें वगैरे धंदे आहेत. येथें बुटांचा बाजार भरतो. येथें ६ व्या शतकांत अँगल्स लोकांनीं वसाहती केल्या. नंतर मोठ्या ( एल्डर ) एडवर्डच्या वेळीं येथें डेन लोक रहात असत. नॉर्थाम्प्टन येथें पुष्कळ कौन्सिलें व पार्लमेंट सभा यांच्या बैठकी झाल्या, ' गुलाबाच्या युद्धां " त (' वार्स ऑफ दि रोझेस ' मधील लढाईत ) ६ व्या हेनरीचा पराजय होऊन तो शत्रूंच्या हातीं लागला.

**नॉर्वे**—नॉर्वेचें राज्य उत्तर यूरोपांत असून स्कॅन्डिनेव्हियन द्वीपकल्पाचा हा पश्चिम भाग आहे. याची पूर्व सरहद्द स्वीडनच्या सरहद्दीशीं मिळते. याच्या उत्तर, पश्चिम व दक्षिण भागास समुद्र आहे. नार्वेची लांबी ११०० मैल असून याची दक्षिणेकडील रुंदी २७०मैल व उत्तरेकडील रुंदी६०मैल आहे. नार्वेच्या किनाऱ्याची लांबी मोजणें फार कठिण आहे. अखंड समजून जर सर्व किनाऱ्याची लांबी मोजली तर ती १७०० मैल भरेल. पण आखातें, खाड्या व मोठमोठीं बेटें यांचा जर समावेश केला तर १२००० मैल भरेल.

हि म न द्या.—यूरोपांतील सर्वांत मोठी हिमनदी जॉस्टेडालब्री ही नार्वेंत आहे. हिचें क्षेत्रफळ ५८० चौरस मैल आहे. हिचे कित्येक फांटे समुद्राला मिळतात. दुसरी मोठी हिमनदी जी स्वारटिसेन तिचें क्षेत्रफळ ४०० चौरस मैल आहे. नार्वेंतील हिममर्यादा ३०८० पासून ५१५० फूट आहे.

बहुतेक सर्व किनाराभर नार्वेतील उंचवटयाच्या जमीनीच्या बाजू समुद्रालगत एकदम सखल झाल्या आहेत. यामुळें समुद्रानें विभक्त झालेले या देशाचे लहान लहान भूमिखंड हे, नार्वेला जणूं काय बेटांची झालरच लावली आहे अशी शोभा आणतात. या देशांतील सर्वसाधारण वार्षिक जास्त उष्णमान म्हणजे ४५-५०° अंश आहे व कमींत कमी २६-४° अंश आहे. नॉर्थकेप येथें सूर्य १२ मे पासून २९ जुलैपर्यंत क्षितिजावर असतो व बोडो येथें ३ जूनपासून ७ जुलैपर्यंत असतो. नार्वेच्या दक्षिण टोंकाकडे सुद्धां एप्रिलअखेरपासून आगष्टच्या मध्यापर्यंत अंधार मुळींच नसतो. हिवाळ्यांत नॉर्थकेप येथें १८ नोव्हेंबरपासून २३ जानेवारीपर्यंत सूर्य क्षितिजावर येत नाहीं. या देशांत डिसेंबर व जानेवारी हे महिने अतिशय वादळाचे असतात.

लो क व स्ती.—नॉर्वेची लोकवस्ती २६,००,००० आहे. सर्वसाधारणपणें नॉर्वे देशांत यूरोपांतील इतर कोणत्याहि देशापेक्षां लोकवस्ती विरळ आहे. शेंकडा७६ लोक खेड्यांतून रहातात. १९व्या शतकाच्या उत्तरार्धांत बरेच लोक परदेशांत गेले. सन १९२० सालच्या खानेसुमारींत नॉर्वेची लोकसंख्या २६४६३०६ इतकी भरली. तीपैकीं शेंकडा २९ लोक शहरामध्यें रहाणारे होते. उत्तरोत्तर शहरामध्यें मोठमोठे कारखाने निघूं लागल्यामुळें शहराच्या वस्तीचें प्रमाण वाढत चाललें आहे. नॉर्वेमध्यें परदेशीं रहाण्यास जाणाऱ्या लोकांचें प्रमाण फार आहे. महायुद्धानंतर ही संख्या कमी होत चालली आहे. तरी अद्यापि पुष्कळच लोक परदेशगमन करतात. १९११ सालीं परदेशगमन केलेल्या लोकांची संख्या १२००० होती,ती १९१८ सालीं १२००पर्यंत आली. १९११ सालीं नॉर्वेमधून आतापर्यंत( १९१८ )बाहेर गेलेल्या लोकांची खानेसुमारी करण्यांत आली. त्यांत १६०००० लोक भरले.

म्हणजे जगाच्या पाठीवर ४३ लाख लोक नार्वेजियन आहेत असें सिद्ध होतें.

नॉर्वेमध्यें पुरुषांपेक्षां स्त्रिया संख्येनें अधिक आहेत. विशेषतः शहरामध्यें बायकांचें प्रमाण अधिक आढळतें. नॉर्वेमध्यें दरवर्षी १६००० पर्यंत लग्नें होतात. मृत्यूचें प्रमाण इतर देशांतल्यापेक्षां बरेंच कमी आहे क्षयरोगाचा फैलाव येथें बराच आढळतो व त्याच्या प्रतिबंधासाठीं संस्था स्थापन करण्यांत आल्या असून अशा संस्थांनां सरकारकडून देणगी मिळते.

द ळ ण व ळ ण.—नॉर्वे व ग्रेटब्रिटन, अमेरिका व जर्मनी यांच्यामध्यें प्रवाशांनां दळणवळणाचे मार्ग १९व्या शतकाच्या शेवटच्या दशकांत झपाट्यानें सुरू झाले. १९व्या शतकाच्या दुसऱ्या अर्धापावेतों नॉर्वेतील मुख्य रस्ते बांधले गेले नव्हते. सन १८५४ मध्यें पाहिला आगगाडीचा रस्ता बांधण्यांत आला.

१९०८ मध्यें नॉर्वेमधील रेल्वे वाढविण्याचा ठराव स्टोर्टिंगनें मंजूर केला व स. १९१० पासून या कामाला सुरवात झाली. १९२१ मध्यें नॉर्वेमधील रेल्वेची लांबी ३४४४ किलोमीटर होती. १९२१ मध्यें सरकारनें सुन्नर ते ऑगपर्यंतचा रेल्वेचा मोठा फांटा तयार करण्याचें काम सुरू केलें. महायुद्धामुळें विजेच्या साहाय्यानें गाड्या चालविण्याचें काम बंद पडलें होतें. पण महायुद्धानंतर तें पुन्हां सुरू करण्यांत आलें. रेल्वेप्रमाणेंच मोठमोठे रस्ते बांधण्याचें काम १९१२ पासून सुरू झालें व त्याप्रमाणें, नॉर्वेमधील सर्व भागांतून व बाहेरच्या गांवांनां जाण्यासाठीं मोठमोठे रस्ते बांधण्यांत आले. या रस्त्यांवरून मोटार-सायकली नेण्यासाठीं कायद्यानें परवानगी देण्यांत आली. १९२१ मध्यें मोटार तयार करण्याचे दोन कारखाने नॉर्वेमध्यें होते. पण मोटारींचें सर्व साहित्य बाहेरून तयार होऊन, ते एकत्र जोडण्याचेंच काम हे कारखाने करीत असत. नॉर्वेमध्यें निरनिराळ्या भागांत नौकानयन चालतें व त्याला सरकारकडून पुष्कळ मदत मिळते. युद्धामध्यें नौकानयनाचें काम कांहीं भागांतून बंद पडलें होतें पण तें युद्धानंतर सुरू करण्यांत आलें आहे. तारा व टेलिफोन हेहि सर्व नॉर्वेभर पसरले आहेत. बिनतारी विद्युत्संदेशगृहें प्रमुख ठिकाणीं स्थापन करण्यांत आलीं आहेत. रेडियमचीं स्टेशनेंहि हळू हळू सुरू करण्यांत आलीं आहेत. १९२२ मध्यें स्टॅव्हेंजर येथें जें रेडियमगृह बांधण्यांत आलें; त्याची जगांतील मोठ्या रेडियमगृहांमध्यें गणना होते.

व्या पा र व उ द्यो ग धं दे, दर्यावर्दी व्यापारः—महायुद्धापूर्वी नॉर्वेमधील व्यापारी गलबतांचें प्रमाण फार मोठें होतें. पण युद्धामध्यें जवळ जवळ अर्धी अधिक गलबतें बुडल्यामुळें नॉर्वेला मोठा धक्का बसला पण १९२१ मध्यें पुन्हां नॉर्वेनें पूर्वीइतकी आपल्या गलबतांची संख्या वाढवली आहे. नाविकांच्या धंद्यांत नॉर्वेमधील सुमारें २६००० लोक पडले आहेत. समुद्रावरील व्यापारासंबंधीं केलेले कायदे, इतर देशांतील कायद्यांपेक्षां अधिक उदार आहेत. १९१९ मध्यें, खलाशांनां दररोज आठ तासांपेक्षां जास्त काम पडूं नये यासंबंधीं स्टोर्टिंगनें कायदा केला. क्रिश्चानिया, क्रिश्चियनलंड, स्टॅव्हेंजर, बर्गेन, ट्रॉंडजेन इत्यादि बंदरें मोठीं करण्यांत आलीं. तेथें सर्व सोयी करण्यांत आल्या आहेत. नार्वेइतका पाण्याचा पुरवठा यूरोपांत फारच क्वचित ठिकाणीं सांपडतो. या पाण्यापासून शक्ति उत्पन्न करण्यासाठीं सरकारनें कंपनी स्थापन केली आहे. नॉर्वेमध्यें एकंदर १ कोटी ५० लक्ष अश्वशक्तीइतकी जलशक्ति निर्माण होऊं शकते असें सिद्ध झालें आहे. तांपैकीं नॉर्वेसाठीं उपयोगास जरूर असणारी शक्ति सोडून बाकीची उरलेली शक्ति मध्ययूरोपांतील राष्ट्रांनां देण्याचा नॉर्वेचा उद्योग चालला आहे. या जलशक्तीचा विद्युत्च्या साहाय्यानें तयार होणाऱ्या रसायनांच्या व धातूंच्या कामीं फार उपयोग होतो.

धं दे.—नॉर्वेमध्यें लोखंडाच्या खाणी पुष्कळ आहेत. अल्यूमिनम, तांबें, निकल वगैरे धातूहि मुबलक सांपडतात. नॉर्वेमधील वहित जमीन १७४०००० एकर असल्याचें १९१७ च्या सरकारी रिपोर्टावरून आढळतें. तांपैकीं १९२१ सालीं ५०००० एकर जमीनच लागवडींत आली. गहूं, राय, सातू, ओट, मॅगकॉर्न, बटाटे हीं मुख्य पीकें आहेत. नॉर्वेत गुराढोरांचीहि समृद्धि आहे. स. १९१९ मध्यें नॉर्वेमध्यें ४०० दुधाच्या डेअऱ्या होत्या. नॉर्वेतील जंगलाचें क्षेत्रफळ २६६०० चौरस मैल आहे. देवदार व फर या झाडांची येथें समृद्धि आहे. सागवान, झाडाच्या साली व कागदाला लागणारें लांकूड हें या जंगलांत निर्माण होतें. जंगलांत निरनिराळ्या प्रकारचीं झाडें लावण्याकरितां नॉर्वेजियन अफोरेस्टेशन असोशिएशन स्थापन झालेली आहे.

मासे धरण्याचा व ते बाहेरदेशीं पाठविण्याचा धंदा प्रमुख आहे. या धंद्यांत सुमारें लाख माणसें गुंतलेलीं असतात. १९१७ सालीं १३५ दशलक्ष क्रोनरच्या किंमतीचे मासे पकडण्यांत आले. १९१९ सालीं या धंद्याला मदत करण्यासाठीं, सरकारनें बँक उघडली व त्या बँकेच्या शाखा प्रमुख शहरीं उघडण्यांत आल्या; व्हेल मासे पकडण्याचा धंदाहि हल्लीं नॉर्वेनें सुरू केला आहे. या व्हेल माशाचें तेल काढण्यांत येतें. १९२० सालीं सुमारें ३५००० टन तेल व्हेल माशांपासून काढण्यांत आलें. जगामध्यें या माशाचें तेल जितकें काढण्यांत येतें त्यापैकीं अर्धें नॉर्वेमधूनच निघतें.

१९२० सालीं नॉर्वेमधून ५१४ दशलक्ष क्रोनरच्या किंमतीच्या मालाची आयात व २१८ दशलक्षांच्या किंमतीच्या मालाची निर्गत झाली. आयात मालांत धान्य, मांस, अंडीं, साखर, कॉफी, कापड, पादत्राण, लोंकरीचें कापड, रेशमी कापड, पेट्रोलियम, यंत्रें, दारू, हे प्रमुख जिन्नस होत. निर्गत मालांत, मासे, माशांचें तेल, सागवान, कंडेन्स्ड मिल्क, कागद वगैरे प्रमुख वस्तू होत.

नार्वेतील औद्योगिक धंद्यांची संघटना करण्याकरितां नार्वेजियन इंडस्ट्रियल असोसिएशन नांवाची एक संस्था १९१९ साली स्थापन झाली असून त्या संस्थेनें नॉर्वेजियन इंडस्ट्री नांवाचें वर्तमानपत्र सुरू केलें आहे. याशिवाय नॉर्वेजियन एम्प्लायर्स असोसिएशन नांवाची संस्था स्थापन झाली असून तिचें "एम्प्लॉयर्स" नांवाचें पाक्षिक प्रसिद्ध होत असतें. स. १९२१ मध्यें नॉर्वेंत एकंदरीत सर्व प्रकारच्या मिळून १२० विमाकंपन्या होत्या व त्या सर्वांचें मिळून ५० कोटी क्रोनर भांडवल होतें.

रा ज्य व्य व स्था.—नार्वे स्वतंत्र असून तेथें सनदशीर वंशपरंपरा प्रजासत्ताक राज्यपद्धति आहे. सन १९०५ मध्यें हा देश स्वीडनपासून विभक्त झाला. सन१८१४मध्यें एड्सव्हाल्ड येथें केलेल्या कायद्याप्रमाणें राज्यव्यवस्था चालते. त्यांत वेळोवेळीं कांहीं फेरफार करण्यांत आले आहेत. राजा १८ व्या वर्षी वयांत येतो व त्याच्या अधिकारांत अंमलबजावणी असते.तो आपला अधिकार प्रधान व मंत्री यांच्या समेकडून बजावितो व ही सभा त्याच्या सरकारी कृत्याबद्दल जबाबदार असते. हे मंत्री व उच्च दर्जाच्या जागेवरील अधिकारी यांनां राजा नेमतो. राजाला तात्पुरते कायदे करण्याचा अधिकार असतो. तसेंच तो युद्ध पुकारूं शकतो. मात्र चढाईच्या युद्धाच्या वेळीं त्याला पार्लमेंटची संमति घ्यावी लागते. त्याला तह करण्याचा अधिकार आहे. त्याचप्रमाणें सैन्य व आरमार यांवर त्याचा अधिकार आहे. पार्लमेंटला कायदे करण्याचा अधिकार आहे. व पार्लमेंटचे सभासद प्रत्येक भागांतून १ याप्रमाणें निवडले जातात. प्रत्येक ३ वर्षांनीं निवडणूक होते. हा मत देण्याचा अधिकार प्रत्येक नार्वेजियनास आहे. मात्र त्याचें वय २५ वर्षांचें असून, तो या देशांत ५ वर्षें तरी राहिला असला पाहिजे.नागरिकत्वाची कायदेशीर अट त्यानें पूर्ण केली पाहिजे. स.१९०७च्या कायद्यान्वयें वरील अटींप्रमाणें बायकांनांहि मत देण्याचा अधिकार आहे. पार्लमेंटच्या सभासदास त्याच्या भागांत मत देण्याचा अधिकार असून त्यानें नार्वेंत १० वर्षें घालविलीं असलीं पाहिजेत व त्याचें वय ३० वर्षांपेक्षां कमी नसलें पाहिजे. पार्लमेंटला स्टोर्टिंग असें म्हणतात. साधारणपणें स्टोर्टिंग वर्षांतून एकदां ३ महिनेपर्यंत भरतें. पार्लमेंट भरल्यानंतर तिचे दोन भाग होतात. एकाला "लॅग्टिंग" म्हणतात व त्यांत एकंदर सभासदांच्या एकचतुर्थांश सभासद असतात. दुसऱ्याला "आडेलस्टिंग" म्हणतात व त्यांत बाकीचे सभासद असतात. प्रत्येक कायद्याचा मसुदा प्रथम आडेलस्टिंगमध्यें जातो जर तो तेथें पास झाला तर तो लॅग्टिंगमध्यें पाठविला जातो. व तेथें जर तो पास झाला तर राजाच्या संमतीनें त्याला कायद्याचें रूप प्राप्त होतें. जर एखादा मसुदा २वेळां आडेलस्टिंगमध्यें पास होऊन लॅग्टिंगमध्यें नाकारण्यांत आला तर या दोन सभांच्या मिश्रसभेंत दोनतृतीयांश मताधिक्यानें तो पास होऊं शकतो. राजाला नकार देण्याचा अधिकार आहे. परंतु एखादा मसुदा जर बैठकींनीं सारखा पास केला तर त्याला कायद्याचें रूप प्राप्त होतें. पार्लमेंट कर ठरवितें व संस्थानाच्या सभेच्या सभासदांवर अधिकार चालवितें. या सभासदांनां पार्लमेंटमध्यें मत देण्याचा अधिकार नसतो; फक्त बोलण्याचाच अधिकार त्यांनां असतो.

ज मा व ख र्च.—येथील जमा व खर्च प्रत्येकी(१९१७साली) ३९४६७६ हजार व २६८७१९ हजार क्रोनर आहे. फक्त बँक ऑफ नॉर्वेला नोटा काढण्याचा अधिकार आहे व ही पेढी खाजगी आहे. नॉर्वेंत सोन्याचें चलन आहे. येथें क्रोनर नांवाचें सुमारें १ शिलिंग व एकपूर्णांक एकद्वितीयांश पेन्स किमतीचें नाणें आहे.

सै न्य व आ र मा र.—२२ अथवा याहून अधिक वयाचे लोक लष्करांत सक्तीनें भरती करण्यास योग्य समजले जातात. युद्धाच्या वेळीं १८पासून ५०वर्षें वयाचे लोक लष्करभरतीला योग्य समजले जात. सैन्याचे दोन भाग आहेत; लाईन रिझर्व्ह व सेकंड रिझर्व्ह. शांततेच्या वेळीं लाईनमध्यें १२००० लोक असतात. परंतु लढाईच्या वेळीं ते २६००० अथवा जास्त करतां येतात. मात्र १८००० वर वाढविण्यास पार्लमेंटची संमति लागते. आरमारांत १२०० ऑफिसर व कायमचे नोकर असतात. नार्वेजवळ ५ डिस्ट्रॉयर जहाजें, ४१ टॉर्पेडो व शिवाय दुसरीं १२ लष्करी जहाजें असून पाणसुरुंग बोटींचा तांडा आहे.

ध र्म व शि क्ष ण.—एव्हान्जीलिकल ल्युथेरन हा देशाचा धर्म असून राजा त्याच धर्माचा अनुयायी असला पाहिजे. शिक्षण सक्तीचें असून शाळेंत जाणाऱ्या मुलांची वयोमर्यादा ७ पासून १४ पर्यंत आहे पण शहरांतून ती ६॥ पासून १४ पर्यंत आहे. शाळेंत जाण्याच्या वयाच्या मुलांपैकीं शेकडा ९४ मुलें शाळेंत जातात. प्राथमिक शिक्षणाच्या शाळा म्युनिसिपालिटीच्या व काउन्टींच्या ताब्यांत आहेत व त्यांचा खर्च म्युनिसिपालिटीला व काउंटीला सोसावा लागतो. फक्त सरकार कांहीं मदत करतें. सरकारची मदत असलेलें असें ख्रिश्चनिआ येथें एक विश्वविद्यालय आहे.

१९१७–१८ साली ५९९९ प्राथमिक शिक्षणाच्या शाळा असून त्यांपैकीं खेडेगांवांतील शाळांत २८२११७ विद्यार्थी आणि शहरांतील शाळेंत ९७००० विद्यार्थी होते. मध्यम शिक्षणाच्या एकंदर शाळा ११३ असून त्यांपैकीं बहुतेक मिश्र म्हणजे मुलामुलींनां एकत्र शिकविणाऱ्या होत्या. १९२१ साली ख्रिश्चनिआ येथील विद्यापीठांत १३८३ विद्यार्थी होते. एक ट्रेनिंग कॉलेज, एक टेक्निकल हायस्कूल व एक शेतकी हायस्कूल होतें.

इ ति हा स, प्राचीनः—अतिप्राचीन काळीं नार्वेमध्यें 'फिनिश' महावंशाचे लोक रहात असावे. हे लोक अनार्य होते. इ. स. ९०० ते १००० च्या सुमारास "लॅप्स" लोक नॉर्वेंत आले. 'ट्युटानिक' महावंशाचे लोक नॉर्वेंत केव्हां

आले हें निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. प्राचीन काळीं या देशांत सुमारें २९ राजे होते, व राजाच्या ताब्यांत त्याची नोकरी करण्याबद्दल शपथ घेतलेले असे योद्धे असत. याशिवाय राजा होण्याला जास्त कांहीं लागत नसे. पुढें या लोकांत एकराष्ट्रीयत्वाची भावना हळू हळू उत्पन्न झाली. पहिल्या राज्याचा ख्रिश्चियाना फोर्डवर उदय झाला. येथील राजानें आपलें राज्य लग्न, दिग्विजय व वारसा या तीन उपायांनीं वाढविलें हाफ्टन राजाच्या वेळीं बराच राज्यविस्तार झाला होता. हाफ्टन राजानंतर हॅराल्ड हार्फगर हा राजा झाला. हा इ. स. ९३३ त वारला. त्याच्यानंतर एरिक ब्लॉडिएक्स हा गादीवर आला. परंतु त्याचा भाऊ हाकन यानें त्याला गादीवरून काढून आपण स्वतः राजा झाला ( ९३४ ). त्याच्या नंतर दुसरा हॅराल्ड व अर्ल हाकन हे राजे झाले. परंतु त्यांच्या कारकीर्दींत महत्त्वाच्या गोष्टी झाल्या नाहींत. याच्यानंतर झालेल्या ओलॅफ राजानें नॉर्वे देशांत ख्रिस्ती धर्माची सुरवात केली. स्टोल्डर येथील लढाईंत हा राजा पडला.

प्राचीन मध्ययुगांत गादीवर हक्क सांगणाऱ्या प्रतिस्पर्ध्यांमध्यें बऱ्याच लढाया झाल्या; व त्यामुळें राजसत्तेचा ऱ्हास होऊन उमरावांना महत्त्व आलें. पुढें पांचवा हाकन याच्या कारकीर्दींत त्यांचें महत्त्व कमी झालें. हाकनची मुलगी इंगेबोर्ग हिचें स्वीडनच्या राजाशीं लग्न झालें. हाकन याच्या मरणानंतर तो निपुत्रिक असल्यामुळें नार्वेचें राज्य इंगेबोर्ग हिचा मुलगा मॅगनस् याजकडे गेलें. अशा रीतीनें स्वीडन व नॉर्वे या राज्यांचें एकीकरण झालें. मॅगनस् यानें आपला पुत्र सहावा हाकन याला नॉर्वेचें राज्य दिलें. हाकननें डेन्मार्कच्या राजकन्येशीं विवाह केला. व त्याचा मुलगा पांचवा ओलॅफ हा डेन्मार्कचा राजा झाला. हाकनच्या मरणानंतर तो डेन्मार्क, स्वीडन व नॉर्वे या तीन देशांचा राजा झाला. ओलॅफ हा निपुत्रिक असल्यानें त्याच्या मरणानंतर एरिक याला तीनहि देशांचा राजा निवडण्यांत आलें.

१३९७ ते १८१४:—या दीर्घ काळाचे चार पोटविभाग पडतात. १४५० सालीं नार्वे डेन्मार्कबरोबर संयुक्त झाला. पुढें रेफमेशन( ख्रिस्ती धर्मसुधारणा )च्या काळामध्यें नार्वे पूर्णपणें एक परायत्त प्रांत बनला १६६० सालीं नार्वेला कांहीं स्वतंत्र राजकीय हक्क मिळाले. आणि १८१४ सालीं सवदशीर राजसत्ताकपद्धति स्थापन होऊन नार्वे स्वीडन देशाच्या बरोबरीचा स्वतंत्र देश बनला. हा दीर्घकाळ पारतंत्र्यांत गेल्यामुळें या काळांत इतिहासांत नमूद करण्यासारख्या गोष्टी नार्वेमध्यें बहुतेक घडल्याच नाहींत. सैन्य व आरमार नष्टप्राय झालें, मूळ नार्वेजी भाषेऐवजीं डॅनिश भाषा प्रचलित झाली.

एरिक याला राजा निवडल्यामुळें जें एकीकरण झालें त्यामुळें नार्वेचें बरेंच नुकसान झालें. कारण नार्वे हा राज्याचा एक प्रांत आहे असें समजलें जात होतें. इ. स. १४४८ मध्यें स्वीडनच्या लोकांनीं कार्ल नटस्सन याला राजा निवडलें व डेन्मार्कच्या लोकांनीं ख्रिश्चियन याला राजा निवडलें. नार्वेला ख्रिश्चियन याला राजा मान्य करणें भाग पडलें. अशा रीतीनें झालेल्या एकीकरणामुळें नार्वेचें फार नुकसान झालें. कारण डेन्मार्कचे राजे नार्वेतील मोठमोठ्या जागा डेन्स लोकांना देत व नॉर्वेचा प्रांत गहाण ठेवून पैसे काढीत. नॉर्वे देशाची स्थिति चवथ्या ख्रिश्चियन राजापर्यंत ( १५८८–१६४८ ) उत्तरोत्तर अधिकाधिक खालावत होती. चवथ्या ख्रिश्चियन राजानेंच ख्रिश्चेनिआ शहर वसविलें. त्यानें नार्वे देशाच्या सुधारणेकरितां बरेच प्रयत्न केले, परंतु याच्या कारकीर्दींत नार्वेचा कांहीं मुलूख स्वीडनच्या ताब्यांत गेला. डेन्मार्कनें स्वीडन देशाशीं इ. स. १६५८ च्या सुमारास युद्ध केलें. या युद्धाच्या शेवटीं नॉर्वेचा कांहीं भाग स्वीडनच्या ताब्यांत गेला.

पांचव्या ख्रिश्चियन राजाच्या कारकीर्दींत नॉर्वेच्या कायदेसंग्रहाची फेरतपासणी झाली. त्यानें नॉर्वेचे गेलेले प्रांत मिळविण्याची खटपट केली. ख्रिश्चियन नंतरच्या दोन राजांच्या कारकीर्दींत, डेन्मार्कच्या चढाईच्या धोरणाबद्दल, पुन्हां नार्वेला आपल्या प्रांताच्या रूपानें दंड द्यावा लागला. १८ वें शतक संपण्याच्या पूर्वी अज्ञान अंधःकार घालविण्याकरितां बरीच खटपट झाली. फक्त डेन्मार्क देशांतूनच धान्याची आयात नॉर्वे देशांत झाली पाहिजे, असला जुलमी कायदा इ. स. १७८८ मध्यें रद्द झाला.

नेपोलियनच्या वेळच्या युद्धाच्या वेळीं डेन्मार्कच्या धोरणामुळें नॉर्वेला नेपोलियनच्या पक्षाला उचलून धरणें भाग पडलें; व त्यामुळें व्यापार बुडून देशांत धान्याचा तुटवडा पडला या व असल्या कांहीं राष्ट्रीय आपत्तीमुळें नॉर्वे देशांत देशाभिमानाची ज्योत पेटली परंतु यावेळीं देशाभिमानाची मजल वेगळ्या राज्यकारभाराच्या मागणीपलीकडे गेली नाहीं. ही मागणी इ. स. १८०७ मध्यें देण्यांत आली. स. १८११ मध्यें ख्रिश्चेनिआ विश्वविद्यालयाची स्थापना झाली.

नेपोलियनच्या युद्धाच्या वेळीं डेन्मार्कनें नेपोलियनची बाजू घेतली. या युद्धाच्या शेवटीं स्वीडननें डेन्मार्कवर स्वारी केली तेव्हां डेन्मार्कच्या राजानें "कील" च्या तहान्वयें नॉर्वे स्वीडनला दिला. परंतु या बाबतींत नॉर्वेतील लोकांची संमति घेतली नव्हती, म्हणून हा तह मान्य करण्याचें त्या लोकांनीं नाकारून एड्स्वोल्ड येथें प्रतिनिधिसभा भरविली ( १८१४ ). या सभेंत अमेरिका, फ्रान्स ( १७९१ ) व स्पेन ( १८१२ ) यांच्या धर्तीवर नॉर्वेची राज्यपद्धति असावी असें ठरविण्यांत आलें. डेन्मार्कनें पाठविलेला नॉर्वेचा राजप्रतिनिधि फ्रेडरिक याला सर्वानुमतें राजा निवडण्यांत आलें. तेथें ठरलेल्या राज्यपद्धतीप्रमाणें ( नॅशनल असेंब्लि ) राष्ट्रीय समेंत एकच सभा असावी व राजाला नियम रद्द करण्याचा अनियंत्रित अधिकार नसावा असें ठरविण्यांत आलें.

पुढें स्वीडननें नॉर्वेवर स्वारी केली तेव्हा शेवटीं मॉस येथें समेट करण्याकरितां सभा भरून तींत असें ठरविण्यांत आलें, कीं नॉर्वेनें स्वीडनचें साम्राज्य कबूल करावें, व त्या देशचा

राज्यकारभार एड्स्वोल्ड येथील प्रतिनीधिसभेनें ठरविल्याप्रमाणें चालावा. मात्र त्या पद्धतींत, फक्त स्वीडन नॉर्वेच्या एकीकरणास जरूर असलेले फरक करावे.

१८१४ते१९१०:—४नोव्हेंबर १८१४ रोजीं नॉर्वे व स्वीडन एका राजछत्राखालीं असून नॉर्वे स्वतंत्र व अविभक्त आहे असें जाहीर करण्यांत आलें. या राज्यपद्धतीप्रमाणें या दोनहि देशांचे राज्यकारभार, प्रतिनिधिसभा, सैन्य, आरमार व कर हे पृथक् पृथक् होते.

यानंतर कांहीं वर्षेपर्यंत या देशाला दारिद्य्र व व्यापाराची मंदाई सहन करावी लागली. देशाची सांपत्तिक स्थिति फार खालावलेली होती. पुढें राजा व स्टोर्टिंग ( प्रतिनिधिसभा ) यांच्यामध्यें बेबनाव होऊं लागला. इ. स. १८२२ मध्यें राजानें राज्यपद्धतींत मुळापासून बदल करण्याचा ठराव स्टोर्टिंगपुढें आणला परंतु तो बहुमतानें नापास झाला. पुढें इ. स. १८२४ आणि १८३० मध्यें वरील ठराव पूर्वीप्रमाणेंच नापास झाला. १७ मे हा दिवस नॉर्वेंतील लोक "स्वराज्यदिन" म्हणून उत्सवांत घालवीत असत. राजाला हा उत्सव आपणास अपमानकारक आहे, असें वाटून त्यानें तो बंद करण्याचे प्रयत्न केले. शेवटीं नॉर्वेंतील लोकांनीं हा उत्सव बंद करण्याचें कबूल केलें.

इ. स. १८३० नंतर नॉर्वेच्या स्टोर्टिंगमध्यें शेतकरी पक्षाचा उदय झाला. देशाच्या जमाखर्चावर या पक्षाचा विशेष कटाक्ष होता. इ. स. १८३६ मध्यें राज्यपद्धतींत सुधारणा करण्याबद्दलचा राजाचा ठराव नापास झाला. तेव्हां राजा नाराज होऊन त्यानें स्टोर्टिंग बरखास्त केलें. पुढें राजानें स्टोर्टिंग बोलाविलें. तेव्हां सभासदांनीं राजाला मानपत्र दिलें व त्यांत परराष्ट्रीय कारभारांत देखील नॉर्वेला स्वीडनच्या बरोबरीचे हक्क द्यावे व नॉर्वेला आपलें स्वतंत्र निशाण दर्यावर वापरण्यास परवानगी द्यावी अशा मागण्या केल्या होत्या. पैकीं निशाणाबद्दलची मागणी अंशतः देऊन परराष्ट्रीय कारभाराच्या मागणीचा विचार करण्यास कमिशन बसविलें.

इसवी स. १८४४ मध्यें पहिला ओस्कर हा गादीवर आला; त्यानें नॉर्वे व स्वीडन यांनीं आपापलीं स्वतंत्र निशाणें दर्यावर वापरावीं असा निकाल लावला. या स्वतंत्र निशाणावरील कोपऱ्यांत "संयुक्त चिन्ह" असावें असें ठरविण्यांत आलें. या राजाच्या कारकीर्दींत नॉर्वे देशाची भरभराट झाली. स. १८५१ मध्यें रशियाचा व नॉर्वेचा सरहद्दीबद्दल तंटा होण्याचा प्रसंग आला होता. परंतु तो इसवी सन १८५६ च्या तहानें टळला. इसवी सन १८५९ मध्यें पंधरावा चार्ल्स गादीवर आला. याच्या कारकिर्दींत, नॉर्वेचा व्हाइसराय नेमण्याचा राजाचा हक्क रद्द करावा असा स्टोर्टिंगनें ठराव पास केला परंतु राजानें त्याला अनुमति दिली नाहीं. याच्या कारकीर्दींत स्वीडननें 'एकीकरणाच्या कायद्याची फेरतपासणी व्हावी' अशी सूचना आणिली. स्वीडनच्या सरकारचें असें मत होतें कीं दोनहि देशांची एकच प्रतिनिधिसभा असावी व तींत लोकसंख्येप्रमाणें प्रतिनिधी असावे म्हणजे नॉर्वेच्या प्रतिनिधींच्या दुप्पट स्वीडनचे प्रतिनिधी असावे. ही सूचना नार्वेच्या स्टोर्टिंग सभेनें मान्य केली. स. १८६९ मध्यें वार्षिक स्टोर्टिंग भरण्याचा कायदा पास झाला. इ. स. १८७१ मध्यें समतेच्या व एकीकरणाचीं बंधनें दृढतर करण्याच्या तत्त्वांवर एकीकरणाच्या कायद्याची फेरतपासणी करण्याचें स्टोर्टिंगनें कबूल केलें. परंतु हें स्वीडनला मान्य नव्हतें. स. १८७२ मध्यें स्टोर्टिंगमध्यें प्रधानमंडलाला येण्याबद्दल कायदा पास झाला.

इ. स. १८७२ मध्यें दुसरा ओस्कर हा गादीवर आला. यानें "व्हाइसराय नेमण्याचा राजाचा अधिकार रद्द व्हावा" हा स्टोर्टिंगचा ठराव मान्य केला. यापुढें प्रधानमंडळाचा अध्यक्ष हा मुख्य प्रधान समजला जात असे व हाच ख्रिश्चानिआच्या सरकारचा मुख्य असे. राजाचा 'व्हेटो'चा अधिकार काढण्याचें बिल तीन वेळां पास होऊन राज्यपद्धत्यनुरूप त्याला कायद्याचें स्वरूप आलें, परंतु हा कायदा राजानें मान्य केला नाहीं. ख्रिश्चानिया विश्वविद्यालयाच्या कायदेपंडितांनां हा वादग्रस्त प्रश्न विचारला असतां त्यांनीं बहुमतानें असें मत दिलें कीं राज्यपद्धतींत बदल करणारा ठराव रद्द करण्याचा राजाचा अधिकार काढतां येत नाहीं. हा राजा व स्टोर्टिंग यांच्यांतील तंटा विकोपास जाऊन आणखी कांहीं तंट्यांचीं कारणें उद्भवलीं. शेवटीं प्रधानमंडळाची रिगस्रेटकडून चौकशी करून तंट्याचा निकाल लावण्याचें ठरलें. हें रिगस्रेट राजकीय गुन्ह्यांचा निकाल लावतें व या निकालावर अपील नसतें. रिंगस्रेटनें प्रधानांनां दोषी ठरवून शिक्षा दिली. या निकालावरून इतर तंट्याचा निकाल लागला, परंतु राजाच्या अधिकारासंबंधीं निकाल या निकालावरून लागला नाहीं.

इ. स. १८१४ च्या एकीकरणाच्या कायद्यांत राजकारणांत नॉर्वे देशाच्या प्रतिनिधीचा सल्ला घ्यावा अगर नाहीं याबद्दल कांहींच उल्लेख नव्हता. याबद्दल नॉर्वेच्या लोकांनीं ओरड केली. तेव्हां स. १८३५ मध्यें असा कायदा पास केला गेला कीं, नॉर्वे व स्वीडन यांचा संबंध असलेल्या, अगर फक्त नॉर्वेचा संबंध असलेल्या राजकारणाबद्दल जेव्हां स्वीडनचा परराष्ट्रीय प्रधान राजाशीं खलबत करील तेव्हां राजाजवळ असलेला नॉर्वेचा प्रधान हजर असावा. सन १८८५ मध्यें स्वीडन देशाच्या राज्यपद्धतींत बदल झाला. त्यांत असें ठरलें कीं राजकारणाच्या खलबताच्या वेळीं स्वीडनचा परराष्ट्रीय प्रधान, प्रधानमंडळाचे आणखी २ सभासद व स्टॉकहोम येथें असलेला नॉर्वे देशाचा प्रधान इतके लोक हजर असले पाहिजेत. ही व्यवस्था समतेच्या तत्त्वावर नाहीं अशी नॉर्वेच्या लोकांनीं ओरड सुरू केली. शेवटीं आपल्या देशाचा संबंध असलेलें राजकारण आपल्या मंत्र्यांनींच करावें अशी मागणी नॉर्वेच्या लोकांनीं केली. याबद्दल बरेच लढे होऊन शेवटीं वेगळ्या राजाच्या सत्तेखालीं आपलें स्वातंत्र्य जाहीर

करण्याचा नॉर्वेचा विचार झाला. तेव्हां इ. स. १९०६ मध्यें दोनहि देशांच्या प्रतिनिधींची संयुक्तसभा कार्लस्टॅड येथें भरली. त्या सभेंत पृथक्करणाचा ठराव पास होऊन ही व्यवस्था १० वर्षेपावेतों चालावी व तीबद्दल कोणींहि तक्रार न केल्यास तीच व्यवस्था पुढें चालवावी असें ठरलें. नॉर्वेच्या लोकांनीं डेन्मार्कचा राजपुत्र चार्लस याला राजा निवडलें व तो सातवा "हाकन" ही पदवी धारण करून गादीवर बसला ( १९०७ ).

इ. स. १८९८ मध्यें सर्व पुरुषांनां मत देण्याचा अधिकार देण्यांत आला व इ. स. १९०७ मध्यें कांहीं विवक्षित वर्गांच्या बायकांनां मत देण्याचा हक्क देण्यांत आला.

१९१० नंतरचा इतिहासः—१९०५ सालीं स्वीडनपासून नॉर्वेची फाटाफूट होऊन नॉर्वे स्वतंत्र झाल्यानंतर नॉर्वेनें आपली स्वतःची राष्ट्रीय सभा इंग्लंडच्या पार्लमेंटरी पद्धतीवर स्थापन केली. पण या स्टोर्टिंग उर्फ राष्ट्रसभेचा एकदम बसावा तसा जम बसणें शक्य नव्हतें. याच सुमारास नॉर्वेमध्यें मजूरसंघ बळावत चालला होता व त्यानें आपला स्वतःचा 'सोशल डेमोक्रॅट' नांवाचा पक्ष स्थापन केला होता. याशिवाय नेहमींप्रमाणें हुजूर पक्ष व जहाल पक्ष असे दोन पक्ष नॉर्वेंत होते.

१९०७ सालीं जॉर्जेन लोवलंड हा नॉर्वेचा प्रधान झाला. १९०६ पासून १९१२ पर्यंत नॉर्वेमध्यें एक मोठा वादग्रस्त प्रश्न उपस्थित झाला होता व तो म्हणजे सरकारच्या मंजुरीनें नॉर्वेतील धबधबे, खाणी, जंगल इत्यादि जी स्थावर मत्ता परकीय व नॉर्वेजियन लोकांनीं मिळविली होती ती यापुढें त्यांच्याच हातांत राहूं द्यावी किंवा नाहीं हा होय. या प्रश्नावर लोवलंडच्या कारकीर्दींत बरींच रणें माजलीं; व निरनिराळ्या पक्षांमध्यें फाटाफूट झाली. लोवलंडनें इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी व रशिया यांच्याशीं तह करून त्यांच्या नार्वेमधील हितसंबंधांचें रक्षण करण्याचें तहाच्या द्वारें मान्य केलें होतें. या तहाला जहाल पक्षांतील कांहीं लोक अनकूल तर कांहीं प्रतिकूल होते. त्यामुळें या जहाल पक्षांत दोन पक्ष होऊन एकानें रॅडिकल व दुसऱ्यानें लिबरल असें नांव धारण केलें. १९०८ सालीं या प्रश्नावर खडाजंगी वाद होऊन रॅडिकल व सोशालिस्ट पक्षांनीं लोवलंडचा पराभव केल्यामुळें लोवलंडला राजीनामा द्यावा लागला व त्या जागीं गन्नर नडसेन हा प्रधान म्हणून आला. यानें परकीय लोकांनीं जी मालमत्ता आपल्या ताब्यांत आणली होती ती कमी करण्यासंबंधीं खटपट चालविली, याला हुजूर पक्ष व लिबरल पक्ष यांनीं विरोध करण्यास सुरवात केली. लिबरल पक्षानें आपली पुनर्घटना करून व हुजूर पक्षाशीं संघटना करून नडसेनच्या बिलाला कसून विरोध केला. त्यामुळें पुन्हां नवीन निवडणूक होऊन तीत हुजूर व लिबरल पक्षाची थोडक्या मताधिक्यानें कां होईना सरशी झाली.

पण या धामधुमीच्या काळांत इतर कित्येक प्रश्न नॉर्वे सरकरनें मिटविले होते. त्यांपैकीं स्वीडन व नार्वे यांच्यामधील सरहद्द निश्चित करण्यासंबंधीचा प्रश्न प्रमुख होता. तो हेगपरिषदेच्या मार्फत स्वीडन व नार्वे यांनीं मिटवून घेतला. १९१० सालीं मोलेंट कोनो हा लिबरल पक्षाचा पुढारी प्रधान झाला. त्याच सालीं स्त्रियांनां म्युनिसिपल निवडणुकींत मतदानाचा अधिकार देण्यांत आला. नार्वे व इंग्लंड यांच्यामध्यें तारायंत्रामार्फत दळणवळण सुरू झालें. परकीय लोकांच्या हितसंरक्षणासंबंधीं नवीन कायदा करण्यांत आला व करासंबंधीचें नवीन बिलहि पसार करण्यांत आलें. पुढें लिबरल व हुजूर पक्षाचें पटेनासें होऊन जेन्स ब्रॅटली यानें प्रधानकीचीं वस्त्रें धारण केलीं. याच्या कारकीर्दींतील विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे मिस अन्नड एग्स्टॅड या बाईची प्रधानमंडळांत झालेली नेमणूक ही होय.

१९१२ सालीं जी नवी निवडणूक झाली तींत रॅडिकल पक्षाचा विजय झाला व नडसेन हा पुन्हां प्रधान झाला. हें प्रधानमंडळ सन १९२० पर्यंत अधिकारारूढ राहिलें. याच्या कारकीर्दींत प्रधानमंडळाला स्टोर्टिंग सभेंतहि बसण्याचा अधिकार देण्यांत आला. १९१४ सालीं महायुद्धाला सुरवात झाल्यामुळें आपल्या राष्ट्राचें ताटस्थ्य राखण्यासाठीं व संरक्षण करण्यासाठीं स्टोर्टिंगची जादा बैठक भरण्यांत आली. या सभेंत नॉर्वेच्या संरक्षणासाठीं लष्करी सेना उभारावयाची ठरून त्याप्रीत्यर्थ १० लक्ष रक्कम मंजूर करण्यांत आली; व स्वीडन व डेन्मार्क यांच्याप्रमाणेंच नॉर्वेनेंहि आपलें ताटस्थ्य जाहीर केलें इतकेंच नव्हे तर या निमित्तानें स्वीडन, डेन्मार्क वगैरे स्कँडिनेव्हियन राष्ट्रांमध्यें व नार्वेमध्यें जे अनेक भानगडीचे प्रश्न उपस्थित झाले होते ते मिटविण्याचे व अशा तऱ्हेनें स्कँडिनेव्हियन राष्ट्रांची एकजूट करण्यासाठीं नार्वेनें प्रयत्न केले. यासाठीं स्टाकहोम, खिश्चानिआ, कोपनहेगन इत्यादि ठिकाणीं या तिन्ही राष्ट्रांच्या प्रतिनिधींच्या व राजांच्या मुलाखती व परिषदा झाल्या व स्कँडिनेव्हियन राष्ट्रांनीं आपलें ऐक्य प्रस्थापित केलें. स्कँडिनेव्हियन राष्ट्रें जरी परस्परांपासून अलग असलीं तरी त्यांचे हितसंबंध व रक्तसंबंध एकच आहेत असें जाहीर करण्यांत आलें व स्कँडिनेव्हियानिझम, उर्फ स्कँडिनेव्हियन राष्ट्रधर्माचा झपाट्यानें प्रसार होऊं लागला. महायुद्धानंतर देखील या तत्त्वाची उपयुक्तता या राष्ट्रांनां वाटूं लागली व त्यामुळें या तत्त्वाचा प्रसार जारीनें सुरू करण्यांत आला. नार्वेनें यासाठीं एक 'रूं नार्डन' नांवाची संस्था स्थापन केली व तिच्या निरनिराळ्या कमिट्या बनविण्यांत येऊन एकेका कमिटीनें एकेका स्कँडिनेव्हियन राष्ट्राशीं सलोखा ठेवण्याचा व तो वृद्धिंगत करण्याचा प्रयत्न करावा असें ठरविण्यांत आलें. नॉर्डन नावाचें एक सांवत्सरिक पुस्तक या संस्थेतर्फे प्रसिद्ध होत होतें.

१९१४ साल हें नॉर्वेच्या इतिहासांत महत्त्वाचें आहे. या वर्षी डेन्मार्कपासून नॉर्वे स्वतंत्र झाल्याला शंभर वर्षे झालीं. अर्थातच हा स्वातंत्र्यदिन नॉर्वेमध्यें फारच बहारींत साजरा करण्यांत आला. या दिवशीं नॉर्वेंतील सर्व कलाकौशल्याच्या वस्तूंचें प्रदर्शन भरविण्यांत आलें व त्यावरून नॉर्वेनें आपल्या व्यापार व उद्योगविषयक बाबतींत आश्चर्यकारक सुधारणा घडवून आणल्याचें निदर्शनास आलें.

महायुद्धामुळें नॉर्वेमध्यें धान्याची महर्गता झाल्यामुळें जिकडे तिकडे असंतोष माजला. त्यामुळें परदेशांतून धान्य आणवून त्याचें योग्य तऱ्हेनें नियमन करण्यासाठीं, एक कामिटी स्थापन करण्यांत आली त्यामुळें असंतोष शमला. १९१४ सालीं नोव्हेंबर महिन्यांत, स्कॅन्डिनेव्हियन टापूंतील उत्तरसमुद्र हा युद्धाचा टापू म्हणून इंग्लंडनें जाहीर केला. व नॉर्वेजियन नौकानयनाला लिंडेस्नीस–फर्नस्लंड हा टापू आंखून ठेवण्यांत आला. १९१५ सालीं धान्याची विलक्षण महर्गता होण्याचीं चिन्हें दिसूं लागल्यामुळें व उद्योगधंद्याला अडथळा येऊं लागल्यामुळें हलाखीची परिस्थिति प्राप्त झाली होती. यासाठीं स्वतंत्र कायदे करण्यांत आले. मजुरविषयक जे प्रश्न उपस्थित झाले होते त्यासंबंधींहि वेळोवेळीं कायदे करण्यांत येऊन, त्यांचे प्रश्न मिटवण्याचा प्रयत्न करण्यांत आला.

महायुद्धामध्यें नॉर्वेचीं कांहीं जहाजें बुडविलीं गेलीं, पुष्कळ खलाशी प्राणास मुकले. या मृत खलाशांच्या स्मरणार्थ बर्जेनच्या किल्ल्यांत त्यांचें स्मारक उभारण्यांत आलें. हें स्मारक नॉर्वेबद्दल अभिमान असणाऱ्या ग्रेटब्रिटनमधील इंग्लिश लोकांनीं उभारलेलं होतें हें विशेष लक्षांत ठेण्यासारखें आहे.

१९२१ ते १९२५:—महायुद्धकालीं युनायटेडस्टेट्स सरकारनें नार्वेच्या जहाजांची जी मदत मागितली होती तिचा मोबदला म्हणून हेगकोर्टानें १९२२च्या आक्टोबरमध्यें नार्वेला १२० लक्ष डॉलर देवविले. नार्वेनें १३० लक्षांची मागणी केली होती व युनायटेडस्टेट्सनें फक्त २५ लाख डॉलर देऊं केले होते. युनायटेडस्टेट सरकारनें हेगकोर्टाच्या निकालाविरुद्ध तक्रार केली.

मजूरवर्गः—नार्वेमधील रॉयल कमिशननें १९२३ सालीं कारखान्यांतील मजुरांच्या सुस्थितीबाबत कायद्यामध्यें दुरुस्ती केली. या कायद्यानें असें ठरलें होतें कीं, ज्या ज्या कारखान्यांत निदान ५० मजूर वर्षभर काम करीत असतात तेथें ⅔ मजुरांनीं विनंति केल्यास वर्क्सकमिटी ( कामासंबंधीं कमिटी ) स्थापण्यांत यावी. तथापि ८०० कारखान्यांपैकीं फक्त १६० कारखान्यांतच अशा कमिट्या स्थापल्या गेल्या होत्या. याचें कारण कमिटयांत फक्त मजूर सभासदच असत, असें वरील कमिशननें सांगितलें व नवीन सूचना अशा केल्या कीं, सदरहू कमिटयांत भांडवलवाल्यांना व मजुरांना सारखे हक्क असावे; कारखान्यांसंबंधीं नियम आखणें व त्यांची अंमलबजावणी करण्यांत, आणि कारखान्यांतील उमेदवारांचें व तरुण मजुरांचें शिक्षण व काम हें ठवरण्यासंबंधांत या कमिटयांनां भाग घेतां यावा. १९२४च्या फेब्रुवारींत गोदींतील मजूरांनीं मजुरीचे दर कमी झाल्याबद्दल तक्रार म्हणून संप केला.

नार्वेंतील देशभाषेबद्दलचा प्रश्नः—नार्वेंत निरनिराळ्या भाषासंबंधाचा घोटाळा बराच माजला असून अलीकडे राष्ट्रीय भावना जागृत झाली आहे. १६ व्या शतकांत ख्रिस्ती धर्मसुधारणेची ( रेफर्मेशन ) लाट नार्वेंत पोंहोंचली. त्यावेळीं नार्वेजी भाषा मागें पडून डॅनिश भाषेचें वर्चस्व झालें व नार्वेजी विद्यार्थी जर्मनींतील विद्यापीठांऐवजी कोपनहेगन युनिव्हर्सिटींत शिक्षणार्थ जाऊं लागले व त्यामुळें मूळ देशभाषेला 'डॅनिश–नार्वेजी भाषा' असें स्वरूप प्राप्त झालें. ही मिश्रभाषा १९व्या शतकाच्या अखेरपर्यंत सुशिक्षित वर्गांत प्रचलित होती. मूळ नार्वेजी भाषा गौण ठरून तिचें लेखनांतून उच्चाटन होऊन ती फक्त खेड्यापाड्यांतील शेतकरी व कोळी यांच्या बोलण्यांत राहिली होती. १९ व्या शतकांत नार्वेजी लेखक ॲशजार्नसेन व मोए यांनीं नार्वेजी लोकांतील जुन्या दंतकथा, जुन्या नार्वेजी भाषेंत लिहून प्रसिद्ध केल्या व तिचा दर्जा वाढविला. तथापि परकी वर्चस्वामुळें नार्वेजी भाषेची वृद्धि होण्यास बराच काल लागला. इवार आसेन या विद्वान लेखकानें जुन्या भाषेचा शब्दकोश व व्याकरण लिहिलें. जुनी लँडस्माल भाषा व डॅनिश–नार्वेजी रिक्स्माॅल भाषा यांच्यामध्यें वर्चस्वाबद्दल झगडा चालू आहे. शाळांतील क्रमिक पुस्तकें व शिक्षणाचें माध्यम याकरितां कोणती भाषा असावी हा वाद चालू असून अखेर कांहीं तडजोड होईल असें दिसतें.

वा ङ्म य, प्राचीनः—नार्वेजियन लोकांच्या प्राचीन वाङ्मयांचा आइसलँडिक वाङ्मयाशीं निकट संबंध आहे. इ.सनाच्या नवव्या शतकांत उच्च व सुशिक्षित वर्गांतील कांहीं लोकांनीं नार्वे देश सोडून आइसलंडांत वसाहती केल्या त्यावेळीं आपलें काव्य व वाङ्मय त्यांनीं आपल्याबरोबर नेलें. स. १८११ त ख्रिश्चनिआचें विश्वविद्यालय स्थापन झालें व १८१४ सालीं डेन्मार्कपासून नार्वे देश वेगळा झाला; या गोष्टींमुळें नार्वेजियन लोकांचें निराळेंच वाङ्मय तयार झालें. यापूर्वीं नार्वेजियन लोक आपले ग्रंथ कोपेनहेगन येथें प्रसिद्ध करीत असत. नार्वे व डेन्स यांचें एकच वाङ्मय होतें; व त्या वाङ्मयाच्या इतिहासांत नार्वेजियन लोकांनीं फार महत्त्वाची कामगिरी केलेली आहे.

१६५० सालीं नार्वे देशांत पहिला छापखाना काढण्यांत आला. 'बॅग्स ख्रिश्चिआनी स्टड्स वेस्किफ्युएलसे' हें नार्वेंत प्रसिद्ध झालेलें पहिलें पुस्तक होय. डोर्थो एंगेलब्रेट्स्डाटर या बाईनें स्वतंत्र ग्रंथ लिहिले. तिनें लिहिलेलें धार्मिक काव्य फार लोकप्रिय आहे. पेटर डास ( १६४७–१७०८ ) या नार्वेच्या नार्वे देशांतील मनुष्यानेंहि स्वतंत्र ग्रंथ लिहिले.

ग्रीनलंडांत पाठविलेला पाद्री हॅन्स एजीड ( १६८६–१७५८ ) यानें तेथें मिळालेल्या अनुभवांवरून अनेक ग्रंथ लिहिले. फ्रेडरिक नानेस्टॅड यां नांवाच्या बिशपनें १७६० सालीं एक साप्ताहिक गॅझेट चालू केलें. क्नुड लीम या पाद्र्यानें १७६७ सालीं वेस्क्रिव्हेल्से ओव्हर फिन्मार्कन्स लॅप्पर या नांवाचा एक महत्त्वाचा ग्रंथ लिहिला. प्रसिद्धीस आलेला बॅरन लुड्विग होलबर्ग याचा जन्म नॉर्वेंत झाला;परंतु लहानपणींच नॉर्वे सोडून तो डेन्मार्कमध्यें गेला.

आठराव्या शतकाच्या आरंभीं कांहीं नॉर्वेजियन लोकांनीं भौतिक शास्त्रांत प्रावीण्य मिळविलें.जोहान अर्न्स्ट गनरस यानें वनस्पतींचा बराच अभ्यास केला त्यानें नॉर्वेजियन रॉयल सोसायटी ऑफ सायन्सेस या नांवाची संस्था १७६० सालीं काढिली. ख्रिश्चन ब्रॅन्मन् टुलिन ( १७२८--१७६५ ) हा एक मोठा कवि होऊन गेला. एव्हाल्डच्या वेळेपासून बॅगेसेनच्या वेळेपर्यंतच्या काळामधील डॅनिश वाङ्मय नॉर्वे लोकांनींच लिहिलेलें आहे. नील्स क्रोग ब्रेडल ( १७३३–७८ ) यानें डेन्समध्यें प्रथमतः लिरिक ( भावनात्मक ) नाटकें लिहिलीं. जोहान नोर्डाहल ब्रुन ( १७४५ -१८१६ ) यानें शोकपर्यवसायी नाटकें लिहिलीं. १७७२ सालीं नॉर्वेजियन कवींचें कोपनहॅगनमध्यें इतकें वर्चस्व झालें कीं, त्यांनीं एक नॉर्वेजियन सोसायटी स्थापन केली. आठराव्या शतकांत क्लॅन्स फ्रिमन, पीटर हर्वो फ्रिमन, क्लॅन्स फास्टिंग, जोहान विवे वगैरे प्रसिद्ध ग्रंथकार होऊन गेले. हे नॉर्वेमध्यें जन्मलेले होते; परंतु डेन्मार्कच्या वाङ्माच्या इतिहासांत त्यांचीं नांवें आढळतात. नील्स ट्रेस्चॉन व हेन्रिक स्टीफन्स हे तत्त्वज्ञानी होते.

मे महिन्याच्या१७व्या तारखेस नॉर्वे देश स्वतंत्र झाल्यामुळें "सिट्टेनडेमाइपोएसी" (म्हणजे १७ मेची कविता) या नांवाचें काव्य लिहिलें गेलें. कॉराड विकोलाइस्स्वाच, हेन्रिक ओकर जेरेगार्ड व मनरिट्झ क्रिस्तोफर हॅन्सेन या एकोणिसाव्या शतकांतील तीन कवींनीं विशिष्ट नॉर्वेजियन विचारपद्धति सुरू केली ( १८१४ ). या तीन कवींनीं नॉर्वेजियन वाङ्मयास सुरवात केली. नॉर्वेजियन वाङ्मयाची सेवा, हेन्रिक अरनोल्ड वरजीलँड यानें उत्तम प्रकारें केली (१८०८–४५); हा एक मोठा कवि होता. परंतु वेलहॅवन यानें वरजीलँडच्या काव्यावर फार जोराची टीका केली. १८३४ सालीं त्यानें अनेक उपहासात्मक कविता लिहिल्या; त्यांनां 'नॉर्वेची प्रभात ' असें म्हणतात.

लहान लहान ग्रंथकारः—मंच याचीं नाटकें व कविता फार लोकप्रिय आहेत. सालोमन डिकोस व लॉर्ड विल्यम् रसेल हीं ऐतिहासिक नाटकें प्रसिद्ध आहेत. लँडस्टड (१८०२-८०) यानें उत्तम स्तोत्रें लिहिलीं आहेत. आस्मंड ओलाफसेन व्हिंजी हा एक बुद्धिमान् शेतकरी होता. डॅनिश वाङ्मयापासून नॉर्वेजियन वाङ्मय ओळखून काढण्यासाठीं त्यानें एक खेडवळ भाषा तयार केली. यानें कांहीं नाटकें व कवितादि लिहिल्या आहेत.इब्सेन व जोर्नसन हे अनुक्रमें कादंबरीकार व नाटककार म्हणून प्रसिद्ध आहेत. जॅकोबाइन कॅमिला कॉलेट नांवाच्या बाईनें 'दि गव्हर्नर्स डॉटर्स' या नांवाची एक उत्तम कादंबरी लिहिली आहे. ( १८५५ ). नॉर्वेमधील स्त्रियांचें दास्यविमोचन करणाऱ्या चळवळीचें नेतृत्त्व हिच्याकडे होतें. ॲनि मॅगडेलननें खेडेगांवांतील आयुष्यक्रमासंबंधीं कादंबऱ्या लिहिल्या आहेत.

पिटर अँड्रीजमंच (१८१०–६३):—हा नॉर्वे देशांतील एक प्रसिद्ध इतिहासकार होता. जाकोबा रुडाल्फ केसर यानें नॉर्वेचा मध्यकालीन इतिहास लिहिला आहे. जाकोब ओलन्स लॅके (१८२९–८१) हा उत्तम व्याकरणकार होऊन गेला. लुड्विग क्रिस्टेन्सेन डाआ हा इतिहासकार व बर्न्ट मो हा चरित्रकार होता. ईलर्ट लुंड सुंड (१८१७–७५) यानें नॉर्वेच्या गरीब लोकांच्या स्थितीचें वर्णन केलें आहे. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं मिचेल स्जेलडेरुप यानें वैद्यकशास्त्रावर ग्रंथ लिहिले. बाल्टाझार मॅथिअस कील्हन व थिओडोर जेरुल्फ हे भूगर्भशास्त्रवेत्ते होते. नेल्स हेन्रिक अबेल हा मोठा गणितशास्त्रज्ञ होता. कार्ल पॉल कॅसपरी ( १८१४–९२ ) हा जर्मन ज्यू असून यानें ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला होता; तो ख्रिश्चॅनिया येथील विश्वविद्यालयांत धर्मशास्त्राचा प्रोफेसर होता. क्रिश्चन एल्स्टर (१८४१–८१ ) याच्या टोरा ट्रॉंडल व डेंजरस पीपल या प्रसिद्ध कादंबऱ्या आहेत. गारबोर्ग याच्या कादंबऱ्या खेडवळ भाषेंत लिहिल्या होत्या. ॲमली स्क्रम हिनें लिहिलेल्या कादंबऱ्यांची भाषा सुंदर नाहीं. परंतु विशिष्ट स्थलाच्या आयुष्यक्रमाची उत्तम कल्पना त्या कादंबऱ्यांवरून होते; हॅन्स जीगर हा प्रथम खलाशी होता. परंतु त्याचें वाङ्मयाकडे लक्ष्य लागलें. यानें मॉर्बिड लव्ह ही कादंबरी लिहिली.

क्नुड हॅम्सुन याच्या अंगीं बराच अहंपणा असून, इतर लेखकांवर तो कडक टीका करीत असे. यानें हंगर या नांवाची एक अद्भुत कादंबरी लिहिली आहे ( १८८८ ). हॅन्स आनरुड याचे ग्रंथ फार मनोरंजक व विनोदी आहेत. एग्गे हा कादंबरीकार व नाटककार होता. यानें एक आनंदपर्यवसायी नाटक लिहिलें आहे.

सन १८८५ च्या सुमारास नॉर्वेजियन वाङ्मयांतून काव्याची हकालपट्टी झाली; परंतु सिगुर्ड बोडकर यानें वाङ्मयांत काव्याचा पुन्हां समावेश केला. नील्स कॉलेट व्होग्ट यानें १८८७ सालीं एक काव्य प्रसिद्ध केलें. आर्ने डायरफेट हा अहंमन्य होता, परंतु हा बुद्धिवान असून याच्या लेखांत माधुर्य आहे. विल्हेल्म क्रॅग यानें काल्पनिक गोष्टी लिहिल्या. त्याच्या कादंबऱ्यांमध्यें वेस्टलंडच्या रहाणीची उत्तम माहिती दिली आहे. थॉमस पी. क्रॅग हा सुप्रसिद्ध कादंबरीकार होता. अडा वाईल्ड ही त्याची प्रसिद्ध कादंबरी आहे. जॉन पालसेन यानें 'दि विडोज सन्' हा ग्रंथ लिहिला. जोहान

बोजर यानें औपरोधिक अद्भुत गोष्टी लिहिल्या आहेत. ‘ दि पॉवर ऑफ फेथ ’ ही गोष्ट फार जोरदार आहे.

टीकाकारः--कार्ल नीरुप व जाल्मर ख्रिश्चनसेन हे टीकाकार असून त्यांनीं नॉर्वेजियन वाङ्मयासंबंधीं निबंध लिहिले आहेत. नॉर्वेचा प्रसिद्ध कोशकार, जेन्स ब्रोग हूलन्होर्सेन ( १८४५--१९०० ) याच्या मृत्युमुळें नॉर्वेजियन लोकांच्या वाङ्मयाची फार हानि झाली. नॉर्वेजियन ग्रंथकारांचा कोश लिहिण्यास त्यानें सुरवात केली होती परंतु तो कोश पूर्ण झाला नाहीं. हा फार उच्च प्रतीचा कोश आहे. अर्न्स्ट सार्स, युगव्हर नीलसेन व एल्. एम्. बी औबर्ट हे अर्वाचीन सुप्रसिद्ध इतिहासकार होते. इंगेलियन मार्कस जाकोब मौराड हा नॉर्वेतील मोठा तत्त्वज्ञानी होता. ईस्थेटिक्स ( १८८९ ) हा त्याचा ग्रंथ अद्वितीय आहे.

१८९९ व १९०० या सालीं, डॅनोनॉर्वेजियन भाषेच्या ऐवजीं, शेतकरी लोकांच्या वेगवेगळ्या भाषा प्रचारांत आणण्याबद्दल मोठा वादविवाद झाला; त्यांत नॉर्वेच्या सर्व ग्रंथकारांचें अंग होतें. ज्या भाषेमध्यें नॉर्वेतील उत्तमोत्तम ग्रंथ लिहिलेले होते त्या डॅनो--नॉर्वेजियन भाषेची हकालपट्टी करणें, भाषाशास्त्रवेत्त्यांनां व ग्रंथकारांनां संमत नव्हतें. विशेषतः जोनसन व सोफूस यांनीं याबद्दल बराच विरोध केला परंतु डॅनोनॉर्वेजियन भाषा काढून टाकून खेडवळ लोकांच्या मिश्र भाषेचा उपयोग करण्यांत यावा असें अर्ने गारबोर्ग याचें मत होतें. कारण, जरी डॅनोनॉर्वेजियन भाषेच्या योगानें पुष्कळ उपयुक्त शब्द प्रचारांत आले होते तरी ती भाषा कृत्रिम असल्यामुळें फक्त लिहिण्याकडे तिचा उपयोग होत असून त्या भाषेंत कोणीहि बोलत नसे; परंतु खेडवळ लोकांच्या मिश्र भाषेमध्यें प्रत्येक मनुष्य बोलत असे; यामुळें ती मिश्रभाषा काढून टाकून डॅनो-नॉर्वेजियन भाषा प्रचारांत आणण्याची कल्पना अर्ने गारबोर्ग याला बिलकुल पसंत नव्हती.

अर्वाचीनः—१९ व्या शतकांत आपलें नांव अजरामर करणारे इब्सेन, जॉनसन, लाय, कीललंड, यांच्या निधनानंतर विसाव्या शतकांतील प्रथमपादांत नटहमसन, हॅन्सई किंक, अर्ने गारबोर्ग, व गन्नर हीबर्ग हे चार ग्रंथकार वाङ्मयक्षितिजावर झळकूं लागले. हमसन व किंक यांची कादंबरीकार या नात्यानें प्रसिद्धि होती तर हीबर्ग हा नाटककार व निबंधलेखक या नांवानें प्रसिद्धि पावला. गरबोर्गची ख्याति मुख्यतः समाजशास्त्र व धर्मशास्त्र यांवर लिहिणारा व कवि या नात्यानें झाली होती. १९०५ सालानंतर म्हणजे नॉर्वेनें आपलें स्वातंत्र्य प्रस्थापित केल्यावर निरनिराळ्या राजकीय व सामाजिक कल्पनांचा उदय नार्वेत होऊं लागला व त्यांचें प्रतिबिंब वाङ्मयामध्यें चमकूं लागलें. नॉर्वेमधील पुराणभाषेच्या पायावर नवीन भाषा तयार करण्याचे व डॅनोनॉर्वेजियन भाषेचें उच्चाटण करण्याचे प्रयत्न वाङ्मयभक्तांनीं व भाषाकोविदांनीं सुरू केले.

कादंबरी-वाङ्मयाच्या क्षेत्रांत हमसन हा प्रामुख्यानें झळकत होता. आत्मवृत्तप्रधान कादंबरी लिहिण्यांत याचा हातखंडा आहे. व्हिक्टोरिया ( १८९८ ) या त्याच्या कादंबरींत व रिकेट्स पोर्ट ( १८९५ ), डिव्हेट्स सिपल ( १८९६ ) व आफ्टनरोड ( १८९८ ) या त्याच्या तीन नाटकांत, शृंगारिक विषयाचें विवेचन असून, डेट व्हिल्डे कॉट ( १९०४ ) या काव्यसंग्रहांत भावनाप्रधान काव्यांचीच संख्या अधिक आढळून येते जॉर्जसन व बायरन या कवींवर लिहिलेलीं त्याचीं काव्यें फार बहारीचीं आहेत १९०५ सालानंतर त्यानें कादंबरीलेखनाला पुन्हां हात घातला. अंडर हॉस्टजर्नेन ( १९०६ ), बेनोनी ( १९०७ ) व रोसा ( १९०८ ) या त्याच्या कादंबऱ्यांत, मानवी जीवितासंबंधीचे विचार खोंचदार भाषेंत मांडलेले आढळून येतात. डेन सिस्टा ग्लेड, ( १९१२ ), बोर्न आव टिडन ( १९१३ ), सेगेलफॉस बाय ( १९१५ ), मार्केन्स ग्रोड ( १९१७ ), निगोर्ड ( १९१८ ) व कॉनेर्व वेड वंडन पोस्टेन ( १९२० ) या त्याच्या अगदीं अलीकडच्या कादंबऱ्या होत. यांचा कथाभाग काल्पनिक असून त्यांत नॉर्वेमधील आधुनिक समाजस्थितीवरील प्रश्नांचा मार्मिकपणें उहापोह केलेला आहे. हल्लींच्या उद्योगधंद्यांत नॉर्वेतील लोकांचें कृषिकर्मावरील लक्ष्य पूर्णपणें उडालेलें आहे व त्यामुळें लोकांमध्यें नैतिक अधःपात होऊं लागलेला आहे असें त्यानें या कादंबऱ्यांमध्यें दाखविलें आहे. ग्रोथ ऑफ दि आॅईल ( १९२० ) ही कादंबरी त्याच्या मार्केन्स ग्रोड या कादंबरीचें इंग्रजी रूपांतर आहे. या कादंबरीमुळें त्याला नोबल प्राईज मिळालें. १९२१–२२ सालीं त्याच्या समग्र ग्रंथांचा संग्रह प्रसिद्ध झाला आहे.

हन्स किंक याच्या कादंबऱ्यांत अद्भुत कल्पना हास्यास्पद रीतीनें, अथवा झणझणीत तऱ्हेनें मांडलेल्या आढळतात. नॉर्वेच्या लोकस्थितीचें ज्ञान याच्याइतकें कोणत्याहि लेखकांत दिसून येत नाहीं. खेडवळ लोकांसंबंधीच्या याच्या छोटया छोटया गोष्टी वाचनीय असतात. स्नेर कव्हलेन ग्रास्ट या त्याच्या कादंबरींत नॉर्वेमधील समाजस्थितीचें वर्णन मार्मिक तऱ्हेनें दिलेलें आढळतें. डेन सिस्टे जेस्ट व मोट कार्नेव्हल या त्याच्या नाटकांत, अद्भुत कल्पनांचा सुळसुळाट दिसून येतो व्हिक्टर ह्यूगोच्या कादंबऱ्यांचा याच्या मनावर फार परिणाम झालेला आहे. याची लेखनशैली संवादात्मक असून नवीन नवीन शब्द तयार करण्यांत याचा हातखंडा आहे. याच्या कादंबऱ्या आल्फ्रेड ई हेंडरसन या अमेरिकन लेखकानें भाषांतरिल्या आहेत.

अर्ने गारबोर्गनें लॅंड्समाल उर्फ नॉर्वेच्या मूळ भाषेंत पुष्कळ भावगीतें रचिलीं आहेत. हागटसा ( १८९५ ) या कादंबरींत एका कुमारिकेचें पात्र असून तिच्या स्वर्ग, पाताळसंबंधीच्या कल्पना बहारींत मांडलेल्या आहेत. महाभारतांतील कथाभागावर ओरेस्युस्कबेट नांवाचें एक नाटक लिहिलें.

तसेंच होळवर्गच्या आनंदपर्यवसायी नाटकाचें भाषांतर करून त्याला जेप्पे पाबजेंट हें नांव दिलें. हें नाटक त्यानें आपल्या बायकोच्या मदतीनें बांधलेल्या नाटकगृहांत करून दाखविण्यांत आलें. याचा लेखनसंग्रह हल्लीं छापत आहे. याच्या बायकोनेंहि एक कादंबरी व कांहीं नाटकें लिहिलीं आहेत.

गन्नर हीवर्ग याचीं नाटकें फार लोकप्रिय असून तीं नॉर्वेंतील निरनिराळ्या महत्त्वाच्या प्रसंगांनां अनुसरून लिहिलेलीं आहेत. कॉंग पायदास यांत जॉर्नसन याच्या नीतितत्त्वावर टीका केलेली आहे. फोकराईट यांत राष्ट्रधर्मावरील विचार प्रकट झालेले आहेत हरल स्वन्समोर या नाटकांत वर्तमानपत्राच्या संपादकाचें चित्र रंगविलें आहे. जेयर लिघेट टिल नेस्टेन यांत मानव्याच्या कल्पनांचें विवेचन आलेलें आहे. जेगव्हिल व्हर्जे मिटलॅंड यांत स्वातंत्र्यकालाची परिस्थिति वर्णिली असून त्यांत देशद्रोहाचें मूर्तिमंत चित्र उभें केलेलें आहे. परोडेरोजेन या हास्यरसोत्पादक नाटकांत जॉर्नसनच्या कौटुंबिक परिस्थितीवर टीका केली आहे. यानें वृत्तपत्रांत अनेक लेख लिहिले व पॅरिसनेव्हे या नांवाखालीं ते एकत्र करून १९०९ सालीं छापण्यांत आले. याच्या निबंधाचा संग्रह, सेंट ओग हार्ट ( १९१७ ), इब्सेन ओग जॉर्नसन पा सीनेन, फ्रान्स्के न्हिलिटर नार्स्के रिटर या नांवाखालीं प्रसिद्ध झाला.

१८७०–८० सालाच्या दरम्यान, नॉर्वेमध्यें जो सत्यपूर्ण कल्पनाप्रधान वाङ्मयाचा सुळसुळाट होता तो पुढें लुप्तप्राय झाला तरी त्याचें प्रतिबिंब जोहनबोजेर याच्या लिव्ह, डेनस्टोअर, व्हर्नेन्स अनसिट,डिरेलंड इत्यादि नाटकांत दिसून येतें. याच्या बहुतेक ग्रंथांचें फ्रेंच,जर्मन व इंग्लिश भाषेंत भाषांतर झालें आहे. जेमेकोस्ट या त्याच्या काव्यसंग्रहांत,हद्दपारीहून परत स्वगृहीं आलेल्या माणसाला किती आनंद वाटतो याचें रसभरित वर्णन आलेलें आहे.

अगदीं अलीकडील अद्भुत-वाङ्मयाच्या संप्रदायाचे सिगजॉर्न आस्टफेल्डर व थॉमस पी क्रॅग हे प्रवर्तक होत. आस्टफेल्डर याच्या लेखनांत,वर्णनप्राचुर्य व नावीन्य दिसून येतें. त्याचप्रमाणें गहन विचारहि मधून मधून दिसून येतात. क्रगच्या नाटकांत व गोष्टींत भावनांचें चित्र सुंदर रीतीनें रंगविलेलें असतें.गव्हरजेल्ड हा त्याचा खेळ फार प्रसिद्ध आहे.

१९१०–२० सालच्या दरम्यान, भावगीतें लिहिण्यांत प्रसिद्धि पावलेल्या कवींत, हर्मन विल्डेनवी, ओलाफ बुल, आर्नल्फ ओव्हरलंड इत्यादि प्रमुख होत. विल्डेनवीच्या काव्यांत प्रसाद व जीवंतपणा दिसून येतो तर ओलाफच्या कवितेंत, ओज व विचार यांचा मेळ दिसून येतो.

आधुनिक कादंबरीकारांत पीटर एग्गे हा फार प्रसिद्ध आहे. याच्या कादंबऱ्यांत सत्यपूर्ण विवेचन आढळतें. त्याची हझर्टे ही कादंबरी फार लोकप्रिय आहे याशिवाय त्यानें फेलेन, बिस्ट इत्यादि नाटकें लिहिलीं असून त्यांत इब्सेनच्या लेखनाची छटा दृग्गोचर होते. अँडर्सनच्या ग्रंथांत वर्णनांचा सुकाळ असतो.आय कॅन्सेलीराडेन डोने व मोटवल या कादंबऱ्यांत वर्णनें पुष्कळ आलीं आहेत. एल्स्टर हा स्वभावचित्रें कुशलतेनें रंगविण्यांत पटाईत आहे. याच्या इलेर, मेस्टर इत्यादि कादंबऱ्यांत, गरीबांच्या हालांचें सहानुभूतिपूर्ण वर्णन आलेलें आहे. हिल्डीच हा विनोदी व लोकप्रिय लेखक आहे. ख्रिस्टेनसेन यानें पुष्कळ कादंबऱ्या लिहिल्या आहेत.फेड्रेलॅंडेट इ व्हेर्डेन स्क्रिजन लिस या ग्रंथांत नॉर्वेची महायुद्धाच्या काळची परिस्थिति कशी होती याचें विवेचन आलें आहे. जोहान फाकबर्गर हा लेखक खाणींतील मजूर असून त्यानें मजुरांचें चित्र आपल्या ग्रंथांत यथार्थ रेखाटलें आहे. लिस्वेट पा जर्मन फील्ड या त्याच्या ग्रंथांत, करुणरस ओथंबलेला आहे. अशाच प्रकारच्या विषयांवर लिहिणारा ओस्करब्रेटन हा लेखक असून त्याची भाषा सोपी व परिणामकारक असते. गॅब्रियल स्कॉट याच्या कादंबऱ्यांत दक्षिण नॉर्वेच्या पुरातन कालचें वर्णन व त्याचप्रमाणें साहसी लोकांचीं वर्णनें आढळतात. हिंमेल्यूरेट, बेबल्सटार्न, जर्नबिर्डन इत्यादि त्याच्या कादंबऱ्या फार प्रसिद्ध आहेत.

स्त्रीलेखिकांत रॅनाहिल्ड जॉल्सेनचें नांव प्रामुख्यानें झळकतें. या लेखिकेच्या वेसमोर, रिक्रागन, फर्नोडामोना इत्यादि कादंबऱ्या प्रसिद्ध असून त्यांत पूर्वनॉर्वेतील निसर्गाचीं बहारदार वर्णनें झालेलीं आहेत. हिचें अनुकरण करणाऱ्या स्त्रीलेखिकांत सिग्रिड अंडसेट हिचें नांव मुख्य असून तिच्या अद्भुत कादंबऱ्या लोकप्रिय आहेत.

विनोदी पण खोंचदार अशी भाषा लिहिण्यांत निल्स जेर याचें नांव मुख्य आहे. रेन्सकपेट्रस डग व डेट लिकेलिजे वल्ग हीं याचीं दोन नाटकें फार प्रसिद्ध आहेत. त्याच्या नाटकांचा संग्रह १९२१–२२ सालीं छापण्यांत आला. सिगर्ड मॅथीसेन हा अलीकडील काळांतील एक चांगला कवि आहे. सिवलीन लायव्लिन यानें पुष्कळ मनोरंजक गोष्टी लिहिल्या आहेत. जर्केच्या फ्री फ्यूगल, मीटिओरट, सोलन इत्यादि कादंबऱ्या व्यापक विचाराच्या दृष्टीनें वाचनीय आहेत. सिगर्ड ख्रिस्टियान्सेस हा वोर्ट एगेट लिव्ह या कादंबरीमुळें व ऑफरडोनेन या नाटकामुळें प्रसिद्धीस आला. रोनाल्ड फिंजेन हा उत्कृष्ट कादंबरीकार व निबंधलेखक आहे. याच्या वाङ्मयावरील निबंधांत त्याची मार्मिक बुद्धि दिसून येते. याचा सिंडेफेल्ड हा खेळ ख्रिस्तियाना येथील नाटकगृहांत १९११ सालीं करण्यांत आला. लॅंडसमाल या मूळच्या नॉर्वेच्या भाषेंत ग्रंथ लिहिणारा, या नात्यानें जेन्स वेट हा कादंबरीकार प्रसिद्ध आहे याच्या खालोखाल ओलाव्ह डन्न हा कादंबरीकार व अंडर्स ओवर्डन व ख्रिस्तोफर उप्पडल हे भावनागीतें लिहिणारे कवी लोकप्रिय आहेत.

[ संदर्भग्रंथः—ब्रेकस्टाड–कॉन्स्टिटयूशन ऑफ दि किंगडम ऑफ नॉर्वे; नॅनसेन–नॉर्वे अँड दि यूनियन विथ् स्वीडन बॉयेसेन—नॉर्वे ( स्टोरी ऑफ दि नेशन्स सीरीज ); हॅार्ने–

हिस्ट्री ऑफ दि लिटरेचर ऑफ दि स्कॅन्डिनेव्हियन नॉर्थ; एडमंडगुज-नॉर्देन स्टडीज. ]

**नार्वेकर वैश्य**—या जातीचें मूलस्थान गोवा प्रांत हा होय. हे तिकडील वैश्यवृत्तीचे लोक आहेत. गोवा प्रांतां-तील नार्वे वगैरे गांवीं यांची बरीच वस्ती होती. सोळाव्या शतकाच्या सुमारास पोर्तुगीज लोकांनीं जेव्हां हिंदु धर्मांतील लोकांस बाटविण्यास सुरवात केली तेव्हां आपला हिंदु धर्म राखण्याकरितां हे लोक सह्याद्रि पर्वत ओलांडून घाटावर पळून आले. या घाटावर आलेल्या लोकांमध्यें बरेच लोक नार्वे या गांवचे रहिवाशी असल्यामुळें ते आपणांस नार्वेकर वैश्य असें म्हणवूं लागले.

या जातीची लोकसंख्या अजमासें चार हजार असून मुख्य वस्तीचें ठिकाण दक्षिण महाराष्ट्रांतील बेळगांव हें होय व या ठिकाणची वस्ती सुमारें एक हजार आहे. या जातींत गांवोगांवीं पंचायती आहेत आणि अलीकडे पांच वर्षांपासून सर्वसामान्य अशी एक पंचायत बेळगांवीं स्थापण्यांत आली आहे. गांवोगांवीं ज्या पंचायती आहेत त्यांचा व बेळगांव येथें स्थापिलेल्या सर्वसामान्य पंचायतीचा अध्यक्ष वेळोवेळीं निवडला जातो; वंशपरंपरेनें नसतो. पंचाच्या निकालाविरुद्ध कोणी गेल्यास त्याला बहिष्कृत करण्यांत येतें. जातीचीं लहान मोठीं अशीं तीन चार देवळें आहेत; त्यां-पैकीं श्रीसमादेवीचें देऊळ बेळगांव येथें आहे. या जातींत 'समादेवी फंड' व 'शिक्षण फंड' असे दोन फंड आहेत. समादेवी-फंड वर्षांतून दोन वेळां गोळा केला जातो. या फंडास जातींतील प्रत्येक इसम आपआपल्या योग्यतेप्रमाणें वर्गणी देतो. ही रक्कम श्रीसमादेवीच्या उत्सवाकरितां खर्च केली जाते. या फंडास मदत म्हणून प्रत्येक लग्नाच्या वेळीं हुंड्याच्या रकमेवर शेंकडा दोन रुपयांप्रमाणें कर सक्तीनें वसूल केला जातो. "शिक्षण-फंड" हा अलीकडेच अस्तित्वांत आला असून देणगी व वर्गणी-शिवाय प्रत्येक लग्नांत वराकडून दोन रुपये व वधूकडून एक रुपया वसूल करून शिक्षणफंडांत जमा करण्यांत येतात. या जातींत विधवांचें केशवपन होत नाहीं; तें व्हावें असें कांहींचें म्हणणें पडतें. या जातींशीं सदृश अशा जाती म्हणजे बांदेकर (आणि त्यांतील पोटजाती म्हणजे पानवरें, संगमेश्वरी आणि पाटणेवाणी), वावकुळे वाणी आणि वैश्य-वाणी या होत. परंतु या जातींचा आणि नार्वेकर वैश्य जातीचा परस्पर विवाह व अन्नोदकव्यवहार होत नाहीं. या जातीचा द्रविड आणि गौडब्राह्मण या जातींशींच फक्त अन्नोदकव्यवहार होतो. जातींत पोटजाती नाहींत. विवा-हादि संस्कार द्रविड ब्राम्हण ज्ञातींतील भिक्षुक करतात. हिंदु-धर्मशास्त्रविषयक बारीक सारीक प्रश्न ज्ञातींतील मुख्य सोड-वितात, परंतु वादग्रस्त प्रश्न असल्यास श्रीमत् जगद्गुरु स्वामी मठसंकेश्वर यांजकडे निकाल विचारण्यांत येत असे. परंतु अलीकडे ही पद्धत नष्ट होत आली आहे. लग्न, मौंजीबंधन वगैरे १६ संस्कार ब्राह्मणांकडून दिलेल्या शास्त्राधारावरून करण्यांत येतात. ज्ञातीचे कुलदेव मंगेशी, नागेशी, शांतादुर्गा, सप्तकोटेश्वर, कनकादेवी वगैरे गोव्यांतील सासष्टी प्रांतांत आहेत. या जातींत पुनर्विवाह नाहीं. [ रा. विठ्ठल यशवंत गावडे, सेक्रेटरी नार्वेकर वैश्यसमाज यांजकडून आलेली माहिती. ]

**नालतवाड**—मुंबई इलाखा, विजापुर जिल्हा. एक प्राचीन गांव. याला पूर्वी नीलावतीपट्टण म्हणत असत. हें मुद्देबिहा-ळच्या आग्नेयीस सुमारें १३ मैलांवर आहे. गांवांत तीन देवळें व तीन शिलालेख आहेत. यांतील एक, दक्षिण चालु-क्यांतील दुसऱ्या जगदेकमल्ल राजाचा आहे. १४०२ सालीं नालतवाड सोलापूरच्या बेरडाकडून लुटलें गेलें.

**नालागड**—पंजाबांतील एक डोंगरी संस्थान. उ. अ. ३०° ५४' ते ३१°१४' आणि पूर्व रेखांश ७६°३९' ते ७६° ५६'. क्षेत्रफळ ५५६ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ४६८६८. यांत ५४२ गांवें असून देस व पहार या दोन तहशिली आहेत. स. १८१५ पूर्वी गुरख्यांनीं हा प्रांत उध्वस्त केला होता पण नंतर ब्रिटिशांनीं येथल्या राजालाच पुन्हां गादीवर बसाविलें. गंहू, जव, मका व खसखस हीं येथील मुख्य पिकें होत.

**नावडा**—ही मध्यप्रांत, निमाड जिल्ह्यांतील एक लहान जात आहे. या नांवाचा 'नाव' (होडी) शब्दाशीं संबंध आहे. पण मल्लार व खेट लोकांपेक्षां यांचा दर्जा उच्च आहे. हे ओंकारेश्वरास यात्रेकरूंनां नर्मदेच्या पार नेतात. हे स्वतःचे पूर्वज रजपूत होते असें म्हणतात. कांहीं लोकांचीं आडनांवें सोळांकी, रावत व मोरी अशीं आहेत. पण हीं त्यांनीं आपल्या क्षत्रिय मालकांचीं नांवें घेतलीं आहेत असें दिसतें. यांनीं एका राजाच्या मुलीचें नर्मदेंत बुडालेलें प्रेत काढून आणलें तेव्हांपासून यांस नर्मदेवर होड्या चालवि-ण्याचा हक्क दिला व तो अद्याप त्यांच्याकडे आहे, त्याबद्दल ते कोणासच कर देत नाहींत. यांच्यांत गोत्रसंबंधाच्या संततीचा एक गाटे नांवाचा वर्ग आहे. न्हाण आलेल्या अविवाहित मुली या वर्गांत घालतात. यांची जात फार लहान असल्यामुळें इतर लोकांशीं स्वैरसंबंध होणें स्वाभाविक आहे. मुली कमी असल्यामुळें त्यांनां मागण्या पुष्कळ असतात व हुंडा मिळतो. चार माणसांसमोर बायकोला घरांतून काढून लावलें कीं घटस्फोट होतो. हे भैरवाची पूजा करतात. आपल्या होड्यांत भैरवाचा एक खिळा ठोकतात [रसेल व हिरालाल].

**नावा**—राजपुताना, जोधपूर संस्थान, सांवर जिल्ह्यांतील शहर. हें सांवरसरोवराच्या उत्तर टोंकावर वसलें आहे. हें राजपुताना-माळवा व जोधपूर बिकानेर या रेल्वेचें जंक्शन स्टेशन आहे. लोकसंख्या (१९११) ५६५७. या शहराभोंवतीं भिंत आहे. मीठ व नक्षीदार चादरी यांचा व्यापार चालतो.

**नाशिक, जिल्हा.**—मुंबई इलाख्यांतील मध्य भागांतला एक जिल्हा. उ. अ. १९° ३५' ते २०° ५३' व पू. रे. ७३°१५' ते ७५°५६'. क्षेत्रफळ ५८५० चौरस मैल. लोकसंख्या

( १९२१ ) ८३३५७६. याच्या उत्तरेस खानदेश, आग्नेयीस निझामचा मुलूख, दक्षिणेस अहमदनगर, पश्चिमेस ठाणा जिल्हा, व धरमपूर, सुरगणा आणि डांग मुलूख. हा सर्व जिल्हा समुद्रसपाटीपासून १३०० ते २००० फूट उंचीवर वसला आहे. पश्चिमेकडील डांग भागांत बरेच पर्वत असून यांवर फक्त खरीप पिकें येणें शक्य आहे.पूर्वेकडील 'देश' भाग मात्र सुपीक असून मोकळा आहे. सातमाळ, किंवा चांदवड पहाडावरून दोन्ही बाजूंनां वहाणाऱ्या, पूर्वेस गोदावरी व पश्चिमेस गिरणा दोन नद्या या आहेत.सर्वांत उंच शिखर धोडप(४७४१फूट).इतर बरींच ऐतिहासिक व धार्मिक दृष्ट्या महत्त्वाचीं लहान लहान शिखरें आहेत. दिंडोरी व नाशिकमध्यें एक लहान पर्वत आहे; यावरच चांभारलेणीं आहेत. गोदावरी ही मोठी नदी असून हिला मिळणाऱ्या नद्या दारणा, कादवा व गिरणा वगैरे आहेत. गिरणा नदी शेतीस फार उपयोगी असून तिला अनेक धरणें बांधिलीं आहेत. या जिल्ह्यांत किल्ले बरेच असून मराठ्यांशीं लढाई झालेलीं अशीं बरींच ठिकाणें यांत आहेत. येथील हवा फार चांगली आहे. एप्रिल ते जानेवारीपर्यंत समुद्राकडील वाऱ्यामुळें हवा समशीतोष्ण असते.

इतिहासः—इ. स. पूर्वी दुसऱ्या शतकापासून इ. स. च्या दुसऱ्या शतकापर्यंत येथें आंध्र घराण्याचा अंमल असून राजधानी पैठण ( नाशिकच्या आग्नेयीस ११० मैल ) येथें होती. पुढें कांहीं काळ अनुक्रमें चालुक्य, राठोड व देवगिरीचे राजे यांचेंहि अंमल होते, इ. स. १२९५ ते १७६० पर्यंत मुसुलमानांपैकीं अनुक्रमें देवगिरीचे राजे गुलबुर्ग्याचे बहामनी राजे, अहमदनगरचे निजामशाही राजे व मोंगल सरदार यांनीं राज्य केलें. इ. स. १७६०–१८१८ पर्यंत येथें मराठेशाही होती; त्यानंतर हा जिल्हा इंग्रजांच्या ताब्यांत गेला

नाशिक हें पौराणिक शहर असून येथें देवालयें बरींच आहेत. बौद्ध व जैन गुहाहि पहाण्यासारख्या आहेत. गोविंदेश्वर येथें जीं देवळें आहेत तीं सर्वांत उत्तम आहेत. बागलाणमध्यें कळवण येथील जोगेश्वर देवळांतील नकशीकाम फार सुरेख आहे. इ. स. १९०६ त येथें सत्रप वंशाच्या वेळचीं बरींच नाणीं सांपडलीं.

या जिल्ह्यांत एकंदर ३८ डोंगरी किल्ले असून यांचे दोन प्रकार आहेत; सह्याद्रीवर असणारे व मध्यभागाच्या चांदवड पहाडावर असणारे. सह्याद्रीवर एकंदर २३ किल्ले आहेत; पैकीं मुख्य गलन, अंजनेरी, त्रिंबक, कुलंग, अलंग व कळसुबाई हे होत. चांदवड पहाडावर पंधरा किल्ले आहेत; पैकीं अंकई, चांदवड व धोडप हे मुख्य होत. हे सर्व किल्ले बहुधां सारखेच आहेत. हे बहुतेक शिवाजीनें बांधले आहेत. मार्कंड हा किल्ला राष्ट्रकूटांच्या वेळेस होता.

लोकवस्तीः—यांत १० शहरें व १६४९खेडीं आहेत. लो. सं.(१९२१) ८३२५७६. १९०१ सालीं लो सं. दुष्काळामुळें कमी झाली. मुख्य शहरें नाशिक, मालेगांव, येवला, इगतपुरी, सिन्नर, मनमाड, नांदगांव व त्रिंबक हीं असून येथील मुख्य भाषा मराठी आहे. या जिल्ह्यांत ब्राह्मण, मराठे, कुणबी कोळी, भिल्ल, वंजारी, माळी, ठाकूर, वारली, तेली, महार, वगैरे मुख्य जाती असून शेंकडा ५९ लोक शेतकी, ९ मजूरी, व २ भिक्षा मागून उपजीविका करतात. येथील जमीन ४ प्रकारची आहे.तीः–(१)नदीकांठची (लालसर काळी माती),(२) उंच प्रदेशांतील (हलकी काळी माती),(३) घाटाशेजारची (पिंगट माती) व (४) सर्वांत सुपीक अशी लालसर माती) खताचा उपयोग बगीच्यांत करतात.येथें बहुतेक रयतवारी पद्धति आहे पण कोठें कोठें इनाम जमिनीहि आहेत. मुख्य पिकें बाजरी, गहूं, ज्वारी, तांदूळ, नागली, कुळीथ, तूर, हरभरा, गळिताचीं धान्यें, कापूस (मालेगांव ), तंबाखू, ऊंस, वगैरे. बगांत द्राक्षें, पेरू, बटाटे, मुइमुग, विड्याचीं पानें होतात. एकाच शेतांत अनुक्रमें नाचणी, साव व खुरासणी पेरतात. तीन वर्षांनंतर जमीन पडीत ठेवितात. येथें रेड्यांकडूनहि शेतीचें काम करवितात. येथें बकऱ्यांचे गैराणी व हराणी असे दोन प्रकार आहेत.

कालवेः—या जिल्ह्यांत कदवा नदी व परसुल तलाव यांचे कालवे आहेत, त्यांपैकीं पहिला कालवा ६३ चौरस मैल जमिनीला पाणी पुरवीत असून यांत दिंडोरी व निफाड येथील पालखेड कालव्याचा समावेश होतो. येथील विहिरी ६ ते ३२ फूट खोल असतात.

जंगलप्रदेशः–याचे तीन वर्ग आहेतः–गिरणा, गोदावरी व पेठ. रक्षित जंगलाचे खुरटें जंगल, इमारती लांकडाचें (साग), सर्व काळ हिरवें असणारें व बाभळींचें जंगल असे ४ प्रकार आहेत.

व्यापारः—येवलें येथें सुती, रेशमी व जरीचें कापड तयार होऊन बाहेर जातें. मालेगांव व विंचूर येथें हातमागावर कांहीं कापड होतें. नाशिक येथें पितळ, काशें, चांदी वगैरे धातूंचीं फारच उत्तम भांडीं तयार होतात.

निर्गत मालः—धान्य, गळिताचीं धान्यें, काकवी, रेशमी व सुती कापड, सण–ताग, तांबें, पितळेचीं व चांदीचीं भांडीं, कांदे, विड्याचीं पानें व लसूण.

आयात मालः—कच्चें रेशीम, सूत, तांबें व पितळ, साखर, किरकोळ सामान, व मीठ. दर आठवड्याला बाजार भरतो व नाशिक व त्रिंबक येथें यात्रा भरतात. येथें फार दूरदूरची मंडळी यात्रांनां येतात.

स्थानिक व्यापाराचीं शहरेंः—इगतपुरी, नाशिक, लासलगांव, नांदगांव, मनमाड, येवला, चांदवड, मालेगांव वगैरे.

नाशिक जिल्ह्यांत ग्रेट इंडियन पेनिशुला रेल्वे, दौंड-मनमाड रेल्वे व हैद्राबाद गोदावरी व्हॅली रेल्वे हे तीन आगगाडीचे मार्ग आहेत. याशिवाय ५७० मैल लांबीचा बैलगाडीचा रस्ता आहे.

दुष्काळः—१३९६ ते १४०७ मध्यें दुर्गादेवीचा दुष्काळ पडला होता. या दुष्काळाला अजून लोक विसरले नाहींत. १४६०, १५२० व १६२९ या सालीं साधारण दुष्काळ पडले. इ. स. १७९१–९२ त फिरून मोठा दुष्काळ पडला. तो पेशव्यांनीं धान्याची निर्गत बंद करून व अन्य तऱ्हांनीं कसा तरी बंद केला. स. १८०२–४ त पेंढारी लोकांमुळें अर्धा शेर गहूं ११ आण्याला विकत मिळे. १८९६–९७त फिरून थोडया प्रमाणांत दुष्काळ पडला. स. १८९९ त पाऊस मुळींच पडला नाहीं. इ. स. १८९९–१९०० त वाजवीपेक्षां ३१८९० मनुष्यें जास्त मेलीं. या दुष्काळाचे परिणाम कमी करण्याकरितां एकंदर खर्च ४५ लक्ष ( यांत ११०८ लक्ष साऱ्याची सूट सुद्धां धरली आहे ) झाला महायुद्धाच्या वेळचा दुष्काळ सर्वत्र सारखाच जाणवला.

कारभारः—जिल्ह्यांत १२तालुके आहेत तेः—नाशिक, सिन्नर, इगतपुरी, दिंडोरी, निफाड, चांदवड, येवला, नांदगांव, मालेगांव, बागलाण, कळवण, व पेठ. येथील कलेक्टर हा सुरगणा संस्थानचा पोलिटिकल एजंट असतो. स. १८१८ त थोडा होळकरांनीं इंदूरजवळच्या भागाऐवजीं दिलेल्या व पेठच्या बेगमेकडून आलेल्या भागांमुळें नाशिकचा विस्तार झाला. १८१८ सालीं नाशिकचा भाग अहंमदनगराकडे तोडून दिला होता, परंतु स. १८६९ त नाशिकची सध्या आहे तशी विभागणी केली. इतर जिल्ह्यांच्या मानानें येथें शिक्षण मागें असे. इ. स. १९०१ त याचा शिक्षणाच्या बाबतींत २४ वा नंबर लागला होता. एकंदर शेंकडा ४.३१ लोकांनां लिहितां वाचतां येत होतें. अलीकडे मात्र वाढ होत चालली आहे.

तालुका.—नाशिक जिल्ह्यांतील तालुका. क्षेत्रफळ ४७० चौरस मैल यांत ३ शहरें व १३४ खेडीं आहेत. तालुक्याची लोकसंख्या (१९१७) ११४८१७. याचा पश्चिमेकडील भाग डोंगराळ आहे. यांतील जमीन सुपीक नाहीं. येथील हवा बरी आहे. पाण्याचा पुरवठा सह्याद्रीशेजारीं खेरीजकरून सर्वत्र चांगला आहे.

शहर.—मुंबई, नाशिक जिल्हा. ग्रेट इंडियन पेनिन्सुला रेल्वेवरील नाशिकरोड स्टेशनाच्या वायव्येस ४ मैलांवर गोदावरी नदीच्या कांठीं, उत्तर अक्षांश २०° व पूर्व रेखांश ७३° ५१' यांवर हा गांव वसलेला असून नाशिक जिल्ह्याचें हें मुख्य ठिकाण आहे. क्षेत्रफळ ३५७ एकर असून लोकसंख्या ( १९११ ) ९४६३ आहे. नाशिक गांव गोदावरीच्या दोन्ही तीरांवर वसलेला असून डाव्या किंवा पूर्वेच्या तीरावर पंचवटी क्षेत्र आहे व उजव्या तीरावर दक्षिणेच्या अंगास जुनें गुलशनाबाद अथवा मुसुलमानी नाशिक आहे, व याच्या उत्तरेस नवें मराठी नाशिक आहे. यापैकीं सर्वांत महत्त्वाचें जुनें मुसुलमानी नाशिक ही हिंदूंची फार जुनी वसाहत असून तिचा भर्हुत येथील चैत्यावरील शिलालेखांत ( ८७ ) व पांडव लेण्यांतील १९ व २१ या शिलालेखांत उल्लेख आलेला आहे. याच्या आसपास नऊ टेंकड्या असून याचें मूळ नांव नवशिख असावें. येथील हवा निरोगी व सुखकर आहे. येथें उन्हाळा फारसा होत नाहीं व पश्चिमेकडील वारा नेहमीं वहात असतो. पाऊस सरासरी २९ इंच पडतो. उष्णतेचें मान सरासरी ७४° आहे.

येथें वकील, जमीनदार, भिक्षुक, व्यापारी, सावकार, कांसार, वगैरे सर्व धंद्यांचे लोक आहेत. येथें बरींच घरें दुमजली असून दगडी चौथऱ्यांवर आहेत. आदितवार पेठेंतील व पुलावरील वस्ती चांगली असून तींतच पेशव्यांचे वाडे आहेत. येथील पुष्कळ घरांवर लांकडी खोदकाम असून तें फार सुबक आहे. जरी या शहरासभोंवती तट नव्हता तरी कांहीं वेशी आहेत. नाशिक हें वऱ्हाड–मध्यप्रांत आणि समुद्रकिनारा यांच्या मध्यावर असल्यामुळें येथें फार प्राचीन कालापासून व्यापार चालत असे. मुसुलमानी अमदानींत काझीपुरा व उर्दूबाजार या व्यापारी पेठा होत्या, पेशवाईमध्यें तिवंधा अथवा चौकामध्यें सर्व घडामोड चालत असे. परंतु हल्लीं मोठ्या सडकेवर व पुलाजवळ मुख्य दुकानें आहेत. येथें सर्व प्रकारच्या मालाची विक्री चालते.

नाशिक येथें सर्व जिल्हाधिकारी रहातात. येथें म्युनिसिपालिटी, दवाखाना, तुरुंग, ३ हायस्कुलें व बऱ्याच मराठी शाळा आहेत. शिवाय एक मुलींची इंग्रजी शाळा आहे. १९२४ सालीं एक आर्ट्स कॉलेज निघालें. येथें प्रवाशांकरितां दोन बंगले आहेत.

येथील म्युनिसिपालिटीची स्थापना १८६४ सालीं झाली असून १८७४ सालीं तिला शहरम्युनिसिपालिटी करण्यांत आलें. पाणी बहुतेक गोदावरीचेंच वापरतात. याखेरीज धोंडो महादेवाच्या हौदाचें पाणीहि चांगलें असून पिण्याकरितां नेतात. येथील गटारांची वगैरे व्यवस्था असावी तितकी चांगली नाहीं.

देवळेंः—येथें एकंदर जवळ जवळ ६० देवळें आहेत; यावरून यास पश्चिम काशी असें म्हणतात. येथें जैनांचा आठवा तीर्थंकर चंद्रप्रभसूरि याचें कुंतिविहार नांवाचें देवालय असल्याबद्दलचा प्रथम उल्लेख जिनप्रभसूरि या जैन ग्रंथकारानें १४ व्या शतकांत केला आहे. सांप्रत याचा कोठें मागमूस लागत नाहीं. यानंतर १६८० सालीं अवरंगझेबाच्या दक्षिणेंतील सुभेदारानें आदितवार पेठेंतील सुंदरनारायण व उमामहेश्वर आणि पंचवटींतलि रामजी व कपालेश्वर वगैरे २५ देवळें पाडल्याबद्दलचा उल्लेख आढळतो. जुन्या गढीवरील महालक्ष्मीच्या देवळाची त्यानें जामामशीद बनविली. हल्लींचीं बहुतेक मोठालीं देवळें पेशवाईमध्यें बांधलीं आहेत. यांपैकीं बहुतेक पेशव्यांच्या कुटुंबांतील माणसें, त्यांचे नाशिक येथील प्रतिनिधी राजेबहाद्दर व नारोशंकर, ओक, चंद्रचूड वगैरे सरदार, अहिल्याबाई होळकर वगैरेंनीं बांधलेलीं असून पुष्कळांनां वर्षासनें वगैरे आहेत.

शिल्पकामाच्या दृष्टीनें पंचवटींतील रामाचें देऊळ, नारोशंकराचें देऊळ व सुंदरनारायणाचें देऊळ हीं उत्तम आहेत. पैकीं रामाचें मंदिर पण साधें आहे. नारोशंकराचें लहान असून त्याचें नक्षीकाम सुंदर आहे व सुंदरनारायणाचें देऊळ दोन्ही दृष्टींनीं मध्यम आहे. शहराच्या आसपास निरनिराळीं तीर्थें व कुंडें आहेत. नाशिक आणि गोवर्धन गंगापूर यांच्या दरम्यान गोवर्धन, पितृ, गालव, ब्रह्म, ऋणमोचन, कण्व अथवा क्षुधा, पापनाशन, विश्वामित्र, श्वेत, कोटि व अग्नि अशीं अकरा कुंडें आहेत. यांखेरीज वद्रिकासंगम, शुक्लतीर्थ, अस्थिवलय, सूर्य, चक्र, अश्विनी, अहिल्यासंगम वगैरे अनेक तीर्थें व कुंडें आहेत. गोदावरीनें सान्निध्य व तिला येऊन मिळणारे अरुणा, वरुणा, सरस्वती, इ. फांटे, त्याप्रमाणेंच ब्रह्म व अस्थिवलय हीं कुंडें व विशेषतः राम, सीता व लक्ष्मण यांचें वास्तव्य, या सर्व गोष्टींमुळें नाशिक हें फार पवित्र क्षेत्र मानलें गेलें आहे.

येथील सर्वांत पवित्र तीर्थ म्हणजे रामकुंड हें होय. येथें नेहमीं व विशेषतः सिंहस्थामध्यें हिंदुस्थानांतील सर्व भागांतून यात्रेकरू येतात. येथील क्षेत्रोपाध्यायाजवळ इतर क्षेत्रांप्रमाणें यजमानांच्या नांवांच्या चोपडया असतात यात्रेकरू येथें तीर्थविधि, गंगापूजा, नगरप्रदक्षिणा, वगैरे करून कपालेश्वर, काळाराम, सीतागुंफा, तपोवन इ. स्थळें पाहून यात्रा संपवितो. येथील मुसुलमानांच्या काळचे अवशेष म्हटले म्हणजे जुनी गढी, दिल्ली दरवाजा, काझीपुरा दरवाजा, जामामशीद, पीरजादची कबर व इतर लहानसहान २२ मशीदी हे होत. जोगवाडा पेठेमध्यें दरग्याजवळ मदीना येथील सय्यद सादशहा हुसेन कादरी सरमस्त याची कबर असून तेथें फाल्गुन व॥ पंचमीस उरूस भरतो.

इतिहासः—नाशिक शहरास कृतयुगामध्यें पद्मनगर, त्रेतायुगांत त्रिकंटक, द्वापरयुगांत जनस्थान आणि कलियुगांत नवशिख अथवा नाशिक अशीं नांवें होतीं. यांपैकीं जनस्थानाचा रामायणांत उल्लेख आहे. येथें राम रहात असून त्याच्याशीं संबंध असलेली तिउंधा, पंचवटी, सीतागुंफा, तपोवन, शूर्पनखेचें नाक वगैरे स्थानें दाखविण्यांत येतात. नाशिक या शहराचा नासिक्य (महाभाष्य ६.२६) या नांवानें पतंजलीनें उल्लेख केलेला आहे. त्यानंतर जबलपूरच्या ईशान्येस भर्हुत येथील स्तूपामध्यें एका कठडयावरील शिलालेखांत नाशिक शहराचा उल्लेख आहे (ख्रिस्तपूर्व २००). त्यानंतर पांडव लेण्यांमधील १८ व १९ या शिलालेखांत नाशिकचा उल्लेख (ख्रिस्तपूर्व १२५-१००) आढळतो; त्यावरून त्या कालीं नाशिक येथें व्यापारी श्रेणी (पेढ्या) असून नाशिक हें तेव्हांपासून भरभराटींत आहे असें दिसतें. टॉलेमीनें (इसवी सन १५०) नासिका या नांवानें याचा उल्लेख केला आहे. वराहमिहिराच्या बृहत्संहितेंत नाशिक हें नांव आढळतें. १४ व्या शतकाच्या आरंभीं जिनप्रभसूरि यानें याचें एक अध्यायभर वर्णन आपल्या तीर्थांच्या वर्णनांत केलेलें आहे.

१४ व्या शतकामध्यें नाशिक, दिल्लीचा दौलताबाद येथील सुभेदार याच्या सत्तेखालीं होतें; तें पुढें बहामनी राजांच्या हातीं गेलें. पुढें तें अहमदनगरच्या राज्यांत मोडत असे व त्यांच्यापासून पुढें मोंगलांनीं घेतलें. एका मुसुलमान सुभेदारानें याचें नांव गुलशनाबाद असें ठेविलें होतें पण हें पेशव्यांच्या ताब्यांत (१७५१-५२) गेल्यावर त्याचें पूर्वीचें नाशिक हें नांव पुन्हां प्रचारांत आलें. १७६०-६१ मध्यें नाशिक हें मराठ्यांचें एक मोठें शहर होतें व गोपिकाबाईनें येथें बरींच देवळें व कुंडें बांधलीं. राघोबादादानें गेथून जवळच असलेल्या चौंधस या गांवाचें आनंदवल्ली (पहा) असें नांव ठेवून तेथें एक वाडा बांधला. १७९० तील कागदपत्रांवरून नाशिक हा संगमनेर सुभ्यांतील एक महाल असून त्याचें उत्पन्न १६७७६० रुपये होतें. इ. स. १८०३ मध्यें अमृतरावानें नाशिक लुटलें. १८१८ त नाशिक येथील सैन्य त्रिंबकेश्वरावर गेलें. व नाशिक शहर ब्रिटिशांच्या ताब्यांत आलें. १८४३ सालीं यूरोपियनांनीं येथें एक गाय मारल्यामुळें दंगा झाला होता.

नाशिकच्या पश्चिमेस ६ मैलांवर व आनंदवल्लीच्या पश्चिमेस ३ मैलांवर गोदातीरीं गोवर्धन-गंगापूर नांवाचें खेडें आहे (पहा). नाशिकच्या दक्षिणेस ५ मैलांवर अंजनेरी त्रिंबक टेंकड्यांपैकीं तीन अलग टेंकड्या असून त्यांपैकीं पूर्वेकडील नाशिकपेक्षां १०६१ फूट व समुद्रसपाटीपासून ३००४ फूट उंच असून तीमध्यें जुनीं (ख्रि. पू. २५० ते ६०० इसवी) बौद्ध लेणीं आहेत. त्यांनां 'चांभारलेणीं' (पहा) असें म्हणतात [इं. गॅ. पु. १८; ग्रँट डफ; वेरिंग्स मराठाज; बर्टिन्स टॉलेमी, मुं. गॅ. (नाशिक जिल्हा) १६; वि. विस्तार. पु. २१; इं. अँ. पु. २२.]

**नासत्य**—अश्विनीकुमार. 'अश्विन्' लेख व वेदविद्या (पृ. ३२७-३२९) पहा.

**नासापुटपार्श्वग्रंथि**—या बारीक गांठी बहुधां लहान मुलांच्या नाकपुड्यांच्या आंत घशाशीं संबंध असणारीं छिद्रें असतात तेथें वाढतात व त्यांच्या मऊ व भुसभुशीत अशा गुठळ्या असतात. त्यामुळें श्वासमार्गांतून पुरेशी शुद्ध हवा जाण्यास जो थोडा प्रतिबंध होतो त्यामुळें फुफ्फुसें हवेनें नीट भरलीं जात नाहींत व म्हणून छातीचा आकारहि चिंचोळा बनतो. यामुळें त्या श्वासनलिकेच्या मुखाशीं नेहमीं सर्दीनें श्लेष्मोत्सर्जन चालू असतें व ती श्लेष्मायुक्त सर्दी कानाच्या अंतःच्छिद्रांत जाऊन अर्धवट अथवा पूर्ण बहिरेपणाहि उत्पन्न करते. त्यामुळें तर कधीं दमा सुद्धां उसळतो. अशा रोग्यांचे गलपिंडहि बहुधां मोठाले असतात. मुलाचा चेहरा बहिरेपणामुळें जड, मंद, बुद्धिशून्य असा दिसतो व त्यामुळें त्याची बौद्धिक व शारीरिक वाढ खुंटल्याप्रमाणें होते, आवाज जड, किंजरा अगर घोगरा होतो. सुसत्या डोळ्यांनीं

( रोग्यानें तोंड उघडलें असतां ) घशाच्या मार्गे दाणेदार लाली मात्र दिसते, पण प्रत्यक्ष गांठी दिसत नाहींत, टाळूस रोगामुळें छिद्र पडलें असल्यास दिसतात. घशांतून बोट घालून तें वर वळविलें असतां त्या गांठीं बोटांस लागतात व हें तपासणें मूल दिल्याशिवाय अंमळ त्रासदायकच असतें. गलग्रंथी कापण्यासाठीं शस्त्रक्रिया करतांना मूल दिल्यावर याहि गांठी बोटास लागल्यास कापून काढितात व शिवाय गलग्रंथी काढतातच. या रोगाचें निदान, शोध, चिकित्सा व अस्तित्व यांचा शोध अलीकडेच लागला आहे. सर्वच मुलांच्या या गांठीवर शस्त्रक्रिया करावी लागते असें नाहीं. पण मुलाचें तोंड जर नेहमीं उघडें रहात असेल व मूल रात्रीं अतिशय घोरत असेल आणि जर त्यास सदा शेंबूड असून बहिरेपणा व तोंडवळा अर्थशून्य, बुद्धिमांद्यसूचक दिसत असेल तर हा रोग आहे किंवा नाहीं हें नीट तपासून जरूर तर शस्त्रक्रिया करणें हाच उत्तम मार्ग आहे व अलीकडे ही शस्त्रक्रिया बरीच प्रचारांत येऊन तिच्यापासून फायदा झालेलीं मुलें पुष्कळ नजरेस येतात. शस्त्रक्रियेनंतर त्या मुलास श्वसनेंद्रियें मजबूत होण्यास श्वसनव्यायाम करण्यास शिकवावें व त्याची, तोंड मिटून नाकांतून श्वास घेण्याची संवय मोडलेली असते ती पुन्हां सुरू केली पाहिजे. म्हणजे त्याची फुफ्फुसें हवेनें नीट भरून छाती रुंद होऊं लागते. या व्यायामाचा उपयोग अगोदरच केल्यास शस्त्रक्रियेचीहि गरज एखाद्या वेळेस भासत नाहीं. शस्त्रक्रिया करणेंच असेल तर ती अति कडक हिंवाळा पडला असतां अथवा मोठे वारे सुटले असतांना करूं नये. शस्त्रक्रिया आटोपल्यावर लागलीच मुलास गाडींत घालून त्यास हिंडावयास पाठवूं नये, तर त्यास अंथरुणांत पडून कांहीं दिवस विश्रांति घेऊं द्यावी. या शस्त्रक्रियेंत कापाकापी व दुःख फारसें नसतें असें जरी आहे तरी क्लोरोफार्म वगैरे औषधांनीं नीट मूल आणल्याशिवाय ती करूं नये. या रोगाचें कारण, वाढ व उत्पत्ति याचें साम्य वाढलेल्या गलग्रंथिरोगाशीं बरेंच आहे व त्या दोहोंसहि प्रथमचे उपाय म्हटले म्हणजे स्वच्छ हवा, व्यायाम, पौष्टिक अन्न व कॉडलिव्हर तेल इत्यादिकांनीं प्रकृति सुधारावी, म्हणजे हे रोग बहुधा कमी होतात. ते कमी नच झाल्यास शेवटीं शस्त्रक्रिया हा उपाय आहेच. कोणी याचा क्षयरोगाशीं संबंध आहे असें प्रतिपादन करतात. याचे शस्त्रक्रियादि चिकित्सा विषयावरील शोध मेयर नांवाच्या कोपनहेगन येथील डॉक्टरनें लाविले. मूल वयांत आल्यावर या गांठीं क्वचित प्रसंगीं लहान होतात. या रोगापासून होणारी सर्दी कानांत जाऊन कानांत ठणका, पू वगैरे उत्पन्न होण्याचा पुष्कळ संभव असतो. म्हणून शस्त्रक्रियेनें अगर अन्य उपायांनीं या सर्व अनर्थांचें मूळ लवकर नाहींसें करणें हाच मार्ग उत्तम आहे

**नासिर उद्दीन, तूसी ख्वाजा** (१२०१–१२७४)–एक प्राचीन इराणी पंडित, तत्त्ववेत्ता व ज्योतिषी. चेंगीजखानाचा नातु हुलाकूखान याचा हा नौकर, तूस (खोरासान) गांवीं सन १२०१ त याचा जन्म झाला. हा शिया पंथाचा असून बहुतेक विषयांवर त्यानें लिहिलेलें असून सांप्रतहि त्याचे कांहीं ग्रंथ इराणांतील विद्यापीठांतून शिकविले जातात. हा ग्रीक भाषाभिज्ञ होता. यानें युक्लिडचें अरबी भाषांतर केलें असून त्यांतील कांहीं सिद्धांत यानें ३१३ व ४१४ निरनिराळ्या रीतींनीं सोडविले आहेत. भूमिति, ज्योतिष, तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र वगैरे विषयांवर त्यानें ग्रंथ रचिले. अल्लाउद्दीन महम्मद नांवाच्या नवाबानें याला आपला वझीर केलें होतें. याच वेळीं याचा नीतिशास्त्रावरील प्रख्यात ग्रंथ 'अखलाक नासिरी' तयार होऊन त्यानें तो देशचा सुभेदार नासिरुद्दीन यास अर्पण केला. नसीरच्या सांगण्यावरून हुलाकूनें बगदाद घेतलें ( १२५८ ). सुफी मतावर यानें दोन टीका लिहिल्या होत्या. खिलाफतनामा व मसरउस शोहरा वगैरे दुसरेहि याचे ग्रंथ आहेत. हुलाकूच्या मुलाच्या कारकीर्दीत नासिर मेला ( १२७४ ). हा स्वभावानें क्रूर होता व त्यानें कैद्यांवर अत्याचार केले होते. [ अल–मुस्तीसाम बिल्लाह ].

**नासिरखुश्रु** ( सन १००४–१०८८ )—अबु मुमुद्दिन नासिर बिन खुश्रु हा इराणचा पहिला कवि खोरासान मधील कुबादियान येथें जन्मला. पहिल्या ४२ वर्षांचा त्याचा वृत्तांत सांपडत नाहीं. तो सुनी होता असें मानण्यास त्याच्या लेखांत बराच पुरावा आहे. वैद्यक, गणित, ज्योतिष ह्यांमध्यें तो पूर्ण पारंगत होता, त्याला अरबी, तुर्की, हिंदुस्थानी, सिंधी भाषा चांगल्या अवगत होत्या. तो बराच विषयासक्त व मद्यपानी असे. तो म्हणतो त्याप्रमाणें त्याला एकदां स्वप्नांत ईश्वरी प्रेरणा झाली तेव्हां त्यानें सर्व सुखोपभोगांचा त्याग करून तो मक्का व मदिना येथें यात्रेस निघाला. या प्रवासाची साद्यंत हकीकत त्यानें आपल्या 'सफरनामा' नामक ग्रंथांत दिली आहे. यांत ११ व्या शतकांतील मुसुलमानांची स्थिति वर्णन केली आहे ती फारच विश्वसनीय आहे व या दृष्टीनें हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. नासिर चार वेळां मक्केस गेला होता. नंतर कैरोकडे जेव्हां त्याचें लक्ष गेलें; त्यावेळीं तेथें पूर्ण शांतता नांदत होती; तेथें शिया पंथ प्रचलित होता. नासिरखुश्रु याला तेथील शिया पंथ पसंत पडून तो त्याचा अनुयायी बनला व खोरासानला परत येऊन तो आपल्या नवीन मतांचा प्रसार करूं लागला. परंतु सुनी लोकांच्या जाचामुळें त्याला देशत्याग करावा लागला. त्यानें आपलें राहिलेलें आयुष्य बदकशान पर्वतांतील यंगानमध्यें फकीर वृत्तींत घालविलें. तेथें त्याला पुष्कळ अनुयायी मिळून शिया पंथाचा प्रसार झाला.

**नासीरजंग**—निझामुल्मुल्क असफजाहचा हा दुसरा मुलगा. असफजाहानें याला दख्खनच्या कारभारावर नेमून आपण माळव्याकडे प्रयाण केलें होतें ( १८३७ ). बाप

तिकडे गेल्यावर याचा दिवाण शहा नवाजखान याच्या सल्यानें नासीरनें बापाविरुद्ध बंड उभारलें; त्यामुळें असफजाह परत दख्खनमध्यें आला. इकडे दिल्लीच्या बादशहानें मराठ्यांनां कबूल केलेली जहागीर नासीर त्यांनां देईना म्हणून थोरल्या बाजीरावानें त्याच्यावर स्वारी करून पुष्कळ दिवस त्याला त्रास दिला; तेव्हां त्यानें मुंगीपैठणास तह करून ठरलेली जहागीर व युद्धखर्च पेशव्यांच्या हवाली केला ( १७४० फेब्रुवारी ). इतक्यांत असफजाह नासीरवर चालून आला व त्यानें या कामीं मराठ्यांची मदत घेतली; नानासाहेब पेशव्याचा मान निजामानें यावेळीं फार ठेवला. प्रथम नासीर बापास शरण गेला परंतु असफजाहचें समाधान झालें नाहीं म्हणून पुन्हां नासीरनें मुल्हेरचा किल्ला घेऊन बंड केलें. शेवटी औरंगाबादेस बापलेकांत युद्ध झालें ( २३ जुलै १७४१ ). त्यांत नासीर फार शौर्यानें लढला. त्यानें बापाच्या हत्तींचे तीन माहूत मारून बापावर हल्ला केला. परंतु पुढें असफजाहनें नासीरला पकडलें व त्याचा प्राण घेण्याचें ठरविलें, परंतु सय्यद लष्करखान नांवाच्या सरदारानें असफजाहची समजूत करून नासीरचा जीव वाचविला ( १७४१ ). त्यामुळें पुढें सय्यदवर नासीरची फार मर्जी असे. असफजाहनें नासीर यास कांहीं दिवस खंदार येथें कैदेंत ठेविलें परंतु पुढें ( १७४३ जानेवारी ) त्यास सोडून दिलें.

कर्नाटकांत पेशव्यांच्या विरुद्ध बिदनूरकर, सोंधकर वगैरे पाळेगार धंडाळी माजवीत असतां त्यांनां नासीरनें मदत केली. म्हणून पेशव्यांनीं प्रथम पाळेगारांचा पराभव करून मग नासीरवर स्वारी केली व त्याचाहि पराभव केला; तेव्हां त्यानें आसुंबरी येथें तह केला ( १७४८ मार्च ).

पुढें असफजाह मेला; त्याला नासीर हा आवडत नसे; त्याचें प्रेम मुज्फरजंग नांवाच्या त्याच्या नातवावर( मुलीच्या मुलावर ) होतें. त्यानें आपल्या पश्चात मुज्फरला निजामी देण्याचें ठरवून त्यावद्दल बादशहाची मंजुरीहि मिळविली होती. परंतु त्याच्या मृत्यूच्या वेळीं तो विजापुरास सुभेदार असून जवळ एकटा नासीर होता ( १७४८ मे ). निजाम मेल्यावर नासीरनें फौज आपल्यास अनुकूल करून बापाची गादी बळकाविली व स्वतःस नवाब निजामुद्दौला ही पदवी घेतली ( जून ).

ही बातमी ऐकून मुज्फरजंग हा सातार्‍यास मराठ्यांची मदत मागण्यास आला. तेथें चंदासाहेब कैदेंत होता; त्याची व याची गट्टी जमून दोघांनीं परस्परांस साहाय्य करावयाचें ठरविलें. चंदासाहेब सुटल्यावर त्याला मुज्फरनें मदत केली व आपण स्वतः दक्षिणची सुभेदारी धारण केली; आणि फ्रेंचांच्या साहाय्यानें नासीरवर स्वारी करण्याची तयारी चालविली. हें वर्तमान ऐकतांच नासीरनें मराठ्यांची मदत घेतली ( १७४९ फेब्रु. ). पेशव्यानीं जानोजी भोंसल्यास १० हजार फौजेसह नासीरकडे पाठविलें. नासीरनें या वेळीं मुरारराव घोरपडे व कर्नूल, कडाप्पा, सावनूर, कर्नाटक येथील नवाब या सर्वांच्या मदतीनें मुज्फरवर स्वारी केली ( सप्टेंबर ); आणि मुज्फरचा पराभव करून त्याला कैदेंत ठेविलें.

त्यावर डुप्लेनें नासीरच्या ताब्यांतील जिंजी घेतली; तेव्हां नासीरनें त्याच्यावर स्वारी केली. त्या स्वारींत फ्रेंचांच्या कारस्थानांनीं दंगा होऊन नासीरच्या एका नोकरानें त्याचा खून केला असें म्हणतात ( ५ डिसें. १७५० ). त्याच्या मागून फ्रेंचांनीं मुज्फरजंगास निजाम केलें. फ्रेंचांनीं नासीरचा दिवाण रामदासपंत यास फितूर करून कडपेकर नवाब महंमदखान याच्याकडून नासीर यास गोळी घालविली असें ग्रँटडफ म्हणतो. नासीरमध्यें बापासारखा दूरदर्शीपणा नव्हता. तो विषयासक्त पण शूर व उदार होता. काव्य व वाङ्मयाची त्यास आवड होती, त्यानें कांहीं लेख लिहून ठेविले आहेत असें म्हणतात. त्याचा मित्र बेलगांवचा मीर गुलाम यानें त्याची हकीकत लिहिली आहे. [ पुरंदरे रोजनिशी; पेशवे शकावली; ब्रह्मेंद्रचरित्र; का. इ. सं. ले. ४९, ६८; नानासाहेबांची रोजनिशी; राजवाडे खंड ३, ६. ]

**नॉस्ट थॉमस** ( सन १८४०-१९०२ )—अमेरिकन विनोदी चित्रकार ( कॅरिकेचरिस्ट ). हा एका लष्करी बँडमधील संगीतज्ञाचा मुलगा जर्मनींत जन्मला. अमेरिकेंत चित्रकलेचें शिक्षण घेऊन १५ व्या वर्षी यानें वर्तमानपत्रांत चित्रें काढण्याची नोकरी धरली. १८६० सालीं 'न्यू यॉर्क इलस्ट्रेटेड न्यूज'या पत्राला चित्रें पाठविण्याकरितां तो इंग्लंडांत गेला. नंतर तो इलस्ट्रेटेड लंडन न्यूज पत्राच्या चित्रांकरितां इटलींत गेला. १८६२ सालीं अमेरिकेंतील सिव्हिल वॉरच्या विरुद्ध असलेल्या लोकांसंबंधीं ' शांतता ' हें त्याचें विनोदी चित्र फार महत्वाचें होतें. १८७३, १८८५, व १८८७ मध्यें त्यानें युनायटेडस्टेट्समध्यें हिंडून व्याख्यानें दिलीं. अमेरिकेंतील रिपब्लिक पार्टी, डेमोक्रॅटिक पार्टी वगैरे राजकीय पक्षांसंबंधींचीं त्याचीं चित्रेंहि फार परिणामकारक असत. प्रेसिडेंट जॉन्सनवर त्यानें विनोदी चित्रांच्या योगानें तीव्र हल्ला केला. प्रे. रूझवेल्टनें त्याला इक्वेडर देशांत गायक्विल येथें कॉन्सल-जनरलची नोकरी देऊन पाठविलें व तेथेंच तो मरण पावला. यु. स्टेट्समधील डेमोक्रॅटिक पक्षाचें चिन्ह गाढव व रिपब्लिकन पक्षाचें चिन्ह हत्ती त्यानें रूढ केलें होतें. शिवाय त्यानें चालू राजकारणावर विनोदात्मक चित्रें म्हणून शेक्सपियरच्या नाटकांतील प्रवेशांचा उपयोग आवश्यक फेरफार करून करण्याचा प्रघात रूढ केला.

**नास्तिक्यवाद**—न+अस्ति म्हणजे ईश्वर, आत्मा, स्वर्ग, नरक, मोक्ष, पुनर्जन्म वगैरे प्रत्यक्ष न दिसणार्‍या गोष्टी नाहींत असें म्हणणाराला नास्तिक असें म्हणतात. हा शब्द पुष्कळ निरनिराळ्या अर्थांनीं वापरतात. एका धर्माचे किंवा एका पंथाचे कट्टे अनुयायी इतर धर्मीयांना

किंवा पंथीयांनां हा निंदाव्यंजक शब्द योजतात. मूर्तिपूजाहीन असा ख्रिस्ती धर्म स्थापन झाला तेव्हां रोमनसाम्राज्यांतील जुन्या मूर्तिपूजक धर्मांचे अनुनायी ख्रिस्ती लोकांनां नास्तिक म्हणून नष्ट करण्यास उद्युक्त झाले. स्पिनोझा नामक यूरोपीय तत्त्ववेत्ता फक्त एका ईश्वराचें अस्तित्त्व मानीत असे, तरीहि त्याचा ख्रिस्ती धर्मीयांनीं नास्तिक ( ख्रिस्ती धर्माचे आचारविधी न मानणारा ) म्हणून छळ केला. दृश्य भौतिक जगाच्या आंत किंवा पलीकडे निराळें देवत्व नाहीं असें मानणारा तो नास्तिक, या अर्थानें कांहीं रानटी लोकांनां नास्तिक म्हणण्यांत येतें, कारण त्यांच्यामध्यें कोणत्याहि प्रकारच्या धर्मकल्पना नसतात अशी समजूत होती, पण वास्तविक पाहतां धर्माविषयीं मुळींच कांहींहि कल्पना नाहीं अशी कोणतीहि रानटी जात आढळत नाहीं. दुसऱ्या पक्षीं बुद्धिप्रामाण्यवाद पत्करून भौतिक जगापलीकडे देव किंवा कोणतीहि अतिमानुषशक्ति नाहीं म्हणणारे तत्त्ववेत्ते असतात. अशा नास्तिक लोकांतहि तीन पोटभेद आढळतात,तेः-(१) पक्के नास्तिक (डॉगमॅटिक ) कीं, जे ईश्वर नाहीं असें निखालस म्हणतात. ( २ ) दुसरे संशयवादी ( स्केप्टिकल ); हे लोक ईश्वराचें अस्तित्त्व जाणण्याचें मनुष्याच्या मनाला सामर्थ्य आहे, याबद्दलच अविश्वास दर्शवितात आणि ( ३ ) तिसरा प्रकार बुद्धिप्रामाण्यवादी ( क्रिटिकल ) लोकांचा. यांचें म्हणणें असें कीं ईश्वराचें अस्तित्त्व सिद्ध करण्याकरितां म्हणून जीं प्रमाणें सांगण्यांत येतात त्यांच्या यथार्थत्त्वताबद्दल ( व्हॅलिडिटी ) संशय प्रदर्शित करतां येतो. दुसऱ्या व तिसऱ्या प्रकारच्या लोकांचें म्हणणें असें असतें कीं कट्टा नास्तिक म्हणजे ईश्वर खास नाहीं असें निःशंकपणें सांगणारा इसम कोणीहि नसतो, तर सर्व नास्तिकवादी दुसऱ्या किंवा तिसऱ्या प्रकारचे असतात. पण या म्हणण्यांत अर्थ नाहीं. कारण फ्युएरबॅच, फ्लोरेन्स व ब्रॅडलॉ यांचे स्पष्ट उद्गार ईश्वराचें अस्तित्व नाकबूल करणारे आहेत. फ्यूएरबॅच् म्हणतो, " ईश्वराचें अस्तित्व नाहीं. ईश्वर नाहीं ही गोष्ट सूर्य आहे इतकीच स्पष्ट आहे व दिवस आहे इतकींच स्वयंसिद्ध आहे; शिवाय असें कीं,ईश्वर असणेंच शक्य नाहीं." फ्लोरेन्स तर याहिपेक्षां अधिक त्वेषानें म्हणतो, " ईश्वर आमचा शत्रू आहे. ईश्वराबद्दल द्वेष उत्पन्न होणें हाच शहाणपणाचा ( ज्ञानाचा ) खरा आरंभ होय. मानवजातीची खरी प्रगति होणें असेल तर नास्तिकपणा हाच तिचा पाया असला पाहिजे." ब्रॅडलॉनें होळीओकला असें बजावून सांगितलें कीं, " ' नास्तिक ' या नांवाला मनुष्यजात मान देऊं लागेपर्यंत मी सततं झगडत राहीन."

या पहिल्या प्रकारच्या म्हणजे कट्ट्या नास्तिकांविरुद्ध दुसऱ्या म्हणजे संशयवादी लोकांची अशी कोटी आहे कीं नास्तिकपणा म्हणजे 'ईश्वरद्वेष' असा अर्थ करणें म्हणजेच एक प्रकारें ईश्वराचें अस्तित्व कबूल करणें आहे;कारण ज्याचा द्वेष करावयाचा त्याला अस्तित्व असल्याशिवाय त्याचा द्वेष करणेंच शक्य नाहीं. म्हणून नास्तिक याचा ईश्वरद्वेष हा अर्थच चूक होय. तर नास्तिक मत म्हणजे ईश्वराचें अस्तित्व न जाणणें किंवा त्याबद्दल संशय प्रदर्शित करणें. तिसऱ्या प्रकारच्या लोकांचें म्हणणें जी. जे. रोमन्सकृत ' ए कॅंडिड एक्झॅमिनेशन ऑफ थीइझम ' या पुस्तकांत सुरेख व्यक्त केलें आहे.त्यांत रोमन्स म्हणतो कीं ईश्वराच्या अस्तित्वाचीं प्रमाणें रद्द ठरविणें म्हणजे विश्वोत्पत्ति व रचना याविषयींची स्पेन्सरची उपपत्ति स्वीकारणें असा अर्थ आहे. पुढें तो म्हणतो " पूर्वीचें पवित्र ईश्वरास्तिक्य मत झुगारून देऊन त्याऐवजी स्पेन्सरचें मत स्वीकारण्यास मी सिद्ध होतों त्यावेळीं माझ्या मनाला अत्यंत तीक्ष्ण वेदना होतात त्या टाळणें मला कधींहि शक्य होणार नाहीं. "

नास्तिक मताला मानवजातीचें हृदय व मन या दोहोंचा विरोध आहे. या वादाला केवळ तर्काची कसोटी लावून भागणार नाहीं तर व्यावहारिक दृष्टीनें ईश्वरास्तिक्य मताची व्यक्तीला किंवा समाजाला किती जरुरी आहे तें पाहिलें पाहिजे. फ्रेंच तत्त्वज्ञ व्होल्टेयर म्हणतो कीं, " जर ईश्वर खरोखरच नसेल तर कांहीं तरी युक्तीनें त्याला अस्तित्वांत आणलाच पाहिजे. " नास्तिक लोकांचीहि एकंदर प्रवृत्ति पाहिल्यास ते सुद्धां ईश्वरसदृश दुसरें कांहीं प्रस्थ स्वमतानुसार निर्माण करतातच.

यूरोपांत अलीकडील भौतिकशास्त्रांच्या वाढीबरोबर नास्तिक मत बळावत गेलें आहे. विश्वरचनेसंबंधाच्या कोपर्निकसच्या सिद्धांतापासून आधुनिक जडवादा ( मटेरिॲलिझम)ला सुरवात होते. बेकन,गॅसेंडी व हॉब्स यांनीं भौतिकशास्त्रांनां जोराचें चलन दिलें. लॉकनें मन व मेंदु यांच्या व्यापारासंबंधीं जडवादाला सुसंगत असें स्पष्टीकरण पुढें मांडलें. तथापि हे सर्व भौतिकशास्त्रज्ञ नास्तिक नव्हते, कारण विश्वोत्पत्तीचें व रचनेचें सर्व कोडें त्यांनां उलगडलेलें नसल्यामुळें सर्वांचें आद्यकारण ईश्वर ते मान्य करीत. फ्रेंच राज्यक्रांतीच्या सुमाराचे डिडेरॉट, हेल्वेशियस, लालान्डे, वगैरे विद्वान नास्तिक होते.सुप्रसिद्ध ज्योतिषशास्त्रज्ञ लाप्लास हाहि नास्तिक होता. त्याचें पुस्तक वाचून नेपोलियननें त्याला ईश्वराबद्दल कांहींच न लिहिण्याचें कारण विचारलें असतां तो म्हणाला, " विश्वोत्पत्ति व रचनेंत ईश्वराचें अस्तित्व जरूरच लागत नाहीं. " १९ व्या शतकांत नास्तिक मत अत्यंत जोरदार रीतीनें जर्मनींत प्रो. लुडविक्ष बुकनेर यानें आपल्या ' फोर्स ॲंड मॅटर ' या पुस्तकांत आणि प्रो. अर्न्स्ट हेकेल यानें ' रिडल ऑफ दि युनिव्हर्स ' या पुस्तकांत प्रतिपादिलें आहे. सृष्टींतील आद्य द्रव्य जड व चैतन्य ( फिजिकल व सायकिकल ) अशा दोन्ही गुणांनीं युक्त असल्याचें हेकेल मानतो व म्हणून तो स्वतःला जडवादी ( मटीरिॲलिस्ट ) तत्वज्ञानी म्हणण्यास कबूल नाहीं. तथापि जडदेहापासून स्वतंत्र निराळें मन किंवा आत्मा यांचें अस्तित्व तो कबूल करीत नसल्यामुळें त्याला जडद्वैतवादी नास्तिकच म्हटलें

पाहिजे. १९ व्या शतकांत फ्रान्समध्यें ऑगस्ट कॉम्ट यानें प्रत्यक्षज्ञानवाद ( पॉझिटिव्हिझम ) पुढें मांडला. कॉम्ट हा स्वतःला जडवादी म्हणवीत नाहीं, तथापि ईश्वराचें अस्तित्व तो मानीत नसल्यामुळें तो नास्तिकच होता. इंग्लंडांत १९ व्या शतकांत आस्तिकवादाला प्रतिकूल मतें दर्शविणारे जॉर्ज जेकब होलीओक, चार्लस ब्रॅडलॉ, जी. जे. रोमन्स, डब्ल्यू. के. क्लिफर्ड, जॉन टिन्डाल, टी. एच्. हक्स्ले व हर्बर्ट स्पेन्सर हे होत; तथापि या तत्त्ववेत्त्यांनीं पूर्ण नास्तिकवादाचा पुरस्कार न करतां अज्ञेयवाद ( ॲग्नास्टिसिझम ) प्रतिपादिला आहे.

मु सु ल मा नी ध र्म.—मुसुलमानी समाज हें अज्ञेयवाद उत्पन्न होण्याला अनुकूल क्षेत्र कधींच नव्हतें. तथापि व्यक्तिगत ( पर्सनल ) ईश्वर अमान्य करणारे लोक महंमदाच्या वेळींच मक्केमध्यें होते. इस्लामी धर्मसंस्थापनेनंतर लवकरच एक झिंदिक म्हणजे नास्तिक पंथ निघाला होता, त्याच्या अनुयायांचा अब्बासिद सुलतानांनीं छळ केल्यामुळें एक दोन शतकांत तो पूर्ण नामशेष झाला.'विश्व स्वयमेव निर्माण झालें, पृथ्वी उत्पन्न करणारा ईश्वर वगैरे कोणी नव्हता ' अशीं या पंथाचीं मतें होतीं. किताब-अल अघानी या ग्रंथांत अशा नास्तिक इसमांचीं नांवें व त्यांच्यासंबंधीं गोष्टी दिल्या आहेत. यानंतर आणखीहि तीन झिंदिक ( नास्तिक ) पंथ निघाले. आणि या पंथांशिवाय कित्येक महत्त्वाचे ग्रंथकार नास्तिक मतें प्रतिपादणारे होऊन गेले इतके कीं साधारण लोकमत असें बनलें कीं, तत्त्वज्ञानाचा ग्रंथ असला कीं त्यांत नास्तिक मतें असावयाचींच. यामुळें अनेक सुलतानांनीं असले तत्त्वज्ञानाचे ग्रंथ व मोठमोठे ग्रंथसंग्रह जाळून टाकण्याच्या आज्ञा दिल्या. अशा नास्तिक मतांचें खंडन करण्याकरितां इस्लामी वाङ्मयांत कालाम म्हणजे अतींद्रिय दैवतविज्ञान ( मेटॅफिजिकल थिऑलजी ) स्वतंत्र ग्रंथशाखा निर्माण झालेली आहे.

बौ द्ध.—बौद्धधर्मी लोक ईश्वराचें अस्तित्व मानीत नाहींत. तथापि पाश्चात्त्य भौतिकशास्त्रज्ञांच्या नास्तिक मताहून बौद्धमत फार निराळें आहे. कारण ते कर्मफळाच्या नियमालाच ईश्वराचें स्वरूप देतात. ब्रह्मजालसुत्तामध्यें बुद्धानें असें सांगितलें आहे कीं, जगाच्या आरंभीं आकाशाच्या मध्यभागीं ब्रह्मा उत्पन्न झाला, नंतर इतर देव उत्पन्न झाले. तथापि या ब्रह्मदेवापेक्षां बुद्ध अधिक श्रेष्ठ असें बौद्धधर्म मानतो. ईश्वर नाहीं, अशाबद्दल बौद्ध वाङ्मयांतील बोधिचर्यावतार वगैरे ग्रंथांत प्रमाणें दिलीं आहेत. तथापि बुद्ध ईश्वर, आत्मा, ब्रह्म वगैरे मानणारा होता, शून्यवादी नास्तिक नव्हता, असें रा. वासुदेवराव आपटे यांनीं प्रतिपादिलें आहे. (' बौद्धपर्व ', पृ. २७६ ते २८६ ).

जै न.—हा धर्मपंथहि नास्तिक मताचा समजतात; पण पाश्चात्त्य जडवादी नाहीं. सकल विश्वाचा आद्य उत्पत्तिकारण आणि अनाद्यनंत असा ईश्वर ते मानीत नाहींत. वास्तविक पाश्चात्त्यांच्या अर्थानें नास्तिक लोकांनां धर्म असत नाहीं. पण जैन लोक पाश्चात्त्य अर्थाचे नास्तिक नाहींत. ते अनेक देव मानतात व त्यांची पूजाअर्चाहि करतात. या देवांनां आयुष्य असतें व ते कर्मफलाच्या कायद्यानें बद्ध असतात त्यामुळें त्यांनाहि मरण येतेंच. जैनांचा कोणताहि देव अमर नाहीं. न्याय व वैशेषिक तत्त्वज्ञानांतील ईश्वरास्तित्वाबद्दलचीं प्रमाणें जैनांच्या स्याद्वादमंजरी, सद्दर्शनसमुच्चयावरील भाष्य वगैरे ग्रंथांत खोडून काढलीं आहेत. तात्त्विकदृष्ट्या जैन हे नास्तिक असले तरी ते स्वतःला नास्तिक म्हणवीत नाहींत आणि हिंदूंच्या प्रमाणें अनेक देवतांचीं मंदिरें व धार्मिक विधी त्यांच्यांत आहेत. यासंबंधीं अधिक विवेचन " जैन संप्रदाय " या (विभाग १४, पृ. ३२४-२५) लेखांत सांपडेल.

हिं दु.—'ना स्ति परलोकस्तत्साधनमदृष्टं तत्साक्षीश्वरो वा इति मतिर्यस्य,' म्हणजे जो स्वर्गनरक,ईश्वर, आत्मा,मोक्ष वगैरे मानीत नाहीं तो नास्तिक अशी व्याख्या आहे. परंतु सर्वदर्शनसंग्रहकार माधवाचार्य यांनीं ' वेदप्रामाण्य न मानणारे ते नास्तिक ' अशी व्याख्या करून चार्वाक, जैन व बौद्धांतील माध्यमिक, योगाचार, सौत्रान्तिक व वैभाषिक हे चार उपपंथ मिळून षड्विध नास्तिक आहेत असें म्हटलें आहे. निरीश्वरवादाला तात्त्विक आधार आस्तिक दर्शनांपैकींच न्याय व सांख्य यांचा आहे. वैशेषिकदर्शनाचा कर्ता कणाद याचें असें मत आहे कीं, जगाचें मूळ कारण परमाणू होत. हे परमाणू जसजसे एकत्र होतात तसतसे त्यांच्यांत नवे नवे गुण संयोगानें उत्पन्न होऊन निरनिराळे पदार्थ बनतात. परमाणूंखेरीज जगाचें दुसरें मूळ कारण नाहीं; म्हणजे सृष्टिकर्ता मूळ ईश्वर आहे असें कांहीं नैय्यायिक मानीत नाहींत ( कांहीं मानतात, त्यांनां ' सेश्वर नैय्यायिक ' म्हणतात ). एका निरीश्वरवादी नैय्यायिकाची अशी गोष्ट सांगतात कीं, मरणसमयीं ईश्वराचें नांव घेण्यास त्यास जवळच्या इसमांनीं सांगितलें असतां " पीलवः पालवः " = ! परमाणु परमाणु ! असे उद्गार त्याच्या तोंडांतून निघाले. दुसरें सांख्य तत्त्वज्ञान हेंहि ईश्वर मानीत नाहीं. प्रकृति व पुरुष हीं दोन मूलतत्त्वें असून त्यांपासून क्रमाक्रमानें सर्व सृष्टि निर्माण झाली असें त्याचें मत आहे.सांख्यवादी,हे आत्मे आहेत,त्यांनां पुनर्जन्म वगैरे आहे या गोष्टी मानतात पण फक्त ईश्वर मानीत नाहींत. सांख्यशास्त्राचा कर्ता कपिल याची निश्चित माहिती नाहीं, किंवा त्याचीं सांख्यशास्त्राचीं सूत्रें आज उपलब्ध नाहींत. सांख्यमताचें ज्ञान ईश्वरकृष्ण नामक विद्वानाच्या सांख्यकारिका या उपलब्ध ग्रंथावरून मिळतें. ईश्वरकृष्ण हा पक्का निरीश्वरवादी होता, हें त्याच्या " कारणमीश्वरमेके ब्रुवते कालं परे स्वभावं वा । प्रजाः कथं निर्गुणतो व्यक्तः कालः स्वभावश्च ॥ या गीतीवरून दिसतें. ही गीती हल्लीं उपलब्ध असलेल्या ईश्वरकृष्णाच्या सांख्यकारिकेंत आढळत नाहीं; पण तिच्यावर गौडपादाचें भाष्य आहे.

ही गीती निरीश्वरमताची असल्यामुळें कोणीतरी मागाहून ती सांख्यकारिकेंतून काढून टाकिली असावी, असें कै. लोकमान्य टिळक यांनीं म्हटलें आहे ( गीतारहस्य, पृ. १६० टीप ). न्याय व सांख्य यांचा निरीश्वरवाद खोडून टाकणारें वेदान्ततत्त्वज्ञान हिंदु धर्मांत सर्वत्र प्रमाण होऊन शंकराचार्यांनीं सर्व नास्तिक मतांचें व दर्शनांचें खंडन केलें आहे.सांप्रत हिंदु लोकांत जैन व हेकेल वगैरेंचें जडाद्वैत मानणारे पाश्चात्य विद्याविभूषित विद्वान यांखेरीज नास्तिक मतवादी इसम आढळत नाहींत. कारण ब्रह्मसमाज, प्रार्थनासमाज हे धर्मसुधारक पंथहि एकेश्वरवादी आहेत.

**नास्मिथ, जेम्स** ( १८०८-१८९० )—हा स्कॉटिश एंजिनियर एडिनबरो येथें जन्मला.त्यानें कॉलेजांत रसायनशास्त्र, गणित वगैरे विषयांचा अभ्यास केला, त्यास यंत्रशास्त्राची प्रथमपासून गोडी होती. त्यानें निरनिराळ्या यंत्रांचे नमुने तयार केले, व लंडन येथें एका कारखान्यांत राहून यांत्रिक कारखान्याची पूर्ण माहिती दोन वर्षांत मिळविली, आणि १८३४ सालीं मँचेस्टर येथें स्वतःचा कारखाना काढून थोडक्याच वर्षांत एका मोठ्या फाऊंड्री (ओतकामाचा कारखाना) चा तो चालक बनला. वाफेनें चालणाऱ्या घणाची ( स्टीमहॅमर ) युक्ति त्यानें काढली. त्याशिवाय प्लेनिंग-मशीन, नट-शेपिंग मशीन, स्टीम पाइल-ड्रायव्हर व अनेक प्रकारची हायड्रॉलिक मशिनरी (जलशक्तीचीं यंत्रें ) त्यानें नवीन शोध लावून बनविली. या धंद्यांत पुष्कळ पैसा मिळवून व त्यांतून अंग काढून घेऊन अखेरच्या आयुष्यांत त्यानें ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केला व चंद्र, वगैरे विषयांवर पुस्तकें लिहिलीं.

**नाहन** ( सिरमूर ), संस्थान.—पंजाबांत, दिल्ली विभागाच्या कमिशनरच्या आधिपत्याखालीं असलेलें एक डोंगराळ संस्थान.हें यमुनेच्या पश्चिम तीरावर व सिमल्याच्या दक्षिणेस आहे. क्षेत्रफळ ११९८ चौरस मैल. मर्यादाः—उत्तरेस जुब्बल व बलसन संस्थानें; पूर्वेस संयुक्त प्रांतांतील डेहराडून जिल्हा; दक्षिणेस अंबाला जिल्हा व कालशिया संस्थान; व पश्चिमेस पतियाळा संस्थान आणि कुंथल.

स्वाभाविक वर्णनः—आग्नेयीकडील किआर्द दून किंवा खोरेंखेरीज संस्थानचा बाकीचा सर्व भाग डोंगराळ आहे. दक्षिण सरहद्दीवर बाह्य सिवालिकाचे डोंगर असून त्याशीं समांतर धार्थी रांग गेलेली आहे; दरम्यानच्या खोऱ्यांतून मारकंद व बाट या नद्या वाहतात. धार्थी रांगेच्या ईशान्येस जलाल नदीचें खोरें आहे. वायव्येकडून आग्नेयीकडे गेलेल्या गिरी नदीच्या योगानें संस्थानचे दोन भाग होतात.उत्तर सरहद्दीच्या मध्यमार्गी चौर नांवाचें ( ११९८२ फूट ) शिखर असून तेथून डोंगराच्या कित्येक रांगा निघतात. ईशान्य सरहद्दीवर सिरमूर आणि डेहराडून यांच्या मधून यमुनेला मिळणारी टोन्स नदी वहाते. या संस्थानची जमीन उत्तरेकडून दक्षिणेकडे उतरती होत गेले आहे.

पावसाळ्यांत हवा मलेरियाची असली तरी इतर ऋतूंत निरोगी असते. डोंगराळ मुलुखांतील हवा समशीतोष्ण आहे. गिरीच्या पलीकडील प्रदेशांत हिंवाळ्यामध्यें बर्फ पडतें. वार्षिक पाऊस निरनिराळ्या ठिकाणीं ५९ ते ६५ इंचपर्यंत पडतो.

इतिहासः—नाहन किंवा सिरमूरचा प्राचीन इतिहास बहुतेक मुळींच नाहीं. त्याची प्राचीन राजधानी सिरमूर ही होती असें म्हणतात. परंतु सध्यां तें खेडें असून त्याच्या आसपास पुष्कळ जुने अवशेष आहेत. अशी दंतकथा आहे कीं,एका डोंबारणीनें येथील राजाजवळ आपल्या कौशल्याची बढाई मारिल्यावरून राजानें तिला दोरीवरूल नदीपार जाऊन येण्यास सांगितलें; व ही गोष्ट तिनें केल्यास तिला अर्धें राज्य देऊं केलें. बाईनें दोरीवरून सुरक्षित रीतीनें नदी ओलांडली; परंतु ती परत येत असतां, राज्य कायम राखण्याच्या उद्देशानें, दरबारच्या एका सरदारानें दोरी तोडून टाकिली, व ती बाई नदींत पडून मरण पावली. या विश्वासघाताबद्दल नदीला पूर येऊन सिरमूर वाहून गेलें,व राजाचाहि निर्वंश होऊन राज्याला मालक उरला नाहीं. कांहीं कालानंतर जेसलमीरचा राजा हरद्वारला यात्रेकरितां गेला असतां मंत्र्यांनीं त्याला राज्य चालविण्याकरितां बोलाविलें. त्याप्रमाणें त्यानें आपल्या मुलाच्या हातीं सैन्य पाठवून हा प्रदेश काबीज केला; त्याचा मुलगा हा सिरमूरचा पहिला राजा होय. त्यानें सुबंशप्रकाश ही पदवी धारण केली व ती अद्यापहि त्याच्या वंशांत चालू आहे. १०९५सालीं राजवन ही नव्या राज्याची राजधानी झाली. आठव्या राजानें हल्लींच्या कुंथल संस्थानांतील रतेश जिंकिलें, व त्याच्यानंतर गादीवर आलेल्य राजानें जुब्बल, बलसन, कुम्हारसेन, घोंड, कोत, व थिओग हे प्रदेश घेऊन आपलें राज्य बहुतेक सतलज नदीच्या पलीकडील मर्यादेपर्यंत वाढविलें. कित्येक वर्षें, हे प्रदेश संस्थानचे मांडलिक म्हणून होते;परंतु संस्थानची राजधानी डेहराडूनमध्यें कालसी येथें असल्यामुळें राजाचा दाब त्यांवर फारसा नसे. स.१६२१ त कर्मप्रकाशानें नाहन ही हल्लींची राजधानी वसविली. त्याच्या नंतरचा राजा मांधाता यानें शहाजहानचा सेनापति कलील उल्ला याला गढवालच्या स्वारींत मदत केल्याबद्दल पुढील राजा सोभागप्रकाश याला कोठ्याची जहागीर मिळाली.औरंगझेबाच्या कारकीर्दींतहि येथील राजानें मदत दिल्याबद्दल औरंगझेबानें कोलागडचा प्रदेश संस्थानच्या राजाकडे दिला. राजा मितप्रकाशानें शीख गुरुगोविंदसिंगाला आश्रय देऊन, किआर्द दूनमध्यें पओंटची तटबंदी करण्याची परवानगी दिली; ह्याच दूनमध्यें भंगानी येथें गोविंदसिंगानें कहलूर व गढवालच्या राजांचा स. १६८८ त पराभव केला. परंतु स.१७५० त किरातप्रकाशानें गढवालच्या राजाचा पराभव करून, नारायणगड, मोर्णी, पिंजौर व शिखांचा दुसरा मुलूख काबीज केला व पतियाळाचा राजा अमरसिंग याच्याशीं तह केलाः कहलूर संस्थानावर, रोहिला कादीरखान यानें

स्वारी केली, तेव्हां येथील राजालाहि त्यानें मदत केली. गुरख्यांनीं गढवालवर स्वारी केली असतां, त्यानें त्यांचा पराभव करून, त्यांनां गंगानदी ही आपल्या राज्याची सरहद्द म्हणून कबूल करावयास लाविलें. त्याचा मुलगा धर्मप्रकाश यानें नालागडचा संस्थानिक व गढवालचा राजा यांनीं केलेल्या स्वाऱ्या परतविल्या, परंतु कांग्राचा राजा संसार याशीं लढत असतांना तो मरण पावला.त्याच्या मागून त्याचा भाऊ गादीवर बसला; परंतु तो दुर्बळ असल्यामुळें राज्यांत बंडें सुरू झालीं; व तीं मोडण्याकरितां त्यानें अविचारानें गुरख्यांची मदत मागितली. ही आयती आलेली संधि वाया जाऊं न देतां गुरख्यांनीं सिरमूरवर स्वारी करून बंडवाल्यांनीं गादीवर बसविलेल्या रत्नप्रकाशाला हांकलून लाविलें, परंतु कर्मप्रकाशाला मात्र पुन्हां गादीवर बसविण्याचें नाकारिलें. त्यानंतर कर्मप्रकाशाच्या धोरणी व धैर्यवान पत्नीनें सर्व कारभार आपल्या हातीं घेऊन ब्रिटिशांची मदत मागितली. त्याच वेळीं नेपाळशीं ब्रिटिशांचें युद्ध सुरू झाल्यामुळें, त्यांनीं सिरमूरमधून गुरख्यांनां घालवून देण्याकरितां सैन्य पाठविलें. गुरखा युद्ध संपल्यानंतर ब्रिटिशांनीं कर्मप्रकाशचा अज्ञान मुलगा फत्तेप्रकाश यास गादीवर बसविलें, व कोटा आणि किआर्दे दूनसह यमुनेच्या पूर्वेकडील सर्व प्रदेश आपल्या राज्यास जोडला. परंतु १८३३ त किआर्देदून परत करण्यांत आलें. अफगाण व शीख युद्धांत येथील राजानें ब्रिटिशांनां चांगली मदत केली. राजा सर समशेरप्रकाश जी. सी. एस्. आय. ( १८५६–९८ ) याच्या कारकीर्दींत संस्थानांत पुष्कळ सुधारणा झाली. बिगारीची चाल बंद झाली, रस्ते तयार झाले, जमाबंद्या झाल्या, व छापखाना, दवाखाने, पोस्टऑफिस व तारऑफिस हीं उघडण्यांत आलीं. हल्लींचे महाराजा सर अमरप्रकाश बहादुर स. १९११ त गादीवर बसले. यांनां ११ तोफांच्या सलामीचा मान मिळतो.

संस्थानची लोकसंख्या (१९२१) १४०४४८. यांत शेंकडा ९५ पेक्षां जास्त हिंदू आहेत, व लोकसंख्येपैकीं शें. ७८ पश्चिम पहाडी भाषा होतात.

शेतकीः—संस्थानच्या इतर भागांपेक्षां किआर्दे दूनची कृषिविषयक परिस्थिति भिन्न आहे. तेथील जमीन नद्यांतील गाळाच्या योगानें बनलेली असल्यामुळें सुपीक असून तिला नैसर्गिक प्रवाहांचें व वेळच्यावेळीं आणि मुबलक पडणाऱ्या पावसाचें पाणी मिळतें. हींत गहूं व हरभरा हीं रब्बी पिकें आणि तांदूळ, मका,ऊंस,आलें व हळद हीं खरिपाचीं पिकें होतात.डोंगराळ भागांत शेती कमी आहे तरी तींत खसखस, आलें,तंबाखू व हळद हीं पिकें बरींच होतात संस्थानांत रयतवारीपद्धत चालू आहे. येथें दुष्काळ पडण्याचा कधींच संभव नसतो. संस्थानांतील जंगलें महत्त्वाचीं असून त्यांत ओक,देवदार, स्प्रूस, बर्च, यू, वगैरे झाडें होतात. स. १९०४ मध्यें जंगलाचें उत्पन्न ८०,००० रु. होतें.

कित्येक ठिकाणीं लोखंड सांपडतें,परंतु कोणत्याहि खाणींत सध्यां काम सुरू नाहीं. शिसें, तांबें, तुरटी व काव हेंहि खनिज पदार्थ सांपडतात, परंतु फक्त काव दोन ठिकाणीं काढली जाते.रून,बाटा वगैरे नद्यांत अत्यंत अल्प प्रमाणावर सोनें सांपडतें.

व्यापार व दळणवळणः—नाहन येथें संस्थानच्या मालकीचा ओतकामाचा कारखाना आहे. हाच येथील सर्वांत महत्त्वाचा कारखाना होय. त्यांत उंसाचे लोखंडी चरक तयार होतात. संस्थानच्या तुरुंगांत इराणी गालिचे, सतरंज्या, चटया वगैरे जिन्नस तयार होतात. यांशिवाय संस्थानांत तयार होणारे दुसरे जिन्नस म्हणजे लांकडी भांडीं, कांबळीं, वेतकाम, जाडेंभरडें सुती कापड हे होत. गहूं, हरभरा, मका वगैरे जिन्नस संस्थानांतून बाहेर जातात, व कापड, भांडीं, साखर, मीठ व औषधें वगैरे माल बाहेरून येतो.नार्थ-वेस्टर्न-रेल्वेच्या बेरार स्टेशनपासून,संस्थानची राजधानी नाहनपर्यंत चांगला रस्ता गेलेला आहे. नाहनपासून यमुनानदीच्या कांठीं रामपूरपर्यंतहि सडक आहे.

राज्यव्यवस्थाः—संस्थानची राज्यव्यवस्था पंजाबच्या धर्तीवर स्थापन केलेली असून न्याय, अंमलबजावणी, लष्कर, पोलीस, जमाखर्च, पब्लिक वर्क्स, वैद्यक, जंगल, तुरुंग वगैरे खात्यांवर राजाची प्रत्यक्ष देखरेख असते. नाहन, रैंक, पओंट व पछाड अशा संस्थानांत चार तहशिली असून त्यांपैकीं प्रत्येकींवर एक एक तहशिलदार आहे. संस्थानच्या वरिष्ठ न्यायकोर्टांत राजा व त्यानें नेमलेले पांच सभासद असून राजा हा अध्यक्ष असतो. देहांत शिक्षा अमलांत आणण्याला दिल्लीच्या कमिशनराची संमति घ्यावी लागते. संस्थानचें वार्षिक उत्पन्न ६००००० रुपये आहे.

पंजाबांतील संस्थानांत व जिल्ह्यांत साक्षरतेच्या बाबतींत या संस्थानचा नंबर २३ वा लागतो. १९०१ सालीं शेंकडा ६.१ पुरुषांनां व शेंकडा ०.३ स्त्रियांनां लिहितां वाचतां येत होतें.

गांव.—नाहन संस्थानची राजधानी,३०°३१′ उ.अ.व७७° २०′पू. रे. वर आहे. हें हिमालयाच्या फांट्यावर वसलें आहे. लोकसंख्या ( १९११ ) ६३४१. हें स. १६२१ त कर्मप्रकाश राजानें वसविलें व तेव्हांपासून हें राजधानीचें शहर आहे. पश्चिम बाजूस संस्थानिकाचें लष्कर असतें. पूर्व भागाला राजा समशेरप्रकाशनें इटालियन धर्तीवर बांधविलेली एक इमारत आहे. येथें एक लहानशी लोखंडाची खाण आहे.

**निआम–निआम**—हे लोक मध्यआफ्रिकेंत राहणारे व मिश्र निग्रो बीजाचे आहेत.कांगो फ्रीस्टेट व ऑंग्लो ईजिप्शियन सूदन येथील सैन्यांनीं निआम-निआम लोकांचें राज्य नष्ट केलें. निआम–निआम हें नांव डिंका भाषेंतील असून त्याचा अर्थ अति खादाड असा आहे. निआम-निआम लोकांचें एतद्देशीय नांव झंडेह् आहे.

मोकळेपणा, धैर्य, कलांची स्वाभाविक आवड व खरें स्त्रीप्रेम हे गुण निआम-निआम लोकांत विशेष आहेत. पुरुष पारध्याचा धंदा करतात व बायका शेतें नांगरतात. बायका-पुरुष लोखंडी, हस्तिदंती, अगर माणसाच्या अथवा माकडाच्या हाडांच्या मोठमोठ्या खुंट्यां केसांत घालतात व अंगाला कॅम झाडाचा लाल रंग लावतात. ते मातीचीं भांडीं करण्याच्या कामांत, धातुकामांत व लांकडांवर कोरीव काम करण्यांत फारच वाकबगार आहेत. त्यांनां गायनवादनाची आवड असून ते अतिशय धूम्रपान करतात. घोडे, बैल, गाढव व उंट यांची त्यांनां मुळींच माहिती नाहीं. निआम-निआम लोकांचें अंगी शिरस्त्राण व त्यांचें शरीरावरील गोंदणें हे त्यांचे विशेष आहेत.

**निआमति**—म्हैसूर संस्थान. शिमोगा जिल्हा. होन्नळ्ळी तालुक्यांतील एक गांव. हें शिमोगा गांवापासून उत्तरेस २१ मैल दूर आहे. याचें पूर्वीचें नांव नेमती होतें. सन १२४५ व १२४७ सालीं होयसळ व स्यून घराण्यांमध्यें येथें भयंकर दोन लढाया झाल्या. सन१३१४ त होयसळाच्या ताब्यांत हें अग्रहार म्हणून होतें. १३९६ सालीं विजयानगरच्या राजांच्या वेळेस हें गोव्याच्या सुभेदाराच्या ताब्यांत होतें. १९ साव्या शतकाच्या आरंभीं दिवाण पूर्णय्यानें हें शहर वसविलें असावें असें वाटतें. येथील व्यापारी लोक लिंगायत जातीचे आहेत. अमेरिकेच्या लढाईच्या वेळीं येथील लोकांनीं कापसाच्या सट्ट्यांत खूप पैसा कमावला.

**निआस**—निआस हें सुमात्राच्या पश्चिम किनाऱ्यावरील सर्वांत मोठें बेट आहे. या बेटाची लांबी व रुंदी अनुक्रमें ८० व २८ मैल आहे. बेटाचा कांहीं भाग ज्वालामुखींपासून बनला असून येथील फार प्राचीन टेंकड्या सुमत्रांतील टेंकड्यां-प्रमाणें आहेत. या बेटाचा उच्चतम भाग सुमारें२३००फूट उंच आहे. उत्तर व पश्चिमेकडे नाको, बंगा वगैरे बरींच लहान बेटें आहेत. येथें पाखंडी लोकांची दाट वस्ती आहे. डच व जर्मन मिशनऱ्यांनीं अनेक उपाय करून देखील येथील लोकांतील दास्यत्वाची चाल व नरहत्या अद्याप प्रचलित आहे. कांहीं संशोधक या लोकांचा बत्ता जातीशीं संबंध दाखवितात परंतु या लोकांची इंडोनेशिअन जातींतील ही एक विशिष्ट शाखाच असावी असें वाटतें. येथें खोबऱ्याचें तेल काढितात. येथील लोक हातानें कापड विणणें व धातूंचीं भांडीं करणें, शेतकी-काम व सडका बांधणें या गोष्टींत निष्णात आहेत. पूर्वकिनाऱ्यावरील गुनांगसिटोली येथें एक डच कमिशनर राहतो.

**निओबियम्**—१८०१ सालीं हॅचेट् हा कुमयुक्त धातूंचें पृथक्करण करीत असतां त्यास एक तेव्हांपर्यंत अज्ञात अशी मृत्तिका सांपडली. १८०२ सालीं एकवर्ग यासहि अशाच प्रकारची मृत्तिका सांपडली. हीस त्यावेळीं कोलंबाईट असें नांव दिलें गेलें. १८४४ सालीं बोडेन्मेस् येथील कोलंबाईट-मध्यें दोन नवीन धातू असल्याचें रोज् याच्या दृष्टोत्पत्तीस आलें. त्यांपैकीं एकास त्यानें टॅंटॅलम् असें नांव दिलें व दुसऱ्यास ग्रीक पौराणिक वाङ्मयांतील टॅंटॅलस याचा मुलगी निओबवरून निओबियम असें नांव दिलें. याची लोहस निओबापिन ( लो नवप्र$_3$ ) स्वरूपांत सांपडतें दुर्मीळ मृत्तिकेमधूनहि ह्या धातूचे कण आढळतात. निओबि-मचीं द्वि, त्रि, व पंच-प्राणिदें उपलब्ध आहेत. त्यांपासून मिळणारा मुख्य रासायनिक संयुक्त पदार्थ म्हणजे निओबित हा होय. निओबियम धातूचें हरिद उज्ज वायूच्या झोता-मध्यें सोज्जित केलें असतां मूळ धातु शुद्ध स्वरूपांत मिळते. निओबिअम्चा वितळण्याचा बिंदु १०५०° आहे.

**निकल**(परमाणुभारांक५८.१६)—हें एक धातुरूप मूलद्रव्य आहे. निकल मुख्यत्वेंकरून कानडा व न्यूकॅलिडोनिया या देशांत सांपडतें. त्याचा रंग करडा असून तें घनवर्धनीय व तन्य आहे. त्याचें विशिष्टगुरुत्व ८ २७९ ते ९.२५ पर्यंत असतें. तें १४००° ते १६००° च्या दरम्यान वितळतें. त्याच्या अंगीं चुंबकीय गुण आहेत, परंतु तापविल्यानें ते नाहींसे होतात. निकल उज्ज शोषून घेतें; त्यावर नैलादि उपधातूंचा ताबडतोब परिणाम होतो, व हवेंत तापविलें असतां त्याचें प्राणिदीकरण होतें. निकलच्या पत्र्यावर नत्राम्लाचा परिणाम होत नाहीं, त्याचप्रमाणें उज्जाच्या प्रवाहांत तापविलें असतांहि तें तसेंच कायम रहातें. ह्या धातूवर उज्जहर आणि गंधाकाम्लाचा परिणाम होत नाहीं. परंतु पातळ नत्राम्लांत तें ताबडतोब द्रवतें. निकल धातूचे क्षार, रुढण्याची क्रिया थांबवितात व झाडांची वाढ बंद करतात. घरगुती कामाला लागणारीं भांडीं, पेले, नाणीं व जर्मनसिल्व्हरसारखे मेल करण्याकरितां निकल धातूचा उपयोग होतो. निकलचीं कित्येक प्राणिदें व गंधकिदें होतात. ह्यांशिवाय निकल प्लविद व निकल कर्बिल हीं दुसरीं मेलनें होत.

**निकाराग्वा**—हें एक मध्यअमेरिकेंतील लोकसत्ताक राज्य आहे. सीमा—उत्तरेस हॉडुरस, पूर्वेस कारिबियन समुद्र, दक्षिणेस कोस्टारिका व पश्चिमेस पासिफिक महासागर. लोक-संख्या ५,५०,००० व क्षेत्रफळ ४९२०० चौरस मैल. हा देश समभुजत्रिकोणाकृति असून त्याचा पाया कारिबियन समुद्राच्या कडेनें १८० मैल पसरला आहे व त्याचें टोंक थेट पश्चिमे-कडे कोझेग्विना नांवाच्या ज्वालामुखीनजीक आहे.

या देशाच्या दोन्हीं किनाऱ्यांचा आकार निरनिराळा आहे. या देशांतील उत्कृष्ट बंदरें येणेंप्रमाणें:—फॉन्सेकाचा दक्षिण फांटा, कोरिंटो, ग्रिटो व सॅन ज्यूअन डेल सूर. या देशाचे स्वभावतः ५ विभाग झाले आहेत. यांतील ज्वालामुखी पर्वत कोझेग्विना, सॅन्टा क्लॅरा, टेलिका वगैरे आहेत. १८३५ सालीं जानेवारीच्या २० व्या तारखेस कोझेग्विनचा अपूर्व व अतिशय भयप्रद असा स्फोट झाला; तो चार दिवस चालू होता.

मनाग्वी व निकाराग्वा या दोन सरोवरांमधून जहाजें चालतात परंतु या दोहोंनां जोडणाऱ्या पनालोया नांवाच्या

खाडीमध्यें टिपिटापा शहराजवळ प्रवाह जोराचा असल्यानें जहाजें खाडींतून जात येत नाहींत. निकाराग्वांतील पर्वतांची जी मुख्य ओळ तिला बहुंशः कॉर्डिलेरा डि लॉस ॲन्डिस असें म्हणतात. या मुख्य ओळीस जागोजाग निरनिराळ्या नांवानें संबोधितात. याचें कोणतेंहि शिखर ७००० फूटांहून अधिक उंच नाहीं. सरोवराकडील बाजू जास्त उभी आहे. परंतु कारिबियनकडील उतरण मोठी नाहीं. मुख्य पर्वताच्या रांगेच्या पूर्वेस असलेलें मैदान म्हणजे निकाराग्वा प्रांताचा अर्धा भाग होतो. येथील प्रमुख नदी म्हटली म्हणजे सिगोव्हिया आहे. हिचें पात्र अरुंद आहे, परंतु लांबीला मध्यअमेरिकेंतील सर्व नद्यांत ही मोठी नदी आहे. या प्रांताचा विशेष म्हणजे इतकाच कीं यांतील सर्व मोठया नद्या पूर्वगामिनी आहेत व पाण्याचा पुरवठा मुख्यत्त्वेंकरून मुख्य पर्वताच्या ओळीपासून होत नाहीं.

येथील उंचवटयाच्या प्रदेशावरील हवा यूरोपांतील लोकांस मानवेल अशीच आहे. परंतु इतर ठिकाणीं ती समशीतोष्ण आहे. सरासरी हवामान८०° आहे. सरोवराच्या पश्चिमेस पाऊस मुसळधार असतो, परंतु कधीं कधीं पूर्व किनाऱ्यावरहि फारच जोराचा पाऊस पडतो. पूर्व किनाऱ्यावर उन्हाळ्यांतहि पाऊस असतो. पासिफिकच्या बाजूस कधीं भूकंपाचे धक्के बसतात. परंतु इतर ठिकाणच्या मानानें त्यांचा जोर कमी असतो.

सरोवराजवळील सखल प्रदेश व त्याच्या भोंवतालचा उंचवटयाचा प्रदेश हेंच सुधारणेचें केन्द्रस्थान होय. या भागांतील हवा समशीतोष्ण, सुपीक जमीन व स्वाभाविक जलमार्ग असल्यामुळें यूरोपियन लोकांची येथेंच विशेष गर्दी झाली. ब्रिटिश, डच, फ्रेंच वगैरे लोकांशीं बेटांव्यवहार सुरू झाल्यामुळें प्रजा संमिश्र होऊं लागली. अपभ्रष्ट स्पॅनिश भाषा हीच बहुतांशीं प्रचलित आहे. इंडियन व निग्रो यांच्या प्रजेस सॅम्बॉस अथवा झॅम्बॉस असें म्हणतात. हे इंडियन लोक अरण्यांत उघडयावर छावण्यांत किंवा गांवें वसवून राहतात. त्यांची संख्या सध्या कांहीं फार नाहीं.

मॅनाग्वा ही राजधानी आहे व लिअन, ग्रॅनाडा, मसाया, हीं मुख्य शहरें आहेत. पूर्वी मालाची ने आण खेचराकरवीं होत असे. परंतु पुढें रस्ते बांधण्यांत आले व मालाची देवघेव सुरू करण्यांत आली. पॅसिफिक आगगाडीचा रस्ता या राज्यांत १७१ मैलांचा आहे. इतर रेल्वे तयार करण्याचें घाटत आहे.

दरसाल सरासरी २२५०००००० पौंड वजनाची कॉफी निघते. ती मुख्यत्त्वेंकरून मॅटागाल्पा प्रदेशांत पिकते. कॅरिबिअनच्या किनाऱ्यावर सोनकेळीं उत्कृष्ट होतात. तंबाखू, तांदूळ, वाटाणे वगैरे तेथील उपयोगापुरतेच होतात. निर्गत माल–कॉफी, सोनकेळीं, सोनें, रबर, गुरेढोरें, कातडें व लांकडी सामान. आयात माल–कापूस, लोंकरीचें सामान, यंत्रें, दारू, स्पिरिट व औषधें इत्यादि. १९१७ सालीं आयात १२७८६१३ पौंडांची व निर्गत ११९५०५१ पौंडांची होती. बहुतेक व्यवहार कागदी नोटांवरच चालतो व त्यांची किंमत केव्हां केव्हां बदलते. समुद्रावरील जकात, तंबाखू, रेल्वेवगैरे वरील कर या मुख्य उत्पन्नाच्या बाबी होत. १९१९ सालीं उत्पन्न २९१९९८ पौंड व खर्चेहि तितकाच होता.

येथील राज्यपद्धति लोकसत्तात्मक असून कॉंग्रेसच्या दोन मंडळांत ४ वर्षांपुरते निवडलेले ४० डेप्युटी व ६ वर्षांकरितां निवडलेले १३ सिनेटर असतात. अंमलबजावणीच्या खात्याचा मुख्य एक लोकांनीं निवडलेला अध्यक्ष असतो. बहुंशीं रोमनकॅथॉलिक हाच धर्म येथें प्रचलित आहे, परंतु इतर कोणत्याहि धर्मानुयायांस मुभा आहे. येथें प्राथमिक शिक्षण फुकट असून सक्तीचें आहे. यांत तीन विश्वविद्यालयें आहेत.

१५०२ सालीं जरी कोलंबसनें अमेरिका शोधून काढिली तरी १५२२ पर्यंत निकाराग्वाच्या सर्व भागांत लोकांचा प्रवेश झाला नव्हता. स्पेनच्या लोकांनीं तो सर्व प्रांत घेऊन तेथें आपलें वर्चस्व बसविलें. १८२३ सालीं निकाराग्वा मध्यअमेरिकाच्या राष्ट्रसंघांत सामील झाला. पण तो संघ १८३९ सालीं मोडला. राष्ट्रसंघ असेपर्यंत या प्रांतांत बंडाळी व दंगेधोपे फार माजत असत.

**निकी**—पुरु ( पोरस ) राजाबरोबर ज्या बाजूस अलेक्झांडरनें लढाई केली, तेथें त्यानें निकी हें शहर वसविलें. हल्लीं त्यास मांग असें म्हणतात. हें जलालपुरच्या पूर्वेस व दिलावरच्या दक्षिणेस ३ कोसांवर आहे. हें मांग गांव एका शक राजानें वसविलें; हल्लीं येथें जाटांची वस्ती आहे. तक्षशिलेच्या एका शिलालेखांत "महाराज माग" हें नांव येतें. मांग येथें मोआ नांवाचीं नाणीं पुष्कळ सांपडतात, त्यांवर "निक" अशीं अक्षरें आढळतात; त्यावरून मांग राजाची निक येथें टांकसाळ असावी. इंडो–सिथियन राजांचींहि नाणीं येथें पुष्कळ सांपडतात; तीं इतकीं विपुल आढळतात कीं, त्यांस तिकडच्या भागांत मांगशाही असें सामान्य नाम पडलें आहे. [ कनिंगहॅम; दीक्षित–भा. भूवर्णन. ]

**निकोबार**—बंगालच्या उपसागरांतील अंदमान निकोबार नांवांच्या बेटांच्या समूहांपैकीं एक समूह. 'अंदमान आणि निकोबार' द्वीपसमूहांची माहिती त्या लेखांत दिली आहे. निकोबार बेटाचें क्षेत्रफळ ६३५ चौरस मैल आहे. यांत एकूण १९ बेटें असून त्यांपैकीं ७ बेटांवर वस्ती नाहीं. लोकसंख्या ( १९११ ) ८८१८. याचें 'नक्कावार' हें मूळचें नांव असून त्याचेंच पुढें निकोबार झालें.

वेगळ्या वेगळ्या बेटांत वेगळ्या वेगळ्या उंचीचे डोंगर आहेत. निकोबारला चांगलें स्वच्छ पाणी नाहीं. फक्त मोठ्या निकोबारवर नद्या आहेत. ननकोवी नांवाचें मोठें बंदर आहे. इतर बंदरें म्हणजे नुसत्या नांगर टाकण्याच्या जागा आहेत. हरएक बेटावर निरनिराळ्या तऱ्हेची सृष्टिशोभा दृष्टीस पडते. उत्तरेकडून दक्षिणेकडे पहातां कारनिकोबार हें तर

सपाट पोंवळ्याचें बेट आहे. चौरा हें देखील सपाट जमीनचें आहे पण दक्षिण भागीं उंच जागा असून डोंगरसपाटी आहे. टेरेसा हें टेंकड्यामय आहे. बोम्पोका ही एकच मोठी ज्वालामुखी टेंकडी आहे. तिलनचाँग ही तर एक लांबच लांब पण अरुंद अशी डोंगराची ओळ आहे. कमोर्टा व ननकोवी हीं दोन्हींहि डोंगराळ आहेत. त्रिन्कट हें तर अगदीं सपाट मैदान आहे. लहान व मोठें निकोबार हीं दोन्हींहि डोंगराळ असून, लहान निकोबारमधील सर्वांत उंच शिखराची उंची १४२८ फूट आहे. मोठया निकोबारमधील शिखराची उंची २१०५ फूट आहे. कारनिकोबार येथें नारळाचीं झाडें बरींच आहेत. हिरवें गवत बेटांवर मुबलक असून ठिकठिकाणीं जंगलहि आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं सृष्टिशोभा फारच रमणीय व आल्हादकारक आहे.

खडकांतून कांहीं कांहीं ठिकाणीं तांबें सांपडतें. अंदमान येथील जंगलापेक्षां निकोबारचें जंगल उत्पन्नाच्या दृष्टीनें मात्तब्बर नाहीं. येथील इमारती लांकूड पहिल्या नंबरचें असतें. फलवृक्ष, नारळीचीं झाडें व सुपारीचीं झाडें चांगलीं फोंफावलेलीं असतात व केळ, पोपया, संत्रें, लिंबें, सिताफळें इत्यादि झाडें लावलीं जात आहेत.

मगरी समुद्रकांठीं व नद्यांच्या पात्रांतून बऱ्याचशा दृष्टीस पडतात व मोठें निकोबार, लहान निकोबार, व कटचल येथें वानरहि आहेत. येथें 'स्पंज' सांपडतो. पावसाळ्याचे दिवस सोडतां येथील हवामान फार उष्ण आहे. येथें कधीं कधीं वादळें किंवा 'चक्रवात' वारे वहातात. जोराचे भूकंपाचे धक्के मधून मधून बसतात.

इ ति हा स.—टोलेमीच्या वेळेपासून अंदमान निकोबारच्या अस्तित्वाची माहिती आहे. १७ व्या शतकांत मिशनरी लोकांचें लक्ष निकोबार बेटांकडे वेधलें. १७५६ सालीं वसाहतीकरितां डेन्स लोकांनीं हें बेट आपल्या कबज्यांत घेतलें, पण ट्रान्क्वीबारला ही वसाहत जोडल्यामुळें येथें खरी वसाहत झाली नाहीं तेव्हां डेन्स मोरव्हिअन लोकांस वसाहत करण्यास व धर्मप्रसार करण्यास बोलाविलें पण मोरव्हिअन लोकांस ह्या प्रयत्नांत यश आलें नाहीं. सन १७८७ तच त्यांचे सर्व प्रयत्न संपुष्टांत आले.

डॅनिश ईस्ट इन्डिया कंपनी ह्यामुळें फार निराश होऊन हें बेट सोडून गेली (१७७३). विल्यम बोल्टस नांवाच्या एका धाडसी डचमनच्या सांगण्यावरून ऑस्ट्रियन लोक येथें आले पण ३ वर्षांत त्यांची निराशा झाली. पण डेन्स लोकांना ह्या कृत्याचा राग येऊन त्यांनीं ननकोरी बंदरावर सन १७८४ ते १८०७ पर्यंत पहारा ठेविला. १७९० व १८०४ सालीं मोरव्हियन लोकांनीं पुन्हां नवे प्रयत्न केले. नेपोलियनशीं झालेल्या लढायांमध्यें सन १८०७ ते १८१४ पर्यंत हीं बेटें इंग्लिश लोकांच्या ताब्यांत होतीं व तीं तहाच्या अटीप्रमाणें डेन्स लोकांस परत केलीं. १८३१ सालीं रोजन (डॅनिश) यानें वसाहत करण्याचा पुन्हां प्रयत्न केला पण मदतीच्या अभावामुळें १८३४ सालीं तो सोडून गेला व १८३७ सालीं ही वसाहत नामशेष झाली, व डेन्स लोकांनींहि ह्या बेटांवरील आपला हक्क सोडून दिला. तेव्हां १८३५ सालीं फ्रेन्च लोक कारनिकोबार येथें आले व सर्व त्रास सोसूनहि टरेसा व चौरा येथें स. १८४६ पर्यंत राहिले व नंतर तेथून गेले. १८४५ सालीं डेन्स लोकांनीं इंग्लिश जहाजांतून 'बूश' नांवाच्या गृहस्थास हीं बेटें आपल्या ताब्यांत घेण्यास पाठविलें. १८४८ सालीं डेन्स लोकांनीं सर्व मालकी सोडून दिली व ह्या बेटांतून आपली वसाहत उठविली. १८५८ सालीं ऑस्ट्रियन्स आले होते पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. सन १८६७ त मारेर यानें प्राशियन लोकांस ह्या बेटांचा ताबा घेण्याची सल्ला दिली पण १८६९ सालीं ब्रिटिश सरकारनें डॅनिश सरकारशीं तडजोडीचें बोलणें लावून ह्या बेटांचा ताबा घेतला व ननकौरीबंदर हें गुन्हेगार लोकांकरितां अंदमानाच्या जोडीला वसाहत म्हणून ठरविलें. पण स. १८८८ त वसाहत करण्याचें बंद करण्यांत आलें. सन १८७१ पासून अंदमान व निकोबार बेटांच्या चीफ कमिशनराच्या हातीं हीं निकोबार बेटें आहेत. येणेंप्रमाणें निकोबार बेटांवरील वसाहतीची हकीकत आहे.

ब्रिटिश सरकारनें ह्या बेटांवर वसाहत करण्याचा १८८४ सालीं प्रयत्न केला, पण तो प्रयत्न सिद्धिस गेला नाहीं. मॅन यानें वसाहतीची हकीकत मोठी मजेदार रीतीनें शेवटच्या रिपोर्टांत (अहवालांत) नमूद केली आहे. निकोबार बेटांवर वसाहत करण्यास म्हणजे मोठें भांडवल व विलक्षण चिकाटी पाहिजे असें दिसतें.

यूरोपीअन लोकांनीं आपला ताबा ह्या बेटांवर बसविला होता तरी येथील रहिवासी लोक व खुद्द ननकौरी बंदरांतील लोक चांचेगिरीचा धंदा करीत असत. व ह्या लोकांनीं पुष्कळ लोकांचा प्राणनाश केला असें आढळून आल्यावरून ह्या त्यांचा धंदा अगदीं बंद पाडण्यांत आला.

येथील एकंदर लोकसंख्या ६५११. ह्या लोकांत जातिभेद नाहीं. वेगवेगळ्या बेटावरचे लोक वेगवेगळी भाषा बोलतात व अशा एकंदर ६ भाषा प्रचारांत आहेत. कारनिकोबार, चौरा, तेरेस्सा या भाषा त्या त्या बेटांत बोलल्या जातात. एक शतकापूर्वी येथील व्यापारी भाषा पोर्तुगीज होती पण तिला देखील डॅनिश, जर्मन, इंग्लिश इत्यादि भाषांचें मधून मधून गालबोट लागलेलें आहे. पोर्तुगीज भाषेच्या पूर्वी मलायी व चिनी भाषा बोलत असत.

लोक.—अंदमान व निकोबारमधील समाजस्थिति दाखविण्यासाठीं ज्ञानकोश विभाग पहिला यांतील पंथभेद, भाषा व जाती दाखविणारीं कोष्टकें (पृ. १६५–१६९) उपयुक्त वाटतील. निकोबारी लोक विलक्षण धर्मभोळे असून त्यांच्यांत फार वेडया समजुती प्रचारांत आहेत. चोरास किंवा खुनी इसमास फांशीं देण्यांत येत असे. पण आतां ही चाल बंद पाडण्यांत आली आहे. मृताखेतावर तर ह्या लोकांचा फारच

विश्वास आहे. मृत मनुष्यांचे कपडे व दागदागिने त्याच्या बरोबरच पुरतात. प्रेतें बहुतेक मध्यरात्रीपूर्वी, सूर्यास्तानंतर किंवा प्रातःकाळीं पुरतात. अशामुळें प्रेतावर किंवा थडग्यावर माणसाची सावली पडत नाहीं असें हे लोक मानतात.

सैतान मारण्याच्या चाली कारनिकोबारमध्यें फार चमत्कारिक आहेत. बायकांनां, पुरुषांनां व कधीं कधीं मुलांनां देखील ह्या समजुतीखातर बळी जावें लागतें. बदमाप व समाजास धोका आणणारे लोक बहुतेक सैतानानें भारलेले आहेत असे ते लोक समजतात व अशा लोकांस प्रथमतः त्यांचे हातपाय तोडून नंतर फांशीं चढवितात व नंतर समुद्रांत बुडवितात. निकोबारी लोक अंगानें सदृढ व धिप्पाड असतात. पालकाच्या व पित्याच्या मरणानंतर इस्टेटीचा वारसा मोठ्या मुलाकडे जातो.

नारळीचीं झाडें, फळझाडें व लहानशा प्रमाणावर एखादी वगाईत हीच ह्या लोकांची इस्टेट असते. इतर सर्व नव्हेची इस्टेट बहुतेक प्रेताबरोबर दहन करण्याची चाल आहे. बापाच्या मरणानंतर मुलीस इस्टेटीचा कांहींच वांटा मिळत नाहीं. लग्नाच्या वेळेस आंदणादाखल जें काय मिळतें तेवढेंच. मुलींनां वरसंशोधनाचा हक्क असतो. लग्नाचा समारंभ किंवा गवगवा कांहीं फार मोठासा नसतो. बोलण्यामध्यें सभ्यतेचा हे लोक मोठा आव आणतात. हे लोक सुतारकामामध्यें निष्णात आहेत.

ह्या बेटांचा व्यापार बहुतेक हिंदुस्थान, ब्रह्मदेश, मलाया व चीन इत्यादि देशांतील लोकांशीं आहे व ह्या समूहांतील बेटांचा आपपासांतहि व्यापार चालतो. नाण्याऐवजीं हे लोक नारळाचा उपयोग करतात. उपजीविकेचे जिन्नस वगैरे सर्व नारळानेंच ते विकत घेतात. बहुतेक गांवांत एक मुख्य असतो त्याच्याकडून ग्रामव्यवस्था होते. सर्व जमीनींचा हक्क ह्याच्याकडेच असतो. परंतु गांवांतील स्थावर जंगम मालकीवर ह्याचा हक्क पोंचत नाहीं. गांवांत वयोवृद्ध लोकांसहि मुख्याच्या खालोखाल मान दिला जातो. स. १८८२ पासून गांवमुख्याला काढून टाकण्याचा किंवा ठेवण्याचा अधिकार इंग्रजसरकारनें आपल्या हातीं ठेवलेला आहे. खरें म्हटलें तर मुख्य निवडण्याचा अधिकार गांवांतील लोकांसच असतो. ननकौरी येथें सरकारी एजंट आहे. गांवांत शांतता व सुव्यवस्था राखणें व रिपोर्ट करणें त्याचप्रमाणें लहान लहान भांडणें मिटविणें वगैरे कामांत त्याला गांवमुख्यास मदत करावी लागते.

**निकोमेडिया** ( आधुनिक-इस्मिद )— हें प्राचीन शहर अॅस्टाकस आखातावर आहे. इ. स. पूर्वी २६४ त बिथिनियाच्या पहिल्या निकोमेडीजनें हें शहर वसविलें. त्यावेळेपासून हें शहर आशियामायनरमध्यें मोठें गणलें जातें. रोमन अंमलांत हें बिथिनियाची राजधानी असून डायोक्लेटियननें याला पूर्वेकडील मुख्य शहर केलें होतें. कान्स्टॅन्टिनपलचा उदय व तुर्कांनीं केलेला या शहरचा पाडाव इत्यादि अडचणी असतांना देखील निकोमेडियाचें महत्त्व कायम राहिलें.

**निकोलस**—या नांवाचे पांच पोप, एक प्रतिस्पर्धी पोप ( अँटिपोप ) व रशियाचे दोन झार होऊन गेले.

पोप, पहिला निकोलस—हा तिसरा बेनेडिक्ट याच्यामागून ८५८ मध्यें पोप झाला. याला दी ग्रेट ही पदवी आहे. त्याच्या पूर्व आयुष्याबद्दल माहिती उपलब्ध नाहीं. तो साडेनऊ वर्षें पाँटिफ या अधिकारावर होता. त्यावेळीं कॉन्स्टांटिनोपल येथील धर्माधिकाऱ्याबरोबर भांडण होऊन पूर्वेकडील व पश्चिमेकडील ( ईस्टर्न अँड वेस्टर्न चर्च )अशीं दोन ख्रिस्ती धर्मपीठें निर्माण झालीं. निकोलसचें दुसरें भांडण, लॉरेन (फ्रान्स)चा राजा लोथेर याला पहिल्या बायकोशीं घटस्फोट करण्याची परवानगी पाहिजे होती ती देण्याच्याविरुद्ध निकोलस असल्यामुळें, चालू होतें. बल्गेरियाच्या नवीन ख्रिस्ती बनलेल्या, बोरिस नांवाच्या राजानें नैतिक व सामाजिक बाबींसंबंधीं १०६ प्रश्न विचारले होते, त्यांचीं उत्तरें निकोलसनें दिलीं तो लेख हल्लीं उपलब्ध आहे.

दुसरा निकोलस ( १०५८–१०६१ ) याला व्यक्तिदृष्ट्या मुळींच महत्त्व नव्हतें. तिसरा निकोलस ( १२००–१२८० ) हा विद्वान व कर्तृत्ववान होता. पण त्यानें आपले पुतणे व इतर नातेवाईक यांनां स्वतंत्र जहागिरी ( प्रिन्सिपॅलिटीज ) दिल्यामुळें तो लोकनिंदेस पात्र झाला. चवथा निकोलस ( १२८८–१२९२ )हा मोठा धार्मिक वृत्तीचा व शांततावादी होता. मूर्तिपूजकांचा धर्म नष्ट करण्याची व धर्मयुद्धांत ( क्रुसेड ) जय मिळविण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती.

पांचवा निकोलस ( १४४७–१४५५ ) हा चांगला विद्वान होता. याची कारकीर्द जगाच्या राजकीय, शास्त्रीय व वाङ्मयीन इतिहासांत महत्त्वाची आहे. त्यावेळीं पांचवा फेलिक्स नांवाचा एक प्रतिपोप झाला होता त्याला यानें पोप पदाचा त्याग करण्यास लाविलें, व हें एक मोठें भांडण व दुही मिटविली. स. १४५० मध्यें त्यानें रोम येथें एक मोठा ज्युबिली समारंभ केला, व त्यावेळीं यात्रेकरूंनीं पुष्कळ देणग्या अर्पण केल्या. या पैशाचा त्यानें ज्ञानप्रसाराच्या कामीं उपयोग केला. होमरच्या काव्याचें पद्यमय भाषांतर करविलें आणि नऊ हजार ग्रंथसंग्रह असलेली एक लायब्ररी स्थापली. पण स. १४५३ मध्यें तुर्क लोकांनीं कॉन्स्टँटिनोपल शहर घेतलें त्यामुळें ख्रिस्ती धर्म व ग्रीक वाङ्मय व विद्वान यांच्यावर जी आपत्ति ओढविली तिच्या योगानें पोपच्या मनाला मोठा धक्का बसला. मुसुलमानांच्या या कृत्याबद्दल "हा होमर व प्लेटो यांच्यावर एक दुसरा मृत्यूच ओढवला" असें एकानें म्हटलें आहे. मुसुलमानांबरोबर धर्मयुद्ध करण्याकरितां निकोलसनें सर्व संस्थानिकांची एकी करण्याचा प्रयत्न केला पण तो साधला नाहीं. निकोलसनें रोम शहर सुधारून शोभा वाढविण्याच्या मोठाल्या योजना केल्या, बरींच चर्चें दुरुस्त केलीं व सेंटपिटरचें चर्च पुन्हा

बांधण्याचा उपक्रम केला. पण रोमन लोकांनां ह्या गोष्टी आवडल्या नाहींत. त्यांनीं पोपचेंच राज्य बुडविण्याचा एक मोठा कट केला पण तो फसला. तथापि निकोलसला स्वतः-विषयींची लोकांतील अप्रियता व कान्स्टँटिनोपलचा पाडाव पाहून अखेरीच्या दिवसांत अत्यंत खिन्नता प्राप्त झाली व तो १४५५ सालीं मरण पावला.

पांचवा निकोलस हा प्रतिस्पर्धी पोप म्हणून १३२८ ते १३३० पर्यंत इटालींत होता. त्याला बव्हेरियाचा लुई या चर्चबहिष्कृत बादशाहानें स्वतःच्या वजनानें पोप म्हणून निवडून आणलें होतें. २२ व्या जॉन पोपनें त्याच्यावर बहिष्कार घातला. निकोलसनें क्षमा होण्याच्या अटीवर आपलीं पापें कबूल केलीं. पुढें त्याला कैद करून पोपच्या राजवाड्यांत ठेवण्यांत आलें. तेथें तो १३३३ सालीं मरण पावला.

बादशहा पहिला निकोलस झार (१७९६—१८५५):— हा रशियाचा बादशहा पहिला पॉल बादशहा व त्याची राणी मेरिआ फेओडोरोव्हना यांचें आठवें अपत्य. हा २५ जून १७९६ सालीं जन्मला. तो ५ वर्षांचा असतांनाच त्याच्या बापाचा खून होऊन त्याचा भाऊ पहिला आलेक्झांडर हा बादशहा झाला. साहाव्या वर्षापासून पुढें पंधरा वर्षें निकोलसचें शिक्षण एम्. व्हान लँम्सडॉर्फ नांवाच्या एका विद्वान व लष्करी अधिकारी असलेल्या इसमाच्या देखरेखीखालीं झालें. तथापि पुस्तकी शिक्षणापेक्षां निकोलसला लष्करी शिक्षणाचीच गोडी अधिक होती. स. १८०८ मध्यें त्याला जनरल हा किताब देण्यांत आला. स. १८१४ मध्यें तो फ्रान्समध्यें लढाईवर गेला, व तेव्हांपासून पुढें आजन्म त्यानें लष्करी पोषाखाखेरीज इतर पद्धतीचा पोषाख कधींच केला नाहीं. स. १८१६ मध्यें त्यानें जर्मनी व इंग्लंडला भेट दिली. बर्लिनला असतांना तेथें प्रशियाचा राजा तिसरा फ्रेडरिक विल्यम याच्या प्रिन्सेस चार्लोटी नांवाच्या मुलीशीं त्याचा वाङ्निश्चय होऊन १८१७ जुलैमध्यें सेंटपिटर्सबर्ग येथें विवाह झाला. अलेक्झांडरनंतर कान्स्टंटाइन या मधल्या भावानें स्वतःची नालायकी जाणून कबूली दिल्यामुळें निकोलसला गादी मिळण्याचें राजघराण्यांतील एकंदर मंडळीच्या कौन्सिलमध्यें ठरलें व त्याप्रमाणें स. १८२५ पहिला अलेक्झांडर वारल्यावर निकोलस बादशहा झाला. तथापि याच वेळीं कान्स्टंटाईनला गादी देण्याबद्दल कांहीं सैन्यानें कट करून निकोलसला घेरलें. पण त्यांत निकोलसच्या तर्फेच्या सैन्याचाच जय झाला. नंतर कटवाल्यांची चौकशी करून कांहींनां फांशीं देण्यांत आलें, कांहींनां कैदेंत टाकलें व कांहींनां सायबेरियांत हद्दपार करण्यांत आलें. याप्रमाणें गादीवर स्थिर झाल्यावर निकोलसनें राज्याची सुधारणा करण्याकडे लक्ष दिलें. राज्यांत सर्वत्र अंदाधुंदी व अव्यवस्था पसरली होती ती मोडून सर्वत्र शांतता, राजनिष्ठा व शिस्त स्थापणें हें मुख्य काम आहे असें निकोलसनें ठरवून सरकारी नोकरांच्या कामावर विशेष लक्ष ठेवलें, लेखनस्वातंत्र्यावर नियंत्रण (सेन्सारशिप) घातलें आणि सैन्याची सतत परेड व पाहाणी सुरू केली. याप्रमाणें स्वतःच्या देखरेखीनें त्यानें सर्व प्रजाजनांनां राजनिष्ठ बनविण्याची योजना केली. निकोलसमधील सर्वांत मोठा दोष म्हणजे त्याचा संशयी स्वभाव; त्याचा कोणावरहि विश्वास नसे. त्यामुळें कोणालाहि स्वतंत्र अधिकार न देतां त्यानें सर्व अधिकारसूत्रें आपल्या हातीं ठेविलीं होतीं. त्याची शरीरप्रकृति दगडासारखी कणखर होती, काम करण्याची ताकद अचाट होती; तपासण्या, परेडी, शिष्टमंडळांच्या मुलाखती, सार्वजनिक संस्थांनां भेटी, व त्यानंतर आठ नऊ तास खोलींत बसून रिपोर्ट, खलिते वाचणें व त्यांवर हुकूम देणें वगैरे त्याचा नित्याचा व्यवसाय असे. यामुळें या वज्रकठोर झारच्या राज्यांत दिसावयाला जिकडे तिकडे बरोबर बंदोबस्त दिसूं लागला परंतु प्रामाणिकपणें उघड टीका करण्याचा मार्ग बंद झाल्यामुळें व कोणालाहिं स्वतंत्र बुद्धि चालविण्यास वाव नसल्यामुळें झारच्या कारभाराला प्रजेच्या संतोषाचें भक्कम पाठबळ नव्हतें. तर सर्व पोकळ डोलारा जोराचा धक्का बसतांच ढांसळणारा होता.

कोणत्याहि राज्याची खरी मजबुती त्याला युद्धरूपी धक्के बसूं लागतांच तात्काळ समजते. तो युद्धाचा प्रसंग १८२८ सालीं तुर्कस्तानबरोबर आला. १ ल्या अलेक्झांडरनें आरमाराकडे दुर्लक्ष केलें होतें; त्याची सुधारणा निकोलसनें विशेष लक्षपूर्वक केली होती. पण खुद्द लढाईंत तें पूर्ण नालायक ठरलें; व बाल्कन प्रांतावरील स्वारींत सैन्यांतील अव्यवस्था व दुर्नीति त्याला प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहावी लागली. शिपायांनां धड पोटाला मिळेना; जखमी झालेल्यांनां दवाखान्यांत नीट औषधोपचार होईनात व तो स्वतः भित्र्या अंतःकरणाचा असल्यामुळें शस्त्रक्रिया करण्यास परवानगी देईना. यामुळें शत्रूंनां व रोगांनां शिपाई बळी पडले. याप्रमाणें अन्तर्गत व्यवस्था व बाह्य युद्धविजय या दोन्ही बाबतींतील आपल्या पराक्रमाविषयींचा त्याचा भ्रमाचा भोंपळा फुटला!

स्वकीय कारभार व परराष्ट्रीय धोरण यासंबंधीं निकोलसचीं तत्त्वें अशीं होतीं कीं, प्रथम देशांत सुव्यवस्था लावून द्यावयाची. 'होली अलायन्स'च्या उद्देशानुरूप यूरोपमध्यें राज्यक्रांतिकारकांचें बंड मोडून परंपरागत चाललेले बादशाही अम्मल चालू ठेवणें व पूर्वेकडील देशांत मोडकळीस आलेलें ऑटोमन साम्राज्य नष्ट करून पवित्र जुना ख्रिस्ती धर्म पसरविणें, ही रशियाकडे कामगिरी आहे अशी निकोलसची भावना होती. याच सुमारास ग्रीकांनीं तुर्कांच्या सत्तेविरुद्ध स्वातंत्र्ययुद्ध सुरू केलें. रशिया व ब्रिटन यांनीं संगनमतानें ग्रीसची बाजू धरली, तुर्कांची समुद्रावरील सत्ता नष्ट करून रशियन सैन्य कान्स्टँटिनोपलमध्यें शिरलें आणि १८२९ मधील ॲड्रियानोपलच्या तहानें तुर्कस्तान रशियाचा मांडलिक बनला. स. १८३० मध्यें फ्रान्स व बेलजममधील

राज्यक्रांतिकारकांची चळवळ मोडून टाकण्याची त्यानें तयारी केली, पण पोलंडमध्यें मोठें बंड झाल्यामुळें निकोलस तिकडे गुंतला. तें मोडल्यावर पुन्हां निकोलसनें नवीन 'पवित्र संघ' (होली अलायन्स) स्थापला. १८३८ मध्यें तुर्कस्ताननें ऑस्ट्रियाच्या मदतीनें रशियापासून स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला व निकोलसनें ब्रिटिश सरकारशीं दोस्ती ठेवून तो प्रयत्न निष्फळ केला. १८४८ सालीं फ्रान्समध्यें क्रांति होऊन तिसरा नेपोलियन बादशहा झाला. त्याचा निकोलसनें योग्य तो सन्मान केला नाहीं. तुर्कस्तान रशियाच्या ताब्यांत रहावा हें ब्रिटनलाहि संमत नव्हतें. त्यामुळें हळूहळू इंग्लंड, फ्रान्स, ऑस्ट्रिया वगैरे देश रशियाचा पक्ष सोडून तुर्कस्तानच्या बाजूला वळले आणि त्यामुळें १८५४ सालीं सुरू झालेल्या क्रिमियन युद्धांत रशियाचा पराभव झाला. त्या धक्क्यानें झार स. १८५५ मध्यें मरण पावला. स. १८४४ त निकोलसनें इंग्लंडला भेट दिली होती. त्यावेळीं व्हिक्टोरिया राणीनें निकोलसच्या स्वभावाचें वर्णनपर पत्र बेल्जमच्या राजाला लिहिलें होतें, त्यांतील मजकूर असा:-" तो करारी व कडक स्वभावाचा आहे; त्याची स्वकर्तव्याविषयीं तत्त्वें ठाम ठरलेलीं आहेत व तीं पृथ्वीवरील कोणीहि त्याला बदलण्यास लावूं शकणार नाहीं, तो फार हुषार आहेसें मला वाटत नाहीं; त्याचें मन सुसंस्कृत नाहीं. त्याचें शिक्षण दुर्लक्षिलें गेलें असावेंसें वाटतें. राजकारण व लष्करी गोष्टी यांतच फायती त्याला मोठी गोडी आहे. कला व इतर सौम्य व्यवसाय त्याला मुळींच रुचत नाहींत. तथापि तो अगदीं निष्कपटी असून अगदीं मोठीं अरेरावीपणाचीं कृत्येंहि सरळपणानें करतो, कारण राज्यकारभार करण्याचा हाच फायतो एक मार्ग आहे असें त्याला वाटतें. मला खात्री आहे कीं, त्याच्या राज्यांतील कित्येक इसमांवर जे भयंकर प्रसंग कोसळले त्याची त्याला दादहि नाहीं, कारण हाताखालचे अधिकारी लाचखाऊ बनून काय अनर्थ करतात त्याबद्दल त्याला पूर्ण अज्ञान होतें; आणि स्वतः मी मोठा न्यायी आहे असें त्याला वाटतें. त्याच्या कानावर फारशा गोष्टी येतच नाहींत. तो फारच मोकळ्या मनाचा असून लोकांपुढें उघड जें बोलूं नये तें तो बोलतो " इत्यादि. त्याला गृहसौख्य चांगलें लाभलें. त्याला सात मुलें होतीं त्यांपैकीं थोरला मुलगा दुसरा अलेक्झांडर हा त्याच्यानंतर बादशहा झाला.

दु स रा नि को ल स (१८६८-१९१८).—हा तिसऱ्या अलेक्झांडरझारचा मुलगा सेंटपीटर्सबर्ग येथें जन्मला. पुस्तकी व लष्करी शिक्षण त्याला चांगल्या विद्वानांकडून मिळालें त्याला लष्करी शिक्षणाची गोडी नव्हती. १८९०-९१ त त्यानें ग्रीस ईजिप्त, हिंदुस्थान, सिलोन व जपान या दूरच्या देशांत प्रवास केला. १८९४ त बाप वारल्यावर तो गादीवर आला व त्याच सालीं व्हिक्टोरिया राणीच्या प्रिन्सेस ॲलिक्स नांवाच्या नातीशीं त्याचा विवाह झाला. नंतर मास्को येथें मोठा राज्यरोहणसमारंभ झाला व त्यावेळीं पोलिसांचा योग्य बंदोबस्त नसल्यामुळें २००० माणसें गर्दींत चिरडून मेलीं. त्यानें परराष्ट्रांबरोबर बापाप्रमाणेंच शांततेचें धोरण चालवून स्वराज्यांत सर्व सत्ता स्वतःच्या हातीं केंद्रीभूत करण्याचा प्रयत्न चालविला. उदारमतवादी लोकांचा पार्लमेंटरी पद्धतीनें राज्यकारभार चालविण्याची मागणी त्यानें कबूल न केल्यामुळें असंतोष उत्पन्न झाला. त्याची इच्छा नसतांहि जपानशीं युद्धाचा प्रसंग उद्भवला आणि पार्लमेंटरी राज्यपद्धतीचे हक्क लोकांनां देणें भाग पडलें.

महायुद्ध सुरू झाल्यावर कमांडर इन चीफ म्हणून झार हा सैन्याच्या मुख्य तळांत राहिला होता आणि आलेक्झांड्रा राणी सर्व राज्यकारभार पहात होती. तिनें साझोनोव्ह व पलिव्हानोव्ह हे लायक मंत्री दूर करून स्टुर्मर, प्रोटोपोपोव्ह, किंवा गॅलिरक्षिन वगैरे प्रधान नेमले. रासपूटिनचा खून झाला तरी त्याचें एक देवालय बांधून खुनाच्या कटांतील इसमांनां फांशी व हद्दपारी अशा कडक शिक्षा दिल्या. राणीची ही सत्ता पुढील राज्यक्रांतीनें नष्ट झाली. १९१७ च्या मार्चमध्यें ड्यूमा सभेच्या प्रेसिडेंटनें निकोलसला राज्यत्याग करण्यास सांगितलें व तद्विषयक ठराव जेव्हां अधिकाऱ्यांनीं प्रत्यक्ष त्याच्या हातीं दिला तेव्हां त्यानें तो शांतपणें व बिनहरकत मान्य केला. त्यानें बादशाही मुकुट आपल्या मुलाला देण्याचेंहि नाकारलें, कारण तसल्या राजकीय वादळाला तोंड देण्यास तो समर्थ नाहीं असें त्याला वाटलें. ग्रँड ड्यूक मायकेलनेंहि राजमुकुट धारण करण्याचें नाकारलें, कारण लोकांची संमति त्याला पाहिजे होती, पण ती मिळेना. या प्रमाणें राजसत्ताकपद्धति रशियांत नष्ट झाली. इंग्लंडनें झार व त्याचें कुटुंब यांनां इंग्लंडांत नेण्याची इच्छा दर्शविली, पण रशियाच्या तत्कालिन लोकशाही सरकारनें तें नाकारलें. नंतर झार, त्याची राणी व एक मुलगा आणि चार मुली यांनां टोबोलस्क येथें अटकेंत ठेवण्यांत आलें. तेथील चरित्रक्रम बादशाही कुटुंबाबरोबरच्या एका फ्रेंच शिक्षकानें वर्णिला आहे. राजघराण्यांतील माणसांचे सर्व गुण या बंदिवासांत निदर्शनास आले. स्वतः झार आपल्या मुलाला इतिहास व रशियन वाङ्मय शिकवूं लागला. सायंकाळीं सर्व कुटुंबीय इसम एकत्र जमून वाचन व गप्पागोष्टी करीत, प्रार्थना करीत व चर्चमध्यें हजर राहात. १९१८ सालीं बोल्शेव्हिक सरकारनें या मंडळींनां इकेटरिंबर्ग येथें ठेवलें. तेथें त्यांच्यावर जुलूम होऊं लागला. सर्व माणसांनां मिळून दोन निजण्याच्या व बसण्याउठण्याची एक मिळून तीनच खोल्या दिल्या होत्या. त्यांचा मुख्य जेलर एक कम्युनिस्ट पंथाचा ज्यू असून बादशाही कुटुंबाचा भयंकर द्वेष्टा होता. स. १९१८ मध्यें कोलचॅकनें उरल पर्वताच्या बाजूला चाल केली. त्यामुळें या राजकुटुंबाचा शेवट ओढवला. इकेटरिंबर्गच्या कम्युनिस्टांनीं एक गुप्त सभा भरवून या राजकीय कैद्यांनां ठार मारण्याचें ठरविलें. १६ जुलैच्या रात्रीं मुख्य जेलर युरकोव्हस्की यानें सर्वांनां त्या कैदखान्याच्या तळघरांत नेलें व देहांतशिक्षेचा हुकूम वाचून

दाखविला. तो ऐकून झारनें कांहीं बोलण्याचा प्रयत्न केला. तेव्हां एकदम रिव्हाल्व्हर झाडून जेलरनें त्या सर्व कैद्यांनां ठार मारलें. इतर मारेकऱ्यांनीं संगिनी व बंदुकींचे दस्ते यांचा उपयोग केला. याप्रमाणें राजकुटुंबांतील सात माणसें व त्यांच्याबरोबरच त्यांचे चार नोकर मारले गेले. कांहीं दिवसांनीं जवळच एका जागीं त्यांचीं प्रेतें जाळून टाकण्यांत आलीं.

**निकोसिया**—ही सायप्रस बेटाची राजधानी असून त्या बेटाच्या उत्तरेस वसलेली आहे. येथील लोकसंख्या १९०१ सालीं १६०५२ होती. या शहराभोंवतीं तट असून त्याला तीन दरवाजे आहेत. येथें कातडीं कमावण्याचें व हातमागांवर रेशमी व सुती कापड विणण्याचे कारखाने आहेत.

**निंगपो**—चीन देशांतील एक मुख्य बंदर. चेख्यांग प्रांतांतील व्यापाराचें मुख्य शहर. उत्तर अक्षांश २९°४९' व पूर्व रेखांश १२१' ३५'. १८४२ सालांतील नानकिंगच्या तहान्वयें निंगपो बंदर परराष्ट्रीय व्यापारास खुलें केलें गेलें. शहर व आजूबाजूचीं खेडीं मिळून एकंदर लोकसंख्या ४ पासून ५ लाखापर्यंत असावी. शहराभोंवतीं एक भिंत आहे. शहरांत टिएन फेंगटा अथवा निंगपो नांवाचें मंदिर आहे. याला चवदा मजले आहेत. निंगपोच्या मधल्या भागांत 'ड्रम टॉवर' (नगारखाना) नांवाचा १५ व्या शतकापूर्वीचा एक बुरूज आहे. रेशीम, कापड सतरंज्या, गालीचे, लांकडी सामान, गवती टोप्या येथें तयार होतात. गवती टोप्या, गवती चटया, संघु, चिनी औषधें, व मासे येथून परदेशांत जातात. चेनहाई शहर घेतल्यावर ब्रिटिश फौजेनें निंगपो काबीज केलें (१८४१); तसेंच स. १८६४ त तैपिंगाच्या ताब्यांत हें शहर सहा महिने होतें.

**निघासन**—संयुक्त प्रांतांतील खेरी जिल्ह्यांतील ईशान्येकडील एक तहशील. क्षेत्रफळ १२४२ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) २९००८७. यांत एकंदर ४०३ खेडीं आहेत. धौरहरा हें तहशिलीचें मुख्य ठिकाण असून निघासन हें एक खेडें आहे. या तहशिलींत एकंदर २९३ चौरस मैल क्षेत्रफळाचें जंगल आहे. पश्चिमेस सार्दा किंवा चौका असून पूर्वेस कारिआला आहे. मोठ्या पुरानें हा प्रदेश वाहून जाण्याचा फार संभव आहे. शिवाय मोहन, दहावर, सरजु नांवाच्या मोठ्या नद्या आहेत.

**निजामअल्ली**—हा निजामुल्मुल्क असफजाहचा चवथा मुलगा. हा सलाबतजंग (याचा वडील भाऊ) गादीवर असतांना वऱ्हाडचा सुभा होता (१७५६). तिकडे त्यानें मराठ्यांनां वऱ्हाडांतून हांकलण्याचा प्रयत्न केला पण जानोजी भोंसल्यानें त्याचा पराभव करून साठचाळीसचा (६० रु. भोंसल्याचे व चाळीस निजामाचे) प्रत्यतें तह केला. यावेळींच निजामअल्ली व त्याचे भाऊ यांचे तंटे लागले. ही संधि पाहून पेशव्यांनीं विश्वासराव व शिंदे यांस औरंगाबादेवर पाठविलें व स्वतः शिंदखेडावर गेले. साखरखेडें येथें मोठी लढाई होऊन तींत निजामअल्लीचा पराभव झाला व पेशव्यांस २५ लक्षांचा प्रांत मिळाला (जानेवारी १७५८). सलाबतमुळें फ्रेंचांचें महत्त्व निजामाच्या दरबारीं फार माजलें, तें नाहींसें करण्यासाठीं शहानवाझ, निझामअल्ली वगैरे मंडळींनीं कट केला; त्यावेळीं बुसीचा दिवाण हैदर यानें निजामअल्लीस पकडण्याचा बेत केला असतां, त्यानें हैदरचा खून केला व आपण बऱ्हाणपुरास गेला (१७५८). तेथें राहून व तें गांव लुटून त्यानें फौज जमविली, तेव्हां बसालतजंगाच्या (निजाम अल्लीचा धाकटा भाऊ) चिथावणीनें जानोजी भोंसल्याच्या व निजामअल्लीच्या लढाया सुरू होऊन, शेवटीं भोंसला पराभव पावला.

पुढें सलाबत हा मद्रासेकडे गेल्याचें पाहून निजामअल्लीनें औरंगाबाद घेऊन हैदराबादेस प्रयाण केलें, त्याबरोबर सलाबत परत आला. त्यानंतर तिघां भावांत वरीच भांडणें होऊन, अखेर निजामअल्ली हा सलाबतचा कारभारी बनला (१७५९). हळू हळू निजामअल्लीनें सलाबतची सत्ता बळकावून (१७६१) त्यास नामधारी केलें; पुढें त्याला कैदेंत टाकून व वर्षभरानें त्याचा खून करून तो स्वतः गादीवर बसला (जून १७६२) व निजाम बनला. यानेंच हैद्राबाद ही राजधानी केली.

या सुमारास निजामानें थोरल्या माधवराव पेशव्याविरुद्ध राघोबादादानां मदत केली. त्याबद्दल चार किल्ले व ५१ लाखांचा मुलूख त्याला देण्याचें ठरलें होतें. पुढें त्यानें विठ्ठल सुंदर या दिवाणाच्या सल्ल्यानें असंतुष्ट मराठे सरदार मिळवून, पेशव्यांवर स्वारी केली; परंतु राक्षसभुवनाच्या लढाईत त्याचाच पराभव झाला, तरी पण राघोबादादांनीं आपल्या लगामीं ठेवण्यासाठीं १० लाखांचा प्रांत त्याला परत दिला (१७६३). फ्रेंचांचा पराभव झाल्यामुळें त्यांच्या ताब्यांतील उत्तर सरकारमधील पांच जिल्हे निजामास परत मिळाले. हैदर व मराठे हे डोईजड झाल्यानें त्यांचा नाश करण्यासाठीं त्यानें गुप्तपणें इंग्रजांशीं (त्यांच्याच उत्तेजनावरून) तह करून, त्या मोबदला वरील प्रांत सालीना ७ लक्ष रु. खंडावर त्यांनां दिले (१७६६). पुढें निजाम व इंग्रज या दोघांनीं हैदरावर स्वारी केली, पण निजाम थोड्याच दिवसांत हैदरास मिळाला; कांहीं दिवसांनीं त्यालाहि सोडून निजाम पुन्हां इंग्रजांस मिळाला. त्यावेळच्या तहानें कर्नाटक बालेघाट प्रांताची दिवाणी इंग्रजांनां मिळाली. व त्याबद्दल सालीना ७ लक्षांची खंडणी त्यांनीं निजामास देण्याचें कबूल केलें (१७६८). पुढील सालीं निजामानें पेशव्यांस भोंसल्यावरील स्वारींत मदत करून तीन लाखांचा मुलूख मिळविला (१७६९).

नारायणराव पेशव्यांच्या वधाचा फायदा घेऊन यानें सैन्य जमविलें, तेव्हां राघोबादादांनीं याच्यावर स्वारी करून बेदरजवळ याचा पराभव केला व त्याचा २० लाखांचा प्रांत घेतला. परंतु यानें त्यांची समक्ष भेट घेऊन व आर्जवी भाषणें

करून तो सर्वच मुलूख परत मिळविला (१७७३). बारभाईंनां मिळून यानें दादानां त्रास दिला व त्याबद्दल बारभाईंकडून १३ लाखांची जहागीर मिळविली ( १७७४ ). नंतर दादानां मिळण्याचें भय दाखवून यानें त्यांच्याकडून आणखी १८ लाखांची जहागीर मिळविली.

यानें भोसल्यांच्या गृहकलहांत पडून साबाजीचा पक्ष घेतला होता. साबाजी मेल्यावर यानें मुधोजीवर स्वारी केली व त्याचा बराच प्रांत काबीज केला, परंतु एलिचपुरास मुधोजीची समक्ष गांठ पडल्यावर त्यानें तो त्यास परत देऊन त्याचा स्नेह संपादिला (१७७५-७८).

मद्रासकर इंग्रजांनीं बसालतजंगास (त्याच्याशीं तह करून) आपल्या पंखाखालीं घेतलें(१७७९),तेव्हां इंग्रजांनीं निजामाविरुद्ध हैदर व मराठे यांच्यांशीं संगनमत करण्याचा घाट घातला; त्यामुळें कलकत्तेकरांनीं मद्रासकरांचा वरील तह रद्द केला ( १७८० ). तेव्हां त्याचा राग थोडा शांत झाला, तरी सुद्धां वडगांव येथें इंग्रजांचा पराभव झाल्यापासून तो त्यांच्याशीं चढेलपणानें वागत असे. पुढें निर्मळच्या जहागिरदारानें एक मोठें बंड उभारल्यानें निजाम घाबरला व मग मराठ्यांची मदत घेऊन त्यानें तें मोडलें ( १७८४ ). टिप्पूवर स्वारी करण्यासाठीं ( १७८४ ) नाना फडणवीस व निजाम यांची यादगीर येथें भेट होऊन स्वारीचा मनसुबा पक्का ठरला. मराठ्यांच्या निजामाकडील चौथाईचा तंटा नाहींसा करण्यासाठीं ही भेट आहे, असें बरवर उठविलें होतें. इतक्यांत टिप्पूनें चढाई करून निजामाच्या विजापूर प्रांताकडे गडबड सुरू केली. पेशव्यांस यावेळीं अंतस्थ अडचणीमुळें टिप्पूवर स्वारी करण्यास सवड झाली नाहीं, त्यामुळें निजामानें टिप्पूशीं समेट केला.

पुढील सालीं टिप्पूवर मराठे व निजाम स्वारीस निघाले. यादगीर येथें निजाम व नाना यांची पुन्हां मुलाखत होऊन, निजाम परत फिरला ( १७८६ ). टिप्पूचा पराभव होऊन त्याच्याशीं झालेल्या तहांत ठरल्याप्रमाणें निजामास त्याची वांटणी मिळाली ( १७८७ ).

बसालतजंग मागेंच वारला ( १७८२ ) होता. तो वारल्यावर उत्तरसरकारपैकीं गंतूर जिल्हा इंग्रजांनीं (१७६२ त) ठरल्याप्रमाणें मागितला, म्हणून निजामानें तो त्यांस दिला ( १७८८ ).टिप्पू, मराठे व इंग्रज या तिघांपैकीं, प्रसंगीं वाटेल त्याची कास धरून निजाम आपला फायदा करून घेई व प्रत्येकाला भुलथापाहि देई. त्याचा दिवाण मीर कासीम याचा ओढा इंग्रजांकडे असे व निजामाचा साधारपणें टिप्पूकडे असे. गंतूर दिल्यावर निजामानें कॉर्नवालीस यास सांगितलें कीं, १७६८ च्या तहाप्रमाणें त्यानें आपल्यास टिप्पूवरील स्वारीसाठीं २ पलटणें व ६ तोफा पुरवाव्या.टिप्पूचें शल्य नाहींसें करण्यास इंग्रज उत्सुक असल्यानें, कॉर्नवालीस यानें पर्यायानें निजामाची मागणी कबूल केली. इकडे निजामानें टिप्पूशींहि संधान बांधलें; परंतु टिप्पूनें त्याच्या मुलीची मागणी केल्यानें निजाम चिडून इंग्रजांस टिप्पूविरुद्ध कायमचा मिळाला ( १७८९ ).

या सुमारास निजामानें कॉर्नवालीस यास सांगितलें कीं, मराठ्यांची पुष्कळ वर्षांची चौथसरदेशमुखी आपल्याकडे तुंबली आहे, ती आपणांस देण्यास सवड नाहीं, तरी या कामीं ती माफ करविण्यास मदत करावी. परंतु कॉर्नवालीस यास यावेळीं मराठ्यांची जरूरी असल्यानें, त्यानें तें नाकारलें; फक्त मध्यस्थी करण्याचें कबूल केलें. यानंतर मराठे, इंग्रज व निजाम या तिघांनीं मिळून टिप्पूवर स्वारी केली ( १७९० ). टिप्पूचा पराभव होऊन, निजामच्या वांटणीस गुत्ती, कडाप्पा वगैरे प्रांत व १ कोटी १० हजार रु खंडणी आली ( १७९२ ).

यानंतर मराठ्यांनीं आपल्या चौथाईची दोन कोटींच्या बाकीची मागणी निजामाकडे केली, परंतु त्यानें ती दिवसगतीवर टाकली. इतक्यांत महादजी शिंदे वारला ( १७९४ ); तेव्हां मराठे दुर्बल झाले असें समजून त्यानें त्यांच्या वकिलाची, नाना फडणवीस व पेशवे यांची थट्टा करून उपमर्द केला व आपली कवायती पलटणें दोन होतीं त्यांची संख्या तेवीस केली. त्यामुळें पेशवेहि युद्धास तयार झाले. अखेर खर्ड्यास लढाई होऊन तींत निजामाचा सपशेल पराभव होऊन, मराठ्यांच्या सर्व अटी त्यास कबूल कराव्या लागल्या ( खर्डे पहा ).

या अपमानामुळें निजामाचा इंग्रजांवर राग होऊन, निजामानें त्यांच्या२ पलटणी हांकलून दिल्या व त्याचबरोबर आपलें ५० हजार घोडदळहि कमी केलें; मात्र रेमंडचीं पलटणें वाढविलीं. यावेळीं निजामाचा वडील पुत्र आलीजाह यानें बापाविरुद्ध बंड उभारलें; त्याला वरील ५० हजार घोडदळ मिळालें. टिप्पूहि त्यास मदत देण्यास तयार झाला, त्यामुळें त्याचा पक्ष जोरांत आला. बेदर व आणखी बरेचसे किल्ले त्यानें घेतले ( १७९५ जून ). परंतु रेमंडनें मराठ्यांच्या साहाय्यानें त्याचा पाठलाग करून औरंगाबादेस त्याला तोंड देऊन व त्याचा पराभव करून पकडलें. पुढें त्यास हैद्राबादेस आणीत असतां त्यानें वाटेंतच विष खाऊन आत्महत्या केली.

यापुढें नाना फडणवीस यानीं महाडचें कारस्थान करून रावबाजीस पेशवे करण्याचें ठरविलें, त्यावेळीं खर्ड्याच्या तहांतील मुलूख व खंडणी यांची सूट, चौथाई बाकीची सूट वगैरे अटींवर निजाम हा नानांस अनुकूल झाला होता ( १७९६ ). तसेंच त्यानें त्यावेळीं दौलतराव शिंद्याशीं, नानांस त्यांच्या अटी पाळवयास भाग पाडण्याबद्दल दुसरा एक गुप्त करार केला. रावबाजीनेंहि निजामाशीं परस्पर मदतीचा एक तह करून, त्यास ८ लाखांची जहागीर दिली ( १७९८ जुलै ); पण थोड्याच दिवसांत निजामानें तो मोडला. याच सालीं इंग्रजांनीं निजामाकडून आपला तैनातीफौजेचा तह करवून, त्याच्यावर आपला दाब बसविला. सहा हजार इंग्रजी लष्कराबद्दल २४१७१०० रुपये सालिना

निजामाकडून घेण्याचें व त्याचा पेशव्यांशीं तंटा उपस्थित झ ल्यास आपण मध्यस्थी करण्याचें ठरविलें ( सप्टें. १७९८ ).

टिप्पूवरील शेवटच्या स्वारींत निजामानें इंग्रजांस उत्तम मदत केली ( १७९९ ). त्यामुळें टिप्पूच्या ३०४०००० होनांच्या मुलुखापैकीं, फक्त ५३०००० चा प्रांत निजामास मिळाला; शिवाय पेशव्यांच्या वांटणीपैकीं १॥। लाखांचा आणखी मिळाला. परंतु पुढें ( आक्टोबर १८०० ) इंग्रजांनीं त्याच्याशीं आणखी एक तह केला; त्यांत परक्यांपासून त्याचें रक्षण करण्याचें इंग्रजांनीं पत्करिलें व त्यासाठीं पूर्वीच्या सहा पलटणींत आणखी दोन पलटणींची व एका घोडदळाची भर घातली व त्यांच्या खर्चासाठीं ( १७९२ आणि १७९९ मिळून ) टिप्पूकडून दोनदां मिळालेला वांटणीचा सर्वच्या सर्व मुलुख कायमचा मागून घेतला. याप्रमाणें निजाम हा सर्वस्वी इंग्रजांच्या हातांत गेला. यानंतर निजामअल्ली फार दिवस वांचला नाहीं; तो सं.१८०२ च्या आगष्टांत हैद्राबादेस बराच वृद्ध होऊन मेला. त्याच्या मागून त्याचा मुलगा सिकंदरजाह हा निजाम झाला.

निजामअल्ली सर्व निजामांत शहाणा व मुत्सद्दी असल्यानें मराठ्यांच्या प्रचंड सामर्थ्यापासून वांचला. त्याच्या दोन्ही बाजूंस नागपूर व पुणेंकर मराठे आणि इतर बाजूंस हैदर व इंग्रज असे होते. त्यामुळें त्याला सर्वांशीं मोठ्या दूरदर्शीपणानें वागावें लागे. वेळ पडेल तसें चढाई करून अथवा पड घेऊन त्यानें आपलें राज्य राखलें. पेशवे-भोंसले भांडणाप्रमाणेंच पेशव्यांच्या गृहकलहांतहि त्यानें भाग घेतला होता. नाना फडणवीस वारल्यानंतर मुत्सद्दीपणाचा पाठिंबा देण्यासारखा माणूस कोणी न राहिल्यानें निजामअल्ली इंग्रजांच्या जाळ्यांत सांपडला. [ वऱ्हाडचा इतिहास; नागपूरकरांची बखर; पेशव्यांची बखर; डफ; राजवाडे खंड, २, ४, ५, ६, ७, १४; खरे-ऐ. ले. सं. भा. ६--१०. ]

**निजामउल्मुल्क**---याचें मूळचें नांव कमरुद्दीन; याचा बाप शहाबुद्दीन म्हणून औरंगझेबाचा सरदार होता. त्याच्या हाताखालीं तुर्की मोंगलांचें छोटेसें सैन्य असे. तो औरंगझेबाबरोबर दख्खनमध्यें आला होता ( १६८४ ). त्याची व संभाजी छत्रपतीच्या सैन्याची रायगडाजवळ निजामपुरीं एक छोटीशी लढाई होऊन तींत त्यास जय मिळाल्यानें त्याला औरंगझेबानें गाझीउद्दीन हा किताब दिला (१६८५).

विजापूरच्या वेढ्यांत गाझीनें आयत्यावेळीं अझीमशहास रसद पोहोंचवून त्याची उपासमार थांबविली व शेवटीं विजापूरहि गाझीच्याच मार्फत खालसा झालें. यामुळें औरंगझेबाची मर्जी त्याच्यावर फार बसून ( १६८६ ), मराठ्यांनीं जेव्हां वऱ्हाडांत धुमाकूळ घातला तेव्हां त्यानें गाझीलाच वऱ्हाडची सुभेदारी दिली ( १७०५ ) होती. ( 'गाजीउद्दीनखान' पहा ).

कमरुद्दिनास १३ व्या वर्षी औरंगझेबानें १०० स्वारांचें पथक व चिनकुलीचखान ही पदवी दिली.त्याच्या अखेरच्या काळांत हा विजापूरकडे सुभेदार होता. सय्यदबंधूंनां, फर्रुकसियर यास गादीवर बसविण्याच्या कामीं यानें मदत केली ( १७१२ ); त्यावेळीं याला गाझीउद्दीन, फिरूजजंग या पदव्या मिळाल्या. याचें व दख्खनचा सुभेदार झुलफिकारखान याचें वांकडें होतें; त्याच्या खुनानंतर दख्खनच्या सुभेदारीवर याचीच नेमणूक होऊन यास खानखानान निजामउल्मुल्क बहादूर हा किताब मिळाला ( १७१३ ). तो दख्खनमध्यें आल्यावर त्याला असंतुष्ट मराठे सरदार ( चंद्रसेन जाधव, सर्जेराव घाटगे, रंभाजीराव निंबाळकर वगैरे ) येऊन मिळाले. त्यांनां आश्रय देऊन त्यानें कोल्हापूरकर संभाजीचा पक्ष उचलून धरला, आणि शाहूच्या सरदारांवर सैन्य धाडलें. मराठ्यांनां चौथाई घेऊं द्यावयाची नाहीं ही त्याची प्रथमपासून इच्छा होती. परंतु शेवटीं मराठे व निजाम यांच्यांत सलोखा होऊन युद्ध थांबलें ( १७१३ ). तरीपण त्यानें पुण्यावर आपला अंमल थोडे दिवस बसविला होता. फार दिवस इकडे राहिल्यानें दख्खनचे सर्व रीतीरिवाज, माहिती व राजकारण त्यास माहीत होतें.

दख्खनची सुभेदारी १७ महिने केल्यावर बादशहानें त्यास उत्तरेकडे मुरादाबादेस नेमून, दख्खनवर हुसेनअल्लीस नेमिलें ( १७१५ ). निजामानें १७ महिन्यांत दक्षिणेंत पुन्हां औरंगझेबशाही उपस्थित केली होती. पण पेशव्यांनीं ती पुढें मोडली. निजामानें मुरादाबादेकडील जमीनदारांची बंडाळी मोडल्यानें व सय्यदबंधूंच्या शिफारशीवरून बादशहानें त्याला बहारच्या व नंतर माळव्याच्या सुभेदारीवर पाठविलें. निजाम हा धूर्त असल्यानें बापाप्रमाणेंच वारा वाहील तशी पाठ देणारा होता. यावेळीं तो सय्यदबंधूंस आपण पूर्ण अनुकूल आहों असें दाखवीत होता ( १७१९ ). पेशवा सय्यदांच्या साहाय्यासाठीं दिल्लीस यावेळीं गेला असतां निजामानें त्याला भाईचारा केला होता.

पुढल्या सालीं ( १७२० ) दिल्ली येथील गडबडीचा फायदा घेऊन, दख्खनमध्यें स्वतंत्र होण्याचें ठरवून ( कारण सय्यदबंधू हे त्याला स्वतंत्र होऊं देत नसत) निजामानें १२ हजार सैन्यासह माळव्यांतून निघून नर्मदा उतरून थोड्याच काळांत लांचलुचपतीनें व कारस्थानानें असीरगड, बऱ्हाणपूर, आणि खानदेश हे प्रांत काबीज केले. यावेळीं माळव्याचा नायब सुभेदार दिलावर याच्या जवळ सय्यदबंधूंचें कांहीं सैन्य असून, औरंगाबादेचा नायबसुभा आलमअली याच्याजवळहि त्यांचें थोडेसें सैन्य होतें. निजाम उघड उघड आपल्याविरुद्ध बंडखोर झाल्याचें पाहून सय्यदबंधूंनीं आलम व दिलावर यांनां त्याचा नाश करण्यास सांगितलें; त्याप्रमाणें दिलावर त्याच्यावर चालून आला. त्याच्या तोंडावर थोडी फौज पाठवून व तो गाफील आहे असें पाहून निजामानें त्याच्यावर खांडवा येथें अचानक छापा घालून त्यास ठार मारिलें (१७२० जून). आलमअल्लीनें मराठ्यांच्या (दाभाडे, भोंसले, निंबाळकर) साहाय्यानें वऱ्हाडांत निजामाशीं

बाळापुरास लढाई दिली; परंतु तींत उतावीळपणानें त्याचा पराभव होउन तो ठार झाला (आगष्ट १७२०). ही बातमी दिल्लीस गेल्यावर तेथें राज्यक्रांति होऊन सय्यदबंधूंचे खून होऊन बादशहा स्वतंत्र बनला. या बनावास मूळ कारण निजामच होता, व बादशहाचीहि त्याला अनुमति होती. म्हणून पुढें बादशहानें त्याचा सन्मान करून त्याला दख्खन व माळव्याचा सुभेदार केलें. पुढें वझीर अमीरखान मेल्यावर तर निजामास असफजाह किताबासह वझिरीहि मिळाली; परंतु दख्खनमधील गडबडीमुळें स. १७२२ (जानेवारी) पर्यंत तो दिल्लीकडे गेला नाहीं.

मध्यंतरी त्यानें मराठ्यांशीं बचावाचें धोरण ठेविलें होतें. सय्यदांचा निकाल लागण्यापूर्वी कोल्हापूरकर व सातारकर यांच्यांशीं त्यानें दोस्ती केली होती व त्यांच्या चौथाईस त्यानें हरकत घेतली नाहीं. पुढें सय्यद गेले. बाळाजी विश्वनाथहि वारला, तेव्हां मात्र यानें गडबड चालवून सातारकरांच्या चौथाईस हरकत घेतली. इतक्यांत मराठे गंगथडीवर जमले व महंमदशहानें दिल्लीहून मराठ्यांस नवीन फर्मानेंहि ( चौथ सरदेशमुखीचें ) दिलें, त्यामुळें त्यानें माघार घेतली ( १८२१ ) व चिखलठाण येथें बाजीरावाची भेट घेऊन सलोखा केला. यावेळीं त्याचें बस्तान नीट बसलें नव्हतें त्यामुळें मराठ्यांशीं भांडण्याचें त्याला सामर्थ्य नव्हतें. आपल्या स्वतंत्र सत्तेच्या आड ते आले नाहींत म्हणजे पुरे, मग वाटल्यास त्यांनीं बादशाही मुलुखावर खुशाल स्वारी करावी, असें त्यानें धोरण ठेवून शाहू, पेशवे व त्याचे सरदार यांच्याशीं आपली वागणूक ठेविली;त्याबरोबरच आपल्या फायद्यासाठीं मराठ्यांतील अंतःकलहास तो मदतहि करीत होता. नंतर दिल्लीस आपलें वजन बसविण्यासाठीं इकडील कामें उरकून तो तिकडे गेला ( १७२२ ).

दिल्लीस दरबारांतील गोंधळ मोडून औरंगझेबी शिस्त लावण्याचा प्रयत्न निजामानें चालविला, परंतु तो विलासी बादशहास आवडला नाहीं, म्हणून त्यानें याला गुजराथेच्या सुभेदारीवर पाठविलें. यानें तेथील माजी सुभेदार हैदरकुली यास त्याची फौज फितूर करून पिटाळून लाविलें. हैदरास आंतून बादशहाची फूस होती. गुजराथेंतील धोलका, भडोच वगैरे पांच परगणे स्वतःस जहागीर ठेवून आपल्या तर्फें आपला चुलता हमीद यास आपल्या अमदाबादेस सुभेदार म्हणून व भाऊ अझीमउल्ला यास माळव्याचा सुभेदार म्हणून नेमून निजाम दिल्लीस परतला ( १७२३ ). परंतु तेथें त्यास कंटाळा येऊन त्यानें वझिरीचा राजीनामा दिला आणि बादशहास न विचारतां शिकारीच्या निमित्तानें दिल्ली सोडून तो दख्खनकडे निघाला.

यामुळें बादशहास राग येऊन त्यानें हैद्राबादच्या मुबारीझ नांवाच्या सुभेदारास निजामास अटकाव करण्याबद्दल गुप्त हुकूम पाठविला. निजामाच्या डोईजडपणास बादशहा कंटाळला होता व सय्यदांसारखाच त्याचाहि नाश करण्यास पहात होता. पण साकरखेडच्याच्या लढाईंत निजामानें मराठ्यांच्या साहाय्यानें मुबारीझला ठार केलें व गोवळकोंडा, हैद्राबाद वगैरे ठाणीं घेतलीं ( १७२४ आक्टोबर ). यामुळें बादशहानें गुजराथ व माळवा येथील निजामाच्या सुभेदाऱ्या काढून घेऊन, सरबुलंद व राजा गिरधर यांस तेथें अनुक्रमें सुभेदार नेमिलें.

निजामाच्या मनांत आपली राजधानी औरंगाबादेहून हलवून हैद्राबादेस न्यावयाची होती,त्यासाठीं त्यानें प्रतिनिधीमार्फत शाहूशीं बोलणें लाविलें कीं, हैद्राबाद व त्या सभोवतालच्या प्रांताच्या चौथाईबद्दल मराठ्यांनीं नक्त रक्कम ध्यावी व इंदापूरजवळ कांहीं गांवें जहागीर घेऊन उपर्युक्त प्रांतावरील आपली सरदेशमुखीहि सोडावी ( १७२७ ); परंतु हें बोलणें बाजीराव पेशवे यांनीं फेटाळून लाविलें. पुढें पेशवे-प्रतिनिधि व शाहु-संभाजी यांचा वाद चाललेला पाहून, निजामानें सरदेशमुखी व मोकासाबाब या बाबी दोन छत्रपतींच्या वारसांच्या हक्कांचा निकाल लागेपर्यंत आपण कोणांसच देत नाहीं असें जाहीर केलें व शाहूच्या राज्यावर वारंवार स्वाऱ्या सुरू केल्या;तेव्हां शाहूनें बाजीरावास त्याच्यावर पाठविलें. निजामानें चंद्रसेन जाधव व संभाजीची मदत घेतली होती; तरी पण पेशव्यानीं त्याला हैराण करून व अखेर त्याची उपासमार करून त्याचा सपशेल पराभव केला. त्यामुळें त्यानें तह करून, संभाजीचा पक्ष सोडणें, शाहूच्या सर्व बाबींचा फडशा करणें व त्याचे हक्क पुढें बिनहरकत वसूल होतील यासाठीं कांहीं किल्ले शाहूच्या ताब्यांत देणें, या गोष्टी कबूल केल्या(१७२८) याप्रमाणें बाजीरावास पहिलीं सात आठ वर्षे निजामाच्या भानगडी मोडण्यांत घालावीं लागलीं (१७२२-२८).

बाजीरावाविरुद्ध त्रिंबकराव दाभाड्यास निजामानें मदत केली होती ( १७३१ ). वास्तविक पेशव्यांविरुद्ध दाभाड्यास त्यानेंच उभें करून पेशव्यांचा पाडाव करण्याचें कारस्थान रचिलें होतें, त्यामुळें डभईच्या लढाईनंतर त्यानें बाजीरावाचा राग शांत करून, त्यास माळवा ताब्यांत घेण्याची सल्ला दिली. यावेळीं बादशहा हतवीर्य झाला होता, त्याच्या भोंवतीं हलकट लोक जमले होते, बाजीरावास जिकडे तिकडे जय मिळत होता, त्यानें मनांत आणलें असतें तर बादशहाकडून त्याला सहज दख्खनची सुभेदारी मिळवितां आली असती, या सर्व गोष्टी लक्ष्यांत घेऊन व आपण स्वतः आतांपर्यंत बादशहाचे अनेक अपराध केले आहेत, हें ध्यानांत ठेवून, यावेळीं निजामानें बाजीरावाशीं संगनमत केलें. पुढें मल्हारबा होळकरानें आग्र्याच्या पलीकडेहि स्वाऱ्या केल्यानें घाबरून महंमदशहानें निजामास दिल्लीस बोलाविलें; परंतु बादशाही जितकी कुमकुवत होईल तितकें आपणांस फायदेशीर होईल या उद्देशानें तो तिकडे गेला नाहीं (१७३५); शिवाय मराठ्यांशीं भांडण्याचें सामर्थ्य त्याला यावेळीं नव्हतें.

निजाम येत नाहींसें पाहून खानडौरान या वजिरानें, मराठ्यांनां त्याच्याकडून फोडण्यासाठीं दख्खनच्या सर्व सुभ्यांत सरदेशपांडेपणाचे हक्क देऊं केले ( १७३६ ); त्यामुळें तो दिल्लीस जाण्यास कबूल झाला. बादशहानेंहि त्याला पुन्हां गुजराथ व माळव्याची सुभेदारी देऊं केली; मात्र मराठ्यांनांच या दोन्ही प्रांतांतून त्यानें हांकलून द्यावें असें बादशहाचें म्हणणें होतें. त्यामुळें त्यानें सैन्य जमवून मराठ्यांनां गुजराथेंतून हांकलण्याची तजवीज जारीनें चालविली. तेव्हां बाजीरावानें त्याला भोपाळजवळ कोंडून व पाणी मिळण्याचीहि पंचाईत पाडून, तह करावयास भाग पडलें ( फेब्रु. १७३८ ), पण या तहांत निजामानें स्वतःच्या पदरास मात्र खार लागूं दिला नाहीं. नादीरशहाच्या स्वारीच्या वेळीं हा दिल्लीस असून महंमदशहातर्फे लढला होता.

यानंतर, दीड वर्ष झालें तरी ठरल्याप्रमाणें आपल्या माळव्याच्या सनदा मिळत नाहींत व निजामहि दिल्ली सोडीत नाहीं, असें पाहून बाजीरावानें निजामाच्या मुलुखावर स्वारी केली ( १७३९ ), आणि नासीरजंगाला ( निजामुल्मुल्क याचा मुलगा ) औरंगाबादेस कोंडून त्याच्या राज्यांत उच्छाद मांडला; तेव्हां नासीर शरण येऊन मुंगीपैठणचा तह झाला ( १७४० ). या तहानें पेशव्यांस हांडेप्रांतांत जहागीर मिळाली. या सुमारास निजाम हा दिल्लीस होता, व त्याला बादशहानें अमीरउल्उमरा हा किताब दिला होता. इतक्यांत नासीरजंग हा आपल्याविरुद्ध बंड करीत आहे, असें ऐकून निजामानें आपला वडील मुलगा गाझीउद्दीन त्याजवर वझिरी सोंपवून तो दख्खनकडे निघाला ( १७४१ जाने. ). इकडे येऊन निजामानें मराठ्यांच्या साहाय्यानें नासीरचें बंड मोडलें ( जुलै ) व कांहीं दिवस त्याला कैदेंत ठेवून नंतर सोडून दिलें ( नासीरजंग पहा ).

या सुमारास मराठे बंगालच्या राजकारणांत गर्क झालेले पाहून, निजामानें कर्नाटकांत आपले हातपाय पसरण्यास सुरवात केली. यावेळीं अर्काटच्या सफदरअलीचा खून होऊन ( १७४२ ) तिकडे सर्व गोंधळ माजला होता, ही संधि साधून बरोबर मोठें सैन्य घेऊन निजाम कर्नाटकांत गेला ( १७४३ जाने. ) व तेथें त्यानें आपल्या योजनेप्रमाणें सर्व व्यवस्था केली. मुरारराव घोरपड्याचे गुत्तीचे हक्क कबूल करून व त्याला गप्प बसवून त्रिचनापल्ली घेतली ( आगष्ट ). तसेंच पेशव्यानीं आपल्या राज्यावर स्वारी करूं नये, म्हणून त्यानें बादशहाकडून पेशव्यांनां माळव्याच्या सनदा मिळवून देण्यांत मदत केली.

इतक्यांत सातार्‍यास पेशवे, गायकवाड व भोंसले यांच्या फौजा जमलेल्या पाहून, आपल्या राज्याबद्दल काळजी वाटून आणि अन्वरुद्दीन यास कर्नाटक पैनघाटाचा व आपला नातु मुजफर यास कर्नाटक बालेघाटाचा कारभार सोंपवून निजाम हैद्राबादकडे वळला ( १७४४ फेब्रु. ), परंतु मराठे त्याला त्रास देत नाहींत असें पाहून, त्यानें आपल्या राज्यांतील बंडखोरांचें पारिपत्य केलें. पुढें ( १७४७ ) निजामानें सुरतेकडे हालचाल केल्यानें पेशव्यानीं त्याच्यावर स्वारी करून आसुंबरी येथें त्याचा पराभव केला.

निजामउल्मुल्क हा ७७ वर्षांचा होऊन बर्‍हाणपूर येथें मरण पावला ( १७४८ ). त्याला गाझीउद्दीन, नासीरजंग, सलाबतजंग, निजामअली, बसालतजंग व मीरमोगल असे सहा पुत्र व दोन मुली होत्या. पैकीं एका मुलीचा मुलगा मुज्फरजंग याच्यावर त्याचें फार प्रेम होतें. निजामाची कबर बर्‍हाणपुरासच आहे. हा कवि होता असें म्हणतात; टिप्पूच्या ग्रंथसंग्रहालयांत "दिवाण आसफ निजामउल्मुल्क" नांवाचा जो काव्यग्रंथ सांपडला, तो याचाच होय, असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. औरंगझेबानें मराठ्यांचा संपूर्ण उत्खात करण्यासाठीं वीस वर्षें घालविलीं, त्यावेळीं त्या तालमींत निजाम हा तयार झाला होता; म्हणून याच्या मनांतहि तोच हेतु अखेरपर्यंत होता; पण पेशव्यांच्या बलापुढें त्याची इच्छा औरंगझेबाप्रमाणेंच सफळ झाली नाहीं. हा बुद्धिमान, शूर, मुत्सद्दी व दीर्घायुषी होता. त्याचा जन्म ११ आगष्ट स. १६७१ त व मृत्यु २१ मे १७४८ रोजीं झाला; मृत्यूसमयीं त्याचें वय ७७ वर्षांचें होतें; डफ म्हणतो १०४ वर्षांचें होतें, हें त्याचें म्हणणें चूक आहे. [ आयर्व्हिन; एलफिन्स्टन; डफ; राजवाडे खंड २,३,६,८; भारतवर्ष शकावली; शाहूचें चरित्र व डायरी; बाळाजी बाजीराव डायरी; का. सं. पत्रें, यादी; मासीर–उल्–उमरा; मनुची; मराठी रियासती २,३. ]

**निजामशाही, अहमदनगरची ( १४८९–१६३७ ),**

मलिक अहमद.—हा अहमदनगरच्या निजामशाही घराण्याचा मूळ पुरुष होता. याचा आजा बहिरंभट नांवाचा ब्राह्मण असून तो गोदेच्या उत्तरेस वर्‍हाडांतील पाथरी नांवाच्या शहराचा देशपांडे होता. दुर्गादेवीच्या दुष्काळांत याचा आजा आपल्या तिमाजी नांवाच्या मुलास घेऊन विजयानगराकडे गेला. बहामनी सुलतान अहमदशहा वली याच्या शिपायांनीं विजयानगरच्या स्वारींत तिमाजीस कैद केलें व गुलाम म्हणून सुलतानाकडे आणलें. सुलतानानें त्यास मुसुलमानी धर्माची दीक्षा दिली व त्यानें मलिकनायन नांव ठेवलें ( १४६० ). पुढें सुलतान महंमद यानें त्यास आपला कारभारी जो खानेजहान त्याच्या शिफारशीवरून मोठ्या योग्यतेस चढविलें. व त्यास निजाम–उल्मुल्क ही पदवी देऊन तेलिंगणच्या सुभ्याच्या जागीं त्याची नेमणूक केली (१४७०). परंतु निजामउल्मुल्कनें मलिक अहमद नांवाच्या आपल्या मुलास नेमणुकीच्या जागीं पाठविलें, व आपण स्वतः सुलतानाच्या दरबारींच राहिला. येथें त्यानें खानेजहानाविरुद्ध कारस्थान रचून सुलतानाच्या हुकूमानें त्याचा वध करविला व आपण स्वतः कारभारी झाला. यानंतरचा सुलतान जो महंमदशहा त्याच्या कारकीर्दींत निजामउल्मुल्कनें आपला अगोदरच मोठ्या असलेल्या जहागिरींत बीड व दुसर्‍या

कित्येक जिल्ह्यांची भर टाकली, व आपल्या मुलास तेलिंगणच्या सुभेदारीवरून परत बोलावून त्याची दौलताबाद सुभ्यावर नेमणूक केली. निजामउल्मुल्काचा वध झाल्यानंतर त्याचा मुलगा मलिक अहमद यानें बंड करून तो स्वतंत्र झाला ( १४८९ ), व स्वतःस निजामशाहा ही पदवी त्यानें लावून घेतली. तीच पुढें अहमदनगरच्या सर्व राजांनीं लाविली व त्यांच्या राज्यास यामुळेंच निजामशाही असें नांव पडलें. शिवाय मूळ पुरुष बहिरंभट याच्या स्मरणार्थ या वंशांतील प्रत्येक शहा आपल्याला बहिरी अशी पदवी लावून घेत असे.

दौलताबाद सुभ्यावर नेमणूक झाल्यानंतर स्वतंत्र होण्यापूर्वी मलीक अहमद यानें कोंडाणें, शिवनेर, लोहगड, वगैरे पुण्याच्या आसपासचे सर्व किल्ले, व कोंकणांत दंडाराजपुरी पावेतोंचे बरेचसे किल्ले, बंडखोर किल्लेदारांपासून आपल्या कबजांत घेतले; पैकीं शिवनेरी किल्ल्यांत त्याला पुष्कळ द्रव्य सांपडलें. त्यावेळीं तो जुन्नरास राही. त्यानें आपल्या राज्यांत सर्वत्र शांतता केली. त्याच्यावर बहामनी शहानें स्वारी केली असतां उलट त्याचाच पराभव झाला. नंतर अहमदनें अहमदनगर हें शहर वसवून तेथें आपली राजधानी केली ( १४९४ ). पुढें तो १५०८ सालीं मेला. तो सद्गुणी व एकपत्नीव्रतस्थ होता असें फेरिस्ता म्हणतो. द्वंद्वयुद्ध करून तंट्याचा निकाल लावण्याची चाल दक्षिणेंत त्यानेंच पाडली.

पहिला बुऱ्हाणशहा ( १५०८–५३ ).—हा अहमदचा मुलगा ७ वर्षांचा असतांना गादीवर आला. हा विद्वान होता; १० व्या वर्षींच तो फारशींत निबंध वगैरे लिही. इस्माईल आदिलशहाची बहीण याला दिली होती. इस्माईलशीं व वऱ्हाडच्या इमादशहाशीं याचीं युद्धें होऊन त्यांत याचा पराभव झाला. कंवरसेन नांवाचा ब्राह्मण पुष्कळ वर्षें याचा प्रधान होता. त्याच्या हुषारीनें त्याच्या राज्याची भरभराट झाली. त्याच्यामुळें मराठे लोक राजदरबारीं पुढें येऊं लागले व त्यांनां मोठमोठ्या जागा मिळाल्या. पुढें पुढें निजामशाहींत मराठ्यांचा जो प्रसार झाला तो एव्हांपासून होय. संभाजीपंत नांवाचा दुसरा एक ब्राह्मण याचा पराष्ट्रमंत्रि होता. शहा ताहीर नांवाचा एक विद्वान याच्या पदरीं होता, त्याच्या सल्ल्यानें यानें राज्यांत शियापंथाचा जबरीनें प्रसार केला. त्यामुळें सुन्नींनीं दंगा आरंभला. गुजराथ, खानदेश व विजापूर येथील बादशहा सुन्नींनांच मिळाले. तेव्हां बुऱ्हाणनें दिल्लीच्या हुमायूनची मदत मागितली, पण तो अडचणींत असल्यानें ती मिळाली नाहीं. हे धार्मिक तंटे पुष्कळ दिवस चालले. एकदां बुऱ्हाणनें विजयनगरकरांच्या साहाय्यानें आदिलशहावर स्वारी केली. त्याचें बहुतेक आयुष्य लढण्यांत गेलें. तो स. १५५३ त मेला; त्याला ५ मुलें होतीं.

हुसेनशहा पहिला ( १५५३–६५ ).—हा बुऱ्हाणचा वडील पुत्र. हा गादीवर बसल्यानंतर याच्या भावांचा व त्याचा तंटा लागला. विजापूर, गोवळकोंडे, व विजयनगर येथील राजे याच्यावर चालून येऊन त्यांनीं नगरास वेढा दिला. तेव्हां यानें अंगीं सामर्थ्य नसल्यानें त्यांच्याशीं तह केला. त्यानंतर दख्खनमधील सर्व मुसुलमान शहांनीं विजयनगरकरांवर स्वारी करून तालीकोट येथें हुसेनशहाचा व त्याच्या राज्याचा नाश केला ( १५६५ ). या युद्धांत हुसेनच्या तोफखान्यानेंच विशेष कामगिरी केली. लढाईहून परतल्यावर थोड्याच दिवसांत हा मेला; याला बरींच मुलें होतीं. प्रसिद्ध चांदबिबी ही याचीच मुलगी होय. विजयनगरच्या विरुद्ध मुसुलमानी संघ स्थापण्यासाठीं हुसेननें चांदबिबीस आदिलशहास दिलें होतें.

मूर्तुझा पहिला ( १५६५–८६ ).—हा हुसेनचा पुत्र; हा लहानपणीं गादीवर बसला. तेव्हां त्याची आई खुदिजा हीच कारभारी झाली. पुढें तिनें वशिल्याचे लोक कारभारांत नेमल्यानें ती प्रजेस अप्रिय होऊन तिला पकडण्याचा कट झाला. पण तो फुटून तिनें कटवाल्यांस शिक्षा केल्या. इतक्यांत विजयनगरच्या राज्यवांटणीबद्दल मुसुलमान पातशहांत भांडणें जुंपलीं, तेव्हां मूर्तुझानें कारभार आपल्या हातीं घेऊन विजापूरवर स्वारी करून आदिलशहाचा धारूरकिल्ला घेतला; त्यामुळें आदिशहानें तह केला ( १५६९ ). या सुमारास पोर्तुगीजांनीं रेवदंड्याच्या निजामी अधिकाऱ्यास दारू पाजून तें बंदर व किनाऱ्यावरील बरींचशीं ठाणीं बळकाविलीं. त्यावेळीं याचें राज्य बराचसा वऱ्हाड, सर्व दौलताबादसुभा, जालनाप्रांत, खानदेश, बाणकोट ते वसईपर्यंतचें कोंकण इतक्या भागावर पसरलें होतें.

यानंतर आदिलशहानें विजयानगरचें राज्य व निजामशहानें सर्व वऱ्हाडचें राज्य घेण्याचें ठरविलें. या सुमारास वऱ्हाडची गादी तोफलखान नांवाचा एक माणूस बळकावून बसला होता. इमादशाहीबरोबरच बेदरची बेदरशाहीहि जिंकून घेण्याचें मूर्तुझानें आदिलशहाच्या मदतीनें ठरविलें. प्रथम तोफलखान व इमादशहा यांस ठार मारून मूर्तुझानें इमादशाही आपल्या राज्यास जोडली. अकबरानें त्याबद्दल तक्रार केली होती, पण मूर्तुझानें तिकडे दुर्लक्ष्य केलें. खानदेशच्या शहानेंहि आडकाठी घेतल्यानें त्याचा पराभव करून मूर्तुझानें त्यांच्यापासून खंडणी घेतली. बेरीदशहानें आपलें राज्य राखण्याबद्दल प्रथम मूर्तुझाचा दिवाण जंगीझखान यास लांच देण्याचा प्रयत्न केला पण तो प्रयत्न फसला. तेव्हां त्याच्या विरुद्ध मूर्तुझाचे कान फुंकले. त्यामुळें मूर्तुझानें त्याला विषप्रयोग केला. पुढें खरा प्रकार समजल्यावर त्यास वाईट वाटलें व त्यानें सर्व राज्यकारभार एका कारभारीमंडळाच्या हवालीं करून आपण ईश्वरसेवेंत काळ घालवूं लागला. पुढें त्यास वेड लागलें, त्यांत तो आपल्या मिरन नांवाच्या मुलाचा जीव घेण्याचा प्रयत्न करी. पण तो न साधतां मूर्तुझाच अखेरीस वेडांत मेला; कोणी म्हणतात मिरननें त्याचा खून केला.

मि र न श हा (१५८६-८९).—हा मुर्तुझाचा पुत्र; हा फार दुर्व्यसनी होता. याची सर्व कारकीर्द केवळ दरबारी भानगडींतच गेली. राज्यांत दक्षिणी व परदेशी असे पक्ष प्रबळ होऊन दाक्षिणात्यांनीं परदेश्यांची व त्याबरोबरच वजिराची व मिरनशहाचीहि कत्तल केली व मिरनचा चुलत भाऊ इस्माईल यास गादीवर बसविलें (१५८९).

इ स्मा ई ल श हा (१५८९-९०).—मुर्तुझाचा बुऱ्हाण नांवाचा भाऊ होता, त्याचा हा मुलगा; हा प्रथम लोहगडावर कैदेंत होता.हा गादीवर आल्यानंतर दक्षिणी पक्षाचा जमालखान हा वजीर बनला; त्यानेंच याला गादीवर बसविलें होतें. इस्माईलचा बाप बुऱ्हाण हा मार्गेच अकबराच्या आश्रयास जाऊन राहिला होता. त्यानें संधि पाहून अकबराची मदत घेऊन इस्माईलवर स्वारी केली व त्यास कैद करून आणि जमालाला ठार करून गादी बळकावली.

बु ऱ्हा ण श हा दु स रा (१५९१-९४).—हा शियापंथी असल्यानें त्यानें सुनी लोकांचा पुष्कळ छळ केला. रेवदंड्यास पोर्तुगीजवर यानें केलेली स्वारी प्रसिद्ध आहे. तींत बुऱ्हाणचा पराभव झाला. पोर्तुगीजांच्या व याच्या नेहमीं चकमकी होत. हा १५९४ सालीं मेला.

इ ब्रा हीं म श हा (१५९४).—हा बुऱ्हाणचा दुसरा पुत्र; हा दुर्व्यसनी होता. दरबारांत दुफळी होऊन विजापुरकरांशीं युद्ध सुरू झालें त्यांत हा मारला गेला.यानें चार महिने राज्य केलें. याच्या मागून वजीर मियान अंजू यानें अहमद नांवाचा एक मुलगा गादीवर बसविला.

अ ह म द श हा (१५९५).—हा निजामशाहीचा खरा वारस नाहीं असा वाद माजला, तेव्हां अंजूनें दिल्लीकर अकबराचा पुत्र मुराद याच्या मदतीनें नगरास वेढा दिला. या वेळीं अहमदशिवाय आणखी तीन इसम निजामशाही राज्यावर आपला हक्क सांगत होते. त्यास पाठिराखेहि मिळाले होते. पैकीं बहादुर नांवाच्या हक्कदारास चांदबिबीचा पाठिंबा होता. मुरादनें वेढा दिला. त्यावेळीं चांदबिबीनें तो मोठ्या शौर्यानें उठविला. तिच्या मदतीस विजापूर व गोवळकोंड्याच्या फौजा आल्या होत्या (चांदबिबी पहा).

ब हा दु र श हा (१५९५-१६००).—हा इब्राहीमचा पुत्र. चांदबिबीनें याला गादीवर बसवून आपण कारभार हातीं घेतला परंतु महंमद नांवाच्या वजिरानें मुरादास (तिच्याविरुद्ध) पुन्हां बोलाविलें. मोंगलांनीं येतां येतां निजामशाहीचा पुष्कळ प्रांत काबीज केला. चांदबिबीच्या विनंतीवरून गोवळकोंडें व विजापूर येथील मदत पुन्हां आली. सोनपत येथें दोन दिवस मोंगल व निजामशहा यांत तुंबळ युद्ध होऊन मोंगल जय पावला (जानेवारी १५९७). पुढें नगरावर एकदम चाल करण्याच्या बाबतींत मुराद व त्याचा सेनापति यांत वाद पडला. इकडे चांदबिबी व वजीर नेहंगखान यांच्यांतहि कारभाराबद्दल तंटा माजला. इतक्यांत मुराद एकाएकीं मेल्यामुळें अकबरानें दानियल यास नगरावर पाठविलें (१५९९). नेहंगखान पळून गेला; चांदबिबी एकटी राहिली. तिच्या मनांत मोंगलांच्या अफाट फौजेस तोंड देण्यापेक्षां तूर्त बालराजासह जुन्नरास जाऊन रहावें व पुढें प्रसंग आला म्हणजे लढाई करावी असा विचार होता; परंतु यामुळें ती मोंगलांस फितूर आहे, असें ठरवून हमीद खोजा व त्याची मंडळी यांनीं तिचा खून केला. अर्थात अहमदनगर आयतें मोंगलांस मिळालें. बहादुरशहास अकबरानें ग्वाल्हेरीस कैदेंत ठेवून दख्खनचा कारभार दानियल यास दिला (१६००).

मु र्तु झा दु स रा (१६०१-०७).—पहिल्या बुऱ्हाणचा नातू; याच्या बापाचें नांव शहाअली. याला निजामशाही सरदारांनीं परिंड्यास गादीवर बसविलें. त्यांत शहाजी राजे, मिआन राजु व मलिकंबर हे मुख्य होते. त्यांनीं पुन्हां निजामशाही वाढीस लाविली.पुढें मलिकंबर व राजू यांत भांडण होऊन मोंगल चालून आला,तेव्हां मलिकंबरनें त्यांच्याशीं तह करून राज्य राखिलें व राजधानी नगरहून हालवून दौलताबादेस नेली. त्याच्या वशिल्यानें बरेच मराठे सरदार पुढें आले. या सुमारास अकबर मेल्यानें अंबरनें मोंगलांचा पराभव करून नगर व वराचसा प्रांत परत मिळविला. पुढें त्याचें व मुर्तुझाचें जमेना म्हणून त्यानें त्यास पदच्युत केलें (१६०७).

बु ऱ्हा ण ति स रा (१७०७-३०).—मलिकंबरनें मुर्तुझास पदच्युत करून बुऱ्हाणास गादीवर बसविलें आणि तोडरमल्लाप्रमाणेंच जमाबंदी करून राज्यांत सर्वत्र सुधारणा केल्या. जहांगीरनें पाठविलेल्या फौजांचा त्यानें पराभव केला; पुढें शहाजहान प्रत्यक्ष आला व त्यानें निजामी दरबारांत बरीच फितुरी केली. त्यामुळें लढाईंत मलिकंबरचा पराभव झाला, तेव्हां नगर व थोडासा प्रांत मोंगलांस देऊन त्यानें त्यांच्याशीं तह केला. अंबर मेल्यावर (१६२६) त्याचा मुलगा फत्तेखान वजीर झाला. पण त्याच्या अंगीं बापासारखी मुत्सद्देगिरी नव्हती. पुढें तो आंतून मोंगलांस फितूरहि झाला. त्यामुळें त्याला शहानें कैदेंत टाकिलें. लुखजी जाधवहि बुऱ्हाणास त्रासून मोंगलांस मिळाला; तेव्हां बुऱ्हाणनें लुखजीचा खून करविला. बुऱ्हाण हुषार नसल्यानें राज्यांत गोंधळ माजला. प्रांताधिकारी स्वतंत्र बनले. तेव्हां त्यांस शहाजीनें एकत्र करून व आपण मुख्य वजीर बनून निजामशाही तगविली आणि मोंगलांपासून पुष्कळसा प्रांत परत मिळविला. विजापुरकरांनीं कोंकणांतील निजामशहाचा कांहीं भाग घेतला होता तोहि शहाजीनें परत घेतला. इतक्यांत शहाजहानचा बंडखोर सरदार खानजहान लोदी यास बुऱ्हाणनें आश्रय दिल्यानें शहाजहाननें त्याचा पराभव केला. पुढच्या वर्षी दख्खनमध्यें भयंकर दुष्काळ पडून निजामशाही ओसाड पडत चालली; ती संधि साधून लोदीस ठार करून पुन्हां मोंगलानें चाल केली. तेव्हा बुऱ्हाणनें कैदेतून फत्तेखानास सोडलें, आणि आदिलशहाशीं परस्परांनीं परस्परांस

मदत करावी असा तह केला. फत्तेखानानें लगेच बुऱ्हाणास कैदेंत टाकून व पुढें त्याचा खून करून सर्व राज्यासह तो मोंगलांस शरण गेला. तेव्हां शहाजहाननें त्याला मोठी जहागीर दिली.

हु से न हु स रा (१६३०–३३).—हा दुसऱ्या मुर्तुझाचा पुत्र; याला फत्तेखानानें गादीवर बसविलें,तेव्हा हा१० वर्षांचा होता. फत्तेखानानें निजामशाही मोंगलांच्या हवालीं केल्यानें शहाजीस राग येऊन, त्यानें आदिलशहाच्या मदतीनें दौलताबादेवर हल्ला केला व फत्तेखानाची समजूत करून दौलताबाद परत घेतलें. मोंगल चिडले व त्यांनीं ५८ दिवस तुंबळ युद्ध करून दौलताबाद परत घेतलें. फत्तेखान व हुसेनशहा यांस पकडून दिल्लीस पाठविलें व निजामशाही ताब्यांत घेतली ( १६३३ ). हुसेनला ग्वालेरीस कैदेंत ठेविलें व फत्तेखानाची उत्तरेकडे नेमणूक झाली.

मु र्तु झा ति स रा ( १६३३–३७ ).—हुसेननंतर शहाजी राजानें याला गादीवर बसवून चार वर्षें आटोकाट प्रयत्न करून आणि मोंगलांशीं टक्कर देऊन निजामशाही तगविली. खरें म्हटल्यास शहाजीच मलिकंबराच्या नंतर मुख्य वजीर व राजनिर्माता होता. त्यानें सर्व कोंकण व नीरा नदीपासून चांदोर टेंकड्यामधील सर्व प्रांत परत मिळविला व परांड्यास राजधानी केली ( १६३४ ). दाक्षिणेंतील युद्धाचा पुन्हां पहिलाच दिवस आला असें पाहून व शाहिस्तेखानादि सरदारांची शहाजीपुढें डाळ शिजत नाहींसें पाहून खास शहाजहान दख्खनमध्यें आला; व शहाजीला त्यानें तोंड दिलें. आदिलशहाच्या मदतीनें मोंगलांचा अनेक ठिकाणीं समाचार घेतला. शेवटीं शहाजहाननें आदिलशहास अर्धी निजामशाही देण्याची लालूच देऊन फोडलें. तरीहि दीड दोन वर्षें शहाजीनें एकट्यानें मोंगलांस दाद लागूं दिली नाहीं. अखेर मुर्तुझासह तो माहुलीस असतांना, शहाच्या आईनेंच शहाजहानशीं बोलणें लावल्यानें शहाजीनें निजामशाही तगविण्याचा प्रयत्न सोडला;नंतर मुर्तुझास शहाजहाननें ग्वाल्हेरीस कैदेंत ठेवून सर्व निजामशाही खालसा करून, अर्धी आदिलशहास दिली ( १६३७ ). याप्रमाणें साधारण १५० वर्षें निजामशाही राज्य महाराष्ट्रांत सुरू होतें. आदिलशाहींत हिंदूंचा जितका छळ झाला अथवा त्यांनां जितकें हलकें लेखण्यांत आलें तितकें निजामशाहींत झालें नाहीं. निजामशाहीचा बहुतेक कारभार मराठ्यांच्याच हातीं होता म्हटलें तरी चालेल. मध्यकालीन (ज्ञानेश्वरानंतर व रामदासापूर्वींच्या) महाराष्ट्रसारस्वताचा उगम बहुधां निजामशाहींत झाला. [ ग्रँटडफ; फेरिस्ता; बुरहानिमासिर; साउथ इंडियन डिनॅस्टिज; मुसुलमानी रियासत; माबेल डफ. ]

**निझामत-इ-जनुब**—मध्यहिंदुस्थानांतील भोपाळ संस्थानाचा एक दक्षिणेकडील जिल्हा. क्षेत्रफळ २७०४ चौरस मैल. हा जिल्हा पूर्वी गढा-मंडलाच्या गोंड नायकाकडे होता व गिन्नुरगड हा किल्ला त्यांचाच होता. हा किल्ला भोपाळ शहराच्या दक्षिणेस ३८ मैलांवर आहे. १८ व्या शतकांत हा किल्ला दोस्तमहंमदच्या ताब्यांत होता. नेवल शहा नांवाच्या गोंड नायकास मदत केल्यावरून दोस्तमहंमदास येथें आश्रय मिळाला होता. नायकाच्या मरणानंतर दोस्तमहंमद स्वतःच या किल्याचा कारभारी बनला. पुढें हा किल्ला वजीर महमंदच्या ताब्यांत आला. येथें एक मोडकळीस आलेला राजवाडा, एक मशीद व इतर इमारती आहेत. वारी व चौकीगड येथेंहि दोन किल्ले आहेत. लोकसंख्या ( १९११ ) २७१८२९. यांत ७९८ खेडीं असून आठ तहशिली आहेत. हा सर्व जिल्हा एका नाझिमच्या ताब्यांत आहे.

**निझामत-इ-मघ्रीब**—मध्यहिंदुस्थान, भोपाळ संस्थानांतील एक पश्चिमेकडील जिल्हा. क्षेत्रफळ २२२६ चौरस मैल. नर्मदा व पार्वती ह्या दोन नद्या ह्या जिल्ह्यांतून वहातात. दोस्तमहंमदखानानें हा जिल्हा १७१६ सालीं काबीज केला होता. पुढें १७४५ सालीं हा पेशव्यानीं घेतला; पण १८१८ सालीं इंग्रज सरकारनें तो भोपाळ सरकारास परत केला. लोकसंख्या ( १९११ ) २२५०६९. शेंकडा ८६ लोक हिंदु आहेत. सिहोर, आष्टा, इच्छावर हीं तीन मोठीं गांवें असून ६२२ खेडीं आहेत. हा जिल्हा नाझिमच्या ताब्यांत असून ह्यांत ७ तहशिली आहेत.

**निझामत-इ-मश्रिक**—मध्यहिंदुस्थान, भोपाळ संस्थानच्या पूर्वेकडील एक जिल्हा. क्षेत्रफळ १९७२ चौरस मैल. जिल्ह्याच्या पूर्व भागांत विंध्याद्रि पर्वताची ओळ आहे. येथील जंगलास व्यापारी दृष्टीनें बरेंच महत्त्व आहे. लोकसंख्या ( १९११ ) २३३४८५; पैकीं शेंकडा ७२ लोक हिंदु आहेत. यांत खेडीं ८११ आहेत. जिल्ह्याचा अधिकारी नाझिम आहे. ह्या जिल्ह्यांत १० तहशिली आहेत.

**निझामत इ-शिमाल**—मध्यहिंदुस्थान.भोपाळ संस्थानाचा उत्तरेकडील जिल्हा. क्षेत्रफळ १४१७ चौरस मैल. सन १७०९ च्या सुमारास दोस्तमहमदखानानें बादशहा बहादुरखानजवळून बेरसिया परगण्याचा प्रदेश मिळविला. त्याच्या पश्चात गादीवर आरूढ झालेल्यांनीं हें संस्थान बनविलें. अकबराच्या कारकीर्दींत हा माळवासुभ्याचा एक सरकार होता. १८ व्या शतकाच्या शेवटीं धारच्या मराठा अधिपतीनें बेरसियापरगणा आपल्या ताब्यांत घेतला होता व तदनंतर तो १८२१ ते १८३५ पर्यंत इंग्रज सरकारच्या अंमलाखालीं होता. १८५७ सालीं तो सरकारजमा करण्यांत आला होता पण १८६० सालीं तो संस्थानास परत देण्यांत आला. लोकसंख्या ( १९०१ ) २०४४४५. शेंकडा ७० लोक हिंदु आहेत. भोपाळ व बेरासिया हीं दोन मोठीं गांवें असून शिवाय ८४२ खेडीं आहेत. ह्या जिल्ह्याच्या ६ तहशिली केल्या आहेत.

**निझामपट्टम** मद्रास इलाख्यामधील गंतूर जिल्ह्याच्या तेन्नाली तालुक्यांतील एक बंदर. लोकसंख्या ( १९०१ ) ४२१६. १९ साव्या शतकांत हें मोठें व्यापारी बंदर

होतें. पण १९०३-०४ सालीं तें एकदम मंदावलें. पूर्व किनाऱ्यावरील ह्याच बंदरांत पहिल्यानें इंग्रज लोकांनीं व्यापार करण्यास सुरवात केली ( १६११ ). १६२१ सालीं त्यांनीं येथें वखार घातली. इंग्रज लोक ह्या बंदरास 'पेट्टीपोली' म्हणत असत. निझामानें उत्तरसरकारचा भाग म्हणून हें बंदर फ्रेंचांस दिलें होतें पण १७५९ सालीं सलाबतजंगनें हें इंग्रजांस दिलें.

**निझामाबाद**, जिल्हा.—हैद्राबाद संस्थान. मेदकगुलशनाबाद विभागांतील एका जिल्हा. ह्यास पूर्वी 'इन्दूरजिल्हा' हें नांव होतें. उत्तरेस नान्दर व अदिलाबाद पूर्वेस करीमनगर; दक्षिणेस मेदक व पश्चिमेस नान्दर. जहागिरी धरून क्षेत्रफळ ३२८२ चौरस मैल. पूर्व व पश्चिमभागीं लहान टेंकड्या आहेत. जिल्ह्यांतील सर्वांत मोठी नदी गोदावरी आहे. गोदावरीस जाऊन मिळणारी मांज्रानदी पश्चिम सरहद्दीवरून वहाते. फुलाग व येदलकत्तवागू ह्या दोन लहान नद्या आहेत. यांत सागवान, शिसूं, एबोनी, बिजासाल, तरवार, आंब्याचीं व चिंचेचीं हीं झाडें; वाघ, चित्ते, कोल्हे, अस्वलें आणि रानडुकरें हीं जनावरें मुख्यत्वेंकरून आढळतात. जिल्ह्यांतील हवा कोरडी असून आरोग्यदायक आहे. पावसाळ्यांत व हिंवाळ्यांत मलेरिया असतो. पाऊस सरासरी ४२ इंच पडतो. लोकसंख्या ( १९११ ) ५६८००९. यांत पांच तालुके, एक पेगाइस्टेट, तीन संस्थानें व सात मोठ्या जहागिरी आहेत. मोठीं गांवें—निझामाबाद, आरमूर, बोधन व बालकोन्डा हीं आहेत. शेंकडा ९१ लोक हिंदु आहेत. येथें तेलगू भाषा चालते.

तालुका.—निझामाबाद जिल्ह्यांतील एक तालुका. ह्याला पूर्वी इन्दूर तालुका म्हणत असत. क्षेत्रफळ ७८९ चौरस मैल. लोकसंख्या जहागिरी धरून ( १९११ ) ११९८४२. ह्या तालुक्यांत १ शहर व १५० खेडीं आहेत. व जहागिरी ३८ आहेत. निझामाबाद किंवा इन्दूर हें तालुक्याचें व जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. पीक मुख्य तांदुळाचें आहे. तालुक्याच्या उत्तरेकडील भागांतून गोदावरी नदी वहाते.

गांव.—निझामाबाद जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. हैद्राबाद गोदावरी व्हॅली रेलवेवर हें स्टेशन आहे. लोकसंख्या ( १९११ ) १७३५३. येथें एक भात कांडण्याची गिरणी असून कापूस दाबण्याचे व सरकी काढण्याचे कारखाने आहेत. रघुनाथदासानें बांधलेल्या देवालयाच्या जागीं—गांवाच्या नैर्ऋत्य भागीं—किल्ला आहे.

**निझामी** ( ११४१-१२०३ )—निझामउद्दिन अबू महंमद इल्यस बिन यूसफ हा इराणी कवि स. ११४१ मध्यें जन्मला. याचा बाप जरी कम नांवाच्या डोंगराळ प्रदेशांत राहात असे तरी निझामीचें सर्व आयुष्य आरानमधील गंज येथें गेलें. यामुळें त्याला गंजचा निझामी असें म्हणत. त्याचे आईबाप त्याच्या लहानपणींच त्याला सोडून गेल्यामुळें मानवी क्षणिकत्वाचा त्याच्या मनावर फारच परिणाम झाला व यामुळें एक प्रकारच्या औदासिन्याचा त्याच्या मनावर पगडा बसून एकान्त व मनन यांचा तो चिराभिलाषी बनला. गंज येथील धार्मिक परिस्थिति त्याच्या मनःस्थितीला हितावह होती. तेथील लोक कट्टे सुनी पंथी असून त्यांच्या मताप्रमाणें न चालणाऱ्यास ते आपल्यांत राहूं देत नसत. निझामीनें साधुजिकच कडक असा फकीरी आयुष्यक्रम अंगिकारिला. कालांतरानें त्याच्या औदासिन्यावर त्याच्या सहजकाव्यप्रतिभेनें विजय मिळविला. त्यानें आपल्या पहिल्या ग्रंथांत ईश्वर व मानव यांवरील आपले विचार सादर केले आहेत.

हा ग्रंथ म्हटला म्हणजे 'मखझनूल अश्रर' हा होय. हा ग्रंथ जरी मुख्यतः वेदान्तविषयक आहे तरी त्यांत वीररसप्रधान काव्याकडील त्याची प्रवृत्ति स्पष्ट दिसून येते. "खुश्रू व शिरीन" हें उत्कृष्ट वीररसप्रधानकाव्य लिहून, इराणांतील प्रमुख अद्भुतकाव्यलेखकांत त्यानें जागा पटकावली.

त्याचें असें म्हणणें होतें कीं वीररसप्रधान काव्याचा आद्य हेतु नैतिक किंवा धार्मिक तत्त्वांचें विवरण करणें हा नसून मनुष्याच्या बऱ्यावाईट मनःप्रवृत्ती, त्यांचे झगडे व ऐहिक विषय हीं रंगवणें हा होय. मानवी स्वभाव व प्रेम, विशेषतः प्रणयी युगुलांचे मनोभाव रेखाटण्याचें त्याचें चातुर्य खरोखरच अवर्णनीय आहे.

त्यानें दरबारी देणग्यांचा जरी स्वीकार केला तरी तो दरबारीं रहावयास कधींच गेला नाहीं. "लैला व मजून" ही त्याची दुसरी प्रेमकहाणी त्यानें चारच महिन्यांत लिहिली.

त्याचा तिसरा उत्कृष्ट ग्रंथ म्हटला म्हणजे "इस्कंदरनामा" ( शिकंदरचरित्र ). या काव्यांत तो फिरदौसीची बरोबरी करूं शकतो. त्याच्या "हॅफ्त पैकर" मध्यें सात गोष्टी आहेत. त्यांतील चौथी फारच मजेदार असून तिचें रशियन भाषेंत भाषांतर झालें आहे.

**निझ्निनोव्ह गोरॉड**—रशिया. याच नांवाच्या प्रांताचें मुख्य ठिकाण. हें मास्कोच्या पूर्वेस आगगाडीनें २७२ मैल आहे. हें व्यापाराच्या केंद्रांपैकीं एक असून माकार्येव्हस्काय यात्रेचें ठिकाण आहे. ओका नदीच्या आसपासच्या प्रदेशांत पक्का माल तयार करण्याचा कारखान्यांची वाढ झाल्यामुळें या शहराचें महत्त्व १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत वाढलें. या शहराचे तीन भाग केले आहेत. येथील हवा अतिशय थंड आहे. सन १९१३ मध्यें येथील लोकसंख्या ११२३०० होती. येथील शिक्षणविषयक संस्था लष्करी शाळा, धंदेशिक्षणाची शाळा व अध्यात्मज्ञानाची शाळा ह्या आहेत.

येथें होणाऱ्या पक्क्या मालाच्या कारखान्यांत गहूं दळण्याची गिरणी, लोखंड व यंत्रें, मेणबत्त्या व दोर, यांचे कारखाने मुख्य आहेत. कॅस्पियन समुद्रावरील पेट्रोलियमची ने आण करण्याकरितां जहाजें बांधण्याचें तसेंच वाफेचीं जहाजें बांधण्याचें काम अलीकडे बरेंच वाढलें आहे. व्होलगा नदीवरील वाफेच्या जहाजाचें व व्यापाराचें निझ्नी हें मुख्य ठिकाण आहे. या शहराच्या महत्त्वाचें मुख्य कारण

येथें भरणारी यात्रा होय. ही यात्रा २९ जुलैपासून सप्टेंबरच्या १७ तारखेपर्यंत असते. या जत्रेला दरवर्षी ४००००० पेक्षां जास्त लोक येतात. १४ व्या शतकाच्या आरंभापर्यंत निझ्नी नोव्होगोरॉड सुझडॅलच्या ताब्यांत होतें. परंतु तें पूर्ण स्वतंत्र होतें. स. १३९० पर्यंत येथील लोक आपला राजा निवडीत असत. स. १३७७ व १३७८ मध्यें तार्तर लोकांनीं हें शहर लुटलें. स. १३९० मध्यें मास्कोप्रिन्स व्हसिली यानें निझ्नी घेतलें व तेथें आपले सुभेदार नेमिले. १४१७ सालीं हें मास्कोला पूर्णपणें जोडण्यांत आलें, व या मास्को संस्थानांचा निझ्नी हा किल्ला करण्यांत आला.

**निडगुंडी**—मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा. बंकापूरच्या पश्चिमेस पांच मैलांवर हें एक लहान खेडें असून येथें पांच शिलालेख आहेत. पैकीं एक राष्ट्रकूट राजा पहिला अमोघवर्ष ( इ. स. ८५१–८७७ ) याच्या वेळचा आहे.

**निडशिंगी**—मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा. हुनगल्लच्या उत्तरेस १० मैलांवर हें एक लहानसें खेडें असून त्या ठिकाणीं इ. स. ११०९ आणि १११० सालांचे दोन शिलालेख आहेत.

**नित्शे, फ्रेडरिक** (१८४४–१९००)—हा कवि व तत्त्ववेत्ता सॅक्सनीमध्यें लुटझेननजीक रॉकेन येथें १५ आक्टोबर १८४४ रोजीं जन्मला. त्याच्या घराण्याचा दूरचा संबंध पोलिश ( पोलंडमधील ) जातीशीं असून त्याबद्दल त्याला मोठा संतोष वाटत असे. त्याची आई व बाप दोघेहि ख्रिस्ती भिक्षुक ( मिनिस्टर ) घराण्यांतील होते व नित्शेनेंहि आयुष्यभर धर्मोपदेशकाचें नव्हे तरी तात्त्विक उपदेशकाचें काम केलें. त्याचा बाप भावनाप्रधान स्वभावाचा होता. तो पस्तिसाव्या वर्षीच अपघातानें वारला. त्याची आई फार देखणी, सशक्त व बंडखोर स्वभावाची होती. गोएटे या प्रख्यात कवीच्या आईच्या सारखाच तिचा स्वभाव असून गोएटेप्रमाणें नित्शेहि आपल्या आईला तिच्या एकोणिसाव्या वर्षी झाला. नित्शे लहानपणापासूनच उंच व सशक्त आणि स्वभावानें शांत व चांगला होता. त्याची वागणूक प्रामाणिक व सभ्यपणाची असे. त्याला आडदांडपणाचे खेळ किंवा असभ्य प्रकारची करमणूक आवडत नसे. काव्य व संगीत यांची त्याला आवड होती. शाळेंत तो गणित व शारीरिक खेळ यांखेरीज बाकी सर्व विषयांत पहिल्या प्रतीचा विद्यार्थी होता. ग्रीक व लॅटिन वाङ्मयाची त्याला विशेष आवड होती. हायस्कूलचें शिक्षण संपवून तो बॉन युनिव्हर्सिटींत शिरला. त्यावेळीं त्याला धर्म, जर्मन व लॅटिन भाषा यांमध्यें प्राविण्य असल्याबद्दल सर्टिफिकीट मिळालें होतें. कॉलेजमध्यें ईश्वरविज्ञान ( थिऑलजी ) व भाषाशास्त्र या दोन विषयांचें अध्ययन सुरू करून भाषाशास्त्राचा विशेष अभ्यास त्यानें केला. मुख्यतः शोपेनहार व वॅगनर यांच्या ग्रंथांचा त्याच्या विचारावर व आयुष्यावर परिणाम झाला, आणि ख्रिस्ती धर्मावरचा विश्वास उडत चालला. बीअरपान द्वंद्वयुद्ध या विद्यार्थ्यांच्या आवडीच्या गोष्टीचा नाद स्वतःला लागावा म्हणून त्यानें प्रयत्न केले पण ते निष्फळ झाले व बिअर–पानाचा त्याचा तिटकारा जन्मभर कायम राहिला. गोएटे व इमर्सन यांचेहि ग्रंथ त्याला फार आवडूं लागले इतकेंच नव्हे तर इमर्सनच्या निबंधांचें पुस्तक नेहमीं त्याच्याजवळ असे. स. १८६९ मध्यें म्हणजे वयाच्या पंचविसाव्या वर्षी त्याला बेसेल युनिव्हर्सिटींत भाषाशास्त्राच्या प्रोफेसरची नोकरी मिळाली व ती त्यानें दहा वर्षे केली. त्याचे या विषयाचे विद्यार्थी थोडे असत व तेहि नित्शेच्या परंपराविरोधी मतांमुळें कमी कमी होत गेले. १८७० सालीं फ्रँको–जर्मन युद्ध सुरू झालें त्यावेळीं त्याची इच्छा असूनहि व तोफखान्यासंबंधींचें लष्करी शिक्षण विद्यार्थीदशेंतच मिळालेलें असूनहि तो स्विस रहिवासी बनल्यामुळें त्याला आवडती अशी प्रत्यक्ष लढाईंत नोकरी मिळाली नाहीं आणि म्हणून त्यानें स्वतःच शुश्रूषाशाखेंतील ( ॲम्ब्युलन्स कोअर ) काम पत्करलें; पण कांहीं आठवडे काम केल्यावर हगवण व घटसर्प झाल्यामुळें त्याला काम सोडावें लागलें. तथापि युद्धामधील हालआपेष्टांच्या या थोडक्याच अनुभवाचा त्याच्यावर फार परिणाम झाला. त्याची प्रकृति व दृष्टि तेव्हांपासून कायमची नादुरुस्त बनली आणि स.१८७९ मध्यें नोकरी सोडून यूरोपांतील हवा मानवेल अशा निरनिराळ्या ठिकाणीं राहावयास त्याला जावें लागलें. या काळांत त्याच्या पुष्कळशा पुरुषांशीं व स्त्रियांशीं ओळखी झाल्या, पण त्याचा स्वभाव मैत्री वगैरे बाबतींत उच्चध्येयवादी असल्यामुळें मतभेद व गैरसमज होऊन बरेच त्याचे मित्र गळत जात असत. तथापि त्याच्याबद्दल सर्वसाधारण लोकांनां आदर व पूज्यबुद्धि वाटे, कारण सर्वांशीं तो सहानुभूतीनें वागे. युद्धांतील कामावरून परत आल्यापासून त्यानें पुस्तकें लिहिण्यास सुरवात केली, पण त्याच्याकडे जनतेचें फारसें लक्ष त्यावेळीं गेलें नाहीं; इतकेंच नव्हे तर पुष्कळशीं पुस्तकें स्वतःच्या खर्चानें त्याला छापावीं लागलीं. स. १८८९ मध्यें एकाएकीं तो पूर्ण वेडा बनला व १९०० सालीं त्याच स्थितींत मरण पावला.

'दी बर्थ आफ ट्रॅजेडी' ( दुःखपर्यवसायी नाटकाचा उगम ) हें नित्शेचें पहिलें पुस्तक होय. त्यांत ग्रीक संस्कृति पौरस्त्य संस्कृतीच्या पायावर उभारली आहे असें प्रतिपादन करून मानवी जीविताची ध्येयभूत स्थिति नित्शेनें स्वकल्पनेप्रमाणें वर्णिली होती. त्यामुळें त्यावर बराच काळ वाद चालू राहिला. दुसरें पुस्तक 'अन्सीझनेबल कन्सिडेरेशन्स'—यांत शोपेनहार, आधुनिक प्रशियॅनिझमचा एक जनक डी. एफ्. स्ट्रॉस वगैरेंच्या चरित्रांवर व इतिहासाध्ययनाचा उपयोग वगैरे विषयांवर टीकात्मक निबंध आहेत. त्यानंतरच्या पुस्तकांपैकीं 'दि डॉन ऑफ डे,' 'झरथुस्ट्र' आणि 'वुइल टु पॉवर' हीं तीन सर्वांत महत्त्वाचीं आहेत. त्याशिवाय 'दि गे सायन्स', 'बिऑंड गुड अँड

ईन्हल', 'दि जिनीऑलजी ऑफ मॉरल्स,' वगैरे पुस्तकें त्यानें लिहिलीं.

**निद्रापस्मार** ( नेकोलेप्सी )—उन्मादवायु, अपस्मार व मज्जादौर्बल्य यांपैकीं कोणत्याहि प्रकृतीच्या माणसांत हा रोग आढळतो व यांत विशेष हा आहे कीं, रोग्यास थोडीं मिनिटें अगर तास दोन तास टिकणारी झोंप एकदम लागते व नंतर रोगी एकदम जागा होतो व असें कांहीं दिवस वारंवार घडतें. याहूनहि तीव्र प्रकार आहेत ते असेः—झोंपेंत रोग्याचे हात पाय वांकडे असतील त्याच स्थितींत ते रहातात. झोंप फार वेळ टिकते. साध्या झोपेंत माणूस हात पाय हलवितो तसे हा रोगी करीत नाहीं. हात पाय दुसऱ्या कोणी उचलला तर तो जड लागतो व जसा व जेथें ठेवावा तसा तेथेंच तो पडून राहतो. अशक्तपणा आणणारीं दुखणीं येऊन गेल्यावर, कांहीं मानसिक रोगांत, अर्धांगवायूच्या बेशुद्धींत व मेस्मेरिझम(वशीकरणाची सूचक)ची गुंगी यामुळेंहि असें होतें. दुसरा अर्धवट झोंपेचा प्रकार याच कारणांमुळें आढळतो व तो कित्येक दिवस अगर आठवडे टिकतो. चेहरा फिकट व हात पाय ढिले, शिथिल असून पापण्या मुद्दाम उघडूं गेल्यास रोगी त्या मिटून धरतो. उजेडामुळें डोळ्यांतील बाहुली लहान होते. नाडी व हृदयाचे ठोके फार मंद असतात ते इतके कीं, रोगी मेला कीं जिवंत आहे याविषयींहि अंमल संशय पडतो. जास्त दिवस रोग टिकल्यास मध्यंतरीं रोगी अंमल सावध होऊन खाणेंपिणें घेतो. बहुतेक रोगी दगावत नाहींत. तिसरा प्रकार, झोंपेमध्यें रोगी डोळे उघडून जागा असल्याशिवाय घरांत इकडे तिकडे हिंडतो, माणसें व वस्तु बघतो; पण सकाळीं त्यास याची विस्मृति पडते. मात्र झोंपेंत चालतांना वाटेंत अडथळे, अडचणी असतील त्या टाळून तो चालतो. अगर कांहीं झोंपेंत बरीं वाईट कृत्यें व कर्में करतो तीं विवक्षित हेतु लक्षांत ठेवून व्यवस्थितपणें करतो ( असें लिहिणें, चोरी करणें इ. ) मात्र या कृत्यांची त्यास जागें झाल्यावर स्मृति नसते. यास उपचार उन्मादरोग, अपस्मार, मज्जादौर्बल्य वगैरे रोगांचे करावेत.

**निनेव्हे**—प्राचीन ॲसिरियन(असुरी) साम्राज्याची अति प्रसिद्ध राजधानी. लगाश या प्राचीन बाबिलोन शहराच्या एका भागाचें हेंच नांव होतें. इष्टार देवीचा पूजासंप्रदाय निनेव्हेमध्यें चालू असून हिचें निना हें दुसरें नांव होतें. निनेव्हे शहर हुसुर, गोमल, अप्परझाब व तैग्रीस या नद्यांमधील प्रदेशांत वसलेलें आहे. या प्रदेशांत निनेव्हेचे कुयुंजीक, नेबीयूनस, व डूर सारगान येथें अवशेष आहेत. तैग्रीस नदीकांठावर हें शहर अडीच मैल पसरलें होतें. या शहरानें एकंदर १८०० एकर जमीन व्यापिली होती. मुख्य शहराच्या बाहेरच्या प्रदेशाचे ( काब्लु ) वेगळे भाग असून त्यांवर वेगळा सुभेदार ( शन्कू ) नेमलेला असे. याच्या पलीकडे रीबीत निनुआ होतें. निनेव्हे, खोर्साबाद, कॅला, व कॅरम्लीस या चार शहरांचा संघ होता. यांपैकीं प्रत्येक शहराला मजबूत तटबंदी होती. प्रत्येकास वेगळा सुभेदार असे व निनेव्हेचा सुभेदार कॅला व असुर येथील सुभेदारांहून कमी दर्जाचा समजला जाई.

निनेव्हेचा इतिहास म्हणजे ॲसिरियाचा इतिहास होय. बाबिलोनिया निना येथील लोकांनीं हें शहर वसविलें असावें असा अंदाज करण्यास कांहींच हरकत नाहीं. पहिल्या शालमनेसरनें आपल्या शिकाती लेखांत असें नमूद केलें आहे कीं, इष्टारचें मंदिर समसीह्दाद ( शामशी–आदाद ) नें बांधिलें. त्याचा जीर्णोद्धार असुरउबालिटनें केला व त्यानंतर खुद्द शालमनेसरनें त्या देवळाचा जीर्णोद्धार केला ( इ.स. पूर्वीं १३००). असुरनासीर अॅपली (इ. स. पूर्वीं ८८५) नें निनेव्हे येथील इष्टारचें इमास–मास मंदिर दुरुस्त केलें व आपली राजधानी कॅला येथें नेली. सेनाचेरिबनें निनेव्हेची चांगली सुधारणा केली. येथें पाण्याचा फार दुष्काळ असल्यामुळें त्यानें कालवे खणून पाण्याची सोय केली. निनेव्हे राजधानी झाली. बाबिलोनची सर्व लूट सेनाचेरिबनें निनेव्हेला आणली. एसरहॅडननें बाबिलोन शहर वसविण्यास सुरवात केली. ह्यानेंच निनेव्हे येथील असुराचें देऊळ बांधिलें. असुरबनिपालनें कांहीं मंदिरें व राजवाडा बांधिला. याच राजवाड्यांत असुरबनिपालचें प्रसिद्ध ग्रंथसंग्रहालय होतें (' असुर बनिपाल 'पहा.).

पुढें सायाक्झारेस व मीड यांनीं निनेव्हेला वेढा दिला होता परंतु मॅडयेस यानें त्याचा बचाव केला. सिथियन लोकांनीं बाबिलोनचा राजा नेबोपोलसर याच्याशीं संगनमत करून सुमारें इ. स. पूर्वी ६०६ मध्यें निनेव्हे घेतलें. सर्व साधारण समज असा आहे कीं मेस्पिश व लॅरिसा येथील अवशेष कुयुंजुक निपरुदचे असावेत. मध्ययुगांत तैग्रीसच्या पूर्वकिनाऱ्यावर मोसलच्या समोरच्या बाजूस असलेल्या जागेस निनेव्हे म्हणत असत. [' बुद्धपूर्व जग' ( ज्ञानकोश वि. ३ ) यांतील उत्तरार्ध–' असुरी–बाबिलोनी संस्कृति ' पहा. ]

**निनोमिय सोन्टोकु** ( १७८७–१८५६ )—जपानांतील शेतकरीवर्गांतील हा साधुपुरुष ओडवरनजीक जन्मला. त्याच्या बाराव्या वर्षी त्याचा बाप वारल्यावर प्रपंचाचा भार त्याच्यावर पडला. त्याला विद्याभ्यास करण्यास चांगली संधि मिळाली नाहीं, तथापि ज्ञानार्जनाची लालसा त्याला इतकी तीव्र होती कीं, चिनी तत्त्ववेत्ता कॉन्फ्युशिअस याचे ग्रंथ तो नेहमीं बरोबर बाळगी व काम करतांना सुद्धां वाची. सोळाव्या वर्षी आई वारल्यामुळें तो चुलत्याच्या घरीं राहूं लागला. पण तेथें रात्रीं पुस्तकें वाचणें हा काळाचा व तेलाचा विनाकारण खर्च आहे असें सांगून चुलत्यानें त्याचा अभ्यासक्रम बंद केला. म्हणून सकाळीं लवकर उठून वाचण्याचा क्रम त्यानें चालविला. शिवाय त्यानें एक ओसाड जमीन लागवडीस आणून त्या उत्पन्नांतून लवकरच बापाची गहाण इस्टेट सोडविली; हें ऐकून हटोरी नांवाच्या एका कर्जबाजारी जमीनदारानें स्वतःची दुःस्थिति जाणून निनोमियास व्यवस्थापक नेमलें. त्यानें त्या जमीनदाराच्या चैनबाजीला पूर्ण फाटा देऊन

त्यानें पांच वर्षांत सर्व कर्ज फेडलें. ती कीर्ति ऐकून ओडवरच्या जहागीरदारानें स्वतःच्या प्रांतांतील शेतकी सुधारण्याकरितां निनोमियाला कामावर नेमलें. त्या प्रांतांत पूर्वी २०००० बुशेल धान्य पिकत असे तेथें फक्त ४००० बुशेलच पिकूं लागलें होतें. कारण तेथील शेतकरी फार आळशी, दारूबाज, व जुगारी बनले होते. दोन वर्षे काम करूनहि निनोमियला फारशी सुधारणा करतां आली नाहीं. तेव्हां नरित देवालयांत बसून २१ दिवस उपवास व ईश्वरप्रार्थना केली. तें पाहून तो शेतकरीवर्ग एकदम शुद्धीवर आला व निनोमियच्या सांगण्यावरहुकूम वागूं लागला. त्यामुळें पुढील पांच वर्षांत इतकी शेतकीची सुधारणा झाली कीं स. १८३६ च्या दुष्काळांत स्वतःच्या प्रांताचें भागवून शिवाय ४०००० लोकांनां मार्च ते मेपर्यंत पोसतां आलें. स.१८४२मध्यें टोकुगव सरकारानेंच निनोमियला शेतकी सुधारण्याच्या कामावर नेमलें. साधारण बऱ्यांपैकीं गांवांत किंवा जिल्ह्यांत तो आरंभ करी आणि इतर लोकांनां स्वकर्तव्य, प्रामाणिकपणा, बंधुप्रेम वगैरे गोष्टी उपदेशानें व प्रत्यक्ष उदाहरणानें शिकवी याप्रमाणें त्यानें आपलें पुढील सर्व आयुष्य जपानच्या शेतकरीवर्गाची उन्नति करण्यांत खर्च केलें. त्याच्या अनुयायांनीं होटोकु नांवाची संस्था काढली. संस्थेचें ध्येय उत्पन्नांत काटकसरीनें खर्च भागवून शिल्लक टाकणें व तिच्यांतून ओसाड जमीन लागवडीस आणणें किंवा एखादा नवा उद्योगधंदा सुरू करणें, हें होतें. दरसाल उत्पन्नांतून कांहीं तरी शिल्लक टाकणें, ही निनोमियच्या उपदेशांतील मुख्य कल्पना होती. सूड घेण्याच्या बुद्धीचा त्यानें अत्यंत निषेध केला. 'होटोकु' हा धर्मपंथ नव्हता, किंवा निनोमिय हा कोणत्याहि एका संप्रदायाचा पुरस्कर्ता नव्हता. शिंटोई पंथ, कन्फ्युशियनपंथ व बौद्धपंथ या तिन्हींतील उपयुक्त गोष्टींचें एकत्रीकरण त्यानें केलें. आणि कोणत्याहि धर्मग्रंथापेक्षां तो निसर्गाला व अधिक महत्त्व देत असे.

**निपाणी**—मुंबई इलाखा, बेळगांव जिल्हा. उत्तर अक्षांश १६° २३' व पूर्व रेखांश ७४° २६'. चिकोडीच्या पश्चिमेस सुमारें १३ मैलांवर हा एक मोठा गांव आहे. लोकसंख्या (१९११) १०७७९. १८५४ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. १८२७ सालीं निपाणीच्या किल्ल्यास आंत घेऊन गांवाभोंवतीं तट बांधण्याच्या कामास निपाणीच्या देसायानें सुरवात केली होती. दक्षिणेकडच्या बाजूचें काम पूर्ण झाल्यावर हें काम आपल्या हातून पूर्ण होणें शक्य नाहीं. असें देसायास वाटल्यावरून त्यानें तें काम बंद केलें. किल्ल्याच्या दरवाजाजवळ १८०० सालीं सिद्दोजीराव निंबाळकर यानें बांधलेला एक वाडा आहे.

**इतिहास.**—निपाणी गांव अलीकडे वसलेला आहे असें दिसतें. ताम्रपट किंवा शिलालेख निपाणींत सांपडलेले नाहींत. येथील आप्पा देसाई याची हकीकत सातव्या विभागांत आली आहे, तिच्यापेक्षां जास्त माहिती येथें समाविष्ट केली आहे. कोल्हापुरकरांनीं आप्पाच्या मुलखास १८०३ मध्यें उपद्रव देण्यास सुरवात केली व निपाणीच्या आग्नेयीस सुमारें ५० मैलांवर असलेल्या तळूरचा देसाई चंद्राप्पा याचें मनोळीवर हल्ला चढविण्यास मन वळविलें. चंद्राप्पानें मनोळीस वेढा देऊन निपाणीचा मुलूख उध्वस्त केला, परंतु वेलस्लीनें आपलें सैन्य पाठविल्यामुळें निपाणीचें संरक्षण झालें व चंद्राप्पा कोल्हापुरास पळून गेला आणि तळूरचा किल्ला देसायास मिळाला. अप्पास पेशव्यांकडून सरलष्कर हा किताब, मनोळी व हुकेरी हे परगणे व याशिवाय ५४११२० रुपये सालीना उत्पन्नाचा फौज सरंजामाचा मुलुख मिळाला. कोल्हापुरकरांचें व आप्पाचें मनोळीवरून सहा वर्षें ( १८०४-१८०९ ) भांडण चाललें, शेवटीं पेशव्यांच्या मध्यस्तीनें तह झाला त्यांत मनोळीवर पेशव्यांच्या वतीनें आप्पानें अधिकार चालवावा व कोल्हापुरच्या राजकन्येशीं यानें लग्न करावें असें ठरलें. हा शरीरसंबंध घडला तरी दोघांचें भांडण चाललेंच होतें. इ. स. १८११ त आप्पानें कोल्हापुरास वेढा दिला. त्यावेळीं एलफिन्स्टन मध्यें पडला व त्याबद्दल झालेल्या तहान्वयें कोल्हापुरनें चिकोडी आणि मनोळी वरील सर्व हक्क सोडला.

१८१८ सालीं आप्पा पेशव्यांच्या बाजूनें होता त्यामुळें मनोळी व चिकोडी परगणे ब्रिटिशांनीं खालसा केले. आप्पावर त्याची प्रजा अत्यंत नाखुष होती कारण हा अत्यंत क्रूर असून आपल्या प्रजेस नाना तऱ्हांनीं छळीत असे. पुष्कळ श्रीमंत लोकांस त्यानें वर्षानुवर्षे बंदींत ठेविलें होतें. तो दुर्वर्तनी होता. पुढें हा वृद्ध झाल्यामुळें फारशी गडबड करीत नव्हता. यास पुत्र नव्हता. म्हणून यानें ताराबाई नांवाच्या बायकोस एका घरांत ठेविलें व त्याच ठिकाणीं एका गरोदर स्त्रीस ठेविलें. ती बाळंत होतांच तिचें मूल ताराबाईच्या ओटींत टाकलें व त्या स्त्रीचा खून करण्यांत आला व ताराबाईसच मुलगा झाला असें प्रसिद्ध केलें. परंतु हें अमानुष कृत्य उघडकीस आलें व त्या स्त्रीचें प्रेत देखील सांपडलें. तेव्हां आप्पाची वृद्धावस्था व इ.स.१८०० व १८०३ सालीं त्यानें इंग्रजांस दिलेली मदत या गोष्टी लक्ष्यांत घेऊन त्याचा लष्करी सरंजाम तो मरेपर्यंत त्याच्याकडे ठेवण्याचें ठरविलें. पुढें त्यानें आपला पुतण्या मुरारराव यास दत्तक घेतलें. नंतर १८३९ सालीं हा मरण पावला व त्याचा लष्करी सरंजाम बेळगांव, धारवाड आणि सोलापूर या जिल्ह्यांत विभागण्यांत आला; पैकीं अथणी आणि होनवड हे भाग व निपाणी गांव बेळगांव जिल्ह्यांत समाविष्ट झाला. आप्पाच्या मरणानंतर त्याच्या सहा विधवांत भांडण लागलें. सर्वांत वडील ही दत्तकातर्फे सर्व अधिकार पहात होती; ती पुढें १८४० त वारली व तिच्याहून धाकटी होती तिच्याकडे सर्व अधिकार आला. दुसऱ्या स्त्रियांनीं आप्पाच्या भावास ३०० अरबांच्या मदतीनें मुलगा ताब्यांत घेण्यास मथविलें. त्यानें निपाणीचा किल्ला अरबांच्या साहाय्यानें घेतला. पुढें १८४१

साली इंग्रजांनी किल्ला घेतला. अरबांस शिक्षा करण्यांत येऊन किल्ला निकामी करण्यांत आला व ज्यांचें अंग या कृत्यांत होतें त्यांचीं पेन्शनें बंद करण्यांत आलीं.

**निप्पुर**—बाबिलोनियांतील अतिप्राचीन शहर. माहितीकरितां 'बुद्धपूर्व जग' ( ज्ञानकोश वि. ३ रा उत्तरार्ध पृ. ४१ ). पहा इ. स. पूर्वी चवथ्या सहस्रकांतील कांहीं शिलालेखांवरून निप्पूर शहर एनलिले देवळामुळें पवित्र समजलें जाई. राजकीय दृष्ट्या याला मुळींच महत्त्व नव्हतें.

**निप्से, जोसेफ निसेफोर** ( १७६५-१८३३ )—या फ्रेंच शास्त्रज्ञाचा जन्म फ्रान्सदेशांतील शालानसूर साउन येथें झाला. यानें सैन्यांत सबलेफ्टनेंटचें काम केलें. इटलीच्या मोहिमेंत हा होता; परंतु आजार व नेत्राचे रोग यामुळें त्याला नोकरी सोडावी लागली. पुढें त्यानें शास्त्रांत शोध लावण्याचें काम हातीं घेतलें व रसायनशास्त्रांत आपल्या भावाच्या मदतीनें श्रम करण्यास सुरवात केली; व पुढें यानें प्रकाशलेखन ( फोटोग्राफी ) विषयांत श्रम करून बरेंचसें यश संपादन केलें. एल् जे. एम्. डाग्वेरे यानें याच दिशेनें प्रयत्न सुरू केले होते. पुढें डाग्वेरे आणि निप्से यांनीं एकत्र होऊन प्रयत्न करण्याचें ठरविलें व या दोघांनीं बरेचसें यश मिळविलें. निप्सेनें फोटोग्राफीवर कित्येक लेख लिहिले आहेत.

**निफाड, तालुका.**—मुंबई इलाखा. नाशिक जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ ४१२ चौरस मैल. लोकसंख्या(१९११) ९३०२९. यांत ११९ खेडीं असून मोठीं गांवें नाहींत. निफाड हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. ह्या तालुक्यांत लोकवस्ती बरीच दाट आहे. जमीन काळी असून तींत गहूं व चणे हीं पिकें निघतात. हवा आरोग्यदायक असून एप्रिल, मे महिन्यांत उष्मा भयंकर असतो. तालुक्याजवळूनच गोदावरी नदी वहाते. पाऊसमान २३ इंच असतें.

**गांव.**—हें नाशिकच्या ईशान्येस २० मैलांवर रेल्वे-स्टेशन असून निफाड तालुक्याचें मुख्य ठाणें आहे. येथें तालुकाकचेरी, पोलिस-कचेरी व पोस्टऑफिस आहे.

**निंब**—मुंबई इलाखा, सातारा जिल्हा. हा गांव साताऱ्याच्या उत्तरेस ८ मैल अंतरावर असून साताऱ्याच्या राजघराण्याकडे आहे. येथें फळफळावळ (मुख्यत:आंबे व पेरू) व कधीं कधीं द्राक्षेंहि होतात. १७५१ सालीं सातारच्या ताराबाईच्या वतीनें, दमाजी गायकवाडनें पेशव्यांच्या फौजेचा या ठिकाणीं पराभव करून त्यांच्याकडून ताराबाईला कांहीं किल्ले देवविले.

**निंबहेर, जिल्हा.**—राजपुतान्यांतील टोंक संस्थानचा एक परगणा क्षेत्रफळ ३७९ चौरस मैल. ह्यांत १३ वेगळ्या वेगळ्या खेड्यांच्या संघाचा समावेश होतो. जिल्ह्यांमधून उदेपूर व ग्वाल्हेर संस्थानाच्या जमीनी आहेत. पूर्वेस ग्वाल्हेर संस्थान असून इतर तीन बाजू उदेपूर संस्थाननें वेष्टित आहेत. नैर्ऋत्येकडील भाग उंच पण सपाटीचा प्रदेश आहे. ईशान्येस चितूरच्या टेंकड्या आहेत. लोकसंख्या ( १९११ ) ४०४१२. निम्बहेर हा एकच गांव असून १८७ खेडीं आहेत. महाजन, ब्राह्मण, चांभार, जाट वगैरे प्रमुख जाती आहेत. येथें सन १०५८ मध्यें निजामी नांवाचा एक परमार रजपूत होता त्यावरून ह्या जिल्ह्याचें नांव पडलें असावेंसें वाटतें. राणा अरिसिंगच्या अमदानीपावेतों ह्या जिल्ह्याचा मेवाडांत समावेश होत असे. सन १७७५ मध्यें हा अहिल्याबाईच्या ताब्यांत आला. तिच्या निधनानंतर तो तुकोजी होळकराकडे आला. नंतर लवकरच जसवंतराव होळकरानें हा आपल्या ताब्यांत घेतला. १८०० सालीं त्यानें आपला मित्र अमीरखान ह्यास हा जिल्हा दिला व १८१७ सालच्या ब्रिटिश सरकारशीं केलेल्या तहानें तो त्याच्याकडेच ठेवण्यांत आला. बंडाच्या सालीं मेवाडच्या पोलिटिकल एजन्टनें उदेपूरच्या सैन्याची तुकडी ह्या जिल्ह्यांत वसविली. सर्वत्र शांतता स्थापित झाल्यावर ब्रिटिश सरकारनें महाराण्यास हा जिल्हा टोंकच्या नबाबास परत देण्यास भाग पाडलें. २४४चौरस मैल जमीन खालसा असून हिचें उत्पन्न संस्थानाकडे जातें. मुख्य पिकें जवार, मका, गहूं, तीळ, कापूस, वगैरे. धामनी जमीन काळ्या जमिनीच्या इतकी पिकाऊ नाहीं. निम्बहेर हें स्टेशन आहे.

**गांव.**—राजपुतान्यांतील टोंक संस्थानामध्यें निंबहेर परगण्याचें प्रमुख गांव. निमचहून वायव्येस१६मैल व अजमेरच्या दक्षिणेस १३४ मैल आहे. लोकसंख्या ४२७८. गांवाभोंवतीं तट आहे. नेहमींच्या वापरांतील भांडीं येथें होतात.

**निंबार्क**—नीमावत पंथाचा संस्थापक व एक वैष्णव धर्मप्रसारक. हा बाराव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेला असावा. कोणी, प्रख्यात गणिती व ज्योतिषी जो भास्कराचार्य तो हाच असें म्हणतात. याचें निंबार्क हें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं एके दिवशीं संध्याकाळीं एक वैरागी अतिथि त्याच्या घरीं आला. तो सूर्यास्तानंतर अन्नग्रहण करीत नसे, तेव्हां निंबार्कानें त्याच्यासाठीं सूर्याला निंबाच्या झाडांत अडकावून ठेविलें म्हणून त्याला निंबार्क (निंब-अर्क) म्हणूं लागले ! ! ! अकराव्या शतकाच्या मध्यकालापासून तेराव्या शतकाच्या मध्यकालापर्यंत दक्षिणेंत वैष्णवधर्मास अभूतपूर्व स्वरूप प्राप्त झालें. उत्कट भक्ति व मायावादाच्या घोरपरिणामाविषयीं शंका(भय?) हीं दोन या नवीन चळवळीचीं प्रमुख किंवा मार्गदर्शक तत्त्वें होतीं. उत्तरेकडे सदर चळवळीच्या प्रसाराचा आपोआप परिणाम झाला. व संप्रदाय किंवा पंथ स्थापणारांचे पुढील दोन वर्ग निरनिराळे अस्तित्वांत आले. ते:—

(१) संस्कृतमध्यें लिहिणारे व (२) स्वमतप्रसारार्थ मातृभाषेचा उपयोग करणारे. पहिल्या वर्गाचा आद्यपुरुष निंबार्क होय. निंबार्क हा जातीनें तैलंगी ब्राह्मण असून बल्लारी जिल्ह्यांतील निम्ब ( सांप्रतचें निम्बापूर ) गांवीं रहात असे

असें म्हणतात. वैशाख शुद्ध तृतीयेस त्याचा जन्म झाला; त्याच्या बापाचें नांव जगन्नाथ असून आईचें नांव सरस्वती होतें.त्याचे अनुयायी त्यास विष्णूच्या सुदर्शन चक्राचा अवतार समजतात. तो केव्हां होऊन गेला यावद्दल निश्चित माहिती उपलब्ध नाहीं. तथापि रामानुजाचार्यांच्या नंतर थोड्या कालानें तो होऊन गेला असावा असें दिसतें. ब्रह्मसूत्रांवर एक लहानसें भाष्य म्हणून 'वेदान्तपारिजातसौरभ' नांवाचा ग्रंथ व सिद्धान्तरत्न किंवा दशश्लोकी नांवाचा एक छोटासा ग्रंथ असे दोन ग्रंथ यानें लिहिले.निंबार्कानंतर थोड्या पुढील कालांत वैष्णव गुरुश्रीनिवास यानें पहिल्याग्रंथावर,व नामावळयांतील वंशपरंपरेप्रमाणें पाहतां ३२ वा हरि व्यासदेव यानें दुसऱ्यावर भाष्य लिहिलें.

निंबार्काचा वेदान्तविषयक सिद्धान्त अद्वैतपर त्याचप्रमाणें द्वैतपरहि आहे. अचेतन किंवा जड सृष्टि, जीवात्मा व ईश्वर हे एकमेकांपासून भिन्न तसेच एकहि आहेत. पहिल्या दोहोंस ईश्वराशिवाय स्वतंत्र अस्तित्व नाहीं या अर्थानें ते(तिघे) एक आहेत.पण हे दोघे, (जीव-ईश्वर) अस्तित्व व क्रिया या बाबतींत ईश्वरावर अवलंबून आहेत. ब्रह्म हें जगताचें उपादान कारण आहे, ह्या ब्रह्मसूत्रांतलि सिद्धांताचाअर्थ खालीलप्रमाणें घेतला आहे.' एखाद्या कार्याचें उपादान कारण असणें म्हणजे (१) त्या कार्याचें रूप धारण करण्याची शक्ति असणें (२) व तें कार्य करण्यास पात्रता असणें होय. सजीव सृष्टि व निर्जीव सृष्टि अशा स्वरूपाच्या पुष्कळ शक्ती ब्रह्माच्या ठायीं आहेत.'

ह्या शक्ती सूक्ष्म स्वरूपांत असणें ही ब्रह्माची सहजावस्था किंवा स्वाभाविक स्थिति होय. यामुळें पहिल्या गोष्टीची पूर्तता होते ( अगर पहिली गोष्ट सिद्ध होते ). शिवाय ह्या शक्तींच्या अंगीं, कार्य जें जगत् किंवा सृष्टि त्याचेंहि बीज सूक्ष्म स्वरूपांत आहे, म्हणजे यानें दुसऱ्या गोष्टीची पूर्तता होते. ब्रह्म हें या शक्ती कृतींत किंवा व्यवहारांत उतरवितें व सूक्ष्म बीजास स्थूलरूप देतें. याप्रमाणें तें जगताचें उपादान कारण होऊं शकतें. रामानुजाचा सिद्धांत निंबार्क-संप्रदायास संमत नाहीं. वास्तव त्यानें तो त्याज्य ठरविला आहे.

दशश्लोकींत निंबार्काच्या मताचें सार आलें आहे; याच्या मुळाशीं रामानुजाचार्यांचीच मतें असून सदर मताचीच ही एका बाजूनें झालेली प्रगति आहे.या मतांत प्रवृत्तीस ( तिच्या सहा प्रकारांसहित ) प्रमुख स्थान दिलें असून प्रवृत्तीनंतर ईश्वरी अनुग्रहानें ईश्वराविषयीं प्रेम अगर भक्ति उत्पन्न होते असें म्हटलें आहे. निंबार्काच्या " साधनभक्तींत " रामानुजाचार्यांचे सर्व योग येतात. रामानुजाचार्यांनीं भक्तीचा मूळ अर्थ बदलून, उपासना किंवा उपनिषदांत सांगितलेलें मनन ( किंवा ध्यान ) म्हणजेच भक्ति असा भक्तीचा अर्थ दिला आहे. निंबार्कानें मूळ अर्थच कायम ठेवला आहे. निंबार्काचीं मतें रामानुज-पंथाच्या वेंकटपंठाच्या मतांच्या जवळ जवळ येतात. पण रामानुजाचार्य व निम्बार्क या दोहोंमधील मुख्य भेद असा आहे कीं, रामानुजाचार्यांची मजल नारायण व त्याच्या तीन स्त्रिया लक्ष्मी, भू व लीला येथपर्यंतच गेली आहे, तर निंबार्कानें निव्वळ कृष्ण,राधा व तिच्या इतर गोपी दासी यांसच प्रमुख स्थान दिलें आहे म्हणजे याकाळीं वैष्णव धर्माचें चवथें अंग अगर उपांग दृग्गोचर झालें; बंगालसकट सबंध उत्तरहिंदुस्थानांत (ज्याचें उपास्य दैवत राम आहे असे लोक सोडून) या मताच्या सदर उपांगानें कायमचें स्थान पटकावलें आहे. निंबार्काचा संप्रदाय " सनकसंप्रदाय " या नांवानें ओळखला जातो. सनक हा दुसऱ्या पिढींतला वैष्णव गुरु होय. त्याच्यावरून संप्रदायाला नांव पडलें. निंबार्क हा दाक्षिणात्य होता तथापि तो वृंदावन येथें राहत असे. यावरून त्यानें वैष्णवपंथांतील राधाकृष्णविषयक अंगास प्रमुख स्थान दिलें आहे त्याचा उलगडा होतो. निम्बार्कांच्या संप्रदायाचे लोक सर्व हिंदुस्थानभर पसरलेले असून मथुरेच्या आसपासचा मुलुख व बंगाल यांमध्यें तर या लोकांची संख्या मोठी आहे. हे लोक कपाळीं गोपीचंदनाच्या दोन उभ्या रेषा व मध्यभागीं एक काळा टिळा लावतात व तुळशीची माळ गळयांत घालतात, व जपमाळ वापरतात. या लोकांचे संन्यासी व गृहस्थाश्रमी असे दोन वर्ग आहेत. हरिव्यासदेवाच्या काळीं सदर भेद प्रथम अस्तित्वांत आला असावा. [मॉनियर विल्यम्स-ब्राह्मॉनिझम अँड हिंदुइझम; भांडारकर—वैष्णविझम, शैविझम, इ. ; गेडेन—स्टडीज् इन् दि रिलिजन्स ऑफ दि ईस्ट; फरकुहर—रिलिजिअस लिटरेचर ऑफ इंडिया ]

**निंबाळकर**—' फलटण ' पहा.

**निबें (टांक)**—लेखनाच्या कामीं जीं आज जिकडे तिकडे निबें, ( टाकांचीं टोंकें, ) वापरतात तीं कशीं तयार करतात याची माहिती या लेखांत दिली आहे.

**टांक तोडणें.**—टांक तोडण्यास दोन प्रकारचीं निरनिराळीं यंत्रें असतात. एक स्क्रू फ्लाय प्रेस व दुसरें पंचिंग मशीन. फ्लाय प्रेसची उंची २॥ ते ३ फूट असून त्याला ४ इंचांत एक आटा, असे २, ३ किंवा ५ आटे असलेला १४ ते १८ इंच लांबीचा व १॥ ते २ इंच व्यासाचा एक पेंच चाकीमध्यें बसविलेला असतो. प्रेसच्या मध्यभागीं गोल,चौरस किंवा तिकोनी ४ पासून ८ इंच लांब स्लाईड लावलेला असून स्लाईडच्या मध्यावर वरील पेंच बसण्याकरितां भोंक ठेवलेलें असतें. स्लाईडच्या खालच्या तोंडास ५ सूत ( ½ इंच ) व्यासाचें भोंक पंच बसविण्याकरितां व स्टड आवळण्याकरितां ठेवलेलें असतें. प्रेसच्या खालच्या बैठकीवर डाय बसविण्याकरितां क्लांप किंवा बोलटाची व्यवस्था केलेली असते. पेंचाच्या डोक्यावर ६ पैलू वरील बाजूस उतरते ठेवलेले असतात. त्या पैलूंत बरेल असा २॥ ते ३ फूट लांबीचा दोन्ही टोंकें वर वळविलेला दांडा बसवून त्या टोंकावर दोन, ३ ते ४

इंच व्यासाचे लोखंडी गोळे बसविलेले असतात. दांड्याच्या एका पुऱ्या फेऱ्यामध्यें स्लाइड ४ इंच उचलली जाते. थोड्याशा झटक्यानें व वरील गोळ्याच्या वजनानें पेंच स्लाईडला जोरानें दाबतो; पंच स्लाइडमध्यें बसविला असल्यानें डायमध्यें उतरतो. पंचिंग मशीनला पेंचाच्या ऐवजीं क्रयॉंक किंवा एक्सेंट्रिक असतें; बाकी स्लाईड वगैरे प्रेसप्रमाणेंच असतें. दांड्याच्या ऐवजीं हीं यंत्रें चालविण्यास दांताच्या चाकाची योजना केलेली असते.

डायपंचची कृति.—टांक तोडण्यासाठीं डाय-पंच प्रथम करावी लागतात. डायकरितां टूलस्टीलचा ४ इंच चौरस व अर्धा इंच जाडीचा पाटा येऊन त्याच्या चारी बाजू प्लेनिंग मशीनवर साफ करून घेतात. डायचा मध्यभाग टांकाच्या लांबी-रुंदीपेक्षां पाव पाव इंच सभोंवार राहील असा १ दोरी ( ⅛ इंच ) वर राहील इतका कांतून घेतात, व खालचा भाग सपाट करतात. यावर आलेल्या भागांवर नमुन्याचा चपटा टांक ठेवून त्याची बाह्यरेषा आंखून घेतात. नंतर मधील सर्व भाग पावदोरी, रेषेच्या सर्व बाजूंनीं राहील इतका ठेऊन बाकीचा सर्व भाग लहानमोठीं भोंकें पाडून व छिनीनें तोडून काढतात. नंतर निरनिराळ्या आकाराच्या बारीक कानसांनीं बाह्यरेषा अर्धी राहील इतक्या बेतानें घांसून काढतात. तुटलेले टांक आंत राहूं नयेत म्हणून डायच्या खालचा भाग ( सपाट बाजू ) सर्व बाजूंनीं पावसूत उतरता ठेवावा लागतो. डाय बैठकीवर कसण्याकरितां चार कोपऱ्याला ४ भोंकें पाडून झाल्यावर डायला पाणी देतात. पाणी देतांना डाय सर्व ठिकाणीं सारखी तापवावी लागते, तापलेली डाय पाण्यांत बुडवितेवेळीं फारच खबरदारी घ्यावी लागते; नाहींपेक्षां पाण्यांत डाय तडकून जाते किंवा वाकडी तिकडी होते. पाणी दिल्यावर तें फार कडक असतें म्हणून तें पुन्हां उतरावें लागतें. याला टेंपरिंग म्हणतात. हें करण्याकरितां डाय गोड्या तेलांत बुडवून एका लाल तापलेल्या लोखंडी जाड तुकड्यावर ठेवतात; म्हणजे खालच्या उष्णतेनें डाय तापूं लागून तीवर निरनिराळे रंग येऊं लागतात. तेल जळण्याच्या बेतांत आल्यावर डाय काढून तशीच थंड होऊं देतात. नंतर तिला गुळगुळीत सहाणेवर घांसून चांगली धार दिली म्हणजे डाय तयार झाली.

पंचहि याप्रमाणेंच तयार होतो. यंत्रावर डाय जोडल्यानंतर पंच डायच्या बाह्यरेषेपेक्षां ⅛ इंच जास्त राहील इतका घांसून काढतात. नंतर स्लाईडमध्यें स्टडनें तो पक्का कसून घेतात, व दांड्यानें किंवा चाक फिरवून तो डायवर उतरतात. डायच्या खुणा पंचवर सर्व बाजूंनीं घेतल्यावर जास्त असलेला भाग पुन्हां अगदीं बारिक कानशीनें घांसून काढतात. पंचचा पृष्ठभाग उत्तम पॉलिश करून नंतर डाय प्रमाणें पंचला पाणी देतात. अशा प्रकारें तयार केलेल्या डाय-पंचला ' मास्टर डाय अँड पंच ' म्हणतात. या डाय-पंचावरून दुसरे डायपंच तयार करतां येतात.

डाय व पंच पंचिंग मशीनला जोडल्यानंतर डायच्या समांतर रेषेंत पत्र्याचा बिंडल डाव्या हाताकडे ठेवतात. तुटलेल्या टांकामध्यें अंतर एकसारखें रहावें म्हणून डायच्या मागच्या बाजूस एक व आपल्या उजव्या हाताकडे एक असे दोन गाईड डायवर लावतात. टांक तोडतांना पंचमध्यें पत्रा अडकूं नये म्हणून एक पट्टी ठेवावी लागते. उजव्या हातानें दांडा खालीवर करतात व डाव्या हातानें पत्रा पुढें सरकावतात. डायच्या पुढें गाईड लावले असल्यानें तुटलेला पत्रा बरोबर त्या गाईडमध्यें बसतो व अशा रीतीनें पत्रा एकसारख्या अंतरानें पुढें सरकावितां येतो. एक दिवसांत ( आठ तासांत ) एक मनुष्य १५००० टांक तोडतो.

भोंकें पाडणें.—टांक तोडून झाल्यावर त्यास भोंकें पाडावीं लागतात. भोंकें पाडण्यास एक लहानसें पंचिंगमशीन असतें. या यंत्राला फक्त एक गोल स्लाईडचें डोकें जरा मोठें ठेवून त्यावर दांड्याचा दाब बसेल अशी व्यवस्था केलेली असते. टांक मध्यावर बरोबर राहाण्याकरितां व भोंकें पाडतांना टांकांत पंच अडकूं नये म्हणून खालीं व वर अशीं दोन गाईडे लावावीं लागतात. एका दिवसांत एक मुलगा १० हजार टांकांना भोंकें पाडतो.

शिक्का मारणें.—शिक्का मारण्याचें यंत्र, तोडण्याच्या स्क्रू फ्लाय प्रेसप्रमाणें असतें. वरच्या बाजूस शिक्क्याचा पंच बसवितात. खालच्या बाजूस तीन इंच उंच व दोन इंच लांब रुंद अशी चौरस माथ्याची डाय बसविलेली असते. टांक मध्यावर रहावा म्हणून एक गाईड डायवर लावतात. गाईडमध्यें टांक ठेऊन दांड्याला थोडासा झटका दिल्याबरोबर शिक्का टांकावर आदळतो. अशा रीतीनें टांकाचें नांव, नंबर, करणाऱ्याचें नांव व ठिकाण टांकांवर उमटतें. दररोज एक मुलगा १० हजार टांकांवर शिक्के मारतो.

बाजू चिरणें.—टांकाचा कडकपणा कमी व्हावा म्हणून टांक बाजूला चिरतात. बाजूच्या चिरण्याची ही कृति भोंकें पाडण्याच्या यंत्राप्रमाणेंच असलेल्या यंत्रावर करतात. दीडपासून दोन दोऱ्या टांकाच्या दोन्ही बाजू चिरतात. एक दिवसांत एक मुलगा ९ हजार टांकांच्या बाजू चिरतो.

टांक तापविणें.—चिरणें झाल्यावर नरम करण्याकरितां टांक तापवावे लागतात. ८ इंच लांब, ६ इंच रुंद, २ इंच उंच व एक दोरी जाड, लोखंडी पत्र्याची दोन टोपणांची पेटी तयार करतात. पेटीला २ फूट लांबीचे लोखंडी दांडे जोडतात; अशा पेट्यांत १३०० ते १५०० टांक भरून मंद आंचेवर तापवितात. चांगले लाल तापल्याबरोबर झांकण न उघडतां तसेच पेट्यांत थंड होऊं देतात. दररोज एक मनुष्य १५००० टांक तापवितो.

टांक खोलविणें.—टांक खोलविण्याचें यंत्र शिक्के मारण्याच्या यंत्रासारखेंच असतें. डाय व पंच या दोहोंवर

एकावर उलटा व दुसऱ्यावर सुलटा अशी टांकाची आकृति दुम-लेली दिसते. खालच्या डायवर टांक बरोबर बसण्याकरतां गाईड न लावतां टांकाच्या वेताचा एक खाचा घालतात, व टांक पुढें जाऊं नये म्हणून खाचाच्या दोन्हीं बाजूंस छिनीनें दोन टच मारतात. या खाच्यांत टांक ठेवून वरील दांडा फिरविल्याबरोबर पंच डायवर उतरून टांक खोलविला जातो. एक मनुष्य दररोज ९ हजार टांक खोलवितो.

पा णी दे णें.—टांक टणक करण्यासाठीं पाणी द्यावें लागतें. पाणी देण्याकरितां एक विशिष्ट प्रकारची भट्टी बांधावी लागते. ती सुमारें १॥ फूट चौरस असून१ फूट उंच असते. भट्टीच्या सर्व बाजू बंद असून फक्त एक तोंड खुलें ठेवलें जातें. टांक तापविण्याकरितां ज्या पेट्या उपयोगांत आणाव्या लागतात त्याच पेटया पाणी देण्याच्या उपयोगीं पडतात. एका पेटींत सुमारें १००० टांक चांगले हालवून भरतात व पेटीचें झांकण लावून पेटी बंद करून भट्टीच्या खुल्या तोंडांतून आंत ठेवतात. खालीवर लांकडी कोळसे घालून व भट्टीचें खुलें तोंड पत्र्यानें बंद केल्यावर भात्यानें सावकाश फुंकतात. पेटी तापून लाल झाली म्हणजे खालचें तोंड वर करून पुन्हां लाल होऊं देतात. साधारणपणें एक पेटी चांगली तापण्यास २०–२२ मिनिटें लागतात.तापविल्यानंतर लगेच झांकण उघडून टांक तेलांत ओततात.

सिलेंडर तेल एका १॥ फूट व्यासाच्या व १ फूट उंचीच्या भांड्यांत अर्ध्यापेक्षां थोडें जास्त भांडें भरेल इतकें ठेवतात. भांड्याच्या तळापासून ३ इंच वर राहील अशा बेतानें आंत एक लोखंडी तारेची जाळी ठेवतात.जाळीचा उपयोग, तेलांत टांक ओतल्याबरोबर ते तळाशीं न बसतां मध्यावर रहावे, म्हणजे तेल खालींवर सारख्या प्रमाणांत असावें हा होय. लाल झालेले टांक तेलांत ओतल्याबरोबर एकदम मोठा जाळ होतो म्हणून ओततेवेळीं तोंड भांड्यापासून मागें घेऊन टांक ओतावे, नाहींतर डोळ्यांनां इजा होण्याचा फार संभव असतो. दोन तीन पेटया टांक तापवून तेलांत ओतल्यावर तेल गरम होऊं लागतें. गरम झालेल्या तेलांत पाणी चांगलें बसत नाहीं म्हणून तेलाचें भांडें दुसऱ्या एका थंड पाण्याच्या भांड्यांत ठेवावें लागतें व पाणी नेहमीं थंड राहील अशी व्यवस्था करावी लागते. दररोज एक मनुष्य ( याच्या जोडीला भाता फुंकण्यास व पाणी बदलण्यास एक मुलगा) १४ ते १७ हजार टांकांनां पाणी देतो.

सा फ क र णें.—सिलेंडर तेल चिकट व घट्ट असतें, अशा तेलांत टाकांनां पाणी द्यावें लागतें. तेलांतून टांक काढल्यावर ते राकेल तेलांत स्वच्छ धुतात. राकेल तेलाचा तेलकटपणा जाण्याकरितां गरम पाण्यांत सोडा विरघळून त्या पाण्यानें धुवून मग ते, गंधकाचें तेजाब थोडया प्रमाणांत पाण्यांत घालून त्यांत धुवून काढतात. तेजाबाचा अंश घालविण्याकरितां पुन्हां एकदोनदा स्वच्छ पाण्यानें धुतल्यानंतर टांक लांकडी भुशांत कोरडे करतात व नंतर साधारणपणें पांढरे करण्याकरितां लांकडी ड्रममध्यें घालून अर्धा तास फिरूं देतात. हा ड्रम सहा किंवा आठपैलू सागवानी लांकडाचा करतात. लांबी २८ ते ३० इंच व व्यास २ फूट असून त्यास, टांक भरण्याकरितां एक तोंड ठेवतात. ड्रमचा कणा बरोबर मध्यभागीं न ठेवतां १॥ इंच हटवून बसवितात म्हणजे ड्रम फिरतांना एकदम गोल न फिरतां वाकडा तिकडा फिरावा. एका मिनिटांत १५ ते २० फेरे होतील इतकीच त्याला गति द्यावी लागते. गति कमी करण्याकरितां लहानमोठीं दांतांचीं चाकें लावावीं लागतात. हा ड्रम हातानें किंवा विजेच्या अगर एंजिनच्या शक्तीनें फिरवितात. एका वेळीं ड्रममध्यें ५ ते ६ हजार टांक साफ होतात.

पा णी उ त र णें.—लाल तापविलेले टांक एकदम तेलांत टाकल्यानें पांढरें ( अतिशय कडक ) पाणी बसतें. इतकें कडक पाणी पुढील कोणत्याहि कृतीला (प्रोसेस) निरुपयोगी असल्यानें टांकाचें पाणी उतरावें लागतें.

एक लोखंडी जाळीचा १२ इंच व्यासाचा गोल ड्रम करून त्याच्या मध्यावर ३ फूट लांबीचा गोल गज, एक टोंक ४ इंच व दुसरें २ फूट बाहेर राहील अशा बेतानें बसविलेला असतो. ड्रमच्या एका टोंकास ४ इंच व्यासाचें एक तोंड ठेवलेलें असतें. या ड्रमच्या तोंडांतून, साधारणपणें पांढरे टांक १००० ते १२०० पर्यंत भरून झांकण बंद करतात. नंतर हा ड्रम एका १८ इंच व्यासाच्या खालीं वर झांकण नसलेल्या १६ इंच उंचीच्या नळकंड्यावर ठेवून कोळशाच्या आंचीवर फिरवितात. जसजशी टांकाला जास्त आंच लागूं लागते तसतसा टांकाचा पांढरेपणा जाऊन अगदीं फिकट पिंवळा रंग येऊं लागतो, नंतर तो गर्द पिंवळा होतो व पुढें जांभळ्या रंगांत त्याचें रूपांतर होऊं लागतें. चांगला गर्द जांभळा रंग आला कीं, ड्रम फिरविण्याचा बंद करून टांक थंड होण्याकरितां खालीं पसरून ठेवितात.पाणी उतरल्यानंतर टांक घांसावे लागतात.

टां क घा स णें.—३ सूत ( $\frac{3}{8}$ इंच ) जाडीची व ४ इंच व्यासाची अशी एमरी किंवा कार्बुन्यांडम दगडाची (हा दगड कुरुंदाच्या जातीसारखाच असतो ) सहाण टांक घांसण्यास घेतात.एका लोखंडी बैठकीवर दोन बेरिंगमध्यें एक कणा घालून त्याच्या दोन्ही टोंकांस दोन सहाणा बसविलेल्या असतात.त्या फिरविण्याकरितां मध्यभागीं एक पुली असते ती चामड्याच्या दोरीनें दर मिनिटाला १२०० ते १६००फेरे होतील इतक्या वेगानें फिरवितात. सहाणेच्या पुढच्या टोंकाला टांक फिरविण्याकरितां टांकाच्या गोलाईच्या आकाराचा खाच्या घातलेली ३ सुती जाडीची पट्टी लावतात.

सहाणेच्या मागच्या बाजूस टांकाचें टोंक बरोबर अर्धा सूत ( $\frac{1}{16}$ इंच ) राहील असें कमी जास्त करतां येणारें गाईड लावलेलें असतें. एकेक टांक घेऊन सहाणेवर टांकाचें पुढचें टोंक $\frac{1}{16}$ इंच सोडून टांकाच्या भोंकापर्यंतचा भाग घांसतात. टोंकाला पत्र्याची जाडी कायम राहून भोंकापर्यंतचा

भाग घांसल्यानें थोडासा पातळ होतो. यामुळें टांकाला लव-चीकपणा येतो. कांहीं कांहीं टांक भोंकावर व चिरलेल्या बाजूवर उगे घांसतात. अशा घांसण्याला ' सरळ घांसणें ' म्हणतात. दररोज एक मुलगा ५००० टांक घासतो.

टांक चिरणें.—टांक घांसणें झाल्यावर ते चिरावयास घेतात. हें चिरण्याचें यंत्र १॥ फूट उंचीचें असून स्क्रू फ्लाय प्रेसचा हुबेहूब लहान नमुनाच असतो. टांक चिरण्याच्या सुऱ्या फार कठिण पोलादाच्या कराव्या लागतात. सुरीच्या दोन्ही बाजूंनां दोन गाईड, टांक बरोबर मध्यावर ठेवण्याकरितां लावतात. डाव्या हातानें टांक धरून उजव्या हातानें प्रेसचा दांडा थोडासा फिरविल्याबरोबर वरची सुरी खालच्या सुरीवर उतरून टांक कापला जातो.

टांक थोडा जरी गाईडमध्यें वांकडा बसला तर समान प्रमाणांत दोन्ही तोंडें न कापलीं जातां टांक फुकट जातो. चिरण्याचें काम सर्वांत फार महत्त्वाचें समजलें जातें म्हणून चांगल्या हुषार व अनुभवी माणसाची या कामाकडे योजना करावी लागते. एका दिवसांत एक मनुष्य ३००० टांक चिरतो.

टुबूक काढणें किंवा टोंक वळविणें.—चिरल्यावर टांकाच्या टोंकाला टुबूक काढतात किंवा टोंकें वर वळविलीं जातात. सर्वच टांकांचीं टोंकें वळवितात असें नाहीं. हें यंत्र भोंक पाडण्याच्या लहान पंचासारखें असून पंचास निमगोल टोंक काढतात व डायला तसाच खांचा घालतात. टांक या खांचाच्या टोंकावर धरून वरचा दांडा दाबल्याबरोबर टोंकावर टुबूक येतें. असेंच टोंकें वर वळविण्याचें करतात. एका दिवसांत एक मनुष्य ५००० टांक तयार करतो.

साफ करणें.—वर सांगितल्याप्रमाणें टांकाला गर्द काळा रंग येतो तो घालविण्याकरितां टांक, गंधकाच्या तेजाब पाण्यांत थोडेसे घालून त्यांत धुतात व लांकडी ड्रममध्यें साफ होण्याकरितां ४००० पर्यंत टांक घालतात. ड्रम साधारण ३ तास एक सारखा सावकाश फिरूं देतात नंतर चांगला भुस्सा घालून अर्धा तासपर्यंत चमक येण्याकरितां ड्रम पुन्हां फिरवावा लागतो. चाळणींतून भुस्सा अलग करून टांक निराळे करतात.

रंग देणें.—पांढरे स्वच्छ निघालेल्या टांकांनां टराविक पद्धतीनें पिवळा रंग देतात.

व्हारनिश करणें.—रंग दिल्यावर पातळ तांब्याच्या तारेंत एक उलटा तर दुसरा सुलटा याप्रमाणें सुमारें ७५ टांक तारेंत ओवून जुळ्या तयार करतात, व त्या तयार केलेल्या जुळ्या व्हारनिशमध्यें बुडवून चांगल्या झटकून आंचीवर सुकवितात. व्हारनिश, लाख किंवा सेलूलिड वितळून तयार करतात. व्हारनिशचें यंत्र साधारण २॥फूट उंच असून त्याची मागची व पुढची बाजू बंद असते. खालचा भाग स्टोव्ह ठेवण्याकरितां थोडा मोकळा ठेवतात. वर दोन टोंकांनां दोन पुल्या लावून त्यांवर हुकासारखीं टोंकें वळविलेल्या पातळ पत्र्याची माळ बसविलेली असते. अशा प्रत्येक वळविलेल्या टोंकांत व्हारनिशमध्यें बुडविलेली टांकाचीं जुळीं टांगून स्टोव्ह किंवा ग्यासच्या आंचीवर गरम करतात. थोडासा व्हारनिसचा धूर निघूं लागल्याबरोबर माळ पुढें सरकवितात. टांक थंड झाल्यावर काढून घेतात. एका दिवसांत एक मनुष्य १२ हजार टांकांनां व्हारनिश करतो. व्हारनिश करण्यानें टांकाला चांगली चमक येऊन गंज चढत नाहीं.

जुळणें, तपासणें व भरणें.—तारेंत ओवलेले टांक बरोबर २४, २४ टांकांच्या जुळ्या करून तपासण्याकरितां ठेवतात ही एकेक जुळी हातांत धरून प्रत्येक टांकाचें टोंक नीट तपासलें जातें. वाकडें, चिरलेलें, टोंक तुटलेले अगर तोंड फांसठलेले टांक काढून टाकतात व नंतर ते कागदी पेट्यांत भरतात. दररोज एक मनुष्य ७ हजार टांक तपासून भरतो.

प्याकिंग.—टांक १ ग्रोस ( १४४ ), अर्धा ग्रोस, पाव ग्रोस किंवा दीड डझनच्या पेट्यांत भरून ज्या त्या नांवाचीं लेबलें लावल्यावर पुड्यांत किंवा ग्रेट ग्रोस ( १२ ग्रोस ) च्या पेटींत भरून विक्रीकरितां तयार होतात. पॉवरचा उपयोग फक्त ग्राईंडिंग व पॉलिशिंगकडे होतो, बाकी सर्व कामें हातानेंच होऊं शकतात. दोन तीन मोठीं माणसें सोडून बाकी सर्व काम १५–१६ वर्षांच्या आंतील मुलें किंवा मुलीच करतात. मोठ्या माणसांपेक्षां मुलांचें काम जलद होऊन फार स्वस्त परवडतें. चार पैशांच्या एका टांकापासून ते पैशाला ६ पर्यंत मिळणारे व दिसण्यांत अगदीं क्षुल्लक दिसणारे टांक तयार होण्यास त्याला १७ माणसांच्या हातून जावें लागतें; याची कल्पना फारच थोडक्यांनां असेल.

पितळी टांकाची कृति.—स्वस्त प्रकारचा माल हा बाजारांत मिळणाऱ्या नं. १२ च्या पितळी पत्र्यापासून तयार करतात. पितळी पत्र्याला टणकपणा बराच कमी असतो. नं. १२ चा पत्रा घेऊन त्याच्या ३ इंच रुंदीच्या लांब पट्ट्या कापतात. नंतर त्या ५ ते ७ वेळां रोलिंग मशीननें दाबून पत्र्याची जाडी ३२ व ३३ स्टँडर्ड वायर गेज इतकी करतात. रोलिंगमधून काढल्यानें पत्रे पातळ होऊन टणक होतात. उत्तम प्रकारच्या पितळी टांकाकरितां तांबें, कथील, जस्त व अँटिमनी इतक्या धातू कमीजास्त प्रमाणांत आटवून त्यांचे पत्रे तयार करावे लागतात. अशा मिश्रणाचे पत्रे जात्याच जास्त टणक व टिकाऊ होऊन त्यांनां रंगहि फार चांगला येतो. अशा मिश्रणाच्या परदेशांतून येणाऱ्या पत्र्याला टोंब्याक म्हणतात. टांक तोडणें, भोंकें पाडणें, शिक्का मारणें, बाजूला चिरणें व खोलविणें हे सर्व प्रकार पोलादी टांकाप्रमाणेंच करतात. फरक इतकाच कीं, पितळी टांक खोलविण्याच्या अगोदर चिरून नंतर खोलावले जातात. खोलवून तयार झाल्यानंतर ते ड्रममध्यें गुळगुळीत होण्याकरितां टाकतात.

नंतर गंधकाचें तेजाब, सोन्याचें तेजाब व थोडासा सोरा एकत्रित करून एका चिनी मातीच्या ओगराळ्यासारख्या परंतु जाळीदार भांड्यांत १५०पर्यंत टांक घालून तेजाबाच्या मिश्रणांत अजमासें एक मिनिट हालवून चार पांच वेळां स्वच्छ वाहत्या पाण्यानें धुवून काढावे लागतात, व लगेच लांकडी भुश्यामध्यें कोरडे करण्याकरितां टाकतात. नंतर तपासणें, जुळणें, भरणें वगैरे सर्व प्रकार पोलादी टांकांप्रमाणेंच करतात.

प्या किं ग.—अगदीं थोड्या जातीच्या टांकाशिवाय बहुतेक सर्व टांक १ ग्रोसच्या ( १४४ ) पेटींत भरतात. कांहीं अर्ध्या ग्रोसच्या, कांहीं पाव ग्रोसच्या व कांहीं कांहीं दीड डझनच्या पेटयांत भरतात. दीड व तीन डझनच्या पेटया किरकोळ विक्रीस व फुटकळ गिऱ्हाइकांस सोयीच्या पडतात, तशा ग्रोसवाल्या पेटया पडत नाहींत. जितक्या कमी मालाच्या पेटया भराव्या तितका प्याकिंग खर्च वाढत असल्यानें, बहुतेक सर्व टांक १ ग्रोसच्या पेटयांतच भरतात.

ग्रोसवाल्या पेटया ग्रेट ग्रोसच्या ( १२ ग्रोस ) पेटींत भरल्या म्हणजे माल पाठविण्यास तयार होतो. अगदीं थोड्या जातीच्या टांकांकरितां टिनच्या ( कल्हईच्या पत्र्याच्या ) पेटया वापरतात परंतु सर्व प्रकारचे टांक भरण्याकरितां कागदी पेटयांचाच उपयोग करतात. अगदीं हलक्या किंमतीचे टांक ग्रेट ग्रोसच्या पेटयांतून न भरतां बारा ग्रोसाचे पुडे बांधतात. पेटींत टांक भरतांना तेलकट कागदाचा ( ऑईल पेपर ) उपयोग करतात. प्रत्येक पेटींत टांकाचें भावपत्र व दुसऱ्या कोणत्यातरी निराळ्या जातीच्या नमुन्याचा एक टांक घालतात.

यं त्र सा मु ग्री.—टांकाचीं टोंकें ( दररोज १०० ग्रोस टांक तयार करण्यासाठीं लागणारी यंत्रसामुग्री पुढें दिल्याप्रमाणें:—

१ चार फुटी लेथ
१ हँड ग्रेनिंग मशीन
१ लहान ड्रिलिंग मशीन
} डाय पंच, कटर वगैरे तयार करण्यासाठीं.

१ पंचिंग मशीन, टांक तोडण्यास.
२ स्क्रू फ्लायप्रेस, शिक्के मारण्याकरितां.
" " खोलविण्याकरितां.
२ पंचिंग प्रेस, भोकें पाडण्यास.
२ ,, ,, बाजू चिरण्यास.
२ ,, ,, बॉल पॉईंट व टोंकें वळविण्यास.
२ ग्राइंडिंग मशीन, घांसण्याकरितां.
४ स्लिटिंग प्रेस, चिरण्याकरितां.
२ ड्रम, पॉलिश करण्यास.
१ भाता
१८ पेटया
} पाणी देणें व तापविण्यासाठीं.

१ ड्रम-जाळीदार, पाणी उतरणें व रंग देण्यास.
१ ल्याकरिंग मशीन, व्हारनिश करण्यास.
१ रोलिंग मशीन, पितळी पत्रे टणक करण्यास.
१ निरनिराळ्या प्रकारचे डायंपचाचे सेट-कटर, सहाणा, वगैरे.
१ मूल्डिंग व कटिंग मशीन, पेटयांनां खाचे घालण्यास व तुकडे तोडण्यास.
१ कॉर्नर कटिंग मशीन, पेटयांचे कोंपरे कापण्यास.
१ आईल एंजिन किंवा विजेची मोटार.
४ हार्स पॉवरचा लेथ, ड्रम, ग्राइंडिंग वगैरे यंत्रें चालविण्याकरितां.

क च्चा मा ल.—(१)पोलादी टांकासाठीं लागणारे निरनिराळ्या जाडीचे पत्रे इंग्लंड, जर्मनी व अमेरिका येथून तयार होऊन येतात. अशा पत्र्यांनां 'कोल्ड रोल्ड स्टील रिबन रोल्स' म्हणतात. यांची रुंदी २॥ इंचांपासून त ४ इंचांपर्यंत असून लांबी ३०० ते ५०० फुटांपर्यंत असते व जाडी ३१, ३२ व ३३ स्टँडर्ड वायरगेज असते. अशा एका पत्र्याचें वजन सुमारें एक हंड्रेडवेट ( ५६ शेर ) असतें. रुंदी व जाडीच्या मानानें पत्र्याची लांबी कमीजास्त होते.

( २ ) पितळी टांकाचे पत्रे जर्मनी, इटली व इंग्लंड येथून येतात, व हे वाटेल तेथें मिळूं शकतात. इटलीचे पत्रे पिंवळ्या रंगाचे व जर्मनीचे तांबूस रंगाचे असतात. नं. १२ चे पत्रे टांकाच्या उपयोगी असून अशा एका पत्र्याचें वजन दीड शेर अदपाव असतें व लांबी चार फूट व रुंदी १४ इंच असते. अगदीं स्वस्त प्रकारचा माल याच पत्र्याचा करतात. चांगल्या किंमती पितळी मालाकरितां तीन चार निरनिराळ्या धातूंचें मिश्रण करून पत्रा तयार करावा लागतो. अशा मिश्रणाचे पत्रे परदेशांतून तयार केलेले मिळतात. त्याला टोंब्याक पत्रे म्हणतात.

( ३ ) सिलेंडर तेल, टांकाला पाणी देण्यास.
( ४ ) गंधकाचें तेजाब.
( ५ ) सोन्याचें तेजाब.
( ६ ) सोरा, पितळी व पोलादी टांक उजळण्याकरितां.
( ७ ) लोखंडी पत्रे, टांक तापविणें, पाणी देणें वगैरे कामास.
( ८ ) कोळसे, टांक तापाविण्याकरितां.
( ९ ) लांकडी भुसा, टांक कोरडे करण्यास.
( १० ) घासलेट तेल. तेलांत पाणी दिल्यानंतर टांक साफ करण्यास.
( ११ ) पेटयांकरितां जाड कागद.
( १२ ) पेटया चिकटविण्याकरितां रंगीत कागद.
( १३ ) पेटयांवर लावण्याकरितां लेबलें.

भांडवल.

| | |
|---|---|
| माल | रु. |
| यंत्रसामुग्री व हत्यारें. | १०००० |
| कच्चा माल | ५००० |
| खेळतें भांडवल | ५००० |
| एकूण रुपये | २०००० |

हिंदुस्थानांतील कारखाने.—१९०६ सालीं शीव ( मुंबई ) येथें श्री. रानडे यांनीं प्रथम टांकांचा कारखाना काढला. या कारखान्यांत फक्त पितळेचीं टोंकें (टांक) तयार होत असत. ह्या कारखान्यांत परदेशी यंत्रें व परदेशी डायपंच वापरीत असत. पुढें अल्पावधींतच तो कारखाना बंद पडला. नंतर तांबट ब्रदर्स कंपनीचा कारखाना कुर्ला ( मुंबई )येथें सुरू झाला.या कारखान्याची एक शाखा१९०९ सालीं ग्वाल्हेरला काढली. पुढें दोन तीन वर्षांनीं सर्व कारखाना ग्वाल्हेरीस गेला. या कारखान्याची सर्व यंत्रसामुग्री तांबट बंधूंनीं स्वतःच बनविली आहे. पोलादी टांकाची सुरवात प्रथम त्यांनींच केली असून अद्यापपर्यंत सर्व हिंदुस्थानांत यांच्याशिवाय पोलादी टांक दुसरे कोणीहि करीत नाहींत. हल्लीं मालवण, कलकत्ता व गुजराथ ( पंजाब ) येथें पितळी टांकाचे कारखाने आहेत. [ लेखक, तांबट बंधू, ग्वाल्हेर. ]

**निमराण**—राजपुन्यांतील अलवार संस्थानामध्यें असलेली एक इस्टेट. क्षेत्रफळ २५चौरस मैल.लोकसंख्या (१९११) १८७३२. ह्या इस्टेटीचे चार विभाग पाडले असून प्रत्येक भागांत १९ खेडीं आहेत. ह्या इस्टेटीवर दिल्लीचा हिंदू राजा पृथ्वीराज ह्याच्या वंशात जन्मलेला रजपूत चव्हाण राजा राज्य करीत आहे. १४६७ सालीं दूप राजानें हा गांव वसविला असें म्हणतात. त्याचाच वंशज अलीकडचा जनकराजा आहे. ह्या इस्टेटींत पूर्वी तीन परगणे असून ३६ खेड्यांचा समावेश होत असे; पण लॉर्ड लेकनें ही इस्टेट १८०३ सालीं खालसा केली. कारण येथील राजानें मराठ्यांस आश्रय दिला होता. १८१५ सालीं फक्त निमराण परगणा व कांहीं खेडीं राजास परत करण्यांत आलीं. बरेच दिवस निमराणचा राजा स्वतंत्रतेचा आव घालीत होता. पण खरें म्हटलें तर अलवारच्या राजानें ही इस्टेट ह्या राजास दिली असल्यामुळें त्याचा हा प्रयत्न व्यर्थ होता.तो अलवारच्या राजाचा मांडलिक होता असें १८६८ सालीं पक्कें ठरवलें गेलें. ह्याबद्दल निमराणच्या राजानें एकअष्टमांश सान्याचें उत्पन्न अलवारच्या राजास द्यावें व नजराणाहि द्यावा असें ठरलें. ह्या प्रदेशांत अहीर लोक रहातात. इस्टेटीचें एकंदर उत्पन्न सुमारें ४० हजार आहे.

**निमि**—सूर्यवंशीय इक्ष्वाकु राजाचा दुसरा पुत्र. हा गौतमाश्रमासमीप वैजयंत नामक नगर वसवून तेथें राज्य करीत असे. राजानें आपणाशिवाय यज्ञ सुरू केला हें पाहून एकदां वसिष्ठानें याला 'तुझा देह पतन पावेल' असा शाप दिला. यानेंहि उलट त्यास तोच शाप दिला. तेव्हां दोघांचेहि आत्मे ब्रह्मदेवाकडे गेले. लगेच ब्रह्मदेवाकडून देहधारणेची आज्ञा झाली. परंतु निमीनें ब्रह्मदेवाची प्रार्थना केली कीं मला आतां देहधारण नको. तेव्हां प्राणिमात्रांच्या नेत्रांत याची स्थापना करण्यांत आली. याचाच पुत्र मिथिनामा जनक होय.

**नियामतखान**—हा कवि, औरंगझेबच्या मुदबकखान्यावरील अधिकारी व अंगरक्षक होता. याची 'हुस्न व इष्क' ही कविता प्रख्यात आहे. यांत औरंगझेबानें मराठ्यांचा नाश न करतां प्रथम विजापूर व गोवळकोंडे येथील मुसुलमान धर्माचीं राज्यें नाहींशीं केल्याबद्दल,त्याच्यावर श्लेषात्मक टीका केलेली आहे.त्यावेळच्या धर्मवेड्या मुसुलमान लोकांनां औरंगझेबाचें हें कृत्य आवडत नव्हतें, मुसुलमान शिपाई डोंगराळ दख्खनमधील लढायांनां कंटाळले होते, वगैरे गोष्टी या काव्यांत आहेत. या काव्यास वाकाय नियामतखान अली असें दुसरें नांव आहे. पौर्वात्य सूपशास्त्रावर खवान नियामत नांवाचा एक उत्तम ग्रंथ यानें लिहिला आहे. हा १७०८ सालीं मेला. त्याला दानिष्मदखान अशी पदवी होती [ बील ]

**निरगुन्डा**—म्हैसूर संस्थानामधील चितळदुर्ग जिल्ह्याच्या होसदुर्ग तहशिलीमधील एक खेडें. हें होसदुर्ग गांवापासून ७ मैल आहे. फार प्राचीन काळीं ही निरगुन्डा प्रांताची राजधानी होती. उत्तरेकडील एका राजानें हें गांव वसविलें व त्याचें नांव 'निलावती' ठेवलें. होयसळ राजांच्या आमदानींत येथें गंगराजे राज्य करीत होते. १३ व्या शतकांत एका राजानें ब्राह्मणास अग्रहार दिला. १६ व्या शतकांत विजयानगरच्या राजानें येथें एक घाट बांधिला. त्यावेळीं हें लिंगायत लोकांचें व्यापाराचें स्थान होतें.

**निरंजनमाधव**—एक महाराष्ट्रीय कवि. निरंजनाचा जन्म कर्नाटकांत ' कंचा प्रांतीं ' झाला. बापाच्या मृत्यूनंतर तो महाराष्ट्रांत आला व थोरल्या बाजीरावाच्या पदरीं राहिला. बाजीरावाच्या पश्चात नानासाहेब पेशवेहि याचा परामर्ष घेत. तो कधीं कधीं राजकारणांत पडत असे. निरंजनमाधव याची कविता वामन व मोरोपंत यांच्या मधल्या काळांत रचली गेली असून या दोघांच्याहि कवितेतील पुष्कळ गुण तिच्यांत स्पष्ट दिसतात. याची भाषा सुबोध व ओजस्वी आहे. याच्यां कवितेंत वृत्तवैचित्र्य व विषयवैचित्र्य असून, प्रसिद्ध झाल्यास ती मराठी सारस्वतांत बरेंच उच्च स्थान पटकावील असें रा. ल. रा. पांगारकर त्यांनीं केसरीकडे पाठविलेल्या ता. २४। ७।१५ च्या पत्रांत लिहितात.स्तोत्रसंग्रह,आत्मचरित्रपर संप्रदायपरिमळनामक ओवीबद्ध ग्रंथ, श्रीज्ञानेश्वरविजय, सुभद्राचंपू, यांशिवाय याचे वृत्तशास्त्रावर वृत्तावतंस व वृत्तमुक्तावलि असे दोन ग्रंथ आहेत. ग्रंथावर कोठें कोठें शक–मिति, दिली आहे;त्यावरून पाहतां ही बहुतेक ग्रंथरचना शके१६८०-१६९४

च्या दरम्यान झालेली आहे असें दिसतें. यानें चिद्‌बोधरामायण उर्फ निरंजनरामायण रचलें असून त्याचें बालकांड १८८५ सालीं रा. गायकवाड यानीं छापलें आहे. संप्रदाय परिमळांत प्रथम कृष्णानंद सिंधु व ज्ञानसुधा हे ग्रंथ यानें लिहिल्याचें लिहिलें आहे. या कवीनें रामचरित्रावर बरीच रचना केली आहे. यानें सर्व हिंदुस्थानभर प्रवास व यात्रा केल्या होत्या. याचा प्रवासवर्णनपर ग्रंथ मोठा मनोरंजक व तत्कालीन परिस्थितीचें ज्ञान करून देणारा आहे. [ महाराष्ट्र--सारस्वत. ]

**निरंजनस्वामी** ( १५५९-१६४९ )—कऱ्हाड येथें राहणारे गणपतिउपासक व समर्थ रामदास स्वामींचे शिष्य. यांची गणेशगीता प्रसिद्ध आहे. यांचें गद्यचरित्र यांचा नातू, भगवान पाठक यानें लिहिलें आहे ( शके १६८३ ).

**निरा कालवा**-मुंबई इलाखा,पुणें जिल्ह्यामध्यें असलेल्या निरानदीच्या डाव्या तीरावरील कालवा. पंढरपूर, भीमथडी व इंदापूर या तालुक्यांत या कालव्याचें पाणी पुरविलें जातें. हा कालवा १८८५-८६ सालीं तयार करण्यांत आला. या कालव्याला पाण्याचा पुरवठा ' व्हायटिंग ' तलावापासून होतो. नदीच्या उजव्या तीरावरील कालव्याचें काम चालू आहे.

**निराजी रावजी**—शिवाजीच्या प्रथमच्या साह्यकारी मंडळींपैकीं एक; हा आग्र्यास शिवाजीबरोबर गेला होता व कैदेंतहि पडला होता ( १६६६ ). तेथून सुटल्यावर यानें मथुरेस मोरोपंत पेशव्याच्या मेहुण्याकडे संभाजीची व्यवस्था लावून दिली. दक्षिणेंत आल्यावर शिवाजीनें याला मोठें बक्षीस दिलें व औरंगाबादेस मोंगलाकडे वकील म्हणून ठेविलें. नंतर गोवळकोंडेकरानें शिवाजीस खंडणी देण्याचें कबूल केल्यावर त्याच्या दरबारीं निराजीपंतास वकील ठेविलें ( १६६९ ). पुढें याला न्यायाधीश करण्यांत आलें. हा मुत्सद्दी असल्यानें याची नेमणूक पुन्हां कुत्बशहाच्या दरबारीं वकिलीच्या कामावर झाली ( १६७८ ). त्यानंतर हा थोडक्याच दिवसांनीं वारला. याचाच मुलगा प्रल्हादपंत होय. [ सभासद; शिवदिग्विजय. ]

**निराशावाद** ( पेसिमिझम ) **आणि आशावाद** ( ऑप्टिमिझम )—या संसाराकडे पाहण्याच्या दोन दृष्टी असून त्या सामाजिक व धार्मिक विचारपद्धतीवर अनेक शतकें यूरोपांत व हिंदुस्थानांत परिणाम करीत आहेत. जीवित निराशापूर्ण असून मनुष्याच्या आयुष्यांत सुखापेक्षां दुःखच आहे अशा मतास निराशावाद म्हणतात. हें मत आशावादाच्या म्हणजे जगांत दुःखापेक्षां सुख अधिक आहे, आणि जगांत अखेर सत्याचाच किंवा सत्पक्षाचाच विजय होणार या मताच्या अगदीं उलट असून या दोहोंच्या मधोमध क्रमोत्कर्षवाद ( मेलिओरिझम ) आहे. याचा अर्थ जग हळू हळू उत्कर्ष पावत असून मनुष्याची चांगलेपणांत प्रगति होत आहे असा आहे. मेलिओरिझम हा शब्द अमेरिकेचे प्रसिद्ध समाजशास्त्रज्ञ लेस्टर वार्ड यांनीं प्रचारांत आणला.

सामान्य मनुष्य आशावादी किंवा निराशावादी होतो तो तात्त्विक विचारामुळें नव्हे तर त्याच्या वैयक्तिक परिस्थितीमुळें त्याची कौटुंबिक व सांपत्तिक स्थिति, शारीरिक आरोग्य वगैरे बाबतींत होणारा उत्कर्षापकर्ष किंवा उपजत स्वभावधर्म यामुळें तो तसा बनतो असें या दोन वादांच्या अनुयायित्वाचें भौतिक स्पष्टीकरण करण्यांत आलें आहे.

साधारणपणें मनुष्याचे या जगांतील जीवित हें विरोध, निराशा, दुःख, शारीरिक आजार व अखेर मृत्यु यांनीं व्याप्त असल्यामुळें जगाचें ज्ञान होऊं लागल्यापासूनच मनुष्याच्या मनाला नाउमेद करणारे प्रसंग वरचेवर येतात व तो साहजिकच निराशावादी बनूं लागतो. इतकेंच नव्हे तर निरनिराळ्या युगांतील व देशांतील मोठमोठे विद्वान व प्रतिभासंपन्न कवी याच निराशावादानें ग्रस्त दिसतात. होमर आपल्या काव्यांत म्हणतो " एकंदर जीवजातींमध्यें मनुष्यापेक्षां अधिक दुःखमय जीवित कोणाचेंहि नाहीं ( इलि. १७, ४४६ ). सोफोक्लीज म्हणतो " जन्मास न यावें हें सर्वांत अधिक चांगलें पण जन्म आलाच तर जेथून मनुष्य आला तेथें पुन्हां परत शक्य तितक्या लवकर जाणें हें बरें. "

हिंदु धर्मग्रंथांची मनुष्यजीवितासंबंधींची सर्व शिकवण आशावादीपणाची आहे. बाकी सर्व पौरस्त्य व पाश्चात्त्य समाजांत निराशावादच सर्वत्र आहे. मात्र अलीकडे पाश्चात्त्य देशांत भौतिक सुस्थिति व शास्त्रप्रगतीनें निसर्गावर वाढलेल्या सत्तेच्या आत्मप्रत्ययामुळें आशावाद वाढत आहे;निराशावाद व आशावाद हीं मतें अर्वाचीन काळांत विशेष पुढें आलीं तरी प्राचीन पौरस्त्य तत्त्वज्ञान व ख्रिस्तपूर्वकालीन यूरोपीय विचार यांत त्यांचीं बीजें आढळतात. प्लेटोचें मत व बुद्धमत निराशावादी दिसलें तरी अंतिम आशावादी आहे. ख्रिश्चन धर्मानें मनुष्यभवितव्याविषयीं निराळी आशा दाखवून कांहीं काळ कांहीं ठिकाणीं निराशावादास हांकून लावलें. यूरोपमध्यें उत्तरेस ट्युटन लोकांत निराशावाद जास्त होता. भूमध्यसमुद्राच्या लगतच्या मुलखांत हें मत विशेष प्रचलित नसे. पण ट्युटन लोकांतहि भावी आयुष्यांत या आयुष्यांतील विषमता नाहींशी होण्याची आशा वर्तमानकालीन दैववादाहून अधिक जोरदार असे. भावी काळांत होणाऱ्या आनंदाच्या कल्पनेनें ख्रिस्ती धर्मानें जरी निराशावादास नाहींसें केलें तरी निराशावादाचें तत्त्व गेलें नाहीं. शरीरदंडन, मौन इत्यादि यतिधर्म मध्ययुगीन ख्रिस्त्यांतहि वृद्धि पावलेच होते. अगदीं अलीकडे यूरोपांत जो निराशावाद प्रसृत झाला त्याच्यापूर्वी तेथें आशावाद १७ व्या आणि १८ व्या शतकांत होता त्याचा प्रमुख पुरस्कर्ता जर्मन तत्त्ववेत्ता लिबनिझ हा होय. त्यानें तत्त्वज्ञानविषयक अथवा धार्मिक आशावाद प्रतिपादून या विश्वांत ईश्वर सर्व संभवनीय मार्गांनीं व भागांतून

चांगलें निवडतो हें मत पुढें मांडलें. कांट हा वैयक्तिक दृष्ट्या मनुष्यांविषयीं जरी निराशावादी असला तरी नैतिक शक्तीसंबंधीं आशावादी आहे व हेगेल हा जरी एखाद्या क्षणास जगांत दुःख अधिक असलें तरी कलह व दुःखानुभव यांनीं जगाची कल्याणाकडेच प्रगति होत आहे असें म्हणतो. याच काळांत इंग्लंडांत लॉक, शॅफ्टस्बरी, बॉलिंग-ब्रोक वगैरे तत्त्ववेत्ते आशावाद प्रतिपादीत होते. १९ व्या शतकांत शोपेनहार व हार्टमन हे प्रसिद्ध निराशावादी झाले आहेत. शोपेनहारनें हेकेलचा निराशावाद वाढविला. विश्व हें फक्त प्रेरकशक्तीनें चाललें आहे,त्यांत विचार नाहीं, ही प्रेरकशक्ति अविचारी आहे. तशीच अहेतुक व म्हणून असुखी आहे,जग हें या शक्तीचें दृश्य असल्यामुळें तेंहि असुखी आहे, इच्छा ही असुखाची स्थिति आहे, असुख म्हणजे दुःख व म्हणून इच्छातृप्ति म्हणजे दुःखविमोचन. हार्टमनचें मत ( अन्कॉन्शस) शोपेनहारच्या प्रेरक मताप्रमाणेंच आहे. शोपेनहार व हार्टमन यांच्या निराशावादांत बुद्धमताप्रमाणें एक प्रकारचा गूढवाद ( मिस्टिसिझम ) दिसतो. पण या निराशावादाबरोबरच उत्क्रांतिवादानें (एव्होल्यूशन) आशावाद उत्पन्न केला आहे. योग्यताजातिजीवन ( सर्व्हायव्हल ऑफ दि फिटेस्ट ) म्हणजे या जगांत जें सर्वांत अधिक योग्य असतें तेंच शिल्लक रहातें, या मतांत आशावाद भरला आहे. या मताप्रमाणें मनुष्याची प्रगति पूर्णत्वाकडे होत आहे.

भा र ती य.—याचे तीन वर्ग पडतात; परिस्थितिविषयक, प्रकृतिविषयक व तत्त्वज्ञानविषयक. पहिला, आपल्या परिस्थितींतील आपत्ती, हवामान, वगैरेमुळें; दुसरा, प्रत्येक गोष्टीची वाईट बाजू पहाण्याची संवय असल्यामुळें; व तिसरा वर्ग आपलें जीवितविषयक जें तत्त्वज्ञान असेल त्यामुळें उत्पन्न होतो. याप्रमाणें मानवी मनावर तीन प्रकारचे दाब पडून साहजिक त्याचें मन निराश होतें. याशिवाय, विद्यमान किंवा भावी आयुष्याविषयीं किंवा या दोन्ही आयुष्यांविषयीं मनुष्य निराश बनत असतो. अत्यंत वाईट निराशावाद म्हणजे जेव्हां मनुष्याला इहलोक किंवा परलोक कांहीं एक किंमतीचे नव्हत व सर्व वस्तूंच्या ठिकाणीं अहंकार भरलेला आहे असें वाटूं लागतें तो. चार्वाकाच्या मतास डॉ. ग्रिसवल्डनें निराशावाद म्हटलें आहे पण तें म्हणणें बरोबर नाहीं. परलोक कबूल करून या भूतलावरच सुखाचा शोध करावा, दुःख टाळीत जावें असें चार्वाकमत आहे.

निराशावादाचीं कारणें:—भारतांत निराशावाद चांगलाच अस्तित्वांत आहे यावद्दल वाद नाहीं. वाद आहे तो त्याच्या कारणासंबंधीं. कांहीं पंडित प्रतिपादितात कीं हा निराशावाद परिस्थितिविषयक आहे; व या त्यांच्या प्रतिपादनांत बरेंच तथ्यहि आहे. ज्याप्रमाणें स्वाऱ्या करून येणाऱ्या ॲक्रियन, डोरियन, भूमध्यसमुद्रांतले मिनोयन या लोकांशीं ग्रीक जेव्हां समरस झाले तेव्हां त्यांची कलाकौशल्यासंबंधीं प्रकृति जशी बळावली त्याचप्रमाणेंच असें म्हणतां येईल कीं, भारतावर चाल करून येणाऱ्या आर्यांची मूळ रहिवाशांशीं जेव्हां वैचारिक एकरूपता झाली तेव्हां त्यांच्या प्रकृतीवर निराशेचा पगडा बसण्यास बरीच मदत झाली. वैदिक कालापासून उपनिषद् कालापर्यंतचा भारतीय आर्यांचा इतिहास हा आशावादित्वापासून निराशावादित्वाकडे त्यांना घेऊन जाणाऱ्या चळवळीचा इतिहास म्हणतां येईल. त्याचप्रमाणें इतर फरकहि महत्त्वाचे आहेत. ऋग्वेदांत लिंगपूजा झिडकारिली आहे ( ७. २१, ५; १०. ९९, ३ ) पण पुढील काळांत ती अत्यंत रूढ झाली. ऋग्वेदांत पुनर्जन्माची कल्पना स्पष्ट आढळत नाहीं. पण उपनिषद्कालांत तो एक श्रद्धाविषय होऊन बसला. यावरून काय दिसतें ? कीं हिंदुस्थानची रहाणी व हवामान यांचा बाहेरून आलेल्या आर्यांच्या प्रकृतीवर परिणाम झाला. अर्वाचीन हिंदुस्थानांतील कांहीं गोष्टींवरूनहि याची शक्यता दिसून येईल. हिंदुस्थानांत जन्म पावलेल्या यूरोपीयन लोकांवर इकडील बराच परिणाम झालेला दिसून येतो व पुष्कळसे आंग्लो-इंडियन आपल्याकडील जादूटोण्याच्या मार्गे लागतात. तेव्हां त्यांच्या बाबतींत केवळ परिस्थितीचा परिणाम झालेला नसून आनुवंशिक संस्काराचाहि कांहीं परिणाम असतो. जगाचा कंटाळा व सर्वत्र वाईट बाजूकडे नजर याच गोष्टींनीं भारतीय निराशावाद दृष्ट होतो असें नसून भारतीय आध्यात्मिक कल्पनांपासून उद्भवलेला आणि तत्त्वज्ञानाच्या भाषेनें आणि विचारसंमतीनें परिस्फुटता पावलेला विचारसंप्रदाय हा एक त्या निराशावादाचें महत्त्वाचें अंग आहे. बार्थ, ओल्डनबर्ग व इतर पंडित यांचा वरीलप्रमाणें कयास आहे.

भारतीय तत्त्वज्ञानांत निवृत्तीचें स्तोम फार माजल्यामुळें भारतीयांचें मन प्रवृत्ति अथवा कर्मापासून दूर जाऊं लागलें, त्याचा परिणाम तें केवळ विचारांचें जाळें विणण्यांत गुंतून राहून दुर्बल बनत चाललें. कर्मप्रवृत्ति ही या विचारांस सहाजिकच आळा घालते. व्यक्तीचें किंवा राष्ट्राचें आयुष्य जर एखाद्या उच्च ध्येयानें प्रेरित होऊन कर्मप्रवृत्त होईल तर त्याचे विचार परिभ्रमणापासून व मन दुर्बलतेपासून परावृत्त होईल. मनुष्यास मिथ्याविचार व दुःखदायक कल्पना यामुळें बंधन प्राप्त होतें असें भारतीय तत्त्वज्ञान म्हणतें, पण चुकीची कर्मप्रवृत्ति हें बंधाचें कारण मानीत नाहीं ( बौद्ध तत्त्वज्ञान तसें मानतें ), म्हणजे बंधनांची व्याख्या करतांना बुद्धीस व मनाच्या भावनास प्राधान्य दिलें असून कर्मप्रवृत्तीच्या नीति-अनीतिपरतेस गौण स्थान दिलें आहे. भारतीय तत्त्वज्ञानांत ज्याप्रमाणें ज्ञान व संवेदना यांस महत्त्व दिलें आहे तसेंच भारतीय विचारपरंपरेंत बुद्धीस महत्त्व दिलें आहे पण आचारांत कित्येक वेळां सुखप्रदतेस महत्त्व दिलेलें आढळतें. भरतखंडांत आपणांस एकीकडे पूर्णपणे वैराग्यवृत्ति, तत्त्वज्ञान्याची सत्यान्वेषी शांति तर दुसरीकडे वैभवांत खेळणाऱ्या राज्याचें ऐश्वर्य असे दोन परस्परविरोधी

देखावे दिसतात व हे वरील तत्त्वज्ञानाचेच परस्परविरुद्ध दोन ध्रुवबिंदू होत. पण या दोघांच्याहि मनांत निवृत्तिपर विचार उत्पन्न होतात. ते एकाच्या मनांत ऐहिक सुखापेक्षां आत्म्यामध्यें लीन होऊन मिळणारें सुख शाश्वत असतें या समजुतीमुळें येतात तर दुसऱ्याच्या मनांत वैभव भोगून मन विटल्यामुळें येतात. भर्तृहरीचें वैराग्य व शृंगारशतक हीं वरील प्रवृत्तींचीं उत्कृष्ट उदाहरणें आहेत. भारतीय मनाला कर्मप्रवृत्तीचें महत्त्व बरोबर आकलन न होण्याचें एक कारण येथील हवामान असूं शकेल. परंतु कोणत्याहि गोष्टीकडे पाहण्याच्या वेळची मानसिक परिस्थिति हीहि या बाबतींत महत्त्वाची आहे. सुखग्राहक मानसिक वृत्तीमध्यें कोणत्याहि वस्तूकडे पाहिल्यास मनुष्य सहसा निराश होत नाहीं; उलट सर्वच दुःखमय आहे अशा मनोवृत्तीनें कोणत्याहि गोष्टीकडे पाहिल्यास मनुष्यास आशाहि लागत नाहीं. भरतखंडांत निराशावाद शिरण्याचें कारण वरील प्रकारच्या परिस्थितीमुळें बनलेली मनोवृत्ति होय. येथें विचार अथवा संवेदना यांस कर्मप्रवृत्तीचें नियंत्रण केव्हांहि घातलेलेंच नाहीं. यामुळें बाहेरील अनुत्तेजक अशी हवामानाची परिस्थिति व सर्व जग क्षणिक, व दुःखमय आहे अशा तऱ्हेच्या विचारसरणीचा मनावर पगडा यांमुळें निराशावादास स्थान मिळालें आहे.

निराशावादाचा ब्राह्मणी विचारांशीं संबंधः --कर्मवादाचा उगम उपनिषदांत कसा झाला याचें विवेचन वेदविद्या विभागांत ( पृ. १७८ ) केलें आहेच. ब्रह्म, कर्म व पुनर्जन्म या तीन महत्तत्त्वांशीं भारतीय नैराश्यवाद संबद्ध आहे असें कांहींस वाटतें. ब्रह्मतत्त्व हें आशावादित्वाचें मोठें उगमस्थान असलें तरी तें मनुष्याला अप्राप्य अशा स्थितींत असल्यानें त्याच्याशीं तुलना करतांना जगाचें क्षुद्रत्वच चटकन नजरेंत भरतें. या ब्रह्माऐवजी वरुणदेवतेला जर भारतीयांच्या धार्मिक भावनेंत अद्वितीय स्थान मिळालें असतें तर हे लोक आशेच्या तेजानें उज्वल दिसूं लागले असते असें ब्रिस्वोल्डसारखे (दि गॉड वरुण इन् दि ऋग्वेद) कांहीं पंडित समजतात.कर्मवाद व पुनर्जन्म हीं परस्परावलंबी आहेत;व त्यांच्यापासून निराशेचा उद्भव आहे असें म्हणणाऱ्या ख्रिस्त्यांची विचारसरणी अशी कीं या तत्त्वांपासून आशावाद उत्पन्न न होण्याचें कारण मनुष्याच्या मुक्ततेचा सर्व भार त्याच्यावरच पडतो व आपण पापी, दुबल व दरिद्रि असल्यानें आपल्या हातून हें अवजड काम कसें पार पडेल या चिंतेनें तो निराश होतो, व त्याला असंख्य जन्म घेतल्याशिवाय मुक्ति मिळणार नाहीं असें हिंदु तत्त्वज्ञान सांगतें. याप्रमाणें तो दुःखद व आभासमय मायेनें बद्ध होतो व आशा सफल होण्याचा काल जन्मजन्मांतरीं पुढें ढकलला गेल्यानें त्याचें अंतःकरण खिन्न होतें.

भरतखंडामध्यें कर्मवादास प्राधान्य असून मनुष्याची उन्नति अगर अवनति ही त्याच्या कर्मावर अवलंबून असते अशी समजूत आहे. त्यानें पुण्यकर्म केल्यास त्याचें फल त्यास मिळतें व पापकर्म केल्यास त्याचें फळ त्यास भोगावें लागतें. यामुळें मनुष्याची कर्माकडे प्रवृत्ति होत नाहीं असें ब्रिस्वोल्डसारख्या कांहीं आशायुक्त ख्रिस्त्यांस वाटतें. त्यांचें म्हणणें असें कीं, ख्रिस्ती लोकांत ज्याप्रमाणें मनुष्यानें केलेल्या पापाचें फल ख्रिस्तानें भोगलें तसा भरतखंडामध्यें मनुष्यांच्या पापाचें फल भोगणारा कोणी नाहीं. यामुळें निराशावादास स्वाभाविकच स्थान आहे ! ! प्रस्तुत ख्रिस्ती कल्पना सोडल्या तरी कांहीं विचारांचा परिणाम नैराश्य वादांत होत असेल यांत शंका नाहीं. कलियुगासारखी इतिहासविकासाची खोटी कल्पना लोकांस निराशवादी करीत असावी.

पुनर्जन्माच्या विचारामुळें परिणाम दोन प्रकारचे होतात आपल्यांस या जन्मीं सुख मिळालें नाहीं तर पुढच्या जन्मीं मिळेल अशी आशा मनुष्यास असते उलट पक्षीं अनेक जन्मांचीं पापें जर मनुष्यांवर परिणाम करवीत असतील एका जन्माच्या सत्कर्मानें काय मोठेसें होणार अशी कल्पना कांहींच्या मनांत येत असावी.

कलियुगाची कल्पना, कालाचें अनंतत्व कार्याचें वैयर्थ्य इत्यादि गोष्टींचा पगडा मनावर बसून हिंदु मनांची ठेवण निराशामय बनली आहे; व त्याचा ओढा नेहमीं संन्यासधर्माकडे असतो. मागें गेला तो काळ अधिकाधिक सुखाचा असतो ही त्यांची जात्याच कल्पना युगानुक्रमावरून दिसून येते. ही समजूत कशी चुकीची आहे व निराशावादी म्हणतात त्याप्रमाणें दिवसानुदिवस जगाची अवनति होत नसून त्याची स्थिति उत्तरोत्तर कशी सुधारत आहे हें 'जगद्विकासाचीं कारकें' या 'बुद्धोत्तर जग' (तिसऱ्या) विभागाच्या ३० व्या प्रकरणांत दाखविलें आहे; अर्थशास्त्र या लेखांतहि यासंबंधीं थोडेसें विवेचन केलें आहे व आजहि हिंदुस्थानांत आशावाद उत्पन्न होत असलेला आनंददायक देखावा दृष्टीस पडतो. लोकांनां कांहीं स्वास्थ्य व सुख मिळूं लागल्याकारणानें निराशेची पकड ढिली होऊं लागली आहे. शिवाय,भक्तिमार्ग व इतर धार्मिक पंथ उदयास येऊन भारताला निराळा धार्मिक आशावाद शिकवीत आहेत.पाश्चात्य आधिभौतिक वादानें यापूर्वीच जमीन तयार करून ठेविली आहे व तींत आर्यसमाज व ब्रह्मसमाज आचारप्रधान धर्माचा क्षय झाला तरी अध्यात्मिक भावना कमी होणार नाहींत अशा आशेचें बीं पेरीत आहेत. स्वराज्य, स्वातंत्र्य,समता,शिक्षण,सामाजिक सुधारणा, वगैरे व्यावहारिक जगांतल्या गोष्टींकडे लोकांचें आतां लक्ष लागूं लागलें आहे. तेव्हां भावी काल पूर्ण आशावादित्वाचा उगवेल अशी आशा करण्यास बरीचशी जागा आहे.

पौरस्त्य किंवा पाश्चात्य निराशावादाबद्दल असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं तत्त्वज्ञान विषयक ज्या सिद्धांतांवर तो उभारलेला आहे ते सिद्धान्तच अग्राह्य आहेत. मानवी दृष्टीनें जगाबद्दल एवढेंच म्हणतां येईल कीं जगातील

बऱ्याचशा गोष्टी अद्याप मानवीबुद्धीला आकलन झाल्या नाहींत व म्हणून बऱ्याच वेळां आपल्या मानवी आशा तृप्त होत नाहींत त्यामुळें मन निराश व दुःखी होतें. तथापि तेवढ्यावरून सर्व जीवित दुःखमय आहे असला निराशावाद प्रस्थापित होऊं शकत नाहीं तसेंच पूर्णपणें आशावाद प्रस्थापित करणेंहि कठीण आहे. कारण जी गोष्ट एका मनुष्याला चांगली वाटते तीच दुसऱ्याला वाईट वाटते. सुख हें ध्येय अशावादी व निराशावादी दोघांनांहि मान्य असून जग हें दुःखाला अधिक कारणीभूत कीं सुखाला अधिक कारणीभूत हा प्रश्न सोडवावयाचा आहे. पण जगांतील एकंदर सुखांची व दुःखांची बेरीज वेऊन वजाबाकी सांगणें हेंच काम अशक्य आहे. कारण सुखदुःखविषयक मानसिक भावना याच इतक्या अत्यंत गुंतागुंतीच्या व अन्योन्यरूपांतर क्षम आहेत कीं त्यांचें निश्चितपणें स्वरूप ओळखणें पुष्कळ वेळां अशक्य असतें. कित्येक वेळां खुद्दुःखापासूनच एकप्रकारचें विलक्षण समाधान वाटत असतें. प्रयत्न व श्रम, कष्ट व भय, स्वार्थत्याग, आत्मयज्ञ व मृत्यु या दुःखमय वाटणाऱ्या गोष्टीच पुष्कळ वेळां मनुष्यामधील सर्व कर्तृत्वशक्ति जागृत करून त्याला यावरून दुःखमय गोष्टी करण्यास प्रवृत्त करतात व त्या करण्यानें त्याला सुख होत असतें. याप्रमाणें बारकाईनें विचार केल्यास निराशावादी लोक दुःखांची म्हणून जी यादी करतात तीच चुकीची आहे असें म्हणावें लागतें. प्रत्यक्ष अनुभव असा आहे कीं, सुखाच्या किंवा दुःखाच्या कोणत्याहि प्रसंगीं 'सदिच्छा' (गुडविल) मनांत वास करीत असल्यास किंवा आपल्याकडील अध्यात्म तत्त्वज्ञानांतील सुखदुःखातीत असलेली स्थितप्रज्ञता प्राप्त झालेली असल्यास तिच्या पुढें सामान्य सुखदुःखें किंवा आशा निराशावाद यांनां कांहीं महत्त्व उरत नाहीं.

**निरुक्त**—एक वेदांग. यास्काचा निरुक्तग्रंथ हा वस्तुतः वेदांवरील टीकाग्रंथ आहे, आणि उपलब्ध असलेल्या कोणत्याहि संस्कृत टीकाग्रंथांहून कित्येक शतकांनीं जुना आहे. आचार्यांच्या उपयोगासाठीं संपादिलेल्या 'निघंटु' नामक असामान्य व आर्ष वैदिक शब्दकोशाच्या आधारावर निरुक्त प्रणीत झालें आहे. याची माहिती व काल यासंबंधीं विवेचन वेदविद्या (पृ. १८५) व विज्ञानेतिहास (पृ.१९४-१९५) या विभागांत मागें येऊन गेलेंच आहे.

निरुक्तावरून एक महत्त्वाचा मुद्दा सिद्ध होतो तो हा कीं, यास्काच्या कालीं ऋग्वेदग्रंथाचें स्वरूप पूर्णपणें निश्चित झालें होतें व ऋग्वेद हल्लीं आहे त्या स्थितींतच तो तत्त्वतः होता. निरुक्त हें आर.रॉथ यानें प्रथम प्रसिद्ध केलें (गॉटिंजेन १८५२). कलकत्त्याच्या बिब्लिओथेका इंडिकामध्यें सामाश्रमी यानीं प्रसिद्ध केलेल्या आवृत्तींत (१८८२-९१) निरुक्तावर भरपूर टीका केली असून सूचीहि जोडिली आहे. मुंबईस श्रेष्ठी क्षेमराज श्रीकृष्णदास यानीं श्रीव्यंकटेश्वर छापखान्यांत छापून शके १८३४ त प्रसिद्ध केलेली प्रत चांगली आहे.

**निर्णायक**, विषय प्रवेश.—कांहीं विशिष्ट प्रकारच्या बैजिक फलांनां निर्णायक म्हणतात. हीं फलें कांहीं ठराविक नियमांनीं काढतां येतात व तीं विशिष्ट प्रकारानें मांडतात; म्हणून निर्णायकांचें गणित करावयाची एक रीति आहे; आणि निर्णायकांच्या धर्मासंबंधानें मीमांसाहि आहे. हे धर्म निर्णायकांच्या आकृतीवर अवलंबून असतात.

इतिहास.—न्यूटनचा प्रतिस्पर्धी प्रसिद्ध जर्मन गणितज्ञ लिब्निट्झ यानें इसवी सन १६९३ मध्यें अनेक बीजविषयक साध्या समीकरणांचीं मूळें गुणांच्या रूपांत मांडतांना ते गुण एका विशेष पद्धतीनें येतात असें पाहिलें. नंतर १७५० सालीं क्रॅमरनें (स्वित्झर्लंड १७०४—५२) बैजिकरीतीनें वक्रांचें अध्ययन करतांना निर्णायकांचाहि बराच विचार केला. निर्णायकांच्या विस्तारांतील चिन्हांचा नियम यानेंच शोधून काढला. त्यानंतर बेझो (फ्रेंच, १७७९), लाप्लास (फ्रेंच, १७४९-१८२७), व्हँडरमाँडी (फ्रेंच, १७७१), लॅग्रँज (फ्रेंच, १७३६-१८१३) यांनीं या विषयांत बरीच भर घातली. या विषयावर पहिल्या प्रथम स्वतंत्र ग्रंथ लिहिणारा फ्रेंच गणितज्ञ कॉची (फ्रेंच) हा होय. या लेखांत दिलेलें बहुतेक सर्व विवेचन त्याच्या ग्रंथांत आढळून येतें. गणित विषयांतील बहुतेक सर्व शाखांत या विषयाचा उपयोग होतो. निरनिराळ्या विषयांत निर्णायकांचा उपयोग करून याकोबी (जर्मन, १८०४—५१), हेसे (जर्मन, १८११—७४), कॅले (इंग्रज, १८२१--९५) सिल्व्हेस्टर (इंग्रज, १८१४—१८९७), वगैरे गणितज्ञांनीं या विषयाचा बराच विस्तार केला आहे. कोणत्याहि शाखेतील सिद्धान्त थोडक्यांत व व्यवस्थित रीतीनें सिद्ध करण्यांत या विषयाचा उपयोग होतो, एवढेंच नव्हे तर कित्येक नवीन सिद्धान्त शोधून काढण्याकडेहि यांचा उपयोग झाला आहे. या विषयावर इंग्रजी भाषेंत स्कॉटिस्वुड, स्कॉट, वील्ड व म्यूर यांचे ग्रंथ आहेत. त्यांपैकीं म्यूरच्या ग्रंथांत मूळ लेखांचे उतारे ऐतिहासिक क्रमानें दिले आहेत. प्रस्तुत लेख स्कॉटच्या ग्रंथाच्या आधारानें लिहिला आहे.

हा विषय सहज समजण्याकरितां, ज्या प्रश्नामुळें निर्णायक शोधून काढले त्या प्रश्नांच्या कांहीं सोप्या उदाहरणांचा विचार केला पाहिजे. हा प्रश्न म्हणजे अनेक बीजविषयक साध्या सामीकरणांचीं मूळें मांडणें हा होय. दोन समीकरणें जर

$$अ_1 क्ष + अ_2 ज्ञ + अ_3 = 0$$

$$इ_1 क्ष + इ_2 ज्ञ + इ_3 = 0$$

अशीं असतील तर त्यांचीं मूळें सहज

$$क्ष = \frac{अ_2 इ_3 - अ_3 इ_2}{अ_1 इ_2 - अ_2 इ_1} ; ज्ञ = \frac{अ_3 इ_1 - अ_1 इ_3}{अ_1 इ_2 - अ_2 इ_1}$$

अशीं आहेत असें दिसून येईल. त्याचप्रमाणें जर समसमान साधीं समीकरणें

$$अ_1क्ष + अ_2ज्ञ + इ_3य = 0$$
$$इ_1क्ष + इ_2ज्ञ + इ_3य = 0$$

अशीं असतील तर क्ष, ज्ञ, आणि य या अज्ञातांचें प्रमाण क्षः . ज्ञः यः: $अ_2इ_3 - अ_3इ_2$ : $अ_3इ_1 - अ_1इ_3$ : $अ_1इ_2 - अ_2इ_1$ असें राहील. यावरून य बद्दल १ मांडल्यानें मागील उत्तरें निघतात.

आतां आपण खालील तीन समघात साध्या समीकरणांचा विचार करूं.

$$क_1 \equiv अ_1क्ष + अ_2ज्ञ + अ_3य + अ_4व = 0$$
$$क_2 \equiv इ_1क्ष + इ_2ज्ञ + इ_3य + इ_3व = 0$$
$$क_3 \equiv उ_3क्ष + उ_2ज्ञ + उ_3य + उ_4व = 0$$

या समीकरणांवरून साधलेल्या

$$प_1क_1 + प_2क_2 + प_3क_3 = 0$$

या समीकरणामध्यें जर

$$प_1अ_3 + प_2इ_3 + प_3उ_3 = 0 \text{ आणि}$$
$$प_1अ_4 + प_2इ_4 + प_3उ_4 = 0$$

तर य आणि व यांचे गुण नाहींसे होतील आणि याकरितां

$$प_1 : प_2 : प_3 :: इ_3उ_4 - उ_3इ_4$$
$$: उ_3अ_4 - अ_3उ_4 : अ_3इ_4 - अ_4इ_3$$

हें प्रमाण राहिलें पाहिजे.

$प_1$, $प_2$, $प_3$ हे वरील प्रमाणांत घेतल्यानें साधित समीकरण

$$[अ_2(इ_3उ_4 - उ_3इ_4) + इ_2(उ_3अ_4 - अ_3उ_4)$$
$$+ उ_2(अ_3इ_4 - इ_3अ_4)]क्ष + [अ_1(इ_3उ_4 - उ_3इ_4)$$
$$+ इ_1(उ_3अ_4 - अ_3उ_4) + उ_1(अ_3इ_4 - इ_3अ_4)]ज्ञ$$
$$= 0 \text{ असें}$$

अर्थात टक्ष + डज्ञ = ० या प्रकारचें होईल. ट आणि ड हीं फलें एकाच आकृतीचीं आहेत पण फरक एवढाच कीं तीं वेगवेगळया गुणांचीं बनलीं आहेत. टला

$$\begin{matrix} अ_2 & अ_3 & अ_4 \\ इ_2 & इ_3 & इ_4 \\ उ_2 & उ_3 & उ_4 \end{matrix}$$

असें लिहिणें सोईस्कर पडतें. ह्या मांडणीला तिसऱ्या दर्जाचा निर्णायक म्हणतात. ह्या निर्णायकांत तीन आडव्या ओळी व तीन उभ्या रांगा आहेत, व म्हणून नऊ घटक आहेत. त्याचप्रमाणें डला,

$$\begin{matrix} अ_1 & अ_3 & अ_4 \\ इ_1 & इ_3 & इ_4 \\ उ_1 & उ_3 & उ_4 \end{matrix}$$

असें मांडलें पाहिजे. ह्यावरून वरील समीकरणांतील अज्ञातांचीं प्रमाणेंः—

$$\frac{क्ष}{\begin{matrix} अ_2 & अ_3 & अ_4 \\ इ_2 & इ_3 & इ_4 \\ उ_2 & उ_3 & उ_4 \end{matrix}} = \frac{-ज्ञ}{\begin{matrix} अ_1 & अ_3 & अ_4 \\ इ_1 & इ_3 & इ_4 \\ उ_1 & उ_3 & उ_4 \end{matrix}}$$

$$= \frac{य}{\begin{matrix} अ_1 & अ_2 & अ_4 \\ इ_1 & इ_2 & इ_4 \\ उ_1 & उ_2 & उ_4 \end{matrix}} = \frac{-व}{\begin{matrix} अ_1 & अ_2 & अ_3 \\ इ_1 & इ_2 & इ_3 \\ उ_1 & उ_2 & उ_3 \end{matrix}}$$

पांच अज्ञातांनीं घडलेलीं चार समघात साधीं समीकरणें इष्टगुणांच्या रीतीनें सोडविण्याकरितां वरील फलांचा उपयोग करतां येतो. आणि ह्याच क्रम जास्त अज्ञातांनीं घडलेल्या साध्या समीकरणास लागू पडतो. साधारणतः आपणास असा निष्कर्ष काढतां येईल कीं म +1 अज्ञातांनीं घडलेल्या म समघात साध्या समीकरणांत अज्ञातांचें प्रमाण $म^2$ घटकांनीं बनलेल्या म घाताच्या समघात फलानें ठरवितां येतें, व हीं फळें समीकरणांतील गुणांनीं बनलेल्या निर्णायकाच्या रूपानें मांडतां येतात. हा निष्कर्ष पुढें सिद्ध करण्यांत येईल.

पहिल्या दर्जाचा निर्णायक । अ । आहे व याचें बैजिक रूपांतर अ आहे. दुसऱ्या दर्जाचा निर्णायक

$$\begin{matrix} अ_1 & अ_2 \\ इ_1 & इ_2 \end{matrix}$$ हा आहे व याचें साधें बैजिक स्वरूप

$$अ_1 इ_2 - इ_1 अ_2 \text{ असें आहे.}$$

कोणत्याहि दर्जाच्या निर्णायकाचें विस्तृत बैजिक रूपांतर काढण्याचे नियम पुढील भागांत दिले आहेत.

ही मांडणी नीट समजण्याकरतां तिसऱ्या दर्जाच्या निर्णायकांचे कांहीं साधे धर्म सिद्ध केले आहेत. कोणत्याहि दर्जाच्या निर्णायकांनां लागू असणाऱ्या नियमांचीं हीं विशिष्ट उदाहरणें आहेत.

$$न \equiv \begin{matrix} अ_1 & अ_2 & अ_3 \\ इ_1 & इ_2 & इ_3 \\ उ_1 & उ_2 & उ_3 \end{matrix} \begin{matrix} = अ_1(इ_2उ_3 - उ_2इ_3) \\ + अ_2(इ_3उ_1 - उ_3इ_1) \\ + अ_3(इ_1उ_2 - उ_1इ_2) \end{matrix}$$

विस्तृत फलाचें प्रत्येक पद $\pm अ_प इ_फ उ_ब$ या स्वरूपाचें आहे. ह्यामध्यें प, फ, ब, हा १, २, ३ ह्या अनुबंधांचा एक प्रस्तार आहे. अर्थातच हें पद तीन घटकांच्या गुणाकारानें झालें आहे; मात्र प्रत्येक ओळींतून व प्रत्येक रांगेंतून फक्त एकच घटक या पदांत आहे. $अ_1 इ_2 उ_3$ हें पद डावीकडून उजवीकडे उतरणाऱ्या कर्णरेषेंतील घटकांचें बनलेलें असून धनचिन्हित आहे. $अ_प इ_फ उ_ब$ ह्या स्वरूपाच्या दुसऱ्या कोणत्याहि पदाचें चिन्ह प, फ, ब, या प्रस्तारावर अवलंबून असतें. प, फ, व हा प्रस्तार १, २, ३, ह्या प्रस्तारावरून विषम अदलाबदलीनें झाला असल्यास पदाचें चिन्ह ऋण समजावें. ह्यावरून अर्ध्या पदांचीं चिन्हें धन व अर्ध्या पदांचीं ऋण होतात.

'न' या निर्णायकांतील ओळींस क्रमानें रांगा करून मांडलें असतां जो दुसरा निर्णायक होतो तो 'न' च्याच बरोबर असतो. म्हणजे—

$$\begin{matrix}\text{अ}_1 & \text{अ}_2 & \text{अ}_3\\ \text{इ}_1 & \text{इ}_2 & \text{इ}_3\\ \text{उ}_1 & \text{उ}_2 & \text{उ}_3\end{matrix} = \begin{matrix}\text{अ}_1 & \text{इ}_1 & \text{उ}_1\\ \text{अ}_2 & \text{इ}_2 & \text{उ}_2\\ \text{अ}_3 & \text{इ}_3 & \text{उ}_3\end{matrix}$$

हें दोन्ही निर्णायकांचीं विस्तृत रूपें मांडून पाहिलीं असतां सिद्ध होईल.

'न' च्या कोणत्याहि दोन ओळींची अथवा रांगांची अदलाबदल केली तर नवीन झालेला निर्णायक '–न' बरोबर होतो. कारण असें केल्यानें 'न' च्या विस्तारांतून अनुबंधांचा क्रम कायम ठेवून दोन अक्षरांची अदलाबदल होते, किंवा अक्षरांचा क्रम कायम ठेवून दोन अनुबंधांची अदलाबदल होते. दोन्ही रीतीनें नवीन निर्णायक –न बरोबर होतो उदाहरणार्थ जर २ र्‍या व ३ र्‍या ओळींची अदलाबदल केली तर नवीन निर्णायक बनतो.

$$\begin{matrix}\text{अ}_1 & \text{अ}_2 & \text{अ}_3\\ \text{उ}_1 & \text{उ}_2 & \text{उ}_3\\ \text{इ}_1 & \text{इ}_2 & \text{इ}_3\end{matrix} \left.\begin{matrix}= \text{अ}_1(\text{उ}_2\text{इ}_3-\text{इ}_2\text{उ}_3)\\ +\text{अ}_2(\text{उ}_3\text{इ}_1-\text{इ}_3\text{उ}_1)\\ +\text{अ}_3(\text{उ}_1\text{इ}_2-\text{इ}_1\text{उ}_2)\end{matrix}\right\} = -\text{न}$$

ह्यावरून असें सिद्ध होतें कीं निर्णायकांत दोन ओळी किंवा रांगा समान असल्यास निर्णायक ० होतो.

$$\text{न} = \text{अ}_1(\text{इ}_2\text{उ}_3-\text{इ}_3\text{उ}_2) + \text{अ}_2(\text{इ}_3\text{उ}_1-\text{इ}_1\text{उ}_3) + \text{अ}_3(\text{इ}_1\text{उ}_2-\text{इ}_2\text{उ}_1)$$

$$= \text{अ}_1\begin{matrix}\text{इ}_2 & \text{इ}_3\\ \text{उ}_2 & \text{उ}_3\end{matrix} + \text{अ}_2\begin{matrix}\text{इ}_3 & \text{इ}_1\\ \text{उ}_3 & \text{उ}_1\end{matrix} + \text{अ}_3\begin{matrix}\text{इ}_1 & \text{इ}_2\\ \text{उ}_1 & \text{उ}_2\end{matrix}.$$

यावरून 'न' हा पहिल्या ओळींतील $\text{अ}_1$, $\text{अ}_2$, $\text{अ}_3$ ह्या घटकांचें साधें समघात फळ आहे, व त्याचे गुण इतर ओळींतील घटकांनीं बनलेले दुसर्‍या दर्जाचे निर्णायक होत असें दिसून येतें. 'न' दुसर्‍या कोणत्याहि ओळींतील किंवा रांगेंतील घटकांनीं बनलेल्या साध्या फळाच्या स्वरूपांत मांडतां येईल ह्यावरून,

$$\begin{matrix}\text{क}_1+\text{ख}_1 & \text{क}_2+\text{ख}_2 & \text{क}_3+\text{ख}_3\\ \text{इ}_1 & \text{इ}_2 & \text{इ}_3\\ \text{उ}_1 & \text{उ}_2 & \text{उ}_3\end{matrix} = \begin{matrix}\text{क}_1 & \text{क}_2 & \text{क}_3\\ \text{इ}_1 & \text{इ}_2 & \text{इ}_3\\ \text{उ}_1 & \text{उ}_2 & \text{उ}_3\end{matrix} + \begin{matrix}\text{ख}_1 & \text{ख}_2 & \text{ख}_3\\ \text{इ}_1 & \text{इ}_2 & \text{इ}_3\\ \text{उ}_1 & \text{उ}_2 & \text{उ}_3\end{matrix}$$

असें सिद्ध होतें. ह्याप्रमाणेंच कोणत्याहि रांगेंतील सर्व घटक द्विपद असतील तर तो निर्णायक दोन निर्णायकांच्या बेरजेबरोबर असतो. हाच नियम जास्त व्यापक केला तर असें म्हणतां येईल कीं जर पहिल्या रांगेंतील प्रत्येक घटक 'प' पदांचा बनलेला असला व तसेंच दुसर्‍या रांगेंतील प्रत्येक घटक 'फ' पदांचा व तिसर्‍या रांगेंतील प्रत्येक घटक 'ब' पदांचा असल्यास 'न' ला प×फ×ब निर्णायकांच्या बेरजेबरोबर मांडतां येईल. यापैकीं प्रत्येक निर्णायकांतील रांगा मूळच्या रांगांतील अनेक पदांपैकीं अनुरूप पदांच्या घटकांनीं बनलेल्या असतात. याचप्रमाणें 'रांग' या शब्दाच्या ऐवजीं 'ओळ' हा शब्द घालून वरच्याच सारखा दुसरा एक नियम करतां येईल. पुन्हां कोणत्याहि रांगेंतील किंवा ओळींतील घटकांनां 'प' नें गुणलें असतां 'न' हा 'प' नें गुणला जातो. जसें:—

$$\begin{matrix}\text{प}\text{अ}_1 & \text{अ}_2 & \text{अ}_3\\ \text{प}\text{इ}_1 & \text{इ}_2 & \text{इ}_3\\ \text{प}\text{उ}_1 & \text{उ}_2 & \text{उ}_3\end{matrix} = \text{प}\times\begin{matrix}\text{अ}_1 & \text{अ}_2 & \text{अ}_3\\ \text{इ}_1 & \text{इ}_2 & \text{इ}_3\\ \text{उ}_1 & \text{उ}_2 & \text{उ}_3\end{matrix}$$

पुन्हां कोणत्याहि निर्णायकाच्या रांगेंतील घटकांत दुसर्‍या कोणत्याहि रांगेंतील घटक अनुक्रमानें मिळविले असतां निर्णायकाची किंमत बदलत नाहीं.

$$\left.\begin{matrix}\text{अ}_1+\text{अ}_2+\text{अ}_3 & \text{अ}_2 & \text{अ}_3\\ \text{इ}_1+\text{इ}_2+\text{इ}_3 & \text{इ}_2 & \text{इ}_3\\ \text{उ}_1+\text{उ}_2+\text{उ}_3 & \text{उ}_2 & \text{उ}_3\end{matrix}\right\} = \text{न}.$$

तिसर्‍या दर्जाच्या दोन निर्णायकांचा गुणाकार तिसर्‍या दर्जाच्याच निर्णायकाच्या स्वरूपानें मांडतां येतो. ह्याकरितां खालीं दिलेल्या निर्णायकाचा विचार करूं.

$$\text{न} = \begin{matrix}\text{कअ}+\text{खइ}+\text{गउ} & \text{कअ}'+\text{खइ}'+\text{गउ}' & \text{कअ}''+\text{खइ}''+\text{गउ}''\\ \text{क}'\text{अ}+\text{ख}'\text{इ}+\text{ग}'\text{उ} & \text{क}'\text{अ}'+\text{ख}'\text{इ}'+\text{ग}'\text{उ}' & \text{क}'\text{अ}''+\text{ख}'\text{इ}''+\text{ग}'\text{उ}''\\ \text{क}''\text{अ}+\text{ख}''\text{इ}+\text{ग}''\text{उ} & \text{क}''\text{अ}'+\text{ख}''\text{इ}'+\text{ग}''\text{उ}' & \text{क}''\text{अ}''+\text{ख}''\text{इ}''+\text{ग}''\text{उ}''\end{matrix}$$

वरील निर्णायक निरनिराळ्या रांगा निवडून केलेल्या खालच्यासारख्या सत्तावीस निर्णायकांच्या बेरजेबरोबर आहे.

$$\begin{matrix}\text{कअ} & \text{कअ}' & \text{खइ}''\\ \text{क}'\text{अ} & \text{क}'\text{अ}' & \text{ख}'\text{इ}''\\ \text{क}''\text{अ} & \text{क}''\text{अ}' & \text{ख}''\text{इ}''\end{matrix} \quad \text{आणि} \quad \begin{matrix}\text{कअ} & \text{खइ}' & \text{गउ}''\\ \text{क}'\text{अ} & \text{ख}'\text{इ}' & \text{ग}'\text{उ}''\\ \text{क}''\text{अ} & \text{ख}''\text{इ}' & \text{ग}''\text{उ}''\end{matrix} \quad \text{इत्यादि}$$

ह्यापैकीं फक्त सहाच निर्णायकांत

$$\begin{matrix}\text{क} & \text{ख} & \text{ग}\\ \text{क}' & \text{ख}' & \text{ग}'\\ \text{क}'' & \text{ख}'' & \text{ग}''\end{matrix}$$

ह्या निर्णायकाचीं सर्व अक्षरें आहेत व फक्त तेवढेच नाहींसे होत नाहींत. बाकीचे २१ नाहींसे होतात. ह्या निर्णायकाला 'ट' आणि

$$\begin{matrix}\text{अ} & \text{इ} & \text{उ}\\ \text{अ}' & \text{इ}' & \text{उ}'\\ \text{अ}'' & \text{इ}'' & \text{उ}''\end{matrix}$$

ला 'ठ' म्हणून २७ निर्णायकांपैकीं नाहींशा न होणार्‍या सहा निर्णायकांत 'ट' हा साधारण अवयव असून दुसरे अवयव 'ठ' चीं ६ पदें होत. उदाहरणार्थः—वर दिलेल्यापैकीं दुसरा निर्णायक $= \text{ट}\,\text{अ}\,\text{इ}'\,\text{उ}''$ आणि 'ट' च्या गुणकाचें चिन्ह 'ठ' च्या विस्तारांतील पदांच्या चिन्हासारखेंच असतें हें प्रत्यक्ष विस्तार मांडल्यानें दिसून येईल म्हणून. न = ट.ठ.

वरील गुणाकाराच्या रीतीस ' रांगांनीं केलेला गुणाकार ' असें म्हणतात. अशाच रीतीनें ओळींनींहि गुणाकार करतां येईल. जसें:—

कख × अइ
कं खं   अं इं

= कअ + खइ   कअं + खइं
  कंअ + खंइ   कंअं + खं इं   किंवा

= कअ+कं अं   खअ+खअं
  कइ+कं इं   खइ+खं इं   अथवा

= कअ+खअं   कइ+खइं
  कंअ+खं अं   कंइ +खं इं   किंवा

= कअ+कंइ   खअ+खंइ
  कअं +कं इं   खअं +खं इं

×

**निर्णायकाची व्याख्या व त्याचे साधारण धर्म.**—म दर्जाचा निर्णायक $म^२$ घटकांचें फल आहे. ह्या $म^२$ घटकांनां दोन अनुबंध लावून लिहिणें सोइस्कर होतें. निर्णायकाची पूर्ण मांडणी अशी होईल:—

| | | | |
|---|---|---|---|
| $अ_{११}$ | $अ_{१२}$ | $अ_{१३}$ | $अ_{१म}$ |
| $अ_{२१}$ | $अ_{२२}$ | $अ_{२३}$ | $अ_{२म}$ |
| $अ_{३१}$ | $अ_{३२}$ | $अ_{३३}$ | $अ_{३म}$ |
| ... | ... | ... | ... |
| ... | ... | .... | .... |
| ... | ... | ... | ... |
| $अ_{म१}$ | $अ_{म२}$ | $अ_{म३}$ | ... $अ_{मम}$ |

यावरून $अ_{पव}$ हा घटक प व्या ओळींतील ब वें अक्षर होय, अथवा व व्या रांगेतील पवें अक्षर होय. ओळी अथवा स्तम्भ वरून खालीं व रांगा डावीकडून उजवीकडे क्रमानें मोजाव्या. हे घटक एका चौरसांत मांडले आहेत असें समजावें व त्याचा $अ_{११}$, $अ_{२२}$, $अ_{३३}$, ... $अ_{मम}$ हा मुख्य अथवा प्रधान कर्ण जाणावा.

कोणत्याहि निर्णायकाचा विस्तार लिहावयाचा असेल तर तो खालील २ नियमांनीं लिहावा.

( अ ) प्रत्येक ओळींतून व रांगेतून एकच घटक घेऊन त्या सर्वांचा गुणाकार केला म्हणजे निर्णायकाच्या विस्ताराचें एक पद होतें. उदाहरणार्थ, $अ_{११}$. $अ_{२२}$. $अ_{३३}$... $अ_{मम}$ हा प्रधान कर्णांतील घटकांचा गुणाकार विस्तारांतील एक पद आहे. ह्या पदास प्रधानपद म्हणतात व याचें चिन्ह धन असतें.

( आ ) दुसऱ्या कोणत्याहि पदाचें चिन्ह खालीं दिलेल्या नियमांनीं काढावें. पद मांडतांना पहिलें अक्षर पहिल्या ओळींतील, दुसरें दुसऱ्या ओळींतील, या क्रमानें अक्षरें मांडावीं म्हणजे अर्थातच पहिले अनुबंध नैसर्गिक क्रमानें राहतील व फक्त दुसऱ्या अनुबंधांचा क्रम निरनिराळा होईल. ह्या दुसऱ्या अनुबंधांचा जो प्रस्तर होईल त्यास नैसर्गिक क्रमांत आणण्याकरितां जर विषम अदलाबदली कराव्या लागल्या तर त्या पदास ऋण चिन्ह द्यावें व सम असल्यास धन चिन्ह द्यावें. अशा रीतीनें ' म ' दर्जाच्या निर्णायकाचीं पदें म ! ( क्रम गुणित म ) असतात, व त्यांपैकीं अर्धीं पदें धन व अर्धीं ऋण असतात.

मागील परिभाषेवरून निर्णायकाची मांडणी—

$अ_{११}$ $अ_{१२}$... $अ_{१म}$   अशी आहे व त्यासच, त्याचा
$अ_{२१}$ $अ_{२२}$... $अ_{२म}$   विचार लक्षांत आणल्यास,
...  ...  ...   $\Sigma \pm अ_{११}. अ_{२२}. अ_{३३}... अ_{मम}$
...  ...  ...   असें मांडतां येइल.
$अ_{म१}$ $अ_{म२}$... $अ_{मम}$

( $\Sigma$ हें चिन्ह एखाद्या पदाच्या पूर्वी मांडलें असतां दिलेल्या नियमास अनुसरून होणाऱ्या त्या पदासारख्या शक्य तेवढ्या पदांची बेरीज दर्शवितें) निर्णयकाची मांडणी दुसऱ्या तऱ्हेनें करण्याचीहि चाल आहे. ती अशी:—

$अ_{१}$ $इ_{१}$ $उ_{१}$......   या निर्णायकास आपण संक्षेपानें
$अ_{२}$ $इ_{२}$ $उ_{२}$......   $\Sigma \pm अ_{१}$ $इ_{२}$ $उ_{३}$ ...असेंहि
$अ_{३}$ $इ_{३}$ $उ_{३}$.......   लिहूं १ल्या प्रकारच्या मांडणीस
...............   अतिसंक्षेपानें [ $अ_{पफ}$ ]( प, फ
...............   = १२३......म ) असें किंवा
$अ_{म}$ $इ_{म}$ $उ_{म}$...   [$अ_{मम}$] असेंहि मांडतात.

कोणत्याहि निर्णायकाच्या ओळींच्या रांगा केल्या व रांगांच्या ओळी केल्या तरी त्या निर्णायकाची किंमत बदलत

$अ_{११}$ $अ_{२१}$ $अ_{३१}$... $अ_{म१}$   नाहीं. वरील निर्णयकास
$अ_{१२}$ $अ_{२२}$ $अ_{३२}$... $अ_{म२}$   असें मांडल्यास त्याचें प्रधान
$अ_{१३}$ $अ_{२३}$ $अ_{३३}$... $अ_{म३}$   पद पूर्वींचेंच असून त्याच्या
...  ...  ...   विस्तारांतील पदांचीं चिन्हें
...  ...  ...   ठरविण्याकरितां दुसऱ्या अनु-
...  ...  ...   बंधांच्या क्रमाच्या ऐवजीं
$अ_{१म}$ $अ_{२म}$ $अ_{३म}$... $अ_{मम}$ पहिल्या अनुबंधाचा क्रम लक्षांत घ्यावा लागेल इतकेंच. पूर्वीच्या विस्तारांतील कोणत्याहि पदाचें चिन्ह याच्या विस्तारांतील त्याच पदाच्या चिन्हाप्रमाणें असतें. यावरून दिलेला नियम सिद्ध होतो.

**सांकल्पिक अंकः**—पाटी अंकाचे नियम बीजगणितांतील अंकांनाहि लागू पडतात. बेरीज व गुणाकार यांस लागू पडणारे नियम तीन आहेत.

नियम १ लाः–सांग्रहिक नियम; म्हणजे,

( अ+इ )+उ = अ+ ( इ+उ ) = अ+इ+उ

आणि अइ×उ = अ×इउ = अइउ.

नियम २ राः–क्रमविषयक नियम; म्हणजे,

अ+ इ = इ+ अ आणि अ× इ = इ ×अ.

नियम ३ राः–सांसर्गिक नियम; म्हणजे,

( अ +उ ) इ = अइ+ उइ

इ ( अ+उ ) = इअ+इउ

बीजगणिताच्या आधुनिक प्रगतीमुळें ज्या अंकांनां वरील नियमांपैकीं एखादा नियम लागू पडत नाहीं, किंवा एखादा नियम, थोडेसें रूपांतर होऊन लागू पडतो, अशांचाहि उपयोग गणितशास्त्रांत करावा लागतो.

ज्या अंकांनां वरील तीनहि नियम लागू पडतात, मग ते खरे असोत वा कल्पित असोत त्यांस सांचयिक अंक म्हणतात.

आतां आपण ज्यास सांकल्पिक अंक म्हणतात त्यांचा विचार करूं.

$ऌ_१, ऌ_२, ऌ_३ \ldots ऌ_म$ या म अंकांचा एक संघ आहे. यापैकीं प्रत्येक अंकाला वेगवेगळया सांचयिक अंकांनीं गुणून त्यांची बेरीज केली असतां जो $अ = अ_१ ऌ_१ + अ_२ ऌ_२ + अ_३ ऌ_३ + \ldots अ_म ऌ_म$.

असा एक अंक होतो त्यास म दर्जाचा सांकल्पिक अंक म्हणतात.

सांचयिक अंकांशीं संलग्न असतां या संघांतील $ऌ_१, ऌ_२, ऌ_३$ इत्यादि प्रत्येकास बीजगणिताचे तीनहि नियम लागू पडतात. परंतु त्यांचा परस्परांशीं संबंध असतां बेरजेस सांग्रहिक व क्रमविषयक नियम लागू पडतात, पण गुणाकारांत मात्र यां नियमाचें थोडें रूपांतर होतें, तें असें:-

ट आणि ड हे कोणतेहि अंक असले तरी

$ऌ_ट ऌ_ड = - ऌ_ड ऌ_ट$ आणि $ऌ^२ = ०\ldots$ ( १ )

जर $अ = अ_१ ऌ_१ + अ_२ ऌ_२ + \ldots + अ_म ऌ_म$

आणि $ई = इ_१ ऌ_१ + इ_२ ऌ_२ + \ldots इ_म ऌ_म$.

तर अ आणि ई हे दोन सांकल्पिक अंक असून त्यांचा गुणाकार खालीं दिल्याप्रमाणें होईल.

$अ. ई = \Sigma अ_ट ऌ_ट . \Sigma इ_ड ऌ_ड$

$= \Sigma अ_ट ऌ_ट इ_ड ऌ_ड$

$= \Sigma अ_ट इ_ड . ऌ_ट ऌ_ड$.

मागें दिलेल्या ( १ )ल्या समीकरणानुसार

$अ. ई = ( अ_१ इ_२ - अ_२ इ_१ ) ऌ_१ ऌ_२$

$+ ( अ_१ इ_३ - अ_३ इ_१ \quad ऌ_१ ऌ_३$

$+ \ldots\ldots ( अ_{म-१} इ_म \; अ_म इ_{म-१} ) ऌ_{म-१} ऌ_म$

म्हणून $अ. ई = - ई. अ$ आणि $अ^२ = ०$

अर्थातच विशकलित $ऌ_१, ऌ_२$ इत्यादि अंकांस जे गुणाकाराचे नियम लागू पडतात तेच सांकल्पिक अंकांसहि लागू पडतात.

जर क हा एखादा सांचयिक अंक असला तर—

$( अ + क ई ) ई = अ. ई. + क ई^२ = अ.ई.$

यावरून दोन सांकल्पिक अंकांचा गुणाकार त्यांतील एकास दुसऱ्याच्या कितीहि पटीनें वाढविलें तरी बदलत नाहीं यावरून,

अ. ई. उ....ठ ह्या गुणाकारांतील एखाद्या उ अंकाच्या ऐवजीं जर $उ + क_१ अ + क_२ ई + \ldots\ldots + क_म$ ठ लिहिलें तरी गुणाकार बदलणार नाहीं. यावरून सांकल्पिक अंकांचा गुणाकार ठराविक असून भागाकार मात्र ठराविक नसतो. कारण ज्या अर्थी,

$( अ + कई ) ई = अ.ई$ त्या अर्थी

$\frac{अ.ई}{ई} = अ + कई$ यांत क हा कोणताहि सांचयिक अंक होय.

$ऌ_१, ऌ_२, ऌ_३$ इत्यादि सर्व अंकांचा गुणाकार १ बरोबर होतो असें समजूं. याचें कारण पुढें समजेल.

आपण $अ_१ \; अ_२ \; अ_३ \ldots अ_म$ $इ_१ \; इ_२ \; इ_३ \ldots इ_म$ $उ_१ \; उ_२ \; उ_३ \ldots उ_म$ ... .. .. ... .. ... .. .. ... ... $ट_१ \; ट_२ \; ट_३ \ldots ट_म$ असा जर एक निर्णायक घेतला आणि त्यांतील ओळींतील घटकांस $ऌ_१, ऌ_२$ इत्यादि अंकांनीं गुणून बनविलेले म दर्जाचे जे म सांकल्पिक अंक होतील त्यांचा गुणाकार—

$प = ( अ_१ ऌ_१ + अ_२ ऌ_२ + \ldots + अ_म ऌ_म ) ( इ_१ ऌ_१ + इ_२ ऌ_२ +$
$\ldots + इ_म ऌ_म ) \ldots ( ट_१ ऌ_१ + ट_२ ऌ_२ + \ldots + ट_म ऌ_म )$
$= \Sigma अ_च इ_छ उ_ज \ldots ट_क्ष . ऌ_च ऌ_छ ऌ_ज \ldots ऌ_क्ष$.

आतां $ऌ_च$ पासून $ऌ_क्ष$ पर्यंतच्या अंकांत जर दोन अंक समान असले तर तें पद ० बरोबर होईल. समान नसल्यास च, छ, ज, ... क्ष हा १, २, ३, ... म याचा एक प्रस्तार आहे व त्यांत १, २, ३, ... म यांतील अदलाबदलींच्या संख्येवर त्या पदाचें चिन्ह अवलंबून राहील. कारण $ऌ_१ . ऌ_२ . \ldots ऌ_म . ऌ_क \ldots ऌ_च$ या पदाची किंमत एकच असते. यावरून प या गुणाकारांत निर्णायकाच्या विस्तारांतील सर्व पदें आपल्या विशिष्ट चिन्हासकट असतात. अर्थातच निर्णायकांचा विस्तार अशा गुणाकारानें काढतां येतो.

कोणत्याहि दर्जाच्या निर्णायकाच्या दोन ओळींची किंवा रांगांची अदलाबदल केल्यास निर्णायकाची किंमत कायम राहून त्याचें चिन्ह मात्र बदलतें. जर—

$न = \Pi ( अ_{च१} ऌ_१ + \ldots + अ_{चप} ऌ_प + \ldots + अ_{चब} ऌ_ब$
$+ \ldots + अ_{चम} ऌ_म )$

( $\Pi$ हें चिन्ह कोणत्याहि संख्येच्या पूर्वीं मांडलें असतां त्या प्रकारच्या सर्व संख्यांचा गुणाकार दर्शवितें ) आणि प आणि ब ह्या रांगांची अदलाबदल केल्यानें न' हा निर्णायक होईल तर—

$न' = \Pi ( अ_{च१} ऌ_१ + \ldots अ_{चब} ऌ_ब + \ldots + अ_{चप} ऌ_प$
$+ \ldots + अ_{चम} ऌ_म )$

सांकल्पिक अंकांच्या बेरजेमध्यें क्रमविषयक नियम लागू पडत असल्यानें न' हा निर्णायक न पासून $ऌ_प$ व $ऌ_ब$ या दोन अक्षरांची अदलाबदल केल्यानें होतो. अर्थातच प्रत्येक पदाच्या सांचयिक अवयवांत फरक पडत नाहीं व केवळ सांकल्पिक अवयवांतच फरक पडतो. यावरून न' = -न. व हाच नियम ओळींसहि लागू पडतो.

जर निर्णायकाच्या दोन ओळी किंवा रांगा एकमेकांसारख्या असतील तर तो निर्णायक 0 बरोबर होतो. वरील नियमावरून या दोन ओळींची अदलाबदल केल्यास निर्णायकाचें चिन्ह बदललें पाहिजे; पण असें केल्यानें त्याच्या स्वरूपांत मुळींच फरक पडत नाहीं अर्थात् न = −न म्हणजे न = 0

जर कोणत्याहि ओळींतील प्रत्येक घटक द्विपद केला तर दिलेल्या निर्णायकास दोन निर्णायकांच्या बेरजेबरोबर मांडतां येईल कारण जर—

$\text{न} = || \text{अ}_{\text{प}}$ आणि

$$\text{अ}_{\text{च}} = (\text{अ}_{\text{च}1} + \text{इ}_{\text{च}1})\,\text{ल}_1 + (\text{अ}_{\text{च}2} + \text{इ}_{\text{च}2})\,\text{ल}_2 + \ldots + (\text{अ}_{\text{चम}} + \text{इ}_{\text{चम}})\,\text{ल}_{\text{म}}$$

$$= (\text{अ}_{\text{च}1}\,\text{ल}_1 + \text{अ}_{\text{च}2}\,\text{ल}_2 + \ldots + \text{अ}_{\text{चम}}\,\text{ल}_{\text{म}}) + (\text{इ}_{\text{च}1}\,\text{ल}_1 + \text{इ}_{\text{च}2}\,\text{ल}_2 + \ldots + \text{इ}_{\text{चम}}\,\text{ल}_{\text{म}})$$

$$= \text{अं}_{\text{च}} + \text{इं}_{\text{च}}$$

व ज्या अर्थी

$$\text{अ}_1\,\text{अ}_2\,\text{अ}_3 \ldots \text{अ}_{\text{म}} = \text{अ}_1\,\text{अ}_2\,\text{अ}_3 \ldots (\text{अं}_{\text{च}} + \text{इं}_{\text{च}})\,\text{अ}_{\text{म}}$$

$$= \text{अ}_1\,\text{अ}_2\,\text{अ}_3 \ldots \text{अ}'_{\text{च}} \ldots \text{अ}_{\text{म}} + \text{अ}_1\,\text{अ}_2\,\text{अ}_3 \ldots \text{इ}'_{\text{च}} \ldots \text{अ}_{\text{म}}$$

त्या अर्थी

$$\text{न} = \text{न}_1 + \text{न}_2.$$

$\text{न}_1$ आणि $\text{न}_2$ या निर्णायकांतील च व्या ओळींत न निर्णायकाच्या च व्या ओळींतील अनुक्रमें पहिला व दुसरा भाग आहे.

यावरून हें सहज दिसून येईल कीं निर्णायकाच्या च व्या ओळींतलि घटक प भागांचा बनला असेल तर मूळ निर्णायकास प निर्णायकांच्या बेरजेबरोबर मांडतां येईल. निर्णायकांत ओळींच्या रांगा व रांगांच्या ओळी केल्यानें ज्या अर्थी निर्णायक बदलत नाहीं त्याअर्थीं ओळीस लागणारे सर्व नियम रांगांसहि लागू पडतील. म्हणून रांगांकरितां निराळे लिहिण्याचें कारण नाहीं. निर्णायकाच्या कोणत्याही ओळीच्या घटकांत दुसऱ्या एखाद्या ओळीचे घटक कोणत्याहि एकाच संख्येनें गुणून मिळविले तरी निर्णायकाची किंमत बदलत नाहीं. कारण आपण च व्या ओळींतील घटकांत प व्या ओळींतील घटक कनें गुणून मिळविले तर निर्णायक—

$$\text{न} = \text{अ}_1\,\text{अ}_2 \ldots\ldots (\text{अ}_{\text{च}} + \text{क}\,\text{अ}_{\text{प}}) \ldots\ldots \text{अ}_{\text{म}}$$

$$= \text{अ}_1\,\text{अ}_2 \ldots\ldots \text{अ}_{\text{च}} \ldots \text{अ}_{\text{म}} + \text{क}\,\text{अ}_1.\,\text{अ}_2 \ldots \text{अ}_{\text{प}} \ldots \text{अ}_{\text{प}} \ldots \text{अ}_{\text{म}}$$

$= \text{अ}_1\,\text{अ}_2 \ldots \text{अ}_{\text{च}} \ldots \text{अ}_{\text{म}} + 0$ ). कारण $\text{अ}_{\text{प}}$ हा अवयव दोनदां येतो.

निर्णायकाचे न्हस्व व त्याचा विस्तार.--निर्णायकांच्या ओळींपैकीं कोणत्याहि 'प' ओळी घेतल्या व तसेंच कोणत्याहि 'प' रांगा घेतल्या तर दोहोंतहि असणाऱ्या घटकांचा जो निर्णायक होतो. त्यास मूळच्या निर्णायकाचा न्हस्व म्हणतात. अर्थातच हा 'प' व्या दर्जाचा न्हस्व होईल.

ज्या अर्थी आपण 'म' ओळींमधून 'प' ओळी

$$^{\text{म}}\text{सं}_{\text{प}} = \frac{\text{म}.(\text{म}-1).(\text{म}-2)\ldots\ldots(\text{म}-\text{प}+1)}{\text{प}!}$$

इतक्या निरनिराळ्या रीतीनें निवडूं शकतो; व त्याचप्रमाणें 'म' रांगांतून 'प' रांगा तितक्याच वेळ काढूं शकतो त्या अर्थी म दर्जाच्या निर्णायकाचे प दर्जाचे न्हस्व

$$\left(^{\text{म}}\text{सं}_{\text{प}}\right)^2$$ होतील.

वर सांगितल्याप्रमाणें म दर्जाच्या निर्णायकांतून प ओळी आणि प रांगा काढल्यावर 'म-प' ओळी व तितक्याच रांगा राहतात. या 'म-प' ओळी व 'म-प' रांगांतून साधारण असलेल्या घटकांचा जो निर्णायक होतो त्यास मागील 'प' व्या दर्जाच्या न्हस्वाचा 'पूरक' न्हस्व म्हणतात. उदाहरणार्थ

$\text{अ}_{11}\;\text{अ}_{12}\;\text{अ}_{13}\;\text{अ}_{14}\;\text{अ}_{15}$

$\text{अ}_{21}\;\text{अ}_{22}\;\text{अ}_{23}\;\text{अ}_{24}\;\text{अ}_{2}$      या निर्णायकांत

..............................

..............................

$\text{अ}_{51}\;\text{अ}_{52}\;\text{अ}_{53}\;\text{अ}_{54}\;\text{अ}_{55}$

$\text{अ}_{11}\;\text{अ}_{12}$                $\text{अ}_{23}\;\;\text{अ}_{24}\;\;\text{अ}_{25}$

आणि        $\text{अ}_{43}\;\;\text{अ}_{44}\;\;\text{अ}_{45}$

$\text{अ}_{31}\;\text{अ}_{32}$                $\text{अ}_{53}\;\;\text{अ}_{4}\;\;\text{अ}_{55}$

हे एकमेकांचे 'पूरक' न्हस्व होत.

$\text{अ}_{11} \ldots\ldots\ldots \text{अ}_{1,\text{च}-1}\;\text{अ}_{1\text{च}} \ldots\ldots\ldots \text{अ}_{1\text{म}}$

......... ......... ......... ......... .........

... ... ... ... ... ... ... ... ...

$\text{अ}_{\text{ज}1} \ldots\ldots\ldots \text{अ}_{\text{जच}-1}\;\;\text{अ}_{\text{ज},\text{च}} \ldots\ldots\ldots \text{अ}_{\text{जम}}$

... ... ... ... ... ......

... ... ... ... ... ......

$\text{अ}_{\text{म}1} \ldots\ldots\ldots \text{अ}_{\text{म},\text{च}-1}\;\;\text{अ}_{\text{म},\text{च}} \ldots\ldots\ldots \text{अ}_{\text{म},\text{म}}$

या निर्णायकांत 'ज' वी ओळ व 'च' वी रांग ह्या वगळून जो निर्णायक राहतो त्यास $\text{अ}_{\text{ज},\text{च}}$ ह्या घटकाचा पूरक न्हस्व म्हणतात. व अशा प्रकारच्या घटकाच्या पूरक न्हस्वांनां मूळच्या निर्णायकाचे प्रथम न्हस्व म्हणतात. त्याचप्रमाणें कोणत्याहि 'प' ओळी व 'प' रांगा वगळल्यावर राहिलेल्या निर्णायकास मूळच्या निर्णायकाचा 'प' वा न्हस्व म्हणतात व हा 'प' वा न्हस्व अर्थातच 'म-प' दर्जाचा असतो.

म दर्जाच्या 'म' सांकल्पिक अंकांचा गुणाकार निर्णायकाच्या स्वरूपांत मांडतां येतो हें आपण पाहिलें. आतां म दर्जाचे सांकल्पिक अंक, जर म पेक्षां अधिक किंवा उणे असतील तर त्या सर्वांचा गुणाकार किती होईल याचा विचार करूं.

$$(\text{अ}_{11}\,\text{ल}_1 + \text{अ}_{12}\,\text{ल}_2 + \ldots\ldots + \text{अ}_{1\text{म}}\,\text{ल}_{\text{म}}) \times \ldots\;\;\ldots$$

$$\ldots \times (\text{अ}_{\text{म}1}\,\text{ल}_1 + \text{अ}_{\text{म}2}\,\text{ल}_2 + \ldots\ldots + \text{अ}_{\text{मम}}\,\text{ल}_{\text{म}}) \times \ldots$$

$$\ldots \times (\text{अ}_{\text{म}+\text{च},1}\,\text{ल}_1 + \text{अ}_{\text{म}+\text{च},2}\,\text{ल}_2 + \ldots + \text{अ}_{\text{म}+\text{च},\text{म}}\,\text{ल}_{\text{म}})$$

$= \sum अ_{१,च}.अ_{२,छ}अ_{३,ज}\ldots अ_{म+च,ट} \times ल्ह_{च} ल्ह_{छ}, ल्ह_{ज} ल्ह_{ट}$.

आतां ल्हचे अनुबंध फक्त 'म' च आहेत व या गुणाकाराच्या प्रत्येक पदांत ल्हची संख्या म + च आहे. म्हणून ल्हचे कांहीं अनुबंध एकापेक्षां जास्त वेळ येतील आणि म्हणून प्रत्येक पद शून्य होईल.

आतां म दर्जाचे सांकल्पिक अंक जर 'म' पेक्षां कमी असले तर त्यांचा गुणाकार असा होईलः-

$( अ_{११}ल्ह_{१} + अ_{१२}ल्ह_{२} + \ldots + अ_{१,म}ल्ह_{म} ) \times ( अ_{२१}ल्ह_{१} + अ_{२२}ल्ह_{२} + \ldots + अ_{२,म}ल्ह_{म} ) \times \ldots \times ( अ_{म-च,१}ल्ह_{१} + \ldots + अ_{म-च,म}ल्ह_{म} )$

$= \sum अ_{१,च}अ_{२,छ},अ_{३,ज} \ldots अ_{म-च,ट}. ल्ह_{च}ल्ह_{छ}\ldots ल्ह_{ट}$

या गुणाकारांतील वर लिहिलेलें पद खालीं दिलेल्या तऱ्हेनें बनलें आहे. $अ_{१च}ल्ह_{च}$ हें पहिल्या अवयवांतून घेतलें आहे. $अ_{२छ}ल्ह_{छ}$ हें दुसऱ्यांतून इत्यादि... $अ_{म-च,ट}ल्ह_{ट}$ हें शेवटल्या अवयवांतून घेतलें आहे. पण ल्हचा हाच गुणाकार क्रमांत फरक होऊन पुन्हां मिळेल. कारण आपण जर पहिला अवयव खेरीजकरून दुसऱ्या कोणत्याहि अवयवांतून 'च' चें पद घेतलें, तसेंच दुसरा अवयव खेरीजकरून दुसऱ्या कोणत्याहि अवयवांतून 'छ' चें पद घेतलें व अशाच क्रमानें सर्व अवयवांतून पदें वेंचिलीं तर आपणांला भिन्न क्रमानें कां होईना ल्हचा वरील गुणाकार मिळेल. आतां ल्हचा हाच गुणाकार ज्या पदांनां साधारण आहे तीं एकत्र केलीं तर—

$\begin{matrix} अ_{१च} & अ_{१छ} & अ_{१ज} & \ldots & अ_{१ट} \\ अ_{२च} & अ_{२छ} & अ_{२ज} & \ldots & अ_{२ट} \\ अ_{३च} & अ_{३छ} & अ_{३ज} & \ldots & अ_{३ट} \\ \ldots & \ldots & \ldots & & \\ \ldots & \ldots & \ldots & & \\ अ_{म-च,च} & अ_{म-च,छ} & अ_{म-च,ज} & & अ_{म-च,ट} \end{matrix}$

हा निर्णायक होईल. तेव्हां गुणाकाराच्या पदांतील एक समूह वरील निर्णायकाला $ल्ह_{च},ल्ह_{छ},ल्ह_{ज}\ldots\ldots ल्ह_{ट}$ ह्यांनीं गुणल्यानें येईल. आणि एकंदर गुणाकारांत असे समूह $^{म}सं_{च-म}$ येतील, म्हणून एकंदर गुणाकार—

$\sum \left.\begin{matrix} अ_{१च} & अ_{१छ} & अ_{१ज} & \ldots & अ_{१ट} \\ अ_{२च} & अ_{२छ} & अ_{२ज} & \ldots & अ_{२ट} \\ अ_{३च} & अ_{३छ} & अ_{३ज} & \ldots & अ_{३ट} \\ \ldots & \ldots & \ldots & & \ldots \\ \ldots & \ldots & \ldots & & \ldots \\ अ_{म-च,च} & अ_{म-च,छ} & अ_{म-च,ज} & & अ_{म-च,ट} \ldots \end{matrix}\right\} ल्ह_{च}\cdot ल्ह_{छ}\cdot ल्ह_{ज} \ldots \ldots ल्ह_{ट}$

असा मांडतां येईल. ( १ )

याचप्रमाणें $अ_{मम}$ हा निर्णायक पूर्ण करण्याकरितां बाकी राहिलेल्या अवयवांचा गुणाकार केला तर—

$(अ_{म-च+१,१}ल्ह_{१}+अ_{म-च+१,२}ल्ह_{२}+ \ldots + अ_{म-च+१,म}ल्ह_{म}) \times ( अ_{म-च+२,१}ल्ह_{१} + अ_{म-च+२,२}ल्ह_{२} + \ldots + अ_{म-च+२,म}ल्ह_{म} ) \times \ldots \times \ldots \times ( अ_{म,१}ल्ह_{१}+अ_{म,२}ल्ह_{२}+ \ldots +अ_{म,म}ल्ह_{म} )$

$= \sum \begin{matrix} अ_{म-च+१,य} & अ_{म-च+१,र} \ldots & अ_{म-च+१,ह} \\ अ_{म-च+२,य} & अ_{म-च+२,र} \ldots & अ_{म-च+२,ह} \ldots \ldots \\ \ldots & \ldots & \ldots \ldots \ldots \\ अ_{म,य} & अ_{म,र} \ldots & अ_{म,ह} \ldots \ldots \end{matrix} \quad ल्ह_{य} ल्ह_{र} \ldots ल्ह_{ह} \quad (२)$

वरील निर्णायकांत य,र...ह हा अनुबंधांचा संघ १,२,...म या अनुबंधांपैकीं कोणत्याहि 'च' अनुबंधाचा झाला आहे. आतां (१) आणि (२) या समीकरणांचा गुणाकार केला तर

$अ_{मम} = \sum \begin{matrix} अ_{१च} & अ_{१छ} & अ_{१ज} & \ldots & अ_{१ट} \\ अ_{२च} & अ_{२छ} & अ_{२ज} & \ldots & अ_{२ट} \\ \ldots & \ldots & \ldots & \ldots & \\ \ldots & \ldots & \ldots & \ldots & \\ अ_{म-च,च} & अ_{म-च,छ} & अ_{म-च,ज} & \ldots & अ_{म-च,ट} \end{matrix}$

$\pm$

$\times \begin{matrix} अ_{म-च+१,य} & अ_{म-च+१,र} & \ldots अ_{म-च+१,ह} \\ अ_{म-च+२,य} & अ_{म-च+२,र} & \ldots अ_{म-च+२,ह} \\ \ldots & \ldots & \ldots\ldots \\ \ldots & \ldots & \ldots\ldots \\ अ_{म,य} & अ_{म,र} & \ldots अ_{म,ह} \end{matrix}$

वरील गुणाकारांत च, छ,...ट आणि य, र...ह हे अनुबंधांचे संघ एकमेकांचे पूरक आहेत व त्यांचा गुणाकार $\pm १$ इतका होतो. या रीतीनें निर्णायकास परस्पर पूरक ऱ्हस्वांच्या गुणाकारांच्या बेरजेच्या स्वरूपांत मांडता येतें. या सिद्धांतास लॅपलेसचा सिद्धांत असें म्हणतात. उदाहरणार्थः—

$\begin{vmatrix} क_{१} & क_{२} & क_{३} & क_{४} \\ ख_{१} & ख_{२} & ख_{३} & ख_{४} \\ ग_{१} & ग_{२} & ग_{३} & ग_{४} \\ घ_{१} & घ_{२} & घ_{३} & घ_{४} \end{vmatrix} = (१२)(३४)+(२३)(१४) +(३१)(२४)+(३४)(१२) +(१४)(२३)+(२४)(३१)$

याच्यांत (१२) (३४) म्हणजे $\begin{vmatrix} क_{१} & क_{२} \\ ख_{१} & ख_{२} \end{vmatrix} \times \begin{vmatrix} ग_{३} & ग_{४} \\ घ_{३} & घ_{४} \end{vmatrix}$

त्याचप्रमाणें

$\begin{vmatrix} क_{१} & क_{२} & क_{३} & क_{४} & क_{५} \\ ख_{१} & ख_{२} & ख_{३} & ख_{४} & ख_{५} \\ ग_{१} & ग_{२} & ग_{३} & ग_{४} & ग_{५} \\ घ_{१} & घ_{२} & घ_{३} & घ_{४} & घ_{५} \\ च_{१} & च_{२} & च_{३} & च_{४} & च_{५} \end{vmatrix} = ( १२३ ) ( ४५ ) +( १४२ ) ( ३५ ) +( १३४ ) ( २५ ) +( २४३ ) ( १५ ) +( १२५ ) ( ३४ ) +( ३१५ ) ( २४ ) +(२३५) ( १४ )+( १४५ )(२३)+( ४२५ ) ( १३ ) +( ३४५ ) ( १२ )$

यांत ( १२३ ( ३५ )

$= \begin{vmatrix} क_{१} & क_{२} & क_{३} \\ ख_{१} & ख_{२} & ख_{३} \\ ग_{१} & ग_{२} & ग_{३} \end{vmatrix} \times \begin{vmatrix} घ_{४} & घ_{५} \\ च_{४} & च_{५} \end{vmatrix}$

एखाद्या म दर्जाच्या निर्णायकांत वरच्या 'प' ओळींत 'म-प' रांगांतील सर्व घटक पुज्य असतील तर तो निर्णायक दोन परस्पर पूरक ऱ्हस्वांच्या गुणाकाराबरोबर असतो. जसें:—

$$\begin{vmatrix} क_{१} & क_{२} & क_{३} & 0 & 0 \\ ख_{१} & ख_{२} & ख_{३} & 0 & 0 \\ ग_{१} & ग_{२} & ग_{३} & 0 & 0 \\ घ_{१} & घ_{२} & घ_{३} & घ_{४} & घ_{५} \\ च_{१} & च_{२} & च_{३} & च_{४} & च_{५} \end{vmatrix} = \begin{vmatrix} क_{१} & क_{२} & क_{३} \\ ख_{१} & ख_{२} & ख_{३} \\ ग_{१} & ग_{२} & ग_{३} \end{vmatrix} \times \begin{vmatrix} घ_{४} & घ_{५} \\ च_{४} & च_{५} \end{vmatrix}$$

परंतु जर त्या 'प' ओळींत 'म–प' पेक्षां अधिक रांगांतील सर्व घटक शून्य असतील तर तो निर्णायक अर्थातच शून्य होईल उदाहरणार्थः—

$$\begin{vmatrix} क_{१} & क_{२} & 0 & 0 & 0 \\ ख_{१} & ख_{२} & 0 & 0 & 0 \\ ग_{१} & ग_{२} & 0 & 0 & 0 \\ घ_{१} & घ_{२} & घ_{३} & घ_{४} & घ_{५} \\ च_{१} & च_{२} & च_{३} & च_{४} & च_{५} \end{vmatrix} = 0$$

मागें सांगितल्याप्रमाणें आपण 'म' दर्जाच्या निर्णायकांतील पहिल्या ओळीच्या प्रत्येक घटकाला त्याच्या पूरक ऱ्हस्वांनीं गुणिलें व त्यांचीं चिन्हें अनुक्रमें +– करून त्यांची बेरीज घेतली तर ही बेरीज निर्णायकाबरोबर होईल उदाहरणार्थः-

$$\begin{vmatrix} क_{१} & क_{२} & क_{३} & क_{४} \\ ख_{१} & ख_{२} & ख_{३} & ख_{४} \\ ग_{१} & ग_{२} & ग_{३} & ग_{४} \\ घ_{१} & घ_{२} & घ_{३} & घ_{४} \end{vmatrix} = क_{१} \begin{vmatrix} ख_{२} & ख_{३} & ख_{४} \\ ग_{२} & ग_{३} & ग_{४} \\ घ_{२} & घ_{३} & घ_{४} \end{vmatrix} - क_{२} \begin{vmatrix} ख_{१} & ख_{३} & ख_{४} \\ ग_{१} & ग_{३} & ग_{४} \\ घ_{१} & घ_{३} & घ_{४} \end{vmatrix} + क_{३} \begin{vmatrix} ख_{१} & ख_{२} & ख_{४} \\ ग_{१} & ग_{२} & ग_{४} \\ घ_{१} & घ_{२} & घ_{४} \end{vmatrix} - क_{४} \begin{vmatrix} ख_{१} & ख_{२} & ख_{३} \\ ग_{१} & ग_{२} & ग_{३} \\ घ_{१} & घ_{२} & घ_{३} \end{vmatrix}$$

चिन्हांचे नियम लक्षांत ठेवून ज्या अर्थी आपल्याला कोणतीहि ओळ पहिल्या ओळींच्या स्थानीं आणतां येते, त्या अर्थी निर्णायकाचें विस्तृत स्वरूप कोणत्याहि ओळींतील घटकांच्या स्वरूपांत मांडता येतें. जसे, वरील निर्णायकास पुढीलप्रमाणेंहि मांडता येईल.

$$-ख_{१} \begin{vmatrix} क_{२} & क_{३} & क_{४} \\ ग_{२} & ग_{३} & ग_{४} \\ घ_{२} & घ_{३} & घ_{४} \end{vmatrix} + ख_{२} \begin{vmatrix} क_{१} & क_{३} & क_{४} \\ ग_{१} & ग_{३} & ग_{४} \\ घ_{१} & घ_{३} & घ_{४} \end{vmatrix} - ख_{३} \begin{vmatrix} क_{१} & क_{२} & क_{४} \\ ग_{१} & ग_{२} & ग_{४} \\ घ_{१} & घ_{२} & घ_{४} \end{vmatrix} + ख_{४} \begin{vmatrix} क_{१} & क_{२} & क_{३} \\ ग_{१} & ग_{२} & ग_{३} \\ घ_{१} & घ_{२} & घ_{३} \end{vmatrix}$$

'म' दर्जाच्या निर्णायकाचें विस्तृत स्वरूप थोडक्यांत मांडण्याची पद्धति अशी आहे.

$$\begin{vmatrix} अ_{११} & अ_{१२} & अ_{१३} & \dots & अ_{१ब} & \dots & अ_{१म} \\ अ_{२१} & अ_{२२} & अ_{२३} & \dots & अ_{२ब} & \dots & अ_{२म} \\ \dots & & \dots & & \dots & \dots & \dots \\ \dots & & \dots & & \dots & \dots & \dots \\ अ_{प१} & अ_{प२} & अ_{प३} & \dots & अ_{पब} & \dots & अ_{मम} \\ \dots & & \dots & & \dots & \dots & \dots \\ \dots & & \dots & & \dots & \dots & \dots \\ अ_{म१} & अ_{म२} & अ_{म३} & \dots & अ_{मब} & \dots & अ_{मम} \end{vmatrix}$$
$$= अ_{प१}अ_{प१} + अ_{प२}अ_{प२} + \dots अ_{पब}अ_{पब} + \dots \dots + अ_{पम}अ_{पम}.$$

यांमध्यें $अ_{पब}$ ह्याचा अर्थ $अ_{पब}$ हा घटक ज्या ओळींत व रांगेंत आहे, ती ओळ व ती रांग काढल्यावर राहिलेला निर्णायक योग्य चिन्हासगट जाणावा. अर्थातच तें चिन्ह $(-१)^{प+ब}$ असें होईल.

(अ) कोणत्याहि निर्णायकाच्या एका ओळींतील सर्व घटक शून्य असतील तर तो निर्णायक सुद्धां शून्य होतो. हें वर सांगितल्याप्रमाणें त्या ओळींच्या घटकांच्या स्वरूपांत निर्णायकाचा विस्तार मांडल्यानें सिद्ध होतें.

(आ) पण एकाशिवाय सर्व घटक शून्य असल्यास निर्णायक, अर्थातच योग्य चिन्हानें हा घटक व त्याचा पूरक ऱ्हस्व ह्यांच्या गुणाकाराबरोबर होतो. उदाहरणार्थः— 'प' व्या ओळींतील $अ_{पब}$ या घटकाशिवाय इतर सर्व घटक शून्य असल्यास निर्णायक $(-१)^{प+ब}अ_{पब}\,अ_{पब}$ याच्या बरोबर होतो.

$$\begin{vmatrix} अ_{११} & अ_{१२} & \dots & अ_{१म} \\ 0 & अ_{२२} & \dots & अ_{२म} \\ 0 & अ_{३२} & \dots & अ_{३म} \\ \dots & \dots & & \dots \\ \dots & \dots & & \dots \\ 0 & अ_{म२} & \dots & अ_{मम} \end{vmatrix} = अ_{११} \begin{vmatrix} अ_{२२} & अ_{२३} & \dots & अ_{२म} \\ अ_{३२} & अ_{३३} & \dots & अ_{३म} \\ \dots & \dots & & \dots \\ \dots & \dots & & \dots \\ अ_{म२} & अ_{म३} & \dots & अ_{मम} \end{vmatrix} = अ_{११}.अ_{११}$$

आणि

$$\begin{vmatrix} अ_{११} & अ_{१२} & अ_{१३} & \dots & अ_{१म} \\ 0 & अ_{२२} & अ_{२३} & \dots & अ_{२म} \\ 0 & 0 & अ_{३३} & \dots & अ_{३म} \\ ,, & ,, & ,, & & ,, \\ ,, & ,, & ,, & & ,, \\ ,, & ,, & ,, & & ,, \\ 0 & 0 & 0 & & अ_{मम} \end{vmatrix} = अ_{११} \begin{vmatrix} अ_{२२} & अ_{२३} & \dots & अ_{२म} \\ 0 & अ_{३३} & \dots & अ_{३म} \\ 0 & 0 & & \dots \\ 0 & 0 & & अ_{मम} \end{vmatrix} = अ_{११}. \begin{vmatrix} अ_{२२} & अ_{२३} & अ_{२म} \dots \\ 0 & \dots & \dots \\ \dots & \dots & \dots \\ 0 & & अ_{मम} \end{vmatrix}$$
$$= अ_{११}.\ अ_{२२}.\ अ_{३३}.\ अ_{४४}.\ \dots\ अ_{मम}.$$

दिलेल्या दुसऱ्या उदाहरणांत प्रधान कर्णरेषेच्या एका बाजूचे सर्व घटक शून्य आहेत.

वर दिलेला नियम कोणत्याहि निर्णायकास त्याच्या खालच्या दर्जाच्या निर्णायकांच्या स्वरूपांत आणण्याकरतां उपयोगी पडतो. दिलेला निर्णायक जर सोईस्कर स्वरूपांत नसेल तर त्याला कधीं कधीं सोईस्कर स्वरूपांत आणतां येतें. जसें:—

$$नि_{म} = \begin{vmatrix} 0 & क & क & \dots & \dots & क \\ ग & 0 & क & \dots & \dots & क \\ ग & ग & 0 & \dots & \dots & क \\ ग & ग & ग & \dots & \dots & क \\ \dots & & & \dots & \dots & \\ ग & ग & ग & \dots & & 0 \end{vmatrix}_{म}$$

[यांतील 'म' हा अनुबंध निर्णायकाचा कदर्जा दर्शवितो. या निर्णायकांत प्रधान कर्णरेषेंतील सर्व घटक शून्य असून त्याच्या उजवीकडील सर्व घटक 'क' व डावीकडील सर्व घटक (ग) आहेत.]

शेवटच्या ओळीपासून सुरुवात करून प्रत्येक ओळींतून त्याच्या पूर्वीची ओळ क्रमानें वजा केली म्हणजे निर्णायकाचें स्वरूप असें होतें.—

$$\text{नि}_\text{म} = \begin{vmatrix} 0 & \text{क} & \text{क} & \text{क} & \dots & \dots & \text{क} \\ \text{ग} & -\text{क} & 0 & 0 & \dots & \dots & 0 \\ 0 & \text{ग} & -\text{क} & 0 & \dots & \dots & 0 \\ 0 & 0 & \text{ग} & -\text{क} & \dots & \dots & 0 \\ \dots & \dots & \dots & \dots & \dots & \dots & 0 \\ \dots & \dots & \dots & \dots & \dots & \dots & 0 \\ \dots & \dots & \dots & \dots & \dots & \dots & \dots \\ 0 & 0 & 0 & 0 & \dots & \dots & -\text{क} \end{vmatrix} \text{म}$$

यांतील पहिल्या रांगेंत (ग) खेरीज इतर सर्व घटक शून्य आहेत. म्हणून

$$\text{नि}_\text{म} = -\text{ग} \begin{vmatrix} \text{क} & \text{क} & \text{क} & \dots & 0 \\ \text{ग} & -\text{क} & 0 & \dots & 0 \\ 0 & \text{ग} & -\text{क} & \dots & 0 \\ 0 & 0 & \text{ग} & \dots & 0 \\ \dots & \dots & \dots & \dots & \dots \\ 0 & 0 & 0 & \dots & -\text{क} \end{vmatrix} (\text{म}-१)$$

या 'म−१' दर्जाच्या निर्णायकांतील पहिल्या ओळींतील घटक अनुक्रमें क +0, 0+क, 0+क, 0+क, ... ... ... अशा स्वरूपांत लिहिल्यास हा निर्णायक दोन निर्णायकांच्या बेरजेबरोबर लिहितां येतो.

$$\text{नि}_\text{म} = -\text{ग} \begin{vmatrix} \text{क} & 0 & 0 & 0 & \dots & 0 \\ \text{ग} & -\text{क} & 0 & 0 & \dots & 0 \\ 0 & \text{ग} & -\text{क} & -0 & \dots & 0 \\ 0 & 0 & 0 & \text{ग} & \dots & 0 \\ \dots & & \dots & & \dots & \\ 0 & 0 & 0 & \dots & & -\text{क} \end{vmatrix} (\text{म}-१) \; -\text{ग} \begin{vmatrix} 0 & \text{क} & \text{क} & \text{क} & \dots & \dots & \dots & \text{क} \\ 0 & \text{ग} & -\text{क} & 0 & 0 & \dots & \dots & 0 \\ 0 & \text{ग} & -\text{क} & 0 & & \dots & \dots & 0 \\ \dots & & \dots & \dots & & & & \\ \dots & & \dots & \dots & & & & \\ 0 & 0 & 0 & 0 & \dots & \dots & & -\text{क} \end{vmatrix} (\text{म}-१)$$

$$= -\text{ग}\,(-१)^{\text{म}-२}\,\text{क}^{\text{म}-१} - \text{ग}\times\text{नि}\,(\text{म}-१)$$

आतां

$$\text{नि}_\text{म} = -\text{ग}\times\text{नि}\,(\text{म}-१) + (-१)^{\text{म}-१}\,\text{क}^{\text{म}-१}\,\text{ग}$$

या समीकरणांत $\text{नि}_\text{म}$ व $\text{नि}_{\text{म}-१}$ हे निर्णायक एकाच स्वरूपाचे आहेत. म्हणून—

$$-\text{ग}[\text{नि}(\text{म}-१)] = [-\text{ग}\times\text{नि}(\text{म}-२)+(-१)^{\text{म}-२}\text{क}^{\text{म}-२}\text{ग}](-\text{ग})$$

त्याचप्रमाणें—

$$(-\text{ग})^२[\text{नि}(\text{म}-२)] = [-\text{ग}\times\text{नि}(\text{म}-३)+(-१)^{\text{म}-३}\text{क}^{\text{म}-३}\text{ग}](-\text{ग})^२$$

... ... ... ... ... ...

$$(-\text{ग})^{\text{म}-३}[\text{नि}_{\text{म}-\text{म}-३}] = [-\text{ग}\times\text{नि}\,(\text{म}-\text{म}-२) + (-\text{क})^{\text{म}-\text{म}-२}\text{ग}](-\text{ग})^{\text{म}-३}$$

वरील समीकरणांच्या डाव्या व उजव्या बाजूंच्या अंगांची बेरीज केली म्हणजे—

$$\text{नि}_\text{म} = (-\text{ग})^{\text{म}-१}\text{नि}_२ + \text{ग}\,[(-\text{क})^{\text{म}-१} + (-\text{क})^{\text{म}-२}(-\text{ग}) + (-\text{क})^{\text{म}-३}(-\text{ग})^२ + \dots \dots (-\text{क})^२(-\text{ग})^{\text{म}-३}]$$

आतां ज्या अर्थी $\text{नि}_२ = -\text{कग}$, त्या अर्थी

$$\text{नि}_\text{म} = -\text{कग}[(-\text{क})^{\text{म}-२}+(-\text{क})^{\text{म}-३}(-\text{ग})+(-\text{क})^{\text{म}-४}(-\text{ग})^२ + \dots \dots + (-\text{ग})^{\text{म}-२}]$$

$$= -\text{कग}\,\frac{(-\text{क})^{\text{म}-२}-(-\text{ग})^{\text{म}-२}}{(-\text{क})-(-\text{ग})}$$

$$= (-१)^{\text{म}-१}\text{कग}\,\frac{\text{क}^{\text{म}-१}-\text{ग}^{\text{म}-१}}{\text{क}-\text{ग}}$$

आतापर्यंत कोणत्याहि निर्णायकाचा दर्जा कमी करतां येतो हें पाहिलें. आतां कोणत्याहि निर्णायकाचा दर्जा कसा वाढवितां येईल हें पाहूं. याकरितां निर्णायकांत एक ओळ व एक रांग अर्थातच वाढवावी लागते. वाढवावयाची रांग व ओळ सुरुवातीसच घेतली तर सोईस्कर पडते. या ओळीचा पहिला घटक १ करून बाकीचे सर्व शून्य केले म्हणजे झालें, मग रांगेंतील घटक कांहींहि असल्यास चालतील जसें:—

$$\text{अ}_{\text{मम}} = \begin{vmatrix} १ & 0 & 0 & \dots & \dots & 0 \\ \text{क} & \text{अ}_{११} & \text{अ}_{१२} & \dots & \dots & \text{अ}_{१\text{म}} \\ \text{ख} & \text{अ}_{२१} & \text{अ}_{२२} & \dots & \dots & \text{अ}_{२\text{म}} \\ \dots & \dots & \dots & \dots & \dots & \dots \\ \dots & \dots & \dots & \dots & \dots & \dots \\ \text{ज्ञ} & \text{अ}_{\text{म}१} & \text{अ}_{\text{म}२} & \dots & \dots & \text{अ}_{\text{मम}} \end{vmatrix}$$

**निर्णायकाचा गुणाकार.**—दोन निर्णायकांचा गुणाकार करण्याकरितां त्या दोघांना एकाच दर्जाचे बनविले पाहिजेत. दोन 'म' दर्जाच्या निर्णायकांचा गुणाकार एका 'म' दर्जाच्याच निर्णायकाच्या स्वरूपांत मांडतां येतो जसें:—

$$\text{अ}_{\text{मम}} \times \text{क}_{\text{मम}}$$

$$= \begin{vmatrix} \text{अ}_{११} & \text{अ}_{१२} & \text{अ}_{१३} & \dots & \text{अ}_{१\text{म}} & 0 & 0 & 0 & \dots & 0 \\ \text{अ}_{२१} & \text{अ}_{२२} & \text{अ}_{२३} & \dots & \text{अ}_{२\text{म}} & 0 & 0 & 0 & \dots & 0 \\ \text{अ}_{३१} & \text{अ}_{३२} & \text{अ}_{३३} & \dots & \text{अ}_{३\text{म}} & 0 & 0 & 0 & \dots & 0 \\ \dots & \dots & \dots & \dots & \dots & 0 & 0 & 0 & \dots & 0 \\ \dots & \dots & \dots & \dots & \dots & 0 & 0 & 0 & \dots & 0 \\ \text{अ}_{\text{म}१} & \text{अ}_{\text{म}२} & \text{अ}_{\text{म}३} & \dots & \text{अ}_{\text{मम}} & 0 & 0 & 0 & \dots & 0 \\ -१ & 0 & 0 & \dots & 0 & \text{क}_{११} & \text{क}_{२१} & \text{क}_{३१} & \dots & \text{क}_{\text{म}१} \\ 0 & -१ & 0 & \dots & 0 & \text{क}_{१२} & \text{क}_{२२} & \text{क}_{३२} & \dots & \text{क}_{\text{म}२} \\ 0 & 0 & -१ & \dots & 0 & \text{क}_{१३} & \text{क}_{२३} & \text{क}_{३३} & \dots & \text{क}_{\text{म}३} \\ 0 & 0 & 0 & \dots & 0 & \vdots & \vdots & \vdots & & \vdots \\ 0 & 0 & 0 & \dots & 0 & \vdots & \vdots & \vdots & & \vdots \\ \dots & \dots & \dots & \dots & \dots & & & & & \\ 0 & 0 & 0 & \dots & -१ & \text{क}_{१\text{म}} & \text{क}_{२\text{म}} & \text{क}_{३\text{म}} & \dots & \text{क}_{\text{मम}} \end{vmatrix}$$

अर्थातच हा निर्णायक '२म' दर्जाचा आहे. तर याला म दर्जाचा करण्याकरितां खालीं लिहिल्याप्रमाणें करावें. या निर्णायकांतील 'म+१' ली रांग नवीन तऱ्हेनें मांडण्याकरितां पहिल्या रांगेंतील घटकांना $\text{क}_{११}$नीं गुणून ते "म+१" ल्या रांगेंतील घटकांत अनुक्रमें मिळवावे, त्याचप्रमाणें २ऱ्या रांगेंतील सर्व घटकांस $\text{क}_{१२}$नीं गुणून हे सुद्धां 'म+१ 'ल्या रांगेंत मिळवावे.आणि याचप्रमाणें तिसऱ्या,चौथ्या ... म व्या

रांगांस अनुक्रमें $क_{१३}, क_{१४}, \ldots क_{१म}$ यांनीं गुणून " म+१ "व्या रांगेंत मिळवावे म्हणजे ' म+१ 'ली रांग खालीं दिल्याप्रमाणें होईल.

$$\begin{array}{l}
अ_{११}\, क_{११}+अ_{१२}\, क_{१२}+अ_{१३}\, क_{१३}+\ldots+अ_{१म}\, क_{१म} \\
अ_{२१}\, क_{११}+अ_{२२}\, क_{१२}+अ_{२३}\, क_{१३}+\ldots+अ_{२म}\, क_{१म} \\
अ_{३१}\, क_{११}+अ_{३२}\, क_{१२}+अ_{३३}\, क_{१३}+\ldots+अ_{३म}\, क_{१म} \\
\ldots \quad \ldots \quad \ldots \quad \ldots \\
\ldots \quad \ldots \quad \ldots \quad \ldots \\
अ_{म१}\, क_{११}+अ_{म२}\, क_{१२}+अ_{म३}\, क_{१३}+\ldots+अ_{मम}\, क_{१म} \\
0 \\ 0 \\ 0 \\ \vdots \\ 0
\end{array}$$

याच रीतीनें 'म+२' री रांग करण्याकरितां $क_{२१}, क_{२२}, क_{२३}, \ldots क_{२म}$ या घटकांनीं क्रमानें पहिल्या ' म 'रांगांस गुणून ते ' म+२ 'व्या रांगेंत मिळवावे, म्हणजे दुसरी रांग अशी होईल.

$$\begin{array}{l}
अ_{११}\, क_{२१}+अ_{१२}\, क_{२२}+अ_{१३}\, क_{२३}+\ldots\, अ_{१म}\, क_{२म} \\
अ_{२१}\, क_{२१}+अ_{२२}\, क_{२२}+अ_{२३}\, क_{२३}+\ldots\, अ_{२म}\, क_{२म} \\
अ_{३१}\, क_{२१}+अ_{३२}\, क_{२२}+अ_{३३}\, क_{२३}+\ldots\, अ_{३म}\, क_{२म} \\
\ldots \quad \ldots \quad \ldots \quad \ldots \\
\ldots \quad \ldots \quad \ldots \quad \ldots \\
अ_{म१}\, क_{२१}+अ_{म२}\, क_{२२}+अ_{म३}\, क_{२३}+\ldots+अ_{मम}\, क_{मम} \\
0 \\ 0 \\ \vdots \\ 0 \\ 0
\end{array}$$

याच रीतीनें ' म+३ री पासून शेवटपर्यंत सर्व रांगा बदलल्यास निर्णायकास पुढीलप्रमाणें स्वरूप प्राप्त होईल.

$$\begin{array}{cccccccc}
अ_{११} & अ_{१२} & \ldots & अ_{१म} & ट_{११} & ट_{१२} & \ldots & ट_{१म} \\
अ_{२१} & अ_{२२} & \ldots & अ_{२म} & ट_{२१} & ट_{२२} & \ldots & ट_{२म} \\
\ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots \\
\ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots \\
अ_{म१} & अ_{म२} & \ldots & अ_{मम} & ट_{म१} & ट_{म२} & \ldots & ट_{मम} \\
-1 & 0 & \ldots & 0 & 0 & 0 & \ldots & 0 \\
0 & -1 & \ldots & 0 & 0 & 0 & \ldots & 0 \\
0 & 0 & \ldots & 0 & 0 & 0 & \ldots & 0 \\
0 & 0 & \ldots & -1 & 0 & 0 & \ldots & 0
\end{array}$$

यांच्यांत $ट_{पब}$ याचा अर्थ

$अ_{प१}\, क_{ब१} + अ_{प२}\, क_{ब२} + अ_{प३}\, क_{ब३}+\ldots अ_{पम}\, क_{बम}$

असा समजावा. वरील निर्णायक लॅप्लेसच्या नियमानें

$$\left.\begin{array}{cccc}
ट_{११} & ट_{१२} & ट_{१३} & \ldots\, ट_{१म} \\
ट_{२१} & ट_{२२} & ट_{२३} & \ldots\, ट_{२म} \\
ट_{३१} & ट_{३२} & ट_{३३} & \ldots\, ट_{३म} \\
\ldots & & \ldots & \ldots \\
ट_{म१} & ट_{म२} & ट_{म३} & \ldots\, ट_{मम}
\end{array}\right\}$$

असा होईल व अर्थातच हा निर्णायक 'म' दर्जाचा आहे.

वरील रीति चांगली समजण्याकरतां तिसऱ्या दर्जाच्या दोन निर्णायकांचा गुणाकार पूर्णपणें मांडून दाखवूं.

$$\left.\begin{array}{ccc}
अ_{११} & अ_{१२} & अ_{१३} \\
अ_{२१} & अ_{२२} & अ_{२३} \\
अ_{३१} & अ_{३२} & अ_{३३}
\end{array}\right\} \times \left\{\begin{array}{ccc}
क_{११} & क_{१२} & क_{१३} \\
क_{२१} & क_{२२} & क_{२३} \\
क_{३१} & क_{३२} & क_{३३}
\end{array}\right. = \begin{array}{cccccc}
अ_{११} & अ_{१२} & अ_{१३} & 0 & 0 & 0 \\
अ_{२१} & अ_{२२} & अ_{२३} & 0 & 0 & 0 \\
अ_{३१} & अ_{३२} & अ_{३३} & 0 & 0 & 0 \\
-1 & 0 & 0 & क_{११} & क_{२१} & क_{३१} \\
0 & 0 & 0 & क_{१२} & क_{२२} & क_{३२} \\
0 & 0 & 1 & क_{३१} & क_{३२} & क_{३३}
\end{array}$$

$$= \begin{array}{cccccc}
अ_{११} & अ_{१२} & अ_{१३} & (अ_{११}\, क_{११}+अ_{१२}\, क_{१२}+अ_{१३}\, क_{१३}) & (अ_{११}\, क_{२१}+अ_{१२}\, क_{२२}+अ_{१३}\, क_{२३}) & (अ_{११}\, क_{३१}+अ_{१२}\, क_{३२}+अ_{१३}\, क_{३३}) \\
अ_{२१} & अ_{२२} & अ_{२३} & (अ_{२१}\, क_{११}+अ_{२२}\, क_{१२}+अ_{२३}\, क_{१३}) & (अ_{२१}\, क_{२१}+अ_{२२}\, क_{२२}+अ_{२३}\, क_{२३}) & (अ_{२१}\, क_{३१}+अ_{२२}\, क_{३२}+अ_{२३}\, क_{३३}) \\
अ_{३१} & अ_{३२} & अ_{३३} & (अ_{३१}\, क_{११}+अ_{३२}\, क_{१२}+अ_{३३}\, क_{१३}) & (अ_{३१}\, क_{२१}+अ_{३२}\, क_{२२}+अ_{३३}\, क_{२३}) & (अ_{३१}\, क_{३१}+अ_{३२}\, क_{३२}+अ_{३३}\, क_{३३}) \\
-1 & 0 & 0 & 0 & 0 & 0 \\
0 & -1 & 0 & 0 & 0 & 0 \\
0 & 0 & -1 & 0 & 0 & 0
\end{array}$$

$$= \begin{array}{ccc}
(अ_{११}\, क_{११}+अ_{१२}\, क_{१२}+अ_{१३}\, क_{१३}) & (अ_{११}\, क_{२१}+अ_{१२}\, क_{२२}+अ_{१३}\, क_{२३}) & (अ_{११}\, क_{३१}+अ_{१२}\, क_{३२}+अ_{१३}\, क_{३३}) \\
(अ_{२१}\, क_{११}+अ_{२२}\, क_{१२}+अ_{२३}\, क_{१३}) & (अ_{२१}\, क_{२१}+अ_{२२}\, क_{२२}+अ_{२३}\, क_{२३}) & (अ_{२१}\, क_{३१}+अ_{२२}\, क_{३२}+अ_{२३}\, क_{३३}) \\
(अ_{३१}\, क_{११}+अ_{३२}\, क_{१२}+अ_{३३}\, क_{१३}) & (अ_{३१}\, क_{२१}+अ_{३२}\, क_{२२}+अ_{३३}\, क_{२३}) & (अ_{३१}\, क_{३१}+अ_{३२}\, क_{३२}+अ_{३३}\, क_{३३})
\end{array}$$

**ऱ्हस्वासक निर्णायक.**—कोणत्याहि निर्णायकांत सर्व घटकांच्या स्थानीं त्यांचे पूरक ऱ्हस्व मांडले म्हणजे जो

निर्णायक होतो त्याला न्हृस्वात्मक निर्णायक म्हणतात. या निर्णायकाच्या मूळच्या निर्णायकाशीं असलेल्या संबंधाचें विवेचन करूं. जसें—

$$\text{नि} = \left.\begin{matrix} \text{क}_{१} & \text{क}_{२} & \text{क}_{३} \\ \text{ख}_{१} & \text{ख}_{२} & \text{ख}_{३} \\ \text{ग}_{१} & \text{ग}_{२} & \text{ग}_{३} \end{matrix}\right\} \text{ या निर्णायकाचा}$$

$$\text{नि} = \left.\begin{matrix} \text{क}_{१} & \text{क}_{२} & \text{क}_{३} \\ \text{ख}_{१} & \text{ख}_{२} & \text{ख}_{३} \\ \text{ग}_{१} & \text{ग}_{२} & \text{ग}_{३} \end{matrix}\right\} \text{ हा न्हृस्वात्मक निर्णायक होय.}$$

या दोन निर्णायकांचा गुणाकार

$$\text{नि.नि} = \left\{\begin{matrix} \text{नि} & ० & ० \\ ० & \text{नि} & ० \\ ० & ० & \text{नि} \end{matrix}\right\} = \text{नि}^{३} \quad \text{म्हणून } \text{नि} = \text{नि}^{२}$$

यावरून हें सहज दिसून येईल कोणत्याहि 'म' दर्जाच्या न्हृस्वात्मक निर्णायकाची किंमत मूळ निर्णायकाच्या 'म−१' व्या घाताबरोबर असते.

$$\text{नि}_{\text{म}} = \text{नि}^{\text{म}-१}$$

निर्णायकांत ओळींची संख्या रांगांच्या संख्येबरोबर असते पण कांहीं घटक चतुःष्कोनाकृतींत मांडतांना ओळींची संख्या रांगांच्या संख्येपेक्षां कमी अगर जास्त केली तर अशा "चतुष्कोनास" निर्णायकाप्रमाणें कांहीं सुद्धां अर्थ नाहीं. तथापि असे एकाच दर्जाचे दोन चतुःष्कोन मांडले व त्यास वरील गुणाकाराची पद्धति लावली तर एक निर्णायक तयार होतो. आतां या निर्णायकासंबंधीं विचार करूं—

प्रकार १ लाः—यांत रांगांची संख्या ओळींच्या संख्येपेक्षां जास्त असते. उदाहरणार्थ आपण

$$\left.\begin{matrix} \text{क}_{१}\text{क}_{२}\text{क}_{३}\text{क}_{४} \\ \text{ख}_{१}\text{ख}_{२}\text{ख}_{३}\text{ख}_{४} \end{matrix}\right\} \text{ हा आणि } \left\{\begin{matrix} \text{ट}_{१}\text{ट}_{२}\text{ट}_{३}\text{ट}_{४} \\ \text{ठ}_{१}\text{ठ}_{२}\text{ठ}_{३}\text{ठ}_{४} \end{matrix}\right.$$

हा असे दोन चतुःष्कोन घेऊन गुणाकाराची पद्धति लावल्यास खालील निर्णायक बनतो.

$$(\text{क}_{१}\text{ट}_{१}+\text{क}_{२}\text{ट}_{२}+\text{क}_{३}\text{ट}_{३}+\text{क}_{४}\text{ट}_{४})(\text{क}_{१}\text{ठ}_{१}+\text{क}_{२}\text{ठ}_{२}+\text{क}_{३}\text{ठ}_{३}+\text{क}_{४}\text{ठ}_{४})$$
$$(\text{क}_{१}\text{ट}_{१}+\text{क}_{२}\text{ट}_{२}+\text{क}_{३}\text{ट}_{३}+\text{क}_{४}\text{ट}_{४}) \quad (\text{ख}_{१}\text{ठ}_{१}+\text{ख}_{२}\text{ठ}_{२}+\text{ख}_{३}\text{ठ}_{३}+\text{ख}_{४}\text{ख}_{४})$$

याची किंमत

$$(\text{क}_{१}\text{ख}_{२})(\text{ट}_{१}\text{ठ}_{२}) + (\text{क}_{१}\text{ख}_{३})(\text{ट}_{१}\text{ठ}_{३}) + (\text{क}_{१}\text{ख}_{४})(\text{ट}_{१}\text{ठ}_{४})$$
$$+ (\text{क}_{२}\text{ख}_{३})(\text{ट}_{२}\text{ठ}_{३}) + (\text{क}_{२}\text{ख}_{४})(\text{ट}_{२}\text{ठ}_{४}) + (\text{क}_{३}\text{ख}_{४})(\text{ट}_{३}\text{ठ}_{४})$$

इतकी होईल. मात्र $\text{क}_{१}\text{ख}_{२}$ याचा अर्थ $\begin{matrix} \text{क}_{१}\text{क}_{२} \\ \text{ख}_{१}\text{ख}_{२} \end{matrix}$ हा निर्णायक असा घ्यावा. त्याचप्रमाणें

$(\text{ट}_{२}\text{ठ}_{४})$ याचा अर्थ $\begin{matrix} \text{ट}_{२}\text{ट}_{४} \\ \text{ठ}_{२}\text{ठ}_{४} \end{matrix}$ हा निर्णायक होतो.

याचप्रमाणें इतरांचे अर्थ समजावे. आणि एकंदरींत वरील विवेचनावरून हें उघड आहे कीं पहिल्या चतुष्कोनांत ओळींच्या संख्येच्या दर्जाचे जितके निरनिराळे निर्णायक शक्य असतील तितके करावे. त्याचप्रमाणें दुसऱ्या चतुष्कोनाचेहि निर्णायक करावे. व नंतर पहिल्यापैकीं एक निर्वाणक घेऊन त्यास दुसऱ्यांतील अनुरूप निर्णायकानें गुणावें व अशा गुणाकारांच्या बेरजेबरोबर हा निर्णायक असतो.

प्रकार २ राः—याच्यांत ओळींची संख्या रांगांच्या संख्येपेक्षां जास्त असते, उदाहरणार्थ आपण

$$\begin{matrix} \text{क}_{१}\text{क}_{२} \\ \text{ख}_{१}\text{ख}_{२} \\ \text{ग}_{१}\text{ग}_{२} \end{matrix} \text{ हा आणि } \begin{matrix} \text{ट}_{१}\text{ट}_{२} \\ \text{ठ}_{१}\text{ठ}_{२} \\ \text{ड}_{१}\text{ड}_{२} \end{matrix} \text{ हा}$$

असे दोन चतुष्कोन घेऊन गुणाकाराची पद्धति लावल्यास खालील निर्णायक बनतो.

$$\begin{matrix} (\text{क}_{१}\text{ट}_{१}+\text{क}_{२}\text{ट}_{२}) & (\text{क}_{१}\text{ठ}_{१}+\text{क}_{२}\text{ठ}_{२}) & (\text{क}_{१}\text{ड}_{१}+\text{क}_{२}\text{ड}_{२}) \\ (\text{ख}_{१}\text{ट}_{१}+\text{ख}_{२}\text{ट}_{२}) & (\text{ख}_{१}\text{ठ}_{१}+\text{ख}_{२}\text{ठ}_{२}) & (\text{ख}_{१}\text{ड}_{१}+\text{ख}_{२}\text{ड}_{२}) \\ (\text{ग}_{१}\text{ट}_{१}+\text{ग}_{२}\text{ट}_{२}) & (\text{ग}_{१}\text{ठ}_{१}+\text{ग}_{२}\text{ठ}_{२}) & (\text{ग}_{१}\text{ड}_{१}+\text{ख}_{२}\text{ड}_{२}) \end{matrix}$$

आतां दिलेल्या दोन्ही चतुष्कोनांत आपण शून्यांची एकेक रांग जोडली तर जे निर्णायक बनतील ते अर्थातच शून्याबरोबर होतील. पण आपण जर त्या दोन निर्णायकांचा गुणाकार केला तर वर दिलेला निर्णायकच होतो, म्हणून तोहि शून्याबरोबर आहे.

चतुष्कोनाच्या वर दिलेल्या गुणाकाराच्या साहाय्यानें आपल्याला भूमितिशास्त्रांतील कांहीं सिद्धांत सहज सिद्ध करतां येतात. त्यांपैकीं आपण एकाचाच विचार करूं. हा सिद्धांत प्रोफेसर केले यानें दिलेल्या अनेक सिद्धांतांपैकीं एक आहे.

$$\begin{matrix} १ & ० & ० & ० \\ \text{य}_{१}^{२}+\text{व}_{१}^{२} & -२\text{य}_{१} & -२\text{व}_{१} & १ \\ \text{य}_{२}^{२}+\text{व}_{२}^{२} & -२\text{य}_{२} & -२\text{व}_{२} & १ \\ \text{य}_{३}^{२}+\text{व}_{३}^{२} & -२\text{य}_{३} & -२\text{व}_{३} & १ \\ \text{य}_{४}^{२}+\text{व}_{४}^{२} & -२\text{य}_{४} & -२\text{व}_{४} & १ \end{matrix} \times \begin{matrix} ० & ० & ० & १ \\ १ & \text{य}_{१} & \text{व}_{१} & \text{य}_{१}^{२}+\text{व}_{१}^{२} \\ १ & \text{य}_{२} & \text{व}_{२} & \text{य}_{२}^{२}+\text{व}_{२}^{२} \\ १ & \text{य}_{३} & \text{व}_{३} & \text{य}_{३}^{२}+\text{व}_{३}^{२} \\ १ & \text{य}_{४} & \text{व}_{४} & \text{य}_{४}^{२}+\text{व}_{४}^{२} \end{matrix}$$

= . . . . . .

०   १   . . १

$१ \quad ० \quad (\text{य}_{१}-\text{य}_{२})^{२}+(\text{व}_{१}-\text{व}_{२})^{२}$

$१ \quad (\text{य}_{१}-\text{व}_{२})^{२}+(\text{व}_{१}-\text{व}_{२})^{२} \quad ०$

$१ \quad (\text{य}_{१}-\text{य}_{३})^{२}+(\text{व}_{१}-\text{व}_{३})^{२} \quad (\text{य}_{२}-\text{य}_{२})^{२}+(\text{व}_{२}-\text{व}_{३})^{२}$

$१ \quad (\text{य}_{१}-\text{य}_{४})^{२}+(\text{व}_{१}-\text{व}_{४})^{२} \quad (\text{य}_{२}-\text{य}_{४})^{३}+(\text{व}_{२}-\text{व}_{४})^{२}$

१   १

$(\text{व}_{१}-\text{य}_{३})^{२}+(\text{व}_{१}-\text{व}_{३})^{२} \quad (\text{य}_{१}-\text{य}_{४})^{२}+(\text{व}_{१}-\text{व}_{४})^{२}$

$(\text{य}_{२}-\text{य}_{३})^{२}+(\text{व}_{२}-\text{व}_{३})^{२} \quad (\text{य}_{२}-\text{य}_{४})^{२}+(\text{व}_{२}-\text{व}_{४})^{२}$

$० \quad (\text{य}_{३}-\text{य}_{४})^{२}+(\text{व}_{३}-\text{व}_{४})^{२}$

$(\text{य}_{३}-\text{य}_{४})^{२}+(\text{व}_{३}-\text{व}_{४})^{२} \quad ०$

हा निर्णायक अधिक सोईस्कर मांडणीनें लिहितां येईल तो असाः—

$$\begin{array}{ccccc} 0 & 1 & 1 & 1 & 1 \\ 1 & 0 & (1,2)^2 & (1,3)^2 & (1,4)^2 \\ 1 & (1,2)^2 & 0 & (2,3)^2 & (2,4)^2 \\ 1 & (1,3)^2 & (2,3)^2 & 0 & (3,4)^2 \\ 1 & (1,4)^2 & (2,4)^2 & (3,4) & 0 \end{array}$$

यांत ( २,४ ), ( ३,४ ) वगैरेंचा अर्थ ज्या बिंदूंचे संशर ($य_2, व_2$), ($य_3,व_4$) आणि ($य_3,व_3$), ($य_4,व_4$) हे आहेत त्या बिंदूंमधील अंतर असा समजावा. या निर्णायकाची किंमत अर्थातच मागील नियमांतील दुसऱ्या प्रकारावरून शून्य होते. आतां आपण एका पातळींत क, ख, ग, घ असे चार बिंदू घेतले तर त्यांतील कख, कग, कघ, खग, खघ, गघ या सहा अंतरांत असलेला परस्पर संबंध या निर्णायकांत व्यक्त होतो.

**अनेक बीजविषयक साधीं समीकरणें व निगमन.**— आपण जर $य_1, य_2, य_3, \ldots\ldots य_म$ या 'म' अज्ञातांचीं खालीं दिलेलीं 'म' समीकरणें घेतलीं तर त्यांचीं मूळें आपणांस सहज काढतां येतात.

$$\begin{array}{l}
(1) \cdots क_1य_1+ख_1य_2+ग_1य_3+ \cdots +न_1य_म = प_1 \\
(2) \cdots क_2य_1+ख_2य_2+ग_2य_3+ \cdots +न_2य_म = प_2 \\
(3) \cdots क_3य_1+ख_3य_2+ग_3य_3+ \cdots +न_3य_म = प_3 \\
\cdots \quad \cdots \quad \cdots \quad \cdots \quad \cdots \quad \cdots \\
\cdots \quad \cdots \quad \cdots \quad \cdots \quad \cdots \quad \cdots \\
(म) \ldots क_म य_1+ख_मय_2+ग_मय_3+ \ldots +न_मय_म = प_म
\end{array}$$

वर दिलेल्या समीकरणांतील अज्ञातांच्या गुणाकारांनीं बनलेला निर्णायक असा होईल—

$$\begin{array}{cccccc} क_1 & ख_1 & ग_1 & \ldots & \ldots & न_1 \\ क_2 & ख_2 & ग_2 & \ldots & \ldots & न_2 \\ क_3 & ख_3 & ग_3 & \ldots & \ldots & न_3 \\ \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots \\ \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots \\ क_म & ख_म & ग_म & \ldots & \ldots & न_म \end{array}$$

आतां $य_1$याची किंमत काढण्याकरतां $क_1$, $क_2$, $क_3$ इत्यादि '$य_1$' च्या गुणांचे पूरक ऱ्हस्व घ्यावे. ते असेः

$क_1$ चा पूरक ऱ्हस्व $\mathfrak{क}_1$ असा लिहूं $क_2$चा पूरक ऱ्हस्व $\mathfrak{क}_2$ इत्यादिप्रमाणें लिहूं. नंतर $\mathfrak{क}_1, \mathfrak{क}_2, \mathfrak{क}_3$ इत्यादि पूरक ऱ्हस्वांनीं दिलेल्या समीकरणांस अनुक्रमें गुणावें आणि नंतर सर्व समीकरणांची बेरीज केली म्हणजे $य_1$ खेरीजकरून सर्व अज्ञातांचे गुण शून्य असल्यामुळें आपल्याला खालीं दिलेलें नवीन समीकरण मिळेल.

$$( क_1\mathfrak{क}_1+क_2\mathfrak{क}_2+क_3\mathfrak{क}_3 \ \ldots \ \ldots +क_म\mathfrak{क}_म ) य_1$$
$$= प_1\mathfrak{क}_1+प_2\mathfrak{क}_2+प_3\mathfrak{क}_3+ \ldots \ \ldots +प_म\mathfrak{क}_म$$

म्हणून

$$य_1 = \frac{प_1\mathfrak{क}_1+प_2\mathfrak{क}_2+प_3\mathfrak{क}_3+ \ldots +प_म\mathfrak{क}_म}{क_1\mathfrak{क}_1+क_2\mathfrak{क}_2+क_3\mathfrak{क}_3+ \ldots +क_म\mathfrak{क}_म}$$

$$= \frac{\begin{array}{cccccc} प_1 & ख_1 & ग_1 & \ldots & \ldots & न_1 \\ प_2 & ख_2 & ग_2 & \ldots & \ldots & न_2 \\ प_3 & ख_3 & ग_3 & \ldots & \ldots & न_3 \\ \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots \\ \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots \\ प_म & ख_म & ग_म & \ldots & \ldots & न_म \end{array}}{\begin{array}{cccccc} क_1 & ख_1 & ग_1 & \ldots & \ldots & न_1 \\ क_2 & ख_2 & ग_2 & \ldots & \ldots & न_2 \\ क_3 & ख_3 & ग_3 & \ldots & \ldots & न_3 \\ \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots \\ \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots \\ क_म & ख_म & ग_म & \ldots & \ldots & न_म \end{array}}$$

याचप्रमाणें $य_3$ची किंमत पुढें दिल्याप्रमाणें होईल.

$$य_3 = \frac{\begin{array}{l} क_1 \, ख_1 \, प_1 \ldots न_1 \\ क_2 \, ख_2 \, प_2 \ldots न_2 \\ क_3 \, ख_3 \, प_3 \ldots न_3 \\ \ldots \ \ldots \ \ldots \\ \ldots \ \ldots \ \ldots \\ \ldots \ \ldots \ \ldots \\ क_म \, ख_म \, प_म \ldots न_म \end{array}}{\begin{array}{l} क_1 \, ख_1 \, ग_1 \ldots न_1 \\ क_2 \, ख_2 \, ग_2 \ldots न_2 \\ क_3 \, ख_3 \, ग_3 \ldots न_3 \\ \ldots \ \ldots \ \ldots \\ \ldots \ \ldots \ \ldots \\ क_म \, ख_म \, ग_म \, न_म \end{array}}$$

याचप्रमाणें इतर सर्व अज्ञातांची किंमत मांडतां येते.

**निगमन.**—आपण

$$अ_1 क + इ_1 ख + उ_1 ग = 0 \ldots (1)$$
$$अ_2 क + इ_2 ख + उ_2 ग = 0 \ldots (2)$$
$$अ_3 क + इ_3 ख + उ_3 ग = 0 \ldots (3)$$

हीं तीन समीकरणें घेऊं. आतां ( १ ) आणि ( २ ) वरून आपणाला क आणि ख यांची किंमत ग च्या रूपांत मांडतां येते. ती अशीः—

$$\frac{क}{\left\{\begin{array}{cc} इ_1 & उ_1 \\ इ_2 & उ_2 \end{array}\right\}} = \frac{ख}{-\left\{\begin{array}{cc} अ_1 & उ_1 \\ अ_2 & उ_2 \end{array}\right\}} = \frac{ग}{\left\{\begin{array}{cc} अ_1 & इ_1 \\ अ_2 & इ_2 \end{array}\right\}}$$

आतां जर क आणि ख यांच्या किंमती तिसऱ्या समीकरणांत लिहिल्या तर तिसरें समीकरण असें होईल.

$$अ_3 \left\{\begin{array}{c} इ_1उ_1 \\ इ_2उ_2 \end{array}\right\} ग - इ_3 \left\{\begin{array}{c} अ_1उ_1 \\ अ_2उ_2 \end{array}\right\} ग + उ_3 \left\{\begin{array}{c} अ_1इ_1 \\ अ_2इ_2 \end{array}\right\} ग = 0$$

या समीकरणांतून ग हा साधारण अवयव असल्यामुळें काढून टाकला तर राहिलेल्या समीकरणास

$$\begin{Bmatrix} अ_{१} & इ_{१} & उ_{१} \\ अ_{२} & इ_{२} & उ_{२} \\ अ_{३} & इ_{३} & उ_{३} \end{Bmatrix} = 0$$

असें मांडतां येतें. यास वरील तीन समीकरणांचा निर्गम म्हणतात, व निर्गम काढण्याच्या पद्धतीस निर्गमन म्हणतात. त्याचप्रमाणें म अज्ञातांचीं म साधीं समघात समीकरणें असल्यास त्यांचाहि आपणाला निर्गम काढतां येतो. तो असाः—

$$अ_{११}क_{१}+अ_{१२}क_{२}+अ_{१३}क_{३}+\ldots+अ_{१म}क_{म}=0$$
$$अ_{२१}क_{१}+अ_{२२}क_{२}+अ_{२३}क_{३}+\ldots+अ_{२म}क_{म}=0$$
$$अ_{३१}क_{१}+अ_{३२}क_{२}+अ_{३३}क_{३}+\ldots+अ_{३म}क_{म}=0$$
$$\ldots \quad \ldots \quad \ldots \quad \ldots \quad \ldots$$
$$\ldots \quad \ldots \quad \ldots \quad \ldots \quad \ldots$$
$$अ_{म१}क_{१}+अ_{म२}क_{२}+अ_{म३}क_{३}+\ldots+अ_{मम}क_{म}=0$$

या समीकरणांचा निर्गम

$[अ_{मम}] = 0$ असा होतो.

एकच अज्ञातांचीं व कोणत्याहि घातांचीं दोन समीकरणें असल्यास आपणांस त्यांचाहि निर्गम काढतां येतो. उदाहरणार्थ, आपण पहिलें समीकरण तिसऱ्या घाताचें व दुसरें चवथ्या घाताचें अशीं दोन समीकरणें घेऊं.

$$अ_{०}क^{३}+अ_{१}क^{२}+अ_{२}क+अ_{३}=0$$
$$इ_{०}क^{४}+इ_{१}क^{३}+इ_{२}क^{२}+इ_{३}क+इ_{४}=0$$

यांपैकीं पहिल्या समीकरणास $क^{३}$, $क^{२}$, आणि क यांनीं गुणून तीं समीकरणें पहिल्यानें मांडूं व नंतर पहिलें समीकरण मांडूं. त्या खालीं दुसऱ्या समीकरणास $क^{२}$ व क नें गुणून मांडल्यावर शेवटीं दुसरें समकिरण मांडावें म्हणजे आपणांस खालील ७ समीकरणें मिळाल्यासारखीं होतील.

$$\begin{array}{rr} अ_{०}क^{६}+अ_{१}क^{५}+अ_{२}क^{४}+अ_{३}क^{३}+ & =0 \\ अक^{५}+अ_{१}क^{४}+अ_{२}क^{३}+अ_{३}क^{२}+ & =0 \\ अक^{४}+अ_{१}क^{३}+अ_{२}क^{२}+अ_{३}क+ & =0 \\ अक^{३}+अ_{१}क^{२}+अ_{२}क+अ & =0 \\ इ_{०}क^{६}+इ_{१}क^{५}+इ_{२}क^{४}+इ_{३}क_{३}+इ_{४}क^{२}+ & =0 \\ इ_{०}क^{५}+इ_{१}क^{४}+इ_{२}क^{३}+इ_{३}क^{२}+इ_{४}क+ & =0 \\ इ_{०}क^{४}+इ_{१}क^{३}+इ_{२}क^{२}+इ_{३}क+इ_{४} & =0 \end{array}$$

वरें दिल्याप्रमाणें यांचा निर्गम

$$\begin{array}{ccccccc} अ_{०} & अ_{१} & अ_{२} & अ_{३} & 0 & 0 & 0 \\ 0 & अ_{०} & अ_{१} & अ_{२} & अ_{३} & 0 & 0 \\ 0 & 0 & अ_{०} & अ_{१} & अ_{२} & अ_{३} & 0 \\ 0 & 0 & 0 & अ_{०} & अ_{१} & अ_{२} & अ_{३} \\ इ_{०} & इ_{१} & इ_{२} & इ_{३} & इ_{४} & 0 & 0 \\ 0 & इ_{०} & इ_{१} & इ_{२} & इ_{३} & इ_{४} & 0 \\ 0 & 0 & इ_{०} & इ_{१} & इ_{२} & इ_{३} & इ_{४} \end{array} = 0$$

असा होईल.

याचप्रमाणें पहिलें समीकरण म घाताचें व दुसरें न घाताचें असल्यास त्याच्या निर्गमांतील निर्णायक म+न दर्जाचा होईल, व तो काढण्याकरितां पहिल्या समीकरणास अनुक्रमें $क^{न-१}$ $क^{न-२}$, $क^{न-३}$, …क यांनीं गुणून तीं न–१ समीकरणें पहिल्यानें मांडून मग पहिलें समीकरण लिहावें. नंतर दुसऱ्या समीकरणास $क^{म-१}$ $क^{म-२}$ $क^{म-३}$, …क यांनीं गुणून तीं लिहावीं व शेवटीं दुसरें समीकरण लिहावें म्हणजे आपणास एकंदर म+न समीकरणें मिळतील व $क^{म+न-१}$ $क^{म+न-२}$ $क^{म+न-३}$…क हे(म+न–१)अज्ञात मानल्यास तीं म+न समीकरणें या अज्ञातांचीं साधीं समीकरणें मानतां येतात व त्यांचा निर्गम खालीं दिल्याप्रमाणें होईल.

$$\begin{array}{ccccccccc} अ_{०} & अ_{१} & अ_{२} & \ldots & अ_{म} & 0 \ldots & & & \ldots \\ 0 & अ_{०} & अ_{१} & \ldots & अ_{म-१} & अ_{म} & 0 & & \ldots \\ 0 & 0 & अ_{०} & \ldots & अ_{म-२} & अ_{म-१} & अ_{म} & & \ldots \\ 0 & 0 & 0 & \ldots & \ldots & \ldots & \ldots & & \ldots \\ \ldots & & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & & \ldots \\ \ldots & & \ldots & \ldots & \ldots & \ldots & अ_{म-१} & & अ_{म} \\ इ_{०} & इ_{१} & इ_{२}\ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & & \ldots \\ 0 & इ_{०} & इ_{२}\ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & & \ldots \\ 0 & 0 & इ_{०}\ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & & \ldots \\ \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & & \ldots \\ \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & & \ldots \\ & \ldots & \ldots & \ldots & \ldots & \ldots & इ_{न-१} & & इ_{न} \end{array}$$

$= 0$

[ ले. प्रो. जी. के. गर्दे ].

**निर्मल साधु**—म्हणजे 'शुद्ध साधु' हा शीख पंथातील एक उपपंथ असून शिखांच्या अकाली पंथाशीं यांचा तीव्र विरोध आहे. शीख पंथाची दीक्षा घेतांना हे लोक दुसरा कोणताहि प्रायश्चित्तविधि करीत नाहींत, फक्त अमृत उर्फ तीर्थ प्राशन करतात व नंतर ' सिंह ' हें नाम धारण करतात. निर्मल व अकाली हे दोन्हीं उपपंथ गुरु गोविंदसिंग याच्यावेळीं निघाले. या पंथाला हें नांव मूळ कसें प्राप्त झालें यावद्दल निरनिराळ्या गोष्टी सांगण्यांत येतात. पंथप्रकाश ( १८९२, पान ८५५ ) या ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, गुरु गोविंदसिंगानें आपल्या शीख शिष्यांस संस्कृत शिकविण्याकरितां काशीच्या एका ब्राह्मणास बोलाविलें असतां शीखांत ब्राह्मण, वैश्य, शूद्र, वगैरे सर्व जातीचे इसम होते. या कारणास्तव त्यानें संस्कृत शिकविण्याचें नाकारिलें. तेव्हां गोविंदसिंगानें आपले कांहीं शिष्य पाठवून संस्कृत ग्रंथांचें पठण करविलें व त्यांनीं संस्कृत शिकल्यावर त्या ग्रंथांचें प्राकृतांत भाषांतर केलें. हे शिष्य साधूप्रमाणें भगवीं वस्त्रें वापरीत असत व त्यांनांच पुढें ' निर्मल ' असें नांव गुरूनें दिलें. दुसरी एक गोष्ट अशी आहे कीं, एकदां एक निकराची लढाई दिवसभर झाल्यानंतर रात्रीं सर्व लष्कर झोपीं गेलें होतें, अशा वेळीं मध्यरात्रीं गुरूनें सर्व छावणींत फिरून पाहिलें तेव्हां ध्यान करीत असलेले कांहीं इसम आढळले; त्यांस त्यानें निर्मल असें नांव दिलें.

हे निर्मल साधू प्रथम शुभ्र वस्त्रें परिधान करीत असत व हिंदु धर्मग्रंथांचाच अभ्यास करीत, त्यामुळें शीख धर्माशीं त्यांचा संबंध कमी झाला. पुढें ते भगवीं वस्त्रें वापरून व भिक्षा मागून निर्वाह करूं लागले. निर्मल साधूंचा पंथ फार व्यवस्थित वागणारा असून पूज्य मानला जातो. त्याच्या प्रत्येक मठावर मुख्य अधिकारी गुरु असतो. त्यांचा मुख्य अखाडा हरिद्वार येथें आहे व त्याशिवाय अमृतसर व पंजाबांतील इतर ठिकाणींहि त्यांचे मठ आहेत.

**निर्मळ, ता लु का.**—हैद्राबाद संस्थानामधील आदिलाबाद जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ ४८० चौरस मैल. लोकसंख्या ( जाहागिरी धरून १९११ ) ५५९९८. यांत निर्मळ हा एक गांव असून १८८ खेडीं आहेत व १५ जहागिरी आहेत. येथें तांदुळाचें उत्पन्न भरपूर होतें. गोदावरी नदी ह्या तालुक्याच्या दक्षिण सीमेवरून वहाते. १९०५ सालीं ह्या तालुक्यांतील कांहीं खेडीं किनवतकडे गेलीं व त्याऐवजीं नर्सापूरचा भाग या तालुक्यास जोडण्यांत आला. निझाम सलावतजंग हा १७५५ सालीं सेनापति बुसीबरोबर औरंगाबादाहून गोवळकोंड्यास जात असतां मार्गांत निर्मळच्या राजानें त्याजवर हल्ला केला. पण राजाचा पराभव होऊन तो मारला गेला.

गां व.—निर्मळ तालुक्याचें मुख्य गांव. ह्या गांवाभोंवतीं तट आहे. लोकसंख्या ९५८८. याच्या भोंवतालच्या टेंकड्यांवर लहान लहान किल्ले आहेत, मोठा किल्ला शहराच्या मध्यभागीं असून तेथें मोडकळीस आलेला राजवाडा आहे.

**निर्मळ**—मुंबई इलाखा. ठाणें जिल्ह्याच्या वसई तालुक्यांतील एक खेडें. हें वसईच्या उत्तरेस ६ मैलांवर आहे. हें अत्यंत पुण्यस्थान समजलें जात असून, येथें एक लिंग आहे. येथें शंकराचार्यांची समाधि असून कार्तिक वद्य एकादशीस त्यांच्या पुण्यतिथीनिमित्त मोठी जत्रा भरते. पितळेचीं व तांब्याचीं भांडीं, सुकी केळीं, मिठाई, कापड व गुरांचा बाजार येथें मोठा भरतो. जत्रेस हिंदु, पारशी, मुसुलमान, ख्रिश्चन,इत्यादि सर्व धर्मांचे लोक येतात.येथें एक सातव्या शतकांतील शिलालेख आहे. पोर्तुगीज अमलाच्या वेळचें सान्ताक्रूझचें एक देवालय येथें आहे. १७३९ सालीं मराठ्यांनीं वसई घेतल्यावर निर्मळ पुन्हां पुनीत करण्यांत आलें व लिंगाच्या जागीं दत्तात्रेयाच्या पादुकांची स्थापना करण्यांत आली. वसईचा सर सुभेदार शंकरजी केशव यानें १७५० सालीं बांधलेलीं ८ देवालयें येथें आहेत. येथें मोठें अन्नछत्र आहे.

**निर्वाण**—हा बौद्ध धर्मग्रंथांतला शब्द असून त्याचा अर्थ मोक्ष, मुक्ति असा आहे. शाक्यमुनीच्या उपदेशांतील मुख्य सार 'निर्वाणप्राप्ति' हें आहे, तेव्हां 'निर्वाण' याची स्पष्ट व असंदिग्ध कल्पना बौद्ध ग्रंथांत असेल असें कोणासहि वाटेल. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं बौद्ध ग्रंथांत निर्वाणासंबंधीं सुबोध विवरण कोठेंच आढळत नाहीं. मनुष्याचें इहलोकचें अस्तित्व स्पष्ट दिसणारेंच आहे व तें दुःखमय आहे हें बौद्धांचें म्हणणें कोणालाहि समजण्यासारखें आहे. मनुष्याला जन्म व मृत्यु हीं सारखीं एकामागून एक प्राप्त होत असतात, व या जन्ममृत्यूंच्या फेऱ्यांमधून कायमची सुटका होणें, हा 'निर्वाणप्राप्ति' याचा अर्थ असेल तरं तोहि स्पष्ट कळण्यासारखा आहे, पण ही निर्वाणाची केवळ अभावात्मक कल्पना ( निगेटिव्ह कन्सेप्शन ) आहे. प्रत्यक्ष निर्वाण म्हणजे कोणत्या प्रकारची स्थिति हें त्यावरून स्पष्ट होत नाहीं. हिंदु धर्माच्या संस्कृत ग्रंथांत मोक्ष शब्दाचा जन्ममरणापासून सुटका आणि जीवात्म्याचें परमात्म्यांत उर्फ ब्रह्मांत एकीकरण असा अर्थ दिला असून ब्रह्म याची कल्पना अनेक विशेषणें लावून स्पष्ट केली आहे. परब्रह्मप्राप्ति ही अत्यंत आनंदमय स्थिति असते आणि हा ब्रह्मानंद इतर सर्व ऐहिक किंवा पारलौकिक आनंदांपेक्षां श्रेष्ठ प्रकारचा असतो असेंहि वर्णन हिंदु धर्मग्रंथांत आहे. निर्वाणप्राप्ति हीहि अत्यंत आनंदमय स्थिति असते असें बौद्ध ग्रंथ म्हणतात, पण ही निर्वाणप्राप्ति मनुष्याला मृत्यूनंतर प्राप्त होते असें नसून जिवंतपणींच प्राप्त होऊं शकते,असें बौद्ध मत असल्यामुळें ब्रह्म व निर्वाण या गोष्टी निराळ्या असाव्यात.

**निलंग**—हैद्राबाद संस्थानामध्यें बिदर जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ६५१ चौरस मैल. लोकसंख्या ( जहागिरी धरून) १९०१ साली ८४६७९ होती. ह्या तालुक्यांत १४१ खेडीं व २६ जाहागिरी आहेत. निलंग हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. १९०५ सालीं वरवाल-राजुरा तालुक्यांतील कांहीं खेड्यांचा ह्या तालुक्यांत समावेश करण्यांत आला. निलंग तालुक्यांत काळी कापसाची जमीन आहे.

**निलफामारी, पो ट वि भा ग.**—बंगाल. रंगपूर जिल्ह्याचा वायव्येकडील पोटविभाग. क्षेत्रफळ ६४९ चौरस मैल. ह्या पोटविभागाच्या पूर्व मर्यादेवर तिस्ता असून, हा प्रदेश सपाट जमिनीचा आहे. जमीन काळी व चिक्कण असून तांदुळाच्या पिकाला योग्य आहे. लोकसंख्या ( १९११)४९१८६०. यांत तीन गांवें व ४७० खेडीं आहेत. हवा निरोगी असून रोगराई वगैरे नाहीं. तंबाखू व उंसाचें पीक बाढत्या प्रमाणावर आहे. निलफामारी हें गांव ईस्टर्न-बेंगाल-रेल्वेवर एक स्टेशन आहे. येथील लोकसंख्या दोन तीन हजार आहे.

**निलिलीन** ( इन्डयुलाइन )—हे निळी, काळसर व तांबडट काळसर छटा असलेले रंग आहेत. ते १८६३ सालीं शोधले गेले. ते यु-से-होडाइनपासून निघणारे पदार्थ आहेत. त्यांची रचना ॲझो-फेनिन या नांवाच्या ( ते तयार करीत असतां,) मिळणाऱ्या पदार्थाच्या योगानें बरीच समजली गेली. ॲझो-फेनिन ( $क_{३६}$ $उ_{२४}$ $न_{४}$ ) हें क्विनिनद्वि-अनिल निलीनबरोबर तापविलें असतां किंवा क्विनिन, निलीन व निलीन-उज्ज-हरिद एकत्र तापविलें असतां मिळतें. निलिलीन रंग अम्र-ॲझो-उदीनापासून तयार करतात.



त्यांचे चार निरनिराळे भाग करतात. ( १ ) उद-निलिलीन, ( २ ) आयसो-रोज-इन्डयुलीन, ( ३ ) रोज-इन्डयुलीन,व(४) नक्त-निलिलिंन. नंबर ३ व ४च्या निलिलीनाचा रंग तांबडा असून त्यांची रचना खालीलप्रमाणें आहे.



नंबर १ चें उद-निलिलीत हें अनाम्ल असून त्याची रचना वरील ॲपोसॅफ्रीन सारखी असते. आयसो-रोज-इंडयुलीनची



सारणी नउ-रु$_6$उ$_3$ नक$_3$ उ$_6$— क$_{10}$उ$_5$याप्रमाणें आहे. नंबर दोनचें निलिलीन क्विनोन-द्वि-हर-इमिद आणि उदिल-त्र-नक्तिल-अमिनपासून मिळतें. नंबर ३चें उदिन-ॲझो-अ-नक्तिल-अमिन व निलीनपासून मिळतें व नंबर ४ चें नक्त निलिलीन उदीन-अ-नक्तिल-अमिन व नक्तिल-अमिनापासून मिळतें.

**निलीन ( ॲनिलाईन )**—निलीन हें सेंद्रिय अनाम्ल असून निळीच्या विध्वंसक ऊर्ध्वपातनाच्या योगानें मिळतें. १८४१ सालीं फ्रीटस्के यानें नीळीवर पालाश-कर्बिताची क्रिया करून एक प्रकारचा तेलकट पदार्थ तयार केला, त्यालाच त्यानें निलीन हें नाव दिलें. याच सुमारास झिनिन नत्र-उदीन उज्जरहित करून एक अनाम्ल तयार केलें व त्यास बन्झिडम् असें नांव दिलें, पण हॉफमन यानें हे पदार्थ एकाच प्रकारचे आहेत असें दाखविलें व तेव्हांपासून हे सर्व प्रकार निलीन या सदराखालीं येतात.

शुद्ध निलीन हें तेलकट असून त्याचे वितळण्याचे व उकळण्याचे बिंदू अनुक्रमें ८° व १८४° आहे. हें हवेंत ठेवलें असतां प्राणवायु आंत घेतें. ह्यास द्राक्षाच्या दारूसारखा वास येत असून त्याची चव करपट पदार्थाप्रमाणें असते. हें कमी प्रतीचें असें एक अनाम्ल असून खनिज अम्लाशीं संयुक्त होऊन याचा क्षार होतो. कर्बद्विगंधकिदाशीं तापविलें असतां हें गंधक-कर्द-नलिनिद देतें. निलीनापासून बरेच रंग तयार करतां येतात, व ज्वरघ्न औषधा सारख्या औषधास लागणारीं द्रव्येंहि तयार करतां येतात. निलीन हें नत्र-उदीन-लोह व हराम्लाच्या योगानें सोज्जित करून तयार करतात.

**निलीय( इंडियम् )**—हा स्फटादि वर्गांतील एक धातु असून तो त्याच्या वर्णलेखावरून रीच् व रिक्टर यांनीं स. १८६३ च्या सुमारास शोधला. हा धातु जस्तामध्यें थोड्या प्रमाणांत मिळतो. हा जस्तापासून वेगळा करण्याकरितां त्यावर हराम्लाची अशा रीतीनें क्रिया करतात कीं, थोडेंसें जस्त विद्रुत होण्याचें राहतें. ह्या स्थितीमध्येंच हा द्रव कांहीं वेळ ठेवल्यास विद्रुत न झालेल्या जशदाच्या भोंवतीं ह्या धातूचा सांका जमतो. मूळ कच्चा धातु अनाम्ली जशद-क्षारापासून वेगळा करून नत्राम्लामध्यें विद्रुत करतात, व नत्राम्ल गंधकाम्लाच्या योगानें तप्त करून काढून टाकतात. ह्यावर अम्नाची क्रिया केली असतां ह्या धातूचें उत्प्राणिद मिळतें. हें उत्प्राणिद सिंधुद्विगंधकिताशीं उकळलें असतां ह्याचें अनाम्ली-गंधकित मिळतें, व नंतर उष्ण गंधकाम्लावरोबर तापविलें असतां साधें गंधकित मिळतें. हें गंधकित खूप तापविलें असतां ह्या धातूचें त्रि-प्राणिद मिळतें. शेवटीं उज्जाच्या वातावरणामध्यें हें त्रि-प्राणिद तापविलें असतां मूळ धातु मिळतो; हा एक मऊसा ७.२४१ विशिष्ट दार्ढ्य असणारा धातु असून त्याचें वितळण्याचें उष्णमान १५५° आहे. ह्याचीं तीन प्रकारचीं हरिदें व दोन प्रकारचीं प्राणिदें होतात. ह्याच्या प्राणिदावर गंधकाम्लाच्या क्रियेच्या योगानें गंधकित मिळतें. बुन्झेन ज्योतीमध्यें ह्याच्या क्षारांचा रंग काळसर निळा असतो, व त्यामुळें ते ओळखले जातात.

**निवडुंग**—या जातींत समावेश होणारीं झाडें बहुतेक झुडुपें असून कांहीं थोडीं लहान झाडाएवढीं मोठीं असतात. या झाडांच्या औषधी गुणधर्मांखेरीज यापासून निघणाऱ्या गटापर्चा नांवाचा रबर तयार करण्याकरितां होणारा उपयोग विशेष महत्त्वाचा आहे. निवडुंगाच्या अनेक जाती असून त्यापैकीं कांहीं खालीं दिल्या आहेत.

यु फो र्बि आ अँ टि को र म.—वज्री (संस्कृत); तिधार, शिङु, कळि, नरसिज् अथवा नर्सेज्, तेकाद्यासिज्, तझौंगवपथ्यट वगैरे याचीं एतद्देशीय नांवें आहेत. दक्षिणेंत कुंपणाकरितां उपयोगांत येणारीं कांहीं झाडें या जातीचीं असून बंगाल व आसाममध्यें तर या जातीच्या झाडांनां पवित्र मानतात. ज्या बगिच्याभोंवतीं यांचें कुंपण असतें त्याचें हीं झाडें चांगलें रक्षण करतात व त्यांत रहाणाऱ्या लोकांचेंहि सर्पदंशापासून रक्षण करतात असा तेथें समज आहे.

यु फो र्बि आ ने रि आ य फो लि आ.—निवडुंग, मन्सासिज्, पातसिज्, सेहुंडु, थोर, मिंगतु, कळि, येलिकळि, व शझौंग हीं या झाडाचीं नांवें आहेत. हें निवडुंगाचें लहान रानटी झाड असून तें दख्खन, पश्चिम किनारा व ओरिसा या ठिकाणीं खडकाळ जमिनीवर आढळतें, परंतु विशेषतः बंगालमध्यें याची लागवड करतात.

उपयोगः—याचा व मागें दिलेल्या जातींच्या झाडांचा चीक सर्व हिंदुस्थानभर औषधी म्हणून उपयोगांत आणतात. हा चीक त्वचेवर लाली आणणारा असून जुलाब होण्याकरितांहि तो घेतला जातो. चामखिळीवर हा लावतात. या चिकापासून रबर तयार करण्याचे प्रयत्न झाले परंतु यापासून होणारा

रवर फारच हलक्या प्रतीचा असतो म्हणून त्या प्रयत्नांना यश आलें नाहीं.

यु फो र्बि आ पि ल लि फे रा.—दुधि, दुदेलि, दुरकेरु, पुसितौ, गोर्डोन् व नयेति अशीं याचीं नांवें आहेत. पंजाबपासून दक्षिणेकडे सर्व हिंदुस्थानभर उष्ण प्रदेशांत हीं लहान झाडें आढळतात.

उपयोगः—लहान मुलांचा मलाशय व फुप्फुसें यांसंबंधीं विकारावर याचा उपयोग होतो.

यु फो र्बि आ रॉ य लि आ ना.—शंकर्पितन्, थोर, सलि, चूल, चून्, छुर, त्सुई, सिहुंद वगैरे याचीं नांवें आहेत. कुमाऊन व कुमाऊच्या पश्चिमेस असलेल्या हिमालयाच्या बाह्य प्रदेशांवर व मिठाच्या डोंगरावर खडकाळ प्रदेशांत हीं झाडें होतात. या झाडांच्या फांद्या जोमदार व कांटेरी असून चीक ताजा असतांना सुगंधी असतो व त्यांत बराच गटापर्चा असतो. हा चीक डोळ्यांना इजा करणारा असतो.

उपयोगः—वस्तूंना जलाभेद्य करण्याकरितां या चिकाचा उपयोग करण्याचे प्रयत्न झाले, परंतु त्यांत यश आलें नाहीं.

यु फो र्बि आ रॉ य ली न्स.—शेर, सेजु, शिर, सेहुंद, लंकशिन्, निव्लि, निवलु, कळ्ळिनेवलि, जेमुड्ड, थुवर, येलेगुल्ल, तिरुकल्लि, श-शोंग हीं याचीं नांवें आहेत. हीं झाडें मूळचीं आफ्रिकेंतील असून हल्लीं हिंदुस्थानांतील हवेशीं त्यांचें पूर्ण सात्म्य झालें आहे. विशेषतः बंगाल, दख्खन, दक्षिण हिंदुस्थान व सिलोन येथील रुक्ष जमिनींत हीं झाडें आढळतात.

उपयोगः—या झाडांचा चीक गरम केला असतां तो तन्य व लवचीक होतो; परंतु उकळिला असतां ठिसूळ बनतो. उत्तर अर्काटमध्यें हा चीक मातींत मिसळून त्याचा घराचीं छपरें करण्याकडे उपयोग करतात. जुलाब होण्याकरितां व प्रतिदाहोत्पादक म्हणून याचा उपयोग करतात. या झाडांचा कुंपणाकरितां चांगला उपयोग होतो.

ना ग फ णा.—हिंदुस्थानांत या निवडुंगाच्या पुष्कळ जाती आलेल्या असून त्या आतां स्थायिक झाल्या आहेत. त्यांपैकीं नागफणा ही एक जात आहे व त्याचीं निरनिराळीं नांवें आहेत. याचीं फळें खातात व त्यांचा मद्यार्काचें ऊर्ध्वपातन करण्यासाठींहि उपयोग करतात. याचे पानासारख्या जोडदांड्यावरील कांटे काढून टाकून दुष्काळाच्या दिवसांत चाऱ्याप्रमाणें उपयोग करतात.या झाडाच्या फळांत कार्बोहैड्रेट्स,तंतु, आल्बुमिनॉइड्स्, चरबी, वगैरे रासायनिक द्रव्यें असतात. नागफणीचा उपयोग शेतांना व घरांना कुंपणें करण्याकडे होतो. फणींतून जे तंतू निघतात त्यांचा कागद करतां येतो.

**निवृत्तिनाथ**—हा आळंदी येथील विठ्ठलपंत नांवाच्या ब्राह्मणाचा पुत्र; आईचें नांव रखमाबाई. ह्याचा जन्म आपेगांव येथें झाला ( १२७३ ). विठ्ठलपंत संसार सोडून संन्यास घेऊन काशीस जाऊन राहिला. पुढें एका सत्पुरुषाच्या उपदेशानें पुन्हां घरीं येऊन संसार करूं लागल्यावर त्यास हा व ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई अशीं ४ मुलें झालीं. तेव्हां संन्याशाचीं हीं मुलें ग्रामवासी ब्राह्मण आपल्या जातींत घेईनात. मुलांच्या मुंजी न होतां ते तसेच वाढूं लागल्यामुळें रखमाबाईस दुःख होऊं लागलें ( ज्ञानेश्वर पहा ). इकडे विठ्ठलपंत मुलांची काळजी सोडून पुनरपि काशीस जाऊन राहिला. हीं मुलें अलौकिक, बुद्धिमान, सदाचरणी, व ईश्वरभक्तिपरायण होतीं. निवृत्तीनें पुढें गहिनीनाथाचा उपदेश घेऊन नाथपंथ स्वीकारला. निवृत्तीनेंच प्रथम आपल्या भावंडांस अध्यात्मविद्या शिकविली. ज्ञानदेव हा त्याचा शिष्य होय. निवृत्तिनाथानें निवृत्तिसार अथवा निवृत्तेश्वरी ग्रंथ व कांहीं काव्य केलें आहे. वृत्तिबोध म्हणूनहि याचा एक ग्रंथ आहे. त्याची समाधि त्र्यंबकेश्वरीं असून, तेथें पौष वद्य ११ स यात्रा भरत असते. त्यानें स.१२९९त समाधि घेतली.शिंद्यांच्या घराण्यांतील बायजाबाईनें निवृत्तिनाथाच्या समाधीचा जीर्णोद्धार केला [ कविचरित्र ].

**निश**—निश हें शहर या नांवाच्या सर्व्हियाच्या विभागाच्या राजधानीचें ठिकाण आहे.१९०० सालीं येथील लोकसंख्या २४४५१ होती. व्यापारांत आणि युद्धकलेंत सर्व सर्व्हियांतील शहरांत येथील लोक फार प्रसिद्ध आहेत. १९०१ सालच्या घटनेपूर्वी राष्ट्रियमंडळ येथें भरत असे. हें धर्माध्यक्षाचें, जिल्हा-प्रिफेक्टचें आणि राष्ट्रीय शिबंदीचें राहण्याचें ठिकाण आहे.

इ. स. २६९ त क्लॉडिअस बादशहानें गॉथ लोकांचा निआसस येथें पराभव केला. ५ व्या शतकांत ॲटिलाच्या कारकीर्दींत हूण लोकांनीं हें शहर जमीनदोस्त केलें. बलगेरियन लोकांनीं ९ व्या शतकापासून हें आपल्या ताब्यांत घेऊन ११ व्या शतकांत तें हंगेरियन लोकांना द्यावें लागलें. नंतर हें शहर बायझन्टाईन बादशहा पहिला मॅनुअल यानें स.११७३ त जिंकिलें. १२ व्या शतकाच्या शेवटीं हें सर्व्हियाच्या ताब्यांत होतें. १३७५ सालीं हें तुर्कांनीं काबीज केलें परंतु १४४३ सालीं पुन्हां हें सर्व्हिया आणि हंगेरीच्या ताब्यांत गेलें.पुन्हां १४५६ सालीं तुर्कांनीं घेतलें. १७ आणि १८ या शतकांत ऑस्ट्रिया व तुर्कस्तान यांमध्यें झालेल्या युद्धांत मिळविलेल्या विजयाप्रीत्यर्थ तुर्की लोकांनीं एक मनोरा बांधला. रशिया आणि तुर्कस्तानमध्यें झालेल्या युद्धांत हें शहर सर्व्हियाच्या ताब्यांत आलें.

**निशापुर**—इराणांतील निशापुर प्रांताच्या राजधानीचें शहर. हें मेशदच्या पश्चिमेस ४० मैलांवर आहे. दंतकथेवरून हें शहर शापूर अथवा सापोर यानें वसविलें असावें; कांहीं लोक म्हणतात कीं, हें शापूरनें वसविलें व इतर म्हणतात कीं, सापोरनें वसविलें. हें एकदां खोरासानमधील चार प्रमुख शहरांत गणलें जात असे, पण आतां अगदीं लहान म्हणजे १५००० लोकवस्तीचें गांव आहे. येथें लोंकर, कापूस व सुकीं फळें ( बदाम व पिस्ते ) यांचा चांगला व्यापार चालतो.सध्याच्या शहराचे पूर्वेस उमरखय्याम

नांवाचा ज्योतिषी व कवि यांचें थडगें एका इमामजाद्याच्या थडग्याच्या वर आहे. फरीद उद्दीन–अत्तर या प्रख्यात कवीचेंहि थडगें जवळच आहे. पांचव्या शतकांत निशापूर फार महत्त्वाचें ठिकाण होतें; येथें याझ्देगर्द दुसरा (४३८–४५७) रहात असे. ताहिरिद लोकांच्या कारकीर्दीत (८२०–८७२) हें भरभराटीचें शहर बनलें, व सामानिदांच्या वेळीं याला फारच महत्त्व आलें. सेल्जुक घराण्यांतील तोघ्रुल नांवाच्या पहिल्या राजानें हें स. १०३७ त आपलें राहण्याचें ठिकाण केलें. ११५३ मध्यें घुझ्झ तुर्कोमन लोकांनीं या देशावर स्वारी करून या शहराचा नाश केला. १२०८ व १२८० सालीं शहराच्या बहुतेक भागाचा भूकंपानें नाश झाला. मोंगलांनीं याचा दोनदां नाश केला; त्यानंतर याला ऊर्जितावस्था आली नाहीं.

**निशोत्तर**—निसोथ, तेवरी, तोहूरि, चितावंश, निसोत्तर, तिकुरि, धिवडे इत्यादि यांचीं नांवें आहेत. हें हिंदुस्थानांत सर्वत्र आढळतें. याच्या मुळ्यांनां त्रिवृत म्हणतात; आर्य वैद्यकांत जुलाब देण्यासाठीं त्यांचा उपयोग करतात. याचे श्वेत आणि कृष्ण असे दोन प्रकार आहेत, त्यांपैकीं श्वेत जास्त पसंत करतात, कारण कृष्ण फार कडक असतें.

**निषाद**—प्राचीन हिंदुस्थानच्या आग्नेय विभागांतील एक राष्ट्रजात. कर्न 'निषाद–राष्ट्राणि' चें भाषांतर 'मूळच्या रहिवाश्यांचें राज्य' व 'निषादसंघ', याचें 'रानटी लोकांच्या जाती' असें भाषांतर करतो (बृहत्संहिता १४. १०, ३. ). रुद्रदामनच्या जुनागड येथील शिलालेखांत निषाद लोक अथवा देश यांचा उल्लेख केलेला आहे. निषादांची उत्पत्ति वेन राजाच्या मांडीपासून झाल्याची कथा पुराणांतून आढळते. हे निषाद विंध्यपर्वतांत वस्ती करून आहेत. ब्राह्मण बाप व शूद्र आई यांच्या संततीला निषाद म्हणतात.

**निसर्गवाद**—"नेचर" यास मराठींत निसर्ग म्हणतात. यांत विषयी व विषय यांचा अंतर्भाव होत असल्यामुळें या वादांत अपौरुषेय व पौरुषेय–अकृत्रिम व कृत्रिम–याविषयीं विचार आले आहेत. या वादाच्या अकृत्रिम तत्त्वानेंच सोफिस्टांचा कर्माकर्म विचार, सिनिकाचा रूढीबद्दलचा तिरस्कार व स्टोईकांचा निसर्गानुसार वर्तननियम यांचा खुलासा होतो. निसर्गाच्या कल्पनेनें इंग्रजी तत्त्वज्ञानांत विशेष परिणाम घडवून आणला आहे. लॉकनें नैसर्गिक व कृत्रिम यांतील विरोध विशेष जोरानें व स्पष्टपणें पुढें आणला. "सिंपल आयडिया" संवेदनात्मक कल्पना–नैसर्गिक–अकृत्रिम म्हणून त्या सत्यप्रकृति द्रव्यापासून होतात. पण "संबंध" हे मानसिक–कृत्रिम–म्हणून असत्य आहेत. ह्यूमचा नैसर्गिक संबंध व तत्त्वज्ञानीय संबंध यांतील भेद याच विरोधांत आढळतो. याविषयीं निसर्गवादाचें संवेदनात्मक ज्ञानवादांत रूपांतर झालें. त्यासच साहचर्यवाद म्हणतात. येथून हें मत विषयनिसर्गवादाकडे झुकलें. बाह्य जगाचा प्रकृतिद्रव्य व गति यांनीं उलगडा करण्यांत आला. निसर्गाकडे परत जाण्याच्या प्रयत्नानें नीतिशास्त्रांत अधोगति झाली. कँब्रिज, प्लेटोमतवादी, क्लार्क वगैरेंनीं वर्तनांत बुद्धिप्रामाण्याचें महत्त्व फार वाढविलें. बुद्धिप्रमाणतत्त्वें गणिती सत्याप्रमाणें निश्चित समजण्यांत येऊं लागलीं. पण शाफ्टबरी, बेंथाम, मिल्ल, यांनीं नीतीचें केंद्र बुद्धींतून काढून अनुक्रमें "नैसर्गिक प्रेम," "सुखदुःख," व "सद्गुणाची आवड" यांत आणलें. बुद्धिप्रामाण्याचा या सर्वांत कोठेंहि पत्ता लागत नाहीं. याप्रमाणें निसर्गवाद बुद्धिप्रामाण्यापासून अबुद्धिप्रामाण्याकडे वळला. मानवी बुद्धीनेंच ईश्वरज्ञान होईल असें मत असणाऱ्यास बुद्धिप्रामाण्यवादी किंवा धार्मिक निसर्गवादी म्हणतात. ईश्वरप्रणीततत्त्वाची शक्यता नाकबुल करणाऱ्यांस तात्त्विक निसर्गवादी म्हणतात. ईश्वर व निसर्ग यांचें ऐक्य प्रतिपादन करण्यास निसर्गेश्वरवादी म्हणतात. त्यांस कधीं कधीं स्पिनोझिस्ट, निरीश्वरवादीहि म्हणतात. पण बुद्धि व निसर्ग यांचे अर्थ बरोबर ठरेपर्यंत निसर्गोच्च व निसर्ग यांचा वाद व्यर्थ होय. अर्वाचीन काळीं निसर्गवाद भौतिक व आत्मिक यांतील विरोधानें ठरला जातो. पण प्रचलित निसर्गवाद अद्वैक्यवादी नाहीं. हेगेल, युबरवेग व इतर इतिहासकार यांनीं त्याचा तसा अर्थ केला आहे. सर्व गोष्टींचा अंतर्भाव एका ईश्वरांत करणारा सर्वेश्वरवाद याहून भिन्न आहे. आपलें ज्ञान दृश्य चमत्कारांचें असतें. जडप्रकृतिगुणविहीन (निर्गुण) असतें व मन तिचें कार्य असणें शक्य नाहीं. पण मानसिक आचार व ज्ञानतंतूचे विकार ह्यांचें साहचर्य असतें. मानसशास्त्र जितकें अधिक साहचर्यवादी तितकें मन व जडप्रकृति एकाच तत्त्वाचीं रूपें आहेत असें अधिक स्पष्टतेनें म्हणतां येईल. या दोहोंत संयोजक अंतस्तत्त्व मानणें साहजिक आहे. आत्मवाद व जडवाद याहून भिन्न असा एक तत्त्ववाद या निसर्गवादानें पुढें आणला आहे. पण अनुभवाच्या सुव्यवस्थित घटनेच्या वेळीं भौतिक बाजूकडून प्रथम सुरवात करावी असें कित्येकांस वाटतें. जीव व मन हे दुय्यम आहेत; आत्मिक विशिष्ट प्रकारच्या भौतिक क्रियेंतून उत्पन्न होतें.

**निसिबस**—निसिबस हें उत्तर मेसापोटेमियांतील एक तटबंदीचें शहर. आधुनिक नेझिब अथवा नेसिबिसची लोकसंख्या ४००० आहे. यांत यहुदी लोकांचा विशेष भरणा असून तें शमार बेदुइन लोकांस करभार देतात. अरब ग्रंथकाराच्या आधारें असें दिसतें कीं, या शहराच्या आसमंतांत दाट झाडी होती. परंतु सध्यां ही जमीन दलदलीची व रोगट झाली आहे. येथें सध्या सेंटजेम्सचें चर्च व कांहीं खांब एवढेच याच्या प्राचीन वैभवाची साक्ष देतात.

निसिबस हें तैग्रीस व भूमध्यसमुद्र यांच्या दरम्यान चालणाऱ्या व्यापारी मार्गावर असल्यामुळें असीरियन व सेल्युसिद यांच्या काळांत फार महत्त्वाचें होतें. आर्मीनियाचे राजे हे इ. स. पूर्वी १४९ पासून इसवी सन १४ पर्यंत येथेंच रहात असत. सरहद्दीवरील तटबंदीचें ठिकाण म्हणून याचा उल्लेख

रोमन व पार्थियन युद्धांत केला आहे. हेड्रीयननें हें पार्थियनांस दिलें. दुसऱ्या शापूरनें याला तीन वेळां वेढा दिला तरी त्याच्या हातीं तें लागलें नाहीं. इ. स. ३६४ त हें इराणी लोकांच्या ताब्यांत आलें. मोसलच्या हमदानिद राजांनीं जबर कर बसविल्यामुळें येथील अरब रहिवाशी बायझन्टाइन प्रदेशांत गेले. हमदानिदांच्या वेळीं त्या शहराचा ऱ्हास झाला. १८३९ सालीं ईजिप्तच्या इब्राहिमपाशानें तुर्क सरदार हफी पाशा याचा येथें पराभव केला. यावेळीं फान मोल्टके हा हजर होता.

**निहाल**—वऱ्हाड-मध्यप्रांतांतील एक जात. हे रानटी लोक भिल्ल व कोरकू यांच्या मिश्रणानें झाले आहेत. यांची संख्या सुमारें १२ हजार आहे. त्यांपैकीं ४००० वऱ्हाडांत आहेत व ८००० हुशंगाबाद बैतूल, व नेमाड जिल्ह्यांत राहतात. हे कोरकू भाषा बोलतात. यांच्यात कोरकू व मराठी निहाल असे दोन वर्ग आहेत. मराठी निहाल अर्थातच जास्त वन्य स्थितींतून वर आलेले असून कोरकू लोकांचा संबंध ते कबूल देखील करीत नाहींत. यांच्यांत देवकांवरून वर्ग पडलेले आहेत. यांच्यांत लग्नें मोठेपणींच होतात. एकाच कुळांतले लोक परस्पर संबंध करीत नाहींत. पण यापलीकडे कांहींच निर्बंध नाहींत. विधवांचें लग्न 'बर्छीसे भोवर फिराना' या विधीनें होतें. एक बांबूची काठी भाला म्हणून रोंवतात व तिच्या भोंवतीं ५ प्रदक्षिणा घालून विधवाविवाह लावतात. चैत्रांत हे लोक झारखंडी नामक वनदेवाची पूजा करतात. सूर्य देवकाचे लोक खेरीज इतर लोक प्रेतें पुरतात. हे लोक गुरें चारणीचें, व कोणी गांवांतून जागल्याचें काम करतात. कांहीं लोक भिलावे तोडण्याचा धंदा करतात. [ रसेल व हिरालाल. ]

**निळारी**—मुंबई इलाख्यांतील एक जात. यांची लोकसंख्या १९११ सालीं ६५८४ होती. पण १९११ सालीं ती १६१५१ भरली. सध्यां बरेचसे निळारी लिंगाइतांत मिसळतात, कोणी रंगारी किंवा शिंपी म्हणून म्हणवितात. तेव्हां यांची लोकसंख्या नेहमीं कमी जास्त प्रमाणानें बदलत जाणार हें उघड आहे. यांनां निराळी असेंहि म्हणतात. रंगारी व निळगर अशींहि यांचीं नांवें असून खानदेश व दक्षिण महाराष्ट्र या प्रदेशांत ही जात सर्वत्र पसरलेली आहे. मूळचा 'निळारी' शब्दाचा अर्थ निळीचा रंग देणारा हा होय. उत्तर हिंदुस्थानांत क्षत्रिय रंगाऱ्यांची एक जात आहे, त्यापैकीं आम्ही आहों असें यांचें म्हणणें आहे. यांच्यांत हिंदु व लिंगाइत असे दोन मुख्य वर्ग आहेत. त्यांच्यांत रोटीबेटीव्यवहार नाहींत. निळारी व शिंपी या दोन जातींत फार निकट संबंध आहे हें कोल्हापूर येथील निळारी व शिंपी जातीच्या सामाजिक धार्मिक व रुढीवरून सिद्ध होत आहे. कारण कोल्हापूरचे शिंपी व हे शिंपी आचारानें भिन्न नाहींत. त्यांचा पिढीजाद धंदा रंगाऱ्याचा व सूत कातण्याचा असतो. यांपैकीं कांहीं फडक्या व झगे विणतात. धर्म व आचारांत बहुतकरून हे मराठे कुणब्यांचें अनुकरण करतात. यांच्यांत लोखंडे, पतंगे, फुटाणे, भुमकर, पाटसकर, बागडे, वगैरे आडनांवें असून कांहीं लोक गोत्रेंहि लावितात. प्रत्येकाचें वेगळें देवक असतें, व नो त्या देवकाच्या माणसाशीं शरीरसंबंध करीत नाहीं. निळारी हे स्मार्त आहेत. कांहीं वारकरी पंथाचेहि आहेत. भैरोबा, भवानी, कालकादेवी, खंडोबा या यांच्या कुलदेवता आहेत. लिंगायत निळारी दक्षिण महाराष्ट्रांतील जिल्ह्यांतून आहेत. विजापूर व इंदी हीं त्यांचीं मुख्य ठिकाणें होत. ते पंचमसाली लिंगायत नाहींत तरी त्यांचे आचार व संस्कार पंचमसाळ्यांप्रमाणें आहेत. हे प्रथम मराठे निळारी असून दक्षिणेकडे गेल्यावर लिंगायत बनले असें दिसतें. [ एन्थोवेन; से. रि. ( १९११ ) पु. ७. ]

**निळो मोरेश्वर**—हा मोरोपंत पिंगळे पेशवे याचा पुत्र. शिवाजीच्या पश्चात राजारामास गादीवर बसविण्याच्या कटांत हा सामील असावा अशा समजुतीनें संभाजीनें यास कैदेंत ठेविलें होतें. पुढें मोरोपंत वारल्यावर याला कैदेंतून काढून संभाजीनें पेशवेपद दिलें (१६८०). नंतर कर्नाटकांतील प्रदेश संभाळण्याच्या कामीं हरजी राजे महाडीक यांच्या मदतीस यास पाठविण्यांत आलें (१६८१). त्या दोघांनीं तिकडे औरंगझेबाच्या हातून आपला गेलेला प्रांत अनेक संकटें सोसून परत मिळविला. मध्यंतरीं याचा चुलता केसोपंत यानें याच्याविरुद्ध संभाजीचे कान फुंकले; त्यामुळें संभाजीची याच्यावर गैरमर्जी झाली होती; परंतु ती पुढें नाहींशी झाली. संभाजीच्या पश्चात राजारामास जिंजी येथें जे योग्याशा विश्रांतीनें दिवस काढतां आले, त्यास कारण हरजी व निळोपंत यांचीच तिकडील कामगिरी होय. त्यामुळें राजारामानेंहि त्याच्याचकडे पेशवेपद कायम केलें (१६९०). जिंजीस असतांना मोंगलांचा प्रसिद्ध सरदार इस्माईलखान मका हा आपल्या पथकासह याच्यातर्फे राजारामाच्या पदरीं होता. शाहूनें सातारा घेतला तरी हा त्याला न मिळतां ताराबाईकडेच राहिला, त्यामुळें शाहूनें त्याच्या भैरव नांवांच्या धाकट्या भावास पेशवेपद दिलें. थोड्याच दिवसांत निळोपंत हा रांगण्यास मरण पावला ( १७०८ ). [ राजाराम व संभाजी यांच्या बखरी; जेधे शकावली. ]

**निळो सोनदेव**—हा हल्लींच्या बावडेकर अमात्य घराण्याचा मूळ पुरुष. याचें मूळ गांव ठाणें जिल्ह्यांत कल्याणजवळ होतें. याचा आजा नारोपंत हा मावळांत खेडेबारें येथें ठकारांच्या घरीं लहानाचा मोठा झाला. त्यानें मालोजीच्या पदरीं नोकरी करून लौकिक संपादिला. त्याचा पुत्र सोनोपंत, हा शहाजीच्या पदरीं असून कर्नाटकांत राज्यव्यवस्थेच्या कामीं त्याला उपयोगी पडला. त्याच्याकडे डबिरीचें काम असे. शिवाजीला पुण्याची जहागीर स्वतंत्रपणें पाहावयास लावण्याच्या वेळीं शहाजीनें त्याच्याबरोवर जी विश्वासाची मंडळी दिली तींत हा होता. शिवाजीनें सोनोपंतास तेंच काम सांगितलें होतें. औरंगझेब दक्षिणचा सुभेदार असतां

शिवाजीनें मोंगलांच्या ज्या आगळिकी केल्या होत्या त्याच्या परिमार्जनासाठीं त्यानें सोनोपंतास औरंगझेबाच्या दरबारीं अनेकदां पाठविलें होतें व कांहीं दिवस त्याला वकील म्हणूनहि नेमिलें होतें. शिवाजीच्या पहिल्या मसलतींत व कार्यांत याचा त्याला पुष्कळ उपयोग झाला. हा स. १६४५त मेल्यावर त्याच्या निळोपंत या वडील मुलास शिवाजीनें सचीवगिरी दिली. निळोपंत व त्याचा धाकटा भाऊ आबाजी हे दोघेहि बापाच्या हाताखालीं व शिवाजीच्या देखरेखीखालीं तयार झाले होते. कोंकण वगैरे प्रांताची व्यवस्था यानें चांगली लाविल्यामुळें याला मुजुमदारी मिळाली (१६४७). त्याचा भाऊ आबाजी (पहा) पराक्रमी होता; त्यानें कल्याण सुभा घेतला होता (१६४८) व पुढें तर कल्याणपासून थेट गोव्यापर्यंतचा मुलूख हस्तगत केला; तेव्हां त्याला या प्रांताचा सुभेदार नेमण्यांत आलें. पुढें (१६६१) शिवाजीनें स्वराज्याची जी नवीन व्यवस्था ठरविली, तींत निळोपंतानें लढाईवर न जातां मुलकी कारभार पहावा असें ठरविलें; तत्पूर्वी यालाहि पेशव्यांप्रमाणें लढायांवर जावें लागत असे. शिद्दीवरील लढायांत यानें प्रमुख भाग घेतला होता. त्यावेळची राज्याची हिशेबी पद्धत याच्याच हातची आहे. शहाजी मेल्यावर जिजाबाई सती जात असतां यानेंच तिची समजूत घालून तिला थांबविलें. शिवाजी आग्र्यास गेला असतां त्यानें मागें जें राज्य चालविण्यास कारभारी मंडळ नेमिलें त्यांत निळोपंत होता. याप्रमाणें त्यानें मराठी राज्याची अखेरपर्यंत चांगली सेवा केली व शेवटीं स.१६७२त हा मरण पावला. त्याच्या मागून त्याचा वडील मुलगा नारोपंत हा अमात्याचें काम पाहूं लागला; परंतु तो साधुवृत्तीचा असल्यानें त्याचा धाकटा भाऊ रामचंद्रपंत हाच काम करी. [ सभासद; शिवदिग्विजय; चावडेकरांचा इतिहास ].

**नीग्रो (पश्चिम आफ्रिकेंतील)**—यांची वस्ती आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर केप व्हर्डेपासून कालाबारपर्यंत पसरलेली असून अन्तर्भागांत साहारा वाळवंटापर्यंत गेलेली आहे. या नीग्रो लोकांच्या अवाढव्य प्रदेशाचें संशोधन होऊन पूर्ण माहिती अद्याप मिळालेली नाहीं. तथापि जें संशोधन झालें आहे त्यावरून असें दिसतें कीं, नीग्रो लोकांच्या अनेक जाती व उपजाती आहेत. नीग्रो लोकांच्या प्रदेशाच्या सरहद्दीवर बऱ्याच भागांत मुसुलमानी धर्माचा प्रसार झाला असून त्यामुळें नीग्रो लोकांच्या मूळ धर्मकल्पना व चालीरीती बदलल्या आहेत. नीग्रो लोकांच्या भाषेला अद्याप लेखनपद्धति माहीत नसल्यामुळें त्या भाषेंत लेख किंवा ग्रंथ मुळींच नाहींत, त्यामुळें पूर्वींची माहिती मिळण्यास दंतकथांशिवाय दुसरें साधन नाहीं. नीग्रो लोकांसंबंधीं सर्व माहिती गेल्या दोन शतकांत उपलब्ध झालेली आहे. त्यापूर्वींची, किनाऱ्यालगतच्या नीग्रो लोकांखेरीज अन्तर्भागांतील नीग्रो लोकांसंबंधीं बिलकूल माहिती नाहीं. वेस्ट इंडीज बेटांत व अमेरिकेंत नेलेले नीग्रो गुलाम अन्तर्भागांत पकडलेले असत, पण अनेक ठिकाणचे नीग्रो एकत्र झाल्यामुळें त्या सर्वांच्या धर्मसमजुती एकाच प्रकारच्या बनल्या गेल्या व त्यामुळें निरनिराळ्या प्रदेशांतील निरनिराळ्या नीग्रो टोळ्यांच्या धर्मसमजुती समजण्यास खात्रीचा मार्ग नाहीं.

मानववंशशास्त्रानें अखिल मानवजातीचे गौर, ताम्र, पीत व कृष्ण असे चार वर्णांचे चार लोकविभाग पाडले असून काळ्या मानववंशामध्यें पूर्व गोलार्धांतील उष्ण कटिबंधांतल्या पश्चिम आफ्रिकेच्या सेनिगांबिया देशापासून फिजी बेटापर्यंतच्या मुलुखांत असलेल्या काळ्या कातडीच्या सर्व लोकांचा समावेश होतो. या सर्वांचा ' नीग्रॉइड ' या नांवाखालीं अंतर्भाव करून या मानववंशांतील लोकांचे विशिष्ट गुणधर्म सर्वांत अधिक ज्या आफ्रिकेंतील लोकांत आढळतात त्यांनांच फक्त नीग्रो हें नांव देण्यांत येतें. नीग्रो व तत्सदृश इतर लोकांची मानववंशशास्त्रीय माहिती तिसऱ्या विभागांत (बुद्धपूर्व जग पृ. २०) दिली आहे. नीग्रो लोकांच्या कित्येक शारीरिक विशेषांवरून पाहतां हे लोक जीवजातींच्या विकाससोपानावर इतर मानवजातींच्या मानानें खालच्या पायरीवर आहेत असें म्हणावें लागतें; कारण लांब हात, चपटें व रुंद बसलेलें नाक, कपाळाच्या पुढें आलेली हनवटी, मोठी व जड कवची आणि कमानदार कपाळ हीं यांचीं वैशिष्ट्यें होत.

या लोकांचें मनुष्यसदृश असलेल्या उच्च वर्गांतील मर्कटजातींशीं अधिक साम्य आहे. पण फक्त एका म्हणजे केसांच्या बाबतींत गोऱ्या लोकांचें माकडांशीं जितकें साम्य आहे तितकें नीग्रोंचें नाहीं. मानसिकदृष्ट्या नीग्रो हे गौरवर्णीयांपेक्षां हलक्या दर्जाचे आहेत. त्यासंबंधीं एफ्. मॅनेट्टा म्हणतो, "नीग्रोंचीं मुलें चलाख, हुषार व तडफदार दिसतात पण वयांत येऊं लागण्याच्या सुमारास त्यांच्यांत हळूहळू फरक होत जातो. त्यांची बुद्धि मंद होते, शरीरांत जडपणा येऊन चपळाईच्या ऐवजीं आळस वाढतो. यावरून नीग्रो व गोरा इसम यांची वाढ निरनिराळ्या प्रकारें होते असें मानलें गेलें आहे. गौरवर्णी लोकांत मस्तकाच्या बाह्य कवचीच्या वाढीबरोबरच आंतील मेंदूचा आकारहि वाढत असतो; उलटपक्षीं नीग्रोच्या मेंदूवरील कवटीचा सांधा अकालीं जोडला जाऊन पुढील हाडाचा दाब मेंदूच्या मागील भागावर पडून त्याची वाढ बंद होते." ही कारणमीमांसा कितपत ग्राह्य आहे ? नीग्रोची बौद्धिक वाढ खुंटण्याचें किंवा अधोगति होण्याचें आणखी कारण असें सांगतात कीं, वयांत आल्यापासून नीग्रोंच्या आचारविचारांनां स्त्रीपुरुषसंबंध हाच मुख्य विषय असतो. नीग्रोंच्या भोंवतालची परिस्थिति त्यांच्या कार्यकर्तृत्वाला उत्तेजक अशी मुळींच नसते. गोऱ्या लोकांनां ती तशी असते. नीग्रो लोकांचा प्रदेश इतका सुपीक आहे कीं अगदीं थोडक्या श्रमांत त्यांनां उदरनिर्वाह करतां येतो. तथापि नीग्रोंची बुद्धि गोऱ्या लोकांनीं अतिशयोक्ति करून लिहिलें आहे तितकी हीन प्रतीची नाहीं. त्यांनां बेरीज-वजाबाकी सुद्धां येत नाहीं येवढ्यावरूनच नीग्रोंनां पूर्ण बुद्धिहीन ठरविणें

योग्य नाहीं, कारण अंकगणितांत प्रगति करण्यास अनुकूल परिस्थिति नीग्रोसमाजांत नव्हती. उलटपक्षीं दृष्टि, कर्णेंद्रियशक्ति, स्थलवर्णनविद्या ( टोपोग्राफी ), दिशानिर्णय, वगैरे बाबतींत नीग्रो लोक गोऱ्या लोकांहून फार अधिक कुशल असतात. सर्व साधारणपणें नीग्रो लोकांची मनोरचना सुस्वभावी व आनंदी मुलासारखी असते म्हणजे अनुभवानें, सुसंस्कारांनीं व विशेषतः शिक्षणानें प्राप्त होणारा प्रगल्भपणा त्यांच्यामध्यें नसतो. त्यामुळें मुलें रागावतात, चिडतात व क्रूरपणाचीं कृत्यें सहजगत्या करतात, तसा प्रकार नीग्रो लोकांत आढळतो. इमानी कुत्र्यासारखा नीग्रो नोकरांत आणीबाणीच्या प्रसंगीं विश्वासूपणाहि असतो. योग्यप्रकारें शिक्षण दिल्यास सुतारकी, लोहारकी, कांतकाम, कलाकौशल्याचीं कामेंहि ते करूं शकतात. तात्पर्य, नीग्रो लोकांत बुद्धिमत्ता नाहीं असें नाहीं; तर आफ्रिकेच्या अन्तर्भागांत इतर प्रगत समाजांशीं दळणवळण नाहीं अशा स्थितींत राहिल्यामुळें त्या समाजाची बौद्धिक प्रगति झाली नाहीं. शेतकी, शिकार, मच्छमारी, गोपालन या व्यवसायांपलीकडे त्यांची मजल गेली नाहीं. राजकीयदृष्ट्या प्रत्येक जण स्वायत्त असून त्यांवर एक मुख्य इसम पुढारी असतो. अनेक गांवांत दळणवळणाची नीट सोय असल्यास एखाद्या गांवाचा पुढारी शेजारच्या अनेक गांवांवर सत्ता प्रस्थापित करतो. नीग्रो लोक शेतकीप्रधान असल्यामुळें स्वाभाविकच शाकाहारी आहेत. तथापि ते मांसाहार मिळेल तेव्हां करतात. मासे हें नाईल व कांगो नदीकांठीं राहणाऱ्या लोकांचें प्रमुख खाद्य आहे. हे लोक नरभक्षकहि आहेत. मनुष्याचें मांस इतर अन्नाच्या अभावमुळें किंवा कांहीं मांत्रिक ( मॅजिकल ) हेतूनें खातात असें नाहीं तर तें आवडतें म्हणून खातात. सर्व नीग्रो टोळ्यांची प्रगति पाषाणयुगाच्या पुढें गेलेली असून लोखंड या धातूचे जिन्नस तयार करण्याची कला सर्वांनां अवगत आहे. मध्यआफ्रिकेंत लोखंडाच्या खाणीहि पुष्कळ आहेत. पश्चिम भागांतील लोक विणकला व लांकडावरील खोदकाम करतात. मातीचीं भांडीं करण्याचें कसब सर्व ठिकाणच्या नीग्रो लोकांत आहे. व्यापारी देवघेव ऐनजिनसीपद्धतीनें ( बार्टर ) चालते. तथापि, कांहीं कवड्या, पितळेचे तुकडे, नाण्याप्रमाणें वापरतात. नीग्रो लोकांत धर्मकल्पना व अतींद्रिय दैवतांवर विश्वास आहे. तथापि, लोकपीडक देवतांचे ते उपासक असून धार्मिक कृत्यें पीडा न व्हावी या हेतूनें ते करतात. जादूटोण्यावर त्यांचा विश्वास असून अशा गोष्टी करणारे लोक पुष्कळ असतात. जादूमंत्रानें पाऊस पाडतां येतो अशीहि त्यांची समजूत असते व त्याप्रमाणें उपाय करणारे लोक असतात. सहारा वाळवंट व पूर्व आफ्रिकेंतील बरेच नीग्रो लोक मुसुलमानी धर्माचे बनले आहेत. ख्रिस्ती धर्माचा प्रसार फारसा नाहीं. कारण इस्लामी धर्म नीग्रो लोकांच्या मूळच्या चालीरीतींत फारसा फरक करीत नाहीं. अनेकपत्नीपद्धति, मद्यपानबंदी या गोष्टी मुसुलमानी धर्मांत आहेत. उलट ख्रिस्ती धर्म एकपत्नीव्रताचा पुरस्कर्ता आहे, व त्यांत उपपंथ फार आहेत. यामुळें ख्रिस्ती मिशनऱ्यांपेक्षां मुसुलमानी धर्मप्रसारकांनां चीनप्रमाणेंच आफ्रिकेंतहि यश अधिक येत आहे. नीग्रो लोकांत प्रत्येक पांचसहा गांवांची निरनिराळी भाषा याप्रमाणें अनेक भाषा असून सर्व घोंटाळा आहे. त्या सर्व चिकटी भाषेच्या स्थितींत आहेत आणि लिहिण्याची लिपि कोठेंहि नाहीं.

नी ग्रो ( युनायटेड स्टेट्समधील ).—अमेरिकेंतील नीग्रो गुलामासंबंधींची माहिती देणारे जुने लेख फ्लॉरिडा व दक्षिण भागांतल्या स्पॅनिश वसाहतवाल्यांजवळ सांपडतात. स्पॅनिश सरकारनें स्पॅनिश वसाहतवाल्यांनां स्वतःच्या मालकीचे नीग्रो गुलाम अमेरिकेंत नेण्यास उघड परवानगी दिली होती आणि फ्लॉरिडा व न्यूमेक्सिकोमध्यें अगदीं प्रथम वसाहत करणारांपाशीं नीग्रो गुलाम होते. नीग्रो लोकांत प्रवासाचें धाडस असतें ही गोष्ट पेरीबरोबर उत्तरध्रुवप्रदेशाच्या सफरींत गेलेल्या मॅथ्यू ए. हेनसन याच्या उदाहरणावरून सिद्ध होते. हेनसन हा नीग्रो लोकांमध्यें शूर व धाडसी पुरुष म्हणून मोठा लोकप्रिय झालेला आहे. त्यानें आपल्या सफरीसंबंधीं व्याख्यानांचा दौरा काढला व आत्मचरित्रहि लिहिलें. १९१४-१५ सालच्या नीग्रो इयर बुकांत हेनसनच्या चरित्राला अर्धें पान दिलें आहे. अमेरिकेंतील आफ्रिकन नीग्रो लोकांच्या इतिहासाला आरंभ इंग्रज वसाहतवाल्यांनीं स. १६१९ मध्यें नीग्रो गुलाम विकत घेतले तेव्हांपासून होतो. त्या सालचा मास्टर जॉन रोल्फ याचा एक जुना लेख सांपडला आहे. त्यांत तो म्हणतो, 'आगस्ट महिन्याच्या अखेरीच्या सुमारास एक डच लढाऊ जहाज इकडे येऊन त्यानें आम्हाला वीस नीगर विकत दिले.' तेव्हांपासून पुढें १५० वर्षांहून अधिक काल आफ्रिकेंतून नीग्रो लोक अमेरिकेंत नेले गेले व त्या व्यापाराचा खास परवाना इंग्रज व्यापाऱ्यांनीं मिळविला होता. खुद्द युनायटेड स्टेट्समध्यें निदान २० लक्ष गुलाम नेले गेले आहेत. त्यांनां धरून नेण्याच्या पद्धतीची माहिती 'गुलामगिरी' (ज्ञानकोश विभाग१२, पृ. १७९) या लेखामध्यें पहा.

१५ व्या शतकांत नव्या जगाचा शोध लागून यूरोपीय लोक तिकडे वसाहती करूं लागल्यापासून गोऱ्या व काळ्या मानवजातींमधील स्पर्धेचे अनेक प्रश्न उद्भवले आहेत. कातडीचा रंग जेथें जितका अधिक काळा तेथें तितकें या स्पर्धेला अधिक हिडिस स्वरूप आलें. अमेरिकेंत 'सिव्हिल वार' ( आपसांतील युद्ध ) होऊन नीग्रोंनां गुलामगिरींतून मुक्त करून राजकीय व सामाजिक हक्क गोऱ्या लोकांच्या बरोबरीनें देण्यांत आले. तथापि गोऱ्या–काळ्यामधील हा प्रश्न तेथेंहि अद्याप सुटला नाहीं. "ज्याच्यामध्यें ⅛ किंवा अधिक आफ्रिकन रक्त आहे तो नीग्रो" अशी एक सरकारी कायद्यानें नीग्रोची व्याख्या केली आहे. एकंदर नीग्रोंपैकीं सुमारें ⅕ लोक मिश्ररक्ताचे आहेत. नीग्रो समाजांतील पुढारी सर्व मिश्ररक्ताचे असतात. शुद्ध रक्ताच्या नीग्रोंत पुढारीपणाचे गुण

नाहींत. इतकेंच नव्हे तर नीग्रो समाजांत शुद्ध रक्ताचे नीग्रो व मिश्ररक्ताचे नीग्रो असे दोन पृथक् वर्ग पडलेले आढळतात. प्रथमपासूनच कापूस व तंबाखू यांची लागवड फार असणाऱ्या दक्षिणेकडील संस्थानांत गुलाम बाळगणारे लोक अधिक होते.

सामाजिक स्थितिः—स.१६६१ पूर्वीपासून कित्येक अमेरिकन संस्थानांत गुलामगिरी रूढ होती. बऱ्याच संस्थानांत त्यांनां जमीन किंवा पैसा-अडका यावर मालकी हक्क नसे. साधारणतः गुलाम टम्हला म्हणजे त्याला घरांतील गुरेंढोरें व इतर निर्जीव मालमत्तेप्रमाणें मानीत असत. मोठमोठ्या शेतजमिनीवर ओव्हरसीयरांच्या ताब्यांत गुलामांनां गुरांप्रमाणें कळप करून ठेवीत असत, व जिवंत राहून काम करण्यास लायक ठेवण्यापुरेशी त्यांची खाण्यापिण्याची काळजी घेत असत; पण काम करून घेतांना निर्दयपणें पशूप्रमाणें त्यांनां चाबकांनीं मारहाण करीत असत. याप्रमाणें दोन शतकें स्थिति चालल्यावर गुलामगिरीविरुद्ध लोकमत उत्तरेकडील संस्थानांत बरेंच जागृत होऊन आपसांत युद्ध झालें व त्यांत यशस्वी झाल्यावर प्रे. लिंकननें स. १८६५ मध्यें गुलामपद्धति बंद झाल्याचा कायदा केला व तदनुसार नीग्रो लोकांनां राजकीय व नागरिकत्वाचे हक्क देण्यासंबंधीं जरूर त्या सुधारणा युनाय. स्टे. च्या राज्यघटनेच्या कायद्यांत केल्या.तथापि भूतदयादि उच्च नैतिक तत्त्वांनीं प्रेरित होऊन केलेल्या या गोष्टी निर्दोष, मुत्सद्दिगिरी व व्यावहारिक शक्याशक्यता या दृष्टींनीं फाजील उतावीळपणाच्या ठरल्या. नुकत्याच गुलामगिरींतून मुक्त झालेल्या १० लक्ष लोकांनां एकदम मतदारीला व अधिकाराच्या जागांनां एकदम लायक ठरविणें ही राजकीय व सामाजिक घोडचूक झाली, कारण हे अधिकार व हक्क योग्यप्रकारें बजावण्यास अवश्य लागणारें शिक्षण देणाऱ्या संस्था अमेरिकन सरकारजवळ तयार नव्हत्या; यामुळें अपात्र लोकांच्या हातीं सत्ता दिल्यामुळें उद्भवलेली अनवस्था पुढील दहा-वीस वर्षांत चांगली प्रत्ययास येऊन नीग्रो लोकांचे अधिकार कमी करण्याच्या अनेक युक्त्या,कायद्यांत फेरफार दक्षिण संस्थानांनीं केले. शिक्षणविषयक लायकीच्या अटी जागोजाग ठेवण्यांत आल्या. परंतु त्याच्या बरोबरच शिक्षणप्रसारार्थहि योजना सुरू झाल्या. त्यामुळें हळूहळू योग्य प्रकारें नीग्रोंचें प्रमाण सरकारी नोकऱ्यांत वाढत जाऊन स. १९१४ मध्यें एकंदर २२,४४० नीग्रो सरकारी नोकरींत होते; व त्यांपैकीं सैन्य व आरमारांत मिळून ६५०० होते. सरकारी कामांतल्यापेक्षांहि समाजांत गोऱ्या लोकांच्या बरोबरीनें दर्जा नीग्रोंनां प्राप्त होणें फार बिकट होतें.स. १८८० च्या सुमारास रेल्वे, हॉटेलें, नाटकगृहें, शिक्षणसंस्था यांमध्यें नीग्रो व गोरे यांच्याकरितां पृथक् पृथक् बसण्याची व्यवस्था असावी असा पास झालेल्या कायद्याबद्दल बरीच खळबळ उडाली होती. फ्लॉरिडामध्यें गोऱ्यानें नीग्रोच्या शाळेंत किंवा नीग्रोनें गोऱ्या मुलांच्या शाळेंत शिक्षक होणें हाहि गुन्हा आहे असा कायदा आहे. गोऱ्यांच्या वस्तींत नीग्रोनें राहूं नये किंवा नीग्रोंच्या वस्तींत गोऱ्यानें घर करूं नये, तसेंच गोऱ्यांच्या शेतजमिनीजवळ नीग्रोनें जमीन खरेदी करूं नये वगैरे गोष्टी उभय समाजांनां अधिक सोयीच्या असल्यानें दोघांचेंहि सर्वत्र हळूहळू पटूं लागलें असून अशा विभक्तपणाबद्दल तक्रारी कमी कमी होऊं लागल्या आहेत. मिश्रविवाहास बहुतेक ठिकाणीं कायद्यानें बंदी आहे. पण जेथें नाहीं, तेथें मिश्रविवाह क्वचितच होतात. तथापि या दोन जातींत परस्पर बेकायदा-व्यवहार चोरटेपणानें बरेच होतात, याचें एक कारण 'नीग्रो' याची सर्वमान्य राष्ट्रीय व्याख्या ठरलेली नाहीं; आणि दुसरें मिश्ररक्ताचा समाज बराच मोठा आहे. चोरटे व्यवहार होतात ते गोरे पुरुष व नीग्रो बायका असेच फार होतात, व नीग्रो पुरुष गोऱ्या बायकांवर बळजबरीचे प्रयत्न करतात, ह्याचें तें एक कारण असावें. तथापि अलीकडे दोघांमध्यें आपापल्या जातीचा अभिमान वाढत असून मिश्रजात उत्पन्न करण्याचें ध्येय नीग्रो लोकांतहि कमी होत आहे, इतकेंच नव्हे तर अमेरिका सोडून आफ्रिकेंतील आपल्या मूळ देशांत परत जाण्याचा प्रश्न कांहीं वर्षांपूर्वी नीग्रो समाजांत बराच महत्त्व पावला होता. पण आतां तो नाद सोडून देऊन अमेरिकेंतच आपला भविष्यकाळ अधिक उज्वल करण्याचाच नीग्रो लोकांचा निश्चय कायम झाला आहे.

शिक्षण व संस्कृति.—गुलामपद्धति बंद करण्यापूर्वी नीग्रोंच्या शिक्षणाकरितां व्यवस्थित सोयी कांहींच नव्हत्या. मिशनरी व इतर उदारवृत्ती-संस्थांनीं शिक्षणप्रसाराचें कांहीं कार्य केलें, व उत्तरेकडील संस्थानांतलि सार्वजनिक शाळांत कांहीं नीग्रोंनां घेत असत. पण विशेष कार्य खाजगी गोऱ्या मालकांकडूनच झालें, कारण स्वतःच्या गुलाम नोकरांनां घरकामें अधिक चांगल्या रीतीनें करतां यावीं म्हणून गोरे लोक नीग्रो गुलामांनां शिक्षण देत असत व अशा रीतीनें शिकलेले नीग्रो स्वजातींत शिक्षणाचा अधिकाधिक प्रसार करीत. अशा रीतीनें गुलामपद्धति बंद झाली,त्याच वेळीं नीग्रो लोकांत साक्षरतेचें प्रमाण शें. ५ होतें व सार्वजनिक शाळांत १०००० नीग्रो विद्यार्थी होते. उच्च शिक्षणाच्या चार शाळा असून त्यांत १५० नीग्रो शिक्षक होते.स.१८६३ मध्यें गुलामपद्धति बंद करण्याचा कायदा झाल्यापासून शिक्षणाचा प्रसार झपाट्यानें सुरू झाला. मिशनरी व इतर पीबॉडीफंड, स्लेटरफंड, जेनेसफंड, रॉकफेलरफंडाचा कांहीं भाग वगैरे फंड शिक्षणकार्यास मिळाले असून खुद्द नीग्रो लोकांतील धनिकांनीं या कार्याकरितां जें द्रव्यसाहाय्य केलें आहे त्यावरून त्यांची दूरदृष्टि व औदार्य चांगलें व्यक्त होतें. सरकारनें नीग्रोंच्या शिक्षणाच्या सोयी वाढविल्या, तथापि गोऱ्यांप्रमाणें निग्रोंच्या शिक्षणसंस्था भरपूर व उत्तम नाहींत, कारण शिक्षणाकडे लावावयाचा पैसा सरकारला नीग्रोंच्या मानानें गोऱ्यांकडूनच फार अधिक मिळत असल्यामुळें गोऱ्या लोकांच्या शिक्षणसंस्थांवरच तो अधिक खर्च होतो. तथापि गुलामपद्धति बंद झाल्यापासून पुढील

पन्नास वर्षांत नीग्रोंचें साक्षरतेचें प्रमाण शें. ७० पर्यंत वाढलें असून १९१३ सालीं १८,००,००० विद्यार्थी मोफत शाळांत शिकत होते. ३५०० नीग्रो शिक्षकाच्या धंद्यांत होते, आणि नार्मल ट्रेनिंगकरितां शाळा व कॉलेजें ५०० होतीं. नीग्रो ग्रॅज्युएट ३८५६ होते निग्रोंच्या शिक्षणाकडे १,३५,००००० डॉलर्स वार्षिक खर्च झाला त्यापैकीं १५,००,०००डॉलर्स निग्रो लोकांकडून मिळालेले होते ( निग्रो इयर बुक, पान ४ ). शिवाय निग्रो विद्यार्थ्यांनां कोणत्या प्रकारचें शिक्षण द्यावें याबद्दल बरीच वर्षे चर्चा व प्रयोग चालू होते. त्यांचा निष्कर्ष असा निघाला आहे कीं, उच्च बौद्धिक शिक्षण त्यांनां झेपण्यासारखें नसल्यामुळें औद्योगिक व घरगुती शिक्षण नीग्रो लोकांनां दिलें पाहिजे, असें डब्यू. ओ. कार्व्हर म्हणतो. याचा प्रत्यय हॅम्प्टन इन्स्टिटयूट, टस्केजी नार्मल अँड इंडस्ट्रियल इन्स्टिटयूट या संस्थांतील शिक्षणप्रकारावरून येतो. उच्च धंदेशिक्षणाकरितां हल्लीं सुमारें कायद्याच्या तीन,वैद्यकाच्या चार,शेतकी व यांत्रिक शिक्षणाकरितां १७ व औषधिविज्ञानाच्या ( फार्मसी ) ५ या सरकारी नियंत्रणाखालच्या शिक्षणसंस्था व अशाच प्रकारच्या खाजगी ३५०शिक्षणसंस्था आहेत. नीग्रो शाळांचीं नांवें मोठमोठीं भपकेदार आहेत पण सांपत्तिक स्थिति गरीबीची आणि प्रत्यक्ष शिक्षण कमी प्रतीचें असतें. उदा० त्यांची 'युनिव्हर्सिटी', हायस्कूलच्या योग्यतेची आणि कॉलेज प्राथमिक शिक्षणापासून आरंभ करून मिडलस्कूलपर्यंत शिक्षण देणारी असते. ललितकलांमध्यें नीग्रोंची अद्याप फारशी प्रगति झाली नाहीं आणि त्यांमध्यें विशेष चमकण्यासारखी लायकी कोणीहि नीग्रो इसमानें दाखविली नाहीं. निग्रो जातीला गाण्याचा आणि तंतुवाद्यें,वायुवाद्यें वाजविण्याचा मोठा नाद आहे. शिल्पकलेंत त्यांनीं थोडेंफार नांव मिळविलें आहे. ग्रंथ लिहिणें, वर्तमानपत्रें चालविणें हीं कामें ते करतात पण तीं उच्च दर्जाचीं नाहींत. अशी वस्तुस्थिति एका दशकापूर्वी होती.

सांपत्तिक स्थिति.—दहा वर्षांवरील निग्रो स्त्रीपुरुषांपैकीं शें.७१ लोक उद्योगधंदा करणारे असून शेतकी,कारखाने, व्यापार, स्वतंत्र धंदे व घरगुती नोकरी वगैरे कामें ते करतात असें स.१९१०च्या खानेसुमारीच्या रिपोर्टावरून दिसतें. कुंभारकाम, सुतारकाम हे धंदे बहुतेक सर्वस्वी त्यांच्या हातीं आहेत. अमेरिकेंत मजूरसंघ पुष्कळ आहेत. पण त्यांपैकीं बऱ्याच संघांत नीग्रो मजुरांनां सभासद होण्यास परवानगी नाहीं. स.१८६३ मध्यें स्वतःचीं घरें असलेले ९००० नीग्रो शेतांचे मालक किंवा व्यवस्थापक १५००० आणि स्वतंत्र धंदेवाले २००० नीग्रो लोक होते. त्यांचीच संख्या १९१३ सालीं अनुक्रमें ५५००००, ९३७००० व ४३००० इतकी वाढली. वाणसवद्याचीं दुकानें, फेरीवाल्यांचा धंदा, खाटीककाम, कोळसेविकी, इमारती वगैरे बांधकामाचीं कंत्राटें, हे मुख्यतः धंदे नीग्रो लोक करतात. नीग्रो मजुरांत कुशलता नसल्यामुळें त्यांच्यांत मजूरकामाची लायकीहि कमी प्रतीची असते. नीग्रो लोकांचीं घरें हलक्या प्रतीचीं, आरोग्यदृष्ट्या व नैतिकदृष्ट्या गैरसोयीचीं असतात. खेडेगांवांत लांकडी घरांत, आणि शहरांत, तबेल्यावरील लहानसहान खोल्यांत, किंवा बारीक सारीक घाणेरड्या घरांत ते रहातात. त्यामुळें त्यांच्यांत रोगांचें व मृत्यूचें प्रमाण फार असून नीतिभ्रष्टताहि फार असते. गोऱ्यांपेक्षां नीग्रोंचे मृत्यूचें प्रमाण शें. ५० नीं अधिक असतें.

धर्म व नीतिमत्ताः—धर्म हा ईश्वराची कृपा व भीति या दोन हेतूंस्तव वाईटाऐवजीं चांगल्याचा स्वीकार करण्याकडे मनुष्याच्या बुद्धीची प्रेरणा करतो. पण कृत्याचा चांगलेवाईटपणा ठरविणें तो अखिल मानवसमाजाच्या हिताहितावरून ठरविला पाहिजे इतका प्रागतिक विचार प्राथमिक स्थितींतील समाजांत नसतो. त्यामुळें केवळ अदृश्य देवतेला तोषविण्याकरितां मानससमाजहिताच्या दृष्टीनें उर्फ नैतिक दृष्टीनें अयोग्य अशा धार्मिक चालीरीती रानटी लोकांत असतात. नीग्रो लोक प्राथमिक स्थितींतच असल्यामुळें त्यांच्या नैतिक कल्पना अप्रगत व अप्रगल्भ आहेत. त्यामुळें युनाय. स्टे. सरकारनें केलेले कायदे, त्यांची नैतिक योग्यता न कळल्यामुळें नीग्रोंनां नापसंत व सत्ताधाऱ्यांचा जुलूम असे वाटतात, शिवाय सिनेमानाटकादि जे गोऱ्या लोकांच्या करमणुकीचे पण विषयसुखोद्दीपक प्रकार नीग्रोंनां पहावयास मिळतात त्यामुळें त्यांच्यामध्यें मनोविकार बळावून त्यांची तृप्ति अन्य मार्गानेंहि करण्याकडे त्यांची प्रवृत्ति होते. यामुळें गुन्हेगारांचें प्रमाण १९०४ सालीं दक्षिण संस्थानांत ४० गोऱ्यांस २२१ नीग्रो आणि उत्तरीय संस्थानांत ८३ गोऱ्यांस ७४३ नीग्रो असें होतें. तथापि हें प्रमाण स.१८९०पासून उतरत आलें आहे. गोऱ्या स्त्रिया तसेंच नीग्रो स्त्रिया यांच्यावर होणाऱ्या बळजबरी( रेप )च्या गुन्ह्यामुळें यु. स्टे. मधील या दोन समाजांत फार वितुष्ट वाढलें असून बळजबरीच्या गुन्ह्याबद्दल कायदेकोर्टाऐवजी लिंचिंगपद्धतीनें म्हणजे खाजगी पंचाच्या कोर्टाकडून न्याय करून अपराध्याला मार मारून अखेर जाळण्याची शिक्षा देण्याचा 'हम करेसो न्याय' असा प्रकार गोऱ्या समाजांत फार दिवस आहे. हा प्रकार नीग्रोहि थोड्या फार प्रमाणांत अंगीकारतात. तथापि लिंचिंगची संख्याहि कमी होत आहे. १९०८ सालीं ७ गोरे व ९३ नीग्रो आणि १९१३सालीं १गोरा व५१ नीग्रो लिंचिंगला बळी पडले. नीग्रो लोकांत आळस, चोरी, मद्यपान, जुगार व व्यभिचार हे दुर्गुण फार आहेत. नैतिक प्रगतीचा अभाव ही गोष्ट वरील दुर्गुणांनां कारण आहेच, पण शिवाय अमेरिकेंतील संपत्ति नीग्रोंच्या श्रमाची असल्यामुळें ती गोऱ्यांपासून बळकावण्यास कांहींच हरकत नाहीं असलें बोल्शेव्हिक नीतिशास्त्रहि नीग्रोमध्यें प्रसृत करण्यांत येतें. नीग्रोमधील दारिद्र्य हेंहि त्यांच्या गुन्हेगिरीचें एक प्रबळ कारण आहे. मद्यपानाचें व्यसन गोऱ्या लोकांच्या

द्रव्यलोभामुळें कांहीं अंशीं वाढलेलें आहे, कारण नीग्रोंनां दारूचें दुकान घालण्याची परवानगी नसते.

नीग्रो लोक अमेरिकेंत आल्यावर धार्मिक बाबीं गोऱ्या मालकांच्या नियंत्रणाखालीं गेल्या व त्यांच्यामध्यें ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं ख्रिस्ती धर्माचा प्रसार सुरू केला. ख्रिस्ती नीग्रोंनां गोऱ्यांच्या चर्चमध्येंच पण गॅलरींत वेगळे बसवीत असत. शहरामध्यें नीग्रोंकरितां निराळीं चर्चें बांधण्यांत आलीं. १८६३ पर्यंत ५ लक्षांहून अधिक ख्रिस्ती निग्रोंची संख्या होती. धार्मिक उत्सव व समारंभ विशेष करणारा रोमनकॅथॉलिक पंथ नीग्रोंनां जास्त आकर्षक वाटणें सहाजिक होतें, तथापि स. १९१३ मध्यें एकंदर ४३ लक्ष ख्रिस्त्यांपैकीं ३८२३५ रोमनकॅथॉलिक असून बाकी प्रॉटेस्टंट, बॅप्टिस्ट, मेथॉडिस्ट, प्रेस्बिटेरियन वगैरे उपपंथांचे होते.

याप्रमाणें नीग्रोंची प्रगति चालू असून कांहीं नीग्रोपक्षीयांनां नीग्रोंची प्रगतिक्षमता अद्याप संपली नाहीं किंवा तिची मर्यादा ठरली नाहीं असें वाटत आहे. गोऱ्या-काळ्यांचा हा सहनिवासाचा प्रश्न दोघांची मिळून एक मिश्रजात पूर्णपणें बनल्याशिवाय सुटणार नाहीं असें कांहींचें मत आहे. नीग्रो ही एक मानवापेक्षां पशुतुल्य जात असून गोऱ्या लोकांच्या बरोबरीनें सामाजिक, राजकीय वगैरे हक्क मिळविण्यास कधींच लायक होणार नाहीं, हें मत प्रतिपादन करणाऱ्या व एकेकाळीं फार प्रसार पावलेल्या पुस्तकाबद्दलची सहानुभूति अजिबात नाहींशी होत चालली आहे, आणि गोरे व नीग्रो या दोन जातींनां एकाच देशांत रहाणें भाग असून दोघांनांहि सांस्कृतिक राष्ट्रीय ध्येयें एकमेकांच्या मदतीवांचून साधतां येणें शक्य नाहीं या मताला ग्राह्य व मान्यता प्राप्त होत चालली आहे.

१९२०सालच्या खानेसुमारींत युनाय. स्टे.मधील नीग्रोंची संख्या १०४६३०१३ भरली. गुलामगिरींतील साठ वर्षें व स्वातंत्र्यातील साठ वर्षें यांतील लोकसंख्येच्या वाढीचें प्रमाण पुढीलप्रमाणें आहे.—

१८००साली लोकसंख्या १००२०३७(शेंकडा वाढ३४३); १८६० साली लोकसंख्या ४४४१८३० (शेंकडा वाढ ३४३); व १९२०साली लोकसंख्या १०४६३०१३ (शेंकडा वाढ१३६). यावरून स्वातंत्र्याच्या काळांत गुलामगिरीच्या मानानें चारदशांश इतकीच वाढ झाली. तात्पर्य स्वातंत्र्यामुळें लोकसंख्येच्या वाढीचें मान कमीच झालें. याला कारणें यु. स्टे. मधील गोऱ्या लोकांच्या वाढीचेंहि प्रमाण कमीच होण्याला जीं कारणें झालीं आहेत तींच कांहीं अंशीं असावीत, कांहीं अंशीं व्यक्तीच्या आणि त्याच्या अन्नोदकाचा भार व्यक्तीवर पडल्यामुळें उत्पन्न होणाऱ्या जबाबदारीच्या कल्पनामुळें नीग्रोंची वाढ मंदावली असावी.

म हा यु द्धां ती ल नी ग्रों ची का म गि री.—१९१४साली महायुद्धाला सुरवात झाली; त्यामुळें यूरोपमध्यें राजकीय, सामाजिक व आर्थिक क्रांति घडून आली. महायुद्धामध्यें अमेरिका प्रथम पडली नव्हती. यूरोपमध्यें आर्थिक परिस्थिति बिकट झाल्यामुळें अमेरिकेला त्या अडचणीचा फायदा मिळाला. अमेरिकेंतील उद्योगधंद्यांनां व व्यापाराला मोठें उत्तेजन मिळालें. अर्थात अमेरिकेंतील कारखानदारांनां नीग्रो मजूरांची अत्यंत आवश्यकता भासूं लागली. उत्तरेनें दक्षिण संस्थानांतील नीग्रोंनां आपल्या भागांत आणण्याविषयीं खटपट केली. तात्पर्य, या महायुद्धानें नीग्रोंची सांपत्तिक स्थिति बरीच सुधारली.

कांहीं काळानंतर अमेरिकाहि महायुद्धांत पडली. जर्मनीनें दोस्तांच्या बतीनें युद्धांत भाग न घेण्याबद्दल नीग्रोंचीं मनें वळविण्याचा प्रयत्न केला. पण नीग्रो लोक त्या आमिषांनां बळी पडले नाहींत. अमेरिकेंतील गोऱ्या लोकांनीं नीग्रो लोकांनां गोऱ्या सैन्यांत येऊं न देण्याविषयींहि खटपट केली, पण त्या खटपटीला यश आलें नाहीं. नीग्रो लोकांपैकीं शेंकडा १३ लोकांनीं अमेरिकेनें उभारलेल्या सैन्यांत आपलीं नांवें दाखल केलीं. तथापि सैन्यामध्येंहि गोऱ्या सोल्जरांच्या बरोबरीचा नीग्रो सैनिकांचा दर्जा राखण्यांत आला नाहीं. गोऱ्या लोकांपेक्षां या काळ्या अदमींवर सैन्यांत दाखल होण्याच्या कामीं अधिक निर्बंध घालण्यांत आले. सैन्यामध्यें नीग्रो लोकांनां लढण्याऐवजीं गोऱ्या सैनिकांच्या व्यवस्थेसाठीं मजुरांचें काम करावें लागत असे. नीग्रोंनां सैन्यांत अधिकाराच्या जागा क्वचितच मिळत असत. अशी स्थिति असतांनाहि नीग्रो लोकांनीं विशेष कुरकूर न करतां महायुद्धांत चांगली कामगिरी बजावली. फ्रान्समधील लढायांत नीग्रो सैनिकांनीं आपलें शौर्य प्रगट केलें. त्यामुळें फ्रेंच लोकांचीं मनें नीग्रोबद्दल अनुकूल झालीं, व त्याचा बराच इष्ट परिणाम झाला.

महायुद्धानंतर नीग्रोंच्या आफ्रिका व अमेरिका या दोन्ही ठिकाणच्या चळवळींनां जोरानें चालना मिळाली. पश्चिम आफ्रिकेंत आक्रा येथें देश्य लोकांनीं नॅशनल कॉंग्रेस भरविली होती. अमेरिकेंत बुकर टी वॉशिंगटन ( चरित्र पहा ) हा नीग्रोंच्या सुधारणेच्या इतिहासांतील सर्वांत श्रेष्ठ पुरुष होय.

नीग्रो लोकांनीं लढाईंत चांगली कामगिरी बजावल्यामुळें त्यांनां पूर्वीपेक्षां अधिक हक्क मिळण्याची आशा उत्पन्न झाली. हे हक्क मिळूं नयेत यासाठीं गोऱ्या लोकांनीं खटपट करण्यास कमी केलें नाहीं. तथापि महायुद्धानंतर नीग्रो लोकांमध्यें आपल्या राजकीय हक्कासंबंधींची पुष्कळच जागृति झाली आहे. नीग्रो लोकांनीं आपली सर्वांगीण उन्नति करण्याच्या कामीं अनेक दृष्टींनीं खटपट चालविली आहे. त्यांनीं आपलीं स्वतंत्र वर्तमानपत्रें काढलीं आहेत. रॉबर्ट एस ॲबटनें चालविलेल्या 'शिकागो डिफेंडर'चा खप २ लाख आहे. नॅशनल ॲसोशिएशनसारख्या संस्था त्यांनीं स्थापन केल्या आहेत व त्यांचा नीग्रो लोकांमध्यें जागृति उत्पन्न करण्याच्या कामीं अतिशय उपयोग होत आहे. नीग्रो लोकांनीं आपल्या मूलस्थानाकडे-आफ्रिकेकडे-परत जावें अशा प्रकारचीहि एक चळवळ सुरू करण्यांत आली असून त्या कामीं मॉर्कस गार्व्हे

या नीग्रो पुढाऱ्यानें आपलें सर्व बळ खर्च केलें आहे. कांहीं नीग्रो पुढाऱ्यांनीं, पॅन-ऑफ्रिकन चळवळ सुरू केली आहे. अशा रीतीनें नीग्रो लोकांत विलक्षण जागृति झाल्याचीं चिन्हें दृग्गोचर होऊं लागलीं आहेत. ज्या मानानें नीग्रोंनीं आपल्या चळवळींचें कार्यक्षेत्र वाढविलें त्याच मानानें गोऱ्या लोकांनीं नीग्रोंची चळवळ हाणून पाडण्याचे प्रयत्न जोरानें चालविले आहेत पण त्यांत यश येईलसें दिसत नाहीं. राजकीय व सामाजिक बाबींप्रमाणेंच वाङ्मय व शास्त्रें यांच्या बाबतींतहि नीग्रो लोक पुढें येऊं लागले आहेत. गायन व वादनकलेंत मिसेस फ्लोरेन्स, कोल टॅलवर्ट, अँडर्सन, हेज इत्यादि नीग्रोंनीं कीर्ति मिळविली आहे. गिल्पिन व आस्टिन यांनीं अभिनयाच्या बाबतींत, गोऱ्या नटांइतकी कीर्ति संपादन केली आहे. कल्लेन, मॅक्केप्रभृति कवींचीं काव्यें जगमान्य झालीं आहेत. प्राणिविषयक शास्त्रामध्यें चार्लस टर्नरनें महत्त्वाचे शोध लावले आहेत एल्म हा इंद्रियविज्ञानशास्त्रवेत्ता या नात्यानें प्रसिद्ध आहे, तर चँडलर, व ब्रँडी यांनीं रसायनशास्त्रांत आपलें नैपुण्य प्रस्थापित केलें आहे.

[ संदर्भ ग्रंथ.—दि नीग्रो इयर बुक, टस्केजी १९१४-१५; डब्ल्यू. ई. बी. ड्यू बॉईस-दुडी ऑफ दि नीग्रो प्रॉब्लेम्स ( १८९८ ); दि नीग्रोचर्च ( १९०३ ); सोशल अँड फिजिकल कंडिशन्स ऑफ नीग्रोज इन सिटीज (१८९७); दि सोल्स ऑफ ब्लॅक फोक (१९०३ ); एम. हेल्म—दि अपवर्ड पाथ ( १९०९ ); एफ. एल्. हॉफमन—रेस ट्रेट्स अँड टॅडन्सीस ऑफ दि अमेरिकन नीग्रो ( १९०६ ); जॅक्सन अँड डेव्हिस—दि इंडस्ट्रियल हिस्टरी ऑफ दि नीग्रो रेस इन यु. स्टे.; जे. एम्. मेक्लिन—डेमॉक्रसी अँन्ड रेस फ्रिक्शन ( १९१४ ); एफ्. पी. नोवल—दि रिडेंप्शन ऑफ आफ्रिका (१८९९); आर. पॅटर्सन-दि नीग्रो अँन्ड हिज नीडस्; डब्ल्यू डी. वेदरफोर्ड—प्रेझेंट फोर्सेस इन दि नीग्रो प्रोग्रेस ( १९१२ ); डी. डब्ल्यू. विल्यम्स—हिस्ट्री ऑफ दि नीग्रो रेस; वुडसन-निग्रो इन अवर हिस्टरी ( १९२२ ). ]

**नीतिशास्त्र**—ह्याचा अर्थ मनुष्यजातीच्या वागणुकीचें शास्त्र असा आहे. चांगली वागणूक कोणती व वाईट वागणूक कोणती याबद्दल भिन्न भिन्न लोकांत व भिन्न भिन्न काळीं भिन्न मतें आढळतात. फार व्यापक अर्थ घेतल्यास या विषयांत अखिल मानवजातीच्या स्वभावाचा किंवा रीतींचा, निरनिराळ्या लोकसमाजाच्या निरनिराळ्या काळांतील रीतींचा इतिहास देऊन, परीक्षण करावें लागेल. एवढ्या विस्तृत विषयाचा नीतिशास्त्रांत समावेश न करतां तत्संबद्ध अशीं दुसरीं अनेक शास्त्रें निर्माण झालीं आहेत. मनुष्याच्या वागणुकीला चांगली व वाईट, किंवा बरोबर व चूक असें ज्या तत्त्वानुसार म्हणतात तेवढ्या तत्त्वांचा विचार नीतिशास्त्रांत केलेला असतो. नीतिशास्त्र म्ह. मनुष्याच्या वागणुकीचें शास्त्र (सायन्स ऑफ कॉन्डक्ट) असें म्हणतात. कित्येकांच्या मतें त्यास "शास्त्र" हें नांव देणें युक्त नाहीं. कारण शास्त्राचें वर्णनात्मक ( डिस्क्रिप्टिव्ह ) व प्रयोगात्मक ( एक्स्पेरिमेंटल ) असे दोन प्रकार आहेत; त्या दोहोंपैकीं कोणत्याहि प्रकारांत हा विषय येऊं शकत नाहीं. वर्तमान व भूतकालीन सर्व मानवांच्या चांगल्या व वाईट अशा सर्व कृत्यांचें वर्णन द्यावयाचें म्हटलें तर ती गोष्ट अशक्य आहे, आणि मनुष्यवागणुकीसंबंधीं प्रयोग करून पाहूं म्हटल्यास एक तर ती गोष्ट व्यावहारिकदृष्ट्या अशक्य आहे, आणि दुसरें हे प्रयोग सदसद्विवेकबुद्धीच करणार व सदसद्विवेकबुद्धीवरच करावयाचे, म्हणजे प्रयोगांचा कर्ता व अधिष्ठान हीं एकत्र असल्यामुळें प्रयोग होणें अशक्य आहे. तात्पर्य, नीतीसंबंधी विचार हा विषय 'शास्त्र' (सायन्स) नसून 'तत्त्वज्ञान' (फिलॉसाफी ) आहे. म्हणून याला नीतिशास्त्र न म्हणतां नैतिक तत्त्वज्ञान ( मॉरल फिलॉसाफी ) म्हणणें योग्य होय अशी मांडणी रे. विल्यम्स करतात ( ब्रिटानिका, ११ वी आवृत्ती ).

नीतिशास्त्रावर संशोधन करणें ही क्रिया विशेष्या व समाजाच्या विकासाच्या दृष्टीनें महत्त्वाची आहे. नीतिशास्त्राच्या इतिहासाचें स्वरूपहि बरेंच विविध आहे. प्रत्येक काळीं समाजांत ज्या क्रिया होत असतात त्यांची योग्यायोग्यता तत्कालीन लोकांकडून ठरविली जात असते, व विधिनिषेधाचे नियम निर्माण होतात. या दृष्टीनें नीतिशास्त्राचा इतिहास म्हणजे निरनिराळ्या काळांतील विधिनिषेधांचा इतिहास होय. या विधिनिषेधांत बदल कसा होत जातो हें, तो बदल होण्यास कोणत्या राजकीय आणि आर्थिक गोष्टी कारण होतात यांसह सांगत गेलें म्हणजे सामाजिक इतिहासाचें महत्त्वाचें अंग स्पष्ट केल्यासारखें होईल. नीतिशास्त्राच्या इतिहासांत आणखी एक निराळें अंग येतें. समाजांत उत्पन्न होणाऱ्या नीतिकल्पना ज्या राजकीय कारणांमुळें, देवविषयक विचारामुळें किंवा विशिष्ट वर्गविषयक अपेक्षांमुळें उत्पन्न होतात, त्या घेऊन नीति म्हणजे काय, अनीति म्हणजे काय यांविषयीं तत्त्ववेत्ते प्रत्येक काळांत नीतिशास्त्रीय विचार प्रगट करीत असतात. त्यांचा इतिहास म्हणजे नीतिकल्पनांच्या शास्त्रीकरणाचा इतिहास होय.

या ज्ञानक्षेत्रांत कर्तव्य व जबाबदारी आणि नैतिकदृष्ट्या पसंति व नापसंति ह्या कल्पना वावरत असलेल्या आढळतात. मानवी कृत्यांचा बरेवाईटपणा ठरवितांना प्रथम मानवी जीविताचें ध्येय काय हा प्रश्न उद्भवतो, आणि या ध्येयासंबंधीं निरनिराळ्या देशांतील व काळांतील तत्त्ववेत्त्यांनीं निरनिराळीं उत्तरें दिलेलीं आहेत. सर्व तत्ववेत्यांच्या विचारांचें पृथक्करण केल्यास ते तीन प्रकारच्या दृष्टींनीं या विषयाकडे पहातात असें आढळतें; ( १ ) भौतिक किंवा ऐहिक किंवा इहलौकिक; ( २ ) दैविक व ( ३ ) अध्यात्मिक किंवा पारलौकिक किंवा पारमार्थिक.

नीतिशास्त्राशीं संबद्ध मानसशास्त्र (सायकॉलजी), समाजशास्त्र ( सोशिऑलजी ); धर्म उर्फ परमार्थशास्त्र ( रिलिजन ), राजनीतिशास्त्र ( पॉलिटिक्स ), अर्थशास्त्र ( एकॉनामिक्स ),

सृष्टिशास्त्र ( नॅचरल फिलॉसफी उर्फ फिलॉसफी ) इतकीं शास्त्रें आहेत. या प्रत्येकापासून नीतिशास्त्र कसें निराळें आहे तें दाखविलें पाहिजे. (१) समाजशास्त्राचा व्यापक अर्थ घेतल्यास त्यांत नीतिशास्त्रादि सर्व शास्त्रांचा समावेश होईल. भिन्नभिन्न समाजांतील नीतिकल्पना घेऊन नीतीचें परम-तत्त्व ठरविणें हें नीतिशास्त्राचें काम आहे. लोकांच्या नीतिकल्पना 'कशा असतात' हें समाजशास्त्र सांगतें, व त्या 'कशा असाव्यात' तें नीतिशास्त्र सांगतें. (२) नीतिमत्ता हा बुद्धीचा धर्म आहे. नीति-अनीतिदर्शक विशेषणें बुद्धीला लागतात, बाह्य क्रियेला नव्हे. त्यामुळें मानसशास्त्र हें नीतिशास्त्राशीं फार संलग्न आहे. (३) अर्थ म्हणजे पैसा कसा मिळवावा हें 'अर्थशास्त्र' सांगतें, पण पैसा मिळविणें एवढेंच मनुष्याचें ध्येय नसून धर्म, अर्थ, काम व मोक्ष असे चार अर्थ किंवा गोष्टी मनुष्यानें या आयुष्यांत साधावयाच्या असल्यामुळें पैसा मिळविणें तो धर्माच्या, कामाच्या व मोक्षाच्या आड येणार नाहीं अशा रीतीनेंच मिळविला पाहिजे. नीतिशास्त्राचें नियंत्रण नसल्यास अर्थशास्त्र लोकांना कठोर, अरसिक, क्रूर, आप्पलपोटे बनवील.

## पाश्चात्य नीतिशास्त्राचा इतिहास.

ग्री क व रो म न का ळ.-पाश्चात्य नीतिशास्त्राचा आरंभ प्राचीन ग्रीक लोकांपासून होतो. तथापि हा विषय शास्त्रस्वरूपांत मांडला जाण्यापूर्वी चांगल्यावाईट आचरणाबद्दलच्या त्रुटित कल्पना ख्रि. पू. ७ व्या व ६ व्या शतकांतील काव्यांत विखुरलेल्या आढळतात. या विषयाचा पहिला तात्त्विक विवेचक साक्रेटिस हा होय. त्याच्यापूर्वी सुप्रसिद्ध सात ग्रीक तत्त्ववेत्ते होऊन गेले; त्यांपैकीं एक थेल्स; याला नीतिशास्त्राची व्यवस्थित उपपत्ति सांपडलीच नाहीं. दुसरा तत्त्ववेत्ता पायथॅगोरस; हा तर एका तत्त्वज्ञानपंथाचा संस्थापक होता; पण त्यानें नीतिविषयक प्रश्नांत अतींद्रियविज्ञानविषयक गोष्टींची गुंतागुंत केली आहे. विश्वाची उत्पत्ति व रचना यासंबंधींच्या गणिती कल्पनाच पायथॅगोरसनें नीतिविषयक प्रश्नांना लागू केल्या आहेत. तिसरा तत्त्ववेत्ता हेरॅक्लिटस ( ख्रि. पू. ५३०-४७० ); याच्या नीतीच्या कल्पनांत स्टोईकपंथाची पूर्वावस्था पाहावयास मिळते, पण त्या व्यवस्थित मांडलेल्या नाहींत. साक्रेटिसपूर्वकालीन तत्त्ववेत्त्यांतला डेमॉक्रिटस हा शेवटचा होय, पण सोपपत्तिक विवेचनाच्या अभावामुळें त्याच्याहि नीतीपर ग्रंथास नीतिशास्त्र म्हणतां येत नाहीं. खरें म्हटलें म्हणजे मानवजातीच्या नीतिविषयक सामान्य कल्पनांत अस्पष्टपणा व परस्पर विरोध कोठें आहे हें शोधून काढण्याकडे लक्ष दिल्याशिवाय नीति या विषयाची शास्त्रीय उपपत्तिपूर्वक मांडणी होणेंच शक्य नाहीं; व त्याकरितां मानवी आचरणांत उत्पन्न होणाऱ्या चांगल्यावाईटाच्या प्रश्नांकडे पहिल्या प्रतीच्या बुद्धिमान माणसानें लक्ष पुरविलें पाहिजे. याप्रमाणें सामान्य माणसांच्या आचरणाकडे आस्थापूर्वक पाहणारा पहिला तत्त्ववेत्ता साक्रेटिस हाच होय. तथापि अतींद्रियविज्ञानाचा नीतिविषयावर जो विशेष पगडा होता तो नष्ट करण्याचें काम साक्रेटिसपूर्वी सोफिस्टपंथी लोकांनीं केलें नव्हतें, तथापि जीवनकलहांत यशस्वी होऊन सार्वजनिक कामांत पुढाकार कसा घ्यावा याविषयीं त्यांचें शिक्षण फार उपयुक्त असे. न्यायानें वागून दुःखापेक्षां सुखप्राप्ति अधिक करून घेण्याचा मार्ग त्यांनीं दाखविला होता.

सॉक्रेटिसः-वरीलप्रमाणें ग्रीक समाजांत नीतिविषयक ज्या अस्पष्ट कल्पना वावरत होत्या त्यांचें चिकित्सक बुद्धीनें निरीक्षण करून योग्य शास्त्रीय समर्थन सोफिस्ट किंवा इतर विद्वानांनां करतां येत नाहीं. ही गोष्ट प्रथम साक्रेटीसनें लोकांच्या नजरेस आणण्याचें काम केलें 'साक्रेटीसचे संवाद' म्हणून जे प्रसिद्ध आहेत त्यांमध्यें तत्कालीन अनेक लोकांचें अज्ञान सिद्ध केलें आहेच, पण त्यामध्यें त्याबरोबरच बरोबर व्याख्या कशी करावी व निर्दोष अनुमानें कशीं काढावीं याची दिशा दाखवून त्यानें प्रत्येक विषयाच्या शास्त्रीय प्रगतीस मोठी मदत केली. प्रचलित मतांची उलट तपासणी करून तो लोकांचें अज्ञान निदर्शनास आणित होता,या त्याच्या विध्वंसक दिसणाऱ्या कामगिरींतून एक मोठें शास्त्रीय नियम निघाले ते हे कीं, 'सद्गुण म्हणजे ज्ञान' ( व्हर्च्यू इज नॉलेज ). पण ह्या साक्रेटिसच्या नियमांत एक हेत्वाभास दडलेला आहे, तो हा कीं, चांगलें कोणतें हें ज्या माणसाला माहीत आहे तो मनुष्य वाईट आचरण कधीं करणारच नाहीं. शिवाय 'चांगलें' ( गुड ) हा साक्रेटिसचा शब्द कर्तव्य व फायदा असा द्व्यर्थी किंवा अनेकार्थी असल्यामुळें पुढें साक्रेटिसच्या शिष्यांनीं त्याचे निरनिराळे अर्थ घेतले. साक्रेटिसच्या तत्त्वज्ञानांत कर्तव्यवादाचा व सुखवादाचा जो सुंदर मिलाफ दिसतो, तो पुढें त्याच्या शिष्यांमध्यें दिसत नाहीं. साक्रेटिसच्या शिष्यांमधून निरनिराळे पंथ निघाले तेः—(१) मेगॅरियन, (२) प्लेटॉनिक (३) सिनिक, (४) सिरेनाईक. ह्या चारहि पंथांनां एक गोष्ट मान्य होती कीं, ज्ञान हें मनुष्यप्राण्याचें विशेष होय; आणि चांगलें काय याविषयींचें ज्ञान हें सर्वांत उच्च प्रतीचें ज्ञान होय. तथापि पहिला पंथ मेगॅरचा; त्या पंथानें, जगांत चांगलें काय हें अद्याप विश्वांतलें एक कोडें आहे असें म्हणून अतींद्रियविज्ञानाशींच नीतिशास्त्राचा संबंध जोडला.

सिरेनाईक पंथः—याचा संस्थापक अरिस्टिप्पस हा आफ्रिकेंत भूमध्यसमुद्रकांठीं असलेल्या 'सिरीन' नांवाच्या गांवीं जन्मला होता. त्यावरून या पंथाचें नांव पडलें. 'चांगलें' म्हणजे उपयुक्त किंवा सुखदायक अशी व्याख्या करून व विषयसुखांची प्राप्ति हें ध्येय ठरवून तदनुसार नीतिनियम या पंथानें ठरविले. या पंथांतला थिओडोरस हा विद्वान, विषयसुखापेक्षां शांति किंवा समाधानवृत्ति व आनंद ( ट्रँक्विलिटी अँड चिअरफुलनेस ) यांनां अधिक महत्त्व देत असे,

व ॲनिसेरिस हा दुसरा विद्वान, स्वार्थापेक्षां परोपकाराच्या सुखाला अधिक लेखीत असे; तथापि एकंदरींत सिरेनाईक पंथाचा सुखवाद असंस्कृत व हीन प्रकारचा होता यांत शंका नाहीं.

सिनिक पंथ—याचा संस्थापक ॲंटिस्थेनीस, याचीं तत्त्वें वरील पंथाच्या अगदीं उलट होती. विषयसुखांनांच ते दुःख मानीत असत ( बेटर मॅडनेस दॅन ए सरेंडर टू प्लेझर = विषयसुखांत दंग होण्यापेक्षां वेडेपण अधिक चांगलें ). दुःख, दारिद्र्य, शारीरिक कष्ट, हीं सोसल्यानें अध्यात्मिक स्वातंत्र्य, व सद्गुण यांत प्रगति होते. पण चांगलें किंवा 'सद्गुण' म्हणजे तरी काय याची व्याख्या सिनिकपंथी लोकांनीं दिलेली नाहीं. यामुळें सिनिकपंथी विद्वान कांहीं तरी विचित्र प्रकारें आपलें आयुष्य घालवीत असत.

प्लेटोः—प्लेटोचें तत्त्वज्ञान हा सॉक्रेटीस व ॲरिस्टॉटल यांचीं तत्त्वज्ञानें जोडणारा दुवा आहे. 'सद्गुण म्हणजे ज्ञान' या साक्रेटिसच्या सूत्रापासून आरंभ करून ज्ञान मिळविणें तें कोणत्या गोष्टींचें मिळवावयाचें याबद्दलची मीमांसा त्यानें केली. ज्ञान म्हणजे जगांतील गोष्टीपासून होणाऱ्या सुख-दुःखांचा आढावा काढण्यास शिकणें, असा प्लेटोनें अर्थ सांगून सुखवादच प्रस्थापित केला. कारण साक्रेटिसच्या 'गुड' याचा सौंदर्याच्या दृष्टीनें चांगलें ( दि ब्युटिफुल ), किंवा विषयसुखाच्या दृष्टीनें चांगलें ( दि यूसफुल ) असा कोणताहि अर्थ घेतला तरी अखेर त्यांतून 'सुखवाद' निष्पन्न होतो. तथापि हा निर्णय देण्यापूर्वी प्लेटोनें नीतिशास्त्राला मानवी व्यवहारक्षेत्रांतून काढून अतींद्रियविज्ञानाच्या क्षेत्रांत नेलें. तो प्रकार असाः—खरें ज्ञान म्हणजे जी सामान्य गोष्ट तिच्या विस्तारमर्यादेंत येणाऱ्या प्रत्येक गोष्टीला लागू पडतें अशा सामान्य गोष्टींचें ज्ञान. भौतिक जगाविषयींच्या ज्ञानाचा प्रत्येक विषय अशा सामान्य प्रकारचा असतो. ज्ञान म्हणजे अशा सामान्य गोष्टींचें किंवा गुणांचें ज्ञान होय. शिवाय ज्ञान हें प्रत्यक्ष अस्तित्वांत असलेल्या गोष्टीचें असावयाचें.

प्लेटोच्या तत्त्वज्ञानांत या तार्किक यथार्थवादाला (रिॲलिझमला) नैतिक स्वरूप कसें प्राप्त झालें तें समजत नाहीं. जरी " गुड " हें प्लेटोच्या तत्त्वज्ञानाचें सूत्र आहे, तरी त्याच्यातत्त्व ज्ञानांत सर्व विश्वाचा समावेश केला जातो. मनुष्याच्या नित्य व्यवहाराला लावण्याच्यां साक्रेटिसच्या अनुमानपद्धतीला धरून याचें विवरण करतां येईल. कोणतेंहि हत्यार किंवा कोणताहि अवयव आपलें काम जितक्या उत्तम रीतीनें पार पाडतो तितक्या प्रमाणांत तें चांगलें असें आपण समजतों.

सर्व विश्व हें साधन आणि साध्य या तत्त्वावर उभारलें आहे अशी जर आपण कल्पना केली तर प्लेटोच्या मतां-प्रमाणें कोणतेंहि साधन जितकें साध्याच्या जवळ जाईल त्या प्रमाणांत त्याचें अस्तित्व किंवा सत्यत्व समजलें जाईल. याच तत्त्वाला अनुसरून जगांतील आदितत्त्वाला प्लेटो आत्यंतिक सौंदर्य म्हणत असे.

याप्रमाणें प्लेटोच्या विचारांत भयंकर उत्क्रांति होऊन त्यानें नीतिशास्त्रास मूलवस्तुशास्त्राच्या ( ऑंटॉलजी ) पंक्तीस आणून बसविलें. प्लेटोच्या वेळेपासून तत्त्वज्ञान हा सामान्य लोकांच्या चर्चेचा विषय न राहून फक्त ज्ञानी लोकांच्या चर्चेचा व विचाराचा विषय झाला.

प्लेटोच्या मतें प्रत्यक्ष सृष्टींतील प्रत्येक पदार्थास तात्त्विक सृष्टींत मूळरूप आहे. त्या मूळरूपाला थोड्याफार प्रमाणांत अनुसरून सृष्टींतील पदार्थ निर्माण झालेले असतात. प्रत्यक्ष सृष्टींत असलेल्या कोणत्याहि पदार्थांत तात्त्विक सृष्टींतील मूळरूपाइतकें सत्यत्व असणें शक्य नाहीं. खरें सत्य त्याच सृष्टींत असूं शकणार. " मरणं प्रकृतिःशरीरिणां " हें तत्त्व प्लेटोला पूर्णपणें मान्य होतें. उत्कृष्ट जगणें म्हणजे इंद्रिय-व्यवहारन्यास करणें होय. यालाच आपण व्यवहारांत मरणें म्हणतो. या प्रकारच्या विश्वासाच्या कल्पनेशीं त्याचे नीतिशास्त्रांतील व्यवहारसौष्ठवविषयक विचार जुळते आहेत. मनुष्याचा आत्मा तात्त्विक सृष्टींत सुव्यवस्थित व बुद्धिप्रधान असला पाहिजे. ज्ञान आणि सद्गुण हे व्याप्यव्यापक आहेत. आत्यंतिक सत्य जाणणें हें जर जीविताचें ध्येय समजलें तर त्याला आत्यंतिक ज्ञानाची जरूरी आहे. परंतु असें ज्ञान सर्वांनां असणें शक्य नाहीं. म्हणून प्लेटोनें सद्गुणी लोकांचे दोन भाग केले आहेत. पूर्ण ज्ञानी लोक व सदसद्विवेकी लोक. उदा० शूर, सात्त्विक, न्यायी लोक. हा विवेक ईश्वरदत्त असतो व तो शिक्षणानें विकास पावतो. नुसतें तात्त्विक विवेचन या विकासास पुरेसें होत नाहीं. प्रत्यक्ष आचरणाची त्यास जोड लागते. या प्रकारें बुद्धि आणि विषयवासना असे आत्म्याचे दोन भाग करून मानसशास्त्रांत प्लेटोनें बरीच क्रांति घडवून आणली. या विषयवासनेचे त्याने दोन भाग केले. या विभागणीस अनुसरून प्लेटोनें चार सद्गुण मान्य केले आहेत ते विद्वत्ता व न्यायीपणा हे उच्च सद्गुण व धैर्य आणि मितता हे होत. सुख हें मनुष्याच्या आयुष्याचें ध्येय असावें कीं नाहीं याबद्दल प्लेटोच्या मतांत बराच चढउतार होत गेला हें त्याच्या निरनिराळ्या संवादात्मक ग्रंथांवरून दिसून येतें. सुख हें प्रत्यक्ष व विनाशी असल्यामुळें तें तत्त्वज्ञान्याचें ध्येय असणें शक्य नाहीं, कारण सुख हें बहुधां दुःखमिश्रित असें असतें. परंतु पुढें तो आपल्या ' रिपब्लिक ' नामक प्रख्यात ग्रंथांत सुख हें तत्त्वज्ञान्याच्या आयुष्याचें ध्येय असतें असें प्रतिपादितो. कारण आत्यंतिक सुख हें तत्त्वज्ञान्यालाच मिळूं शकेल, कारण त्याला पूर्ण ज्ञान असतें. कनिष्ठ दर्जाच्या सद्गुणी लोकांनां दुःखमिश्रित सुख प्राप्त होतें, कारण त्यांनां पूर्ण ज्ञान नसतें. पुष्कळ वेळां दुःखाच्या अभावास लोक सुख समजतात. याप्रमाणें ज्ञान, न्यायीपणा व सुख हीं तिन्ही परस्परावलंबी असल्यामुळें ज्ञानी मनुष्याच्या आयुष्याचीं ध्येयें आहेत असें प्लेटो समजतो.

अरिस्टॉटलः—प्लेटोच्या तत्त्वज्ञानानंतर आपण अरिस्टॉटलच्या तत्वज्ञानाचा विचार करूं लागलों म्हणजे त्यांच्या विचार व भाषा पद्धतीवरून ते एकमेकांच्या अगदीं विरुद्ध मताचे होते असें वाटतें, आणि अरिस्टॉटलनें आपल्या नीतिशास्त्र व तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांत प्लेटो व त्याचे अनुयायी यांच्यावर जी कडक टीका केली आहे तीमुळें वरील अनुमानास बळकटी येते. परंतु या अनुमानाचा फोलपणा पुढें अॅन्टिओकसनामक तत्त्ववेत्त्यानें सिद्ध केला.

प्लेटोच्या मतें जगांत एकच शास्त्र आहे व त्याचा उद्देश 'कल्याण' हा होय. त्यानें आपल्या शास्त्राची पद्धतशीर विभागणी केली नाहीं, व तें मनुष्याच्या नित्य व्यवहारास कसें लावतां येईल हेंहि सांगितलें नाहीं. ऐहिक व पारमार्थिक 'कल्याण' याचा संबंध काय हें प्लेटोनें स्पष्ट केलें नाहीं. परंतु या दोहोंचा अति निकट संबंध आहे असें अरिस्टॉटलनें प्रतिपादन केलें. विश्वाचें अविनाशी 'कल्याण' हें दुसरें कांहीं नसून विश्वविषयक गूढ कल्पनेची शुद्ध परंपरा होय. तीं कर्ता आहे व कार्यहि आहे, अचल व अविनाशी आहे, आणि प्रत्यक्ष दृष्टीचें आदिकारण आहे. आणि प्लेटो व अरिस्टॉटल या दोघांच्या मतें या अशा शुद्ध कल्पनातंरगांत विलिन होणें हेंच प्रत्येक तत्त्वज्ञान्याचें ध्येय असलें पाहिजे व तें त्यानें आपल्या अत्यंत शुद्ध आचरणानें गांठलें पाहिजे. परंतु विद्वान मनुष्य हा देवासारखा असतो हें प्लेटोचें मत अरिस्टॉटलला पसंत नव्हतें. 'कोणताहि मनुष्य आपल्या हिताविरुद्ध वागणार नाहीं व सद्गुण हा ज्ञानावर अवलंबून असणार' हें परस्पर विरोधी तत्त्व दोघांनांहि मान्य होतें. प्लेटोच्या पुढें अरिस्टाटलची प्रगति म्हणजे 'शुद्ध सद्गुणाकरितांच शुद्ध आचरण करणें' हें प्रतिपादन होय. या तत्त्वाचा प्लेटोच्या शास्त्रांत अस्पष्ट उल्लेख आढळतो. मनुष्याच्या आयुष्याचें मुख्य ध्येय शुद्ध आचरण हें होय; सुख हा त्याचा परिणाम होय. ज्ञान आणि सद्गुण या बुद्धिग्राह्य गोष्टी आहेत, सुख हें नाहीं. विषयसुख हें खरें सुखच नाहीं हें तत्त्व दोघांनां सारखेंच मान्य होतें.

अॅरिस्टॉटलचें नीतिशास्त्रः—प्रत्येक मनुष्याच्या कृतीला कांहीं उद्देश्य लागतें, मग तें स्वतः त्याच्याकरितां असो किंवा त्यामुळें दुसरी एखादी गोष्ट साध्य करणें असो. परंतु सर्व कृत्यें साधन असूं शकणार नाहींत. साध्य असें कांहीं तरी असतेंच. त्याला तो मोक्ष किंवा अविनाशी सुख म्हणतो. जगांतील प्रत्येक प्राणी निर्माण करण्यांत कांहीं तरी उद्देश आहे. निरनिराळ्या जातींच्या प्राण्यांचा उद्देश निराळा आहे. मनुष्याला निर्माण करण्यांत कांहीं विशिष्ट हेतु आहे. तो हेतु योग्यरीतीनें आपल्या आचरणानें तडीस नेणें हेंच मनुष्याच्या आयुष्याचें ध्येय असलें पाहिजे. हें ज्याच्या कृतींत साध्य होतें तो मनुष्य व ती त्याची कृति श्रेष्ठ होय. परंतु मनुष्याच्या आयुष्यांत दुसऱ्या पुष्कळ गोष्टी अशा असतात कीं, त्यांचा या ध्येयसाधनांच्या बाबतींत कांहीं उपयोग नसतो. या प्रकारचें मनुष्याचें 'आत्यंतिक हित' कोणतें हें अॅरिस्टॉटल स्पष्ट करून सांगत नाहीं. सौंदर्य, उच्चकुल, संततीची जोपासना वगैरे सारख्या क्षुल्लक गोष्टींचा तो मानवी हिताच्या व्याख्येंत समावेश करीत नाहीं व त्या वगळीतहि नाहीं. ही व्याख्या करतांना तो लोकमताला बराच मान देतो.

अॅरिस्टॉटलच्या नीतिशास्त्रांत सद्गुणांच्या वर्गवारीला बरेंच महत्त्व आहे. ही वर्गवारी विशिष्ट तत्त्वावर किंवा मानवी आयुष्याच्या निरनिराळ्या बाजूंचा विचार करून केलेली दिसत नाहीं. विद्वत्ता व न्यायीपणा या दोन गुणांचा तो निरनिराळा विचार करतो. पाहिल्याचे तो व्यावहारिक व तात्त्विक शहाणपणा असे दोन भाग करतो. असें करण्यांत याचा व प्लेटोचा अतिशय मतभेद दिसून येतो. पुढें मनुष्याच्या मानसिक व सांपत्तिक स्थितीवर अवलंबून असणाऱ्या सद्गुणांची वर्गवारी दिली आहे, ती अशीः–धैर्य व मितता ( टेंपरन्स ); उदारपणा व महत्त्वाकांक्षा; क्षमा; व शेवटीं व्यावहारिक सद्गुण म्हणजे सत्यप्रियता व मित्रत्व.

या अॅरिस्टॉटलनें दिलेल्या सद्गुणांच्या वर्गवारीला नुसतें ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्व नसून शास्त्रीयदृष्ट्याहि विशेष महत्त्व आहे. कोणत्याहि गुणाला अतिरेक व अभाव अशा दोन स्थिती आहेत. यांमधील "सुवर्णमध्य" शोधून काढणें हें ज्ञान होय व तो आचरणांत आणणें हा सद्गुण होय. हें अॅरिस्टॉटलचें मत होतें. परंतु यांत शास्त्रीयदृष्ट्या विस्कळितपणा बराच दिसतो व कधीं कधीं या तत्त्वाचा अवलंब करणें हास्यास्पद होतें. एकंदरींत अॅरिस्टॉटलनें लिहिलेला नीतिशास्त्रावरील ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. अॅरिस्टॉटलनें दिलेल्या वर्गवारीमुळें मनुष्याच्या नैतिक आयुष्याचे दोन भाग करावे लागतात. एक तात्त्विक व दुसरा व्यावहारिक. या दोहोंची उत्पत्ति ज्ञानांतच असल्यामुळें त्यांचा मेळ घालणें कठिण पडतें. याच विभागणींतून पुढें दोन पंथ उत्पन्न झाले; एक 'सिनिक' व दुसरा 'स्टोईक.' झेनो हा स्टोईकपंथाचा संस्थापक होता.

स्टोईक पंथः—या दोन्ही पंथांनां पूर्ण ज्ञान प्राप्त करण्यांत मोक्ष आहे हें तत्त्व मान्य होतें. ज्ञान व प्रत्यक्ष कृति यांची फारखत दोघांनाहि मान्य नव्हती. कोणीहि मनुष्य समजून उमजून आपल्या अहिताची गोष्ट करीत नाहीं. हें सॉक्रेटिसानें प्रतिपादिलेलें तत्त्व या लोकांनां मान्य होतें. विषयवासना अज्ञानजन्य कल्पना होत. पूर्णज्ञानी मनुष्य अशा वासनांपासून अलिप्त असतो. ज्ञानी मनुष्यास वासनांचें ज्ञान असतें परंतु तो विषयसुखास बळी पडत नाहीं. त्याचप्रमाणें शारीरिक दुःखामुळें ज्ञानी मनुष्य ध्येयपराङ्मुख होत नाहीं. या प्रकारची पूर्ण सिद्धावस्था प्राप्त झालेले लोक अति दुर्मिळ असतात अथवा ही स्थिति फक्त कल्पनाच आहे व प्रत्येक ज्ञानी मनुष्य या स्थितीस पोहोंचण्याचा प्रयत्न मात्र करीत असतो. स्टोईक लोकांच्या मतें

अज्ञान आणि पाप हे समानार्थी शब्द होते. पाप मग तें क्षुल्लक असो किंवा मोठें असो दोन्हींहि त्यांच्या दृष्टीनें सारखींच होतीं. त्याचप्रमाणें ज्ञानाची अथवा सद्गुणाची स्थिति होय. ॲरिस्टाटलनें हें तत्त्व खोडून काढण्याचा प्रयत्न केला, परंतु तो त्यास साधला नाहीं. स्टोईकपंथी लोकांस हें तत्त्व मान्य होतें. हें तत्त्व मान्य केल्यास सद्गुण म्हणजे ज्ञान, अर्थात पाप ही नकळत घडून येणारी गोष्ट होय; हें तत्त्व मान्य करण्याऐवजीं अज्ञान हें बुद्धिपुरस्सर असतें हें 'स्टोईक' लोकांनां मान्य होतें.

सर्व जगतांत ईश्वर ज्ञानरूपानें पसरला आहे. मनुष्याच्या प्रत्येक चांगल्या कृतींत ईश्वरी ज्ञानाचा अंश असतो आणि तो जर विषयवासनापासून अलिप्त राहील तर त्याची कृति सद्बुद्धीला धरूनच होईल. यावरूनच पुढें प्रत्येकानें निसर्गास अनुसरून वागावें हें तत्त्व प्रचलित झालें. यापूर्वी हें तत्त्व क्रूसीपस व झेनोक्रेटीस या तत्त्वज्ञान्यांनीं प्रतिपादिलें होतें. स्टोईकपंथी लोकांचा विशेष हा होता कीं, त्यांनां वाटेल त्या गोष्टींनां 'चांगलें व वाईट' हे शब्द लावणें कबूल नव्हतें. व्यावहारिक नीतिमत्तेंत स्टोईक लोकांचा विशेष आणि महत्त्वाचा मुद्दा म्हटला म्हणजे मनुष्य हा व्यक्तीकरितां नसून समाजाकरितां निर्माण झालेला आहे हा होय. मनुष्य हा समाजप्रिय प्राणी आहे हें ॲरिस्टॉटलचें तत्त्व त्यांच्या तत्त्वास जुळतें होतें. ईश्वराच्या (झूस) राज्यांत सर्व लोकांनीं आपापसांतील करार पाळावे, एकमेकांस इजा करूं नये, इजा किंवा धोका निवारणार्थ संघ करावे, हे सर्व निसर्गाचेच कायदे होत; त्याचप्रमाणें मनुष्यांनीं संतति निर्माण करावी, तिची योग्य जोपासना करावी व तिला शिक्षण द्यावें हीं त्यापासूनच निघणारीं अनुमानें होत. परंतु याशिवाय स्त्रीपुरुषांचे काय संबंध असावे हें मात्र निसर्गाच्या कायद्यांत सांगितलें नव्हतें, आणि याचमुळें सर्व स्त्रियांवर सर्व पुरुषांची सारखीच सत्ता आहे हें प्लेटोचें तत्त्व यांनां मान्य होतें.

स्टोईक लोकांच्या ध्येयांत विशेष आकर्षक मुद्दा म्हटला म्हणजे शारीरिक क्लेशापासून अलिप्त राहणें हा होय. त्याच वेळेस एपीक्यूरस नामक तत्त्वज्ञान्यानें जो'सुखवाद'सुरू केला होता त्यास या लोकांचा विरोध होता.मनुष्याचें ध्येय प्रत्यक्ष सुख प्राप्त करून घेणें हें नसून दुःखापासून अलिप्त राहणें हें होय असा ते भेद करीत असत कोणत्याहि सत्कृत्यापासून होणारा आनंद मानणें किंवा तो मिळविण्याचा प्रयत्न करणें हें देखील त्यांनां मान्य नव्हतें. कशाहि प्रकारचे क्लेश किंवा आयुष्यांत येणारे आकस्मिक प्रसंग यामुळें मनाची शांतता व उल्हास यत्किंचितहि ढळूं न देणें हें उच्च ध्येय मनुष्यजातीपुढें ठेवल्यामुळें झेनो व त्याचे अनुयायी आदरणीय होत. झेनोच्या मतें हें ध्येय गांठण्यास कालमर्यादेची आवश्यकता नव्हती. वरील प्रकारची मनाची साम्यावस्था एखाद्या प्रसंगीं जरी ठेवतां आली तरी पुरे होती.

एपीक्यूरसः—सुख हें मनुष्याचें अंतिम ध्येय आहे असें याचें मत होतें. ज्याचा परिणाम वाईट होण्याचा संभव आहे असेंच सुख तेवढें वगळावें. साधारण लोकांची सुखाची जी कल्पना आहे तीच याला मान्य होती, परंतु शारीरिक सुखापेक्षां मानसिक सुखास तो जास्त महत्त्व देत असे आणि शारीरिक किंवा मानसिक दुःख नाहीसें केलें म्हणजे जी स्थिति प्राप्त होते तें सुख, अशी सुखाची व्याख्या तो करीत असे. सुख वाढूं शकत नाहीं, फक्त त्यांत निरनिराळे प्रकार होतात. गुप्त पाप हें तो अति वाईट समजत असे व निरपेक्ष मैत्रीला तो विशेष मान देत असे.

वरील सर्व मतांचा परिणाम समाजांत इ. स. च्या दुसऱ्या शतकापर्यंत टिकला.या काळापर्यंतच्या ग्रीक व रोमन तत्त्वज्ञानाचे चार भाग केले जातात. ते स्टोईक व एपिक्यूरियन हे दोन पंथ व प्लेटो आणि ॲरिस्टॉटल यांचें तत्वज्ञान हे होत. ॲरिस्टॉटलच्या नीतिशास्त्रांत पुढें सुधारणा झाली नाहीं. त्याचप्रमाणें एपीक्यूरसच्या पंथाची स्थिती झाली. परंतु प्लेटो आणि झेनो यांच्या तत्त्वज्ञानानें लोकांच्या मनावर बराच पगडा बसविला.

समाजांत हळूहळू होणाऱ्या मतांतरामुळें प्लेटोनें घालून दिलेल्या परंपरेंत बरीच ओढाताण झाली. या काळांत मनुष्याच्या उच्च व नीच अशा स्थितींत तत्त्वतःकांहीं विरोध नसतो हें तत्त्व प्रचलित झालें होतें व तें ॲंटिओकस व प्लूटार्क यांच्यामधील दोडशें वर्षांच्या अवधींत थोड्याफार प्रमाणांत चालू होतें. परंतु पुढें प्लूटार्कनें, प्लेटोनें आपल्या 'कायदे' नामक संवादांत प्रतिपादिलेलें तत्त्व जोरानें प्रतिपादन केलें. मनुष्याच्या प्रत्यक्ष व्यवहारांत व कल्पनासृष्टींत फार अंतर आहे व कल्पनांच्या मानानें ते फार अर्धवट असतात व दैवी साक्षात्कार किंवा दृष्टांत झाल्याशिवाय त्याची पूर्तता होत नाहीं इत्यादि मतें त्यानें प्रचलित केलीं. असे साक्षात्कार होण्यास विषयपराङ्मुखता व शारीरिक व मानसिक शुद्धि यांची आवश्यकता लागते. या मताचा जोराचा प्रसार ईजिप्तमधील प्लोटायनस नामक तत्त्वज्ञान्यानें केला.

प्लोटायनसः—हा इ. स. २०५–२७० या काळांत ईजिप्त देशांत होऊन गेला. यानें प्लेटोच्याच तत्त्वज्ञानाचा प्रसार केला. कल्पनासृष्टि व प्रत्यक्षसृष्टि यांमध्यें प्लेटोच्या काळांत विशेष विरोध नव्हता, आणि त्याचा मोक्ष (गुड) म्हणजे वस्तुमात्रांतील तत्त्व हा होता. परंतु प्लोटायनसच्या वेळेस या सृष्टपदार्थाविषयीं तिरस्कार विशेष उत्पन्न झाला, आणि मोक्षप्राप्तीच्या मार्गांत प्रकृति हें पहिलें विघ्न होय व जडदेह हा आत्म्याच्या वाटेंतील दुसरें विघ्न होय, अशा प्रकारचीं मतें प्रस्थापित झालीं. जडदेहाच्या सर्व वासना नष्ट केल्याशिवाय मोक्ष मिळणें शक्य नाहीं असें याचें मत होतें. याच तत्त्वाचा जोराचा पुकारा त्याचा शिष्य पॉरफिरी यानें केला.जगाच्या आदितत्त्वाची आपल्याला योग्य कल्पना करतां

येते व आपण जसा त्याचा पूर्ण विचार करूं तसें तें आपल्याला पूर्ण कळतें. परंतु प्लोटायनस याचें मत अगदीं विरुद्ध होतें. ज्या अर्थी बुद्धि व तिचा विषय या दोन वस्तू असतात त्या अर्थी ती जगाचें आदितत्त्व किंवा ईश्वर असूं शकणार नाहीं. तो याहून वेगळा असला पाहिजे. त्यास मर्यादा असणें शक्य नाहीं, आणि ज्या वेळेस मनाची जाणीव नष्ट होते आणि मन ब्रह्मानंदांत विलीन होऊन तद्रूप होतें तीच मानवी आयुष्याची उच्चतम स्थिति होय.

**ख्रिस्ती धर्म व मध्ययुगीन नीतिशास्त्र.**—धर्म हा मनुष्याच्या आयुष्यांतील प्रत्येक बाबीला नियम घालून देतो; व नैतिक आचरणाची बाब ही एक त्यांपैकीं महत्त्वाची बाजू आहे. ख्रिस्ती धर्मानें घालून दिलेले मनुष्याच्या आचरणाबद्दलचे नैतिक नियम कोणते व कशा प्रकारचे आहेत हें व्यवस्थितपणें दाखविण्याचा प्रयत्न इ. स. ४ थ्या शतकांत प्रथम झाला, व त्यानंतर आणखी नऊ शतकांनीं ख्रिस्ती धर्मांतील नीतिनियमांना शास्त्रीय स्वरूपांत मांडण्याचें काम खरी तत्त्वनिष्ठा असलेल्या एका बुद्धिमान् इसमानें केलें.

या बाबतींत पहिला मुद्दा म्हटला म्हणजे समाजांत धार्मिक बाबतींत नीतिविषयक स्पष्ट असा कायदा मानणें हा होय.तो कायदा ईश्वरप्रणीत आहे व तो पाळल्यास सुख प्राप्त होईल व मोडल्यास दुःख प्राप्त होईल. सॉक्रेटिसाच्या वेळेपासून असे नीतिविषयक नियम असत. परंतु त्यांस कलमवार लिहिलेल्या कायद्याचें व्यवस्थित स्वरूप आलें नव्हतें. ख्रिस्ती धर्माच्या काळापासून त्याला राजकीय कायद्याइतकें व्यवस्थित स्वरूप प्राप्त झालें. मनुष्याच्या आयुष्यांत येणाऱ्या सर्व प्रसंगांस अनुसरून ईश्वरानें नीतिविषयक नियम केले आहेत व धर्मग्रंथांत दिलेल्या निरनिराळ्या उदाहरणांप्रमाणें ते मानवी व्यवहारास लावावयाचे आहेत; या पद्धतीस प्रथम 'ज्यू' लोकांनीं सुरवात केली व ख्रिस्तधर्मीयांनीं त्याचा सर्वत्र प्रसार केला. नैतिक दिव्यदृष्टि ही बुद्धीपासून उत्पन्न होत नसून ईश्वरी प्रेरणेनें येत असते. बुद्धीला फक्त तिच्या अनुरोधानें अम्मलबजावणी करावयाची असते. हे नीतिशास्त्राचे नियम यहुदी धर्मसंस्थापक 'मोझेस' व त्याच्या मागून झालेले अवतारी पुरुष यांनीं प्रचलित केले.

ईश्वरी कायदा हा ख्रिस्ती लोकांनीं ज्यू लोकांपासूनच घेतला. त्यांतील संस्कारविषयक सर्व भाग गाळून व येशू ख्रिस्तानें व त्याच्या अनुयायांनीं सांगितलेलीं तत्त्वें मिळून त्यांचा धर्मग्रंथ होतो.या कायद्यास धरून राज्यपद्धतींत राजाच्या अधिकाराव्यतिरिक्त व धार्मिक बाबतींत पूर्ण अधिकारी 'चर्च' ही संस्था निर्माण केली.

या संस्थेच्या नियमांत राजकीय कायद्याप्रमाणें प्रत्यक्ष शिक्षा नसते. पापपुण्यानुरूप मरणानंतर आत्म्याला होणारें सुख-दुःख हेंच त्यांचें स्वरूप होतें. परंतु हळू हळू धर्माध्यक्षांनीं त्यांत सुधारणा घडवून आणली. स्वधर्मीय परंतु महत्पातकें करणाऱ्यांपासून तों परधर्मीयांपर्यंत निरनिराळ्या गुन्ह्यांनां पापक्षालनार्थ निरनिराळ्या शिक्षा व संस्कार आखून दिले. तपश्चर्या व धर्मबहिष्कार या नीतिधर्मांच्या दोन शिक्षा झाल्या. जसजसे शिक्षांचे प्रकार वाढत गेले तशा गुन्ह्यांच्याहि व्याख्या करणें क्रमप्राप्त झालें, परंतु ही यहुदी धर्माची कल्पना ख्रिस्ती धर्मास संमत नव्हती. हें कांहीं जरी असलें तरी अंतःकरणशुद्धि हा ख्रिस्ती धर्माचा विशेष समजला जात असे.

ध्येयशुद्धि, सद्गुणाकरतांच सद्वर्तन, विषयव्यसनांचा त्याग हीं प्राक् तत्वज्ञान्यांचीं मतें ख्रिस्ती नीतिशास्त्रास मान्य होतीं. परंतु दोहोंतील फरक चित्तशुद्धि कशाला म्हणावें यांत होता. पूर्वीच्या तत्त्वज्ञान्यांस ज्ञान व शुद्धि हीं समानार्थी वाटत असत. सम्यक्ज्ञान असल्यावर दुर्वर्तन होणें शक्य नाहीं, असें सॉक्रेटिस व त्याचे अनुयायी यांचें मत होतें. परंतु ख्रिस्ती लोकांचा सर्व भर 'श्रद्धा' व 'प्रेम' या दोन मनःस्थितींवर होता.

**श्रद्धाः**—श्रद्धा म्हणजे अदृश्य सृष्टि, ईश्वरप्रणीत कायदे व स्वर्ग-नरकांतील सुखदुःखें या सर्व कल्पनांवर विश्वास. या कल्पना ख्रिस्ती धर्माच्या सुरवातीस बऱ्याच लोकप्रिय होत्या. परंतु पुढें यामध्यें व तत्त्वज्ञानावर अधिष्ठित झालेल्या नीतिनियमांत विरोध उत्पन्न झाला. बौद्धिक कारणें कांहींहि असलीं तरी नैतिक व धार्मिक समजुतीवर दृढ विश्वास ठेवला,यासच श्रद्धा म्हणतात. नैतिकदृष्ट्या सर्व गुन्हेगार सारखेच ही स्टोइक लोकांची कल्पना ख्रिस्ती लोकांस मान्य होती. परंतु श्रद्धेनें त्यांच्या स्थितींत फरक घडवून आणला. श्रद्धेच्या योगानें मनुष्यांस ध्येय गांठण्यास शक्ति प्राप्त होते, व तो स्वतः जरी महत्पातकी व नरकांत जाण्यास योग्य असला तरी येशू ख्रिस्ताच्या उत्कृष्ट कामगिरीमुळें व भयंकर हालअपेष्टा सहन केल्यामुळें ईश्वर आपल्याला क्षमा करील ही जाणीव उत्पन्न होते. यांपैकीं पहिली कल्पना जास्त सरळ व सर्व ख्रिस्तीलोकांत प्रचलित आहे.

**प्रेम व शुद्धिः**—ख्रिस्ती धर्माचा दुसरा विशेष म्हटला म्हणजे ईश्वरावर व सर्व प्राणिमात्रावर प्रेम करणें हा होय. यावरून पुढें शुद्धाचरण, मानसिक शुद्धि व दुष्कृत्याविषयीं पूर्ण तिरस्कार हे उत्पन्न झाले. एकंदरींत ख्रिस्ती नीतिशास्त्राचें सार म्हटलें म्हणजे (१) आज्ञाधारकपणा, (२) विषयपराङ्मुखता, (३) औदार्य, (४) अंतःकरणशुद्धि (५) व विनय यांचा समुच्चय होय.

(१) ज्या अर्थी नीतिशास्त्राचे नियम कोणत्याहि प्रकारची चिकित्सा न करतां कबूल करावे व पाळावे लागतात त्या अर्थी त्या धर्मांत आज्ञाधारकपणा हा गुण मुख्य समजला पाहिजे.

(२) ज्या काळांत पारमार्थिक कल्पनांचा ऐहिक कल्पनांशीं विरोध होता अशा काळांत ख्रिस्ती धर्माचा जन्म झाल्यामुळें संपत्ति, कीर्ति, सत्ता वगैरे ऐहिक गोष्टींविषयीं तिरस्कार प्रथमपासून उत्पन्न झाला व तो स्टोइक लोकांच्यापेक्षां देखील तीव्र स्वरूपांत दिसूं लागला. सर्व जग हें कांहीं काळपर्यंत

सैतानाच्या हातांत सांपडलें आहे, तेव्हां या ठिकाणच्या सर्व गोष्टींपासून विन्मुख होणें याशिवाय आपल्यास दुसरें कांहीं करतां येणार नाहीं. यामुळें शरीरकष्ट, ब्रह्मचर्य, उपवास वगैरे गोष्टींनां महत्त्व प्राप्त झालें.

(३) सुसंस्कृत अशा नीतिशास्त्रांत ख्रिस्ती धर्माला जर कशानें महत्त्व आलें असेल तर तें औदार्य व प्रेम या सद्गुणांवर भर दिल्यानें होय. प्लेटोच्या काळांत इतर प्राणिमात्राशीं स्नेहभाव दाखविणें इतकीच कल्पना होती.पुढें ॲरिस्टाटलच्या काळांत ही मजल मैत्रीपर्यंत गेली. स्टोईक लोकांनीं सर्व मनुष्यजातीविषयीं सहानुभूति असावी ही कल्पना प्रसृत केली आणि ख्रिस्ती धर्मानें सर्व मानवजातीविषयीं प्रेम असावें व त्या दिशेनें दुसऱ्याचें सुख वाढविण्याचा प्रयत्न करावा असें प्रतिपादिलें. या तत्त्वाच्या प्रसारामुळें(१)दुबळीं मुलें टाकून देणें, (२) हिंस्र पशूंबरोबर द्वंद्वयुद्ध करणें व (३)मनुष्यें गुलाम म्हणून विकणें, वगैरे अनिष्ट चाली बंद झाल्या. अनाथालयें व रुग्णालयें उघडण्यांत आलीं.

(४) अंतःकरणशुद्धीच्या नियमांस अनुसरून स्त्रीपुरुषांच्या संबंधींचे नियम करण्यांत आले.

(५) विषयपराङ्मुखता, सत्ता व कीर्ति यांविषयीं औदासिन्य व येशूख्रिस्ताचें चरित्र यामुळें विनय हा विशिष्ठ सद्गुण ख्रिस्ती नीतिशास्त्रानें सांगितला.

ग्रीक तत्त्वज्ञान्यांनां इच्छास्वातंत्र्य ग्राह्य होतें; परंतु त्याचा 'कोणीहि मनुष्य जाणून बुजून आपल्या हिताविरुद्ध वर्तन करीत नाहीं' या तत्त्वाशीं विरोध येत होता. त्याचप्रमाणें ख्रिस्तधर्मीयांनां तें मान्य होतें तरी त्याचा 'सद्गुण हे ईश्वरी प्रसादाचें फळ होय.' या समजुतीशीं विरोध येत होता. या काळांत हा विरोध नाहींसा करण्याचा तत्त्वज्ञान्यांकडून जोराचा प्रयत्न झाला.

ख्रिस्ती धर्म हा ईश्वरप्रणीत असून तो इच्छास्वातंत्र्य असलेल्या लोकांनां सांगितला आहे; त्या धर्माचे नियम आहेत व त्या नियमांच्या उल्लंघनास शिक्षा सांगितल्या आहेत वगैरे अशा प्रकारची ख्रिस्ती धर्माविषयीं कल्पना होती. ख्रिस्तीधर्मीय साधू व ग्रीकांच्या वेळचा तत्त्वज्ञानी यांमध्यें वास्तविक कांहीं फरक नव्हता. परंतु अशा प्रकारचें मत प्रचलित केलेलें ऑगस्टिन यास पसंत नव्हतें.

ऑगस्टिन ( इ. स. ३५४ ते ४३० ):—ईश्वरी कृपेशिवाय ईश्वराचे कायदे पाळतां येणें मनुष्यास शक्य नाहीं असें मत यानें प्रचलित केलें. ईश्वराचे कायदे व त्यांत नमूद केलेल्या शिक्षा ह्या जर मान्य करावयाच्या तर मनुष्यास इच्छास्वातंत्र्य पाहिजे ही गोष्ट त्यास कळत होती; परंतु मनुष्यजात ज्याच्यापासून निर्माण झाली त्या ॲडॅमला हें स्वातंत्र्य होतें. तें असून मनुष्यजातीनें 'पाप' पत्करलें, व त्यामुळें मनुष्यजात ही अंतकालपर्यंत पातकांत पडली. त्यांच्यापैकीं कांहींनां ईश्वरानें पावन करून घेतलें तरच त्यांची मुक्तता होणें शक्य आहे. मनुष्यांत दिसणाऱ्या सद्गुणांनां नैतिक किंमत कांहीं नाहीं. श्रद्धा व प्रेम आणि त्यांपासून उत्पन्न होणारी आशा ही तीन ख्रिस्ती नीतिशास्त्राचीं मूलतत्त्वें आहेत असें तो समजत असे. त्यानें सद्गुणाचे चार प्रकार सांगितले. तेः—( १ ) चातुर्य, ( २ ) समता,(३) धैर्य व(४)न्यायबुद्धि; परंतु हे ईश्वराविषयीं असणाऱ्या प्रेमाचे प्रकार आहेत असें तो समजे. त्याच्या मतांत व स्टोईकपंथी मतांत बरेंच साम्य होतें. परंतु त्यानें लोकांची ऐहिक गोष्टींविषयीं उदासीनता बरीच कमी केली व राज्यांत सुधारणा घडवून आणल्या. हीं सर्व तत्त्वें ऑगस्टिननें आपला गुरु ॲब्रोज याच्या 'डी ऑफिशियस मिनिस्ट्रोरम' नामक ग्रंथांतून घेतलीं.

या दोन तत्त्वज्ञान्यांच्या मतानुसार पुढल्या तत्त्वज्ञान्यांनीं नीतिशास्त्राची मांडणी केली. या काळांत मुख्य सद्गुणांच्या यादीबरोबर महत्पातकांची यादी प्रचलित झाली. पातकांची संख्या प्रथम आठ होती, परंतु सात या आंकड्याविषयीं विशिष्ट कल्पना असल्यामुळें सात प्रचारांत आलीं. तीं अशीं:—गर्व, हांव, क्रोध, खादाडपणा, व्यभिचार, मत्सर,व पोकळ डौल.सातव्या शतकांत या व इतर बारक्यासारक्या पापांच्या यादी व त्याबद्दलच्या शिक्षांचें पुस्तक प्रसिद्ध झालें. पुढें गुन्हा करणाऱ्याच्या मानसिक स्थितीचा विचार करण्यांत येऊं लागला. हा धार्मिक कायदा १४ व्या व १५ व्या शतकांत पूर्णत्वास पोहोंचला.

म ध्य यु ग:—मनुष्याला वर्तनस्वातंत्र्य आहे किंवा नाहीं याविषयीं मध्ययुगांत ॲरिस्टॉटलच्या शिष्यवर्गांत बराच खल होत असे; व प्रत्येकाचीं निरनिराळीं मतें पुढें येत. त्यांत प्रथम इ. स. ८१० ते ८७७ या काळांत होऊन गेलेला एरिजेना हा होय. त्याचें मत 'ईश्वर सत्य,जगत् मिथ्या होय व प्रत्येकानें ईश्वराच्या स्थितीप्रत जाण्याचा प्रयत्न करावा, असें होतें. परंतु हें मत फार दिवस टिकलें नाहीं. पुढें इ. स. १०३३ ते ११०९ मध्यें होऊन गेलेला ॲन्स्लेम यानें आगस्टिनचें 'मनुष्य हा पापी आहे व ईश्वरी कृपेनें त्याचें पापक्षालन होतें,' हें मत प्रचलित केलें. परंतु मनुष्याच्या वर्तनस्वातंत्र्याचा स्पष्ट खुलासा इ.स. १०७९ ते ११४२ त होऊन गेलेल्या ॲबेलार्डनामक पंडितानें केला. 'कृत्यांचा चांगलेवाईटपणा हा मनःस्थितीवर अवलंबून असतो' असें मत त्यानें प्रतिपादिलें.

टॉमस ॲक्विनसः—वर दर्शविलेल्या निरनिराळ्या मतांचें एकीकरण करून त्यास योग्य वळण देणारा टॉमस ॲक्विनस होय.सर्व सृष्टपदार्थांचा एका केंद्राकडे जाण्याचा प्रयत्न आहे. तें केंद्र 'कल्याण' अथवा 'ईश्वर' होय. मनुष्याची उत्कृष्ट कृति म्हणजे ईश्वराविषयीं ज्ञान प्राप्त करून घेणें होय. परंतु हें मानवी बुद्धीच्या पलीकडचें आहे, आणि ईश्वरीकृपेनेंच तें प्राप्त होणें शक्य आहे. मानवी सुखाचे उच्चनीच असे प्रकार आहेत. उत्तम शरीरप्रकृति व सद्वर्तन यांमुळें मिळणारें

शारीरिक व मानसिक सुख हें कनिष्ठ प्रकारचें होय. सद्वर्तनानें होणाऱ्या ईश्वरी कृपेमुळें प्राप्त होणारें सुख उच्च प्रकारचें होय.

नंतर तो सद्गुणांची यादी देतो. ती थोडया फार फरकाशिवाय अॅरिस्टॉटलच्या यादीसारखींच आहे. श्रद्धा, प्रेम व आशा हे तीन सद्गुण याच्या यादींत जास्त आहेत. नीतिशास्त्राचे नियम दिल्यानंतर तो कायद्याकडे वळतो व राजकीय कायदे व नैतिक कायदे यांचा मिलाफ करतो. समाजाचा जो मुख्य अधिकारी असतो त्यानें सामाजिक सुखाकरितां जे हुकूम केले असतात ते कायदे होत. ईश्वर हा सर्व मानवी व इतर प्राण्यांच्या समाजाचा मुख्य आहे.(१)त्याचे हुकूम ते कायदेच होत. ते सर्व प्राण्यांनां लागतात; (२) निसर्गाचे कायदे बुद्धि असलेल्या प्राण्यांनां लागतात; (३) मनुष्यानें केलेले कायदे मानवी समाजास लागतात. (४) दैवी कायदे मनुष्यांनां विशिष्ट प्रेरणेनें प्राप्त होतात. मानवी कायदे मनुष्याच्या प्रत्यक्ष कृतीस लागतात. निसर्गाचे कायदे अस्पष्ट व मोघम स्वरूपाचे असतात. प्रेरणात्मक कायद्याची आवश्यकता आहे. परंतु मनुष्याच्या वर्तनस्वातंत्र्याविषयीं त्याचें निश्चित व स्पष्ट असें मत नाहीं. त्यामुळें त्याच्यावर बरीच टीका झाली. एवंच मध्ययुगांत त्याच्या 'समाथिओलॉजिआ' ग्रंथाइतका चांगला ग्रंथ कोणाचाच झाला नाहीं.

यांच्या नंतरच्या काळांत नीतिनियमांची फार चिकित्सा झाली. या वादांत निरनिराळ्या विद्यालयांतील अध्यापक भाग घेत.योग्यायोग्य वर्तनाचे सूक्ष्म भेद करून व त्याबावतींत काल्पनिक उदाहरणें देऊन एक नीतिनियमांचें स्वतंत्र पुस्तक तयार करण्यांत आलें. एकाच कृत्याच्या योग्यायोग्यतेबद्दल निरनिराळ्या पंडितांचीं (डॉक्टरां) निरनिराळीं मतें पडूं लागलीं. तेव्हां या अडचणींतून बाहेर पडण्याकरितां एक निराळाच मार्ग 'जेसुइट' पंथाच्या लोकांनीं काढला. यायोगानें कोणाला आपलें वर्तन योग्य आहे असें दाखवावयाचें असल्यास त्यानें कोणत्याहि एका पंडिताचें मत आपल्यासारखें आहे असें दाखवावें म्हणजे पुरे होत असे. याचा परिणाम काय झाला तो १७ व्या शतकांत प्रसिद्ध झालेल्या पास्कलच्या पुस्तकावरून दिसून येईल.

धर्मसुधारणा.—या मतमतांराच्या घोंटाळ्यामुळें व त्यापासून देशांत चोहोंकडे माजलेल्या अनीति व धार्मिक जुलमामुळें मार्टिन लूथरनें केलेली धर्मसुधारणा घडून आली. त्यायोगानें धर्मोपदेशकांचा व धर्मगुरूंचा बडेजाव देवळांतील निरनिराळे विधी व मोक्षप्राप्तीच्या बाबतींत धर्माध्यक्ष किंवा त्याचे प्रतिनिधी या सर्वांनां फांटा मिळाला; यामुळें कर्तव्य, नीति, सद्गुण वगैरेसंबंधीं जुन्या समजुतींत कांहींहि फरक झाला नाहीं. नीतिशास्त्राला जें कायद्याचें स्वरूप प्राप्त झालें होतें तें नाहींसें झालें, अॅरिस्टॉटलचें मत ग्राह्य धरण्यांत जी एक प्रकारची मानसिक गुलामगिरी दिसून येत होती तीहि नाहींशी झाली व नीतिशास्त्र आणि तत्त्वज्ञान यांचा स्वतंत्र रीतीनें विचार होऊं लागला.

आधुनिक नीतिशास्त्र.—या प्रकारें निरनिराळ्या पंडितांचीं निरनिराळीं मतें प्रचलित झाल्यामुळें सर्व लोकांस ग्राह्य अशा ग्रंथाची आवश्यकता भासूं लागली. निसर्गाचा कायदा सर्वांस मान्य होईल या समजुतीनें जेंटिलिस व ग्रोटिअस यांनीं सोळाव्या शतकाच्या अखेरीस तो प्रतिपादण्यास सुरवात केली. यांच्या मतें तो ईश्वरी कायद्याचाच एक भाग होय. व त्या ईश्वरी कायद्याचीहि मनुष्यांत दिसून येणाऱ्या स्वभावावरच उभारणी केली आहे. मनुष्यांमध्यें संघ करून सुखासमाधानानें राहण्याची व कांहीं विशिष्ट तत्त्वानुसार वागण्याची जी इच्छा दिसून येते तोच मनुष्य व इतर प्राणी यांमधील भेद होय. हा कायदा स्वभावतःच मनुष्यांस कळतो व त्याची अम्मलबजावणी अनुभवानें करतां येते. ग्रोटिअसनें यासंबंधीच्या बायबलांतील कल्पनांनां पुष्टी देऊन मनुष्य किंवा समाज यांच्यामधील कायद्याप्रमाणेंच राष्ट्रा-राष्ट्रांतील वागणुकीचा कायदा असावा असें प्रतिपादिलें. या मूलभूत मानवी संघासच पुढें संघटित राज्यव्यवस्थेचें स्वरूप प्राप्त झालें. परंतु हा निसर्गाचा कायदा पाळण्याचें मनुष्यांस काय कारण झालें? याला सामाजिक स्वरूप कितीसें आहे? या व अशा प्रकारच्या प्रश्नास इंग्लंडमध्यें इ. स. १५८८ ते १६७९ त होऊन गेलेल्या हॉब्ज नामक पंडितानें उत्तर दिलें.

हॉब्जः—हा जडवादी होता. त्याची नीतिशास्त्राविषयीं मतें मानसशास्त्रांतील विचारांस धरून होतीं. जडशरीर हें खरें व मानसिक भावना ह्या निव्वळ आभास होत. जीवधारणेस पोषक क्रिया सुख होत व शरीरघातक क्रिया दुःख होत, असें त्याचें ठाम मत होतें. सुखप्राप्तीच्या प्रयत्नांचे सहज व सहेतुक असे दोन भाग त्यास कबूल नव्हते. भूतदया, गुणग्राहकता इ. विकार हे स्वार्थमूलक होत. सुख हेंच मनुष्यजातीचें ध्येय असलें पाहिजे. बुद्धि फक्त तें सुख मिळविण्याचे मार्ग सुचविते. प्रथमदर्शनीं हीं मतें एपिक्यूरसच्या मतांसारखीं दिसतात. परंतु हॉब्जचा विशेष हीं जुनीं मतें प्रतिपादण्यांत नाहीं. सुखप्राप्त्यर्थ मनुष्याची प्रवृत्ति असली तरी त्या बाबतींतील नियम योग्य रीतीनें पाळले जातात किंवा नाहीं हें पाहाण्यास राज्यघटनेची आवश्यकता आहे. सदर नियमांच्या अम्मलबजावणीनें सामुदायिक सुख वाढविलें पाहिजे. असें जरी होतें तरी नीतिशास्त्राचे सर्वसाधारण नियम त्याला ग्राह्य होते. "आपण स्वतः जें केलें नसतें तें दुसऱ्यास करावयास लावूं नको किंवा दुसऱ्यास करूं नको" हें तत्त्व जरी उच्च आहे तरी प्रत्येकानें तें गांठण्याचा प्रयत्न करावा असें त्याचें प्रामाणिक मत होतें. यावरून हें स्पष्ट होतें कीं, हॉब्जच्या मतें नीतिनियम हे जुलमी होत. कारण राज्यघटनेनें जे योग्यायोग्य नियम घालून दिले तेच प्रत्येकानें पाळले पाहिजेत; त्यांची

युक्तायुक्तता ठरविण्याचा खाजगी व्यक्तीस अधिकार नाहीं. त्याच्या राज्यव्यवस्थेचा ' सुलतानी ' हा एकच प्रकार होता, व नीतिशास्त्र व राज्यव्यवस्था हीं संलग्न होतीं. मनुष्य हा स्वार्थलोलुप आहे व राज्यव्यवस्था ही एकतंत्री व अमर्याद अशी असली पाहिजे, या दोन विलक्षण मतांचा त्यानें आपल्या ग्रंथांत जरी योग्य मिलाफ केला तरी त्यामुळें लोकांत जागृति उत्पन्न होऊन त्याच्या मतांवर सर्व बाजूंनीं टीका होऊं लागली ती करण्यांत केंब्रिज येथील कडवर्थ, मोअर इत्यादि पंडितांनीं पुढाकार घेतला.

इष्ट-अनिष्ट, मंगल-अमंगल यांत तात्त्विक भेद आहे, तो मनुष्याच्या किंवा ईश्वराच्या मर्जीवर अवलंबून नाहीं, व मनुष्यास त्याची स्थल आणि काल यांच्या जाणिवेप्रमाणें जाणीव होते, वगैरे कडवर्थचीं मतें होतीं. मोअर हा निरनिराळे २३नीतीचे नियम सांगतो. उदा०मंगलाचे गुणकालानुरोधानें निरानिराळे प्रकार होऊं शकतात; उच्च मंगल किंवा कनिष्ठ अमंगल हेंच पत्करावें, प्रत्यक्ष अमंगलापेक्षां मंगलाचा अभावा पत्करावा; वगैरे.

मनुष्यानें आपल्या बांधवांकरितां स्वार्थत्याग कां करावा या बाबतींत हॉब्ज व त्याचे टीकाकार यांच्यामध्यें विरोध होता. ' एकानें सुखानें सुस्थितींत रहावें हें जर चांगलें तर दोघांनीं तसें रहावें हें दुप्पट चांगलें असें कडवर्थनें वरील प्रश्नास उत्तर दिलें.'नीतिशास्त्र ही एक चांगली गोष्ट व सुखानें राहण्याची कला आहे; सद्वर्तनानें जें सुख मिळतें तेंच सुख खरें होय, ' असें मोअरचें या प्रश्नास उत्तर होतें.

यांच्या मागून कल्पक व प्रगल्भ विचारांचा कंबरलंडनामक पंडित होऊन गेला. सर्व लोकांचें हित साधण्यासारखी अवस्था असणें हेंच नीतिनियमांचें सार होय असें त्यानें प्रतिपादिलें व पुढें निघालेल्या उपयुक्ततावादाचें बीजारोपण त्यानें केलें. ' प्रत्येकानें दुसऱ्याचें शक्य तितकें जर चांगलें केलें तर त्या सर्वांचा समुच्चय हा जगांतील उच्च मंगल ( कल्याण )होय ' असें त्यानें प्रतिपादिलें. त्याचें ध्येय नुसतें सुख नसून पूर्णावस्था हेंहि होतें. परंतु वैयक्तिक सुखाची व सामुदायिक सुखाची सांगड कशी घालावयाची हें त्यानें स्पष्ट केलें नाहीं.

लॉकः—ही गोष्ट लॉक या इंग्रज पंडितानें आपल्या ' मानवी बुद्धि ' ( इ. स. १६९० ) नामक ग्रंथांत स्पष्ट करून सांगितली. सुख-दुःख म्हणजे मंगल-अमंगल होय हें हॉब्जचें तत्त्व व नीतिनियम हे राजकीय सत्तेव्यतिरिक्त बंधनकारक आहेत व ते मनुष्यास उपजत ज्ञानानें प्राप्त होतात हें त्याच्या विरोधकांचें तत्त्व, हीं दोन्ही लॉकला मान्य होतीं. या सर्व नियमांचा समुच्चय म्हणजे ईश्वरी कायदा होय. जर सर्वशक्तिमान सर्वज्ञ अशा ईश्वराची आपण कल्पना केली तर गणितशास्त्राच्या तत्त्वाप्रमाणें त्रिकालाबाधित अशीं नीतितत्त्वेंहि आपणांस कळतील. कोणतीहि गोष्ट चांगली किंवा वाईट हें तिच्या कमी-अधिक सुखदायक परिणामावरून ठरवावयास पाहिजे. ग्रोटिअसची निसर्गाच्या कायद्याविषयीं जी कल्पना होती तीच लॉकची होती. याचींच तत्त्वें क्लार्क यानें आपल्या ' ईश्वर व त्याचे गुणधर्म ' या इ. स. १७०४ मध्यें प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांत स्पष्ट केलीं आहेत. भक्ति, समता, परोपकारबुद्धि, गांभीर्य हे चार सद्गुण तो प्रामुख्यानें सांगतो. जें युक्त तें तज्जन्य सुख-दुःखांचा विचार न करतां मनुष्यानें करावें. परंतु अनिष्ट मनोविकारांचा ज्याच्यावर पगडा बसला आहे अशा मनुष्यास हा नियम लावूं नये असें त्याचें म्हणणें असल्यामुळें त्याच्या प्रतिपादनास कमीपणा येतो यामुळें हॉब्जचीं तत्त्वें खोडलीं गेलीं नाहींत व नीतिशास्त्र तात्त्विक पायांवर उभारणें कठिण झालें.

शॅफ्ट्सबरी ( इ. स. १६७१ ते १७१३ ):—बंधुभाव व परोपकारबुद्धि या नीतितत्त्वांची, 'मनुष्य हा समाजप्रिय प्राणी आहे' या तत्वावर उभारणी करून ती प्रामुख्यानें पुढें मांडणारा शॅफ्टसबरी हा होय. समाजव्यतिरिक्त अशा मनुष्याची आपण कल्पनाच करीत नाहीं. जर मनुष्य हा समाजाचा घटक समजून त्याच्या कृतीचा बरेवाईटपणा ठरवावयाचा, तर समाजावर त्याच्या कृतीचा इष्टानिष्ट परिणाम काय होतो, हें पहाणें जरूर आहे. हॉब्जनें कल्पना केलेल्या मनुष्यास जर राज्यव्यवस्थेच्या दाबांतून मोकळा केला तर तो भयंकर अत्याचार करील ! ही आपली मानवी सत्कृत्याची कल्पनाच नाहीं. मनुष्यानें निष्काम बुद्धीनें परोपकार करणें, हाच सद्गुण होय. परंतु इतकेंच सांगून तो थांबत नाहीं. परंतु व्यक्तीचें सुख हें सामुदायिक सुखाचा एक भाग होय, तेव्हां त्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं हेंहि तो त्याबरोबरच सांगतो, या दोहोंचा योग्य मिलाफ करणें यांतच विशेष शहाणपणा आहे. शारीरिक सुखापेक्षां मानसिक सुखास तो जास्त किंमत देतो, आणि त्यांत परोपकारापासून होणारें सुख उच्च प्रकारचें समजतो. याहि पलीकडे जाऊन तो असें म्हणतो कीं, सद्गुणाकरितांच सदाचरण करणें हें श्रेष्ठ होय. प्रत्येक मनुष्यांत अशी सद्गुणप्रेरक बुद्धि असते. अशा प्रकारची कृति करणें हेंच अत्युच्च सुख होय.

शॅफ्ट्सबरीच्या वेळेपासून नीतिशास्त्राचे नियम मानसशास्त्राच्या नियमांस धरून होऊं लागले, व हट्चीसन, ह्यूम, बटलर, इ. पंडित मनाच्या निरनिराळ्या स्थितींचा विचार करूं लागले. शॅफ्ट्सबरीवर धार्मिक व नास्तिक अशा दोन्ही मतांच्या लोकांकडून टीका झाली. या नास्तिकांत मँडेव्हेली हा प्रमुख होता. सद्वर्तन हें मनुष्यास स्वाभाविक असें नाहीं, सद्गुण हे मनुष्यावर जुलमानें लादलेले आहेत, वगैरे त्याचीं मतें होतीं.

बटलरः—यानें मनुष्याच्या मूळ नैतिक स्थितीविषयीं हॉब्जनें जें मत प्रतिपादिलें होतें त्यावर हल्ला केला. हॉब्जचें म्हणणें असें होतें कीं, स्वाभाविकपणें मनुष्यास नीति-अनीति

नसते. नीतीचे नियम हे मुख्यतः आत्मसंरक्षण हा जो मूळ उद्देश तो साधण्याकरितां, समाजांत शांतता रहावी म्हणून केलेले, असतात. याच्या उलट बटलरचें असें म्हणणें होतें कीं, मनुष्यास सदसद्विवेकबुद्धिहि असतेच, ती कृत्रिम नाहीं. मनुष्यांत आत्मसंरक्षणाची इच्छा जितकी प्रबळ असते तितकीच समाजधारणेची असते. स्वहितापासून होणारें सुख व ज्याचा उद्देश सुख नाहीं अशा परहिताच्या गोष्टी केल्यानें होणारा आनंद यांत आपण फरक केला पाहिजे. सुखाची इच्छा, सुखाचा विषय व सुख या तिन्ही गोष्टी भिन्न आहेत.उदा० भुकेचा विषय सुख नसून अन्न हा आहे.तें सेवन केलें असतां सुखकारक परिणाम होतो. ज्या गोष्टी करण्यांत सुख नाहीं किंवा ज्यांत स्वसुखाचा प्रत्यक्ष नाश आहे अशा गोष्टी मनुष्य आपण होऊन करतांना दिसतो तेव्हां अनियंत्रित स्वार्थ हें मनुष्याचें ध्येय असणें शक्य नाहीं. मनुष्यांच्या वासनांनां जर स्वाभाविकपणें नियंत्रण असेल तर तें सदसद्विवेकबुद्धि हेंच असूं शकेल. मनोविकारावर स्वार्थ व सदसद्विवेकबुद्धि या दोहोंचें नियंत्रण असतें हें बटलर कबूल करतो परंतु सदसद्विवेकबुद्धीनें सुचविलेले विचार जास्त स्पष्ट असल्यामुळें तीच मुख्य समजणें शहाणपणाचें होय.

वोलेस्टनः—हींच मतें वोलेस्टननामक पंडिताच्या इ. स. १७२२ त प्रसिद्ध झालेल्या 'निसर्ग-धर्म' नांवाच्या पुस्तकांत आढळून येतात. नैतिक इष्ट व निसर्ग इष्ट हीं भिन्न आहेत व तीं प्राप्त करून घेण्याचा मनुष्याकडून प्रयत्न होत असतो असें यानेंच प्रथम प्रतिपादिलें.

हचिसनः—हा पंडित सद्गुण व परोपकारबुद्धि हीं एकच आहेत असें म्हणतो व तो सद्गुणांच्या निरनिराळ्या प्रकारांची यादी देतो. सदसद्विवेकबुद्धीला नियामक अधिकार आहे हें बटलरचें मत त्यालाहि कबूल आहे. सरळपणा, इमानीपणा, धैर्य, मान वगैरे गुण दुसऱ्या प्रतीचे होत; शास्त्र व कला यांचें ज्ञान हे कनिष्ट दर्जाचे होत. वैयक्तिक व सामुदायिक सुख यांत विरोध येत नाहीं. परोपकारबुद्धीची प्रेरणा स्वार्थमूलक असते असें शॅफ्टसबरीच्या प्रतिपादनांत ध्वनित होतें. त्यास हचिसन असें उत्तर देतो कीं, मृत्यु समीप आला असतां मनुष्याची परोपकारबुद्धि तीव्र होते याला कारण स्वार्थच असतो काय? नाहीं. परंतु क्रियेच्या नैतिक बरेवाईटपणाविषयीं नियम कसे आंखावयाचे हा प्रश्न शिल्लक राहातो. यास त्यानें उत्तर असें- कोणत्याहि कृत्याचे औपचारिक व कळकळीचें असे दोन भाग होतात. ज्या कृत्यानें मनुष्य मनापासून दुसऱ्याचें हित साधतो तें औपचारिक कृत्यापेक्षां जास्त चांगलें. पुढें बेनथॅम व पेली यांनीं उपयुक्ततावादाचें जें तत्त्व प्रस्थापित केलें तेंच अस्पष्ट स्वरूपांत यानें मांडिलें होतें. तें तत्त्व म्हणजे 'जास्त लोकांचें जास्त हित साधणें' हें होय.

ह्यूमः—हाच नियम ह्यूमनें राजकारणांत लागू केला. त्याचें प्रतिपादन त्याच्या 'मानवी स्वभाव' नामक ग्रंथांत आढळून येतें (इ. स. १७३९). प्रथम मनुष्य हा संघ करून राहूं लागतो. पुढें त्याला त्या संघाचे नियम पाळावे लागतात. न्याय, विश्वासूपणा,खरेपणा वगैरे सर्व मनुष्याच्या सोईकरितां निर्माण केलेले सद्गुण होत. आपण कोणत्याहि कृत्याचा बरेवाईटपणा त्याच्या परिणामावरून ठरवितों. येथेंच त्याचा व हचिसनचा विरोध येतो. चांगलें कृत्य करण्याची स्वाभाविक प्रवृत्ति होणें, हा सद्गुण होय असें हचिसनचें मत होतें.

खरेपणा, धैर्य, उद्योगप्रियता, चातुर्य वगैरे सद्गुणांनां स्वार्थबुद्धीशिवाय दुसरें कांहीं अधिष्ठान असलें पाहिजे असें वाटून तें सहानुभूति हेंच असावें असें त्यानें सोदाहरण प्रतिपादिलें. पूर्वीच्या शॅफ्टसबरी व हचिसन यांच्या वैयक्तिक उदारपणाला सांघिक उदारपणाची जोड देऊन, विनय, विनोद, सभ्यपणा, स्वच्छपणा वगैरे समुदायांत जरूर असणाऱ्या सद्गुणांची त्यास पुस्ती जोडली. तारतम्य, सावधपणा, धाडस, उद्योगीपणा, काटकसर, चातुर्य त्याचप्रमाणें, धिमेपणा, चिकाटी, प्रसंगावधान, चपलता, चलाखबुद्धि, समयसूचकता वगैरे सद्गुण एखादा नास्तिक, तुसडा मनुष्य देखील उपयुक्त म्हणून कबूल करील. इतकें सर्व सांगितलें तरी सद्वर्तनाचा हेतु काय हें ह्यूम स्पष्ट सांगत नाहीं. परंतु बुद्धि ही कोणत्याहि कृत्याचें प्रत्यक्ष कारण नाहीं हें मात्र तो स्पष्ट सांगतो.याचें योग्य उत्तर त्याच्याच वेळेस होऊन गेलेल्या ॲडम स्मिथनामक पंडितानें इसवी सन १७५९ मध्यें प्रसिद्ध झालेल्या आपल्या 'नैतिक कल्पनांची उपपत्ति' या नांवाच्या पुस्तकांत दिलें आहे. कोणतेंहि कृत्य करण्याची भावना ज्या विकाराच्या योगानें होते त्या विकाराशीं सहानुभूति हें त्याचें कारण होय. ज्या प्रमाणांत आपले व दुसऱ्याचे विचार जुळतात त्या प्रमाणांत ती क्रिया मनुष्याकडून पुनः पुनः केली जाते. यावरून दुसऱ्याच्या सहानुभूतीच्या प्रमाणांत आपल्या कृत्यांचा चढउतार करावा हें म्हणणें प्राप्त होतें. याच्याच पुढें पाप व पुण्य कसें ठरवावें हा प्रश्न उत्पन्न होतो.कर्त्याच्या कृतीबद्दल तिरस्कार उत्पन्न होईल तेव्हां पाप होय, त्यालाच आपण गुन्हा म्हणतो. सदसद्विवेकबुद्धि म्हणजे काल्पनिक प्रेक्षकाची सहानुभूति होय.

आतांपर्यंत नैतिक कृत्यांच्या उभारणी कशावर झाल्या आहेत हें मानसशास्त्राच्या साहाय्यानें सांगण्याचा जो प्रयत्न झाला त्याचे पुढें अगदीं दोन स्वतंत्र पंथ झाले; (१) मनुष्याच्या मनःस्थितीवरून (प्रेरणेवरून) किंवा (२) कृत्याच्या उपयुक्ततेवरून त्याची नैतिक किंमत ठरविणें हे ते दोन मार्ग होत. डॉ. प्राइस, रीड, स्टुअर्ट वगैरे पंडित पहिल्या मताचे होत व बेनथॅम, पेली इत्यादि दुसऱ्या मताचे होते.

प्राइसः—यानें कडवर्थ व क्लार्क यांचेच विचार थोडा फेरफार करून मांडले. न्याय्य व अन्याय्य यांच्या व्याख्या स्वतंत्रपणें करतां येणें शक्य नाहीं. भावना या सदसद्विवेकबुद्धीपेक्षां कमी दर्जाच्या होत. न्यायान्यायाच्या कल्पना इतरास धरून असतात. नीतीच्या कल्पना मात्र कर्त्याच्या मनावर अवलंबून असतात. तेव्हां बुद्धि आणि उपजत प्रेरणा या दोहोंच्या साहाय्यानें सद्वर्तन घडतें. कोणत्याहि कृत्याचा बरेवाईटपणा हेतूवर अवलंबून असतो हें प्राइस व रीड या दोघांनीं प्रामुख्यानें सांगितलें. स्वतःचें किंवा दुसऱ्याचें सुख वाढविणें या गोष्टीपेक्षां दुसरी कशाचीच स्पष्ट प्रेरणा मनुष्यास होत नाहीं असें प्राइसचें मत होतें.

रीडः—यानें 'मानवी मनाच्या निरनिराळ्या शक्ती' या नांवाचा ग्रंथ इ. स. १७८८ त प्रसिद्ध केला. स्वार्थ व कर्तव्यनिष्ठा हे दोन स्वतंत्र मनोधर्म आहेत. त्यांस व्यवहारांत बुद्धि या एकाच नांवानें संबोधिलें जातें बुद्धि ही नैतिकमनोधर्मांहून श्रेष्ठ होय. प्राईस हा या भावनेस सुख किंवा धर्म समजतो तर रीड हा त्यास सहानुभूति समजतो. ह्या बुद्धीचा विकास होण्यास शिक्षणाची आवश्यकता आहे असें त्याचें मत होतें.

नीतितत्त्वांची उभारणी शास्त्रशुद्ध पायावर करावी ही रीडची आकांक्षा नव्हती. त्यानें या बाबतींत सर्वसाधारण नियम सांगितले ते असेः—मनुष्याच्या वर्तनांत (१) योग्यायोग्य हें असतेंच, (२) परंतु तें वर्तन सहेतुक असलें पाहिजे. (३) आपण आपलें कर्तव्य जाणण्यास शिकलें पाहिजे. (४) परंतु वाईट गोष्टींची भुरळ मनास पडूं न देण्याचा आपण शक्य तितका प्रयत्न केला पाहिजे. त्याचा शिष्य डूगल्ड स्टुअर्ट हा बटलर व रीड यांचीच री ओढतो. परंतु परोपकारबुद्धीपेक्षां न्यायतेला तो जास्त महत्त्व देतो.

व्हेवेलः—हींच तत्त्वें जास्त विशद करण्याचा डॉ. व्हेवेल यानें आपल्या 'नीतिशास्त्राचीं मूलतत्त्वें' या इ. स. १८४६ त प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांत प्रयत्न केला. त्याला नियामक शक्तींतील स्वार्थ (स्वतःविषयीं प्रेम) हें तत्त्व मान्य नव्हतें, आणि त्यास धरूनच सुख हेंच मानवी कृतींचें प्रेरक होय हेंहि त्यास मान्य नव्हतें. नैतिकबुद्धि हें एकच नियामक तत्त्व असून परोपकार, न्याय, सत्य, शुद्धि व सुव्यवस्था हीं पांच मुख्य तत्त्वें होत. हींच समा . लावावयाचीं असल्यास शरीरसंरक्षण, संपत्ति, करार, [illegible] ह व राज्यव्यवस्था ह्या पांच गोष्टी मुख्य होत.

अठराव्या व एकोणिसाव्या शतकांत प्रेरणा व उपयुक्तता या दोन तत्त्वांवर नीतिशास्त्र उभारण्याच्या बाबतींत जो वाद झाला त्यानें त्या शास्त्रास व्यवस्थित स्वरूप यावयास पाहिजे होतें परंतु तसें आलें नाहीं. योग्य काय ? व मी तें कां करावें या प्रश्नांचीं उत्तरें सुख आणि दुःख या दोन तत्त्वांनींच उपयुक्ततावाद्यांनीं दिलीं.

पेलीः—यानें 'नीतिशास्त्र व राजकारण यांचीं मूलतत्त्वें' हा ग्रंथ इ. स. १७८५ मध्यें लिहिला. वरील दोन तत्त्वें ईश्वरी राज्यव्यवस्था गृहीत धरल्यास लागू पडतात. ईश्वरी आज्ञा नैतिक प्रेरणेस कारण होते. ती पाळल्यास स्वर्ग प्राप्त होतो, मोडल्यास नरकयातना भोगाव्या लागतात. ईश्वराच्या आज्ञा धर्मग्रंथावरून कळतात. प्रत्येकानें सद्वर्तनाची संवय लावावी.

बेनथॅमः—याची मांडणी जास्त शास्त्रशुद्ध आहे. तो कोणत्याहि कृतीचा सुखदुःखोत्पादक दृष्टीनेंच विचार करतो. ते परिणाम बुद्धिगम्य व सहज स्पष्ट दिसण्यासारखे असेच असले पाहिजेत. प्रत्यक्ष अनुभवानें सिद्ध होणाऱ्या गोष्टी तेवढ्याच ग्राह्य मानाव्या. शारीरिक, राजकीय, नैतिक व सामाजिक अशीं चार प्रमाणें तो मानतो. व्यक्ति व समाज यांची सांगड घालण्यास सर्वशक्तिमान अशा इच्छेची त्याला जरूरी भासत नाहीं.

राज्यघटना व कायदे या खात्यांत व्यक्ति व समाज यांच्या हिताचा विरोध वारंवार येतो, त्याकरितां शहाणपणानें आपला दृष्टिकोन बदलणें इष्ट असतें. त्यानें सामाजिक नीतिशास्त्राची जशी उभारणी केली तशी वैयक्तिक नियमांची केली नाहीं. तसा त्याच्या शिष्यांनींहि प्रयत्न केला नाहीं. त्याचे कांहीं अनुयायी असें प्रतिपादूं लागले कीं, दुसऱ्याचें जास्तींतजास्त हित साधल्यास आपलेंहि साधतें. कांहीं त्याच्या उपयुक्ततावादास दैवी राज्यव्यवस्थेचें स्वरूप देऊं लागले.

याच्या तत्त्वाचा निरनिराळ्या दृष्टींनीं उपयोग करणें शक्य आहे. (१) धार्मिक बुद्धीनें किंवा साम्यबुद्धीनें; सामुदायिक हित हेंच जर कोणी आपलें ध्येय ठरवील तर त्यांस हें तत्त्व व्यावहारिक मार्गदर्शक होईल; (२) खासगी व सामाजिक हिताचा; ज्या ठिकाणीं विरोध होत नसेल तेथें नियम म्हणून याचा उपयोग होईल; (३) दुसऱ्याचीं कृत्यें चांगलीं किंवा वाईट हें ठरविण्यास हें एक प्रमाण होईल.

जॉन स्टुअर्ट मिलः—मिलनें बेनथॅमच्या तत्त्वांत थोडा फरक केला. सद्गुणाकरितांच सद्वर्तन करण्याची मनाची तयारी झाल्याशिवाय तें उपयुक्ततेप्रमाणें आचरण करण्यास योग्य नाहीं. ही सद्गुणप्रीति नैसर्गिक असते. याची उपपत्ति संगतीच्या नियमानें लावतां येते. सद्वर्तनानें सुरवातीस झालेल्या फायद्यामुळें पुन्हां तसेंच वर्तन घडतें. ही संवय पुढें इतकी प्रबळ होते कीं प्रथम त्यापासून होत असलेला फायदा जरी पुढें नष्ट झाला तरी त्याच प्रकारचें वर्तन चालू ठेवण्याची मनाला इच्छा होते. या सद्वर्तनाचा हेतु स्वार्थ किंवा परोपकार हा नसून यांच्या मिलाफानें उत्पन्न होणारी पूर्वीची भावना होय. न्याय म्हणजे स्वार्थ व सहानुभूति यांनीं शुद्ध झालेला संताप होय, असें मिलचें मत होतें.

ही विचारसंगतीची कल्पना मिलनेंच प्रथम पुढें आणिली असें नाहीं. त्याच्या अगोदर हार्टलें यानें स. १७४८ त हें मत

प्रतिपादिलें होतें, व लॉक आणि ह्यूम यांनीं आपल्या तत्त्वज्ञानांत या कल्पनेचा उपयोग केला होता परंतु प्रेरणावाद्यांनां हें तत्त्व मान्य नव्हतें; ते म्हणतः लहान मुलांत देखील ज्या नैतिक कल्पना आढळून येतात. त्यांनां विचारसंगतीला अवसरच नसतो. परंतु यावर उलट असें उत्तर आहे कीं लहान मुलांत त्या पूर्वजन्मीच्या संस्कारावरून दिसून येतात. अशा पिढीजाद संस्कारानें मनुष्यास निरनिराळ्या गोष्टीचें उपजत ज्ञान मिळतें; हें तत्त्व डार्विनच्या 'नैसर्गिक निवड' या तत्त्वास धरून पुढें आलें.

हा लेख पुरा करण्याच्या अगोदर मनुष्यास इच्छास्वांतंत्र्य आहे कीं नाहीं व असल्यास त्याचें स्वरूप काय यविषयीं निरनिराळ्या लोकांचे विचार काय आहेत तें पाहूं. हें स्वातंत्र्य तीन प्रकारचें असूं शकतें. (१) निरनिराळ्या गोष्टींतून कोणतीहि उचलणें, (२) मनोविकार व विवेकबुद्धि यांच्या झगड्यांत विवेक सांगेल तेंच पसंत करून त्या प्रमाणें वागणें व (३) नेहमीं विवेकबुद्धीच्याच हुकुमाप्रमाणें वागणें.या मुद्यांचा हॉब्ज व त्याच्या नंतर होऊन गेलेले पंडित यांनीं विचार केला नाहीं. निरनिराळ्या विकारांची अदलाबदल म्हणजे विचार होय, व शेवटल्या विचाराप्रमाणें क्रिया घडते, असें हॉब्जचें मत होतें. मनांत विचारांची अतिशय खळबळ उडाली म्हणजे क्रिया घडते असें लॉकचें मत होतें. शॅफ्टसबरी व बटलर हे तर याचा विचारच करीत नाहींत. परंतु रीड, ह्यूम वगैरे प्रेरणावादी लोकांनीं मात्र याचें महत्त्व ओळखिलें.

फ्रेंच नीतिशास्त्राचे इंग्लिश नीतिशास्त्रावर परिणाम बरेच घडून आले. परंतु ते बेनथॅमच्या काळापर्यंत मुळींच दिसून येत नव्हते, कारण बहुतेक सर्व लेखकांनां इंग्लिश पूर्वपरंपरा होती. बेनथॅमच्या मतांवर हेल्व्हेशियनच्या विचारांचा बराच परिणाम झाला.

मनुष्याचे सर्व व्यवहार स्वार्थमूलक असल्यामुळें नीतितत्त्वें म्हणजे समाजाचें सामुदायिक हित साधणाऱ्या गोष्टी होत. तेव्हां सामुदायिक हिताव्यतिरिक्त दुसरें सद्गुणाचें प्रमाण मानणें व्यर्थ होय. कायदे करणाराचें मुख्य कर्तव्य म्हणजे स्वार्थास धरून समाजहित साधण्याकरितां व्यक्तींच्या वर्तनास दिशा लावणें होय. ही विचारसरणी बेनथॅमनें हेल्वेशियसपासून घेतली. पुढें ज्यानें आपल्या आकर्षक लेखनपद्धतीनें उपयुक्ततावादास लोकप्रिय केलें त्या मिलवर ऑगस्ट कोम्ट नामक फ्रेंच पंडिताच्या ग्रंथाचा फार परिणाम झाला. मनुष्यांत संघप्रियतेचा जोर दिवसेंदिवस वाढत जातो.निर्बुद्ध प्राण्यांत व मनुष्यांत जे गुण प्रथम सारखे होते ते कमी होत जातात व निष्कामलोकसंग्रहाची आवड वाढत जाते, वगैरे मतें मिलनें कोम्टपासून घेतलीं. सामाजिक हित जितकें जास्त साधावें तितकें आपलें हित जास्त होतें हें त्याचें तत्त्व बेनथॅमच्या तत्वाच्या अगदीं उलट होतें. बेनथॅमच्या नीतिनियमास स्थानिक वैचित्र्याच्या माहितीची आवश्यकता नव्हती. ते नियम त्रिकालाबाधित असतात असें त्याचें मत होतें परंतु कोम्टच्या ग्रंथांत विकासतत्त्वाची योग्य जाणीव असलेली दिसून येते. स्थलकालानुरूप मनुष्याच्या नीतिविषयक कल्पनांत फरक होतो हें तत्त्व त्याला मान्य होतें.

कान्टः—जर्मन पंडितांच्या विचाराचा पगडा १९ व्या शतकाच्या मध्यापर्यंत इंग्रज लेखकांवर बसलेला मुळींच दिसून येत नाहीं. कान्ट या जर्मन पंडिताचीं मतें प्राइस व रीड या इंग्रज पंडितांच्या मतासारखीं होतीं. मनुष्य हा समंजस प्राणी असल्यामुळें त्यास बुद्धीच्या विशिष्ट हुकुमाप्रमाणें वागलें पाहिजे. कृतीचा चांगलेवाईटपणा हेतूवरूनच ठरविला पाहिजे, आणि हा हेतु नैसर्गिक कलाहून भिन्न असला पाहिजे. कर्तव्य हें कर्तव्य म्हणूनच केलें पाहिजे. सत्कृत्य करण्यापासून होणारा आनंद हा तें कृत्य करण्याचा हेतु असूं शकणार नाहीं, कारण तो कृत्य केल्यानंतर होतो. कोणत्याहि गोष्टीची योग्यायोग्यता ठरविण्याचें औपचारिक व प्रत्यक्ष असें भिन्न कारण असूं शकणार नाहीं, हें व त्यापासून निघणारें कर्तव्य हें, कर्तव्याकरितांच केलें पाहिजे हें तत्त्व कान्टनेंच प्रथम प्रतिपादिलें. हेंच त्याच्या तत्त्वांचें वैशिष्ट्य होय. 'जें तत्त्व सार्वत्रिक कायदा व्हावें असें तुम्हांस वाटेल त्याच तत्त्वाप्रमाणें वागा' हें तत्त्व गृहीत धरल्यास त्यावर सर्व नैतिक नियमांची उभारणी करतां येते. वरील तत्त्व गृहीत धरल्यानंतर वर्तनस्वातंत्र्य ओघानेंच प्राप्त होतें. कर्तव्य व वर्तनस्वातंत्र्य यांची योग्य सांगड घातलेली कांन्टच्या मतांतच दिसून येते. 'स्वतःस आणि दुसऱ्यास नेहमीं साध्य समजून वर्तन कर, साधन समजूं नको, हें दुसरें तत्त्व त्यानें प्रचलित केलें. प्रत्येकाच्या कृत्यांत ज्या अडचणी व विरोध येतात ते पूर्णपणें नाहींसे करणें हाच व्यवहारशास्त्राचा उद्देश होय. आत्म्याचा पूर्ण विकास करणें हें व्यक्तीचें ध्येय होय व प्रत्येकानें दुसऱ्यास तें ध्येय गांठण्यास मदत करणें इतकेंच त्याचें दुसऱ्याच्या बाबतींत कर्तव्य होय. यासच व्यवहारांत सुख म्हणतात. स्वतःचें सुख प्राप्त करून घ्या, हें कोणास सांगावें लागत नाहीं, कारण तें मिळविण्याचा तो निसर्गतःच प्रयत्न करतो. दुसऱ्याचें हित साधा, कारण आपलें हित साधण्यास त्यानें मदत करावी अशी आपली इच्छा असते. तेव्हां नैतिक ध्येय कर्तव्य व सुख मिळून होतें.

हेगेलः—कान्टच्या ( इ. स. १८२१ ) मताविरुद्ध व कांहीं बाबतींत त्यासारखीं मतें हेगेलनें प्रतिपादिलीं. सर्व समंजस प्राण्यांत दिसून येणारी इच्छा अमलांत आणणें हेंच कर्तव्य होय हें कान्टचें तत्व त्याला कबूल होतें.परंतु कान्टच्या मतें हें तत्त्व प्रत्येकाला अंतस्स्फूर्तीनें कळून येतें व हेगेलच्या मतें हें तत्त्व निरनिराळ्या समाजसंस्थांमध्यें आढळून येतें व नंतर मनुष्यास कळतें. या संस्था म्हणजे कुटुंब, समाज व राज्यव्यवस्था ह्या होत. जरी नीतिशास्त्रांत हेगेलच्या मतांचा इंग्रज पंडितांवर विशेष परिणाम झाला नाहीं,तरी कोणत्याहि

शास्त्रांत ऐतिहासिक पद्धतीचा अवलंब करावयाचा हें तत्त्व हेगेलनेंच प्रथम सर्वांनां शिकविलें. असूर्ताकडून मूर्ताकडे येणें हें विश्वाचें आदितत्व होय, आणि स्वतंत्र विचारांचा निरनिराळया सामाजिक व राजकीय संस्थांतून विकास होणें हाच मानवजातीचा इतिहास होय. ( १ ) अनियंत्रित राजसत्ता, ( २ ) नियमित राजसत्ता व प्रजासत्ता ह्या त्या संस्था होत.

एकोणिस व विसावें शतकः—इंग्लंडमध्यें लॉर्ड बेकनच्या काळापर्यंत नीतिशास्त्रविषयक चळवळीवर धार्मिक समजुतींचा व ॲरिस्टॉटलच्या तत्त्वज्ञानाचा फार अंमल असल्यामुळें यूरोपखंडांतील इतर वादापासून हें शास्त्र अगदीं अलिप्त होतें. परंतु बेकनच्या वेळेपासून पुढें मनुष्याच्या वर्तनाचें निरीक्षण करून त्यापासून शास्त्रशुद्ध नैतिक नियम बांधण्याचा प्रयत्न झाला. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत व विसाव्या शतकांत मात्र डार्विनच्या विकासवादानें सर्व प्रकारच्या शास्त्रीय विचारांनां निराळें वळण लावलें. त्याचप्रमाणें जर्मन तत्त्ववेत्ता हेगेल याच्या तत्त्वज्ञानाचा व ऐतिहासिक पद्धतीचा परिणाम झाला.सुख हेंच नैतिक वर्तनाचें ध्येय आहे या जुन्या मताचा बेनथॅम, मिल इत्यादि.उपयुक्ततावादी पंडितांच्या मतांवर बराच परिणाम झालेला दिसून येतो, व सुख हें ध्येय असूं शकणार नाहीं असें त्याच्यानें म्हणवत नाहीं व त्याला सिद्ध करतां येत नाहीं.

डार्विनः—मनुष्य हा ज्याअर्थी कनिष्ठ प्राण्यांतूनच विकासानंतर उत्पन्न झाला त्याअर्थी इतर प्राण्यांस जे नियम तेच मनुष्यप्राण्यास लावणें जरूर आहे. मनुष्यामध्यें व इतर प्राण्यांत कांहीं एकसंबंध नाहीं असें होणें शक्य नाहीं.मनुष्याचें बुद्धिजन्य व समंजस अशा वर्तनाशिवाय बाकीचें वर्तन जर इतर प्राण्यांसारखेंच असतें तर त्या वर्तनांतहि पूर्वीचा कांहीं अवशेष राहिला असला पाहिजे. परंतु समुदायविषयक स्फूर्ति हेंच सद्वर्तनाचें कारण असलें पाहिजे असें तो म्हणत नाहीं. जीवनकलहांत लायकच जिवंत राहूं शकतात हें तत्व नीतिशास्त्रांत लावतां येणार नाहीं; कारण इमानीपणा, सहानुभूति वगैरे गुणांची उपपत्ति लावतां येणार नाहीं.

स्पेन्सरः—नीतिशास्त्र अथवा इतर शास्त्रें यांतील सिद्धांतांची उभारणी प्राणिशास्त्रावर करण्याचा स्पेन्सरनें प्रयत्न केला. या शास्त्रांतील तत्वानुरोधानें कोणत्या कृत्यापासून सुख होतें व कोणत्यापासून दुःख होतें हें पाहून त्यावर नैतिक नियम बसवावे.

स्पेन्सरला सामुदायिक सुख हें ध्येय मान्य नव्हतें,कारण निरनिराळया लोकांच्या सुखाच्या कल्पना स्थलकालानुरोधानें बदलत असतात. तेव्हां ध्येय ठरविण्याचें सुख हें साधन असूं शकेल; स्वतःच ध्येय असूं शकणार नाहीं.मानवजीविताचें अंतिम ध्येय ( कल्याण ) सुख हेंच असलें पाहिजे. ज्या वर्तनानें जीवधारणा होते व दुःखापेक्षां सुख जास्त प्राप्त होतें तें वर्तन चांगलें. न्यायान्यायाच्या कल्पना अनुभवजन्य नसून अंतस्स्फूर्तिजन्य असतात;परंतु त्याची मनुष्यजातींत वाढ आनुवंशिक संस्कारानें होते अशा प्रकारची असंबद्धता स्पेन्सरच्या विचारांत दिसून येते. त्याचीं प्रमाणें वरचेवर बदलतात व निश्चित अनुमान असें त्याच्या लेखांतून निघत नाहीं. त्यानें नीतिशास्त्राचे पूर्ण व अपूर्ण अथवा अन्योन्यसंबद्ध असे दोन भाग केले. जो समाज पूर्णावस्थेस पोहोंचला त्यास पहिले व इतरास दुसरे नियम लागतात. वर्तन जसजसें सुसंबद्ध, निश्चित व विजातीय होत जातें, तसतसें तें अधिक नैतिक होय. या व अशा प्रकारचीं हास्यास्पद अनुमानें त्यानें काढलीं.

अशाच प्रकारची टीका नीतिशास्त्राच्या विकासवादास धरून विचार करणाऱ्या सर्व तत्वज्ञान्यांवर करतां येईल. लेस्लीस्टीफन हा यांपैकींच एक होय. सामुदायिक सुखाऐवजीं सामाजिक आरोग्य हा मुद्दा घेऊन नीतिशास्त्राचा विचार करावा असें तो म्हणतो. नैतिक विकासाचा इतिहास लिहून त्यापासून अनुमानें काढून ते थांबत नाहींत. नैतिक नियम हे स्वयंभू आहेत व ते मनुष्यजातीच्या सुखाकरितां निसर्गानें अमलांत आणले आहेत असें कांहीं विकासवादी प्रतिपादितात. अतिशय असंबद्ध व असंभाव्य मतें फ्रेडरिक नीत्शे याच्या लेखांत आढळतात. बंधुप्रीतीला जरी तो अजीबात फांटा द्यावयास सांगतो तरी समाजांत स्वार्थत्यागमूलक ज्या क्रिया घडतात त्यांचें कारण बंधुप्रीतिविषयक प्रेरणा हें होय असें तो शेवटीं म्हणतो. निराशावादी लोकांवर टीका करतांना तो जें लिहितो त्यांत थोडें फार सत्य आढळून येतें.

टी. एच्. ग्रीनः—विकासवाद्यांवर टीका करणाऱ्यांचा पुढारी ग्रीन हा होता. उत्क्रांतितत्त्वावर नीतिशास्त्राची उभारणी करण्यास ग्रीनची मुख्य हरकत म्हटली म्हणजे निसर्गास अनुसरून नैतिक वर्तनाची उपपत्ति लावतां येणें शक्य नाहीं ही होय.नैतिक जाणीव ही शास्त्रीयज्ञानाचा विषय होऊं शकणार नाहीं. नैतिक जाणिवेचा इतिहास पाहिला तर आत्मज्ञानाच्या प्रादुर्भावाबरोबर दुसरीहि एक जाणीव उत्पन्न होते असें आपल्यास आढळून येईल. ग्रीननें आपल्या नीतिशास्त्राची उभारणी अध्यात्मशास्त्रावर केल्यामुळें त्याच्यावर बरीच टीका झाली. त्यानें प्रतिपादिलेल्या आत्म्याच्या अमरत्वावरहि बरीच टीका झाली. त्यानें निसर्गवाद व सुखवाद यांवर केलेली टीका योग्य आहे. 'आत्मज्ञान किंवा आत्मोन्नति हें नैतिक वर्तनाचें ध्येय होय' हें ग्रीनचें म्हणणें पुष्कळ टीकाकारांनां पटत नाहीं. कारण याचा अर्थ 'वाईट गुणांचा विकास' असा देखील होईल.परंतु ग्रीन नेहमीं स्पष्ट करून सांगतो कीं, आत्मोन्नति म्हणजे आपल्या कल्पनांप्रमाणें जें अत्युत्कृष्ट तें प्राप्त करून घेणें होय. ग्रीनचा ध्येयवाद हा सदाचाराची प्रेरणा व संवय यांवर अधिष्ठित आहे; हाच त्याचा विशेष आहे, आणि त्यानें आपलें तत्वज्ञान ( अध्यात्म ) साधारण माणसाला समजेल अशा नीतीच्या कल्पनांवरच उभारलें आहे.

प्रो. टेलरः—ग्रीनच्या 'प्रोलेगोमेना' नामक ग्रंथामुळेच ब्रॅडले यांचीं नैतिक आणि 'आभास व सत्य' हीं नामांकित पुस्तकें लिहिलीं गेलीं. परंतु त्याच्याच मताचा टेलर याचा 'नीतिविषयक प्रश्न' हा इ. स. १९०१मध्यें प्रसिद्ध झालेला ग्रंथ विशेष महत्त्वाचा होय. याच्या ग्रंथांतील मुख्य मुद्दे असेः—(१) नीतिशास्त्राची उभारणी अध्यात्मावर न करणें, (२) स्वार्थ व बंधुप्रेम यांतील विरोध. पहिल्या मुद्यावर त्याचें असें म्हणणें आहे कीं भौतिकशास्त्रांचा अध्यात्मशास्त्राशीं जसा संबंध नाहीं तसाच नीतिशास्त्राचाहि नाहीं. विश्वाचें आदिकारण व त्याविषयीं अध्यात्मशास्त्राची उपपत्ति यांच्याशीं नीतिशास्त्राचा कांहीं एक संबंध नसून मनुष्याचा प्रत्यक्ष व्यवहाराशीं संबंध आहे; व त्या शास्त्राची उभारणी मानसशास्त्र व समाजशास्त्र यांवरच केली पाहिजे. हें अनुभवजन्य शास्त्रच समजलें पाहिजे. स्वार्थ किंवा बंधुप्रेम यांपैकीं कोणतें एकच ध्येय ठरविणें शक्य नाहीं; या दोन्ही गुणांची योग्य सांगड घातली पाहिजे.

मनुष्याच्या नैतिक कलांवर नीतिशास्त्राच्या तत्त्वांची उभारणी करण्याचा प्रयत्न टेलर करतो. परंतु अध्यात्मशास्त्राशीं या शास्त्राची फारकत केल्यानें नीतितत्त्वाची योग्य उपपत्ति लागत नाहीं व हाच त्याच्या टीकाकारांचा मुद्दा होय. इ. स. १८७० पासून पुढें झालेल्या पंडितांवर ग्रीन, ब्रॅडले व टेलर यांच्याच विचाराचा पगडा बसलेला दिसतो.

मनुष्याच्या नैतिक कल्पनांना योग्य वळण व व्यवस्थित स्वरूप देण्याचा मार्टीनोनें प्रयत्न केला. कोणत्याहि क्रियेच्या कारणांचो त्यानें जी परंपरा दिली आहे ती काल्पनिक आहे असें स्पष्ट दिसतें व सदसद्विवेकबुद्धि हा मनाचा स्वतंत्र धर्म आहे व त्याचे निकाल तावडतोब दिले जातात व ते योग्य असतात हें त्याचें म्हणणें आधुनिक मानसशास्त्रास धरून नाहीं.

त्याच्या नंतर तितक्या योग्यतेचा पंडित सिज्विक हा होय. त्यानें इ. स. १८७४ मध्यें 'नीतिशास्त्राची पद्धति' हा ग्रंथ प्रसिद्ध केला. सिज्विकच्या ध्येयवादाविषयीं मार्टिनोचें फार अनुकूल मत होतें. त्यानें उपयुक्ततावादाची निराळ्या पद्धतीनें मांडणी केली. सिज्विकनें नीतिशास्त्रविषयक विचाराला पद्धतशीर वळण लाविलें. डॉ. रॅशडॉल हा आधुनिक नामांकित पंडिताला सिज्विकचा सुखवाद पसंत नसला तरी त्यास त्याचा बौद्धिक उपयुक्ततावाद पसंत होता.

**इजिप्शियन.**—या प्राचीन लोकांना मनांतल्या गोष्टींची फारशी आवड नसल्यानें, त्यांचे नैतिक विचार फारसे गहन नव्हते व त्यांत परस्परविरोधी पंथहि नव्हते. तथापि त्यांचे विचार उच्च दर्जाचे व पूर्ण नैतिक वळणाचे असत. मनुष्यांतील अतिशय उच्च सद्गुण म्हणजे आपल्या गांवांत चांगलें नांव कमाविणें होय. ऑसिरिससारखे देव नीतीचे संरक्षक होत व ते नैतिक पापपुण्याचा निवाडा करीत. शिक्षा या अर्थी जो इजिप्शियन शब्द आहे त्याचा अक्षरशः अर्थ 'शिकवण' असा आहे, तेव्हां गुन्हा केल्यास शिक्षा कशाकरितां करावयाची यांचें ज्ञान त्यांना होतें असें दिसतें. आतां त्यांच्यांतील विशिष्ट गुणावगुणांसंबंधीं विचार करूं.

मनुष्यहत्या निषिद्ध मानली जाई. तथापि व्यभिचारी बायकोचा जीव घेणें हें अगदीं कायदेशीर समजलें जाई; व हीच शिक्षा तिच्या जाराला मिळे. त्याचप्रमाणें बंदिवान शत्रूंना मारण्याचाहि विधिनिषेध नसे. नरमेध निःसंशय आचारांत असे. यावरून इजिप्शियन हे फार क्रूर वाटतील; पण कैद्यांशीं वागणूक, गुन्हेगारांना शिक्षा आणि धार्मिक बलिदान या बाबतींत सर्वच प्राचीन देशांतील लोक इजिप्शियनांसारखे असत. त्यांच्या खोदलेखांवरून असें दिसतें कीं, हे प्राचीन इजिप्शियन अतिशय शांतताप्रिय व सुस्वभावी असल्यानें त्यांच्या ठिकाणीं क्रौर्य संभवत नाहीं. ते स्वभावानें दयाळु, परोपकारी व आतिथ्यशील होते. वृद्धांना साहाय्य करणें हें अति पुण्यप्रद समजलें जाई. तसेंच आईबापांची आज्ञा पाळणें हें मुलांचें कर्तव्य असून तें त्यानें बजावलेंच पाहिजे त्याचप्रमाणें बापानेंहि मुलाला चांगलें वागविलें पाहिजे. आईला बापापेक्षां जास्त मान दिला जाई व तिच्या कुळांतच वारसा चाले. बायको ही संततीकरितां म्हणून मानिली जाई; तथापि तिला वाईट वागविलें जात नसे. भाऊबहिणींचीं लग्नें होत. बहुपत्नीत्व निषिद्ध नसे; तरी फारसें रूढ नसे. कोणत्याहि तत्कालीन राष्ट्रांतल्यापेक्षां इजिप्तमध्यें स्त्रियांचा दर्जा अधिक उच्च असे.

लग्नापूर्वीचा व्यभिचार फारसा विचारांत घेत नसत. अनीतिमती स्त्रिया बऱ्याच आढळत. सरदार लोकांच्या मेजवानीच्या प्रसंगीं हजर असणाऱ्या नर्तकी, वेश्यावर्गापैकीं असत. धर्माच्या नांवाखालींहि वेश्याव्यवसाय चाले. इजिप्शियन लोक आपलें शरीर व कपडे नमुनेदार स्वच्छ ठेवीत. त्यांच्यांत गुलामगिरीची पद्धत असेच. प्रजेची सर्व संपत्ति राजाची मानिली जाई. या संपत्तीचें दान मालकांना राजाकडून मिळालेलें असे. सर्व जमीनीची पाहाणी व नोंदणी फार बारकाईनें व काळजीपूर्वक केलेली आढळते. इजिप्तमध्यें चोरांचा फार सुळसुळाट असे. मृताबरोबर मौल्यवान वस्तु व जवाहीर पुरण्याच्या पद्धतीमुळें थडगीं उकरणारे चोर तयार होत. सत्यनिष्ठेला मोठा मान असे, तरी खोटें बोलणें हें बऱ्याच वेळां व्यावहारिक व क्षम्य मानिलें जाई. दुसऱ्याचें नुकसान न करतां आपल्या फायद्यासाठीं खोटें बोलणें फार हुषारीचें समजत. कृतज्ञतेला इजिप्शियन शब्द नाहीं. मोठ्या माणसांच्या संगतींत असतांना सभ्यपणें, व समयसूचकता राखून वागावें असें सांगितलें आहे. आपल्या सद्गुणांचा व शहाणपणाचा दिमाख दाखविण्याची संवय हल्लींच्या इजिप्शियनांप्रमाणेंच प्राचीनांनाहि होती. दारू पिणें पाप समजत नसत; दारूचा मनसोक्त आस्वाद घेतला जाई. उद्यमाची किंमत या लोकांना चांगली माहीत होती. शौर्याला उत्तेजन मिळे व विद्याव्यासंगाची सर्वत्र चहा होई; पितृनिष्ठेचें लक्षण म्हणून और्ध्वदेहिक

भक्तिभावानें मुलाला करावें लागे. यांच्यांत उपाध्याय-वर्ग होता. ईश्वर सद्गुणाबद्दल बक्षीस देतो म्हणून आपलें कर्तव्य म्हणून सत्यनिष्ठ राहिलें पाहिजे, अशी शिकवण असे. सारांश ईजिप्शियन लोक आनंदी, रंगेल, चैनी, छांदिष्ट व ढिल्या मनाचे होते असें वरील वर्णनावरून दिसून येईल. तथापि ते दयाळू, परोपकारी व सभ्य असत. ते फारसे हुषार नसत. पण कलाकौशल्याची त्यांनां आवड असे.

के ल्टि क, गॉ ल:—यांच्या चालीरीतींतील कांहीं गोष्टी दिग्दर्शित केल्यास यांची नीतिमत्ता कळून येईल. यांच्यांत नवऱ्यानें भावी पत्नी विकत घ्यावयाची असे. लग्नें वाटेल तेव्हां मोडतां येत. धर्मपत्नीखेरीज नवऱ्याला अनेक रखेल्या ठेवण्याची मोकळीक असे. जारकर्माला कोठें प्रतिबंधच नसे. तथापि स्त्रिया पतिव्रताधर्मानें वागत. वेश्याव्यवसायहि कमी प्रमाणांत नसे. यांच्या बायका फार सुंदर व हुषार असून कधीं कधीं त्या पुरुषांचे कारभारहि पहात. पण त्यांची स्थिति समाधानकारक नसे. गॉल लोक फार क्रूर म्हणून ग्रीक-रोमन लोक त्यांचा तिटकारा करतात. तथापि ते तत्कालीन रानटी लोकांपेक्षां जास्त क्रूर नव्हते. ते नरमेध करीत व आत्महत्याहि करून घेत. पण शौर्यांत त्यांचा हात धरणारा कोणी नसे. ते मद्यासक्त, लोभी पण न्यायी व धर्मभोळे असत; गॉल लोक फार अभिमानी म्हणून प्रसिद्धि आहे.

आयरिश:—जिराल्डस म्हणतो कीं, आयरिश ( प्राचीन ) लोक लग्नें करीत नाहींत किंवा गोत्रगमन टाळीत नाहींत. भाऊ आपल्या विधवा भावजयींशीं गमन करतात ( टोपोग्रॅफी ऑफ आयर्लंड, पृ. १६४ ). गॉल लोकांतल्याप्रमाणेंच रखेल्या ठेवण्याची यांच्यांत चाल असे; व हे क्रूरहि पण तसेच असत. गॉल लोकांप्रमाणेंच आयरिश लोकांचे इतर सद्गुण व दुर्गुण असत. यांच्यात शिस्तीचा तिटकारा असे. विश्वासघाताबद्दल जिराल्डस यां लोकांनां फार दोष देतो. दया व दाक्षिण्य या गुणांबद्दल आयरिश इतिहास व वाङ्मय यांत भरपूर उल्लेख आढळतात. गॉल लोकांप्रमाणेंच अपमानाचा सूड घेण्यास आयरिश लोक सर्वदा अति तत्पर दिसतात. गुलामगिरीची अनिष्ट चाल यांच्यांत पुरातन काळापासून आहे. खुनाची तर त्यांनां दिक्कतच नसे. वृद्धांनां आयरिश लोक फार मान देत. जिराल्डसच्या वेळचे आयरिश फार आळशी व वाईट लोक असत; तथापि गॉलप्रमाणें ते फार स्वच्छ रहात.

वेल्श:—विवाहेच्छू तरुणतरुणींनीं अगोदर एकत्र राहून एकमेकांचा स्वभाव व संततिसंभव पाहिल्याशिवाय हे लोक लग्न करीत नाहींत असें जिराल्डस म्हणतो. आयर्लंडांतल्याप्रमाणेंच या देशांतहि लग्नबंधन शिथिल असे व स्त्रियांनां फाजील स्वातंत्र्य असे. बहुपत्नीत्व कायद्यानें मान्य केलेलें नसे. जारकर्माला मोठीशी शिक्षा नसे; नवऱ्याला भरपाई-रक्कम दिली म्हणजे भागे. आयर्लंडांतल्याप्रमाणें रखेल्या ठेवण्याची चाल बोकाळलेली नव्हती. याचें कारण विवाहित स्त्रियांनां असलेलें फाजील स्वातंत्र्य होय. वेश्यांचें चांगलें संरक्षण करणारे कायदे नसत. वेल्श लोक फार शूर व देशभक्त असत. हे वेळप्रसंगीं कडकडीत उपास काढीत तरी खाण्याचें पुढें आलें कीं त्यावर लांडग्याप्रमाणें तुटून पडत; मग त्यांस सुमार रहात नसे. हे धर्मनिष्ठ व आतिथ्यशालिहि तसेच असत. खून व भ्रातृहत्या यांत हे निर्ढावलेले असून चोऱ्या व दरोडे घालणें हें पाप समजत नसत. ( जिराल्डस, २.२ ) हे निसर्गाविरुद्ध संभोग करीत. कुटुंबांत नवरा हा प्रमुख असे; त्याला वाटेल तें करण्याचा ( बायकामुलांनां मारण्याचाहि ) अधिकार असे. हे बोलण्यांत फार धीट, तरबेज व अलंकारप्रवीण असत. आयरिश लोक जितके मत्सरयुक्त तितकेच हे मत्सररहित असत. यांची रहाणी स्वच्छ असे.

स्कॉ टि श:—प्राचीन काळीं लग्नसंस्था नव्हे: स्त्रीपुरुषांत अनिरुद्ध संबंध घडून येत असे. दहा बारा पुरुष (सामान्यतः भाऊ भाऊ किंवा बाप व मुलें) यांमध्यें एक बायको असे. राजघराणें, सरदार, उपाध्याय व लोक या सर्वांची अनौरस संतति असे. द्विपत्नीत्व व जारकर्म हे सामान्य गुन्हे असत. स्कॉटलंडांत मद्यपान मनसोक्त सुरू असे, इतकें कीं तें कायद्यानें सुद्धां बंद होईना. रेफॉर्मेशनकाळापर्यंत खून व कत्तली या सररहा चालू असत. त्यांचा चोऱ्या करण्याचा धंदा फार मोठ्या प्रमाणावर चालू असे.

## पौरस्त्य नीतिशास्त्र.

भा र ती य—पुनर्जन्मावर विश्वास ठेवल्यानें भारतीय नीतिशास्त्राला निराळाच रंग चढला आहे. वेदसूक्तांतून या पुनर्जन्माबद्दल स्पष्ट उल्लेख नाहीं; किंवा नैतिक विचारहि फारसे आढळत नाहींत. फक्त स्वर्गीय आनंद व नरकयातना यांचा निर्देश केलेला दिसतो. उलट उपनिषदांतून सद्गुणी माणसें ब्राह्मण जन्माला व दुष्ट माणसें चांडाल जन्माला जातात असें सांगितलें आहे ( उदा. छांदोग्य उप. ५. १० ). कर्म व कर्मविपाक ही कल्पना षड्दर्शनें व धर्मसूत्रें यांतून विवेचिली आहे. भारतीय तत्त्वज्ञानाचा उच्चतम हेतु कर्मबंधनांपासून मुक्त होण्याचा आहे. धर्मसूत्रांतून ब्राह्मण जातींत जन्म घेतल्यामुळें उत्पन्न झालेलीं विशिष्ट कर्में निवेदिलीं आहेत. तसेंच पंचव्रत आचरून कर्मबंधनांतून सुटून मोक्ष साधनाची इच्छा करणाऱ्या ब्राह्मण यतींचीं कर्तव्यें विवेचिलीं आहेत.

मनु, महाभारत व इतर अभिजात संस्कृत वाङ्मय यांत दिग्दर्शित झालेल्या पुढील काळच्या ब्राह्मणी धर्मांत जुन्या आतिनियमांची पुनरावृत्ति आहे. त्यांत आध्यात्मिक व सामाजिक श्रेष्ठतेला पोंचण्याचा ब्राह्मणवर्गाचा अधिकार प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. न्यायपीठापुढें अनदीं सत्य तें सांगण्याचा साक्षीदाराला उत्कृष्ट उपदेश केलेला आहे. पण यावर विरजण म्हणूनच कीं काय, श्रेष्ठ जातीच्या

माणसाला मृत्यूपासून सोडविण्याकरितां खोटी साक्ष देण्याला हरकत नाहीं अशी परवानगी ठेविली आहे. गोब्राह्मणांची पवित्रता याखेरीज हिंदूंमधील बऱ्यावाईट गोष्टींच्या कल्पना इतर प्राचीन राष्ट्रांतील कल्पनांप्रमाणेंच आहेत. प्रत्येक पापाला प्रायश्चित्त आहेच. प्रत्येक जातीचीं विशिष्ट कर्मे आहेत तरी पुढील कर्मे सर्वांनां सारखींच बंधनकारक आहेत. क्षमा, सत्यवादित्व, आत्मसंयमन, पावित्र्य, औदार्य, प्राण्याविषयीं पूज्यबुद्धि, वडील माणसांची आज्ञा पाळणें, यात्रा करणें, सहानुभूति, सरळपणा, समाधान वगैरे (विष्णुसूत्र, २. १६ पासून पुढें ). बौद्ध-जैनांप्रमाणें अहिंसाव्रत पाळण्याची त्यांस सक्ति नाहीं. वानप्रस्थाश्रमाचें मोठें पुण्य वर्णिलें आहे. महाभारतांत पौरोहित्यधर्माचा बराच उल्लेख असून हिंदुनीतिशास्त्राचें तें एक ' कोड 'च म्हणतां येईल. यज्ञ, अध्ययन, औदार्य, तपस्या, सत्य, दया, आत्मसंयम आणि निर्लोभता हीं धर्ममार्गाचीं अष्टांगें निवेदिलीं आहेत. महाभारतासारख्या महाकाव्यांतून सामाजिक व गृहसौख्याचीं बरींच हृदयस्पर्शी दृश्यें आढळतात उदा. मुलें आईबापांशीं आज्ञाधारक व वरिष्ठांशीं नम्र आढळतात; आईबाप मुलांवर अत्यंत प्रेम करतात व त्यांच्या सुखासाठीं आपला जीवहि देण्याला तयार असतात; स्त्रिया पतिव्रता आहेत तसेंच पतीहि आपल्या स्त्रियांच्या ठिकाणीं प्रेमासक्त आहेत; कुटुंबांत प्रेम व शांतता नांदत आहे. एकंदर संस्कृत वाङ्मयांतून असा उपदेशपर व लाघवयुक्त ध्वनि उमटत आहे. कल्पित गोष्टींच्या संग्रहांतून तर हा तीव्र भासतो. कारण त्यांत कोल्हे, मांजरें, हत्ती, पोपट, माकडें व इतर प्राणी यांच्या तोंडीं उपदेशपर व नैतिक भावनामय भाषा घातलेली आहे. प्रबोधचंद्रोदयासारख्या संस्कृत काव्यनाटकांतूनहि नीति शिकविली आहे. संस्कृत नैतिक काव्याचा आत्मा म्हणजे दैववाद; हें दैव मागील जन्मीं केलेल्या गोष्टींवर अवलंबून ठेविलेलें असतें. तेव्हां प्रत्येकानें या जन्मीं चांगली वर्तणूक ठेवून पुढील जन्माला नीट वळण द्यावें अशी साहजिक समजूत होते. लिंगायत धर्माचा बसव ( १२ वें शतक ), कबीरपंथसंस्थापक कबीर (१५ वें शतक ), नानक, दादू, आणि चैतन्य ( १६ वें शतक) व इतर असेच नवधर्मसंस्थापक यांची वृत्ति सामान्यतः आपल्या धर्मांत सामाजिक समता उत्पन्न करण्याची होती. पण व्यवहारांत जातिभेदाच्या या निर्मूलन-प्रयत्नाला फारसें यश आलें नाहीं. मोक्षाकरितां भक्तिमार्ग लोकप्रिय होत चालला आहे. पुनर्जन्माची कल्पना सर्व हिंदूंत नाहीं. उदा० मध्यप्रांतांतील सामान्य हिंदु शेतकऱ्याचा पुनर्जन्मावर विश्वास नसून त्याला एवढेंच वाटतें कीं या जगांत जे चांगले वागतात ते मरणोत्तर स्वर्गाला जातात व वाईट लोक नरकांत पडतात. तथापि नीतिमत्तेवर या दोन्ही कल्पनांचा सारखाच परिणाम होतो. आर्यसमाज, ब्राह्मोसमाज यांसारख्या नूतन धार्मिक पंथांच्या उपदेशांत व आचरणांत हिंदुस्थानावर ख्रिस्तीनीतीचा बसत असलेला पगडा दृष्टीस पडतो. उदा० आर्यसमाज हा स्त्री व पुरुष या दोघांनांहि शिक्षण घेण्यास भाग पाडतो व मनुष्यजातीची शारीरिक, बौद्धिक, आध्यात्मिक, नैतिक आणि सामाजिक सुधारणा करून अखिल जगताचें बरें करण्याची हांव धरतो.

बौद्ध नीतीचें स्वतंत्र विवेचन पुढेंच आहे, आतां जैनांची नीति पाहूं. प्राणिजीविताविषयीं आदरबुद्धि दाखविण्यांत जैन बौद्धांपेक्षां पुढें आहेत. (' अहिंसा ' पहा.) जैनभिक्षूनें अहिंसाव्रत कडकपणें पाळून शिवाय बौद्ध व ब्राह्मण यतीप्रमाणें खोटें न बोलण्याची, परवानगीशिवाय अपहार न करण्याची, ब्रह्मचर्य राखण्याची आणि आत्मयज्ञ करण्याची शपथ घेतली पाहिजे. या धार्मिक संप्रदायांत संन्यासव्रताचें फार प्रस्थ आहे. जैन गृहस्थांनीं पाळावयाचे नियम बरेच सौम्य आहेत. आपल्या धर्माकरितां कसलाहि त्याग आनंदानें करण्याची तयारी असलेले गृहस्थ जैन धर्मांत जास्त आढळतील व हाच त्या धर्माचा विशेष आहे. जैन यती निकृष्ट लोकांनां जैनधर्माचें शिक्षण देण्याचें व एकंदर समाजाच्या कल्याणाची खटपट करण्याचें काम आजहि करीत असलेले दिसून येतील.

बौद्ध.—व्यवहारिक गरजांनां तात्त्विक ज्ञानाची दिलेली जोड आणि संन्यासधर्मावर दिलेला विशेष भर हाच बौद्धनीतीचा गाभा म्हणतां येईल. ज्याप्रमाणें बौद्धांचा धर्म तत्त्वज्ञानाशीं विलग न करतां येण्याइतका संयुक्त आहे त्याचप्रमाणें व्यावहारिक गरजा व शिक्षण हीं लक्षांत घेऊन बनविलेल्या नीतिशास्त्राच्या तत्त्वांवर त्यांच्या नीतीची उभारणी आहे. याप्रमाणें तात्त्विक व व्यवहारिक बाजूंची सांगड घालण्यांत बौद्ध नीतिशास्त्रानें सर्वसामान्य हिंदुमताची धाटणी न कळत उचलली आहे असें म्हणावें लागतें. संन्यास धर्मांत त्याचा व हिंदुस्थानांतील इतर धार्मिक पंथांचा फारच थोडा विरोध आहे. सामाजिक संस्था व परंपरा यांच्याशीं चिकटून न रहाण्यांत याचा ब्राह्मणी नीतीशीं मूलभूत विरोध दिसून येतो. बौद्धांनीं प्रत्येकाच्या ज्ञानांत व गुणांत दिसून येणारीं जागतिक सत्यें हींच नीतीला आधारभूत घेतलीं आहेत. थोडक्यांत असें सांगतां येईल कीं, बौद्धनीति ही स्वातंत्र्यवादी व वैयक्तिक तत्त्वाची तर ब्राह्मणीनीति कायदेशीर व सामाजिक तत्त्वाची आहे. बौद्धनीतीनें अंगिकारलेला हा व्यक्तिरूपी पाया व स्वातंत्र्यसिद्धांत भारतधर्मेतिहासांत अगदीं नवीन असून त्यावरच बौद्धसंप्रदायाच्या जागतिक धर्माची उभारणी आहे. व्यक्तीचा नैतिक व बौद्धिक उत्कर्ष हाच बौद्धनीतीचा अंतिम हेतु आहे. बौद्धांच्या व्यावहारिक नीतिशास्त्राचा मुख्य विषय सद्गुण व दुर्गुण यांतील विरोध स्पष्ट करणें हा आहे. या दोन विरुद्ध गुणांचे तक्ते केलेले असून त्यांचा उपयोग वर्गीकरणासाठीं व चटकन् व्यावहारिक उपयोगाकरितां निवड करतां यावी म्हणून आहे. मनुष्य स्वभावांतील मूलभूत दुर्गुण स्वार्थपरता होय; मग त्यापासून काम, छंद वगैरे दुसरे दुर्गुण उपस्थित होतात. निर्वाणाच्या

पैलतीरी नेणारे सद्गुण म्हणजे पारमिता होत. नीतीचा उत्कर्ष करण्यासाठींच संघांची योजना आहे. या संघांत संन्यासी व गृहस्थाश्रमी लोकांचा समावेश होई व विनयपिटकांत दिलेले आचारनियम यांनां नीतिमार्गदर्शक असत ( तिपिटक–बुद्धोत्तरजग, प्र. ११ वें पहा ). आयुष्य पूर्णपणें नैतिक होण्यासाठीं श्रमण झालें पाहिजे असा उपदेश आहे. पण गृहस्थाश्रमांत राहूनहि मोक्ष अजीवात मिळणार नाहीं असें नाहीं. अति पवित्र राहणाऱ्या भिक्षूंत व गृहस्थांत कांहींहि फरक नाहीं असें बुद्धानें एकदां म्हटल्याचें सांगतात. यावरून नैतिक व आध्यात्मिक पूर्णता संपादन करण्याच्या लायकींत आपल्या भिक्षु व गृहस्थाश्रमी शिष्यशाखांत बुद्धानें मोठा फरक केला होतासें दिसत नाहीं. स्त्री–पुरुषसंबंधाविषयीं असेंच म्हणतां येईल. स्त्रियांचें नैसर्गिक दौर्बल्य व व्यंगें यांमुळें, त्या पूर्ण नीतिमत्ता संपादन करण्यास कमी लायक असतात असा सर्वसाधारण समज आहे. बुद्धानें वारंवार स्त्रियांचे दोष व दुर्गुण यांचा पाढा वाचून भिक्षूंनां त्यांच्यापासून अलिप्त राहण्याविषयीं बजाविलें आहे; व त्याचप्रमाणें पुरुषांचा दुष्टपणा स्त्रियांच्या नजरेस आणिला आहे. तेव्हां बुद्ध स्त्रियांनांच नांवें ठेवितो असें नाहीं. पण वैषयिक अनीतींत पुरुष हाच प्रत्यक्ष चळवळ्या असल्यानें बुद्धानें आपल्या पुरुषशिष्यांनां सावध रहाण्याविषयीं बजाविलें आहे.

बौद्धनीतिशास्त्रांत भिक्षु व गृहस्थ यांनां सांगितलेल्या नियमांखेरीज, अहिंसा, अस्तेय, अव्यभिचार असत्यनिषेध व अमादन ( माद न आणणें ) हे पांच सार्वत्रिक नियम आढळतात. धम्मपद व जातककथा यांतून सुंदर नीतिकथा गोंविल्या आहेत; नीतिवचनें तर जागोजाग आहेत. प्रापंचिकासाठीं नीतिधर्म 'पंचशीलें धाम्मिक सुत्तांत' आढळेल.

मु सु ल मा नी.--कुराणांतील नीतिशास्त्र थोडक्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे " विश्वास ठेवा व चांगलें असेल तें करा. " दानधर्माचा कुराणांत वारंवार कळकळीचा उपदेश केलेला आहे. याखेरीज ईश्वरमान्य असे इतर मानवी सद्गुण जे कुराणांत सांगितले आहेत त्यांपैकीं कांहीं सूरनु—बेनीइस्राईल नांवाच्या अध्यायांत ( २३--४० ) अव्यवस्थितपणें मांडलेले आढळतील. मुसुलमानांत नीतिमत्तेचा प्रश्न धार्मिक स्वरूपाचा आहे.बक्षीस व शिक्षा या मुख्यतः परलोकांतल्या गोष्टी आहेत. जे विश्वास ठेवून चांगलें आचरण करतात त्यांनां स्वर्गसुख लाभतें. दारू-जुगार सोडणें, चैनी न करणें वगैरे. पृथ्वीवर केलेल्या आत्मनिग्रहाच्या गोष्टींकरितां त्यांनां परलोकांत त्याच चैनीच्या गोष्टी अक्षय लाभतात. संन्यासधर्माचें बीज इस्लामी संप्रदायांत रुजविण्याचा महंमदानें केलेला प्रयत्न फारसा सफळ झाला नाहीं. कारण अरब लोकांचा कल चैनीकडे असे, पण पुढें चैनीचा कंटाळा आल्यावर संन्यस्तनीतिपंथ निघाला. गूढवादी सूफीपंथ हा त्यांपैकींच आहे.

दंतकथा व म्हणी यांतून मुसुलमानांचें नैतिक तत्त्वज्ञान आढळून येतें. गझ्झलीचें ( इ. स. १०५९--११११ ) नीतितत्त्वज्ञान स्वतंत्र रूपानें लागेल. त्याचा 'इह्या उलूम अल्दीन ' हा नीतिग्रंथ प्रसिद्ध आहे. १८ व्या शतकांत वहाबी चळवळ प्रादुर्भूत झाली. तिचा हेतू मुसुलमानी संप्रदायांतील दोष काढून तिला सात्त्विक स्वरूपाची बनविण्याचा आहे. आज यूरोप व अमेरिका यांतील आधुनिक संस्कृतीचा पगडा या संप्रदायावर बसत चालला आहे. मोरोक्कोपासून मलायाद्वीपसमूहापर्यंत पसरलेल्या मुसुलमानांत वेगवेगळे पंथ आहेत व त्यांचे नैतिक आचारविचारहि वेगवेगळेच आहेत. खोजे व रखेल्या यांच्या स्वरूपांत गुलामगिरी अद्याप त्यांच्यांत नांदत आहे. तथापि या चैनीच्या गोष्टी असल्याकारणानें या गुलामांनां साहजिकच चांगल्या रीतीनें वागविण्यांत येतें. आपला धर्म वाढविणें हें प्रत्येक मुसुलमानाचें कर्तव्य मानिलें जातें. बहुपत्नीत्व शास्त्रसंमत आहे. पण आज आर्थिक परिस्थितीमुळें फक्त कांहीं श्रीमंत मुसुलमानच एकापेक्षां अधिक बायका करतात. घटस्फोट केव्हांहि सहज करतां येतो त्यामुळें तरुण समाजाला चांगलें वळण मिळत नाहीं. स्त्रियांची स्थिति अत्यंत खालावलेली आहे. हे लोक अति धर्मभोळे आहेत. मुसुलमानी अधिकाऱ्यांत फार अनाचार बोकाळलेला दृष्टीस पडतो व त्यामुळें समाजाची व्हावी तशी प्रगति होत नाहीं. फायद्याकरितां खोटें बोलणें हें बऱ्याच राष्ट्रजातींप्रमाणें यांच्यांत गर्हणीय मानीत नाहींत. लहान मुलें व कुलटा बायका यांनां चैनीच्या सर्व गोष्टी पुरवून आपण मात्र पोषाखांत साधे रहाण्याचा बरेच मुसुलमान प्रयत्न करतात. अफू, हशीश इत्यादि मादक पदार्थांचें सेवन पाश्चात्य देशांतील दारूप्रमाणें सार्वत्रिक आहे. तेव्हां आजच्या परिस्थितींत मुसुलमानी धर्मग्रंथाबरहुकूम वागणें कमी संस्कृतीच्या लोकांनां कांहीं फायदेशीर असलें तरी नैतिक प्रगतीला तें हानिकारक होईल.

पा र शी.–अवेस्ता व पह्लवी ग्रंथांतून दिग्दर्शित होणारा झरथुष्ट्रीधर्म हा केवळ नीतिधर्म आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या धार्मिक संप्रदायांत अहुरमझ्द हा पवित्र सदात्मा असून अहरिमन् हा अपवित्र दुरात्मा मानिला आहे. या दोघांत नेहमीं वर्चस्वाविषयीं झगडे चालतात. तेव्हां द्वैताची कल्पना याच्या मुळाशीं आहे. नीति म्हणजे दुरात्म्यांशीं करावा लागणारा झगडा होय; म्हणून तदनुरोधानें मनुष्याचीं याज्ञिक व विधिविषयक कर्तव्यें आंखण्यांत येतात. आजारीपणानंतर हांथरूण स्वच्छ करणें हें केवळ आरोग्याकरितां नसून अंतःस्थित दुरात्म्यांनां झाडून टाकण्याकरितां अवश्य असतें असें पारशी मानितात. सर्व आजार व शारीरिक विटाळ हे सैतानाच्या व मृत्यूच्या राज्यांतील

होत. जाळल्यानें किंवा इतर रीतीनें मृत कुत्र्यांची व माणसांची विल्हेवाट लाविल्यानें पृथ्वी, अग्नि किंवा पाणी यांना विटाळ होईल म्हणून आजचे पारशी लोक ' टावर ऑफ सायलेन्स ' मध्यें स्वर्गीय पक्ष्यांकडून ते खाल्ले जावेत म्हणून मृतांना ठेवितात. पण उलट असा समज आहे की दुष्ट माणसांच्या किंवा हिंस्र प्राण्यांच्या प्रेतांपासून अपवित्रता पसरत नाहीं कारण त्याच्या मृत्यूनंतर दुरात्मा त्यांच्या शरीरांना सोडून जात असतो ( वेंदि. ५. ३५-३८ ).

पारश्यांत नीति म्हणजे एक सुधारणेची कला आहे. झरथुष्ट्राच्या काळीं याचा उपयोग भटक्या व शेतकरी वर्गाला सुधारण्याकडे होत असे. हिंदूंप्रमाणें त्यांच्यांत गोरक्षण ही उच्च धार्मिक नीति मानिली जाई; याखेरीज चांगली शेती करणें, कालवे खणणें, रस्ते व पूल बांधणें, शेतकीचीं हत्यारें तयार करणें यांसारख्या आवश्यक गोष्टी धर्मनिष्ठांचीं कर्तव्यें म्हणून अवेस्तांत उपदेशिली आहेत.

या व्यावहारिक नीतितत्त्वांखेरीज उच्च नीतितत्त्वेंहि पारशी धर्मांत आहेत. मनुष्याचें उत्पादनकार्य हें अतिशय प्रशंसिलेलें आहे. उत्पादनांत किंवा आयुष्यांत बिघाड येईल अशी कोणतीहि गोष्ट करावयाची नाहीं. या कारणाकरितांच या संप्रदायाला संन्यासधर्म मान्य नाहीं. आपल्या स्वतःच्या आयुष्याची व वंशाची काळजी घेण्याखेरीज दुसरीं उच्च व व्यवहारीक कर्तव्यें म्हणजे उद्योगशीलता, मिताहार, काटकसर प्रातर्जागर, सर्व व्यवहारिक गोष्टींत तत्परता हीं होत. सत्यता, ऋजुता, न्याय, श्रद्धा व औदार्य हे गुण आयुष्याला चांगली दिशा लागण्याकरितां पाहिजेत. ' दीना-ई मईनोग-ई खत ' मध्यें ( अ. ३७ ) नाजुक भावना, दया, कृतज्ञता यांसारखे मनुष्यांतले ३३ गुण वर्णन केले आहेत.

याप्रमाणें पारशी संप्रदाय हा खरोखरीच नैतिक धर्म असल्यानें तो पाळण्यासाठीं या समाजाला अहोरात्र खटपट करावी लागते. पारशी उपाध्यायांचें सबंध आयुष्य शुद्धीकरण व भूतापसरण यांकरितां कराव्या लागणाऱ्या धार्मिक विधींत जातें. सर्वांत मोठा गुन्हा म्हणजे पाखंडीपणा होय. गुन्ह्यांना शिक्षा वेंदीदादमध्यें सांगितल्या आहेत. या ग्रंथांत भूतविद्या व नीतिशास्त्र यांची सांगड घातलेली दिसते. पापपुण्याचा शेवटचा निवाड्याचा दिवस असून त्यावेळीं सर्वांची खरी परीक्षा होत असते असा ख्रिस्ती संप्रदायाप्रमाणें या संप्रदायाचाहि समज आहे.

सदाचार व न्यायपद्धति यांची योजना करितां पारशी लोकांनीं उपयुक्तता व व्यवहारीकता यांकडे चांगली नजर पोंचविलेली दिसते. वैयक्तिक आयुष्यांत त्यांच्या नीतिशास्त्राचा उपयोग आत्मनिग्रह व सत्यशीलता यांनां उत्तेजन देण्याकडे होतो तर सामाजिक आयुष्यांत सत्यनिष्ठा, नियमितपणा व सामाजिक एकी करण्याकडे होतो. स्वार्थनिरपेक्षतेच्या भावनांना पारश्यांनीं अजीबात फांटा दिलेला आहे. त्यांच्या धार्मिक विचारांतहि भावना शिरलेल्या नाहींत. तेव्हां त्यांचा अवेस्ताधर्म हा एक कायदाच म्हणतां येईल.

ज पा नी.— जपानी राष्ट्राच्या चिरकालीन इतिहासांत अनेक प्रकारच्या नीती अमलांत येऊन गेल्या. तथापि त्यांतील मूळ सारभूत तत्त्वांत बदल झालेला नाहीं. प्राचीन जपान्यांतलि विशिष्ट नैतिक अंगें आजच्या जपान्यांतहि आढळतील. त्यांतील प्रधान अंग म्हणजे राष्ट्रीयत्व. हें राजघराणें व संस्थान या ठिकाणीं केंद्रीभूत झालेलें दिसून येईल. आजपर्यंत ज्यांत एकाच राजघराण्याकडे गादी चालत आलेली आहे असें उदाहरण जगांत जपानखेरीज दुसरें कोठेंहि नाहीं. तेव्हां अशा पुरातन व पवित्र गादीला जपानी लोक फार मानितात यांत नवल नाहीं. जपानी लोक मिक्याडोकडे पितृप्रेमानें पहातात. तेव्हां प्रत्यक्ष मातापित्यावरील प्रेमाला जपानांत चीनप्रमाणें पहिला दर्जा नसून राजनिष्ठेच्या खालचा दर्जा आहे. प्राचीन जपानी लोक स्वभावानें गरीब, उदार, दयाळु असून ते जगाशीं शांततेनें वागत. तथापि ते खंबीर मनाचे व निधड्या छातीचे असत. आपल्या पितृभूमीकरितां ते हातावर शिर घेऊन तयार असत.

शिंतोधर्म हा जपानचा राष्ट्रधर्म आहे, नीतिधर्म नव्हे. राष्ट्रदेवतांची उपासना, राजा आणि मातापितरें यांविषयीं आदर, राष्ट्रकल्याणासाठीं प्रयत्न व सात्त्विक रहाणी यांची शिकवण शिंतोधर्मांत आहे. बुशिडोधर्मांत लष्करी जातीकरितां नीतिशिक्षा विवेचिली आहे. या धर्माची खरी प्रगति १२ व्या शतकापासून पुढें झाली. ज्याप्रमाणें शिंतो हा राष्ट्राचा देश्य धर्म आहे त्याप्रमाणें बुशिडो ही जपान्यांची राष्ट्रनीति आहे. राजभक्ति, पितृभक्ति व देवभक्ति हीं बुशी वर्गाचीं प्रधान कर्तव्यें समजलीं जात. इतर सद्गुण त्यांच्या अंगीं येतील असे नियम केलेले असत. इ. सनाच्या तिसऱ्या शतकांत कन्फ्यूशिअस संप्रदाय जपानांत शिरला व १७ व्या शतकांत त्यानें तेथें चांगले दिवस पाहिले. हा संप्रदाय जपानांत अद्यापि टिकून राहिला आहे पण तो खालावलेल्या स्थितींत आहे. या संप्रदायाच्या नीतिधर्माला बौद्ध संप्रदायाकडून अति जोराचा धक्का बसला. चीनमधील व जपानमधील कनफ्यूशियन संप्रदायांतील भेद, असें चिनी नीतिशास्त्र स्वर्गोपासनेवर उभारलेलें आहे तर इकडे जपानी लोक पितरात्म्यांची उपासना करतात. चिनी लोक ज्ञानी माणसांना अतिशय मान देतात, व मूर्ख आणि जुलमी राजांना लोकांनीं वाटल्यास गादीवरून काढून टाकावें असें प्रतिपादितात; पण जपानी लोक मिक्याडोंनां अति पवित्र व अदूषित समजतात, चिनी लोक परोपकारिता व पितृभक्ति हे श्रेष्ठ सद्गुण मानितात तर जपानी राजनिष्ठा आणि सदाचार यांनां सर्वांत जास्त किंमत देतात.

बौद्ध संप्रदाय जपानांत शिरल्यापासून (६ वें शतक) त्यानें शिंतोला आत्मसात् केलें. ही जोडी १८७१ सालीं कायम फुटली. बुशिडोधर्मालाहि या संप्रदायाचें बरेंच साहाय्य झालें.

यांतील स्वार्थराहित्य व इच्छामुक्ति हीं तत्त्वें जपानी हृदयांत लवकर शिरलीं. राष्ट्रीय चैतन्यांतील कठोरपणा बौद्ध संप्रदायांतील परोपकारशीलतेच्या शिकवणीनें मृदु पडला व परलोकाची नवीन कल्पना जपान्यांमध्यें त्यानें आणून दिली. सर्व जगताच्या मुळाशीं एक सर्वसामान्य कारण आहे व जगतांतील वस्तूंचा एकमेकाशीं अतिशय गुंतागुंतीचा संबंध आहे या समजुतीवर बौद्ध नीतिशास्त्राची उभारणी आहे. [ साइरो—आउटलाइन्स ऑफ बुद्धिस्ट एथिक्स, १९०३; आर एन्डो—ओरिएंटल एथिक्स. ]

चि नी.—चीनी लोकांचें नीतिशास्त्र म्हणजे कॉन्फ्यूशियन संप्रदायाचें नीतिशास्त्र होय; कारण इतर धर्माचें नीतिशास्त्र चीनमध्यें रुजलें नाहीं. व्यावहारिक नीतीचा अध्यापक म्हणून कन्फ्यूशियसची ख्याति आहे, पण त्याचा यासंबंधीं ग्रंथ असा नाहीं; किंवा नीतिसिद्धांताची व्यवस्थेशीर मांडणीहि त्यानें केलेली नाहीं. त्याचे तुटक व विसंगत बोल त्याच्या अनुयायांनीं गोळा केले आहेत इतकेंच. कन्फ्यूशियसचे अनुयायी जेन ( दानधर्म ), इ (सदाचार), लि ( औचित्य ), चिह् ( ज्ञान ), व हसिन् ( ऋजुता ) हे पांच सद्गुण मानितात. आपल्याला अकारण छळणाऱ्यालाहि क्षमा करून त्याला दया दाखवा हें ख्रिस्तसंप्रदायी तत्त्व कन्फ्यूशियसचें नाहीं. बापाचा खून करणाऱ्याला मुलानें केव्हांहि व कोठेंहि ठार करण्याला तयार असलें पाहिजे असें कन्फ्यूशियसनें एकदां उत्तर दिलेलें आहे. मातृपितृभक्ति व आप्तप्रेम हीं कन्फ्यूशियसच्या सामाजिक व नैतिक संप्रदायाचीं मुख्य अंगें होत ( बुद्धपूर्व जग, उत्तरार्ध पृ. ५८; व 'कन्फ्यूशियस' पहा ). पितरांच्या उपासनेच्या सध्याच्या प्रकाराला व कल्पनेला कन्फ्यूशियसची संमति नाहीं. वाडवडिलांची आठवण ठेवण्यासाठीं श्राद्धें वगैरे पितृ--उपासना करावी असें त्याचें मत होतें. पितरांच्या उपासनेवर परकीय टीकाकार असा आक्षेप आणतात कीं, त्या योगानें रखेल्या ठेवण्याला उत्तेजन मिळतें. चीनमध्यें श्रीमंत लोकांत रखेल्या ठेवण्याची फार चाल आहे; पण कडकडीत नीतिमत्तेचे लोक या चालीविरुद्ध आहेत; बायकोला मुलगा होत नसेल तर मात्र गोष्ट निराळी. कारण त्या बाबतींत पितृयज्ञ अखंड चालविण्यासाठीं मुलांची आवश्यकता भासते व त्यामुळें रखेल्या ठेवाव्या लागतात. [ केबर—दि डॉक्ट्रिन्स ऑफ कन्फ्यूशिअस; गूट—दि रिलिजिअस सिस्टिम ऑफ चायना; मार्टिन—दि लोअर ऑफ कॅथे. ]

**नीपर नदी**—ही नदी रशियांत असून हिचा उगम व्हालडे टेंकड्यांच्या पायथ्याशीं आहे. १४१० मैल वहात जाऊन ही नदी अखेर काळ्या समुद्राला मिळते. डोरोगोबुझपर्यंत हिच्यांत जहाजें चालतात. ह्या नदीचे बरेच कालवे असून हिच्या नौकानयनयोग्य अशा बऱ्याच उपनद्या आहेत. या नदीचा बाल्टिक समुद्राशीं संबंध जोडण्यांत आला आहे.

**नीबुहर, कारस्टेन** ( १७३३–१८१५ )—हा जर्मन प्रवासी एका शेतकऱ्याचा मुलगा असून त्याला लहानपणीं थोडेंच शिक्षण मिळालें. सर्व्हेअर व भूगोलशास्त्रवेत्ता बनण्याकरितां त्यानें गणित वगैरे विषयांचा व अरबी भाषेचाहि अभ्यास केला. ईजिप्त, अरबस्तान व सीरिया या देशांचें शास्त्रीय संशोधन करण्याकरितां डेन्मार्कच्या ५ व्या फ्रेडरिक राजानें जी मंडळी पाठविण्याचें ठरविलें तिच्यांत सामील झाला. स. १७६१ मध्यें या सफरीची मंडळी निघून आलेक्झांड्रियाला उतरली व तेथून नाइल नदीच्या उगमाकडे निघाली. सुवेझला पोहोंचल्यावर नीबुहरनें माउंट सीनायला भेट दिली. नंतर मंडळी जेद्दाला व नंतर मोकाला येथें गेली. नंतर मंडळींनीं येमेनची राजधानी साना हें शहर पाहिलें. पुढें ही मंडळी मुंबईस जात असतां या संशोधकांपैकीं वाटेंत सर्वजण आजारानें मृत्युमुखीं पडून एकटा नीबुहर उरला. तो मुंबईस चवदा महिने राहिला व नंतर मस्कत, बुशायर, शिराझ, पर्सेपोलीस, बाबिलोन, बगदाद, मोसल, अलेप्पो, सायप्रस, ब्रुसा व कान्स्टँटिनोपल या शहरांनां भेट देऊन स. १७६७ च्या नोव्हेंबरांत कोपनहेगनला परत गेला. त्यानें आपल्या सफरींतील देशांचें भूवर्णन, लोक, पुराणवस्तु वगैरेसंबंधानें लिहिलेली अरबस्तानसंबंधीं माहिती प्रमाणभूत मानतात. त्यानें आफ्रिकेच्या अंतर्भागाची व तुर्की साम्राज्याच्या राजकीय व लष्करी परिस्थितीची माहितीहि एका जर्मन मासिकांत प्रसिद्ध केली.

**नीमच**—मध्यहिंदुस्थान, ग्वालेर संस्थान, मंदसोर जिल्ह्यांतील एक शहर. येथें ब्रिटिश लष्करी छावणी आहे. राजपुताना-माळवा-रेल्वेच्या अजमेर-खांडवा शाखेवर नीमच स्टेशन आहे. १९११ सालीं नीमच कँटोनमेंटची लोकसंख्या १२३१८ व गांवाची ४९८९ होती. एका रुक्ष खडकाळ जागेवर हें शहर वसलेलें असून समुद्रसपाटीपासून १६१३ फूट उंच आहे. धान्य, अफू आणि कापूस वगैरे मालांची नेआण चालते. येथें पंडिता रमाबाई मिशन आहे. १८१७ सालीं जेव्हां पेंढारी लोकांनीं लुटालूट चालविली त्यावेळीं त्यांच्यावर दाब बसविण्याकरितां येथें छावणी केली. १८१८ सालीं येथें एक किल्ला बांधण्यांत आला. १८२२ ते २८२५ सालापासून नीमच हें राजपुताना माळवा पोलिटिकल चार्जचें मुख्य ठाणें असून येथें रेसिडेन्ट रहात असे.

१८५७ सालीं झालेली माळव्यांतील गडबड येथेंच सुरू झाली. येथील छावणींतील लोकांत मूळ अस्वास्थ्य दिसून आलें. जून ३ ला एक शिपाई तुकडी उठली तेव्हां यूरोपियनांची बायकामुलें उदेपूरच्या महाराजाकडे आश्रयास गेलीं पण लगेच यूरोपियन अधिकाऱ्यांनीं किल्ला परत घेतला. मंदसोरच्या कोणी छद्मी फिरोजशहानें किल्ल्यास वेढा दिला व आंतील लोकांस दाणागोटा मिळूं देणें बंद केलें. पण नोव्हेंबरच्या शेवटीं 'माळवा फील्ड फोर्स' येऊन त्यांची मुक्तता झाली. १८९५ सालीं जी माळवा एजन्सी निर्माण

करण्यांत आली तिच्याकरितां पोलिटिकल एजन्टचें नीमच हेंच मुख्य ठिकाण समजलें गेलें आहे. येथें एक सरकारी हायस्कूल, तीन चार इस्पितळें व एक जिमखाना क्लब आहे.

**नीरो** ( इ. स. ३७–६८ )—एक रोमन बादशहा. हा प्रेअस डोमिशियस अहेनोबार्बस व धाकटी अॅग्रिपिना यांचा मुलगा, अँटियम येथें जन्मला. त्याच्या तिसऱ्या वर्षीच बाप वारला. नंतर क्लॉडिअस बादशहानें अॅग्रिपिनाला जवळ ठेवून घेतलें आणि आपल्या पहिल्या बायकोला बदफैलीपणाच्या आरोपावरून फांशीं देऊन अॅग्रिपिनाशीं लग्न लावलें. नंतर नीरोला युवराज म्हणून मान्य करून क्लॉडियसनें त्याच्या शिक्षणाची चांगली व्यवस्था केली. इ. स. ५३ त क्लॉडियसची मुलगी ऑक्टेव्हिया हिच्याशीं नीरोचा विवाह झाला. ५४ सालीं अॅग्रिपिनाच्या कारवाईनें क्लॉडियसला विषप्रयोग करून ठार मारण्यांत आलें आणि नीरो बादशहा झाला. नीरोच्या कारकीर्दीचीं पहिलीं पांच वर्षे चांगल्या प्रकारें जाऊन प्रजा संतुष्ट होती. तथापि या काळांत प्रथम अॅग्रिपिनाच्या हातांत राज्यसत्ता होती ती स्वतच्या हातीं घेण्याकरितां नीरोनें अनेक उपायांनीं तिला ५९ सालीं ठार मारविलें. या सुमारास नीरोचें पॉपीआ सॅबिना नांवाच्या श्रीमंत घराण्यांतील स्त्रीवर प्रेम जडलें होतें. तिनें नीरोकडून ऑक्टेव्हियाला ठार मारवून त्याच्याशीं लग्न लावलें. नीरो स्वभावानें गर्विष्ठ, उद्दाम व क्रूर होता. रोमच्या अमलाखालीं असलेल्या ब्रिटिनमधील लोकांनीं याच सुमारास बंड केलें होतें पण तें मोडण्यांत आलें. त्यानंतर इ. स. ६३ मध्यें पॉंपी शहराचा कांहीं भाग भूकंपानें नष्ट झाला. इ. स. ६४ मध्यें रोम शहराला आग लागली. याप्रमाणें एकामागून एक अनर्थकारक व अनिष्ट गोष्टी घडून आल्यामुळें नीरोच्या मनावर परिणाम झाला आणि प्रजेच्या मनालाहि बादशहा अप्रिय वाटूं लागला. रोमवर ईश्वरी कोप झाल्याचा संशय पुष्कळांना येऊं लागला. त्यावर उपाय म्हणून कित्येक धार्मिक विधी करण्यांत आले व कित्येक ख्रिस्ती लोकांना ठार मारण्यांत आलें. चांगल्या सडका व उत्तम राजवाडे बांधण्याचें कामहि नीरोनें चालविलें होतें. या कामाकरितां जो अतोनात पैसा लागला तो प्रांतिक अधिकाऱ्यांनीं प्रजेपासून जुलुमानें वसूल केला. यामुळें नीरोबद्दल सर्वत्र अप्रियता उत्पन्न होऊन त्याला ठार मारण्याचा अनेक थोर इसमांनीं कट केला पण तो उघडकीस आला, आणि कांहींनां फांशी देण्यांत आलें. नंतर त्यानें ग्रीस देशाला भेट देऊन तेथें अनेक प्रकारच्या सामन्यांत स्वतः भाग घेतला. पण पैसा मिळविण्याकरितां कित्येक ग्रीक श्रीमंत गृहस्थांना त्यानें ठार मारलें व देवालयें लुटलीं; यामुळें त्याच्याबद्दल असंतोष वाढत गेला, अनेक कट झाले, व त्यांत खुद्द सीनेटच्या सभासदांचें अंग होतें. बादशाही सैन्य व राजवाड्याचे संरक्षक शिपाईहि त्याच्याशीं बेइमान झाले. तेव्हां तो रोम सोडून पळून गेला. तिकडे त्याला पकडण्याच स्वार गेले असतां नीरोनें आत्महत्या केली.

**नील**—या नांवाच्या अनेक पौराणिक व्यक्ती आहेत. उदा० (१) रामसेनेंतील वानर; यानेंच सेतु बांधला होता. (२) पुरुकुलोत्पन्न अजमीढ यास नीलिनीपासून झालेला पुत्र. भारतीयुद्धांतील एक दुर्योधनपक्षीय राजा व एक पांडवपक्षीय अनूप देशाचा राजा. (३) किष्किंधेच्या दक्षिणेस असणाऱ्या मांहिष्मती नगरीचा राजा; यास राजसूययज्ञकाळीं, सहदेवानें जिंकिलें होतें. पुढें अश्वमेधकाळींहि हा अर्जुनास शरण येऊन साहाय्यक झाला होता. याशिवाय नील म्हणजे कुबेराच्या नवनिर्धींतील आठवा निधि व आपण राहातो याच्या व्युत्क्रम अंगीं असणारा पर्वत.

**नीलकंठ दीक्षित**—भारद्वाजगोत्री, नारायण दीक्षित व भूमिदेवी यांचा पुत्र, आणि अप्पय्या दीक्षित यांचा नातू ( अ. कोशकाराच्या मतें पुतण्या ). यास सर्व शास्त्रांतील थोडथोडेंच परंतु चांगलें ज्ञान होतें. शिवाय यास कविताशक्तीहि होती. कलिविडंबन, गंगावतरण, शांतिविलास हीं काव्यें यानें लिहिलीं आहेत. हा आपल्या बुद्धिचातुर्यानें मदुरा शहराचा राजा तिरुपतिमल्ल नाईक याचा प्रधान झाला. प्रधानकीचें काम चालवीत असतां याच्या कारकीर्दींत प्रजा सुखानें नांदत होती. यानें नीलकंठविजय नांवाचा एक चंपु लिहिला आहे ( १६३३ ), व त्यांत नाना तऱ्हेच्या सर्व देशांचें वर्णन नाटकाच्या पद्धतीवर लिहिलें आहे.

**नीलकंठशास्त्री थत्ते**— हा पंडित वाई येथील राहणारा; हा जातीचा कोकणस्थ ब्राह्मण होता. याचा मुख्य वाणा व्याकरणाचा असे, तरी यानें न्यायशास्त्रादि विषयांत अनेक विद्यार्थी तयार केले. याच्या विद्यार्थ्यांत मोरुशास्त्री गोडबोले, मोरेश्वरशास्त्री साठे; कुप्पाशास्त्री द्रविड, त्र्यंबकशास्त्री शालिग्राम, विनायकशास्त्री दिवेकर इत्यादिक प्रमुख होते. बाळाजीपंत नातू यांची कन्या यांची सून होती.

**नीलकलमी**—नीलकलमी, बीलदी, कोडि, काळादाणा, काकतान-विराइ इत्यादि नांवें या वेलीला आहेत. या सर्पाकृति वळसे घालीत वाढणाऱ्या वेलीची, हिंदुस्थानांत लागवड करतात, पण ती आपोआप देखील वाढते. काळयादाण्याचा जुलाबाच्या औषधाप्रमाणें उपयोग करतात, व जैपाल ( जालाप ) नांवाची औषधाची मुळी जें कार्य करते तेंच कार्य या बिया करतात.

**नीलगिरी**—मद्रास इलाख्यामधील एक जिल्हा. क्षेत्रफळ ९८२चौरस मैल. नीलगिरी या दक्षिण हिंदुस्थानांतील पर्वतांच्या रांगा आहेत; यांच्या भोंवतालच्या प्रदेशाचा नीलगिरी जिल्हा बनविला आहे. जिल्ह्याच्या उत्तरेस म्हैसूर संस्थान असून पूर्वेस व आग्नेयीस कोइम्बतूर जिल्हा आहे. पश्चिमेस व नैर्ऋत्येस मलबार आहे. या जिल्ह्याचे स्वाभाविकपणें दोन अगदीं निरनिराळे विभाग होऊं शकतात. पूर्वघाट व सह्याद्रीचा दक्षिण भाग यांच्या संयोगामुळें तयार झालेला उंच डोंगरसपाटीचा प्रदेश व दुसरा नजीकचाच जरा कमी उंचीचा मलबार वायनदचा भाग. पहिल्या भागांतील प्रदेशाची उंची

सर्वसाधारण ६५०० फूट असून कांहीं कांहीं ठिकाणीं ८००० फूट आहे. एक चौरस मैल जागा देखील सपाट नाहीं अशी ह्या प्रदेशाची ख्याति आहे व तेथें दऱ्याखोऱ्यांतून लहान लहान ' शोलास ' नांवाचीं जंगलें आहेत. यांत उटकमंड व कुन्नुर हे तालुके आहेत.वायनदाच्या नजीकच्या प्रदेशाचा आतां गुडलूरचा तालुका तयार केला आहे व ह्या भागास ' आग्नेय वायनद ' असें नांव मिळालें आहे. हा प्रदेश समुद्रसपाटीपासून २००० ते ३०००फूट उंच असून जमीन सपाट आहे. ह्या भागांत जंगलहि बरेंचसें आहे. पठार असलेल्या उंच प्रदेशाच्या आग्नेय बाजूस ' कुंटा ' नांवाच्या टेंकड्या आहेत. यांची कांहीं कांहीं ठिकाणीं उंची ८००० फुटांवर आहे. मकुर्ति नांवाचें एक शिखर८४०३फूट उंच आहे. उटकमंड हें जिल्ह्याचें मुख्य स्थान असून मद्रास--सरकारचें उन्हाळ्यांत राहण्याचें स्थानहि आहे ( पहा ). दुसरें एक शिखर 'दोडबेट्टा 'नांवाचें ८७६० फूट उंच आहे. जिल्ह्याच्या पश्चिम भागांतून पंडि नदी वहात असून ती बेयपूर नदीस जाऊन मिळते. इतर सर्व नद्या भवानी नदीस जाऊन मिळतात. वाघ, चित्ते, काळवीट, सांबरें, हत्ती वगैरे श्वापदें या जिल्ह्यांत आढळतात. वायनदच्या प्रदेशांत विषारी सर्प पुष्कळ आहेत. पावसाची वार्षिक सरासरी ६७ इंच आहे. वायनदच्या प्रदेशांत पाऊस मुबलक पडतो. देवाला येथें तर सरासरी १६१ इंच व नडुवट्टम येथें १०२ इंच पाऊस पडतो.

इ ति हा स.—ह्या जिल्ह्याच्या पूर्वेतिहासाविषयीं फारशी माहिती नाहीं. १६ व्या शतकाच्या उत्तरार्धांत मदुरेच्या नाईक राजांच्या हद्दींत कोइम्बतुरासमवेत हाहि भाग होता.पुढें एक शतकानंतर तो म्हैसूरच्या हिंदु राजांच्या ताब्यांत गेला. पुढें हैदरअल्ली व त्याचा पुत्र टिप्पू ह्यांनीं ह्या प्रदेशाचें महत्त्व जाणून वायनदकडून म्हैसूरवर स्वारी होऊं नये म्हणून खबरदारी घेण्याकरितां येथील किल्ल्यांची पक्की डागडुजी केली. १७९९ सालीं श्रीरंगपट्टणास टिप्पूच्या पाडावानंतर केलेल्या विभागणींत हा जिल्हा कंपनीसरकारच्या हातीं आला.

निलगिरीवरील डोंगरसपाटीस रमणीय स्वरूप आणण्याचें सर्व श्रेय कोइम्बतूरच्या त्यावेळच्या कलेक्टर जॉन सुलीव्हन याच्याकडे आहे. १८६७ सालीं उटकमंड हें मद्रास इलाख्याचें थंड हवेचें ठिकाण म्हणून निवडण्यांत आलें ( ' उटकमंड ' पहा ). कोटगिरीजवळ अगदीं जुन्या तऱ्हेचीं थडगीं आहेत. कांहीं तोडा नामक मूळ रहिवाश्यांच्या वेळचीं थडगीं उकरलीं असून त्यांमध्यें शस्त्रास्त्रें, भांडीं वगैरे सांपडलीं आहेत.

येथें उदेयारकोट,हुलिकलदुर्ग व मालीकोट असे तीन किल्ले आहेत. मालीकोट उटकमंडच्या वायव्येस ५ मैलांवर असून टिप्पूसुलतान हा किल्ला उपयोगांत आणीत असे. त्यानें ह्याचें नांव हुसेनाबाद ठेवलें होतें. १८२७ सालीं जेव्हां उटकमंड येथें बिशप डौनहौसचा पाया खणला गेला त्यावेळीं येथें रोमन सोन्याचें नाणें सापडलें आहे. व दोडबेट्टा येथेंहि असेंच कांहीं सांपडलें असल्यामुळें असें अनुमान निघतें कीं येथें पूर्वी सोन्याची खाण वगैरे कांहीं तरी असून परदेशीय व्यापाऱ्यांची वसाहत होती. सध्यां येथील कुरुम्बा लोक सोन्याच्या खाणींत काम करतात.

१८७७ सालीं आग्नेय वायनदचा भाग त्या जिल्ह्यास जोडण्यांत आला. तेव्हांपासून ह्याची लोकसंख्या वाढली. आहे. १९२१ सालीं ती १२६५१९ होती.कॉफीच्या मळ्याचा धंदा खालावल्यापासून ह्या जिल्ह्याची लोकसंख्या जरा खालावली आहे. उटकमंड व कुन्नूर हीं दोन उन्हाळ्यांत रहावयाचीं ठिकाणें केल्यामुळें व वेलिंग्टन येथें छावणी आणल्यामुळें, त्याप्रमाणें ह्या भागांत दुष्काळाचा फेरा कधींहि न आल्यामुळें ह्या जिल्ह्याची लोकसंख्या दिवसेंदिवस वाढत आहे. उटकमंड व कुन्नूर हीं दोन मोठीं गांवें आहेत. उटकमंड, कुन्नूर व गुदलूर असे एकंदर तीन तालुके ह्या जिल्ह्यांत आहेत. एकंदर खेडीं ४९ आहेत. हिंदूंची लोकसंख्या शेकडा ८२ आहे व मुसुलमानांपेक्षां ख्रिस्ती लोकांची संख्या जास्ती आहे. तामिळ, बगडा, कानडी, मल्याळम्, तेलगू हिंदुस्थानी, इंग्रजी व कुरुंबा अशा एकंदर आठ भाषा येथें बोलल्या जातात. येथें ब्राह्मणांची वस्ती फार कमी आहे; हजारांस सात असें ब्राह्मणांचें प्रमाण पडतें. हिंदु धर्मीय लोकांत देखील पोटभेद व ज्ञाती बऱ्याच आहेत. बडगा, पराया, वेल्लाळ, कुरुम्बा, चेटी, कोटा व तोडा हीं त्यांची नांवें, असून पराया लोक मोलमजुरीधंदा, वेल्लाळ शेतकीधंदा व चेटी व्यापारधंदा करतात.

हा प्रदेश उंच असल्यामुळें इलाख्यांतील इतर जिल्ह्यापेक्षां ह्या भागाची शेतकीविषयक स्थिति जरा निराळी आहे. काळी चिकण जमीन सर्वांत सुपीक आहे.नंतर एक तऱ्हेच्या तपकिरी रंगाच्या मातीचा नंबर लागतो. पिंवळी व लाल अशी अगदी कमी दर्जाची जमीन असून तींत चांगलें पीक उत्पन्न करावयाचें असल्यास चांगल्या खताची जरूरी असते. वायनदच्या प्रदेशांत पाणथळ भागांत धान्य वगैरे पेरतात. पाऊन बराच पडणाऱ्या भागांत तांदुळाचेंहि पीक काढतात. येथील जमीन इतकी सुपीक आहे कीं येथें खताची फार कमी जरूरी असते. डोंगरसपाटीवर कमी पाणी लागणारीं धान्यें पेरतात.

निलगिरीमध्यें जमीनदाऱ्या किंवा इनामी जमाती नाहींत. सर्व जमीन रयतवारी पद्धतीवर आहे. सुमारें५०० चौरस मैल जमीन जंगलच आहे. कालव्यानें किंवा इतर कोणत्याहि तऱ्हेनें पाणी खेळविण्याची सोय केलेली नाहीं. येथें कॉफीची लागवड बरीच करतात. किंबहुना सर्वांत महत्त्वाचें पीक हेंच आहे असें म्हणावें लागतें. १८७६ सालीं ऑक्टरलोनी खोऱ्यांत ४००० एकर पेक्षां अधिक जमिनींत कॉफीची लागवड केली होती. १९०३–०४ सालीं २६००० एकर जागा कॉफीच्या लागवडीकडे घेण्यांत आली होती. पैकीं अर्ध्याहून अधिक जागा कुन्नूर तालुक्यांत आहे. १९०३–०४ सालीं

तिन्ही तालुक्यांत मिळून ८००० एकर जमीन चहाच्या मळ्यांनीं व्यापलेली होती. सध्यां लागवड वाढत्या प्रमाणावर आहे. १ हजार एकरपेक्षां अधिक जमीन सिंकोनाच्या लागवडीकरितां घेण्यांत आली आहे. नडूवत्तम येथें क्विनाईन तयार करण्याचा एक कारखाना आहे.

वायनदच्या प्रदेशांत फक्त तांदूळ होतो. डोंगराच्या उतारांतील मदुमलई, बीन, सिगूर हीं तीन मोठ्यापैकीं जंगलें राखून ठेवलेलीं आहेत. ह्या राखून ठेवलेल्या जंगलांत सागवानी लांकूड फार उत्तमपैकीं होतें. सिगूरच्या जंगलांत चंदनाचें लांकूड चांगल्यापैकीं होतें. लोखंड, अभ्रक, सुवर्णरजमिश्रित स्फटिक वगैरे खनिज पदार्थ आहेत. कोटगिरीजवळ करझोल येथें लोखंड पुष्कळ सापडतें. वायनदमध्यें अभ्रक व सुवर्णरजमिश्रित स्फटिक सांपडतात. ह्या जिल्ह्यांत दारूच्या भट्ट्या खूप आहेत. अरवणघाट खोऱ्यांत विनधुराची बंदुकीची दारू तयार करण्याचा सरकारी कारखाना आहे.

या जिल्ह्यांत उत्पन्न होणारा तांदूळ व रागी येथील लोकांस पुरण्याइतका नसल्यामुळें म्हैसूर इलाख्यांतून बराच तांदूळ आणावा लागतो. उटकमंड, कुन्नूर, कोटगिरी व गुडलूर येथें मोठे बाजार भरतात. कॉफी, चहा, सिंकोनाची साल, क्विनाईन व दारू ह्या निर्गत माल आहे. व्यापार बहुतेक अंशीं मुसुलमान लोकांच्या हातीं असून बहुतेक माल कालिकत बंदरांत पाठविला जातो.

सन १८३० पावेतों निलगिरी हा कोईम्बतूर जिल्ह्याचा भाग होता व स.१८६८ पर्यंत तर हा कोईम्बतूर जिल्ह्याचा तालुका होता. पण तदनंतर कांहीं वर्षेंपर्यंत हा एका कमिशनरच्या हाताखालीं वेगळा जिल्हा होता. पण १८८२ सालीं पुन्हां सर्व व्यवस्था करून हा जिल्हा एका कलेक्टरच्या ताब्यांत देण्यांत आला.

नवीन 'वेस्टलन्ड रूल्स' मुळें मुर्तिपद्धतीस खो बसला. डोंगरसपाटीवरील सर्व जमिनीवर तोडा लोक, आपला हक्क आहे असें समजत असत. त्याप्रमाणें प्रत्येकाच्या झोंपडीभोंवतीं ११ एकर जागा देण्यांत आली, व ती त्यांच्या मालकीची जागा समजण्यांत येत आहे. चार नाडांची ( विभागांची ) छत्तीस खेड्यांत विभागणी करून धारावंदी करण्यांत आली. पिकाऊ जमिनीची त्या जमिनींत उत्पन्न करण्याच्या शक्तीवर विभागणी केली. जमिनीच्या उत्पन्नाप्रमाणें व काळेपणा, खडकाळपणा ह्या तत्त्वांवर वर्गीकरण न करतां एकंदर चार विभागांचें ३६६. सारा देणाऱ्या खेड्यांत वर्गीकरण करण्यांत आलें. वायनदच्या प्रदेशाची वेगळी धारावंदी १८८७ सालीं करण्यांत आली. नमवलकोद, मननाद, व चेरनकोद ह्या तीन 'अमसम'ची १२ खेड्यांत विभागणी करण्यांत आली; पैकीं आठ 'जनमी' आहेत. ह्या वेगळ्या वेगळ्या पाटलांच्या ताब्यांत असून उरलेल्या चार जनमी सरकारच्या ताब्यांत आहेत. सिगूर घाटाच्या पायथ्याची 'जमीन' व मोयार नदीच्या भागांत साधी रयतवारी पद्धत अमलांत आहे. जमनिसाराउत्पन्न सुमारें दीड लाख रुपये व एकंदर उत्पन्न साडेसात लाख रुपये आहे. उटकमंड व कुनूरच्या म्युनिसिपालिटया सोडून सर्व व्यवस्था डिस्ट्रिक्ट बोर्डच्या ताब्यांत आहे. वेलिंगटन ही छावणीची जागा आहे.

शेंकडा १२ लोकांस लिहितां वाचतां येतें गुडलूर तालुका शिक्षणाच्या बाबतींत मागसलेला आहे असें म्हणावें लागतें.

**नीलगिरीवरील लोक**—नीलगिरी पर्वतावरचे मूळचे लोक म्हणजे बडगा, इरुल, कुरुंबा, कोटा, व तोडा हे होत. इरुल व कुरुंबा लोकांची माहिती त्या त्या नांवाखालीं दिलेली आहे; बाकीच्यांची माहिती येथें थोडक्यांत दिली आहे.

**ब ड गा**.—हे शैवसंप्रदायी आहेत. विजयानगरचें राज्य मोडल्यानंतर म्हैसूरांतून हे नीलगिरी येथें ३५० वर्षांपूर्वी आले. हे तोडा लोकांस कर देतात. सरकारकडून सवलतीच्या दरानें जमिनी घेऊन कसतात. हे लोक अपभ्रष्ट कानडी भाषा बोलतात.

**को टा**.—यांनां कोटार, कोटेर, अशींहि नांवें आहेत.यांची जात अजून बनली नाहीं.यांच्या समाजास केरी हें नांव आहे. यांचा बांधा मध्यम उंचीचा,तांबूस रंगाचा पण सुंदर असतो. स्त्रिया मात्र पुरुषांइतक्या सुंदर नसतात. एका गांवांत ३० ते ६० झोंपड्या असतात.पैकीं एक दोन झोंपड्या विटाळशांकरितां राखून ठेवलेल्या असतात. हे लोक भातशेती करतात. शिवाय हे कारागीर असून सोनार, सुतार, लोहारकाम, कातडीं कमाविणें, दोऱ्या वळणें, छत्र्या तयार करणें इत्यादि कामें करतात.बायका कुंभारकाम करतात.तोडा लोकांप्रमाणें घराचा मालकी हक्क लहान मुलासच द्यावा लागतो. आई त्याच्याचजवळ राहते. शिल्लक राहिलेली संपत्ति सर्वांत सारखी वांटतात व लहानासहि त्यांतला वांटा मिळतोच.हे लोक तोडा लोकांस गुतु नांवाचा कर देतात व तोडा लोक यांच्या सणाच्या दिवशीं आपल्या पंक्तीचा लाभ यांनां देतात. यांच्या देवाचें नांव कामतराय असें आहे.त्याच्या घर्मबिंदूपासून तोडा, कुरुंबा व कोटा लोक उत्पन्न झाले असें समजतात. यांच्यांत 'कवटा' नांवाचा 'कामतराय' देवाचा मोठा सण असतो, तो १५ दिवस चालतो.

बायकोच्या गर्भारपणीं नवरा नखें व केस वाढवितो. मुलांचीं लग्नें १५ ते २० वर्षांपर्यंत व मुलींचीं ६ ते ८ वर्षांपर्यंत करितात. लग्नविधींत मुलीची सासू तिच्या गळ्यांत ताली बांधते. कोठें कोठें वर वधूकडे जाऊन ताली बांधून येतो. यांच्यांत कोणत्याच दंतकथा उपलब्ध नाहींत.

**तो डा**.—यांची संख्या सुमारें ७०० आहे. यांच्यांत दोन वर्ग आहेत; देवालयाल व तरसरझाल. या दोहोंत परस्परविवाह होत नाहींत. देवलयालांच्या बायका तरसरझाल लोकांच्या गांवांत देखील जात नाहींत पण तरसरझाल बायका मात्र यांच्याकडे येतात. डोळे पाणीदार, काळे

तुळतुळीत केस, सुरेख दांत व साधारण उंची अशी ठेवण असते. बायकांचे केस कुरळे असून पुरुष लांब केस वाढवितात. हे लोक ५ झोंपड्यांच्या घरांत राहतात. पैकीं ३ झोंपड्यांत माणसें राहतात, चवथींत दुभतें ठेवतात व राहिलेल्या झोंपडींत गुरें बांधतात. यांच्या गुरांवर यांची पूर्ण मालकी असते पण त्यांचें दूध काढून तें दुभत्यांत ठेवण्याचें काम पुजाऱ्याकडे असतें. प्रत्येक कुटुंबांतील मुख्याच्या नांवानें सरकारांतून त्यास पट्टा मिळतो. तो मेल्यावर त्याची जागा वडील मुलास मिळते. बापाची संपत्ति मुलांत सारखी वांटली जाते. हे कोणताच इतर उद्योग करीत नाहींत. गुरें पाळणें व शेतकी करणें यांवरच यांचा निर्वाह होतो. पूर्वी हे म्हशीचें पारडू मारून खात. पण आतां सुधारलेल्या हिंदूंच्या साहचर्यानें यांस तसें करण्याची लाज वाटते. बहुपतित्वाची चाल आतां यांच्यांतून मोडत चालली आहे. तरीपण सर्व भाऊ एकाच बायकोवर काम भागवितात. निरनिराळ्या झोंपड्या बांधून पाळीनें बायकोला जवळ ठेवतात. म्हशी व त्यांचें दूध यांसंबंधानेंच तोडा लोकांचे सर्व धार्मिक विधी आहेत. दूधघरें हीं यांचीं देवळें व यांची व्यवस्था पाहणारे ते यांचे उपाध्याय होत. उपाध्याय ५ प्रकारचे आहेत तेः— (१) पालाल—हे पवित्र समजले जातात. (२) वरझाल-यांनां पालालासारखे तप करावें लागत नाहीं. यांच्याकडे गांवांतील गुरांचें दूध काढण्याचें काम असतें. यांची नेमणूक कायम असेपर्यंत यांनां लंगोटी नेसून ब्रह्मचारीव्रतानें रहावें लागतें. (३) कोकवली; (४) कुरपुली व (५) पालीकार फाल. यांच्यांत २ प्रकारचीं मंदिरें असतात. (१) बोवा—शंकूसारख्या शिखराचें मंदीर व (२) पाळ्ठी—हें साधारण बाहेरून घरासारखें दिसतें. या दोहोंचाहि उपयोग दुभतें ठेवण्याकडे करतात. हे लोक दरवर्षी कोनशास्त्र नांवाचा रेड्याचा होम करतात. यांच्यांत वाग्निश्चय लौकर करतात. मुलगा भावी सासऱ्याचे पाय डोक्यावर ठेवतो व रेड्यांची अदलाबदल केली कीं लग्नाचा करार झाला. लग्नाच्या वेळीं वर वधूच्या बापाकडे जातो. रेड्यांची देवघेव झाली कीं वधू त्याला मिळते; तिच्याबरोबर निराळ्या झोंपडींत तो कांहीं दिवस राहून तिला घेऊन गांवीं जातो. पुष्कळ भावांनां एकच स्त्री करावयाची असली तर वडील भावाबरोबरच तिचें लग्न करतात. खऱ्या लग्नाखेरीज इतर व्यवस्थित संबंधाचा प्रकार असतोच; म्हणजे एका स्त्रीनें एकाशीं जुन्या चालीप्रमाणें लग्न लावून अनेकांशीं शरीरसंबंध करावा याला 'मोखथोड व इथोल' म्हणतात. एकाची वाग्निश्चयाची बायको दुसऱ्यास देतां येते. यांच्यांत उत्तरकार्य फार मनोवेधक असतें. एक हिरवें उत्तरकार्य व एक वाळकें उत्तरकार्य असे दोन विधी असतात. यांच्या भाषेचा संस्कृताशीं कांहींच संबंध नाहीं. नाइम या पांच जणांच्या पंचायतीतर्फे लोकांचे व्यवहार चालतात. बायकांच्या अदलाबदलीमुळें उपस्थित झालेले खटले या पंचापुढें येतात. दूधदुभत्याच्या समारंभाची व्यवस्था या सभेकडे असते [ रिव्हर्स—दि तोडाज; ब्रीक्स—ॲन अकाऊंट ऑफ दि प्रिमिटिव्ह ट्राइब्स ॲंड मॉन्युमेंट्स ऑफ दि नीलगिरीज. ]

**नीलगिरी संस्थान**—ओरिसांतील एक मांडलिक संस्थान. क्षे. फ. २७८ चौरस मैल. उत्तरेस व पश्चिमेस मयूरभंज संस्थान; त्याचप्रमाणें पूर्वेस व दक्षिणेस बाळासोर जिल्हा. एकतृतियांश भाग डोंगराळ असून त्यांत इमारती लांकूड सांपडतें. ज्यापासून दगडद्या, वाडगे वगैरे भांडीं तयार करतात तो काळा दगड येथें सांपडतो. छोटानागपूरमधून आलेल्या एका शूर पुरुषानें ह्या संस्थानाची स्थापना केली असें सांगतात. मोंगलांच्या अमदानींत ह्या संस्थानची भरभराट झाली, व अकबराच्या हिंदु सेनापतीस, मानसिंगास, बंडखोर पठाणांचा मोड करण्यास मदत केल्याबद्दल येथील एका संस्थानिकास मोठें इनामहि देण्यांत आलें होतें. संस्थानाचें उत्पन्न १३७००० रुपये असून ब्रिटिशसरकारास खंडणीदाखल ३९०० रुपये द्यावे लागतात. संस्थानची लोकसंख्या (१९२१) ६५२२२ आहे. ह्या संस्थानांत एकंदर २८४ खेडीं आहेत. नीलगिरी येथें राजा रहात असल्यामुळें त्या खेड्यास महत्त्व आलें आहे. हें खेडें एका टेंकडीच्या पायथ्याशीं वसलेलें असून येथून कलकत्याहून मद्रासला जाणारी मोठी सडक पांच मैलांवर आहे. येथें हिंदूंची लोकसंख्या फार आहे. येथें खंडैत, भूमिज, ब्राह्मण, गौड व हो इत्यादि जातींचे लोक आहेत.

**नीलमणि**—याला नील, शनि असेंहि म्हणतात. हा बहुधां अस्मानी रंगाचा असून कठिणपणाविषयीं हिरा व लाल यांच्या खालोखाल असतो. नीलमण्याचे रंग निरनिराळे असतात. फिक्कट निळा, व गहिरा निळा यांच्यामधील रंगांचे नीलमणी असतात; परंतु याशिवाय पांढऱ्या शुभ्र रंगाचे, पिवळ्या व हिरव्या रंगाचेहि आढळतात.

आतांपर्यंत उत्तम नील ब्रह्मदेश व सिलोन टापूंत मिळत असत, पण हल्लीं उत्तर अमेरिका व आस्ट्रेलिया या देशांत मिळूं लागले आहेत. हिंदुस्थानांत कालिकत, कानानोर व विसनगर राज्य या ठिकाणीं नील सांपडत होते. अगदीं अलीकडील काळांत काश्मिरांतील झांस्कर हें या बाबतींत महत्त्वाचें ठिकाण होतें; परंतु हल्लीं तेथील खाणींतील सांठा संपला आहे. पिवळे, पांढरे, हिरवे व साधारण निळे नील ब्रह्मदेशांत (ज्या ठिकाणीं लाल सांपडतात तेथें) सांपडतात. २ रतीहून कमी वजनाच्या नीलास दर रतीस ४० पासून १२० रुपये पडतात. उत्तम नील ४ पासून ६ रतींपर्यंत मोठा असला तर त्यास तेवढ्याच वजनाच्या हिऱ्यापेक्षांहि जास्त किंमत पडते. [ मोडक—पदार्थवर्णन, भाग १; वाट—कमार्शियल प्राडक्टस ].

**नीलरक्तपित्त**—त्वचेखालीं सूक्ष्मरक्तवाहिन्या फुटल्यामुळें मध्यम आकाराचे निळसर रंगाचे डाग पडणें हें या

रोगाचें लक्षण आहे. रक्तांत फरक घडून आल्यामुळें अशी भावना देवी, गोंवर, विषमज्वर, प्लेग, तीव्र संधिवात, कांहीं मज्जातंतूंच्या रोगामध्यें, मूत्रपिंड, रक्तपित्त, रक्तस्रावक प्रकृति व इतर थोड्या रोगानंतर उत्पन्न होतें. बेंझोल व बेंझीन हा पदार्थ ज्यांच्या वापरण्यांत येतो अगर जे त्याची वाफ श्वासाबरोबर नकळत बरेच दिवस घेतात त्यांनाहि हा रोग होतो.

ल क्ष णें.—अंग ठेंचाळून काळें निळें होतें. त्याप्रमाणें डाग काळसर अगर लालसर तांबडा अगर निळसर जांभळसर असून शरीराच्या कोणत्याहि भागावर तो दिसतो. त्याचा व्यास सुमारें ½ इंच असून दाबल्यानें त्याचा रंग फिका पडत नाहीं. तो त्वचेच्या सपाटीबरोबर असतो. एखादेवेळीं डाग फक्त हातापायांवरच दिसतात. कांहीं दिवसांनीं तो डाग फिका पडत जाऊन पिंगट अगर पिवळा होतो. ताप वगैरे दुसरीं लक्षणें यांत नसतात. तोंडास अरुचि व फिकटपणा असतो. पंधरा वीस दिवसांनीं हे डाग मावळून बरे होतात. याहून तीव्र रोगांत फार मोठाले काळसर लाल डाग पडून नाक, तोंड, उदर, आंत्र, मूत्रपिंड, गर्भाशय, श्वसनमार्ग अशा श्लेष्मलत्वचेमध्यें रक्तस्राव सुरू होतो. रोगी फिकट दिसतो; त्यास ज्वर व ग्रकवा येतो. हिरड्या सुजत नाहींत पण त्यांतून रक्त वहातें व याहून तीव्रतम रोगांत रक्तस्रावामुळें मृत्यु येतो. प्रेतपरीक्षेमध्यें मूत्रपिंड, फुप्फुसावरण, हृदयावरण, आंत्रावरण, मस्तिष्कावरण, फुप्फुसें, हाडांचा पोकळ भाग, मेंदू या ठिकाणीं बराच स्राव झालेला दिसतो. फुलणारें नीलरक्तपित्तनामक एक भयंकर तीव्रतम प्रकार आहे त्यामध्यें रोगी ५ तासांपासून तीन दिवसांत मरतो. संधिवातामुळें होणाऱ्या रोगांत घसा सुजतो, सांधे धरतात व ज्वर असतो; हृदयावरणदाह हा रोग कधीं त्यामुळें होतो. बालनीलरक्तपित्त म्हणून एका प्रकारांत मुलांनां पुन्हां पुन्हां महिन्या-दोनमहिन्यांनीं उलटणारा असा भेद आहे. त्यांत सांधे धरतात. डाग लहान असून गांधी उठल्याप्रमाणें फिके अगर निळे किंवा लालसर असतात व पोटशूळ, वांति, मलमूत्राबरोबर रक्तस्राव व मूत्रपिंडदाह हीं लक्षणें त्यामुळें होतात व म्हणून आंत्रावरोध अगर आंत्रपुच्छदाह यांपैकीं रोग आहे काय असा संशय उत्पन्न होतो व हातास सांखळलेल्या रक्ताची गांठ लागल्यामुळें चुकून शस्त्रक्रियाहि केली जाण्याचा संभव असतो. लघवींत आलब्यूमिन व रक्त आढळतें व तें रोग बरा झाल्यावरहि टिकतें. यापैकीं बरेच रोगी दगावतात व पुष्कळ बरे होतात. या रोगांत रक्तामध्यें स्लेटपाटीच्या आकाराच्या पेशींचें प्रमाण वाजवीपेक्षां कमी होतें व सूक्ष्म रक्तवाहिन्यांतील अंतस्त्वचा फाटून नाहींशी होते, यामुळें ठिकठिकाणीं रक्तस्राव होतो.

यासारख्या रोगापासून याचें रोगनिदान करतेवेळीं हें लक्षांत ठेवावें कीं, रक्तपित्तरोगांत हिरड्या फार सुजतात व शरीरांत ठिकठिकाणीं गांठी उत्पन्न होतात. सार्कोमाग्रंथीचें निदान करतांना या दोहोंत थोडें साम्य दिसतें. गलिच्छ वस्तींत राहणाऱ्या मुलांनां पुष्कळ पिसा दंश करून मोठाले डाग पडतात. परंतु त्या मुलांस स्वच्छ ठिकाणीं निजविल्यास ते डाग नाहींसे होतात तसे या रोगाचे डाग लवकर नाहींसे होत नाहींत.

उ प चा र.—सौम्य रोगासाठीं अंथरुणांत रोग्यानें पडून पूर्ण विश्रांति घ्यावी. पौष्टिक अन्न व शक्ति आणणारीं औषधें घ्यावींत म्हणजे लवकर गुण येतो. लोहसोमल, क्विनाईन यांचे नाना प्रकार यथायोग्य प्रमाणांत योजून द्यावेत. विश्रांतीनंतर लागलीच हातापायांवरचे डाग नाहींसे होतात व रोगी पुरी विश्रांति मिळण्याच्या अगोदर हिंडूं फिरूं लागला कीं ते पुन्हां दिसतात. तीव्र रोगांत हीं सोमलयुक्त औषधें गुणकारी असतात. शरीरांतील भागांतून रक्तस्राव थांबवण्यासाठीं टरपेंटाइन, लेडॲसिटेट, अर्गोटीन, हीनवीर्य सल्फ्यूरिक ॲसिड वगैरे स्तंभक औषधें योजावीं. क्यालशियम् क्लोराइड किंवा ल्याक्टेट २० ग्रेन दर ४ तासांनीं द्यावें; व नंतर तें प्रमाण कमी करून १५ अगर १० ग्रेन प्रमाणांत औषध घेतल्यानें उपयोग होतो.

**नीलांबरशर्मा**—हा गंगा-गंडकी संगमापासून दोन कोसांवर पाटणा येथें राहणारा मैथिल ब्राह्मण होता. बापाचें नांव शंभूनाथ होतें. वडील बंधु जीवनाथ याच्यापाशीं व कांहीं दिवस काशीच्या संस्कृत पाठशाळेंत यानें अध्ययन केलें. अलवारचा राजा शिव याच्या सभेंत हा मुख्य ज्योतिषी होता. हा शके १८०५ मध्यें काशीस मृत्यु पावला.

याचा गोलप्रकाश नांवाचा ग्रंथ संस्कृतांत आहे; तो शके १५९३ त बापूदेवानें छापला. इंग्लिश भाषा न जाणणारांस हा ग्रंथ फार उपयोगी आहे. भास्करीय ग्रंथाच्या कांहीं भागावर यानें टीका केली आहे. याचा ज्येष्ठ बंधु जीवनाथ यानें भास्करबीजटीका केली असून भावप्रकाशादि फलग्रंथ लिहिले आहेत. [ दीक्षितकृत भारतीय ज्योतिःशास्त्र ].

**नीस्टर नदी**—हिचा उगम कार्पेथियनपर्वताच्या उत्तरेकडील उतारापासून आहे. पहिल्या ३५० मैलांपर्यंत ही ऑस्ट्रियाच्या ताब्यांत आहे व पुढील ५२० मैल रशियाच्या ताब्यांत आहे. हिच्या पात्रांत बरेच खडक आहेत. वर्षांतून दोन वेळ हिला मोठा पूर येतो. या नदीचा व्यापारासाठीं चांगला उपयोग होतो. हिच्यांत आगबोटी चालतात. मुख्य उपनदी सेरेथ ही होय.

**नीळ**—ॲनिल, अर्जेंटिया, आरेक्टा, आर्टिक्युलेटा-लँगेरासीमोसा, टिंक्टोरिया वगैरे ‘ इंडिगोफेरा ’ च्या अनेक जातींपासून सध्याची नीळ तयार होते. पण या जातींशिवाय अशीं कित्येक झाडें आहेत कीं, त्यांपासून रासायनिकरीत्या अगदीं निळीसारखाच पदार्थ तयार करतां येतो, आणि म्हणूनच या झाडांपासून उत्पन्न होणाऱ्या रंगाला पुष्कळ भाषांत ‘ नील ’ हेंच नांव वापरण्यांत आलें आहे. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें भारतीय अभिजातवाङ्मयांत आढळणारा ‘ नील ’ शब्द इंडिगोफेराच्या जातीकरितां वापरला

आहे. किंवा निळीसारखाच पदार्थ प्रसवणाऱ्या इतर झाडां-करितां वापरला आहे, याचा उलगडा करणें कठिण पडतें. प्राचीन यूरोपीयन ग्रंथकारांनीं ज्या वोडनामक झाडाचा उल्लेख केला आहे तें झाड आज मध्यआशियांत आढळतें.संस्कृत ग्रंथकारांचें 'नील' म्हणजे बहुतेक हें 'वोड' झाडच असावें. हिंदुस्थानांत निळीचा रंग काढण्याकरितां अनेक झाडांचा उपयोग करण्यांत येतो. त्यांपैकीं कांहींचीं नांवें येणेंप्रमाणें:— मध्य चीन व आसाम येथील 'रम'; ईशान्य भागांतील 'रायअम'; दक्षिण हिंदुस्थानांतील 'नेरिअम' अथवा 'पाल'; ब्रह्मदेशांतील जिम्नेमा टिंगेन्स; कोचिन-चीन येथील स्पिलँथेस, टिक्टोरिया, वगैरे. निळीचें झाड बहुवर्षायु आहे, परंतु तें बहुतकरून एकदोन वर्षांपेक्षां जास्त दिवस ठेवीत नाहींत. या झाडाला चिंचेच्या पानांप्रमाणें बारीक पानें येतात व मठाच्या शेंगेप्रमाणें शेंगा येऊन त्यांत बारीक बीं येतें.

ऐतिहासिक माहिती.—'पेरिप्लुस ऑफ दि इरीथ्रिअनसी' (खिस्तपूर्व ८०) या ग्रंथावरून असें दिसतें कीं, बारबरीकॉन नामक सिंधुनदीवरील सिथिअन शहरांतून त्यावेळीं निळीची निर्गत होत असे. मार्कोपोलो यानें (१२९८) क्किलॉन येथें स्वतः पाहिलेल्या निळीच्या उद्योगधंद्याचा खरा इतिहास लिहून ठेवला आहे. 'काननाट' (कँबे) येथें स. १४६८ त निळीची लागवड होत असे, असें 'अथानासीअस नीकीतिन' हा रशियन प्रवासी म्हणतो. १४९८, १५०३ व १५१६ या वर्षांच्या दरम्यान हा उद्योगधंदा मंदावलेला असावा असें वास्को द गामा, व्हार्थेमा आणि बार्बोसा, हे प्रवासी त्याचा निर्देश करीत नाहींत, यावरून दिसतें. स. १५६३ त पश्चिम हिंदुस्थानांत निळीचे कारखाने असावेत असें गार्सिआ डी. ऑर्टो यानें दिलेल्या माहितीवरून दिसतें. बाबराच्या आत्मचरित्रांत निळीचा कांहींच उल्लेख नाहीं. ऐने-ई-अकबरीमधील उल्लेखावरून आग्रा येथें त्यावेळीं नीळ होत असे असें दिसतें. लिन्सचॅटिन हा म्हणतो कीं, स.१५९८त फक्त कँबेआ येथेंच निळीचा धंदा इतका भरभराटला होता कीं, तेथून सबंध जगांत नीळ जात असे.

फिंच यानें हिंदुस्थानांतील निळीच्या धंद्याचें व ती तयार कशी करतात याचें जें वर्णन केलेलें तें फार महत्त्वाचें आहे (ट्रॅव्हल्स इन इंडिया-परचास पिलिग्रिमीज, १६०७). हिंदुस्थानांत नीळ कशी तयार करीत याची माहिती फॉस्टर यानें १६१६ सालीं लिहून ठेवली आहे (ई. आय. सी. लेटर्स, ४,२४१). गुजराथमध्यें (अहमदाबाद) १६३८ सालीं नीळ कशी तयार करीत याची हकीकत मांडेलेस्लो यानें लिहून ठेवली आहे (ट्रॅव्हेल्स--ऑलिआरिअसच्या हिस्टरी मस्कोव्ही, इ. १६६८).

१६२२ सालच्या गुजराथेंतील निळीसंबंधानें टेरी यानेंहि जवळ जवळ वरच्याप्रमाणेंच माहिती दिलेली आहे. फ्रान्सिस बर्नीअर याच्या लेखांत दिल्ली येथील निळीचा उल्लेख आला आहे. टॅव्हरनिअर यानें गुजराथ, गोवळकोंडे, आग्रा, बंगाल इत्यादि ठिकाणच्या निळीच्या धंद्याचें बरेंच विस्तृत वर्णन केलें आहे. ऱ्होड यानें, मलबार किनाऱ्यावरील निळीच्या धंद्याची माहिती दिलेली आहे. बंगालमध्यें निळीची लागवड करण्याकरितां १६८१ सालीं वेस्टइंडीजहून यूरोपीयन मळेवाले नेण्यांत आले. त्याप्रमाणें १७९० सालीं जेसोर येथें निळीचे कारखाने काढण्यांत आले. हा धंदा बंगालमध्यें स्थापन होऊन कांहीं दिवस होतात न होतात तोंच तो बुडाला.

मिडेन विलसनसाहेबानें, 'इंडियन प्लँटर्स गॅझेटांत' हिंदुस्थानांतील निळीच्या धंद्यासंबंधीं बरीच ऐतिहासिक माहिती दिलेली आहे. त्या माहितीवरून निळीच्या धंद्याच्या उत्पादकांपैकीं, ग्रँडसाहेब हे एक होते असें दिसतें. तिरहुत येथें हा धंदा सन १७७४ आणि १८०० यांच्या दरम्यान स्थापला गेला होता. स.१७८० पासून १८०२ पर्यंत कंपनीचा या धंद्यास प्रत्यक्ष पाठिंबा होता. परंतु या धंद्याचें सर्व नेतृत्व फक्त अँलो--इंडियन समाजाकडेच असल्यामुळें, या धंद्याला बंगालमध्यें चांगली बरकत येईना. तेव्हां यूरोपच्या बाजारांत विकण्याच्या योग्यतेची नीळ जर एतद्देशीय कारखानदार तयार करतील, तर त्यांच्यापासूनहि ती विकत घ्यावी असें कंपनीनें ठरविलें.

हिंदुस्थानांतील निळीचा हा प्राचीन धंदा रसातळास कसा गेला याचा इतिहास फारच हृदयद्रावक व बोधप्रद असल्यामुळें, त्याचा येथें थोडक्यांत उल्लेख केल्यास वावगें होणार नाहीं. ज्यावेळीं हिंदुस्थानांतील नीळ खरेदी करून तिची यूरोपमध्यें निर्गत करण्यास यूरोपीयनांनीं प्रथम सुरवात केली त्यावेळीं जवळ जवळ सर्व निळीची निर्गत पश्चिम इलाख्यांतून व विशेषतः सुरत येथून होत असे. पोर्तुगीज लोक ती खरेदी करून लिस्बनला नेत व तेथून हॉलंडच्या रंगवाल्यांना विकीत. पुढें डच ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना झाल्यावर निळीचा सर्व व्यापार डच लोकांच्या हातीं गेला. या व्यापारांत डच लोकांचा अतोनात फायदा होत आहेसें पाहून यूरोपीय राष्ट्रांच्या मनांत हेवा उत्पन्न झाला, व आपल्या देशांतील 'वोड' ची लागवड करणाऱ्या व्यापाऱ्यांच्या पोटावर पाय येण्याचा रंग दिसतांच जर्मनी, इंग्लंड व फ्रान्स या देशांनीं प्रतिबंधक कायदे पास करून हिंदुस्थानांतील निळीच्या निर्गतीस आळा घातला.

जो कोणी हिंदुस्थानांतील नीळ खरेदी करील अथवा तिचा उपयोग करील तो मृत्यूच्या शिक्षेस पात्र होईल असें या देशांनीं ठरविलें. हिंदुस्थानांतील नीळ यूरोपमध्यें पाठविण्याचा ईस्ट इंडिया कंपनीनें एकसारखा क्रम सुरू ठेवल्यामुळें स्पेन, फ्रान्स, पोर्तुगाल, आणि इंग्लंड येथील वसाहतवाल्यांनीं हिंदुस्थानाबाहेर नीळ उत्पन्न करण्याचे प्रयत्न सुरू केले व त्यांत त्यांना इतकें यश आलें कीं,

त्यांच्याशीं चढाओढ करणें अशक्य होऊन ई. इं. कंपनीनें यूरोपमध्यें निळीची निर्गत करण्याचें कार्य सोडून दिलें. परंतु याच वेळीं अमेरिका व फ्रान्स यांच्यांत कांहीं राजकारणविषयक अडचणी उपस्थित झाल्यामुळें आणि वेस्ट इंडीजमध्यें साखर आणि कॉफी यांची लागवड जास्त किफायतशीर होऊन तेथें निळीचा धंदा अजीबात बसल्यामुळें हिंदुस्थानांत या धंद्यास फिरून चलन मिळालें. बंगालमध्यें हा धंदा पुनरुज्जीवित करण्यांत आला, पण वर सांगितल्याप्रमाणें तो लवकरच रसातळास गेला. तेथून या धंद्याचें तिरहुत आणि संयुक्तप्रांत येथें स्थानान्तर झालें. परंतु याच सुमारास रासायनिकरीत्या नीळ तयार करण्याच्या प्रयोगास जर्मनींत यश आल्यामुळें नैसर्गिक वनस्पतिजन्य निळीच्या अस्तित्वावरच आपत्ति येऊन गुदरली. अर्थातच रासायनिक निळीपुढें हिंदुस्थानांतील नैसर्गिक निळीचें कांहीं न चालल्यामुळें या धंद्याचें आयुष्य संपुष्टांत आलें. १९१५ च्या फेब्रुवारी महिन्यांत दिल्लीला एक परिषद भरून नैसर्गिक निळीच्या धंद्याला, कृषिविषयक, संशोधक व व्यापारी दृष्टीनें उत्तेजन देण्यासंबंधीं विचार करण्यांत आला. स. १९१८ त इंपीरियल लेजि. कौन्सिलमध्यें इंडिगो सेसबिल पास झालें. शास्त्रीय शोधनाकरितां बाहेर पाठविल्या जाणाऱ्या निळीवर या बिलान्वयें जकात बसविण्यांत आली. कारण शास्त्रीय संशोधनाच्या योगानें परकीय देशांत निळीची लागवड चांगल्या प्रकारें होण्यास मदत मिळे.

### निळीचें क्षेत्र व रंगाचें उत्पन्न.

| प्रांताचें नांव. | क्षेत्र. | | रंगाचें उत्पन्न | |
|---|---|---|---|---|
| | मार्च, सन १९१४अखेर ५ वर्षांची सरासरी, एकर | सन १९१६ ते १७, एकर | मार्च, सन १९१४अखेर ५ वर्षांची सरासरी.हंड्रेडवेट | सन १९१६ ते १७, हंड्रेड. |
| बिहार-ओरिसा | ८३००० | ८०६०० | ११७०० | १०९०० |
| मद्रास | ७३००० | ४४९९०० | १६२०० | ५९१०० |
| पंजाब | ३२९०० | १५७४०० | ५१४०० | ९९०० |
| संयुक्तप्रांत | २४४०० | ५९३०० | २९०० | १४१०० |
| मुंबई-इलाखा | ५२०० | ७००० | १३०० | १३०० |
| बंगाल | ११०० | २२०० | १०० | २०० |
| एकूण | २२०००० | ७५६४०० | ३७६०० | ९५५०० |

( मुंबई इलाखा व बंगाल यांतील आंकडे अनुक्रमें २ व ४ वर्षांच्या सरासरींचे आहेत. )

याप्रमाणें गेल्या शतकांत बाहेरील देशांना निळीचा पुरवठा हिंदुस्थानांतून होत असे. ईस्ट इंडिया कंपनीच्या वेळीं बंगालप्रांतांत मोठमोठे कारखाने निघाले व त्यांतून सन १८९६ पर्यंत हिंदुस्थानांतून कोट्यावधि रुपयांची नीळ यूरोपांत जात असे. जर्मनींतील कृत्रिम रंग हिंदुस्थानांत येऊं लागल्यापासून निळीची लागवड खालावत चालली होती; तिची लढाईमुळें पुन्हां ऊर्जितावस्था होत चालली हें वर दिलेल्या क्षेत्राच्या व किंमतीच्या आंकड्यांवरून लक्षांत येईल. हिंदुस्थानांत १८९५ सालीं निळीखालीं १६,८८,०४२ एकर क्षेत्र होतें, तें कमी होत होत सन १९१४ म्हणजे लढाई सुरू होण्यापूर्वी १५०००० एकरांवर आलें होतें. लढाई सुरू झाल्यापासून पुन्हां हें क्षेत्र चढत्या प्रमाणावर आहे हें वर दिलेल्या कोष्टकावरून सहज लक्षांत येईल.

लढाई बंद पडल्यावर पुन्हां उत्पन्न कसें उतरलें हें १९२३-२४ च्या आंकड्यावरून दिसून येईल.

| प्रांत | एकर | हंड्रेडवेट |
|---|---|---|
| मद्रास | ९५९०० | २२००० |
| संयुक्तप्रांत | १९८०० | २२०० |
| बिहार-ओरिसा | २४८०० | ४२०० |
| पंजाब | २६००० | ६६०० |
| बंगाल | ९०० | ... |
| मुंबई इलाखा | ८००० | ११०० |
| एकूण | १८५४०० | ३६१०० |

कृत्रिम निळीमुळें किंमतींत कसा फरक होत गेला हें खालीं दिलेल्या आंकड्यांवरून सहज कळून येईल. इ. स. १८९७ मध्यें एक पौंड चांगल्या निळीला ७ ते ८ शिलिंग ( म्हणजे ७४.६६ पौंडांच्या एका मणाला ४००-४५० रुपये ) किंमत पडत असे. लढाई सुरू होण्यापूर्वी जर्मनींतून कृत्रिम नीळ हिंदुस्थानांत दरवर्षी सुमारें ३२४ टन येत असे. लढाई सुरू झाल्याबरोबर किंमतींत अतोनात फरक झाला. सन १९१३-१४ च्या डिसेंबर महिन्यांत एका हंड्रेडवेटला जेथें २५५ रुपये पडत होते तेथें १९१४-१५ सालीं त्याच महिन्यांत १०१२ रुपये पडूं लागले. सन १९१५-१६ सालीं ९३७ व १९१६-१७ सालीं १०१२ रुपये एका हंड्रेडवेटाची किंमत झाली. हिंदुस्थानांतून निळीची निर्गत किती झाली हें खालील कोष्टकावरून दिसून येईल.

| वर्ष | हंड्रेडवेट | किंमत रुपये |
|---|---|---|
| १८९४-९५ | १६६,३०८ | ४,७४,५९,१५३ |
| १८९५-९६ | १८७३३७ | ५,३५,४५,११२ |
| १८९९-१९०० | ८५,४६० | २,०८,७८,८४८ |

सन १८९७ पासून १९०६ पर्यंत निळीच्या व्यापाराला थोडथोडा उतरता पाया लागला व तो तसाच उतरत राहिला.

| वर्ष | हंड्रेडवेटस् | किंमत रुपये |
|---|---|---|
| १९०६-१९०७ | ३५,१०२ | ७०,०४,७७३ |
| १९११-१९१२ | १९,१५५ | ३७,५८,०२५ |
| १९१२-१९१३ | ११,८५७ | २२,०१,३२५ |
| १९१३-१९१४ | १०,९३९ | २१,२९,०७० |
| १९१९-१९२० | ३२,६८७ | ... ... |
| १९२१-१९२४ | ६,७०२ | ... ... |

| बंगाल्यांतून निर्गत | | मद्रास इलाख्यांतून निर्गत | |
|---|---|---|---|
| वर्ष | हंड्रेडवेट | वर्ष | हंड्रेडवेट |
| १८९६ | १११,७१४ | १८९६ | ६२,४२५ |
| १९१३ | ८,७५२ | १९१३ | १,७८७ |
| १९१९ | १५,७३९ | १९१९ | ४,१७९ |
| १९२३ | ३,३१६ | १९२३ | २,७४४ |

सन १८८० मध्यें सर्व हिंदुस्थानांत निळीचे २८०० मोठे व ६००० लहान कारखाने होते व त्यांत ३६०००० लोक काम करीत होते. तेंच १९११ सालीं १२१ मोठे कारखाने असून (पैकीं ११२ वाफेनें चालणारे) त्यांत काम करणाऱ्यांची संख्या ३०७९५ होती.

बिहार प्रांतांत दोन जातींच्या निळीची लागवड करतात. एक सुमात्रा व दुसरी नेटल-जावा; यांपैकीं सुमात्रा जातीची लागवड संयुक्तप्रांतांत, मद्रास इलाख्यांत व पंजाबांत विशेष आढळते. जावा जातीची लागवड बिहार प्रांतांत सन १९०४ पासून जास्त प्रमाणांत सुरू झाली व या जातीचें सरासरी उत्पन्न सुमात्रापेक्षां कमी होतें हें खालीं दिलेल्या आंकड्यांवरून सिद्ध होतें.

| वर्ष | | रंग दर एकरीं सरासरी उत्पन्न शेर | छटाक | रंगाचें उत्पन्न सरासरी दर १०० मण पाल्यांतून शेर | छटाक |
|---|---|---|---|---|---|
| १९०६ | जावा | १४ | ६ | १४ | १३ |
| | सुमात्रा | १० | १५ | १२ | ४ |

१९१६ सालीं हेंच उत्पन्न जास्त आलें आहे. जावा १६ ते १८ शेर. सुमात्रा ८ ते ९ शेर. याच सालांतील जावांतील पहिल्या कापणीच्या पानांत इंडिगोटिनचें शेंकडा प्रमाण ०.८ ते १ व सुमात्रांतील शें. प्रमाण ०.४ ते ०.६ होतें.

जावाची पेरणी आक्टोबरांत करितात व दर एकरीं बीं ५-६ शेर पडतें. जानेवारीपर्यंत त्याची फारशी वाढ होत नाहीं. पहिली कापणी मे-जून महिन्यांत होते ही सहा इंच बुडखे ठेवून करतात. दुसरी कापणी आणखी दीड महिन्यानें येते. सुमात्रा जातीची लागवड फेब्रुवारींत करतात. ही लागवड आक्टोबरांत केल्यास थंडीमुळें पीक बरोबर येत नाहीं. बीं दर एकरीं ८-१२ शेर पेरितात. याची पहिली कापणी जुलई महिन्यांत येते. दुसरी कापणी दोन महिन्यांनीं येते. बहार व बंगाल प्रांतांत नदीकांठच्या मळईत पूर येऊन गेल्यावर निळीचें बीं आक्टोबरांत फेकून पेरितात. याची एक कापणी उत्तम येते. संयुक्त प्रांतांत हलक्या जमिनींत निळीचें एक पीक पाणी देऊन पेरून सप्टेंबरांत कापतात. याची दुसरी कापणी घेत नाहींत. निळीच्या बियावरील कवच कठिण असल्यामुळें तें नरम व्हावें व लवकर उगवावें म्हणून पेरण्यापूर्वी तें गंधकाच्या तेजाबांत व नंतर पाण्यांत धुवून वाळवून पेरितात. बीं दर एकरीं पांच सहा शेर पडतें. एक मण बियाला तीन शेर तेजाब लागतो. तेजाबांत बीं चांगलें मिसळल्यावर त्यावर २० ते ३० ग्यालन पाणी ओतून तें झराझर हालवावें व एक मिनिट थांबून पाणी ओतून टाकावें. असें पांच सहा वेळ सर्व तेजाब नाहींसा होईपर्यंत धुवावें. नंतर सर्व पाणी काढून बीं उन्हांत घालून वरचेवर परतून वाळवावें.

नीळ हें झाड द्विदल जातीपैकीं असल्यामुळें ज्या जमिनींत निळीची लागवड करावी ती जमीन सुधारत जाते व पुढच्या पिकास त्यापासून फायदा होतो. तांबूस, काळया अगर रब्बी पिकें करण्यास योग्य अशा जमिनींत नीळ चांगली होते. जमीन नांगरून कुळवून ढेंकळें फोडून तयार झाल्यावर ती फळी फिरवून घट्ट करितात. दर एकरीं शेणखत २० ते ३० गाड्या देतात. नंतर एक फुटाच्या अंतरानें पाभरीनें बीं पेरितात. बीं दर एकरीं १२ ते १५ पौंड पडतें. पुढें या पिकास दोन खुरपण्या व दोन तीन कोळपण्या देतात. जमीन नेहमीं भुसभुशीत राहील अशी तजवीज करतात. पेरणी जूनमध्यें झाली असल्यास पहिली कापणी ३॥ ते ४ महिन्यांनीं म्हणजे सप्टेंबर महिन्यांत मिळते. फुलें येऊं लागलीं अगर पानें मोडून जर चटदिशीं दोन तुकडे होतील तर नीळ कापण्यास तयार झाली असें समजावें. पीक कापल्यानंतर त्यावर पाऊस पडल्यास त्यांतील रंग बिघडतो व कमी पडतो. दुसरें पीक घेणें असल्यास २-३ इंच बुडखे ठेवून झाडें कापावीं. म्हणजे पुन्हां साडेतीन चार महिन्यांनीं कापणी येते. याप्रमाणें तिसरेंहि पीक घेतां येतें. परंतु बहुतेक ही कापणी न घेतां झाडें बियाकरितां ठेवितात. कित्येक ठिकाणीं हीं झाडें दोन तीन वर्षें राहूं देतात. पाणी दिल्यास दर तीन महिन्यांत एक कापणी मिळते. पहिली कापणी सप्टेंबर ते आक्टोबर; दुसरी नोव्हेंबर ते डिसेंबर व तिसरी फेब्रुवारी ते मार्च महिन्यांत मिळते. केव्हां केव्हां कपाशींत निळीचें बीं परतात. खानदेशांत एक कापणी पहिल्या वर्षी घेतात तिला 'घुरपान' म्हणतात. दुसऱ्या वर्षी दोन कापण्या घेतात त्यांना अनुक्रमें 'खोडवा' व 'मच्छी' म्हणतात. तिसऱ्या वर्षी पिकाचें बीं धरितात.

रं ग त या र क र ण्या ची री त.—निळीचीं झाडें सकाळीं कापून तीं एका चुनेगच्ची गोल (सुमारें ६ फूट व्यासाच्या व ४ फूट खोलीच्या) कुंडींत दगडाखालीं दाबून ठेवितात. सभोंवतीं दीड फूट जागा सोडून आंत एक लहान कुंडी केलेली असते. तिचा व्यास तीन फूट व खोली दोन फूट असते. नंतर त्यांत स्वच्छ पाणी सोडितात. तें निळीवर तीन इंच असलें पाहिजे. प्रत्येक कुंडींत सुमारें झाडाची बारा ओझीं मावतात. सुमारें चोवीस तासांनीं पाल्यांतील रंग पाण्यांत उतरतो. दुसऱ्या दिवशीं पहाटे हीं दाबलेलीं झाडें बाहेर काढितात. व कुंड्यांतील पाणी दोन तीन तास पायानें ढवळतात. कित्येक ठिकाणीं काठ्यांनीं ढवळतात. जावांत

घुसळण्याचें काम आंत वाफ सोडून अगर कोंडलेली हवा सोडून करितात. पाण्याचा रंग प्रथम फिकट हिरवट असून पुढें तो निळा होतो व नंतर तांबूस दिसूं लागतो. कुंडींतील पाणी उतूं येऊं लागल्यासारखें दिसूं लागल्यावर त्यांत पळसाचा डिंक पाण्यांत भिजवून अगर पळसाच्या सालीचें पाणी करून टाकितात. यायोगानें रंग तळाशीं जाऊन बसतो. नंतर पाणी स्थिर झाल्यावर वरील पाणी फेंकून देऊन खालील रंगाचा गाळ लहानशा कुंडींत टाकून तींत तो रात्रभर राहूं देतात. दुसऱ्या दिवशीं वरील पाणी फेंकून खालील रंगाचा सांका खादीच्या कपड्यावर घालितात व त्याला विळ्यानें कवच्या पाडितात. यानें सर्व पाणी निघून जाऊन रंगाचा सांका दाट होतो. या कपड्याची गांठोडी करून त्यावर चार पांच तास दगडाचा दाब ठेवितात. नंतर गाळाच्या वड्या कापून ठेवितात व वर राख टाकतात. सर्व पाणी निचरून गेल्यावर जमिनीवर राख टाकून त्यावर दुसऱ्या दिवशीं त्या वड्या चटईवर उन्हांत वाळवितात. तिसऱ्या दिवसापासून त्या सावलींत वाळवितात. याप्रमाणें सुमारें तीन आठवड्यांत बाजारांत विकण्याजोगा रंग तयार होतो.

सुक्या पानांपासून रंग करण्याची कृतिः—या कृतीनें रंग करण्याची पद्धत मद्रासेकडे जास्त प्रचारांत आहे. पानें वाळलेलीं असल्यामुळें फुरसतीप्रमाणें रंगाचें काम करितां येतें. या कृतींत झाडें कापून तीं दोन तीन दिवस शेतांत वाळवितात. नंतर फांद्या झाडून पानें वेगळीं करितात व तीं सुक्या जागेंत सांठवून ठेवितात. पुढें रंग करण्याच्या वेळीं वरीलप्रमाणें एका चुनेगच्ची हौदांत भिजत घालितात. त्यांत पानांच्या सहापट पाणी घालितात व तीं दोन तास लांकडी दांड्यांनीं ढवळतात. सर्व पानें भिजून पाण्यांत खालीं बसेपर्यंत असें करावें लागतें. दोन तीन तासांनीं पाण्याला हिरवा रंग येतो व पाणी दाट दिसूं लागतें. नंतर तें पाणी दुसऱ्या हौदांत घेतात. पहिल्या हौदांत पाणी जास्त वेळ राहिल्यास कांहीं रंग पानांत पुन्हां मिसळून जातो. पुढें सर्व कृति पहिल्या प्रकारांत सांगितल्याप्रमाणें करावी. एक वर्षाच्या सर्व पिकाचें उत्पन्न सरासरी ९--१० टन होतें.

| दर एकरीं सरासरी उत्पन्न | रंगाचें प्रमाण शेर |
|---|---|
| पहिल्या कापणीस | ४०--५० |
| दुसऱ्या " | ७०--८० |
| तिसऱ्या " | ३०--४० |

निळीचा रंग पक्का असतो. कापड फाटलें तरी रंग जात नाहीं. निळीच्या फांद्यांचा रंग काढल्यावर त्यास खानदेशांत "लाखी" व वऱ्हाड प्रांतांत "सीट" म्हणतात. त्यांचा खताकडे चांगला उपयोग होतो.

**नीलकंठ धर्मपूरकर**—वऱ्हाडांतील माहूरजवळील गोदातीरच्या धर्मपूरचा रहिवासी व प्रसिद्ध ज्योतिषी. याचें घराणें ज्योतिषाबद्दल प्रसिद्ध आहे. याचा आजा चिंतामणि हा साहित्यांत व ज्योतिषांत पारंगत होता. याचा बाप अनंत याचे जातकपद्धति व कामधेनुटीका हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. नीलकंठानें ताजकनीलकंठी नांवाचा फलज्योतिषावर एक ग्रंथ लिहिला आहे. त्यांत फारशी व अरबी शब्द बरेच आहेत, त्यांवरून त्याचा त्या भाषांशीं परिचय असावा. जातकपद्धति ग्रंथ गयाप्रांतांत प्रमाणभूत मानतात; अनंत हा काशीस गेल्यावर नीलकंठाचा लौकिक फार वाढला व तो अकबराच्या दरबारीं एक मुख्य पंडित बनला. नीलकंठाचा भाऊ राम यानें मुहूर्तचिंतामणी ग्रंथ लिहिला आहे. ज्योतिषशास्त्रांत हा ग्रंथ महत्त्वाचा आहे. रामविनोद नांवाचा करणग्रंथ रामानें जयपूरच्या एका राजासाठीं तयार केला. भावाप्रमाणेंच रामासहि अकबराचा आश्रय होता. राजा तोडरमल्लासाठीं रामानें तोडरानंद म्हणून एक ग्रंथ लिहिला पण तो दुर्मिळ आहे. नीलकंठाचा पुत्र गोविंद यानें मुहूर्तचिंतामणीवर पीयूषधारा म्हणून एक विद्वन्मान्य टीका लिहिली आहे; त्यानें कांहीं काव्यपर ग्रंथहि केले आहेत. याप्रमाणें या घराण्यांत बरेच विद्वान निपजले. [ गणकतरंगिणी; भारतीय ज्योतिःशास्त्र; मुनीश्वर—गोलाध्याय; वऱ्हाडचा इतिहास. ]

**नीळल**—हें प्रथमतः सन १८६८मध्यें वेयर यानें शोधलें. हें प्राण-नीललापासून संयोगीकरणाच्या योगानें तयार करतां येतें. प्राणनीळलाचें जशद-चूर्णाबरोबर ऊर्ध्वपातन केलें असतां हा पदार्थ मिळतो. नील सोज्जित केला असतां नीळल मिळतें. आसन्न-नत्र-दालचिनीअम्ल हें पलाद-कर्बिताशीं तप्त केलें असतां आपणांस नीळल मिळतें. ह्याचा विनळण्याचा बिंदु ५२° हा असून हें २४५° वर उकळतें. हें एक कमजोर अनाम्ल आहे. पाइन झाडाच्या लांकडांनां हे लावलें असतां त्याचा रंग तांबूस होतो. ह्यापासून निघणारे बरेच पदार्थ प्रचारांत आहेत.

**नुझवीद, तालुका.**—मद्रास इलाख्यांतील कृष्णा जिल्ह्यामधील एक तालुका. क्षेत्रफळ २९७ चौरस मैल. पूर्वी हा तालुका म्हणजे एक जमीनदारी इस्टेट होती. पुढें त्याचे आठ भाग पाडण्यांत आले. लोकसंख्या ( १९२१ )६५०७७. यांत १ शहर व १६९ खेडीं आहेत. ह्या तालुक्यांत एल्लोर कालवा व ब्रह्मय्यालिंगम नांवाचा मोठा तलाव आहे.

**गांव.**—मद्रास इलाख्यांतील कृष्णा जिल्ह्यांत असलेल्या नुझवीद तालुक्याचें व जमीनदारीचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या (१९११)१००२३. गांवाच्या भोंवताली जंगली प्रदेश आहे. येथें एक गढी आहे तींत जमीनदार रहातात. येथें नारळीचीं व आंब्याचीं झाडें पुष्कळ आहेत.

**नुनगर**—पंजाबांत नुनगर नांवाची मीठ तयार करणारांची एक जात आहे. लोकसंख्या (१९११) ९९८७. हे हिंदु, शीख व मुसुलमान आहेत. ते पंजाबच्या पूर्वभागांतील ( मीठ तयार करणारे ) आहेत परंतु मिठाच्या खाणींत काम करणाऱ्यांशीं यांचा संबंध नाहीं. कारण खाणींत काम करणारे लोक निरनिराळ्या जातींचे आहेत.

**नुनिया लुनिया**—मीठ तयार करणारांची एक जात. यांची एकंदर संख्या ८ लाखांपर्यंत आहे. पैकीं संयुक्तप्रांतांत ४ लाख व बिहार-ओरिसांत सुमारें तीन लाख नुनिया आहेत. बंगाल्यांत ४२ हजार आहेत. बाकीच्या प्रांतांतून कमी आहेत. यांच्यांतले जे वर्ग आहेत त्यांच्या नांवांवरूनच यांची जात अनेकांच्या मिश्रणानें झाली आहे असें दिसून येईल. सरकारच्या मीठ करण्याच्या नियंत्रणामुळें आतां यांचा धंदा बंद पडला. मध्यप्रांतांत हे लोक बांधकाम व दगडाचें काम करूं लागले आहेत. तेथें हे लोक वधूपेक्षां वयानें लहान अशा वराबरोबर तिचें लग्न करतात. हे लोक ब्राह्मणांकडून सर्व धार्मिक विधी करतात. [ रसेल व हिरालाल ].

**नुर्ऱ**—मध्यप्रांतांतील एक जात. हे लोक द्राविडवंशांतील आहेत. हे शेतकी व टोपल्या विणण्याचा धंदा करतात. यांची भाषा मुंडा वर्गांतील आहे व ही देखील मुंडा लोकांचीच एक शाखा आहेत. यांच्यांत उडिया लोकांच्या रक्ताचें व डोमांच्या रक्ताचें मिश्रण झालेलें आहे. यांच्या पूर्वजास सिंगबोंगानें प्रथम निर्माण केलें असें म्हणतात. यांच्यांत देवकाच्या भेदामुळें बरेच वर्गभेद झाले आहेत. लग्नें प्रौढपणींच होतात. वाग्निश्चय फार काव्यमय भाषेंत होतो. लग्नविधि, खांबाभोंवतीं सात प्रदक्षिणा घालून करतात. विधवा आपल्या दिराबरोबरच लग्न लावते. दुसऱ्याबरोबर लग्न केलें तर तिच्या दुसऱ्या नवऱ्यास तिच्या पहिल्या लग्नाचा खर्च तिच्या दिरास द्यावा लागतो. यांचा दर्जा फार निकृष्ट आहे.

**नुवरएलिया**—सिलोन. एक आरोग्यस्थान. सन १९०१ मध्यें येथील लोकसंख्या ५०२६ होती. हें समुद्रसपाटीपासून ६२४० फूट उंच असून पेड्रोतालागेला या सिलोनमधील अत्युच्च पर्वतावर आहे. कोलंबोहून नुवरएलियाला आगगाडीनें जातां येतें. येथील सर्वसाधारण वार्षिक हवामान ५८° आहे. येथें पावसाचें वार्षिक मान ९५ इंच आहे. हें ठिकाण सुधारण्यास सरकारनें बराच पैसा खर्च केला आहे

**नूरजहान** ( १५७६--१६४५ )—(नूरजहान = जगत्-प्रकाश ) मोंगल बादशहा जहांगीर याची एक राणी. हिची जहांगीरच्या मृत्यूपर्यंतची हकीकत १४ व्या विभागांत जहांगीर . बादशहा या नांवाखालीं आलेली आहे. त्यापुढील हकीकत येथें दिली आहे. जहांगीर मेल्यावर नूरजहानास तिच्या भावानेंच ( असफखानानें ) कैदेंत टाकून व मसलत करून शहाजहानास गादीवर बसविलें. ती उच्च दर्जाची कवयित्री होती व जहांगीरच्या तिच्यावर भाळण्याच्या कारणांपैकीं हें एक कारण होतें. महाराणी असतांना तिला वार्षिक ३७५०००० रुपयांची खाजगी नेमणूक होती. जहांगिरनंतर ती १८ वर्षें जिवंत होती परंतु तिचा बहुतेक काळ कैदेंतच गेला. ती वयाच्या ७२ व्या वर्षी (१६४५ सालीं) लाहोर येथें वारली. तेथेंच जहांगीरच्या कबरेजवळ रावी नदीकांठीं तिचीहि कबर आहे. कांहीं लोकांनीं तिला ताजमहालांत पुरल्याचें लिहिलें आहे तें खोटें आहे.

**नूरपूर, तहशील**.—पंजाबांतील कांग्रा जिल्ह्याची एक तहशील. क्षेत्रफळ ५१९ चौरस मैल. या तहशिलींत जिकडे तिकडे टेंकड्या असून प्रदेश जंगलमय आहे. ईशान्येस ह्या तहशिलीमध्यें व चम्बा संस्थानामध्यें धवलधार पर्वतरांग आहे. लोकसंख्या ( १९२१ ) ९५४७०. नूरपूर गांव हें तहशिलीचें मुख्य ठिकाण असून हींत १९१ खेडीं आहेत.

**गांव**.—तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें धरमसालाच्या पश्चिमेस ३७ मैल आहे. लोकसंख्या (१९०१) ४४६२. ह्यास पूर्वी 'धामेरी' म्हणत. बादशहा नुरुद्दीन जहांगीराच्या नांवावरून नूरपूर हें नांव पडलें. कांहींचें म्हणणें कीं, नूरजहानच्या स्मरणार्थ जहांगीरनें हें नांव ठेविलें. येथें इब्राहिम गझनीकरानें बांधलेला किल्ला आहे. येथील राजांस माऊ व पथिआनीचे जमीनदार म्हणत असत. पुढें माऊ शहाजहाननें जमीनदोस्त केल्यामुळें नूरपूर ही त्यांची राजधानी बनली. रणजितसिंगानें नूरपूर १८१५ सालीं काबीज केलें. मुख्य लोकावस्ती रजपूत, काश्मिरी व खत्री लोकांची आहे. काश्मिरी लोक 'पश्मिना' लोंकरीच्या शाली तयार करतात. पूर्वी ह्या गांवास व्यापारी दृष्टीनें चांगलेंच महत्त्व होतें.

**नूरपूरचे राजे**.—येथील राजांस मुसुलमान इतिहासकार माऊ व पैठण अथवा पथिआनी येथील जमीनदार असें नांव देतात. या प्रांतांत ११९८७२ बिघे जमीन असून सर्व वसूल ७२९७०१५ दाम ( ४० दाम = १ एक अकबरशाही रुपया ) होता व धामेरीचा वसूल १६ लक्ष दाम होता. येथील जमीनदारांच्या नांवाचा उल्लेख अकबराच्या कारकीर्दीच्या सुरवातीपासून आढळतो. अकबरानें मानकोट येथें शिकंदरसूर यास वेढा दिला होता तेव्हां येथील जमीनदार राजा बख्तमल हा शिकंदराच्या बाजूस होता पण तो लवकरच शरण आला. परंतु बहिरामखानानें त्याचा वध करण्याचा हुकूम केला व त्याचा भाऊ तख्तमल यास गादीवर बसविलें. बख्तमल आधीं होता कीं, तख्तमल आधीं होता तें नक्की सांगतां येत नाहीं. अकबरनाम्याच्या प्रत्येक हस्तलिखित प्रतींत नांवाची अदलाबदल केलेली आहे.

यानंतर सुमारें ३२ वर्षांनीं राजा बसु याचें नांव ऐकूं येतें. याचें वरील राजांशीं कोणतें नातें होतें तें माहीत नाहीं, परंतु शहाजहान व औरंगझेब यांच्या कारकीर्दीतील बसु यास इतिहासकार नवीन घराण्याचा संस्थापक मानतात.

**बसुराजा**:—बसुराजा जमीनदार झाल्यावर त्यानें अकबराचें मांडलिकत्व कबूल केलें; परंतु अकबरानें आपल्या भावाच्या मृत्यूनंतर लाहोर येथें राजधानी नेली त्यावेळीं तो त्याच्या दर्शनास अथवा भेटीस गेला नाहीं. परंतु अकबरानें हसनबेग यास माऊवर स्वारी करण्याकरितां पाठवितांच तो शरण गेला. अशा प्रकारें त्यानें तीन वेळां बंड केलें; शेवटीं जहांगीरच्या मदतीनें त्यानें पुन्हां राजकृपा मिळविण्याचा प्रयत्न केला, पण त्यास यश मिळालें नाहीं. जहांगीर गादीवर

बसल्यावर तो तीनहजारी व राजा झाला. बसुराजाच्या मागून त्याचा मुलगा गादीवर बसला.

सुरजमलः—जहांगीरनें त्याला राजा व दोनहजारी केलें. एकदां तो कांग्राच्या स्वारीवर बादशाही सैन्याबरोबर गेला, पण तेथें बादशाही सैन्यास चिथवण्याचा त्यानें प्रयत्न केला. शहाजहानच्या मध्यस्थीनें त्याला क्षमा मिळाली. पुढें शहाजहानाबरोबर दक्षिणेंतील व कांग्रावरील स्वारींबरोबर तो होता.त्याच्याबरोबर असलेल्या शहाकुलीनें त्याच्याविरुद्ध तक्रार केल्यावरून सुरजमलास परत बोलविण्यांत आलें व त्याच्या जागीं विक्रमजिताची नेमणुक झाली. विक्रमजित येण्यापूर्वी सुरजमलानें मिळालेल्या अधिकाराचा दुरुपयोग केला. नंतर सुरजमलानें लुटालुटीस प्रारंभ केला व जेव्हां सय्यद गफिकुन्हा यानें त्यास विरोध केला तेव्हां त्यास सुरजनें ठार मारलें. नंतर त्यानें विक्रमजितावर उघडपणें स्वारी केली पण तींत त्यास माघार घ्यावी लागली. लवकरच माऊ व नूरपूर हीं शहरें बादशाही फौजेच्या स्वाधीन झालीं व सुरजमल रानांत पळून गेला; तिकडे तो लवकरच मरण पावला. यानंतर कोटलाचा ( कोटलेहार ) किल्लाहि सर करण्यांत आला व त्याचा भाऊ माधोसिंग व मुलगा यांची राजधानीस रवानगी करण्यांत आली. [ दीक्षित–भारतीय भूवर्णन; इंडि. अँटिक्वरि. पु. १; वैद्य--मध्ययुगीन भारत, भा. १ ]

**नूरमहाल**—पंजाबांतील जालंदर जिल्ह्याच्या फिलौर तहशिलींतील एक गांव. लोकसंख्या (१९११) ७१७८. जहांगीरची स्त्री नूरजहान हिनें ह्या गांव पुन्हां वसविला. तिच्याच हुकुमावरून येथें एक सराई बांधण्यांत आली आहे. येथें ' गब्रून ' कापड तयार होतें.

**नूरुद्दीन महमूद** ( १११७–११७३ )—उर्फ मलिक-उल्‌अदिल, ख्रिस्ती धर्मयुद्धकालीन एक अत्यंत प्रख्यात व शूर असा सीरियाचा अताबक्षवंशीय मुसुलमान राजा. हा स. ११४६ त गादीवर आला. याचा वडील भाऊ सैफुद्दीन व हा, यांनीं सीरियाचा प्राचीन राजवंशांतील राजपुत्र अल्पअर्सलान याचा पराभव करून तो सर्व प्रांत काबीज केला. नूरच्या बापानें पॅलेस्टाईनमधील लॅटिन ख्रिस्त्यांच्या विरुद्ध जें धर्मयुद्ध पुकारलें होतें, तेंच पुढें चालविण्यांत नूरचीं पहिलीं वर्षें गेलीं. यानें एडेसा येथें कैद केलेल्या ख्रिस्त्यांची निर्दयपणें कत्तल केली व तें शहर बेचिराख करून टाकिलें. हें शहर परत घेण्याकरितां फ्रान्सचा राजा सातवा लुई याच्या हाताखालीं यूरोपीय लोकांनीं दुसरें धर्मयुद्ध सुरू केलें (११४८ ). परंतु नूरनें व त्याच्या सेल्जुक तुर्कांनीं इंग्रजांचा धुव्वा उडवून दिला, एडेसा मुसुलमानांच्याच हातांत राहिलें व दमास्कसच्या वेढ्यांत तिसऱ्या बाल्डविनचा व यूरोपीयनांचा पुरा मोड ( त्यांच्या आपसांतील मत्सरानें ) झाला. त्यामुळें नूरची सत्ता जास्त वाढली. त्यानें अँटिओकच्या रेमंडला लढाईंत ठार करून तें राज्य खालसा केलें (११४९) व जेरुसलेमचा व एडेसाचा राजा जोसेलाईन कोर्टेने यास पकडून कैदेंत टाकिलें आणि तेवलशेर, रावेनडेन वगैरे त्याच्या राज्याचा बहुतेक भाग जिंकून घेतला.पुढें बाल्डविननें दमास्कसचा राजा मुजीरुद्दीन याचा पराभव केल्यानें तेथील प्रधानमंडळानें मुजीरास पदच्युत करून तो सर्व प्रांत नूरच्या हवालीं केला ( ११५४ ). त्यानें दमास्कस ही राजधानी करून पॅलेस्टाईनचा भोंवतालचा सर्व प्रांत व ईजिप्तच्या फातिमाइट सरहद्दीपर्यंतचा प्रांत हस्तगत करून राज्यांत सुधारणा करून मशिदी, विद्यालयें, दवाखाने, पाणपोया वगैरे सुरू केल्या; नंतर त्यानें ईजिप्तहि खालसा केला. नूरचा प्रबल शत्रू बाल्डविन स.११६२ त मेला. मेसापोटेमियावर नूरचा पुतण्या सुभेदार होता. नूर आतां जवळ जवळ ईजिप्तचाहि राजा झाला. त्याचें नांव बगदादच्या खलिफासारखें खुत्व्यांत व खुद्द मक्का–मदिना येथील प्रार्थनेंत येऊं लागलें. त्याचा सेनापति सालहउद्दीन हा यापुढें हळू हळू स्वतंत्र बनूं लागला व त्यानें ईजिप्त आपल्या काबूंत घेण्यास प्रारंभ केला; तेव्हां त्याच्यावर स्वारी करण्याकरितां तयारी करीत असतां नूरुद्दीन हा एकाएकीं मरण पावला ( ११७३ ). त्याच्या मागून त्याचा लहान मुलगा मलिक-उस् सालह इस्माइल हा गादीवर आला पण तो अज्ञान व दुर्बळ असल्यानें सालहउद्दीननें ईजिप्त व दमास्कसच्या राज्याचा बहुतेक प्रांत जिंकून घेतला. [ बील ]

**नूशेरवान अदल**—इराणचा जुना राजा; ज्ञा. को. च्या ४ थ्याविभागांत ५९पृष्ठावर(पहिला खुश्रु)याची थोडी माहिती आली आहे. त्याशिवाय जास्त येथें येईल. हा स. ५३१ त गादीवर आला. यानें रोमन साम्राज्यावर केलेल्या स्वाऱ्यांबद्दल पौरस्त्य व पाश्चात्त्य इतिहासलेखकांनीं दिलेली माहिती जवळ जवळ सारखीच आढळते. जस्टिनियन या रोमन बादशहास यानें कैद केलें असें पौर्वात्य लेखक म्हणतात; त्यास पाश्चिमात्यांचा मात्र दुजोरा नाहीं. मात्र जस्टिनियननें अपमानकारक अटी कबूल करून तो याला शरण गेल्याचें त्यांच्या ग्रंथांत आढळतें. नूशेरनें सीरिया, अँटिओक, भूमध्यसमुद्रकिनारा, इबेरिया, कॅलकॉस, फासीस वगैरे प्रांत जिंकले. हा लष्करी धोरणांत वाकबगार होता; फक्त त्याला तोड म्हणून बेलिसरीअस हा एक निघाला. नूशेरनें जस्टिनियनला आपल्या मांडलिक राजाप्रमाणें वागविलें, त्याच्यापासून ३० हजार दिनार खंडणी घेतली व पश्चिम दिशेकडे आपला दरारा बसविला. रोमन बादशहा जस्टिन व टायबेरियस यांच्यावरील दुसऱ्या स्वारींत, नूशेरनें ८० वर्षांचें वय असतांहि आपल्या युद्धकौशल्यानें दारा येथें त्यांचा पराभव करून सिरिया लुटला ( ५७२ ). पुढें ७ वर्षांनीं तो मरण पावला ( ५७९ ).

महम्मद पैगंबर याचा जन्म नूशेरच्या कारकीर्दींत झाला ( ५७१ ); त्यामुळें महम्मद मोठ्या अभिमानानें म्हणे कीं, मी एका मोठ्या सत्यनिष्ठ राजाच्या वेळीं जन्मास आलों. यावरूनच नूशेरच्या गुणांची साक्ष पटते.

नूह—पंजाबांतील गुरगांव जिल्ह्याची एक तहशील. क्षेत्रफळ ४०१ चौरस मैल. हिच्या पश्चिमेस अलवार संस्थान आहे, लोकसंख्या (१९२१) ११२११९. हीं २६० खेडीं आहेत. नूह ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत १८०८ सालीं आलें.

नृत्य—ही कला अत्यंत प्राचीन कालापासून तयार होत आहे आणि हिची जोपासना जगांत सर्व प्रकारचे लोक करीत आहेत. आपल्या देशांत या कलेस आज एक प्रकारचें गौणस्थान आहे, व चांगल्या स्थितींतील पुरुष व स्त्रिया या कलेकडे गौरवानें पहात नाहींत. वेश्यावृत्तीच्या स्त्रियांच्या हातीं ही कला पडली आहे. तथापि यावरून या कलेकडे आपल्या लोकांचें पूर्वीपासून दुर्लक्ष होतें असें म्हणतां येत नाहीं. कां कीं, या कलेवर संस्कृत पंडितांनीं लक्ष देऊन त्या कलेच्या शास्त्रीकरणासाठीं लागणारा प्रयत्न केला आहे. उलटपक्षीं असेंहि म्हणतां येणार नाहीं कीं पाश्चात्य देशांत या कलेच्या धंदेवाईकांकडे समाजाचें सन्मानपूर्वक लक्ष पूर्वीपासून होतें. सामान्य नाचणाऱ्या स्त्रिया म्हणजे त्या अनीतिमार्गी असावयाच्याच ही समजूत पाश्चात्य देशांतहि बरीच प्रचलित आहे व तरुण शृंगारास्वाद घेऊं इच्छिणारीं पोरें अशाच प्रकारच्या स्त्रियांशीं दोस्ती जमविण्याचा प्रयत्न करतात, आणि सुशिक्षित मध्यम वर्गाची तरुण मुलगी जर रंगभूमीवर गेली तर अजूनहि लोकांत त्याबद्दल डोळे वटारले जातात.

आपल्याकडे नृत्यकलेस समाजांत कनिष्ठस्थान मिळालें याचें कारण तिचे उपासक कमी होऊन ती कला केवळ धंदेवाईकांच्या हातीं पडली हेंच प्रामुख्यानें देतां येईल. धंदेवाईक नर्तकनर्तकींची नैतिक स्थिति समाजांत नेहमींच वरखालीं होत जाणार व ती खालीं होणें ही अत्यंत स्वाभाविक गोष्ट आहे. आपल्याकडे कांहीं वरच्या वर्गांतील स्त्रिया षोकासाठीं नृत्य शिकत असाव्यात हें शक्य आहे. पण या गोष्टीची व्याप्ति मध्यमवर्गांत किती होती हें सांगतां येत नाहीं. प्राचीन हिंदुस्थानांत नृत्यकलेचें व त्यांतील हावभावांचें कसें शिक्षण देत हें नंदिकेश्वराच्या 'अभिनयदर्पणा' वरून कळून येईल. या ग्रंथाचा गोषवारा 'अभिनय' या लेखांत [ ज्ञानकोश विभाग ६, पृ. ३०८ ] दिला आहे, तो पहावा.

वेदकालांत नृत्य ही गोष्ट लोकप्रिय होती तथापि तिकडे सद्बुद्धीनें लोक पहात असत अशी समजूत करून घेण्याचें खात्रीपूर्वक साधन नाहीं. महाव्रतांत जें नृत्य आहे तें दासींचें आहे. केवळ श्रौतसंस्थांत नृत्याचा प्रवेश म्हणजे संस्थेचा सन्मान असें मुळींच नाहीं. कां कीं, महाव्रतांत कांहीं अश्लील गोष्टीहि आल्या आहेत, तथापि नृत्य ही गोष्ट शास्त्रीय तऱ्हेनें अभ्यास करण्यास लायख आहे इतपत लोकांची खात्री झाली होती. शास्त्रीकरणाचें स्वरूप खालीलप्रमाणें देतां येईल.

मनुष्यांतील व इतर अनेक प्राण्यांतील भावनांचें स्नायूद्वारां आविष्करण करण्याची जी नैसर्गिक क्रिया तिला नृत्य म्हणतात. समाज व व्यक्ति यांच्या प्रत्येक हालचालीशीं संबंध येईल अशा रीतीनें मानववंशाच्या सामाजिक व्यवहारांत नृत्याला वाव मिळालेला आहे. त्याच्या हालचालीला तालबद्धता पाहिजे. ही तालबद्धता अतिशय गंभीर व निरुद्ध अशा भावनांचें आविष्करण करण्यास चांगली उपयोगी पडते. अशा नृत्यामुळें लोकांनां ज्याची मनापासून आवड त्यां विषयीं आवेश वाढतो. नृत्यांत सर्व अवयवांनां चालना मिळते, भावनामय उत्साह प्रदीप्त होतो, तो इतका कीं कधीं कधीं नाचणारी व्यक्ति बेहोष होऊन पडते. याप्रमाणें एखादी गोष्ट साजरी करण्याचा व वैयक्तिक किंवा सामाजिक भावना दिग्दर्शित करण्याचा नृत्य हा नैसर्गिक प्रकार आहे. मूळारंभीं हा एक निव्वळ शारीरिक खेळ असून विषयवासनेला उत्तेजन किंवा करमणूक म्हणून तो करीत पण समाज जसजसा विकसत गेला तसतसा नृत्याचा उपयोग समारंभ व नाटकें यांतूनच विशेषतः होऊं लागला, व त्यांतच अनेक अंगांचा समावेश होत असे. उदाहरणार्थ, साध्या हास्योत्पादक नाचांत, उपासना, नाटक, व्यायाम, आवेश, करमणूक, खेळ, कला या सर्वांचें मिश्रण असतें.

च ल न व ल नां चें क्षे त्र.—नृत्याचें क्षेत्र साहाजिकच फार मोठें असतें. एका टोंकाला भावनाहीन कवायती तर दुसऱ्या टोंकाला संभाषणांत योजले जाणारे हस्ताभिनय या दोहोंमधील विस्तीर्ण क्षेत्र नृत्याचें आहे. करमणूक म्हणून केल्या जाणाऱ्या आधुनिक नाचांत हें चलनवलन फक्त पायांपुरतेंच असतें. पण पूर्वावस्थांत बाकीचें सर्व शरीर आणि विशेषतः हात यांचा उपयोग करीत ( 'अभिनय' पहा ); प्राचीन नृत्यकलेंत शरीराचें चलन प्रामुख्यानें नजरेस येई. संगीत व इतर साधनें हीं शारीरिक आविर्भावाला मदत म्हणून उपयोजिण्यांत येतात. कलाकौशल्याच्या नाचाचे कांहीं प्रकार कोल्हाट्याच्या किंवा जादूगाराच्या खेळासारखे वाटतात. उलट बहुतेक सामाजिक, धार्मिक नाच मिरवणुकीवजा असतात.

अ नु न य व नृ त्य.—ज्याप्रमाणें अनेक पक्षिगणांतील नर आपल्यांत व आपल्या प्रणयिनींत कामोद्दीपन व्हावें म्हणून मादींभोंवतीं नाचतात त्याचप्रमाणें रानटी माणसें स्त्रियांची आराधना करण्याकरितां त्यांच्याभोंवतीं नाचतात. मनुष्य व पक्षी या दोहोंतहि निसर्गबुद्धीनेंच हें काम होतें; हेतुपूर्वक नसतें. स्त्रियांच्या पुढें पुढें करण्याची आजची तरुणांची वृत्तीहि वरच्या सारखीच नैसर्गिक आहे. आज होत असलेले बॉल-रूममधील नाचहि तरुणतरुणींनां एकत्र आणण्याकरितां योजिलेली एक सर्वमान्य युक्ति आहे. स्त्रीपुरुषांच्या आकर्षकतेचें वर्धन करण्याचा आणि त्यांस एकत्रपणें सुशिक्षित करमणूक करून देण्याचा हा एक सुसंस्कृत प्रकार आहे. कामोद्दीपनाच्या शक्तीमुळें त्याची लोकप्रियता वाढते ही गोष्टहि लपत नाहीं. ज्यांत स्त्रीपुरुषांनीं परस्परांनां घट्ट आंवळून नाचण्याची पद्धत प्रथमच पुढें आली तो 'वाल्ट्स' नाच जेव्हां इंग्लंडांत एक

शतकापूर्वी सुरू झाला तेव्हां त्याच्या विरुद्ध लोक बरेच खवळले होते.

युद्ध नृत्य.—नाचणाऱ्या योद्ध्यांच्या अंगीं शारीरिक उत्साह व शौर्य वाढण्याकरितांच म्हणून मुख्यतः या नाचाचा मूळ उपयोग असे. शिवाय या नाचाच्या अंगीं असणारा जादूचा प्रभाव व आपल्या अत्याचाराच्या हावभावांनीं शत्रूच्या ठिकाणीं उत्पन्न होणारी भीति या सारख्या मूळच्या लोकांच्या कल्पनाहि या नाचाला कारणीभूत आहेत. या नाचाचा व्यावहारिक पण त्या रानटी लोकांनां अज्ञात उपयोग असा आहे कीं, त्यामुळें त्यांनां शत्रूवर हल्ला करण्याच्या प्रकारांची आपोआप उजळणी मिळते व कवाईत केल्यासारखी होते. तेव्हां रानटी लोकांच्या किंवा स्पार्टन लोकांच्याहि युद्धनृत्यांनां, त्यांनां नकळत केली जाणारी लढाईची रंगीत तालीम म्हणतां येईल. तथापि कोणत्याहि अतिमानुष शक्तीशीं झगडण्याकरितांहि हीं युद्धनृत्यें होतात. कृषिविषयक धार्मिक विधींत पिकांचे रोग, वाईट हवा आणि इतर नापीकतेच्या गोष्टी यांच्याशीं झगडण्यासाठींहि अशीं युद्धनृत्यें किंवा यासारखेच प्रकार केलेले दिसून येतात.

कृषीवल नृत्यें.—लागवडीच्या वेळीं केले जाणारे अशा प्रकारचे समारंभ पिकांनां यशस्वी होतात अशी समजूत असते. अनुकरणप्रवर्तक जादूमुळें नाचणाऱ्यांच्या हालचालींचा पिकांवर परिणाम होतो, किंवा नाचणाऱ्यांच्या ठिकाणीं वनस्पतिदेवता अवतरून त्या सद्गुण व सुपीकता प्रसृत करतात असा साधारण समज आहे. यूरोपांत तर हे नाच फार. आपल्या हालचालींनें आपण निसर्गाला हलवितों या समजुतीनें शेतकरी नाचतात. आपणांकडील गौरीप्रमाणें एखादें झाड किंवा खांब यांभोंवतीं नाचणें विशेष रूढ असून त्याला लौकिक नृत्यहि म्हणतां येईल. यांत धार्मिक विधी व करमणूक यांचें सुंदर मिश्रण दृष्टीस पडतें. यांत मानवप्राण्यांच्या सुरतलीला सृष्टीला समृद्ध करण्याला उपयोगी पडतील अशा वाटतात असे अनेक विधी आहेत. नाचांत पुष्कळ वेळां सुरतप्रयोगाचें अनुकरण केलें जातें व त्याचा जादूटोण्याप्रमाणेंहि उपयोग मानितात. व यामुळें नृत्यकलेंत उत्पन्न होणारे हावभाव सभ्य नृत्यांस चिकटवण्याचा प्रयत्न, अर्वाचीन कालांत वारंवार होतो.

जादू नृत्य.—आपल्या आवेशपूर्ण हालचालीमुळें भोंवतालच्या वातावरणांत नृत्य हें चलबिचल घडवून आणतें ही कल्पना पाऊस पाडण्याच्या आफ्रिकन किंवा आस्ट्रियन लोकांच्या विचित्र चालींत चांगली दिसून येते. ग्रीक पुराणांतील बकनृत्य हें सूर्याच्या प्रगतीला साहाय्यक असें जादूनृत्य आहे असें मानितात. जगांतील निरनिराळ्या भागांत चालणारीं मुग्धाभिनयी नृत्यें हीं निरनिराळ्या पक्ष्यांच्या गतीला अनुसरून आहेत. कांहीं नृत्यें केवळ जादूचीं नसून 'सहानुभूत्युत्पादक' (सिंपॅथेटिक) असतात. मूर्तीभोंवतीं नाचण्याची कित्येकांत (यूरोपीयन लोकांतहि) चाल आहे. त्याबद्दल समजुतीहि भिन्न भिन्न आहेत.

धार्मिक नृत्य.—धार्मिक उपासनेचा एक भाग किंवा रूप म्हणून नृत्याला स्थान मिळणें अगदीं स्वाभाविक आहे. अशा नृत्याचे हेतू प्रसंगाप्रमाणें निरनिराळे असूं शकतील. ख्रिस्ती संप्रदायाच्या प्रथमावस्थेंत बिशप हे भक्तांनां घेऊन देवळांत व संतांच्या समाधीपुढें नाच करीत. ६९२ च्या कौन्सिलनें ही चाल बंद करण्याचा प्रयत्न केला पण ती बंद झाली नाहीं. १८ व्या शतकांत देखील फ्रान्समध्यें संतांच्या उत्सवप्रसंगीं उपाध्यायांचा नाच होई. नृत्यासंबंधींच्या निरनिराळ्या कल्पना या धार्मिक नृत्यांत गर्भित असतात. आपल्याकडे हरिभक्तांचें नाचणें वारंवार दृष्टीस पडतेंच.

मुग्धाभिनयी नृत्य.—सौंदर्यशास्त्रीय दृष्टीनें पहातां नृत्य हें स्नायु-संगीत म्हणतां येईल संगीताप्रमाणें तें प्राधान्येंकरून स्वतःचेंच दिग्दर्शन करतें. त्यानंतर तें कलेच्या क्षेत्रांत व साधनांत जें कांहीं असेल त्याचें आविष्करण करितें. या दुसऱ्या कार्याच्या वेळीं नृत्य हें मुग्धाभिनयी असतें. या प्रकारच्या नृत्याचा इतिहास फार दूरवर पोंचतो. हें नृत्य आस्ट्रेलियनांसारख्या अतिशय कमी सुधारलेल्या लोकांत बरेंच विकास पावलेलें असून आजच्या सुधारणेच्या शिखरास पोंचलेल्या लोकांतहि अत्यंत प्रिय असेंच आहे. इतर प्रकारांप्रमाणें याचाहि उपयोग निरनिराळ्या कारणाकरितां निरनिराळ्या ठिकाणीं करतात. मुग्धाभिनयी किंवा छद्मवेषी नृत्यांत बराच गूढार्थ आहे असें कांहीं लोक समजतात. वायव्य अमेरिकेंतील देश्य लोकांत या नृत्यांची बरीच प्रगति दिसते. यांतून जातीच्या संरक्षक देवताच्या चरित्रांतील प्रसंग दाखविण्यांत येतात. दैवक उपासनेच्या प्राण्यांचीं नृत्यें या लोकांच्या बऱ्याच धार्मिक भावना व्यक्त करतात.

आजकाल प्राथमिक शाळांतून शैक्षणिक प्रयोगादाखल मुग्धाभिनय होत असतात. पेरणी, कापणी यांसारख्या साध्या क्रिया मुलें अंगविक्षेपानें बरोबर करून दाखवितात. आतांच्या सिनेमाप्रमाणें करण्यांत येणारीं मूकनाटकें प्राचीन काळीं लोकप्रिय होतीं. यांकरितां पुराणांतून कथानकांची निवड करीत; यांतून नाचाहि बरेच असत. अर्वाचीन बॅलट नृत्य १५ व्या शतकापासून अस्तित्वांत आहे. इटलींतून बॅलट जेव्हां फ्रान्समध्यें आलें तेव्हां त्याची खरी प्रगति झाली.

सामाजिक करमणुकीचा प्रकार.—नाटकांप्रमाणेंच कलाकौशल्ययुक्त व नाटकी नृत्यांवरहि पुष्कळ वेळां निरनिराळ्या समाजांचे हल्ले होऊन तीं निषिद्ध ठरत. यामुळें नाचाचा धंदा करणारांचा एक स्वतंत्र वर्ग बनला. बऱ्याच समाजांतून असे वर्ग असून त्यांनां प्राप्तीहि चांगली होते, तथापि लोक त्या धंद्यांत पडूं इच्छीत नाहींत. जागतिक कलेच्या इतिहासांत टॅरिलओनी व पॅव्हलोव्हा यांसारखे श्रेष्ठ नृत्यकार होऊन

गेले असून त्यांचा दर्जा अतिविख्यात गवयी व पद्यकार यांच्या खालोखाल लागेल यांत शंका नाहीं.

सामाजिक करमणूक म्हणून नृत्याचा उपयोग अगदीं अलीकडचा आहे. मुलांनीं व मुलींनीं एकत्र नाचावें या मताचा प्लेटो होता तरी १५ व्या शतकांत इटलींत या कलेचें पुनरुज्जीवन होऊन ती फ्रान्समध्यें जाईपर्यंत तिला खेळाच्या दृष्टीनें फारसें महत्त्व नव्हतें. पुढें स्पेन हें या कलेचें माहेरघर बनलें. नृत्यकलेच्या विकासाचा इतिहास निःसंशय सामाजिक विकासावर बराच प्रकाश पाडील. या इतिहासांत एकामागून एक येणाऱ्या विकासावस्था किंवा संप्रदाय स्पष्ट दिसतात. विशिष्ट नृत्यांमध्यें पॅव्हने'चा प्रमुखत्वानें उल्लेख करावा लागेल. याचें धंदेवाईक स्वरूप आहे. 'मिन्युएट' हें या कलें-तील अतिसुंदर फळ म्हणतां येईल. पण वास्तविक हें फक्त सभ्याचाराचे कृत्रिम नियम दर्शवितें. 'वाल्टस' हें युग्मनृत्य संशयजन्य आहे. सुसंस्कृत व रानटी लोकांचा संबंध येत गेला म्हणजे एकमेकांतील नृत्यप्रकार एकमेक उचलतात असा अनुभव आहे.

आपल्याकडे नृत्याचें शास्त्रीकरण करण्याचा प्रयत्न केला गेला तो येणेंप्रमाणें.

प्रत्येक नाचांत शरीराच्या हालचाली म्हणजे अभिनय वर्णन करतांना ( १ ) अंगें, म्हणजे डोकें हाताचे पंजे, कुशी, कंबर, पाय व मान ( २ ) प्रत्यंगें, म्हणजे खांदे, बाहू, पोट, मांड्या, पोटऱ्या, मनगटें, गुडघे व हातांचे कोपरे ( ३ ) आणि उपांगें म्हणजे डोळे, पापण्या, बुबुळें, गाल, नाक, तोंड, ओठ, दांत, जीभ, हनुवटी, चेहेरा. या तीनहि प्रकारच्या अभिनयस्थानांच्या हालचालींचें वर्णन करावें. नृत्य-वर्णनाची शास्त्रीयभाषा तयार झाली आहे ती येणेंप्रमाणें:– गाणें ज्याप्रमाणें सात स्वरांत लिहितां येतें त्याप्रमाणें प्रत्येक नाच अभिनयांत लिहितां येतो. स्वाभाविक क्रिया करतांनां जे अंगविक्षेप होतात अगर ज्या क्रिया होतात त्यांपैकीं प्रत्येक अंगाच्या, प्रत्यंगाच्या व उपांगाच्या प्रत्येक निरनिराळ्या क्रियांस नांवें दिलीं गेलीं आहेत. त्यामुळें सर्व प्रकारच्या हालचाली ( अभिनय ) थोडक्यांत लिहितां येतात. अनेक प्रकारचे अभिनय एकत्र होऊन एक नृत्य होतें. नृत्याचे हेतू सामान्यतः तीन असतात ( १ ) शरीर-चापल्य व हालचालींतील गोंडसपणा दाखवून प्रेक्षकास आश्चर्यचकित करणें, ( २ ) संगीतास जोड म्हणून आपल्या पायांनीं अगर घंटांनीं नाद उत्पन्न करून, किंवा नादास योग्य असे अंगविक्षेप करून, श्रोत्यांच्या किंवा प्रेक्षकांच्या मनावर एकभाव उत्पन्न करणें, ( ३ ) स्मरणानें पूर्वानु-भूत विकार जागृत करतां येतात म्हणून, सर्वांस परिचित असलेल्या क्रियांची, अगर ऐतिहासिक, पौराणिक व नाट्य-विषय झालेल्या कथांची, प्रसंगांची अगर व्यक्तींची भाव-विषयक स्मृति उत्पन्न करणें.

या पद्धतीनें नृत्य विवेचन आपल्या ग्रंथांत आढळतें. यूरोपांतहि शास्त्रीकरणाचे प्रकार याच पद्धतीचे आहेत. पण त्यांनीं अनेक ठिकाणीं आढळणाऱ्या अंगविक्षेपसंतति अव-लोकून आणि त्यांनां अधिक गोंडसपणा देत जाऊन त्यांस कलेंत स्थान दिलें आहे.

**अ र्वा ची न नृ त्य.**—अर्वाचीन काळांत कला व करम-णुकीचें साधन या नात्यानें नृत्याची वाढ झालेली आढळते. मनोविकार अगर धार्मिक भावना उद्दीपित करण्याचें नृत्य हें महत्त्वाचें साधन आहे अशी जी प्राचीन कल्पना होती ती अर्वाचीन काळांत मागें पडत चाललेली दिसते.

पंधराव्या शतकांत इटलीमध्यें नृत्यामध्यें क्रांति घडून आली, व फ्रान्समध्यें त्याच्या वाढीला चांगला अवसर मिळाला. खुद्द फ्रान्समध्यें उत्पन्न झालेले नृत्याचे प्रकार फारच थोडे आहेत पण परकीय राष्ट्रांतील विविध नृत्यांचे प्रकार आपल्या राष्ट्रांत आणून त्यांची सुंदर तऱ्हेनें वाढ करण्याचें काम फ्रान्स राष्ट्राला उत्तम साधलें. नृत्यशास्त्रांतील संज्ञा बहु-तेक फ्रेंच भाषेंतील आहेत एवढी एकच गोष्ट वरील विधा-नाच्या समर्थनाला पुरेशी आहे.

**डॅन्से बॅसे व हौटेः**—सोळाव्या शतकामध्यें डॅन्से बॅसे व डॅन्से हौटे हे नृत्याचे नवीन दोन प्रकार अस्तित्वांत आले. डॅन्से बॅसे हा शिष्टांमध्यें प्रचलित असे तर दुसरा खेडवळ लोकांत प्रसार पावला होता. याखेरीज या शतकांत, गैलार्ड, वोल्ट, ब्रनले, पवान इत्यादि नवीन नवीन प्रकारच्या नृत्याचे प्रकार उदयास आले. या वरील प्रकारामध्यें पवान हा प्रसिद्ध व लोकप्रिय नृत्यप्रकार होता. याचें वर्णन टॅबोरे नांवाच्या एका नृत्यशास्त्रज्ञानें सविस्तर दिलें आहे. या प्रकारांत, नृत्यकौशल्यापेक्षां, बाह्यदेखावाच अधिक असे. नर्तक व नर्तकी यांचे भपकेदार पोषाख असत, नर्त-कांच्या हातांत तलवारी असत व डोक्यावर पिसांच्या टोप्या असत.

**पवान व इतरः**—पवान अगर ब्रनले व १७ व्या आणि १८ व्या शतकांत उदयास आलेल्या इतर नृत्यप्रकारांमध्यें चुंबनालाहि बरेंच महत्त्व देण्यांत येत असे व त्यामुळें ते लव-कर लोकप्रिय झाले. १७ व्या शतकांत सरबंद नांवाचा एक नृत्यप्रकार अतिशय लोकप्रिय होता पण तो फार दिवस टिकला नाहीं. पवानच्या खालोखाल कौरान्टे नांवाचा एक प्रकार अस्तित्वांत आला. या नाचांत, पायाच्या बोटावर नाचण्याची व अनेक वेळां प्रणाम करण्याची पद्धत असे. चव-दाव्या लुईला हा नाच फारच आवडत असे व त्याच्या वेळीं प्रत्येक सरदारघराण्यांतील माणसाला हा नाच शिकावा लागे असें म्हणतात.

**मिन्युएः**—पण फ्रान्सनें ज्याची पूर्ण वाढ केली असा नाच म्हणजे मिन्यूए हा होय. हा १६५० सालीं बाहेरून फ्रान्समध्यें आला. प्रथम हा नाच विनोदी व हास्योत्पादक होता. पण त्याचा दरबारांत प्रवेश झाला त्यावेळीं त्याला भारदस्त

स्वरूप प्राप्त झालें. चवदाव्या लुईच्या कारकीर्दीत तर याच्या लोकप्रियतेचा कळस झाला. हल्लींच्या मिन्यूए नाचाला जें छचोरी स्वरूप प्राप्त झालें आहे तें लुईच्या वेळीं मुळींच नव्हतें. तरीपण त्यावेळींहि या नाचांत भपकेदार पोषाखाचा व थाटमाटाचा प्रवेश झाला होताच. निरनिराळ्या नाचांतून चांगला भाग जेवढा असेल तेवढा या मिन्यूएमध्यें घेतलेला होता. तत्कालीन फ्रान्स हा 'शिव्हलरी' उर्फ वीरवृत्ति व स्त्रीदाक्षिण्य याबद्दल फार प्रसिद्ध होता. अर्थात त्यावेळच्या परिस्थितीला साजेसे फरक या मिन्यूएमध्यें करण्यांत आले होते. उत्कृष्ट हावभाव, ऐटींत मान लववून प्रणाम करण्याची पद्धत, हंसरा चेहरा, तिरप्या दृष्टीनें बघणें इत्यादि मनोवेधक गोष्टींचा या मिन्यूएमध्यें अंतर्भाव झाला असल्यामुळें, या नाचानें सर्वांना वेड लावलें होतें. मिन्यूएमधील तालाबरहुकूम स्वरैक्यघटना करण्याची त्यावेळीं फ्रान्समध्यें पद्धत पडली. यावरून या नाचाची लोकप्रियता किती होती हें दिसून येतें. या मिन्यूएच्या अखेरीस 'गॅव्होटे' नाच करण्याचा प्रथम प्रघात असे पण पुढें तो स्वतंत्र रीतीनें नाचण्यांत येऊं लागला. प्रथमतः त्याच्यांत चुंबन घेणें, मनोहर तऱ्हेनें उड्या मारणें इत्यादि प्रकार असत पण पुढें त्यालाहि गंभीर स्वरूप प्राप्त झालें. विशेषतः याचा प्रसार रंगभूमीवर फार झपाट्यानें झाला.

याशिवाय फ्रान्समध्यें एकोसैस ( १७६० ); दहाव्या चार्लसच्या कारकीर्दीत कार्टीलाँ, जर्मनींतून आलेला गॅलॉप, स.१८३६ मध्यें लॅबोर्देनें काढलेला लॅन्सर्स,प्रागमधून आलेला पोल्का, शोटिशे ( १८४४ ); बोरी काड्रिल, वल्ट्स इत्यादि नाच फ्रान्समध्यें १८ व्या शतकांत व १९ व्या शतकाच्या प्रारंभींच्या काळांत उदयास आले.

पण फ्रान्स हें नृत्यसंवर्धनाचें तर स्पेन हें नृत्योत्पत्तीचें माहेरघर होय. स्पेनमध्यें नृत्य हा जीविताचा एक आवश्यक भाग म्हणून गणला जातो दहाव्या अगर बाराव्या शतकांतील नाच अद्यापीहि प्रचारांत असलेले आढळतात. तुरडिऑन, गिविदन, पीदे गिबाओ, मडम ऑर्लीअन्स, क्लेमन, पवान इत्यादि नाच स्पेनमध्यें प्राचीन काळीं प्रसिद्ध होते. चवथ्या फिलिपच्या कारकीर्दीत रंगभूमीवर नाचांचा फार सुळसुळाट असे; व ते नाच फार भपकेदार रीतीनें करण्यांत येत असत. त्यामुळें स्पेनमध्यें जे खरे खुरे नाच होते ते १८ व्या शतकांत मागें पडले. याच शतकांत बोलेरो, सेगुइदिला, फंडँगो इत्यादि प्रसिद्ध नाच उदयास आले. त्यांत फंडँगो हा सर्वांत महत्त्वाचा नाच होय.हा नाच दोघांनीं नाचावयाचा असतो. प्रथमतः अगदीं सावकाशपणें करतालांत व चुटक्या वाजवून नाचाला सुरवात होते आणि शेवटीं तो ऐन रंगांत आला म्हणजे अतिशय गडबडीनें नाचाला सुरवात होते. या नाचांतील महत्त्वाचा विशेष म्हणजे नाचाच्या मध्यंतरींच एकदम सर्व वादन बंद होतें व त्याबरोबर त वादन पुन्हां सुरू होईतों नाचणारें युग्म अगदीं स्तब्ध व शरीराची यत्किंचित हालचाल न करतां उभें रहातें.

स्पेनः—बोलेरो हा नाच बराच अलीकडच्या काळांतला आहे. हा तिसऱ्या चार्लसच्या कारकीर्दीत, सेबॅस्टियन सेरेझो यानें काढला. या नाचांत, शस्त्रांचा उपयोग स्वैरपणानें करण्यांत येई. हा एका अगर एकाहून अधिक युग्मांकडून नाचण्यांत येत असे. स्पेनमधील प्रत्येक प्रांताचा स्वतंत्र असा नाच असे. ॲरागॉनमध्यें जोत हा नाच फार लोकप्रिय असे. विशेषतः धार्मिक समारंभाच्या वेळीं हा नाच करण्यांत येत असे. कचूका नांवाचा नाच त्रितालामध्यें नाचण्यांत येई. या नाचांत डोक्याच्या व खांद्याच्या हालचाली फार कराव्या लागत असत. याशिवाय, जिप्सींचा 'जलेओडे जेरेझ' हा नाच, पॅलोटीया, पोलो, गलेगडा, हबरुवेर्द, विटो इत्यादि नाच स्पेनमध्यें लोकप्रिय आहेत.

ग्रेटब्रिटनः—ग्रेटब्रिटनमधील नाच जवळ जवळ फ्रान्समधीलच असल्यानें त्यांचें येथें निराळें विवेचन करण्याचें कारण नाहीं. तथापि खास इंग्लंडचे असे कांहीं नाच आहेत, त्यांबद्दल येथें थोडें फार–विवेचन केलें पाहिजे. अशा खास इंग्लंडच्या नाचांपैकीं एग व कॅरोल हे नाच होत. तिसऱ्या एडवर्डच्या कारकीर्दीत निघालेले मॉरिस नाचहि अद्यापि इंग्लंडांत प्रचारांत आहेत. मॉरिस नाचांपैकीं, रॉबिनहुड, मेडमेरियन, फ्रायर टक, लिटल जान, टॉम दि पाइपर हे नाच फार प्रसिद्ध आहेत. इंग्लिश नाच हे शीघ्र गतीनें नाचावयाचे असतात. यांपैकीं कांहीं मॉरिस नाच अजून नाचले जातात. तुतारीच्या सांथीवर नाच नाचण्याची चाल इंग्लंडांत फार प्रचलित आहे. एलिझाबेथच्या कारकीर्दीत, साधे पण मनोरंजक असे नाच फार लोकप्रिय झाले. ' हंट दि स्लिपर ', ' किस इन दि रिंग' इत्यादि नाच अगदीं साधे आहेत; यांना आज नाच म्हणण्यापेक्षां मुलांचे खेळ म्हटलें पाहिजे.हे लपंडावासारखे आहेत. ट्यूडर अंमलांतील नाचांत चुंबनांचा फार सुळसुळाट असे. 'कुशन' नाचांत तर चुंबनाचें फारच स्तोम असे. याशिवाय 'टॉली पॉली,' 'कम किस मी नाऊ', 'दि हॅपी मॅरेज', 'डिसेंब्लिंग लव्ह', ' अंडर अँण्ड ओव्हर ' इत्यादि अनेक नाच प्रसिद्ध होते. प्यूरिटन राजांच्या अमदानींत नाच मागें पडले पण रेस्टोरेशनच्या काळांत व ॲनच्या कारकीर्दीत पुन्हां नाचास ऊत आला; व त्यांत अश्लील प्रकार घुसडले गेले पण थोडक्याच काळांत पुन्हां सभ्य नाचाकडे लोकांची प्रवृत्ति होऊं लागली. स्कॉटलंडमध्यें रील्स, फ्लिंग्स इत्यादि नाच आढळतात. आयर्लंडमध्यें जिगची फार लोकप्रियता आहे. वेल्समध्यें खास वेल्श लोकांचा असा स्वतंत्र नाच नाहीं. व्हिक्टोरियाच्या काळापासून नृत्यांतून चुंबन गेलें आहे.

गेल्या पिढींत इंग्लंडमध्यें प्रचारांत असलेले नाच म्हणजे वाल्ट्झ, काड्रिल, लॅन्सर्स, पोल्का, गॅलप, बॉस्टिंग्टन

पोस्ट, पोल्का मझुर्का, स्कॉटिशे, सर रॉजर डी कॉव्हर्ले, कोरिलान, बॅले इत्यादि होत. वाल्ट्झ् हा मूळांत फ्रेंच नाच होता. तो स. १८१२ मध्यें इंग्लंडांत आला. गंग्ल, वाल्डटयूफेल, स्ट्रॉस इत्यादि घराण्यांतील नर्तकांनीं तो फार लोकप्रिय केला. क्वाड्रिल नाच इंग्लंडमध्यें लोकप्रिय करण्याचें श्रेय, लेडी जर्सी, लेडी हॅरियट बटलर, लेडी सुसन रायडर, मॉंटगॉमरी, हार्ले, मॉंटेग्यू इत्यादि नर्तक-नर्तकीकडे आहे. लॅन्सर्स नाच १८५०सालीं इंग्लंडमध्यें आला व मॅडम सॅकें हिनें तो लोकप्रिय केला. पोल्का हा बोहेमियन लोकांचा नाच, इंग्लंडमध्यें १८४०सालीं आला. हा इंग्लंडमध्यें फारच लोकप्रिय झाला. सर रॉजर डी कॉव्हरले हा एवढाच नाच मात्र खास इंग्लिश आहे. टांगो, फास्कट्राट, दि ब्ल्यूज, वनस्टेप, टू स्टेप हे अगदीं अलीकडचे नृत्यप्रकार आहेत. सध्यांच्या नृत्यप्रकारांत अश्लीलता वाढत चालली आहे.

नृत्य हें शारीरिक शिक्षणाचें एक प्रमुख अंग आहे. यानें शरीराच्या सर्व भागांनां थोडक्यांत पुष्कळ श्रम होतात. शिवाय हे श्रम मनोरंजन होऊन साहजिकपणें होतात, त्यामुळें त्यांनां फार महत्त्व आहे [ व्हुइलीयर--हिस्ट्री ऑफ डान्सिंग, (१८९७); गिरौडेट-ट्रेटे ड ला डॅन्से ( १९०० ). ]

**नृसिंह**—(१) एक भारतीय ज्योतिषी. याचा जन्म शके १५०८ मध्यें झाला. हा गोलग्रामस्थ दिवाकराचा पौत्र होय. शके १५३३ मध्यें नृसिंहानें सूर्यसिद्धांतावर सौरभाष्य नांवाची टीका केली; तींत उपपत्ति आहे. याची ग्रंथसंख्या ४२०० आहे. शके १५४३ मध्यें सिद्धांतशिरोमणीवर यानें वासनावार्तिक नांवाची टीका लिहिली आहे. वासनाकल्पलता असेंहि तिचें दुसरें नांव आहे. हा मोठा मीमांसक होता [ दीक्षितकृत भारतीय ज्योतिःशास्त्र ].

(२) ग्रहलाघवकार गणेश दैवज्ञ यांचा बंधु राम व रामाचा पुत्र नृसिंह. शके १४८० मध्यें यानें मध्यग्रहसिद्धि नांवाचा ग्रंथ लिहिला असें सुधाकर लिहितात. कृष्णशास्त्री गोडबोले यांच्या हस्तलिखित मराठी पुस्तकांत लिहिलें आहे कीं केशव दैवज्ञाचा नातु रामाचा पुत्र नृसिंह यानें शके १५१० मध्यें ग्रहकौमुदी ग्रंथ लिहिला. नृसिंहाचा जन्मशक १४७० हा होय. हा शक आणि वरील १४८० हा शक यांपैकीं एक चुकीचा असला पाहिजे. १४७० हा चुकीचा असणें संभवत नाहीं कदाचित शके १४८० नंतर कांहीं वर्षांनीं नृसिंहानें तो ग्रंथ लिहिला असेल. [ दीक्षितकृत भा. ज्योतिःशास्त्र ]

( ३ ) नृसिंह उर्फ बापूदेवः—हिंदुस्थानांत इंग्रजी राज्य सुरू झाल्यावर भारतीय आणि यूरोपीय या दोन्ही प्रकारच्या गणितांत आणि ज्योतिषशास्त्रांत निपुण असे जे विद्वान होऊन गेले त्यांत बापूदेव हा एक होता. हा ऋग्वेदी चित्तपावन ब्राह्मण, मूळचा अहमदनगर जिल्ह्यांत गोदातीरीं टोकें येथें राहणारा असून याचा जन्म शके १७४३, कार्तिक शु॥ ६ स झाला. पित्याचें नांव सीताराम व आईचें नांव सत्यभामा. प्रथमतः याचें अध्ययन नागपुरास मराठी शाळेंत झालें, व तेथेंच त्यानें ढुंढिराजनामक कान्यकुब्ज विद्वानाजवळ भास्करीय लीलावती व बीज यांचें अध्ययन केलें. शके १७६० मध्यें सिहूरच्या पोलिटिकल एजंटनें बापूदेवाची नेमणूक काशी येथें केली. तेव्हांपासून म्हणजे शके १७६३ अखेरपर्यंत तो काशीस होता. शके १७८१ मध्यें तो तेथेंच मुख्य अध्यापक झाला. हा शके १८१२त मृत्यु पावला.

याचे ग्रंथः--रेखागणित प्रथमाध्याय, त्रिकोणमितीचा कांहीं भाग, सायनवाद, तत्त्वविवेकपरीक्षा, मानमंदिरस्थयंत्रवर्णन, अंकगणित, अष्टादशविचित्रप्रश्नसंग्रहसोत्तर इत्यादि याचे संस्कृत ग्रंथ छापलेले आहेत. हिंदी भाषेंत अंकगणित, बीजगणित व फलितविचार हे ग्रंथ छापलेले आहेत. सिद्धांतशिरोमणीचा गोलाध्याय याचा इंग्लिश अनुवाद यानें तपासला व सूर्यसिद्धांताचा अनुवाद केला. सिद्धांतशिरोमणीचें गणित आणि गोलाध्याय हीं शके १७८८ त व लीलावती १८०५ मध्यें छापली आहे. [ दीक्षितकृत भा. ज्योतिःशास्त्र ].

**नेगापट्टम्**, ता लुका.—मद्रास इलाखा. तंजावर जिल्ह्यांतील समुद्रकांठचा एक तालुका, क्षेत्रफळ २४० चौरस मैल. लोकसंख्या ( सन १९२१ ) २२३३३५. नेगापट्टम् शहरामुळें ह्या तालुक्याला फारच महत्त्व आलें आहे. इतर तालुक्यांपेक्षां ह्या तालुक्यांत सुशिक्षित लोक पुष्कळ आहेत. तिरुवलूर नांवाचें दुसरें एक शहर ह्या तालुक्यांत आहे. यांत एकंदर खेडीं १८९ असून जमीन निरनिराळ्या प्रकारची आहे.

श ह र.—नेगापट्टम् तालुक्यांतील एक मोठें शहर व बंदर. उत्तर अक्षांश १०° ४६' व पूर्व रेखांश ७९° ५१'. साउथ इन्डियन रेल्वेनें हें शहर मद्रासपासून १२ मैल दूर आहे. लोकसंख्या ( १९२१ ) ५४०१६. शेंकडा ६८ लोक हिंदु आहेत. याच्या उत्तरेस नागोर नांवाचा किल्ला आहे. प्राचीनकाळीं नाग लोकांचें हें राजधानीचें शहर होतें. या ठिकाणीं राजराज चोलानें दोन बौद्ध मंदिरें बांधविलीं ( ९८५ ). येथील यात्रेस बाहेरचे लोक १५ व्या शतकापर्यंत येत असत. नंतर कांहीं काळानंतर पूर्व किनाऱ्यावरील पोर्तुगीज लोकांचें हें व्यापाराचें ठाणें होतें, व ह्या शहरास ते 'कारोमान्डलचें शहर' असें म्हणत. डच लोकांनीं हें स. १६६० त घेतलें व त्यांचें हें स. १७८१ पर्यंत मुख्य ठाणें होतें. तंजावरच्या राजानें स. १७७३त डच लोकांस नागोरचा किल्ला विकला परंतु इंग्लिशांच्या मदतीनें कर्नाटकच्या नबाबानें तो परत घेतला. पण पुढें १७७६ सालीं तो कंपनीस मिळाला. १७८०-८१ सालच्या युद्धांत हैदरअल्लीनें हें शहर व किल्ला डच लोकांस दिला पण हेक्टर मनरो ह्यानें मद्रासहून येऊन १७८१ सालीं किल्ला व शहर दोन्हींहि परत घेतलीं. १७९९ सालीं तंजावरचें राज्य ब्रिटिश सरकारास मिळालें. येथें तीन हायस्कुलें आहेत.

येथें एक फार प्राचीन काळचें देऊळ आहे. या देवळांतील शिलालेखावरून डच लोकांनीं १७१७ सालीं हें बाधलें असावें

असें वाटतें. तसेंच मिरानसाहेब मखन साधु ह्याच्या नांवानें नागोर येथें एक दरगा आहे. यावरील लेखावरून तंजावरच्या प्रतापसिंग राण्यानें १७५७ सालीं हा दरगा बांधला असें दिसून येतें.

सन १८४५ पावेतों मद्रासच्या दक्षिणेस नेगापट्टम् हेंच मुख्य बंदर होतें. पण पुढें कांहीं वर्षेपर्यंत टांकीवार हें व्यापाराचें मुख्य बंदर झालें. १८६१ सालीं नेगापट्टम हें साउथ इन्डियन रेल्वेचें स्टेशन झाल्यापासून गेलेलें वैभव पुन्हां आलें. तुतिकोरिनचा मद्रासशीं संबंध जडल्यापासून पुन्हां खालावल्याचीं लक्षणें दिसूं लागलीं आहेत. नेगापट्टमचा व्यापार बहुतेक अंशीं सिंहलद्वीप, ब्रह्मदेश, स्ट्रेटस् सेटलमेंट्स व थोड्या प्रमाणावर स्पेन व 'संयुक्त राज्य' ह्या देशांशीं चालतो. बाहेर पाठविला जाणारा माल तांदूळ, सुती माल, तूप, तंबाखू, चिरूट, कातडें वगैरे.

**नेताजी पालकर**—माणकोजी दहातोंड्याच्या मृत्यूनंतर शिवाजीनें नेताजी पालकर यास सरनोबतीची जागा दिली ( १६५७ ). नेताजी पालकराचें ठिकठिकाणच्या शिलेदार लोकांवर बरेंच वजन होतें. हा सातारा जिल्ह्यांतील खंडोबाच्या पालीचा रहाणारा होता असें म्हणतात. शिवाजीनें अफझुलखानाची भेट घेण्याचें ठरविलें तेव्हां त्यानें नेताजीस प्रतापगड किल्ल्याच्या पूर्वेस थोड्या अंतरावर झाडींत त्याच्या लोकांसह ठेविलें होतें. ठरल्याप्रमाणें खुणेचें शिंग होतांच नेताजी अफझुलखानाच्या लोकांवर तुटून पडून त्यानें त्यांची सरसहा कत्तल केली ( १६५९ ). शिद्दी जोहारानें पन्हाळ्यास वेढा दिला तेव्हां नेताजीनें आसमंतांतील मुलूख उध्वस्त करून वेढा देणाऱ्या सैन्याची रसद मारण्याचा उपक्रम केला होता. तो विजापुरकरांच्या फौजेस मैदानांत कधीं तोंड देत नसे, परंतु रात्रीच्या वेळीं तिच्यावर हल्ले करून तिला त्रास मात्र देत होता (१६६०). इ. स १६६२ च्या पावसाळ्यानंतर नेताजीनें अवरंगाबादेपर्यंत मोंगलाचा मुलूख लुटून उध्वस्त केला, व खंडणी गोळा केली. त्यास अडविण्यास कोणीच पुढें आलें नाहीं. त्याप्रमाणेंच शाएस्तेखानाच्या पुण्याच्या मुक्कामांतहि यानें त्याला वारंवार सतावून सोडलें होतें. पुढील पावसाळ्याच्या सुमारास ( १६६३ ) नेताजीनें अहमदनगर व औरंगाबाद यांच्या आसमंतांतील मुलूख लुटून जाळपोळ करण्यास सुरवात केली होती. परंतु मोंगलांच्या एका तुकडीनें याच्यावर अचानक हल्ला करून यास मार्गे हटविलें; यावेळीं नेताजी जखमी झाला होता.

नेताजी हा मोंगलांच्या मुलुखांत यशस्वीपणें लुटालूट करून प्रत्येक पावसाळ्याच्या आरंभीं अगदीं नियमितपणें परत येत असे. पुढें ( १६६५ फेब्रुवारी ) जयसिंग व दिलेरखान दक्षिणेंत आले, तेव्हां ही बातमी नेताजीच्या हलगर्जीपणामुळें शिवाजीस वेळेवर कळली नाहीं. शत्रूच्या हालचालींवर लक्ष ठेवणें हा एक त्याच्या कामाचा भाग असून तो यावेळीं दूर कोठेंतरी होता. शिवाजीला नेताजीच्या वर्तनाचा राग आला परंतु ह्यावेळीं त्यास कामावरून काढून टाकणें मुत्सद्दीपणाचें नसल्यामुळें शिवाजीनें गय केली. या प्रसंगीं जयसिंगानें नेताजीस लांच दिली असावी असें ग्रँटडफ म्हणतो. बखरकार म्हणतात त्याला यावेळीं शिवाजीनें परिंड्याच्या बाजूस मोंगलांवर पाठविलें होतें; परंतु त्यांच्या प्रचंड फौजेपुढें त्याचा टिकाव लागला नाहीं; तरीहि त्यानें त्यांचा बराच नाश केला. परंतु पुढें नऊ महिन्यांनीं हा विजापुरावरील मोहिमेंत मोंगलांनां मदत करण्याकरितां शिवाजीबरोबर आला होता. एके प्रसंगीं सैन्याच्या पिछाडीचें संरक्षण करण्याच्या कामगिरीवर असतां, यानें बराच नांवलौकिक संपादिला. काफीखान म्हणतो कीं जयसिंग दक्षिणेच्या मोहिमेंत असतांना ( १६६५–१६६७ ) त्यानें नेताजी पालकरास कैदेंतून अवरंझेबाकडे दिल्लीस पाठविलें. तेथें त्यास बाटविण्यांत येऊन त्याला मुर्शिद हा किताब देण्यांत आला व त्याचें नांव महंमद ठेविलें ( १६६७ मार्च ). परंतु तो पुढें शिवाजीकडे परत आला. नऊ वर्षें मुसुलमान राहून त्यानें प्रायश्चित्त घेतलें आणि पुन्हां तो हिंदु धर्मांत दाखल झाला ( १६७६ ). यापुढील त्याची हकीकत समजत नाहीं. कदाचित तो मेला असावा, कारण येसाजी कंकास या सुमारास सरनोबती मिळाली आहे. [ जेधे; डफ; सभासद; शिवदिग्विजय. ]

**नत्ति**—बौद्ध तत्त्वाचें सुसंबद्ध आणि पद्धतशीर विवेचन करणारा ग्रंथ. नेत्ति म्हणजे संगतिसूत्र होय. या ग्रंथाची रचना अभिधम्म ग्रंथाप्रमाणें असून सिंहलद्वीपामध्यें त्याला तिपिटक ग्रंथाप्रमाणेंच आधारभूत मानतात, आणि ब्रह्मदेशामध्यें तर त्याचा समावेश तिपिटकामध्येंच केलेला आहे. हा ग्रंथ बुद्धाच्या प्रथम शिष्यांपैकींच एक जो महाकच्चायन त्याच्या नांवानें प्रसिद्ध आहे. परंतु हार्डी याच्या मतें तो ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शकामध्यें लिहिलेला असून तो सध्यांच्या स्वरूपांत धम्मपाल या टीकाकारानें ख्रिस्ती शकाच्या पांचव्या शतकामध्यें लिहिला. पेटकोपदेस ( पिटकांच्या अभ्यासकांस उपदेश ) या ग्रंथामध्यें जरी नेत्ति याचा आधार घेतलेला आहे, तरी तोहि फारसा अलीकडील नाहीं, परंतु या ग्रंथालाहि ब्रह्मदेशामध्यें धर्मशास्त्रीय ग्रंथांत स्थान मिळालें असून, तोहि महाकच्चायन याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

**नेत्रकोणा,** पो ट वि भा ग.—बंगाल. मैमनसिंग जिल्ह्याचा एक ईशान्येकडील पोटविभाग, क्षेत्रफळ ११४८ चौरस मैल. ईशान्येकडील डोंगराळ भाग वजा करतां हा प्रदेश सपाटीचा आहे. १९११ सालीं लोकसंख्या ६५५२९५ होती. यांत नेत्रकोणा नांवाचें एकच मोठें गांव व २६१० खेडीं आहेत. दुर्गापूर ठाण्याच्या भागांत लोकवस्ती थोडी आहे.

गां व.—नेत्रकोणा पोटविभागांतील एक मोठा गांव. लोकसंख्या ( १९११ ) १३७४०. सन १८८१ मध्यें येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली.

**नेत्ररोग**—नेत्रांची रचना व इतर माहिती शारीरशास्त्र व इंद्रियविज्ञान या लेखांत आढळेल. या ठिकाणीं फक्त नेत्ररोगासंबंधीं विवेचन आहे. अंधत्व आणि जुनाट खुपऱ्या या सदराखालीं नेत्ररोगापैकीं महत्त्वाच्या भागाचें वर्णन दिलें आहे. त्याशिवाय अनेक महत्त्वाच्या नेत्ररोगांचें व दृष्टिमांद्यप्रकाराचें वर्णन पुढें देण्यापूर्वी डोळे कसे तपासण्यांत येतात याची कल्पना करून देणें योग्य आहे. डोळ्याची रचना हें सदर वाचल्यानें पापण्या, कांचपटल, कनीनिका, कनीनिकापटल, अश्रुपिंड व अश्रुवाहक नलिका, सिलियरी पिंड, कोराईड व कृष्णपटल, कांचमणिपटल, दृष्टिपटल, दृष्टिमज्जा या व इतर डोळ्याच्या बाह्य भागापासून आंतपर्यंत असणाऱ्या रचना कळतील; त्यांनां नानाविध रोग होतात. या आपल्या उष्णकटिबंधांतील देशांत खोल असणाऱ्या रचनारोगापेक्षां बाह्यरचनारोगच फार होतात. बाह्यरचना नुसत्या नजरेनें उजेडांत पाहून नेत्रवैद्य तपासतो. अडचण वाटल्यास अगर अति बारीक व्रण, फूल तपासण्यासाठीं दोन्ही अंगांस फुगीर कांचेचा उपयोग, त्या विकृत भागावर न दिपणारा उजेड पाडून रोगपरीक्षा करतां येते. खोलरचना विकृत झाल्यास त्या तपासण्याचें साधन ( नेत्रपरीक्षणयंत्र ) म्हणजे सुमारें एक रुपयाच्या आकाराचा हातांत धरण्यास सोईस्कर असा आरसा असून त्याच्या मध्यभागीं आरपार भोंक असतें. अंधाऱ्या खोलींत रोग्यास दिव्याशेजारीं बसवून या दिव्यानें प्रकाशित झालेल्या आरशाचा उजेड नेत्रावर पाडल्यानें मधील छिद्रांतून डोळ्याच्या कांचपटलावरील व्रण, डोळ्याचे खोलरचनेचे रोग पहातां येतात. हें यंत्र डोळ्याशीं धरून व रोग्याच्या डोळ्यापुढें थोड्या अंतरावर सांगितलेलें, डोळे तपासण्याचें दोन्ही अंगांस फुगीर असें भिंग धरल्यानें या खोलरचनेचें उलट व ठळक सबंध पण बारीक प्रतिबिंब त्या भिंगांत दिसतें, व भिंग बाजूस करून परीक्षणयंत्राचा उजेड रोग्याच्या डोळ्यावर अगदीं जवळून पाडल्यानें हीच नेत्रविकृति अंशतः पण आहे तेवढ्या आकाराची पाहतां येते. दृष्टिमांद्य किती आहे हें याहि प्रकारानें तपासतां येतें, व चष्मा देतां येतो व मोतीबिंदु आहे किंवा नाहीं हें तपासतां येतें. या यंत्राचें तत्त्व हें कीं, रात्रीं अंधारांत आपण घराबाहेर उभे राहिलों व घरांतील अंधाऱ्या खोलींत उजेड आणला तर बाहेरच्या माणसास खोलींतलि पदार्थ दृग्गोचर होतात तद्वत् हा उजेड नेत्रवैद्य, अंधाऱ्या खोलींत कनीनिकारूपी खिडकीवर पाडून आंतील परीक्षण करतो.

दृ ष्टि मां द्य रो ग.—याचे मुख्य तीन प्रकार आहेत, तेः— ऱ्हस्व दृष्टिरोग–पुष्कळ तरुण लोकांनां नेत्रांत विकृति नसूनहि लांबचें दिसत नाहीं; वाचावयास पुस्तक डोळ्यांजवळ न्यावें लागतें म्हणून यास ऱ्हस्वदृष्टि हें नांव समर्पक आहे. निरोगी दृष्टि असतां बाहेरील आकृतीच्या उलट प्रतिबिंब नेत्रांतील दृष्टिपटलावरच नेमकें पडतें. परंतु अशा ऱ्हस्वदृष्टिधोडीत लोकांच्या डोळ्याचा आकार वाजवीपेक्षां लांबट असल्यामुळें या प्रतिबिंबाचे किरण दृष्टिपटलाच्या पुढें प्रतिबिंबित झाल्यामुळें रूपरंगादि तज्जन्य ज्ञानाचा बोध मेंदूशीं असलेल्या दृष्टिपटलास व्हावयाचा तो डोळ्याच्या कमी अगर अधिक व्यंगाच्या मानानें कमी अगर अधिक होतो. यास उपाय म्हणजे दोन्ही अंगांस खोलगट असलेलें भिंग डोळ्यापुढें ( चष्म्याप्रमाणें ) ठेवल्यानें बाहेरील पदार्थाचें प्रतिबिंब त्या खोलगट भिंगाच्या साहाय्यानें निरोगी डोळ्यांत पडावें त्याप्रमाणें नेमकें दृष्टिपटलावर पडूं लागतें. जसें कमी–अधिक दृष्टिमांद्य असेल त्यामानानें पाव अंशापासून वीस अंशांपावेतों हीं भिंगें खोलगट असतात; व उजवा आणि डावा डोळा वेगळे तपासून त्याप्रमाणें चष्मा घेतला म्हणजे उत्तम दिसतें. यापुढील इतर प्रकारचें दृष्टिमांद्य अजमावण्यासाठीं स्वेलेनकृत टाइपांच्या अक्षरांचे लहान–मोठे कागद मिळतात. हे टाइप प्रमाणशीर असतात; म्हणजे काटकोनाचे ९० भाग असतात; तर ५ भागांचा जो लहान कोन होतो तेवढेहि लहान टाइप यांत असतात व त्यांचा आकार प्रमाणशीर वाढविलेला असल्यामुळें निरोगी माणसास ते किती अंतरावरून वाचतां आले पाहिजेत हें ठरलेलें असतें. त्यापेक्षां जितक्या कमी अंतरावरून ते वाचतां येतील तितकी दृष्टि अधु आहे असें समजावें. हीच दृष्टिपरीक्षणाची तऱ्हा पुढील प्रकारच्या व सामान्यतः प्रौढ व वृद्ध माणसांत आढळणाऱ्या दृष्टिमांद्यप्रकारांत असते.

दीर्घदृष्टिरोग, चाळिशी लागणें:—जन्मापासून एखाद्याची दृष्टि उत्तम असूनहि ४० ते ४६ वयाच्या सुमारास त्या माणसास वाचण्याच्या वेळीं नीट न दिसल्यामुळें पुस्तक दूर धरावेंसें वाटतें व नंतर डोळे ताणल्यानें त्यास दिसतें. याचें कारण वरच्या प्रकारच्या उलट म्हणजे प्रतिबिंबित आकृति दृष्टिपटलाच्या मागें या डोळ्याच्या ऱ्हस्वरचनेमुळें बिंबित होते हें आहे. डोळे तपासण्याची ही तऱ्हा वरील प्रकाराप्रमाणेंच आहे.

दोन्ही अंगांस फुगीर (पाव ते २० पर्यंत अंशाचीं) भिंगें चष्म्याच्या रूपानें वापरल्यामुळें आकृति दृष्टिपटलावरच नेमकी पडून दृष्टिव्यंग दूर होतें. हे दोन्ही व पुढील व्यंगहि नेत्रवैद्यास या टाइपामुळें व तसेंच अंधाऱ्या खोलींत नेत्रपरीक्षणयंत्रसाहाय्यानेंहि तपासतां येतात; व कांहीं खोल रोगविकृति असल्यास ती पाहतां येते.

ऋणानियमित दृष्टि व धनानियमित दृष्टिरोग:—दूर अगर जवळ अंतरावर उभ्या व आडव्या रेघा अगर अक्षरें असल्यास कांहीं रोग्यास उभ्या व अक्षराचा उभट भाग तेवढा दिसतो व आडव्या रेघा व अक्षराचा आडवा भाग दिसत नाहीं; अगर याच्या उलट प्रकार म्हणजे आडव्या रेघा स्पष्ट दिसणें व उभ्या न दिसणें. या प्रकारचें चमत्कारिक दृष्टिमांद्य हें आहे. हें दूर होण्यासाठीं भिंगाची मागील एक बाजू सपाट व पुढील बाजू खोलगट अगर फुगीर ( जसें व्यंग

असेल त्याप्रमाणें ) अशा प्रकारचा चष्मा वापरावा लागतो. तो न वापरल्यानें कपाळशूळ, आंचके वगैरेहि रोग उद्भवतात. याखेरीज दुहेरी दिसणें व तिरवेपणा यांवर चष्म्याचा इलाज थोडाबहुत आहे, पण विस्तारभयास्तव वर्णन आवरलें पाहिजे.

पा प ण्यां च्या क डा चा दा ह रो ग.—गलिच्छ, व अशक्त मुलांनां हा रोग होऊन तेथें सूज, लाली व चिडलेलें असतें; हयगयीमुळें पापण्यांचे केंस झडतात अगर वाकडे होतात. याला उपाय थोडा बायकार्ब १० ग्रेन व पाणी १औंस हें औषध डोळ्यांत घालावें व त्यानें डोळे धुवावे. पापण्यांच्या केंसांस सिल्व्हर नायट्रेट २ ग्रेन व बाष्पजल १ औंस हें लावावें. बारीक ग्रंथिरोग पापण्यांच्या कडांनां होतो. त्यांत पूहि होतो. याला उपाय म्हणजे पापण्या शस्त्रानें चिरून कापून काढाव्या व आंतील मगज दाबून खरवडून काढावा.

रां ज ण वा डी.—हिचें वरच्याप्रमाणें परंतु प्रकृतीस बिघाड होऊन होणारी व बरीच ठणकणारी वपुवाळणारी बारीक गांठ पापणीच्या आंत होते व फुटते अगर फोडावी. याला एकामागून दुसरी, तिसरी असें पोंकहि येतें. याला उपाय शेकणें व जरुर तर फोडणें.

आगंतुक कण व पदार्थ डोळ्यांत जे शिरतात ते, योग्य अशा बिनधारेच्या शस्त्रानें बाहेर काढतां येतात. अश्रुग्रंथि व नलिका यांचा दाह–गळूं व त्यांतील पोंकळी बंद होऊन डोळ्यांतून एकसारखें पाणी वहाणें हा त्रासदायक रोग होतो. अश्रुवाहक छिद्रांत त्यासाठीं केलेली सळई रोज घालून तो मार्ग न बुजेल असा ठेवणें व स्तंभक व जंतुघ्न औषधांनीं तो धुणें आणि गळूं झाल्यास तें वेळेवर फोडून त्याचें लासूर अगर व्रण बनूं न देणें हे उपाय आहेत.

पा प ण्या.—पापण्यांच्या जुनाट दाहाचें वर्णन ‘ जुनाट खुपऱ्या व अंधत्व’ या सदराखालीं दिलें आहे. त्या रोगापासून होणाऱ्या दुष्परिणामामुळें त्या रोगास भयावह मानतात.

ती व्र दा ह अ ग र डो ळे ये णें.—अक्षिपुटदाह, ठणका, लाली, थोडा पू या लक्षणांसह सांथीप्रमाणें हा रोग संसर्गानें होतो. मागाहून औषधोपचारानें पूर्ण बराहि होतो. उपाय– बोरीक ॲसिड ( १० ग्रेन : पाणी १ औंस ) अगर झिंकसल्फेट (२ ग्रेन : पाणी १ औंस) अगर तुरटी (५ ग्रेन : पाणी १ औंस ) यांनीं हा रोग बरा होतो.

पूयप्रमेहजन्य आक्षेपुटदाह व प्रसूतिजन्य बालाक्षिपुटदाहः—यांपैकीं पहिला रोग परमा झालेल्या माणसास परम्याच्या स्रावाचा संसर्ग डोळ्यास लागून होतो, व दुसरा मूल जन्मतेवेळीं प्रसूतीचा योनिमार्ग दूषित स्थितींत असतां मुलांस होतो. दोन्ही रोग सूज, दाह, लाली, ठणका, गळ, पू व बरे होण्यास लागणारा काळ यांमुळें भयंकर आहेत. फुलें व व्रण पडण्याचा व डोळा जाण्याचाहि संभव दोहोंत असतो. उपाय— रोग बरा होईपर्यंत दररोज डोळा रसकापुराच्या धावनानें (१भाग : पाणी ६०००भाग)धुवावा. पापणी उलटून त्यांत सिल्व्हर नायट्रेट (१० ग्रेन : पाणी १ औंस) लावावें. दुसऱ्या डोळ्यास संसर्ग देऊं नये म्हणून तो बांधून ठेवावा.

अ हि रा.—डोळ्याच्या पांढऱ्या भागावर बारीक पुटकळी व त्या भोंवती रक्तवाहिन्यांची एके ठिकाणीं लाली असें याचें स्वरूप आहे. अशक्त लहान मुलांनां व रोगी माणसांनां हा रोग होतो. डोळ्यास दीप, डोळे मिटणें हीं लक्षणें असतात. उपाय—यास पाऱ्याच्या पिंवळया आक्साइडचें मलम ( ४ ग्रेन : १ औंसामध्यें ) निजतेवेळीं डोळ्यांत घालावें.

बारीक वसाग्रंथि व तिकोनी लहान मांसग्रंथि या दोन प्रकारचे रोग या ठिकाणीं होतात, ते शस्त्रक्रियासाध्य आहेत. कांचपटलाचे रोग व दाहरोग हे मुख्य असून त्यांचे भेद आहेत व त्या सर्वांचीं सामान्य लक्षणें दुःख, उजेड सहन न होणें, पाण्याची गळ, दृष्टिमांद्य, काळ्या बुबुळाभोंवती खोल भागांत गुलाबी लाली, व डोळ्याच्या कांचपटलामध्यें मलिनता येणें हीं होत. कांचपटलामध्यें एकाखालीं एक असे थर आहेत. त्यांतील पृष्ठभागावरील थरांचा दाह फार करून पाहण्यांत येतो. ह्यांतच रक्तवाहिन्या फुगून लाली फार आली म्हणजे त्या रोगास पॅनस असें म्हणतात. हा रोग लवकर शमला नाहीं तर काळ्या बुबुळाभोंवतालची श्लेष्मल त्वचा बारीक कात्रीनें वर्तुळाकार कातरतात. म्हणजे रक्तवाहिन्या तुटून लाली कमी होते. दाहशमनासाठीं अफू, बेलाडोना वगैरे औषधें उपयुक्त आहेत.

कांचपटलावरील साधा व्रण अगर फूल पडण्यास कारण हा दाहच होय व त्यामुळें कांचपटलाचा कांहीं भाग गळून जाऊन तेथें बारीक खड्डा पडतो. तो पाहण्यास फुगीर भिंगाची मदत चांगली होते अगर नुसत्या डोळ्यांनींहि दिसतो. उपाय—बारीक व्रण असल्यास ॲट्रोपीन हें औषध डोळ्यांत घालावें. मोठा व खोल व्रण असल्यास एसेरीन अगर पायलोकारपिन हें औषध अधिक बरें. फूल जुनाट झाल्यास पारदाच्या पिंवळ्या ऑक्साईडचें मलम डोळ्यांत रोज एकदां अगर दोनदां घालावें व डोळा मिटून तो अंमल व हळू चोळावा.

दूषित व्रण वरील कारणामुळेंच होऊन त्याची खोल व रुंद पसरण्याकडे प्रवृत्ति असते, व त्यामुळें कांचपटलाच्या मागील पोकळींत थोडा पू जमतो. उपाय—या व्रणास सिल्व्हर नायट्रेटची कांडी अगर अन्य प्रकारच्या भाजण्याच्या कांडीनें थोडा कडा व तळ यास स्पर्श करावा. कांचपटलाचा खालचा भाग शस्त्रानें चिरून त्यांतून पू निघून जाण्यास मार्ग करून देतात, व नंतर बेलाडोना अगर ॲट्रोपीनचे थेंब डोळ्यांत घालतात.

कांचपटलाच्या मधील थरांचा दाह, ज्या मुलांच्या मातापितरांनां फिरंगोपदंश हा रोग झालेला असतां त्यांनां होतो

व त्यामुळें डोळ्यावर दाट सारा येतो. अगोदर एक डोळा बिघडून मागून दुसरा बिघडतो. रोगास उगम ५ ते १६ या वयाच्या दरम्यान होतो; याला योग्य उपाय केले नाहीं तर कनीनिकापटलदाह, आगंतुक कांचबिंदुरोग, सारा, हे रोग होतात. सारा कितीहि आला असला तरी उपचार केल्याबरोबर तो भराभर कमी होऊन डोळे स्वच्छ होतात. उपाय—पारदाचें लहान प्रमाण बरेच दिवस द्यावें, व शक्तीसाठीं पोटांत लोह द्यावा. डोळ्यांत अॅट्रोपीनचे थेंब आणि पिंवळें मलम घालावें.

कांचपटलाच्या मागील थरांत दाहरोग असतो; पण बहुतकरून त्यासह कनीनिकादाह अगर दुसरा तसाच नेत्ररोग असतो. सारा लहान वर्तुळाकार असतो. या सर्व प्रकारच्या कांचपटलदाहामुळें लहान मोठ्या आकाराचा सारा व व्रण,डाग मागें शिल्लक रहातात व ते डोळ्याच्या बाहुलीसमोर असले तर स्पष्ट दिसण्यास अडथळा उत्पन्न करतात व सौंदर्यांत व्यंग आणतात. खोल व्रण पडून एखादे वेळीं कांचपटल कोंचदार होतें;अगर व्रण फुटून आंतील कनीनिकापटल त्यांत अडकून त्यावरील लस वाळून विद्रूपता प्राप्त होते;यासच डोळ्यांत वडस वाढणें म्हणतात.

कांचपटलावर अगर आंत आगंतुक पदार्थ गेला तर तो शक्य तेवढा जलद काढून टाकणें इष्ट असतें. प्रथम डोळ्यामध्यें कोकेन औषधानें चांगली बधिरता उत्पन्न करून रोग्यास उजेडासमोर खुर्चीवर बसवून त्याचें डोकें मागें करावें. नेत्रवैद्यानें खुर्चीमागें उभें राहून पापण्या उघडून बुबुळ न हलेलसें बोटानें स्थिर करावें व उजव्या हातांतील बिनधारेच्या शस्त्रानें तो पदार्थ अलगत उचलून घ्यावा.

नेत्रावरणनामक श्लेष्मल त्वचा दाहरोग.—यामुळें बुबुळापासून थोड्या अंतरावर लाली उत्पन्न होऊन ती बरेच महिने टिकते. हा रोग क्षयी, संधिवातरोगी अगर फिरंगोपदंशरोगी अशा माणसांत विशेष होतो; व यामुळें कांचपटलदाह कनीनिकादाह हे रोगहि होतात. उपचार–अफूच्या बोंडानें शेकणें, जळवा लावणें, चोळणें ( बेलाडोना अगर अॅट्रोपीन हीं औषधें कनीनिकादाह असल्यास ) हे उपाय करून शिवाय संधिवात, क्षय, उपदंशादि व्याधिदोषावर तीं तीं उपयुक्त औषधें योजून द्यावीत.

डोळ्यांतील जखमा.—कांचपटलास जखम झाल्यास ती लवकर भरून येते; तसेंच नेत्रावरणनामक पांढऱ्या श्लेष्मल त्वचेची जखम लहान असून आंत आगंतुक पदार्थ शिरला नसेल आणि काळ्या बुबुळाच्या मागील बाजूस निदान पाव इंच असल्यास जखमेस टांके मारून ती बरी होते. परंतु जेथें नेत्रावरण व कांचपटल यांचा संधि होतो त्या प्रांतांतील जखम अत्यंत भयप्रद होय. कारण तीमुळें त्या सबंध डोळ्यांत दाह होऊन तो डोळा जाऊन शेजारील डोळाहि तशाच दाहामुळें जातो. म्हणून अशा वेळीं आगाऊ उपाय म्हणून तो जखमी डोळा काढून टाकणें इष्ट असतें.

कनीनिकापटल, सिलियरी ग्रंथि व कोरॉइडपटल या तिन्ही रचनांचा सुखदुःखाचा समान अंशभागी असा संघ आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणजे यांपैकीं कोठेंहि रोग सुरू झाला तरी तो या सर्व ठिकाणीं पसरण्याची प्रवृत्ति असते.

तीव्र कनीनिकापटलदाह, लक्षणें:—डोळ्यांत चेहरा व कपाळ वगैरे ठिकाणीं दुःख, वेदना व शूळ, अंधुक दिसणें, पाण्याची गळ, नेत्रावरणांतील रक्तवाहिन्या लाल दिसणें व त्यामुळें बुबुळाभोंवतीं गुलाबी छटा व साधारणतः थोडी दीप्ति हीं लक्षणें असून उजेडांत व अंधेरांत लहान मोठी बाहुली होते. त्या शक्तीचा ऱ्हास होणें, ती लहान होणें व तिचा रंग बदलणें व तीव्र अॅट्रोपीन घातलें असतां ती चांगलीशी नेहमीप्रमाणें मोठी न होणें हींहि लक्षणें असतात.

जुनाट कनीनिकादाहांत एक लहान (विकृत) बाहुली व दुसरी चांगली, कमी दिसणें व कधीं कधीं डोळा दुखणें एवढींच लक्षणें असतात. फिरंगोपदंश, संधिवात व पादांगुष्ठ रोग या रोगांनीं पीडित माणसांनां तसेंच इजा अगर कांचपटलदाह किंवा सिलियरीपिंड अगर कोराइडपटलदाह यांमुळेंहि या रोगास निमित्त होतें. अगोदर संधिवाताची प्रकृति असून परमा झाला तर हा रोग फार करून होतो व पादांगुष्ठरोग्यामध्यें बिनदुःखाचा व चेंगट प्रकारचा असला दाह सुरू होतो. उपचार—प्रथम डोळ्यांत अॅट्रोपीनचे थेंब रोज घालून बाहुली विस्तृत राहील असें करावें; नंतर लाली असल्यास कानशिलाच्या ठिकाणीं १–२ जळवा अगर एखादें पलिस्तर मारावें. पोटामध्यें त्या त्या प्रकारच्या संधिवातादि प्रकृतिमानाप्रमाणें इष्ट उपचार सुरू ठेवावेत. सिलीयरी पिंडदाहाचीं लक्षणें व उपचार बहुतेक वरीलप्रमाणें आहेत.

कोरॉइडपटलदाह.—याचीं बाह्य लक्षणें फारशीं नसून याचें अस्तित्व नेत्रपरीक्षणयंत्रानेंच कळतें. फिरंगोपदंश, अतिऱ्हस्व दृष्टिरोग,क्षय वगैरे याचीं कारणें असतात.उपचार–पोटांत सूक्ष्म प्रमाणांत पारदाच्या सौम्य भस्मापैकीं एखादें योजून द्यावें. वरील तिन्ही(कनीनिकापटल वगैरे) रचनासंघांत पूययुक्तदाह होऊन सबंध डोळ्याचा विद्रधि बनतो अगर लस स्रवणारा दाह एका डोळ्यास होणाऱ्या इजेमुळें दुसऱ्या डोळ्यास होतो, व त्यामुळें दोन्ही डोळे जातात. या दोन्ही जातींचे दाह कष्टसाध्य अगर असाध्यच आहेत.

नेत्रांतील कांचमण्याचे रोग(मोतिबिंदु).—दोन्ही अंगास फुगीर अशा कांचेंतून किरण दृष्टिपटलावर पडतात तेथें पदार्थ प्रतिबिंबित होतो. परंतु त्याच्या रचनेंत बदल होऊन हा मणि अंशतः अगर पूर्णपणें अपारदर्शक होतो व यास मोतिबिंदु म्हणतात. पस्तीस वयाखालील लोकांत होणाऱ्या मोतिबिंदूस मृदु अगर अपूर्ण व बाकीच्यांनां कठिण अगर पूर्ण मोतिबिंदु असें म्हणतात. आपोआप होणाऱ्या मोतिबिंदूस स्वतंत्र व इतर नेत्ररोगामुळें दुष्परिणाम म्हणून बनणाऱ्या मोतीबिंदूस परतंत्र मोतिबिंदु असें नांव आहे.

उदाहरणार्थ, कांचबिंदु या रोगाच्या अखेरीस मोतिबिंदु होतो तो या परतंत्र प्रकारचा असतो.

पूर्ण अगर कठिण मोतिबिंदु अपारदर्शक बनण्यास त्याच्या मध्यबिंदूपासून आरंभ होतो किंवा पृष्ठभागांतून अपारदर्शकता होत जाते. पहिल्या प्रकारचे मोतिबिंदु रंगानें पिंवळसर व कठिण असतात परंतु मधुमेहाच्या रोग्यांत मात्र तसे नसतात. दुसऱ्या प्रकारचे मोतिबिंदूची अपारदर्शकता त्याच्या आंसापासून पांढऱ्या रेषांच्या रूपानें दिसते. जन्मतः असणारे मोतिबिंदु दोन्ही डोळ्यांत असतात. एखादे वेळीं पूर्ण मोतिबिंदु विरघळून जातो.

अपूर्ण अगर मृदु मोतिबिंदूचे रचनेप्रमाणें तीन चार भेद आहेत. मोतिबिंदु पक्व अगर पूर्ण झाल्याचीं लक्षणें म्हणजे तो रंगानें पांढरा, पिंवळा अगर करडा दिसतो व डोळ्याची बाहुली मोठी करून फुगीर भिंगाच्या उजेडानें पाहिला तर तो दिसतो. अपूर्ण मोतिबिंदु या भिंगानें तिरकस उजेड पाडून किंवा अंधाऱ्या खोलींत नेत्रपरीक्षणयंत्रानें पहातां येतो. त्याच्या रेषा काळ्या दिसतात. लक्षणें—रोग्यास कमी दिसूं लागतें व डोळ्यापुढें काळे डाग व रेषा दिसतात. संध्याकाळीं बाहुली विस्तृत झाल्यामुळें तेव्हां रोग्यास अंमळ बरें दिसतें. पदार्थ जवळ घेऊन पाहिला तर स्पष्ट दिसतो. एका डोळ्यानें पाहिलें तर कोणा रोग्यास दोन आकृती दिसतात; अगर दोहोंपेक्षांहि अधिक आकृती दिसतात.

उपचारः—म्हातारपणीं मोतिबिंदु झाला असतां अट्रोपीनचा थोड्या प्रमाणांत उपयोग केल्यानें ( अर्धा ते एक ग्रेन : १ औंस पाणी ) कांहीं दिवस दृष्टि सुधारते. परंतु शेवटीं तो पूर्ण पक्व झाल्यावर शस्त्रक्रिया केली पाहिजे. मात्र ती करण्यापूर्वी पुढील गोष्टी ध्यानांत ठेवाव्याः—( १ ) पापण्या व अश्रुमार्ग हा पूरहित व स्वच्छ स्थितींत नसल्यास औषधें घालून तो तसा करावा. ( २ ) मोतिबिंदु काढल्यानंतर डोळ्याचा खोल व इतर भाग दृष्टि परत येण्याइतका शाबूत आहे अशी अगोदर खात्री करून घ्यावी. नाहीं तर शस्त्रक्रिया व खटाटोप व्यर्थ जाऊन निराशा होते. रोगी वृद्ध असल्यास एक डोळा काम करण्यास उपयोगी आहे व मोतिबिंदु झालेल्या डोळ्यानें इतर कांहीं दिसत नसून फक्त उजेड आहे किंवा अंधार आहे येवढेंच कळत आहे अशी वेळ शस्त्रक्रियेस उत्तम. (३) रोग्यास पादांगुष्ठवात, मधुमेह, अल्ब्यूमिन प्रमेह, रक्तवाहिन्यांचा व इतर रोग असल्यास तदर्थ अगोदर औषधें देऊन प्रकृति सुधारावी. मोतिबिंदु काढण्याचे प्रकार दोन आहेतः—(१) सुईनें खरवडून काढणें; हा प्रकार मृदु मोतिबिंदूसाठीं पसंत करतात. ( २ ) सबंध ओढून काढणें; हा प्रकार कठिण मोतिबिंदुस ( म्हातारपणच्या ) प्रशस्त आहे. त्याचें वर्णन देण्यापूर्वी कनीनिकापटलविच्छेदननामक बाहुलीच्या छिद्राचा एक कोपरा कापून मोठा करण्याची शस्त्रक्रिया आहे तिचें वर्णन देऊं. कारण ती अगोदर करून नंतर लागलीच मोतिबिंदु काढण्यांत येतो. कनीनिकापटलविच्छेदन हें मोतिबिंदु काढण्याशिवाय पुढील रोगांतहि करावें लागतें. ( १ ) कांचपटलावर मोठा सारा येऊन अंधत्व आलें तर दृष्टि सुधारण्यास; ( २ ) कांहीं विशिष्ट प्रकारच्या अंशतः पांढरे झालेल्या मोतिबिंदूमध्यें; (३) पुन्हां पुन्हां उलटणारा कनीनिकादाह, कांचबिंदु व कनीनिकापटलाचा मागील भाग त्याच्या मागील रचनेस चिकटणें. या रोगांत प्रथम रोग्यास टेबलावर उताणा निजवून क्लोरोफार्मनें गुंगी आणावी; अगर कोकेनचे थेंब घालून डोळ्यांस बधिरता आणावी. नंतर रोग्याच्या उशाशीं वैद्यानें उभें राहून डोळे उघडे ठेवण्याचा चाप लावावा. नंतर जेथील कनीनिकापटलाचा तुकडा कापणें असेल त्याच्या बरोबर समोरील श्लेष्मलत्वचा चिमटयांत धरून स्थिर करावी. नंतर कांचपटल चिरण्याचा बारका त्रिकोनी पात्याचा चाकू कांचपटलांत घुसवून त्यांत चीर पाडावी व त्याची मूठ खालीं थोडी दाबून त्या पटलमागील पोकळी अंमळ मोठी व स्पष्ट करून तो चाकू बाहेर काढावा आणि श्लेष्मलत्वचा पकडलेला चिमटा मदतनिसास धरून ठेवण्यास सांगावें. नंतर कांचपटलांतील जखमेंतून कनीनिकापटल पकडण्याचा बारीक चिमटा घालून बाहुलीची कड त्यानें इतर ठिकाणीं धक्का न लावतां पकडून बाहेर ओढावी व कांचपटलांतील जखमेसरशी आडवा अगर उभा तुकडा बारक्या कातरीनें उडवावा. नंतर याप्रमाणें छेदन झालेलें तें पटल एका बोथट हत्यारानें जागच्याजागीं व डोळा पट्टयांनीं बांधून ठेवावा. कांचबिंदुरोगामध्यें आराम पडण्यासाठीं जेव्हां ही क्रिया करतात तेव्हां या पटलाचा मोठा तुकडा कापतात.

मोतिबिंदु काढण्याची शस्त्रक्रियाः—वर सांगितल्याप्रमाणें कनीनिकापटलछेदन करावें; म्हणजे बाहुलीच्या अरुंद छिद्रांतून तो बाहेर काढणें सोपें पडतें ( कोणी वैद्य ही शस्त्रक्रिया केल्याशिवाय मोतिबिंदु काढतात ). त्यासाठीं कांच—पटलाच्या बाहेरील कडेस३ मिलिमिटर रुंदीचा कांचपटलाचा छेद होईल अशा बेतानें अरुंद पात्याच्या चाकूनें छेद करावा व त्याचें टोंक दुसऱ्या बाजूस बाहेर काढावें व छेद पुरा करावा. नंतर जरूर वाटल्यास कनीनिकापटल—छेदनक्रिया करावी. ती झाल्यावर डोळ्याची श्लेष्मलत्वचा चिमटयांत धरून स्थिर करून अणकुचीदार हत्यार कनीनिकापटलांतील छिद्रांत घालून कांचमण्याचें वेष्टण आडवें कापावें. नंतर डोळ्याच्या वरील बाजूस चमच्यासारख्या हत्यारानें दाबावें म्हणजे मोतिबिंदूची कड जखमेंत दिसूं लागते व तसाच दाब ठेवीत गेल्यानें तो मोतिबिंदु बाहेर येतो. ह्यानंतर डोळे उघडे ठेवण्याचा चाप काढून थोडा वेळ पापण्या मिटवाव्या. मग काळ्या बुबुळाच्या खालीं जरा दाबल्यानें आंत कांहीं मऊ पदार्थ राहिला असल्यास तो बाहेर येतो. नंतर कनीनिकापटल जागच्या जागीं बसवून ठेवावें व डोळा पट्टयांनीं एक आठवडाभर बांधावा दररोज पट्टी सोडून हळूच पापण्या घुसळाव्या व कनीनिकापटलदाह सुरु झाला आहे किंवा काय हें

तपाशीत जावें; तसें चिन्ह दिसल्यास अॅट्रोपीन आणि जळवांचा उपयोग करावा. कांचपटलांतील जखमेंत पू झाल्यास तीस सिल्व्हर नायट्रेट लावावें अगर तीवर आयोडोफार्म टाकावा. कनीनिकापटल जखमेमध्यें गुंतणें, रक्तस्राव, अथवा सर्व डोळ्याचा पूययुक्त दाह हे दुष्परिणाम कधीं कधीं होतात. दोन महिन्यांनीं डोळे तपासून चष्मा द्यावा. बाहुलींत कांहीं अडकलेलें आहे असें दिसल्यास पुन्हां शस्त्रक्रिया करून सुई-सारख्या शस्त्रानें तें काढून टाकावें. सुईनें मृदु मोतिबिंदु खरवडून काढण्याची शस्त्रक्रिया--रोग्यास टेबलावर उताणा निजवून त्याच्या डोळ्यांत कोकेनचे थेंब टाकून बधिरता आणावी. रोगी मूल अथवा भित्रा अगर घाबरट असल्यास त्याला क्लोरोफॉर्म देऊन गुंगी आणणें बरें. अगोदर अॅट्रोपीन घालून बाहुली मोठी करून ठेवावी. रोग्याच्या उशाशीं उभें राहून डोळे उघडे ठेवण्याचा चाप बसवावा व चिमटयानें बुबुळ स्थिर करून एक सरळ व तीक्ष्ण सुई काळ्या बुबुळाच्या कडेनें डोळ्यांत खुपसून बाहुलीच्या छिद्रांतून मोतिबिंदुवेष्टणास स्पर्श करील इतकी घालून त्याला तिनें उभा व आडवा छेद करावा. म्हणजे तें वेष्टण फाटतें. मग हळू हळू सुई काढावी आणि डोळ्यांत अॅट्रोपीन घालून डोळा बांधून ठेवावा. याचा परिणाम असा होतो कीं मोतिबिंदूंतील मगज कांचपटलामार्गे येऊन तेथें तो जिरून अगर वितळून जातो. आठदहा दिवसांनीं या मगजापासून आग अगर ठणका लागल्यास व तो जिरून न गेल्यास कांचपटलास जखम करून तो बाहेर काढून टाकावा व यावेळीं त्या जखमेंत कनीनिकापटल न अडकेल अशी खबरदारी घ्यावी.

दृष्टिमज्जातंतुदाह व दृष्टिमज्जातंतुक्षय, तसेंच दृष्टिपटलदाह व दृष्टिपटलच्युति व दुसरे कित्येक रोग नेत्ररोगांतील खोल भागाचे आहेत. त्यांचें वर्णन विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं.

का च बिं दू.—नेत्रामध्यें जो स्वाभाविक द्रवेचा व इतर दाब असतो तो पाडल्यानें नेत्रांचा स्वाभाविक टणकपणा जास्त भासूं लागतो व त्यामुळें हा रोग होतो. लक्षणें:-मिटलेल्या डोळ्यावर दोन्ही तर्जन्या ठेवून जरा दाबल्यानें टणकपणा बोटास कळतो. डोळ्यास हात लावल्यानें व आपोआपहि दुःख होतें. डोळ्याभोंवतालच्या रक्तवाहिन्या लाल होतात. त्यांचें स्पर्शज्ञान अंमळ कमी होतें. त्याचप्रमाणें सारा व बुबुळावर बारीक खळगे दिसतात. कांचपटलामागील पोकळी उथळ होते, बाहुली मोठी होते, डोळ्यांतील खोल भाग नेत्रपरीक्षणयंत्रानें हिरवट दिसतो व तेथील धमन्या रक्ताधिक्यानें भरलेल्या व उडत असलेल्या दिसतात. दृष्टिमांद्य येतें, उजेड कमी समजतो व नाकाच्या बाजूस नजरेचा पल्ला कमी पोहोंचतो. हीं लक्षणें होण्याच्या अगोदर रोग्यास सर्व कांहीं भुरकट दिसूं लागतें, व दिव्याभोंवतालीं रंगीत वलयें ( कडीं ) दिसतात, कपाळशूळ उठतो, व वारंवार नीट दिसेनासें झाल्यामुळें वरच्यावर चष्मे बदलावे लागतात. या रोगाचे तीव्र, मध्यम व जुनाट असे तीन प्रकार आहेत. ते—

(१) तीव्र रोगाचीं लक्षणें:—रोग्यास कपाळशूळ, ओकारी सुरू झाल्यामुळें पित्त झालें आहे असें वाटतें. हा कपाळशूळ एकाएकीं उठतो. जरी बाहुली विस्तृत असली तरी बुबुळावर सारा असल्यामुळें डोळ्याच्या खोल भागाची तपासणी करतां येत नाहीं. डोळ्याच्या अंतर्भागांतील खळगा विशेष खोलगट नसतो परंतु धमन्या मात्र स्पष्टपणें उडतांना दिसतात. थोड्या दिवसांनीं हीं लक्षणें कमी होतात. पण कांहीं दिवसांनीं पुन्हां उलटतात व कायमचा रोग होऊन बसतो. मग डोळ्यांत फार वेदना व बुबुळाचा टणकपणा व त्यांत रक्तस्राव, त्यामुळें होणारा ( परतंत्र ) मोतिबिंदु, फुलें, डोळ्यांत वडस वाढणें नंतर सबंध डोळा आकसणें हे दुष्परिणाम होतात.

( २ ) मध्यम प्रकाराचीं लक्षणें:—हीं मागें सांगितलेल्या व पुढें येणाऱ्या प्रकाराच्या दरम्यान तीव्र असतात.

( ३ ) तिसरा प्रकार (जुनाट):—तीव्र रोग वरच्यावर झाल्यामुळें शेवटीं हा प्रकार होतो किंवा आरंभापासूनच हळू हळू डोळा दुखल्याशिवाय व लाली, व टणकपणा विशेष वाढल्याशिवाय हा रोग होतो. नजरेचा विस्तृतपणा अगर पल्ला कमी होतो. कांचपटलाचें स्पर्शज्ञान कमी होतें व नेत्राच्या आंतील खळगा रुक्ष होऊन शेवटीं अंधत्व येतें. हा रोग बहुधां उतारवयांत होतो व बहुधां चाळीस वर्षाच्या पुढें होतो. तो कदाचित वंशपरंपराहि असतो. डोळ्यांतील प्रवाही रसांच्या गतीस अवरोध झाल्यामुळें हा रोग होतो. ज्यांनां दीर्घदृष्टिरोग आहे, व ज्यांनीं इतर नेत्ररोगांकरितां अॅट्रोपीन या औषधाचा वाजवीपेक्षां फाजील उपयोग केला असेल त्यांनां हा रोग होतो. उपचार—डोळ्यांत एसेरीनचे थेंब घालावे. तसेंच कनीनिकापटलच्छेदनक्रिया केल्यानें रोग्यास आराम वाटतो. मात्र त्या पटलाचा बराच मोठा तुकडा कात्रीनें उडवावा लागतो. हल्लीं प्रकारच्या कांचबिंदूस डोळ्याच्या पांढऱ्या बुबुळास थोडा छेद केल्यानें डोळ्यांतील टणकपणा कमी होऊन डोळा नरम पडतो. जुनाट कांचबिंदूरोगामध्यें शस्त्रक्रियेचा उपयोग होत नाहीं.

डो ळ्या च्या ख ळ ग्या सं बं धीं रो ग.—( १ ) डोळ्यांस मार लागून रक्तवाहिन्या फुटून पांढऱ्या बुबुळांवर लाल डाग दिसतात. नंतर ते आपोआप बरे होतात. ( २ ) कधीं सबंध डोळ्याचे विद्रधी अगर गळूं दनून डोळा जातो. (३) डोळ्याच्या खाचेंत अगर डोळ्याच्या आंत एखादद्दुसऱ्या प्रकारचा ग्रंथिरोग वाढून डोळा बटबटीत व पुढें आलेला दिसतो.

डो ळा का ढ ण्या ची श स्त्र क्रि या.—कित्येक वेळां डोळा काढून टाकणें भाग पडत असल्यामुळें हें वर्णन येथें देतों. रोग्यास टेबलावर उताणा निजवून क्लोरोफॉर्मनें गुंगी आणावी, नंतर डोळा उघडण्याचा चाप बसवावा व चिमटयानें बुबुळ स्थिर करून ठेवावें, नंतर कात्रीनें काळ्या बुबुळाभोंवतालची श्लेष्मल त्वचा वर्तुळाकार कातरावी. तिच्याखालीं चोहोंकडची

स्नायुबंधनें असतात तीं हुकानें उचलून धरून कातरीनें तोडावीं म्हणजे बुबुळ पुढें येतें, त्याच्या मागें कातरी घुसवून डोळ्याच्या तळाशीं दृष्टिमज्जातंतु असतो तो कातरावा आणि डोळा बाहेर काढावा. रक्तस्राव थांबविल्यावर खळग्यावर अंमळ दाब ठेवून डोळा बांधावा. जखम बरी झाल्यावर सुमारें तीन महिन्यांनीं कृत्रिम डोळा बसवावा, म्हणजे डोळ्याच्या खांचेमुळें येणारी विद्रुपता बरीच कमी होते. तिरवेपणा दोन्हीं अगर एका बुबुळामध्यें वर, खालीं, अथवा अंतः अगर बहिर्वक्रता आली म्हणजे त्या त्या तऱ्हेचा तिरवेपणा प्राप्त होतो. डोळा वर-खालीं, आत बाहेर व तिरकस फिरविण्याचे बारीक स्नायू आहेत त्यांनां ताण पडून त्यांत अशक्तता अगर लुलेपणा आल्यामुळें हा रोग होतो. या सर्व प्रकारांचें वर्णन देण्यास अवकाश नाहीं. कांहीं प्रकारामध्यें रोग्यांस दोन आकृती दिसतात. उपचार—कांहीं प्रकारचा तिरवेपणा ॲट्रोपीन अगर एसेरीन ऋकचायत( ।मिंगाचे )चष्मे वापरून आणि दुहेरी चित्रें पहाण्याच्या दुर्बिणींतून चित्रें पाहण्याची संवय केल्यानें त्या स्नायूस व्यायाम होऊन तिरवेपणा कमी होतो. वातरोग कारण असल्यास त्यावर युक्त औषधें पोटांत द्यावींत. कांहीं प्रकारामध्यें शस्त्रक्रिया करून हें व्यंग दूर होतें. ती शस्त्रक्रिया अशीः—रोग्याच्या डोळ्यांत कोकेन घालून बधिरता अगर क्लोरोफार्म देऊन गुंगी आणावी. नंतर नेत्रवैद्यानें त्याच्या उजव्या हातास उभें रहावें व डोळा उघडण्याचा चाप बसवावा. बुबुळाचा अधोभाग आणि अंतर्भागाचा मिलाफ होण्याच्या ठिकाणची त्वचा चिमटयांत धरून स्थिर करावी आणि ती बोथट शेंड्याच्या कातरीनें थोडी कातरावी, व कात्री आंत घुसवून त्याच्या आंतील डोळ्याचें वेष्टन कातरावें. नंतर एक आंकडा जखमेंत घालून त्या स्नायुबंधनाच्या खालून पापणीच्या खालीं त्याचें टोंक निघेल असें करावें आणि नंतर पुन्हां कात्री घालून एक दोन चटक्यांत तें स्नायुबंधन कापावें. नंतर एक दिवस डोळा चांगला बांधावा.

डोळ्याचें बहुतेक चलनवलन होण्यास कारण मास्तिष्कजन्यतृतीयमज्जातंतु आहे; त्यास रोग झाला असतां डोळ्याच्या स्नायूस अर्धांगाप्रमाणें लुलेपणा येतो. वर खालीं वगैरे कुठेंच डोळा फिरवितां येत नाहीं. उजव्या बुबुळाची नजर डावीकडे व डाव्याची उजवीकडे कायमची होऊन बसते. डोळ्याची बाहुली लहान मोठी करण्याची वर्तुळाकार स्नायूंतील शक्ति जवळचें व लांबचें दिसण्याच्या कामीं नष्ट होते आणि इतर प्रकारचाहि लुलेपणा प्राप्त होतो. यास फिरंगोपदंश हें बहुधां कारण असतें व त्यासाठीं पोटामध्यें पोटयासियम आयोडाइड हें औषध द्यावें अगर दुसरें कांहीं कारण असल्यास त्याकारणांप्रमाणें औषध योजून द्यावें.

बु बु ळां ची चं च ल ता.—लहानपणीं मुलांस आंकडी अगर झटके येऊन अपस्मार वगैरे होऊन अगर मोठेपणीं खाणींत वाकून काम करणाऱ्या मजुरांस हा रोग होतो. लक्षणें—बुबुळ वर खालीं सारखें फिरत असतें. नजर मुळींच स्थिर नसते. याला उपाय फार धिमेपणानें केले पाहिजेत. विजेची पेटी लावणें, पोटांत शक्तीचें औषध देणें वगैरे इलाज करून पहावे नंतर डोळ्यांस एका बिंदूकडे पहाण्यास लावून त्यास व्यायाम करवावा.

व र ची पा प णी लु ली प ड णें.—हा रोग होण्याचें कारण मास्तिष्कजन्य सप्तममज्जातंतूला रोग झाल्यामुळें तो स्नायु लुला पडतो व पापणी आपोआप उघडतां येत नाहीं. तसेंच कानाच्या आंतील भागांतील बारीक हाडें, कान फुटून फार वाहिल्यामुळें कुजून जाऊन पापणी उघडतां येत नाहीं. त्यावरहि कान फुटतेवेळींच योग्य इलाज करावेत.

जु ना ट खु प ऱ्या.—पापण्यांच्या आंतील श्लेष्मलत्वचेवर व त्यांतल्यात्यांत वरच्या पापणीखालीं टांचणीच्या टोंकायेवढे करड्यातांबुस रंगाचे वाळूच्या कणायेवढे बारीक उंचवटे असतात त्यांनां खुपऱ्या म्हणतात व त्या तीव्र आणि जुनाट प्रकारच्या असलेल्या आढळून येतात.

कारणेंः—अति लहान अर्भकाखेरीज सर्व मोठ्या माणसांनां हा रोग होतो. परंतु कोंदट, रोगट व अस्वच्छ राहणी या रोगास विशेष अनुकूल असते व म्हणून जेथें गर्दीमुळें आरोग्य बिघडतें अशा शाळा, संस्था, सैन्याच्या छावण्या, प्लेगक्यांप, दलदलीच्या जागा या ठिकाणीं डोळे येऊन डोळ्यांतून पू वाहण्याची सांथ पसरते. या तीव्र प्रकारच्या खुपऱ्या कांहीं रोग्यांच्या शेवटीं बऱ्या होतात. परंतु पुष्कळ रोग्यांच्या खुपऱ्या पूर्ण बऱ्या न झाल्यामुळें जुनाट होऊन बसतात.

लक्षणेंः—पापण्यांस फुगवटी व जाडपणा दिसणें, थोडें ऊन, उजेड व अंमळ चकचकीत दिव्याच्या प्रकाशामुळें डोळ्यास दीप असणें, डोळ्यांतून थोडा चिकट व पिंवळा स्राव सुरू होणें वगैरे. हा स्राव संसर्गकारी असतो. या खुपऱ्या श्लेष्मलत्वचेखालीं व्रणासारख्या पसरून त्यांतून पू वाहून त्या बऱ्या झाल्या तरी तेथें व्रण राहून त्या ठिकाणीं पापणी आकुंचित होते, व त्यामुळें पापण्यांचे केंस सरळच्याऐवजीं वक्र होतात व पडकेंस वगैरे नव्या व्याधी उत्पन्न होतात. आणखी यामुळें नव्या व्याधी म्हणजे पापण्या आंत अगर बाहेर आकुंचनानें वळणें व त्यामुळें पापण्यांचे केंस वांकडे होणें अगर ते झडणें, अगर ते बुबुळास खुपणें व त्यामुळें बुबुळावर फुलें ( व्रण ) पडणें, काळ्या, अर्ध्या अगर सर्व भागांतील रक्तवाहिन्या फुगून डोळे लाल होणें, डोळ्यात सदा कांहीं तरी कारणानें चिकट स्राव व लाली उत्पन्न होणें, वडस वाढणार आहे अशी स्थिति बुबुळाची होणें व त्यामुळें कनीनिकापटलदाह वगैरे या आगंतुक व्याधीमुळें हा रोगास भयंकर रोग मानतात व त्यामुळें अंधत्वहि कसें येतें व जनतेंतील अंधत्व ही आपत्ति कशी कमी होईल हें समजण्यासाठीं या ग्रंथांतील "अंधत्व" हा लेख पहावा.

उपचारः—जुनाट खुपऱ्यांत पिंवळा स्राव होत असेल तर पापण्या उलटून त्यांवर सिल्व्हरनायट्रेट (१औंस बाष्पजलांत १०ग्रेन) हें झोंवणारें औषध लावून लागलीच ते सैन्धवाच्या पाण्यानें धुवून टाकावें म्हणजे आंकुचन न होतां स्राव कमी होईल. प्रोटार्गल, आरजिराल हींहि औषधें ( ४ ग्रेन व बाष्पजल १०० थेंब ) चांगलीं असून पापण्यांना मागाहून धुवावें लागत नाहीं. आकुंचन व स्तंभन करणारीं औषधें लावूं नयेत; परंतु आठवड्यांतून दोन अगर तीन वेळां मोरचुताचा खडा खुपऱ्यावर हलक्या हातानें फिरवावा. पडकेस व पापण्याची अंतः व बहिर्विक्रता कायम बरी होण्यास—शस्त्रक्रियेनें ते सरळ होतात. पडकेस यांसाठीं तात्पुरता उपाय म्हणजे तो बारीक चिमटयानें उपटणें.काळ्या बुबुळांत लाली फार आल्यास कनीनिकापटलदाह न होऊं देण्यासाठीं एट्रोपीनचा ( ४ ग्रेन = १ औंस पाणी ) १ थेंब डोळ्यांत एकदां घालावा. हे सर्व उपाय चालू असतां रोग्याची शारीरिक स्थिति, पौष्टिक आहार, औषधें व मोकळी हवा यांच्यायोगानें सुधारावी.

आ यु र्वे दी य.—आयुर्वेदांत डोळ्यांच्या ९४ रोगांचें वर्णन केलें आहे. कृच्छ्रोन्मील, निमेष, वातहत, कुंभिका, पित्तोक्लिष्ट, पक्ष्मशात, कफोत्क्लिष्ट, उत्संगा,रक्तोत्क्लिष्ट, रांजणवाडी, बिसवर्त्म, उक्लिष्टवर्त्म, श्लिष्टवर्त्म, कर्दमवर्त्म, बहुलवर्त्म,कुकुणक, पक्ष्मोपरोध, अलजी, अर्बुद इत्यादि पापण्यांचे रोग होत. जलस्राव, कफस्राव, उपनाह, रक्तस्राव, पर्वणी, पूयस्राव, हे डोळ्यांच्या सांध्यावर होणारे रोग आहेत. शुक्तिका, शुक्रार्म, बलासग्रथित, पिष्टार्म, शिरोत्पात, शिराजाल, रक्तार्म, अहिरा, स्नावार्म, शिराजपिटिका, हे बुबुळांचे रोग होत. मोतिबिंदु, कांचबिंदु, रातांधळ, उलटया बाहुल्या हेहि दृष्टिदोषच आहेत. या रोगांवर उपाय सांगितले आहेत. कुंभिकासारख्या रोगांत पापणीचें लेखन करतात. पापणीचे केंस गळून पडत असल्यास त्यांच्या मुळाशीं सुईनें गोंदावें किंवा जळवा लावाव्या. खुपऱ्यांचें लेखन करून सुंठ व सैंधव यांचें चूर्ण वर चोळून ऊन पाण्यानें धुवून खैर, तूर, शेवग्याचा पाला यांच्या काढयाची घडी ठेवावी. याप्रकारें डोळ्यांच्या निरनिराळ्या ९४ विकारांवर चिकित्सा वाग्भटासारख्या आयुर्वेदीय ग्रंथांत सांपडते.

निरोगी मनुष्यानें देखील आपले डोळे चांगले रहावे म्हणून नेहमीं जव, गहूं, साळी, साठेसाळी, व हरीक हीं जुनीं धान्यें आणि मूग वगैरे कफपित्तनाशक धान्यें पुष्कळसें तूप घालून खावीं. तसेंच कफपित्तनाशक भाज्या,जांगलमांस, डाळिंब, खडीसाखर, सैंधव, त्रिफळा, द्राक्षें खाणें, पावसाचें पाणी पिणें, छत्री, जोडा वापरणें व वमनादिकांनीं दोषांचें शोधन करणें या गोष्टी कराव्यात म्हणून सांगितलें आहे. पायांस तेल, तूप, उटणें लाविल्यानें डोळ्यांस हितकर असतें.

**नेदर्लंड**—एक प्राचीन यूरोपीयन देशसमूह. याची भौगोलिक माहिती 'हॉलंड' व 'बेल्जम' या लेखांतून आढळेल हीं दोन राष्ट्रें जेव्हां एकच होतीं तेव्हांचा इतिहास या ठिकाणीं सांपडेल. जुलियस सीझरच्या गॉलच्या स्वारीनंतर नेदरलँड देशाची रोमन लोकांना माहिती झाली. येथें गॅलोकेल्टिक, जरमॅनिक व इतर दुसऱ्या जातीचे लोक रहात असत. गॅलोकेल्टिक जातींनां बेल्जी लोक असें म्हणत असत. यामध्यें नूरवी लोक फार शूर आणि धाडशी असत. सीझरची स्वारी इ. स. पूर्वी ५७ या वर्षी झाली. त्यानें सर्व बेल्जी जातींनां रोमच्या सत्तेखालीं आणलें. इ. स. पूर्वी आगस्टसच्या बादशाही अंमलाखालीं नेदर्लंड हा गालिया बेल्जिका या नांवानें प्रसिद्धीस आला. यानें बटाव्हियन लोकांनां इ. स. १२ मध्यें जिंकलें. त्यांनां साम्राज्यघटक न बनवितां नुसते दोस्तच करण्यांत आलें होतें. हा देश म्हणजे रोमचें सैन्यभरतीचें पेवच झालें होतें. मध्ययूरोपांतील लढाईची तयारी करण्याची ही उत्तम जागा रोमला लाभली. बटाव्हियन लोक फार शूर आणि नांवाजलेले योद्धे होते. फ्रिजियन लोक रोमसत्तेखालीं इ. स. ४७ मध्यें आणले.

नेरोच्या मृत्यूनंतर रोमच्या पातशाहीबद्दल भांडणें सुरू झालीं. तेव्हां क्लॉडियस सिव्हिलिस या बटाव्हियन अग्रणीनें बंड पुकारलें. हा मोठा राजकारणपटु मनुष्य होता. आपल्या भावाचा सूड उगविण्यासाठीं व आपणास भोगाव्या लागणाऱ्या शिक्षेचा बचपा काढण्यासाठीं त्यानें जर्मन आणि बेल्जी लोकांनां रोमच्या विरुद्ध बंड करण्याकरितां उद्युक्त केलें. प्रथम प्रथम रोमचा पराभव झाला. परंतु पुढें जर्मन व केल्ट जातींमध्यें भांडणें झालीं. शेवटीं रोमचा व बटाव्हियनांचा तह होऊन ते पुन्हां रोमचे दोस्त झाले.

फ्रँ क लो क.—इ. स. ४८१–५११ मध्यें मध्य आणि दक्षिण नेदर्लंड फ्रँक लोकांच्या ताब्यांत गेलें. बाकीचा मुलूख स्वतंत्र फ्रिजियन लोकांच्या हातीं राहिला.उत्तरेकडील जर्मन लोक सॅक्सन या नांवानें माहीत होते. यांच्यांत व फ्रिजियन लोकांत कांहीं विशेष फरक नव्हता.

या मध्य आणि दक्षिण नेदर्लंडचा राजा क्लोव्हीस यानें ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली. व यामुळें या देशांतील लोकांची सुधारणा होऊन हळू हळू हे लोक गॅलो-रोमन लोकांत मिसळून गेले. कँब्री, टूर्ने, अॅरॉस, थेरोने व लीज या ठिकाणीं बिशपांचे मठ स्थापण्यांत आले. फ्रिजियन लोक ख्रिस्ती होण्यास फार नाखूष होते. त्यांनीं विंटफ्रेड नांवाच्या इंग्लिश बिशपाचा स ७५४ मध्यें खून केला. परंतु शार्लमेन बादशहानें त्यांनां ख्रिस्ती होण्यास भाग पाडलें.

८४३ सालीं कॅरोलिंजियन बादशाहीचे ३ तुकडे करण्यांत आले. यांतील मधला तुकडा बादशहा लोथेअर याला देण्यांत आला. यामध्यें नेदर्लंडचा समावेश झाला होता. या बादशहानंतर दुसरा लोथेअर हा बादशहा झाला. याला लोथारी हा प्रदेश मिळाला. या लोथेअरला वारस नसल्यामुळें याचें राज्य ( ८७० सालीं ) पूर्व आणि पश्चिम फ्रँकियांत वांटून देण्यांत आलें. स. ९२४ मध्यें लारेन हा

हेनरी दि फौलरच्या राज्यांत जर्मन ( पूर्व फ्रँकिश ) साम्राज्याखालीं गेला. हेनरीचा मुलगा ओटो ( ओटो दि ग्रेट ) यानें स. ९५३ मध्यें आपल्या पराक्रमी भावाच्या ताब्यांत हा देश दिला; याप्रमाणें यापुढील नेदर्लंड देशाचा इतिहास हा लहान लहान संस्थानांचा इतिहास आहे. यांतील फ्लँडर प्रांतच फक्त फ्रेंच सत्तेखालीं राहिला.

कॅरोलिंजियनचें साम्राज्य मोडल्यावर लहान लहान छोटीं संस्थानें आपले हातपाय पसरूं लागलीं, व यांच्यांत लौकरच भांडणें सुरू झालीं. याच सुमारास नॉर्स लोकांनीं स्वारी केली. यावेळीं जिकडे तिकडे अंदाधुंदी माजली, व सर्व प्रदेश ओसाड पडला. या गडबडीच्या काळांत कांहीं लहान लहान संस्थानें येथें निर्माण झालीं. उदाहरणार्थ, फ्लँडर्स, हॉलंड, ब्रॅबँट, लिंबर्ग, लग्झेंबर्ग, युट्रेच लीज, गेल्डरलँड इत्यादि.

९ व्या आणि १० व्या शतकांत नार्स लोकांच्या स्वाऱ्यांमुळें या देशाची फार दैना उडाली. ते देशच्या देश लुटून उध्वस्त करीत. लुटालूट, जाळपोळ, खून हे दिवसाढवळ्या जिकडे तिकडे होत असत.

११ व्या शतकाच्या अखेरीस जहागिरीपद्धति ( फ्यूडल सिस्टीम )नेदर्लंडमध्यें पूर्णपणें सुरू झाली व हळू हळू या देशांतून सुधारणेचें पाऊल पुढें पडूं लागलें व जिकडे तिकडे व्यवस्थित राज्यपद्धति प्रचलित झाली. याच सुमारास पीटर दि हरमिट यानें क्रुसेडसाठीं सर्व पश्चिम यूरोप हलवून सोडला. या पहिल्या क्रुसेडचे मोठमोठे पुरस्कर्ते नेदर्लंडमधीलच होते. स. १२०३ मधील लॅटिन क्रुसेडनें कॉन्स्टांटिनोपलचा मुकुट तर फ्लँडर्सच्या बाल्डविनच्या डोक्यावर ठेविला. स. १२१८ मध्यें नेदर्लंडच्याच लोकांनीं तरवार वाजविली. या क्रुसेडचा नेदर्लंडच्या बाबतींत फार चांगला परिणाम झाला. यामुळें येथील लोकांची कूपमंडूकवृत्ति जाऊन त्यांचें मन प्रगल्भ झालें. पूर्वेकडील ज्ञानभांडार प्रथम यूरोपमध्यें यांनींच आणलें, व यांच्यामुळें व्यापाराला उत्तेजन मिळालें.

१२ व्या शतकांत येथील शहरांस सनदा मिळूं लागल्या. या शहरांचे दोन प्रकार असत. एक स्वतंत्र शहर आणि एक समाईक मंडळ( काम्यून ). समाइक मंडळाला, वारसा, न्याय, कर, सर्पणाचा उपयोग, इत्यादि हक्क मिळत असत, व हे समाईक मंडळ आपले अधिकारी निवडीत असे, व हा निवडण्याचा हक्क कांहीं थोड्या घराण्यांनां असे. पुढें हा हक्क वंशपरंपरागत झाला व या सत्ताधारी अल्प वर्गाला कुलीन (पॅट्रिशियन) वर्गाचे लोक असें म्हणूं लागले. बर्गोमास्टर म्हणून एक अधिकारी नेमला जात असे; त्याचें काम मंडळाचा जमाखर्च पाहणें हें होतें. याप्रमाणें म्युनिसिपालिटी( नगर संस्था किंवा स्थानिक संस्था )च्या रूपानें छोटेखानी प्रजासत्ताक गांवें निर्माण झालीं.

घेंट, ब्रजेस, व यिप्रेस हीं तीन शहरें फार भरभराटीस पोंचलीं. येथील लोकसंख्या लाखांनीं मोजण्यासारखी असे. येथें कापडाचा व्यापार चाले. मोठा ब्रजेस हें व्यापाराचें केंद्र बनलें होतें. या शहरांतील निरनिराळ्या पेशाच्या लोकांनीं भराभर जातिसंस्था किंवा विशिष्ट धंदेसंस्था स्थापन केल्या, आणि त्यांनीं कुलीन वर्गाला असलेल्या सर्व सवलती मिळविल्या. कुलीन वर्गानें फ्रेंचांची मदत मिळविली, पण स. १३०२ मधील कोर्टेरॉयच्या लढाईनें या कारागीरवर्गानें सरशी मिळविली. याप्रमाणें घेंट येथील प्रसिद्ध नागरिक मुत्सद्दी जेक्स व्हॉन आर्टव्हेले याच्या वेळेस (१२८५-१३४५) फ्लेमिश शहरांची सत्ता कळसास पोंचली. परंतु पुढें या शहरांतून आपापसाबद्दल असूया उत्पन्न झाली व शेवटीं यामुळें त्यांचें सामर्थ्य लोपलें. स. १३८२ मध्यें रूजबेकच्या लढाईंत पराभव झाल्यामुळें या नगरसंस्थांच्या उत्कर्षास ओहोटी लागली.

याप्रमाणें १४ व्या शतकाच्या शेवटीं या नगरसंस्थांच्या योगानें व्यापार व उद्योग फार वाढला, व फ्लँडर्स देशाच्या सधनतेमुळें यावर सर्वांची दृष्टि जाऊं लागली. हळू हळू सर्व नेदर्लंड या सुमारास बर्गंडी घराण्याच्या ताब्यांत आला. १३८४ सालीं फिलिफ दि बोल्ड हा फ्लँडर्स आणि ॲर्टाइसचा राजा झाला. १४१९-१४६७ सालीं फिलिफ दि गुड ( चांगला फिलिफ ) यानें बर्गंडियन सत्तेला दृढ केलें. चार्ल दि बोल्ड (धीट चार्लस) यानें स. १४६८ त लीज घेतलें व १४७३ सालीं गेल्डरलँड हा भाग आपल्या राज्यास जोडला.

बर्गंडी राजघराण्याची इच्छा मध्यवर्ती सत्ता निर्माण करण्याची होती, व या गोष्टीकडे लक्ष ठेवून फिलिफ दि गुडनें सर्व शहरांनां दडपून टाकलें. याच्या दरबारचा थाट फार भपकेदार असे. फिलिफ राजा जरी दुष्ट होता तरी तो राजकीय दृष्ट्या फार श्रेष्ठ होता. १४७३ सालीं मेलिन्स येथें एक महामंडल, (ग्रँड कौन्सिल ) स्थापण्यांत आलें व त्याच्या हातीं न्यायाचीं आणि जमाखर्चाचीं सूत्रें देण्यांत आलीं. धीट चार्लसच्या वेळेसच फ्रान्समध्यें ११ वा लुई राज्य करीत होता. तो फार धूर्त आणि चाणाक्ष असे. चार्लसनें फ्रान्सवर स्वारी केली व तींत त्याला यश आलें. यानें प्रथमच खडें सैन्य ठेवण्याचा प्रघात पाडला. चार्लस जरी फार शूर होता तरी त्याच्यांत मुत्सद्देगिरी मुळींच नव्हती. १४७६ सालीं ग्रँडसन येथें आणि मोरात येथें स्विस लोकांनीं त्याचा पराभव केला. १४७७ सालीं पुन्हां नॅन्सी येथें त्याचा पराभव होऊन चार्लसच्या राज्यविस्ताराचें सर्व मनोराज्य लयास गेलें. या लढाईंत खुद्द चार्लस मारला गेला.

ही संधि साधून ११ व्या लुईनें बर्गंडी, ॲर्टॉईस इत्यादि प्रदेश घशाखालीं घातला. परंतु ह्या नेदर्लंडच्या प्रांतांनां फ्रेंच सत्ता नको होती. १४७७ सालीं " ग्रेट प्रिव्हिलेज " ( मोठा हक्क ) नांवाच्या सनदेवर मेरीची सही फ्लँडर्स, ब्रॅबँट इत्यादि शहरांनीं करवून घेतली. या सनदेप्रमाणें लढाई करणें, लग्नसंबंध जोडणें, कर बसविणें तो लोकांच्या मतासिवाय बसवूं नये, एतद्देशीय खेरीजकरून

इतरांस मोठमोठ्या हुद्याच्या जागा देऊं नयेत, व सर्वत्र राष्ट्रीय भाषाच चालवी, असें होतें. याप्रमाणें स्थानिक हक्क लोकांस देण्यांत आल्यामुळें राजसत्तेस बराच आळा बसला. लौकरच मेरीचें लग्न आस्ट्रियाच्या मॅक्झिमीलियनबरोबर झालें, व याप्रमाणें हॅप्सबर्ग घराण्याशीं नेदर्लंडचा संबंध आला. १४९२ सालीं मेरी मरण पावली. १४९४ सालीं फिलिफ दि फेअर (मेरीचा मुलगा) यास नेदर्लंड देण्यांत आलें. याचा विवाह ॲरागॉनच्या जोन्नाशीं झाला. १५०६ सालीं फिलिफ व जोन्ना यांना कॅस्टाईलचें राज्य मिळालें. याच वर्षी फिलिफ मरण पावला, व त्याच्या मागें त्याचा ६ वर्षांचा मुलगा चार्लस हा राजा झाला. अद्याप फिलिफचा बाप मॅक्झिमीलियन हा जिवंतच होता. तो चार्लसचा पालक झाला. त्यानें आपली मुलगी मार्गारेट हिला गव्हर्नर जनरल नेमलें. ती फार हुषार असल्यामुळें तिनें आपलें काम ८ वर्षेपर्यंत चोख रीतीनें बजावलें. पुढें चार्लस १५ वर्षांचा झाल्यावर तो कॅस्टाईलचा आणि ॲरॅगॉनचा राजा झाला, व या कॅस्टाईलच्या राज्यपदाबरोबरच इटली व अमेरिका यांचाहि बराच मुलूख त्यास मिळाला. १५१९ सालीं मॅक्झिमीलियन बादशहा मरण पावला. त्याच्या गादीवर चार्लस हा बसला. हा बादशहा नेदर्लंडमधील प्रजेस अत्यंत प्रिय झाला होता. याच्या राज्यांत बऱ्याच लढाया झाल्या. नेदर्लंडचा राज्यकारभार १५३० पर्यंत बहुतेक मार्गारेटच पहात असे.पण पुढें तिनें ही व्यवस्था आपल्या मेरी नांवाच्या बहिणीच्या हातीं दिली. ती सुद्धां मोठी शहाणी स्त्री असल्यामुळें तिनें नेदर्लंडची व्यवस्था फार धोरणानें चालविली होती. तिला जेव्हां गव्हर्नर जनरल करण्यांत आलें, त्यावेळीं तीन निरनिराळ्या सभा निर्माण करण्यांत आल्या, व त्यांच्या हातांत सर्व राज्यव्यवस्था देण्यांत आली. चार्लसची नेदरलंड्सची राज्यपद्धति फार नेमस्त होती. परंतु पुढें पुढें त्याला जास्त करभार वसूल करणें भाग पडलें. घेंट नवीन वाढविलेला कर देईना म्हणून १५४० सालीं चार्लसनें घेंट शहर घेतलें व त्या शहराचे सर्व हक्क आणि सनदा हिरावून घेतल्या, व त्या शहरावर बरीच खंडणी लादली. जर्मनीच्या प्रॉटेस्टंट राजांशीं होणाऱ्या लढायामुळें या ५ व्या चार्लस बादशहास द्रव्यबळ आणि मनुष्यबळ यांची सारखी टंचाई भासूं लागली. व यामुळें त्यानें वारंवार नवीन हुकूम काढले व स. १५५० मधील हुकूम फार सक्तीनें अंमलांत आणला. याचा उद्देश, प्रॉटेस्टंट लोकांच्या त्रासाचा समूळ नायनाट करावयाचा असा होता. याप्रमाणें नवीन प्रॉटेस्टंटपंथी लोकांना जिवंत गाडण्यांत आलें. परंतु, ही सुधारणेची लाट कांहीं केल्या थांबली नाहीं. चार्लस हा या अवाढव्य राज्याचा कारभार पाहून त्रासला होता. त्यानें १५५५ सालीं राज्यत्याग केला, तेव्हां दुसरा फिलिफ हा गादीवर बसला. त्यानें फ्रेंचांचा १५५७ सालीं सेंटक्वेंटिन व १५५८ सालीं ग्रॅव्हेलाईन्स येथें पराभव केला. यामुळें केटा कॅम्ब्रेसिस येथील तहाचीं कलमें त्याला अगदीं अनुकूल अशीं होतीं. फिलिफ हा स्पॅनिअर्ड असल्यामुळें त्याची नेदर्लंडमधील प्रजा त्याच्याविषयीं नेहमीं साशंक असे. फिलिफ हा स. १५५९ या वर्षी ब्रुसेल्सहून स्पेनमध्यें गेला, तो पुन्हां परत आला नाहीं.

त्यानें ५ व्या चार्लसची मुलगी मार्गारेट हिच्या हातीं नेदर्लंडचा सर्व कारभार दिला. तिनें सुद्धां राज्यकारभार फार शहाणपणानें केला. तिच्या मदतीस ३ मंत्री देण्यांत आले होते. त्यांपैकीं कार्डिनल ग्रॅनव्हिले हाच खरा राज्यकारभार पाहणारा होता असें म्हटलें असतां चालेल. हा अत्यंत लायख आणि विचारी असा मनुष्य होता. नवीन धर्मपीठें आणि स्पेनचें सैन्य यामुळें नेदर्लंडमधील लोकांत असंतोष पसरला. तेव्हां स्पेनचें सैन्य १५६१ सालीं परत धाडण्यांत आलें. याच सुमारास दुसरी एक अडचण उपस्थित झाली. नासॉचा विल्यम, ऑरेंजचा राजा, फिलिफ दि मॉंटमॉरेन्सी, हूर्नचे सरदार इत्यादि फार वजनदार अशा नाईट ऑफ फ्लीस सभेच्या सभासदांस निव्वळ नामधारीच सभासद बनविल्यामुळें त्यांनीं आपल्या जागेचा राजीनामा दिला व ग्रॅनव्हिले यास काढून टाकण्याविषयीं राजास त्यांनीं अर्ज केला.याप्रमाणें १५६४सालीं ग्रॅनव्हिले ब्रुसेल्स सोडून गेला.

१५६३ सालीं ट्रेंटच्या सभेचें कार्य संपलें, व तिनें मंजूर केलेले हुकूमनामे चोहोंकडे अंमलांत आणण्यांत आले. यामुळें नेदर्लंडमध्यें जिकडे तिकडे धार्मिक छळ सुरू झाला.मोठमोठ्या गव्हर्नरांनीं असले हुकूम अंमलांत आणण्याऐवजीं राजीनामे दिले. १५६६ सालीं "दि रिक्वेस्ट" नांवाचा अर्ज मार्गारेटकडे पाठविण्यांत आला व जेव्हां ही सारी मंडळी तो अर्ज घेऊन मार्गारेटजवळ पोंचली, तेव्हां तिच्या तीन सल्लागारांपैकीं एक बार्लेमॉंट तिला म्हणाला "काय बाईसाहेब, आपण या भिकाऱ्यांना इतके कां घाबरतां?" यामुळें नेदर्लंडमध्यें देशाभक्तांचा "दि बेगर्स" म्हणजे दरिद्री या नांवाचा एक पक्षच निर्माण झाला.

तेव्हां ऑरेंजचा विल्यम, हूर्न इत्यादि मंडळी स्पेनमध्यें नेदर्लंडमधील नाजुक परिस्थिति समजावून सांगण्यासाठीं गेली. यांचा फिलिपनें चांगला सत्कार केला.परंतु त्यानें त्यास स्पेनमध्यें अडकवून ठेवलें. इकडे लोकांचा संताप जास्तच वाढत गेला. भर दिवसां मोकळ्या पटांगणांत लोकांच्या सभा भरूं लागल्या आणि कॅल्विनिस्ट धर्मगुरूंचीं व्याख्यानें धडकून होऊं लागलीं. या व्याख्यानांचा असा परिणाम झाला कीं, लोक मूर्तिभंजकांचा उघड उघड पुरस्कार करूं लागले, व त्यामुळें लोकांनीं चर्चमधील मूर्ती, तसबिरी, व्यासपीठें वगैरे फोडण्यास आणि तोडण्यास सुरवात केली, व या सर्व गोष्टींचा कळस ॲन्टवर्पच्या भव्य मंदिराची विटंबना करण्याच्या प्रसंगांत झाला. तेव्हां फिलिपनें आल्वाच्या ड्यूकास नेदर्लंडमध्यें या भ्रष्ट लोकांचा पुरता नायनाट करण्याकरितां धाडिलें.

आरेंजचा विल्यम हा कांहीं यावेळीं स्वस्थ बसला नव्हता. त्याला पुढें कांहीं विपरीत घडणार हें कळलेंच होतें. त्यानें एग्मांट व हूर्ने यांचें मन वळविण्याचा यत्न केला पण जेव्हां ते राजाविरुद्ध त्यास मिळेनात, तेव्हां तो पळून गेला.

१५६७ सालीं २००० मूर्तिभंजकांचे राईराई एवढे तुकडे करण्यांत आले. लवकरच आल्वा नेदर्लंडमध्यें आला. त्यानें "संकटकालीन सभा" बोलाविली. तिला लोकांनीं "रक्ततृष्णेची सभा" असें नांव दिलें. या सभेचें काम म्हणजे न्याय देण्याचा फार्स करणें हें होतें. लोकांनां धरून आणून त्यांनां शिक्षा ठोठवावयाची हा या सभेचा मुख्य उद्देश होता. यावेळीं असंख्य लोक इंग्लंड आणि जर्मनी देशांत पळून गेले. आरेंजच्या राजाची मालमत्ता सरकारजमा करण्यांत आली व त्याला बंडखोर म्हणून ठरविण्यांत आलें. लौकरच त्याचा मुलगा फिलिफ विल्यम यास माद्रिद येथें पळवून नेण्यांत आलें. इकडे विल्यमनें फ्रेंच सैन्य उभारलें. व त्याच्या भावानें फ्रीसलंडवर स्वारी केली. हेलीजरली येथें त्यानें स्पेनच्या सैन्याचा पराभव केला. परंतु आल्वा यानें लुईची लौकरच अगदीं दाणादाण उडवली. १५६८ त एग्मांट व हूर्ने यांचा शिरच्छेद करण्यांत आला.

१५६९ त लढाईचा खर्च भागविण्यासाठीं आल्वानें मोठमोठे कर लादले व ते तो जबरीनें वसूल करूं लागला. इकडे विल्यम आणि लुई यांनीं पुन्हां दुसऱ्यांदा उठावणी करण्याची तयारी चालविली होतीच. १५६९ या वर्षीं आरेंजच्या विल्यमनें स्पेनच्या व्यापारी गलबतांवर छापा घालण्याचा मनसुबा केला. त्यानें दर्यावर नुसता कहर उडवून दिला. रोमन कॅथोलिक भट किंवा इतर लोक त्याच्या हातीं लागतांच त्यानें त्यांचा अतोनात छळ केला. याप्रमाणें त्यानें आल्वाच्या दुष्ट कृत्यांचा सूड घेण्यास सुरवात केली. १५७२ त त्यानें ब्रिल शहर एकदम घेतलें. याप्रमाणें त्यानें हळू हळू शहरें घेण्यास सुरवात केली. आरेंजला मिळालेल्या या जयामुळें चोहोंकडे बंड व्हावयास लागलीं, व तीन महिन्यांत एक ॲमस्टरडॅम खेरीजकरून सर्व हॉलंड बंडखोरांच्या हातीं लागलें.

इकडे नासूच्या लुईनें मॉन्स शहरास वेढा देऊन तें घेतलें. तेव्हां एक मलें मोठें स्पेनचें सैन्य तेथें जाऊन त्यानें लुईला मॉन्समध्यें कोंडलें. त्याला मदत करण्याकरितां विल्यम हा एक एक शहर जिंकीत जिंकीत पुढें निघाला. इतक्यांत त्याला बार्थेलोम्यू येथील कत्तलीचें वृत्त कळलें. त्यानें मॉन्सचा वेढा उठविण्याचा प्रयत्न केला परंतु त्यांत त्याला अपयश आलें. तेव्हां मॉन्स स्पेनच्या सैन्याच्या हातीं लागलें. यामुळें आरेंज डरला नाहीं. सर्व हॉलंड देशानें त्याला आपला मुख्य अधिकारी म्हणून म्हटलें आरेंज यानें आपलें कायमचें राहण्याचें ठिकाण डेल्फ्ट हें शहर केलें. आल्वाच्या मुलानें झुटफेन शहर घेतलें व नार्डेनच्या लोकांची अत्यंत निर्दयपणें कत्तल उडविली. नार्डेनच्या कत्तलीस इतिहासकालीन जुलमी गोष्टींच्या शिरोभागीं बसविण्यास कांहींच हरकत नाहीं.

हारलेम शहरचा वेढा हा नेदर्लंड्च्या इतिहासांत फार प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें अल्कमारचाहि वेढा फार प्रसिद्ध आहे. लोकांनीं समुद्राचा बांध फोडला तेव्हां आल्वाचा मुलगा डॉनफ्रेडेरिक यास एकदम मागें पाय काढावा लागला. १५७३ त आल्वाच्या आरमाराचा पराभव करण्यांत आला. १५७३ त आल्वानें त्रासून राजीनामा दिला. त्याच्या नंतर डॉनलुई रिक्वेसेनस हा गव्हर्नर जनरल होऊन आला. १५७४ त स्पॅनिश लोकांचें मिडलबर्ग हें शहर गेलें. पुढें मार्चमध्यें निज्मवेजन येथें नासूच्या लुईचा पराभव झाला व यांत तो मारला गेला. १५७४ त लीडनचा वेढा परतविण्यांत आला. या जयानिमित्त लेडनला एक विश्वविद्यापाठाची स्थापना झाली. विल्यमला १५७५ वर्ष फार त्रासदायक गेलें परंतु १५७६ या वर्षीं रेक्वेसेनेस हा मरण पावला. याच वर्षीं हॉलंड व झीलंड या देशांचा एक संघ बनविण्यांत आला. विल्यमकडे या देशांतील सैन्याचें सेनापतित्व देण्यांत आलें. १५७६ त वॅलून आणि स्पॅनिश सैन्यांत बंड होऊन झीलंडचा बचाव झाला. या बंडास "स्पॅनिश फ्यूरी" असें म्हणतात. ब्रुसेल्स येथें तह होऊन त्या तहान्वयें कॅथोलिक आणि प्रॉटेस्टंट लोकांस समान रीतीनें वागविण्यांत यावें, स्पेनचा राजा हा कायद्याच्या दृष्टीनें राजा मानण्यांत यावा, व आरेंज यास हॉलंड व झीलंडचा गव्हर्नर नेमावें असें ठरलें. मध्यंतरीं फिलीफ बादशहानें आस्ट्रियाच्या डॉनजॉन यास नेदरलँड्चा गव्हर्नर जनरल नेमलें. घेंट येथील तहाच्या अटी त्यानें मान्य केल्याशिवाय त्याचा हुकूम मानावयाचा नाहीं असा राजमंडळानें आग्रह धरिला. याच सुमारास "युनिअन ऑफ ब्रूसेल्स" या तहान्वयें विल्यमची बाजू फार बळकट झाली. यामुळें डॉनजॉनला घेंटच्या तहाच्या अटी मान्य करणें भाग पडलें. सन १५७७ मध्यें "कायमची राजाज्ञा" फाडण्यांत आली व याप्रमाणें हॉलंड आणि झीलंडचें मुख्याधिकारीपद आरेंजकडेच ठेवण्यांत आलें. परंतु, आरेंजसारख्या धूर्त राजकारणकुशलास यांतील डाव उमगला,व त्यानें ही आज्ञा हॉलंड व झीलंडमध्यें प्रसिद्ध करण्याचें नाकारलें.

डॉनजॉन पहिल्या मेस ब्रुसेल्समध्यें शिरला. परंतु त्याच्या हातीं कांहींच सत्ता नव्हती. त्यानें सत्ता संपादण्याचा प्रयत्न केला, परंतु अखेर त्यास ब्रुसेल्स सोडून जावें लागलें. तेव्हां ब्रुसेल्समध्यें आरेंजनें प्रवेश करून ब्रुसेल्स, ॲंटवर्प व घेंट येथील स्पॅनिश सैन्य त्यानें घालवून लावलें. त्याचा ब्रुसेल्समध्यें फार सत्कार झाला व याप्रमाणें सर्व नेदरलँड्चा तो पुढारी बनला.

उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील प्रॉटेस्टंट आणि कॅथोलिक यांच्यामधील वैमनस्य फार खोलवर रुजलें होतें, व त्याप्रमाणें डच आणि वेल्जम हीं दोन राष्ट्रें कालाच्या ओघाबरोबर वहात चाललीं होतीं. ६ आक्टोबरला कॅथोलिक लोकांनीं गुप्तपणें बादशहाचा भाऊ आर्चड्यूक मॅथिआस

यास ब्रुसेल्स येथें बोलावून आणलें. आरेंजच्या मनांत त्याचा सत्कार करून आपलें कार्य साधावें असें होतें. कारण मॅथिआस नुसता राजा करून आपल्या हातीं सर्व राजसूत्रें ठेवावीत असा त्याचा इरादा होता.

परंतु ह्यावेळीं फिलिफचें धावें दणाणलें. त्यानें अलेक्झांडर फारनीजबरोबर २० हजार सैन्य देऊन त्यांस डॉनजॉनच्या मदतीस धाडलें. १५७८ या वर्षी डॉनजाननें नेदर्लंडच्या लोकांचा नामूर येथें पराभव केला.यावेळीं अँज्यूच्या ड्यूकनें चाल करून मॉन्स शहर घेतलें. याच वेळीं जॉन कासिमीर हा जर्मन सैन्य घेऊन नेदर्लंडमध्यें घुसला. या आणीबाणीच्या प्रसंगीं आरेंजची राजकारणपटु बुद्धिमत्ता अत्यंत विशदपणें चमकूं लागली. त्यानें अँज्यूला नेदर्लंडच्या स्वातंत्र्याचा कैवारी अशी बहुमानास्पद पदवी दिली.इकडे एलिझाबेथ राणी, हेनरी नॅव्हारे,जॉन कासीमीर याच्याबरोबर राष्ट्रीय कार्यास मदत देण्याप्रीत्यर्थ त्यानें बोलणें सुरू केलें. इतक्यांत डॉनजॉन हा ऑक्टोबर महिन्यांत मरण पावला. तेव्हां फिलिफ बादशहानें आलेक्झांडर फारनीज यास डॉनजॉनच्या जागीं नेमलें. हा अत्यंत शूर आणि राजकार्यधुरंधर होता. त्यानें हां हां म्हणता कॅथोलिक लोकांचें मन राजपक्षाकडे वळविलें. कॅथोलिक लोकांनां स्वदेशीय प्रॉटेस्टंट लोकांचा जुलूम सहन होईना. त्यांनां परकी अंमल परवडला.याप्रमाणें त्यांनीं ब्रुसेल्सच्या सभेतर्फे राजाविषयींची आपली पूर्ण राजनिष्ठा व्यक्त केली. इकडे उत्तरेकडील हॉलंड, झीलंड, यूट्रेच, गेल्डरलंड, झुटफेन यांनीं युट्रेचला सभा बोलावून तींत पुढील गोष्टी ठरविल्या. यायोगें उत्तरेकडील प्रांत हे जणूं एकच प्रांत आहेत असे एकत्रित बांधले गेले. परकी सत्तेला वित्त आणि प्राण यांची आहुती देऊन घालवून लावावयाचें, व धर्माच्या बाबातींत पूर्ण मोकळीक ठेवावयाची असा या सभेंत ठराव पास झाला. विल्यमच्या मनांत सतराहि प्रांतांचें एकीकरण व्हावें असें होतें परंतु ही गोष्ट आतां अशक्य होती. यापुढील इतिहास हा हॉलंड आणि बेल्जम या वेगवेगळ्या देशांचा असल्यामुळें तो त्या नांवाखालीं पहा.

**नेपल्स**—इटली. सिसिलीची राजधानी. लोकसंख्या १९१५ सालीं ६९७९१७ होती. हें शहर नेपल्सच्या उपसागराच्या उत्तर किनाऱ्यावर असून उत्तर अक्षांश ४०° ५२' आणि पूर्व रेखांश १४° १५' ४५" यांवर आहे. रेल्वेनें रोमपासून हें मैल १५१ आहे.

येथें व्होमेरो नांवाची एक प्रेक्षणीय टेंकडी असून सुंदर आणि रुंद अशी रीव्हिएरा सडक व व्हिलाकॉमूनेल नांवाचे सार्वजनिक बगीचे आहेत. टोलेडो हा येथील सर्वांत प्रसिद्ध असा रहदारीचा रस्ता आहे. रॉबर्ट राजानें १३४३ सालीं बांधलेला सेन्ट एल्मो नांवाचा किल्ला याचा लष्करी कैद्यांचा तुरुंग म्हणून हल्लीं उपयोगांत आणला जातो. नुओव्हो किल्ल्यांत १४७० सालीं पहिल्या अल्फान्सोच्या स्मरणार्थ उभारलेली एक भव्य कमान आहे. येथील राजवाड्यांत नेपल्स येथील सर्व नामधारी राजांचे पुतळे उभारलेले आहेत.

हें शहर रोमन कॅथॉलिक पंथाच्या आर्चबिशपचें रहाण्याचें ठिकाण असून येथें २३७ प्रार्थनामंदिरें आहेत. त्यांपैकीं सेंन्ट जानुआरीस, सानडोमेनिको मॅजिओर आणि सानलॉरेन्झो हीं फार प्रसिद्ध आहेत येथील राष्ट्रीय पदार्थसंग्रहालयांत एक वाचनालय असून त्यांत सुंदर तसबिरी आहेत. येथील विद्यापीठांत गणितशास्त्र,वाङ्मय,वैद्यक आणि सृष्टिशास्त्र अशा चार शाखा आहेत. प्राथमिक शिक्षणाकरितां येथें ९० शाळा आहेत. आंधळे, बहिरे आणि मुके या लोकांकरितां येथें शाळा आहेत. येथें रॉयल नॅशनल आणि गियाकोमो अशीं दोन वाचनालयें आहेत. सानकार्लो आणि बेलिनीशिवाय पुष्कळ नाटकगृहें येथें आहेत. गोरगरिबांच्या सोयीकरितां धर्मादायसंस्था आणि रुग्णालयें येथें आहेत.हल्लीं येथें रेशीम,कापूस, ताग,लॉकर यांचे आणि जहाजें बांधण्याचे कारखाने आहेत. १८८४ सालच्या कॉलऱ्याच्या रोगानंतर या शहराचा बराच भाग मोडून नवीन बांधण्यांत आला.

इ ति हा स.—हें शहर मूळचीं ग्रीक लोकांची वसाहत होती. सांप्रत जेथें नेपल्स शहर आहे तेथें पूर्वी पार्थिनो नांवाची वसाहत होती. येथील लोकांनां अथेन्स आणि कॅलचीस लोक मिळाल्यावर त्यांनीं एक नवीन शहर वसवून त्यास निआपोलिस हें नांव दिलें. इसवी सनापूर्वी ३२८ मध्यें पेलिऑपोलिस येथील लोकांनीं रोमच्या दोस्तराष्ट्रांवर स्वारी केल्यामुळें पब्लिलिअसफिलो नांवाच्या सेनापतीनें त्या शहरास वेढा देऊन तें काबीज केलें. नेऑपोलिस येथील लोकांनीं रोमचें सार्वभौमत्व कबूल केल्यामुळें त्यांच्या स्वातंत्र्यास मुळींच धक्का पोहोंचला नाहीं पिह्रस आणि हॅनिबॉलनें हें शहर काबीज करण्याचे प्रयत्न केले पण त्यांत त्यांनां यश आलें नाहीं.

रोमन राष्ट्राच्या ऱ्हासानंतर गॉथिक युद्धांत या शहराचें बरेंच नुकसान झालें. ५४२ सालीं टोटिलानें हें शहर काबीज केलें. पुढें कांहीं दिवस हें शहर रॅव्हेनाच्या लोकांच्या ताब्यांत होतें. लॉंबर्डसच्या स्वारीमुळें बराच भाग परक्यांच्या ताब्यांत गेला. पोपला तिसरा ग्रेगरी ह्याचा आधार मिळाल्यामुळें येथील लोकांनीं प्रजासत्ताक राज्य स्थापिलें. कॅपुआचा राजपुत्र चवथा पँडुल्फ यानें हें १०२७ सालीं काबीज केलें होतें परंतु सरजीअस ड्यूकनें नॉर्मन लोकांच्या मदतीनें त्याच्यापासून परत घेतलें. यावेळेपासून खरी सत्ता नॉर्मन लोकांच्या हातांत होती. दक्षिण इटली आणि सिसिली नॉर्मन लोकांनीं काबीज केल्यावर येथील प्रजासत्ताकपद्धतीचा नाश झाला.

**नेपाळ**—हिमालयाच्या पायथ्याशीं म्हणजे हिंदुस्थानच्या उत्तर सीमेवर ५२० मैल लांबीचें विस्तृत असें हें

एक एतद्देशीय स्वतंत्र संस्थान आहे. येथें गुरखे लोकांची वस्ती आहे. एकंदर लोकसंख्या ५०लाख; बहुतेक लोक हिंदु आहेत. नेपाळ शब्दाची उपपत्ति अशी आहे ( इं. अँ. पु. २२ पृ. २९२—९४ ). गुरखे लोकांच्या सर्व डोंगरी प्रदेशास हिमालयांतील हिंदु नसलेले डोंगरी लोक व तिबेटी लोक पाल म्हणतात; व पाल प्रदेशाच्या या भागास मूळचें नांव ने असावेंसें दिसतें. यावरून या भागांतील लोकांस हिंदु लोक नेवार म्हणजे नेचे रहिवाशी म्हणतात. नेचा अर्थ आश्रयार्थ अथवा वसतीकरितां गुहांची जागा असा आहे इंडो-चिनी लोकांच्या बऱ्याच भाषांत नेचा अर्थ वसतिस्थान आहे. येणेंप्रमाणें नेपाळचा अर्थ पाल देशाचें ने म्हणजे वसतिस्थान, अथवा मुख्य ठिकाण अथवा देऊळ असा आहे.

प्र दे श.—क्षेत्रफळ ५४ हजार चौ. मैल उत्तरेस तिबेट; पूर्वेस सिकीमचें संस्थान व दार्जिलिंग जिल्हा; दक्षिणेस बंगाल व संयुक्तप्रांत; पश्चिमेस कुमाऊन व कालीनदी. उत्तरेकडील हिमालयाचा भाग अगदीं बर्फाच्छादित आहे. ह्या प्रदेशाचे चार भाग केले आहेत.—(१) तराई, (२) शिवालिक पर्वत, ( ३ ) हिमालयाचा प्रदेश उर्फ खाटमांडूचें खोरें (हिमालयाचा १०हजार फूट उंचीचा प्रदेश.) (४) अज्ञात हिमालयाचा प्रदेश ( ह्यांत एवरेस्ट शिखर व इतर बर्फाच्छादित प्रदेशाचा समावेश होतो. )

हिमालयाच्या इतर शिखरांचा उल्लेखः—नन्दादेवी२५७०० फूट); धवलगिरी (२६८२६फूट;; गोसैतान (२५३०५ फूट); व कांचनगंगा ( २८१४६ फूट ).

न द्याः—कौरिआला ( कर्णाली ) किंवा घोग्रा, गंडक, व कोसी. पश्चिम भागांतून शारदा नदी वाहते व ही नदी नेपाळ व कुमाऊनमधील सीमा आहे. काली, वाई आणि राप्ती ह्या नद्या गंगेस जाऊन मिळतातात.

मध्यप्रदेशाला नेपाळी लोक 'सप्तगंडकी' हें नांव देतात. ह्या सात गंडकी नद्यांमुळें धवलगिरी व गोसैतान ह्या दोन शिखरांमधील प्रदेशास पाणी मिळतें. अगदीं पूर्वेकडे त्रिशूळगंगा नदी वहाते. पूर्वप्रदेशाला सप्तकोसी हें नांव आहे व त्यापैकीं सानकोसी ही नदी मुख्य आहे. ह्या नदीमुळें कधीं कधीं मोठा पूर आला तर पिंकाचें व मालाचें फार नुकसान होतें. ह्या सर्वांपासून बराच निराळा असा खाटमांडूच्या भोंवतालचा प्रदेश होय. या भागांतून वाग्मती व विष्णुमती या नद्या वहातात. नेपाळांत मोठमोठे तलाव नाहींत. नेपाळच्या खोऱ्यापलीकडे पोखराच्या प्रदेशांत लहान लहान तळीं आहेत.

अ र ण्यें.—येथील वनशोभा फार मनोरम आहे. कांहीं भागाचा शेतकीकडे उपयोग केला असून अर्ध्याअधिक भागांत जंगल आहे.साल व शिसवी हीं झाडें जंगलांतील कांहीं भागांत विपूल आहेत. सर्व जंगल एकाच तऱ्हेचें नाहीं. कांहीं ठिकाणीं १० ते १५ फूट उंचीचें गवत वाढतें व तराईच्या पूर्वभागांत तर हत्तीला देखील मार्ग काढतां येणार नाहीं इतकें दाट व उंच गवत आहे. यांत मोठ्या व [illegible] आहेत. कांहीं कांहीं दऱ्याखोऱ्यांतून तांदुळाचें व मक्याचें पीक दृष्टीस पडतें. अगदीं पूर्वटोंकावर गौरीशंकर-शिखर आहे. ह्या प्रदेशाचें एकंदर नीट निरीक्षण करून त्याविषयीं अद्याप कोणीं माहिती दिलेली नाहीं. मेडली-कोटनें केलेले खाटमांडूच्या पश्चिमेकडील कांहीं शोध वाचनीय आहेत. डेहराडूनच्या दक्षिणेस असलेल्या सिवालिक पर्वताच्या ओळीप्रमाणेंच चुरिया घाटी म्हणून एक ओळ आहे. दोन्ही ठिकाणची जमीन सारखीच आहे.

प्रा णी.—तराईच्या दाट जंगलांत सर्व तऱ्हेचे वन्य पशु सांपडतात. जरी त्यांची संख्या आतां कमी होऊं लागली आहे तरी अजून असे कित्येक भाग आहेत, कीं ज्यांत सिंहादि हिंस्र पशूहि आढळतात. तराईंत रानटी हत्ती पुष्कळ आहेत पण त्यांस गोळी घालून न मारतां पकडावें असा नियम आहे. माणसाळलेल्या व रानटी हत्तींची झुंज झुंपवून त्यांस पकडण्याची इकडे चाल आहे.

ह वा मा न.—मे व डिसेंबरच्या दरम्यान तराईची हवा अतिशय पावसामुळें फार खराब व रोगकारक असते. तेव्हां येथें नवज्वराच्या तापाची साथ पसरते.येथील थारस लोकांवर ह्या सांथीचा कांहीं परिणाम होत नाहीं असें म्हणतात. उत्तरेस नेपाळच्या खिंडीच्या प्रदेशांत हवा फार उत्तम आहे. खाटमांडू येथें वार्षिक पावसाची सरासरी छप्पन्न पूर्णांक एक-द्वितियांश इंच असते.

प्रा ची न का ळ.—बृहत्संहितेंत ( ४. २२; ५. ६५ ) व प्रयागच्या समुद्रगुप्ताच्या शिलास्तंभांत नेपाळचा उल्लेख येतो. फाहिआन व ह्यूएनत्संग यांच्या प्रवासवर्णनांवरून सध्यां बौद्ध काळांतील संशोधनाचें काम सुरू आहे. कपिलवस्तूचें स्थान उत्तरेस तराईंत पडेरियाजवळ पुराव्यावरून निश्चित ठरलें आहे. गौतम बुद्धाचा ज्यांत जन्म झाला अशा शाक्य राजघराण्याचें हें राजधानीचें शहर होतें. नेपाळांत अशोकाचे कांहीं लेखस्तंभ असून त्यावरून अशोकाच्या प्रवासाची कल्पना येते. खुद्द नेपाळसरकारनें यूरोपीयन भूस्तरशास्त्रज्ञ व पुराणवस्तुसंशोधक लोकांच्या नेतृत्वाखालीं संशोधनाचें काम आपल्या हातीं घेतलें आहे. नेपाळ खोऱ्यांत बौद्ध लोकांचा केव्हां शिरकाव झाला हें अजून नक्की बाहेर आलें नाहीं. खि.पू.३०० च्या सुमारास ह्या धर्माचा झपाट्यानें प्रसार झाला असें कित्येकांचें मत आहे तर इ. स. च्या पहिल्या शतकांत प्रसार झाला असें कोणी म्हणतात. खाटमांडू येथून जवळच शंभुनाथ व बोधनाथ ह्यांच्या प्रसिद्ध समाधी आहेत नेपाळांतील सर्व कलाकौशल्यकाम चीनच्या धर्तीचें आहे. नेवार लोकांच्या वेळीं शिल्पकामास बराच वाव मिळाला.

रो ग.—संधीवात, बद्धकोष्टता, त्वग्रोग व (पावसाळ्यांत) महामारी, नवज्वर वगैरे रोगांचा इकडे प्रसार आहे. महामारीसारखा रोग तराईच्या भागांत फार आहे. इकडे [illegible] आला नाहीं असें म्हणतात.



राजवाड्यापुढील चौक, खाटमांडू.



स्वयंभू टेकडी ( खाटमांडूच्या पश्चिमेस दीड मैलावर )



बोधनाथाचें देऊळ. ( खाटमांडूपासून ३॥ मैल दूर )

